महर्षि श्रीवाल्मीकिप्रणीत

# योगवासिष्ठ

या ग्रंथाचें

## मराठी सुरस भाषांतर

### भाग तिसरा.

—:०:—

प्रकरण

निर्वाणप्रकरण उत्तरार्ध


भाषांतरकार

वे. शा. सं. विष्णु वामन बापट शास्त्री.



प्रकाशकः—बाळकृष्ण पांडुरंग ठकार मालक, गणेश विष्णु चिपळूणकर
आणि मंडळी, बुधवार पेठ, पुणें.

मुद्रक—अच्युत चिंतामण भट, यशवंत छापखाना, १२१ शनवार, पुणें सिटी.

शाके १८४९ प्रभवनाम संवत्सरे. | सन १९२७ इसवी.

# अर्पण-पत्रिका



पूर्णानंदस्वभावः स्वजनहितकृते माययोपात्तकायः ।
कारुण्यादुद्दिधीर्षुर्जनमनवरतं मोहपङ्के निमग्नम् ॥
आविश्यान्तर्वसिष्ठं बहिरपि कलयंशिष्यभावं वितेने ।
यः संवादेन शास्त्रामृतजलधिममुं रामचंद्रं प्रपद्ये ॥

जो आपल्या अव्यक्तरूपानें सर्व चराचराला व्यापून राहिला आहे; ज्याच्यामध्यें सर्व भूतें आहेत; परंतु जो मृगजलप्राय भूतांमध्यें नाहीं; ज्याच्यामध्यें पुढां वस्तुतः भूतें नाहींतच; परंतु असें असूनही जो ऐश्वरयोगरूप आहे, अशा त्या भगवंताच्या प्रेरणेनें प्रारंभ होऊन पूर्णतेला गेलेला हा ग्रंथ व त्या सच्चिदानंदस्वरूपी नारायणाचे प्रेरणेनें श्रीमत्सचिवकुलभूषण श्रीमंत सरकार पंडित रघुनाथराव शंकर ऊर्फ बाबासाहेब पंत-सचीव संस्थान भोर, यांच्या उदार आश्रयाखालीं तयार झालेला हा शेवटचा भाग श्रीमंत सरकारांची स्वधर्म-निष्ठा, त्यांची रसज्ञता, मार्मिकता व गुणग्राहकता.

इ० सद्गुण पाहून आणि परवानगी घेऊन
भगवद्‌ंश श्रीमंत पंतसचीवसाहेब
यांस कृतज्ञतापूर्वक अर्पण
केला आहे.

प्रकाशक.



श्रीसीतारामचंद्रप्रसन्न

# प्रकाशकाचे दोन शब्द.

**यत्कृतं यत्करिष्यामि तत्सर्वं न मयाकृतम्।**
**त्वया कृतं तु फलभुक्त्वमेव मधुसूदन॥ १॥**

भगवान् श्री षड्गुणैश्वर्यसंपन्न आत्मारामरूपी श्री सीतारामचंद्राच्या व आद्य कवि महर्षि वाल्मीकिमुनींच्या आशीर्वादानेंच आम्ही आज महर्षि वाल्मीकिमुनिप्रणीत बृहद्योगवासिष्ठाचा अंतिम भाग ( तिसरा ) प्रसिद्ध करून कृतकृत्य झालों आहों. या ग्रंथाचा पहिला भाग सन १९१६ सालांत व दुसरा १८ सालांत प्रसिद्ध केल्यावर आज सुमारें ४ वर्षांनीं हा शेवटचा भाग प्रसिद्ध होत आहे, ही अत्यंत खेदाची गोष्ट होय. ह्या भागाच्या प्रकाशनास कल्पनातीत उशीर झाल्यामुळें या ग्रंथास आतांपर्यंत जेवढे अल्पसंख्याक आश्रयदाते झाले आहेत त्यांना मात्र या भागाकरितां बराच काल तिष्ठत बसावें लागलें. त्यामुळें आम्ही त्यांच्या रोषास पात्र होणें संभवनीय आहे. इतकेंच नव्हे तर त्यांनीं आमच्यावर जे जे आरोप केले असतील ते ते सर्व सहन करून उलट त्यांच्याजवळ आम्हीं होऊनच क्षमा मागितली पाहिजे. इतक्या अक्षम्य उशीरानेंच हा भाग प्रसिद्ध होऊन येथेंच ग्रंथ समाप्त झाला आहे. परंतु आम्ही असें सर्वांनाच मुद्दाम कळवितों कीं, अशाच बिकट परिस्थितींतून एकेका पाउलानें पुढचा मार्ग शोधून आम्ही प्रवास करीत असल्यामुळें कल्पनातीत विलंबानें कां होईना हा ग्रंथ आमच्या ह्यातींत पूर्ण होऊन तो प्रसिद्ध झालेला आम्ही पहात आहों. या आनंदातिरेकांत आम्ही निमग्न असल्यामुळेंच आमच्या सर्व आश्रयदात्यांस त्या आनंदाचे यथाविभाग भागीदार करून त्यांचा रोष दूर करण्याचा प्रयत्न केल्यावरच त्यांच्यापाशीं क्षमेची याचना करीत आहों. आम्हांस पूर्ण खात्री आहे कीं, दोन भाग ग्रंथाचें अध्ययन करून शांतचित्त झालेले मुमुक्षु आश्रयदाते आम्हांस खरोखर आमच्या इच्छेनुरूप क्षमा करून नवीन आश्रयदाते मिळवून देतील व ग्रंथाच्या पूर्णतेनें झालेल्या आनंदांत भरच घालतील अशी खात्री आहे. शिवाय आतां ग्रंथाचा अपूर्णतादोषहि दूर झाला आहे. म्हणून आमच्या सर्व आश्रयदात्या बंधुभगिनींस आम्हीं आमचें हृत्कमल पूर्णपणें विकसित करून मोकळ्या मनानें मुद्दाम कळवितों कीं, आपण सर्वजण सध्यांच्या कालांत जितकें हें धर्मग्रंथप्रकाशनाचें काम सुलभ मानीत असाल तितकें तें खास नाहीं; हा आमचा स्वतःचा सोळा वर्षांचा अनुभव आहे. सर्वप्रकारें संपन्न असलेल्यांना सुद्धां जें काम अल्पावधींत करतां येणार नाहीं तेंच आमच्यासारख्या विपन्नग्रस्तांस " सर्वारंभास्तंदुलाः प्रस्थमूलाः " ( प्रत्येक दिवसाकरितां लागणाऱ्या शेरभर तांदुळांची चिंता वाहणारांस ) कसें शक्य असेल ! याचा सर्वांनींच शांतपणें विचार करावा अशी आमची आग्रहाची शिफारस आहे. तो केल्यास आमच्या म्हणण्याची सत्यता ध्यानांत येईल.

आज योगवासिष्ठग्रंथ पूर्ण झाल्याबद्दल आम्हीं आरंभींच भरपूर आनंद व्यक्त केला आहे. पण तो निर्भेळ सात्विक मात्र नाहीं. तर चिंताशबल-राजस-आनंद आहे, हेंही तितक्याच मोकळ्या मनानें सर्वांना कळकळीनें कळवीत आहों. कां कीं, हा ग्रंथ पूर्ण होण्यास खरें कारण आम्ही नसून आमच्याहून अगदींच त्रयस्थ असे तीन महात्मे गृहस्थ खरें कारण आहेत. त्यांतहि मुख्यत: श्रीमंत रा. रा. सखाराम गणेश ऊर्फ बापूसाहेब फडके राहणार कल्याण यांनाच सर्वांपेक्षां हा व्यवहार अधिक तापदायक झाला आहे. त्यांच्या उदारतेची व धर्मबुद्धीची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे. " मुलगी देऊन जांवयास आयुष्य चिंतावें लागतें " या म्हणीप्रमाणेंच

पहिल्या येण्याची तड लागण्याकरितांच त्यांना या भागाकरितां आणखीहि रक्कम देण्याचा प्रसंग आल्यामुळें आम्हीं त्यांना मोठ्याच पेचांत घातलें आहे. आमच्या विनंतीस मान देऊन त्यांनीं या भागाकरितां आणखी बरीच मोठी रक्कम दिल्यामुळें हा भाग प्रसिद्ध झाला. आणखी नवीन रक्कम देण्याचें त्यांनीं धाडस केलें नसतें तर हा भाग आणखी किती लांबला असतां तें त्या सर्वेश्वरासच माहीत. म्हणून सर्व महाराष्ट्रीय ग्रंथप्रेमींस आम्ही अत्यंत आग्रहाची विनंति करितों कीं, ग्रंथ अपूर्ण राहतो कीं काय अशी जी चिंता वाटत होती, ती सर्वेश्वरी कृपेनें दूर होऊन आतां ग्रंथ पूर्ण झाला आहे. तर परोपकार व धर्मग्रंथाचा प्रसार या पवित्र भावनेनें प्रेरित होऊन प्रत्येक ग्राहकानें आपआपल्या इष्टमित्रांस ग्राहक होण्याची शिफारस करावी व त्या सर्व उदारधी महात्म्यांच्या हृद्रोगाचा परिहार करावा, अशी आमची सर्वांना आग्रहपुरस्सर प्रार्थना आहे. ज्या सकल गुणसंपन्न परमेश्वरानें फडकेप्रभृति महात्म्यांना आपलें तन, मन, धन वेंचण्यास प्रेरणा केली, तोच दयाघन श्रीराम सर्व महाराष्ट्रीयांस ग्रंथाचा संग्रह करण्याची प्रेरणा करून सर्वांनाच चिंतामुक्त करील असा आम्हांस पूर्ण विश्वास आहे. संपूर्ण योगवासिष्ठ, आणि भारत--भागवताचे उपसंहार यांचा सर्वांनीं एकदम संग्रह केल्यास ग्रंथाच्या पूर्णतेनें झालेला आनंद कायम राहून आमचा वृद्धापकाल आम्हांस सुखकर जाईल. शिवाय आमच्या वयोमानानें व प्रकृतिमानानें प्रस्तुत पुस्तक हें आमच्या आयुष्यांतील शेवटचें ठरणार असें वाटत आहे. कारण या कालांत धर्मग्रंथांवर श्रद्धा ठेवून जाहिरातीनें ग्रंथाची मागणी करणारे हरीचे लाल—' मनुष्याणां सहस्रेषु कश्चित् ' या भगवदुक्तीप्रमाणें क्वचितच आढळतात, असा हा आमचा व्यवसाय करूं लागल्यापासूनचा—सुमारें दीड तपाचा अनुभव आहे. " तुम्हीं हातीं घेतलेल्या कामाकरितां जगाचें मुळींच अडलेलें नाहीं. ललितवाङ्मय, राजकीयवाङ्मय, याची आज लोकांना जितकी गोडी व जरूर आहे तितकी या पुराणवाङ्मयाची नाहीं. तर हें भारूड सर्वांचे माथीं मारून तुम्हीं घरोघर अडचण मात्र केली आहे." इत्यादि बोलणारेच फार भेटले आहेत व ते कोणी सामान्य असते, तर आम्ही त्यांचा फारसा विचारहि केला नसता. पण सर्वगुणसंपन्न म्हणविणारांनींच आम्हांस अशा प्रकारचें पांडित्य ऐकविलें आहे. म्हणून आम्हीहि निश्चयपूर्वक असें म्हणतों कीं, " जानंति ते किमपि तान्प्रति नैष यत्नः । उत्पत्स्यतेऽस्ति मम कोपि समानधर्मा कालोह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी " या कविकुलगुरूच्या उक्तीप्रमाणें अंगीकृत कार्य तडीस लावावयाचा निर्धार करूनच कर्तव्य करावयाचें. मग त्याचा परिणाम कसाही होवो ! अस्तु.

सन १९०२–३ सालापासून आतांपर्यंत "चिपळूणकर मंडळीनें" प्रस्तुत ग्रंथासह अत्यंत मोठे, अत्यंत बोधप्रद, चतुर्विध पुरुषार्थदायक आणि मुख्यतः महाराष्ट्रीय वाङ्मयाला आधारभूत असे चार धर्मग्रंथ प्रसिद्ध करून सर्वसाधारण साक्षर जनतेला त्याचा संग्रह करून अभ्यास करितां येईल अशीच जनतारूपी सर्वेश्वराची उपासना केली व गद्य वाङ्मयांत फारच मोठी भर घातली अशी अनेक समाजधुरीण ग्वाही देत आहेत. त्यांतल्या त्यांत तौलनिक व चिकित्सक दृष्टीनें ज्यांचा अभ्यास करितां येईल, असे निबंधात्मक दोन ग्रंथ—भारत—भागवतांचे उपसंहार—प्रसिद्ध केल्यानें वर्तमान चिकित्सायुगांत अनेक दृष्टींनीं शाणोल्लेखनसंस्कार केल्यावरही हीं भारत—भगवतादि ग्रंथरूपीं राष्ट्रीय निधींतील दिव्य रत्नें कशीं तळपत आहेत व या राष्ट्रांत पुनः पुनः नवजीवनाचा प्रवाह सोडून सर्व राष्ट्राला जागृति आणि प्रोत्साहन देण्यास कशीं समर्थ आहेत हें विचारवंत पुरुषांस सांगण्याची आवश्यकताच भासत नाहीं. आज सर्व देशभर जी जागृति झाली व होत आहे, तिला खरोखर कारण हेच ग्रंथ आहेत. पूर्वकालचे व प्रस्तुतचे सर्व समाजधुरीण याच सर्व ग्रंथांतील प्रमेयें उद्धृत करून लोकजागृतीचें अत्यंत जोखमीचें काम करीत आले व करीत आहेत. याच ग्रंथाच्या श्रवण-मनन—निदिध्यासानें स्वराज्यसंस्थापक छत्रपति शिवभूपति आणि भागवतधर्मप्रसारक ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास, लोकमान्य टिळक प्रभृति नररत्नें याच महाराष्ट्रांत जन्मलून

त्यांनीं आपापलीं नांवें अजरामर करून ठेविलीं आहेत. आसुरीसंपत्तीनें मदांध झालेल्या पाश्चिमात्य राष्ट्रांनीं स्वधर्माची कितीहि महती गाइली तरी, व कितीहि धडपड केली तरी त्यांना अखेरची शांति याच निमित्तुल्य ग्रंथांच्या अभ्यासानें प्राप्त होणारी आहे. तो अधिकार अन्य धर्मग्रंथाला नाहींच नाहीं, अशी आमची ठाम समजूत आहे. प्रस्तुत भौतिकशास्त्राचा अत्यंत विकास होऊन रोज रोज नवे नवे चमत्कार दृग्गोचर होत आहेत, तरी स्वतंत्र राष्ट्रांनासुद्धां अखेर आमच्या धर्मानें व्यक्त केलेल्या सात्विक शांतीची आवश्यकता भासूं लागली असून, ती प्राप्त व्हावी म्हणूनच सर्व राष्ट्रांचे प्रतिनिधी नित्य शांतिपरिषदा भरवीत आहेत. परंतु खऱ्या जिवंत, अमृतमय झऱ्याचा अजून कोणालाच थांग लागला नाहीं व तो असल्या वरवरच्या उपायांनीं लागणारही नाहीं, हें त्रिकालाबाधित सत्य आहे. जेव्हां प्रत्येक राष्ट्रांत सत्यनिष्ठा, जगन्नियंत्याच्या अस्तित्वाविषयीं पूर्ण भरंवसा, तत्प्रीत्यर्थ सात्विक तपोनुष्ठान, आपपरभावाचा पूर्ण लोप, शमदमादि साधनसंपन्नता, विश्वासयुक्त बुद्धीनें आप्त वाक्यांचें परिशीलनपूर्वक अध्ययन, अध्यापन, यावद्वस्तुजातांत ओतप्रोत परमेश्वरांश भरला असल्याबद्दलची दृढ श्रद्धा, इत्यादि सात्विक सद्गुणांचा सर्व राष्ट्रांतून पूर्ण विकास होऊन तदनुरूप आचरण घडेल, तेव्हांच त्या अमृतमय शांतिनिकेतनांत सुगम प्रवेश होऊन मगच अपार सुखसमृद्धि सर्वांच्या हस्तगत होईल आणि ती एकदां हस्तगत झाली म्हणजे सुराज्य, स्वराज्य, वैराज्य, यांचें जें आज महत्व वाटत आहे, तेंही भ्रामक असल्याची खात्री पटून अखेर सच्चिदानंदाशीं समरस झाल्यावर कशाचीच महती वाटणार नाहीं. असो.

सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, "चिपळूणकर मंडळीनें" तिच्यांतल्या अखेरच्या एकाच वृद्ध बालकानें अनेक संकटांना तोंड देऊन, नव्हे हें सामर्थ्य ज्यानें त्याला दिलें, त्या सर्वेश्वरानें दाखविलेल्या मार्गानें जाऊन परमेश्वरप्राप्तीच्या मार्गांतील दीपस्तंभांप्रमाणें असणारे प्रस्तुतच्या ग्रंथासारखे ग्रंथ प्रकाशित करून-जनतेपुढें ठेवून ईशप्राप्तीचा मार्ग सुलभ करून दिला आहे. त्यांचा संग्रह करून सद्भावनेनें अभ्यास केला, तर सर्वांचेंच ऐहिक पारमार्थिक कल्याण होऊन हा प्रचंड भवसागर गोष्पदप्राय वाटेल व सर्वच ईश्वरी अनुग्रहाला प्राप्त होतील.

महाराष्ट्रीय बंधुभगिनींनो, हा तुमचा परमहितचिंतक बंधु हात उभारून कंठरवानें वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें तुम्हाला प्रार्थना करीत असतां, तुम्ही सर्व गृहस्थाश्रमी असूनही त्याला निराश कराल काय? नाहीं, असें तुम्हीं खरोखरच करणार नाहीं, अशी त्याची पूर्ण खात्री आहे. म्हणून तीन भागांनीं युक्त असलेला योगवासिष्ठ ग्रंथ आणि भारत–भागवतांचे उपसंहार यांचा संग्रह करून व आपापल्या इष्टमित्रादिकांना संग्रह करण्याची शिफारस करून परलोकमार्गाच्या अगदीं नजीक पोचलेल्या बंधूचें प्राणोत्क्रमण सुखानें होऊन, तो निश्चित मनानें ईश्वराजवळ पोहोंचेल, अशा प्रकारची त्याला अखेरची भिक्षा घाला हेंच तो पुनः पुनः सर्वांना विनवून मागत आहे. तर त्याच्या या निर्वाणीच्या मागणीचा प्रेमानें स्वीकार करून ऋणरूपी नरकांतून त्याचा सत्वर उद्धार होईल असें कराच. यापुढें त्याच्याकडून आणखी कांहीं वाङ्मयाची व जनतेची सेवा होईल, अशी त्याला बिलकुल उमेद राहिली नाहीं. आतांपर्यंत झाली ही अखेरचीच सेवा होय, असेंच त्याला सद्यःस्थितीमुळें वाटत आहे.

येथपर्यंत या भागाच्या उशिराचें कारण सांगून आमची सद्यःस्थिति व भविष्यत्काळची आशा सर्वांपुढें उघड्या दिलानें मांडिल्यावर, आतां आम्हीं भाषांतरकार वगैरे साहाय्यक मंडळींचें अभिनंदन करून तूर्त तरी आश्रयदात्यांची रजा घेणार आहों.

या योगवासिष्ठ ग्रंथाचें भाषांतर एकाच व्यक्तीकडून तयार व्हावें अशी आमची प्रबलतम इच्छा होती. परंतु ती सर्वेश्वरी संकल्पाला सोडून असल्यामुळें सफल झाली नाहीं. अर्थात् दोन भाषांतरकार मिळून हें काम झालें व त्याबद्दलचा खुलासा पहिल्या व दुसऱ्या भागाच्या प्रस्तावनेंत

केला आहे. अखेर या ग्रंथाच्या पूर्णतेचें श्रेय सर्वेश्वरी अनुग्रहानें आचार्य पाक्षिक व ब्रह्मविद्याग्रंथ-रत्नमाला यांचे संपादक वे. शा. संपन्न विद्वन्मान्य, श्रीयुत विष्णु वामन बापटशास्त्री यांनाच लाभलें ही अभिनंदनीय गोष्ट होय. शास्त्रीबोवांची लेखनशैली, काम करण्याचा धडाका, करारी स्वभाव वगैरे गोष्टी सुप्रसिद्ध असून ते महाराष्ट्रीयांचे चिरपरिचित आहेत. तेव्हां त्यांचा परिचय करून देण्याची मुळींच गरज नाहीं. नुकतेच शास्त्रीबोवांनीं जे भगवद्गीताभाष्यार्थ व सुबोधगीता—हे दोन ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत, तेच धडाक्यानें काम करण्याची त्यांच्याबद्दलची साक्ष पटवीत आहेत. हीं दोन्ही पुस्तकें शास्त्रीबोवांनीं खरोखरीच एकाच वर्षांत लिहून प्रसिद्ध केलीं आहेत.

योगवासिष्ठ हा ग्रंथ एकाच भाषांतरकाराकडून लिहिला जावा अशी आमची इच्छा असतांना ती जशी सफल झाली नाहीं तशी ती छापण्यांतही झाली नाहीं. दुसऱ्या भागाची छपाई दोन छापखान्यांत मिळून झाल्यामुळें त्यांत थोडा विसंगतपणाच आला आहे. पण यास कारणही ईशेच्छाच मानली पाहिजे.

कालवैचित्र्यानें व आमच्या पूर्व जन्मसंस्कारानें " चिपळूणकर मंडळींच्या " कार्याशीं आमचा प्रत्यक्ष संबंध जडल्यापासून ( ता. १।५।०६ इसवीपासून आतांपर्यंत ) एका गोष्टीशिवाय बाकी सर्व बाबतींत आमची पूर्ण निराशाच झाली असून व्यवहारांत अनेक घटना झाल्या, तरी अंतीं कल्पनातीत हाल अपेष्टाच आमच्या वांट्यास आल्या आहेत. हें काम करितांना ज्याच्या हातानें सोळा वर्षांत सवालाखाची घडामोड झाली, त्याला वयाच्या पूर्ण उत्तरार्धांत असहाय असा एकाकी राहून उर्वरित आयुष्यांत उपजीविकेविषयीं दुःखयुक्त निःश्वास सोडण्याचा प्रसंग यावा यापेक्षां दुसरें दुर्भाग्य कोणतें असणार ? परंतु, " विपदः संतु नः शश्वद्यासु संकीर्त्यते हरिः " किंवा, " यस्यानुग्रहमिच्छामि तस्य सर्वं हराम्यहम् " अथवा, ' योऽसौ विश्वंभरो देवो स किं सुप्तोथवा-मृतः " इत्यादि सदुक्तींवर आमची दृढ श्रद्धा असल्यामुळेंच निर्लज्जपणा पतकरून जनतारूपी सर्वे-श्वरापुढें वस्तुस्थितीचें आविष्करण केलें आहे. बंधुजनहो, सोळा वर्षांच्या गतकालांत समाधान मानण्यासारखी एकच गोष्ट घडली आहे ती ही कीं, " चिपळूणकर मंडळीचे " सर्व मेंबर हयात असतांना सर्वांनीं मिळून केलेली प्रतिज्ञा--उपसंहारासहित अठरा वर्षे महाभारत प्रकाशित करण्याची--अखेर श्री गोपाल कृष्णाच्या कृपेनें एकाच्याच हातानें पूर्णतेस जाऊन, हरिवंशपर्वासहित सर्व महाभारत दहा भागांत प्रसिद्ध झालें ही होय. महाभारत तर संपलेंच. परंतु, त्यानंतरही योगवासिष्ठ भाग तीन, श्री भागवतादर्श--भागवताचा उपसंहार-महाभारताच्या उपसंहाराचें हिंदी भाषांतर आणि बालबोधिनी नांवाची समूल, सान्वय, सार्थ भगवद्गीता, इतकें कार्य यदृच्छेनेंच घडून संकल्पित कार्य अर्धवट न राहतां किंवा कोणा तिऱ्हाइताकडे त्याचा संबंध न पोंचतां मंडळीकडूनेंच परमेश्वरानें करविलें ही परमानंदाची गोष्ट आहे. आणि याच आनंदांत बाकीच्या खेदजनक गोष्टींची फारशी भीति वाटत नाहीं. अस्तु.

वर दर्शविलेल्या वस्तुस्थितीचा या घटिकेपर्यंत आम्ही अनुभव घेत आहों तरी " देव करी तरी काय एक नोहे " या सदुक्तीवर आमचा अढळ विश्वास व जन्मांतरीय सुकृतानें ईश्वरी कृतीवर पूर्ण निष्ठा असल्यामुळें, सर्वसाक्षी, सर्वांतर्यामी प्रभू सर्व महाराष्ट्रीय बांधवांस प्रेरणा करून याही भयंकर आघातापासून आम्हांस वांचवून अखेरची इच्छा पूर्ण करील अशी अजूनही पूर्ण खात्री आहेच आहे, इतकें करूनहि जर हा अंतिम हेतु ( आमच्या डोळ्यादेखत मंडळी ऋण-मुक्त होण्याचा ) नच पूर्ण झाला, तर सर्वांचेंच भाग्य म्हणावें अथवा ऋणको व धनको या उभय-तांच्या पुढील जन्माची ही तयारी म्हणून समाधान मानावें हेंच निर्विवाद ठरतें.

या योगवासिष्ठ ग्रंथाचे आरंभाचे भाषांतरकार कै० रामकृष्ण वासुदेव बरवे यांनीं पहिल्या भागांत ग्रंथाचा उपोद्घात म्हणून मजकूर लिहून ग्रंथाच्या अखेरीस महाभारतादिकांच्या उपसंहारा-

प्रमाणें स्वतंत्र उपसंहार लिहिण्याची इच्छा व्यक्त केली होती. परंतु मूळ भाषांतरहि त्यांच्या हातून पुरें झालें नाहीं आणि दुसरा भाग अर्धाच जर त्यांनीं सोडिला तर सर्व ग्रंथ पूर्ण झाल्यावर उपसंहार लिहिणें अशक्यच होतें. कै. हरि नारायण आपटे यांनीं महाभारताच्या पहिल्या भागांत उपोद्घात देऊन उपसंहार लिहिण्याचें आश्वासन दिलें होतें, परंतु त्यांना बारा वर्षांचा अवधि मिळाला होता, तरी जसें त्यांच्याकडून कांहींच झालें नाहीं, तसाच प्रकार बरवे हयात असते तरी त्यांच्याकडून झाला असता. असो. "गतं न शोचामि" म्हणून आम्ही प्रस्तुतचे भाषांतरकार वे. शा. संपन्न बापटशास्त्रीबोवांना "प्रसिद्ध झालेल्या उपोद्घातास अनुरूप असे कांहीं विचार सुचल्यास प्रयत्न करून पहा." अशी विनंति केली होती. पण त्यांनींहि समाधानकारक असा कांहींच जबाब दिला नाहीं. असें आहे तरी अजूनही आम्ही योगवासिष्ठावर उपसंहारात्मक ग्रंथ लिहिला जाऊन तो प्रसिद्ध करण्याचा योग यावा म्हणून लेखक धुंडाळीत आहों. आमच्या एका विशेष परिचयाच्या अधिकारी गृहस्थास विनंति केली असतां, त्यांनीं "उपसंहारावर उपसंहार" काय लिहावयाचा ? असा जबाब दिला. म्हणजे त्यांच्या म्हणण्याचा आशय असा कीं, मूळ रामायणाचाच योगवासिष्ठ हा उपसंहार आहे, असेंच त्यांचें मत आहे. दुसऱ्या एका अधिकारी गृहस्थांसहि आम्ही विनंति केली, त्यावरून त्यांनी ग्रंथाच्या वाचनास आरंभ केला आहे. पहावें श्रीरामजी काय योग आणितात तें.

रा. ब. सी. व्ही. वैद्य यांनीं महाभारताचा उपसंहार लिहून दिल्यावर रामायणावर असाच विस्तृत ग्रंथ लिहून द्या म्हणून विनंति केली होती. परंतु ती त्यांनीं इतर व्यवसायांमुळें नाकारिली. शिवाय त्यांनीं "रिडल ऑफ रामायण" नांवाचें पुस्तक प्रसिद्ध करून एका गृहस्थांनीं त्याचें मराठी भाषांतरहि प्रसिद्ध केलें आहेच. या एकंदर हकीगतीवरून रामायण योगवासिष्ठाचे उपसंहार आमचे हातानें प्रसिद्ध होण्याचा योग येईलसें वाटत नाहीं. एतावता प्रस्तुतचें कालमान, आमचें वयोमान, प्रकृतीच्या अस्वस्थतेनें काम करण्याची नाउमेद आणि सर्वांत महत्वाची बाब म्हणजे मदतीचा अभाव इत्यादि कारणांनीं प्रस्तुतचे पुस्तक आमच्या आयुष्यांतील शेवटचेंच ठरणार असें अनेक कारणांमुळें वाटत आहे. त्यांतूनहि सर्वेश्वरी इच्छा मानवी बुद्धीला अगम्य असल्यामुळें भविष्यत्काळांत आणखी कोणता योग येणार व काय होणार तें आतांच कसें सांगतां येईल ! सध्यां अनेक कारणांमुळें जें वाटतें तेंच येथपर्यंत कळविलें आहे.

महाभारताप्रमाणे या ग्रंथास अनेक संस्थानांतून मदत मिळून तो शक्य तितक्या सवलतीनें देतां यावा म्हणून आम्हीं आटोकाट प्रयत्न केला. परंतु सतत सहा वर्षें परिश्रम केले असूनहि त्या मानानें व्हावी तशी फलप्राप्ति झाली नाहीं. तथापि, आमचे परिश्रम अगदींच फुकट गेले असेंहि झालें नाहीं. म्हणूनच ठराविक किंमतींत दोन भाग दिले गेले. पण महायुद्धाचा काळ बरा असेंच सध्याचे दिवस आल्यामुळें प्रस्तुतचा हा अखेरचा भाग त्याच किंमतींत कसा देतां येईल हा अत्यंत जोखमीचा प्रश्न सतत आमचेपुढें उभा होता. परंतु विद्यमान व भावी आश्रयदात्यांच्या सौभाग्यानें थोडाच कां होईना पण आश्रय मिळाला, म्हणून मूळच्याच किंमतींत हाहि भाग देतां येऊन दिलेला शब्द कायम ठेवण्याचें भाग्य आम्हास लाभलें. याकरितां पूर्व वहिवाटीस अनुसरून मदत करणारांचीं नांवें त्यांच्या गौरवार्थ प्रसिद्ध करीत आहों. आम्हांस आशा आहे कीं, आमच्याप्रमाणें सर्व आश्रयदातेहि मदत कराणारांचें अभिनंदन करून त्यांना धन्यवाद देतील. ज्यांच्याकडून मदत आली तीं नांवें पुढें दिल्याप्रमाणें आहेतः—

श्रीमान् सर महाराजासाहेब देवास धाकटीपाती, श्रीमंत सरकार नामदार चीफ ऑफ कुरुंदवाड, श्रीमंत सरकार चीफ ऑफ मिरजमळा, श्रीमन्महाराजासाहेब गायकवाड दरबार विद्याखातें, आणि श्रीयुत शेट मुरारजी गोकुळदास देवजी, श्रीयुत ब्यारिस्टर जयकर, रा

रा. विश्वनाथराव साळवेकर, मालक सरदार गृह मुंबई, आणि श्रीयुत केशव रावजी गोंधळेकर पुणें, या सर्वांनीं यथाशक्ति मदत करून आम्हांस ऋणी करून ठेविलें आहे.

याशिवाय ऐन अडचणींत या भागाचें काम सांपडलें असतांना यदृच्छया नुकतेंच ता. १८।८।२२ इसवी रोजीं आपल्या कुलपरंपरागत स्वराज्याचीं सूत्रें हातीं घेतलेले, युवराजअवस्थेपासून आमच्या संस्थेबद्दल सदैव साभिमान असणारे, गुणग्राही व आमचे खास पिढीचे अन्नदाते श्रीमंत सरकार पंडित रघुनाथराव शंकर ऊर्फ बाबासाहेब पंतसचीव, संस्थान भोर यांचा येथें प्रामुख्यानेंच उल्लेख केला पाहिजे. कारण, आम्ही तीन भागांत प्रसिद्ध होणाऱ्या योगवासिष्ठ ग्रंथाची किंमत सन १९१६ सालांत पहिला भाग प्रसिद्ध करितांना बारा रुपये ही जाहीर केली होती. तो आमचा शब्द कायम राहून ग्रंथहि पूर्ण व्हावा म्हणून आमच्या विनंतीचा गौरव करून श्रीमंतांनीं जें बहुमोल साहाय्य केलें त्याबद्दल त्यांचें जेवढें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच होईल. "आपत्सु मग्नः स्मरणं त्वदीयं करोमि दुर्गे करुणार्णवेशी" या श्रीमच्छंकराचार्यांच्या उक्तीप्रमाणें आम्हीं श्रीमंतांस विनंति करितांच त्यांनीं आपलें गुणग्राहकत्व व औदार्य प्रगट करून आजपर्यंतची आमची निराशा भरून काढिली आहे. अथवा स्वतःच्या सौभाग्यानेंच त्यांनीं या वाङ्मयसत्रांचें अंतिम श्रेय जें अवभृथस्नान तें संपादून भोरकर मंडळीनें आरंभिलेल्या यज्ञाची सांगता करून अजरामर यश संपादिलें असेंच आम्हांस वाटतें.

श्रीमंत बाबासाहेबांनीं अधिकारसूत्रें हातीं घेतांना ता. १८–८–२२ च्या भव्य दरबारांत सुविचारपरिप्लुत असें भाषण करून आपल्या अलौकिक गुणबाहुल्यानें, अमृतस्यंदी वाणीनें आणि कल्पनातीत औदार्यानें आपलें राजकारणपटुत्व व्यक्त करून प्रजाजनांच्या निराश अंतःकरणास टवटवी आणिली व पहिल्याच भेटींत सर्वांचीं मनें आत्मसात् करून भारून टाकिल्यानें स्वतःचें विशिष्टत्व व्यक्त केलें. अशा प्रकारें त्यांनीं राजा हें नांव सार्थ करून प्रजानुरंजनाची पात्रता आरंभींच सिद्ध केली आहे. असें होण्याला कारणहि तसेंच बलवत्तर आहे. तें हें कीं, भोर संस्थानिकांची उपास्यदेवता श्रीरामचंद्र असून त्या संस्थानाला रामराज्य म्हणण्याचा परिपाठ पुरातन काळापासूनचा आहे. अशा संस्थानाचीं अधिकारसूत्रें तदंशभूत रघुनाथाच्या हातीं येतांच श्रीमंत बाबासाहेबांनीं स्वतःच्या नांवाला साजेशीच कृती केली. ती अशी कीं, "स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि । लोकस्याराधनायैव मुंचतो नास्ति मे व्यथा ॥" या षड्गुणैश्वर्य श्रीरामाच्या उक्तीप्रमाणेंच तदंशभूत रघुनाथरावांनीं प्रसंगीं जरूर तेंच केलें, हें योग्यच झालें. तेव्हां अशा महात्म्याची जोड गरीब रयतेस यदृच्छेनेंच मिळाली ती त्या परब्रह्म सशक्तीक श्रीरामाच्या कृपेनें चिरसुखदायी व आयुरारोग्यसंपन्न होऊन उभयतांत–राजा व प्रजा यांच्यांत उत्तरोत्तर सुखसमृद्धि करणारी व कालमानानें प्रजाजनांच्या वाढत्या आकांक्षा पूर्ण करणारी होवो, म्हणून आम्ही त्या मंगलधाम रामचंद्राला अनन्य प्रेमानें शरण जाऊन प्रार्थना करीत आहों.

श्रीमंत सरकारांनीं "भोरकर चिपळूणकर मंडळीचा" या प्रसंगीं जो गौरव केला तो खरोखरच अभिमानास्पद असून मंडळीच्या उज्ज्वल भविष्यत्कालाचा हा त्यांनीं पायाच घातला असेंच सर्वांना वाटेल. म्हणून मंडळीकडून अंशतः कृतज्ञता व्यक्त व्हावी या प्रेममय भावनेनें श्रीमंतांची परवानगी घेऊन योगवासिष्ठ ग्रंथाचा हा भाग आम्ही अत्यंत विशुद्ध दैवी भावनेनें "नराणां च नराधिपः ही भगवदुक्ति डोळ्यांपुढें ठेवून" श्रीमंत सरकारास अर्पण करीत आहों. आशा आहे कीं, आमच्या विशुद्ध भावनेप्रमाणेंच श्रीमंत सरकारहि या अल्प नजराण्याचा "पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति । तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥" या भगवान् श्रीकृष्णाच्या उक्तीप्रमाणें स्वीकार करून वरप्रदानावांछल मंडळीचा वाङ्‍व्यवसाय आपल्या कल्पतरु सदृश आश्रयाखालीं "देवान भावयतानेन ते देवा भावयंतु वः ।

परंपरं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ या ईश्वरी आज्ञेप्रमाणें मंडळीस कृतार्थ करितील अशी भरपूर आशा आहे. धर्मग्रंथ प्रकाशन करणाऱ्या संस्थेला आपल्या आश्रयाखालीं घेण्यांत फारच व्यापक तत्त्व भरलें आहे. तें प्रवृत्ति साधून निवृत्ति साधणें हें होय. असतु; एवंगुणविशिष्ट श्रीमंत सरकारचें सर्वांगिण कल्याण चिंतून अन्य विषयाकडे वळतों. भागाच्या आरंभीं श्रीमंतांचा दरबारी ड्रेसाचा फोटो देऊन त्यापुढें अल्प असें जीवनचरित्रहि दिलें आहे.

या भागांत जीं चित्रें दिलीं आहेत तीं रा. रा. जुवेकर यांनीं काढिलीं आहेत. आमच्या आजपर्यंतच्या चित्रकारांहून हे गृहस्थ अगदींच नवीन परिचित असून त्यांनीं आपलें काम अगदीं अल्पावधींत व अत्यंत काळजीनें करून आम्हांस उपकारबद्ध करून ठेविलें आहे.

या भागाच्या छपाईचें काम येथील जगद्धितेच्छु प्रेसचे मालक रा. रा. केशव रावजी गोंधळेकर व त्यांचे चिरंजीव रा. रा. दत्तात्रय केशव ऊर्फ नानासाहेब गोंधळेकर यांनीं फारच मेहनत घेऊन व आज कित्येक दिवसांच्या परिचयास शोभेल असेंच करून आम्हांस ऋणी करून ठेविलें आहे. करितां या पितापुत्रांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

या ग्रंथाच्या पूर्णतेचा ज्यांच्या ज्यांच्याशीं संबंध पोंचला त्यांनीं त्यांनीं आपापलीं कामें अत्यंत काळजी घेऊन केलीं आहेत. तरी ही मानवी कृति असल्यामुळें ती सर्वथैव निर्दोष असणें अशक्य आहे. तींत हस्तनेत्रादि दोष होणें हें अपरिहार्यच आहे. तेव्हां त्याबद्दल सुज्ञ वाचक क्षमा करितील अशी आशा आहे.

शेवटीं भाषांतरकार, मुद्रक, सावकार, साहाय्यक आणि विद्यमान असलेले व पुढें होणारे सर्व ग्राहक या सर्वांचें कल्याण करण्याबद्दल अनन्य प्रेमानें त्या सच्चिदानंदरूपी राजारामचंद्राची प्रार्थना करून रजा घेतों. ता. १–१२–१९२२ इसवी.

शके १८४४ दुंदुभिनाम संवत्सरे. } सर्वांचा नम्र सेवक, बाळकृष्ण पांडुरंग ठकार, प्रकाशक.



श्रीकृष्ण प्रसन्न.

# दुसऱ्या आवृत्तीसंबंधीं प्रकाशकांचें शब्द.

**यत्कृतं यत्करिष्यामि तत्सर्वं न मयाकृतम्।**
**त्वया कृतं तु फलभुक्त्वमेव मधुसूदन॥ १॥**

श्री. सच्चिदानंद, षड्गुणैश्वर्यसंपन्न, श्री राजा रामचंद्राच्या कृपेनें आज आम्ही हा पुनर्मुद्रित केलेला "श्रीबृहद्योगवासिष्ठाच्या मराठी सुरस भाषांतराचा" तिसरा भाग आश्रयदात्यांस अर्पण करीत आहों. या ग्रंथाच्या पुनर्मुद्रणाचें कारण दुसऱ्या भागांतील दुसऱ्या आवृत्तीच्या प्रकाशकांच्या शब्दांत सर्वांना कळविलेंच आहे. म्हणून आतां येथें पुनरुक्तीची जरूर नाहीं.

या भागाच्या प्रकाशनाचें कामही आमचे मित्र व यशवंत प्रेसचे मालक रा. रा. अच्युतराव भट यांनीं सर्व जबाबदारी आपलेकडे घेऊन पुरें केल्याबद्दल त्यांची जेवढी स्तुति करावी तेवढी थोडीच आहे. या त्यांच्या धाडसाचें योग्यफल सर्वसाक्षी परमेश्वर ग्राहकांच्या व प्रचारकांच्या साह्यानें जरूर देवो अशी प्रभूस अनन्य प्रेमानें प्रार्थना करून पुढच्या उद्योगाचे प्रस्तावाकडे वळतों.

या पुढचा संस्थेचा उद्योग म्हणजे "श्रीवाल्मिकी रामायण समालोचन अथवा रामायणाचा उपसंहार" हा ग्रंथ प्रकाशनास घेणें हा होय. त्याची योजना सिद्ध झाली असून तो येत्या चातुर्मासापर्यंत महाराष्ट्रीय बंधु भगिनींच्या सेवेस सादर अर्पण होईल अशी खात्री वाटते. "सत्य संकल्पाचा दाता" श्रीरामप्रभू ही व्यक्त केलेली सदिच्छा नियमितपणें सफल करील अशी पूर्ण उमेद आहे. तथापि, मानवी आशा आणि ईशसंकल्प यांतील अंतर जाणणें आम्हा जडजीवांना सर्वथैव अगम्य आहे. असें आहे तरी ज्या सर्व साक्षी, सर्व व्यापि, सर्वगामी व सर्वांतर्यामी प्रभू गोपाल कृष्णानें आमची कसलीच पात्रता नसतांना ता. १।५।१९०६ या दिवसापासून हातीं धरून आजपर्यंतचें कार्य करविलें, तोच जगचालक प्रभू हेंही कार्य ठरीव मुदतींत निर्विघ्नपणें पूर्णतेस नेईल असा पूर्ण भरंवसा आहे.

"रामायण समालोचन किंवा रामायणाचा उपसंहार" हा ग्रंथ ही भारतभागवताच्या-उपसंहाराप्रमाणेंच विद्वान व बहुश्रुत लेखकाच्या बहुविध परिश्रमाचें फल असून तो सहृदय वाचकांचें मन रामायण ग्रंथाच्या परिशीलनास उत्तेजित करील असाच उतरला आहे. आणि यांतही येथील केसरी वर्तमान पत्राचे दुय्यम संपादक रा. रा. ज. स. करंदीकर यांची प्रस्तावना त्याला जोडून प्रसिद्ध होईल हा विशेष आहे. सदर गोष्ट जाहिरातीनें लवकरच प्रसिद्ध होईल.

## अखेरचें हृद्गत.

"रामायण उपसंहार" या ग्रंथानें काम हातावेगळें झाल्यावर आम्हीं पुढें आयुष्य लाभलें तरी त्याचा उपयोग एखाद्या क्षेत्रांत वास्तव्य करण्याकडे करण्याचे ठरविलें आहे. कारण, आतां परिश्रम होत नसून कालही बदलला आहे. म्हणून सर्वांची रजा घेणेंच योग्य असें वाटूं लागलें आहे. अर्थात् (आम्हीं स्वस्थ असल्यावर) "चिपळूणकर आणि मंडळी" या संस्थेचा चालू व्यवसाय येथेंच विराम पावणार कीं, पुढें तसाच नेटानें चालविणारा एखादा महात्मा भेटून तो चालविणार, अथवा मुळींच मंद पडणार हें सर्वेश्वर जाणे. कै. ग. वि. चिपळूणकर यांना त्यांच्या मृत्युसमयीं ही चिंता नव्हती. आमच्या भागधेयानें आम्हांस या चिंतेनें अहोरात्र व्यग्र केलें आहे. पण उपाय काय? हाही ईश्वरी संकल्पच म्हणून चित्तस्वस्थ ठेविण्याचा अभ्यास करणेंच योग्य होय.

येथपर्यंत जरूर तेवढ्या गोष्टींचा उल्लेख केल्यावर सर्व आश्रयदात्यांचे आभार मानून सर्वांचें कल्याण करण्याबद्दल परमेश्वराची अनन्य भावनेनें प्रार्थना करून पुढच्या कामाकरितां रजा घेतों.

सर्वांचा नम्र सेवक
पुणें. ता. ९।२।२७. इ. } बाळकृष्ण पांडुरंग ठकार, प्रकाशक.

श्री.

# श्रीमंत सरकार रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब पंडित पंतसचीव संस्थानाधिपति भोर यांचें अल्प चरित्र.

भोर संस्थानची हद्द पुणें, सातारा व कुलाबा या तीन जिल्ह्यांस लागून आहे. सन १९२१ च्या खानेसुमारीप्रमाणें संस्थानची लोकसंख्या १,३०,४८७ आहे व क्षेत्रफळ ९२५ चौरस मैल असून वार्षिक उत्पन्न सुमारें ५००,००० रुपये आहे.

मराठी साम्राज्यसंस्थापक प्रतापशाली छत्रपति श्री शिवाजीमहाराज निवर्तल्यानंतर त्यांचे मागून त्यांचे वडील चिरंजीव संभाजीमहाराज गादीवर आले. परंतु लवकरच दुर्व्यसनाच्या जाळ्यांत सांपडून ते मोंगलांकडून पकडले गेले व महत्त्वाकांक्षी औरंगजेबानें त्यांचा हाल हाल करून वध केला व त्यांचा मुलगा शाहू यास बंदिवान करून दिल्लीस नेलें. शिवाजी महाराजाचे दुसरे चिरंजीव राजाराम महाराज यांना जिंजीकडे पळून जावें लागलें.

संभाजीमहाराजांचा जो अमानुषपणें व निर्दयपणे वध करण्यांत आला त्यामुळें सर्व महाराष्ट्र क्रोधानें संतप्त झाला. स्वाभिमानाची, स्वातंत्र्याची व स्वदेशभक्तीची लाट उसळली. मराठी साम्राज्याचे रक्षणार्थ तरुण देशभक्त पुढें आले. त्याच मंडळीचे अग्रभागीं सचीव घराण्याचे मूळ पुरुष शंकराजी नारायण हे होते. ह्या वीर पुरुषानें आपल्या आंगच्या बुद्धिकौशल्यानें व मोहक गुणांनीं सर्व मावळ्यांना वश करून मोठ्या शौर्यानें मोगलांचे ताब्यांत गेलेला राजगड किल्ला सन १६९२ सालीं सर केला व त्याचप्रमाणें सह्याद्रीवरील दुसरेही किल्ले मोंगलांपासून काबीज केले. याप्रमाणें मोंगलांचे ताब्यांत गेलेला प्रांत परत घेऊन त्यांनीं राजाराम महाराजांस जिंजीहून साताऱ्यास सुरक्षित आणून गादीवर बसविलें. त्यांच्या बहुमोल सेवेबद्दल व उत्कृष्ट कामगिरीबद्दल राजाराम महाराज खुष झाले व त्यांनीं त्यांना मदार उल्मोहाल म्हणजे विश्वासनिधि ही बहुमानाची पदवी दिली. व इ. स. १६९७ सालीं अष्टप्रधानांपैकीं सचीव पदावर त्यांची नेमणूक करून व कांहीं राजचिन्हें अर्पण करून मोठी जहागीर दिली. याप्रमाणें शंकराजी नारायण हे भोर संस्थानचे मूळ पुरुष होत. त्यांनीं संस्थानचा कारभार उत्तम रीतीनें चालविला होता.

इ० स० १७०७ सालीं औरंगजेब बादशहा वारला. तेव्हां त्याच्या मुलानें शाहूची मुक्तता करून त्यास दक्षिणेंत जाण्याची परवानगी दिली. त्याप्रमाणें शाहू साताऱ्याकडे येण्यास निघाला. साताऱ्यास राजाराममहाराज परलोकवासी झाल्यामुळें त्यांची बायको ताराबाई ह्या आपला अज्ञान मुलगा शिवाजी याच्या नांवानें राज्यकारभार चालवीत होत्या. शाहू दक्षिणेंत येत आहे ही बातमी कळतांच त्या धूर्त, कावेबाज ताराबाईने सर्व सरदार व प्रधान यांना एकत्र बोलावून सांगितलें कीं, शाहू नांवाचा कोणी तोतया येत आहे, त्यास कोणी मदत करूं नये. तिच्या बोलण्यावर विश्वास ठेवून सर्वांनीं शपथा घेतल्या कीं, आम्ही तोतया शाहूस मिळणार नाहीं. तुमच्या मुलाशीं राजनिष्ठ राहूं.

शाहूमहाराज जेव्हां साताऱ्याजवळ आले तेव्हां त्यांनीं इतर सरदारांबरोबरच शंकराजी नारायण यास निरोप पाठविला कीं, तुम्हीं आपलें कसलेलें सैन्य बरोबर घेऊन आमचे मदती-करितां यावें. शाहूमहाराज हे तोतये नसून गादीचे खरे वारस आहेत असें जेव्हां शंकराजीस कळलें तेव्हां ते मोठ्या पेंचांत पडले. शाहूमहाराजांस मिळावें तर वचनभंगाचें पातक पदरीं येणार, ताराबाईशीं राजनिष्ठ रहावें तर शाहूमहाराजांवर हल्ला उचलण्याचा प्रसंग येऊन स्वामिद्रोह घडणार अशा दुहेरी कचाटयांत ते सांपडले. तेव्हां त्या सत्यनिष्ठ व स्वामिनिष्ठ करारी पुरुषानें ह्या प्रसंगांतून सुटण्याकरितां संन्यास ग्रहण करून भोरचे पश्चिमेस ८ मैलांवर असलेल्या आंबवडेगांवीं

पंचगंगातीर्थाजवळ हिरकणी खाऊन देहत्याग केला. केवढी ही वचनासक्ति व स्वामिनिष्ठा!

जेव्हां ही गोष्ट शाहूमहाराजांचे कानावर गेली तेव्हां त्या स्वामिनिष्ठ सेवकाबद्दल मोठें कौतुक व धन्यता वाटून त्यांनीं त्यांचा २ वर्षांचा मुलगा नारोशंकर यास सचीव पदाची वस्त्रें देऊन भोरची जहागीर त्यांचेकडे चालू ठेविली.

शंकराजी नारायणापासून नववे पुरुष हल्लीचे चीफसाहेबांचे नुकतेच परलोकवासी झालेले वडील हिज हायनेस श्रीमंत शंकरराव हे होत. त्यांनीं सन १८७४ पासून १९२२ जुलैपर्यंत ४८ वर्षें राज्यकारभार केला. त्यांनीं आपले कारकीर्दीत संस्थानचें उत्पन्न वाढवून बऱ्याच सुधारणा केल्या. दळणवळणांकरितां सडका तयार केल्या व विहिरी धर्मशाळा, वगैरे लोकोपयुक्त बरीच कामें केलीं आहेत. त्यांच्या उत्तम राज्यव्यवस्थेबद्दल व राजनिष्ठेबद्दल सन १९०३ सालच्या दिल्ली दरबारचे वेळीं यांना नऊ तोफांचे सलामीचा मान मिळाला व १९११ सालीं दरबारचे दुसरे वेळीं ११ तोफांचे सलामीचा मान मिळून त्याबरोबर हिज हायनेस ही पदवी मिळाली. नियमितपणा, करारीपणा, राजनिष्ठा, कर्तव्यदक्षता, व्यवहारकुशलता, समयज्ञता, राजकारणपटुता इत्यादि गुण त्यांचे अंगीं होते. भोरचे इतिहासांत आजपर्यंत त्यांच्याइतकी दीर्घकालीन कारकीर्द दुसरी कोणाची झाली नाहीं. हे तारीख १७ जुलै १९२२ रोजीं आपल्या वयाच्या ६९ वे वर्षी परलोकवासी झाले.

त्यांच्या मागून त्यांचे औरस पुत्र श्रीमंत रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब हे सचीव पदावर आरूढ झाले आहेत. हे सचीव घराण्यांतील १० वे पुरुष होत.

श्रीमंत सरकार रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब यांचा जन्म ता० २० सप्टेंबर सन १८७८ सालीं झाला. त्यांचें उपनयन ता० ४ एप्रील सन १८८७ सालीं झालें. सन १८९१ ता. १ जून रोजीं श्रीमंत सरदार बाळासाहेब विंचुरकर यांची कन्या गंगुताईसाहेब यांचेबरोबर त्यांचा मोठ्या थाटानें विवाह झाला. सन १९०४ ता. २७ सप्टेंबर रोजीं त्यांना पुत्ररत्न झालें. त्यांचें नांव सदाशिवराव उर्फ भाऊसाहेब ठेवलें आहे. त्यांचें उपनयन सन १९१३ ता. १५ जून रोजीं झालें. ते हल्लींचे युवराज आहेत व भोर हायस्कुलांत म्याट्रिकचे वर्गांत शिकत आहेत. त्यांचा अभ्यास उत्तम चालला आहे. श्रीमंत सरकार बाबासाहेबांचें आपले पत्नीवर अपरिमित प्रेम होतें. उभयतांचा आयुष्यक्रम मोठ्या सुखांत व आनंदांत चालला होता. परंतु निर्घृण काळास त्यांचें तें सुख सहन न होऊन तो श्री. सौ. गंगुताईसाहेबांना सन १९०७ सालीं अकालींच घेऊन गेला. त्यांच्या निधनानें श्रीमंत सरकार बाबासाहेबांना अनिवार दुःख होऊन मोठा धक्का बसला व त्यांच्या मनावर व शरीरावर बराच परिणाम झाला. पुढें सन १९०८ सालीं रा. रा. पुराणीक यांचे कन्येबरोबर त्यांचा द्वितीय विवाह झाला. त्याच हल्लींच्या राणीसाहेब आहेत व त्यांचें नांव श्री. सौ. लक्ष्मीबाई राणीसाहेब असें आहे. त्याही सुशील, सुशिक्षित व सद्गुणी आहेत.

श्रीमंत सरकार बाबासाहेब यांचें इंग्रजी ३ इयत्तेपर्यंत भोर येथें शिक्षण झाल्यानंतर ते सन १८९३ सालीं पुण्यास पुणें हायस्कुलांत शिकण्याकरितां गेले. व त्या शाळेंतून सन १८९९ सालीं ते म्याट्रिक परीक्षेंत उत्तीर्ण झाले. त्यांचे पूर्वी सचीव घराण्यांत विश्वविद्यालयांतील परीक्षेंत कोणीही पास झाले नव्हते. म्याट्रिक परीक्षा पास झाल्यानंतर ते पुढील शिक्षणाकरितां डेक्कन कॉलेजांत गेले. व सन १९०१ सालीं त्यांची प्रिव्हीयस परीक्षा पास झाली. परंतु प्रकृति अशक्त असल्यामुळें व दृष्टीही थोडी अधू असल्यामुळें त्यांना पुढील परीक्षेस बसतां आलें नाहीं. परंतु त्याच कॉलेजांत सुमारें ५ वर्षेपर्यंत इंटरमिजिएट व बी. ए. च्या क्लासांतील व्याख्यानांस ते हजर असत. व फर्स्ट एल्. एल्. बीच्या दोन टर्मचा अभ्यासही त्यांनीं पुरा केला. नंतर त्यांनीं डेक्कन कॉलेज सोडलें व पुण्यांतील नामांकित विद्वान् वकिलांजवळ दिवाणी, फौजदारी व मुलकी कायद्यांचें अध्ययन केलें.

याप्रमाणें त्यांनीं १९०५ पर्यंतचा काल सर्व तऱ्हेचें शिक्षण संपादन करण्यांत घालविला. इतकी तयारी झाल्यानंतर न्यायाधिशाच्या कामाची माहिती होण्याकरितां सन १९०६ सालीं पोलिटिकल एजंट मि. स्विफ्ट यांचे शिफारशीवरून मुंबई सरकारनें पुण्यांत त्यांची बेंच म्याजिस्ट्रेट म्हणून नेमणूक केली. त्या जागेवर त्यांनीं ४।५ वर्षें काम केलें. त्यांचें काम पाहून मुंबईचे गव्हरनर लॉर्ड ल्यामिंग्टन हे फार खुष झाले व त्यांनीं माजी हिज हायनेस यांचे जवळ प्रशंसोद्गार काढिले. सन १९१३ सालीं लॉर्ड सिडेनह्याम यांच्या शिफारशीवरून माजी हिज हायनेस यांनीं संस्थानचे कामाची माहिती होण्याकरितां त्यांना शिरवळ तालुक्याचे अ. कलेक्टर व जज्जाचे अधिकार दिले.

गादीवर बसेपर्यंत त्या तालुक्याचा कारभार त्यांनीं उत्तम रीतीनें सहानुभूतिपूर्वक चालवून लोकांचीं मनें आपणाकडे ओढून घेतलीं. तालुक्याचे कारभारांतील बरेच दोष दूर करण्याचा प्रयत्न केला; संस्थानांत ट्रॅन्सफर ऑफ् प्रापर्टी ॲक्ट सुरू करविला. शिरवळ येथें सरकारी दवाखाना सुरू करून लोकांची गैरसोय दूर केली. तालुक्याच्या उत्तम कारभाराबद्दल मुंबईसरकार व पोलिटिकल एजंट यांच्याकडून त्यांना प्रशंसापर शेरे मिळाले आहेत.

प्रवासाशिवाय शिक्षण अपुरें राहतें, ही गोष्ट श्रीमंत सरकार बाबासाहेबांच्या मनावर पूर्ण बिंबली असल्यामुळें त्यांनीं प्रवास करून जगाचें ज्ञानही संपादन केलें. त्यांनीं काश्मीर, भोपाळ, बडोदा, उदेपूर, ग्वालेर, हैदराबाद, सांगली, मिरज, म्हैसूर वगैरे संस्थानें पाहून तेथील राज्यव्यवस्था, सामाजिक स्थिति ह्यांचें सूक्ष्म निरीक्षण करून माहिती मिळविली आहे. दिल्लीस दोन्ही दरबारचे वेळीं व संस्थानिकांच्या कान्फरन्सच्या वेळीं हे आपल्या वडिलांबरोबर गेले होते. काशी, रामेश्वर वगैरे पुण्य क्षेत्रेंही त्यांनीं पाहिलीं आहेत. प्रवासामुळें त्यांच्या अनुभवांत व ज्ञानांत बरीच भर पडलेली आहे.

भोर येथें व्यायामाची व सार्वजनिक वाचनालयाची सोय नव्हती. श्रीमंत सरकार बाबासाहेब यांच्या लक्षांत या दोन्ही उणिवा येऊन प्रतिकूल स्थिति असतांही उत्तेजन देऊन व स्वतः पुढाकार घेऊन प्रथम त्यांनीं श्रीराम क्रीडाभुवन नांवाची संस्था स्थापन केली व कांहीं दिवसांनीं सार्वजनिक वाचनालय सुरू केलें. ही संस्था केवळ त्यांच्याच आश्रयानें निघाल्यामुळें त्यांच्या पहिल्या कुटुंबाचें नांव या संस्थेस दिलें आहे. कै. श्री. गंगुताई वाचनालय या नांवानें ही संस्था प्रसिद्ध आहे. दोन्ही संस्था त्यांच्याच आश्रयानें चालल्या आहेत.

श्रीमंत बाबासाहेब यांच्यामध्यें विशेष गोष्ट म्हटली म्हणजे प्रतिकूल परिस्थिति असतांना त्यांनीं इतका अभ्यास करून इंग्रज सरकारच्या राजदरबारांत, संस्थानिकांत व समाजांत आपल्या अकलहुशारीनें व कर्तबगारीनें इतका लौकिक मिळविला कीं, जरी ते आतांपर्यंत युवराज होते तरी गादीवर असलेल्या संस्थानिकांप्रमाणें त्यांची मानमान्यता होत होती. प्रायव्हेट एंट्रीमध्यें त्यांना लेव्हीचें व गव्हरमेंटहौसच्या पार्टीचें आमंत्रण येत होतें. सरदार नसतांना सरदारांच्या पार्टीचें आमंत्रण येत होतें. तसेंच त्यांच्या ताब्यांत जो शिरवळ तालुका दिला होता तेवढ्यापुरता वार्षिक रिपोर्ट वडिलांच्या मार्फत गव्हरमेंटकडे पाठवितां येत होता व त्यावर स्वतंत्र शेरे येत होते.

त्यांच्या परमप्रिय मातोश्री श्री. सौ. जिजीसाहेब ह्या ता. १२ माहे फेब्रुवारी १९२२ रोजीं इहलोक सोडून गेल्या. कै. श्री. सौ. जिजीसाहेब यांचा श्रीमंत सरकार बाबासाहेबांना मोठा आधार होता. त्या स्वभावानें फार शांत असत. नोकरांना फार ममतेनें वागवीत. यामुळें त्यांना सर्वजण आईसाहेब म्हणत असत. त्या आपला बहुतेक वेळ ईश्वरसेवेंत व पुराणश्रवणांत घालवीत असत. त्यांच्या निधनानें दुःख झालें नाहीं असा कोणीही नाहीं. त्यांना जाऊन ५ महिने होतांच हिज हायनेस श्रीमंत शंकरराव हेही ता. १७ जुलै १९२२ रोजीं कैलासवासी झाले.

याप्रमाणें लागोपाठ दुःखाचे दोन डोंगर श्रीमंत सरकार बाबासाहेब यांचेवर कोसळले.

वडील निवर्तल्यानंतर दुसरे दिवशीं श्रीमंत सरकार बाबासाहेबांनीं राज्यसूत्रें हातीं घेतल्याचा जाहिरनामा प्रसिद्ध केला. पुढें १ महिन्यानें म्हणजे ता. १८ ऑगस्ट १९२२ रोजीं मोठ्या थाटानें त्यांचा राज्यारोहणसमारंभ झाला. या समारंभास बरीच पाहुणे मंडळी आली होती. पोलिटिकल एजंट मि. हडसन हे आले होते. रामाचे मंडपांत दरबार भरला होता. प्रथम पोलिटिकल एजंट यांनीं नेकनामदार गव्हरनरसाहेबांचा खलिता वाचून दाखविला. त्यांतलि मुख्य आशय असा होता "संस्थानची गादी वारसाचे हक्कानें आपणाकडे आली. तदंगभूत अधिकार आपण धारण केले या गोष्टीस महाराज चक्रवर्ती राजे व हिंदुस्तानचे बादशाह यांच्या वतीनें नेकनामदार गव्हर्नरसाहेब यांनीं मान्यता दिलेली असून ती मान्यता जाहीर करण्यास आपणास मोठा आनंद वाटत आहे व ही गोष्ट आपणांस कळविण्यास व त्याबरोबरच नेक नामदार यांच्या वतीनें आपलें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करण्यास मला आज्ञा झाली आहे." नंतर पोलिटिकल एजंट यांनीं भाषण करून सांगितलें कीं, आपले नवे चीफ हे चांगले सुशिक्षित व अनुभवी असल्यामुळें त्यांच्या हातून राज्यकारभाराचें काम कशा रीतीनें पार पडलें जाईल याबद्दल कोणासही भीति बाळगण्याचें कारण नाहीं.

यावर श्रीमंतांनीं भाषण केलें. प्रथम त्यांनीं जमलेल्या पाहुणे मंडळींचे व बादशहा, नेक नामदार गव्हर्नरसाहेब, पोलिटिकल एजंट यांचे आभार मानून समयोचित भाषण केलें व पुढील देणग्या व सवलती देण्याचें जाहिर केलें:—

(१) घरपट्टी, म्हैसपटी, लग्नटक्का व पाटदाम हे विशिष्ठ जातीवरील विषमतादर्शक कर माफ करण्यांत आले आहेत. (२) तपकीर, शेंदूर, विड्याचीं पानें या जिनसांवर लायसेन्स फी घेतली जाणार नाहीं. (३) चार इयत्तेपर्यंत प्राथमिक शिक्षण मोफत करण्यांत आलें आहे. (४) दहा रुपयांचे खातेदारांस रुपयास ४ आणेप्रमाणें व त्यावरील खातेदारास रुपयास १ आणा याप्रमाणें एक सालचे साऱ्यांत माफी दिली जाईल. (५) नोकर लोकांस ४० रुपयेपर्यंत पगार असणाऱ्यांना १ महिन्याचा पगार, ४० ते ७५ पर्यंत पाऊण महिन्याचा व त्यावरील पगार असणाऱ्यांना अर्धा महिन्याचा पगार देणगी म्हणून मिळेल. (६) सुधागड तालुक्यांत दवाखाना सुरू करण्यांत येईल. (७) भोर येथें वेदशाळा स्थापन करण्यांत येईल. याप्रमाणें प्रथमच देणग्या व सवलती देऊन श्रीमंतांनीं आपल्या प्रजेस खुष केलें आहे.

दुसरे दिवशीं म्हणजे ता. १९ रोजीं श्रीमंतांना सर्व तालुक्यांतर्फे व पुण्यांतील कांहीं संस्थांमार्फत मानपत्रें अर्पण करण्यांत आलीं; त्या वेळीं त्यांनीं उत्तरादाखल जें भाषण केलें त्यांत आपले कारकीर्दीचें धोरण कसें होईल हें जाहीर केलें. त्यांतील सारांश असा "राजाचें कर्तव्य दोन प्रकारचें असते, एक धर्म व ईश्वर यांची सेवा. दुसरें प्रजापालन व तद्द्वारा जनतारूपी परमेश्वराची सेवा. हीं दोन्हीं कर्तव्यें बिनकसूर करण्याचा माझा कृतसंकल्प आहे. आजपर्यंत या संस्थानचा कारभार जुन्या व एकतंत्री वळणावर चालविण्यांत आला आहे तो बदलणें भाग आहे. लोकांचा पैसा त्यांच्याच प्रतिनिधींच्या इच्छेस अनुसरून त्यांच्याच कल्याणाप्रीत्यर्थ खर्च होईल असेंच माझ्या कारभाराचें धोरण राहील. लोकांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांची तात्काळ दाद लावणें हें माझें प्रथम कर्तव्य आहे. बजेटची पद्धति सुरू करून लोकप्रतिनिधित्वाचें तत्व कारभारास लागू करण्याची माझी इच्छा आहे."

या जाहीर आश्वासनावरून श्रीमंतांची कारकीर्द यशस्वी, सुखदायक व प्रगमनशील झाल्यावांचून रहाणार नाहीं अशी आशा करण्यास मुळींच हरकत नाहीं.

श्रीमंतांनीं योजिलेल्या सर्व सुधारणा घडवून आणण्याकरितां त्यांना उत्तमारोग्य व दीर्घायुष्य प्राप्त होवो अशी परमेश्वराजवळ अनन्यभावें प्रार्थना करून हें चरित्र पुरें करतों.

*

# योगवासिष्ठ, निर्वाणप्रकरण, उत्तरार्ध.

## विषयानुक्रमणिका.

———



ॐ

# योगवासिष्ठ.

## ६ निर्वाणप्रकरण, उत्तरार्ध.

### सर्ग १

—:०:—

१ निर्मम, निरहंकार, संकल्पविकल्परहित मुक्त जिवंत कसे राहतात व चेष्टा—व्यवहार कसा करितात तें येथें सांगतात.

**श्रीरामः**—हे ब्रम्हन् ! देह, प्राण इत्यादिकांविषयींच्या 'हा मी व हे माझे' इत्यादि कल्पनांचा त्याग केल्यामुळें सर्व क्रिया शांत होतात. वरील कल्पनांचा त्याग केल्यावर देहाचें धारण करणाऱ्या प्राणादिकांचा व्यवहारहि शांत होतो. त्यामुळें प्राण्याचें शरीर तत्काल पडतें. प्राणादिकांची क्रिया शांत झाल्यामुळें तें मरण पावतें. तेव्हां आपण आतांच सांगितल्याप्रमाणें कल्पनात्याग केलेल्या जिवंत मनुष्याचा व्यवहार कसा संभवतो ?

**श्रीवसिष्ठः**—रामा, कल्पनात्याग जिवंत मनुष्याचाच संभवतो; मेल्याचा संभवत नाहीं. ( जिवंत रहाणें हें कल्पनेच्या अधीन नाहीं, तर प्रारब्धाच्या अधीन आहे. त्यामुळें कल्पनात्याग व जीवन यांचा कांहीं संबंध नाहीं. ) वास्तव मी आतां तुला त्या कल्पनात्यागाचें यथार्थ स्वरूप सांगतों, तें तूं ऐक. तें तुझ्या श्रवणेंद्रियाला भूषित करील. कल्पनावेत्ते विद्वान् देहादिकाना मी असें ह्मणणें, यालाच कल्पना म्हणतात, आणि अपरिच्छिन्न ब्रह्माकाशरूप अर्थाचें—आपल्या पारमार्थिक स्वभावाचें अनुसंधान करणें, याला संकल्पत्याग म्हणतात. कारण मी अपरिच्छिन्न ब्रह्मरूप आहें, अशी भावना केल्यानें मी परिच्छिन्न देहादिरूप आहे ही कल्पना नाहींशी होते. कल्पनेचें स्वरूप जाणणारे ज्ञानी पदार्थांची भावना—विषयां-

---

१ निर्वाण प्रकरणाच्या पूर्वार्धाच्या शेवटीं श्रीवसिष्ठांनीं 'हा मी व हें माझें अशी भावना करणारा पुरुष दुःखापासून विशेषतः मुक्त होत नाहीं. पण जो अशी भावना करीत नाहीं, तो मुक्त होतो; यास्तव यांतील जें तुला इष्ट वाटेल तें कर.' असें सांगितलें आहे. पृ. १२६० पहा.

विषयींची आसक्ति, हीच कल्पना आहे, असें म्हणतात. पण ते सर्व पदार्थ—विषय ब्रह्माकाशरूप आहेत, असें अनुसंधान करणें याला संकल्प-त्याग म्हणतात. उत्तम तत्त्ववेत्ते हें देहादि सर्व दृश्य सत्य आहे, असा अभिमान धारण करणें, यास कल्पना—संकल्प म्हणतात. व तें देहादि सर्व ब्रह्माकाश आहे; असें चिंतन करणें याला कल्पनात्याग म्हणतात. ( अशा प्रकारचा कल्पनात्याग जिवंतपणींच करतां येणें शक्य आहे. मेल्यावर तो संभवत नाहीं. ह्यामुळें जीवन व कल्पनात्याग यांचा विरोध नाहीं. ) पूर्वानुभूत विषयांचें स्मरण करणें व पूर्वीं कधीं न अनुभविलेल्या विषयांचें—भविष्यत्काळच्या विषयाचें अनुसंधान करणें हाच संकल्प आहे, आणि त्यांतील कशाचेंहि अनुसंधान न करणें हेंच शिव-कल्याण-ब्रह्म आहे असें तत्त्ववेत्ते जाणतात. यास्तव, बा रामा ! प्रत्यक्ष, अनुमान इत्यादि प्रमाणांनीं पूर्वीं अनुभविलेल्या व न अनुभविलेल्या म्हणजे पुढें अनुभवावयाच्या पदार्थांची स्मृति, त्यांचें चिंतन सोडून तूं अपरिच्छिन्न ब्रह्माकाशांत मिळून जा व काष्ठासारखा निश्चल हो आणि दीर्घकाल जिवंत रहा. कारण ब्रह्मच आत्मा आहे, अशा भावनेनें इतर चित्तवृत्तींचा निरोध होतो, त्यामुळें त्या योग्याला दीर्घ आयुष्य प्राप्त होतें. अर्थात् हा कल्पनात्याग जीवनाला क्षीण करणारा नसून उलट त्याची वृद्धि करणारा आहे. हे महाबुद्धिमान् रामा ! तूं व्यवहारसंबंधीं सर्व प्रकारच्या स्मरणांचा निरोध करून रहा. ( अहो, पण सर्वच स्मृतींचा त्याग केल्यावर प्रारब्ध-प्राप्त व्यवहार तरी कसा होईल ? म्हणून विचारशील तर ) रामा ! ज्याचा अभ्यास दृढ झाला आहे, अशा व्यवहाराला पूर्वोत्तर स्मृति अथवा विशेष प्रयत्न वगैरे यांची अपेक्षा नसते. अर्थात् अर्धवट निजलेल्या बालकाच्या हालचालीप्रमाणें केवळ पूर्वाभ्यासानेंच प्राप्त झालेल्या अवश्य कर्तव्यामध्यें तुझी प्रवृत्ति संकल्पावांचूनही होईल. जसें कुंभाराचें चाक प्रयोजन नसतांही केवळ पूर्व संस्कारानें—त्याला दिलेला वेग क्षीण होईपर्यंत भ्रमण करीत रहातें, त्याप्रमाणें हे निष्पाप रामा ! पूर्वसंस्कारवशात् निःसंकल्पप्रवाहानें शरीरयंत्र आपली प्राप्तक्रिया प्रारब्धक्षय होईपर्यंत करतें. ज्याचें चित्त क्षीण झालें आहे, असा तूं सत्त्वसंस्काराचें अनुकरण कर. म्हणजे वासनाशून्य चित्ताचे जे संस्कार, त्यांच्या वेगाचें अनुवर्तन कर आणि आपल्या प्रवाहपतित कर्तव्यामध्येंच प्रवृत्त हो. चित्त वासनाशून्य झालेलें असल्यामुळें तुझ्या रागद्वेषांचा क्षय झालेला आहे. त्यामुळें तुझी उच्छृंखल प्रवृत्ति केव्हांही होणार नाहीं. मीं हा दोन्ही हात वर उचलून मोठ्यानें ओरडून 'असंकल्प हेंच परमश्रेय आहे. त्याची भावना तुम्ही आपल्या मनांत कां करीत नाहीं ?' असें सांगत आहें. पण, माझें म्हणणें कोणी ऐकत नाहीं ! हर हर ! सर्व लोक त्यांच्या हृदयांत स्थित असलेल्याहि या सर्व दुःखांचा नाश करणाऱ्या विचारसंज्ञक चिंतामणीचा त्याग करितात. हें खरोखर मोहाचें माहात्म्य आहे ! दृश्यदर्शनापासून—विषयज्ञानापासून सर्वथा मुक्त झालेलें जें आत्मतत्त्व तोच मुख्य असंकल्प आहे; यास्तव तूं तन्मयच हो. परम श्रेय म्हणून जें कांहीं आहे, तें हें एवढेंच. त्याचा तूं स्वतःच अनुभव घे. बा रामा ! ज्याच्यापुढें परम साम्राज्यहि तृणासारखें तुच्छ असें वाटतें, तें परमपद, केवळ संकल्परहित झाल्यानेंच प्राप्त होतें. जेथें जावयाचें असतें

१ कारण आकाशादि क्रमानें झालेलें तें सर्व मायाकार्य आहे व मायेचें अधिष्ठान ब्रम्ह आहे. म्हणून तें सर्व ब्रम्हाकाश आहे, असें चिंतन करणें.

तिकडेच निघालेल्या वाटसरूच्या पायांची गति संकल्पावांचून जशी होते, तसा तूं नियत कर्मामध्यें प्रवृत्त हो. सर्व कर्मांच्या फळांविषयींचा विचार निजलेल्या पुरुषाप्रमाणें विसरून प्रवाहपतित स्वकर्तव्यामध्यें तूं संकल्पावांचून प्रवृत्त हो. ज्याप्रमाणें स्वतः सर्व प्रकारच्या हालचालीपासून मुक्त झालेलें कोवळें गवत वायु व जल इत्यादिकांच्या प्रवाहांत पडलें असतां दुसऱ्या तृणाशीं संयुक्त होणें, वियुक्त होणें. इत्यादि कार्यें संकल्पावांचूनच करतें, त्याप्रमाणें तूंहि संकल्प न करतां व सुखदुःखांची भावना न करतां प्रवाहपतित कार्यामध्यें प्रवृत्त हो. प्रेक्षकाच्या कौतुकाकरितां जणुं काय स्वतःच नृत्यादिक करीत असल्याप्रमाणें दिसणाऱ्या लांकडी बाहुल्यांना नटाप्रमाणें शृंगारादिक रसांची भावना जशी होत नाहीं, त्याप्रमाणें तूंहि प्रारब्धप्राप्त कर्म करीत असतांनाही मनांत कौतुकबुद्धि धारण करूं नकोस. मूर्ख विषयसुखामध्यें जशी प्रीति ठेवतो तशी तूं ठेवूं नको. हेमन्त ऋतूमध्यें वेली जशा नुसत्या आकारमात्र उभ्या असलेल्या दिसतात, त्यांच्यावर शोभा कांहींच नसते त्याप्रमाणें तुझीं सर्व इंद्रियवृत्तिज्ञानें[१] नीरसच—केवल आकारमात्रसंलक्ष्य असोत. शिशिरऋतूंत वेलीनें वेढलेला वृक्ष जसा नीरस असतो, त्याप्रमाणें बोधसूर्यानें जिच्यांतील रस—प्रीति शोषून घेतली आहे, अशा षड्वर्गसत्तेनें[२] तूं एखाद्या यंत्राप्रमाणें हालचाल करीत रहा. ( अहो, पण नीरस षड्वर्गाचें जीवन कसें होईल, म्हणून विचारशील तर सांगतों.) हेमन्तऋतु बाह्य जलाच्या अभावींहि आंतील रसानेंच वृक्षांना जसा जिवंत ठेवतो, त्याप्रमाणें आवरणशून्य भूमानन्दरूप चित् हाच ज्यांचा आंतील जीवन, पुष्टि इत्यादिकांचा हेतु—रस आहे, अशा स्वभावतः बाह्य रसाचा आस्वाद घेण्यास प्रवृत्त झालेल्याहि इंद्रियांचें स्वयत्नानें निवारण करून त्यांना आंतील चिद्रसाचा अनुभव घेण्यासाठींच प्रवृत्त कर व आंतील चिद्रसावर त्यांना धारण कर. पण असें न करतां तूं जर आपल्या इंद्रियवृत्ति सरस ठेवशील--त्यांना विषयतृष्णायुक्त करशील व त्यांचें बाह्य विषयसुखापासून निवारण करणार नाहींस, तर तूं जरी व्यवहार करीत असलास किंवा करीत नसलास—सव व्यवहार सोडून बसलास तरी हा तुझा संसाररूपी अनर्थाचा समूह केव्हांहि शांत होणार नाहीं. वायु, अग्नीची ज्वाला, यंत्र व पाणी हे पदार्थ संकल्पावांचून जसे स्पंदन पावतात, त्याप्रमाणें तूंहि जर संकल्पावांचूनच व्यावहारिक हालचाल करशील, तर तूं अनंत कल्याणाचें पात्र होशील. अनंत कल्याण संपादन करण्यास सर्व प्रकारें समर्थ होशील. वासनेवांचून स्वकर्माच्या कर्तृत्वाचा अभ्यास करणें हेंच परम धैर्य आहे व हेंच जन्मरूपी ज्वराचें—दुःखाचें निवारण आहे. तूं वासना व संकल्प यांना सोडून यदृच्छेनें प्राप्त झालेल्या स्थितीचें अनुवर्तन कर. चाकाचें भ्रमण जसें हळूहळू आपोआप शांत होत जातें. त्याप्रमाणें तूंहि उत्तरोत्तर शांत होत कर्मामध्यें प्रवृत्त हो. तूं आपल्या चित्ताला कर्मफलामध्यें आसक्त होऊं देऊं नकोस. कर्मत्याग जरी केलास तरी त्याच्या फलाविषयींहि आसक्ति ठेवूं नकोस. फलाची आसक्ति सोडल्यावर कर्में करणें किंवा त्यांचा त्याग करणें यामध्यें विशेष कांहींच रहात नाहीं.

---

१ वृत्तिज्ञानासारखीं दिसणारीं पण मनांत रागद्वेषादि कार्य न करणारीं अशीं असोत.

२ षड्वर्ग म्हणजे पंचकोशांनीं परिवेष्टित झालेला चिदाभास, मनासह प्राणवर्ग, ज्ञानेंद्रियवर्ग, कर्मेंद्रियवर्ग, ज्ञानकर्मेंद्रियांसह अन्तःकरणचतुष्टय व रस-रक्तादि सहा कोशांचें शरीर हे सहा षड्वर्ग, त्यांच्या सत्तेनें.

यास्तव तूं त्या दोहोंचाहि त्याग कर, किंवा त्या दोहोंचाहि आश्रय कर. उगीच अधिक पाल्हाळानें सांगून काय करावयाचें आहे? मी हें तुला संक्षेपानें सांगतों. संकल्प करणें हाच मनोबंध आहे, व त्याचा अभाव हीच विमुक्त अवस्था आहे. तेथें कोठेंच कार्य व त्याज्य असें कांहींच नाहीं. तर सर्व शिव, अज, शांत अनन्त आहे. यास्तव तूं स्वरूपतः जसा आहेस तसाच रहा. कर्मामध्येंहि अकर्मत्व म्ह. निष्क्रिय ब्रम्हात्मत्व पहा. अकर्मामध्यें ह्मणजे तशा प्रकारच्या ब्रम्हभावस्थितीमध्यें अवश्यकर्तव्यता पहा आणि यथाभूतार्थ—वास्तविक-पारमार्थिक चिद्रूप होऊन मोठ्या सुखानें शांत रहा. बाह्य विषयज्ञानशून्य होऊन स्वरूपज्ञानामध्यें स्थिर होणें याला योग म्हणतात. तोच अकृत्रिम—स्वाभाविक चित्तक्षय आहे. यास्तव तूं अत्यंत तन्मय होऊन जसा आहेस तसाच रहा. ( अहो, पण आमवातानें ज्याचें सर्व अंग जड झालें आहे अशा रोगी पुरुषाप्रमाणें कांहीं हालचाल न करतां बसल्यास खेदच होईल, आनंद होणार नाहीं. म्हणून म्हणशील तर— ) बाबा रे! सम, शांत, शिव, सूक्ष्म, द्वैत-ऐक्यरहित, सर्वव्यापक, अनन्त, पर व शुद्ध अशा तत्त्वामध्यें कोण कशाचा खेद करणार! मरुभूमीमध्यें जसा अंकुर उत्पन्न होत नाहीं, त्याप्रमाणें तुझ्या ठिकाणीं संकल्प उदय न पावो. दगडाच्या उदरांत जशी वेल उगवत नाहीं, त्याप्रमाणें तुझ्या मनांत इच्छेचा उदय न होवो, जो बाह्य विषयसंवेदनशून्य व शांत असतो त्याला केलेल्या किंवा न केलेल्या लौकिक व वैदिक कर्मानें कोणताहि ऐहिक किंवा पारलौकिकहि पुरुषार्थ प्राप्त होत नाहीं कारण कर्म व अकर्म या दोहोंच्याहि बाधाचा अवधि—परम सीमा व त्या दोहोंच्याहि आत्मभूत अशा नित्य अभेदरूप तुझ्या ठिकाणीं प्रातिभासिक कर्माचा मिथ्या उदय जरी झाला तरी वस्तुतः त्याला कर्मत्व नाहीं. कर्तृत्वरूपानें जरी विवर्त झाला तरी कर्तृता नाहीं. कारण ज्याला कर्मत्व, कर्तृत्व इत्यादि सत्य वाटतें त्यालाच कर्मफल मिळतें, असा शास्त्राचा सिद्धांत आहे. तूं जोंवर 'अहं मम' असें जाणत राहशील, तोंवर दुःखापासून मुक्त होणार नाहींस, आणि अहंमम-भावना सोडलीस कीं मुक्त होशील; यास्तव यांतील तुला जें इष्ट असेल तें कर. 'अहं' व 'मम' हे भाव मुळीं नाहींतच. तर जें कांहीं आहे तें परम शिवस्वरूप आहे. 'भूमानंद' या नांवाच्या शिवाहून भिन्न असें हें दृश्य-प्रातिभासिक जगत् अवस्तु—मिथ्या आहे. हे राघवा! हें जें कांहीं जगत् दिसत आहे तें सोन्याच्या कड्याप्रमाणें भासत आहे, तें सोन्याहून पृथक् विद्यमान नाहीं. त्याचें अवेदन हाच त्याचा क्षय आहे, असें विद्वान् समजतात. ब्रह्मभावनेनें जगाचा बाध झाल्यावर त्याच्या अधिष्ठानरूपानें मागून अवशिष्ट राहिलेलें जें ज्ञानस्वरूप तेंच सत्य एकरूप आहे, तोच परमार्थ आहे, असें अनुभवनिष्ठ जाणतात.

---

## सर्ग २ रा.

१—सर्व शिवमय जगत् असें निरूपण, २ कर्मबीजाचा निश्चय व ३ त्याचें समूल निवारण.

श्रीवसिष्ठः—रामा! जसें पंकमय सैन्य असतें तसें हें जगत् शिवमय आहे. तें अद्वैत, ऐक्य, मननशून्य, शांत व तत्वदृष्टच्या आत्म्यामध्यें—पारमार्थिक स्वभावामध्यें अवस्थित आहे. जें जें चित्-च्या योगानें प्रकाश पावणारें तें तें चिद्विवर्त आहे. त्यामुळें मन, अहंकार, बुद्धि वगैरे व चित्त हें सर्व चिन्मय

आहे. कारण चित्तें चेत्योन्मुख होणें, हेंच मनन आहे. तें चिद्व्याप्त असतें. त्यामुळें अभिमान, निश्चय, स्मरण, इच्छा, संकल्प इत्यादि त्याच्या वृत्तिहि तशाच चिद्व्याप्त असतात, हें सर्वांच्या अनुभवानेंच सिद्ध आहे. त्याचप्रमाणें चित्-चेत्यसंबंधलक्षण काल, विषयाकार, क्रिया, शब्द, शक्तिसंबंध, इत्यादिकांसह सर्व अंतःकरणसंसरण साक्षात् साक्षिवेद्य असल्यामुळें शिवमय आहे, हें जाणणें शक्य आहे. त्याचप्रमाणें बाह्य इंद्रियें, त्यांच्या द्वारा होणारें बाह्य विषयांचें ज्ञान, व त्यांचे विषय या सर्वांचा जो अनुभव येतो तो चिद्व्याप्तीमुळेंच येतो. त्यामुळें रूप शब्दादि विषयांचें दर्शन, त्याचप्रमाणें बाह्य विषयांचें ग्रहण, त्याग इत्यादि करण्याची बुद्धि, तिचे विषय हें सर्व शिवपंकमयच आहे. सर्व शिवमय आहे, असें पाहिलें असतां शिवच सर्व त्रिपुटिरूपानें प्रकाशमान होतो. कारण तें सर्व शिवमय आहे व त्याला अनन्तत्व आहे. तेव्हां त्यांतील कोणत्या शिवभिन्न साधनानें कशाचें—कोणत्या शिवभिन्न वस्तूचें ज्ञान होणार ? अर्थात् प्रमाता, प्रमेय, प्रमाण इत्यादि; देश, काल, दिशा वगैरे, भाव-अभावादि विवर्त वगैरे हें सर्व शिवपंकमय आहे. सर्व विवर्तांचें अहं व मम या दोन रूपांनीं ग्रहण करून, या दोन भावनांमध्यें त्यांचा संग्रह करून त्या भावनाहि चिद्व्याप्त आहेत असें अनुसंधान ठेवलें असतां केवल पुरुष तन्मात्रच होतो, त्यामुळें त्या चिन्मात्रांत अवस्थान होणें सुलभ आहे. यास्तव तूं अहं व मम यांतील सार असा जो परमेश्वर त्याहून दुसरें कांहीं नाहीं, असें निश्चयानें जाणून तूं आपल्या मतीला कोठेंहि आसक्त होऊं देऊं नको. तर शिलेच्या उदरांतील मौनाप्रमाणें वागादिकांच्या सर्व चेष्टा सोडून रहा.

**श्रीरामः—हे प्रभो ! अहं व मम या** असद्रूपांची भावना न करणाऱ्या ज्ञानी पुरुषाच्या कर्मत्यागानें अशुभ काय होणार किंवा त्याच्या कर्मानुष्ठानानें शुभ तरी काय होणार ? (अर्थात् त्याचें तूष्णीं अवस्थान सहज घडेल).

**श्रीवसिष्ठः**—हे निष्पापा रामा ! मी आतां तुला कांहीं विचारतों, तें जर तत्त्वतः जाणत असशील तर मला सांग. अगोदर कर्म कशाला म्हणतात ? कर्माचा विस्तार कशा प्रकारचा आहे ? त्याचें मूळ काय आहे ? त्यांतील नाश करण्यास योग्य असलेल्या अंशाचा उत्तम प्रकारें नाश कसा केला जातो ? ( मूळासह कर्माचा त्याग करतां आल्यास ज्ञानी पुरुषाची तूष्णीं स्थिति अशक्य नाहीं, अशा अभिप्रायानें हा मूळाविषयीं प्रश्न केला आहे. )

**श्रीरामः**—भगवन् ! ज्याचा कौशल्यानें नाश करावयाचा असतो, ज्याचा अत्यंत विनाश व्हावा अशी इच्छा असते, त्याचें मूळ तोडलें तरच त्याचा सर्वथा विनाश होतो. वर वर शाखा वगैरे तोडल्यानें त्याचा सर्वथा नाश होत नाहीं. खरोखर बुद्धिमानानें आपलें शुभाशुभ म्ह० पुण्यपापरूप कर्म अवश्य नाहींसें करावें. तें दोन्ही प्रकारचें स्वकर्म अवश्य नाश करण्यास योग्य आहे. त्याचें मूळ निःशेष उपटून टाकलें असतां तें पुण्यपापरूप कर्म पूर्णपणें नष्ट होतें. हे ब्रह्मन् ! मी कर्मरूपी वृक्षाचीं मूळें सांगतों तीं ऐका. त्यांना उपटून टाकल्यानें निर्मूल झालेला कर्मवृक्ष पुनः उदय पावत नाहीं. हे ब्रह्मन् ! अगोदर देह हाच कर्मवृक्ष उत्पन्न झाला आहे. तो संसाररूपी अरण्यांत वाढला आहे. हात, पाय इत्यादि विचित्र शाखांनीं तो अतिशय शोभत आहे. सुख व दुःख या

१ यानें वसिष्ठांच्या वरील प्रश्नांतील 'त्याचें मूल काय आहे ?' या तिसऱ्या प्रश्नाचे उत्तर राम देत आहे.

फलांचीच रांग ज्याच्यावर आहे अशा या देहवृक्षाचें बीज प्राक्तन-कर्म आहे. हा देहवृक्ष क्षणभर म्हणजे कांहीं काल तारुण्यानें रम्य दिसत असतो व जरारूपी पुष्पानें हंसत असतो. कालरूपी उग्र मर्कट याच्या आकृतीचा प्रत्येकक्षणीं ध्वंस करीत असतो. (काल प्रतिक्षणीं याचा परिणाम करीत असतो.) निद्रारूपी हेमन्त ऋतूच्या उदरांत याच्या स्वप्नरूपी पानांचे अंकुर संकुचित होऊन राहिलेले असतात. या देहाची जी वार्धक्यावस्था तोच या वृक्षाचा शरत्कालासारखा शिशिर-ऋतूचा अंत. त्या दशेंत या वृक्षाच्या चेष्टारूप पर्णपंक्ति शांत व नष्ट होतात. जगद्रूपी जंगलांत उत्पन्न झालेल्या या वृक्षाच्याजवळ भार्यापुत्रादि पोष्य वर्ग हेंच गवत उगवलेलें असतें. हातापायांचे तळवे, ओंठ, कान, जिव्हा इत्यादि मृदु भाग हेच या वृक्षाचे ताम्रवर्ण पल्लव—कोवळी पालवी आहे. पुढें तेच अवयव थोडेसे रांठ झाले म्हणजे तींच या वृक्षाचीं वर्तुल, रेखांकित पानें होतात. आंतून रक्तयुक्त स्नायु, अस्थि यांनीं माखलेलीं असल्यामुळें सरस—रम्य दिसणारीं हातापायांचीं बोटें, हेच त्या देहवृक्षाचे रक्तवर्ण, वायूनें चंचल झालेले, व तुळतुळीत आकाराचे बालपल्लव आहेत. मृदु, ज्यांचीं टोकें तुळतुळीत व तीक्ष्ण आहेत अशीं, वर्तुळ, पुन: पुन: वाढणारीं, चंद्राच्या द्वितीयेच्या कलेसारखीं जीं नखें, त्याच कळ्या आहेत. याप्रमाणें देहरूपानें विकास पावलेल्या प्राक्तन कर्मांचीं कर्मेंद्रियें हींच मूळें आहेत. त्यांतील जीं कर्मेंद्रियें सच्छिद्र आहेत तीं आसक्ति, काम, इत्यादि सर्पांच्या योगानें दूपित झालेलीं असून जीं छिद्ररहित आहेत, ग्रंथियुक्त आहेत, तीं दृढ अस्थि व ग्रंथि यांनीं मजबूत झालेलीं आहेत. नाड्यांतून भरलेला जो अन्नरस त्यांत तीं मग्न झालेलीं असतात. तीं वासनारसानें पीतवर्ण व स्वत:च्या रक्तरसानें युक्त असतात. त्यांतील ‘पाद’ हें कर्मेंद्रिय घोट्यांनीं युक्त असतें. तीं सुंदर त्वचेनें आच्छादित झालेलीं असतात. त्यामुळें गुळगुळीत असतात. त्या कर्मेंद्रियांचींहि मूळें ज्ञानेंद्रियें आहेत. तीं देहाच्या बाहेर फार दूर जाऊनहि विषयाचें ग्रहण करण्यास समर्थ आहेत. तीं नेत्रगोलकादि पांच प्रकारच्या स्थानांचा आश्रय करून राहणारीं आहेत. तीं कर्मेंद्रियाप्रमाणेंच आपापल्या विषयवासनारूप पंकांत मग्न होऊन राहिलेलीं असतात. त्यामुळेंच तीं आपापल्या विषयांविषयीं मोठी प्रीति धारण करतात. तीं फार मोठीं—बलाढ्य आहेत. त्यांचा निग्रह करणें फार कठीण आहे. त्यांचें मूळ मन आहे. त्यांचें खोड फार मोठें आहे. त्यानें त्रिभुवनाला व्यापलें आहे. तें पांच इंद्रियें याच प्रवाहरूप शिरांनीं रूपादि विषयप्रीतिरूप अनन्त द्रव आंत ओढून नेतें व उपभोगानंतर त्यांना पुन: तें बाहेर टाकतें. त्या मनाचेंहि मूळ जीव आहे. चिदाभासरूपानें विषयोन्मुख झालेली व तेज-आप्-अन्नरूप कार्यांत प्रविष्ट झालेली जी चित् तेंच त्या जीवाचें रूप आहे, त्यांतील विषयांशाचें अविद्याशबल चित् हें मूळ आहे. चिदाभासांशाचें बीजभूत ब्रह्म-चैतन्य हें मूळ आहे. पण नामरूपरहित, अनन्त, शुद्ध असलेल्या ब्रह्माचें मूळ कांहीं एक नाहीं. याप्रमाणें सर्व कर्मांचें विषयोन्मुख चित् हेंच उत्तम बीज आहे. तें विषयोन्मुख चैतन्य अहंकारादिकांशीं तादात्म्य पावून मी कर्तृस्वरूप जीव आहें, असें समजतें व तेंच आंतल्या आंत क्रियात्मक स्पंद होऊन फलासाठीं प्रवृत्त होतें. यास्तव

१ फाल्गुनांत प्रसिद्ध वृक्षांचीं पानें भराभर गळून पडतात, हें सर्वांना माहीतच आहे.

हे मुने! जीवाचित् हेंच कर्माचें आद्य बीज आहे. तें असलें म्हणजे ज्याला मोठमोठ्या शाखा आहेत असा हा देहवृक्ष उत्पन्न होतो. हें जीवचैतन्य अहंकारादि भावनेनें युक्त होऊन मी कर्ता जीव आहें, अशा जागृत झालेल्या शब्दार्थ-भावनेनें युक्त झालें असतां तेंच कर्माच्या बीजत्वास प्राप्त होतें व तशा भावनेनें युक्त न झाल्यास तेंच सत् परम पद आहे. म्हणजे शुद्ध चिति—चेतन, जीव हा शब्द व अर्थ या भावनेनें वेष्टित झाली कीं, तीच कर्माच्या बीजत्वास प्राप्त होते. पण ती तशा भावनेनें युक्त जर न झाली तर तेंच आद्य परम पद आहे. यास्तव, देहादि-अहंभावाकार जीवाचें 'मी कर्ता आहें' असें समजणें कर्माचें कारण आहे. हे मुनीश्वरा! मी जें हें कर्माचें मूळ सांगितलें आहे, तें पूर्वीं तुम्हींच सांगितलेलें असून त्याच्या आधारानेंच मीं हें सांगितलें आहे. मीं आपल्या उपदेशाचाच हा अनुवाद केला आहे.

श्रीवसिष्ठः—हे राघवा, या अहंकाररूप सूक्ष्म कर्माचा त्याग कोणता? व त्याचें अनुष्ठान तरी कोणतें? मुकाट्यानें बसणें किंवा देहाचा त्याग करणें, या उपायांनीं कर्मत्याग होऊं शकत नाहीं. अर्थात् देह इ० उपाधि असेपर्यंत तूं सांगितलेल्या कर्माच्या मूळाचा त्याग संभवत नाहीं हें सिद्ध झालें. कारण, त्या उपाधीकडून बाह्य किंवा आंतर विषयांतील ज्याची ज्याची कल्पना केली जाते तें तें दृश्य उत्पन्न होतें. मग तें सत्य आकाराचें असो कीं, असत्याकार असो; व त्या विभ्रमाचा अनुभव येतो. कल्पनेच्या अनुसार भ्रम झाल्यावांचून रहात नाहीं. पण त्या विषयांची कल्पनाच जर न केली तर चैतन्य सर्व भ्रमापासून मुक्त होतें. सुषुप्ति, मूर्च्छा, समाधि या समयीं चित् सर्व-संकल्पशून्य असतें. त्यामुळें त्या अवस्थांमध्यें 'आत्मा हृदयाच्या सर्व शोकाचें उल्लंघन केलेला असा होतो' या श्रुतीच्या अर्थाचा साक्षात् अनुभव येतो. (अहो, पण तो याला होणारा भ्रम जर खोटा असेल तर तो झाला म्हणून बिघडलें काय? असें विचारशील, तर सांगतों.) भ्रम खोटा असो कीं खरा असो, तो कसा आहे, याचा विचार करून काय करावयाचें आहे? कारण संसार खोटा जरी असला तरी त्याचा बाध होईपर्यंत भ्रामक दुःखादिकांचाही अनुभव येतोच. हें जीवचेतनच वासना, इच्छा, मन, कर्म, संकल्प इत्यादि नांवांनीं शरीरांत उत्पन्न होतें, व तेंच संसाररूपानें विकास पावतें. (असें जर असेल तर चित्प्रतिबिंबाचें निमित्त अशा चित्तोपाधीचें बोधानें निरसन करावें, म्हणून म्हणशील तर सांगतों—) देही-देहवान् जीव प्रबुद्ध-ज्ञानी असो, कीं अज्ञ असो; देह विद्यमान असेपर्यंत देहरूपी-गृहांत चित्त असतें. त्याचा त्याग संभवत नाहीं. जिवंत असलेल्याकडून त्याचा त्याग कसा बरें संभवेल? अर्थात् **मुकाट्यानें बसल्यानें किंवा देहत्यागानेंहि कर्माचा त्याग होऊं शकत नाहीं. तर प्रारब्धकर्माच्या ओघानें प्राप्त झालेला व्यवहार करीत असतांनाही मीं असंग, अद्वितीय, कूटस्थ[1] चिन्मात्र आहें, मी कांहीं करीत नाहीं, अशा निष्क्रिय आत्मस्थितीनें 'कर्म' हा शब्द व त्याचा अर्थ यांविषयींची भावनाच उत्पन्न होत नाहीं. असें झालें असतां अनायासानें कर्माकर्मत्वविकल्प सोडून पुरुष केवल आत्माच होतो.** असो. याप्रमाणें कर्माचा सर्वथा त्याग अशक्य असतांना जो हा कर्तव्यतेचा त्याग करितो,

१ 'कूटस्थ चिन्मात्र' हें 'सर्व' अर्थपर आहे; व 'ओं' हें 'सर्व' शब्दपर आहे. यास्तव 'ओं' या शब्दानें 'कूटस्थ चिन्मात्र' हा अर्थ जाणावा.

त्यानें वस्तुतः कशाचाही त्याग केलेला नाहीं. ( अर्थात् त्याग जर शक्य असेल तर तो वर सांगितलेल्या प्रकारेंच शक्य आहे. दुसऱ्या कोणत्याही प्रकारें शक्य नाहीं. ) आत्मसाक्षात्काररूप बोधानें सर्व द्वैताचा बाध आपोआप होतो. त्याबरोबरच कर्माचाही बाध होतो. त्यामुळें म्ह० सर्व दृश्य प्रतिभासाच्या बाधामुळें सर्व दृश्याचें जें अत्यंत असत्त्व तोच जगाचा त्याग आहे व तोच असंग मोक्ष आहे, असें विद्वान् समजतात. ( अहो, पण आत्मसाक्षात्कारानें दृश्याचा बाध होईल, दृक्शक्तीचा बाध कसा होणार? म्हणून म्हणशील तर सांगतों—) दृश्य विद्यमान असलें तर त्याविषयींचें वेदन होतें. पण तत्त्वदृष्टच्या सृष्टीच्या आरंभींच विषयसंवेदन उत्पन्न झालेलें नाहीं. त्यामुळें तें वेद्यसंवेदन विद्यमान नाहीं. तस्मात् वेदन कोठचें ? व कशाविषयींचें असणार ? ( कारण उपाधीचा बाध झाल्यावर चिदाभास पृथक् राहूं शकत नाहीं ). आतां चिदाभासत्वरूप वेद्योन्मुखत्व सोडून अवशिष्ट राहणारें जें शुद्ध चिदात्मैकरूप तें द्वैतवेदन नव्हे व ती क्रिया नव्हे; तर त्याला शांत ब्रह्मच म्हणतात. जें चिदाभासात्मक चेतन तेंच कर्म म्हटलें जातें. कारण तें बुद्ध्यादि उपाधि याच कारकव्यापारानें जलादिकांत प्रतिबिंबित झालेल्या आकाशाप्रमाणें विकास पावलेलें असतें. ह्मणूनच अनुभवनिष्ठ सत्पुरुष मोक्षाला चिदाभासशून्यच ह्मणतात; आणि त्यांची विवेकी शिष्याला उद्देशून असलेली उपदेशवाणी अशा स्वरूपाचीच ऐकूं येते. म्हणून देह असेपर्यंत कर्मांचा त्याग उपपन्न होत नाहीं. जे कर्मांचा सत्कार करितात त्यांच्याकडून त्यांच्या मूळाचा त्याग संभवत नाहीं. वासनात्मक मनाची चिदाभाससंविद् हें स्वकर्माचें मूळ आहे. पण ती चिदाभाससंविद् देह असेपर्यंत आत्मसाक्षात्कारावांचून नाहींशी करतां येत नाहीं. हे रामा ! ही चिदाभाससंविद् प्राण्याच्या चित्तांत दुसरींही कामवासनादि कर्मांचीं मूळें उत्पन्न करणारी आहे व तिला कर्तृत्व असल्यामुळें ती सर्वांत श्रेष्ठ आहे. ज्याच्याकडून चिदाभासरूप संविद् मूळ अज्ञानासह स्वप्रयत्नानें तत्त्वाला जाणून स्वरूपापासून ढळविली जाते, त्याच्याकडून तिच्या मूलभूत सूक्ष्म संविदेचाहि नुसत्या अननुसंधानानेंच स्वप्रयत्नानें नाश केला जातो. म्ह० मूल अज्ञानासह चिदाभाससंविदेचा बाध केल्यावर दृश्यदर्शनरूप वृत्त्यवच्छिन्न चिदाभासाच्या बाधासाठीं निराळा यत्न करावयास नको. त्या मूलोच्छेदासाठीं केलेल्या यत्नानेंच संसारवृक्षाचा समूल उच्छेद होतो. तात्पर्य, ज्यांत चिदाभास नाहीं, अशा प्रकारचें जें एकसजातीयादि भेदांनीं व दृश्य विषयभेदांनीं रहित आकाश तेंच वर सांगितलेल्या रीतीनें ब्रह्म आहे. तेंच आम्हां सर्व चेतनांचें सार—पारमार्थिक रूप आहे, असें ब्रह्मवेत्ते सांगतात. २.

---

## सर्ग ३ रा.

—:०:—

१ सर्व दृश्याचें अत्यंत परिमार्जन केलें असतां विद्वानांचें निर्विषय व निष्क्रिय तत्त्व कोणत्या उपायानें सिद्ध होतें तें येथें सांगतात.

श्रीरामः—हे मुनींद्रा ! वेदनांचें अवेदन कसें केलें जातें ? कारण असत् पदार्थाचा भाव संभवत नाहीं व सत् वस्तूचा अभाव संभवत नाहीं !

श्रीवासिष्ठः—रामा ! असत्चा भाव होत नाहीं व सत्चा अभाव होत नाहीं, असा

अबाधित सिद्धांत असल्यामुळेंच वेदनाचें अवेदन आपोआप होणें अगदीं सुकर आहे. संसारदर्शेत प्रसिद्ध असलेले हे वेदनशब्दार्थ म्ह. 'वेदन' हा शब्द व त्याचा अर्थ रज्जुसर्पभ्रमासारखे आहेत. ते मिथ्या उदय पावलेले आहेत. ते दोन्हीहि मृगजळासारखे आहेत, असें तूं समज. त्या दोहोंचा अबोध म्ह. त्रिपुटीची निवृत्तिच अत्यंत श्रेष्ठ आहे. कारण साक्षीपासून ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय इत्यादि त्रिपुटीची निवृत्ति होणें हाच मोक्ष आहे आणि त्यांचा बोधच दुःखाला कारण होतो. यास्तव रामा! तूं अविनाशी कूटस्थ आत्मरूपच जाण; त्रिपुटींत अंतर्भूत होणाऱ्या वृत्त्यादिकांत प्रविष्ट झालेल्या चिदाभासाला आत्मा समजूं नको. त्या परिच्छिन्न चिदाभासाचे ठिकाणीं 'हा आत्मा' अशी भावना करणें—त्याला आत्मा समजणें, हेंच प्राण्याला अत्यंत दुःख देणारें आहे. यास्तव त्याचा समूळ उच्छेद करून तूं जसा स्वभावतः आहेस तसाच रहा. (पण व्यवहारसमयीं त्याचा उच्छेद कसा करतां येईल? उत्तर—) सर्व त्रिपुटीबोधरूप व्यवहाराचे वेळींहि 'व्यावहारिक ज्ञान' हा शब्द व त्याचा अर्थ यांहून भिन्न असलेलें जें कूटस्थ चिन्मात्र त्यालाच 'ओं' या शब्दानें लक्षित करून तोच आत्मा निर्वाणाचा उदय आहे, असें जाणून शांत व्हावें. सर्व विक्षेपशून्य होऊन व्यवहार करावा. विवेकी पुरुषानें आपल्या शुभाशुभात्मक कर्मांचा नाश करावा. (वर सांगितलेल्या प्रकारच्या बोधानें युक्त होऊन व्यवहार करीत राहिलें असतां संचित पुण्यपापांचा नाश होतो व ज्ञानोत्तरकालीन पुण्यपापांचा लेप लागत नाहीं.) तो नाश 'कर्म वस्तुतः नाहीं; आत्मा निष्क्रिय असल्यामुळें कर्म हा त्याचा धर्म नव्हे' अशा ज्ञानानें होतो. तसें ज्ञान तत्त्वसाक्षात्कारानें सिद्ध होतें. सर्व कर्मांचें मूळ अशा चिदाभासाचा नाश केल्यानें संसार शांत होतो. यास्तव सर्व कर्म मूळ, फळें, शाखा, उपशाखा, पानें, फुलें, या सर्वांसह नाहींसें होईपर्यंत त्याचा चांगला विचार व शोध करावा. बिल्वफलांतील मज्जा आपल्यामध्यें जें बीजादिक करते, तें त्या बिल्वाहून जसें पृथक् नसतें, त्याप्रमाणें चिद्रूप आत्मा आपल्यामध्यें जें चित्तसंज्ञक क्रियाकारकादि करतो तें त्याहून यत्किंचित्‌हि पृथक् नसतें. भूलोकाच्या एकदेशीं राहणारें जंबुद्वीप भूलोकाहून जसें भिन्न नाहीं, त्याप्रमाणें आकाश व त्यांतील भूत—लोक-विषय इत्यादि परमात्म्याहून अगदीं पृथक् नाही. जसें जें जल तेंच त्यांतील द्रवत्व, त्याहून पृथक नाहीं, त्याचप्रमाणें चित्तत्व चित्त आहे. कारण चित्तत्व व चित्त हे शब्द व त्यांचा अर्थ 'चिति' धातूपासूनच झालेले आहेत. चिन्मात्र हाच त्यांचा अर्थ आहे. जसें पाण्यांत द्रवत्व व तेजांत प्रकाश त्याप्रमाणें ब्रम्हांत ग्राहकत्व व स्मर्तृत्व या दोन धर्मांनीं रहित असें चित्त्व व चित्त राहतें. विषयांना प्रकाशित करणें हेंच चित्‌चें कर्म आहे, तें निर्विकार चित्-पासून कारणावांचूनच भ्रामक यक्षाप्रमाणें उत्पन्न होतें. आणि जें निर्मूल—कारणावांचून उत्पन्न झालेलें असतें, तें वस्तुतः उत्पन्नच झालेलें नव्हे; आणि विषयाना प्रकाशित करणें हें चेतनकर्महि जर निष्कारण असल्यामुळें वायु व त्याचा स्पंद यांप्रमाणें अपृथक् आहे, तर बाहेर ह्मणजे जागृतींत व आंत ह्मणजे स्वप्न व सुषुप्ति यांत होणारी जी विषयप्रतीति तीहि आत्माच आहे त्याहून पृथक् नाहीं. सर्व कर्मांचा विस्तार देहच आहे. तोच मूलतः आत्मा व शाखातः संसार आहे. चिदाभासात्मक क्रियेचा बाध करणें, एतद्रूप अनहंत्वानें ह्मणजे त्याच मूलोच्छेदानें तो शाखांसह शांत होतो. पण चिदाभासाच्या उच्छेदानें जीवाचा उच्छेद होईल, असें समजूं

नये. तर ब्रम्हभावनेनें तो जीव अनन्तात्मा होतो. म्हणजे त्यानें त्या भावनेनें संसाररूप अनर्थाचा समूल उच्छेद करून परमपुरुषार्थच संपादन केला आहे. असें समज. यास्तव, रामा! डुकराच्या मुखाचें अग्र नागरमोथ्यांना जसें समूळ उपटतें, त्याप्रमाणें तूं संसाराचें मूळ अनहंभावनेनें उपटून टाक. असें केल्यानें कर्म-बीजकलांच्या कोशाचाच—असंख्य कर्मबीजांच्या सांठ्याचाच—त्याग केलासें होईल. यावांचून त्याचा त्याग करतां येणार नाहीं. हे राघवा! यास्तव तुझ्या चित्तांत सदा स्थित असलेलें वेदनात्मक कर्ममूल शांत होवो. या कर्मबीज-कलेचा त्याग केला असतां जीवाच्या ब्रम्हात्मत्वातिरिक्त चिदाभासात्मक इतर आत्म्याचा व त्याला दिसणाऱ्या प्रपंचाचा अभाव होतो. तो झाल्यावर ज्यांना वस्तूचा बोध झाला आहे अशा शांत तज्ज्ञांकडून कशाचेंहि ग्रहण केलें जात नाहीं व कशाचाहि त्याग केला जात नाहीं. ते त्याग व आदान—ग्रहण यांस जाणत नाहींत. यामुळें त्यांचें हृदय आकाशासारखें सर्वभावनाशून्य होतें. त्यांचें चित्त अतिशय शांत होतें व ते ज्ञानी पुरुष स्वरूपामध्यें अव-स्थित होतात. ते प्रारब्धप्राप्त कर्तव्य करतात व केव्हां करीतहि नाहींत. कारण प्रारब्ध-प्रवाहांत पडलेलें सर्व अनायासानेंच होतें. तें घडत असतांना त्यांचें मन शांत असतें. नदीच्या प्रवाहांत पडलेलें तृणादि सर्व जसें त्या प्रवाहाबरोबर वहात जातें, त्याप्रमाणें त्यांचीं कर्मेंद्रियें मनामध्यें कोणत्याहि प्रकारचा विकार न करतांच आपापलें कार्य करीत राहतात. अर्धवट निजलेल्या बालकाच्या अवयवांच्या हालचालीचाहि दृष्टांत त्यांच्या क्रियेला आहे. निर्विषय आनंद प्राप्त झाला असतां भोगप्रवण इंद्रियवृत्ति नीरस—रागशून्य व त्यामुळेंच आपापल्या विषयांचें प्रकाशन करण्यास असमर्थशा होतात. अर्थात् त्या संस्काररूपानें चित्तांत रहात नाहींत व विषयाकारानें बाहेरहि रहात नाहींत. अर्थात पूर्वोक्त वेदन हाच त्याग आहे, तो प्रबोधानें सिद्ध झालेला आहे. त्यामुळें त्या ज्ञानी पुरुषाला आत्मभिन्न मिथ्या वस्तूचा कांहीं उपयोग नसतो. तेव्हां जीवनोपयोगी अदृष्टाच्या सामर्थ्यानेंच होणाऱ्या देहस्पंदरूप कर्मानें काय होणार व अकर्मानें तरी काय होणार? चिदाभासरहित, विषयसंवेदनरहित व वासनारहित असें जें चित्ताचें शांत, सम, कृताकृतानुसंधानशून्य अवस्थान तोच कर्मत्याग होय. पुनः स्मरण न होईल अशा रीतीनें चिरकाळ विसरलेल्या कर्माप्रमाणें स्तंभाच्या उदरासारखें जें निर्विकार राहणें तोच कर्मत्याग होय. याप्रमाणें मूळाचा त्याग न करतां केवळ कर्मेंद्रियांचा संयमच जे वृथा ज्ञानाभिमानी करितात, त्या अज्ञपशूंना कर्मत्यागरूप पिशाच खाऊन सोडतें. पण समूल कर्मत्यागानेंच जे शांतीचा आश्रय करून राहिलेले असतात, त्यांच्या कृतकर्माचें कांहीं फल नाहीं व अकृत कर्माचा कांहीं प्रत्यवायहि नाहीं. याप्रमाणें कर्मबीजकलेला समूळ उपटून तज्ज्ञ सतत अक्षय समाधानानें राहतात. ते आपल्या चित्तांत अत्यंत सुखी असतात. प्रवाहपतित कार्यामध्यें ते थोडीशी हालचाल करितात; पण तिचा अभिमान धरून तन्मय होत नाहींत. तर मदिरेनें मत्त झालेल्या मनुष्याप्रमाणें किंवा कळसूत्री बाहुलीच्या हालचालीप्रमाणें अभिमानानें तन्मय न होतांच व्यवहार करितात. मोक्षलक्ष्मी हीच त्यांची विलासिनी असते. ते जणुं काय तिच्या व्यसनानेंच आपल्या देहादिकांस विसरतात. त्या विलासिनीविषयींच्या अत्यंत आसक्तीमुळें त्यांना आपल्या देहादिकांचेंहि भान नसतें. त्यामुळें अर्ध्या निजलेल्या व अर्ध्या जाग्या असलेल्या पुरुषाप्रमाणें ते

पांचव्या, सहाव्या इत्यादि योगभूमिकांतील कोणत्या तरी भूमिकेस प्राप्त झालेले असतात. ज्याचा समूल त्याग केलेला असतो, त्याचाच त्याग केला असें म्हटलें जातें. पण, मुळासकट न केलेला जो त्याग तो झाडाच्या शाखा वर वर तोडण्यासारखाच आहे. या कर्मवृक्षाचा मूळापासून उच्छेद न करतां वर वर त्याच्या शाखाच तोडल्यास तो वृक्ष पुनः दुःख देण्यासाठींच सहस्र शाखांनीं सर्व बाजूंनीं वाढतो. तात्पर्य, हे रामा! पूर्वोक्त अवेदनरूप भावानें कर्मत्याग सिद्ध होतो. यास्तव वर सांगितलेल्याच क्रमानें याचाच अभ्यास करीत रहा. जे कर्माचा त्याग न करतां बाकीचे उपाय करितात, ते अत्यागालाच त्यागरूप समजून आकाशालाच ताडण करीत सुटतात. ज्ञानस्वरूपतेमुळें कर्मत्याग आपोआप सिद्ध होतो. जीवन्मुक्ताची निरिच्छ क्रिया फार मोठी जरी असली तरी दग्धबीज असल्यामुळें म्ह. तिच्यांतील कर्तृत्व हें बीज दग्ध झालेलें असल्यामुळें ती अक्रियाच आहे. ज्यांतील तंतु जळले आहेत असा पटाचा आभास फार मोठा जरी असला, तरी तो कांहीं पट होऊं शकत नाहीं. ज्याप्रमाणें दोरीनें वेष्टिलें जाणारें कूपकाष्ठ पाणी विहिरींतून वर काढणें, त्याचा सेक करणें इत्यादिरूप रसभावनेमुळेंच धान्यसंपत्ति—शेत उगवणें याच्या योगानें सफल होतें, नुसत्या वृथा फिरण्यानें सफल होत नाहीं; त्याप्रमाणें बुद्धिसहित इंद्रियांनीं भोगासक्तिरूप रसाच्या भावनेनें केलेलें कर्म सफल होतें. केवल शरीरचेष्टारूप स्पंद निष्फल होतो. ज्ञानानें कर्मत्याग स्थिर झाला असतां वासनाशून्य झालेला जीवन्मुक्त गृहांत राहो कीं अरण्यांत राहो, तो धनादि संपत्तीच्या क्षयानें दरिद्री असो कीं तिच्या वृद्धीमुळें उत्कर्ष पावो, दोन्ही अवस्थांत सम असतो. **जो चित्तांत अत्यंत शांत झालेला असतो त्याचें गृह हेंच अगदीं दूर असलेलें निर्जन वन आहे. पण जो अशान्त असतो तो निर्जन वनांत जरी असला तरी तें वनाहि त्याला असंख्य लोकांनीं भरलेली नगरीच होते.** ज्याची मति अत्यंत शांत आहे अशा ज्ञानी पुरुषाची रम्य वनभूमि हृदयांतच असते. ती अत्यंत निर्मल व विस्तृत असते. त्या भूमींत कधीं स्वप्नांतसुद्धां कोणी मानव प्राप्त होत नाहींत. ज्या पुरुषाचें दृश्य ज्ञानाग्नीनें दग्ध झालें आहे, त्याला हें जगत्च महा अरण्य झालेलें असतें. त्या जगद्रूप महा अरण्यांत त्याला कोणताही विषय स्फुरत नाहीं. त्यांतलि सर्व विशेष पदार्थ शांत झालेले असतात व तें महारण्य शून्य असतें. पण जो अनंत संकल्प करणारा अज्ञ पुरुष असतो त्याच्या हृदयांतच सर्व जगाची स्थिति होते. त्यामुळें सप्तसागरांनीं परिवेष्टित झालेली ही सर्व भूमि—हा लोक हृदयांतच पुनः पुनः परिवर्तन पावतो. अज्ञानानें दीन झालेल्या त्या पुरुषाच्या हृदयांतच नाना प्रकारचा ग्रामसमूह असतो. त्यांत नानाप्रकारचीं कर्में चाललेलीं असतात व सुखदुःखादि नानाप्रकारच्या द्वंद्वांची अतिशय दाटी झालेली असते. **आरशांत ज्याप्रमाणें एखादें मोठें नगर प्रतिबिंबित झालेलें असतें, त्याप्रमाणें मलिन हृदयामध्यें सर्व सृष्टि अगदीं स्पष्टपणें प्रकाशमान होते.** ती सृष्टि द्रव्यार्जन, व्यय, प्रवास, कलह इत्यादि नानाप्रकारच्या कर्तव्यांनीं सर्वदाच विकारमय झालेली असते. कारण तीं कर्तव्यें करीत असतांना लोभ, मोह, शोक, भय इत्यादि विकारदशा प्राप्त होणें सर्वथा अपरिहार्य असतें. तशीच ती मलिन हृदयांत प्रकाशमान होणारी सृष्टि—भूमि, पुरें, मोठमोठीं नगरें, अवान्तर देश व पर्वत यांनीं युक्त असते.

## सर्ग ४ था.

—:०:—

१ अहंताच संसाराचें मूळ आहे. २ त्याचा त्याग, आत्मबोध व अनहंभावाचें सतत अनुसंधान यांच्या योगानें होतो.

**श्रीवसिष्ठ**—रामा! केवल दृक्–स्वरूप आत्म्यानें सर्व दृश्यरहित होणें हाच मोक्ष आहे. पण दिव्यांतील तेल संपलें असतां दिवा जसा आपोआप विझतो, त्याप्रमाणें ज्ञान-कलारूप बोध झाला असतां सर्व दृश्याचें मूळ जें अज्ञान त्याचा बाध होतो. अज्ञानाचा बाध झाला असतां अहंतादिकांसह सर्व जगत् शांत होतें. त्यामुळें विझलेल्या दिव्याप्रमाणें त्याग सिद्ध होतो. त्यावांचून त्यागाची सिद्धि होत नाहीं. कर्माचा नुस्ता त्याग हा त्यागच नव्हे, तर ज्यांत जगाची प्रतिमा मुळींच नसते अशा प्रकारचा अहंकारत्यागानंतर अवशिष्ट राहिलेला जो एकात्मा तोच सर्व त्यागरूप मुख्य अव्यय मोक्ष आहे. अर्थात् आत्मसाक्षात्कार हाच 'त्याग' होय. सामान्य लोकांच्या दृष्टीला दिसणारा जो हा देहादि दृश्यरूप विकार तोच मी व त्या देहादिकांशीं ज्याचा संबंध आहे असें हें सर्व भोग्य जगत् माझें आहे, अशा रीतीनें प्रत्येक प्राण्याला होणारा तादात्म्य व संसर्ग-अध्यासरूप दोन प्रकारचा बंध तैल-रहित दीपाप्रमाणें समूल शांत झाला असतां सर्वोत्तम ज्ञान म्ह० चैतन्यच 'आत्मा' म्हणून अवशिष्ट राहतो. तोच परम मोक्ष होय. पण 'हा मी' व 'हें माझें' अशा प्रकारची ज्याची भावना—अशा प्रकारचा ज्याचा द्विविध बंध शांत झालेला नसतो त्याला ज्ञान होत नाहीं, त्याला शांति नाहीं व त्याला सुखहि नाहीं. 'हें माझें' व 'हा मी' या एवढ्याच कल्पनेचा जो क्षय तो बोधात्माच आहे. कारण आरोपि-ताचा बाध अधिष्ठानमात्र असतो. तेंच शिव आहे, तीच अत्यंत शांत अवस्था आहे. त्याहून दुसरा पुरुषार्थच नाहीं. तत्त्वसाक्षात्कारानें 'अहं' हा अंश क्षीण झाला असतां ममत्वाचा विषय असें हें सर्व जगत्च क्षीण होतें. (पण सर्व जगाचा क्षय म्ह० सर्वस्वाचा क्षय आहे, असें समजून भयभीत होणाऱ्याचें समाधान वसिष्ठ करितात.) पण सर्व जगाचा क्षय म्ह० त्यांतील कांहींहि व कोठेंहि क्षीण होत नाहीं, तर तें सर्व परमार्थ एकरूपानें स्थितच असतें. 'अहं' असें समजणारा 'मी कोणी नाहीं; असंग आत्मा आहे' अशी भावना केल्यानेंच निर्विघ्न-पणें शांत होतो. ही मुक्ति एवढ्याशाच या उपा-यानें साध्य होणारी आहे. मग अनेक साध-नांच्या संपादनासाठीं एवढे श्रम कशाला करा-वेत? 'मी' व 'मी नाहीं' या दोन्ही भ्रांतिच आहेत. कारण 'अहं'-बुद्धीप्रमाणें 'अनहं'-बुद्धिही द्वैतरूप असल्यामुळें आरोपित आहे. कारण त्यांतील कोणतीहि बुद्धि परमार्थ चित्-स्वभावावांचून होऊं शकत नाहीं. पण चित्त्व तर आकाशासारखें विशद आहे. तेव्हां त्यांत ही भ्रमस्थिति वस्तुतः कोठून संभवणार? अर्थात् अहंबुद्धीला घालविण्यासाठीं अनहंबुद्धीरूप द्वैताचाच जरी अंगीकार केला तरी ती बुद्धि अहंबुद्धिसहवर्तमान आपोआप चिदात्म्यांत शांत होते. (याला उदाहरण निवळीच्या बीचें आहे. गढूळ पाण्याला निवळीची बी उगा-ळून लाविली असतां त्या बीच्या कल्कासह पाण्यांतील माती जशी खालीं बसते, त्याप्रमाणें अनहंभावना अहंभावासह आत्मस्वरूपांत शांत होते.) यास्तव वास्तविक भ्रम नाहीं, त्याचें साधन नाहीं; त्याचें भ्रांति होणें हें फळ नाहीं व त्या भ्रमाचा आश्रय—भ्रामकही कोणी नाहीं. तर आत्मस्वरूपाचें अज्ञानच हें सर्व आहे व तें आत्मज्ञानानें संपतें. हें चिन्मात्रच असद्रूपा-

सारखें होऊन पसरलें आहे, असें तूं समज; व हे रामा! अगदीं मौन धारण करून रहा. कारण हें सर्व निर्वाणमात्र-आनंदएकरूप आहे. जेव्हां जेव्हां 'अहं' या भावनेच्या उदयाचा प्रसंग येईल, तेव्हां तेव्हां तद्विरोधी अनहंभावनेचा तूं अभ्यास कर; म्हणजे शोकाचा प्रसंग येणार नाहीं. याप्रमाणें सतत सावधान चित्तानें स्थिर केलेल्या अनहंभावानें अहंभावाला सत्वर आकाशपुष्पादिकांसारखा बनवून रणांगणांत धनुष्याला जोडलेल्या अर्जुनाच्या बाणाप्रमाणें पराङ्मुख न होतां ब्रह्मपदाला घट्ट धरून—तन्मय होऊन रहा. त्याला सोडून म्हणजे त्याला विसरून एक क्षणभर सुद्धां राहूं नकोस. तूं याप्रमाणें सतत अहंतेला आकाशतुल्यतेस पोंचवून सर्व पदार्थांविषयींच्या भावनेनें रहित हो. चित्तांत कोणत्याही पदार्थाच्या कल्पनेस थारा देऊं नकोस व भवसागराचें उल्लंघन कर. स्वाभाविक अज्ञानामुळेंच उत्पन्न झालेल्या अहंभावाला जिंकण्याइतकेंहि सामर्थ्य ज्याच्यामध्यें नाहीं, त्या पशूला उत्तम पदाची प्राप्ति होईल, ही आशाच कशाला पाहिजे? तिचें नांवही ध्यावयास नको. ज्या उत्तमाधिकाऱ्यानें स्वतःपूर्वींच कामादि अरिषड्वर्गाला पूर्णपणें जिंकलें आहे, तोच मोक्षासारख्या महा फलाला पात्र होतो; इतर नरगर्दभ त्याचें पात्र होत नाहीं. ज्या मध्यमाधिकाऱ्याची मनोवृत्ति मनांतल्या मनांत जिंकली जात आहे, किंवा ज्या उत्तमाधिकाऱ्यानें तिला जिंकलें आहे, तोच विवेकांचा विषय आहे व त्यानेंच पुरुषार्थाच्या साधनानें आपला जन्म सफल केलेला असल्यामुळें त्यालाच 'पुरुष' असें म्हटलें जातें. समुद्रांत फेंकलेल्या पाषाणाप्रमाणें जो जो विषय तुझ्या ठिकाणीं येतो, त्या त्यापासून तूं 'नाहं' अशा भावनेनें दूर पळ. म्ह० असंग आत्मभावनेनें माझा त्याच्याशीं कांहीं संबंध नाहीं, असें समज. 'अहं' नाहीं, अशा भावनेनें अहंकाराचा अभाव जाणूनहि सोपपत्तिक ज्ञप्तिस्वरूपसुखाला जाणणारा—त्याचा चांगला अनुभव घेणारा—असा तूं एखाद्या अज्ञासारखा मोहित होणार कीं काय? छेः, तें शक्यच नाहीं. उपपत्तितः ज्ञेय विषयच सिद्ध होत नाहीं. कारण सर्व विकार नुसते वाणीनें उच्चारण्यापुरतेच असतात, त्यापलीकडे त्यांचें पृथक् अस्तित्व नाहीं, हें तुला कळलें आहे. सोन्यामध्यें जसें कटकत्व वगैरे केवळ भ्रांतिमात्र असतें, त्याप्रमाणें ज्ञेय भ्रांतिमात्र आहे व ती तुझी भ्रांति नुस्त्या अस्मरणानेंच शांत होते. वायूंतील स्पंदाप्रमाणें तुझ्या चित्तांत जो जो विषय उदय पावेल, त्याच्या विषयीं 'हा मी नव्हे' किंवा 'हा माझा नव्हे' अशा चिद्वृत्तीनें त्याला निराधार करून सोड. ज्यानें अगोदरच लोभ, लज्जा व मोह यांना अनहंभावानें जिंकलें नाहीं, तो नास्तिक्य, यथेष्टाचरण इत्यादि देणाऱ्या या अध्यात्मशास्त्रांत वृथा कशाला प्रवृत्त होतो? कारण, तो त्याचा अधिकारीच नव्हे. वायूंतील स्पंदाप्रमाणें तुझ्या ठिकाणीं हें जें 'अहंत्व' स्थित आहे, तें वायूंतील स्पंदाप्रमाणेंच परमात्म्याहून पृथक् नाहीं. कूटस्थ चिन्मात्र-स्वभाव आत्म्याच्या ज्ञानानें परमात्म्यामध्यें विलीन झालेला—तद्भावास प्राप्त झालेला हा प्रपंच फारच शोभतो. कारण पुष्पमालेच्या ठिकाणीं कल्पिलेला सर्पादि दुष्ट अर्थहि ज्ञानानें त्या माळेंत लीन झाला असतां जसा कंठस्थ पुष्पमालेच्या रूपानें शोभतो, त्याप्रमाणें परमात्मा कधीं विकारांच्या आकारानें उदय पावत नाहीं, व कधींहि त्यांच्या अस्तानें अस्त पावत नाहीं. त्याच्याहून अन्य पदार्थ विद्यमानच नाहीं. तेव्हां भाव कोठचा व अभाव तरी कोठचा? उत्पत्ति व ध्वंस हे शब्दहि परमात्म्याचे

ठिकाणीं संभवत नाहींत. ' मी ' ' माझें ' इत्यादि त्रिपुटींचा बाध झाला असतां त्यामुळें प्राप्त होणारा जीवभावहि नष्ट होतो. नंतर परामध्यें पर, पूर्णांत पूर्ण, शान्तांत शांत व शिवामध्यें शिव स्थित होतें. म्हणजे त्वंपद-लक्ष्य साक्षी—प्रत्यगात्मा तत्पदलक्ष्य पर-ब्रह्मांत स्थित होतो. अर्थात् तत्व जसें पूर्वी स्थित होतें, तसेंच हें होऊन राहतें. कांहीं अपूर्व गोष्ट घडते असें नाहीं. जीवभाव नष्ट झाल्यावर आत्म्याचें कांहीं अपूर्व रूप उत्पन्न होतें, असें नाहीं. त्यानंतर मग मी नाहीं, जगत् नाहीं व ' हा मी ' आणि ' हें जगत् ' ही बुद्धि नाहीं. ( अहो, पण प्रदीपाच्या निर्वाणाप्रमाणें आभासासह अविद्येचें निर्वाण हेंच ज्ञानाचें फळ आहे. कारण तसें न मानल्यास ज्ञान निष्फळ होणार ! ' उत्तर— ) निर्वाण हें ज्ञानाचें फल आहे खरें; पण तें अत्यंत अप्रसिद्ध आहे. कारण निशारहित म्हणजे रात्रिरहित सूर्याच्या ठिकाणीं जशी रात्रीची निवृत्ति नित्यसिद्ध असते, तसें अनिर्वाण ब्रह्मामध्यें निर्वाण नित्यसिद्ध आहे. त्यामुळें अनर्थनिवृत्ति हें ज्ञानाचें अपूर्व फल नव्हे. त्याचप्रमाणें नित्यसिद्ध निरतिशयानंदांत आनंदप्राप्तिरूप फलहि अपूर्व नव्हे. तसेंच शांत ब्रह्मांत शांत होणें हेंहि अपूर्व फल नव्हे. त्यामुळें ज्ञानफलाच्या योगानें द्वैतापत्ति होत नाहीं. जर प्रत्यगात्म्याच्या ठिकाणीं बंध व ब्रम्हामध्यें आकाशादि पदार्थ सत्य असता तर त्यांचें निर्वाण--बाध दीपाच्या निर्वाणाप्रमाणें अपूर्व झाला असता. पण रज्जुसर्पनिर्वाणाप्रमाणें प्रत्यगात्म्याच्या बंधाचें निर्वाण हें अनिर्वाणच आहे. ब्रम्हहि वस्तुतः खऱ्या आकाशादिकांसहवर्तमान नसतेंच. त्यामुळें त्याची निवृत्तिहि द्वैत प्राप्त करून देणारी नाहीं. अहो, मोठमोठ्या शस्त्रांचे आघात सहन केले जातात; भयंकर व्याधींच्या वेदना सहन केल्या जातात; मग 'मी नव्हे' 'मी देह नाहीं' एवढेंच सहन करण्यांत काय मोठी अडचण आहे ? किंवा त्या अनहंभावनेला असह्य कसें म्हणतां येईल ? जगांत पदार्थांचे जे अनेक समूह आहेत त्यांचा ' अहं ' हा अक्षय अंकुर आहे. त्याचें निर्मूलन केलें असतां सर्व जगत् निर्मूलत्वास प्राप्त झालें आहे, असें समज. परमात्मरूप आदर्श अहंकारानें मलीन झालेला दिसतो. तो कसा ? लौकिक आरशावर तोंडाची वाफ सोडली असतां तो जसा मलिन होतो, त्याचप्रमाणें. वस्तुतः तोंडाच्या वाफेप्रमाणेंच अहंकार निःसार आहे. तथापि त्याचें कार्य सारयुक्तसें भासतें. पण त्याची शांति झाली असतां परमात्मा प्रसन्न होतो. अहंकार हा परमात्म-वायूंतील स्पंद आहे, पण त्याची शांति झाली असतां तेंच अनिर्देश्य, अनाभास, अनन्त, अज, अव्यय आहे. अहंकारच चैतन्यामध्यें द्रव्याचें प्रतिबिंब पाडणारा आहे. त्यामुळें त्याची शांति झाली कीं, ती चिति सर्व आभासशून्य, अनन्त, अव्यय, अज होते. अहंकार हाच मेघ शांत झाला असतां परमार्थरूप शरत्कालचें आकाश अत्यंत श्रेष्ठ, अनन्त व स्वच्छ लक्ष्मीनें अतिशय शोभूं लागतें. हे रामा ! ज्याचा स्वभाव व्यक्त झालेला नाहीं व जें दीर्घकालापासून अहंकाररूप तांब्याचा डाक लागल्यामुळें जीवरूप ताम्रत्वास प्राप्त झालें आहे असें ब्रह्मरूप सोनें श्रवणादि उपायांनीं चांगलें तापविलें असतां अहंकाररूप मलानें रहित होतें आणि तें तसें निर्मळ झालें असतां अत्यंत ज्योतिःस्वरूप आणि त्यामुळेंच अत्यंत कांतियुक्त ब्रह्मसुवर्ण बनतें. ज्याप्रमाणें समुद्रांत विलीन झालेलें मीठ, गारा इत्यादिकांचीं नांवें लुप्त होतात व त्यानंतर त्यांचा त्या त्या नांवांनीं उल्लेख करतां येत नाहीं, त्याचप्रमाणें तुझी ही

अहंता व अनहंता ब्रह्मत्वास प्राप्त होईल, व मग तुझा कोणत्याहि नांवानें उल्लेख करतां येणार नाहीं. त्याला ' ब्रह्म ' असें म्हणतां येईल म्हणून म्हणशील, तर तो व्यपदेशाहि [ तसें ह्मणणेंहि ] अहंत्वरूप पूर्वीचा जो परिच्छेद तो निवृत्त होणें या निमित्तानें होतो. म्हणजे ' ब्रह्म ' हें नांवहि सापेक्ष आहे. ज्यांतील तरंगादिक शांत झाले आहेत आणि त्यामुळें जें स्वभावानें स्थित आहे, असें जल पूर्वीच्या समुद्रतरंगादिरूपानें आंत सतूसें भासतें, त्यामुळें तरंगसमुद्रादि संज्ञेस पात्र होतें. तें जलस्वभावानें अव्यपदेश्यच—अनिर्देश्यच होतें, हें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें ब्रह्माविषयीं जाणावें. अहंकार हें जगाचें बीज आहे, त्या बीजालाच भावनेचें मूळ जें अज्ञान त्याच्या नाशानें जर दग्ध करून सोडलें, तर मग मी, तूं, जगत्, बंध इत्यादि कल्पनाच कोठची ? सत् म्ह० कालत्रयीं अबाध्य, ब्रम्ह म्ह० अपरिच्छिन्नत्व शिव— निरतिशय आनंद व आत्मा—अपरोक्ष चिदेकरस अशा स्वभावाच्या परमात्म्यांत त्या चारी स्वभावांचा संकोच होणें, या कलंकानें कलंकित झालेली समष्टयहंता उदय पावते. म्ह० मृत्तिकेच्या कुंभाच्या आकारानें परिच्छेद झाला असतां मृत्तिकेच्या स्वभावाची विस्मृति जशी होते, त्याप्रमाणें परमात्म्याच्या वरील चारी स्वभावांचें संकोचरूप मालिन्यामुळें अनवधान होतें. त्यामुळें वरील समष्टयहंता म्ह० हिरण्यगर्भाची अहंता उत्पन्न होते. त्या बीजरूप ' अहं ' अर्थापासून—समष्टयहंकारापासून दृश्यसत्तारूप बिंबलता—तोंडलीची वेल उत्पन्न झाली आहे. त्या वेलीवर अनंत जगें हींच फळें येतात व तीं गळून पडतात. अहंकाररूप मिऱ्याच्या आंत पर्वत, समुद्र, पृथ्वी, नद्या, मन, त्याच्या काम-संकल्पादि वृत्ति इत्यादि ही सर्व चमत्कृति—हा सर्व चमत्कार आहे. विकास पावणाऱ्या अहंकारसंज्ञक उग्र पुष्पाचा आकाश, पृथ्वी, वायु, अंतरिक्ष, पर्वत, नद्या, दिशा, इत्यादि हा सुंदर सुवास आहे. मेरूच्या परभागीं सद्रूपच असलेला दिवस अपरभागीं प्रसार पावला असतां त्याच निमित्तानें पूर्वी विद्यमान असलेल्याच रूपाचें प्रकाशनादि जसें करतो, त्याप्रमाणें अतिशय वृद्धि पावलेला अहंकार या सर्व जगाला प्रकट करतो. ज्याप्रमाणें प्रवृत्त झालेला दिवस रूपादि पदार्थांना प्रकट करतो, त्याप्रमाणें अहंकार असत् जगाचें भान एक क्षणांत करवितो. अहंकार या अतिशय वाईट तेलाचा थेंब ब्रह्मरूप जलांत पसरतो व त्यामुळेंच तत्काल त्रिभुवनरूप चक्र उत्पन्न होतें. काय चमत्कार आहे? अहंता नुस्त्या विकासानेंच जगाचा अनुभव घेते. पण तिचा निमेष—संकोच झाला असतां त्यांतील कशाचाहि अनुभव येत नाहीं. याविषयीं दूषित नेत्राचेंच उदाहरण आहे. दुष्ट चक्षु असत्यहि पदार्थ सत्यसे भासवितो. पण तो मिटला कीं कांहीं दिसत नाहीं. नेत्रांतील कनीनिकेप्रमाणें अहंकार पसरला कीं, संसाराचा अनुभव येतो, पण सुषुप्ति मरण-मूर्च्छा या अवस्थांमध्यें तो लीन होऊन राहिला असतां व मोक्षांत समूल क्षीण झाला असतां त्याचा अनुभव येत नाहीं. नित्य ज्ञानानें ' अहं ' या अंशाला निःशेष करून सोडलें असतां ही संसाररूपी मृगतृष्णिका—संसारमृगजळ निःशेष शांत होतें. तात्पर्य, ही श्रेष्ठ आत्मवस्तु स्वप्रकाश चिदात्म्याच्या भावनेनेंच—केवळ ' तोच मी ' या तदाकार वृत्तीनेंच साध्य होणारी आहे. ( ह्मणजे तिच्या प्राप्तीचें साधन अति सुलभ आहे. फलहि तसेंच अत्यंत सुलभ आहे, असें सांगतात— ) आत्मा नित्यसिद्ध आहे, प्रयत्नानें त्याला उत्पन्न करावयाचें नाहीं. त्यामुळें त्याची खुशाल प्राप्ति करून घे. ' तो मला

कसा मिळेल?' असें म्हणून खिन्न होऊं नकोस. व अहंभावादि भ्रांतीलाही पात्र होऊं नकोस. हे निष्पाप रामा! केवल स्वतःच्या यत्नानेंच साध्य होणाऱ्या दुसऱ्या पुरुषादिकांच्या किंवा बाह्य साधनादिकांच्या साह्याची अपेक्षा न करणाऱ्या अनहंवेदनेवांचून-'मी नाहीं' अशा भावनेवांचून दुसरें कोणतेंहि श्रेयःसाधन मला दिसत नाहीं. हे रामा! तूं प्रथम व्यष्ट्यहंभाव विसर. म्ह० हें शरीरच मी हा अभिमान टाक. नंतर पर्वत, अन्तरिक्ष, भूमि, समुद्र, वायु, व आकाश अशा स्वरूपाचा हो. सर्वतः प्रसिद्ध असलेल्या या विश्वाला भरून रहा. त्यामुळें तुझें वैभव विस्तृत होईल. तात्पर्य, समष्ट्यहंभावानें रहा. त्यानंतर चराचर सर्व जगत् निष्प्रपंच ब्रह्मच आहे, अशा भावनेनें त्याचा बाध करून निष्प्रपंच, इंद्रियें, कामादि मल व चित्तवृत्ति यांनीं रहित, स्वस्थ, शांत व शोकरहित असा होऊन रहा. याप्रमाणें अध्यारोप व अपवाद यांच्या योगानें निष्प्रपंच आत्म्याला सर्व उपाधिरहित करणें हें सर्व वेदान्तसिद्धान्ताचें सार आहे.

---

## सर्ग ५ वा.

१ शास्त्र जितेंद्रियांच्या ठिकाणींच सफल होतें, इतरांच्या ठिकाणीं नाहीं. २ वसिष्ठ भुशुंडाने सांगितलेली विद्याधराची कथा सांगूं लागतात.

**श्रीवसिष्ठ**—मनासहवर्तमान आपापल्या विषयाकडे धांवणें, या इंद्रियांच्या स्वभावाला अगोदर जिंकून त्यानंतरच जो नित्यानित्य वस्तुविवेकादिक साधनांमध्यें प्रवृत्त होतो, त्यालाच शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशाचें सर्व फल मिळतें; दुसऱ्या कोणालाहि तें मिळत नाहीं. ज्या मूढमतीनें आपल्या मनांत नुसत्या स्वभावालाही जिंकलें नाहीं, त्याला उत्तम पदाची प्राप्ति होणें, वाळूंतून तेलाच्या प्राप्तीप्रमाणें, अतिशय दुर्लभ आहे. वस्त्रादि निर्मल वस्तूवर तेलाच्या थेंबाचा जसा डाग पडतो, त्याप्रमाणें ज्यांचें चित्त शुद्ध आहे त्यांच्यावर अल्प उपदेशहि मोठा परिणाम करितो. पण ज्यांचें चित्त अगदींच उथळ असतें, त्यांच्यावर आरशाला मोतीं जसें चिकटत नाहीं, त्याप्रमाणें उपदेशाचा कांहीं परिणाम होत नाहीं. याविषयीं असा एक पुरातन इतिहास सांगत असतात. मला पूर्वीं तोच भुशुंडानें मेरुपर्वतावर सांगितला. मागें एकदां अशाच कांहीं अध्यात्मविषयक गोष्टी चालल्या असतां मी एकान्तांत मेरूच्या शिखरावरील ढोलींत त्या दीर्घजीवी कावळ्याला असें विचारलें. मुग्धबुद्धि—मूढ व अनात्मज्ञ अशा एखाद्या अति दीर्घकाल जिवंत राहिलेल्या प्राण्याला तूं स्मरतोस का? असा मीं प्रश्न केला असतां रामा! त्यानें मला असें सांगितलें.

**भुशुंडः**—पूर्वीं एक अनात्मज्ञ—आत्म्याला न जाणणारा व त्यामुळेंच अतिशय खेद पावणारा विद्याधर होता. त्याचीं इंद्रियें त्याच्या अधीन नसल्यामुळें त्याला फार खेद होत असे. त्याला विश्रांतिसुख मुळींच मिळत नसे. नाना प्रकारच्या तपानें, यमनियमांच्या योगानें त्यानें आपलें शरीर शुष्क करून घेतलें होतें. तो विचारी असल्यामुळें आयुष्याची वृद्धि करणाऱ्या सदाचारानें संपन्न होता. त्यामुळें ज्याचें आयुष्य क्षीण झालेलें नाहीं, असा तो पूर्वीं चार कल्प जिवंत राहिला. त्यानंतर चवथ्या कल्पाच्या शेवटीं त्याच्या मनांत विवेकाचा उदय झाला. कारण ज्याप्रमाणें विदूर या नांवाच्या भूप्रदेशीं मेघाच्या उदयामुळें वैडूर्य नांवाचें रत्न उत्पन्न होतें,

त्याप्रमाणें दीर्घकाल यम-नियमादिक तपश्चर्या केल्यामुळें त्याच्या मनांत विवेकाचा उदय होणें अत्यंत अवश्यच होतें. ( त्या विवेकाचें स्वरूप दाखवितात. ) माझा पुनः पुनः जन्म व मरण न होवो, मला जरा न येवो, असें वारंवार चिंतन करणाऱ्या मला आतां त्याचा कंटाळा आला आहे. ही चिंता आतां पुरे झाली. या सर्व प्रपंचांत एक स्थिर वस्तु काय आहे ? असा त्यानें विचार आरंभिला. पांच प्राण, दहा इंद्रियें, मन, बुद्धि व स्थूल देह अशा अठरा पदार्थांनीं युक्त असलेल्या नगरीला फार दिवस वाहून अतिशय श्रांत झालेला तो विद्याधर विरक्तचित्त झाला. संसारावरील त्याचें प्रेम पार उडालें; व तो मजपाशीं ती एक स्थिर वस्तु विचारण्यासाठीं आला. माझ्याजवळ येऊन त्यानें मला साष्टांग प्रणाम केला. मींहि त्याचा उचित सत्कार केला. नंतर त्याला प्रश्न करण्याचा अवसर जेव्हां मिळाला तेव्हां तो मला असें अनिंदित वचन बोलला.

विद्याधरः—हे श्रेष्ठा! आपापल्या विषयामध्यें शीघ्र प्रवेश करणारीं असल्यामुळें मृदु, पण प्रवेश केल्यावर फार ताप देणारीं, एकदा विषयासक्त झाल्यावर त्यापासून परतवितां येत नसल्यामुळें दगडाहूनहि बळकट—अचल, अशीं हीं इंद्रियें व शस्त्रें एकसारखींच आहेत. कारण खड्ग, बाणादिक शस्त्रें जशीं शरीराचा छेद, भेद इत्यादि करण्यास दक्ष असतात, तशींच इंद्रियें छेद-भेदादि करण्यास दक्ष आहेत. हृदयांत रूढ झालेलीं हीं इंद्रियें म्ह० अंधकारानें गर्द झालेलीं अरण्येंच आहेत. तीं अरण्यें कामादि मर्कटांच्या योगानें आकुल झालेलीं असतात. तीं मलिन व विपत्ति देणारीं आहेत. प्राण-मन-देह-हृदय यांमध्यें तीं क्षुधा, तृषा इत्यादि सहा ऊर्मींच्या योगानें



दुःख उत्पन्न करितात. त्यांत दैवयोगानें एखादे प्रसंगीं शम-दमादि गुणांचा उदय जरी झाला तरी त्या गुणारण्याला जाळून तीं जणुं काय अग्निरूपच आहेत. त्यामुळें तीं ऊर्मियुक्त असलीं तरी शीतल नसतात, तर अविवेकप्रचुर असतात. यास्तव अशा प्रकारच्या इंद्रियांना व त्यांच्या आश्रयभूत मनाला जिंकून पुरुष सुखी होतो. तो भोगांनीं कधींच खरा सुखी होत नाहीं. तेव्हां मला विद्याधरांच्या भोगरूप विषयांचें काय प्रयोजन आहे ? कांहीं नाहीं. म्हणून मी त्या सर्वांविषयीं विरक्त होऊन आत्मज्ञानाच्या इच्छेनें तुला शरण आलों आहें. ९

---

## सर्ग ६ वा.

१ विद्याधर दीर्घकाल स्वतः दिव्य भोगांचा अनुभव घेऊन व त्यांची मीमांसा करून विषय व इंद्रियें यांचे दोष दाखवितो.

विद्याधरः—जें निरतिशय आनंदस्वरूप असल्यामुळें उत्तम, आयासरहित, क्षय व अतिशय यांनीं रहित व आदि-अंतरहित परम पावन पद तें मला सत्वर सांग. ( कारण तापत्रयानें संतप्त होणाऱ्या मला आतां विलंब सहन होत नाहीं. ) हे मुने! मी इतके दिवस जडरूप होऊन निजून राहिलों होतों. आतां मनाला तीव्रतर वैराग्यरूप प्रसाद प्राप्त झाल्यामुळें मी जागा झालों आहें. मन कामरूप मोठ्या रोगानें अतिशय संतप्त झालें आहे. तें दुर्वासनांमध्यें अत्यंत क्षुब्ध झालें आहे. यास्तव ज्याच्या कर्मांचा उच्छेद होणें शक्य नाहीं, अशा माझा तूं 'अहं' या रूपानें रूढ झालेल्या या मोहांतून उद्धार कर. ( अरे बाबा ! तूं देवयोनींत उत्पन्न झाला आहेस, विद्याधरत्वा-

मुळें तुझ्या ठिकाणीं सर्व विद्या जन्मतःच सिद्ध आहेत; आणि विद्यांच्या सामर्थ्यानेंच विद्याधर सर्व दुःखाचें निरसन करण्यास समर्थ आहेत, ते मणि-मंत्र-रसायनादि सिद्धींनीं व अणिमादि ऐश्वर्यांनीं युक्त असतात, असें ऐकतों, तेव्हां अशा विशिष्ट जन्मानें युक्त असलेल्या तुझ्या ठिकाणीं कामादि दुःखें व कार्पण्यादि दोष कसे प्राप्त झाले, कीं ज्यांच्या निवारणासाठीं तूं सर्वमान्य असूनहि कावळ्याच्या कुळांत उत्पन्न झालेल्या मला शरण येऊन असा प्रश्न करीत आहेस ? असें विचारशील तर हे भुशुंडा! ह्याचें उत्तर सांगतों-) सर्व विद्या, सिद्धि इत्यादिकांनीं मी जरी संपन्न आहें, तरी आत्मज्ञानरहित आहें. त्यामुळें माझ्या ठिकाणीं काम-क्रोध, ईर्ष्या-असूया इत्यादि दुःखें व कार्पण्यादि दोष येऊन कोसळतातच. कारण आत्मज्ञानाच्या अभावीं मी अजितेंद्रिय आहें. ज्याचीं पानें उग्र म्ह० स्नेहरहित म्हणजे पाण्याचा लेप लावून न घेणारीं आहेत अशा अत्यंत सुशोभित व बिसतंतुयुक्त कमलावर दंवाचे बिंदु जसे येऊन पडतात व त्या कमलाला निस्तेज करून सोडतात, त्याप्रमाणेंच माझ्यावर वरील दुःखें वगैरे येऊन पडतात. दीर्घकाल जिवंत राहणारे देवादि जीर्ण जंतुहि कमलांतील मशकादिकांप्रमाणें केवळ जन्माला येतात व मरतात. तेहि इतर किड्यांप्रमाणें धर्म किंवा मोक्ष या पुरुषार्थासाठीं जन्म घेत नाहींत. पूर्वी हजारों वेळां भोगलेल्या त्याच त्या शब्दादि विषयांच्या योगानें आह्मी फार दिवसांपासून विनाकारण अतिशय खिन्न होत आहों. आम्ही अतिशय तुच्छ सुखलेशाकरितां इंद्रियें व विषय यांच्या संयोगांनीं वारंवार फसविले जात आहों. चित्ताला एक क्षणभरहि विश्रांति न देतां क्षणभंगुर विषयोपभोगांमध्यें भ्रमण करणाऱ्या माझ्या या संसाराचा अंत होत नाहीं. मरुभूमींतील मार्ग जसा कधीं संपत नाहीं तसाच माझा हा संसार संपत नाहीं; व त्यामुळें मला स्थैर्यावस्थाहि प्राप्त होत नाहीं. या भोगभूमि आरंभीं आपातरमणीय भासतात. त्या विनाश पावणाऱ्या पण संसाराला कारण होणाऱ्या असतात. थोड्याच अवधींत त्या विकार पावतात व त्यामुळेंच भयंकर आहेत. मला ही विद्याधराची संपत्ति मोठ्या पुण्यानेंच प्राप्त झाली आहे, हें खरें; पण तिच्यामध्यें मान व अपमान यांचें प्राधान्य असतें. श्री संपत्ति दुरहंकारानें रम्य झालेली असते. म्हणून मी या विवेकी पुरुषांना प्रतिकूल वाटणाऱ्या दुष्ट विद्याधरश्रीनें संतुष्ट होत नाहीं. मला तिच्यापासून सुख होत नाहीं. मीं कुबेराच्या चैत्ररथ उद्यानांतील पुष्पांनीं कोमल झालेल्या व ज्यांतील कल्पवृक्षांच्या शाखांनीं सर्व वैभव व संपत्ति दिल्या आहेत अशा भूमि अवलोकन केल्या. मेरुपर्वतावरील कुंजांतून, विद्याधरांच्या नगरांतून, विमानांच्या श्रेष्ठ पंक्तींतून, आणि आवहनिवह इत्यादि वातस्कंध भागांतून मीं विहार केला. देवांच्या सैन्यांत, अप्सरांच्या भुजलतांवर व हारादिकांच्या योगानें भूषित झालेल्या स्त्रीपुरुषांचे चित्ताकर्षक विहारचमत्कार ज्यांत चालले आहेत अशा लोकपालांच्या नगरींत विश्रांति घेतली. पण त्यांतील कांहींही उचित व गुणयुक्त नाहीं. कारण बाबारे! तें सर्व मानसव्याधिरूप विषाग्नीनें जळून भस्म झालेलें असतें, हें मला आतां विवेकाचा उदय झाल्यावर कळलें आहे. पूर्वी मलाहि तें कळलें नव्हतें. सुंदर रूप पाहण्याविषयीं आसक्त झालेल्या, स्त्रीचें मुख पाहण्याची अतिशय आकांक्षा करणाऱ्या आणि बाह्य व आंतर प्रकाशानें युक्त असलेल्या चक्षूंकडून मी स्वविषयासक्तीनें मनाला दूषित करण्यासाठीं मोठ्या दुःखाला पोंचविला जात आहें. तें चक्षुरिंद्रिय स्त्रीशरीरांत हें वस्त्र-

आभरण-अनुलेपनादिकच शोभा देणारें आहे. रक्त-मांस-केंस-हाडें इत्यादिक शोभा देणारें नाहीं, असें विवेचन न करितांच केवळ रूपा च्याच मागें जाणें, हा त्याचा स्वभाव अस ल्यामुळें अवस्तूमध्येंहि तें आसक्त होतें. विषया-सक्तीनें दूषित झालेलें चित्त भयंकर अनर्थांत पाडणाऱ्या दुराचरणांत तत्पर होऊन नाना-प्रकारच्या बंधसंज्ञक आपत्तींत जोंवर पडत नाहीं तोंवर विषयांविषयीं विरक्त होत नाहीं. हें घ्राणेंद्रिय अनर्थासाठींच इतस्ततः धांवत सुटतें आणि एखाद्या उन्मत्त घोड्याप्रमाणें त्याचें निवारण करण्यास मी समर्थ होत नाहीं. ज्याप्रमाणें अतिदुष्ट वैऱ्यानें एकाद्याला बला-त्कारानें आपल्या अधीन करून घ्यावें आणि नगरींतील सर्व दुर्गंध वाहून नेणाऱ्या मोरींतून त्याला संचार करावयास लावावें, त्याप्रमाणें मुखांतील श्वासाच्या मागोमाग धांवत सुट-णाऱ्या या घ्राणानें मला या अकार्यांत नियुक्त केलें आहे. भक्ष्याभक्ष्याचा विचार करणाऱ्या शास्त्राच्या मर्यादेनें हीन असलेल्या या रसनेनें मला कृमि-कीट-पश्वादि योनि याच दुःख-पर्वतामध्यें मारून टाकलें आहे. त्या योनींत बलवानांमध्यें हत्ती श्रेष्ठ आहे व बुद्धिमानांमध्यें कोल्हा श्रेष्ठ आहे. अर्थात् रसनादोषामुळें अधःपात झालेल्या माझा उद्धार गजापर्यंत किंवा जंबुकापर्यंतच फार तर होणार, हें उघड आहे. ग्रीष्मकालानें अत्यंत दीप्त झालेल्या सूर्याच्या तापाचा निरोध जसा करतां येत नाहीं, त्याप्रमाणें त्वगिंद्रियाच्या विषयलंपट-तेचा मला निरोध करतां येत नाहीं. तृणा-विषयींची इच्छा हरिणाला जशी विषम-प्रदेशींहि घेऊन जाते आणि तृणानें झांकलेल्या कूपादिकांत पाडते, त्याप्रमाणें हे मुने! शुभ शब्दरसाची इच्छा करणाऱ्या माझ्या श्रवणें-द्रियाच्या शक्ति मला संकटांत पाडतात. 'तर मग काय तुला ते रूपादि-शब्दान्त विषय दुर्लभ आहेत कीं काय?' म्हणून विचाराल तर तसें नाहीं. मला सर्व विषय सुलभ आहेत. मी अतिशय नम्र भृत्यांच्या अतिप्रिय व प्रेमळ वाद्य गीतादि शब्दयुक्त शुभ शब्दश्री ऐकल्या. वैभव हरण करून आणणाऱ्या व ध्वनियुक्त रत्नभूषणांनीं भूषित झालेल्या स्त्रिया, दिशा व समुद्र आणि पर्वत यांचे तट पाहिले. नम्र व सुंदर स्त्रीजनांनीं आणून दिलेले गुणशाली चमत्कारिक मनोरम गोड षड्रस मीं चिरकाळ खाल्ले—त्यांचा पुष्कळ दिवस स्वाद घेतला. रेशमी वस्त्रें, उच्च प्रतीच्या स्त्रिया, रत्नांचे हार, पुष्पें, आस्तरणें, शीतल, मंद व सुगंध वायु यांचा भोगभूमीमध्यें सर्व बाजूंनीं निर्विघ्न-पणें अनुभव घेतला. त्यांच्या स्पर्शाचें सुख अनुभविलें. स्त्रीसुख, चंदन, वाळा इत्यादि औषधि, पुष्पें, कापुर—कस्तुरी इत्यादि पदार्थ यांचे मंद वायूबरोबर आलेले गंध—सुवास मीं हुंगले—त्यांचा यथेच्छ अनुभव घेतला. अहो मुनिवर्य! तात्पर्य, मीं पुनः पुनः शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध यांचा यथेच्छ अनुभव घेतला. त्यामुळें ते सर्व आतां मला शुष्क व नीरस वाटूं लागले आहेत. तेव्हां आतां पुनः त्यांचेंच सेवन कसें करूं? तें मला सत्वर सांग. या दुर्भोगांच्या समूहांचा हजारों वर्षें जरी आब्रह्म-स्तंबपर्यंत शरीरांत भोग घेत राहिलें तरी तृप्ति होत नाहीं. दीर्घकालपर्यंत साम्राज्य करून, स्त्रीजनांचा उपभोग घेऊन, व शत्रूंच्या सैन्याचा पूर्ण पराभव करून अपूर्व कोणतें प्राप्त होतें? कांहीं नाहीं. त्या हिरण्यकशिपु प्रभृति जीवांना मरणच नव्हतें; कारण, त्यांनीं जगांतील कोणत्याहि प्रसिद्ध पदार्थापासून

१ 'सुरापाः कृमयो भवन्ति अभक्ष्यभक्षिणश्च' सुरापान करणारे व अभक्ष्यभक्षण करणारे कृमि होतात, असें धर्मशास्त्रांत सांगितलें आहे.

मरण न यावें, असा वर तपःसामर्थ्यानें संपादन केला होता. पण ते सर्व थोड्याच वेळांत एकाएकीं भस्म होऊन गेले. वास्तव जें प्राप्त झालें असतां पुनः आणखी खांहीं प्राप्तव्य उरत नाहीं, तें मिळविण्याविषयीं इंद्रियें, प्राण, मन यांच्या संयमादि श्रमानें साध्य होणाऱ्या चेष्टेनेंहि यत्न करावा. ज्यानें अतिशय रम्य भोग दीर्घकाल भोगले आहेत, त्याच्या डोक्यावर कल्पवृक्ष उत्पन्न झाला आहे, असें एकाहि जीवानें आजवर पाहिलेलें नाहीं. किंवा त्याच्या दुसऱ्या एकाद्या अवयवांत विमानादि उत्पन्न झालें आहे, असेंहि कोणाच्या अनुभवास आलें नाहीं. म्हणजे दीर्घ काल श्रेष्ठ भोग भोगले म्हणजे कांहीं अपूर्व गोष्ट घडते असें नाहीं. अर्थात् दीर्घ भोगानुभवाचा त्याला किंवा दुसऱ्याला कांहीं उपयोग नाहीं. लबाड पोरें भोळ्या पोराला जशीं फसवितात, त्याप्रमाणें या इंद्रियांनीं मला या सीमारहित विषयारण्यभूमींत फार दिवसांपासून फसविण्याचा रोजगार चालविला होता. शब्दादि विषयरूप भूतेंच मनाला बाहेर आकर्षण करून घेऊन आपापल्या विषयाचा भोग घेण्यासाठीं श्रोत्रादि इंद्रियरूपानें अवस्थित होतात. वास्तव हे इंद्रिय नांवाचे विषय माझे शत्रु आहेत. मित्र नव्हेत, हें मीं आज ओळखलें आहे. हे विषयेंद्रियरूप शत पारधी या शून्य संसारजंगलांत दग्ध झालेल्या या नरमृगाला पुनः पुनः धीर देऊन—वारंवार त्याचें आश्वासन करून मारतात. ज्यांच्या दृष्टींत भयंकर विष आहे अशा विषयेंद्रिय सर्पांनीं ज्यांना जाळलें नाहीं असे या जगांत दोन–तीन पुरुषहि मला दिसत नाहींत. इंद्रियें हींच शत्रूची सेना आहे. ती भोग याच भयंकर गजांनीं युक्त आहे. तृष्णा हींच तिच्याजवळचीं चंचल जाळीं आहेत. शीतोष्णादि द्वंद्वें याच रथांनीं ती व्याप्त आहे. लोभ ह्याच त्या सैन्यांतील भयंकर तरवारी आहेत. कोप ह्याच भाल्यांच्या समूहानें तें सैन्य चिन्हित झालें आहे. अहंकार या सेनापतीनें त्याचें पालन केलें आहे; चेष्टा—इंद्रियांचे व्यापार याच चपल घोड्यांनीं ती सेना व्यापलेली आहे. कामाच्या कोलाहलानें ती व्याकुल झाली आहे. शरीररूप नगराच्या सीमेवर जाऊन व त्या सीमेचें आक्रमण करून ती स्थित आहे. अशा प्रकारच्या या इंद्रियसैन्याला जिंकावयास जे तयार होतात, तेच या जगांत फार मोठे योद्धे होत. मत्त ऐरावताच्या गंडस्थळाचा भेद करणेंहि सहज आहे. तें महत्कार्यहि अगदीं सोपें, पण उन्मार्गानें जाऊं लागलेल्या आपल्या इंद्रियांचा पूर्णपणें निग्रह करणें शक्य नाहीं. हे साधो! तत्त्ववेत्त्यांनींहि केलेला इंद्रियांचा जय ही सर्व पौरुषाची, सर्व महत्त्वाची, सत्याची व मोठ्या वैभवाची पराकाष्ठा आहे. जोंवर पुरुष कृपण इंद्रियांकडून तृणप्रमाणें ओढला जात नाहीं, तोंवरच तो देवांच्याही मान्यतेस पात्र होतो. जे मोठे धीर पुरुष जितेंद्रिय असतात, तेच या भूलोकीं 'नर' होत. बाकीच्यांना मी मांसाचीं चपल कळसूत्री बाहुलीं समजतों. हे मुने! मनःसेनापतीच्या या इंद्रियपंचकरूप सेनेला जिंकावयास जर कांहीं उपाय असेल तर मी तिला खचित पूर्णपणें जिंकीन. इंद्रियें या नांवाच्या भयंकर रोगांच्या शांतीला विषयभोगाशा सोडणें, यावांचून दुसरें कांहीं औषध नाहीं; तीर्थें नाहींत व मंत्रही नाहींत. महाअरण्यामध्यें चोर एकट्याच प्रवाशाला जसे अतिशय त्रास देतात, त्याप्रमाणें आपापल्या विषयाकडे वेगानें धांवणाऱ्या या इंद्रियांनीं मला अतिशय दुःख दिलें आहे. हीं इंद्रियें पाण्याच्या डबक्यासारखीं आहेत. कारण डबकीं चिखलांनीं भरलेलीं असतात, तीं गढूळ

असतात. अतिशय दौर्भाग्यानें युक्त असतात. व दुर्गंधयुक्त शेवाळानें तीं तुच्छ झालेलीं असतात. इंद्रियांतहि हे सर्व दोष आहेत. भयंकर जंगलें जशीं दुरुल्लंघनीय असतात, तशींच इंद्रियेंहि दुरुल्लंघनीय आहेत. जंगलाप्रमाणेंच त्यांचेंहि मोठ्या दुःखानेंच उल्लंघन करतां येतें. जंगलें बर्फाच्या योगानें व इंद्रियें नाड्यानें गहन झालेलीं असतात. जंगलांत जशी अनेक प्रकारची भीति वाटते, तशींच या इंद्रियांमध्यें अनेक प्रकारचीं भयें उत्पन्न होतात. कमलनाल जसें चिखलापासून होतें, त्याप्रमाणें इंद्रियें मळापासून होतात. त्याच्याप्रमाणेंच त्यांना छिद्रें असतात. मृणालांतील गुण–तंतु फार बारीक असतात. इंद्रियांतलि वासनागुणहीं सूक्ष्म असतात. तीं दोन्ही ग्रंथियुक्त असतात. इंद्रियें प्रायः देहावयवरूप असतात व मृणालें जलानें युक्त असतात. क्षारसमुद्राचें जल व इंद्रियें रूक्ष असतात. कारण तीं निष्ठुर असतात व त्यांचा स्पर्श सुखावह नसतो. तीं रत्नांविषयीं अतिशय लुब्ध असतात. इंद्रियें क्षुधातृषादि सहा ऊर्मींनीं व समुद्रजल लाटांनीं व्याप्त असतें. तीं दोन्ही भयंकर नक्रांच्या योगानें घोर झालेलीं असतात. काम–क्रोधादिक हेच इंद्रियांतील नक्र होत. मरण व इंद्रियें यांचेंहि–बांधवांना उद्वेग देणें, दुसरा देह निर्माण करणें व करुणाप्रद आक्रोश करणें या बाबतींत साम्य आहे. अरण्यें व इंद्रियें यांचें अविवेक्याचे शत्रु होणें व विवेकी जनाचे मित्र होणें, त्यांत प्रवेश करतां न येणें, मर्यादा नसणें, व विश्रांतिशून्य असणें, या बाबतींत साम्य आहे. भयंकर मेघ व इंद्रियें यांचें मोठमोठ्या गर्जना करणें, त्यांत कांहीं सार–स्थिरांश नसणें, मलिन व जड असणें व विजेच्या चमकीप्रमाणें क्षणिक सुखाचा आभास दाखविणें, या गोष्टींत साम्य आहे. आपलीं इंद्रियें व भूच्छिद्र यांचें क्षुद्र प्राण्यांनींच ग्रहण करणें पण कृतार्थ पुरुषांनीं वर्ज करणें, आणि रज व तम यांनीं पराभूत होणें यांत साम्य आहे. ( उकिरड्यानें भरलेल्या खड्ड्यांत कीटादि क्षुद्र प्राणी असतात व तो खड्डा धूळ व अंधकार यांनीं युक्त असतो, हें सर्वांना माहीत आहे. ) जीर्ण श्वभ्राचीं मुखें व इंद्रियें यांचें साम्य आहे. तीं दोन्ही मनुष्याला खालीं पाडण्यांत अतिशय दक्ष असतात. तीं दोष व सर्प यांनीं युक्त असतात व त्यांत लक्षावधि रूक्ष कंटक असतात. इंद्रियें हे राक्षसच आहेत. कारण राक्षसाप्रमाणेंच तीं आत्मंभरी, अनार्य, केवळ साहसांतच तत्पर व अंधकारांत–अज्ञानदशेंत–विहार करणारीं आहेत. हीं इंद्रियें जीर्ण वेळूच्या वगैरे काष्ठाप्रमाणें अंतःशून्य, असार, वक्र, ग्रंथियुक्त व जाळणें याच एका कामाचीं आहेत. ज्यांत सर्व अमज्जनच आहेत अशा नगरामारखीं हीं इंद्रियें भयंकर मोहाच्या परंपरेनें युक्त, भयंकर जीर्ण कूपाप्रमाणें गहन व विष्ठापुंजाप्रमाणें तुच्छ आहेत. कुंभारांचीं चाकें जशीं घटादि अनंत पदार्थांचीं कारणें असतात, तशीं इंद्रियें अनंत जन्मांचीं व त्यांतलि दुःखांचीं कारणें आहेत. चाकें जशीं भ्रमण करितात, तशींच इंद्रियेंहि भ्रम पावतात. चाकें जशीं चिखलानें माखलेलीं असतात त्याप्रमाणें इंद्रियें दोषयुक्त असतात. आपन्नांचा उद्धार करणें हेंच ज्याचें शील आहे अशा हे भुशुंडा ! याप्रमाणें इंद्रियांमुळें प्राप्त झालेल्या आपत्तिसागरांत निमग्न झालेल्या, सर्वस्वाचा त्याग केल्यामुळें निष्कांचन झालेल्या व शरण आलेल्या मला तत्त्वोपदेश करून माझा या आपत्तींतून उद्धार कर. कारण या जगांत तुझ्यासारखे जे जे कांहीं प्रसिद्ध तत्त्वज्ञ आहेत, त्या सर्वोत्कर्षानें राहणाऱ्या दयाळू पुरुषांचा समागम शोकाचें सर्वथा हरण कर-

णारा आहे, असें अनुभवी तत्त्वज्ञ सांगतात.

## सर्ग ७ वा.

—:०—

१ ब्रम्हच आहे, जगदुःख नाहीं. २ आत्म्याचें अज्ञान जगद्रूपानें पसरलें आहे. ३ अहं बीजापासूनच जगत्वृक्ष वाढला आहे.

भृशुंडः—हे ब्राह्मणा वसिष्ठा, त्या विद्याधराचें असें हें पवित्र वचन ऐकून त्यानंतर मीं त्याला हें असें उत्तर अगदीं स्पष्ट शब्दांनीं दिलें. हे विद्याधरश्रेष्ठा ! फार उत्तम आहे. तूं आपल्याच कल्याणासाठीं असा विवेकी झालास ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. तूं या संसाररूप अंधकूपापासून लवकर वर उठण्याची इच्छा करीत आहेस ! या संसारदुःखांतून मुक्त होण्याची इच्छा करीत आहेस ! ज्याप्रमाणें अग्नीनें व्यापलेली सुवर्णरसाची पंक्ति अतिशय कांतीनें शोभते, त्याप्रमाणें ही तुझी विवेकानें अतिशय व्याप्त झालेली मति फारच शोभत आहे. म्हणूनच ती तुझी विवेकशालिनी मति माझ्या उपदेशाच्या अर्थाला अनायासानें अवश्य ग्रहण करील. कारण निर्मल आरशांत द्रव्य सहज प्रतिबिंबित होतें, हें प्रसिद्ध आहे. आतां मी तुला जें सांगत आहें, त्याचा तूं 'होय, ठीक आहे' अशा बुद्धीनेंच स्वीकार कर. कारण आम्ही या गोष्टीचा दीर्घकाल शोध केला आहे. त्याविषयीं तूं कांहीं विचार करूं नकोस. निःशंकपणें त्याचा स्वीकार कर. तुझ्या हृदयांत दृश्यरूपानें अहंकारादि जें कांहीं भासत आहे, अहंकारादि जें जें कांहीं तुझ्या प्रतीतीला—अनुभवाला येतें, तें सर्व तूं नाहींस. कारण या बुद्ध्यादि दृश्यवर्गांतीलच कोणी आत्मा आहे व मला त्याची प्राप्ति करून घेणें आहे, असें समजून तूं दीर्घकाल जरी त्याचा शोध करीत राहिलास, तरी तुला त्याची प्राप्ति होणार नाहीं. यास्तव तूं दृश्यमात्ररूप अबोधाचा त्याग करून त्या सर्व दृश्याचा साक्षी जो आत्मा त्याला जाण. मी नाहीं, तूं नाहींस, व हें जगत्‌हि नाहीं, असा ज्याचा निश्चय झाला आहे अशा तुला सर्व शिवच आहे. तें दुःखालाहि कारण होत नाहीं व सुखालाही कारण होत नाहीं. तुझ्या ठिकाणचा सुखदुःख—वैषम्य—दोषांश निवृत्त झाल्यानें परम कल्याण ब्रह्मभावानें सर्व आहेच. सुषुप्तींत प्रसिद्ध असलेलें अज्ञानच अहंकारादिभावानें घनीभूत होतें. झोपेंतील अज्ञानच अहंकार बनतें व त्यापासून स्वप्न व जागृति एतद्रूप जगत् झालें आहे. अग्नीशीं संबंध होतांच वितळणाऱ्या लाखेप्रमाणें विलीन झालेल्या जाग्रदादिरूप जगापासून अज्ञता झाली आहे. याचा किती जरी विचार केला तरी त्यांतील अमुक एकच पक्ष मानण्यास विशेष युक्ति नसल्यामुळें त्यांतील कारण काय व कार्य कोणतें, तें कळत नाहीं. यास्तव थिजलेलें व वितळलेलें असें दोन्ही प्रकारचें घृत जसें एकच, त्याप्रमाणें सर्व अज्ञानमात्र आहे. मृगजलाप्रमाणें विश्व अवस्तु—मिथ्या आहे. त्यामुळें तें आहे असें जरी भासलें, तरी नाहीं. हें जें कांहीं सत् किंवा असत् भासत आहे तें ब्रह्म आहे. मृगजळाप्रमाणें हें विश्व नाहीं, तूं नाहींस किंवा प्रतिभासही नाहीं. इतकेंच नव्हे, तर घटाच्या अभावीं प्रकाश जरी असला तरी घटप्रकाश हा शब्द व त्याचा अर्थ या दोघांचाही अभाव होतो, त्याप्रमाणें सर्व जगाचा बाध झाला असतां ब्रह्म जरी असलें तरी जगाच्या संबंधानें ह्याचा प्रत्यय येत नाहीं. हे विद्याधरा ! या विश्वाचें बीज

अहंत्व आहे, असें तूं जाण. पर्वत, समुद्र, पृथ्वी, नदी, नद इत्यादिकांनीं युक्त असा हा जगद्रूपी जरठ वृक्ष त्या बीजापासून होतो. अत्यंत सूक्ष्म असलेल्या या अहंत्व बीजापासून हा जगद्वृक्ष उत्पन्न होतो. त्या वृक्षाचीं विषयासक्तीनें युक्त अशीं अधोभुवनें हीं मूळें आहेत. अश्विनीप्रभृति सत्तावीस नक्षत्रांचा समूह ही त्यांची मुख्य कळी आहे. इतर नक्षत्रांचा समूह या सूक्ष्म कळ्या आहेत. प्राण्याच्या धर्माधर्मादि वासना हेच पुष्पगुच्छसमूह. पूर्ण चंद्र, हेच त्या वृक्षाच्या फळांचे घोंस आहेत. स्वर्ग, महर्, जन, तप व सत्य या नांवाचे मोठमोठ्या पुण्यवानांचे लोक ह्याच मोठाल्या वृक्षशाखांनीं बनलेल्या जाळ्या आहेत. मेरु, मंदर, सह्याद्रि इत्यादि पर्वत ह्याच त्या जगद्वृक्षाच्या पत्रपंक्ति आहेत. सात समुद्र हींच त्या वृक्षाचीं अळीं आहेत. पाताळ हेंच मूळ कोटर आहे. कृतादि युगें हेच त्या वृक्षाला पोखरून त्यांतलि धर्मरूप पीठ खालीं पाडणारे किडे आहेत. प्रत्येक युगांतील वर्ष, अयन, ऋतु, मास इत्यादि गुणपंक्ति हीच शाखामूलादिकांच्या उद्भवाचीं स्थानें म्ह० पेरें आहेत. अज्ञान हीच त्याची उत्पत्तिभूमि आहे. जीव हेच त्यावरील पक्षिसमूह आहेत. भ्रांतिज्ञान हेंच त्या वृक्षाचें खोड—सर्व शाखांचा आधारभूत मध्यभाग आहे. तत्त्वज्ञानानें त्याचें निर्वाण होणें, हाच त्याला लागणारा वणवा आहे. इंद्रियांनीं विषयोपभोग घेणें व मनानें विषयांविषयींचे संकल्पविकल्प करणें, हेच त्या वृक्षाच्या सुगंधाचे प्रसर आहेत. अव्याकृत आकाश हेंच त्याचें विपुल वन आहे. नेत्रपुट, खालचे व वरचे ओंठ हीं फुलांचीं देठें आहेत. कारण तीं नेत्र उघडणें व हंसणें यांच्या योगानें नेत्र व दांत यांची शोभा हीं पुष्पें प्रसवतात. ऋतु ह्याच त्या वृक्षाच्या विचित्र शाखा आहेत. दश दिशा या उपशाखा आहेत. आत्मसंविद् हाच त्या वृक्षांच्या जीवनाला कारण होणारा रसप्रवाह आहे. सूर्य, चंद्र, अग्नि इत्यादिकांचा आपल्यामध्यें लय करून स्वतःहि निवृत्त होणारा सूत्रात्माच त्याचा वातस्कंद आहे. प्रतिदिवशीं उदयोन्मुख व अस्तोन्मुख होणाऱ्या चंद्र-सूर्यांच्या कांति याच त्या वृक्षाच्या रम्य व चंचल पुष्पमंजरी आहेत. सूर्याबरोबर भ्रमण करणारा—त्याच्या उलट दिशेस जाणारा अंधकार हेच भ्रमण करणारे भ्रमर आहेत. अशा प्रकारचा हा संसारवृक्ष मूळप्रदेशीं पाताळास, मध्यभागीं दिग्भागांस व अग्रभागीं अंतरिक्षास व्यापून वस्तुतः असत् असतांना सत् असल्यासारखा स्थित आहे. त्याचें ‘ अहं ’ हें बीज ‘ अनहं ’ या अग्नीनें भाजलें गेलें ह्मणजे जीवन्मुक्तिसुखाचा त्या देहाचा पात होईतों आभासमात्र अनुभव जरी आला तरी पुन्हा जन्मादिकांच्या योगानें त्याचा उदय होत नाहीं. त्याला अंकुर फुटत नाहीं. ७.

---

## सर्ग ८ वा.

—:०:—

१ संसारवृक्षाचा ज्ञानानें उच्छेद होतो. हा संसार संकल्पमंडपासारखा आहे.

**भुशुंडः**—हे विद्याधरा! सात अधोलोकांसह ही पृथ्वी ज्याचा आधार आहे, लोकालोक पर्वतापर्यंत सर्व पर्वतांच्या गुहा हेंच ज्याचें मंदिर आहे, म्ह० अळ्यासह पार आहे, दश दिशांमध्यें व आकाशांत सभोंवार पसरलेल्या आडव्या शाखांनीं व वर पसरलेल्या उभ्या शाखांनीं व त्यांवरून होणाऱ्या प्राण्यांच्या

---

१ मूळ कोटर ह्म० अगदीं बुंधांतील ढोल.

संचारानें जो अतिशय चंचल झाला आहे, अशा प्रकारचा हा जगद्वृक्ष 'अहंत्व-' बीजापासून उत्पन्न होतो. पण तें बीज ज्ञानाग्नीनें दग्ध झालें असतां त्यापासून कांहीं उत्पन्न होत नाहीं. तत्वतः हें आहे तरी काय, असें रत्न-परीक्षेप्रमाणें त्याचें परीक्षण करूं लागलें असतां 'अहंत्व' ब्रह्ममात्र आहे असा निश्चय होतो. त्यामुळें तें अहंत्व केव्हांहि वस्तुभूत नाहीं, असें कळतें. ज्ञान, ज्ञान म्हणून जें म्हणतात तें हें एवढेंच. त्यानेंच संसाराचें बीज दग्ध होतें. 'मी मी' असा अहंत्वभाव धरल्यानें संसाराचें बीज अहंत्व आहे व 'मी कोणी निराळा पदार्थ नाहीं' अशा नाहंत्वभावानें 'अहंत्व' नाहींसें होतें. हेंच उत्तम ज्ञान होय. सृष्टीच्या आरंभींच या सर्गाचा अभाव आहे. तेव्हां ज्या सत् किंवा असत् वस्तूची उत्पत्तिच संभवत नाहीं, त्याच्या स्थितीचें नांवच घ्यावयास नको; तेव्हां अहंत्व कोठचें ? त्वंत्व कोठचें व हा द्वैतैक्यभ्रम कोठचा ? जे गुरूचें वाक्य ऐकून स्वयत्नानें समूल संकल्पत्याग करण्याविषयीं यत्न करितात, तेच ब्रह्मपदप्राप्तीमध्यें विजयी होतात. सूपकार म्ह० स्वयंपाकी—आचारी आपल्या सूपशास्त्रांत स्वयंपाक करूनच विजय मिळवितो, त्याप्रमाणें विवेकी जन गुरुशास्त्रोक्त-यत्नानेंच आपलें कैवल्यपर्यंत विवेकित्व संपादन करतो. दुसऱ्या कोणत्याहि उपायानें नव्हे. जगत् हा चित्—चाच चमत्कार आहे, असें तूं जाण. दुसरें कांहीं नाहीं. त्यामुळें तें चित्च्या बाहेर दिशांमध्यें नाहीं व आंतही नाहीं. चित्रकाराच्या चित्तांतील कल्पित चित्राप्रमाणें केवल संकल्पस्फुरणानें हें जगच्चित्र दिसतें व संकल्प मावळला कीं तेंहि मावळतें. हे विद्याधरा ! एक मोठा मंडप आहे. त्याचे खांब मोठमोठे आहेत. तो मोत्यें व रत्नें यांनीं निर्मिलेला आहे. त्याचा विस्तार अनेक लक्ष योजनें आहे. सुंदर सोन्यानें त्याला चित्रित केलें आहे. तो मेरूप्रमाणें अधोमुख पुरलेल्या सहस्रावधि रत्नस्तंभांनीं आवृत झालेला आहे. त्यामुळें तो कोठें हजारों इंद्रधनुष्यांनीं युक्त असल्यासारखा व कोठें कल्पान्तींच्या संध्याकालीन अभ्रांसारखा सुंदर दिसतो. त्या मंडपांत वास्तव्य करणाऱ्या स्त्रिया, बालक व पुरुष यांच्या क्रीडेसाठीं पाताल, स्वर्ग इत्यादि निरनिराळ्या आकारांचे संपुट केलेले आहेत. त्यांतील प्रत्येक संपुटांत नाना नद्या, पर्वत, वनें, हत्ती, घोडे, पक्ष्यादिक, मनुष्यादिक इत्यादि विविध रचना आहेत. ते संपुट प्राणिरूप बीजांनीं व त्यांच्या उपभोग्य वस्तूंनीं सर्व बाजूंनीं भरलेले आहेत. अंधकाराला घालविणाऱ्या मणि—प्रदीप—चंद्र—सूर्य यांच्या योगानें त्या जीवांची प्रवृत्ति सुरू होते व त्यांच्या शब्दांनीं ते संपुट अनेक प्रकारांनीं दुमदुमून जातात. त्यांची शोभा कोठें कोठें अंधकारांनीं व क्वचित् प्रकाशांनीं विचित्र झालेली दिसते. ते अतिशय श्रेष्ठ सुगंधानें सुंदर झालेले असतात. क्रीडालक्ष्मीची जणुं काय खाणच अशा त्या मंडपांत स्त्रियांच्या मंडनाकरितां ज्यावरून कोमल पल्लव—पुष्पादि खुडून घेतले आहेत असे कल्पवृक्ष केलेले आहेत. त्यांत बालकांच्या श्वासोच्छ्वासांनींहि हलणारे म्हणजे इतके हलके कुलपर्वत बालकांचे खेळण्याचे चेंडू केलेले आहेत. संध्याकाळचे मेघ हेच त्या मंडपांत दिग्वधूंचे कर्णपूर केले आहेत, शरत्कालचे मेघ हींच स्त्रियांच्या हातांतील चामरें आहेत. कल्पांतकालचे मेघ हेच त्यांतील पंखे आहेत. सर्व भूतळ हेंच त्यांतील द्यूत खेळावयाचें फलक आहे. तारकांसह आकाश हें त्या मंडपाचें छत केलेलें आहे. त्या मंडपांतील आकाशरूप

अंगणांत गृहनिवासी जन व ब्रम्हादि मंडप-स्वामी हे द्यूत खेळत आहेत. चतुर्विध भूत-समुदाय ह्याच त्या द्यूतांतील सोंगट्या आहेत. पुनः पुनः जन्म-मरणादिकांच्या योगानें त्या सोंगट्या पटभर फिरविल्या जातात. त्यांत चंद्र व सूर्य हे फांसे आहेत व जगाचा आविर्भाव व तिरोभाव होतो असा प्रत्यय येणें हाच त्या द्यूतांत लावलेला पण आहे. अशा प्रकारचा मंडप आहे, असा संकल्प करणाऱ्या पुरुषाचा संकल्पच पुढील दृश्या-प्रमाणें—पुढें साक्षात् दिसत असल्यासारखा—जसा सत्यत्वास प्राप्त होतो, त्याप्रमाणेंच हा जगद्रूप मंडपहि जगत्कर्त्याच्या संकल्पांनीं उद्भवलेला आहे. चित्रकाराच्या चित्तांतील चित्राप्रमाणें हा केवल चिच्चमत्कारमात्र आहे—असत्यच स्फुरत आहे. प्रतिभासदृष्ट्या सर्व आहे व परमार्थदृष्ट्या हें कांहीं नाहीं. मायाहत्ती वगैरे मायिक पदार्थां-प्रमाणें हा खोटाच कोठून तरी उद्भवलेला आहे. सोन्यांत जसें कडेंपण वगैरे, त्याप्रमाणें संसार ज्याच्या उदरांत आहे, असा हा चिच्चमत्कार आहे. केवल त्याविषयींचा संकल्प टाकण्यानेंच त्याचा क्षय होतो. अर्थात् त्याचा सर्वथा क्षय करणें, हें प्रत्येकाच्या अगदीं स्वाधीन आहे. यास्तव जशी तुझी इच्छा असेल तसें कर. अन्न-पानादि ऐहिक भोगसामग्री व दान-यज्ञादि पारलौकिक भोगसामग्री या दोन्हींविषयीं ज्याच्या मनांत अनादर उत्पन्न झाला आहे, म्ह० या दोन्ही फलांची ज्याला इच्छा राहिलेली नाहीं, त्याचा हा शेवटचा जन्म आहे. तो कर्माचा त्याग करीत नाहीं. हे शुद्धबुद्ध विद्याधरा! अधःपाताला कारण होणाऱ्या अविवेक—पदवीच्या अपेक्षेनें दुसऱ्या, व त्रिभुवनाला जिनें पवित्र केलें आहे, अशा या पवित्र विवेकपदवीला तूं प्राप्त झाला आहेस. यास्तव या मनामुळें तुझा अधःपात होणार नाहीं, असें मी अनुमान करतों. ह्मणून तूं वाणी व मन यांच्या व्यापारांनीं रहित अशा शुद्ध चिन्मात्रपदाचा अवलंब करून मन-आदि सर्व दृश्यजात सोड; त्याविषयीं संकल्प करूं नको. ८.

## सर्ग ९ वा.

—:०:—

१ जगाचा उदय, अस्त, सत्ता, स्फूर्ति, इत्यादि चित्च्या अधीन आहे. २ विश्व हा सर्व चित्‌चा विलास आहे. ३ ह्मणून तें चिन्मात्र आहे.

भुशुंडः—दृश्य, त्यांतील क्रिया-गुण-दोषादि व त्याला प्रकाशित करणारें चिद्रूप यांसहि न जाणतां—त्यांतील कशाचेंहि अनुसंधान न करितां हे विद्याधरा! तूं शांत व चिद्घन असाच रहा. (तो कसा?) निर्मल जलांत प्रविष्ट झालेले सूर्यकिरण जसे तापरहित व प्रकाशमात्ररूप राहतात तसा रहा. जलाची राशिच अशा समुद्रांत जलाहून अगदीं विलक्षण स्वभावाचा अग्नि जसा राहतो, त्याप्रमाणें चेतनांत अचेतन राहतें. तें चेतनामुळेंच राहतें. कारण चेतनाच्या अभावीं अचेतनाचा प्रत्यय येणें शक्य नाहीं. अग्नीच्या ज्वालेचा विनाश होण्यास किंवा ती उत्पन्न होण्यास वायु जसा कारण होतो, त्याचप्रमाणें चेतन[1] व अचेतन या दोघांचेंहि कारण चित् आहे, पण चित् हें त्यांचें विवर्त कारण आहे. 'अहं नाहीं' अशा भावनेनें तुझें चिद्रूप चित्—मध्यें विश्रांति पावो. त्यानंतर जी दशा स्वभावतःच अनुभवास येईल तसा तूं हो. प्रसन्न जलपूराच्या आंत व बाहेर जसें जलच असतें, त्याचप्रमाणें चिद्रूप असा तूं सर्व पदार्थांच्या आंत व बाहेर स्थित

१ अहंवृत्तिविषय चेतन व इदंवृत्तिविषय अचेतन.

आहेस. 'अहं' या अंशाचा त्याग केल्यानें तुझें चिद्रूप चित् मध्यें जर मिळून गेलें, अखंड एकरूप झालें व त्यानंतर त्याला दुसरें—अचेतन असें कांहींहि स्फुरलें नाहीं, तर मग त्या ब्रह्मरूपाला कशाची उपमा देतां येणार? ज्याप्रमाणें सुर व असुर यांमहवर्तमान पाताल, भूलोक व स्वर्ग यांप्रमाणें स्थित असलेलें व प्रीति-हर्ष-क्रोध, युद्ध-जय-पराजय इत्यादि नाना भावांनीं, पळणें, पाठलाग करणें इत्यादि वेगयुक्त भावांनीं, तदनुरूप क्रिया व काल यांनीं सर्वतः अगदीं व्याकुल झालेलेंहि हें भिंतीवर रंगांनीं काढलेलें जगत् आपल्या आधाररूपानें मुनिशरीरासारखें सर्वव्यापारशून्यच असतें, त्याप्रमाणें मायाशबल चित्-चित्रानें व्यापलेलें हें जगत्हि शुद्ध चिदाकाशरूप भिंतीवर निर्विकार शुद्ध चिद्रूपानेंच स्थित आहे. जगद्भावानें स्थित नाहीं. तात्पर्य, अनृत जगद्रूप किंवा परमार्थ सत्—ब्रह्मरूप यांतील जें स्वभावतःच स्फुरतें तेंच अनुभवास येतें. त्याचाच प्रत्यय येऊं लागतो. याप्रमाणें दोन्ही गोष्टी तुझ्या स्वाधीन आहेत. तूं पाहिजे तर व्युत्थान पावून व्यवहारोन्मुख हो किंवा चित्तसमाधानानें परमार्थोन्मुख हो. तुझ्या इच्छेप्रमाणें कर. अज्ञांहून तत्त्ववेत्त्यांमध्यें जो विशेष आहे तो हा असा:—चिदाकाशांत हे सर्व चिच्चमत्कार जगद्रूपानें स्फुरतात. ते तत्त्वज्ञांना निरोध करूं शकत नाहींत, अतत्त्वज्ञांना निरोध करितात. याला उदाहरण मृगजळाचें. ही मरुभूमि आहे व हे सूर्यकिरणच कांहीं दोषामुळें मोठ्या नदीच्या आकारानें दिसत आहेत असें ज्यांना माहित असतें, तें त्या मृगजळाच्या नदीच्या ऐलतीरीं अडकून पडत नाहींत. पण हें तत्त्व ज्यांना माहीत नसतें ते बुडणें, मरणें, वाहून जाणें, इत्यादि भीतीनें अलीकडे अडकून पडतात, तिमिररोग झालेल्या लोकांच्या दृष्टीला आकाशांत केसासारख्या काळ्या रेषांचा समूह जसा दिसतो, त्याप्रमाणें संसारांतच आसक्त होऊन राहणाऱ्या अज्ञांना हें जगद्रूप दिसतें. याप्रमाणें हें जगत्, तूं, मी इत्यादि सर्व अवबोधरूप आहे. तें केवल चिच्चमत्कारमात्र आहे. म्हणून तें अज्ञदृष्टचा उदय पावलेलें व तत्त्वज्ञांच्या दृष्टीनें अनुदित आहे. सूर्याच्या किरणांच्या योगानेंच बनलेलें गंधर्वनगर जसें असतें, तसें या व्यवहारभूमींत हें सर्व जगत् आहे. पण तें आकाशांतील लतेप्रमाणें जगद्रूपानें सत्य नाहीं. ९.

---

## सर्ग १० वा.

—:०:—

१ ब्रह्म निर्विकार व निष्कारण जसें आहे तसेंच आहे. त्यांत जगत् केव्हांहि व कोठेंहि नव्हतें व नाहीं.

भुशुंडः—हे विद्याधरा! चेतनेतर म्ह० जड ह्मणून संमत असलेलें जगत् जें स्फुरतें—त्याचा अनुभव येतो, तें चेतनामुळें स्फुरतें असें तूं जाण. स्फुरद्रुपत्व हेंच चेतनत्व. जगद्रूप जर स्फुरत आहे तर तें चेतनच आहे, चेतनेतर नाहीं. जलांत प्रतिबिंबित झालेला अग्नि जसा जलाहून निराळी वस्तू नव्हे त्याप्रमाणें तें चेतनाहून भिन्न नाहीं. अर्थात् जलाच्या शैत्याहून त्यांतील प्रतिबिंबित अग्नीचें उष्णत्व जसें पृथक् नसतें, त्याचप्रमाणें चैतन्याहून जाड्य निराळें नाहीं. याप्रमाणें जगाचें वेदन किंवा अवेदन यांचा अभेद असल्यामुळें म्ह० केवल जाड्याचा अपलाप केला असतां जगाचा अपलापहि सिद्ध होत असल्यामुळें तूं स्वस्थ—सर्व विक्षेपरहित होऊन रहा. चित्रकाराच्या चित्तांतील चित्राच्या ज्ञानाप्रमाणें व गंधर्वनगराचें अधिष्ठान अशा आकाशाच्या मध्याप्रमाणें तूं परि-

च्छेदशून्य रहा. अक्षुब्ध निर्मल जलामध्यें भावी फेनाचा लव जसा असतो, त्याप्रमाणें ब्रह्म सर्व शक्ति असल्यामुळें त्यांत अचित्त्वहि असतें. कारणावांचून जलापासून फेंस निघत नाहीं, त्याचप्रमाणें कारणावांचून ब्रम्हापासून सृष्ट्यादिकांचाहि उदय होत नाहीं. कारणावांचून होणाऱ्या या सर्ग-वृत्तीमध्यें कांहीं कारण नाहीं. म्हणूनच जगत् वगैरे कांहीं उत्पन्न होत नाहीं, व नाश पावत नाहीं. कारणाचा अत्यंत अभाव असल्यामुळें जगांतील कांहींच उत्पन्न होत नाहीं. हें जगत आपल्याला पुढें जरी दिसत आहे, तरी मरुभूमींतील मृगजळाप्रमाणें तें विद्यमान नाहींच. ब्रम्ह अनन्त, अज, शांत आहे; ह्मणून तें आहे. पण सृष्टिबुद्धि नाहीं. कारण सृष्टि आहे असें म्हणण्यास कांहीं कारण नाहीं. त्यामुळें हें अखंडित ब्रह्मच आहे. यास्तव हे विद्याधरा! तूं शिलोदरासारखा आहेस. किंवा तुला आकाश कोशाची उपमा आहे. तूं ब्रह्मैकघन—ब्रह्मैकरसरूप आहेस. त्यामुळें अज व अनवयव आहेस. तूं ज्ञानरूप आहेस. सत्तासामान्यरूप आहेस. व सर्व विशेषांचा बाध झाल्यावर सामान्यरूपहि नाहींस. ज्यांत चिदाभास व बुद्धि हीं दोन्ही नाहींत, अशा आत्म्यामध्यें तूं स्वरूपानें शांत हो. अज आत्मा नित्य आनंद आहे. त्यामुळें त्याचें कार्य करणारें म्ह० त्याला आनंद देणारें असें कांहीं निमित्त नाहीं. त्यामुळेंहि सृष्ट्यादिकांचा असंभव आहे. यास्तव जें आहे तें अज व शिव आहे. ज्या मूर्ख विलासी जनांना चिद्रूप आत्माहि अवगत नाहीं, ज्यांना त्याविषयींहि संशय आहे, त्यांचा नाश होणें अपरिहार्य आहे. तेव्हां अशा मूढांच्या मोक्षोपायाचा विचार करणें व्यर्थ आहे. जेथें जेथें परब्रह्म आहे, तेथें तेथें जगत् हा शब्द व त्याचा अर्थ या रूपानें जगें आहेतच. नाश पावलेलीं असंख्य जगेंहि त्यांत आहेत व विकास पावलेलीं जगेंहि आहेत. तृण, काष्ट, जल, भिंत इत्यादि सर्वत्र परब्रह्म स्थित आहे. आणि त्या सर्व ठिकाणीं सृष्टीचा ओघहि ओतप्रोत भरून राहिलेला आहे. ब्रम्हाचा हा काय स्वभाव आहे तो कांहीं सांगता येत नाहीं. अनंत परम तत्त्वामध्यें स्वत्व व अस्वत्व यांचा अत्यंत असंभव आहे. अभावाची अपेक्षा करणारा जो भाव त्याचाहि ब्रम्हामध्यें असंभव असल्यामुळें त्या अनन्त तत्त्वांत स्वभावादिक दुरुक्तींना अवकाशच मिळत नाहीं, अस्वत्व व अभाव यांचा नित्य व अनन्त ब्रम्हामध्यें अत्यंत असंभव आहे. यास्तव 'स्वत्व' हे भाव सिद्ध झाले असतां 'स्वभाव' हें नांवहि उरत नाहीं. विचारपूर्वक अवलोकन केलें असतां हे साधो! 'अहंत्व' उपलब्धच होत नाहीं. कारण तें 'अहंत्व' अज्ञानें कल्पिलेल्या यक्षाप्रमाणें खोटेंच निष्कारण उद्भवलें आहे. 'अहंत्व' हा शब्द व त्याचा अर्थ यांनीं रहित असें जें कांहीं प्राप्त होतें तेंच परम तत्त्व आहे. पण 'अहंत्व' हा शब्द व त्याचा अर्थ यांनीं युक्त असें तें तत्त्व रत्नपारख्याप्रमाणें शास्त्र, आचार्य व स्वानुभव यांच्या योगानें परीक्षा करून पाहूं लागलें असतां विलीन होतें. ज्याप्रमाणें सोनें व कड्याचा आकार यांचा भेद व अभेद हे दोन्ही संकल्पमात्र आहेत, त्याप्रमाणें जगद्—दृष्टि व ब्रम्हदृष्टि यांचा भेद व अभेद हा पर्यायशब्दांसारखाच आहे. घट व कुंभ हे जसे केवल पर्यायशब्द आहेत.—शब्दभेद असला तरी पदार्थभेद जसा होत नाहीं, त्याप्रमाणें वरील भेद व अभेद संकल्प—मात्र आहे, सत्य नव्हे, असें सांगितलें आहे. १०.

———

## सर्ग ११ वा.

—:०:—

१ इंद्रियजयानें पूर्ण ब्रम्हांत निर्विकार मन:-स्थिति करावी. २ देहादि दृश्यविषयींची अदृष्टि दृढ करावी.

**भुशुंड:**—वस्त्रादिकांनीं आच्छादित न झालेल्या अंगाला शस्त्रांचा स्पर्श झाला असतां किंवा तरुणीच्या स्तनादि अंगांचा स्पर्श झाला असतां ज्याचें चित्त एकसारखेंच अगदीं सम रहातें तो परमपदीं स्थित आहे, असें जाणावें. वास्तव शस्त्रें, स्त्रीचे अवयव इत्यादि बाह्य पदार्थांपासून होणारा जो विकार त्याला मिथ्यात्वबुद्धीनें प्रतिबंध करून स्वात्मसुखांतच विश्रांति घेणें, एतद्रूप सुपुप्तता उदय पावेपर्यंत धैर्यानें व पुरुषयत्नानें अभ्यास करावा. पाणी कमलाला जसें लेप करीत नाहीं, त्याप्रमाणें पुढें प्राप्त झालेल्याहीं आधि परमार्थतत्त्वज्ञाला यत्किंचित्‌हि लेप करीत नाहींत. शस्त्रें व अंगना यांचा स्पर्श झाला असतां आकाशाला जसें, तसेंच ज्याला त्याचें भानहि होत नाहीं, तर त्यांचा जणूं काय स्पर्श न झाल्याप्रमाणेंच जो शांतात्मा असतो, तो साक्षात्कारवान्—ज्ञानवान् होय. विष आपल्या स्वभावापासून च्युत न होतांच ज्याप्रमाणें विषकीटाच्या रूपानें परिणाम पावतें व त्यामुळें गुणता—विषकीटत्व विषाहून भिन्न नव्हे, त्याप्रमाणें ब्रह्म स्वरूपाचा त्याग न करितांच जीवत्वास प्राप्त होतें. पण तें जीवत्व केवल स्वरूपतत्त्वज्ञानानें बाधित होणारें असतें. अमर्त्य आत्माच जसा जीव होतो, त्याप्रमाणें चित् आपलें रूप न सोडतांच जडरूपास प्राप्त होते जीवाप्रमाणें जगत्‌हि ब्रह्माहून भिन्न नाहीं; तर ब्रह्माभिन्न आहे. तथापि जणुं काय तें त्याहून अगदीं विलक्षण असें उत्पन्न झालें आहे. तो सर्ग—प्रपंच ब्रह्मनिष्ठच आहे. तथापि तन्निष्ठ नाहीं असा भासतो. तो यथापूर्व मिथ्या उत्पन्न झालेला असल्यामुळें जरी पूर्वीचाच आहे, तरी पूर्वींचा नव्हे असा वाटतो. विषस्वभावाच्या दृष्टीनें जसें जन्ममरण नाहीं, पण देहिस्वभावदृष्टया तें आहे, त्याप्रमाणें जीवामध्येंहि ब्रह्मस्वभावदृष्ट्या कोणताच भावविकार नाहीं. जीवविकारदृष्ट्या जन्मादि सर्व विकार आहेत. देहेंद्रियादि पदार्थांमध्यें आसक्ति ठेवून त्यांत निमग्न होणें हा अपराध न करितां श्रवणादि प्रयत्नानें आत्मसाक्षात्कार संपादन केल्यानेंच हा भवार्णव गायीच्या पावलाप्रमाणें अनायासानें उल्लंघन केला जातो. दैव मला यांतून तारील, असें म्हणून स्वप्रयत्नांची उपेक्षा केल्यानें पुरुषार्थप्राप्ति होत नाहीं. ज्याच्या ठिकाणीं सर्व पदार्थांतील सारसुखरूप अंतरवस्था व सर्व पदार्थांहून अत्यंत श्रेष्ठ अशी अंत:शीलता असते, त्या परिपूर्ण स्वभावतत्त्वज्ञामध्यें कोणाची अवहेलना प्रवृत्त होणार ? जगांतील पदार्थांच्या सत्तेचा अंतर्भाग—मध्यभाग तूं जर सन्मात्र ब्रम्हस्वरूपानें पाहशील तर मग शुद्ध आत्म्यामध्यें मन, बुद्धि, अहंकार इत्यादि कलंक उत्पन्न होणार नाहींत हे विद्याधरा ! ज्याप्रमाणें तूं घट पटादि पदार्थांना तटस्थ रूपानें-स्वत:हून पृथक्त्वानें पाहतोस, त्याप्रमाणें शरीरालाहि पहा. शरीरच मी अशा भावनेनें पाहूं नकोस. त्याचप्रमाणें अहंत्व, मन, बुद्धि इत्याकांचें संवदनहि तटस्थत्वानें पहा. त्यानंतर साक्षिस्वरूप होऊन बाहेरील जगत्पदार्थ व आंतील मनोबुद्ध्यादि यांचा प्रत्यय न घेतां ज्ञप्तिमात्र होऊन स्वाभाविक स्थितीनें रहा. म्हणजे शेवटीं साक्षिरूपत्वहि सोडून स्वाभाविक ज्ञप्तिमात्र होऊन रहा. त्या स्थितींत संपत्ति, विपत्ति, त्यामुळें होणारें सुख व दु:ख यांतील कोणत्याहि निमित्तानें कोणाला केव्हांहि कांहीं दोष

किंवा गुण नाहीं. ज्या अर्थीं कर्तृता नाहीं, त्या अर्थीं भोक्तृताहि नाहीं, हें तूं निश्चित समज. ११

## सर्ग १२ वा.

१ अहंभाव भ्रांतिमात्र आहे. २ जगद्भ्रम हा चित्‌चा अन्यथा परिणाम आहे. ३ त्याचें मूळ अविद्या आहे. ४ तिच्या क्षयाचा क्रम.

भुशुंडः—ज्याप्रमाणें महाकाशांत घटाकाश, मठाकाश इत्यादि अपर आकाश उत्पन्न झालें अशी कल्पना करणें भ्रांतिमात्र, असद्रूप आहे, त्याप्रमाणें अज्ञात आत्म्यामध्यें सूक्ष्म प्रपंचरूप अहंभावाची भावना करणें असद्रूप आहे. आकाशांत आकाश उत्पन्न झालें, या भ्रांतीचा कल्पक—कल्पनाकर्ता जसा ‘ अहं ’ हा तिसरा आहे, त्याप्रमाणें अविद्यावृत झाल्यामुळें असत्‌सें भासणारें, व त्यामुळेंच शब्दादिकांनीं व्यवहार करण्यास अयोग्य असें जें आत्मरूप सद्वस्तु आहे तें तिसरें कल्पक आहे. दृष्टान्तांत ज्याप्रमाणें आकाशांत अद्वय आकाशात्माच असतां व त्यांतील दुसऱ्या आकाशाला कल्पक पुरुषाचें संकल्पावछिन्न चिद्रूप स्वतःला संकल्पात्मक बनून जाणतें, त्याप्रमाणें अविद्योपहित आत्मा स्वतःलाच मी अविद्याच आहें, मीच हें आहें इत्यादि त्रिपुटीरूप बनवून पाहतो. यास्तव ‘ मी ’ म्हणून कोणी अविद्येहून निराळा नाहीं. त्याचप्रमाणें प्रपंचरूप अनहंहि नाहीं. यास्तव केवळ एक चिद्रूप आहे. तें इतकें सूक्ष्म आहे कीं, त्याच्या अपेक्षेनें आकाशहि अतिशय स्थूल वाटतें. अणूमध्यें जसा महामेरु असावा, त्याप्रमाणें त्याची कल्पना हीच आकाशादि प्रपंचरूपता आहे. आकाशाहूनहि अतिशय अणु असलेला जो जडाभास, तोहि या आत्मचितीहून अतिशय स्थूल आहे. अशाप्रकारचें जें परम सूक्ष्म चैतन्य तें ‘ अहं-इदं ’ इत्यादि अनादि वासनेच्या योगानें उत्तरोत्तर स्थूलस्वभावकल्पनेनें सर्वांला जाणतें. हीच कल्पना सृष्टि म्हणून रूढ झाली आहे. आत्मचैतन्याचा अहंतादि अध्यात्मविस्तार व आकाशादि अधिदैवविस्तार हेंच सर्व जगत् आहे. ज्याप्रमाणें जलाच्या द्रवाचें प्रसरण म्हणजेच आवर्तादि-तरंगादिवेष्टन उत्पन्न होणें आहे तसेंच हें समजावें. जलद्रवाचा प्रसार न होणें म्हणजे तरंगादिकांचा उपशम होय, त्याचप्रमाणें चित्‌चें प्रसरण न होणें, हीच जगाची शांति म्ह० प्रलय आहे. तो प्रलय निःस्पंद वायूच्या आकाराचा किंवा आकाशाच्या मध्यकोशासारखा असतो. याप्रमाणें सिद्ध झालेल्या देश-कालादि जगाच्या अवान्तर कार्यरूप हजारों विकासांतहि चिन्मात्रप्रसारावांचून दुसरें कांहीं पारमार्थिक रूप उपपन्न होत नाहीं. चिन्मात्ररूप पसरलेल्या काळांत, आकाशांत, नावेंत, जलांत, स्थलांत, झोंपेंत, जागृतींत, स्वप्नांत हें जगत् उदय पावलेसें होतें. तत्त्वज्ञाच्या दृष्टीनें हें प्रसरण किंवा अप्रसरण संभवत नाहीं. कारण आत्मतत्त्व आकाशाहूनहि अतिशय स्वच्छ आहे. तें संचलनादि सर्व विकारशून्य आहे. ज्ञानी पुरुषाच्या चित्तांत भोगादिकांचें स्फुरणच होत नाहीं. त्याच्या स्वरूपांत ‘ हा मी ’ असाहि भाव उत्पन्न होत नाहीं. जलामध्यें जसें द्रवत्व असतें, तसा कूटस्थ स्वभावांत तो एकरूप होऊन राहतो. अंधकारांत सर्पाचीं पावलें जशीं दिसत नाहींत, त्याप्रमाणें संकल्परहित झालेला तो बुद्धि, लज्जा, भय, स्मृति, कीर्ति, कांति इत्यादि चित्तवृत्तींच्या समूहास पहात नाहीं. ब्रह्मरूप चंद्रबिंबापासून स्फुरलेल्या ज्या जीवचिदाभासलक्षण ज्योत्स्ना त्यांच्या अंशभूत चाक्षुषादि ज्ञानरूप जें अमृत, त्याच्या योगानें जगाची सिद्धि होत असल्यामुळें त्या अमृताचा द्रवच असा हा प्रपंच ब्रह्माहून निराळा नाहीं. कारण

त्याचे आधार–दिशा व काल यांचा निरवयव व निष्क्रिय ब्रह्माचे ठिकाणीं असंभव आहे. दिशा असेल तर मूर्तद्रव्याच्या क्रियेनें सृष्टिकालाची कल्पना होणार. पण उत्पत्तीच्या पूर्वीं दिशा नाहीं. त्याचप्रमाणें काल असेल तेव्हां दिशादि पदार्थांच्या उत्पत्तीची कल्पना होणार. पण प्रलयामध्यें काल नाहीं. कारण क्रियेवांचून कालाची सिद्धि होत नाहीं. पूर्ण कूटस्थांत क्रिया संभवत नाहीं आणि त्या दोघांचा असंभव असतांना दुसऱ्या कोणालाहि अवकाशच नाहीं. म्हणून ब्रम्हव्यतिरिक्त वस्तूची सिद्धि होत नाहीं. याप्रमाणें परमेश्वर स्वाभिन्न जगदाकारामध्यें सर्वसाधारण चिदानन्दरूपानें स्फुरण पावत असतांना देहादि एकाद्या पदार्थांत ' हा मी ' असा विशेष अभिमान ठेवून तदनुकुल व प्रतिकूल पदार्थांविषयीं हा ग्राह्य व हा त्याज्य इत्यादि कल्पना करून आधिमान् होणारा जो अहंकारात्मा तो अन्यथा भासतो. पण तें सर्व चित्तच आहे. ज्ञानानें एका क्षणांत क्षीण होऊन जाणारी ही सृष्टिरूप मृगजलनदी नानाप्रकारच्या तरंग-आवर्तादिकांनीं प्रवाहरूपानें सारखी चालली आहे. ज्याप्रमाणें दुरून दिसणाऱ्या लाटांवरून हें पाणी आहे असें भासतें, धुराचा लोट निबिड मेघ भासतो, त्याप्रमाणें ब्रम्ह व मन या दोघांहून निराळा तिसरा प्रपंच जड व सत्य आहे असा भासतो. करवतानें लांकूड कापलें असतां त्यात चक्रादि आकार जसे दिसतात, त्याप्रमाणें दिशादि सर्वभावशून्य परतत्त्वामध्यें तद्रूप व अतद्रूप असा हा सर्ग—प्रपंच आहे. स्वतः मिथ्या असल्यामुळें मृदु, पण अधिष्ठान सत्तेनें दगडासारखा कठोर अशा या प्रपंचांत विवेक्याला स्फटिक शिळेंत झालेल्या कदलिस्तंभाहून प्रतिबिंबित वैलक्षण्य कांहीं दिसत नाहीं. हें जगत् वस्त्रावर लिहिलेल्या चित्रमय महाराज्यासारखें आहे. त्यांत हजारों पाय, हात, मस्तकें, डोळे, तोंडें, चेष्टा, इंगितें, तर्क, वीतभर लांबीचे नानाप्रकारचे पर्वत, शरीरें, दिशा, देश, नद्या वगैरे आहेत. तें अन्तःशून्य आहे. म्हणजे त्यांत सारभूत असें कांहीं नाहीं. तें चित्र अनेक रंगांनीं रंगविलेलें आहे. वैराग्यानेंच त्याचें मार्जन करतां येतें; किंवा चित्रपक्षीं, विरुद्ध रंगानें त्या पूर्वचित्राचें मार्जन करतां येतें. तें जगच्चित्र सुर, असुर, गंधर्व, विद्याधर, महा सर्प यांनीं युक्त आहे. सूत्रात्मरूप आंतर वायु व हा बाहेरील प्रसिद्ध वायु यांच्या योगानें स्पंदन पावण्याचें त्याचें शील आहे. तें ब्रम्हचेतनानें व द्रष्टृचेतनानें चेतित झालें आहे. तात्पर्य, अशा प्रकारचें तें जगच्चित्र वस्त्रावरील चित्रमहाराज्याप्रमाणें गंभीर व सुंदर आहे. तें विचार करीपर्यंतच सुंदर दिसतें. विचार करूं लागलें असतां तो त्याला सहन होत नाहीं. तें केवल विकल्पानें स्फुरण पावलें आहे. पाण्यांत पडलेला तेलाचा बिंदु जसा सभोंवार पसरतो, त्याप्रमाणें अर्थशून्यत्वामुळें व बाध्यत्वामुळें असत्य असलेल्या स्पंदरूप विकल्पवृत्तिमान् मनामध्यें प्रतिबिंबभावानें पडलेली संवित् भ्रांतिमध्यें पसरते. ( ती कशी याचें उत्तर— ) मनाला क्षुब्ध करणारे जे कामवासनादि दोष त्यांच्या समूहांनीं सर्व प्रकारचे आवर्त व विवर्त यांच्या योगानें निबद्ध झालेली संवित् विकल्पानें उन्मुखी होऊन पसरते. त्याचप्रमाणें ती पुत्र-स्त्री इत्यादिकांविषयीं पसरणारा जो स्नेह त्यानें युक्त अशा जड व मिथ्या शब्द-स्पर्शादि विषयांच्या आस्वादनानें ' अहं ' इत्यादि चिद्रूपांत अधिक पसरते. अशा रीतीनें पसरणारी संवित् हाच वर चित्रमहाराज्यत्वानें वर्णिलेला संसार आहे. पण याप्रमाणें ही आदि चित् ' अहं ' अशा विकल्पानें बहिर्मुख

होऊन जणुंकाय जीवभावास जरी प्राप्त होत असली, तरी जलत्वाहून 'तोयत्व'—पाणीपणा जसा पृथक् नाहीं, त्याप्रमाणें ती परमात्म्याहून पृथक् नाहीं. चिदादित्यच 'स्व' 'आत्मा' 'सर्ग' असा म्हटला जातो. तो 'अहं' होऊन वरील नांवांस पात्र होतो. त्यामुळें प्रपंच त्याहून निराळा नाहीं. त्या सर्गाला उत्पन्न करणारा सर्जकहि निराळा नाहीं. जसा जलाचा द्रव स्पंदात्मक सत्तेंत स्पंद आहे, त्याचप्रमाणें चिदात्मा व्योमत्वानें व्योमत्वादिकांस जाणतो. देशकालादि निर्माणपूर्वकच चित्-चें वेदन असतें. कारण त्याला सृष्टिरूपत्व आहे. त्यामुळें त्याला जलाच्या द्रवत्वाची उपमा बरोबर लागू पडते. मन, बुद्धि, अहंकार, इत्यादि जें जें कांहीं वेदन म्हणून आहे ती ती सर्व अविद्या आहे, असें समज. ती शास्त्रोक्त यम-नियमादि व श्रवण-मननादि पौरुष यत्नानें तत्काल नाश पावते. अविद्येचा अर्धा भाग परस्पर तत्त्वविषयक संभाषणादि केल्यानें निवृत्त होतो. चतुर्थांश भाग शास्त्रविचारणांनीं निवृत्त होतो व बाकीचा चतुर्थांश आत्मानुभवानें निवृत्त होतो. अशा रीतीनें क्रमानें अविद्येचे चारी भाग एकाच वेळीं भूमिकांचा अभ्यास केल्यानें क्षय पावले असतां जें अवशिष्ट राहतें तें नामरूपरहित सन्मात्रच परम पुरुषार्थ आहे.

**श्रीरामः**—हे मुनिवर्य! परस्पर संलापांनीं अविद्येचा अर्धा भाग निवृत्त होतो, शास्त्रविचारानें चतुर्थांश निवृत्त होतो व आत्मानुभवानें बाकीचा चतुर्थांश निवृत्त होतो, म्हणून जें सांगितलें तें कसें? अविद्येचे ते भाग कसे निवृत्त होतात? आपण 'समकाल अभ्यासानें व क्रमानें' असें काय सांगतां! नामरूपरहित सन्मात्र तें काय व 'सद्वस्तु' तें काय? हें मला सांगा.

**श्रीवसिष्ठः**—ज्याला या संसारसागरांतून उतरून पार जाण्याची इच्छा असेल अशा सुजन, विरक्त पुरुषानें आत्मज्ञानी व मुमुक्षु यांसह हा संसार काय आहे, याचें पर्यवसान कशांत होतें, याचें मूळ काय आहे, याचें सार काय आहे, यांतून कसें पार पडतां येईल, इत्यादि गोष्टींचा विचार करावा. जेथें सांपडेल तेथून विरक्त, निर्मत्सर, सज्जन, आत्मज्ञ जनाला हुडकून काढून शहाण्यानें मोठ्या यत्नानें त्याची आराधना करावी. साधूचा समागम प्राप्त झाल्यानेंच हे ज्ञानिश्रेष्ठा! अर्धी अविद्या क्षय पावत आहे, असें तूं समज. कारण त्या समागमामुळें इतर भूमिकांहून ज्येष्ठ व साधनचतुष्टयसंपत्तीमुळें श्रेष्ठ अशा प्रथमभूमिकादशेचा उदय होत असतो. सज्जनांच्या संपर्कामुळें अविद्येचा अर्धा भाग नाश पावतो. चतुर्थांश शास्त्रार्थाच्या योगानें जातो. राहिलेला चवथा भाग स्वयत्नानें नाहींसा करावा. उत्कट मुमुक्षारूपाचा अभिलाष जर उत्पन्न झाला, तर वैराग्यच भोग व त्याचीं साधनें यांपासून त्या पुरुषाचें निवारण करतें. त्यामुळें अवश्य निर्मम झालेला पुरुष संन्यास करतो. ममतेचा क्षय झाला असतां अविद्येचा चतुर्थांश स्वयत्नानेंच जातो. साधुसंगम, स्वच्छास्त्र व स्वयत्न हे तिन्ही उपाय एकाच वेळीं जर प्राप्त झाले, तर सर्वांच्या योगानें एकाच समयीं अविद्येचा क्षय होतो. पण ते

---

१ विनय, प्रणाम, दान, संमान, यांच्या योगानें वश करून घेतलेल्या तत्त्ववेत्त्यांशीं संभाषणादिक करून वैराग्यादि साधनचतुष्टयाची सिद्धि होऊन पुत्र स्त्री-धनादिकांविषयींची ममता ही अर्धी अविद्या निवृत्त होते.

२ श्रवणादिकांच्या योगानें देहादिकांच्या ठिकाणचा अहंतादिरूप विक्षेपशक्तीचा भाग निवृत्त होतो.

३ अविद्येचा आवरणांश.

जर सर्व एकाच वेळीं प्राप्त न होतां एकदा साधुसंगम हा एकच, दुसऱ्या वेळीं शास्त्रार्थ व तिसऱ्या वेळीं स्वयत्न अशी क्रमानें त्यांची प्राप्ति झाली तर क्रमानेंच अविद्येच्या अंशांचा क्षय होतो. याप्रमाणें अविद्येचा निःशेष क्षय झाल्यावर जें एक अखंड रूप अवशिष्ट राहतें, त्याला हें कांहीं आहे असें म्हणतां येत नाहीं व कांहीं नाहीं असेंहि म्हणवत नाहीं. तेंच सत् व असत् यांहून विलक्षण असें नामरूपरहित तत्त्व आहे. हे रामा! तें अवशिष्ट राहिलेलें तत्त्व आनंदैकघन, जरादि विकारशून्य ब्रह्मच आहे; आणि जीव जगद्रूप संकल्पविकल्पस्फुरणमात्र असल्यामुळें असत्च आहे. याप्रमाणें तूं आत्मानात्मतत्त्वाला बरोबर जाणून, प्रमाण-प्रमेयादि त्रिपुटीमोहरहित होऊन, निर्वाण ब्रह्मच हो आणि आपल्या निरतिशय सर्वव्याप्तीमुळें परिपूर्ण व निःशोक होऊन रहा. १२

---

## सर्ग १३ वा.

—:०:—

१ मायाकार्याला देशादिकांची अपेक्षा नसते. २ इंद्राच्या सूक्ष्म उदरांत राज्यकल्पनेचें आख्यान.

भुशुंडः—ज्याप्रमाणें आकाशांत एकाच वेळीं पसरलेल्या प्रकाशाचें धारण करण्यास स्तंभाची कांहीं गरज नसते त्याप्रमाणें दृष्टिसृष्टिवादांत एकाच वेळीं देशकालादिकांसह सर्व जगाचा प्रसार होतो. त्यामुळें त्या मायिक जगाचें धारण करण्यासाठीं देशादिकांची अपेक्षा नसते. अर्थात् वर 'देश-कालादि निर्माणपूर्वक वेदन' असें जें म्हटलें आहे, तो केवल अभ्युपगम्यवाद आहे. ती वस्तुस्थिति नव्हे. हें जगत्त्रय मनःसंकल्पमात्र उत्पन्न झालेलें आहे, त्यामुळें वायूच्या आंत असलेल्या ज्योतीहून किंवा सुगंधाहून शांत-गुप्त असलेलें, सूक्ष्म, हलकें व स्वच्छ आहे. हे साधो! हें चिच्चमत्कारमात्र आहे, अशा दृष्टीनें पाहिलेल्या या जगद्रूप अणूच्या अपेक्षेनें वायूंत असलेलें सुगंधत्वहि खरोखर स्थूल आहे. कारण त्याचा प्राणादिकांशीं संबंध होऊन अनुभव येऊं शकतो. जसा मनोरथानें मनांतल्या मनांत कल्पिलेला पदार्थ साक्षीलाच तेवढा दिसतो, किंवा स्वतःचें स्वप्न स्वतःलाच दिसतें, त्याप्रमाणें हा प्रपंच ज्याला स्फुरतो त्यालाच त्याचा अनुभव येतो. याविषयीं असा पुरातन इतिहास सांगतातः—पूर्वीं देवराजाला एका त्रसरेणूच्या उदरांत काय दिसलें तें ऐक. एका प्रदेशीं एकदां एका कल्पवृक्षावर दोन शाखांच्या संधींत एक जगदुंबर फळ लागलेलें होतें. सुर, असुर इत्यादिकांसह सर्व लहान-थोर किड्यांचा त्यांत घुं घुं असा आवाज एकसारखा चालला होता. पर्वतरूपी मजबूत कड्यांनीं अतिशय दुर्भेद्य झालेलीं पाताळ, भूमि व स्वर्ग अशीं तीन द्वारें त्या फळाला होतीं. चिच्चमत्काररूपी विचित्र व मोठ्या वासनारसानें तें फळ अतिशय पुष्ट झालें होतें. नानाप्रकारचे अनुभव हाच त्याला फार चांगला वास येत होता. चित्तास्वादानें तें मनोहर होतें. वर सांगितलेल्या ब्रम्हवृक्षावर वाढलेल्या सूक्ष्म जगद्रूप असंख्य सत्तांच्या आंत तें फळ होतें. अहंकार हाच त्याचा फार मोठा देठ आहे. साक्षिचित्प्रकाशानें तें अत्यंत उज्जल दिसत असतें. मोक्षाचें द्वार ज्ञान हेंच त्याचें विकास पावणारें मुख आहे. नद्या व समुद्र याच शिरांनीं तें व्याप्त आहे. तन्मात्र पंचकोशांत तें स्थित आहे. वर तरंगत असलेलीं नक्षत्रें हेच त्या फळावरील तुषारकण आहेत. महाकल्पाच्या शेवटीं तें परिपक्व होतें. त्यानंतर तें काकीच्या किंवा कोकिळेच्या तोंडांत पडतें. असच्छास्त्राच्या कर्णकठोर ध्वनीला अनुसरणारी अविद्या कावळी त्याला खातें,

तिनें खाल्लेला भाग वासनामात्रशेष राहतो म्ह० नाश पावतो. शास्त्राच्या मधुर ध्वनीला अनुसरणारी कोकालाहि त्याच्या कांहीं भागाला खाते–तो भाग ब्रह्मभावास प्राप्त होतो. त्या उदुंबर फळांत त्रिभुवनेश्वर देवराज इंद्र होता. मधानें भरलेल्या घागरीच्या आंत असलेल्या मधमाशांचा राजा जसा असतो, तसाच तो होता. गुरूनें ज्या तत्त्वांचा उपदेश केला होता त्यांचा चांगला अभ्यास केल्यामुळें त्याच्या बुद्धीवरील अज्ञानाचें आवरण क्षीण झालें होतें, त्यामुळें तो महात्मा झाला. त्यानें सर्वांची पराकाष्ठा आत्मा आहे, अशी भावना केली व त्यामुळें तो सर्व लौकिक व वैदिक ज्ञानी लोकांत श्रेष्ठ झाला. त्यामुळें एकदां नारायणादिक सर्व वीर्यशाली पुरुष कोठें अगदीं लीन झाले असतां तो एकाकी सुरेश्वर शस्त्रांच्या ज्वालाग्नीचे भार वाहणाऱ्या असुरांशीं युद्ध करूं लागला. शेवटीं त्या महावीर्यवानांनीं त्याला जिंकलें. तेव्हां तो लागलीच पळाला. दशदिशांकडे अतिशय पळत सुटलेल्या त्याचा शत्रूंनीं पाठलाग केला. पापी पुरुषाला जसा स्वर्गादि चांगला परलोक मिळत नाहीं त्याप्रमाणें त्याला विश्रांतीचें स्थान मिळालें नाहीं. पण इतक्यांत शत्रूंना थोडीशी भ्रांति पडून ते तेथल्या तेथें घुटमळत आहेत असें पाहून तेंच तेवढें त्यांचें छिद्र सांपडतांच, आपल्या स्थूलाकार संकल्पास भूतसूक्ष्मांत शांत करून तो स्वतः अतिशय अणुप्रमाण बनला, आणि मधुकर कमलकोशांत जसा प्रवेश करतो त्याप्रमाणें तो बाहेर सूर्यकिरणांच्या कोशांत असलेल्या त्रसरेणूंत अन्तःप्रवेशसंकल्पसंविद्रूपानें शिरला. तेथें त्यानें लागलीच विश्रांति घेतली. फार वेळानें तो चित्तस्थैर्याला प्राप्त झाला. संग्रामाचा त्याला विसर पडला, व परमसुखास प्राप्त झाला. नंतर त्यानें तेथें एका क्षणांत आपल्या कल्पित गृहाचा अनुभव घेतला. कमलासन ब्रह्मदेव आपल्या आसनभूत कमलांत जसा रममाण होतो, तसा तो त्या आपल्या गृहांत रममाण झाला. गृहांत स्थित असलेल्या त्या हरीनें आपलें तें कल्पित नगर पाहिलें. रत्नें, मोत्यें, प्रवाल, इत्यादिकांचे ज्याला तट आहेत असें त्याचें त्या नगरांत मंदिर होतें. नंतर त्या नगरांत असलेल्या इंद्रानें मोठा देश पाहिला. तो नाना पर्वत, देश, ग्राम, गोकुलें, नगरें, अरण्यें यांनीं विराजमान् झाला होता. तसा त्या देशाच्या संकल्पानें संकल्पयुक्त झालेला इंद्र त्यानंतर भूलोक पाहूं लागला. सागर, पर्वत, भूमि, नद्या, राजे, देशांच्या सीमा इत्यादिकांसहवर्तमान काल, क्रिया इत्यादि सर्व भुवनाची कल्पना त्यांत होती. या संकल्पांत निमग्न झालेल्या इंद्रानें त्यानंतर त्रिभुवन पाहिलें. पाताल, भूमि, स्वर्ग, अंतरिक्ष, सूर्य इत्यादिकांसह तें त्रिभुवन अत्यंत शोभत होतें. विषयभोगांच्या भरानें भूषित झालेला तो त्या त्रिभुवनांत पुनः देवेंद्र होऊन राहिला. कुंद या नांवाचा त्याला एक मोठा वीर्यवान् पुत्र झाला. त्यानंतर आयुष्याची समाप्ति होतांच देहाचा त्याग करून तो अनिंदित शक्र तैलरहित दीपाप्रमाणें निर्वाण पावला. त्याच्या मागें त्याचा पुत्र कुंद त्रैलोक्याचा राजा झाला. त्यानेंहि आपल्या पुत्राला उत्पन्न केलें व पुष्कळ दिवसांनीं जीविताचा क्षय झाला असतां कुंदहि परमपदास प्राप्त झाला. त्याचा पुत्रहि पित्याप्रमाणेंच आपल्या पुत्राला राज्यावर बसवून आयुष्याच्या अंतीं पवित्र परमपदीं प्राप्त झाला. याप्रमाणें इंद्राचे सहस्त्रावधि वंशज तेथें होऊन गेले. त्या राज्यावर हल्लींहि अंशक या नांवाचा राजा बसलेला आहे. हे सुंदर विद्याधरा! वर वर्णन केल्याप्रमाणें या क्षणापर्यंत इंद्रानें त्रसरेणूच्या आंत संकल्पानें उत्पन्न केलेल्या जगांत

त्याचाच वंशज इंद्रपदाचा उपभोग घेत आहे. फार काय, पण एखादे वेळीं आकाशांतील सूर्यकिरणांनीं पावन होणारा तो अणु जरी गळून नष्ट झाला तरी त्याचें राज्य नष्ट होत नाहीं.

---

## सर्ग १४ वा.

१ त्याच्या कुलांत उत्पन्न झालेल्या शक्राला कमलनालांत जगाचा अनुभव. २ ब्रह्मदृष्टि झाली असतां सर्वदृष्टि व तिच्या योगानें आकाशेंद्रता.

भुशुंडः—त्या इंद्राचा वंशज—त्याच्या त्या कुलांत झालेला कोणी एक देवेश होता. त्याच्यामध्यें उत्तम उत्तम गुण होते. तो अतिशय श्रीमान् होता. त्याचें तें शरीर शेवटचें होतें बृहस्पतीच्या उपदेशवाणीनें तेथें त्या इंद्रकुलोत्पन्न पुत्राला आत्मतत्त्वसाक्षात्काररूप ज्ञानप्राप्ति झाली. त्यामुळें त्याला खरें ज्ञेय तत्त्व कळलें. प्रारब्ध-प्राप्त जें कर्तव्य प्राप्त होईल तें तो निःशंकपणें करूं लागला. तो देवांचा अधीश्वर याप्रमाणें जगाचें राज्य करूं लागला. त्यानें दानवांशीं युद्ध केलें. सर्व शत्रूंना जिंकलें. अज्ञानांतून ज्याचें मन उत्तीर्ण झालें आहे असा तो शंभर अश्वमेध यज्ञ करता झाला. एकदा कांहीं कार्यवशात् तो बराच वेळ कमलनालांतील सूक्ष्म तंतूंत राहिला. तेथें त्यानें दुसरींहि शेकडों राज्य-युद्ध-जय-पराजय इत्यादि वर्तमानें अनुभविलीं. आत्मसाक्षात्काररूप प्रबोधानें प्राप्त झालेल्या बलानें शोभणाऱ्या त्याला एकदा ‘ मी आतां उत्तम ध्यान लावून मायाशबल ब्रह्मस्वभावास पाहतों,’ अशी इच्छा झाली. त्यानंतर एकांतांत उत्तम प्रकारें स्थित असलेल्या त्यानें ध्यानानें पाहिलें. त्यानें त्या वेळीं बाह्य व आंतर अशा दोन्ही प्रकारच्या विक्षेपकारणांचा त्याग केला होता. त्यामुळें त्याची बुद्धि अतिशय शांत झाली. तेव्हां त्यानें सर्वशक्तिपर, सर्व वस्तुमय, विभु ब्रह्म पाहिलें. तें सर्वथा सर्वदा ब्रह्म आहे. सर्व इंद्रियादि शक्तींनीं युक्त आहे. तें सर्वत्र आहे. सर्वग आहे. त्याला सर्व बाजूला हात, पाय वगैरे आहेत. सर्वतः डोळे, मस्तकें व मुखें आहेत. तें श्रोत्रेंद्रिययुक्त आहे. या लोकीं तें सर्वाला व्यापून राहिलें आहे. तें सर्व इंद्रियगुणांनीं रहित आहे, पण सर्व इंद्रियांच्या गुणग्रहणशक्तींनीं युक्त आहे. तें परमार्थतः असक्त पण व्यवहारदृष्टया सर्वभृत आहे. तें भूतांच्या बाहेरहि आहे व आंतहि आहे. तें अचर व चर आहे. सूक्ष्म असल्यामुळें तें अविज्ञेय आहे. तें दूरस्थ आहे व विद्वद्दृष्टया अगदीं समीपहि आहे. तें सर्वत्र चंद्रसूर्यमय, सर्वत्र धरामय, सर्वत्र पर्वतमय, सर्वत्र समुद्रमय, सर्वत्र सार, व गुरु-जड-भारी, सर्वत्र आकाशमय, सर्वत्र संसृतिमय, सर्वत्र जगन्मय, सर्वत्र मोक्षमय, सर्वत्र आद्यचिन्मय, सर्वत्र सर्वार्थमय, सर्वतः सर्ववर्जित असें ब्रह्म त्यानें पाहिलें. घर, पट, वट, भिंत, रथ, वानर, तेज, आकाश, गृह, वृक्ष, पर्वत, वायु, जल, अग्नि, इत्यादि सर्वत्र त्यानें त्रिजगत् पाहिलें सारांश, त्या इंद्रानें परमाणूच्या केवळ एका लहानशा अंशांत नाना शारीरचेष्टा, मानसचेष्टा, स्वर्गनरकादिकांच्या विविध आवृत्ति इत्यादिकांनीं युक्त अशीं त्रिभुवनें पाहिलीं. ज्याप्रमाणें मिऱ्याच्या आंत तीक्ष्णता व आकाशांत शून्यत्व असतें, त्याप्रमाणें आविर्भाव-कालयुक्त व तिरोभावकालयुक्त चिन्मय आत्म्यामध्यें त्रिभुवन असतें. याप्रमाणें जीवभावरहित शुद्ध संविदेनें हें सर्व पहात तो इंद्र त्याच क्रमानें व तसाच ध्यानवान् झाला. तो उदार बुद्धिमान् इंद्र, ध्यानानें सर्व एका शबल-ब्रह्मांत

पाहता झाला. त्या महामतीनें तूं व मी पहात असलेलें हें जगत् पाहिलें. त्यानंतर या सर्गांत पाताल, भूलोक इत्यादि लोकांच्या दर्शनक्रमानें शक्रलोकापर्यंत मनानें संचार करणारा तो तेथील शक्राला पाहतांच 'मी शक्र आहें' ही त्याची भावना उद्बुद्ध झाली व पूर्वी केलेल्या शंभर अश्वमेधांचें फल मिळणें अवश्य असल्यामुळें तो स्वतः इंद्रत्वास प्राप्त झाला शेंकडों वृत्तांतांनीं अत्यंत सुशोभित झालेलें जगाचें राज्य त्यानें केलें. हे विद्याधरकुलाधीशा! या रीतीनें त्या त्रसरेणूंतील इंद्राच्या कुलांत उत्पन्न झालेला तो इंद्र आज या ब्रह्मांडांतही देवराज होऊन राहिला आहे, असें जाण. त्यानंतर 'हा इंद्र मी आहें.' अशी भावना केल्यावर बीजाप्रमाणें हृदयांत संस्काररूपानें असलेल्या प्राचीन मुख्य ज्ञानयोगाभ्यासाच्या योगानें त्याला 'आपण बिसतंतूंत राहिलों आहों व तेथें ध्यानाच्या योगानें हें सर्व पहात आहों' इत्यादि सर्व वृत्तांत आठवला. त्याला आपल्या सर्व पूर्व वृत्तांताचा अनुभव आला. जसा हा त्रसरेणूच्या उदरांत राहणारा इंद्र सांगितला, तसाच हा दुसरा बिसतंतूंत राहणारा त्याचाच वंशज इंद्र आहे. त्याचें नांव कांतिमान असें होतें. असेच आणखी सहस्रावधि इंद्र आकाशांत इकडे तिकडे पसरलेले आहेत. त्यांचेही व्यवहार वरील इंद्राच्या व्यवहारासारखेच होतात. आजवर असले असंख्य इंद्र होऊन गेले आहेत व हल्लीं आहेत. अशा प्रकारची ही अविच्छिन्न नदी दीर्घकाल चालली आहे. पूर्वोक्त योगभूमिकांतील चवथ्या भूमीपासून सहाव्या भूमीच्या अंतापर्यंत तत्पदरूढ किंवा अर्धरूढ होईपर्यंत ती दृश्य नदी अशीच रहावयाची. याप्रमाणें ही प्रत्ययोन्मुखी माया फार दूरवर पसरलेली आहे. ती केवळ सत्य ब्रम्हतत्त्वानें अवलोकन केल्यानेंच विलय पावत असते. तिचा हाच विचित्र स्वभाव आहे. हे निष्पाप विद्याधरा! ही माया कोठून तरी आली आहे, कोठें तरी राहते, कशी तरी झाली आहे, आणि अशी अनिर्वचनीय रूपानें होऊन ही दिसत आहे. मेघापासून जशी वृष्टि होते त्याप्रमाणें अहंभावचमत्कारापासून ही सर्व दृश्यमाया होते; आणि केवल विवेकदृष्टीनें तिच्याकडे पाहिलें असतां धुक्याप्रमाणें ती नाहींशी होते. केवल विवेकानें नाश पावणें, हा तिचा स्वभावच आहे. सर्वसाक्षी ब्रम्हरूप परमार्थतः सर्व विकल्पशून्य आहे. म्हणूनच अहंकारवशात् विस्तार पावलेल्या सर्व मानस व इंद्रियविकल्पांनीं तें रहित आहे. म्ह० जाग्रदवस्थारहित आहे. त्यामुळेंच तें वासनामय सर्व स्वाप्नसर्वार्थशून्य आहे. तसेंच सर्वशून्यतालक्षण सौषुप्त अज्ञानानेंहि रहित आहे. यामुळें तें पूर्ण चिद्रूप आत्मतत्त्व अविशिष्ट राहिलेलें आहे. १४

---

## सर्ग १५ वा.

—:०:—

१ अहंभाव हें जगद्भ्रांतीचें बीज. २ त्याचें रूप, ३ त्याच्या निरसनानें जगाचें निरसन व ४ शुद्ध चिन्मात्रशेषानें कृतार्थता

भुशुंडः—जसें परमाणूच्या आंत असलेल्या इंद्राच्याहि त्रसरेणूंत त्रिभुवन दिसलें, त्याप्रमाणें जेथें अहंत्व तेथें जगत् पूर्वीच येऊन राहतें. आकाशाच्या नीलवर्णाप्रमाणें अकस्मात् होणारा जो हा जगत्संबंधी भ्रम त्याचें अभिमानरूप अहंभाव हेंच आद्य मूळ सांगितलेलें आहे. वासनारसाचा ज्याच्यावर सेक झाला आहे अशा अहंबीजकणापासून हा त्रिजगद्वृक्ष ब्रह्मगिरीवर आकाशारण्यांत होतो.

तारका हाच त्यावरील पुष्पांचा समूह आहे. वनांत मेघरूपी धुक्यानें आच्छादित झालेले पर्वत हेच त्या वृक्षाचे पल्लव आहेत. गंगादि नद्या याच त्या वृक्षाच्या अंगांतील रसांनीं भरलेल्या शिरा आहेत. वासना हेच ज्यांतील बीजांश आहेत, असे भोग हींच त्या वृक्षाचीं फळें आहेत. ( अहंत्व हें मोठें जल व जगत् हे त्यावरील तरंगादिक असें वर्णन—) 'अहंत्व' या पाण्याचा जगत् हा स्पंद, म्ह० विलास सांगितला आहे. वैषयिक सुख हेंच त्यांतील माधुर्य आहे. त्यांतून वासनारस गळत असतो. नक्षत्रें हाच तुषारांचा वर्षाव आहे. आकाशाच्या योगानें तो अनन्त कुक्षिकुहरवान् आहे. संपत्ति व विपत्ति हे त्यांतील मोठाले आवर्त आहेत. नाना प्रकारचे पर्वत हेच त्यावरील तरंग आहेत. त्रैलोक्यांतील जन याच त्यांतील व्यक्त होणाऱ्या रेखा आहेत. अत्यंत चंचल सूर्यचंद्रादि-प्रकाशांनीं तो अहंत्व-जलाचा स्पंद फेनयुक्त आहे. ब्रह्मांडें हेच त्यांतलि बुडबुडे आहेत. एखाद्या मजबूत दाराप्रमाणें मोक्षमार्गाला प्रतिबंध करणारा जो मोह त्यानें तो अतिशय वाढलेला आहे. भूपीठ हाच त्यांतील फेसाचा मोठा गोळा असून चिदाभासयुक्त जीवांनीं तो जलकाकवन् आहे. म्ह० मद्गु या नांवाचे जलकाक त्यावर बसलेले आहेत. त्यांच्या खालीं, वर, तिरकस इ. विचित्र व वेगयुक्त भ्रमणांनीं मज्जनोन्मज्जनात्मक झाला आहे. त्या स्पंदांत जरामरण-मोहादि लाटांचा समुदाय हीच मोठी चमत्कृति आहे. उत्पन्न होऊन नाश पावणारे देहादिक याच जलबिंदुसमूहानें तो सुंदर दिसत असतो. ( आतां दुसऱ्या दोन प्रकारांनीं जगाचें वर्णन ) जगत् हा अहंत्ववायूचा स्पंद आहे असें समजावें किंवा जगत् हें अहंत्वकमलाचें सौगंध्य आहे, असें जाणावें. वायु व स्पंद हे जसे केव्हांहि भिन्न नव्हेत, त्याप्रमाणें अहंत्व व जगत् भिन्न नाहीं. जल व द्रवत्व किंवा अग्नि व त्याचें औष्ण्य यांप्रमाणेंच अहंत्व व जगत् यांचा अभेद आहे. अहंकारांत जगत् आहे व जगाच्या हृदयांत 'अहं' आहे. म्हणूनच अहंत्वाचें परिमार्जन केलें असतां जगाचें परिमार्जन आपोआप होतें. त्या दोघांचा आविर्भाव परस्परांच्या अधीन असून स्थितिहि परस्परसापेक्ष आहे. यास्तव जगाचें बीज जें अहंत्व त्याचें अनहंभावानें जो परिमार्जन करतो तो पाण्यानें चित्र जसें धुवून टाकावें त्याप्रमाणें जगद्रूपी मळ पुसून सोडतो. हे विद्याधरा ! अहंत्व म्हणून कांहीं नाहीं. तें सशाच्या शिंगाप्रमाणें अवस्तु असल्यामुळें निष्कारण उत्पन्न झालें आहे. निरतिशय, व्याप्त, अनन्त, संकल्पोल्लेखशून्य अशा ब्रह्मामध्यें 'अहंत्व' या भावाचें कांहीं कारणच नाहीं. त्यामुळें तें अहंत्व केव्हांहि सन्मय नाहीं. व्यवहारांत संभवनीय कारणहि अवस्तूमध्यें प्रवृत्त होत नाहीं. आणि ह्या सृष्ट्यादिकांचें तर कारण संभवतच नाहीं. त्यामुळें वंध्यापुत्राप्रमाणें अहंत्वादि केव्हांहि नाहीं. अहंत्वाच्या अभावीं जगत् नाहीं. जगाच्या अभावामुळें चित्त्व मात्र अवशिष्ट राहिलें आहे. तें चित्त्व कैवल्यलक्षण आहे. यास्तव तूं शांत व अगदीं सुखानें रहा. याप्रमाणें उपपत्तींनीं सिद्ध झालेल्या जगत् व अहंकार यांच्या अभावामुळें तुझे रूपदर्शनादि बाह्य संसार व आंतील संकल्पात्मक मानस संसार शांत आहेत. त्याहून निराळें हेय दुःख नाहीं. यास्तव तूं आतां अगदीं शांत रहा. जें मुळीं नाहीं तें नाहींच. त्यांतून राहिलेलें जें दुःखविक्षेपरहित अवस्थान तेंच तूं आहेस. तूं आतां अज्ञाननिद्रेपासून अगदीं चांगला जागा झाला आहेस. यास्तव पुनः निर्मूल भ्रांतीला आपल्या मनांत थारा देऊं नकोस. हे विद्या-

धरी ! ज्याचा बाह्याभ्यंतर दृश्यकल्पनालक्षण कलंक निघून गेला आहे व त्यामुळेंच जो शुद्ध झाला आहे असा तूं आत्मा शिव आहेस, शांत आहेस, ईश्वर आहेस व नित्य आहेस. अध्यारोपांत शून्यहि पर्वतासारखें होतें व अपवादांत जगत् किंवा सर्व ब्रह्मांडहि परमाणुरूप—आकाशतुल्यच होतें. १९.

## सर्ग १६ वा.

१ श्रवणानें विद्याधराची समाधि. २ अनहंभावाच्या प्रशंसेनें कथेचा उपसंहार.

भुशुंडः—मी याप्रमाणें सांगत असतां तो विद्याधरनायक शांत झाला. त्याचें दृश्यज्ञान अगदीं शांत झालें. त्याचें चित्त नीरक्षीरन्यायानें चिदेकरस ब्रह्मामध्यें तादात्म्य पावलें. त्याचें चित्त समाधींत परिणाम पावलें. त्यानंतर मीं त्याला पुनः पुनः देहभानावर आणण्याचा जरी प्रयत्न केला, तरी परम शांतीस प्राप्त झालेला तो शब्दादि विषयांमध्यें आसक्त झाला नाहीं. तो मुख्य अधिकारी होता. त्यामुळें माझ्या त्या तेवढ्याशाच उपदेशानें तो प्रबोधवान्—ज्ञानी झाला. हे वसिष्ठा, त्याला श्रवणाची आवृत्ति, मनन, निदिध्यास इत्यादि अधिकाधिक साधनपरंपरेची आवश्यकता नव्हती. असो; हे रामा, त्यासाठींच मीं वर 'पाण्यांत जसा तेलाचा बिंदु पसरतो त्याप्रमाणें चित्त जर शुद्ध झालें, तर त्यांत उपदेश पसरतो' असें म्हटलें. तुझ्या प्रत्यगात्म्यांत अहं—अंश नाहीं, म्हणून तूं त्या असत् अहंकाराची आपल्या मनांत शांतीसाठीं भावना करूं नको. श्रेष्ठ सारसंग्रहभूत उपदेशाची उक्ति ही एवढीच आहे. याहून निराळी नाहीं. ही श्रेष्ठ उपदेशोक्ति असंस्कृत मनांत पडली असतां ती उताण्या तुळतुळीत आरशावर पडलेल्या स्वच्छ व गोल मोत्यांप्रमाणें तत्काल विलीन होते, नाहींशी होते, त्यावर स्थिर रहात नाहीं. पण तीच सुसंस्कृत व शांत मनांत अगदीं ठसून राहते व केव्हांही तेथून च्युत होत नाहीं. ती त्या शुद्ध व शांत चित्तांत प्रवेश करून सर्व मोहारण्याला जाळण्यास समर्थ अशी विचारसंज्ञक अग्निज्वाला उत्पन्न करते. ज्याप्रमाणें सूर्यकांतमण्यांत प्रविष्ट झालेला सूर्याचा किरण अग्नि-शिखा उत्पन्न करतो, त्याप्रमाणेंच ती उक्ति विचारज्वाला उत्पन्न करते. दुःखसंज्ञक संसारवृक्षाचें अहंभावन हेंच फार मोठें बीज आहे. त्याचप्रमाणें 'हें माझें' अशी भावना करणें हें त्या संसारवृक्षाचें मूलादि शरीर आहे. कारण तें रागादि शाखाप्रसरांचें कारण आहे. 'अहं' हें बीजावस्थास्थानीं आहे व 'मम' हें त्याचें कार्य जो वृक्ष त्याच्या स्थानीं आहे. त्यापासून शाखास्थानीं असलेली इच्छा प्रवृत्त होते. ती 'इदं' या नांवाच्या शेंकडों विषयरूप अनर्थांना व संसारमासाला उत्पन्न करणारी आहे. ( इतकें बोलून भुशुंड पुनः मला म्हणाला—) हे मुनिश्रेष्ठा ! अशा प्रकारचे कांहीं मूढहि दीर्घ आयुष्यानें युक्त असतात. दीर्घायुष्याचें कारण तत्त्वज्ञानच आहे. याविषयीं कांहीं विशेष नियम करतां येत नाहीं. ज्यांचें मन आंतल्या आंत दीर्घ काल अभ्यास केल्यानें अत्यंत शुद्ध असतें, त्यांना थोडासा जरी उपदेश केला, तरी ते परमपद-प्राप्तीचें साधन जें ज्ञान त्यास प्राप्त होतात.

श्रीवसिष्ठः—मेरुपर्वताच्या शिखरावर मला असें बोलून तो पक्षिराज मुक्तात्मा भुशुंड मुकाट्यानें बसला. ऋष्यमूकपर्वतावरील मतंगाश्रमांत मतंगमुनीचा शाप होईल या भीतीनें मेघ गर्जना करीत नाहींत, म्हणून मेघ ऋष्यमूकावर जसा मुकाट्यानें बसतो, तसा भुशुंड

गप्प बसला. रामा ! मीहि त्या भुशुंड सिद्धास विचारून विद्याधराकडे गेलों व त्याच्या सांगण्यावरून वरील हकीकतीविषयीं खात्री करून घेऊन मुनिमंडलानें मंडित अशा आपल्या आश्रमास प्राप्त झालों. हे रामा ! बोध करितांच विद्याधराला शांति कशी प्राप्त झाली, याविषयीं भुशुंडानें मला जें सांगितलें होतें, तें मीं तुला कथन केलें. या प्रसंगानें भुशुंड पक्ष्याचा व माझा जो समागम झाला, त्याला आज या कल्पांतील अकरा महायुगें होऊन गेलीं. १६

---

## सर्ग १७ वा.

—:०:—

१ अनहंभाव या अग्नीनें अहंबीजाचा दाह होऊन देहादि संसाराचा उत्तम प्रकारें बाध झाला असतां मिथ्यात्व सांगितलें जातें.

**श्रीवसिष्ठ**:—याप्रमाणें अनहंवेदनामुळेंच शुभाशुभ फळें देणारी संसारवेल—इच्छा खरोखर आंतल्या आंत शांत होते. अनहंवेदनाच्या अभ्यासामुळें मनुष्य मातीचें ढेंकुळ, दगड व सोनें यांना समान मानूं लागतो. त्याची संसारपीडा शांत होते. कारण, कामाचा उपशम झाला कीं, लोभादि दोषांचा क्षय होऊन वैराग्यादि संपत्ति प्राप्त होते. त्यामुळें पुरुषाच्या सर्व मानसदुःखांचा क्षय होतो. श्रावणादिकांच्या योगानें ज्ञाननिर्मंथनाचा अभ्यास केल्यानें अहंतारूप प्रमातृयंत्रपुटांतून अग्नीच्या ज्वालेप्रमाणें प्रकट झालेला जो परमात्मसाक्षात्काररूप बोध त्याच्या बळानें फेकलेला अहंत्वादि दृश्य पदार्थरूप पाषाण गोफणीनें सोडलेल्या धोंड्याप्रमाणें तत्काळ कोठें जातो तें कांहीं कळत नाहीं. वरील अहंतापुटांतून उद्भवलेल्या ब्रह्मज्ञानवीरानें ज्याला जोरानें फेकलें आहे तो अहंकाररूप अज्ञानपाषाण कोठें जातो तें कांहीं कळत नाहीं. अनहंतापुटांतून उठलेल्या ब्रह्मवीराच्या बलानें फेंकला गेलेला हा व्यष्टि-समष्टिशरीरयंत्ररूप पाषाण कोठें जातो तें कांहीं कळत नाहीं. अहंतारूप चिदग्निज्वालेनें अहंतारूप हिम नाहींसें केलें असतां विलीन होणारें तें कोठें जातें कांहीं कळत नाहीं. अनहंतारूप वृत्तींतील चिज्ज्योतीनें शरीररूपी पानावरील अहंरस सुकवून सोडला असतां त्या नीरस पर्णावरून उठून तो कोठें जातो कोण जाणे ! शरीररूपी पर्णावरून सुकवून सोडलेला अहंभावरसामव अनहंतालक्षण सूर्यकिरणाच्या मार्गानें ब्रह्मत्वास प्राप्त होतो. शय्या, चिखल, पर्वत, गृह, आकाश, स्थल, जल इत्यादि स्थानीं असलेली, स्थूल, सूक्ष्म, निराकार किंवा रूपान्तरास प्राप्त झालेली, सुप्त, प्रबुद्ध, भस्मत्वास प्राप्त झालेली, कोणीं धरलेली, कोणीं नेलेली, दूर असलेली किंवा जवळ असलेली, तात्पर्य कोणत्याहि अवस्थेत व कोणत्याहि स्थानीं असलेली ही शरीररूप वटधाना—वडाचें बीज आपल्या स्वरूपांत ‘ अहंत्व ’ या नांवाचा नवीन अंकुर उत्पन्न करते; आणि जिच्यामध्यें अहंत्व-नवांकुर उत्पन्न झाला आहे, अशी ती शरीरवटधाना एका क्षणांत हें संसारसंज्ञक सर्व दिग्व्यापी शाखाजाल पसरविते. अहंत्व या वटबीजाच्या आंत स्थित असलेला देहरूप मोठा वृक्ष संसारशाखासमूहास वाटेल तेथें विस्तार पावावयास लावतो. ज्याप्रमाणें बीजाच्या उदरांत ज्याला शेंकडों शाखा आहेत आणि त्यांवर पानें व फळें विराजमान होत आहेत, अशा प्रकारचा मोठा वृक्ष असतो. कारण तो त्यांत असल्यामुळेंच बीजपुटाला फोडून अंकुरादि क्रमानें बाहेर येत असल्याचें आबालवृद्धांना प्रत्यक्ष दिसतें. त्याप्रमाणेंच अहंत्वरूप जें सूक्ष्मबीज त्यांत सर्व दृश्यांसह देह आहे. विद्वानांनीं

सूक्ष्म-बुद्धिलक्षण दृष्टीनेंच तें पाहिलें आहे. श्रवणादि विचारांच्या योगानें तत्त्वबोध झाल्यामुळें ज्याचें स्वरूप चिदाकाशमात्र झालें आहे अशा जीवन्मुक्ताचें अहंत्व विद्यमान देहाशींहि तादात्म्य पावत नाहीं. ह्मणजे तो ज्ञानी जीवन्मुक्त स्वतःच्या विद्यमान शरीरालाहि ' अहं ' असें म्हणत नाहीं, तर तो विदेहमुक्ताहि निरतिशयानंदांत प्रतिष्ठित होऊन राहतो. त्यामुळें ज्ञानरूप महाअग्नीनें दग्ध झालेल्या अहंत्वबीजाच्या उदरांतून संसारवृक्ष उत्पन्न होत नाहीं. १७

## सर्ग १८ वा.

—:०:—

मृत जीवांच्या मनांतील जगें वायूकडून आकाशांत सर्वतः उडविलीं जातात असें वर्णन.

श्रीवासिष्ठः—मन-बुद्धि-अहंकारादि सर्वनाशात्मक मरण आहे, असें पामर समजतात. पण वस्तुतः तसें नाहीं. तर एका शरीराचें प्रारब्ध क्षीण होऊन त्याविषयींचा संकल्प क्षय पावतो. दुसऱ्या शरीराला कारण होणारें कर्म फलोन्मुख होतें. त्याला अनुरूप असा संकल्पहि उदय पावतो. याप्रमाणें पूर्वभावाचें विस्मरण होऊन प्रारब्धक्षय होईतों उत्तर संकल्पाचें स्थैर्य हेंच मरण होय. प्रत्येक जीवाच्या संकल्पकल्पित जगांतील मेरु-मंदरादि पर्वत दश दिशांमध्यें वायूकडून सर्वत्र उडवून नेले जात आहेत, असें मला दिसतें. तूंहि त्यांना पहा. केळीच्या खांबांतील सोपटांप्रमाणें एकावर एक असे व एकाच्या आंत दुसरा असे हे सर्व संसार आकाशांत परस्पर संश्लिष्ट व असंश्लिष्ट असे होऊन राहिले आहेत. ज्या भोक्त्यांचें प्रारब्ध समान आहे ते एकरूप होऊन मिळालेसे दिसतात, व ज्यांचें प्रारब्ध तसें नाहीं ते भिन्न भिन्न आहेत.

श्रीरामः—हे मुनिश्रेष्ठ ! ' हे पहा माझ्या पुढून वाहून नेले जात आहेत ' या वाक्याचा अखंड अर्थ मला कांहींच कळला नाहीं. तरी तो मला सर्व सांगा.

श्रीवासिष्ठः—प्राणाच्या आंत चित्त व चित्ताच्या आंत विविधाकार जगत बीजांतील वृक्षाप्रमाणें आहे. पुरुष मेला म्हणजे त्याचे प्राणवायु आकाशांतील वायूशीं मिळून जातात. नद्यांच्या पाण्याशीं समुद्राचें पाणी द्रवस्वभाव असल्यामुळें जसें मिळून जातें त्याप्रमाणें शरीरांतून निघालेले वायु बाहेरील पूर्ण वायूशीं मिळतात. कारण समस्वभावांचे पदार्थ एकमेकांशीं मिळाले असतां त्यांची एकताच होते. म्हणून आकाशवायूंनीं ज्यांचें आकर्षण केलें आहे अशा प्राणांच्या आंतील जगेंहि, तीं संकल्प-एकरूप जरी असलीं तरी, जणुं काय इकडे तिकडे वाहून नेलीं जातात. मी आपल्या सभोंवार या सर्व दिशा, ज्यांत स्फुरण पावणारा संकल्प आहे अशा प्राणवायूसहवर्तमान असलेल्या, या वायूंनीं परिपूर्ण आहेत असें पाहतों. माझ्या पुढील या संकल्पजगदंगणांत हे मंदरमेरुप्रभृति पर्वत वाहून नेले जात आहेत, असें मी पाहतों तूंहि बुद्धिदृष्टच्या पहा. ( कारण या महावायूंत प्राण जर आहेत, तर प्राणांत चित्त व चित्तांत प्रत्येक जीवाचें निरनिराळें जगतहि असलेंच पाहिजे असें सांगतात. ) आकाशातील वायूंत मृतांचे प्राण आहेत. त्या प्राणांच्या आंत मन आहे; आणि तिळांत जसें तेल, त्याप्रमाणें त्या मनाच्या आंत जगत् आहे, असें तूं समज. आकाशवायूकडून आकाशतुल्य मनोमय प्राण जसे वाहून नेले जातात, त्याप्रमाणेंच त्यांचीं अंगें अशीं हीं जगेंहि वाहून नेलीं जातात. तीं मनोमय असल्यामुळें अगदीं हलकीं असतात. त्यामुळें वायूला उडवून नेतां येतात. वायु गंधाला जसा वाहून नेतो त्याप्रमाणें

चतुर्विध प्राण्यांसहवर्तमान आकाश, पृथ्वी इत्याकिकांचे समूह अशीं अप्रतिष्ठित त्रिभुवनेंहि वाहून नेतो. हे रघुनंदना! तीं बुद्धीनेंच दिसतात; बाह्य दृष्टीनें दिसत नाहींत. कारण तीं आपल्या स्वप्नांतील नगरांप्रमाणें किंवा स्वप्नांतील नदीच्या पुराप्रमाणें संकल्परूप आहेत तीं आकाशाहूनहि अत्यंत सूक्ष्म असून सर्वत्र सर्वदा आहेत. कल्पनामात्ररूप असलेलीं तीं वस्तुतः थोडींशीं सुद्धां वाहून नेलीं जात नाहींत. पण तीं कल्पनामात्र असल्यामुळें जरी सत्य नाहींत तथापि तींच त्या त्या जीवांच्या भोगाला योग्य अशा स्वर्ग—नरक-भूम्यादि लोकांत त्यांच्या दृढभावत्वामुळें सुख-दुःखादि भोग देण्यास समर्थ असतात. त्यामुळें तीं सत्यच आहेत. कारण त्यांना सत्यता देणारा अधिष्ठान चिदंश सर्वगत असतो. आमच्या दृष्टीनें श्रवण-धारणादि व्यवहारास समर्थ असलेला तूं राम जसा खरा, तशींच तीं जगेंहि खरीं. प्रतिबिंबाप्रमाणें पुढील प्राणनदीच्या वेगांतील तीं वासनामात्र असल्यामुळें अनाविर्भूत व आविर्भूत पुरें वायूकडून वाहून नेली जातात व वाहून नेलीं जातहि नाहींत. राघवा! वायूच्या अंगात स्थित असलेले गंध जसे वाहून नेले जातात, त्याप्रमाणें आकाशमयरूप प्राणस्थित जगें वाहून नेलीं जातात. घटाला दुसऱ्या प्रदेशीं जरी नेलें तरी त्यांतील आकाशांत जसा भेद पडत नाहीं, त्याप्रमाणें चित्तांत त्रिजगद्रूपानें स्पंद व भेद जरी झाला तरी आत्म्यामध्यें कोणत्याहि प्रकारें स्पंद व भेद उद्भवत नाहीं. याप्रमाणें जगद्भ्रांति सत्य नव्हे तर ती तुझ्या चित्तांत खोटीच उत्पन्न झाली आहे. ती केवळ ब्रह्मरूपिणी असल्यामुळें नाश पावत नाहीं व उदयही पावत नाहीं. ( असें जर आहे, तर आम्ही पृथ्वीला निश्चल-रूपानें कसे पाहतों? उत्तर—) वस्तुतः जगत् व त्याची भ्रांति हीं दोन्ही अनुदितच आहेत; परंतु त्यांचा उदय झाला आहे, हा पक्ष जरी घेतला तरी वातांनीं या पृथ्वीला हालविलेलें, उडविलेलें वगैरे तिच्या पाठीवर बसलेल्या आम्हांला कळत नाहीं. ज्याप्रमाणें नौकेची गति तिच्या आंत बसलेल्या लोकांना दिसत नाहीं, त्याप्रमाणें वायूनीं पृथ्वीला हालविलेलें वगैरे आम्हांला दिसत नाहीं. ज्याप्रमाणें नावेच्या शरीरांत स्थित असलेल्या किंवा नावेचे अवयव बनलेल्या काष्ठादिकांना नावेची गति प्रतीत होत नाहीं, त्याप्रमाणें पृथ्वींत असलेल्या व पार्थिव देहादिकांच्या योगानें तन्मय झालेल्या आम्हांला पृथ्वीची गति दिसत नाहीं. जसें एक योजन विस्तीर्ण असलेलेंहि घर लहानशा वृक्षाच्या स्तंभावर चित्रकाराच्या बुद्धीनें राहूं शकतें, त्याप्रमाणें बुद्धि-कल्पनेनें परमाणूच्या आंत सर्व जगत् अनुभवास येतें. ज्याचें चित्त हलकें आहे तो एखाद्या अल्प वस्तूलाहि फार मोठी समजतो. जसें—एखाद्या रत्नकोशगृहांत शिरलेली उंदरी, तेथील रत्नांच्या राशीलाही तुच्छ मानते व तेथें दैवयोगानें दिसलेल्या मूठभर धान्याला फार मोठें समजते, किंवा एखादें अर्भक आपल्या अंगावरील बहुमूल्य दागिन्यांनाही तुच्छ समजून चिखलाच्या बाहुलीला फार मोठी वस्तु समजतें, त्याप्रमाणें परमाणूला फार मोठी वस्तु समजून अज्ञ त्यांत मोठ्या जगाची कल्पना करतो. अज्ञानानें आवृत झालेल्या चितूच्या जगत्संज्ञक खोट्या भ्रमांत केवल जिवंत असलेल्याचाच हा लोक आहे, मेलेल्यांचे दुसरे लोक व तेथें धर्माधर्मांचीं फलें आहेत, इत्यादि कल्पना ही विस्तार पावणाऱ्या चित्ताची संकल्परूप भावना आहे. ज्याच्या मनांत हें त्याज्य आहे व हें ग्राह्य आहे अशी अज्ञता असते, तो सर्वज्ञ जरी

असला, तरी त्याच्या ठिकाणीं व्यवहारासाठीं प्रारब्धक्षय होई तों लेशतः अनुवृत्त होणारी मूढता आहेच. म्हणूनच सर्वज्ञ असलेला जो समष्टि जीव हिरण्यगर्भ तो, देहाला आत्मा मानणारा लौकिक पुरुष जसा आपल्या अवयवांना पाहतो, त्याप्रमाणें आपल्या शरीरांतच त्रिभुवन पसरलेलें पाहतो. हे रामा! केवल ज्ञानरूप, अनन्त, अज, अव्यय असें जें ब्रह्मतत्त्व तेंच मायेमध्यें प्रवेश करून ईश्वर बनतें. त्याचे अवयव हीं सर्व जगें आहेत. लोखंडाचा गोळा जर सचेतन असता, तर त्यानें आपल्या स्वरूपांत सूक्ष्मरूपानें स्थित असलेल्या वस्तरा, सुई, सुरी इत्यादि विकारांना जसें पाहिलें असतें, त्याप्रमाणें ईश्वर प्रलयकाळीं आपल्यामध्यें लीन झालेल्या जीवाच्या संस्कारांत प्रवेश करून त्रिजगद्भ्रम पाहतो. अधिष्ठान-चित्प्राधान्यानें चित् किंवा आरोपित मृत्प्राधान्यानें अचित् असा मातीचा गोळा परळ, मोघा, घट इत्यादि सर्व मृद्विकार मृन्मय जसा पाहतो, त्याप्रमाणें जीव जगाला मानतो. पूर्वोक्त प्रकारेंच चित् किंवा अचित् असलेला अंकुर जसा आपल्यामध्यें वृक्षत्व पाहतो, त्याप्रमाणें वृक्षशब्द व अर्थ यांनीं रहित असलेलें ब्रह्म आपल्यामध्यें जगत् पाहतें. जसा चित् किंवा अचित् आरसा आपल्यामध्यें प्रतिबिंबित झालेल्या नगराला जाणतो किंवा जाणत नाहीं त्याप्रमाणें ब्रह्म जीवेश्वरोपाधींत प्रवेश केल्यानें जगाला जाणतें; अनुपहित दृष्टीनें जाणत नाहीं. तात्पर्य, हें जगत्त्रय देश-काल-क्रिया-द्रव्य-मात्र आहे. त्यामुळें देशकालादिरूप असलेलें अहंत्व व जगत् यांचा भेद नाहीं. हीच गोष्ट त्यांच्या प्रत्ययाला आणून देण्यासाठीं श्रुतीनें व मींहि मृत्तिका, लोखंड इत्यादि दृष्टांत वस्तुतः अचेतन असले तरी त्यांवर चेतनत्वाचा आरोप करून एकदेशसाम्यानें सांगितले आहेत. हें जें कांहीं स्थावरजंगमात्मक जगत् दिसत आहे, तें वास्तव ब्रह्मभावलक्षण परम सूक्ष्मत्व न सोडतांच विवर्तरूप स्थूल जगत् दिसत आहे. तेंच समष्टिजीवाचें शरीर म्हटलें आहे. म्हणूनच अधिष्ठानदृष्टया सर्व विवर्तसंवेदनाचा बाध झाला असतां निष्प्रतिबंध सर्वतः शुद्धात्मप्रसर देणाऱ्या पूर्णपदामध्यें थोडासाहि जीवजगद्भेद उरत नाहीं. मूढ जीवाकडून शुद्ध चित्–मध्यें जो जो विकल्पांश जेथें जेथें जसा जसा जेव्हां जेव्हां व ज्या ज्या निमित्तानें अर्पण केला जातो तशी चित् विवर्त पावते. आकाशांत जसा अंकुर संभवत नाहीं, तसा जड मनांत, तें जड असल्यामुळेंच, संकल्प संभवत नाहीं. अर्थात् मनामध्यें संकल्प करण्याचें जें सामर्थ्य येतें तें चिदाभासाच्या प्रवेशामुळें येतें. त्यामुळें चितिच सर्व विवर्तांचें कारण आहे. अज्ञ चित्तांत जी जी विकल्पश्री उदय पावते, ती चिदाकाशाची आहे. कारण चिदाकाश सर्वव्यापी व अनन्त आहे. त्यामुळें ती सन्मयी नव्हे, असन्मयी आहे. विकल्पश्री अप्रबुद्धांचे ठिकाणीं जरी उदय पावली, तरी ती प्रबुद्ध तत्त्वामध्यें उदय पावलेली नाहींच. चिदाकाश सर्वव्यापी व देश-काल-वस्तुकृत परिच्छेदशून्य असल्यामुळें ती विकल्पश्री सन्मयी नाहीं, असत् आहे. ( ती जर असत् आहे, तर आबालगोपालांच्या अनुभवास कशी येते? उत्तर–) जागृतींत सर्व संकल्पकल्पना आबालवृद्धांस सतत खरीशी वाटते, हें खरें; पण ती वस्तुतः स्वप्नासारखी आहे. स्वप्नादि अवस्थेंत आंत अनुभविलेला अर्थ–गजादि पदार्थ बाहेर केव्हां तरी खरा उपलब्ध होतो काय? नाहीं. १ जाग्रत् व स्वप्न हा संकल्प, २ सुषुप्ति केवळ वासनामात्र व ३ त्या दोन्हींमध्यें प्रतिबिंबित झालेला चिद्रूप–त्या दोन्ही अवस्थांचा भोक्ता जीव, असे हे तीन पदार्थ सत्य कूटस्थ चित्चे

स्वरूपांत चित्राप्रमाणें लिहिलेले आहेत. चित्रांतील संसारासारखा हा संसार अधिष्ठानसत्तेनें सत्य आहे असा जरी भासला, तरी तो असत्य जीवाचा असल्यामुळें असत्यच आहे. अधिष्ठान सत्—चा तो धर्म नव्हे. कारण त्याला त्याचा स्पर्शहि होत नाहीं. ज्याप्रमाणें चित्रांतील प्रतिबिंबरूप व स्वप्नांतील घोडा चित्रांतील, प्रतिबिंबांतील व स्वप्नांतील पुरुषाचेंच वाहन होऊं शकतो, जागृतींतील पुरुषाचें तो वाहन होऊं शकत नाहीं, त्याप्रमाणेंच हें समजावें. पूर्वीं एक ब्रम्हच असून तेंच हें सर्व जगत् झालें आहे, अशी श्रुति आहे. त्यामुळें सत्य आत्म्याचाच स्वाज्ञानामुळें हा संसार आहे असें जरी मानलें, तरी ब्रम्ह नित्यमुक्तच आहे. कसें तें पहा—सत्य ब्रह्म तत्वबोधाच्या पूर्वीं आपली सत्यता जगामध्यें संक्रामित करतें आणि स्वतःच जगाची सत्यता बनतें. तत्वबोधानंतर ब्रह्म बाधित जगापासून आपली सत्ता आपल्यामध्यें उपसंहृत करून घेतें, व त्याच्या असत्यता नांवालाहि पात्र होतें. कारण ज्ञानानंतर प्रपंच केवळ अधिष्ठानरूपानें राहतो. त्यामुळें असत्यताहि अधिष्ठानाहून पृथक् आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण आतिवाहिक म्ह. सूक्ष्मदेहासह एका स्वाज्ञानाचाच परिक्षय जरी झाला तरी पूर्णतालक्षण विकासवान् मुक्त प्रत्यगात्माच शिव होतो. अर्थात् अज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनेंच आकाशांत वायूकडून शिवरीच्या कापसाप्रमाणें अनंत जगें वाहून नेलीं जातात; पण जसे दगड वाहून नेले जात नाहींत, तशीं तीं जगेंहि तत्त्वदृष्टच्या वायूकडून उडविलीं जात नाहींत. कारण तीं कल्पनेहून निराळीं नाहींत. याप्रमाणें या सर्व पदार्थसमूहाच्या कोशांत म्हणजे अतिशय विस्तीर्ण अज्ञात चिदाकाशांत अविद्यादृष्ट्या अनंत जगें आहेत. त्यांतील कांहीं भोक्त्यांच्या अदृष्टानुसार जागरावस्थेंत व एकाच ब्रह्मांडांत एकमेकांशीं मिळतात व कांहीं भोक्त्यांचें अदृष्ट एकसारखें नसल्यास निरनिराळ्या ब्रह्मांडांत व स्वप्नांत एकमेकांशीं मिळत नाहींत. परमचिति जें ब्रह्म त्याला सर्वत्व आहे, सर्वशक्तित्व आहे, त्याच्या इयत्तेचा संकोच करणाऱ्या कारणाचा अभाव आहे. त्यामुळें गुण, क्रिया, वस्तु व जाति यांच्या योगानें अनन्तरूप अशीं, अनेक प्रकारच्या कार्यारंभांनीं प्रचुर अशा दिगंतरीं रहाणाऱ्या जनांनीं भरलेलीं, चंचल मेघांत प्रतिबिंबित झालेल्या नगराप्रमाणें क्षणभंगुर, म्हणून आपल्या चित्तांत स्फुरलेल्या देवगंधर्वादिकांच्या दाट महानगराची ज्यांना उपमा आहे, अशीं तीं सर्व ब्रम्हामध्यें स्फुरण पावणारीं जगें आहेत. त्यांना अधिष्ठानसद्रूपानें स्थैर्य जरी असलें तरी तीं स्वरूपानें क्षणभंगुर आहेत. त्याचप्रममाणें जागरांत त्यांचीं इंद्रियें व्यक्त जरी असलीं तरी तत्त्वतः अव्यक्तच आहेत. आत्मज्योतीनें तीं प्रकाशयुक्त असलीं तरी अज्ञानतमानें आच्छादित झाल्यामुळें अंधकारांत गढलेलीं आहेत. तीं सर्व जगें म्हणजे चिद्रूप सागराच्या लहरींचीं विवर्तनेंच आहेत. नद्यांच्या पात्रांत जल जरी पृथक् स्थित असलें तरी सर्व नद्यांचीं जलें सागरांत अगदीं मिळून जातात. आकाशांत एकाच वेळीं उदय पावलेल्या नक्षत्रांची कांति आकाशांत पसरलेली असते; पण ही या नक्षत्रांची कांति, ही यांची, असें विवेचन करतां येत नसल्यामुळें ती परस्पर मिसळलेली असते. तथापि त्यांतील एक नक्षत्र चालत असतां दुसरें चालत नाहीं, म्हणून तीं सर्व पृथक् स्थित आहेत, असें म्हणावें लागतें. त्याच न्यायानें सर्व जगें एकमेकांशीं मिळालेलीं असलीं तरी पृथक् आहेत व पृथक् स्थित असलीं तरी एकमेकांशीं मिळालेलीं आहेत. १८.

## सर्ग १९ वा.

—:०:—

१ जीवस्वरूप, २ समष्टि-व्यष्टि देहांची कल्पना, ३ स्थान व करण यांच्या भेदानें भोगभेद.

**श्रीराम**:—हे मुने, जीवाचें शास्त्रीय व्यवहारोपयोगी स्वरूप, आकृतिग्रहण, त्याचें परमात्मत्व व त्याचें स्थान—बाह्य व्यवहाराचें द्वार मला सांगा.

**श्रीवसिष्ठ**:—अनंत जें चेतनाकाश ब्रह्म तेंच स्वसंकल्पानें चेत्य झालें आहे. चक्षुरादि इंद्रियांच्या द्वारा तें पदार्थानुभव देतें म्हणून त्याला 'चित्' असें दुसरें नांव आहे. प्राणधारण करणें यामुळें तेंच जीव या नांवानें सांगितलें जातें. तें पराणु नाहीं, स्थूल नाहीं, आकाश नाहीं, किंवा कांहीं नाहीं. तर तें चिन्मात्र, स्वानुभवरूप आहे. सूक्ष्म भूतांत प्रवेश करून त्यांचें धारण केल्यामुळें त्या सर्वव्यापी तत्त्वाला जीव म्हटलें जातें. या सृष्टींत जे अत्यंत सूक्ष्म पदार्थ आहेत त्या सर्वांहून तें अधिक सूक्ष्म आहे; जे अत्यंत स्थूल पदार्थ आहेत त्या सर्वांहून अधिक स्थूल आहे. तें अगदीं निर्विकल्प स्वरूप आहे. ज्ञानी त्या सर्वालाच जीव समजतात. ज्या ज्या पदार्थांचें जें जाति-गुण-आकारादि रूप असतें त्या रूपानें तें तत्त्व त्यांत स्थित आहे, असें समज. त्यामुळें तें त्या त्या आकारानें भासतें. कारण पुनः पुनः पाहिलें असतां त्या त्या आकारानें भासणें हाच त्याचा स्वभाव आहे. एकदा घट पाहिला व पुनः त्याच्याकडे दृष्टि दिली कीं, त्याचा नियमानें 'हा घट' असाच अनुभव येतो. म्हणूनच समष्टि जीव जेथें जसा संकल्प करतो तसाच तेथें होतो. कारण त्याचा संकल्प सत्य असतो. पण व्यष्टि जीव जसा स्वतः असतो तसेंच जगत् पाहतो. म्हणून वायूच्या स्पंदाप्रमाणें सर्व वस्तुवैचित्र्यचेतनात्मक सर्ग समष्टि जीवाच्या स्वानुभवानें सिद्ध आहे. वायूच्या स्पंदाप्रमाणें तो त्याचा स्वभाव आहे. बालकाला जशी यक्षाची भ्रांति होते त्याप्रमाणें उपदेश व अभ्यास यांच्या योगानें तो झालेला नसतो. ही गोष्ट स्वानुभवानेंच कळून येण्यासारखी आहे. स्पंदावांचून असलेला वायु वस्तुतः जरी असला तरी नाहींच; त्याप्रमाणें दृश्याचा अनुभव न घेणारा जीव वस्तुतः जिवंत असतांनाच ब्रह्मभावास प्राप्त होतो. समष्टि जीव चिद्घनरूप असल्यामुळें 'अहं' असा समष्ट्यहंकार धारण करून देश, काल, क्रिया, द्रव्य, शक्ति यांस प्रकट करून राहतो. तीच त्याची सर्वज्ञता—सर्वशक्तिता, इत्यादि संपत्ति आहे. एखादा मनुष्य स्वप्नांत आपलें मरण जसें पाहतो, त्याप्रमाणें तो समष्टि जीव समष्टिचित्ताचा अनुभव घेतो. देश, काल, क्रिया, द्रव्य यांचा संस्काररूपानें थोडासा आविर्भाव झाल्यामुळें तें चित्त किंचित् देशकालादिकांनीं युक्त पण स्थूलरूपानें त्यांचा आविर्भाव न झाल्यामुळें त्यांनीं युक्त नाहीं असें, वस्तुतः असत्य असूनहि सत्यसें भासणारें, व केवळ चिन्मात्ररूप असतें, तें समष्टि-चित्तस्वरूपानें दवाच्या परमाणूसारखें असतें. समष्टि जीवाला त्याच्या स्वरूपांतच अनुभव येतो. एखादा मनुष्य स्वप्नांत स्वतः वाघ झाल्याचें पाहतो. त्यामुळें त्याचे हात पाय वगैरे अवयवहि मनुष्याच्या हातापायांहून निराळे झाले आहेत, असें त्याला वाटतें. त्याचप्रमाणें ब्रह्म स्वतः विष्णु झाल्याचा अनुभव घेऊन पुढें तो अन्यथाभावहि विसरतो आणि चिदेकरस ब्रह्मसत्तेला विसरून परिछिन्न जडसत्ताच मी आहें, अशा भावनेनें त्याची ब्रह्मांडरूप विराडाकृति आविर्भूत होते. सूक्ष्म हिरण्यगर्भाला पंचीकरणाच्या योगानें स्थूलता प्राप्त होते. त्या अवस्थेंत समष्ट्यात्मक मन द्रव-

स्वभाव चंद्रबिंबाप्रमाणें स्वतःला पाहतें. तीच बुद्धिसमष्टिभावरूप विरंचिता—ब्रह्मदेवत्व आहे. त्याला विराड्देहांत भोग मिळावा म्हणून मनःसमष्टीपासूनच आदित्यादिरूप इंद्रियपंचक उत्पन्न होतें. तें काकतालीय-न्यायानें आपोआप उत्पन्न होऊन अनुभवास येतें. त्या पांच ज्ञानांचीं पांच निरनिराळीं अंगें त्याला प्रतीत होतात. याप्रमाणें तो विराट् पुरुष पांच अवयवांनीं युक्त होत्साता अतिशय शोभतो. आदित्य, दिशा, जल, वायु, व पृथ्वी या नांवाच्या पांच इंद्रियस्थानभूत अवयवांनीं पांच विषयांचा अनुभव घेणारा तो मनोविकल्पांनीं अनंत आकारांची कल्पना करून अनंत आकारवान् होतो. पण हा त्याचा कार्याकार खोटा असल्यामुळें कारणरूपानें तो अव्यक्तात्मा आहे. त्यामुळें निरामय—सर्व उपद्रवरहित आहे. पण तो असा मनोमय जरी असला, तरी स्वतःसिद्ध ज्ञानैश्वर्यशक्ति-संपन्न असल्यामुळें त्याला जीवत्वाहि आहे व ईश्वरत्वाहि आहे. तो परमात्म्यापासून प्रथम उदय पावलेला आहे. तो आकाशासारखा स्वच्छ आहे, शांत आहे, नित्यानंद-प्रकाशमय आहे. तो सर्व पुरुषसमष्टिरूप एक पुरुष आहे. तो परम परमेश्वर आहे. तो स्वतःच वाटेल तेव्हां व्यक्त होतो, वाटेल तेव्हां अव्यक्त होतो. स्वतःच प्रसर पावतो व स्वतःच संकोच पावतो. तो स्वतःच्या सत्य संकल्पानें एका क्षणांत कल्पाचे ओघ निर्माण करतो. यदृच्छेनें पुनः उदय पावतो, व पुनः होऊन शांत होतो. मनोमात्रत्व हेंच त्याचें एक रूप आहे. सर्वोपादान ईश्वराचा तो हा देह आहे. हाच व्यष्टिभावानें सर्व जीवांचें पुर्यष्टक म्हटलेला आहे. तोच पिपीलिकादि सर्व सूक्ष्म देहांतील सूक्ष्म देह आहे. तसाच तो आकाशात्मा सर्व स्थूल पदार्थांचा स्थूल आकार आहे. तो व्यक्त आहे, अव्यक्त आहे, अंतरहित आहे. कार्याच्या आंत आहे, बाहेर आहे, परमार्थतः तो कांहीं नाहीं. व्यवहारदृष्ट्या तो परिच्छिन्नच आहे. हे रामा! पांच ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियांसह प्राण, मन व अहंकार हीं आठ त्याचीं मूर्तामूर्तरसरूप अंगें आहेत. त्यानेंच चतुर्मुख होऊन हे चार वेद गाइले. शब्द व अर्थ यांची कल्पना केली. शास्त्रीय सदाचारादि मर्यादा स्थापिली; व ती अद्यापि तशीच स्थित आहे. वरील द्युलोक हा याचा मूर्धा, खालील पृथ्वी हे त्याच्या पायांचे तळवे, अपराकाश—अंतराळ प्रदेश हें त्याचें उदर, ब्रह्मांडमंडप हें शरीर, अनन्त लोकान्तरें हेंच पार्श्वादि अवयव, जल हेंच त्याच्या शरीरांतील रक्त, पर्वत ह्याच मांसपेशी, नद्या ह्याच सतत वाहणाऱ्या नाड्या, समुद्र हेच रक्ताचे आधारभूत पिंड, द्वीपें हींच आंतडीं, दिशा हे विस्तीर्ण बाहु, नक्षत्रें हींच रोमपंक्ति, एकुणपन्नास वायु हेच त्यांतील प्राणवायु, सूर्यमंडल हाच[1] त्याचा क्रूर चक्षु आहे. वडवाग्नि हेंच पित्त—जठराग्नि आहे. चंद्रमंडल जीव, श्लेष्मा, शुक्र, वपाभाग, बलव संकल्पकोशरूप मन आहे. परमामृत ब्रह्मच सारात्मा आहे. इंद्ररूप मनच शरीरवृक्षाचें व कर्मवृक्षाचें बीज आहे. तें उत्पन्न होणाऱ्या सर्व पदार्थांचेंहि अन्नादिभावानें पोषण करणारें असल्यामुळें आनंदकारण आहे. जें इंदुमंडल तोच विराट्शरीरांतील जीव म्हणून म्हटलेला आहे. कारण, अन्नात्मक अशा त्याच्याकडून समष्टिप्राणाचें धारण केलें जातें. त्याचप्रमाणें अन्नमय या नांवाच्या व्यष्टि—शरीराचें तो बीज आहे. प्राणामुळें होणारीं जी सर्व कर्मे त्यांचें मूळ व व्यष्टिमनाचें कारण आहे. कारण या इंदुरूप विराट्-जीवापासून त्रिभुवनांत

१ बरगड्या वगैरे.

जीव, मनें, कर्में, विषयभोग व मोक्ष पसरतात. ब्रह्मा, विष्णु व हर इत्यादि हे या विराडात्म्याचे संकल्प आहेत. सुर, असुर व आकाशचर पक्षी, हे त्याच्या चित्ताचे चमत्कार आहेत. अतिसूक्ष्म अमृतकलारूपत्वास साक्षित्वानें चंद्रामध्यें जाणणारा हा चित्स्वभाव प्रजापति जेव्हां सृष्टीच्या आरंभीं देवतादि शरीराकारांचा संकल्प करतो तेव्हां तसल्या चतुर्मुखादि शरीरभावांतच स्वतः सिद्धवत् राहतो, म्हणजे तो संकल्पाप्रमाणें आकार धारण करतो. कारण तो सत्यसंकल्प असतो. यास्तव हे रघुनंदना! हें चंद्रमण्डलच सर्व जीवसमष्टि विराट् जीवाचें शरीर आहे. असें समज. त्या शरीराचे अपंचीकृत पंचभूतें हेच अवयव आहेत, याचाच जाग्रत् या रूपानें सर्वांना अनुभव येतो. विराट् जीव जो चंद्रमा त्याच्यापासून प्राण्यांच्या जीवनांचीं साधनें अशीं सर्व प्रकारचीं अन्नें, चंद्रकलांचा ओषधींतून प्रसार होणें या रूपानें प्रसार पावतात. तींच प्राण्यांच्या शरीरींतील जीवोपाधिभूत असून जीवांमध्यें स्वतः जिवंत राहतात. तींच मन होऊन सर्व चेष्टा करितात. तींच जन्म व कर्म यांचें कारण आहेत. याप्रमाणें असंख्य विराट् शरीरें, असंख्य महाकल्प आजवर होऊन गेले आहेत. विविध आचारांनीं युक्त अशीं असंख्य विराट् शरीरें व महाकल्प पुढें होतील व सांप्रतकालींहि आहेत. उत्तम पद जें ब्रह्म त्याहून अभिन्न—तद्रूप म्हणूनच अंतरहित, असा जिचा महान् व्यष्टिसमष्टिदेहसंबंध आहे, तशा प्रकारच्या अधिष्ठानसत्तेनेंच तिचा विवर्त—अन्यथा परिणाम असा हा विराटपुरुष वर वर्णन केल्याप्रमाणें सर्व देशकालांत या मायावृत ब्रह्मांत राहतो. १९.

---

## सर्ग २० वा.

१ वासना कर्म काम यांच्या अनुरूप संकल्प करणें या बाबतींत व्यष्टि जीवांचें समष्टीशीं साम्य आहे.

श्रीवासिष्ठः—हा पंचभूतात्मा विराट् पुरुष जें जें जसें जसें व्हावें म्हणून संकल्प करतो तें तें तसेंच होतें. स्वतः ब्रह्माकाशहि त्याच्या संकल्पाप्रमाणें बनतें. हे रामा! सर्व जगज्जात हा त्याचा संकल्प आहे, असें ज्ञानी समजतात. सृष्टीच्या आरंभीं ब्रह्म पूर्वकल्पांत केलेल्या उपासनेचे संस्कार ज्यांत आहेत अशा वासनेमुळें पंचभूतात्मक विराड्रूप होऊन उपासनेचें फल असे जे पंचमहाभूतात्मक विषयसमष्टिभोग त्यांस उन्मुख झालें, ते विषयोपभोग भोगण्यास तयार झालें. या सृष्टींत जितके पदार्थ आहेत, त्या सर्वांचें विराट् हें कारण आहे. कारणांचा जो स्वभाव असतो त्याच स्वभावाचीं कार्यें होतात, असा नियम असल्यामुळें जसा हा विराट् आहे तसा प्रत्येक व्यष्टि जीवहि स्वरूपामध्यें सर्व सर्ग निर्माण करण्यास समर्थ आहे. कारण मनोवृत्तीच्या अनुसार स्वसंविद् बाह्य व आंतर विषयाकारानें प्रसार पावूं लागली असतां विराडाप्रमाणें हा व्यष्टि जीवहि त्या त्या विषयाला जाणणाराच असतो. त्याला न जाणणारा केव्हांहि नसतो. असें त्या दोघांचें साम्य आहे. भूमीवर सरपटणाऱ्या जंतूपासून रुद्रापर्यंत हा असा भ्रम उदय पावला आहे. कारण, बीजाच्या कोशांत जसा वृक्ष तसा अणूमध्येंहि मोठ्या पर्वताचा विस्तार आहे. म्हणून हा भ्रम होय. सरपटणाऱ्या प्राण्यापासून महारुद्रापर्यंत प्रत्येक आत्म्यांत स्रष्टा आहे. अत्यंत अणूमध्येंहि तो बोधरूपानें अनन्तात्मा आहे. अबोधरूपानें नव्हे. विराडात्म्यामध्यें

जशा प्रकारचा हा विस्तार आलेला आहे. तशाच प्रकारचा तो मशक, ऊ, इत्यादि सर्व अणुमात्र भूतांतहि आहे. वस्तुतः कोठें कांहीं स्थूल नाहीं व कांहीं सूक्ष्म नाहीं. तर जेथें जें जसें भ्रांतीनें विस्तार पावलेलें असतें, तसाच तत्काल त्याचा अनुभव येतो. मनापासून चंद्र झाला व चंद्रापासून मन झालें. किंवा समष्टि जीवापासून हा व्यष्टि जीव झाला आहे. अथवा व्यष्टि व समष्टि यांची जल व द्रव याप्रमाणें एकच सत्ता आहे. त्यामुळें त्यांत भेद नाहीं. तेव्हां कारणता तरी कोठची? देहाच्या एका बारिक कणासारखें शुक्र हीच जीवाची पहिली उपाधि आहे. त्या शुक्रसंज्ञक उपाधीनें युक्त असलेल्या जीवापासूनच आई बापांच्या मैथुनसमयीं अचल पूर्णानन्द ब्रम्हाचा भोगाकारवृत्तींत प्रतिबिंबरूपानें आनंद प्रवृत्त होतो. ब्रम्हाच्या त्या आत्मस्थ आभासलक्षण आनंदाचा रेतोवच्छिन्न जीवचित् रेतोभूत स्वभावानेंच अनुभव घेते. ती रेतोरूपच मी प्रियतम आनंद आहे, अशी तन्मयता धारण करते. त्यामुळें चित् चिन्मयरूपिणी आहे. त्यानंतर ही जीवसंविद् तदन्तर्गत पंचतेस म्ह० देहरूप पंचत्वास तादात्म्यानेंच प्राप्त होते. हा तिचा त्यांतील प्रवेश होय. त्याची निराळी कारणता नाहीं व कार्यताहि नाहीं. या उपहित रूपांत स्वभावोक्ति अर्थवती होत नाहीं. म्हणजे असें होणें हा स्वभावच आहे, असें म्हणणेंहि उपपन्न होत नाहीं. कारण 'स्व' व 'स्वभाव' यांचा परस्पर प्रतियोगी व्यवच्छेद होऊं शकत नाहीं. कारण स्व म्हणजे शुद्ध चित् असा अर्थ समजल्यास, शुद्ध चित् अद्वय असल्यामुळें, त्याचा प्रतियोगी—विरोधी किंवा त्याचा व्यवच्छेद निराळा नाहीं. जीव स्वतःच्या जीवत्वामुळेंच 'जीवत्व' या निर्देशास पात्र होतो. तो स्वतःच अन्तस्त्वानें व बहिष्ट्वानें दिसतो. याविषयीं वायूचा योग्य दृष्टांत आहे. जसें 'वायु वाहतो' येथें वायु क्रियात्माच असतांना विकल्पबुद्धीनें 'वायु' हें द्रव्य व 'वाहणें' ही त्याची क्रिया असा भेद कल्पून व्यवहार करितात, त्याप्रमाणें 'जीव' व त्याचें 'जीवत्व' असा भेद कल्पून धर्म-धर्मिभावानें व्यवहार होतो. (अहो, पण जीवरूप जर जन्य नाहीं व स्वभावभूत नित्यहि नाहीं, तर मग संसारांत पडलेलें जीवरूप हें काय आहे? उत्तर-) अनिर्वचनीय अज्ञानानें आच्छादित झालेलें ब्रम्हच जीव आहे व स्वरूपालाच अन्यथा पाहणें, हा त्याचा संसार आहे. अर्थात् जात्यंधाला जसा मार्ग दिसत नाहीं त्याप्रमाणें विषयवस्तुपरायण झालेला व प्राणेंद्रियादि जड वर्गाशीं तादात्म्य पावलेला आत्मा स्वरूपाला पहात नाहीं. जगदाकारानें विकास पावणाऱ्या अविद्याशक्तीनें परिवेष्टित झालेला व त्यामुळेंच स्वतःच्या ऐक्याला द्रष्टा व दृश्य अशा रीतीनें द्वित्व पाहणारा तो त्या द्वैतावर अभिनिवेश ठेवतो आणि स्पंदशक्तीनें वायु जसा आच्छादित होतो त्याप्रमाणें अविद्याशक्तीनें आवृत झालेला तो स्वरूपाला पहात नाहीं. वास्तव मिथ्या, वेद्यरूप, असत्, अहंरूप अज्ञानसंज्ञक महाग्रंथीला विद्येनें शिथिल करणें, अविद्यामहाग्रंथि सोडणें हाच मोक्ष म्हटलेला आहे. यास्तव हे रामा! तूं ज्याच्यापासून अज्ञानमेघ निघून गेला आहे तशा प्रकारचा चेतन चित्प्रकाशमात्र

१ अन्य प्राणी याच आनंदाच्या लेशावर आनंदी होतात अशा अर्थाची 'एतस्यैवानन्दस्यान्यानि भूतानि मात्रामुपजीवन्ति' अशी तैत्तिरीय श्रुति आहे.

२ 'आनन्दाद्ध्येव इमानि भूतानि जायन्ते' आनंदापासूनच हीं भूतें उत्पन्न होतात, अशा अर्थाची दुसरी तैत्तिरीय श्रुति आहे. (तै. भा. ३, ६ पृ. १८२).

होऊन ' अहं ' अशा अहंकारोपाधिपरिच्छेदाला न जाणणारा असा म्हणने शोधित त्वंपदार्थ होत्साता मूर्त, अमूर्त व त्याचें मूळ अज्ञान यांचा ज्यांत बाध झाला आहे असा नामरहित आनंदैकरसघन चेतन म्हणजे शोधित-तत्पदार्थ हो. अर्थात् तूं तद्रूप होऊन पूर्ण रहा. २०

## सर्ग २१ वा.

—:०:—

१ ज्ञानबंधुत्व शुभ व अशुभ असें दोन प्रकारचें आहे. २ त्यांतील शुभ ज्ञानबंधुत्व ग्राह्य, व अशुभ ज्ञानबंधुत्व त्याज्य.

**श्रीवसिष्ठ:**—रामा, सदा ज्ञानीच व्हावें. ज्ञानबंधु केव्हांहि होऊं नये. अज्ञानी मनुष्य फार चांगला, पण ज्ञानबंधु मुळींच बरा नाहीं.

**श्रीराम:**—ज्ञानी कोणाला ह्मणतात, व ज्ञानबंधु कोणाला म्हणतात ? ज्ञान्याला कोणतें फल मिळतें, व ज्ञानबंधूला कोणतें फल मिळतें ?

**श्रीवसिष्ठ:**—एखाद्या शिल्पी मनुष्याप्रमाणें जो भोगासाठीं शास्त्राचें पठण व व्याख्यान करितो, पण त्याप्रमाणें वागण्याचा मुळींच प्रयत्न करींत नाहीं, तो ज्ञानबंधु होय. ज्याला शास्त्राभ्यासामुळें शब्दांचा अर्थ कळतो, पण या सर्व दृश्य पदार्थांशीं व्यवहार करीत असतांना वैराग्य, शांति, इत्यादि रूपांनीं तो बोध परिणत झालेला दिसत नाहीं, तो ज्ञानबंधु होय. कारण तो मूढ शास्त्ररूपी शिल्पावर उपजीविका करतो. शास्त्रार्थाचा एखाद्या कलेप्रमाणें उपयोग करणारे जे अन्न-वस्त्र मिळाल्यानेंच संतुष्ट होतात, व हेंच शास्त्राचें फल आहे असें समजतात, त्यांना ज्ञानबंधु जाणावें. शास्त्रानें सांगितलेल्या उचित प्रवृत्तिरूप धर्मामध्यें जो प्रवृत्त होतो, म्हणजे जो शास्त्रविहित सत्कर्मांचें अनुष्ठान करतो, त्याला चित्तशुद्धिद्वारा ज्ञान अवश्य प्राप्त होतें, त्याचें निवारण केव्हांहि करतां येत नाहीं. म्हणून तोसुद्धां एकप्रकारचा ज्ञानबंधुच होय. पण हें ज्ञानबंधुत्व शुभ आहे. वरच्यासारखें अशुभ नाहीं. पंडित आत्मज्ञानालाच ज्ञान ह्मणतात, दुसरीं जीं भौतिक ज्ञानें आहेत, तीं केवळ ज्ञानाभासरूप आहेत. कारण, त्यांपासून ब्रह्मानंदाचा लाभ होत नाहीं. जे आत्मज्ञान संपादन न करतां इतर ज्ञानाच्या लेशानें संतुष्ट होतात, त्यांचें जीवित, व त्यांचा व्यवहार अतिशय कष्टकर होतो. म्हणून तेहि अशुभ ज्ञानबंधुच होत. रामा, यास्तव योगाच्या सातव्या भूमिकेमध्यें चित्ताचें स्थैर्य होईपर्यंत मुमुक्षूनें केव्हांहि संतुष्ट होऊं नये. तर, क्रमानें यत्न करीत, उत्तरोत्तर भूमिकांचा विजय करावा. रामा, तूं ज्ञानबंधु होऊन, भोगरूप संसाररोगामध्यें खितपत पडूं नकोस. या लोकीं मुमुक्षूनें उचित् आहारासाठीं वर्णाश्रमविहित कर्म करावें. प्राणांचें रक्षण करण्यासाठींच आहार करावा. प्राण तत्त्वजिज्ञासेसाठींच धारण करावे व तत्त्वालाच जाणण्याची इच्छा करावी; म्हणजे पुन: दु:ख होत नाहीं. २१

## सर्ग २२ वा.

—:०:—

१ ज्ञानी पुरुषाचीं लक्षणें उपपत्तीसह सांगतात. २ तसेंच प्रसंगत: जीव, जगत् व ब्रह्म यांचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ:**—जो मनुष्य योगभूमिकांवर क्रमानें आरूढ झाल्यामुळें परिपक्व झालेल्या ज्ञानानें केवळ ज्ञेयब्रह्मामध्यें अत्यंत स्थिर होतो, व नंतर जो आपल्या प्रारब्धकर्मांचें फल जरी भोगीत असला तरी शब्दादि सर्व विषय व काम-संकल्पादि वृत्तींनीं परिणत झालेलें चित्त हीं दोन्ही चित्तरूपच आहेत, आणि तें चित्त परमार्थ सत् वस्तु नाहीं असें

समजतो, तो ज्ञानी होय. असें ज्ञान्याचें लक्षण जाणणारे पंडित सांगतात. त्याचप्रमाणें प्रत्येक विषयज्ञानाच्या साक्षी चित्स्वरूप आत्म्याला तत्त्वतः जाणून सर्ववासनाशून्य वृत्तीनें अवशिष्ट राहिलेल्या सृष्टीला जो पाहतो, तो ज्ञानी होय. ज्याच्या सर्व इच्छा शांत झालेल्या असतात. व्यवहारामध्यें ज्याच्या चित्तशांतीचा पूर्णपणें अनुभव येतो, जो स्वभावतःच केवल आत्मलाभानेंच नित्यतृप्त झालेला असतो, त्याला ज्ञानी म्हणतात. जो बोध मोक्षाला कारण होतो त्याला ज्ञान हें नांव आहे. बाकीचीं ज्ञानें केवळ अन्न व वस्त्र देणारीं असल्यामुळें तीं केवल उपजीविका आहे. ह्मणजे शब्दार्थज्ञान एखाद्या कलेप्रमाणें उपजीविकेचें साधन होतें; तें खरें ज्ञान नव्हे. प्रारब्धप्राप्त कर्तव्यामध्यें जो पुरुष काम व संकल्प सोडून शांतचित्तानें रहातो तो पंडित होय. कारणावांचूनच हे सर्व पदार्थ उत्पन्न होतात. ते परमात्म्यापासून उत्पन्न होतात असें जरी उपनिषदांतून म्हटलें आहे, तरी असंग व उदासीन असलेला परमात्मा वस्तुतः त्यांचें कारण होऊं शकत नाहीं. खरोखर अविद्यमान असलेले हे पदार्थ विद्यमान असल्याप्रमाणें भासतात. हें जगत् आविर्भाव व तिरोभाव यांच्या योगानें उत्पन्न होतें व नाश पावतें असें भासतें. बीजापासून जसा अंकुर प्रगट होतो, व तो अंकुर पुनः बीजामध्यें शक्तिरूपानें लीन होतो, तसें हें जगत् आपल्या बीजापासून प्रगट होतें, व पुनः तें बीजामध्यें लीन होतें. ह्मणजे कारणाच्या व्यापारानें कार्याला त्याचें स्वरूप प्राप्त होतें, व तें कार्य पुनः आपल्या कार्याचें कारण बनतें. जगाच्या आरंभापासून अंतापर्यंत ही कार्यकारणपरंपरा अशीच चालली आहे. फार काय, पण एक सृष्टि तिच्या प्रलयाचें कारण बनते व प्रलय पुढील सृष्टीचें कारण होतो. ह्मणजे कार्यकारणभाव नियत नाहीं. तेव्हां सृष्टि कारणापासून झाली आहे असें कसें म्हणतां येईल? सृष्टि साक्षात् दिसते म्हणून ती आहे असें म्हणावें, तर मृगजळ देखील साक्षात् दिसतें. सृष्टि या शब्दावरून अर्थबोध होतो म्हणावें, तर 'सशाचें शिंग' यावरूनहि अर्थबोध होतो. पण तेवढ्यावरूनच मृगजळ व सशाचें शिंग हीं विद्यमान आहेत, असें म्हणतां येत नाहीं; त्याचप्रमाणें जगत् हें विद्यमान आहे, असें म्हणतां येत नाहीं. कारण प्रमाणपूर्वक निरूपण करूं लागलें असतां मृगजळ व सशाचें शिंग हे दोन्हीं आभास ठरतात, तसेंच आत्मदृष्टीच्या जगाकडे पाहिलें ह्मणजे तेंहि आभासरूप बनतें. अर्थात् जे मिथ्या शशशृंगादिकांचें कारण हुडकूं लागतात, ते वंध्यापुत्राच्या नातवाच्या खांद्यावर बसतात. मिथ्या पदार्थांचें जर कांहीं कारण असेल, तर तें फक्त त्याविषयींचें अज्ञान हेंच होय. कारण त्यांच्या अधिष्ठानाचें ज्ञान होतांच, तत्काल त्या आभासाचा क्षय होतो. जीव देहादि अचेतन पदार्थांना मी असें म्हणूं लागला कीं तो बद्ध होतो, व शरीरादिकांहून अगदीं निराळा साक्षी आत्मा मी आहें, असें त्यानें ओळखलें, कीं तो स्वतः आत्मा होतो. हेमंतऋतूंत अगदीं निजल्याप्रमाणें असलेला आम्रवृक्ष वसंतऋतूंत पालवी फुटून मोहोर आला असतां, तो जसा आतां जागाच झाला आहे, असें वाटतें, त्याप्रमाणें हा जीव देहादिकांना 'मी' असें मानून अज्ञानदशेंत निजल्याप्रमाणेंच असतो. आणि 'मी चेतन आत्मा आहें असें कळलें कीं तोच परमानंदानें युक्त झाल्यामुळें जणुंकाय जागाच झाला आहे असें वाटतें. तो मी चेतन आहें, असें मानून चेतनरूप होतो. पण तसें समजेपर्यंत अनेक जन्मांमध्यें, अनेक प्रकारच्या सुखदुःखांचा अनुभव घेऊन तो जर्जर

होतो. ज्यांना ही परम दृष्टि प्राप्त झालेली असते, ते कोणत्याहि प्रकारच्या विषयज्ञानाचा अभिमान धारण करीत नाहींत, तर जल स्वभावत:च सखल प्रदेशाकडे जसें वाहतें, त्याप्रमाणें ज्ञानी केवल प्रारब्धाचें अनुवर्तन करितो. जे ज्ञानी या परमदृष्टीला प्राप्त झालेले असतात ते या दृश्यश्रीच्या पलीकडे असलेल्या परमतत्त्वाला पहातात. त्यामुळें ते जगांत प्राप्त व्यवहार जरी करीत असले, तरी जगाला पहातच नाहींत, तर त्याचें कारण जें ब्रह्म त्यालाच पाहतात. पाणी जेव्हां वेगानें वहात असतें त्या वेळीं व तें जेव्हां संथ असतें त्या वेळींहि तें आपलें जलत्व जसें सोडीत नाहीं, त्याप्रमाणें परमदृष्टीला प्राप्त झालेले ज्ञानी जगाचें भान व अभान हीं दोन्हीं ब्रह्मरूप पहातात. म्हणजे त्या दोन्ही अवस्थांत जगाचें ब्रह्मत्व नष्ट होत नाहीं. ज्ञानी विषयांचें चिंतन करीत नाहींत. त्यामुळें ते दाव्यापासून सुटलेल्या बैलाप्रमाणें स्वतंत्र असतात. अर्थात् त्यांच्याहि शरीरेंद्रियांची हालचाल जी दिसते, ती वाऱ्यामुळें हलणाऱ्या झाडाच्या पानाप्रमाणेंच होय. संसाराच्या परतीराला, म्हणजे परब्रम्हाला पहाणारे ज्ञानी, नदीच्या कांठीं राहणारे लोक विहिरीची जशी प्रशंसा करीत नाहींत, तसे कर्माची प्रशंसा करीत नाहींत. ज्यांच्या कर्मवासना दृढ झालेल्या असतात, तेच मूढ कर्माची प्रशंसा करितात आणि ज्ञानाच्या अभावीं ते श्रुतिस्मृतींनीं सांगितलेलें कर्म: करितात, व त्यामुळेंच त्याचें फलहि भोगतात. गिधाड भूमीवर पडलेल्या आमिषावर जशी झांप घालतो, तशीं इंद्रियें विषयांमध्यें आसक्त होतात. म्हणून त्यांचें मनानें संयमन करून, व चित्ताला स्थिर करून आत्मपरायण होऊन रहावें. सोनें जसें कोणत्याहि आकारावाचून रहात नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्म स्थूल किंवा सूक्ष्म सृष्टीवाचून रहात नाहीं. पण ज्याची बुद्धि सुसंकृत झालेली असते, त्याला ती सृष्टिहि ब्रम्हरूपच भासते. कल्पाचा क्षण होऊन सर्वत्र अंधकार पसरला असतां ज्याप्रमाणें व्यवहाराचा कोणताहि विभाग भासत नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्मरूप झालेल्या ज्ञानी पुरुषालाहि सर्वत्र एक ब्रह्म दिसतें; प्रपंच दिसत नाहीं. पळणाऱ्या ढगांमध्यें ज्याप्रमाणें त्यांचे अवयव स्थिरच असतात, तथापि त्या ढगांबरोबर तेहि त्यांच्या पूर्वींच्या स्थानापासून दूर होतात, त्याप्रमाणें चित्सत्ता भूतांमध्यें एका दृष्टीनें स्पंद पावते व एका दृष्टीनें स्थिर असते. जलामध्यें जलाचे अंश द्वैतमय व अद्वैतमयहि असतात, त्याप्रमाणें चिदात्मा भूतांमध्यें द्वैतमय व अद्वैतमय असतो. ज्याप्रमाणें आकाशांत आकाशाचे अंश द्वैत व अद्वैतमय असतात, त्याप्रमाणें निरवयव शिवामध्यें ही सृष्टि अनन्य भासते. जगामध्यें अहंरूप असतें व अहंरूपांत जगत् असतें. ह्मणजे जगत् व अहं हीं केळीच्या सोपटांप्रमाणें एकमेकांला आच्छादित करून रहातात. जीव आपल्यामध्येंच असलेलें जगत् संकल्पानें बाहेर असल्यासारखें पहातो. जीव कांहीं कारणावांचूनच आपल्याला जगद्रूपानें पाहतो. ह्मणजे ज्याप्रमाणें आकारांकडे दृष्टि दिल्यास सोनेंच निरनिराळ्या अलंकारांच्या रूपानें भासतें, पण तेंच सुवर्ण या दृष्टीनें पाहिल्यास सर्व अलंकार एकरूप दिसतात, त्याप्रमाणें ज्ञानी जीव जगाला ब्रम्हरूपानें पाहूं लागला कीं, त्याला सर्व जगत् एकरूप दिसतें. आत्मवेत्ते पुण्यवान् जीव जिवंत असले, तरी वस्तुत: जिवंत नाहींत, मृत्यु पावले तरी खरोखर मरत नाहींत, व विद्यमान असले तरी जणूं काय नसतात. जसा एखादा गृहस्थ घरांत बसलेला असूनहि गोठ्यांतलि दुधाच्या भांड्याकडे त्याचें मन गेलेलें असल्यास घरांतील बाकीच्या गोष्टी

त्याला कळत नाहींत, त्याप्रमाणें ज्ञानी शरीरानें सर्व कर्मे करीत असूनहि मन आत्म्यामध्यें आसक्त झाल्यामुळें कर्मांना पहात नाहीं. ज्याप्रमाणें ब्रह्मांड्-हृदयामध्यें विराट् जीव हा चंद्र स्थित असतो, त्याप्रमाणें प्रत्येक जीवाच्या देहांत हृदयामध्यें बर्फाच्या सूक्ष्म कणाप्रमाणें जीव बीजरूपानें राहातो. बर्फाच्या कणांसारखा ज्याचा आकार आहे, असा जीव स्थूल शरीरांत स्थूल होतो, व सूक्ष्म शरीरांत सूक्ष्म होतो. 'अहं' हें त्याचें स्वरूप आहे. तोच पितृशरीरांतील सूक्ष्म जीव मातृ-शरीरांत प्रवेश करून तदाकार शरीर धारण करितो. वस्तुतः तें शरीर मिथ्या असतें. कारण तें निरनिराळ्या आकारानें विकार पावलेलें असतें. तथापि त्या असत् शरीरालाहि चेतनाच्या बळावर सद्रूप समजतात. ज्याप्रमाणें फुलामध्यें सुगंध त्याप्रमाणें देहबीज हेंच ज्याचें सार आहे, अशा स्वकर्मानें उत्पन्न केलेल्या कोशांत म्ह० त्या बीजापासून उत्पन्न झालेल्या देहांत कोशकार कृमीप्रमाणें तो जीव बद्ध होऊन रहातो. ज्याप्रमाणें ब्रह्मांडमंडपामध्यें चांदणें सर्वत्र पसरतें, त्याप्रमाणें हृदयांतील देहबीजामध्यें असलेलें ज्ञान नखशिखांत शरीरांत 'मी' या रूपानें पसरतें. बाष्प आकाशांत मेघरूपानें जसें अंतरिक्षाला व्यापून रहातें, त्याप्रमाणें ज्ञानरूप जल इंद्रिय द्वारें याच प्रनालिकेच्या द्वारा बाहेर पसरून त्रिभुवनाला व्यापतें. आत्म्याचें स्वरूपभूत ज्ञान जरी या समग्र देहामध्यें आंत व बाहेर असतें, तरी हृदयस्थ बीजामध्यें वासनांचा समुदाय रहातो. म्हणजे 'मी' अशा प्रकारचा विशेष अभिमान् हृदयांतच अनुभविला जातो. केवल संकल्प हेंच जीवाचें स्वरूप आहे. त्यामुळें जीव ज्या संकल्पानें दृढ होतो, तसाच तत्काल हृदयामध्यें बनून बाहेरचा व्यवहार करूं लागतो. म्हणूनच चित्त ब्रह्मामध्यें स्थिर झाल्यावांचून दुसऱ्या कोणत्याहि उपायानें अहंभाव शांत होत नाहीं. म्हणून हे रामा! मनन, निदिध्यासन, इत्यादि उपायानें ब्रह्माला जाणावें. अहंकाराचा समूळ नाश होण्यासाठीं योगाभ्यासाच्या भूमिकांचा उत्तरोत्तर जय करीत निर्विकल्प समाधींत स्थिर व्हावें, आणि त्या शेवटच्या भूमिकेंत आकाशाकार ब्रह्माचा अनुभव घ्यावा. रामा, साधकाला याच क्रमानें ब्रह्मस्थिति संपादन करावी लागते. पण जे तत्वज्ञ असतात, त्यांना असा अभ्यास करावा लागत नाहीं. कारण ते कळसूत्री बाहुलीप्रमाणें स्वतःच्या संकल्पावांचूनच प्रारब्धप्राप्त व्यवहार करितात. जो कधीं कशाचीहि चिंता वहात नाहीं, त्याला मुक्त असें म्हणतात. तो जीवंत असतानांहि आकाशासारखा निर्मल असतो, त्यामुळें शृंखलादि बंधनांपासून मुक्त झालेला पुरुष ज्याप्रमाणें स्वैर व्यवहार करूं शकतो, त्याप्रमाणें हा मुक्त पुरुष सर्व कर्मबंधनांपासून सुटून स्वतंत्र होतो. ब्रह्मांडांत सूर्याची प्रभा जशी पसरते, त्याप्रमाणें हृदयस्थ बीजामध्यें असलेली संविद् 'अहं' या रूपानें सर्व शरीरांत नखशिखांत पसरते. ही संविद् नेत्रामध्यें दृक्, जिव्हेंत रसना, कानांत श्रोत्र, इत्यादि प्रकारें पंचज्ञानेंद्रियरूप बनते, आणि त्यांतच निमग्न होते. ज्याप्रमाणें वसंतऋतूंत भूमिमध्यें सर्वत्र असलेला रस अंकुरत्वानें प्रकट होतो, त्याप्रमाणें चिद्भाव एका अंशानें मनोरूप होऊन इंद्रियरूपानें प्रकट होतो. जो प्रत्यक्ष दिसणाऱ्या या मन, अहंकार, देह इत्यादि पदार्थांमध्यें असद्भावना करीत नाहीं, म्हणजे हे सर्व पदार्थ मिथ्या आहेत अशी कल्पना करीत नाहीं, त्याच्या हातून वैराग्यपूर्वक मोक्षसाधनांचें अनुष्ठान घडत नाहीं. त्यामुळें त्याचें जन्मादि अनंत दुःख शांत होत नाहीं. वेळीं जें कांहीं प्राप्त होईल त्यानें ज्ञानी, शरीराला

आच्छादित करितो; जें मिळेल त्यावर क्षुधेची शांति करितो व प्रसंगीं जें प्राप्त होईल त्यावर शयन करतो. आणि असा पुरुष खरोखरच एखाद्या सम्राटाप्रमाणें शोभतो. ज्ञानी ब्रम्हाकार वासनांनीं जरी युक्त असला तरी जगद्वासनांनीं युक्त नसतो, ह्मणून तो वस्तुतः वासनारहित होय. त्याच्या मनांत जगांतील कोणत्याहि पदार्थाविषयीं संकल्प नसतो. त्यामुळें वस्तुतः तो जरी अंतःशून्य असला तरी आकाश ज्याप्रमाणें वायूनें परिपूर्ण असतें. त्याप्रमाणें त्याचें हृदयाकाश पूर्णब्रह्मानें परिपूर्ण असल्यामुळें तो अशून्य-आत्मा असतो. योगाच्या सातव्या भूमिकेमध्यें स्थित असलेला ज्ञानी कोणत्याहि अवस्थेंत जरी असला तरी तो मोठ्या प्रयत्नानेंहि जागा केला जात नाहीं. ह्मणजे तो आसन, शयन, यान, यांपैकीं कोठेंहि जरी असला, तरी त्याचें मन सर्व प्रकारचें मनन सोडून शांत झालेलें असल्यामुळें तो निजलेल्या मनुष्याप्रमाणें देहभान विसरतो. त्यामुळें त्याला पुष्कळ प्रयत्नानेंहि देहभानावर आणतां येत नाहीं. हा पुरुष केवळ चिन्मात्र आहे. तो सर्व शरीराला व्यापून रहातो. सर्व जगालाहि तो व्यापतो, तथापि कमलामध्यें—कमलाच्या केसरामध्येंच जसा त्याचा वास विशेषेंकरून प्रतीत होतो. त्याप्रमाणें शरीराच्या बीजांत तो विशेषेंकरून प्रकट होतो. प्राणी चिन्मात्र आहे व जगत् हा त्या चैतन्याचाच विस्तार आहे, असें ज्ञानी समजतात. सर्व उपदेशाचें तात्पर्य यांतच आहे. आत्मनिष्ठ होऊन जगाला विसरणें, हीच परा निष्ठा आहे. यास्तव हे रामा, सर्व वैभवाविषयीं तूं विरक्त हो. आपल्या हृदयाला पाषाणासारखें दृढ कर ह्मणजे तुझा खरा उत्कर्ष होईल. हे माधो, तुझें हृदयाकाश पूर्ण परब्रम्हानें परिपूर्ण होवो. ज्ञानी व अज्ञानी यांच्यामध्यें जर कांहीं विशेष असेल तर तो हाच कीं, अज्ञ शुभाशुभ कर्मामध्यें आसक्त असतो, व ज्ञानी नसतो. आत्मसत्ता विकास पावली कीं, तीच जगत् बनते. पण ज्याला परमतत्त्व कळलें आहे, त्याला जगत्च ज्ञानरूप दिसतें. आपल्याला जें जें कांहीं दिसतें, तें तें सर्व विनाश पावतें. विनाश पावलेली प्रत्येक वस्तु पुनः उत्पन्न होते आणि जें कधीं नष्ट होत नाहीं व उत्पन्नहि होत नाहीं, तेंच सत् होय. तेंच तूं आहेस. ही जगद्भ्रांति निर्मूल आहे. तिचा तूं कितीहि विचार केलास, तरी तिचें योग्य कारण तुला कधींहि सांपडणार नाहीं. मृगजलापासून खऱ्या जलाचा लाभ जसा कधींहि होत नाहीं, त्याप्रमाणें संसाराचें खरें मूळ तुला कळणार नाहीं. जसें भाजलेलें बीज अंकुर उत्पन्न करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें आत्मदर्शनानें आच्छादित झालेली अहं ही भावना, पुढचा जन्म हेंच आपलें कार्य करूं शकत नाहीं. विद्वान् पुरुष ज्ञानोत्तर कर्म करीत असला, किंवा त्यानें तें सोडलें तरी तो नेहमीं स्वरूपांतच स्थित असतो. कारण तो विरक्त, निष्काम, मननशून्य व नित्य शांत असतो. चित्ताची शांति झाली असतां सर्व भोगवासना पूर्णपणें शांत होतात, त्यांचा समूळ नाश होतो. कारण चित्त हीच त्यांची खाण आहे. चित्त, देह, इत्यादि रूपानें साकार होणें, हाच जीवभाव आहे; त्यामुळेंच सर्व संताप होतो. अर्थात् जेव्हां चित्त, देह, इत्यादि उपाधींना सोडून जीव केवळ चित्प्रकाशरूप बनतो, तेव्हां तो साक्षात् परमात्माच होतो. ह्मणजे ज्याप्रमाणें अपराण्हसमयीं सूर्याचा ताप जरी अधिक भासला व त्यामुळें सकाळच्या उन्हाहून त्या वेळचें ऊन्ह निराळें आहे असें वाटलें, तरी सूर्यप्रकाश या दृष्टीनें त्याच्याकडे जो पहातो, त्याला मुळींच भेद

दिसत नाहीं, त्याच न्यायानें उपाधिदृष्टच्या भासणारे जीवभेद निरुपाधिक अवस्थेंत अनुभवाला येत नाहींत. पुरुष जमिनीवर उभा राहून आकाशांतील चंद्राकडे पहातो, त्या वेळीं त्याच्या हृदयापासून चंद्रापर्यंत एक प्रकारची वृत्ति, म्हणजे ज्ञानाचा प्रवाह सुरू असतो. अर्थात् चंद्राला पहाणाऱ्या मनुष्याच्या नेत्रापासून चंद्रमंडलापर्यंत मध्यें असलेलें जें निर्विषय ज्ञान तेंच परमात्म्याचें रूप होय. चिदाकाशाचा मायिक चमत्कार हेंच जगत् आहे. यास्तव हे रामा, जगाचें तत्त्व जाणणाऱ्या पुरुषाला सर्व प्रकारच्या भ्रमानें रहित व अक्षय असें एक परमार्थतत्त्वच भासतें. परंतु तें अतत्त्वज्ञाला जगत् या रूपानेंच दिसतें. परमात्मा त्याचा नियामक आहे असें त्याला वाटतें, व विषयप्रीति हेंच त्यांतील सार आहे, अशी त्याची भावना असते; आणि ब्रम्हाकाशांत तें खरोखरच आहे अशी त्याची समजूत असते.२२

---

## सर्ग २३ वा.

१ एका रुक्ष अरण्यांत मंकीचा वसिष्ठाशीं समागम. २ वैराग्यानें तत्त्वजिज्ञासु बनलेल्या त्याला वसिष्ठाचा उपदेश.

**श्रीवसिष्ठः**—रामा, तूं आपली वैराग्याविषयींची वासना वाढवून विषयवासनेचा नाश कर, आणि या स्वाभाविक अज्ञानादिरूप संसारापासून तत्त्वबोधानें स्वतःचा उद्धार करून घेऊन शांत आत्मस्वरूपाला मंकीप्रमाणें प्राप्त हो. पूर्वीं मंकी नांवाचा एक ब्राम्हण होता, त्यानें उग्र व्रतें आचरिलीं होतीं, त्यामुळें ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे, अशा त्याला माझ्या उपदेशामुळें मोक्ष कसा प्राप्त झाला तें तूं ऐक. मी एकदा आकाशांतून पृथ्वीवर आलों. तुझ्या पितामहानें यज्ञादि कांहीं निमित्तानें बोलाविलें होतें, म्हणून सप्तर्षिलोकांतून भूलोकीं आल्यावर अयोध्येकडे जात असतांना मी एका मोठ्या अरण्यांत शिरलों. तें अरण्य इतकें रुक्ष होतें कीं, तेथील भूमि सूर्यकिरणांनीं अतिशय तप्त झाली होती. तेथील धूळ व तापलेली वाळू यांवर पाय टेकवत नसे. तें अरण्य इतकें अफाट होतें कीं, त्याचा अंत लागत नव्हता. कोठें कोठें एखादा कुग्राम दिसत होता व एखाद्या ठिकाणीं शांत व सुशोभित प्रदेश आढळत होता. त्यांत धूळ उडत नव्हती, वाऱ्यापासून त्रास होत नव्हता, व सूर्याच्या प्रखर तापामुळें मृगजलाचाहि भास होत नव्हता. अशी निर्मल ब्रम्हसत्ता सर्वत्र पसरलेली असते, त्याप्रमाणें तें अरण्यहि सर्वत्र अफाट पसरलें होतें. ब्रह्मप्राप्तीसाठीं साधकाला जसा भगीरथ प्रयत्न करावा लागतो, त्याप्रमाणें त्या दुर्गम अरण्यांतून पार पडण्यासाठीं प्रवास करणारांना मोठा प्रयत्न करावा लागत असे. संसारी जीव अविवेकाला जसा प्राप्त होतो, त्याचप्रमाणें त्यांतील प्रवाश्यांना मृगजलाचा वारंवार भ्रम होऊन त्या शून्य प्रदेशांत त्यांची दिशाभूल होत असे. रामा, अशा त्या भयंकर अरण्यांतून मी संचार करीत असतांना माझ्यापुढें कोणीएक प्रवासी श्रांत होऊन आपल्याशींच कांहीं बोलत आहे असें मला दिसलें.

पान्थः—"ज्याप्रमाणें दुर्जनाचा समागम अतिशय संताप देतो, त्याप्रमाणें हा तप्त झालेला सूर्यहि मला अतिशय ताप देत आहे. त्यामुळें माझीं मर्मस्थानें व्याकुळ होत आहेत. किरणांतून तो जणुं काय अग्नीचा वर्षाव करीत आहे. झाडांचीं पानेंहि कोमेजून गेलीं आहेत. त्यामुळें ही वनराजि जणुं काय जळतच आहे, असें वाटतें. यास्तव मी आतां या समोर दिसणाऱ्या ग्रामांत प्रवेश करितों. तेथें कांहीं काळ

विश्रांति घेऊन नंतर त्वरेनें पुढील मार्ग आक्रमीन." असा विचार करून तो समोर दिसणाऱ्या किराताच्या गावांत प्रवेश करण्याची जों इच्छा करीत आहे, तों मीं त्याला म्हटलें, "हे मित्रा, तुझें स्वागत असो. हे सुकुमारा, निष्कांचन लोकांना संचार करण्यास योग्य, व जेथें आतिथ्य करणारे जन पुष्कळ आहेत असा मार्ग तुला माहित नाहीं, म्हणूनच तूं असल्या रुक्ष व दुर्गम अरण्यांतून संचार करीत आहेस. परंतु बाबारे, या गांवांत तुला खरी विश्रांति मिळणार नाहीं. तेथें तूं पुष्कळ वेळ जरी राहिलास तरी तुला जी विश्रांति मिळेल, ती पुनः केव्हां तरी खचित क्षय पावेल. कारण मनुष्यलोकामध्यें कर्मानुष्ठान करून दक्षिणमार्गानें जीव पितृलोकीं जातो व उपासना करून उत्तरमार्गानें देवादि लोकीं जातो. तेथें कांहीं काल सुखहि भोगतो. पण, कर्म व उपासना या साधनांनीं तो जन्ममरणपरंपरेंतून मुक्त होत नाहीं. त्यामुळें त्याला नित्य विश्रांति मिळत नाहीं. हे मित्रा, तूं ज्या गांवांत जात आहेस, तेथें पामरजन रहातात. त्यामुळें त्यांच्या भाषणादिकांपासून तुला समाधान तर वाटणार नाहींच पण उलट क्षोभ मात्र होईल. खारट पाणी प्याल्यानें तृषा शांत न होतां अधिकच वाढते. त्याप्रमाणें पामरांच्या संगतीनें तुझें दुःख कमी न होतां अधिकच वाढेल. हे नेहमीं केवल ग्रामाचाच आश्रय करून रहाणारे भिल्ल, आमच्यासारख्या लोकांच्या संगतीला भीत असतात. ते हरिणाप्रमाणें नेहमीं उन्मार्गानें जात असतात. ते कधींहि विचार करीत नाहींत. विषयांचा भोग घेऊन त्यांतच अधिक आसक्त होतात. त्यांना दुराचरणाची मुळींच भीति वाटत नाहीं. ते पाषाणाच्या मूर्तींसारखे स्तब्ध असतात. काम, अर्थ, राग व द्वेष यांतच त्यांचा सर्व पराक्रम असतो. त्यांची बुद्धि अविचारानें दग्ध झालेली असते, म्हणून ते आपातरमणीय[१] कर्मांमध्यें रममाण होतात. मेघपंक्ति जशी मरुभूमीवर, तशी शुद्ध कुलामध्यें उत्पन्न झालेल्या लोकांची उदार, शीतल व रसिक प्रज्ञा या लोकांवर विश्वास ठेवीत नाहीं. मित्रा, अंधकारानें भरलेल्या गुहेंत सर्प होऊन पडणेंहि बरें; एखाद्या मोठ्या शिळेच्या सांधींत किडा होऊन राहणें बरें; निर्जन प्रदेशांत पंगु मृग होणेंहि बरें; पण ग्राम्य जनांचा समागम बरा नाहीं. कारण ते शर्करावगुंठित विषकणासारखे असतात विषकण तोंडांत टाकते वेळीं गोड लागतात, पण परिणामीं जीव घेतात. तसेंच ग्राम्य जनहि आरंभीं मोठा स्नेह दाखवितात, थोड्याच वेळांत विरक्त होतात, व शेवटीं जीव घेण्यास तयार होतात. ते अधार्मिक जन झंझावाताप्रमाणें धूळ उधळीत, वृक्षांचें उन्मूलन करीत व गवत, वाळलेलीं पानें इत्यादिकांना उडवीत जगांत क्षोभ उत्पन्न करीत असतात." रामा, याप्रमाणें मी बोललों असतां अमृतजलानें स्नान केल्याप्रमाणें, अत्यंत शांत होऊन तो पुनः बोलला, "हे भगवन्, तूं कोण आहेस? तुझ्या चर्येवरून तूं आपल्या अंतःकरणामध्यें अतिशय संतुष्ट आहेस असें दिसतें. तूं कोणी आत्मज्ञ महात्मा तर नाहींस? कारण, एखादा वाटसरू ज्या गांवांतून जात असतो त्या गांवांतील लोकांच्या व्यवहाराकडे तो उदासीन वृत्तीनें जसा पाहतो, त्याप्रमाणें तूं या सर्व लोकव्यवहाराला मनांत यत्किंचितूहि क्षुब्ध न होतां पहातोस. तूं अमृतप्राशन केलें आहेस कीं काय? किंवा तूं कोणी मोठा सम्राट आहेस? कारण तुझ्यापाशीं कांहीं नाहीं, तूं निष्कांचन दिसतोस, तथापि पूर्ण चंद्राप्रमाणें भासतोस. तूं सांसारिक दुःखांनीं रहित आहेस.

१ विचार करीपर्यंतच रमणीय वाटणारें कर्म.

पण जीवन्मुक्ताच्या गुणांनीं परिपूर्ण आहेस. तुला देहादिकांचें भान नाहीं, त्यामुळें तूं मदानें मत्त झाल्यासारखा दिसतोस, पण परमार्थाविषयीं अतिशय दक्ष आहेस. वस्तुतः तूं कांहीं नाहींस, पण ज्ञानदृष्टीनें तूंच सर्व आहेस. व्यवहारांत जें जें कांहीं दिसतें त्याच्याशीं एका दृष्टीनें तुझा कांहीं संबंध नाहीं व दुसऱ्या दृष्टीनें संबंध आहेहि. तुझें रूप अति शांत, अत्यंत रमणीय, तेजस्वी, नित्यतृप्त, अत्यंत ऊर्जित व कोणत्याहि प्रतिकूल अवस्थेनें व्याकुळ न होणारें असें आहे. त्याचें कारण काय? तूं या वेळीं भूमीवर जरी स्थित आहेस तरी आकाशांत समस्त लोकांच्या वर असलेला भासतोस. तुला दुसऱ्या कशाविषयींहि आस्था नाहीं; पण माझ्यासारख्या दुःखी जीवांचा उद्धार करण्याविषयीं मोठी आस्था आहे, असें दिसतें. चंद्राहूनहि तुझें अमृतमय मन श्रेष्ठ आहे. कारण चंद्राचे किरण जगभर पसरतात. पण मन आत्मस्वरूपाला सोडून यत्किंचितूहि दूर जात नाहीं. तसेंच औषधि, वनस्पति, सोम, अन्न, इत्यादि रूपानें परिणत झालेलें चंद्राचें अमृत प्राण्यांच्या उपभोगाला योग्य होतें. त्यामुळें त्याचा क्षयहि होतो, पण तुझें अमृतमय मन कधींहि क्षीण होत नाहीं. तूं पूर्ण चंद्राप्रमाणें कलांनीं युक्त आहेस, पण चंद्राप्रमाणें तुझ्यामध्यें कलंक मात्र नाहीं. चंद्राप्रमाणेंच तूं शीतल आहेस, पण तसाच तेजस्वीहि आहेस म्हणजे, तपश्चर्येच्या योगानें तुझ्यामध्यें अपराधी लोकांचा निग्रह करण्यास समर्थ असें तेजहि दिसतें. तूं आनंदरसानें परिपूर्ण आहेस. तुझ्या इच्छेमध्यें हें सर्व संसारमंडळ स्थित आहे; व अंकुरामध्यें जसें फळ असतें, त्याप्रमाणेंच तुझ्या चैतन्यामध्यें हें सद्मतरूप आहे, असें मला दिसतें. मुने, मी शांडिल्य कुलांत उत्पन्न झालेला एक ब्राह्मण आहें. मला मंकी म्हणतात. मी तीर्थयात्रेच्या उद्देशानें पुष्कळ प्रवास केला, आणि अनेक तीर्थें पाहून आतां फार दिवसांनीं आपल्या घरीं परत चाललों आहें. पण माझें मन संसाराविषयीं विरक्त झाल्यामुळें घरीं जाण्याची मला उत्सुकता वाटत नाहीं. कारण या ब्रम्हांडांतील सर्व भूतें क्षणभंगुर आहेत, असें पाहून संसाराची मला आसक्ति राहिली नाहीं. यास्तव हे भगवन्, कृपा करून आपण कोण आहां, हें मला खरें सांगा. आपल्यासारख्या सत्पुरुषांचीं चित्तरूपी सरोवरें फार गंभीर व प्रसन्न असतात. केवल दर्शनानेंच मित्रत्व करणाऱ्या महात्म्यांच्या पुढें सर्व भूतें कमलाप्रमाणें विकास पावतात, व त्यांजवर विश्वास ठेवितात. माझें हें मन थोडेंसें विवेकी आहे. तथापि योग्य गुरूंनीं कृपा करून तत्त्वोपदेश केल्यावांचून तें सांसारिक दुःख टाळण्यास समर्थ होणार नाहीं.

श्रीवसिष्ठः—हे महाभागा, मी वसिष्ठ मुनि आहें. माझें निवासस्थान अंतरिक्षांत आहे. सूर्यवंशांतील ‘अज’ या नांवाच्या राजर्षीच्या कांहीं कार्यासाठीं मी या मार्गानें अयोध्येस चाललों आहें. हे सज्जना, तूं आतां खिन्न होऊं नकोस. कारण तूं आतां विद्वानांच्या मार्गांत प्रविष्ट झाला आहेस, त्यामुळें तूं बहुतेक संसारसागराच्या परतीरास पोंचलाच आहेस. कारण, वैराग्याचें वैभव, उदार बुद्धि, ही अशा प्रकारची उक्ति व शांतरूप आकृति सामान्य मनुष्यांत संभवत नाहीं. त्यामुळें तूं महात्माच आहेस असें मी समजतों. जसा हिरा सहाणेवर चातुर्यानें घासला असतां चमकूं लागतो, त्याचप्रमाणें रागद्वेषादि दोषांनीं रहित झालेलें चित्त विवेकी संभवतें. साधो, तूं काय जाणूं इच्छितोस? तूं या संसाराचा त्याग कसा करणार? मला असें वाटतें कीं, जो पुरुष त्याला उपदेशिलेलें तत्त्व कर्मानें संपादन

करितो, तो उत्तम साधनांनीं संपन्न होतो. त्याची वासना रागादि–दोषरहित होते. त्याची मति नित्य-अनित्य, सार-असार, इत्यादिकांचा विवेक करण्यास समर्थ होते; आणि असा जो शिष्य असतो, तोच गुरूपदेशाच्या तेजानें आनंदरूप परमपदाला प्राप्त होण्यास समर्थ होतो. जो असा सुसंस्कृत नसतो, तो परमानंदास कधींहि प्राप्त होत नाहीं. तूं जन्ममरणादि सर्व दुःखांपासून मुक्त होण्याची इच्छा करीत आहेस, असें तुझ्या भाषणावरून स्पष्ट होतें म्हणजे तूं ज्ञानाचा उत्तम अधिकारी आहेस, याविषयीं मला मुळींच शंका नाहीं. म्हणून मी तुला ज्ञान सांगतों. २३.

## सर्ग २४ वा.

१ मंकी देह, इंद्रियें, मन, बुद्धि, यांच्या दोषांचें सविस्तर वर्णन करून आपल्या संसार-दुःखाचें निवेदन करितो.

श्रीवसिष्ठः—रामा, मीं असें सांगितलें असतां, मंकी माझ्या पायांवर मस्तक ठेवून मोठ्या संतोषानें मला म्हणालाः—

मंकीः—हे भगवन्, मी दहाहि दिशा फिरलों. जशी प्राण्यांची दृष्टि कांहीं तरी चांगली वस्तु पहाण्यासाठीं सभोंवार संचार करिते, त्याप्रमाणें एखाद्या श्रेष्ठ साधूची गांठ पडावी, यासाठीं मी सर्वत्र हिंडलों, पण माझे संशय घालवून मला कृतार्थ करील, असा एकही सत्पुरुष मला आढळला नाहीं. पण आज तुझें दर्शन झाल्यानें माझ्या या ब्राह्मणदेहाचें सार्थक झालें, असें मी समजतों. कारण—देव, असुर, तिर्यक् प्राणी इत्यादिकांच्या देहांमध्यें ब्राह्मणदेहच श्रेष्ठ आहे, आणि त्यांतहि ज्ञानाधिकारी ब्राह्मणदेह सर्वांत श्रेष्ठ आहे. तसा देह मला प्राप्त झाल्यामुळें व दैववशात् आज तुझें दर्शन घडल्यामुळें मला या जन्माचें फल मिळालें, असें मी समजतों. भगवन्, या संसारांतील अनेक दोष व विविध दशा यांचा अनुभव घेतां घेतां मी त्रासलों आहें. पुनः पुनः जन्म, पुनः पुनः मरण, सुखामागून दुःख व दुःखामागून सुख, असा हा क्रम सारखा चालला आहे. संसारांत कांहीं थोडेंसें सुखहि अनुभवाला येतें. पण त्याचाहि परिणाम दुःखांतच होत असल्यामुळें सर्व सुखेंहि दुःसह दुःखेंच आहेत. असें मी समजतों. हे मुने, त्या सुखांपेक्षां दुःखें पतकरलीं. कारण आपण या जगांत अत्यंत दुःखी प्राणी पहातों. जसे जलचर! त्या बिचाऱ्यांना एक क्षणभर विश्रांति घेण्यास योग्य असें स्थानहि मिळत नाहीं. ते पाण्यांतच विश्रांति घेतात व त्याचें त्यांना दुःखहि वाटत नाहीं. कारण भूमीवर विश्रांति घेण्यांत काय सुख आहे, याची त्यांना कल्पनाच नसते. त्यामुळें आमच्या दृष्टीनें त्यांचें दुःख तें त्यांच्या दृष्टीनें त्यांना सुखच वाटतें, म्हणून एकसारखें दुःखपरंपरेंत रहाणें फारसें वाईट नाहीं. पण, ज्या दुःखाच्या परंपरेचा क्षणिक सुखानें वारंवार विच्छेद होतो, तीं सुखेंहि मला दुःखेंच भासतात. कारण त्यापुढें दुःखाची तीव्रता अधिक भासते. म्हणून या संसारांतील सुखेंहि मला दुःखच देतात. तीं मला इतकें दुःखी करितात कीं, त्यांच्यापुढें मला संसारांतील दुःखेंहि प्रिय वाटतात. दांत, केश व त्वचा, यांसह माझें वय आतां जर्जर झालें आहे. पण तत्त्वज्ञानाच्या उपयोगीं न पडतां वृथा जीर्ण झालेलें हें सर्व शरीर अनर्थपरंपरेचें कारण मात्र होऊन राहिलें आहे भोगांच्या उत्कर्षाचाच एकसारखा अभिलाष धरणारी माझी बुद्धि परमपुरुषार्थाच्या साधनाचा निश्चय करीत नाहीं.

मन क्षणोक्षणीं वाढणाऱ्या आसक्तीनें विकास पावलें आहे. तें गत गोष्टींचें स्मरण करून व पुढील गोष्टींचा संकल्प करून दुःखी व मूढ होत आहे. त्यामुळें त्याला आत्म्याची भावनाच होत नाहीं. ज्या मनाला सुसंस्कार झालेले नसतात, त्याची स्थिति एखाद्या कुग्रामाच्या स्थितीप्रमाणें अतिशय हीन असते. ज्याप्रमाणें कुग्रामांत अनेक वृक्षांच्या पाचोळ्याचा ठिकठिकाणीं ढीग झालेला असतो, व हिंस्र पशुपक्षी स्वैर संचार करीत असतात, त्याप्रमाणें संस्कारहीन मनामध्यें निरनिराळ्या विषयवासनांचे ढीग झालेले असतात, व कामादि विकारांचा स्वैर संचार चाललेला असतो. कंटकवृक्षांच्या शाखेप्रमाणें बुद्धि क्रूर व कुटिल झालेली असते. अनेक प्रकारचे आयास देणाऱ्या चिंतेमुळें आयुष्य वृथा क्षीण होतें. तृष्णा एखाद्या शुष्क लतेप्रमाणें केव्हांही फलद्रूप होत नाहीं. त्यामुळें वस्तुतः ती नष्टच झालेली असते, परंतु सर्वथा नष्ट होत नाहीं; तर पुनः पुनः उत्पन्न होतेच. ती मनुष्याला विवेकरसाचा स्वाद घेऊं देत नाहीं. हे भगवन्, कर्माच्या योगानेंच आपला उद्धार करून घ्यावा, तर तसेंहि शक्य नाहीं. कारण, आपण जें कांहीं नित्य किंवा नैमित्तिक कर्म करावें, तें प्राक्तन पापाच्या समुद्रांत कोठें गडप होऊन जातें, तें कळत नाहीं. कारण, भोगाविषयींची वासना मनुष्याला काम्य व निषिद्ध कर्मामध्यें त्याची इच्छा नसली तरी प्रवृत्त करते. हे भगवन्, पुत्र, स्त्री, बांधव इत्यादिकांच्या आसक्तीनेंच माझें जीवित क्षीण झालें, भवसागरही तरून गेलों नाहीं. भयंकर भोगाशा प्रतिदिनीं वाढत चालली आहे. धनामुळें मोठमोठ्या आपत्ति ओढवल्या. परिवाराविषयींच्या अनेक चिंतांनीं व्याकुळ केलें. संपन्न व सर्व परिवारानें युक्त असलेल्या मनुष्याला लक्ष्मी केव्हां फसवितें, हें कळत नाहीं. माझें चित्त, शुष्क सागराप्रमाणें अतिशय शून्य झालें आहे. त्यांत नानाप्रकारच्या इच्छा उद्भवतात, संकल्पकल्लोळहि उठतात. तथापि त्याला इष्ट वस्तूची प्राप्ति होत नाहीं. तें आशेनें धांवत असतें, पण त्याला कसलाहि लाभ होत नाहीं. त्याची कधीं तृप्तिच होत नाहीं. एखाद्या अमंगळ जागीं उगवलेल्या कंटकवृक्षाप्रमाणें केवळ विषयपरायण झालेल्या मला विवेकी जन स्पर्शहि करीत नाहींत. मन एखाद्या उन्मत्ताप्रमाणें वृथाच वाटेल तेथें भटकत फिरतें, मोठमोठे संकल्प करितें. मी आतां जवळ जवळ मृतच झालों आहें, तथापि तें थकलें नाहीं. त्याचे संकल्प व विकल्प अधिकाधिकच चालले आहेत. पण त्याला इष्ट अर्थ प्रायः कधींच मिळत नाहीं. त्यामुळें तें मला दुःख मात्र देतें. माझी अज्ञानरूपी रात्र अद्यापि क्षीण झालेली नाहीं, त्यामुळें अहंभावरूप यक्षहि अद्यापि नाहींसा होत नाहीं. तो विद्यमान असल्यामुळें शास्त्र, सज्जन यांचा संपर्क माझ्या मनावर कांहीं परिणाम करूं शकत नाहीं, अहंभावामुळें शास्त्र व सज्जन यांच्या उपदेशाप्रमाणें मला मनाचा निग्रह करितां येत नाहीं. हे मुने, अज्ञानांधकाररूप मत्त गजाला मारणारा सिंह, कर्मरूप तृणाला जाळून टाकणारा अग्नि, वासनारूप रजनीचा नाश करणारा विवेकरूप सूर्य, माझ्या चित्तांत अद्यापि उदय पावला नाहीं. मला मिथ्या पदार्थ सत्य असल्यासारखे भासतात. चित्तरूपी मत्त हत्ती मला व्याकुळ करीत आहे. इंद्रियें माझ्या मर्मच्छेद करीत आहेत. संसारांतून तरून जाण्यासाठीं ज्ञानी लोक जिचा आश्रय करितात ती शास्त्रदृष्टिही मीं संपादन केली नाहीं. त्यामुळें मला स्वभावतःच प्राप्त झालेली दृष्टि ही वासनारूप तिमिर वाढविण्यास कारण झाली आहे. वास्तव अशा या भयंकर

अविवेकाच्या प्रसंगीं मीं काय करावें म्हणजे माझें अत्यंत हित होईल ? मी संसारदुःखांतून कसा सुटेन तें मला सांग. कारण 'सत्पुरुषांची संगति लाधली म्हणजे सर्व अविवेक नाहींसा होतो व सर्व आशा क्षीण होतात, शरदृतूंतील आकाशाप्रमाणें अंतःकरण निर्मल होतें.' अशी जी सत्पुरुषाची वाणी मीं ऐकिली आहे, ती आज संसाराचा उपशम करणाऱ्या तुझ्या बोधानें खरी ठरो. २४.

## सर्ग २५ वा.

—:०:—

१ अविद्येपासून उत्पन्न झालेलीं बंधाचीं चार बीजें. २ परमात्मविद्येनें त्यांचा नाश.

**श्रीवसिष्ठः**—संवेदना, भावना, वासना, आणि कलना, असा हा चार प्रकारचा कारण-समुदाय अविद्येपासून उत्पन्न होतो. या संसारांतील सर्व अनर्थांचें तेंच बीज आहे. इंद्रियांनीं विषयांचा उपभोग घेणें हेंच संवेदन; विषय दूर झाला असतां त्याच्या गुणांचें अनुसंधान करून त्याचें चिंतन करणें ही भावना; चित्तांत त्याचाच दृढ संस्कार होणें ही वासना; व त्या वासनेमुळें मरणकालींहि त्या विषयाचें स्मरण होणें ही कलना, विषय मिथ्या असल्यामुळें त्या विषयाचीं हीं संवेदनादिक अनर्थबीजें देखील मिथ्या आहेत. त्यांतील संवेदना व भावना हीं सर्व दोषांचीं मुख्य कारणें आहेत. त्यांतल्या त्यांत संवेदनेपेक्षां भावना हा महान् अनर्थ आहे. वसंतऋतूमध्यें फल-पुष्पादिकांनीं समृद्ध झालेल्या लता त्यांतील रसाच्या योगानेंच जशा वृद्धि पावतात, तशाच सर्व आपत्ति भावनेमुळें उद्भवतात. या दुर्गम संसारांत वासनेमुळेंच प्रवृत्त होणारे सर्व लोक उत्तरोत्तर अधिक अनर्थांत पडतात. वसंतऋतु संपून ग्रीष्म ऋतु लागला असतां पृथ्वींतील रस हळूहळू जसा क्षय पावतो, त्याप्रमाणें विवेकी पुरुषाचा सर्व संसार वासनेसह क्षीण होतो.

विषयवासना क्षीण होण्यासाठीं विषयांतील दोषांचें चिंतन व ब्रह्माची भावना दृढ करावी. या संसाररूपी कंटक–वृक्षाला वाढविणारी ही विषयवासनाच आहे. वसंत ऋतूंतील रस ज्याप्रमाणें वनशोभेला वाढवितो, त्याप्रमाणें विषयवासना संसाराचें रमणीयत्व वाढविते. जीवचैतन्यांत वासनारस संसारांधकाररूपानें परिणत होतो. ज्याप्रमाणें मधुमासांतील रस पृथ्वीवर वनरूपानें स्थित असतो, तसाच वासनारस संसाररूपानें परिणत होतो. पण तेथें शुद्ध व निराकार चिन्मात्राहून निराळें दुसरें कांहीं नसतें. आकाशाचें अवकाश हेंच रूप असल्यामुळें जसें त्यांत शून्यत्वाहून आणखी कांहीं भासत नाहीं, त्याचप्रमाणें या सृष्टींत सत्ता व स्फूर्ति यांवांचून दुसरें कांहीं भासत नाहीं; आणि सत्ता व स्फूर्ति हें चिन्मात्राचेंच स्वरूप आहे. याप्रमाणें सर्वत्र सर्वदा प्रतीत होणारा चिन्मात्ररूप आत्मा देह, इंद्रियें इत्यादिकांहून भिन्न नाहीं, तर तो देहादिरूपच आहे, अशी जी दृढ मति तीच अविद्या, तोच भ्रम, व तोच हा सर्व संसार आहे. केवल अविवेकामुळें सिद्ध झालेला हा संसार नुसत्या विवेकानेंच नाश पावतो. अज्ञ मनुष्यानें कल्पिलेल्या वेताळाप्रमाणें केवल कल्पनेनें भासणारा हा संसार मिथ्या आहे. म्हणूनच विवेकानें तो एका क्षणांत नाहींसा होतो. पृथ्वीवरील सर्व नद्यांचे ओघ समुद्राला जसे मिळतात, त्याप्रमाणें सर्व दृश्याचें ज्ञान, दृश्याचा बाध झाला असतां केवळ ज्ञानरूप होतें. नद्या आपलें नांव–रूप वगैरे सोडून जशा समुद्ररूप होतात, त्याचप्रमाणें सर्व विषयज्ञानें विषयांचा बाध झाला असतां एक–आत्मरूप बनतात. जसें

मृण्मय पात्र मृत्तिकेवांचून केव्हांही उपलब्ध होत नाहीं, तर ज्या ज्या वेळीं तें दिसतें त्या त्या वेळीं तें मृत्तिकेसहवर्तमानच दिसतें; तसेंच चैतन्यावांचून कोणतेंहि दृश्य उपलब्ध होत नाहीं. कारण प्रत्येक दृश्य चिन्मयच असतें. ज्ञानानेंच ज्ञात होणारी जी वस्तु ती ज्ञान-रूपच होय. कारण कोणताहि विषय ज्ञाना-वांचून केव्हांच प्रतीत होत नाहीं. त्यामुळें कोणतेंहि दृश्य त्याच्या ज्ञानाहून निराळें नाहीं. द्रष्टा, दर्शन, दृश्य, या प्रत्येकांत बोध रूपत्व हेंच सार आहे. त्यामुळें कोणतेंहि दृश्य ज्ञानाहून भिन्न नाहीं. सजातीय वस्तु सजा-तीय वस्तूशीं एकरूपच होते. तेजोरूप नेत्र तेजालाच म्ह० पदार्थाच्या रूपालाच पाहतात. त्यामुळें दृश्य व दर्शन म्ह० पहाण्याचें साधन यांचें एकत्व निश्चित होतें. याचा अनुभवहि त्यामुळेंच येतो. काष्ठ, पाषाण, इत्यादि पदा-र्थांना बोधरूपत्व जर नसेल तर त्यांचें अस्ति-त्व केव्हांहि प्रतीत होणार नाहीं. ज्याप्रमाणें मनुष्यांना शिंग कधींहि दिसत नाहीं, त्याच-प्रमाणें ज्ञानावांचून हे पदार्थ कधींहि दिसत नाहींत. ही सर्व दृश्यश्री केवळ बोधरूप अस-ल्यामुळें वस्तुतः बोधाहून अगदीं विलक्षण असली तरी बोधरूप होऊन बोधानेंच जाणली जाते. जसा वायु केवळ स्पंदमात्र, किंवा समुद्र केवळ जलमात्र, तसें जगांतील हें सर्व दृश्य केवळ बोधमात्र आहे. एकमेकांशीं जोड-लेले काष्ठादि पदार्थ अविवेकावस्थेंत मिश्र-रूपानें जरी दिसले तरी विवेकावस्थेंत ते केवल ज्ञानरूपच दिसतात. त्या वेळीं त्यांचा मिश्रपणा अनुभवाला येत नसून ऐक्य अनुभवाला येतें. दूध व पाणी एकमेकांत मिसळल्यानें तीं एक-रूप दिसतात, त्याचप्रमाणें दृक् व दृश्य यांनाहि एकरूपत्व आहे. कारण तीं दोन्हीं ज्ञानरूपच आहेत. ह्मणूनच दृश्याचा अनुभव येतो. देहाला 'अहं' असें म्हटल्यानें देहबंध उत्पन्न होतो व देह मी नव्हे, अशी भावना दृढ केल्यानें जीव बंधनांतून मुक्त होतो. तेव्हां बंध काय तो जर एवढाच आहे तर तो आपल्या स्वाधीन आहे. त्याला घालविण्यास उशीर कितीसा? त्यांत अशक्य तरी काय आहे?

तिमिररोग्याला आकाशांत दोन चंद्र दिसूं लागतात. तृषार्ताला मरुभूमीवर मृगजल दिसूं लागतें. त्याप्रमाणें अविद्वानाला 'अहं' हा मिथ्याभ्रम होतो. हें माझें ही भावना बंधाला कारण होते व शरीरादिक मी नव्हे, ही भा-वना मुक्तीला कारण होते. याप्रमाणें बंध व मोक्ष जर आपल्या स्वाधीन आहेत, व आत्म-ज्ञान जर इतकें सुलभ आहे, तर बंधाचा व अज्ञ-तेचा अनुभव जीव कां घेतात? भांडें व बोरें किंवा घट व आकाश यांचा न्यायहि या अहंकाराला लागू होत नाहीं. कारण भांडें व बोरें हीं दोन्हीं साकार आहेत. त्यामुळें त्यांचा संबंध होऊं शकतो आणि घट मूर्त व आकाश अमूर्त जरी असलें, तरी घटाच्या योगानें अमूर्त आकाशहि मर्यादित होतें. पण अहंकार व आत्मा हे दोन्हीं अमूर्त आहेत, त्यामुळें त्यांचा परस्पर संबंध केवल भ्रमावांचून दुसऱ्या कशानें संभवत नाहीं. आत्म्याच्या ठिकाणीं अहं ही भावना कांहीं कारणावांचून उत्पन्न झाली आहे. त्यामुळेंच ती सत्य नव्हे. अर्थात् नाहं किंवा सोहं अशा भावनेनें अहंकाराचा बाध झाला असतां आत्मस्थिति सहजसिद्ध आहे. पूर्वमीमांसक हे, जड व चैतन्य यांचें खरोखरीच ऐक्य आहे व तेंच आत्म्याचें रूप आहे असें समजतात. पण ती त्यांची समजूत चुकीची आहे. कारण आत्म्याला जड-चेतनरूप मानल्यास त्याचा जडांश नेहमीं जडच राहणार. मग त्या जडां-शाचा अनुभव कसा येईल? ज्याचा अनु-भवच येत नाहीं ती वस्तु आहे हें तरी कसें सिद्ध

होणार? त्याचप्रमाणें त्याचा चिदंश ज्ञानरूप जरी असला तरी त्याला प्रकाशित करण्याला योग्य असा विषयच रहात नाहीं. त्यामुळें आत्म्याच्या जडांशाला चेतनांशाचें भान होणार नाहीं व चेतनांशाला जडांशाचें भान होणार नाहीं. त्यामुळें परस्परांना न जाणणें हेंच आत्म्याचें ऐक्य होय. चेतन कधींहि जड होणें शक्य नाहीं व जड केव्हांहि चेतन होणें शक्य नाहीं. कारण प्रकृति ह्मणजे स्वभाव केव्हांहि बदलत नाहीं. किंवा जे केव्हांहि न बदलणारे धर्म त्यांनाच स्वभाव असें ह्मणतात. तूं अजड आत्मरूपालाच अंशतः जडरूपानें पहात आहेस, तें तुझें पहाणें अज्ञानामुळें आहे. त्यांत अजडाचें एकरूपत्व शक्यच नाहीं. त्यामुळें आत्मा जडबोधैक्यरूप आहे, हें तुझें ह्मणणें मिथ्या आहे. तर मग निरनिराळे वादी आत्म्याविषयीं परस्परविरुद्ध अनेक मतें कां प्रतिपादितात, ह्मणून विचारशील तर सांगतों. ते बहिर्दृष्टि असतात. त्यांचीं अंतःकरणें विचित्र वासनांनी व अभिमानानें युक्त असतात. त्यामुळें ते तत्त्वाचें परीक्षण करूं लागले असतां पर्वतशिखरावरून घसरणाऱ्या दगडाप्रमाणें खालीं खालींच जातात. ह्मणूनच वैदिक दृष्टीला अंतरलेले ते विविध योनींत जन्म घेऊन नाना प्रकारचीं दुःखें भोगितात. त्यांच्या दुःखाचें वर्णन करवत नाहीं.

कारण वासनारूप वायूकडून ते गवताप्रमाणें इतस्ततः उडवले जातात. हे साधो, विषयरसानें अनुरक्त झालेले लोक तळहातानें आघात केलेल्या कंदुकाप्रमाणें निरनिराळया उच्च-नीच अवस्थांतून अतिशय भ्रमण करून नरकांत पडतात. नंतर तेथें दीर्घकाल क्लेश भोगून सर्व प्रकारें जर्जर झालेले ते कालांतरींहि स्थावर, कृमि, कीट इत्यादि योनींतच जन्म पावतात. त्या अनात्मज्ञांना पुनः मनुष्यजन्म मिळणें फार दुर्लभ होतें. २९.

# सर्ग २६ वा.

—:०:—

१ विषयासक्तियुक्त भावनेमुळें अनर्थ, २ विवेकजन्य तत्त्वदर्शनामुळें भावनाशांति व तिच्या योगानें अनर्थशांति.

**श्रीवासिष्ठ:**—पावसाळ्यांत हजारों किडे जसे पृथ्वीवर उत्पन्न होतात. त्याप्रमाणें स्थावरादिजन्मरूप संसारमार्गांत पडलेल्या जीवावर अनेक आपत्ति येऊन कोसळतात. क्षुधा, तृषा, जरा, भय, मरण इत्यादि अनेक संकटें त्याला भोगावीं लागतात. पण हे सर्व भाव एकमेकांहून अगदीं भिन्न असतात अरण्यांतील पाषाणाप्रमाणें त्यांचा परस्परसंबंध असतो. पण भावना त्यांना परस्पर गुंतविते. त्या भावनेचें मूळ विवेकाविषयीं अंध झालेलें, रागद्वेषादि विकारांनीं मलिन झालेलें, पूर्ववृत्तांताविषयींच्या वासनांनीं निबिड झालेलें चित्तच आहे. अरे ! हीं भूतें वासनापरवश होऊन अनेक जन्मांमध्यें विचित्र सुखदुःखें अनुभवितात. अहो, ही वासना मोठीं कठीण आहे. तिच्यामुळेंच वस्तुतः विद्यमान नसलेलेहि जन आपल्या चित्तांत त्या भ्रमाचा अनुभव घेतात. विवेकी जन व पूर्ण चंद्र यांमध्यें कांहीं अंतर नसतें. कारण चंद्राप्रमाणेंच ज्ञानीहि लोकांना आल्हाद देतो. मधुरवाणीच्या द्वारा अमृतस्राव करतो. तो शरीरानें व मनानें अत्यंत शुद्ध असतो. ज्ञानोपदेशानें लोकांना प्रकाश देतो व विरक्तीमुळें अत्यंत शीतल असतो. पूर्वापर विचार न करतां अप्राप्य वस्तूची इच्छा करणारा अमर्याद मूढ व बालक यांच्यांत अंतर कोणतें? प्राप्त झालेलें शुभ किंवा अशुभ आमिष प्राण जाईपर्यंत न सोडणारा मत्स्य व मूढ यांमध्यें फरक काय? देह, स्त्री, धन इत्यादि सर्व पदार्थ कोरड्या वाळूनें

बनविलेल्या पात्राप्रमाणें क्षणभंगुर असतात. हे साधो, आब्रह्मस्तंबपर्यंत ज्या शेंकडों योनि आहेत, त्यांत कल्पांतापर्यंत भ्रमण करणाऱ्या जीवाच्या चित्ताची शांति शमावांचून कधींहि होणें शक्य नाहीं. केवल विवेकानेंच बंधाचा लेशहि उरत नाहीं. मार्गानें जात असतां, पायाखालीं पाहून चालणाऱ्या मनुष्याला जसे कांटे, ठेंच वगैरे लागत नाहीं, त्याप्रमाणें तत्त्वज्ञाला बंधाची पीडा होत नाहीं. हे साधो, तुझें चित्त विवेक व अवधान यांनीं युक्त आहे. त्यामुळें तृष्णा त्याला व्याकुळ करूं शकणार नाहीं. कारण सावधान व जागरूक मनुष्याला पिशाच काय करणार? ज्याप्रमाणें रूपाचें आलोचन करणें हाच दृष्टीचा प्रसार आहे, म्हणजे दृष्टि स्वस्थानाला म्ह० नेत्राला सोडून जी बाहेर पसरते, ती रूप पाहण्यासाठींच होय. त्याचप्रमाणें अहंकार व सर्व जगत् हीं दोन्ही केवल संविद्चा प्रसार आहे. म्ह० तीं दोन्ही केवळ संविद्रूपच होतात. अर्थात् कामादि शत्रूंना जिंकणाऱ्या हे वीरा, डोळे मिटले म्ह० सर्व रूपांच्या प्रकाशाचा जसा उपशम होतो, त्याप्रमाणें ध्यानादि उपायांनीं विषयज्ञानाला स्वरूपज्ञानामध्यें स्थिर करणें हीच सर्व दृश्याची शांति होय. शुद्ध संविद्च आकाशांत किंचित् विकार पावून अहंकारासह सर्व जगत् बनते. वायु स्पंदन या रूपानें जसा विकार पावतो, तशी संविद् मिथ्या जगद्रूप बनते. माती किंवा सोनें यांमध्यें उत्पन्न झालेला घटाकार व कुंडलाकार जसा त्याहून पृथक्त्वानें प्राप्त होणें शक्य नाहीं, त्याचप्रमाणें हें जगत्हि चित्हून पृथक्त्वानें उपलब्ध होत नाहीं. म्हणून तें मिथ्या आहे तें जर सत्य असतें तर निराळें उपलब्ध झालें असतें. आकाश जसें शून्यमात्र, वायु जसा स्पंदमात्र, तरंगादि जसें केवळ जलमात्र, त्याप्रमाणें हें जगत् केवल संविद्मात्र आहे.

हे सत्पुरुषा, हें त्रिभुवन सजातीयादि भेदरहित संविद्-मात्र आहे. तें आकाशाप्रमाणें शांत आहे. तूं जगाला जलांत प्रतिबिंबित झालेल्या पर्वताप्रमाणें पहा! सर्व दोषरहित व शांत–स्वभाव अशा ज्ञानी पुरुषाच्या चित्तांत अशी शीतलता उत्पन्न होते कीं, तिच्यापुढें चद्राचे किरणहि प्रदीप्त अग्नीच्या ठिणगीप्रमाणें भासतात. हें जगत् अत्यंत शांत शिवरूप झालें असतां त्यांत हा द्वैताभास कसा, कोणत्या साधनानें व कोणत्या क्रियेनें उत्पन्न होणार? जी ब्रह्म या नांवाची सत्ता तेंच प्रत्येकाचें निज स्वरूप आहे. त्यांत कोणत्याहि प्रकारची बाधा नाहीं. तर हें सर्व तन्मय व अव्यय आहे. पण हें जें पदार्थत्व म्ह० नामरूपभाव त्याचा मात्र बाध होतो; आणि ज्याचा बाध होतो, ती वस्तु आहे असें म्हणण्यास आम्ही तयार नाहीं. आम्ही त्याला आकाशपुष्पाप्रमाणें असत् मानितों. बाधित होणारें तें जगद्रूप केवल मनोमात्र असतें. त्यामुळें ध्यानादिकांच्या योगानें तूं मनाचा निरोध कर. मनाला अमनस्त्व प्राप्त झालें असतां तें नामरूपांचा संकल्प करीत नाहीं. त्यामुळें चक्षुरादि इंद्रियांच्या द्वारा वृत्ति उत्पन्न होत नाहींत आणि वृत्तींच्या अभावीं ज्ञानरूप आत्मा अनंत, अज, अव्यय, ब्रह्मच होतो. यास्तव तूं सर्व मनन टाकून शांत होऊन रहा.

हे श्रेष्ठा, आकाशासारख्या आत्मस्वरूपांत मनाचा निरोध करून रहाणाऱ्या ज्ञानी पुरुषाला नाम व रूप यांची प्रतीतिच येत नाहीं. कारण आत्मस्वरूपामध्यें स्थिर होण्याचा दृढ अभ्यास न केल्यामुळेंच मनामध्यें स्वप्नांतील विकारांप्रमाणें नाम व रूप यांचा उदय होतो. जगत् मनोमात्र आहे, याविषयीं प्रमाण काय म्हणून विचारशील तर सांगतों. हिरण्यगर्भाचें मनच जगाला निर्माण करणारें आहे. तें कोण-

त्याहि प्रकारचा संभार न घेतांच जगच्चित्र निर्माण करतें. त्याला रंग, कुंचला, इत्यादि चित्राची सामग्री तर लागत नाहींच, पण त्याला चित्रफलकाची देखील अपेक्षा नसते. नुसत्या संकल्पानेंच तें विविध आकार उत्पन्न करतें व अनुभव घेतें. अर्थात् मनावांचून जगाचा कोणी कर्ता नाहीं, व त्यावांचून जगांतील कोणतेंहि कार्य नाहीं. स्वप्न, मनोरथ इत्यादि अवस्थांमध्यें मनच पदार्थांना उत्पन्न करतें व त्याचा अनुभव घेतें, हें प्रसिद्ध आहे. तें मन ज्याचा ज्याचा विस्तार करतें, त्या सर्वांमध्यें तें स्वतःच तदाकार होऊन रहातें. त्यामुळें दृश्य मनाहून निराळें नाहीं. तेव्हां दुसरा कोण, कशानें, कशाला, व कोठें उत्पन्न करणार ? मी सुखी किंवा दुःखी असें मनानें म्हटलें कीं, सुखित्व व दुःखित्व उत्पन्न होतें. म्ह० सुख, दुःख व त्याचे साधनभूत सर्व पदार्थ मनाच्या संकल्पाच्या अधीन आहेत, त्यामुळें मनःसंकल्प शांत झाला म्ह० सर्व जगत् शून्यरूप किंवा आत्मरूप बनतें. चिदाकाशरूप असलेल्याहि सर्व पदार्थांना पार्थिवत्व खोटेंच आलें आहे. पण स्वप्नांतील पदार्थांना जशी मनोमात्रता असते, त्याप्रमाणें त्या पार्थिवत्वालाहि वस्तुतः चिद्रूपत्व आहे. अर्थात् 'अहं' ही वृत्ति उत्पन्न झाली असतां, ब्रम्हसत्ताच भ्रामक पदार्थांच्या रूपानें विकार पावते, आणि अहं ही वृत्ति टाकली कीं, ब्रह्मसत्ता केवळ स्वरूपनिष्ठ व श्रमशालिनीच बनते. सोन्याचें कडें हा पदार्थ जसा सोन्याहून भिन्न नसतो, त्याप्रमाणें 'अहंपण' शमस्वरूप आत्मसत्तेहून निराळें नाहीं. ज्ञानी निर्विकार, विमनस्क, मौनी, कर्ता, अकर्ता, शीतल, शांत व शून्य हृदयाकाशांतहि चैतन्यपूर्ण होऊन रहातो. ज्याप्रमाणें कळसूत्री बाहुली कोणत्याहि प्रकारच्या वासनेवांचून शरीराची हालचाल करीत असतांना दिसते, त्याप्रमाणें ज्ञानी सर्व व्यवहार उत्तम प्रकारें करीत असतांनाहि अक्षुब्ध चित्तानें स्वरूपामध्यें स्थिर रहातो. त्याचें अंतःकरण वासनाशून्य झालेलें असल्यामुळें 'मी ही हालचाल करितों' असा अभिमान तो धरीत नाहीं. 'पण शरीराची हालचाल होत असतांना त्यांतील आत्म्याची हालचाल कशी होणार नाहीं ?' असें विचारशील तर सांगतों. पाळणा हालत असतांनाहि त्यांतील बालकाचीं अंगें जशीं स्थिर रहातात, त्याप्रमाणें शरीर व्यवहार करीत असतांनाहि देहाभिमानाच्या अभावीं स्वरूपामध्यें ज्ञानी स्थिर रहातो. चित्तवृत्तीला बहिर्मुख न होऊं देतां केवळ ज्ञाननिष्ठ, निष्काम, निःसंकल्प झालेला पुरुष अनात्मपदार्थाचें अनुसंधानच करीत नाहीं. कारण तो शांत, अनंत, आत्मरूप झालेला असतो. जो स्वतः अभिमान सोडल्यामुळें द्रष्टा बनतो, दृश्यापासून अगदीं दूर असतो, जो इंद्रियांशीं तादात्म्य पावत नाहीं, जो निराकार, अनपेक्ष व केवळ तद्रूप झालेला असतो, तो अनात्म्याचें अनुसंधान कोठून करणार ? अपेक्षा हाच घोर बंध व उपेक्षा हीच मुक्ति. निष्कामतेमध्यें जो स्थिर स्थित झाला आहे, तो मुक्तीवांचून दुसरें काय पाहणार ? शरीरासाठीं सर्व पदार्थांची अपेक्षा असते. पण तें शरीरच स्वप्नांतील शरीराप्रमाणें असत्—भ्रममात्र आहे, असें विवेकानें ठरल्यावर पुरुष कशासाठीं कसली अपेक्षा करणार ? ज्ञानी सर्व क्रिया टाकून, सर्व कौतुक सोडून, सर्व विषयज्ञानाचा त्याग करून, केवळ चिन्मात्र होऊन रहातो. हे रामा, माझा हा सर्व उपदेश ऐकतांच मंकीनें आपला महामोह निःशेष टाकला आणि कात टाकल्यावर सर्प जसा सुखी होतो, तसा तोहि सुखी झाला. त्यानंतर प्रारब्धप्राप्त कर्तव्य, वासनाशून्य मनानें करीत तो शंभर वर्षें पर्वतावर

शांत चित्तानें राहिला. शेवटीं ब्रह्मरूप होऊन अद्यापि पाषाणासारखा तो तेथें राहिला आहे. त्या योग्याचीं सर्व इंद्रियें शांत झालीं असून त्याला कोणी मुद्दाम जाऊन जागें करील, तेव्हांच तो देहभानावर येतो. हे राघवा, तूंहि याच विवेकोपायानें ज्ञानामध्यें उदय पावलेल्या मनानें आत्मानंदांत विहार करण्यासाठीं शांतीला संपादन कर. तुझी बुद्धि विषयासक्त होऊन शरदृतूंतील जल रहित मेघपंक्ति जशी क्षणांत नहींशी होते त्याप्रमाणें ती विवेकहीन होऊन दीनतेला प्राप्त न होवो. २६.

---

## सर्ग २७ वा.

—:०:—

१ चित्तस्पंदामुळें चित्तत्वाचें स्पंदन होत आहे, अशा भ्रामक समजुतीनें विश्वविभूति भासतात. २ चित्तशांतीनें त्यांची शांति होऊन स्वरूपस्थितीचा लाभ होतो.

**श्रीवसिष्ठः**—हे रामा, तूं शांत हो, निर्विकार हो; प्रारब्धानुसार जी अवस्था प्राप्त होईल तिचें अनुवर्तन करणारा हो. स्फटिकाची प्रतिमा जरी विद्यमान असली तरी दृष्टीच्या प्रसाराला प्रतिबंध करीत नसल्यामुळें ती असत् असल्याप्रमाणें म्हणजे नसल्यासारखीच जशी होते, त्याप्रमाणें तूं विद्यमान असलास तरी म्हणजे शरीर असेपर्यंत तुझा जीवभाव जरी नष्ट न झाला तरी, अद्वैतदृष्टीच्या प्रसाराला तो प्रतिबंध करीत नसल्यामुळें तूं विद्यमान असतांही नसल्यासारखेंच वर्तन कर. आत्मा एकच असून सर्वव्यापकतेमुळें तो ज्ञानाच्या पूर्वीं सर्वांचा आत्मा होऊन राहिला आहे असें वाटतें. पण आत्मज्ञान झाल्यावर व्यष्टि व समष्टि या भावांचा बाध झाल्यामुळें तो एक आहे किंवा सर्वांमध्यें आहे ही कल्पनाच उरत नाहीं. सर्व चिदाकाश आदि-अंतरहित आहे. चित्त त्यानेंच परिपूर्ण आहे. तेव्हां शरीराची उत्पत्ति किंवा विनाश झाला तरी चित्तत्वांत कांहीं खंड पडत नाहीं. चैतन्याचा मिथ्या विकार असें जें मन, त्याच्या स्वाभाविक चपलतेमुळें जड वस्तूंच्या क्रिया दिसतात. जलांत जसे तरंग त्याचप्रमाणें वास्तविक अचपल चित्च्या सत्तेनें जड पदार्थांमध्यें हालचाल होते. ज्याप्रमाणें शुभ्र मेघ हें वस्त्रच आहे, अशी जरी कोणाला शंका आली तरी तो मेघ वस्त्राचें कार्य करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें "हा देहच मी आत्मा" ही समजूत खरी नव्हे. हे रामा, म्हणून तूं मिथ्या देहादिकांमध्यें अहंभाव धारण करून त्यांतच निमग्न होऊं नकोस. कारण देहाभिमानामुळें तुला अपार संसारसागरांत पडावें लागेल. तूं अनंत सुखासाठीं व मोक्षासाठीं आद्य तत्त्वाचें चिंतन कर. चिदाकाश अनंत आहे, त्याला इयत्ता नाहीं. तोच सर्वत्र सम असलेला आत्मा आहे. तीच परम वस्तु होय. तूं आपल्या आत्म्याला तत्परायण कर. तूं असा निश्चय केलास व मनाला आत्ममय बनविलेंस म्हणजे तंच तो निरंजन नारायण होशील. ध्याता, ध्येय, ध्यान, हें सर्व खोटें आहे. त्यामुळेंच मनाला आत्ममय केलें म्हणजे ही त्रिपुटी बाधित होते. द्रष्टा, दृश्य, दर्शन या चित्च्याच विभूति आहेत. जड वस्तु चिद्वस्तूहून निराळी केव्हांच दिसत नाहीं. म्हणून दृश्य सर्वदा दर्शनानुसारीच असतें. म्हणजे जडवस्तूंचा अनुभव चित्-वस्तूच्या अधीन असतो. पण ध्येयाची गोष्ट तशी नाहीं. ध्येय ब्रह्म स्वतःसिद्ध असल्यामुळें ध्यानावांचूनही रहातें, व ध्यानावांचून त्याचा अनुभवही येतो. त्यामुळें चिद्वस्तु ध्यानानुसारी नाहीं. म्ह० ध्यान केलें

तरच त्याची सिद्धि होते, असें नाहीं. प्रतिपदेचा चंद्र उदय पावला असतां समुद्र क्षुब्ध होतो व प्रलयवायु वाहूं लागला असतां शुष्क होतो. पण आत्मतत्व सर्व अवस्थांमध्यें सम व सौम्य असतें, तें कधीं क्षुब्ध होत नाहीं व शांत होत नाहीं. असें जर आहे तर द्रष्टा, दृश्य इत्यादि त्रिपुटी आत्म्याची विभूति कशी, असें विचारशील तर सांगतों. ज्याप्रमाणें नौकेंत बसून जात असलेल्या लोकांना तीरावरील वृक्षादि चालत आहेत असा भास होतो, किंवा शुक्तीला पाहून ही चांदी आहे असें वाटतें, त्याचप्रमाणें देहादि आत्मा आहे, असें वाटणें हा भ्रम आहे. याप्रमाणें देहदृष्टया चित्तहि कल्पित आहे. चित्त व देह या दोहोंच्या दृष्टीनें जीव कल्पित आहे. जीवदृष्टया देह व चित्त कल्पित आहेत आणि शुद्ध चित् हें त्या सर्व कल्पनांचें अधिष्ठान आहे. अर्थात् तिचेच देहादि हे सर्व मिथ्या परिणाम आहेत. पण ब्रम्हदृष्टीनें हें सर्व एक शांत व सर्वव्यापक आहे. जगदादिक दुसरें कांहीं नाहीं इतकेंच नव्हे तर जगत् आहे व ब्रम्हसत्ता नाहीं असें जें तुला वाटत होतें, तें खरें नव्हे. आकाशांत जसें वन संभवत नाहीं, वाळूपासून तेल निघणें जसें शक्य नाहीं व चंद्रबिंबांत जशी विद्युत् संभवत नाहीं, त्याप्रमाणें चित्तत्त्वांत देहादिक संभवत नाहीं. हे रामा! अविद्यमानच असलेल्या या जगद्रूपाला भिऊं नकोस, हेंच परम सत्य आहे, असें समज. जगत् आहे आणि ब्रम्ह नाहीं, अशी जी तुला भ्रांति होती, ती आज माझ्या उपदेशानें शांत झाली आहे. संसारबंधाचें कारण त्या भ्रांतीवांचून दुसरें काय आहे? मृत्पात्रें जशीं मृन्मात्र असतात, तसें हें चिन्मात्र आहे आणि तत्त्वविचार केला असतां तें आपोआप क्षीण होतें. हे रामा, तूं माझ्या या सौम्य उपदेशानें अहंभावरूप संकल्पापासून मुक्त हो. संपन्न स्थितींत हृष्ट होऊं नकोस, व आपत्ति आली असतां खेद करूं नकोस. उत्कर्ष व अपकर्ष या दोन्ही अवस्थांमध्यें सम स्थित हो आणि माझ्या या उपदेशाला विसरून व स्वरूपस्थितीला सोडून राहूं नकोस. हे दाशरथे, हे रघुकुलाकाशांतील चंद्रा, तूं ब्रह्मात्मैक्यवस्तूला साक्षात् जाणून कृतकृत्य झालास म्हणजे मग चित्ताला संताप देणारे जे हर्ष, शोक, इच्छा, इत्यादि दोष त्यांचा वाटेल तर त्याग कर, किंवा प्रारब्धाच्या प्रबल दोषामुळें त्यांचा त्याग करणें अशक्य झाल्यास त्यांचें अनुवर्तन कर. त्याग केलास तर जीवन्मुक्तिसुखाचा अनुभव घेशील व अनुवर्तन केलेंस तर दृष्ट दुःखाचा क्षय होणार नाहीं, पण विदेह मुक्ति प्राप्त होईलच. २७.

---

## सर्ग २८ वा.

—:०:—

१ बीजांकुरभूत जन्म देणाऱ्या दैवनांवाच्या कर्माचें तत्त्व.

**श्रीरामः**—हे प्रभो, बीज, अंकुर, कर्ते पुरुष, त्यांचीं विहित-निषिद्ध कर्में, हीं दृष्ट सामग्री व दैव या नांवाची अदृश्य सामग्री यांच्या योगानें जन्ममरणपरंपरारूप संसारानर्थ उत्पन्न होतो. यास्तव त्यांचें तत्त्व थोडक्यांत सांगा.

**श्रीवसिष्ठः**—रामा, दैवाचें तत्त्व कर्म आहे. कर्माचें तत्त्व पुरुष आहे, पुरुषाचें तत्त्व मनोरूप चित्स्पंद आहे. मनाचें तत्त्व चिदात्माच आहे. तो चिदात्मा 'मीं बहुरूप व्हावें, उत्पन्न व्हावें,' अशा प्राथमिक संकल्परूप चित्स्पंदानें समष्टि—व्यष्टिमय होतो. त्यानंतर, देहावर मी असा अभिमान ठेविल्यामुळें तो चिदात्माच पुरुष होतो. नंतर कर्में करणारा तो पुण्यपाप-

रूप देवत्वाला प्राप्त होतो, त्याच्या भोगासाठीं घट-पट इत्यादि पदार्थ बनतो. सर्व भोग्य-पदार्थ हेंच जगत् आहे. त्यामुळें तो परमात्माच आपल्या स्पंदाच्या द्वारा हें सर्व बनला आहे. संविदूच्या स्पंदावांचून पुरुषत्व किंवा कर्म कसें होणार? सर्व पदार्थ संविदूच्या सत्तेनें व स्फूर्तीनें सत्ता-स्फूर्तियुक्त होतात. त्यामुळें संविद्चेच ते मिथ्या परिणाम होत. वासनायुक्त संवित्स्पंदापासून जगल्लक्ष्मी प्रवृत्त होते व वासनारहित संविद् स्पंदामुळें संसार निवृत्त होतो. संविद्चें वासनारहित स्पंदन हें अस्पंदनच आहे, असें विद्वान् समजतात. कारण तरंग आपल्या कारणांत लीन झाला ह्मणजे समुद्ररूप बनतो, मग त्याला तरंग असें ह्मणत नाहींत. संविदूचा स्पंद व आत्मा यांमध्यें केवल कल्पनानाशावांचून यत्किंचित्‌हि भेद नाहीं. ह्मणून हे रामा, सृष्टींतील पुरुष व कर्म हीं दोन्ही चित्स्पंदच आहेत. त्यामुळें जल व तरंग यांचें द्वित्व जसें केवल काल्पनिक, त्याप्रमाणें चित्स्पंदरूप पुरुष व कर्म यांचा भेद काल्पनिक आहे. अधिष्ठानाच्या दृष्टीनें त्यांत भेदच नाहीं. रामा, पुरुषच कर्म आहे व कर्मच पुरुष आहे. ते दोन्हीं बर्फ व शीतत्व यांसारखेच अभिन्न आहेत. जें बर्फ तेंच शैत्य, जें शैत्य तेंच बर्फ, याप्रमाणें पुरुष तेंच कर्म, व कर्म तोच पुरुष. संविद्स्पंदरसाचेच दैव, कर्म, पुरुष इत्यादि सर्व पर्यायशब्द आहेत. कर्मादिक त्यांहून भिन्न नाहींत. स्पंदामुळें संविदच जगद्बीज होते आणि अस्पंदामुळें तिच्यांतील बीजत्व नष्ट होतें. बीजामध्यें जे सूक्ष्म अवयव असतात, तेच अंकुररूपानें व्यक्त होतात. चित् स्वभावतःच क्वचित् स्पंदयुक्त असते. क्वचित् स्पंदरहित असते. अपार सागराप्रमाणें ती दिशा काल, क्रम या रूपानें व्यक्त होते, कोठें व्यक्त होतहि नाहीं. संवित्स्पंद वासनावान् होऊन वस्तुतः कारण नसतांनाहि कारण होतो; देहादि अंकुरांचें बीज बनतो. तृण, वल्ली, लता, इत्यादिकांच्या बीजामध्येंहि संविदूस्पंदच मुख्य बीजरूपानें रहातो. ह्मणजे इतर सर्व लौकिक बीजांचें तो बीज आहे, पण त्याचें बीज दुसरें कांहीं नाहीं. अग्नि व उष्णता यांचा जसा भेद नाहीं, त्याचप्रमाणें बीज व अंकुर हीं पृथक् नाहींत. बीजच अंकुर आहे असें तूं समज. तसेंच कर्मच मनुष्य आहे, असें तूं जाण. भूमीच्या उदरांत स्फुरण पावणारी चित् स्थावरांचे अंकुर उत्पन्न करिते. पाण्यावर जसे बुडबुडे त्याप्रमाणें तिच्यापासून स्थूल, सूक्ष्म, मृदु, व कठीण अंकुर उत्पन्न होतात. अहो, अतिशय मृदु असलेल्या भूतलापासून वज्रासारखे कठिण अंकुर उत्पन्न करण्यास चिदात्म्यावांचून कोण समर्थ आहे? ज्याप्रमाणें पुष्प व फल यांना लतेंतील रस उत्पन्न करितो, त्याप्रमाणें प्राण्यांच्या शरीरांतील साररूप रसांत असलेली संविद् प्राण्यांच्या शरीराला उत्पन्न करिते. ती सर्वव्यापिनी संविद् जर अशी अति बलाढ्य नसती, तर देव, असुर, राजे इत्यादिकांच्या उत्कर्षाला कशी कारण झाली असती? स्थावर व जंगम पदार्थांचें आद्य बीज संवित्स्फुरणच आहे. त्याचें बीज दुसरें कांहीं नाहीं. त्यामुळें बीज व अंकुर, क्रिया व पुरुष आणि दैव व तरंग, लाटा व उर्मी, यांचा अधिष्ठानदृष्ट्या भेद नाहीं व परस्परहि भेद नाहीं. जो मनुष्य व त्याचें कर्म यांमध्यें बीजांकुरन्यायानें द्वित्व पहातो त्या मोठ्या विद्वत्पशूला नमस्कार असो. संविदेमध्यें असलेला जो वासनारस तेंच जन्माचें बीज आहे. त्याच्यापासूनच जन्माचा अंकुर उद्भवतो. रामा, तूं त्याला असंगरूप अग्नीनें जाळून टाक. शुभाशुभ कार्य प्रारब्धानुसार करीत असतांना किंवा त्याचा त्याग करतांना मनानें त्यांत

निमग्न न होणें यालाच ज्ञानी लोक असंगत्व म्हणतात; किंवा वासनांचा उच्छेद करणें हाच असंग होय. कोणत्याना कोणत्या तरी युक्तीनें त्याला तूं संपादन कर. ह्मणजे वासना हाच संग आहे असें वाटत असेल, तर त्याचा उच्छेद करण्यासाठीं तूं तत्त्वज्ञानाचा अभ्यास कर. तुला राजयोगरूप युक्तीनें वासनाक्षय साध्य वाटत असेल, तर तूं त्याच्यायोगानें वासनाशून्य हो. हठयोगाचा आश्रय करावा असें तुला वाटत असेल तर तसें कर, पण दीर्घकाल अभ्यास करून तो संपादन कर. वासनाक्षयानंतर जें तुझें स्वरूप अवशिष्ट राहील, तेंच परम पद आहे असें समज. वाटेल त्या यत्नानें या अहंभावाचें निवारण कर. हाच वासनाक्षय आहे. पुरुषाच्या ध्यानादि प्रयत्नावांचून संसाराचें उल्लंघन करून जाण्यास दुसरा उपाय नाहीं. अहंकारत्याग हाच वासनाक्षय आहे, व त्यालाच संसारोत्तरण म्हणतात. जी आद्य संविद्, तोच अंकुर, तेंच बीज, तेंच कर्म, तोच पुरुष व तेंच शुभाशुभ दैव आहे. सृष्टीच्या पूर्वीं संविदेहून निराळें बीज नसतें, अंकुर नसतो, पुरुष नसतो, कर्म नसतें व दैवहि नसतें. तर केवळ चित्च त्या त्या आकारानें उदय पावते. हे रामा, वस्तुतः बीज नाहीं, अंकुर नाहीं, कर्म नाहीं व पुरुषहि नाहीं, म्हणजे त्यांना स्वतः अस्तित्व नाहीं. अर्थात् एक चित्स्वरूपच देव, नर, असुर यांच्या नाममात्र आकारांनीं एखाद्या नटाप्रमाणें नटलें आहे. यास्तव, हे शांतस्वरूप रामा! तूं अशा रूपाचेंच निःशंकपणें चिंतन करून पुरुष, कर्म इत्यादि मिथ्या गोष्टींचा विचारहि टाकून वासनाशून्य हो; आणि मग तुझ्या इच्छेप्रमाणें वाटेल तर समाधिस्थ होऊन रहा किंवा प्रारब्धानुसार व्यवहार करीत रहा. रामा! तूं आपल्या सर्व इच्छा टाकून दे. निःशंक हो. केवल चिन्मात्र, सर्व कर्तव्यें करणारा, केवळ आत्म्यामध्येंच आराम पावणारा, पूर्णकाम व शमाच्या योगानें रमणीय व निर्भय हो. २८.



## सर्ग २९ वा.

१ व्यवहारांत प्राप्तलोकचर्या करणें व त्याचवेळीं स्वरूपामध्यें स्थिर रहाणें या दोन गोष्टींचा उपदेश.

श्रीवसिष्ठः—रामा! तूं नित्य अंतर्मुख होऊन रहा. वीतराग हो. वासनाशून्य हो. सर्वत्र चिन्मात्र, शुद्ध व शांत रूपाची भावना कर. तूं आकाशाप्रमाणें स्वच्छ, ज्ञानी, केवल चिन्मात्रस्वरूप, सर्वत्र सम, सौम्य, समानंद, सर्वव्यापक व सर्वत्र ब्रह्मरसाचा अनुभव घेणारा हो. शोक, घोर आपत्ति, अनेक संकटें, मोठे मोठे अनर्थ किंवा अशींच दुसरीं कांहीं अल्प किंवा महत् कार्यें जीं जीं प्राप्त होतील, तीं सर्व मनांत खिन्न न होतां यथाक्रम व त्या त्या देशांतील धर्माला अनुसरून तूं कर. डोळ्यांतून अश्रु ढाळून मोठ्यांनीं आक्रंदन करण्यापर्यंत जरी दुःख झालें, व निरनिराळ्या प्रकारें सुखानुभव आला, प्रिय मनुष्यांचा समागम झाला, उत्सव व उत्कर्ष यांचे प्रसंग आले, तरी तूं त्या सर्वांमध्यें आनंदाचा अनुभव घे. मूढाप्रमाणें वासनांनीं व्याकुल होऊं नकोस. संग्रामादिकांमध्यें यमासारखा क्रूर होऊन एखाद्या मूढाप्रमाणें सर्व भूतांना जाळून टाक. दावाग्नि गवताला जसा जाळतो, त्याप्रमाणें तूं संग्रामांत शत्रूंना जाळून टाक. तूं केव्हांहि खिन्न न होतां, धर्माच्या अविरुद्ध क्रमानें प्राप्त झालेल्या कार्यांमध्यें अर्थाचें चिंतन कर, व त्याला संपादनहि कर. एखादा भोगवासनांनीं

व्यापलेला मूढ धनाचें चिंतन जसें करितो, त्याप्रमाणें तूंहि बकवृत्तीनें त्याचें चिंतन कर. जसा वारा जलरहित मेघांना उडवून देतो, त्याप्रमाणें तूंहि सर्व शत्रूंना स्वसामर्थ्यानें पराभूत कर. त्या वेळींहि तूं वासनवान् मूढाप्रमाणेंच आपलें कर्तव्य कर. करुणेला योग्य असलेल्या उत्तम जनांवर धैर्यानें दया कर. बाह्य व्यवहार करतांना तूं सामान्य मनुष्याप्रमाणेंच रहा. पण आपलें मन मात्र आत्म्याच्या ठिकाणीं स्थिर ठेव. आत्मस्वरूपांतच विश्रांति घे व आत्मश्लाघा करूं नकोस. तूं सामान्य माणसांप्रमाणेंच हर्षप्रसंगीं हृष्ट हो, दुःखप्रसंगीं दुःखित हो; दीनावर दया कर. व वीरासमोर वीर्यवान् हो; पण हें सर्व काम करीत असतांनाहि तूं अंतर्मुख रहा. सर्वदा आनंदित रहा, स्वात्म्यामध्येंच रममाण हो. रामा, याप्रमाणें शमानें युक्त होऊन जो प्राप्त कार्य करितो, तो वस्तुतः त्याचा कर्ताच नव्हे. हे साधो! आत्मभावनेनें ज्याला सतत अंतर्मुख स्थिति प्राप्त झाली आहे त्याच्या शरीरावर वज्रप्रवाह जरी झाला तरी तें वज्रच कुंठित होतें, त्याला कांहीं पीडा होत नाहीं. कारण सर्व संकल्पविकल्पापासून मुक्त झालेला, स्वसंविद्रूप कूटरांत शांतपणें बसलेला व आत्म्यामध्यें यथेष्ट विश्रांति पावलेला तो महेश्वरच आहे. त्याला शस्त्रें तोडीत नाहींत, पाणी भिजवीत नाहीं, अग्नि जाळीत नाहीं, व वायु सुकवीत नाहीं. जरामरणरहित, सुस्थिर, अज स्वात्म्याला आलिंगन देऊन धैर्यानें रहा. स्तंभाच्या आधारावर जसें घर रहातें, तसा तूं त्याच्या आधारावर रहा. जगद्वृक्षाच्या पदार्थरूप पुष्पांचा रम्य सुगंधच, अशा ब्रह्मसंविदेचा आश्रय करून सर्व बाह्य संविदांना अंतर्मुख कर. तूं स्वरूपामध्यें स्थित हो. कारण सतत अंतर्मुख राहून बाह्य कार्यें करणारे पुरुष जरी जीवंत असले तरी दगडाप्रमाणें त्यांच्यामध्यें वासना उत्पन्न होत नाहीं. रामा, तूं आपल्या मनाला आत्मानंदांत निजव; तें पुनः क्षुब्ध होणार नाहीं अशा रीतीनें त्याला निजव. सर्व कर्में करीत असतांनाहि कांसवाच्या अंगांप्रमाणें सर्व वृत्तिशून्य होऊन रहा. बाह्य व्यवहार कर, पण आंतील मनावर त्याचा परिणाम होऊं देऊं नकोस. ह्मणजे बाह्य व्यवहारांत जागणारें पण अंतर्व्यवहारांत निजलेलें अशा चित्तानें तूं व्यवहार कर. लहान बालक, उन्मत्त, इत्यादिकांच्या व्यवहाराप्रमाणें आंतून ज्यानें वासनांचा त्याग केला आहे असा तूं प्राप्त व्यवहार जरी करीत असलास तरी आकाशाप्रमाणें तुझें चित्त लिप्त होणार नाहीं. आंतून वृत्तित्याग केल्यामुळें लीन झालेलें, पण बाह्यव्यवहारांत किंचित् प्रसार पावणारें अशा चित्तानें तूं सर्व संतापशून्य होऊन रहा. चित्त आतून अत्यंत सुप्तसें झालें ह्मणजे नुसत्या बाह्य व्यवहारानें तुला दुःख होणार नाहीं. ज्ञानामुळें चित्तक्षयाचा उदय झाला ह्म० मग संकल्पानें मलिन न झालेल्या शुद्ध संविदेमध्यें स्थित होऊन, मग तूं पाहिजे तर बाह्य व्यवहार कर, नाहीं तर करूं नकोस. निद्रित पुरुषाच्या चित्ताप्रमाणें सर्व वृत्तिरहित चित्तानें जागृतींतील व्यवहार करतांना तूं पाहिजे तर इष्ट पदार्थांचा संग्रह कर किंवा त्याग कर. अथवा कशाचाच संग्रह करूं नकोस, व त्यागहि करूं नकोस. तूं जाग्रद्-अवस्थेंतहि स्थूल व सूक्ष्म उपाधींचा लय केल्यामुळें जर निद्रित राहाशील व सुषुप्तींतहि अज्ञानावरणाच्या अभावीं जागशील, तर जागृति व सुषुप्ति यांचें ऐक्य होईल. कारण अज्ञान व त्याचें कारण या दोघाचा बाध झाल्यावर त्या दोन्ही भिन्न अवस्था आहेत, असें म्हणण्यास कारण रहात नाहीं.

याप्रमाणें त्यांचें ऐक्य झाल्यावर जें सन्मात्र तत्त्व अवशिष्ट रहातें, तेंच तूं आहेस. त्या अवस्थेंत तूं सर्व दुःखशून्य होशील. रामा, या प्रमाणें हळूहळू अभ्यास करून तूं सर्व वस्तूंहून अगदीं विलक्षण, अद्वन्द्व, आद्यंतरहित फलाची प्राप्ति करून घेऊन जगत् द्वैतहि नाहीं व अद्वैतही नाहीं एवढाच निश्चय तूं ठेव, आणि त्या योगानें आपलें अंतःकरण आकाशासारखें स्वच्छ करून परम-विश्रांतीला प्राप्त हो.

श्रीरामः—हे मुनिश्रेष्ठ, सर्व द्वैताचा बाध झाल्यावर मी वसिष्ठ आहें, ही भावनाहि तुमच्यामध्यें अवशिष्ट रहाणें शक्य नाहीं. मग आपण उपदेशादि व्यवहार कसा करतां?

श्रीवाल्मीकिः—रामानें असें विचारलें असतां, वक्त्यांतील श्रेष्ठ वसिष्ठ क्षणभर स्तब्ध बसला. त्याची श्वासोच्छ्वासादि क्रिया स्पष्ट चालली असतां तो कांहीं बोलला नाहीं. तेव्हां सभेंतील महाजन मोठ्या संशयसागरांत पडले. तें पाहून राम पुनः म्हणाला—"भगवन्, आपण मजप्रमाणेंच असे स्तब्ध कां बसलांत? जगांत असा प्रश्नच नाहीं कीं, ज्याविषयीं शिष्यांनीं प्रश्न केला असतां, विद्वान् गुरु त्याचें उत्तर देऊं शकत नाहींत."

श्रीवसिष्ठः—रामा, मी तुझ्या प्रश्नाचें उत्तर देण्यास असमर्थ असल्यामुळें, किंवा सर्व उपाय खुंटल्यामुळें स्तब्ध बसलों. असें समजूं नको. तर हा प्रश्न गहन आहे व स्तब्ध बसणें हेंच याचें उत्तर आहे. प्रश्न करणारा दोन प्रकारचा असतो. एक तत्त्वज्ञ व दुसरा अज्ञ. अज्ञाला अज्ञतेनें व ज्ञान्याला ज्ञानदृष्टीनें उत्तर दिलें पाहिजे. हे महाबुद्धिमाना, तूं एवढा वेळ अज्ञ होतास. तें परमपद तुला ज्ञात झालेलें नव्हतें. त्यामुळें तूं सविकल्प उत्तरांचा अधिकारी होतास, पण आतां तत्त्वज्ञ झाला आहेस, परमपदीं विश्रांति पावला आहेस; त्यामुळें सविकल्प उत्तरांना मुळींच योग्य नाहींस. हे वाङ्मिन्, जेवढा म्हणून वाङ्मय उल्लेख असतो—मग तो मोठा असो कीं अल्प असो, त्याचा अर्थ गहन असो किंवा सुलभ असो, तो सर्व सापेक्ष असतो. निरपेक्ष शब्द संभवत नाहीं. पण तत्त्वज्ञाला अशा कलंकानें युक्त असलेलें उत्तर देणें योग्य नाहीं. कलंकरहित वाणीच नाहीं. तूं तर मोठा तत्त्वज्ञ झाला आहेस. आणि तुझ्यासारख्या ज्ञानी शिष्याला यथाभूत तत्त्व सांगणेंच योग्य आहे. अंतरहित, काष्ठमौन हाच तत्त्वार्थ आहे. कारण, तत्त्वज्ञानाचा उदय होण्यापूर्वींच उपदेश प्रवृत्त होतो, आणि त्या वेळीं सविकल्प वाणीचाच आश्रय करावा लागतो. पण विचारानें तत्त्वाची ओळख झाली म्हणजे शब्दाची प्रवृत्तिच कुंठित होते. सर्व संकल्प शांत होतात. अशा प्रकारचें जें मौन, तेंच परमपद होय. हे प्रिय शिष्या, तुझ्यासारख्या तत्त्वज्ञाला तसें मौनानें उत्तर देणेंच मला प्राप्त होतें. पुरुष जसा असतो, तसा बोलतो. मी केवळ ज्ञेयरूप असल्यामुळें वाणीचा विषय न होणाऱ्या परमपदीं स्थित आहें. जो वाग्-अगोचरपदीं स्थित असतो, तो वाग्रूप मल कसा धारण करील? त्यामुळें मी ज्याविषयीं कांहीं बोलतांच येत नाहीं त्याविषयीं बोलत नाहीं. कारण वाक् संकल्पानें मलिन झालेली असते.

श्रीरामः—हे भगवन्, वाणीमध्यें जे जे दोष प्रवृत्त होतात, त्या सर्वांना सोडून तुम्ही कोण तें मला सांगा. म्हणजे त्या दोषांमध्यें शब्दाचें तात्पर्य न ठेवतां निरुपाधिक वस्तूतच तें कसें राहील हें मला सांगा. म्ह० मला लक्षणेनें तत्त्वबोध करा.

श्रीवसिष्ठः—रामा, असें जर असेल तर वस्तूंचें स्वरूप जसें आहे, तसें मी तुला

सांगतों. हे तत्त्ववेत्त्यांतील श्रेष्ठा, तूं कोण, मी कोण, व हें जगत् काय आहे, तें ऐक. मी तर निरामय, चिदाकाश आहें. मी विषयविज्ञानशून्य व सर्व संकल्परहित आहें. मी स्वच्छ चिदाकाश आहें. तूंहि आकाशच आहेस, व हें सर्व जगत् आकाशमात्रच आहे. मी केवळ शुद्ध ज्ञानरूप आहें. शुद्ध ज्ञानामध्येंच स्थित आहें. विषयज्ञानानें रहित आहें. त्यामुळें प्रत्यग् आत्म्याहून अणुमामात्रहि अन्य वस्तु आहे असें मी समजत नाहीं. असें जर आहे, तर अज्ञ लोकांना बोध करावयास व प्रतिवाद्यांशीं वाद करावयास अहंकारयुक्त विद्वान् कसे तयार होतात, असें म्हणशील तर सांगतों. शिष्यांना संसारदुःखांतून सोडविण्यासाठीं व प्रतिवाद्यांना निःसंदेह करून मोक्षमार्गांत प्रवृत्त करण्यासाठीं उद्योगी विद्वान् श्रुति, युक्ति इत्यादि प्रमाणांनीं स्वपक्ष उत्थापित करून बाधित झालेल्या अहंकाराचाहि स्वतःवर मिथ्या आरोप करितात आणि एका आत्म्याचेच शतशः भाग कल्पितात, पण त्या कल्पित विभागानें अज्ञजनांप्रमाणें मोहित होऊन द्वैतदृष्टि बनत नाहींत. पण अशा रीतीनें पांडित्य प्रकट करण्याचा जो प्रकार तेंच परमपद आहे, असें मात्र समजूं नको. कारण जिवंत असतांनाहि अति शांत, व व्यवहार करीत असतांनाहि शवाप्रमाणें मनांत अतिशय जड, म्हणजे संवेदनशून्य होऊन रहाणें हेंच परमपद होय. तें परमपद अंतर्बहिःसाधनशून्य असल्यामुळें, मी कर्ता, भोक्ता या भावनेनेंहि शून्य असतें. त्यामुळेंच प्राप्त विषय भोगीत असतांनाहि तें सुख-दुःख-रहित असतें. तें स्वप्रकाश, निरतिशय व आनंदरूप असल्यामुळें शिवस्वरूप आहे. या अहंतेचा अभाव हाच मोक्ष व अहंता धारण करणें हाच बंध आहे. पण साधकावस्थेंत, या अहंतेलाच शिवरूप मानून तिच्या द्वारा मोक्षाचा शोध केला आहे. जन्मांधानें चित्र पहाण्याचा जसा उद्योग करावा, त्यांतलाच हा प्रकार आहे. शरीर हालचाल करीत असतांना किंवा तें स्थिर असतांना मनानें पाषाणाप्रमाणें असणें हेंच निर्वाण, व तेंच परमपद आहे. पण तें दुसऱ्या मनुष्याला दिसणें शक्य नाहीं. ज्याचा त्यानेंच अनुभव घेतला पाहिजे. जो लौकिक फलाविषयीं विरक्त झालेला असतो, त्यालाच आंतल्या आंत या स्थितीचा अनुभव येतो. याला विषयज्ञानाचाच दृष्टान्त आहे. विषयसंवेदन ज्याचें त्याला मनांतल्या मनांत होतें. एकाचें विषयज्ञान दुसऱ्याच्या अनुभवाला येत नाहीं. चिद्रूप परम पदामध्यें अहंता नाहीं, त्वत्ता नाहीं, अनहंता नाहीं व अन्यताहि नाहीं; तर एक कैवल्य आहे. तेंच निर्मल, कल्याणरूप निर्वाण आहे. या चेतनाचें विषयोन्मुखत्व हाच संसार आहे. तोच अतिशय क्लेश देतो. चैतन्यानें विषयोन्मुख न होणें हेंच अचेतनत्व आहे. त्यालाच मोक्ष व परम शांत अव्यय पद तूं जाण. दिशा, काल इत्यादिकांनीं परिच्छिन्न न झालेल्या शांत निर्विकार आत्म्यामध्यें स्थित झाल्यावर विषय संभवतच नाहीं. मग त्याला आत्मभिन्न वस्तूचें भान कोठून होणार? ज्याप्रमाणें स्वप्नांतील संविदेमध्यें उत्पन्न झालेला जगद्रूप संकल्प संविद्रूपच जरी असला तरी त्या रूपाला सोडून अन्यरूप होतो, त्याप्रमाणें हा आत्मा बहिर्मुख झाला असतां जडप्रपंचरूप बनतो. मन, बुद्धि, इत्यादि हे सर्व पदार्थ संविन्मात्ररूप आहेत, पण त्यांची मन, बुद्धि इत्यादि पदार्थरूपानें भावना केली कीं ते जडरूप होतात. याप्रमाणें सबाह्यअभ्यंतर एक, स्वच्छ, अज संविदच पसरलेली असतांना त्यांत बहिर्मुखतारूप भेदबुद्धि उत्पन्न होणें, हेंच एक सर्व अनर्थाचें

बीज आहे. तूं कदाचित् म्हणशील कीं, तर मग शुद्ध संविद् व शून्य यांत अंतर काय? तर सांगतों. ज्ञानी लोक त्यांतील अंतर स्वानुभवानें जाणतात. वाणीनें त्याचें वर्णन करतां येत नाहीं. त्या संविदेचा निरतिशय आनंदरूपानें तज्ज्ञ अनुभव घेतात. ज्याप्रमाणें अंधकारामध्यें मोठ्या यत्नानें एखाद्या वस्तूकडे पाहूं लागलें असतां ती दिसते, तसा हा सदसद्रूप आभास दिसतो. जर मी सर्व वासना सोडून शांत झालों तर मी आकाशच आहें. तूंहि वासना जर दृढ केली नाहींस, तर चिदाकाश आहेस. दुसऱ्याहि एखाद्या पुरुषानें जर आपल्या मनांत चिदाकाशच मी आहें असा निश्चय केला, तर तोहि तज्ज्ञच आहे. तो व्यवहारांत इतर अज्ञ पुरुषांप्रमाणें विद्यमान जरी असला तरी चिद्रूपच असल्यामुळें देहादि नसल्यासारखाच शांत होतो. 'जीवाची अविद्या चिद्रूपानें शांत होते कीं जड रूपानें?' असें विचारशील तर सांगतों. मी अज्ञ आहें, या प्रत्येक जीवाच्या प्रतीतीवरूनच त्याच्या अज्ञानाची सिद्धि होते. संसाररूप अविद्याग्नि त्या अज्ञानाकडूनच प्रज्वलित केला जातो. पण मी ब्रह्म आहें, अशा ज्ञानरूप वायूकडून शेवटीं त्याची शांति होते. अर्थात् अविद्येचा बाध त्याचें जें अधिष्ठान चिद्रूप त्यांत होतो. शांत होणाऱ्या चेतनाचें खांबाच्या अज्ञानासारखें जें जगाविषयींचें अज्ञान, तोच मोक्ष, तेंच अक्षय व अक्षुब्ध परमपद होय. मूलाज्ञान जोंवर आहे, तोंवर बाह्य वस्तूंचें ज्ञान नसणें याला अज्ञान किंवा मूर्खपणा म्हणतात; पण त्या अज्ञानाचा नाश झाला म्हणजे तो मानव मुनि होतो. अर्थात् ज्ञानानें अज्ञानाचा नाश करून ज्ञानित्व संपादन करणें, म्हणजेच मुनि बनणें आहे; व अज्ञानाचा आश्रय करून अज्ञ होणें म्हणजे पशु, वृक्ष इत्यादि बनणें आहे. मी, ब्रह्म व हें जगत् हा अविद्यामय भ्रम आहे. तो असत्य आहे. दिवा लावला असतां अंधकार जसा रहात नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानानें जगद्भ्रम दिसत नाहीं, म्हणून तो खोटा. ज्याची बुद्धि शांत झाली आहे, तो जीवन्मुक्त मनांत किंवा जनांत कसलाहि अनुभव घेत नाहीं. कारण त्याचा इंद्रियसमुदाय जरी व्यवहाराला समर्थ असला तरी तो स्वतः संकल्पशून्य असतो. त्यामुळें त्याला विषयांची संवेदनाच होत नाहीं. स्वप्न जसें सुषुप्तीमध्यें लीन होतें, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाच्या समाधींत सर्व दृश्य लीन होतें. नंतर तो जरी पुनः व्यवहार करूं लागला तरी त्याला सर्वत्र आत्माच दिसतो. आकाशामध्यें जसें नीलत्व, त्याप्रमाणें परमात्म्यामध्यें जगत्. तें केवळ भ्रांतिमात्र आहे. आणि जसें आकाश तसाच तो परमात्मा. हें सर्व दृश्य असत् आहे, अशी ज्याची भावना असते, तो सर्व वासनांनीं युक्त जरी असला तरी वस्तुतः वासनाशून्यच होय. रामा, ज्याप्रमाणें संकल्पानें निर्माण केलेल्या पदार्थांत स्वप्न, माया, इंद्रजाल, हे चमत्कार आहेत, त्याचप्रमाणें संसार हाहि एक चमत्कार आहे. त्यामुळें स्वप्नादि जरी प्रत्यक्ष अनुभवाला येत असलें तरी त्यामध्यें आसक्ति ठेवणें जसें सर्वथा अयोग्य, त्याचप्रमाणें संसारांत आसक्ति ठेवणेंहि अयोग्य कर्ता व भोक्ता यांचाच असंभव असल्यामुळें दुःख, सुख, पुण्य, पाप यांतील कांहीं नाहीं व कोणाचें कांहीं नष्टहि होत नाहीं. दुःखादि सर्व मानस-संकल्प आहेत; ते सर्व शून्य व निराधार आहेत. फार काय, पण 'हें माझें' असा ममत्वप्रत्यय जो भासतो, तोहि चंद्राच्या द्वित्वाप्रमाणें किंवा स्वप्नांतील नगराप्रमाणें मिथ्या आहे. 'हें माझें' असा प्रत्यय ज्याला येतो त्यालामुद्धां आमच्या दृष्टीनें अहंकार नाहींच. वास्तव सर्व द्वैतशून्य झालेला तत्त्वज्ञ

व्यवहार करीत राहो, कीं काष्ठमौन धरून राहो, तो कसाहि जरी असला तरी ब्रम्हत्वास प्राप्त होतो. रामा ! याप्रमाणें मायिक विवर्त-वादाचा आश्रय करून व आरोपित जगाचा अपवाद करून तत्त्वज्ञ परमपुरुषार्थामध्यें प्रतिष्ठित होतो, हें सांगितलें. पण जे दुसरे कित्येक तार्किक परस्परविरुद्ध सिद्धांत कल्पितात. त्यांना जगाची उत्पत्ति, स्थिति, लय, परमपुरुषार्थरूप परमार्थ यांची युक्तीनें व्यवस्था लावितां येत नाहीं. 'तर मग सर्व शून्यच आहे, असें म्हणावें लागेल.' असें जर म्हणशील तर सांगतों. आम्हीं संविद्भिन्न विषयांचा अपवाद जरी केला, ते मिथ्या आहेत असें जरी ह्मटलें, तरी त्या अपवादाचेंहि ग्रहण करणारी संविद् रहात असल्यामुळें शून्यवादाची प्रसक्ति होत नाहीं. ती संविद् नाहींच असें म्हणतां येणें शक्य नाहीं. कारण संविद् नाहीं, असें म्हणणाऱ्या नास्तिकाचा अनुभवच तिची सिद्धि करितो. कारण स्वतःच्या अनुभवाचा कधींच कोणाला अपलाप करितां येत नाहीं, ह्मणजे त्यांना तो नाकबूल करतां येत नाहीं; आणि जो अनुभव तोच आत्मा, तोच सर्व प्रमाण-प्रमेय-व्यवहाराची पराकाष्ठा आहे. हेंच अनिर्वाच्य ब्रम्हतत्त्व होय. अशा सर्वगत ब्रम्हामध्यें हें जगद्वैचित्र्यस्वभावतत्त्व उत्पन्न होतें, असें म्हणतां येणें शक्य नाहीं. अर्थात तें मायिकच आहे, सत्य नव्हे. हे रामा, ब्रम्हवेत्त्यांनीं ज्याचें सेवन केलें आहे त्याचा परिहार कारणें अशक्य आहे. तूं जें कल्याणस्वरूप, नित्य स्थित ब्रम्ह, तेंच होऊन रहा; आणि नंतर व्यवहारांत इतर लोकांप्रमाणें खा, पी व क्रिया कर. तूं तसा व्यवहार जरी करीत राहिलास तरी मुक्तच आहेस. कारण हा दृश्यबंध तुला नाहीं. २९.

---

# सर्ग ३० वा.

१ धैर्यवान् पुरुष ज्या दृष्टीनें अविद्येपासून उत्पन्न झालेली अहतादि अनेकत्वभ्रांति सोडून ब्रह्मामध्यें स्थिर होतो, त्या दृष्टीचा उपदेश.

**श्रीवसिष्ठः**—अहंता जोंवर सोडली नाहीं, तोंवर ब्रम्हविचारहि प्रवृत्त होत नाहीं, व लाभ तर दूरच राहिला. अहंता हीच इतर सर्व अज्ञानाचें मूळ कारण आहे. ती निर्वाणपदाला झांकून टाकते. पण मूढ त्या अहंतेच्या योगानेंच निर्वाणपदाचा शोध करूं लागतात. तसें करणें हा वेडेपणाच आहे. अज्ञानापासून उत्पन्न झालेली अहंता हेंच मनुष्याच्या अज्ञतेचें चिन्ह आहे. धूर जसा अग्नीवांचून दिसत नाहीं; त्याप्रमाणें अहंता अज्ञावांचून दिसत नाहीं. शांत तत्त्वज्ञाच्या ठिकाणीं 'मम' आणि 'अहं' हे भाव नसतात. ज्ञानी सदेह असो कीं विदेह असो, अहंतारूप मल निःशेष टाकून आकाशाप्रमाणें शांत, निर्मल व दुःखरहित होतो. ज्याप्रमाणें ज्ञानी शोभतो त्याप्रमाणें शरत्कालचें आकाशहि शोभत नाहीं, शांत समुद्र शोभत नाहीं व पूर्ण चंद्राचें बिंब शोभत नाहीं. ज्याप्रमाणें युद्धाच्या चित्रांतील सैन्य अक्षुब्ध असतें, त्याप्रमाणें व्यवहार करीत असलेल्या ज्ञान्याची समता केव्हांहि ढळत नाहीं. पण ज्ञानी व्यवहार करतो, एवढ्यावरूनच त्याच्या ठिकाणीं पुनर्जन्माला कारण होणारी वासनाहि असेल असें अनुमान होतें. पण मी देह नव्हें, तर नित्य सिद्ध आत्मा आहें, अशा बोधानें ती वासनाहि लीन होते. ती जळलेल्या वस्त्राच्या विणीप्रमाणें नुसती भासमान असते. पण समुद्रावरील मोठी लाटहि जलाहून निराळी कांहीं वस्तु आहे हें जसें म्हणतां येत नाहीं, त्याप्रमाणें ती ज्ञानानें दग्ध झालेली वासना चिन्म-

यच आहे. समुद्र अतिशय क्षुब्ध झालेला असावा, त्यावर पर्वताच्या शिखरासारख्या मोठमोठ्या लाटा उंच उसळत असाव्या, तथापि तें सर्व जसें जलच, त्याप्रमाणें दृश्य जगाच्या आकारानें विकास पावलेलें ब्रह्महि निर्विकार ब्रह्मच आहे. 'तर मग ज्ञानी पुरुषाच्या सर्व वासना क्षीण झाल्यावर त्याचें लक्षण तरी काय असतें?' असें विचारशील तर सांगतों. जो मनामध्यें अनेक तरंग उठत असले तरी अक्षुब्ध, बाहेर शरीर-इंद्रियांनीं व्यवहार करीत असला तरी शांत, व अप्रिय गोष्टी घडल्या तरी प्रसन्न असतो त्याला युक्त म्हणतात. चिन्मय परमतत्त्वामध्यें चैतन्यच अहंत्वरूप सृष्टीच्या आकारानें जलतरंगन्यायानें स्फुरण पावतें. तेव्हां तरंगांच्या अनेकत्वाप्रमाणें जगांतील द्वैताची काय मोठी महती आहे! मेघांचे आकाशामध्यें हत्ती, रथ इत्यादि आकार असे दिसतात, पण ते मेघांतील धूमाहून केव्हांहीं भिन्न नसतात. तसे हे सर्व सृष्टींतील पदार्थ परमपदीं तद्रूपानेंच भासतात. अहो विद्वान् श्रोतृगण हो, तुम्ही विषाद मानूं नका. सर्व विषादाचें कारण प्रपंच आहे. पण तो संविदवर झालेला मिथ्या आभास आहे, असा विचार करून, त्याला अधिष्ठानरूपानें पहा. सर्व भ्रमांचें अधिष्ठान शुद्ध संविद् आहे, त्यामुळें सर्व प्रपंच संविद्रूप आहे असें पाहून तुम्ही मोठ्या आनंदानें आपलें आयुष्य घालवा. तुमचा विजय असो. माझ्या उपदेशानें तुम्ही आतां तत्त्वज्ञ झाला आहांत. पूर्वीप्रमाणें अज्ञ राहिलां नाहींत. जसा अंकुर वासनात्मक वृक्ष, पत्र, फल इत्यादिकांचा आपल्या स्वरूपांत संग्रह करतो, त्याप्रमाणें अज्ञ स्वात्मा वस्तुतः आकाशासारखा निर्मल असतांना त्यांत जगत् व अहंत्व यांचा अनुभव घेतो. म्हणजे अज्ञानानें आच्छादित झालेल्या चैतन्यांत तीं दोन्ही बीजरूपानें रहातात. यास्तव बाहेरील विषयसत्ता व आंतील मनःसत्ता या दोन्ही सत्ता अधिष्ठान चिद्रूपानें जरी सत्य असल्या तरी स्वरूपतः खऱ्या नाहींत. तर ज्याप्रमाणें पेटलेली उदबत्ती अतिशय वेगानें हालविली असतां अनेक आकारांचा भास होतो, त्याचप्रमाणें त्या सत्ता खोट्या असतात. किंवा एकाद्या विधुरानें मनोरथानें कल्पिलेल्या अबला जशा मिथ्या तशाच त्या सत्ता मिथ्या. यास्तव अहो श्रोते हो, सर्व जगाचा उदय कसा होतो, स्थितिकालीं त्यांतील व्यवहार कसे चालतात, त्याचा लय कसा होतो, त्यांतील देश व काल यांची काय स्थिति आहे, या सर्वांचा, उत्पत्ति, स्थिति व उपशम या प्रकरणांत सांगितलेल्या युक्तींनीं विचार करून व हें सर्व मिथ्या आहे असा निश्चय करून शांत रहा. व्यवहार करीत असतांना इष्ट व अनिष्ट यांची प्राप्ति होणें अपरिहार्य आहे. म्हणून तूं शवाप्रमाणें त्या दोन्ही प्रसंगीं शांत रहा. कारण जो मनांत अत्यंत शांत असतो, त्याला द्वैताचा अनुभवच येत नाहीं. जीवन्मुक्तांची मनोवासनारहित असलेली अहंता देहावसान होईपर्यंत ज्या जगाचें धारण करते, व त्याचा भोक्ता आयुष्य संपेपर्यंत जो जिवंत रहातो, तीं दोन्ही चिद्रूपच आहेत, त्यांत जडांशाचा लेशहि नाहीं; आणि तेंच परमपद आहे. चित्सत्ताच पाशानें बांधलेल्या मनुष्यांना दुःख भोगण्यासाठीं जीव व जगत् याच्या प्रवाहानें, समुद्रांतील नौकेप्रमाणें, नेत असते. त्या संसारपाशानें बद्ध झालेल्या अज्ञ लोकांना मोक्षसत्तेचें कधीं स्वप्नहि पडत नाहीं. अज्ञान, जाड्य, यांचा अनुभव घेणें याच अपराधामुळें मोक्षसत्ता अज्ञानाचा आश्रय करीत नाहीं, भृगुपात[१], जल-

१ भृगुपात=स्वर्गाच्या इच्छेनं पर्वताच्या कड्यावरून स्वतःच उडी घेणें.

समाधि इत्यादि उपायांनीं मरण पावलेल्या मनुष्याला प्राप्त होणारें स्वर्गादि फळ जिवंतपणीं जसें मिळत नाहीं, त्याचप्रमाणें अज्ञ पुरुषाला ज्ञानानेंच मिळणारा मोक्ष दुर्लभ आहे. जें जें केवळ संकल्पानेंच प्राप्त होणारें असतें, तें तें त्याविषयींचा संकल्प टाकतांच नाश पावतें. असे संकल्पानें उत्पन्न झालेले पदार्थ जेथें संभवतच नाहींत, तेंच अक्षय सत्य पद होय. मी आत्मस्वरूपाहून भिन्न नाहीं अशी भावना करून तूं निर्भय हो. जसें मूढानें हें विष आहे अशा भावनेनें टाकलेलें अमृत तत्वज्ञाला टाकतां येत नाहीं, तो हें अमृतच आहे असें जाणून निर्भयपणें त्याचें प्राशन करतो, त्याप्रमाणें 'मी नाहीं' ही भावना अनात्मज्ञांना भयावह जरी वाटत असली तरी परमार्थदृष्टीनें तीच खरी व त्यामुळेंच ग्रहण करण्यास योग्य आहे. देहापासून चित्तापर्यंत सर्व शरीर जड आहे, असा विचार केल्यावर त्यांत 'अहं' कोठेंच सांपडत नाहीं. त्यामुळें 'मी आहें,' असें ह्मणणें खरें नव्हे. यास्तव सर्व शांतीची परमावधि जर कोठें असेल तर ती अहंताशांतींतच आहे. म्हणून दीर्घकाल विचार करून 'अहं' ही भावना शांत करावी. कारण तीच मुक्ति आहे. बर्फ जरी वितळलें तरी त्यांतील जलांश जसा थोडासाहि कमी होत नाहीं, त्याप्रमाणें अहंतेची जरी शांति झाली तरी आत्मस्वरूपांत कांहीं कमीपणा येत नाहीं. अहंताशांति ह्मणजे सर्वस्वाचा नाश आहे, असें समजूं नये. या अहंकारशांतिरूप मुक्तींत भोगत्याग, आत्मविचार व मनोनिग्रह यावांचून दुसऱ्या कशाचाहि उपयोग नाहीं. असा विचार करून अहो मुमुक्षूंनो, सर्व अनात्मवर्गाचा त्याग करा, व तत्त्वबोधानें आत्म्याचाच आश्रय करा. याप्रमाणें अहंतेपर्यंत सर्व द्वैताची शांति करून सर्व वासनाशून्य होऊन मनानें ब्रह्ममय होणें, हाच मोक्ष असें श्रुति व विद्वान् सांगतात. पण ही अवस्था ज्ञानावांचून केव्हांहि प्राप्त होणें शक्य नाहीं. तें ज्ञान--परम बोध म्हणजेच परब्रह्म जगद्भ्रमरूप बनतें. जगाचा आकार हा भ्रम आहे, सत्य नव्हे, ही गोष्ट मोक्षशास्त्रांत प्रसिद्ध आहे. परमात्मबोध झाला म्हणजे मग द्वैताचा अनुभव येत नाहीं, असें श्रुतीनें सांगितलें आहे; व विद्वानांचा अनुभवहि तसाच आहे. त्यामुळें अनेक जन्मांतील संस्कारांमुळें जगत् सत्य आहे, असा प्रत्यय जरी आला तरी त्यावर विश्वास ठेवूं नये. कारण जीवाच्या दीर्घ संसारबंधाला तोच कारण आहे. म्हणून शास्त्रादिकांवर विश्वास ठेवून हें जगत् व मी हीं दोन्ही असत् आहेत, वस्तुतः तीं नाहींत, असें श्रवण, मनन, अभ्यास यांच्या योगानें दृढ समजून, स्वशरीरापर्यंत सर्वांविषयीं निरपेक्ष होऊन, परमार्थतत्त्वाला जाणून व चिदाकाशस्वरूप होऊन पुरुष मुक्त होतो. पुनः जन्ममरणपरंपरेंत पडत नाहीं. आत्मज्ञान हाच त्याचा उपाय आहे. ३०.

---

## सर्ग ३१ वा.

—:०:—

१ चित्नें ग्रासलेलें अचित्रूप सत् असो कीं असत् असो, पण त्यांतील कांहींहि नष्ट होत नाहीं, याविषयीं निर्वाणस्थिति सांगितली जाते.

**श्रीवसिष्ठः**—मनांत जी असत्य वस्तु, किंवा अवस्तु कल्पिली जाते, तिचाच सर्वात्म्यामध्यें तत्काल अनुभव येतो. बाह्य वस्तूचा वारंवार परिचय केल्यानें मनांतील पदार्थच बाह्य पदार्थाच्या रूपानें स्फुरतो. याविषयीं आपले स्वप्नाचाच दृष्टांत आहे. हें सर्व चिद्रूप आहे, चित् आकाशाहूनहि निर्मल आहे. घृत हिंवाळ्यांत जसें गोठून जातें, त्याप्रमाणें चित्च

जगदाकार धारण करतें, म्हणून जगत् चिद्रूपच आहे. या सृष्टींत वस्तुतः नाश नाहीं, अस्तित्व नाहीं, अनर्थ नाहीं, जन्म-मरण नाहीं, आकाश नाहीं, शून्यत्व नाहीं, अनेकत्व नाहीं; तर हें सर्व एक ब्रह्मच आहे. पण 'सर्व ब्रह्म आहे' हें ह्मणणें सुद्धां सापेक्ष आहे. तेव्हां वस्तुतः ब्रह्महि नाहीं. तर एक अनिर्वाच्य सच्चिदानंद-रूप आत्मतत्त्व मात्र आहे, बाकी सर्व भास आहे. जगत्, अहंत्व इत्यादिकांचा नाश झाला तरी वस्तुतः कांहीं नष्ट होत नाहीं. कारण असत् वस्तूचा नाश तरी कसा होणार? स्वप्नादिकां-तील वस्तु मिथ्या आहेत, काल्पनिक आहेत, त्यामुळें त्यांतील कांहीं नष्टहि होत नाहीं. मिथ्या प्रतीत होणाऱ्या संकल्पनगरांतील पदा-र्थांचा नाश कसा होणार? त्याचप्रमाणें जगत्, अहंता इत्यादिकांचा नाश संभवत नाहीं. कारण असत् पदार्थांच्या अधिष्ठानाचें स्वरूप कळल्यानें बाध[१] होतो, नाश[२] होत नाहीं. 'जर जगत् असें असत्च आहे, तर त्याची शास्त्रांत निंदा कां केली आहे? त्याला अनर्थ कां म्हटलें आहे? तें त्याज्य आहे असा निर्णय कां केला आहे?' असें विचारशील तर तें खरें आहे. असत् वस्तूची निंदा, त्या-विषयींचा विचार व निर्णय यांचा संभवच नाहीं. कारण आकाशपुष्पाची निंदा, विचार किंवा निर्णय कोणीहि करीत नाहीं. तथापि स्वाभा-विक स्वरूपस्थिति सिद्ध होण्यासाठीं असत् जगालाहि सत् मानून, त्याची निंदा करून, त्याविषयीं वैराग्य, विवेक, तत्त्वसाक्षात्कार इत्यादि उपाय कल्पिला आहे. कशाचीहि भावना न करतां यथाशास्त्र व यथासंप्रदाय योगभूमिकांचा क्रमानें अभ्यास करून पाषाणा-सारखें स्थिर होणें, हाच या शास्त्राचा सिद्धांत आहे. आत्मतत्त्वाचा हा असा निर्णय झाला. आतां स्वर्गादि जगत्स्वरूपाचा कसा निर्णय केला असतां तो फलद्रूप होतो तें सांगतों. जगत् केवल संकल्पमात्र आहे. त्यांत तुला पुरुषार्थाचा जो आभास होतो, तो क्षणिक आहे, एका क्षणांत तो निःशेष शांत होतो, असा जगद्भ्रमाविषयीं निर्णय करावा. तूं कदाचित म्हणशील कीं, सुषुप्ति, मरण, व प्रलय या वेळीं जग आपोआपच क्षय पावत असतें. तेव्हां त्यासाठीं तें बोधमात्र आहे, असेंच ज्ञान संपादन करण्याची कांहीं गरज नाहीं. (म्हणून म्हणशील) तर सांगतों. जगत्, ब्रह्मरूप आहे असें जाणल्यानें जो त्याचा क्षय होतो, तो समूल क्षय असल्यामुळें म्हणजे बीजासह त्याचा बाध होत असल्यामुळें तो सुषुप्ति व प्रलय यांतील क्षयासारखा पुनः उत्पन्न होत नाहीं. सुषुप्ति, मरण इत्यादि समयीं झालेला क्षय नित्य नसतो. त्या दशेंत संस्कारबीजरूपानें जगत् असतें; कार्यरूपानें नसतें, एवढेंच काय तें. ब्रह्मज्ञानानंतर जगाचा जो क्षय होतो, तो नित्य आहे. बीजरूपानेंहि जगत् रहात नाहीं. स्वप्नांतील जगाप्रमाणें ज्या असत् पुरुषांना जगाचें अस्तित्व भासतें, जगत् आहे असा भ्रम होतो, ते पुरुष व त्यांना भासणारा जग-द्भ्रम हे दोन्ही मृगजलांतील तरंगाप्रमाणें आहेत. वंध्यापुत्राच्या शब्दाप्रमाणें असत् असलेल्या सृष्टीचा सद्भाव मानणाऱ्या लोकां-च्या ज्ञानाचा निर्णय कसा करावा, हें आम्हांला कळत नाहीं. जगत्तत्त्व परिपूर्ण समुद्राप्रमाणें आनंदैकरस-पूर्ण आहे. ज्यांना ही पूर्णता अनुभवानें कळलेली असते, ते द्रष्टा, दृश्य,

१ रज्जूवर सर्पाचा भास होतो. पण रज्जूचे ज्ञान झालें, म्हणजे सर्पाचा भास खोटा ठरतो. यालाच बाध म्हणतात. २ नाश म्हणजे अदर्शन; स्थूल पदार्थानें आपला आकार सोडून सूक्ष्म बीज-रूपानें रहाणें हाच नाश होय.

दर्शन इत्यादि द्वैतांत पडत नाहींत. ते वायुरहित प्रदेशांतील दिव्याप्रमाणें अचल असतात. प्रारब्धानुसार ते व्यवहार जरी करीत असले तरी व्यवहारशून्य असल्याप्रमाणेंच मनामध्यें अगदीं स्वस्थ रहातात. ज्ञानी पुरुषाची अंतःशीतलता परिपूर्ण समुद्राप्रमाणें कांहीं अपूर्वच दिसते. त्यांचें ज्ञान व त्यामुळें प्राप्त झालेली शांति हीं दोन्ही अवर्णनीय आहेत. वासनाच पुरुष आहे. तिच्याविषयीं विचार करूं लागलें असतां ती विद्यमान असलेली दिसत नाहीं. तिला कोणीहि कधीं पहात नाहीं. तिच्यापासून हा सर्व संसार झालेला आहे जें अंधकारामुळेंच भासणारें, तें प्रकाश आल्यावर रहात नाहीं. अंधकारांत भासणारें भूत, चोर वगैरे हेंच याचें निदर्शन आहे. स्थूल देहाची सामग्री पंचीकृत भूतांपासून उत्पन्न झालेली असते. त्याचप्रमाणें बुद्धि, अहंकार वगैरे सूक्ष्म शरीराची सामग्रीहि अपंचीकृत भूतांपासून झालेली असते. भूतें जड आहेत, त्यामुळें त्यांपासून झालेलीं स्थूल व सूक्ष्म शरीरेंहि जडच आहेत. यास्तव शरीररूपत्व टाकून, बुद्धि, अहंकार व चित्त, यांनाहि भौतिक समजून, त्यांच्या विषयींची आस्था सोडून, स्वप्रकाश चिन्मात्र स्वरूपानें अवस्थित होणें हाच भूमिकेचा उदय होय. आत्मचैतन्य लिंगशरीराशीं तादात्म्यभासानें मिळून गेलें असतां तें विषयोन्मुख होतें. त्यामुळें वासना उत्पन्न होते. पण केवळ आत्मस्थितीमध्यें चैतन्य विषयोन्मुखच होत नसल्यामुळें वासना कशी, कोठें व कोठून होणार ? ज्याला हा भ्रम होतो, तो स्वतःच जर मिथ्या आहे, तर मृगजलासारखा असलेला हा संसार, त्याला कोठून दिसणार ? कारण तत्त्वदृष्टीनें पाहूं लागलें असतां जीवच उपलब्ध होत नाहीं. मग त्याचा संसार कोठला ? यास्तव चित्तोदयच होऊं देऊं नये. आत्म्याला पहाण्यास प्रवृत्त झालेल्या पुरुषालाहि विषयाचें स्मरण होतें. त्यामुळें चित्ताचा उदय होतो. तोच पुनः संसाराची प्रवृत्ति करतो. यास्तव सर्व विषयांचा अनादर करून आकाशाप्रमाणें अंतःकरण शून्य करावें. पुनः विषयांचें स्मरण न होईल इतकें त्यांचें विस्मरण होणें, हेंच परम श्रेय होय. आत्माभ्यास करणारानें द्रष्टा, भोक्ता, आस्तित्व, नास्तित्व, इत्यादि कांहीं नसून सागरासारखें एक शांत आत्मस्वरूप आहे, अशी भावना करावी. सर्व दृश्य जगत् सत् ब्रह्म आहे, असा स्पष्ट अनुभव आला असतां जीव व त्याची उपाधि यांचा क्षय होतो. त्यानंतर जलाशयांतील जल आटून गेलें असतां बिंब–प्रतिबिंब भाव जसा नष्ट होतो, त्याप्रमाणें सर्व उपाधींचा बाध झाल्यावर संसाराचा क्षय होऊन एक शिवस्वरूप अवशिष्ट रहातें. परम तत्त्वामध्यें विश्रांति पावलेला समदर्शी पुरुष सर्व व्यवहार सोडून शांततेचा अनुभव घेतो, समाधि लावून बसतो, किंवा रागद्वेषरहित होऊन व्यवहार करतो. म्हणजे ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं प्रारब्धानुसार या दोन्ही गोष्टी संभवतात; किंवा जीवन्मुक्त पुरुषाची शांतिच अवशिष्ट रहाते, त्याचा व्यवहार संभवतच नाहीं. व्यवहार करणारा ज्ञानी सर्ववासनाशून्य होणें शक्य नाहीं. यास्तव आरंभीं व्यवहार सुटणें जरी शक्य नसलें, तरी सातव्या भूमिकेपर्यंत निश्चयानें अभ्यास करणाऱ्या पुरुषाला वासनाशून्य होतां येतें आणि निश्चयानें वासनाशून्य झालेला मुनि व्यवहार कसा करणार ? जोंवर त्याची शांति पूर्णतेला प्राप्त झालेली नसते, तोंवर त्यानें राग, द्वेष, भय, हर्ष सोडून व्यवहार करावा. कारण आसक्ति, भय व क्रोध यांना सोडून शांतचित्त व मुक्त झालेला मुनि वस्तुतः सचेतन असला

व प्राप्त व्यवहार करीत असला तरी नेहमीं शिळेप्रमाणें स्थिर रहातो. कमलबीजाच्या कोशांत सर्व कमलिनी जशी असते, त्याप्रमाणें आत्म्यामध्यें हा सर्व संसार आहे. स्वप्नांतील भ्रांति जशी मनोमय, तशीच सृष्टि आत्ममय बाह्य संसाराची कल्पना केली कीं तो बाहेर दिसूं लागतो व मनांत आत्मचिंतन केलें कीं, आत्माच दिसतो. परमतत्त्वामध्यें जी जी भावना करावी ती ती दिसूं लागते. मनांत जी स्वप्नादिकांची भ्रांति होते तीच ही बाह्य संसाररूपानें उदय पावली आहे. दोन पात्रां-तील पाण्याप्रमाणें स्वप्नभ्रांति व बाह्य संसार यांत मुळींच भेद नाहीं. दोन्ही भ्रांतिमात्र आहेत. त्यामुळें दोन्ही अवस्थांमध्यें स्थैर्य किंवा अस्थैर्य सारखेंच आहे. जल व तरंग यांच्या आधार-आधेयतेप्रमाणेंच स्वप्न व जागर किंवा चित् व त्या दोन अवस्था यांची आधार–आधेयता आहे. स्वप्नांत दिसणारे पदार्थ आत्ममात्र आहेत, असें अनुसंधान करीपर्यंतच ते भासतात. ते आत्ममात्र आहेत असें कळून आलें कीं तत्काल बाधित होतात. हाच न्याय जाग्रदवस्थेतील संसाराला लागू आहे. संसार आत्म्याहून भिन्न आहे, अशी भावना केली कीं, तो दिसूं लागतो; व तो आत्मरूप आहे, असें चिंतन केलें कीं, तो निराळा दिसत नाहीं. साधक पुरुष, आत्मभावनेनें सर्वसंकल्पशून्य व शांत परमात्मरूप बनतो व तशी भावना न केल्यास तो संसारी जीवच रहातो. स्वप्नादि सर्व विषयज्ञान शांत झालें असतां परमेश्वराचें शुद्धस्वरूप अवशिष्ट रहातें. तें आहे असें म्हणतां येत नाहीं, नाहीं असें म्हणतां येत नाहीं, वाणीचा विषयच होत नाहीं. 'तर मग गुरु त्याचा शब्दानें उपदेश कसा करतात?' असें म्हणशील तर सांगतों. सर्व भ्रांतीचा समूळ लय झाला असतां, समाधिस्थ पुरुष स्वानुभवानेंच तें स्वरूप जाणतो. शब्दांनीं त्याचें वर्णन करतां येत नाहीं. अर्थात् गुरुहि शिष्यांना जो उपदेश करितात तोहि श्रोत्यांची बुद्धि मोक्षमार्गांत प्रवृत्त व्हावी, एवढ्यासाठींच असतो. गुरु किंवा शास्त्र उपाय सांगतात, त्याप्रमाणें अभ्यास करून आत्मसाक्षात्कार ज्याचा त्याला संपादन करावा लागतो. ह्मणून हे रामा! तूं अहंकार टाक. भय, मान, विषाद, लोभ, मोह, मन, देह, मनन, इंद्रियें व चित्तजाड्य यांनीं रहित असलेलें शांत, अक्षय, अद्वय, अज आत्मस्वरूपच तूं हो. याप्रमाणें एक ब्रह्मरूप होऊन रहाणेंच उचित आहे. ३१.

---

## सर्ग ३२ वा.

—:०:—

१ साधूंचा समागम, सच्छास्त्रविचार व अभ्यास करणाऱ्या मुमुक्षूला अवश्य मोक्ष प्राप्त होतो, २ व तो त्याच्याच स्वाधीन असतो, असें उपपादन.

श्रीवसिष्ठ:—जेव्हां चिति विकास पावते, तेव्हांच अहंता व जगत् हा भ्रम खोटाच उदय पावतो. आकाशांत स्पंदामुळें जसें वायुत्व उत्पन्न होतें, तसाच हा जगद्भ्रम होतो. जगाला ब्रह्मरूप पाहिल्यानें उत्पन्न झालेला तो भ्रम खेदाला कारण होत नाहीं. पण त्याचें जगत् या रूपानें जर चिंतन केलें, तर तोच परम अनर्थाला कारण होतो. दृष्टि बाहेर पसरली असतां जशी रूपाचा अनुभव घेते, त्याप्रमाणें चिति विकास पावून म्हणजे बहिर्मुख होऊन जगद्भ्रमाचा अनुभव घेते; पण ती स्वत: निर्विकार आहे. त्यामुळें तिनें बाह्य विषयोन्मुख होणें हाहि एक चमत्कारच आहे. शिवाय, बाह्यविषय मिथ्या आहेत, त्यामुळेंहि स्वभाव-

तःच तिचें बहिर्मुखत्व संभवत नाहीं. पण आत्मज्ञान झाल्यावर ही गोष्ट कळते आणि त्यानंतर जगद्भ्रम खेदाला कारण होत नाहीं. चितीचा प्रसार असत् आहे. असत् वस्तूचें कार्य कसें दिसणार? वंध्यापुत्राकडून कधीं तरी कांहीं होणें शक्य आहे का? चैतन्याचा हा प्रसार अनुभवानेंच सिद्ध होणार. पण तो अनुभव आत्मज्ञानानें खोटा ठरला म्हणजे मग जगाचा जो भास होतो, तो लहान मुलाला दिसणाऱ्या बागुलबोवापेक्षां अधिक योग्यतेचा नाहीं. 'अहं' असें समजून अहंभाव धरणेंहि दुःखालाच कारण होतें. अहंभाव टाकला कीं, दुःख नाहीं. त्यामुळें बंध व मोक्ष स्वाधीन आहेत. विद्येमुळें मूळ अज्ञान नाहींसें झालें असतां चिदात्मैकरूपत्व प्राप्त होतें. त्यानंतर मन, बुद्धि इत्यादि सर्व अजड वस्तूंचें पाषाणादि जड वस्तूप्रमाणें जें निश्चल अज्ञान, वेद्यवेदभावरहित अवस्थान, तेंच ध्यान किंवा समाधि हो. त्यावरून मुक्ति ही उपलक्षित होते. हे पंडितंमन्य वादी जन हो! तुम्ही मूर्खाप्रमाणें द्वैतादि नाना विकल्प उत्पन्न करून वादविवादांनीं वृथा कंठशोष करूं नका. या परम सिद्धांताचेंच अवलंबन करा. बहिर्मुख पुरुषाला होणारें विषयज्ञान जसें अनिवार्य, तसेंच त्यांना होणारें दुःखहि अनिवार्य. पण अंतर्मुख पुरुषाला प्रारब्धप्राप्त दुःख भोगीत असतांनाहि स्वानंदानुभव येत असल्यामुळें जणुंकाय दुःखाचा अनुभव तो घेतच नाहीं. कारण स्वानंदानुभवानें त्या दुःखाला झांकून टाकलेलें असतें; त्यामुळें निजलेल्या पुरुषाला डांस, ढेंकूण वगैरे चावले तरी त्याला तें जसें समजत नाहीं, त्याप्रमाणें वासनारहित ज्ञानी पुरुषाला प्रारब्धप्राप्त दुःखाचा अनुभव येत नाहीं. अर्थात् वासना वाढली असतां ज्याप्रमाणें संसाराचा अनुभव येतो, त्याप्रमाणेंच ती अतिशय क्षीण झाली असतां मुक्तीचा अनुभवहि सिद्ध होतो. यास्तव योगाभ्यासादि उपायांनीं वासनेचा हळूहळू क्षय करावा. अत्यंत क्षीण झालेली वासना हीच मुक्ति होय. ती उपायानें क्षीण होतां होतां अगदीं निःशेष क्षय पावते. आकाशांतील ढग जसे उत्तरोत्तर क्षय पावून अगदीं नाहींसे होतात, त्याचप्रमाणें वासनांचा दीर्घ यत्नानें क्षय होतो. मीच ब्रह्म आहें, अशा भावनेनें ज्ञानाची अभिवृद्धि झाल्यावर वासना प्रतिदिवशीं सूक्ष्म होतां होतां शेवटीं स्वतः मुक्तिच बनते. म्हणजे ज्याप्रमाणें पंडितांच्या समागमामुळें व विद्याभ्यासामुळें ज्ञान वाढूं लागलें ह्मणजे मूढता क्षीण होऊं लागते व शेवटीं पूर्ण पांडित्य प्राप्त होतें, त्याप्रमाणें वासनेचा क्षय झाल्यावर मोक्ष मिळतो. किंबहुना, मूढतेचा क्षय ह्मणजेच जसें पांडित्य, त्याप्रमाणेंच वासनाक्षय म्हणजेच मुक्ति. पण हा बोध कोठवर वाढवावा, म्हणून विचारशील तर सांगतों. 'मी ब्रह्म आहें' या भावनेचा सतत अभ्यास केल्यामुळें येथें जिवंत असलेल्या किंवा परलोकीं गेलेल्या योग्याचा 'मी जीव नाहीं,' असा शमरूप निश्चय दृढ होईतों बोध दृढ केला पाहिजे. वायूमध्यें वायु हें द्रव्य व त्याचें स्पंदन ही क्रिया हें द्वंद्व जसें असतें, त्याप्रमाणेंच आत्मा व जगत् हें द्वंद्व भासतें. मी कोण व हें कसें, असा विचार केल्यानेंच त्याची शांति होते. मी नाहीं, इतका निश्चय केल्यानेंच जर शांति मिळणें शक्य आहे, तर तेवढ्यासाठींच मोहांत कां पडावें? सत्संगम व विचार यांच्या योगानें तत्त्वज्ञान तत्काल होतें. तत्त्ववेत्त्याच्या समागमानें 'मी' हें बंधन क्षीण होतें. प्रकाशानें जसा अंधकार जातो, किंवा दिवस उगवला असतां रात्र संपते, त्याप्रमाणें ज्ञानानें अहंरूप अज्ञान नाश पावतें. मी कोण, हें दृश्य

करणें? जीव कोण? व प्राणादिकांचें धारण करणें हें काय आहे? याचा तत्त्ववेत्त्यांच्या सहवासांत राहून मोक्षप्राप्तीपर्यंत विचार करावा. ज्याअर्थी तत्त्ववेत्त्यांच्या संपर्कानें जगत् बोधानें उज्ज्वलित झालें आहे असें भासतें व त्यामुळें सर्व पदार्थांच्या तत्वाला आच्छादित करणारें अहंरूप अज्ञान नाश पावून तत्काल वस्तुतत्व प्रतीत होतें. त्या अर्थी सत्समागम अवश्य करावा. रामा, जो जो अतिशय ज्ञानसंपन्न असेल त्या एकट्याचीच तूं उपासना कर. कारण एकाच वेळीं अनेक विद्वानांचा सहवास केल्यास त्यांच्या संभाषणांतूनच वादरूपी पिशाच उत्पन्न होतें, आणि विद्वान्हि एकदा अभिमानानें वाद करूं लागला म्हणजे त्याची बुद्धि कलुषित होते. तो स्वतःच्या मताविषयींच आग्रह धरतो, तर्कानें त्याचीच सिद्धि करूं लागतो, व त्यामुळें परमार्थापासून भ्रष्ट होतो. यास्तव शहाण्यानें निरनिराळ्या विद्वानांचा एकांतात सहवास करावा आणि त्यांनीं सांगितलेल्या सर्व गोष्टींचा स्वतःच्या बुद्धीनें चांगला विचार करावा. विचारशक्ति वाढविण्यासाठीं विद्वानांच्या उक्तींचें मनन करावें व सर्व संकल्पशून्य असलेलें जें सत्, तद्रूप व्हावें. विद्वानांच्या संगतीनें बुद्धीला अतिशय तीक्ष्ण करून अज्ञानरूपी लतिकेला छिन्नभिन्न करून टाकावें. मी जी गोष्ट सांगत आहे, ती सर्वथा संभवनीय आहे आणि म्हणूनच आग्रहानें सर्वांना सांगत आहें. हे श्रोते हो, आम्हीं त्याचा अनुभव घेतला आहे. व्यर्थ कांहीं तरी बोलत नाहीं. ज्याप्रमाणें आकाशांत मेघ, धुकें, ऊन्ह इत्यादि पसरल्यानें किंवा मोठ्या समुद्रावर तरंगादि उठल्यानें त्याचें कांहीं अनिष्ट होत नाहीं, किंवा कोणत्याहि इष्ट वस्तूची प्राप्ति होत नाहीं, त्याप्रमाणें संकल्परहित योग्याच्या इष्टानिष्टाचा नाश किंवा उदय होत नाहीं. परिपूर्ण परब्रह्माचा विचार केला असतां हें सर्व जगत् मृगजलासारखें भासतें. त्यामुळें 'अहं' असा पृथक् जीवभाव उरत नाहीं. आणि योग्याचा इतका उत्कर्ष झाल्यावर त्याच्या ठिकाणीं मननादि भ्रम कोठून होणार? ३२.

---

## सर्ग ३३ वा.

—:०:—

१. भ्रांतिकल्पना, २ प्रतिकल्पना, व ३ परलोकचिकित्सा.

श्रीवसिष्ठः—रामा, ज्ञानाधिकाराला योग्य अशा शरीरास प्राप्त झालेल्या पुरुषानें तत्त्वज्ञान जर संपादन केलें नाहीं, आपल्या शुद्धबुद्धीला सत्समागमानें विकसित करून ध्यान, समाधि इत्यादि प्रयत्नानें तो जर ज्ञानी झाला नाहीं, तर त्याला मोक्षप्राप्तीचा दुसरा कोणताहि उपाय नाहीं. ज्याप्रमाणें स्वभावतः मरणाला कारण होणारेंहि विष, रसायनशास्त्रांत सांगितलेल्या उपायानें अमृतासारखें रसायनहि होऊं शकतें, त्याप्रमाणें सर्व कल्पित वस्तु व वासना, अविद्या वगैरे यांना शास्त्रीय उपायानें मोक्षसाधन करतां येतें, म्हणजे शास्त्रीय दृष्टीनें त्यांतील अशास्त्रीयता घालवून बंधाला कारण होणाऱ्याहि त्यांना मोक्षोपयोगी करणें, यांतच कौशल्य आहे. यालाच प्रतिकल्पना असें म्हणतात. सर्व कल्पनांची निवृत्ति होईपर्यंत अशी प्रतिकल्पना करीत राहिलें पाहिजे. सर्व कल्पनाराहित्य हीच मुक्तता. कारण पुरुष सर्व कल्पनारहित झाला म्हणजे त्याचें जें शुद्ध स्वरूप रहातें, तें निर्विशेष ब्रह्म होय. ही अवस्था वैराग्य व संन्यास यांच्या

योगानें सर्व विषयोपभोगांचा त्याग केल्यानेंच सिद्ध होते. त्यावांचून सिद्ध होत नाहीं. वैराग्य-पूर्वक भोगत्यागरूप संन्यास केल्यावर श्रवण व मनन यांच्या योगानें आत्मतत्वाचा निश्चय करून मनानें व वाणीनें शब्द व अर्थ यांची भावना करूं नये. म्हणजे वाणी व मन या दोन्हींचाही निरोध करावा. याप्रमाणें, वाक् व मन यांच्या क्रिया म्हणजे शब्दोच्चार व अर्थचिंतन यांना सोडून जो शांत रहातो, त्याच्या कल्पनेची शांति हळूहळू वाढत जाते. अहं या एका वृत्तीला सोडून अविद्या दुसरी कांहीं वस्तुच नाहीं; आणि सर्व भावनांना शांत करणारा तत्त्वसाक्षात्कार झाला व त्यामुळें अहंकार बाधित झाला, म्हणजे मग मोक्ष म्हणून दुसरें कांहीं रहात नाहीं. पण तत्त्वसाक्षात्कार झाल्यानंतरहि जगत्, जीव, संसार इत्यादिकांविषयीं आस्था ठेवून, हा स्थूल देह विद्यमान असेपर्यंत थोड्याशा अहंभावाचाहि तूं आश्रय करशील, तर परिपूर्ण परमानंदस्वरूपाला विसरल्यामुळें लागलीच संसारदुःखांत पडशील; आणि तूं अहंभाव टाकशील तर सर्व दुःखांपासून निवृत्त होशील. जो महात्मा बहिर्मुखवृत्ति न झाल्यामुळें हें सर्व सत् असलेलेंच जगत् असत्सें होऊन पहातो, ज्याला दगडाप्रमाणें त्याचें ज्ञान होत नाहीं, त्यामुळें जो अतिशय शांत असतो, त्याला खरोखर नमस्कार असो. पाषाणाला ज्याप्रमाणें कोणत्याहि वस्तूचें ज्ञान होत नाहीं, त्याप्रमाणें दृढ अंतर्मुख झाल्यामुळें ज्याला हें सर्व जगत् दिसत नाहीं, त्याचें चित्त परब्रह्मामध्यें लीन होऊन रहातें, त्यामुळें त्याला सर्व दृश्य शून्य होतें. केवळ चैतन्याचीच भावना केल्यामुळें ज्ञानी केव्हांहि बहिर्मुख होतच नाहीं आणि बहिर्मुख झाल्यावांचून दृश्य दिसत नाहीं. त्यामुळें शांतचित्त पुरुषाचें जगत्हि शांत होतें. रामा, हें दृश्य वस्तुतः असो कीं नसो, पण त्याचा प्रत्यय आला म्हणजे दुःखाची वृद्धि होते व त्याचा प्रत्यय येत नाहीं असें झालें म्हणजे सुख होतें. अर्थात् सुख व दुःख, बाह्य जगाला पहाणें किंवा न पहाणें यांवर अवलंबून आहे; तें खरें आहे किंवा खोटें आहे यांवर अवलंबून नाहीं. स्वप्नांत दिसणाऱ्या वाघाचेंहि भय वाटतें व दुःख होतें; पण गाढ निद्रावस्थेंत वाघाचा भास होत नाहीं. त्यामुळें भय, दुःखहि नाहींत. मन बहिर्मुख होऊन जगाची कल्पना करूं लागलें कीं, तें दिसतें व तें स्वरूपांत लीन झालें कीं कांहीं दिसत नाहीं. प्राण्यांच्यामागें दोन घोर व्याधि लागल्या आहेत. एक इहलोक व दुसरा परलोक. यांच्या योगानें तो असह्य दुःखें भोगतो. कारण, त्याला दोन्ही लोकांमध्यें आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक भाव अतिशय पीडा देतात. क्षुधा, तृष्णा इत्यादि या लोकांतील व्याधींची चिकित्सा सुज्ञ लोक अन्न-पानादि औषधांनीं मरेपर्यंत करतात, पण विषयोपभोग हें त्यांच्या निवृत्तीचें योग्य औषधच नसल्यामुळें त्यांना व्याधिरहित होतां येत नाहीं; आणि नरक, जन्मपरंपरा इत्यादि पारलौकिक व्याधींची चिकित्सा विषयोपभोगांनीं होऊंच शकत नाहीं. म्हणून जे पुण्यवान् पुरुष असतात ते पारलौकिक महाव्याधींचें निवारण, शम, सत्संग, ज्ञान इत्यादि अमृतांनीं करण्याचा यत्न करतात. जे परलोकाची चिकित्सा करण्यामध्यें अतिशय सावधान असतात, म्ह० विषयोपभोगरूप अपथ्याचें सेवन न करितां सत्संगादि औषधाचें सेवन करितात, ते शमरूप औषधाच्या शक्तीनें व्याधिरहित होतात; मोक्षमार्गांत निर्भयपणें संचार करितात; मुक्त होण्याची त्यांची इच्छा सफल होते. रामा, शम, सत्संग इत्यादि औषध येथेंच—या मनुष्यजन्मांतच सुलभ आहे.

यास्तव जो मानव नरकव्याधीची चिकित्सा येथेंच करीत नाहीं, तो साधुसमागम, सच्छास्त्र, जेथें मिळणें शक्यच नाहीं, अशा स्थावर-नरकादि योनींत जाऊन काय करणार ? हे अज्ञजनहो ! तुमचें जीवित इहलोकच्या व्याधींची चिकित्सा करण्यांतच क्षय न पावो. तर आत्मज्ञानरूप औषधानें परलोकव्याधीची चिकित्सा करा. आयुष्य वायूप्रमाणें चंचल व कमलाच्या पानावरील जलबिंदूप्रमाणें क्षणभंगुर आहे. यास्तव परलोकमहाव्याधीची चिकित्सा मोठ्या यत्नानें व सत्वर करा. परलोक-महाव्याधीची चिकित्सा मोठ्या यत्नानें व सत्वर केली असतां इहलोकरूप व्याधि आपोआपच शांत होते. त्यासाठीं निराळा यत्न करावयास नको. प्राणी संविन्मात्र आहे व त्या संविदेचें प्रसरण हेंच जगत् आहे, असें विद्वान लोक समजतात. त्यामुळें जगत् परमाणूंच्या उदरांतहि शेंकडों पर्वतां इतकें विस्तीर्ण आहे. कारण संविद् परिपूर्ण आहे. त्यामुळें ती परमाणूंतहि आपल्या स्वाभाविक पूर्णत्वानेंच रहाते. त्यामुळें परमाणूसारख्या अतिशय सूक्ष्म पदार्थांतहि रहाणाऱ्या तिच्यामध्यें अतिशय विस्तीर्ण जगाचें भान होणें अशक्य नाहीं. नेत्रांतील अति सूक्ष्म कनीनिकेंत हिमालयासारखा गगनभेदी पर्वतहि प्रतीत होतो हें प्रसिद्ध आहे. संवित्चें प्रसरण म्हणजेच बहिर्मुखतेनें मिथ्या विकास पावणें होय आणि तिनें बहिर्मुख होणें, म्हणजेच बाह्य विषय व काम-संकल्पादिक मनोविकार होत. त्या सर्वांचा अनुभव चिदाकाशांतच येतो. त्यामुळें जगद्रूप व्याधि सत्य नव्हे. तो मिथ्या असल्यामुळेंच सहस्रावधि प्रलय जरी झाले, तरी त्याची वास्तविक निवृत्ति होणार नाहीं आणि हजार वेळां जरी सृष्टि झाली, तरी ती खरीच आहे, तिला पारमार्थिक सत्ता आहे, असें म्हणतां येत नाहीं. कारण जगत् हा दृश्य या नांवाचा मोठा भ्रम आहे. केवळ भ्रांति हेंच त्याचें स्वरूप आहे. त्यामुळें केवल आत्मज्ञानानेंच त्याची निवृत्ति होईल. भोगरूप पंकार्णवांत रुतलेल्या आत्म्याला स्वतःच्या दीर्घ प्रयत्नानेंच जर वर न काढलें; तर त्याच्या उद्धाराला अन्य उपाय नाहीं. ज्यानें आपल्या मनाला जिंकलेलें नसतें, तो मूढ भोगरूप पंकांत रुततो, आणि सर्व जगाचें सागर हेंच जसें एक पात्र आहे, त्याप्रमाणें तो सर्व आपत्तींचें एक पात्र बनतो. अ युष्याची पहिली अवस्था बाल्य ही आहे, त्याचप्रमाणें मोक्षाचा पहिला उपाय भोगत्याग आहे. त्यामुळें आसक्तीची शांति होते. ज्ञानी पुरुषाची जीवितनदी अनेक तरंगांनीं जरी युक्त असली, तरी ती अक्षुब्ध असते. चित्रांतील नदीप्रमाणें ती सम व सौम्य वहाते. पण अज्ञ पुरुषाची जीवितनदी अतिशय भयंकर असते. अनेक प्रकारच्या ध्वनींनीं ती चित्तवृत्तीला अतिशय क्षुब्ध करते. नानाप्रकारचे दुःखरूपी तरंग त्यांत उद्भवतात. अज्ञ पुरुषांच्या अविचारामुळेंच सृष्टि, स्थिति, प्रलय इत्यादि संविद्चे मिथ्या विकास अनुभवास येतात. पण त्यांची योग्यता दोन चंद्र, बालकांनीं कल्पिलेला वेताळ, मृगजल व स्वप्न यांहून अधिक नाहीं. चिदाकाशामध्यें संविद् बहिर्मुख झाल्यामुळें मिथ्या जगत् सत्य असल्यासारखा अनुभव येतो. पण आकाशांत दिसणाऱ्या गंधर्वनगराप्रमाणेंच तो भासमात्र होय. सृष्टिभ्रम हा संविद्विकासरूप जलावरील बुडबुडा आहे. 'अहं' इत्यादि भावविकारांच्या रूपानें तो परिणत झाला आहे. संविद्ची शांति, म्हणजे अंतर्मुखता हाच जगाचा अभाव, व तिचें उन्मीलन हेंच जगत्. तें वस्तुतः आंत नाहीं, बाहेर नाहीं; असत्य नाहीं व सत्यहि नाहीं; तर तें सर्व

चिद्रूप, अज, अव्यक्त, एक, अव्यय, ईश्वर, स्वत्व-भावत्वरहित व आकाशाहूनहि अत्यंत शांतरूप ब्रह्म आहे. तें ब्रह्म निर्विशेष असल्यामुळें सृष्टीचें ज्ञान वायूच्या स्पंदाप्रमाणें केवल काल्पनिक आहे. अविद्येमुळें झालेला तो भ्रम आहे. वायूच्या स्पंदाला जसें कांहीं कारण नाहीं, त्याप्रमाणें त्या भ्रमालाहि वास्तविक कांहीं कारण नाहीं. स्वप्नांतील अनुभवाप्रमाणें ती भ्रांति आहे, ब्रह्मसागरांतील ते ब्रह्मरूपतरंग: आहेत, पण वस्तुतः त्यांत स्वप्नहि नाहीं व सृष्टीहि नाहीं. हें एकच निराभास, चित्त्व या नांवाच्या धर्मांतरानें रहित, अजड, सम, अद्वय, अव्यय आहे. तें सत् नाहीं, असत् नाहीं व सदसत्‌हि नाहीं. रामा ! अशा ब्रम्हभावानें स्थित असलेल्या ज्या योग्याच्या संविदेची पूर्णपणें शांति झालेली असते, त्याला मुनि असें म्हणतात. त्याची संविद् बाह्य विषयांचें ग्रहण करीत नाहीं. एखाद्या मृन्मय पदार्थाप्रमाणें ज्याला दृश्याचें ज्ञानच होत नाहीं व त्यामुळें ज्याचें अहंकारासह सर्व जगत् विगलित झालेलें असतें, त्याला श्रेष्ठ मुनि म्हणतात. जसें सकल्पनगर असंकल्पामुळें शांत होतें, त्याप्रमाणें चैतन्य बहिर्मुख झाल्यामुळेंच उद्भवणारें जगत् व अहं, चैतन्याला अभ्यासानें शांत करून बाह्य पदार्थांना विसरलें कीं, तीं दोन्हीं चैतन्यांतच शांत होतात. सर्व जड वस्तूंमध्यें जाड्य अनुगत असतें. तोच स्वभाव व तीच मूळ अविद्या. त्या एका अविद्येला सोडून सर्व नाम व रूप सहेतुक आहेत. म्हणजे त्या अविद्येमुळें उद्भवलेलीं आहेत. त्या स्वभावाचा किंवा मूलविद्येचा साक्षी आत्मा असून त्याच्यामुळेंच अविद्येची सिद्धि होते. यास्तव साक्षीमुळेंच सिद्ध होणाऱ्या अविद्यादिकांचें निरसन करून त्यांची उपेक्षा करून मी साक्षिमात्र आहें, असा अनुभव घेणें, म्हणजे स्वतः साक्षी चिन्मात्र आहे असें समजणें ही मुक्ति होय. या सृष्टींत अविद्यानाशानंतर कोणत्याहि पदार्थाचें जाड्य अवशिष्ट रहात नाहीं, तर ज्ञानी योग्याला सर्व अनुभव चिदेकस्वरूप भासतात, त्याला सर्व जगत् आनंदमय दिसतें. दुःख व अज्ञान यांचा गंधहि अनुभवास येत नाहीं. त्याचे सर्व अनुभव म्हणजे महाचिद्रूप वायूचे स्पंदच आहेत. ते अनुभव म्हणजे ब्रम्हाकाशाची शून्यता आहे, असें समजावें. वायु व त्याचा स्पंद यांचा भेद जसा काल्पनिक, त्याप्रमाणेंच ब्रह्म व जगत् यांचा भेदहि असत्य आहे. स्वप्नांत आपलें मरण आपणच जसें अनुभवतों, तशीच जगत् ही भ्रांति आहे. आणि कोणतीहि भ्रांति तत्त्वार्थाचा विचार करीपर्यंतच असते. योग्य मार्गानें विचार केला कीं जगत्-भ्रांति ब्रम्हत्वाला प्राप्त होते. भ्रांति मिथ्या असते, त्यामुळें विचार केला असतां भ्रामक पदार्थ सशाच्या शिंगाप्रमाणें उपलब्ध होत नाहींत. भ्रांतींतील सत्ता व स्फूर्ति हा ब्रम्हाचाच अंश असतो. त्यामुळें विचारानें भ्रामक पदार्थाचा बाध होऊन त्यांतील ब्रम्हांश ब्रम्हामध्यें जाऊन मिळतो आणि शेवटीं अतिशुद्ध ब्रम्हच अवशिष्ट रहातें. हे रामा, तूं देहावरील आसक्तीमुळेंच होणाऱ्या जरामोहादि भ्रांतीचा त्याग करून आदि-मध्य-अंतरहित, अनंत, निर्मल, सम, शिव, शाश्वत व एकच ब्रम्हाकाशत्वाला प्राप्त हो. ३२

———

# सर्ग ३४ वा.

—:०:—

१ जगत् दृष्टिसृष्टि आहे, त्यामुळें केवळ अदर्शनानेंच त्याचा क्षय होतो, असा जो वाद येथें सुरू केला आहे, त्याविषयीं उपपत्ति.

**श्रीवसिष्ठः**—हे रामा! प्राप्त झालेल्या सुखदुःखांतील जो अंश नाश पावतो, तो नाशिवंत म्ह० मिथ्या. जो नाश पावत नाहीं, तो अविनाशी म्ह० सत्य. एवढी एक गोष्ट समजली, म्हणजे शास्त्रोपदेशाचें कांहीं कारण उरत नाहीं. जो इच्छादि वृत्तींनीं युक्त असतो, तो नित्य दुःखी होतो. इच्छाशांतीनें त्यालाच केव्हां केव्हां सुखहि होतें. इच्छादि विकार चित्ताला होतात, आत्म्याला होत नाहींत, म्ह० वस्तुतः आत्मा सुखीहि नाहीं, व दुःखीहि नाहीं. यास्तव सुखदुःखांची पूर्णपणें चिकित्सा करावी असें ज्याला वाटत असेल त्यानें प्रथम इच्छेचाच त्याग करावा. 'हा मी, हें जगत्' ही भ्रांति परमपदीं नाहीं. हें सर्व शांत निराधार, अव्यय, निर्वाण आहे. मी, ब्रह्म, जगत् या शाब्दिक भ्रमाला अति शांत चिदाकाशांत विषयच नाहीं. तेव्हां त्याची कल्पना कोण कशी करणार? आणि येथें अहं, जगत्, ब्रह्म इत्यादि शब्दच जर नाहींत तर कर्ता व भोक्ता हे भाव तरी कोठले? कारण एक शांत चिद्रूपच हें सर्व आहे. 'अहो पण कर्ता, भोक्ता इत्यादि सर्वांचाच जर निषेध केला, तर मग ज्ञानाचा उपायहि रहाणार नाहीं!' म्हणून म्हणशील तर सांगतों. सर्व पदार्थांचा जरी निषेध केला तरी उपदेशाचा विषय जें ब्रह्म तोच स्वात्मा असल्यामुळें त्याचा निषेध होऊंच शकत नाहीं. सर्व मिथ्या पदार्थांच्या निषेधाची पराकाष्ठाच ब्रह्म आहे. त्यामुळें निषेधमुखानें सर्व विषयांचा बाध करून अवशिष्ट रहाणाऱ्या ब्रह्माचा लक्षणेनें उपदेश करतां येतो. सर्वांचा बाध झाल्यावर 'त्या बाधालाहि जाणणारें जें तत्त्व अवशिष्ट रहातें, तेंच ब्रह्म आहे, तोच आत्मा आहे.' असा उपदेश करतां येतो. तो ऐकून शिष्य सर्व अनात्मवस्तूंचा 'हें मी नव्हे' असें म्हणून बाध करितो, आणि शेवटीं तो स्वरूपानेंच अवशिष्ट रहातो. अर्थात् उपदेश केवळ मार्गदर्शक आहे. आतां नुसत्या अदर्शनानेंच दृश्याचा बाध कसा होतो, म्हणून विचारशील तर सांगतों. आपल्या समोर सिद्ध, पिशाच वगैरे उभे असतात, पण त्यांच्यांतील अंतर्धानशक्तीमुळें, त्यांच्या भयंकर चेष्टाहि कशा होतात तें आम्हांला कळत नाहीं. किंवा एकाच जागीं असलेल्या दोन पुरुषांपैकीं एक स्वप्नांत मेघाचें गडगडणें ऐकतो व दुसरा जागा असून तें ऐकत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. कारण ज्या पदार्थाचें ज्ञान व्हावयाचें तदाकार वृत्ति बनली पाहिजे. अंतःकरणांत जो पदार्थ व्यक्त होतो त्याचाच अनुभव येतो असा नियम आहे. सिद्ध किंवा पिशाच यांचा संचार गुप्त असल्यामुळें अंतःकरण तदाकार होऊं शकत नाहीं. त्यामुळें त्याचा अनुभवहि येत नाहीं. एकाच्या स्वप्नांतील गडगडणें दुसऱ्याला न ऐकूं येण्याचें हेंच कारण आहे. अंतःकरणानें पदार्थाकार होणें म्हणजे त्यांतील ज्ञानानेंच तदाकार होणें आहे आणि ज्ञान हेंच आत्म्याचें रूप आहे. त्यामुळें जें जें भासतें, तें तें सर्व तन्मय आहे. तस्मात् अहंकारासह सर्व जगत् परमात्म्याहून भिन्न नाहीं. संकल्प आणि स्वप्न, यांतील पदार्थांप्रमाणें ज्ञप्तिच जगद्रूपानें भासते. ती वस्तुतः निरवय आहे, तथापि जलावरील ऊर्मींप्रमाणें सावयव जगाच्या आकारानें भासते. एक आत्माच, ज्ञप्ति बहिर्मुख झाली असतां, अज्ञानानें तिच्यामध्यें मिथ्या विकार उत्पन्न

झाला असतां, अनेकत्वास प्राप्त होतो. पण तें अनेकत्व मिथ्या असल्यामुळें तत्वदृष्टीनें त्याचा विचार करूं लागलें असतां तेंच उपलब्ध होत नाहीं. ज्याप्रमाणें वस्तुतः अवयवशून्य असलेला हा जीव आपल्या कल्पनेनें हस्तपादादि अवयवांनीं स्वप्नांत सावयव होतो, त्याप्रमाणें नित्य, निरवयव व शांत ब्रम्ह जगत् बनतें. चिद्रूप सोन्याची चीप जगद्रूप विविध अलंकाराकार धारण करते. ती ज्याचें ज्याचें स्मरण करते, तो तो पदार्थ पुढें पहाते, ह्मणजे तिच्या कल्पनेप्रमाणें जगत् दिसतें. समुद्र द्रवरूप असल्यामुळें तरंगादि आकारांनीं जसा भासतो, त्याचप्रमाणें ब्रम्हच चिद्रूप असल्यामुळें आपल्या सत्तेनें जणुं काय जगद्रूपानें परिणाम पावतें. तें स्वरूपांत ज्याची ज्याची कल्पना करतें, तें तेंच पहातें. त्याला वास्तविक रूप नसतांनाहि तें स्वरूप पहातें, आणि ज्याची कल्पना करीत नाहीं, तें त्याला दिसतहि नाहीं. ब्रम्हच सर्वेश्वर असल्यामुळें,–सर्व शक्तींनीं संपन्न असल्यामुळें, आपल्या देहभूत भावेंत चेतन व अचेतन या शब्दांना अवकाश देतें. पण चेतन व अचेतन हीं उक्तिहि उपदेशार्थच आहे. त्यांचा विषय वस्तुतः विद्यमान नाहीं. जगत् सत्‌हि नाहीं व असत्‌हि नाहीं. तें चित्तत्त्वांत संकल्पामुळें भासतें. त्याविषयींचा संकल्प टाकला कीं भासत नाहीं. तेव्हां त्यांतील पदार्थांविषयीं आम्ही काय आग्रह धरणार? वायूच्या स्पंदाप्रमाणें आत्म्याचे चेतन व अचेतन हे भाव आहेत. ते आपल्या स्वाधीन आहेत, यत्न व श्रम यांनीं साध्य होणारे नाहींत. निश्चल स्फटिकांत स्वभावतःच दिसणारीं व अदृश्य होणारीं सहस्रावधि प्रतिबिंबें जशीं यत्नसाध्य नसतात, त्याप्रमाणेंच आत्म्यांतील ते भाव स्वाभाविक आहेत. ज्याचें प्रमाणपूर्वक निरूपण करूं लागलें असतां सत्ता, आधार व कारण यांची उपलब्धि होत नाहीं, तो अहं या नांवाचा यक्ष कोठून उत्पन्न झाला आहे, हें कळत नाहीं. ज्या अहंयक्षाची वास्तविक सत्ताच संभवत नाहीं, त्यानें तुम्हांला परवश करून टाकलें हें मोठें आश्चर्य आहे. ब्रम्हामध्यें अहं हा भ्रम काकतालीयन्यायानेंच भासतो. आकाशांत केसासारख्या रेषा जशा दिसतात, त्याप्रमाणें दृष्टीला भ्रम झाला असतां, अहंचा उदय होतो. ब्रम्हच जर अहं व जगत् आहे, तर त्याचा नाश व उत्पत्ति कोठली? व त्यांच्या अभावीं हर्ष व विषाद यांना अवकाश कोठला? ईश्वर सर्वशक्तिमान् असल्यामुळें कल्पना केली कीं लागलेंच जगत् दिसतें. कल्पनेच्या अभावीं कांहीं दिसत नाहीं. यास्तव तूं कल्पनाशून्य हो. रामा, तुला जगाचें दर्शन न व्हावो. तीच सर्व दृश्यमार्जनरूप मुक्ति आहे. तीच परमपुरुषार्थ, व तेंच परमफल. हे रामा, वर वर्णन केल्याप्रमाणें जगालाहि चित्त्व आहे. त्यामुळें ब्रह्माकाश स्वप्न व संकल्पनगर याप्रमाणें अकस्मात् विपरीत रूपानें भासतें. पण वास्तविक पहातां तें त्याहून भिन्न कसें असणार? आणि जगत् ब्रह्माहून भिन्न आहे, असें जर म्हटलें तर त्याला सत्ता व स्फूर्ति कोठली? आणि सत्ता व स्फूर्ति यांच्या अभावीं त्याला खरें तरी कसें म्हणावें? निश्चल जलामध्यें जशा ऊर्मि, न खोदलेल्या लांकडामध्यें जशी प्रतिमा, भूमीमध्यें उत्पन्न न झालेले जसे घटादिक, तसें ब्रम्हामध्यें सृष्टित्व अव्यक्त असतें. निराकार, निरवयव, निर्मल सत्त्वामध्यें ज्याचा अनुभव घेतला जातो, तें तेंच आहे, असें वाटूं लागतें. पण विचार केला तर ‘अहं’ कोणता? व ‘जगत्’ कोणतें? वायूचें स्पंदवैचित्र्य जसें वायूच्या सत्तेनेंच भासतें, त्याप्रमाणें अविद्याशून्य ब्रम्ह-

सत्तेनें जगदादि व अहमादि भासतें. ज्याप्रमाणें मेघामध्यें वृक्ष, हत्ती, अश्व, हरिण इत्यादि मिथ्या भास दिसतात, त्याप्रमाणें परब्रह्मामध्यें जगत् व अहंता भासते. सर्व सृष्टि परमशिवामध्यें अवयवयुक्त भासते. कार्य व कारण यांचाच दृष्टांत तिच्या त्या प्रतिभासाला योग्य आहे. ज्याप्रमाणें वटादि वृक्ष हें कार्य असून त्याचें बीज कारण असतें, आणि त्या सूक्ष्म बीजापासून वृक्ष, शाखा इत्यादि कार्य विस्तार पावतें, त्याप्रमाणें अतिसूक्ष्म ब्रह्मापासून अति स्थूल सृष्टि उदय पावते. बीजामध्यें नसलेले अवयव कार्यांत व्यक्त होतात. अर्थात जगत् स्वात्मव्यतिरिक्त संभवतच नसल्यामुळें मनांत अतिशय शांत, आयासशून्य, उपाधिरहित व भ्रमशून्य आकाशाप्रमाणें सम रहावें. वस्तुत: तुम्ही नाहीं, आम्ही नाहीं, जगत् नाहीं, व आकाशांतील भूतें नाहींत, तर हें सर्व शांत व परिपूर्ण ब्रह्मच आहे. सर्व पदार्थ विचारानें समान झाले असतां, विशेषभ्रमाचा त्याग करावा. विशेषत: सर्व सोडणें व अविशेषरूप होणें, हीच परमार्थ स्थिति होय. तीच चित् मी आहें, अशी भावना करावी. बहिर्मुख होऊन विषयांना जाणणें, हेंच बंधन व स्वातिरिक्त वस्तूला न जाणणें हाच मोक्ष आहे, असें जाण. ही अवस्था प्राप्त झाल्यावर तूं प्राप्तव्यवहार करीत रहा. योगभूमिकांचा क्रमानें अभ्यास कर. द्रष्टा दृश्याकडे जात नाहीं. चिति चेत्य विषयाकडे जात नाहीं व चेत्याच्या अभावीं जगत्‌हि भासत नाहीं. अशा स्थितींत कोण, काय व कसें जाणणार ? द्रष्टा व दृश्य यांचाच अभाव झाल्यामुळें जाग्रदवस्थेंतच सुषुप्तीप्रमाणें निर्विषय होऊन रहावें. शरत्कालच्या आकाशकोशाप्रमाणे निर्मल होऊन रहावें. वायूच्या स्पंदाप्रमाणें ब्रह्मामध्यें अज्ञानानें द्वैत दिसतें. चित् व अचित् हा भेद पहाणें, हींच सृष्टि व ऐक्यदर्शन हाच मोक्ष होय. ब्रह्मरूप वायूचा चिद्रूप स्पंद हीच सृष्टि असल्यामुळें चित्स्पंदन न होणें हेंच निर्वाण आहे. बीजांत असलेला वृक्षच शाखा-पल्लवादि रूपानें विकास पावतो, म्हणजे तें जसें बीजाचेंच रूप आहे, त्याप्रमाणें महाचित्तत्वामध्यें असलेलें स्वरूपच सृष्टीला जाणतें. बीजच पर्णादिरूपानें विकास पावून त्यांत त्या आकारानें स्थित होतें, त्याप्रमाणेंच ब्रह्मचित्‌हि सृष्टीला जाणूं लागली, म्हणजे सृष्टि बनते. वृक्षाच्या सहा भावविकारांचाहि सृष्टीला योग्य दृष्टांत आहे. बीजापासून वृक्षाच्या पुष्प—फलापर्यंत ज्या अवस्था क्रमानें होतात, त्या सर्व बीजामध्यें पूर्वींच असतात; पण व्यक्त नसतात; तर बीजाला भूमीमध्यें पेरलें म्ह० त्यापासून अंकुर होतो. हीच जन्मरूप पहिली भावविक्रिया होय. नंतर त्याचें अस्तित्व सुरू होतें, तीच अस्तित्वरूप दुसरी विक्रिया. पुढें तोच अंकुर वाढूं लागतो. हीच वृद्धि या नांवाची तिसरी विक्रिया. त्यानंतर वृक्षाचे बुंधे व शाखा हे त्याचेच परिणाम होत, ही विपरिणाम या नांवाची चवथी विक्रिया होय, कांहीं काळानें त्यांचा क्षय होऊं लागतो, ही अपक्षय या नांवाची पांचवी विक्रिया, व शेवटीं त्याचा नाश होतो. हीच शेवटली सहावी विक्रिया होय. सृष्टीचें बीज चिति आहे. तिच्यापासूनच जगत् हा परिणाम होतो. बीजभूत चितीपासून स्थूल सृष्टीपर्यंत वरील सहाहि भावविक्रिया बीजरूप चितीमध्यें होतात. अर्थात् सृष्टि हा चित्‌चाच विकार असल्यामुळें चिद्रूप आहे. हें सर्व जगत् निर्विकार परब्रह्ममय आहे. त्याच्यामध्यें जे भावविकार दिसतात, तेहि काल्पनिक असल्यामुळें सर्व निर्विकार, आदि-अंतरहित, व निरामय आहेत, असें जाणावें. हा द्वैताद्वैत

विकार स्वसंकल्पमात्र आहे. त्यामुळें आपणच संकल्पाचा त्याग केला म्हणजे तो आपोआप क्षय पावतो. याविषयीं संकल्प–नगराचा योग्य दृष्टांत आहे. शून्यत्व व आकाश यांचा भेद जसा तूं केवल कल्पनेनें जाणतोस, त्याप्रमाणें ब्रह्म व सृष्टि यांचा भेद काल्पनिक व युक्तिशून्य आहे, असेंच तूं समज. सृष्टीच्या पूर्वीं ब्रह्माची जी महाचिद्रूपिणी शांत सत्ता होती, तीच स्वतः अज्ञानामुळें अहंत्वाला प्राप्त झाली आहे. 'मी मनुष्य आहें' ही भावना सुद्धां अहंकारामुळेंच होते. या जगद्रूप ब्रह्मामध्यें वस्तुतः कांहीं-सुद्धां उत्पन्न होत नाहीं, व जलतरंगन्यायानें उत्पन्न झालेलें कांहीं नाशहि पावत नाहीं. पदार्थरूपानें व ब्रह्मरूपानेंहि स्थित असलेलें जगत्तत्व आपल्या निर्विकार स्वरूपांतच रहातें. जसा वृक्षादि अवयवी आपल्या अवयवांत, आकाश आकाशांत व जल जलांत एकरूप होऊन रहातें, तसें ब्रह्म एकरूप स्थित आहे. संवित् अर्ध्या निमिषांत आकाशांतील चंद्राला पहाते. आपल्या नेत्रापासून चंद्रापर्यंत मध्यें असलेलें जें अंतर त्यांतहि संविद् असतेच. पण विषयाच्या अभावीं प्रकट होत नाहीं. तोच तिचा स्वभाव होय. तेंच तिचें निरुपाधिक व निर्विषय स्वरूप आहे. रामा, त्याच स्वरूपाची तूं उपासना कर. हे दाशरथे! शास्त्रज्ञ विवेकी या संविदेचें स्वरूप दोन प्रकारचें सांगतात; एक सविवर्त, व दुसरें निर्विवर्त. पहिलें रूप अज्ञजनांच्या अनुभवांनीं सिद्ध झालेलें असतें व दुसरें कूटस्थ, पूर्ण, आनंद एकरस असतें. पहिल्याला क्षुब्ध व दुसऱ्याला अक्षुब्ध म्हणतात. त्यांतील ज्या स्वरूपाच्या आश्रयानें तूं परम पुरुषार्थ सिद्ध करण्याची इच्छा करीत असशील, त्यामध्येंच एकनिष्ठ हो. विचार न करितां कांहीं तरी समजून अविवेकी बनूं नकोस. ३४.

---

## सर्ग ३५ वा.

—:०:—

१ आत्मा अखंड एकरूप आहे, या गोष्टीचा अनुभव येण्यासाठीं सत्य व मिथ्या या दोन्ही रूपानें भासणाऱ्या ब्रह्माचें वर्णन.

श्रीवसिष्ठः—संविद् क्षणांत एका देशाहून दुसऱ्या दूर देशीं प्राप्त झाली असतां मध्यें जें निर्विषय रूप असतें, तेंच परमात्म्याचें परमरूप होय. तूं जातांना, ऐकतांना, स्पर्श करीत असतांना, वास घेतांना, निमिषोन्मेष करतांना, किंवा हंसतांना केवळ आत्ममय होऊन रहा. निर्विषय चिन्मात्र ब्रह्म तूं हो. म्हणजे तुला कांहीं पीडा होणार नाहीं. त्यामुळेंच तूं जीवन्मुक्तीचा अनुभव घेशील. त्या स्थितीचा अनुभव घेत असतांनाच आपला कुलाचार न सोडतां, तूं व्यवहार जरी केलास तरी स्वरूपापासून ढळणार नाहींस. कारण, तुझें चित्त वासनाशून्य झाल्यावर तुला द्वैताचें भानच होणार नाहीं. हीच परमस्थिति होय. द्वैत अविद्येचें कार्य आहे, हें जाणण्यास एकच प्रमाण पुरे आहे. तें कोणतें? तर विचारपूर्वक पाहूं लागलें असतां तें उपलब्ध होत नाहीं. प्रमाणपूर्वक निरूपण करूं लागल्यावरही जर अविद्या उपलब्ध झाली असती, तर तिला पराविद्याच म्हणतां आलें असतें. पण तसें होत नाहीं. आणि द्वैताचें कारण जी अविद्या तिचाच जर संभव नाहीं, तर विषय व त्यांचें ग्रहण करणारा जीव हे कोठून संभवणार? आणि द्वैताचा जर असंभवच आहे, तर विद्वानांच्या मनांत त्याची स्फूर्ति तरी कशी होणार?

याप्रमाणें विचार केला ह्मणजे मनांत शांतीचाच उदय होतो. ब्रह्म सत्य आहे, जगत्‌हि ब्रह्ममय असल्यामुळें सत्य आहे ब्रह्म व जगत् यांचा पारमार्थिक भेद नाहीं. एकच तत्त्व अनेकाकार होऊन राहिलें आहे. ब्रह्म सर्व आहे म्हणजे परिपूर्ण आहे, तथापि तें असर्व म्हणजे परिछिन्न असल्यासारखें भासतें. तें शुद्ध आहे, तथापि अशुद्ध असल्यासारखें दिसतें. अशून्य असूनहि शून्याप्रमाणें व शून्य अशून्यासारखें स्पष्ट दिसतें. तें व्यापक आहे, तथापि अव्यापक असल्यासारखेंच दिसतें. तें देशतः व कालतः परिच्छिन्न आहे, असा जरी भास झाला तरी स्वरूपतः अपरिच्छिन्न आहे. तें मूळचें निर्विकार, पण उपाधीमुळें विकार पावणारेंसें दिसतें. तें सम व शांत असूनहि विषम व अशांत असल्याचा अनुभव येतो. तें वस्तुतः सद्रूप असूनहि असत् असल्यासारखें भासतें. कारण तें दिसत नाहीं. तें तत्त्व आहे, पण अतत्त्वासारखें दिसतें. त्याच्यामध्यें विभाग नाहींत, पण पदोपदीं विभागांचा अनुभव येतो. त्यांत जाड्य म्ह० अज्ञान नाहीं, तरी तें जडासारखें दिसतें. वस्तुतः निर्विषय आहे, तथापि विषयरूपानें प्रतीत होते. त्याला अंश नाहींत, तथापि सांश असल्याप्रमाणें दिसतें. त्यांत अहंकार नाहीं, तथापि ' हा मी ' असें प्रत्येक जीव म्हणतो. तें अविनाशी आहे, तरी क्षणभंगुरसें भासतें. त्याच्यामध्यें कलंक नाहीं, तथापि तें कलंकित दिसतें. तें अज्ञेय आहे, तरी ज्ञेयासारखें प्रतीत होतें. स्वयंप्रकाश असूनहि गाढ अंधकाराप्रमाणें व पुरातन असूनहि नवीन असल्यासारखें भासतें. परमाणूहूनहि सूक्ष्म असलें तरी तें आपल्या स्वरूपांत हजारों सृष्टींना धारण करितें. तें सर्वात्मक जरी आहे तरी यज्ञ, दान, तप, चित्तशुद्धि, वैराग्य, श्रवण, मनन इत्यादि पुरुषप्रयत्नानें रहित, सर्व दृश्याला पाहणारें, बंधरहित असूनहि अनेक बंधांनीं युक्त व अनेक प्रकारांनीं दिसत असलें तरी अद्वितीय, मायारहित असूनहि विविधमायारूपी किरणसमुदायांनीं परिवेष्टित झालेला जणुंकाय सूर्यच, असें तें ब्रह्म तूं जाण. समुद्र जसा सर्व जलांचा निधि, त्याप्रमाणें तें सर्व ज्ञानांचा निधि आहे. ब्रह्मांडरूपानें तो जगद्रत्नांचा मोठा खजिना आहे. ब्रह्मांड अतिशय गुरु म्ह० जड जरी असलें तरी विवेकरूपी तागडींत घालून तोलूं लागलें असतां, त्याचा गुरुत्व हा धर्म मिथ्या ठरतो, त्यामुळें तें कापसाच्या सूक्ष्म अंशापेक्षांहि हलकें होतें. मायारूपी किरणांचा चंद्र असलेलें तें चक्षूचा विषय होत नाहीं. तें कालतः अनंत व देशतः अपार असूनहि कोठल्याहि देशीं अथवा कालीं अवस्थित नाहीं. शून्यप्रदेशांतहि वनाची रचना करण्यांत व मोठमोठे पर्वत निर्माण करण्यांत तें तत्पर असतें. तें सूक्ष्माहूनहि अति सूक्ष्म, स्थूलाहूनहि अति स्थूल, गुरुपदार्थांहूनहि अतिशय गुरु व श्रेष्ठांहूनहि श्रेष्ठ आहे. कर्ता, कर्म, करण ही त्रिपुटी ज्याच्या ठिकाणीं नाहीं. त्याचें कांहीं कारकहि नाहीं. त्यामुळें तें अंतःशून्य असूनहि कर्त्रादि कारकांनीं चिरकाल परिपूर्ण आहे. तें जगाचें संपुट असूनहि नेहमीं अरण्याप्रमाणें शून्य आहे. तें पर्वताप्रमाणें निरवकाश असलें तरी सर्वत्र सावकाश आहे. तें प्रत्येक वस्तूमध्यें आहे. प्रत्येक क्षणामध्यें आहे. अति पुरातन आहे. अति कोमल व नूतनहि आहे. तें प्रकाशरूप जरी असलें तरी अंधकारासारखें आहे. कारण तें आपल्या उदरांत सर्व जगाला झांकून टाकतें. म्हणून जणुं काय अंधकारच आहे. प्रत्यक्ष असूनहि दिसत नाहीं. परोक्ष म्हणावें तर अग्रभागीं स्थित असतें. चिद्रूप असून जड व अजड असून चिद्रूप असें

तें केवल 'अहं' या शब्दाचाच विषय असूनहि 'युष्मद्' म्ह० 'तूं' या शब्दाचा विषय होतें. एक ज्याला 'तूं' म्हणतो, त्यालाच तो स्वतः 'मी' म्हणतो. मी व तूं, यांहून निराळा असलेला एखादा तटस्थ पुरुषहि स्वतःला 'मी' असेंच म्हणतो. त्यामुळें 'मी' हें आत्म्याचें नांव आहे व त्या परिपूर्ण सागरांतील ऊर्मि म्हणजेच हें त्रिभुवन होय. तुषार शुक्तेला जसे धारण करितात, त्याप्रमाणें ब्रह्म आपल्यामध्यें जगाला धारण करतें; आणि मोठ्या समुद्रांत जशा लाटा उसळतात, तसेंच ब्रह्मामध्यें हें जगत् स्फुरतें. तुषारांमध्यें त्यांची स्वच्छता जशी भासते, त्याप्रमाणें या ब्रह्मतत्त्वामध्यें सर्व भासतें. पाणी तरंगांना जसें आपल्या स्वरूपांतच उत्पन्न करतें, त्याप्रमाणें देश, काल व अवयव यांनीं रहित असलेलाहि देव अहर्निश मिथ्या जगाला जणुं काय व्यक्त करतो. या विस्तीर्ण आकाशारण्यांत प्रसार पावणाऱ्या व भूतपंचकरूप पर्णांनीं युक्त असलेल्या जगद्रूप जीर्ण मंजरी विकास पावतात. हा परमदेव अत्यंत निर्मलाकार आहे. तो स्वतःचें प्रतिबिंब पहाण्याच्या इच्छेनें स्वतःचाच आरसा झाला आहे. अपरिच्छिन्न ब्रम्हसंविदेंत आकाश-उदुंबर आहे. ब्रम्हांड हें त्याचें फल आहे. स्वेच्छेनें कल्पिलेलें त्रैलोक्य हे त्याचे अवयव आहेत. त्यांत चंद्रसूर्यादिक प्रकाशित होतात, त्यापासून प्राण्यांचीं चक्षुरादि इंद्रियें बनतात; आणि त्यांच्या द्वारा जविभूत आत्मा सृष्टींतील रूपादिकांचा अनुभव घेतो. अर्थात् आत्माच आपल्या दर्शनादि क्रियांचीं उपकरणें बनतो. तो अंतस्थ असल्यासारखा, बाहेर असल्यासारखा, एकरूप, अनेकरूप, भावरूप, अभावरूप वगैरे स्वतःच बनतो. सर्व पदार्थांची शोभा आत्मरूप आहे, म्ह० आत्मा हीच त्यांची शोभा आहे. जिव्हा विविध रसांना जशी प्रकट करते, त्याप्रमाणें आत्म्यामध्यें त्याच्या इच्छेनेंच सर्व पदार्थ प्रकट होतात. या आत्मजलाचें जें द्रवत्व तेंच हें जगत् आहे. नाना प्रकारचीं विषयज्ञानें व अनुभव हाच त्यांतील मधुर रस आहे, आणि अनेक जन्म व लोक हेच त्यावरील तरंग आहेत. चंद्र, सूर्य, अग्नि इत्यादि पदार्थांची रूपादि शोभा, सुषुप्ति व प्रलय या अवस्थांमध्यें, या स्वयंप्रकाश आत्म्यांतच शांत होते आणि जाग्रत् व स्वप्न या अवस्थांमध्यें, यापासूनच उत्पन्न होते. सूर्यादि आकाशस्थ तेजोगोलांपासून प्रभामंडल जसें उद्भवतें, अगदीं तसेंच हें समजावें. ज्याप्रमाणें बर्फामध्यें शुभ्रत्व, त्याप्रमाणें आत्म्यामध्यें हें सर्व जगत्, किंबहुना आत्माच हें सर्व जगत् आहे. चंद्रापासून जसे किरण, त्याप्रमाणें आत्म्यापासून सर्व अनुभव उद्भवतात. या निरवयव रंगापासूनच हें जगच्चित्र निर्माण होतें. म्हणून जन्मादि भावविकार व वैचित्र्य यांचा जरी अनुभव येत असला तरी वस्तुतः त्यांचा अभाव आहे व तें सर्व ब्रह्ममयच आहे, असें तूं समज. या वनवृक्षापासूनच दृश्यरूप शाखा आकाशांगणांत पसरल्या आहेत. त्यांना जगत्समुदाय हेच गुच्छ लागले आहेत. ही दृश्यरूप नदी खरोखर वृद्धि व ऱ्हास यांनीं युक्त आहे. ती या आत्मरूप निश्चल पर्वतावरून वहाते व तिच्या प्रवाहाबरोबर द्वैतरूपी असंख्य पुष्पें वहात असतात. या आकाशरूप रंगभूमीवर भुवनरूप अभिनय करून नियतिरूप नर्तकी कल्परूप उत्सवाच्या वेळीं सतत नृत्य करीत असते. ती नियतिनर्तकी ब्रह्मरंगरूप मायिक मंडपांत आपल्या 'काल' या नांवाच्या पुत्राला पुनः पुनः निरनिराळ्या वेषांत दाखविते. त्याला पुनः पुनः उत्पन्न करते व पुनः पुनः संहृत करते. तिचा तो पुत्र काल आपल्या नेत्रांच्या

निमिषोन्मेषांनीं कोट्यवधि ब्रह्मांडांचे उदय व प्रलय करतो. पण एवढा मोठा क्षोभ होत असूनहि आत्मा जशाचा तसा शांतच असतो. आरशांत हजारों प्रतिबिंबें जरी पडलीं तरी तो जसा निर्विकार असतो, त्याप्रमाणें असंख्य सृष्टींचा उदय व अस्त जरी झाला तरी त्यांचा आधारभूत आत्मा इच्छादि सर्व विक्रियाशून्य असतो. भौतिक पदार्थांचें भूतपंचक हें जसें कारण आहे, त्याप्रमाणें भूत, भविष्यत् व वर्तमान सृष्टींचें आत्मा हें बीज आहे. पण तें स्वतः कारणरहित आहे. त्याचा विकास हीच जगल्लक्ष्मी व त्याचा स्वरूपामध्यें संकोच हाच प्रलय होय. जेव्हां आत्मा विकास व संकोच यांनीं रहित होतो, तेव्हां स्वरूपांतच रहातो. रामा! परिमाणानें व देश, काल, संख्या यांनीं फारच मोठीं असलेलीं जीं हीं ब्रह्मांडें त्यांतील पदार्थांची उत्पत्ति, स्थिति व लय, प्राण्यांच्या जन्म, बाल्य, तारुण्यादि दशा, जाग्रत्-स्वप्नादि अवस्था, उत्कर्ष, अपकर्ष इत्यादि भाव चिदाकाशांतच उदय पावतात; त्यामुळें तीं सर्व वायूच्या स्पंदाप्रमाणें अपरिच्छिन्न ब्रह्मस्वरूप आहेत, असें समजून तूं स्वस्थ रहा. ३५.

---

## सर्ग ३६ वा.

—:०:—

१ तुच्छ विषयांचा अनिच्छेनें उपभोग घेणें बंधाला कारण होत नाहीं. २ इच्छा हाच परमबंध आहे. ६ इच्छेचा त्याग हीच मुक्ति.

**श्रीवसिष्ठः**—जलांतील आवर्ताप्रमाणें सर्व पदार्थ प्रथम भिन्नरूप भासतात. ते स्वतः-विषयींची इच्छा उत्पन्न करून चित्ताला भ्रमण करावयास लावतात. नंतर राग, द्वेष, दुःख इ० अनर्थांत पर्यवसान पावतात. पण विचारानें तरंग जसे जलमात्र दिसूं लागतात, तसें सर्व पदार्थ एकरूप झाल्यावर चित्तांत भ्रम उत्पन्न करीत नाहींत व अनर्थांतहि पाडीत नाहींत. या सर्व विश्वाचें सत्तामात्ररूप परमाकाशत्व हेंच अविरुद्धस्वरूप आहे. त्या सत्तेला सर्व विशेष रूपापासून अगदीं पृथक् केल्यावर जें तिचें सन्मात्ररूप रहातें, तेंच स्वाभाविक रूप होय. म्हणन चित्ताला शांत करून त्याचाच आश्रय करावा. ज्याप्रमाणें बालकानें शून्य प्रदेशीं कल्पिलेलें यक्ष-पिशाचादिकांचें भयंकर रूप प्रौढ मनुष्याच्या दृष्टीनें कांहीं नसतें, त्याप्रमाणें माझ्या दृष्टीनें हें विश्व तत्त्वतः कांहीं नाहीं. पाषाणाच्या प्रतिमांचें सैन्य जसें अकिंचित्कर, त्याप्रमाणें सर्व विश्वहि केवल मनःसंकल्परूप असल्यामुळें निरुपयोगी होय. विद्वानाच्या दृष्टीनें त्यांत विश्वत्व कशाचें ! अज्ञदृष्ट्या मात्र त्यांत विषयसंकल्प, उपभोग इत्यादि सर्व कांहीं आहे. पण विचार करूं लागल्यास त्यांतहि सारभूत चिन्मात्रावांचून कांहीं उपलब्ध होत नाहीं. त्यामुळें वस्तुतः त्यांना विश्वत्वहि नाहीं. अर्थात् जगाला जाणणारा जो पुरुष त्याचें ज्ञातृत्व, हीच जगाची भ्रांति व अनात्मपदार्थांचें अज्ञातृत्व, हीच त्या भ्रमाची शांति होय. म्हणजे एकाद्या गोष्टीचें स्मरण करणें, किंवा तिला विसरणें हें जसें प्रत्येकाच्या स्वाधीन आहे, त्याचप्रमाणें जगाचें ज्ञातृत्व, किंवा अज्ञातृत्व मनुष्याच्या हातीं आहे. हें सर्व चिदाकाशच आहे. त्यांत अनुभवास येणारी पदार्थांची सत्ता चित्सत्तेहून निराळी नाहीं. 'अहं' असा अहंकारहि नाहीं. ज्ञप्तींत विकारादिकहि नाहींत. त्यामुळें वस्तुतः चिद्व्यतिरिक्त कांहीं नाहीं. आकाशांतील अरण्य जसें शब्दमात्र, त्याचप्रमाणें 'त्वं, अहं,' इत्यादि शब्दभ्रम आहेत; सर्व शांत, शुद्ध, शिवस्वरूप आहे. त्यांत मला दुसरें कांहीं दिसत नाहीं. त्याच-

प्रमाणें माझें हें उपदेशवचनहि संविदाकाशरूप आहे, असें तूं समज. कारण हें वचन तुझ्या संविदाकाशरूप आत्म्यांतच स्वतः स्थित असतें. जड स्वरूपांत तें केव्हांहि स्थित होत नाहीं. शब्दतत्त्वहि चिद्रूप स्फोटात्मकच आहे, असें विचारानें ठरतें. चित्रांतील पुरुषाप्रमाणें किंवा पाषाणावर खोदलेल्या मूर्तीप्रमाणें इच्छाशून्य होऊन रहाणें हेंच परम पद होय. इच्छा जरी नसली तरी ज्याचें मन आत्म्यामध्यें विश्रांति पावलें आहे, असा मौनी पुरुष कळसूत्री पुतळ्याप्रमाणें प्रकृत कर्मामध्यें जरी हालचाल करीत असला, तरी मनांत व्याकुळ होत नाहीं. व्यवहार करणाऱ्या ज्ञानी पुरुषाचें जीवन वेळूप्रमाणें अंतर्बाहि-शून्य असतें. तें त्याला विरस भासतें आणि त्याविषयींच्या वासना त्याच्या मनांत नसतात. ज्याला दृश्य आवडत नाहीं व मनांत अदृश्याविषयींची रुचि असते. तो सबाह्य—अभ्यंतर शांत असलेला पुरुष संसारसागरांतून तरून गेलेला असतो. मुरलीप्रमाणें त्यानें कितीहि शब्द जरी उच्चारले तरी त्याच्या चित्तांत त्यामुळें विकार उत्पन्न होत नाहीं. कारण त्याची वासना क्षीण झालेली असते. प्रारब्धप्राप्त कर्मफलाचा तो अनुभव घेत असतो. त्यामुळें त्याच्या ठिकाणीं अहंममाभिमानहि नसतो. त्यांच्या अभावीं तो कोणत्याहि प्रकारें आसक्त न होतां वाग्-इंद्रियानें शब्दोच्चार करतो व शब्दोच्चार करतांनाहि त्याचें कर्तृत्व त्याचेकडे येत नाहीं. त्याचप्रमाणें वासनाशून्य मनानें प्रारब्धप्राप्त स्पर्शनीय पदार्थांना त्याला खुशाल स्पर्श करूं दे. नटांच्या परस्पर स्पर्शाप्रमाणें इच्छा व संकल्प यांनीं रहित असलेल्या त्या स्पर्शानें तो बद्ध होत नाहीं. एका पळीनें स्वयंपाकांतील निरनिराळे पदार्थ ढवळले तरी तिच्यावर जसा त्या रसांचा परिणाम होत नाहीं, त्याप्रमाणें इच्छा, द्वेष, लोभ, क्रोध इत्यादि विकारांनीं रहित असलेल्या ज्ञानी पुरुषानें विविध रसांचा आस्वाद जरी घेतला, तरी त्याच्या मनावर त्याचा संस्कार घडत नाहीं. चित्रांतील नेत्राप्रमाणें ज्ञानी पुरुषानें प्रारब्धप्राप्त विविध रूपें जरी पाहिलीं तरी वासना, रस, मान, गर्व यांनीं रहित असल्यामुळें त्याचें मन विकृत होत नाहीं. वनांतील वायूप्रमाणें त्यानें अनेक सुगंधांचा वास जरी घेतला, तरी निरिच्छ मनावर त्याचा कांहीं परिणाम घडत नाहीं. रामा ! याप्रमाणें सर्व जगत् नीरस आहे असें जाणून, भोगरूपी रोगांची चिकित्सा जर न केली तर दुःखशांतीचें नांवहि घ्यावयाला नको. जो हें समजतो, भोगरूपी विषाचा स्वाद घेत असतांना प्रतिदिवशीं जो अधिकाधिक संतुष्ट होतो, तो प्रदीप्त अग्नीमध्यें स्वमूर्तिरूप तृणाला सतत टाकीत रहातो. यास्तव वेदाला भूषित करणारे विद्वान् निरिच्छत्व हेंच समाधान आहे, असें ह्मणतात. मनाला निरिच्छ केल्यानें जसें तें शांत होतें, तसें शेंकडों उपदेशांनींहि होत नाहीं. इच्छेचा उदय हेंच दुःख आहे व इच्छाशांति हेंच सुख आहे. तसलें दुःख नरकांतहि होत नाहीं व तसलें सुख ब्रह्मलोकांतहि मिळत नाहीं. इच्छामात्र हेंच चित्त आहे. त्याची शांति हाच मोक्ष आहे. सर्व शास्त्रें, तप, यम, नियम हे सर्व इच्छाशांतीचेच उपाय आहेत. प्राण्याच्या मनांत जितकी जितकी व जशी जशी इच्छा उत्पन्न होते, तितकी तितकी व तशी तशी दुःखबीजमुष्टिच पेरली जाते. विवेकानें प्राण्याची इच्छा जशी जशी कमी होत जाते, तसा तसा दुःखचिंतारूप रोग शांत होत जातो. इच्छा आसक्तीमुळें जशी जशी वाढत जाते तशा दुःख व चिंतारूप विषाच्या ऊर्मि वृद्धि पाव-

तात. स्वयत्नरूप औषधानें हा इच्छारूप व्याधि जर घालविला नाहीं, तर त्यापेक्षां अधिक बलवान् औषध दुसरें नाहीं. इच्छेचा पूर्णपणें उपशम करतां येणें जरी शक्य नसलें तरी अल्पशः तरी उपशम करण्याचा प्रयत्न करावा. कारण त्या मार्गाला लागलेला मनुष्य अधोगतीला जात नाहीं. जो नराधम इच्छा कमी करण्याचा मुळींच प्रयत्न करीत नाहीं, तो प्रतिदिवशीं स्वतःलाच अंधकूपांत टाकतो. दुःख देणाऱ्या संसाराचें बीज इच्छाच आहे. तिला ज्ञानाग्नीनें जाळून टाकावें, म्हणजे जन्मरूपानें तिचा अंकुर पुनः उद्भवत नाहीं. इच्छा हाच संसार व तिचा अभाव हेंच निर्वाण, यास्तव इच्छा उत्पन्नच होणार नाहीं, असा यत्न करावा. व्यर्थ श्रम काय कामाचा? शास्त्रोपदेश व गुरु यांचा व्यर्थ कशाला आश्रय करतां? इच्छेला शांत करण्याचा यत्न न करतां केवल त्यांचाच आश्रय करणें व्यर्थ आहे. त्याच्या जागीं इच्छेनें अनुसंधान न करणें या चित्तसमाधानाच्या उपायाचाच आश्रय कां करीत नाहीं? ज्याच्या बुद्धीला इच्छेचें अनुसंधान न करणें ही अतिशय सुलभ गोष्ट दुःसाध्य वाटते, त्याला गुरूपदेश, शास्त्र इत्यादि सर्व खरोखर व्यर्थ होय. ज्याप्रमाणें व्याघ्रादि हिंस्र पशूंनीं व्याप्त असलेल्या अरण्यांत हरिणीचा जन्म म्हणजे मरणच होय, त्याप्रमाणें दुःखाचा प्रसार करणाऱ्या व इच्छा-विषाचा विकार उत्पन्न करणाऱ्या संसारांत मनुष्यांचा सर्वदा अंतच होत असतो. या इच्छेनें पुरुषाला बालकासारखें चपल जर न केलें, तरच तो आत्मज्ञानासाठीं अल्प तरी यत्न करील. यास्तव इच्छाशांतिच करावी. इच्छा शांत झाल्यानेंच ज्ञान प्राप्त होतें. निरिच्छता हेंच निर्वाण व सेच्छता हेंच बंधन; यास्तव यथाशक्ति इच्छेला जिंकावें. त्यांत दुष्कर तें काय आहे? जरा, मरण, जन्म इत्यादि कंटकमय वृक्षाचें बीज इच्छाच आहे. यास्तव त्या इच्छेला मनांतल्या मनांत शमाग्नीनें जाळून टाकावें. ज्या ज्या विषयीं मनुष्य निरिच्छ होतो, त्या त्या बंधापासून तो मुक्त होतो. यास्तव आपलें सर्व सामर्थ्य खर्चून, धैर्य धरून, विवेक करून, वैराग्यादि उपायांनीं, उत्पन्न झालेल्या इच्छेला मारून टाकावें. ज्या ज्या विषयाविषयीं इच्छा उत्पन्न होते, तो तो विषयच बंध उत्पन्न करितो आणि असले पुण्यपापमय बंधपाश म्ह० दुःखाचे पर्वतच आहेत. त्यामुळें सर्व क्लेश उद्भवतात. एखाद्या अधिकारी मनुष्याचा एक क्षणहि जर इच्छेच्या निरोधावांचून गेला, तर त्यासाठीं चोरांनीं सर्वस्व लुटल्याप्रमाणें दीर्घकाल आक्रंदन करणेंच युक्त आहे. या पुरुषाची इच्छा आंतल्या आंत जशी जशी शांत होत जाते, तसे तसे मोक्षासाठीं त्याचे वैराग्यादि गुण वाढूं लागतात. या अविवेकी जीवाची इच्छा पूर्ण करूं लागणें, म्हणजे संसाररूप विषवृक्षाला जलसिंचन करण्यासारखेंच होय. हृदयरूप वृक्षापासून उत्पन्न झालेल्या इच्छा या पुरुष-पशूला सतत जाळीत असतात. त्या तीक्ष्ण खड्गाच्या अग्राप्रमाणें तीव्र असतात. पापरूप अग्नीच्या त्या ज्वालाच आहेत. त्या हृदयांत उत्पन्न होतात व तेथील जीवाला स्नेहपाशांनीं घट्ट बांधून, सुखदुःखादि बीजकोशांत टाकून अत्यंत संतप्त करितात. यास्तव रामा! सर्वथा इच्छात्याग करावा. ३९.

---

# सर्ग ३७ वा.

१ प्रथम इच्छा उत्पन्नच न होईल असा यत्न करणें, २ पण दैववशात् ती जरी झाली, तरी केवळ ब्रम्हच आहे, अशी भावना करणें, ३ सोपपत्तिक ज्ञानयोग.

श्रीवसिष्ठः—इच्छा-विषाच्या विकाराचा जो वियोग, त्यालाच योग हें नांव आहे. योगाचें वर्णन पूर्वींहि जरी स्पष्ट केलें आहे, तरी शांतीसाठीं तें पुनः ऐक. आत्म्याहून निराळी जर एखादी वस्तु असेल, तर तिच्यासाठीं यत्न करणें उचित होईल; पण आत्म्याहून पृथक् वस्तुच नाहीं. तेव्हां आणखी कसली इच्छा करावयाची ? चित् निरवयव, सूक्ष्म, आकाशाहूनहि अधिक शून्य आहे. तीच अहंकार व जगदाकार आहे. तेव्हां तिच्याविषयीं निराळी इच्छा कशी संभवणार ? ती आकाशरूप आहे. विषय व विषयी हे दोन्ही आकाशरूप आहेत. जगाचा आभास मिथ्या आहे. तेव्हां त्यानंतर इच्छेचा विचार कोठून असणार ? बुद्धीनें विषयाचें ग्रहण केलें तरच त्याविषयीं इच्छा उत्पन्न होणार, पण विद्वानाची बुद्धि विषयाचें ग्रहण करीत नसल्यामुळें ग्राह्य-ग्राहक-संबंधच उत्पन्न होत नाहीं. तेव्हां त्याला इच्छा तरी कशी होणार ? आम्ही अतिशय शांतचित्त आहोंत, त्यामुळें अज्ञांच्या दृष्टीनें सिद्ध असलेला ग्राह्य-ग्राहक-संबंध आम्हांला प्रतीतच होत नाहीं. इतकेंच नव्हे, तर ज्यांना तो प्रतीत होतो, ते अज्ञहि आमच्या दृष्टीनें असिद्धच आहेत. तो संबंध स्वनिष्ठ जरी असला तरी उपलब्ध होत नाहीं. असद्वस्तूचा लाभ कसा होणार ? कृष्णवर्ण चंद्र कधीं तरी कोणीं पाहिला आहे का ? ग्राहकादिक सर्व त्रिपुटीची सत्ता तात्त्विक आत्म्यामध्यें कधींच प्रतीत होत नाहीं. त्यांचें स्वरूप अज्ञानाहून भिन्न नाहीं. अशास्त्रीय दृष्टीनेंच ग्राहकादि पदार्थ सत्य भासतात, पण शास्त्रीय तत्त्वदृष्टीचा उदय झाला म्हणजे ते कोठें जातात, तें कांहीं कळत नाहीं. तत्त्वज्ञानाचाहि स्वभाव असा आहे कीं, असत्य अहंता आत्मतत्त्वच आहे, असें शास्त्रतः समजलें कीं, ती स्वरूपांत लीन होते; आणि अहंतेनें आत्म्यामध्यें लीन होणें, हाच द्रष्टा व व दृश्य यांचा क्षय व विशिष्ट निर्वाण आहे. निर्वाणावस्थेंत दृश्यादिक नाहीं. दृश्यादिकांचा जेव्हां अनुभव येतो तेव्हां निर्वाण म्हणजे शांति नाहीं. प्रकाश व अंधकार यांप्रमाणें परस्परविरुद्ध असलेल्या या दोघांचा अनुभव एकाच वेळीं येणें अशक्य आहे. जर त्यांचा अनुभव एकाच वेळीं येऊं लागला, तर परस्परबाधित होणाऱ्या त्या दोन्ही अवस्था मिथ्या ठरतील. पण शांति किंवा निर्वाण मिथ्या नाहीं. कारण आत्मानुभवी विद्वानांना अक्षय आनंदाचा अनुभव त्या अवस्थेंत येतो. दृश्यादि भ्रमभूत आहे, तें नित्य नाहीं व सुखप्रदहि नाहीं. म्हणून त्याची भावना न करतां निर्वाणामध्यें स्थिर व्हावें. दृश्याचें चिंतन केल्यामुळेंच अनर्थ ओढवतात. तें शुक्तिरजतप्रमाणें[1] प्रमाणांनीं निरूपण केलें असतां बाधित होतें. त्याच्यापासून कांहीं पुरुषार्थ प्राप्त होत नाहीं, तेव्हां त्याचा जर निषेध केला, तें असत् आहे असें म्हटलें, तर त्यांत हानि कोणती ? तें आहे, असें मानलें तर मोठें दुःख होतें, व मिथ्या आहे असें म्हटलें तर सुख होतें. त्याच्या मिथ्यात्वाचें सतत चिंतन केलें तर त्याचे संस्कार दृढ होतात. वास्तव, अहो अज्ञजनहो,

---

१ एखादा शिंपीचा किंवा कसलाहि चकाकणारा तुकडा दृष्टीस पडला असतां, ती चांदी आहे किंवा चवली वगैरे नाणें आहे, असा जो भास होतो, त्यालाच शुक्तिरजत असें म्हणतात.

तुम्ही परमार्थ वस्तूमध्यें स्थिर होऊन शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशाप्रमाणें सर्व विकार असत्य आहेत, असें करतलामलकवत् स्पष्ट दिसत असतांनाहि यांत आसक्त होऊन परमार्थ वस्तूला कां विसरतां? हें सर्व दृश्य बंध उत्पन्न करणारें आहे, हें तुम्हांला ठाऊक नाहीं का? तुम्हांला बंधाचीच का इच्छा आहे? म्हणून तुम्ही दृश्यासक्ति सोडीत नाहीं? ज्या वेळीं कार्य-कारणभावादि सर्व ब्रह्मच आहे, असा निश्चय होतो, तेव्हां देहच मी ही बुद्धि नाहींशी होऊन प्रत्यगात्मा ब्रह्मरूपच आहे, ही गोष्ट अनुभवानें सिद्ध होते. त्यानंतर दृश्य अणुमात्रहि अवशिष्ट रहात नाहीं. म्हणूनच जे परिपूर्ण सर्वात्म्यामध्येंहि, कार्यकारणतादि दृश्याचा अंगीकार करून ब्रह्माचा बोध करण्यासाठीं साधनें हुडकतात, त्या तार्किक वाद्यांचें किंवा शिष्यांचें आम्हांला कांहीं प्रयोजन नाहीं. कार्य व कारण यांचा अंगीकार करणारांना मोक्षाचा मार्गच सांपडत नाहीं. वायूच्या स्पंदनाचें, जलाच्या द्रवत्वाचें व आकाशाच्या शून्यत्वाचें जें कारण, तेंच चिदात्म्याच्या सृष्टित्वादिकांचें कारण आहे. स्वभाव म्हणजे अविद्या हेंच त्या सर्वांचें कारण. जेव्हां कार्यकारणभावादि सर्व ब्रह्मच झालें तेव्हां ब्रह्म सृष्टीचें कारण आहे, हें म्हणणें व्यर्थ आहे. त्या शिवस्वरूप परमात्म्यामध्यें दुःख नाहीं, सुख नाहीं व चिन्मात्रत्वाहून निराळें कांहीं नाहीं. हें जगतूहि शांत शिवमय आहे. तेव्हां त्यांत इच्छेचा उदय कोठून होणार? मातीच्या बनविलेल्या सैनिकांमध्यें ज्याप्रमाणें मातीवांचून दुसरें कांहीं नसतें, त्याप्रमाणें जगत्, अहंता, इत्यादि दृश्यामध्यें ब्रह्मावांचून दुसरें कांहीं नाहीं.

**श्रीरामः**—हे मुनीश्वर! असें जर असेल, तर इच्छा उत्पन्न होवो किंवा न होवो, ती ब्रह्मच आहे, तर तिचें विधान किंवा निषेध करण्यांत काय अर्थ आहे?

**श्रीवसिष्ठः**—रामा, आत्मसाक्षात्कार झाल्यावर इच्छा ब्रह्मच होते, ब्रह्माहून भिन्न रहात नाहीं, असें जें तूं समजला आहेस, तें अगदीं खरें आहे. तथापि त्याविषयीं मी आणखी कांहीं सांगतों, ऐक. जेव्हां जेव्हां ज्ञानाचा उदय होतो, तेव्हां तेव्हां इच्छा शांत होते व ती वस्तुस्वभावामुळें उदय पावते. सूर्यास्तानंतर जशी रात्र होते, त्याप्रमाणें अज्ञानदशेंत आपोआपच इच्छा उद्भवते; आणि सूर्योदय होतांच जसा अंधकार नाहींसा होतो, त्याचप्रमाणें ज्ञान होतांच इच्छा नाहींशी होते. अरुणोदय झाल्यापासून प्रत्येक क्षणीं अंधकार जसा विरल होऊं लागतो, त्याप्रमाणें ज्ञानाचा जसजसा उदय होऊं लागतो, तशी तशी द्वैताची शांति, व वासनेचा विलय होतो. त्यानंतर इच्छा कशी उद्भवणार? त्याची अविद्या शांत झालेली असते, व निर्मल मुक्तता उदय पावलेली असते. त्याला सर्व दृश्याविषयीं वैराग्य आलेलें असतें. त्यामुळें इच्छा केव्हांहि उत्पन्न होऊं शकत नाहीं. दृश्याविषयीं विरक्त झालेल्या पुरुषाला दृश्य आनंद देऊं शकत नाहीं. स्वभावतःच त्याला जगच्छोभा आनंद देत नाहीं. त्यामुळें तो दृश्यांत आसक्त होत नाहीं. एखादे वेळीं काकतालीयन्यायानें किंवा कोणाच्या प्रेरणेनें त्याला इच्छा होते, पण ती त्याच्या अंतःकरणांत वासनारूपानें परिणत होत नाहीं. किंवा ज्याचें ज्ञान अतिशय दृढ असतें, त्याला इच्छाच होत नाहीं. ज्ञानी पुरुषाची अशा प्रकारची इच्छा किंवा अनिच्छा हें ब्रह्मच आहे. किंवा त्याला नव्या नव्या विषयांना पाहून इच्छा होतच नाहीं. कारण ज्ञान बलवत्तर आहे. त्यामुळें तें उत्पन्न झाल्यावर इच्छा नियमानें शांतच होते. प्रकाश व अंध-

कार यांप्रमाणें ज्ञान व इच्छा यांचा एकत्र सहवास संभवतच नाहीं. त्यामुळें स्वभावतः प्राप्त होणारी जी विषयासक्ति तिच्या निषेधाचा विषय तत्त्वज्ञानी होत नाहीं. जो अंध नाहीं, त्याला ' अंधानें कूपांत पडूं नये असें सांगणें ' केव्हांहि उचित नाहीं. ज्याच्या सर्व इच्छा शांत झाल्या आहेत, त्याला कोण काय सांगणार ? व कशासाठीं सांगणार ? बाह्य विषयांची इच्छा निवृत्त होणें, व स्वानंदानुभवानें तृप्त होणें हेंच ज्ञानित्वाचें लक्षण आहे. असा ज्ञानी सर्व लोकांना अभय देऊन सुखी करतो. जेव्हां दृश्य निरसन झाल्यामुळें पुरुषाचें मन त्यांत अनुरक्त होत नाहीं, तेव्हां त्या विषयींची इच्छाहि प्रसार पावत नाहीं. तीच विमुक्तावस्था होय. ज्ञानामुळें द्वैत व अद्वैत या भावना सोडून जेव्हां पुरुष शांतचित्त होऊन रहातो, तेव्हां त्याचे इच्छा, अनिच्छा इत्यादि सर्व भाव एक शिवस्वरूप बनतात. ज्ञानामुळें द्वैत, अद्वैत, द्वैताद्वैत इत्यादि भावना नष्ट होतात. तो अंतःकरणांत अत्यंत शुद्ध, अव्यग्र, शांत व स्वरूपनिष्ठ होतो. त्यानें कर्म जरी केलें, तरी त्याचा कांहीं उपयोग नाहीं. न केलें तरी त्यांत कांहीं दोष नाहीं. आब्रह्मस्तंबपर्यंत कोणत्याहि प्राण्यासाठीं सुद्धां त्याला कांहीं कर्तव्य नसतें. तो स्वेच्छेनें कांहीं करीत नाहीं, अनिच्छेनें करीत नाहीं, सद्वस्तूकरितां करीत नाहीं, असद्वस्तूकरितां करीत नाहीं. स्वतः करीत नाहीं, दुसऱ्याकडून करविला जात नाहीं. त्याला जीवितासाठीं व मृत्युनिवारणार्थहि कांहीं कर्तव्य नसतें. सृष्टींतील एकहि पदार्थ त्याला संपादन करावयाचा नसतो. ज्याला मोक्षसुखाचा अनुभव आलेला असतो, त्याच्या मनांत अगोदर इच्छाच उत्पन्न होत नाहीं, व झाली तरी ती शाश्वत ब्रह्मच असते. दुःख व सुख यांतील कांहींच नसून हें सर्व जगत् एक अज, शांत, शिवस्वरूप आहे, असें समजून जो मनांत शिलेप्रमाणें स्थिर असतो, त्याला विद्वान् लोक ज्ञानी समजतात. विषाला जसें अमृत बनवावें त्याप्रमाणें तो दुःखालाहि सुख बनवितो आणि जो धीर पुरुष मी दुःखालाहि आपल्या भावनेनें सुखाचें स्वरूप आणीन अशा निश्चयानें व्यवहार करतो, तो ज्ञानी होय. त्या अवस्थेंत त्याला विपरीत ज्ञान होत नाहीं, तर त्याला आकाशादि पदार्थांचें त्या त्या वस्तूच्या रूपानेंच ज्ञान होतें. तो ज्याला शांत, शिव, शून्य व सत् समजतो, तेंच वस्तुतः शांत, शून्य, वगैरे असतें. अज्ञ ज्याला शांत वगैरे समजतात, तें वस्तुतः शांत वगैरे नव्हे. आकाशांत आकाश, शांतवस्तूमध्यें शांति, कल्याणरूप वस्तूंत जसें कल्याण स्थित असतें तसें ब्रह्मामध्यें जगत् आहे. यास्तव बहिर्मुख होऊन जगाचा अनुभव घ्यावयाचा नाहीं, असा एकदा निश्चय केला, व त्याप्रमाणें वागूं लागलें म्हणजे जगत् सौम्य व शांत होतें. मग अहंताभ्रम आपोआप क्षय पावतो. हें जें कांहीं चराचर जगत् दिसत आहे, तें सर्व शांत आकाशच आहे. तें वस्तुतः मनोराज्यांतील नगरासारखें प्रतीत होतें. एखाद्या पुरुषानें आपल्या मनोरथानें कल्पिलेल्या नगरांत दुसऱ्या संकल्परहित पुरुषाला जसा सहज संचार करतां येतो; त्याला तेथें मनुष्यें, घरें वगैरे कांहीं दिसत नाहीं, त्याला कोणी प्रतिबंध करीत नाहीं, त्याप्रमाणें विद्वानाला या जगांत ब्रह्मावांचून कांहीं दिसत नाहीं. कारण समुद्रादि विविध पदार्थांचा जेथें अभाव आहे, अशा आत्म्यामध्यें द्रष्ट्याचें अंतःकरणच समुद्रादिकांच्या रूपानें विकास पावतें. जसें तृषित व श्रांत पुरुषाचें चक्षुरूप इंद्रियच निर्जल प्रदेशीं मृगजलाच्या आभासानें तद्रूप बनतें, तसेंच अंतः-

करण जगद्रूप धारण करितें. स्वप्नांतील नगराप्रमाणें किंवा लहान मुलानें कल्पिलेल्या वेताळाप्रमाणें दिसणाऱ्या या जगांत सत्यता व असत्यता तरी कशाची ? अहं ही वृत्ति वस्तुतः असत्य असतांनाच सत्य असल्यासारखी भासते. त्यामुळें ज्याला भ्रांति होते तो जीवहि जर खरा नाहीं, तर त्याच्यावांचून भासणारी भ्रांति खरी कोठून असणार? या जगाला कांहींच म्हणतां येत नाहीं. त्याला सत् म्हणावें तर क्षणभंगुर दिसतें; असत् म्हणावें, तर प्रतीत होतें. सत् व असत् या दोन्ही धर्मांनीं युक्त आहे, असें म्हणावें; तर एकाच पदार्थाच्या ठिकाणीं असे परस्परविरोधी दोन धर्म संभवत नाहींत. ह्मणजे हें जगत् अनिर्वाच्य आहे. इंद्रियांच्या योगानें त्याचें यथार्थ ज्ञान होत नाहीं. तथापि आकाशांतील गंधर्वनगराप्रमाणें तें प्रतीत होतें. तत्त्ववेत्त्याचे विषय तत्वज्ञानाच्या बलानेंच शांत होत असल्यामुळें त्याची इच्छा व अनिच्छा या दोन्ही जरी सारख्याच आहेत, तरी हे रामा! इच्छेचा उदयच न होऊं देणें अधिक श्रेयस्कर आहे. कारण अंतःकरणांत इच्छा उदय पावली ह्मणजे शांतीचा भंग होतो, आणि शांतीचा भंग हाच विक्षेप व दुःख आहे. इच्छाच शान्त झाली म्हणजे अक्षुब्ध चित्तांत शांत सुखाचा निर्विघ्नपणें आविर्भाव होतो. आकाशाला आकाशरूपानें जाणणें, व चिदात्म्याला अहं, जगत्, असें जाणणें, हीं दोन्ही सारखींच. वायूच्या स्पंदाला जसें कांहीं कारण नाहीं, त्याप्रमाणें आत्म्याच्या तसल्या प्रतीतिलि कांहीं कारण नाहीं. चित्नें विषयोन्मुख होणें हाच चित्ताचा उदय होय आणि चित्तानें इच्छेनें युक्त होणें, हाच संसार होय. इच्छा टाकणें हीच मुक्ति; इच्छात्याग हाच मुक्तीचा उपाय आहे, असें जाणून शांत व्हावें. त्यानंतर, ईश्वरानें जगाची उत्पत्ति केली किंवा संहार केला तरी त्याला ज्याप्रमाणें कांहीं लाभ होत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाला इच्छा झाली, तरी त्यांत हानि, लाभ, कांहीं नाहीं. चिदाकाशांत इच्छा, अनिच्छा, सत्, असत्, भाव, अभाव, सुख, असुख यांतील कोणतीच कल्पना संभवत नाहीं. ज्याची इच्छा प्रतिदिवशीं कमी कमी होत जाते, व जो विवेक व शम यांनीं तृप्त होतो, त्यालाच मोक्षाधिकारी म्हणतात. ज्याचें हृदय इच्छारूपी तीक्ष्ण बाणाच्या अग्रानें विद्ध होऊन अतिशय दुःख देत असतें, त्याला मणि, मंत्र, औषधि, यांचा कांहीं उपयोग होत नाहीं. ब्रह्मदेवानें प्राण्याला दुःख होऊं नये, म्हणून औषधी, मंत्र, यंत्र, शरीर, इंद्रियें इत्यादि जें जें उत्पन्न केलें आहे, त्या सर्वांचा मीं पूर्वींच विचार केला आहे. त्यांत मला मिथ्या भ्रमावांचून दुसरें कांहींच दिसत नाहीं. आतां भ्रांतिसिद्ध अशाच एखाद्या उपायानें संसारदुःखाची चिकित्सा करावी म्हणून म्हटल्यास अनवस्थाच प्राप्त होते. म्हणजे एकाच्या भ्रांतिसिद्ध उपायानें दुसऱ्याच्या भ्रांतिसिद्ध दुःखाचें निवारण होऊं लागलें, तर एकाच्या कल्पित पदार्थाचा दुसऱ्यालाहि त्याच्याच सारखा अनुभव यावयास पाहिजे, पण तो येत नाहीं. शिवाय भ्रांतिसिद्ध पदार्थ मिथ्या असल्यामुळेंहि त्याच्या योगानें दुसऱ्याच्या दुःखाचें निवारण होणें शक्य नाहीं. सशाच्या शिंगानें आकाशाला भोंक पाडतां येईल काय ? पाषाणाचें जसें जल व्हावें, त्याप्रमाणें चिदाकाश अहंभाव धारण करून अंतःकरण बनतें, आणि अंतःकरणच ईश्वराच्या अचिंत्य शक्तीनें साकार बनून, देहादिच मीं आहे, अशी कल्पना करतें. एकादा पुरुष स्वप्नामध्यें स्वतःचेंच मरण जसें पाहतो त्याप्रमाणें चिच्छक्ति चित्वामुळें मिथ्या संसारित्व अनुभविते. आका-

शामध्यें नीलत्व दिसतें, पण तें सत्य नव्हे; असत्य होय. पण त्याचा अनुभव येतो. त्यामुळें त्याला सर्वथा असत्यहि म्हणतां येत नाहीं. तसेंच, या परमेश्वरामध्यें सृष्टि दिसते, म्हणून तिला मिथ्या म्हणतां येत नाहीं व एका क्षणांत तिच्यामध्यें विलक्षण बदल होत असल्यामुळें तिला सत्यहि मानतां येत नाहीं. अर्थात्, ती अनिर्वचनीय आहे. ज्याप्रमाणें शून्यत्व व आकाश किंवा स्पंद व वायु यांचा भेद नाहीं, त्याप्रमाणें एकरूप असलेली सृष्टि व ब्रह्म यांचा भेद नाहीं. या सृष्टींत कांहीं उत्पन्न होत नाहीं व नाश पावत नाहीं; तर निद्रित मनुष्याला जसें स्वप्न, त्याप्रमाणें मनुष्याला ही सृष्टि भासते. हे पृथिव्यादि पदार्थ केवल संकल्पमात्र व त्यामुळेंच अविद्यमान आहेत. तेव्हां त्यांतील कशाचा त्याग करावा, व कशाचें ग्रहण करावें? चिदाकाशांत कांहीं क्रियाच संभवत नाहीं. हें शरीर पृथिव्यादि कारणांपासून उत्पन्न झालें आहे. त्यामुळें तेंहि आपल्या कारणाप्रमाणें कल्पित आहे. केवळ ब्रह्म चिन्मात्र आहे, आणि तें आत्म्यामध्येंच स्थित आहे. बुद्ध्यादिकांचें करणत्व चैतन्याच्या अपेक्षेनें भिन्न आहे, किंवा अभिन्न आहे, असें म्हणतां येत नसल्यामुळें अमक्याकडून अमुक केलें जातें हा व्यवहारही वस्तुतः परमार्थ वस्तूलाच उद्देशून होणार, हें उघड आहे. कारण, त्रिकालीं जर कांहीं संभवत असेल तर ती एक परमार्थ वस्तुच होय. त्याच न्यायानें ब्रह्माच्या आधारानें प्रतीत होणारे कल्प, महाकल्प वगैरे व त्यांतील क्रियांचे समुदाय वस्तुतः स्वप्नांतील जन्म मरणादिकांप्रमाणें निष्कारण आहेत. त्यांच्यामध्यें योग्य क्रमहि अनुभवास येत नाहीं. कारण एका क्षणांतच त्यांच्यामध्यें विलक्षण फरक झालेला दिसतो. अर्थात् चिदाकाशच पृथ्वी आहे; तेंच पर्वत, किल्ल्याचे विशाल कोट, तेंच हे सर्व लोक, व त्यांच्या सर्व क्रिया आहे. कारण चैतन्याला स्वरूपामध्येंच सर्व सृष्टींचें भान होतें. या आकाशाधारावर हें जगच्चित्र चिन्मय रंगानें काढलेलें आहे. तें केव्हांहि उदय पावत नाहीं, अस्त पावत नाहीं, शांत होत नाहीं, व कोमेजत नाहीं. चैतन्यरूप जलामध्यें जगद्रूप मोठमोठे तरंग उत्पन्न होतात, व ते तद्रूपच असतात. तेव्हां त्यांत अमुक एक उत्पन्न झालें आहे, अमक्याचा नाश झाला आहे, हें कसें म्हणतां येणार? व जेथें सर्वच एकरूप असतें, तेथें तशा व्यवहाराला अवकाशच कोठें आहे? महाचिदाकाश शांत आहे. स्वभावतःच त्यांत जगाचा अभाव आहे. विषयांचा असंभव असल्यामुळें ते विद्यमान नाहींतच. तेव्हां त्यांचे उदय-अस्त कोठून होणार? ब्रम्ह ज्या वेळीं सृष्टिरूपानें अवस्थित होतें, त्या वेळीं विचित्र वासनेच्या अनुसार संकल्प करतांच पर्वत आकाशरूप बनतात व आकाश पर्वतासारखें दिसूं लागतें. म्हणूनच योगाभ्यासानें सिद्ध झालेले महायोगी संविद्रूप सिद्धौषधिचूर्णानें एका निमिषांत जगाला आकाशरूप बनवितात. ज्याप्रमाणें या प्रसिद्ध भूताकाशांत सिद्धांच्या संकल्पानें कल्पिलेलीं अनंत नगरें एकमेकांहून अगदीं भिन्न पण गुप्त असतात, त्याप्रमाणें ब्रह्मामध्यें असंख्य सृष्टि असतात. पण त्या वस्तुतः चिदाकाशच होत. महासागरांतील तरंग परस्परांशीं मिश्रित झालेले असले तरी जसे जलाहून पृथक् पृथक्च असल्यासारखे भासतात, पण वस्तुतः पृथक् नसतात, त्याप्रमाणें महाचितीमध्यें हे महासर्ग परस्परांशीं मिश्रित असूनहि पृथक्च रहातात. पण वस्तुतः ते त्याहून व्यतिरिक्त नसतात. ज्ञानी योगी आपल्या संकल्पित लोकांतून दुसऱ्या सिद्धांच्या संकल्पित लोकांमध्यें जाऊं शकतात, म्हणजे त्यांना

आपली उपाधि मूळ चैतन्यामध्यें लीन करून व दुसऱ्याच्या चित्तामध्यें प्रवेश करून त्या त्या लोकामध्यें जाणें शक्य आहे, असें अनुभवी योगी सांगतात. त्यावरूनहि एका चैतन्याचेंच सत्यत्व सिद्ध होतें. तथापि योग हा सर्व-साधारण लोकांचा विषय नव्हे. असो; कधींहि विनाश न पावणाऱ्या परमपदामध्यें हीं सर्व भूतें आकाशांतील मेघादिकांप्रमाणें किंवा गंधर्व-नगरादिकांप्रमाणें स्थित आहेत. स्फटिकामध्यें प्रतिबिंबित झालेल्या रेखा वगैरे जशा दिस-तात, त्याप्रमाणें सर्व सृष्टिभ्रम परमार्थ आत्मा-नंदांतच सहज प्रतीत होतात. ते वस्तुतः उदय पावत नाहींत, कारण ते औपाधिक असतात. निरनिराळ्या पुष्पांचे सुवास एक-मेकांत जरी मिसळले, तरी ते स्वभावतः जसे अगदीं भिन्न भिन्न असतात, त्याप्रमाणें सर्व सृष्टि आकाशरूप असून सिद्धांच्या भूमीप्रमाणें परस्पर भिन्नभिन्न असतात. ज्यांचा संकल्प व मोह अतिशय वाढलेला असतो, त्यांना प्रपं-चहि स्थूल दिसतो, पण ज्या योगाभ्यासी लोकांचा संकल्प व मोह विचारानें सूक्ष्म, सूक्ष्म-तर, झालेला असतो, त्यांना जगाचा अनुभवहि तशाच रूपानें येतो. रामा ! तत्त्वदृष्टीनें जर पाहिलें, तर आंतर विज्ञान हाच परमार्थ आहे, असा वाद करीत बसणें हेंहि खरें नव्हे. दृश्य पदार्थ दुःखाला कारण आहे, व अशा पदार्थां-नींच हें सर्व जगत् भरलें आहे, हेंहि खरें नव्हे, असा वाद करणेंहि बरें नव्हे. ज्याच्या त्याच्या संकल्पाप्रमाणें ज्ञान फलद्रूप होत असतें. चैत-न्यामध्यें जें चित्त्व आहे तेंच जगत् आहे, अशी भावना केली ह्मणजे मग त्यांत जल, व त्याचें द्रवत्व यांप्रमाणें भेद संभवत नाहीं. सर्वांचा आधार काल, तदंतर्गत चतुर्दश भुवनें, त्या भुवनांतील मी, तूं इत्यादि म्हण-णारे भोक्ते जीव त्यांच्या उपभोगाचीं साधनें—इंद्रियें, शब्द-स्पर्शादि विषय, त्यांचा विचित्र भोग हें सर्व ईश्वररूप आहे. सर्वज्ञ, सर्वशक्ति, इत्यादि उपाधींनें युक्त असलेल्या पर-मेश्वराचें तें मायिक स्वरूप आहे अशी भावना केली, ह्मणजेच परमार्थतः एक शांत चिदाका-शच आहे, असा निश्चय होतो; आणि तो झाल्यावर रागादि दोष मुळींच संभवत नाहींत. इच्छादि दोषांना जिंकण्याचा हाच एक उपाय आहे. ३७.

---

## सर्ग ३८ वा.

—:०:—

१ चित् व चेत्य ( विषयी आणि विषय) यांचा संसर्ग व भेद या विषयींच्या भ्रमाचें निरसन. २ चित्च जगत् आहे, या सिद्धांताचें सत्तर्कानें उपपादन.

**श्रीवसिष्ठः**—चित् जेव्हां अब्रह्मता-भ्रमानें क्षुब्ध होते, तेव्हां जगत् पहाते. माया दिसण्यासाठीं एक प्रकारचें अंजन नेत्रांत घातलें ह्मणजे आकाशांत जसा पर्वत दिसूं लागतो, तसेंच विक्षिप्त झालेल्या चित्‌ला जगत् दिसतें. संकल्पानें उत्पन्न केलेली सृष्टि व ब्रह्मसृष्टि या दोन्हीं आम्ही सारख्याच मानतों. चित्रांतील सृष्टि जशी कधींहि क्षुब्ध होत नाहीं, त्याप्रमाणें ब्रम्हांतील सृष्टिहि ब्रह्मा-मध्यें क्षोभ उत्पन्न करीत नाहीं. कारण चित्रां-तील सृष्टीप्रमाणेंच ही बाह्य सृष्टिहि भ्रांति-कृत आहे. तथापि ती जीवाच्या कल्पनेनें क्षुब्ध झाल्यासारखी दिसते. ज्याप्रमाणें भिंती-वरील चित्रसृष्टि वस्तुतः भिंतीच्या रूपानेंच रहाते, त्यामुळें ती वस्तुतः भिंतीहून भिन्न नाहीं, पण भ्रांत मनुष्याच्या दृष्टीची कल्पना मनांत न येतां चित्रांतील सृष्टिमात्र स्पष्ट दिसूं लागते त्याच-प्रमाणें ही सृष्टि ज्ञानामध्यें कल्पित आहे, त्या-

मुळें वास्तविक ज्ञानरूप आहे. ती ज्ञानाच्या बाहेर नाहीं, तथापि भ्रांत मनुष्याच्या दृष्टीनें ती बाह्य आहे असें दिसतें. ज्ञान सत्यरूप आहे. म्हणून बाह्य विषयरूपताहि सत्यच आहे, असें तूं समज. यावरून तुला कदाचित् असें वाटलें कीं, हें आमचें मत बौद्धांचा 'बाह्य पदार्थ आहेत' हा वाद किंवा 'ते मुळीं नाहींतच, तर केवळ विज्ञानच पदार्थरूपानें भासतें, हा विज्ञानवाद यांशीं विरुद्ध नाहीं. पण त्या वादांचाहि आमच्या सिद्धांतांत अंतर्भाव होतो. कारण आम्ही चिद्हून भिन्न असलेलें विज्ञान व बाह्य प्रपंच यांना खोटे मानतों, त्यामुळें व्यवहारामध्यें कांहीं अपेक्षेनें दोन्ही वाद स्वीकारतां येतात. परमार्थतः मात्र ते दोन्ही खोटे! सर्व चिद्रूप आहे आणि चित् नेहमीं अक्षुब्ध असते, तिच्यामध्यें कोणत्याहि प्रकारचा विशेष नसतो. त्यामुळें क्षुब्ध झालेल्या आकाशादिक पंचभूतांची शांति अर्थात् सिद्धच आहे. त्यामुळें सर्व पूर्ण ब्रह्म सत्स्वरूप आहे, हीच गोष्ट सिद्ध होते. आम्ही जें कांहीं करतों तें सर्व त्या ब्रह्मसत्तेकरितां, व जें जें करतों तें तिच्यामुळेंच. तें सर्व ब्रह्मच सर्वतः आहे. तें सर्वमय आहे. त्या सर्वात्म्याला नमस्कार असो. विषय चिन्मात्र असल्यामुळें तो द्रष्टयाच्या चित्स्वरूपाशीं जेव्हां एकरूप होऊन जातो, तेव्हांच दृश्य रूपानें त्याचा अनुभव येतो, त्यावांचून नाहीं. जेव्हां द्रष्टा, दर्शन व दृश्य ही दृष्टि केवल चिन्मात्रच आहे, असा निश्चय होतो, तेव्हां सर्व जगाचें स्वरूप केवल अनुभव-ज्ञान आहे, असें परमार्थतः सिद्ध होतें. द्रष्टा व दृश्य हीं दोन्ही चिदात्मक साक्षीमध्यें जर एकरूप न झालीं, तर ऊंस खावयास प्रवृत्त झालेला मनुष्य ऊंसाला पाहून व तो चोखीत असूनहि त्याचें माधुर्य जाणण्यास पाषाणाप्रमाणें समर्थ होत नाहीं. कारण जडाला रस कळणार कसा? स्वतः रसच त्याला आपला अनुभव देईल, असें म्हणावें, तर तोहि जडच आहे. चेत्य म्हणजे विषय चिन्मय असल्यामुळें जलामध्यें जलबिंदु जसे मिळून जातात, तसे ते चित्तीमध्यें निमग्न होतात, त्यामुळें अनुभव येतो. त्यावांचून तो येणें शक्य नाहीं. दोन काष्ठांना परस्परांचा अनुभव येत नाहीं. त्यांची काष्ठत्व ही जाति जरी एक असली तरी त्यांचें चित्शीं तादात्म्य न झाल्यामुळें जसें ज्ञान होत नाहीं, त्याप्रमाणें जड द्रष्टाहि जोंवर चित्शीं तादात्म्य पावत नाहीं, तोंवर त्याला जाणूं शकत नाहीं. दृश्य चिद्रूप होईतों काष्ठासारखेंच असतें. काष्ठाची स्थिति जशा प्रकारची असते, तशीच दृश्याची असते. काष्ठ चिन्मय झाल्यानें जसें द्रष्टयाला दिसतें, तसें इतर दृश्यहि चिन्मय होऊनच त्याच्या अनुभवास येतें. त्यामुळें तें चिद्रूप आहे, असा तर्कानेंहि निश्चय करितां येतो. जल, वायु, पृथ्वी, इत्यादि सर्व महा चिद्रूपानेंच विस्तार पावलेले आहेत. त्यामुळें जगाचें ब्रह्मैक्य सिद्ध होतें. तर मग त्याला ज्ञान कां होत नाहीं, असें विचारशील, तर बाबारे! आपण ज्याला जड पदार्थ म्हणतों त्यांत बुद्धि, प्राण, जीव इत्यादि नसतात; त्यामुळें त्यांना ज्ञान होत नाहीं. प्राण, बुद्धि इत्यादिकहि भावनेनें कल्पिलेलें आहे व भावना म्हणजे चित्चा विकास आहे, तो इच्छेनें उदय पावत असतो. जेव्हां इच्छा नाहीं, तेव्हां पदार्थाची भावना नाहीं, व भावना नाहीं तेथें पदार्थ नाहीं. अर्थात् ब्रह्मसत्ताच जगत् या रूपानें भासते व सुषुप्ति, प्रलय, या रूपानेंच ती शांत होते. सर्व बीजांमध्यें आत्माच पुरुषत्वानें अनुगत होतो. जगांतील प्रत्येक पदार्थामध्यें जो अतिशय सूक्ष्म सारभूत अंश असतो, तोच तो परमात्मा होय. तोच अंकुरापासून शाखा, पुष्प,

बीज इत्यादि उत्तरोत्तर सर्व कार्यांत व्याप्त असतो. यास्तव जो जो अंश ज्यापेक्षां सूक्ष्म व त्यामुळेंच कारण म्हणून प्रसिद्ध असतो, त्याचा त्याचा ब्रम्हकोटीमध्यें प्रवेश करून जो जो स्थूल व त्यामुळेंच कार्यरूपानें प्रसिद्ध असलेला भाग, त्या त्या भागाला मायाकोटीमध्यें प्रविष्ट करावें; ह्मणजे कार्याच्या अपेक्षेनें सूक्ष्म असलेलें कारण ब्रम्हरूप आहे, व कारणाच्या अपेक्षेनें स्थूल असलेलें प्रत्येक कार्य मायामय व त्यामुळेंच मिथ्या आहे अशी भावना करावी. ब्रम्ह सर्व परमाणूंचा आत्मा आहे. त्यामुळेंच प्रत्येक पदार्थामध्यें असणारा जो साररूप सूक्ष्म अंश तीच परमार्थ वस्तु व तेंच ब्रम्ह होय. जसें घटादि कार्य सर्व मृण्मय असतें, मृत्तिका हेंच त्यांतील मुख्य द्रव्य होय, तिच्यावांचून त्यांत कांहीं नाहीं; तसेंच हें सर्व जगत्‌दि आमूलाग्र ज्या ज्या पुरुषाकडून जसें जसें विचारपूर्वक पाहिलें जातें, तसें तसें तें सर्व सन्मात्ररूप ब्रम्हच दिसतें. अणुरेणूइतकेंहि त्यांत दुसरें कांहीं नाहीं. सुवर्णाचे हजारों अलंकार जरी पुढें मांडले तरी त्यांत जसें सुवर्णत्वाहून अन्य कांहीं नसतें, त्याप्रमाणें जगद्भाव व जीवभाव यांच्या समुदायामध्यें शांत ब्रम्हाचें शांतत्वच असतें. दुसरें कांहीं नाहीं. रामा, तुझ्याजवळच जर कोणी मनुष्य निजला असला, व तो स्वप्नांत मेघांचा मोठा समुदाय पहात असला, तरी तो जसा तुझ्या दृष्टीस पडत नाहीं, त्याप्रमाणें, माझ्या दृष्टीनें सृष्टि, स्थिति, लय इत्यादि सर्व क्षोभ शून्यरूप आहेत. आकाशाची मलिनता व गंधर्वपुत्रांची सेना जशी मिथ्या, तसेंच हें जगत्‌हि शून्यरूप होय. तें केवल शांततारूप आहे. अंतःकरणांतील संकल्पभ्रमच पुष्परूप होऊन बाहेर जगाच्या आकारानें फलद्रूप होतो. ज्याप्रमाणें भमींत पेरलेलें वटवृक्षादिकांचें बीज जलानें आर्द्र झालें असतां अंकुरादि क्रमानें महावृक्ष बनून छाया, आश्रय, इत्यादिकांच्या योगानें प्राण्यांवर उपकार करण्यास समर्थ होतें, त्याप्रमाणेंच अंतःकरणांतील संकल्पबीजापासून हा जगद्वृक्ष विस्तार पावतो व प्राण्यांना त्यांच्या कर्माप्रमाणें सुखदुःखादि भोग देतो. ज्याचे अहंतादि प्रतिबंध नाहींसे होऊन निरतिशयानंद व्यक्त झाला आहे, त्या ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें, अणिमादि सिद्धि कस्पटाप्रमाणें तुच्छ होतात. ज्ञानी महात्म्याला देव, असुर, मनुष्य, इत्यादि विविध प्राण्यांनीं भरलेलेंहि हें विश्व एका केसाइतकें तुच्छ भासतें, त्यामुळें त्रैलोक्यांत मला असा एकहि पदार्थ दिसत नाहीं, कीं जो त्याच्या मनांत लोभ उत्पन्न करूं शकेल! ज्याला आत्म्याचा साक्षात्कार झाला आहे, तो कसाहि वागला व कोठेंहि गेला तरी त्याच्या मनांत द्वैतसंकल्प उत्पन्न होत नाहींत. ज्या महात्म्याला सर्व विश्व आकाशासारखें शून्य भासतें, त्याला मिथ्या विषयांची इच्छा कशी होणार? ज्याचे सर्व विषय शांत झाले आहेत, व सर्व इच्छा निवृत्त झाल्या आहेत, ज्याला वैभव व दारिद्र्य समान भासतात, त्याचा महिमा जाणण्यास कोण समर्थ आहे? त्याचे बंधु-पुत्रादि इष्टजन मरण पावले तर त्याला खेद होत नाहीं, व त्यांचा उत्कर्ष झाला, तर त्यामुळें हर्ष होत नाहीं. आप्त-इष्टांच्या मरणानें हा मीच मृत झालों आहें असें तो समजत नाहीं, व त्यांच्या जीवनानें मीच जिवंत आहें असेंहि मानीत नाहीं. अज्ञजनांच्या भ्रांतीनें मृगजलाच्या प्रवाहाप्रमाणें भ्रांतीला पात्र झालेल्या आत्म्यामध्यें जन्म व मरण हे भाव खोटेच भासतात. पण आह्मी जों त्यांचें उत्तम रीतीनें परीक्षण करावयास जातों, तों आह्मांला भ्रांतिहि दिसेनाशी होते. आम्ही परीक्षक आहोंत, ही कल्पना

नाहींशी होते, व जन्म-मरणाचें नांव सुद्धां उरत नाहीं. तर केवल शांत, अव्यय तत्त्व अनुभवास येतें. जो दृश्याविषयीं विरक्त झालेला असतो, जो आत्म्यामध्येंच रममाण होतो, व ज्याचें चित्त शमसंपन्न झालेलें असतें, तो वस्तुतः विद्यमानस्वरूप असूनहि अविद्यमान असा भासतो. त्यानें भवसागराचें उल्लंघन केलेलें असतें. त्यामुळें तो ब्रम्हरूपानें जरी स्थित असला तरी देहेंद्रियादिकांनीं रहित असतो. ज्याची मनोवृत्ति अतिशय शांत झाली आहे व त्यामुळें जो आत्म्यामध्यें एकरूप होऊन गेला आहे, तो वस्तुतः विद्यमान जरी असला तरी निर्वाण पावलेला असतो. कारण तो निरुपाधिक आत्मरूप झालेला असतो. दिवा मालविला असतां त्याचें जसें निर्वाण होतें म्हणजे तो जसा शांत होतो, त्याचप्रमाणें मनोवृत्तीच्या शांतीमुळें आत्म्याला निर्वाण प्राप्त होतें. ज्याला बुद्धीपासून घटपटादि स्थूल व सूक्ष्म पदार्थांपर्यंत सर्व दृश्य रुचेनासें होतें, त्या आकाशाप्रमाणें शांत असलेल्या पुरुषाला ज्ञानी लोक मुक्त असें म्हणतात. अविचारामुळें ‘ अहं ’ ही भावना उद्भवते व विचारानें ती नाहींशी होते. ‘ अहं ’ चाच अभाव झाल्यावर जगत् कोठचें व संसार तरी कोठचा ? चैतन्याच्या विपरीत भावनेमुळेंच बुद्ध्यादिकांच्या स्वरूपानें भासणारें चिदाकाश संकल्पमय जगाला जाणतें. ज्याप्रमाणें माझें मन सर्वविषयशून्य झालें आहे, तसेंच तुझेंहि होईल. तुला जर आत्म्याचें यथार्थ स्वरूप कळेल व त्यामुळें भ्रांतीचा नाश होईल तर तुझें मनहि सर्व विषयशून्य होईल. तूं भूतांचा आत्मा होशील. त्यानंतर सर्व आचरण मंगलरूप होईल, तुझी स्थिति निर्वाणरूप होईल. रामा, तूं जें करतोस, तूं जें खातोस, जो होम करतोस, जें देतोस, जें तप करतोस, जी हिंसा करतोस व दुसऱ्याहि ज्या ज्या क्रिया करतोस तें सर्व अव्यय शिवस्वरूपच आहे. मी, तूं, क्रिया, काल, आकाशादि भूतें, लोकालोकादिक पर्वत इत्यादि जें जें कांहीं आहे, तें सर्व मंगलरूप चिदाकाशच पसरलें आहे. मनाचे संकल्प व विकल्प, रूपादि विषयांचे अनुभव, त्रिकालीं अनुभवास येणारें जगत्, जन्म, जरा, मरण, रोग, इत्यादि सर्व महाचिदाकाशच आहे व तें सर्व शिवस्वरूप आहे. रामा, तूं आपल्या दुःखाच्या शांतीचे उपाय शोधीत बसूं नकोस, मनांत कांहीं शंका बाळगूं नकोस, विषयांचा अनुभव घेऊं नकोस, सर्व इच्छा टाकून दे, चिंतनहि करूं नकोस, मी अमुक आहे असा अभिमान धरूं नकोस, आणि या सर्व गोष्टी केल्यावर तूं जसा असशील तसाच रहा, तेंच निर्वाण होय. इच्छा व मनन हीं टाकल्यावर शांत, भावनाशून्य व वासनारहित होऊन तूं वाटल्यास व्यवहार कर किंवा करूं नकोस. वायूचा स्पंद व अस्पंद या दोन्ही प्रकारें जसा व्यवहार होतो तसाच तुझा व्यवहार होऊं दे. ज्याप्रमाणें लाकडाची नौका वल्ह्यांच्या योगानें चालविली जाते, त्याप्रमाणें तुझी पुरुषाला उचित् असलेली चेष्टा वासना व संकल्प यांनीं रहित, शांत व शास्त्रानुसार होऊं दे. हे रामा! तुझा व्यवहार स्नेहानें युक्त असा न होवो. माता, पिता, बंधु इत्यादि लोकांवर तूं अत्यंत आसक्तहि होऊं नकोस. फार काय, तूं ज्ञानी आहेस कीं अज्ञानी आहेस, दयाळू आहेस कीं निष्ठुर आहेस, हेंहि कोणाला कळू देऊं नकोस. तर तूं व्यवहारांतहि चित्रांतील दीपाप्रमाणें स्थिर रहा. प्राप्त भोगाविषयीं तूं विरक्त हो. पुढें प्राप्त होणाऱ्या भोगाची इच्छा करूं नकोस. तूं वासनाशून्य झालास म्हणजे मग शास्त्रावांचून तुला कांहींच प्रिय वाटणार नाहीं. शास्त्रच तुला विश्रांति

देईल. त्यामुळेंच तुला स्वसुखाचा अनुभव येईल. जोंवर देह आहे, तोंवर अवश्य तो व्यवहार केलाच पाहिजे. म्हणून तो शास्त्रानुसारच होईल व त्यामुळें चित्तदोष शांत होतील, असाच व्यवहार तूं कर. पण तसाहि तूं अभिनिवेश धरूं नकोस. मी शास्त्रानुसारच वर्तन करीन, सज्जनांचीच संगति धरीन, असा आग्रहहि तूं धरूं नकोस. कारण कोणत्याहि प्रकारचा अभिनिवेश न धरतां आपापल्या वर्णाश्रमाला उचित अशा आचरणांत व शमदमादिकांत आसक्त होणें, हेंच ज्ञानी पुरुषाचें मुख्य लक्षण आहे. यथेष्ट आचरण हें ज्ञानाचें लक्षण नव्हे. ३८

## सर्ग ३९ वा.

१ आत्म्यामध्यें विश्रांति पावलेला मनुष्य कोणत्या रूपानें अवशिष्ट रहातो, व जगत् त्याला कसें दिसतें, त्याचें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—जो पुरुष संकल्परहित असतो, तो शास्त्रानुसारच वर्तन करील हा नियम कसा संभवतो ? असें विचारशील तर सांगतों. रामा, परमार्थतत्त्वाचा साक्षात्कार झाल्यामुळें ज्याचा संसार क्षीण झाला आहे, असा पुरुष, नियमानें शास्त्रीय व्यवहारच करावा, असा संकल्प करीत नाहीं. कारण, प्रसंगप्राप्त व्यवहाराला कारण होणारा जो संकल्प, तोहि आभासरूप असल्यामुळें स्वात्माच आहे असें पाहतो. संकल्प या रूपानें त्याकडे पहातच नाहीं आणि कोणत्याही वस्तूकडे त्या त्या वस्तूच्या रूपानें पाहिल्यावांचून तिची सत्ताच सिद्ध होत नाहीं. त्यामुळें ज्ञानी पुरुषाच्या व्यवहाराला अवश्य असलेला संकल्प हा खरा संकल्प नसून, संकल्पाभास आहे. आरशावर तोंडाची वाफ सोडली असतां त्याला जशी मलिनता प्राप्त होते, त्याप्रमाणें चैतन्यामध्यें आत्म-साक्षात्कार होण्यापूर्वीं कांहीं अनिर्वाच्य कारणामुळें 'अहं' अशी अहंता उद्भवते, पण ती तत्त्ववेत्त्याच्या ठिकाणीं कांहीं कारणावांचून तत्काल नाहींशी झालेली दिसते. त्यानंतर मोठ्या यत्नानें जरी तिचा शोध केला, तरी ती हातीं लागत नाहीं. ज्याचें अज्ञानावरण क्षीण झालेलें असतें, ज्याच्या सर्व इच्छा शांत झालेल्या आहेत, जो परमामृताच्या लाभानें पूर्ण संतुष्टचित्त झाला आहे, तो निरतिशय आनंदस्वरूपसत्तेनेंच विराजमान् होतो. पूर्ण चंद्राच्या योगानें आकाश जसें शोभतें, त्याप्रमाणें ज्ञानरूप प्रकाशानें चमकणाऱ्या बुद्धीनें ज्ञानी आसमंतातील सर्व प्रदेश प्रकाशित करतो. तो जेथें असतो, तेथील लोकांच्या अंतःकरणांत संशयरूप धुकें राहूं देत नाहीं. वायु मेघादि आवरणाला दूर सारून सूर्यप्रकाशाला सर्व ब्रह्मांडभर पसरण्यास जसा अवकाश देतो, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाची बुद्धि अज्ञ जनांच्या अंतःकरणांतील अज्ञानावरणाला घालवून आत्मविचाराला अवकाश देते. ज्ञानी पुरुष आत्माच आहे, असें कोणालाहि सहज कळतें. कारण, त्याच्या ठिकाणीं संसारदोष किंवा संदेह यांचा अभाव असतो. त्याला आत्मप्रकाशाचा लाभ झालेला असतो, त्याच्या ठिकाणीं अज्ञानावरण नसतें. त्यामुळें तो शरत्कालांतील आकाशाप्रमाणें स्वच्छ असतो. त्याच्या ठिकाणीं संकल्प नसतो. तो निराधार असतो, शांत असतो. ब्रह्मलोकांतून आलेल्या वायुप्रमाणें तो अंतःकरणांत अति शीतल असतो. त्यामुळें अशा पुरुषाच्या समागमांत राहून प्रणाम, शुश्रूषा इत्यादिकांच्या योगानें तो इतर लोकांनाहि निष्पाप करीत असतो. स्वर्गादि पदार्थांना स्वप्नांतील पदार्थांप्रमाणें, किंवा वंध्या-

नुमते स्मरणाच्या उपयोगीं, तसेंच आत्मज्ञान झाल्यावर ‘ मी, तूं, हें जगत् ’ यांचा स्मरणापलिकडे कांहीं उपयोग नाहीं. यास्तव रामा ! मीं पूर्वी सांगितलेल्या क्रमानें योगाभ्यास कर, आत्मभावना दृढ कर, म्हणजे जगद्वासना हळूहळू क्षीण होत जाऊन, मी नाहीं, संसार नाहीं, तर केवल एक आत्मस्वरूप आहे, असा निश्चय होऊन तेंच एक अवशिष्ट राहील. हा स्वभावसूर्य जसा जसा उदय पावत जाईल तसा तसा भोगांधकार कमी कमी होऊन शेवटीं सर्वथा नाहींसा होईल. तो आहे, असेंहि कधीं वाटणार नाहीं. याप्रमाणें भोगांधकार नाहींसा झाला म्हणजे अंतःकरणादि साधनसमुदाय अज्ञान व ‘स्थूल देहच मी’ इत्यादि अध्यास, यांनीं तो रहित होतो. त्याचप्रमाणें ब्रह्माकारवृत्तीनें प्रदीप्त झालेल्या ज्ञानानें चमकूं लागतो आणि त्यामुळें दीपापासून सभोंवार पसरलेल्या प्रकाशासारखा ज्ञानप्रकाशानें सर्व जगाला व्यापून तो ब्रम्हरूप झाला आहे, असा भास होतो. ३९

---

## सर्ग ४० वा.

—:०:—

१. संसारांत ब्रम्ह भासत नाहीं, व ब्रम्हामध्यें संसार भासत नाहीं, पण जीवन्मुक्तींत पर्यायानें दोन्ही भासतात, असें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—शब्दादि बाह्य पदार्थ मन, बुद्धि, इंद्रियें, विषयज्ञान, इत्यादि सर्व बाह्य व आभ्यंतर वस्तूंचें वास्तव स्वरूप साक्षी चैतन्यच आहे, असें विद्वान् समजतात. त्या स्वरूपांत विकाररूप मल केव्हांही उद्भवत नाहीं. जेव्हां अपरिच्छिन्न अविद्येचा क्षय झाल्यामुळें वास्तव स्वभावस्थिति उदय पावते, तेव्हां संसार भ्रमासारखा भासतो. जेव्हां स्वभावामध्यें अंतःकरण विश्रांति पावून, शांतिरूप स्थिति रूढ होते, तेव्हां जगद्रूप दृश्य, सुषुप्तींत जसें स्वप्न, त्याप्रमाणें शांत होतें. भोग हेच संसार-महारोग आहेत, बंधु हेंच दृढ बंधन आहे, अर्थसंपत्तिच अनर्थांत पाडणारी आहे; यास्तव विवेकयुक्त बुद्धीनें स्वरूपांतच शांत व्हावें. अविद्यारूपत्व हाच संसार, व विद्यारूपत्व हेंच परमार्थतत्त्व, यास्तव परमाकाशरूप व्हावें, शांति धरावी, या संसारामध्यें क्लेश भोगींत राहूं नये. अर्थात् सुख व दुःख किंवा बंध व मोक्ष आपल्याच स्वाधीन आहेत, ते कसे म्हणशील, तर माझा अनुभव सांगतों. ‘ मी वसिष्ठ जीव आहें, ’ असें समजत नाहीं, दृश्य किंवा जगद्भ्रम यांना पहात नाहीं. शांत ब्रह्मामध्यें मीं प्रवेश केला आहे. त्यामुळें मी केवळ आनंदस्वरूप ब्रम्हच आहें. रामा, तूं मला वसिष्ठ या रूपानें जें पहातोस, तेंहि तूं आपल्या संकल्पाप्रमाणेंच अवलोकन करतोस. मी तर स्वतःला शांत केवळ परमाकाशच पहातों. तुला सुद्धां शब्द, अर्थ, इत्यादिरूप जे मनोमय भ्रम होतात, तेहि वायूतील स्पंदाप्रमाणें परमाकाश जें ब्रह्म त्यांतच जणुं काय उत्पन्न झालेसे दिसतात. वस्तुतः ते उत्पन्न होत नाहींत. मी द्वैत पहात नाहीं, यावरून द्वैताचा द्वेष करतों असें कदाचित् तुला वाटेल; पण वस्तुस्थिति तशी नाहीं; तर द्वैत व अद्वैत यांचा एकाच कालीं प्रत्यय येणें अशक्य आहे. जो ब्रम्हरूप झालेला असतो, तो प्रपंचाला जाणत नाहीं व प्रपंचमय झालेला असतो, तो ब्रम्हाला ओळखीत नाहीं. निद्रित मनुष्य स्वप्नाचा अनुभव घेत नाहीं व स्वप्न पहात असलेला मनुष्य सुषुप्तीचा अनुभव घेत नाहीं, पण जागा झालेला मनुष्य स्वप्न व जागृति या दोहोंचा जसा अनुभव घेतो, त्याचप्रमाणें ज्याला ब्रम्हसाक्षात्कार झाला

व्यवहार व जन्म, मरण, सुख-दुःखभोग इत्यादि जीवाचा व्यवहार करतो. आकाशादि भूतें हे त्या चिदात्म्याचेच अवयव आहेत. त्याच्या सत्तेनेंच तीं भूतें सत्तावान् होतात, अर्थात् तो चिदात्माच सर्व पदार्थांच्या रूपानें सर्व क्रिया करण्यास प्रवृत्त होतो, पण तो स्वतः अकर्ता आहे. पदार्थांच्या व्यवहाराप्रमाणेंच शब्दप्रयोगादि व्यवहारहि चिदात्म्याच्या सत्तेनेंच होतो. शरीर, वागादि इंद्रियें इत्यादि सर्व भौतिक पदार्थ जड असल्यामुळें स्वतः व्यवहार करण्यास असमर्थ असतात, त्यामुळें " मी वसिष्ठ, तूं राम, " इत्यादि व्यवहार जिव्हादि इंद्रियांच्या व्यापारानें जो होतो, तोहि हृदयस्थ चिदात्म्याच्या सामर्थ्यानेंच होतो. त्याला मृदंग, डफ इत्यादि वाद्यांचा योग्य दृष्टांत आहे. वस्तुतः मृदंगादि वाद्यें जड आहेत, पण त्यांतून वादकाच्या इच्छेप्रमाणें विचित्र ध्वनि उत्पन्न होतात हें प्रसिद्ध आहे. जी प्रत्यक्ष भासणारीहि वस्तु प्रमाणपूर्वक विचारानें भासेनाशी होते, ती केव्हांहि नाहींच. जगद्रूपहि विचारानें नाहींसें होणारें आहे, त्यामुळें स्वतः स्वरूपशून्य असलेलें तें ब्रह्मामध्यें ब्रह्मरूपानेंच स्थित आहे. ज्यांना जगद्रूप स्वप्न दिसत आहे, ते स्वप्नपुरुषहि परस्परांच्या दृष्टीनें विद्यमान नाहींतच. स्वप्नामध्यें आपण ज्या मनुष्यांना पहातों ते त्याच वेळीं आपणाला पहात नसतात हें प्रसिद्धच होय. मग ते ब्रह्मभूत आत्म्यामध्यें कोठून रहाणार ? खरोखर संसारी जीव आकाशांतील पुष्पाप्रमाणें ब्रह्मामध्यें केवल कल्पनामय असतात. रामा ! मी केवल ब्रह्मरूप आहें, त्यामुळें सांसारिक सर्व जीव माझ्यामध्येंच वायूंतील स्पंदाप्रमाणें आपल्या सर्व व्यवहारांसह रहातात. स्वप्न पहाणाऱ्या पुरुषाचें स्वप्न जसें त्याहून भिन्न नसतें, त्याप्रमाणेंच त्यांचा सद्रूप आत्मा मी आहें. निद्रित पुरुषाच्या स्वप्नाप्रमाणें, खरोखर, ते संसारी जीव अविद्यमान आहेत. त्यांच्याशीं माझा जो व्यवहार होतो तो ब्रम्हामध्यें अवस्थित असलेलें ब्रम्हच आहे, तथापि त्यांच्या दृष्टीनें मी त्यांना उपदेश करीत आहें, असें दिसतें. रामा ! ते जर मला अशा दृष्टीनें पहात असतील, तर खुशाल पाहोत. मला त्यांच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. आत्म्यामध्यें अगोदर मीच नाहीं; मग माझा उपदेशादि व्यवहार कोठचा ? ही सर्व ब्रम्हासत्ताच पसरलेली आहे. ही माझी वाणी सुद्धां ब्रम्हरूपच असून ती जणुं काय तुझ्यासाठींच उदय पावते. सर्व वस्तु केवल आनंदरूप आहेत, असें पाहिल्यामुळें सर्वांशीं अविरुद्ध असलेल्या तत्त्वज्ञानी पुरुषाला दुःखादि विरुद्ध पदार्थहि अनुकूलच भासतात. तो शुद्ध संविद्रूप असतो, त्यामुळें त्याच्या हृदयामध्यें भोगेच्छाहि उत्पन्न होत नाहीं. मनुष्यांचा बंध व मोक्ष त्यांच्या अधीन आहे. त्यांनीं मनांत आणलें तर ते बद्ध होतात, व मुक्तहि होऊं शकतात. पण प्रत्येकाचा बंध व मोक्ष याप्रमाणें त्याच्या स्वाधीन असूनहि प्रत्येक जीव मोहित होऊन, स्वरूपानंदाला विसरून संसारदुःख भोगूं लागतो, व त्यांतून सुटण्यासाठीं मोक्षोपायांचें अनुष्ठान करूं लागतो. पण हा सर्व गाईच्या पावलाला समुद्र समजण्यासारखाच भ्रम आहे. मिथ्या दुःखाचा उपशम हेंच मोक्षाचें स्वरूप आहे, व केवल विवेकानें स्वभावतःच त्याची सिद्धि होते. मोक्षाला धन, मित्र, क्रिया यांचा कांहीं उपयोग होत नाहीं. पाण्यामध्यें टाकलेला तेलाचा थेंब जसा चक्राकार बनतो, त्याप्रमाणें विषयाचें चिंतन करतांच आत्मचित् जगदाकार बनते. जाग्रदवस्थेंत स्वप्नवृत्तांत जशा प्रकारचा होतो, तशाच प्रकारचें विवेकी पुरुषाला जगत् भासतें. जागें होतांच स्वप्नांतील पदार्थ जसे

नुमते स्मरणाच्या उपयोगी, तसेंच आत्मज्ञान झाल्यावर ' मी, तूं, हें जगत् ' यांचा स्मरणापलीकडे कांहीं उपयोग नाहीं. यास्तव रामा ! मीं पूर्वी सांगितलेल्या क्रमानें योगाभ्यास कर, आत्मभावना दृढ कर, म्हणजे जगद्वासना हळूहळू क्षीण होत जाऊन, मी नाहीं, संसार नाहीं, तर केवल एक आत्मस्वरूप आहे, असा निश्चय होऊन तेंच एक अवशिष्ट राहील. हा स्वभावसूर्य जसा जसा उदय पावत जाईल तसा तसा भोगांधकार कमी कमी होऊन शेवटीं सर्वथा नाहींसा होईल. तो आहे, असेंहि कधीं वाटणार नाहीं. याप्रमाणें भोगांधकार नाहींसा झाला म्हणजे अंतःकरणादि साधनसमुदाय अज्ञान व 'स्थूल देहच मी' इत्यादि अध्यास, यांनीं तो रहित होतो. त्याचप्रमाणें ब्रह्माकारवृत्तीनें प्रदीप्त झालेल्या ज्ञानानें चमकूं लागतो आणि त्यामुळें दीपापासून सभोंवार पसरलेल्या प्रकाशासारखा ज्ञानप्रकाशानें सर्व जगाला व्यापून तो ब्रम्हरूप झाला आहे, असा भास होतो. ३९

---

## सर्ग ४० वा.

—:०:—

१. संसारांत ब्रम्ह भासत नाहीं, व ब्रम्हामध्यें संसार भासत नाहीं, पण जीवन्मुक्तींत पर्यायानें दोन्हीं भासतात, असें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—शब्दादि बाह्य पदार्थ मन, बुद्धि, इंद्रियें, विषयज्ञान, इत्यादि सर्व बाह्य व आभ्यंतर वस्तूंचें वास्तव स्वरूप साक्षी चैतन्यच आहे, असें विद्वान् समजतात. त्या स्वरूपांत विकाररूप मल केव्हांही उद्भवत नाहीं. जेव्हां अपरिच्छिन्न अविद्येचा क्षय झाल्यामुळें वास्तव स्वभावस्थिति उदय पावते, तेव्हां संसार भ्रमासारखा भासतो. जेव्हां स्वभावामध्यें अंतःकरण विश्रांति पावून, शांति रूप स्थिति रूढ होते, तेव्हां जगद्रूप दृश्य, सुषुप्तींत जसें स्वप्न, त्याप्रमाणें शांत होतें. भोग हेच संसार-महारोग आहेत, बंधु हेच दृढ बंधन आहे, अर्थसंपत्तिच अनर्थांत पाडणारी आहे; यास्तव विवेकयुक्त बुद्धीनें स्वरूपांतच शांत व्हावें. अविद्यारूपत्व हाच संसार, व विद्यारूपत्व हेंच परमार्थतत्त्व, यास्तव परमाकाशरूप व्हावें, शांति धरावी, या संसारामध्यें क्लेश भोगीत राहूं नये. अर्थात् सुख व दुःख किंवा बंध व मोक्ष आपल्याच स्वाधीन आहेत, ते कसे म्हणशील, तर माझा अनुभव सांगतों. ' मी वसिष्ठ जीव आहें, ' असें समजत नाहीं, दृश्य किंवा जगद्भ्रम यांना पहात नाहीं. शांत ब्रह्मामध्यें मीं प्रवेश केला आहे. त्यामुळें मी केवळ आनंदस्वरूप ब्रम्हच आहें. रामा, तूं मला वसिष्ठ या रूपानें जें पहातोस, तेंहि तूं आपल्या संकल्पाप्रमाणेंच अवलोकन करतोस. मी तर स्वतःला शांत केवळ परमाकाशच पहातों. तुला सुद्धां शब्द, अर्थ, इत्यादिरूप जे मनोमय भ्रम होतात, तेहि वायूतील स्पंदाप्रमाणें परमाकाश जें ब्रह्म त्यांतच जणुं काय उत्पन्न झालेसे दिसतात. वस्तुतः ते उत्पन्न होत नाहींत. मी द्वैत पहात नाहीं, यावरून द्वैताचा द्वेष करतों असें कदाचित् तुला वाटेल; पण वस्तुस्थिति तशी नाहीं; तर द्वैत व अद्वैत यांचा एकाच कालीं प्रत्यय येणें अशक्य आहे. जो ब्रम्हरूप झालेला असतो, तो प्रपंचाला जाणत नाहीं व प्रपंचमय झालेला असतो, तो ब्रम्हाला ओळखीत नाहीं. निद्रित मनुष्य स्वप्नाचा अनुभव घेत नाहीं व स्वप्न पहात असलेला मनुष्य सुषुप्तीचा अनुभव घेत नाहीं, पण जागा झालेला मनुष्य स्वप्न व जागृति या दोहोंचा जसा अनुभव घेतो, त्याचप्रमाणें ज्याला ब्रम्हसाक्षात्कार झाला

आहे, तो शांतचित्त जीवन्मुक्त ब्रम्ह व जगत् या दोहोंचाहि एकाच वेळीं अनुभव घेतो. कारण तो ज्या वेळीं जगाला पहातो, त्याच-वेळीं तें ब्रम्ह प्रकाशमय आहे असेंहि समजतो. कारण जीवन्मुक्ताला प्रपंचाचें जर मुळींच भान नसतें, तर अज्ञ जीवांना उपदेश करण्याचें महत्कार्यहि त्याच्या हातून घडलें नसतें. ज्ञानी हें सर्व द्वैत जसें आहे तसेंच जाणतो, पण त्यांत आसक्त होत नाहीं. त्यापासून हळूहळू चित्ताचा निरोध करीत तो शुद्धात्मा शरत्कालीन मेघाप्रमाणें शांत होतो. स्मरणरूप व काल्पनिक संग्रामाचें जें स्वरूप असतें तेंच जीवन्मुक्ताच्या जगदनुभवाचें रूप असतें, त्याला सत् ह्मणतां येत नाहीं व असतूहि ह्मणतां येत नाहीं. त्यामुळें अहंत्व व जगत् हा शुद्ध भ्रम आहे. रामा! सर्व जीवांना दिसणारी ही जगन्माया परमार्थ सत्य आत्म्यामध्यें व शून्यामध्येंहि नाहीं. तिचा द्रष्टा जीवहि विद्यमान् नाहीं. त्यामुळें शून्य व अशून्य या दोहोंहूनहि अत्यंत विलक्षण असलेली ही भ्रांति अनिर्वचनीय आहे. ती जरी भासत असली, तरी तिची कार्यकारणपरंपरा लावतां येत नाहीं, त्यामुळें तिचें निश्चित स्वरूपहि सांगतां येत नाहीं. ४०.

---

## सर्ग ४१ वा.

—:०:—

१ अविद्यास्वभावामुळें त्रिभुवनरूप बाहुलीचें नृत्य, व २ विद्यास्वभावानें निर्वाण.

**श्रीवसिष्ठः**—'मी, तूं,' इत्यादि या सर्व प्रपंचाचा अनुभव, हा अविद्येचा स्वभाव आहे. यास्तव शास्त्रीय उपायांनीं विद्या संपादन करून अद्वितीय, स्वप्रकाश, पूर्णानंदरूप होऊन, केवळ विद्यास्वभाव बनून स्वतःला निर्वाणमय करावें. जेथें सूर्य असतो तेथें प्रकाश जसा अवश्य असतोच, त्याप्रमाणें जेथें आत्मसाक्षात्कार झालेला असतो, तेथें परम वैराग्य अवश्य असलेंच पाहिजे. तो साक्षात्कार म्हणजे विद्या, विद्वत्समागम, विवेक, विषयवैराग्य, यांमुळेंच सिद्ध होतो. कर्ता, कर्म, करण, द्रष्टा, दृश्य, दर्शन, इत्यादि सर्व सामग्रीनें रहित असेंच हें जगच्चित्र उद्भवलेलें आहे. आधारावांचून जसें एखादें चित्र असावें, तसेंच हें सर्व आहे. तें वस्तुतः उत्पन्न झालेलें नाहीं, त्यामुळें विविधाकारांनीं प्रतीत होणारेंहि जगत् शांत तत्त्वामध्यें शांत रूपानेंच स्थित आहे. तें अनामय परब्रह्मच असून सत्य व अव्यय आहे. जगद्रूपी चित्रांतील या असंख्य मूर्तींची गणना करण्यास कोण समर्थ आहे? त्या सर्व मूर्ति चिदाकाशांत केवळ जीवांच्या कल्पनारूप रंगानें रंगविल्या आहेत. तीं जगद्रूप चित्रें जणूं काय नवे नवे अभिनय करून शृंगारादि विकारांनीं युक्त असल्याप्रमाणेंच चेष्टा करीत असतात. परमाणूंप्रमाणें अतिसूक्ष्म पदार्थापासून ब्रम्हदेवासारख्या विराटपुरुषापर्यंत, प्रत्येकामध्यें त्यांचा असाच विलास चाललेला असतो. रामा! या जगच्चित्रपुत्रिका सर्व ऋतु, याच मस्तकावरील पुष्पमालांना धारण करतात. दिशारूपी बाहुलतांनीं त्या व्याकुल झालेल्या असतात. पाताललोक याच त्यांच्या पादलता आहेत. ब्रम्हलोक हीच त्यांची मान आहे. चंद्र व सूर्य हेच नेत्र आहेत, नक्षत्रसमुदाय हेच लोम आहेत, सप्तलोक हींच सात अंगें आहेत, सर्वत्र पसरलेलें स्वच्छ आकाश हेंच वस्त्र आहे. द्वीपांच्या सभोंवार असलेले समुद्र हींच त्यांचीं कंकणें आहेत. लोकालोक पर्वत याच मेखला आहेत, भौतिक शरीरादिकांचें धारण व पोषण यासाठीं धडपड करणारे जीव हेच त्यांचे प्राणवायु आहेत, पुराण व वेद

हींच त्यांचीं वचनें आहेत, निरनिराळ्या क्रियांचीं सुखदुःखादि फलें हेच त्यांचे विलास आहेत. तात्पर्य, अशा सर्व सामग्रीनें युक्त असलेल्या त्या त्रिजगत्-पुत्रिका सतत नृत्य करीत असतात, व तेंच आपल्याला जगद्रूपानें साक्षात् दिसत असतें. त्यांच्या या नृत्याचें कारण अविद्यायुक्त चितन्न आहे. कारण श्रुतीमध्यें अविद्याविशिष्ट ब्रह्मच जगाचें निमित्त सांगितलें आहे. ज्याप्रमाणें निद्रावस्थेंत अंतःकरणानें सर्वथा लीन न होणें हेंच स्वप्नाचें कारण, तसेंच अविद्यावस्थ ब्रह्म हेंच जगाचें कारण होय. हे रामा, तूं पारमार्थिक स्वभावाची भावना करीत, जागृतींतहि अज्ञाननाशामुळें असुषुप्त व सर्व द्वैतोपसंहारामुळें सुषुप्त अशा तूर्यपदामध्यें स्थिर हो. जागृतींतहि सर्व विक्षेप टाक. या प्रपंच-स्वप्नाचा आश्रय करूं नकोस. जागृतींतहि निद्रित असल्याप्रमाणें जगद्भावना-शून्य होणें, आत्मज्ञानानें आसक्ति व वासना यांनीं रहित होणें हाच स्वभाव आहे, असें तज्ज्ञ समजतात व त्याच स्वभावामध्यें दृढ होणें, हीच मुक्ति होय. कर्ता, कर्म, करण, द्रष्टा, दृश्य, दर्शन यांच्या अभावीं विषयाचें दर्शन व चिंतनहि संभवत नाहीं. त्यामुळें पूर्वोक्त स्वभावामध्यें स्थिर झालेल्या पुरुषाला व्यवहार-समयींहि जगत् चिदेकरसरूप भासतें. अति रमणीय आत्मतत्त्वामध्यें जगतहि रमणीय दिसतें. पूर्ण ब्रह्मामध्यें तें परिपूर्ण स्वरूपानें स्थित होतें. द्वैत व ऐक्य यांनीं रहित अशा प्रत्येक आत्म्यामध्यें द्वैत व ऐक्य यांनीं रहित असें ब्रह्म अखंड एकरूपानें भासतें. सृष्टिरूपानें स्थित असलेलें हें सत्य, सत्य आत्म्यामध्यें शांत राहिलें आहे. तें स्वरूपतःच शांत आहे. त्यामुळें आकाशाच्या मध्याप्रमाणें, मोठ्या शिलेच्या जठरासारखें, उत्तम रत्नाच्या मध्याप्रमाणेंच तें घनरूप असलें तरी आकाशोपम आहे. म्हणूनच त्यामध्यें जगत्प्रतिबिंब व्यक्त होतांच क्षुब्ध झाल्याप्रमाणें जरी दिसलें, तरी स्वतः अक्षुब्धच असतें. तें जगद्रूपानें असत् जरी भासलें तरी सद्रूपच असतें. ज्याप्रमाणें एखाद्या शिल्पशास्त्रज्ञाच्या मनांत पुढें होणाऱ्या एखाद्या विशाल नगराची रचना रहाते, त्याप्रमाणें जगत्कारण ब्रह्मामध्यें हें सर्व जगत् बीजरूपानें रहातें. त्या अवस्थेंत मन एकरस-रूप असतें. ज्याप्रमाणें कल्पित नगर संकल्पाहून भिन्न नसतें, त्याप्रमाणें हा जगाचा आभास परमार्थाहून भिन्न नाहीं. सुवर्णाच्या चौकोनी चिपेमध्यें, त्यापासून पुढें होणाऱ्या अनेक अलंकाराचे आकार जसे बीजरूपानें असतात. त्याप्रमाणें परब्रह्मामध्यें हें सर्व जगत् रहातें. पुढें होणारे विविध पदार्थांचे आकार जरी त्यांत असले तरी तें स्वतः शांत व अव्ययच असतें. त्यामध्यें सतत नाश व उत्पत्ति चालूच असते, तथापि तें स्वतः एकरूप, अनामय, उत्पत्तिनाशरहित व जरारहित असतें. तें तसें असूनहि अनेक असल्याप्रमाणें प्रत्ययाला येतें. हे रामा! ज्ञान झालें असतां केवळ शांत-स्वभाव ब्रह्मच आपल्या अद्वैत स्वभावामुळें अस्तोदयरहित असलें तरी सृष्टिरूप स्वराज्य-वैभवानें भासतें. म्हणजे ज्याप्रमाणें आकाशांत तिमिरयुक्त दृष्टीला अनेक केशाकार, गंधर्वनगरें, नीलवर्ण इत्यादि दिसतात, तसेंच ब्रह्मामध्यें सृष्टिवैभव दिसतें; पण औषधादि उपायांनीं नेत्रदोष नाहींसे झाले असतां आकाश जसें जसें स्वच्छ भासतें, तसेंच विचारानें जगद्रहित ब्रह्म ज्ञानी पुरुषाला प्रतिक्षणीं दिसतें. ४१.

---

## सर्ग ४२ वा.

—:०:—

१ विश्व व विश्वेश्वर यांची एकता. २ विवेकानें पूज्य होणारा स्वात्माच परमेश्वर.

श्रीवसिष्ठः—शांत, कूटस्थ आत्म्यामध्यें जें प्रथमतः चित्ताचें स्फुरण होतें, तें चिदात्म्याहून भिन्न नाहीं. कारण तें चित्‌हि चिदात्म्याप्रमाणें अव्यक्त व निर्मल असतें व व्यवहारांत नाम व रूप यांच्या भेदामुळें वस्तूंचा भेद होतो, पण तो भेद नामरूप व्यक्त होण्यापूर्वीं चित्‌मध्यें संभवतच नाहीं. त्यामुळें चित् व चित्त यांचा भेद नाहीं. कारण चिद्‌हि निर्मल व चित्तहि निर्मल, त्यामुळें प्रभा व आकाश यांच्याप्रमाणें चिद् व चित्त यांचा भेद संभवत नाहीं. याच न्यायानें चित्ताच्या अधीन असलेला जगद्भेदहि असंभवनीयच आहे. निर्विकार प्रत्यगात्माकाशांत मननादि वृत्ति व शब्दादि विषय मृगजलाप्रमाणें भासतात, पण चित्तरूप सूर्य अस्त पावला असतां, ते सर्व विकार शांत होतात. वायूचें स्पंदन कोणत्याहि साधनाच्या अपेक्षेवांचून जसें होतें, त्याप्रमाणें परमात्म्याच्या प्रकाशाचा प्रसार हेंच जगत् आहे. पाण्यांतील द्रवत्वाप्रमाणें, आकाशांतील शून्यत्वाप्रमाणें, किंवा वायूतील स्पंदाप्रमाणें, परमात्म्यामध्यें हें अनिर्वाच्य आत्ममय जगत् भासतें. महाचिद्रूप महाकाशांत जें हें जगत् दिसत आहे, तें रत्नांतील तेजस्वितेप्रमाणें चित्त्वच आहे. जसें जलामध्यें द्रवत्व, आकाशांत शून्यत्व, व वायूमध्यें स्पंदन, तसें महाचितीमध्यें जगत् आहे. ज्याप्रमाणें वायु आपल्या स्वरूपांत स्पंद पावतो, त्याप्रमाणें चिति स्वरूपांतच जगत् पहाते. त्यामुळें द्वैत, ऐक्य इत्यादि भेदांचा यत्किंचित्‌हि संभव नाहीं. अविवेकानें जगत् भयंकर भासतें, व विवेकानें क्षणभंगुर दिसतें. पण परमार्थबोध झाला असतां, तें सर्वदा ब्रह्ममात्र बनतें, त्यामुळें भयंकर किंवा क्षणभंगुर दिसत नाहीं. शुद्ध व आदि-मध्य-अंतरहित अशा केवल ज्ञप्तीवांचून त्यांत कांहीं नाहीं, असा ज्ञानी पुरुषांनीं निर्णय केला आहे—पण आत्मसाक्षात्कारानें तसा निर्णय होण्यापूर्वीं अनेक वाद प्रवृत्त होतात. कोणाला तें शांत शिवस्वरूप वाटतें, कोणी त्याला शाश्वत ब्रह्म म्हणतात, कोणी शून्य हेंच तत्त्व समजतात. कोणी केवळ विज्ञान हेंच या जगांतील सार समजतात, पण वस्तुतः तें अनंत चिद्रूपच आपल्या स्वरूपामध्यें जणूं काय विषयत्वाची भावना करीत, स्वरूपांतच ज्ञेयत्व, अज्ञत्व, इत्यादि अवस्थांस प्राप्त होतें. चित्वाच्या बलावरच आरोपित वस्तूंची स्फूर्ति होत असल्यामुळें चित्तत्वावांचून ज्ञेयाची सत्ता नाहीं व ज्ञेयसत्तेवांचून चित्‌ला चित्त्व नाहीं. ज्याप्रमाणें शून्यरूप निर्विकार आकाशावांचून वायूचें कारण नाहीं, किंवा वायूवांचून स्पंदाचें दुसरें कांहीं कारण नाहीं, त्याप्रमाणें जगाचें चित्त्वावांचून दुसरें कांहीं कारण नाहीं. अतिस्वच्छ असलेली जी महाचिति तिच्यामध्यें सृष्टींतील निरनिराळ्या पदार्थांचें ज्ञान होण्यास, त्यांचें सत्व किंवा असत्त्व प्रतीत होण्यास दुसऱ्या कोणत्याहि कारणाची अपेक्षा नाहीं. चित् व जड यांच्या भेदाची व त्यांच्या कारणाच्या एकत्वाची सत्ता परब्रह्मामुळें सिद्ध होते. पण त्या कूटस्थ अद्वितीय चिदाकाशांत द्वित्व किंवा एकत्व यांची कल्पना कोण करणार! सत्ता व स्फूर्ति यांच्या योगानें त्यांचें समर्थन सृष्टीतलि जड पदार्थांपैकीं कोणीहि करण्यास समर्थ नाहीं. आकाशाच्या द्वित्वाचा, किंवा वायु व स्पंद यांच्या भेदाचा, कधींच कोणाला अनुभव येत नाहीं. कारण त्याच

भेद जरी कल्पिला तरी तो वास्तविक नसून शब्दमात्र असतो, हें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें विश्व व विश्वेश्वर यांचें द्वित्व असद्रूप आहे. जें महाचिन्मात्र तत्त्व तें सद्रूपच असून त्यांत द्वित्वाचा असंभव आहे. चिन्मात्रच विश्वासारखें भासतें. देश, काल इत्यादिकांनीं युक्त असल्यामुळें विश्वांतील कांहीं पदार्थ सत्य भासतात, कांहीं असत्य भासतात. जे थोडा वेळ राहतात, त्यांच्या अपेक्षेनें दीर्घ काल राहणाऱ्या पदार्थाला व्यवहारांत नित्य समजतात. न्यून प्रदेशांत रहाणाऱ्या वस्तूहून विस्तीर्ण प्रदेशांत राहणाऱ्या वस्तूला व्यवहारांत व्यापक समजतात. हें जरी खरें आहे, तरी वस्तुतः विश्व नाहीं, व विश्वत्व नाहीं. त्यामुळें सोन्याच्या अलंकारांमध्यें खरी सत्यता नसून सोन्यामध्यें जशी खरी सत्यता असते, त्याप्रमाणें देशकालांनीं परिच्छिन्न झालेल्या कोणत्याच वस्तूमध्यें सत्यत्व नसून चिन्मात्रालाच परमार्थ सत्यता आहे. जसें सुवर्णकंकण सोन्याहून निराळें आहे, असें ह्मणणें अशक्य, त्याचप्रमाणें विश्व परमात्म्याहून भिन्न आहे, असें ह्मणणें अयोग्य आहे. त्यांत द्वित्व किंवा ऐक्य यांतील कशाचाच संभव नाहीं. त्यामुळें कार्यकारणता कोठची! बरें, ‘ काल्पनिक कार्यकारणभेद आम्ही स्वीकारितों, ’ असें म्हणशील, तर आकाशांतील शून्यत्वाप्रमाणें किंवा जलांतील द्रवत्वाप्रमाणें काल्पनिक भेदानें त्याच्या सत्यत्वाचा निर्वाह होत नाहीं. आकाश व आकाशांतील रेघ हीं दोन्ही जरी अत्यंत अभिन्न असलीं तरी त्यांच्या भेदाची कल्पना होते. त्याच न्यायानें चिन्मात्र, जगत् वगैरे यांचा जरी अभेद असला तरी काल्पनिक भेदाची सिद्धि होते. पण वस्तुतः ब्रम्हाचें जें रूप तेंच जगाचें रूप, तेव्हां त्यांत द्वित्व व एकत्व कोठलें! आकाश ज्या रूपाचें असतें, त्याच आकाराचें सर्व शून्यहि आहे. त्याच न्यायानें एक, निर्मल, व्यापक, सर्वात्मक चिन्मात्रांत हें सर्व जगत् आहे. शिळेवर सैनिकांचीं चित्रें कोरून त्यांची एक मोठी सेना बनविली असतां, त्यांत सर्वत्र पाषाणत्व अनुस्यूत असतें, तेव्हां त्यांत कार्यकारणवैचित्र्य कसें व कोठून संभवणार? आकाशामध्यें तद्भिन्न वस्तूचा जर असंभवच आहे, तर अनाकाशता कोठची? त्याचप्रमाणें महाचितीमध्यें तद्भिन्न प्रपंच तरी कसा असणार? अर्थात प्रपंचाचा जो भास होतो तो आत्मप्रकाशरूपच आहे. पाषाणावर कोरलेलें चित्र पाषाणाचाच विकार असल्यामुळें तद्रूप असतें, त्याचप्रमाणें हे साधो! या विश्वाविषयीं तशीच भावना करून स्वरूपामध्यें स्थित झालें असतां विश्वाचा लय होतो. त्यानंतर एखाद्या निश्चेष्ट मनुष्याप्रमाणें संसार अवशिष्ट रहातो. ज्याप्रमाणें नेत्र मिटले असतां बाहेरचे पदार्थ दिसेनासे होतात, त्याप्रमाणें अंतःकरण आत्म्यामध्यें लीन झालें असतां बाह्य जगत् दिसेनासें होतें. स्वप्नामध्यें जागृतींतील विषय असत् होतात व जागृतींत स्वप्नांतील विषय असत् होतात, कारण त्या दोन्ही अवस्थांत, त्या त्या विषयाची भावना होत नसल्यामुळें प्रपंचाचें भान भावनाधीन आहे, ही गोष्ट सिद्ध होते. रामा! तूं भावनेचा त्याग करून पाषाणासारखा निर्विकार होऊन रहा. कारण अंतःस्वभाव सर्वविकारशून्य आहे, म्हणून त्या आपल्या स्वरूपाप्रमाणेंच साम्यामध्यें स्थित व्हावें. जोंवर विवेक करण्याचें सामर्थ्य प्राप्त झालें नाहीं, तोंवर परमेश्वराची उपासना करावी. ती करीत असतांनाच विवेक, वैराग्य इत्यादि साधनांचा अभ्यास करावा. व्यापक विवेकरूप सामग्रीनें आत्मसाक्षात्कार होण्यासाठीं आत्मरूप परमेश्वराची प्राप्त पदार्थांनीं पूजा

करावी. भोग्यरूपानें जो जो पदार्थ प्राप्त होईल, तो विवेकबुद्धीनें परमेश्वराला समर्पण करावा. विवेकानें पूजिलेला स्वात्मा निरतिशय आनंदरूप वर सत्वर देतो. रुद्र, उपेंद्र इत्यादिकांची पूजा या पूजेपुढें अगदीं तुच्छ आहे. विचार, शम, सत्संग इत्यादि हेच उपचार व पुष्पें यांच्या योगानें पूजिलेला स्वात्मा परमेश्वर तत्काळ मोक्ष हें फल देतो. यथार्थ ज्ञान, याच एका उपचारानें पूजिलेला तो परमात्मा, मोक्षासारखें सर्वोत्तम फल देतो. जेथें आत्मा हाच ईश्वर आहे असा निश्चय होतो, तेथें अनात्मरूप तटस्थ ईश्वराचा आश्रय कोण करील? "अहो, पण तटस्थ ईश्वर पूजेनें प्रसन्न झाला असतां, शस्त्र, सर्प, विष, अग्नि इत्यादि घातुक पदार्थांपासून रक्षण करील, कूटस्थ आत्मा काय करणार?" म्हणून विचारशील; तर बाबारे, ज्यानें सत्संग, शम, संतोष, विवेक इत्यादिकांनीं आत्म्याला पूजिलें आहे, त्याला शस्त्रादि घातुक पदार्थांचा कांहीं उपसर्ग होत नाहीं, ते त्याला पुष्पाप्रमाणें कोमल वाटतात. देवपूजा, तप, तीर्थयात्रा, दानें, इत्यादि कितीहि जरी केलीं, तरी ज्यांच्यामध्यें विवेक नाहीं व ज्यामुळें ते महात्मेहि नाहींत, अशांना त्यांचा कांहीं उपयोग होत नाहीं. तीं त्यांना निरर्थकच असल्यामुळें क्षणिक फल देऊन जळून जातात. पण हे रामा! तींच जर विवेकपूर्वक केलीं तर सफल होतात. मग अंतःकरणामध्यें स्पष्ट विवेकच कां केला जात नाहीं? आत्म्याचें यथार्थ ज्ञान झालें असतां वासनेचा क्षय होतो, चित्त प्रसन्न होतें, आणि मग 'विवेक' या नांवाच्या यत्नाला आरंभ होतो. शमरूप अमृताच्या योगानें विवेकाची अशी वृद्धि करावी कीं, पुन: तो निरनिराळ्या भ्रमांनीं शुष्क होऊन जाणार नाहीं. परमार्थतत्त्वाच्या दर्शनानें अनित्य देहसत्तेचा अनादर करून लज्जा, भय, विषाद, ईर्ष्या, सुख, दुःख यांना एकाच वेळीं जिंकावें. जगदादि व शरीरादि आरंभींच जर नाहीं तर आज कोठून असणार? हें विश्व कारणापासून जर झालें असेल तर तें ब्रह्मरूपच आहे. तें केवळ कल्पनामात्र आहे. तें शुद्ध चिन्मय आहे. ज्ञप्तीहून घटादि पदार्थ भिन्न नाहींत. सर्व कल्पना ज्ञानरूप असते, आणि ती चिदाभासरूप ज्ञप्तिसुद्धां अज्ञात आत्मतत्त्वाची प्रतिबिंबरूप शोभा आहे. तिचें यथार्थरूप कळलें असतां म्हणजे ती आभासरूप ज्ञप्तिहि केवळ प्रत्यगात्मरूप आहे असें ज्ञान झालें असतां तत्काळ शांत होते. ज्ञेयाच्या अभावीं ती कोणत्या स्वरूपाची आहे, हेंहि सांगतां येत नाहीं. कारण प्रतिबिंबाच्या अभावीं बिंबभूत पदार्थाला बिंबहीं म्हणतां येत नाहीं. अर्थात् ज्ञेयाच्या अभावीं ज्ञप्तीचा अभाव होऊन केवळ शाश्वत शिवस्वरूप अवशिष्ट रहातें, त्यानंतर शरीरादिकांचा अभाव होतो. अखंड, निरुपाधिक, पूर्ण, शांत परमात्मतत्त्वच परिपूर्ण रहातें. ज्ञान, ज्ञेय व ज्ञप्ति यांनीं रहित असें तें तत्त्व, पाषाणाप्रमाणें निर्विकार स्थित होतें. ज्ञानी लोक पाषाणावर कोरलेल्या मूर्तीप्रमाणें आपल्या स्वरूपांतच रहातात, त्यांचीं अंतःकरणें शांत असतात. ते प्रारब्धानुसार शरीराची हालचाल जरी करीत असले, किंवा दुसऱ्याकडून करवीत असले तरी आत्मरूपच रहातात. ते बाह्यव्यवहार जरी करीत असले, तरी परमात्मरूप झालेले असल्यामुळें आकाशाप्रमाणें मनांत निर्विकार असतात. ते ज्या अवस्थेंत असतात, तेथेंच जसेच्या तसेच रहातात. किंवा कोठें जाण्याचा प्रसंग आला असतां, जातातहि. तात्पर्य, जें प्राप्त होईल तें कर्म अखिन्न मनानें करणें, हा आत्मज्ञांचा श्रेष्ठ स्वभावच होय. किंवा ज्ञानी पुरुषानें सर्वदा समाधिस्थच रहावें;

ह्मणजे, सर्वस्वाचा त्याग करावा, अंतःकरण शांत व उज्ज्वल करावें, एकांतामध्येंच चित्रा-प्रमाणें रहावें. संकल्प शांत झाला असतां, काल्पित नगर जसें निःशेष नाश पावतें, किंवा जागृतींत स्वप्न जसें अस्त पावतें, त्याप्रमाणें ज्ञानानंतर जगत् सर्वदा बाधित होतें. अज्ञ पुरुष शास्त्राचीं कांहीं वाक्यें ऐकूनच मी तत्त्वज्ञ आहें, असें समजतो, आणि मोक्षाचें वर्णन करूं लागतो. पण तें त्याचें करणें, एखाद्या जन्मांधानें डोळस पुरुषाच्या रूपानुभवाचें वर्णन करण्यासारखेंच आहे. असा तत्त्वज्ञानाभिमानी मनांत मानापमानाच्या योगानें संतप्त होत असतो, त्याला एखाद्या खऱ्या तत्त्वज्ञाप्रमाणें शांतिसुखाचा अनुभव येत नाहीं. अंधगोलांगुल-न्यायानें असत् उपदेशानें फसून जाऊन स्वतःला कृतार्थ समजणारे पुष्कळ लोक आपणाला दिसतात. अज्ञानी पुरुष अज्ञत्वामुळेंच अल्पलाभा-नेंहि स्वतःला कृतार्थ समजतो. पण रामा! जो अज्ञानानें मोहित झालेला पुरुष वस्तुतः अकृ-तार्थ असतांना स्वतःला कृतार्थ समजतो, त्याला आपल्या अकृतार्थतेचा प्रत्यय थोड्याच वेळांत अनर्थ ओढवल्यानें येतो. एका निमिषांत भाव व अभाव यांच्या भ्रमांनीं कल्पित पदार्थ दुःख देत असल्यामुळें ज्ञानी लोक कल्पनात्मक उपाय, हा उपायच नव्हे असें समजतात. यास्तव पूर्वोक्त तत्त्वज्ञान हाच मोक्षाचा खरा उपाय आहे. वासनाक्षय होईपर्यंत त्याचा अ-भ्यास करावा, अभ्यासानें तत्त्वज्ञान दृढ झालें ह्मणजे त्याचेंच मोक्षामध्यें पर्यवसान होतें. त्या अवस्थेंत जगत् हा भ्रम आहे असा निश्चय होऊन ब्रह्मलोकापर्यंत सर्व विषय नीरस वाटूं लागतात. म्हणूनच हे रामा, मी ज्याचा उप-देश केला आहे, तो तत्वार्थ आहे. म्हणून ती केवल कल्पना आहे, लौकिक किंवा पौराणिक कथा आहे असें, बहिर्मुख होऊन समजशील तर कृतार्थ होणार नाहींस. कारण बहि-र्मुख अवस्थेंत तुझें चित्त वासनेनें भरलेलें अस-ल्यामुळें जगत्स्वरूप तुला अवश्य दिसेलच. पण तूं जर अंतर्मुख झालास तर सर्व विषय निर्वि-षय चिद्रूपच आहेत, असा साक्षात् अनुभव घेऊन आत्मस्वरूपांत विश्रांति पावशील. बहि-र्मुखत्वानें उपदेशवाक्यावरून ज्याचें तुला ज्ञान होईल तें जन्मांधाच्या अनुभवासारखें अज्ञानच आहे, असें समज. कारण, साक्षात् अपरोक्ष असलेल्या वस्तूचें परोक्ष ज्ञान होणें, हा भ्रमच आहे. यास्तव हे रामा! तशा बोधाचा तिर-स्कार करून तूं या नित्य अपरोक्ष प्रत्यगात्म-रूप बोधामध्यें तन्मय होऊन जा. त्याचा साक्षात् अनुभव घेऊन जन्मादि विक्रियाशून्य अनुभवच तूं हो. ४२.

---

१ एक अंध एका अरण्यांत एकटाच रडत व 'अरे, मला कोणी अमुक देशाला जाण्याचा मार्ग दाखवा,' असें ओरडत होता. त्याला पाहून एका निर्दय ठगानें 'या बैलाच्या पुच्छाला धरून त्याच्या मागोमाग जा,' असें सांगून, बैलाचें पुच्छ त्याच्या हातीं दिलें. तेव्हां तो बिचारा त्या लबाडाच्या वचनावर विश्वास ठेवून हातांतील पुच्छ न सोडतां त्याच्या मागोमाग चालला. बैलानें आपलें पुच्छ त्याच्या हातांतून सोडवून घेण्याचा प्रयत्न केला, पण तो भद्राळू अंध हातांतील पुच्छ सोडीना, बैल त्रासून पळूं लागला त्यामुळें अंधाला मोठे क्लेश झाले. तो अनर्थांत सांपडला, व शेवटीं एका मोठ्या खड्डयांत पडला. अंधानें धरलेलें गोलांगु-लाचें म्हणजे बैलाचें पुच्छ लबाडाच्या शब्दावर विश्वास ठेवून न सोडल्यामुळें तो संकटांत पडला, या गोष्टीला अनुसरून हा न्याय रूढ झाला आहे.

## सर्ग ४३ वा.

—:०:—

१ मनोरूपी यक्षाचें जणुं काय नगरच, अशा अज्ञानकल्पित जगाचें केवल ज्ञानानें निरसन झालें असतां ब्रम्हैक्यस्थिति प्राप्त होते.

श्रीवसिष्ठः—रामा ! आंतर अहंतादि व बाह्य जगत् म्हणजेच भोक्तृरूप व भोग्य असें हें सर्व अनुभवरूप भोगाच्या तत्त्वाचें ज्ञान झालें असतां असत्य होतें. कारण भोगाचें पर्यवसान चिद्मध्यें होतें. करण व भोग्य यांच्या संबंधाचा अनुभव हाच भोग आहे, त्या अनुभवानेंच अविवेकामुळें भोक्ताच आत्मा आहे अशी बुद्धि होते. त्यामुळें आत्मा अनुभवयुक्त आहे असा भ्रम होतो. पण साक्षी आत्मा साक्षात् अनुभवच आहे, त्यामुळें तो सत्य ब्रम्हच होय. अज्ञानरूपी ज्वरापासून मुक्त झालेल्या व बोधशैत्यानें शीतल झालेल्या ज्ञानी पुरुषाचें चिन्ह हेंच कीं, त्याला भोगरूपी जल नकोसें होतें. ज्वरिताला जशी तृषा लागते व पाणी हवेंसें वाटतें, पण ज्वर उतरून आरोग्य प्राप्त झालें असतां त्याची आवश्यकता भासत नाहीं, हें प्रसिद्ध आहे; त्याचप्रमाणें ज्ञानानें तृप्त झालेल्या पुरुषाला भोगांची गरज नसते. नाम व रूप यांच्या योगानें होणारे जे मिथ्या ज्ञानरूप भ्रम, ते सर्व व्यर्थ आहेत. विषयांविषयीं विरक्त झालेल्या पुरुषांनीं भोक्त्यांतील अहंकारांश टाकल्यानेंच चिन्मात्ररूप निर्वाण सिद्ध होतें. यास्तव अहंकारत्यागाचीच भावना दृढ करावी. स्वप्नांत पाहिलेले पदार्थ जागृत पुरुषाला जसे अनुरक्त करीत नाहींत, व ते विद्यमानहि नसतात, त्याचप्रमाणें मी व हें जगत् या भ्रमांत दिसलेले पदार्थ तत्त्वज्ञाला अनुरक्त करीत नाहींत व त्याला ते सत्यहि वाटत नाहींत. यक्षविद्येमध्यें निपुण असलेला मनुष्य आपल्या भावनेनेंच कल्पिलेल्या यक्षशरीरामध्यें स्थित होऊन स्वजनांसह एका मोठ्या नगराची कल्पना करून, त्या सर्वांला जसें पहातो, त्याप्रमाणें जीव संसाराला पहातो. पण तो यक्षाच्या संसाराप्रमाणेंच मिथ्या होय. तो यक्ष भ्रांतिकल्पित असतो. त्यानें कल्पिलेलें स्वजनयुक्त नगरहि कल्पितच असतें, तथापि तो स्वतः भोक्ता बनतो, व स्वजनादि सर्व त्याचें भोग्य बनतें व त्यांचा परस्पर व्यवहारहि होतो. त्यामुळें ते दोन्हीं सद्रूप आहेत असें वाटतें, पण वस्तुतः ते कल्पित असल्यामुळें मिथ्या होत. अहंत्व व जगत् या भ्रमांनाहि हाच न्याय लागू आहे. साक्षी चैतन्य आवरणरहित असल्यामुळें अरण्यांतील भ्रमरूप यक्षांचा जसा त्यावर आरोप होतो, त्याचप्रमाणें हे चौदा लोक त्याला मिथ्याज्ञानामुळें दिसतात. मी भ्रममात्र आहें, त्यामुळें मिथ्याच आहें, असें जाणून तशीच भावना करणारा यक्ष जसा अयक्ष होतो, त्याप्रमाणें जगत् मिथ्या आहे, अशी दृढ भावना केल्यानें चित्त तात्त्विक चिद्रूपत्वास प्राप्त होतें. यास्तव हे रामा ! तूं सर्व कल्पना व शंका टाकून, त्याग व ग्रहण यांनीं रहित होऊन, सर्व इच्छांचा उपसंहार करून, त्यानंतर तुझें जें शांत स्वरूप राहील, त्यांतच स्थिर हो. हें दृश्य सत्तारहित आहे. त्यांत सत्तेची उत्पत्तिच होत नाहीं. किंवा तें द्रष्टृरूपच आहे. किंवा तें द्रष्टृरूपहि नाहीं. कारण परमार्थ चिद्रूप हेंच द्रष्ट्याचें स्वरूप आहे व दृश्य तुच्छ आहे. तेव्हां तें तुच्छ जगत् चिद्रूप आहे, हें कसें सिद्ध करतां येणार ? वसंत ऋतूंतील रसानें भरलेल्या लतेला जशा नवीन शाखा व पल्लव फुटतात, त्याप्रमाणेंच चिन्मात्रस्वरूपानें भरलेल्या संविदेपासून हा सर्व प्रपंच विस्तार पावतो. हा जगाचा आभास, म्हणजे शुद्ध चिन्मात्रवेदन आहे. त्यांत ऐक्य कोठचें,

द्वित्व कोठचें व निर्वाण तरी कोठचें? यास्तव तूं शांत रहा. चिन्मय आकाशरूप व्हावें, निरतिशय आनंदाचा अनुभव घ्यावा व निर्वाणरूप आनंदनंदनवनांत निःशंक होऊन रहावें. या अतिशून्य संसारारण्यभूमींत, हे मानवांनो! असे भ्रांतचित्त होऊन हरणासारखे कां भटकतां? त्रिभुवनरूप मृगजलावर लुब्ध होऊन विवेकशून्य मनानें इतस्ततः धावूं नका. तृष्णेनें व्याकुल होऊन शांतीचा भ्रंश करून घेऊं नका. काल्पनिक विषयरूप मृगजल प्राशन करण्यांत आपलें आयुष्य व्यर्थ गमावूं नका, जगद्रूप गंधर्वनगराच्या दर्पानें आपला नाश करून घेऊं नका! व्यवहारांतील सुखें दुःखरूप आहेत, व तीं नाशालाच कारण होतात, ही दृष्टि कायम ठेवा. या महाकाशामध्यें जगद्रूप भ्रांति पाहूं नका. भ्रांतिरहित स्वरूपांत एकरूप होऊन जा. हे विचारी मानवा, उंच वृक्षाच्या पानांवरील जलबिंदूप्रमाणें क्षणभंगुर असलेल्या संसारांतील अज्ञानरूप अंधारांतील गर्भशय्येवर शयन करूं नको. तर आदि-अंत-शून्य स्वभावामध्यें सतत शांत रहा. द्रष्टा, दृश्य इत्यादि अस्वाभाविक दशेमध्यें आसक्त होऊन विनाश करून घेऊं नको. संसार अज्ञ जनांनाच प्रतीत होतो. पण तो यत्किंचितूहि विद्यमान नाहीं. अर्थात् त्यांतील सारभूत जें तत्त्व तेंच सत्य आहे. पण त्याचें नांवहि विद्यमान नाहीं. तृष्णारूपी लोखंडी शृंखलांनीं परिवेष्टित असलेल्या संसाररूपी पिंजऱ्याला ज्ञानबलानें तोडून सिंहाप्रमाणें सर्व उत्कर्षाच्या पराकाष्ठेमध्यें स्थित हो. 'अहं व मम' मी व माझें या भ्रांतिरूप आग्रहाची शांति हाच मोक्ष आहे. योगी कोणत्याहि स्थितींत जरी असला तरी ती स्वात्मसत्ताच होय. वासनाशून्यत्व हेंच निर्वाणत्व आहे. तीच त्रिविध तापांची शांति आहे व संसारमार्गामध्यें श्रांत झालेल्या पुरुषाची ती श्रांतविश्रांतिभूमि आहे. तत्त्वज्ञानी, जगद्रूप पदार्थाला जसे जाणतात, तसे अज्ञ जाणत नाहींत व अज्ञ लोक जगाला जसें पाहतात, त्या दृष्टीनें ज्ञानी पहात नाहींत. त्या दोघांनाहि परस्परांचा अनुभव परस्परांना शब्दानें सांगतां येत नाहीं. विश्वाविषयींची भ्रांति पूर्णपणें शांत झाली असतां, विश्व असलें तरी तें ज्ञानी पुरुषाला दिसत नाहीं. ज्याप्रमाणें गंगा, गोदा, नर्मदा इत्यादि नद्या महासागराला जाऊन मिळाल्यावर समुद्ररूपानें स्थित असूनहि, स्वरूपानें उपलब्ध होत नाहींत, त्याप्रमाणें जगद्भ्रांति शांत झाल्यावर ज्ञानी पुरुषांना जगद्रूपानें त्याचा अनुभव येत नाहीं, ब्रह्मरूपानें येतो. भ्रांति शांत झाल्यावर विश्व ब्रह्मरूप होतें, त्यामुळें अज्ञपुरुषांच्या दृष्टीनें विद्यमान असलेलें हें जगत् ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें अविद्यमान होतें. जळालेल्या गवताची राख जशी वाऱ्यानें कोठें तरी उडून जाते, त्याप्रमाणें सत्पुरुषांच्या स्वभावविश्रांतीमुळें जगत् अदृश्य होतें. 'ब्रह्म' या शब्दाचा मुख्य अर्थ अतिशय वृद्धि पावणें हा आहे. पण तो निर्विकल्प, स्वप्रकाश, निरतिशय, आनंद, प्रत्यगात्मरूप जर असेल तर उत्तम. पण तोच जर 'जगत्' या शब्दाच्या प्रवृत्तीला कारण होणारा जो विकार तद्रूप असेल तर उत्तम नाहीं. एखाद्या अर्भकाला जशा प्रकारानें हे सर्व पदार्थ दिसतात, तशाच प्रकारें वासनाशून्य होऊन राहिलेल्या ज्ञानी पुरुषाला ते दिसतात. सर्व प्राण्यांची जी रात्र, म्हणजे ज्ञानावस्था, त्यांत ज्ञानी जागतो व सर्व प्राण्यांची जी जागृति म्हणजे जी अज्ञानावस्था, ती ज्ञानी पुरुषाची रात्र होय. कारण सर्व लोक अज्ञानांधकारानें आवृत असल्यामुळें त्यांना सुषुप्ताप्रमाणें स्थित असलेलें आत्मतत्त्व दिसत नाहीं, पण तत्त्ववेत्याला सुषुप्तीप्रमाणें अज्ञानामध्यें

विश्रांति घेण्याचा प्रसंग येत नाहीं. कारण तो अज्ञानरहित असतो, आत्म्याला सतत पहातो, त्यामुळें तो आत्मतत्त्वाविषयीं जागृत असतो. चित्रांतील निरनिराळे पदार्थ पाहून मनुष्याच्या मनांत जसे कांहीं विकार उत्पन्न होत नाहींत, त्याप्रमाणें, आत्मज्ञाला जगांतील पदार्थ पाहून विषयतृष्णा होत नाहीं. जन्मांधाला रूपाचा अनुभव जशा प्रकारचा येतो, तसेंच अज्ञ मनुष्याला भ्रांतिरूप मिथ्या जगाचें ज्ञान होतें. पण ज्ञानी पुरुषाला तें ब्रह्मरूपानें भासतें, व जगद्रूपानें भासत नाहीं. अत्यंत मूढांना दुःखत्वानें प्रसिद्ध असलेलें हें त्रैलोक्य हा विमूढांचा विषय आहे, ज्ञानी पुरुषांचा नव्हे. कारण त्रैलोक्य सत्य नव्हे. तर मग विषयभोगाच्या अभावीं ज्ञानी कशानें तृप्त होऊन जिवंत रहातो, असें विचारशील तर सांगतों. स्वप्नांत हें स्वप्न आहे असें जर कळलें तर त्यांतील पदार्थ त्याला फारसे आवडत नाहींत, त्याचप्रमाणें जगद्-अवस्थाहि स्वप्नवतच आहे, असें कळल्यावर त्यांतील भोगांची त्याला इच्छा होणार नाहीं. हें जरी खरें आहे, तरी ज्ञानी सर्व विभागशून्य विश्रांति पावलेल्या अत्यंत अविरोधास प्राप्त झालेला असतो, त्यामुळें त्याचें अंतःकरण अतिशय शीतल असतें. व तो सर्व विक्षेपांनीं शून्य होऊन रहातो. ज्याच्या चित्ताला भोगवासना विषयाकडे ओढीत नाहींत, त्या मुक्त पुरुषाची समस्थिति चित्तनिरोधाविषयींच्या यत्नावांचूनच सिद्ध होते. म्हणजे चित्तनिरोधासाठीं त्याला ध्यान वगैरे करावें लागत नाहीं. भोगवासनाशून्य पुरुषाचा चित्तनिरोध स्वभावतःच सिद्ध असतो. ज्याप्रमाणें सरोवरांतील जल पाट काढल्यावांचून बाहेर जाणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें त्याचें चित्त बहिर्मुख होणें शक्य नाहीं. बाह्य पदार्थ हाच मनःसंकल्प व मन हाच बाह्य पदार्थांचा समुदाय होय. मनच त्याला जाणतें. मनःसंकल्प हाच विषयांचा आभास आहे. मग तो विषय बाह्य असो किंवा आंतर असो. ज्याप्रमाणें समुद्राला जाऊन मिळेपर्यंत निरनिराळ्या नद्यांचें जल अनेकरूप असतें व तें समुद्राला मिळाल्यावर जसें केवळ एकरूप होतें, सामान्य जलाच्या आकारानेंच त्याचा प्रत्यय येतो, त्याप्रमाणें सबाह्याभ्यंतर सर्व पदार्थांच्या आकारानें एक मनच स्फुरण पावतें. विषय व मन यांच्यामध्यें जल व तरंग याप्रमाणें द्वित्व नाहीं. वायु व स्पंद यांप्रमाणें एकाच्या अभावीं दोहोंचीहि शांति होते. खरोखर एकाची शांति झाल्यानेंच परमार्थतः निःसार असलेल्या जगांत सत्य कांहींच भासत नाहीं. केवळ एक आत्मतत्त्वाचा अनुभव अवशिष्ट रहातो. त्यामुळें विषय व मन यांची शांति एकाच वेळीं होते. यास्तव ज्ञानी पुरुषानें संकल्परूप विषयाची इच्छा करूं नये व यथार्थ ज्ञानानें मनालाहि मिथ्या मानावें, ह्मणजे त्या दोन्हींचीहि शांति होते. हा त्यांचा बाध म्हणजे स्वप्नांतील वाघाच्या नाशाप्रमाणेंच अनष्ट नाश होय. म्हणजे वस्तुतः त्याचा नाश होत नाहीं, तर तीं दोन्ही भ्रामक आहेत, असा निश्चय होतो. आपला शत्रु मृण्मय आहे, म्हणजे मृत्तिकेच्या पुतळ्यालाच आपण वैरी समजत होतों, असें कळतांच त्याविषयींचा शत्रुभाव व त्यामुळें वाटणारें भय, हीं दोन्ही जशीं बाधित होतात, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाचे विषय व मनहि जशींच्या तशींच स्थित असतांना मिथ्या भासतात. एखाद्या शूर पुरुषाला ज्याप्रमाणें पिशाचाचा भास होत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाला अज्ञ पुरुषांसह सर्व जगत् भासत नाहीं. ह्मणजे केवळ जगत्च त्यांना दिसत नाहीं. असें नाहीं, तर अज्ञजनहि दिसत नाहींत. जवळच स्वस्थ घोरत पडलेल्या मनुष्याला

स्वप्नांत दिसणारे विविध पदार्थहि जवळच्याच जागृत असलेल्या मनुष्याला दिसत नाहींत. एखादा भित्रा पुरुष जसा काल्पनिक यक्ष आपल्यापुढें पहातो, तसा स्वप्न पहाणारा पुरुष स्वप्नांतील प्रपंच पहातो. अज्ञ पुरुष, अमुक ज्ञानी आहे ही सुद्धां एक कल्पनाच करतो. अज्ञाच्या दृष्टीनें वंध्येचीहि पुत्रपौत्रादि संतति वाढते. पण तत्त्वज्ञ आदिअंतरहित, ज्ञानस्वरूप ब्रह्मच हें सर्व आहे असें समजतात. ब्रह्म हाच सृष्टीचा स्वभाव आहे, असे ते जाणतात. मन या शब्दाचा कांहीं निराळा अर्थ आहे असें त्यांना वाटत नाहीं. ब्रह्मतत्त्व सर्वविभागरहित आहे, अशी त्यांची दृढ समजूत असते. बोधरूप जलावर मन, बुद्धि, अहंकार हे निर्मल तरंगच जणुंकाय उत्पन्न झाले आहेत. तेव्हां त्यांत, विषय व त्यांची कल्पना करणारें मन, हें सत्य कसें संभवणार ? रामा ! ही वृथा भ्रांति आहे. यास्तव तूं स्वभावामध्येंच स्थित हो. शरदृतूंतील आकाश जसें अति निर्मल असतें, त्याप्रमाणें जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति यांच्या पलिकडे जाऊन शुद्ध बोधस्वभावामध्यें स्थित असलेल्या पुरुषांना मनाचा अनुभवच येत नाहीं. या मिथ्या द्वैताचा बाध करून ह्मणजे तें सर्व मिथ्या आहे अशी भावना दृढ करून चिद्घन स्वभावामध्यें स्थिर हो. तो स्वभाव या सर्व अनंत द्वैताचें अधिष्ठान आहे. ज्ञप्तिच अंतःकरणांतील व बाहेरील पदार्थांचा आधार आहे. जसें शाखा, फळें इत्यादिकांचें मूळ कारण बीज आहे, तसेंच चित् हें सर्व स्थूल, सूक्ष्म प्रपंचाचें मूळ आहे. ज्ञेयाचा असंभव असल्यामुळें ज्ञप्तिहि अनिर्वाच्यत्वाला प्राप्त झाली आहे. जगाचें मूलतत्त्व सर्व विशेषशून्य आहे. त्यामुळें सर्व विशेषाचा बाध झाला असतां, स्वयंप्रकाश सत् अवशिष्ट रहातें. मनाचा संकल्प हाच विषय आहे. म्हणूनच तो अभावरूप भ्रम आहे. मन हाच विषयाचा संस्कार आहे व तोहि अभावात्मक असल्यामुळें भ्रम आहे. अज परमात्मा सर्वात्मक असल्यामुळें कांहीं कारणावांचूनच जगाचें अस्तित्व भासतें आणि भ्रामक अनुभवानें पदार्थ मिथ्याच अनुभवाला येतो. मन कांहीं कारणावांचूनच विषयाच्या आकारानें स्फुरण पावतें. विजेच्या चमकण्याप्रमाणें तें स्वभावतःच अस्थिर असलेलें मन विषयाकार बनतें. ह्मणजे ब्रम्ह जसें मनोरूपानें परिणाम पावतें, त्याप्रमाणें मनहि विषयरूपानें निष्काणरच भासतें. तूं केवल विषयसंकल्परूपानें संसारांत भ्रमण करतोस, पण केवल स्वभावाचें ज्ञान झाल्यावर 'तूं' हा पदार्थच उरणार नाहीं व असा भ्रमहि होणार नाहीं. हा संसार मनामुळेंच आहे. तो आत्मबोधानें शान्त होतो. शुक्तिरजत या भ्रमाप्रमाणें हे लोक वृथा क्लेश भोगीत असतात. त्यामुळें सर्व सृष्टीचा अभाव आहे, असें समजणें हेंच बोधाचें श्रेष्ठ स्वरूप आहे व तोच असंसार, ह्मणजे मोक्ष होय. निर्वाणाहून दुसरी सर्व सत्ता दुःखालाच कारण होते. 'मी' हा भ्रम आहे. तो मृगजलासारखा असत् व शून्यस्वरूप आहे. अशा प्रकारचें आत्मज्ञान झालें असतां 'अहं' ही वृत्ति शांत होते. यास्तव स्वरूपाला जाणून ज्ञानमय होऊन सबाह्य-अभ्यंतर विषयतेचा त्याग करावा. त्यांत असलेलें आपलें स्वरूप मात्र टाकूं नये. कारण जलच जसें तरंगत्वाला प्राप्त होतें किंवा वृक्षाची आमूलाग्र सत्ता जशी बीजरूप असते, त्याप्रमाणें सर्व विषयता ब्रह्ममय आहे. यास्तव विषयाकाराची उपेक्षा करून त्यांतील ब्रह्मरसाचाच तेवढा स्वीकार करावा. जसें एकच निर्मल आकाश असंख्य योजनें विस्तार पावलेलें आहे, त्याचप्रमाणें एकच निर्विकार व निर्मल ज्ञप्ति अनंत विषयांच्या आकारांनीं

भासतें. जसें एकच सर्वव्यापक आकाश शून्यरूपानें सर्वत्र निर्मल असतें, त्याप्रमाणें एकच अखंड तत्त्व ज्ञेयाकार भासतें. घृत स्वतःला घनरूप बनवून जसें पाषाणरूप बनतें, त्याप्रमाणें एक शुद्ध ब्रह्महि ज्ञान ज्ञेय-दशेमध्यें घनरूप बनतें. चित्‌च विषयरूपानें विकार पावून चित्तरूप बनते, त्याला कांहीं विशेष निमित्ताची अपेक्षा नसते. देश, काल इत्यादिकांच्या साह्यावांचूनच आत्मा केवल स्वरूपाला विसरून चित्तरूपास प्राप्त होतो. अज्ञ पुरुष निरनिराळ्या न्यायांनीं उपदेशिला जातो. श्रुत्यनुकूल तर्कांनीं एकच आत्मा अनेक आकारांनीं विस्तार पावला आहे, असें सांगितलें आहे. जरी या साक्षात् आत्म्याचें अज्ञान वगैरे कांहींच संभवत नाहीं, तथापि त्याचें ज्ञान होईपर्यंत त्यांची कल्पना केली जाते. परस्परांना आत्मतत्त्वाचा बोध व्हावा, ह्मणून शुद्ध चिदात्म्यामध्येंहि अज्ञानादिकांची भावना करावी लागते. रामा! याप्रमाणें जीवाचें वास्तविक अस्तित्वच संभवत नसल्यामुळें ज्यांचे देहादिसंघात अधिकारी असतात, ज्यांनीं अभिमान टाकलेला असतो, ज्यांचा अविवेक शांत झालेला असतो, ज्यांची सर्व भ्रांति पार नाहींशी झालेली असते व जे अनंत स्वरूपांत शांत झालेले असतात, ते अज्ञानाचा बाध करणाऱ्या ज्ञानांत लीन होऊन जातात व ते सतत चित्तसमाधानरूप परमविश्रांतीमध्यें तत्पर होऊन रहातात. ४३.

---

## सर्ग ४४ वा.

१ वर्धनीय समाधानकल्पवृक्षाचें वर्णन. २ भ्रांत झालेल्या प्राण्याच्या मनोमृगाची त्याच्या छायेंत विश्रांति.

श्रीरामः—हे मुने, विवेकी जनांना सर्व प्रकारें उपजीविका करण्यास योग्य अशा समाधानवृक्षाची विश्रांति देणारी सत्ता, त्याच्या लता, पुष्पें यांसह क्रमानें सांगा. त्या वृक्षाचें बीज काय, क्षेत्र कोणतें, कोणत्या उदकाच्या सिंचनानें त्याला अंकुर येतो, पुढें त्याचीं पर्णें, शाखा, पुष्पें, फलें, छाया कोणती, इत्यादिकांचें सविस्तर वर्णन करून मला सांगा.

श्रीवसिष्ठः—रामा, ज्याच्यावर सर्व प्रकारें उपजीविका केली जाते, असा समाधानवृक्ष मी सांगतों. विवेकी-जनरूप अरण्यांत तो वृक्ष अतिशय वाढतो, व पत्र-पुष्प-फलांनीं युक्त होतो. शत्रु, स्वजन, अपमानादि यांपासून उत्पन्न होणाऱ्या दुःखानें किंवा भाग्यवशात् आपोआपच अकस्मात् या संसारवनाचा कंटाळा येतो, त्याविषयीं मन विरक्त होतें. शुभ कर्में याच नांगरानें नांगरलेलें, सतत आनंदरसानें सिंचन केलेलें व श्वासोच्छ्वासरूपी बंधनांनीं विभक्त केलेलें अंतःकरण हेंच याचें क्षेत्र होय. विवेकीजनरूपी अरण्यांत विवेकानें अतिशय शुद्ध झालेल्या चित्तभूमींत संसारनिर्वेदरूप समाधिबीज आपोआप पडतें. आपल्या चित्तभूमीमध्यें पडलेल्या त्या वैराग्यरूप ध्यानबीजाला वाढविण्याविषयीं निश्चयानें उद्युक्त झालेल्या पुरुषानें पुढें सांगितलेल्या वस्तूंचें त्यावर सिंचन करावें. पुनः भोगामध्यें आसक्त होऊन इतर लौकिक क्षणिक वैराग्याप्रमाणें त्याचा नाश करूं नये. कामक्रोधादि वेगांना सहन करून त्यांना उत्तरोत्तर वाढवीतच जावें. प्रथम त्या वैराग्यबीजाला सत्संगमरूप ताज्या दुधाचें सिंचन करावें. नंतर त्याच्या मुखांतून निघालेल्या शुद्ध, स्निग्ध, मधुर व स्वतःला हितकर अशा चंद्रांतील अमृतासारख्या शास्त्रोपदेशामृतानें सेक करावा. नेति नेति, इत्यादि उपनिषद्वाक्यांनीं स्थूल, सूक्ष्म पदार्थांचा ह्मणजे सर्व द्वैताचाच निषेध केल्यामुळें अंतःकरणांत सर्व

संसार शून्य आहे, अशी भावना स्थिर होते. त्यामुळें सर्व तापाची शांति होते. यास्तव अतिशय मधुर व शीतल शास्त्रामृतरसांनीं वैराग्याला वाढवावें. आचार्यांच्या हृदयांत असलेल्या ब्रह्मसरोवरापासून व्याख्यानाच्या द्वारा अमृतप्रवाह निघतात. त्या श्रवणमननादिरूप श्रेष्ठ शास्त्रार्थजलानें वैराग्यबीजाला वाढवावें. विवेकयुक्त बुद्धीनें आपल्या चित्तभूमींत ध्यानाचें संसारवैराग्यरूप बीज पडलें आहे, असें जाणून त्याचें मोठ्या यत्नानें रक्षण करावें. शारीर, मानस व वाङ्मय असें त्रिविध तप, दान, अमानित्व, अदांभित्व इत्यादि ज्ञानसाधनें, ईश्वरार्पण केलेलीं कर्मे, तीर्थयात्रा, पुण्यस्थानीं निवास, यांचेंच त्या बीजाच्या रक्षणार्थ कुंपण घालावें. याप्रमाणें अनेक उपायांनीं त्या वैराग्यरूप ध्यानबीजाला अंकुर आला असतां, त्याचें रक्षण कसें करावें हें जाणणारा व तें करण्यांत निपुण असलेला 'संतोष' या नांवाचा रक्षक नेमावा. त्याच्याबरोबर त्याची 'मुदिता' नांवाची भार्याहि असावी. हा रक्षक नेमण्यापूर्वीं पूर्ववासनांमध्यें असलेल्या आशारूप पक्ष्यांना दूर घालवावें. पुत्र, मित्र, धन इत्यादि अनात्म्यांमध्यें असलेला जो अनुराग, तद्रूप पक्ष्यांना व काम, गर्व, इत्यादि गृध्रांना त्या संतोष-रक्षकाकडून हांकून द्यावें. कारण वैराग्यापासून उत्पन्न झालेल्या ध्यानांकुराला खुडून टाकण्यासाठींच ते येत असतात. अहिंसा, यम, नियम, आसन, प्राणायाम, ईश्वरोपासना, इत्यादि सत्क्रियारूप मृदु कुंचल्यांनीं या अंकुराच्या क्षेत्रांतील धूळ झाडून टाकावी. त्याचप्रमाणें अचिंत्य ब्रह्मलोक देणाऱ्या विवेकरूप सूर्यप्रकाशानें त्यांतील अज्ञानांधकारहि घालवावा. संपत्ति व स्त्रिया हे भोग क्षणभंगुर तरंग आहेत. पापरूप मेघापासून निघालेल्या उल्का त्या अंकुरावर पडतात. धैर्य, औदार्य, दया, मंत्र, जप, स्नान, तप, दम इत्यादि उपायांनीं प्रणवार्थरूप त्रिशूल ज्यानें आपल्या हातीं घेतला आहे, अशा रक्षकानें त्या सर्व उल्कांचें निवारण करावें. याप्रमाणें संरक्षण केलेल्या या ध्यानबीजापासून पुष्टि, सौंदर्य इत्यादिकांनीं उन्नत व तेजस्वी विवेक या नांवाचा नवा अंकुर उत्पन्न होतो. त्या अंकुरामुळें चित्तभूमि प्रकाशयुक्त व विकास पावलेली भासते. नुकत्याच उगवलेल्या चंद्रानें जसें आकाश, त्याचप्रमाणें चित्त विवेकप्रकाशानें अतिशय रम्य भासतें. त्या अंकुरापासून दोन पानें विकास पावतात. एक शास्त्रांविषयींची रुचि व दुसरें साधुसमागम. तो अंकुर कांड या रूपानें परिणाम पावतो. त्याचें मूळ दृढ होतें. तो उंच वाढूं लागतो. संतोषरूपी त्वचा त्याला वेढते. वैराग्यरसानें तो टवटवीत होतो. वैराग्यरसानें अतिशय पुष्ट झालेल्या त्याच्यावर शास्त्रार्थरूपी वर्षर्तूंतील विपुल वृष्टि झाल्यानें तो थोडक्या वेळांत परमोन्नतीस प्राप्त होतो. याप्रमाणें शास्त्रार्थ, साधुसमागम, व वैराग्यरस यांनीं पुष्ट झालेला तो समाधानवृक्ष राग, द्वेष इत्यादि कपींच्या क्षोभानें यत्किंचित्‌हि कंपायमान होत नाहीं. नंतर त्या विज्ञानानें अलंकृत झालेल्या व आनंदरसानें विकास पावणाऱ्या वृक्षाच्या या विस्तृत शाखा सभोंवार पसरतात. आत्मतत्त्वाची स्पष्टता, सत्यता, परमात्मरूपानें स्थिति, धीरता, विकल्पशून्यता, सर्वत्र शांतता, मैत्री, दयालुत्व, कीर्ति, आर्यता, या शांत्यादि पर्णांनीं युक्त असलेल्या शाखांनीं तो ध्यानतरु अत्यंत ऊर्जित झालेला दिसतो. ज्यांना यशोरूप पुष्पें आलीं आहेत, असा तो संन्यासी पुरुषाचा समाधानवृक्ष, पारिजातवृक्षाप्रमाणें सर्व कामना पूर्ण करतो. याप्रमाणें लता, पल्लव, पुष्पें यांनीं युक्त असलेला हा ज्ञानवृक्ष मूळ

अज्ञानाचा उच्छेद करण्यास समर्थ असलेलें 'ब्रह्मसाक्षात्कार' हेंच फल देतो आणि तें प्रतिदिवशीं वाढत असल्यामुळें तो वृक्षहि उत्तरोत्तर रम्य दिसूं लागतो. तो यशोरूप पुष्पगुच्छांनीं संपन्न होतो. उत्तम गुण याच पल्लवांनीं विस्तार पावतो. वैराग्यरसानें वृद्धि पावतो. प्रज्ञारूप मंजरींनीं सुशोभित होतो. जसा मेघ पावसाळ्यांत सर्व भूपृष्ठाला शीतल करतो, त्याप्रमाणेंच हा समाधानरूपी वृक्ष सर्व आशा शांत करतो. जसा चंद्रमा सूर्याच्या तापाला शमवितो, त्याप्रमाणें हा वृक्ष त्रिविधतापाला नाहींसा करतो. वर्षाऋतु लागतांच, तो जसा सर्व भूपृष्ठावर छाया पसरतो, त्याप्रमाणें हा वृक्ष शमरूप छाया देतो. पूर्वेकडील वायु मेघाला ज्याप्रमाणें आकाशभर पसरवितो, त्याप्रमाणें शम चित्तस्थैर्य संपादन करतो. कुलाचल जसा स्थित असतो, तसें चित्त आत्म्यामध्यें स्थिर होतें. कैवल्यरूप फलाचें उंच घटियंत्र रचतो. त्यांत शांत्यादि कल्याणगुणांची शोभा सर्वत्र पसरलेली दिसते. पुरुषाच्या हृदयारण्यांत विवेकरूपी कल्पवृक्ष प्रतिदिवशीं वाढूं लागला असतां त्याच्या खालीं छायेचें छत पसरतें. त्यामुळें हृदयाचे सर्व ताप नाहींसे करणारी शीतलता प्राप्त होते. मतिरूपी लता उल्हास पावते. तिच्या पानांवर पडलेल्या गुण-तुषारांनीं ती रमणीय दिसते. असो. त्या वृक्षाच्या छायेंत संसाराच्या इतर प्रांतांत थकलेला मनोमृग विश्रांति घेतो. रामा! त्या मनोमृगाचें किती वर्णन करावें! तो जन्मापासून मरेपर्यंत एकसारखा भटकत असतो, दैववशात् एखादे वेळीं तो सन्मार्गामध्यें जरी आला, तरी तेथें निरनिराळ्या वाद करणाऱ्या शास्त्रकारांचा कोलाहल त्याच्या कानीं येतो. त्यामुळें व्यग्र होऊन तो त्या सन्मार्गापासून च्युत होतो. कागादि सहा व्याध सप्तमात्ररूप जो शारीर-पुरुष त्याच चर्मासाठीं त्याच्या मागें लागलेले असतात. त्यामुळें असार व साकार अशा शरीरादि असंख्य कंटकमय झुडपांत स्वतःला लपवून त्याचें रक्षण करतां करतां तो अतिशय थकून गेलेला असतो. संसारारण्यांत पसरणारा वासना-वायु त्याला त्या अरण्यभर पळावयास लावतो. अहंतारूप मृगजलाची नदी त्याला जलाच्या आशेनें भटकावयास लावते. त्यामुळें अंगांत भिनलेल्या विषाप्रमाणें त्याच्या अंगाचा तृष्णेमुळें दाह होतो. त्याला नानाप्रकारच्या भोगाविषयीं अतिशय आसक्ति असल्यामुळें ते अधिकाधिक वाढावेत असें वाटतें. त्यामुळें तो अल्प भोगानें तृप्त होत नाहीं. त्यामुळेंच फार दूर व विषम प्रदेशीं असलेल्याही कोवळ्या गवतासारख्या सुशोभित दिसणाऱ्या विषयाकडे तो पळत सुटतो. त्यामुळें त्याचीं सर्व गात्रें शिथिल होतात. पुत्र-पौत्रादिकांचें परिपालन करणें हें आपलें कर्तव्य आहे, असें समजून त्यासाठीं तो त्रिविध ताप सहन करतो व शेवटीं त्यांनींच व्याकुळ होऊन अनर्थगर्तेंत पडतो. संपत्तिरूप वेलीमध्यें पाय अडकल्यामुळें ज्याची गति कुंठित झाली आहे, असा तो शत्रु, चोर, राजा, इत्यादिकांपासून बंधन, ताडण, दंड यांचा अनुभव घेतो. त्याचें अंग घटून जातें. तृष्णारूपी नदीमध्यें पडलेला तो क्षुधा, तृषा, शोक, मोह, जरा, मृत्यु या ऊर्मींकडून दूर वाहून नेला जातो. विविध व्याधिरूप व्याधांच्या भीतीनें तो इतस्ततः पळत सुटतो. ज्यानें दैवाचा कधीं विचारहि केला नाहीं, असा तो मनोमृग मृत्युरूप व्याध येऊन ठेपल्यामुळें भीतीनें आपला आकार संकुचित करून रहातो. विषयांच्या प्रदेशांतून प्राप्त झालेल्या दुःखरूपी बाणाची त्याला नेहमीं भीति वाटत असते. हिंसकानें फेंकलेले दगड आपल्या अंगाला लागतील कीं काय अशी

त्याला नेहमीं भीति वाटत असते. म्हणजे पूर्व-पूर्व दुःखानुभवाच्या संस्कारांनीं, तो चिन्हित झालेला असतो. दगडाचे प्रहारांनीं जसे अंगावर व्रण पडतात, त्याप्रमाणें पूर्व दुःखानुभव-संस्कार त्याच्यावर झालेले असतात. स्वर्ग, नरक, इत्यादि ऊर्ध्व व अधःप्रदेशीं क्रमानें संपात व निपात घडतात, ह्मणजे वर जातांना त्याला ठेंचा लागतात व खालीं जातांना त्याचें अंग ठेंचतें, त्यामुळें त्याला दुःख होतें. काम, क्रोध, भय इत्यादि विकाररूप पाषाणांच्या आघातांनीं निरंतर त्याच्या अंगांचें चूर्ण होत असतें. तृष्णारूपी कंटकमय लतेच्या जाळ्यांत अडकल्यामुळें त्या मनोमृगाच्या अंगाला शतशः कांटे टोंचलेले असतात. त्यानें आपल्या बुद्धीप्रमाणें आपला आचार ठरविलेला असतो. दुसऱ्यांच्या कपटांना ओळखण्याचें चातुर्य त्याच्यामध्यें नसतें. इंद्रियग्रामास प्राप्त होऊन लागलाच तो अतिशय धांवूं लागतो. ज्याला आपल्या ताब्यांत आणणें फार कठीण आहे, असा कामरूप गज आपल्या संचारामध्यें, त्याच्या अंगाचें मर्दन करून सोडतो. विषयरूप अजगराच्या भयंकर विषारी फूत्कारांनीं तो मूर्छित झालेला असतो. कामुक बनलेला तो मनोमृग, विषयरसाच्या आशेनें कामिनीरूप भूमींत बहुतकरून घसरून पडतो. क्रोधरूप दावाग्नीनें त्याची पाठ भाजून तींवर फोड उठतात, व त्याचा फार दाह होतो. विषयांमध्यें पुनः पुनः भ्रमण केल्यामुळें अनंत चिंता, शोक इत्यादिकांमुळें तो दीर्घदुःखी होतो. अभिलाषरूपी दंश म्हणजे डांस त्याला फार पीडा देतात. भोग, लोभ, विषयसुख इत्यादि शृगाल—कोल्हे त्याला एकसारखे पळवीत असतात. स्वकर्माच्या कर्तृत्वानें म्ह० कर्तृत्वाभिमानानें भ्रमण करीत असलेल्या दारिद्र्यरूपी व्याघ्राकडून त्याचा पाठलाग केला जातो. मोहांधकारामध्यें चांचपडत जाणाऱ्या त्याला उच्चनीच प्रदेशीं वारंवार अडखळावें लागतें. मानरूपी सिंहाच्या उत्कर्षानें त्याचें हृदय भयानें थरथर कांपत असतें. मृत्युरूपी व्याघ्रानें त्याच्याकडे एखाद्या सुखच्छेद्य पुष्पाप्रमाणें पाहिलेलें असतें. ह्मणजे पुष्पाचें विदारण करणें जितकें सुलभ आहे तितकेंच या मनोमृगाला मारणें सुलभ आहे, असें मृत्युरूप व्याध समजतो. गर्वरूप अजगर त्याला गिळून टाकण्यासाठीं फार दिवसांपासून टपून बसलेला असतो. निरनिराळ्या विषयांच्या इच्छांनीं तो दीन होऊन याचक बनतो व लोकांपुढें दांत विचकत फिरतो. तारुण्यरूप सुहृदाकडून तो स्त्रीसाठीं एक क्षणभर आलिंगन देऊन पुनः सोडला जातो. झंझावातासारखीं इंद्रियें त्या मनोमृगाला नरकस्थावरादि योनिरूप निबिड अरण्यांत वारंवार फेंकतात. हे रामा! अशा प्रकारचा हा मनोरूप हरिण अनेक जन्मांतील पुण्याच्या परिपाकामुळें भाग्योदय झाला असतां उत्तम जन्म घेऊन शमादि साधनांचें अनुष्ठान करतो व वरील ध्यानतरूच्या छायेंत विश्रांतिसुखाचा अनुभव घेतो. ह्मणजे ज्याप्रमाणें रात्रीं सर्व प्राणी शीत व अंधकार यांनीं आर्त होतात, पण रात्र संपून सूर्योदय होतांच त्यांना सुख होतें, त्याप्रमाणें आर्त झालेल्या या मनोमृगाला शेवटीं ध्यान व ज्ञान यांच्या योगानें शांतीचा लाभ होतो. अहो श्रोते जनहो, ताल, तमाल इत्यादि वृक्षांच्याखालीं बसून विश्रांति मिळणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें भूमि, स्वर्ग इत्यादि ब्रम्हलोकापर्यंत जे विविध भोग आहेत, त्यांतच आनंद मानणाऱ्या आत्मज्ञानशून्य लोकांना

परमानंदाचा कधींच अनुभव येत नाहीं. यास्तव तुमचा मनोमृग मोक्षरूप विश्रांतिसुखाला वर वर्णन केलेल्या उपायांनीं प्राप्त होवो. ४४

## सर्ग ४५ वा.

—:०:—

१ मनाच्या ध्यानवृक्षावरील आरोहणाचा क्रम. २ आरोहण करीत असतांना उत्तरोत्तर भूमिकांमध्यें सुखाचा उत्कर्ष.

श्रीवसिष्ठः—रामा! याप्रमाणें विश्रांति पावलेला हा मनोरूप मृग त्या ध्यानकल्पवृक्षावरच रममाण होतो, मग दुसऱ्या वृक्षाकडे तो जात नाहीं. त्या वृक्षाच्या गुच्छाच्या आरंभापासून मन विश्रांति पावेपर्यंत जो काल जातो, तेवढ्यांत तो विवेकयुक्त ध्यानवृक्ष आंतल्या आंत कैवल्यफलाला धारण करतो, आणि पारमार्थिक आत्मस्वरूपभूत कैवल्यफलाला हळूहळू प्रकट करतो. हा मनोमृग त्या वृक्षाच्या खालीं उभा राहून त्या पवित्र फलाला पहातो. ध्यानवृक्षाच्या एका शाखेला तें पवित्र फल लागलेलें दिसतें. नंतर तो मनोरूप मनुष्य[1] त्या फलाचा अस्वाद घेण्यासाठीं त्या विवेकयुक्त ध्यानवृक्षावर चढूं लागतो. तो सर्व परिवाराचा त्याग करतो. दृढ निश्चय करतो. अगोदर विवेकवृक्षावरील आपला पाय दृढ करून मग संसारभूमीवरील आपला पाय उचलतो. म्हणजे देहादिकांवरील अहं-ममाभिमान टाकतो आणि त्या वृक्षावर उच्चस्थानीं पाय पोंचला म्हणजे मग तो खालीं पहात नाहीं. तर पुढील पाऊल ठेवण्याच्या वरील शाखांकडेच लक्ष ठेवितो. त्या उत्तम फलासाठीं विवेकवृक्षावर आरूढ झालेला तो, सर्प जशी कात टाकतो, त्याप्रमाणें प्राक्तन संस्कारांना टाकतो. पूर्व व्यवहारांचें स्मरण करीत नाहीं. एखादे वेळीं दैववशात् त्याला जरी स्मरण आलें, तरी स्वतःला उच्चपदीं आरूढ झालेलें पाहून 'मी एवढा वेळ विषयसुखलेशासाठीं किती दीन होत होतों?' असें म्हणून स्वतःच स्वतःला हंसतो. सर्वभूतदया, अभय, सत्त्वशुद्धि इत्यादि त्या वृक्षाच्या निरनिराळ्या शाखांवरून संचार करणारा तो, लोभरूपी सर्पाला जमिनदोस्त करून एखाद्या सम्राटाप्रमाणें शोभतो. सद्बुद्धिरूप चंद्राला लुप्त करून सोडणाऱ्या अमावास्येच्या परंपरा, दुःखरूप चंद्राच्या अनेकत्वभ्रांतीला कारण होणारा जो तिमिर या नांवाचा नेत्ररोग त्याची जणु काय पंक्तिच, प्राण्याला बद्ध करणारी पोलादाची जणु काय शृंखलाच, अशा तऱ्हेची जी तृष्णा, ती प्राण्याला शुभेच्छा झाल्यापासून प्रतिदिवशीं क्षीण होत होत, शेवटीं अगदीं क्षीण होते. त्यानंतर तो मनुष्य प्राप्त स्थितीची उपेक्षा करीत नाहीं, अप्राप्त अवस्थेची अपेक्षा करीत नाहीं, सर्व वृत्तींमध्यें चंद्रासारखा सौम्य व शीतल रहातो. तो अध्यात्म शास्त्राचे—शम, दम, संतोषादि जे अर्थ तद्रूप कोमल पल्लवांवर स्थिर स्थित होतो, इतर शास्त्रानुसार प्रवृत्ति केल्यास प्राण्यांची ब्रम्हलोकापर्यंत उन्नति व स्वाभाविक प्रवृत्तीमुळें नरकांत अवनति होणें, या दोन्ही जगद्गति अज्ञानदशेंतच प्राप्त होतात, असें पाहून तो अध्यात्मशास्त्रांतच निश्चित होतो. तो विवेकवृक्षावर आरूढ झालेला पुरुष पूर्वीच्या अज्ञानभूमिकांना भयंकर विषवृक्षाच्या विषारी पुष्पांनीं अतिशय कठोर झालेल्या शाखांप्रमाणें पहातो व त्या भूमिकांतील दुर्दशेला हंसतो, त्या ध्यानवृक्षाच्या स्कंधप्रदेशीं उत्तरोत्तर भूमिकांमध्यें अभ्यासाच्या बलानें क्रमानें आ-

[1] हरिण वृक्षावर चढण्यास असमर्थ असल्यामुळें मनाला येथें मनुष्याची उपमा दिली आहे.

रूढ होऊन तेथेंच चित्तवृत्तीच्या योगानें खालीं-वर विहार करीत असलेला तो, एखाद्या राजाप्रमाणें शोभतो. स्त्री, पुत्र, मित्र इत्यादि सर्व संबंधी लोक व धन यांना दुसऱ्या जन्मांतील किंवा स्वप्नांतील पुत्रादिकांप्रमाणें पहातो. एखाद्या नटाच्या व्यवहाराप्रमाणें केवल दुसऱ्याचें मनोरंजन करणें हाच ज्यामध्यें प्रधान हेतु आहे, अशा कृत्रिम राग, द्वेष, भय, उन्माद, मान, मोह, इत्यादिकांच्या योगानें याचे सर्व व्यवहार होत असल्यासारखे दिसतात, पण त्याचें चित्त शीतळ व निर्मल असतें. समोर दिसणाऱ्याहि संसारमृगजलाच्या नदीची गति, एखाद्या उन्मत्ताच्या व्यवहाराप्रमाणें पाहून हा तिला हंसतो, कारण ती नदी मिथ्या व क्षणभंगुर तरंगांचीच आधारभूत असते. त्याला लोक, स्त्री, धन इत्यादिकांतील कशाचीहि इच्छा नसते. एका अपूर्व स्थानीं विश्रांति पावलेला तो जिवंत असतांनाच शवासारखा असतो. केवल अत्यंत शुद्ध बोधरूप व अतिउन्नत स्थानीं असलेल्या फळावर दृष्टि ठेवून तो त्या वृक्षावर उंच उंच चढत जातो. पूर्वींच्या आपत्तींचें पुनः पुनः स्मरण करून संतोषामृतानें अतिशय पुष्ट झालेला तो अज्ञानदशेंत पुरुषार्थरूप भासणाऱ्याहि अनर्थांचा नाश झाला असतां, अतिशय संतुष्ट होतो. ज्याप्रमाणें गाढ झोंप घेत असलेल्या पुरुषाला एकाएकीं जागें केलें असतां तो निद्रासुखाचा विच्छेद झाल्यामुळें उद्वेगास प्राप्त होतो, त्याप्रमाणें हा ध्यानवृक्षावर आरूढ झालेला पुरुष अवश्य कर्तव्यरूप व्यवहारामध्यें दुसऱ्याकडून प्रेरणा केला गेला असतां, समाधिसुखाचा विच्छेद झाल्यामुळें उद्विग्न होतो. अतिशय प्रवास करून थकलेला वाटसरू जशी सतत व अबाधित विश्रांति इच्छितो, त्याप्रमाणें पूर्वी दीर्घकाल अज्ञानामुळें प्राप्त झालेल्या जन्ममरणपरंपराप्राप्त श्रमानें थकून जाऊन आतां समाधिसुखाचीच इच्छा करतो. त्याचे श्वासोच्छ्वास चाललेले असतात, त्यावरून तो बाहेरून व्यवहार करीत आहे, जागा आहे, असें जरी वाटलें, तरी काष्ठरहित अग्नीप्रमाणें तो स्वरूपांतच शांत होतो. कारण केवल श्वासाच्याच दृष्टीनें पाहिल्यास तो इतर लोकांसारखा जरी दिसला, तरी आंतून अहंममाभिमानानें युक्त नसल्यामुळें परमात्म्यांत शांत होतो. पूर्वाभ्यासाच्या बलानें पदार्थांविषयींची अप्रीति आपोआप हळूहळू उत्पन्न होऊं लागते. त्या अप्रीतीचें निराकरण करण्यास तो समर्थ नसतो. प्रारब्धप्राप्त विषयोपभोगदृष्टीचें निराकरण करण्यास तो असमर्थ असतो, त्याचप्रमाणें या विरक्तीचें निराकरण त्याच्याकडून होत नाहीं. रामा! त्या परमार्थफल देणाऱ्या महापदवीला प्राप्त होणारा तो शब्दाचाहि विषय न होणाऱ्या सहाव्या भूमिकेस प्राप्त होतो. प्रवासी रूक्ष प्रदेशांतून प्रवास करण्याची जशी इच्छा करीत नाहीं, त्याप्रमाणें दैववशात् प्रयत्नावांचून प्राप्त झालेल्या भोगाविषयींहि तो विरक्त होतो. तो एखाद्या मत्त पुरुषाप्रमाणें निश्चिंत असतो. संसारव्यवहारामध्यें निजलेला तो आनंदांत रहातो. त्याचें अंतःकरण तृप्त असतें. तो मन व वाणी यांचा निरोध करून कांहीं अवर्णनीय अवस्थेस प्राप्त होतो. एखादा सिद्ध मेरुशिखरास जसा प्राप्त होतो, किंवा पक्षी वृक्षाच्या अग्रावर जाऊन बसतो, त्याप्रमाणें ध्यानाचा अभ्यास करणारा योगी क्रमानें परमार्थफलाच्या अगदीं समीप जाऊन पोहोंचतो. त्यानंतर सर्व वासना व सर्व प्रकारचें मनन सोडून आकाशासारखा अक्षुब्ध झालेला तो ब्रह्मानंदरूप फलाचें ग्रहण करतो, त्याचा आस्वाद घेतो, त्याचा अनुभव घेतो, व सर्व प्रकारानें तृप्त होतो. म्हणजे योगाच्या सप्तम

भूमिकेंत तो प्रतिष्ठित होतो. संकल्पाचा परित्याग केल्यामुळें प्रतिदिवशीं विस्तार पावणारी जी शुद्ध स्वरूपांतील विश्रांति तिलाच परमपुरषार्थप्राप्ति म्हटलें जातें. भेदबुद्धि विलीन होते. नंतर अभेदच अवशिष्ट रहातो. जें शुद्ध, एक, आदि-अंतरहित चित्स्वरूप तेंच ब्रम्ह होय असें ज्ञानी समजतात. जो लोकैषणेविषयीं विरक्त झालेला असतो, ज्याची स्त्री-पुत्रादिकांविषयींची एषणा शांत झालेली असते, तोच त्या पदीं विश्रांति पावतो. सूर्याच्या तापामुळें बर्फ किंवा दंव यांची पंक्ति जशी सुकून जाते, त्याप्रमाणें चित् व परमार्थ यांची परस्पर भेदबुद्धि लीन होऊन जाते. कारण ती निरतिशय आनंदरूपानेंच परिणाम पावते. धनुष्याला आकर्ण ओढून सोडलें असतां पुनः तें पूर्ववत ताठ होतें, पण परमात्म्यामध्यें लीन झालेलें चित्त पुनः बहिर्मुख होत नाहीं. तर त्याला जेथें व जसें स्थिर करावें तसेंच तें रहातें. म्हणून त्याला कठोर धनुष्याची उपमा देतां येत नाहीं. तर मृदु पुष्पांच्या मालेचीच उपमा देतां येते. कारण पुष्पांची माला भूमीवर जशी सरळ किंवा वांकडी ठेवावी तशीच ती रहाते. ज्याप्रमाणें एखाद्या स्तंभावर स्पष्ट न खोदलेली प्रतिमा बीजरूपानें रहाते, तिला सतूहि म्हणतां येत नाहीं, असतूहि म्हणतां येत नाहीं, तशी परमात्म्यामध्यें सर्व विश्वाची स्थिति होते. बीजरूपानें असलेल्या तिला सत् म्हणतां येत नाही व असतूहि म्हणतां येत नाहीं. याप्रमाणें ज्ञान होण्यापूर्वीं प्रपंचानें युक्त असलेल्या ब्रम्हामध्यें निष्प्रपंचस्वरूपाचें अज्ञानामुळें ध्यानच करतां येत नाहीं. पण जो साक्षात् ज्ञानीच झालेला असतो, तो स्वतःच ब्रम्हरूपांत रहातो. तेव्हां स्वरूपांतच स्थिर झालेला तो, ध्यान करण्यास कसा समर्थ होणार? कारण गाढ झोंप घेत असलेला किंवा जागा असलेला मनुष्य, मी स्वप्नरहित आहें, असें ध्यान करूं शकत नाहीं. जागृत पुरुष स्वप्नांतील पदार्थाविषयीं जसा विरक्त असतो, त्याप्रमाणें तत्त्ववेत्त्यांनीं प्रपंचाविषयीं तुच्छ बुद्धीनें अत्यंत वैराग्य धारण करावें. कारण तें शक्य आहे आणि या सर्व दृश्याविषयीं ज्यांच्या मनांत अत्यंत विरक्ति असते, तोच ज्ञानी होय. कारण जो अज्ञानी आहे, त्याला दृश्याचा त्याग करण्यानें सामर्थ्यच नसतें. दृश्याला जाणणें, हाच अज्ञान दशेंतलि बोध होय. तशा बोधामुळेंच अज्ञांना प्रपंच शाश्वत भासतो. त्या अवस्थेंत चित्ताचें समाधान होणें मुळींच शक्य नाहीं. तर मनाला द्रष्टा व दृश्य यांचा एकतारूप प्रत्यय जेव्हां येतो, तेव्हां पुरुप स्वतःच आत्मरूपामध्यें स्थिर होऊन विश्रांति घेतो. दृश्य विषयांचें वैराग्य हाच तत्त्ववेत्त्याचा सहज स्वभाव आहे. ज्ञानी लोक दृश्याचें स्फुरण हेंच अतत्त्वज्ञत्व आहे, असें म्हणतात. अतत्त्वज्ञालाच विषय आवडतात, तत्त्वज्ञाला आवडत नाहींत. ज्यानें अमृत प्राशन केलें आहे, त्याला कडू कांजी आवडत नसते. तृष्णाशून्य झालेल्या व वरील तिन्ही एषणांचा त्याग करणाऱ्या ज्ञानी पुरुषाचें ध्यान त्याची इच्छा नसली तरी स्वभावतःच प्रवृत्त होतें. कारण तो आत्मनिष्ठच असतो व तृष्णादि दोषांमुळेंच चित्तामध्यें विक्षेप उत्पन्न होतो. त्यामुळें स्वरूपसंधानरूप ध्यान अविच्छिन्न रहात नाहीं. पण ती तृष्णाच ज्याच्या ठिकाणीं नसते, तो स्वरूपाला सोडून आणखी कोठें व कसा रहाणार? किंवा तृष्णारहित ज्ञानी पुरुषाची विषयेच्छा अनंत असते, तिचा अंतच लागत नाहीं. कारण तो स्वतः अपरिच्छिन्न आत्मरूप बनलेला असतो. त्यामुळें ज्याचें चिंतन करावयाचें त्या बाह्य विषयाचें

ज्ञान कसेंहि जरी झालें, तरी ते त्याच्या तृष्णेची पूर्ति करण्यास समर्थ नसतात. तशा तृष्णेचा निरोध नित्य, निरतिशय आनंदानेंच होतो. त्यामुळें पंख गळून पडलेल्या पर्वताची स्थिति जशी एकाच ठिकाणीं स्थिर होते, त्याप्रमाणें तृष्णाशून्य पुरुषाचें आनंदानुभवरूप अनंत ध्यान आपोआप अविच्छिन्न चालतें. म्हणूनच शुद्धबोधाचा उदय होईपर्यंतच समाधीसाठीं यत्न करणें उचित होय. शुद्ध बोधात्म्याचा साक्षात् अनुभव आला असतां, समाधीसाठीं यत्न करण्याची कांहीं आवश्यकताच रहात नाहीं. कारण साक्षात्कार व समाधीविषयींचा यत्न हे परस्परविरूद्ध असल्यामुळें दोघांची एकाच वेळीं स्थिति संभवत नाहीं, असें तत्त्ववेत्त्यांनीं सांगितलें आहे. अतिशय प्रदीप्त अग्नीमध्यें घृतबिंदूचें अस्तिव संभवत नाहीं. विषयाविषयींचें परमवैराग्य हेंच समाधान होय. तें ज्यानें संपादन केलें आहे, त्या मनुष्यरूपी ब्रह्माला नमस्कार असो. विषयविरक्ति अतिशय दृढ झाली असतां, इंद्रासह सुर व असुरहि त्याच्या ध्यानाला विघ्न करूं शकत नाहींत. विषयविरक्ति पूर्णपणें साध्य झाली असतां, वज्रासारखें दृढ ध्यान करावें. ज्ञानानें सर्व भेद नष्ट झाला असतां बाकीच्या ध्यानरूप तृणाचा काय उपयोग? जगत् हा शब्द, व त्याचा अर्थ मूर्खांमध्येंच रूढ झाला आहे. ज्ञानी पुरुषांचा तो विषय नव्हे. जेथें तज्ज्ञ व अतज्ज्ञ, त्याचप्रमाणें विश्व व विश्वेश्वर, त्यांचें ज्ञान व अज्ञान हीं ज्या परमानंदामध्यें एकरूप होऊन भासतात, तेथेंच हे विद्वान्हो, तुम्ही विश्रांति घ्या. कारण विवेकी लोकांच्या मननादि बोधभूमीमध्यें, किंवा ज्ञानी लोकांच्या साक्षात्कारादि बोधभूमीमध्यें आत्म्याहून निराळी सत्ता किंवा असत्ता, द्वैत किंवा अद्वैत यांचा कोणाला निर्णयच करतां येत नाहीं. परमानंदामध्यें विश्रांति पावण्याचा पहिला उपाय अध्यात्मशास्त्राचा अभ्यास. मोठ्या आदरानें निरंतर शास्त्रार्थाचें चिंतन करणें, यालाच शास्त्राभ्यास म्हणतात. हा पहिला उपाय; ज्ञानी पुरुषाचा समागम हा दुसरा व ध्यान हा निर्वाणाचा तिसरा उपाय होय. त्यांतील शेवटचा ध्यान हा उपाय सर्वांत श्रेष्ठ आहे. कारण ध्यान हें चित्तविश्रांतिरूप फलाच्या अगदीं जवळ असतें. ही अपरिच्छिन्न, नित्य, अपरोक्ष ब्रह्मचित्, 'जीव' या नांवाच्या स्वप्नप्रतिबिंबाच्या आदर्शासारखें जें अंतःकरण त्याच उपाधीमुळें परस्परविरूद्ध रूप धारण करते. जगांत प्रिय व अप्रिय यांच्या संसर्गामुळें ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्व विशेषांस व्यापून आपल्या कर्मवैचित्र्यामुळें ती सम व विषम शरीरांत उदय पावते. याप्रमाणें अनादिकालापासून, जन्ममरणपरंपरारूप संसारांत पडलेल्या जीवांतील ज्या कोणा एखाद्याचा भाग्योदय झाल्यामुळें ज्ञानाधिकारानें योग्य असा जन्म प्राप्त होतो, त्याला शास्त्र, सत्संगति इत्यादि उपाय प्राप्त होतात. त्यामुळें बोध व विरक्ति या दोन दीपांतील एकाची सिद्धि झाली असतां, दुसऱ्याचीहि होते. त्यानंतर ज्ञानरूपी अग्नीनें जळून भस्म झालेला जगद्रूप तूल[1] चिदाकाशांत उत्तर भूमिकांचा अभ्यास करणें, एतद्रूप वावटळीनें वेगानें कोठें उडून जातो हें कांहीं समजत नाहीं. ज्याप्रमाणें चित्रांतील अग्नि शीतनिवारण करूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें आपात ज्ञान अज्ञानानें निवारण करूं शकत नाहीं. ज्याप्रमाणें अज्ञपुरुषाच्या अभिमानरूप मिथ्या ज्ञानामुळें संसारभ्रांति उत्तरोत्तर वाढतच जाते, त्याप्रमाणें तत्त्वज्ञाच्या ज्ञानाची जशी जशी

---

१. तूल=कापूस.

वृद्धि होऊं लागते, तसें तसें अज्ञान जळूं लागतें. तत्त्वज्ञाला अज्ञपुरुषाचें जगत् निर्विषय होऊन रहातें. त्याला चित्तांतील पदार्थांप्रमाणें सर्व जगत् भासतें. शून्यत्वानेंच रचलेली, स्वप्नांतील मिथ्या संकल्पानें निर्मिलेली सृष्टि जशी भासावी, त्याप्रमाणेंच ज्ञानी पुरुषाच्या चित्तांत जगद्रूप ज्ञप्ति केवळ संकल्पमात्र भासते. ज्ञानाविषयीं जो केव्हांहि मूढ होत नाहीं, त्याला अहंता व जगत्स्थिति यांतील कांहींच भासत नाहीं. तो परमाभासरूप झालेला असल्यामुळें त्याची कोणत्याच प्रकारें स्थिति होत नाहीं. त्याचें चित्त शुष्क व आर्द्र काष्ठाप्रमाणें बोध व अबोधरूप झालेलें असतें. बोधाच्या आधिक्यामुळें तो सर्व लोकांशीं मैत्री संपादन करतो. आपल्या सुखदुःखाप्रमाणें त्यांचें सुखदुःख पहातो, त्यांच्यावर दया करतो. पण अबोधांशानें लोकांशीं विवादहि करतो. ज्ञानांशानें जगत् एकरूप पहातो व अज्ञानांशानें तें आत्मरूप आहे, हें त्याच्या ध्यानांत येत नाहीं. म्हणजे त्याच्यामध्यें ज्ञान व अज्ञान यांतील जो अधिक भाग असतो तन्मय तो होऊन रहातो. त्याचें ज्ञान परिपक्व झालेलें असतें. त्याला जगाचें सत्त्व व असत्त्व यथार्थ भासत नाहीं. म्हणजे ज्याप्रमाणें सातव्या भूमिकेवर आरूढ झालेला योगी जाग्रत्, स्वप्न, व सुषुप्त यांचा स्वभाव जाणत नाहीं, त्याप्रमाणेंच ज्ञानी जगाला सत्य मानीत नाहीं. वासना हेंच मन आहे. ती वासना आत्मविचारानें नाश पावते. कारण ती मिथ्या आहे, त्यामुळें तिचा नाश झाला असतां मोक्ष अनायासें प्रवृत्त होतो. अर्थात् आरंभीं मनोमृगाच्या ध्यानतरूवरील विश्रांतीसाठीं जें रूपक आरंभिलेलें होतें त्याचा मोक्षामध्यें परिणाम होतो. मनोनाश झाला असतां मनोमृगाच्या रूपानें वर्णिलेल्या आत्म्याचें स्वरूपावस्थान सिद्ध होतें. तोच त्याचा मोक्ष होय. मुमुक्षु म्हणजेच वर सांगितलेला मनोमृग अंकुर, कांड, शाखा, पल्लव, पुष्प, फल, या क्रमानें परिणाम पावलेल्या विवेकवृक्षावरील बोधरूप फलाला प्राप्त होतो, आणि त्या ध्यानवृक्षावरील परम फलाचा म्ह० परमानंदाचा आस्वाद घेऊन तो संसारबंधनापासून मुक्त होतो. ४९.

---

## सर्ग ४६ वा.

१ ध्यानवृक्षाच्या फलाचा आस्वाद घेतला असतां मनाची स्थिति कशी होते, व विषयवैराग्य दृढ कसें होतें, याचें वर्णन.

श्रीवसिष्ठः—परमार्थफलाचा साक्षात अनुभव आला असतां आणि मुक्तीमध्यें त्याचा परिणाम झाला असतां, बोध म्ह० चरमसाक्षात्कारवृत्तिहि, तिचें उपादान कारण जें अज्ञान त्याचा बाध होत असल्यामुळें असत् होते, आणि मनोमृग परम पुरुषार्थरूप आत्माच होतो. दिव्यांतील तेल संपलें असतां त्यांतील ज्योति कोठें जाते, तें जसें कळत नाहीं, त्याप्रमाणें ती पूर्वीची मृगता म्ह० विषयरूपतृणाला शोधण्याचा स्वभाव कोठें नाहींसा होतो. अनंत ब्रम्हस्वरूपाला प्रकाशित करणारी परमार्थदशाच त्या वेळीं असते. ध्यानवृक्षाचें फल मिळालें असतां, बोधत्वास प्राप्त झालेलें मन, पंख तोडलेल्या पर्वताप्रमाणें अचल स्थिति धारण करितें. त्या अवस्थेंत मनाचें मनत्व कोठें तरी जातें, व केवल निरुपाधिक ज्ञान अवशिष्ट रहातें. मनानें बाह्य विषयांचें मनन करण्याचा आपला स्वभाव टाकून तें स्वतः निर्बाध, निरंश व सर्वव्यापक चिन्मात्रच होतें. चित्तामध्यें पूर्वी जी सत्ता,

देह व आत्मा यांचा विवेक न झाल्यामुळें जणुं काय जडरूप होऊन राहिली होती, तीच सत्ता आतां देहादि आत्म्याहून अगदीं भिन्न आहे, असें समजून ज्ञानरूपानेंच उदय पावली आहे. त्यामुळें ती आदि—अंतरहित, निर्मल व परमार्थप्रकाशरूप फल देणारी झाली आहे. त्यामुळें त्या अवस्थेंत सर्व इच्छांचें स्वभावतःच निरसन होतें. आणि मग आदि-अंतरहित, निरुपद्रव स्वात्मध्यानच अवशिष्ट रहातें. जोंवर ब्रह्माचा साक्षात्कार झाला नाहीं, व मन परमपदीं विश्रांति पावलें नाहीं, तोंवर दुसऱ्या विषयाच्या अनुसंधानामुळें केवळ ध्यानच अवशिष्ट रहात नाहीं, केवल ध्यानाचाच अनुभव येत नाहीं. पण ज्या वेळीं मन सर्व विषयचिंतन सोडून परमार्थाशीं एकरूप होऊन जातें, तेव्हां तें आहे कोठें तेंहि कळत नाहीं. मग वासना कोठच्या, कर्मे कोठलीं व हर्ष, क्रोध इत्यादि विकार तरी कोठचे ? केवळ ध्याननिष्ठ झालेला योगी, दृढ समाधानामध्येंच स्थिर स्थित आहे, तो पर्वतासारखा अचल आहे, असाच त्याचा अनुभव येतो. आत्मस्वरूपांतच रममाण होणारा योगी सर्व भोगांविषयीं विरक्त होतो. त्याच्या इंद्रियवृत्ति अतिशय शांत होतात. सर्व दृश्य त्याला नीरस वाटूं लागतें. क्रमानें त्याच्या सर्व वृत्ति गलित होतात, व त्याची विश्रांति उत्तरोत्तर वाढूं लागते. अशा स्थितींत ध्यानाप्रमाणें त्याची समाधिहि स्वभावतःच सिद्ध होते. उदार अंतःकरणाचे मुमुक्षु जोंवर चित्रांतील मनुष्याप्रमाणें विषयांना पहातहि नाहींत, तोंवर विषयविरक्तीचा अभ्यास करतात, ह्मणजे चित्रांतील मनुष्याला जसे पुढील पदार्थ दिसत नाहींत, त्याप्रमाणें विषयविरक्तीचा अभ्यास करणाऱ्या मनुष्याला पुढें असलेले पदार्थहि चित्तांत विकार उत्पन्न करीत नाहींत. असें झालें ह्मणजे तें वैराग्य दृढ झालें असें समजावें. त्यानंतर त्याला वैराग्याच्या अभ्यासाची गरज नाहीं. जगांतील पदार्थांना न पहाणारा व वासनाशून्यतेमुळें आत्मरूप झालेला ज्ञानी त्याची इच्छा नसतांनाहि कोणी बलात्कारानेंच निवृत्त केल्याप्रमाणें दृढ-समाधानांमध्यें प्रवेश करतो. गुळावर चिकटलेली मुंगी जशी त्याला सोडीत नाहीं, त्याप्रमाणें पहिल्याच समाधानामध्यें ज्याला निरतिशय आनंदाचा अनुभव आलेला आहे, त्याचें स्वभावतःच एकाग्र बनलेलें मन, आनंदाला सोडून दूर जात नाहीं. पावसाळ्यांत नदीला जसा मोठा पूर येतो, त्याप्रमाणेंच पूर्वोक्त ज्ञानी पुरुषाला समाधानाचा लाभ होतो. सर्व विषय-वासना शांत झाल्यामुळें बलात्कारानें जसें ध्यान प्राप्त होतें, त्याप्रमाणें ब्रह्मानंदाचा साक्षात्कार झाल्यावर अनात्मविषयांचें वैराग्य दृढ होतें. तीच समाधि होय. रागादि-दोषांनीं चित्त जोंवर संतप्त होत असतें, तोंवर केव्हांहि कोणालाहि समाधान होत नाहीं. यास्तव दृढ विषय-वैराग्य हेंच ध्यान होय आणि त्याचाच पूर्ण परिपाक झाला असतां तें ध्यानच समाधि बनतें. अर्थात् भोगांविषयींची विरक्ति हेंच बीज, ध्यान हाच त्या बीजापासून उत्पन्न झालेला अंकुर, आणि अचल ध्यान हीच समाधि होय. साक्षात्कारवृत्तीनें प्रकट झालेलें ब्रह्मच, अविद्येचा उच्छेद केल्यामुळें ज्ञान, वासनेचा उच्छेद केल्यामुळें ध्यान व सर्व दुःखांचा उच्छेद केल्यामुळें आनंदरूपानें निर्वाण म्हटलें जातें. पण हें सर्व विषयभोगाविषयीं विरक्ति असली तरच सिद्ध होतें, त्यावांचून नाहीं. त्यामुळें भोगांविषयींची विरक्ति जर असेल, तर निराळ्या ध्यानाचा आग्रह कशाला ? आणि विषयवैराग्य जर नाहीं, तर ध्यानादिकांच्या आग्रहाचा तरी काय उपयोग ? म्हणजे किती जरी ध्यान केलें तरी त्याचा काय उपयोग ? ज्यानें दृश्याविष-

यींचें प्रेम सर्वथा सोडिलें आहे त्या आत्मज्ञानवान् मुनीचें निर्विकल्प समाधान कोणत्याहि प्रकारच्या प्रतिबंधावांचून प्रवृत्त होतें. ज्याला दृश्य प्रिय वाटत नाहीं, त्यालाच ज्ञान झालें असें समजावें. ज्या वेळीं विषयभोग आवडेनासे होतात, तेव्हांच यथार्थ ज्ञान उदय पावलें आहे, असें समजावें. जो स्वरूपामध्यें विश्रांति पावलेला असतो, त्याला भोगित्व कोठलें? कारण भोगित्व हा अस्वभाव आहे, तें स्वाभाविक नव्हे. अज्ञानामुळें त्याचा उद्भव होतो. तेव्हां ज्ञानानें अज्ञानाचा क्षय झाल्यावर भोगित्व कोठलें? अभ्यासी पुरुषानें नियतकालीं ध्यानाचा अभ्यास केल्यावर वेदांतशास्त्राचें गुरुमुखानें सहाध्यायांसह श्रवण करावें. उपनिषदें, गीता इत्यादिकांचा पाठ करावा, प्रणवादिकांचा जप करावा आणि इतकें सर्व करून झाल्यावर ध्यान करावें, म्ह० समाधीचा अभ्यास[१] करावा. हे रामा! अंतःकरणाच्या सर्व वृत्ति शांत कराव्या, सर्व खेद टाकावा, सर्व शंका सोडून आह्लादयुक्त व्हावें. झोंपेंत असल्याप्रमाणें सौम्य असावें आणि चित्ताला सम, शांत व शरदृतूंतील मेघविस्तराप्रमाणें अति शुद्ध करावें. ४६

---

१ स्कंदपुराणांत—

जपश्रान्तः पुनर्ध्यायेद्ध्यानश्रान्तः पुनर्जपेत्।
जपध्यानाभियुक्तस्य प्रसीदति परः शिवः॥

असें म्हटलें आहे. याचा अर्थ—जप करून श्रांत झालेल्या साधकानें पुनः ध्यान करावें व ध्यान करून कंटाळा आला असतां पुनः जप करावा. जप व ध्यान यांनीं युक्त असलेल्या म्हणजे त्यांतच आपला सर्व काल घालविणाऱ्या पुरुषावर परमात्मा प्रसन्न होतो.

# सर्ग ४७ वा.

—:०:—

१ पुनरपि मुक्तीच्या साधनांच्या क्रमाचें दृढ वैराग्यापर्यंत सविस्तर वर्णन.

श्रीवसिष्ठः—हे रामा! संसारभारानें अतिशय श्रांत झालेला व मरणमूर्च्छादि संकटांमध्यें ज्याचें शरीर खितपत पडलें आहे, अशा मनुष्याला विश्रांतीची इच्छा होते. ह्मणून त्यानें त्या विश्रांतीसाठीं, कोणकोणते गुण कोणत्या क्रमानें संपादन केले पाहिजेत, तें सांगतों ऐक. जेव्हां कांहीं कारणानें, व कारणावांचूनहि आपल्या मनांत संसारवैराग्यरूप विवेकाचा लेश उत्पन्न होतो, तेव्हां मार्गींतील श्रम घालविण्यासाठीं उन्हानें संतप्त झालेले प्रवासी वृक्षछायेचा आश्रय जसा करतात, त्याप्रमाणें साधुत्वानें अतिशय विस्तार पावलेल्या पुढील गुणांचा आश्रय करावा. जसा मार्गस्थ मनुष्य यज्ञांतील यूपाचा[१] छायेसाठीं आश्रय करीत नाहींत, त्याप्रमाणें सन्मार्गस्थ मुमुक्षु अज्ञजनांपासून फार दूर रहातो. तो सज्जनांचें अनुकरण करतो. स्नान, दान, तप, यज्ञ इत्यादि धर्मकार्यें करूं लागतो. त्याचा सर्व व्यवहार निष्कपटपणें होतो. त्याचें प्रत्येक कृत्य सौम्य व उदार असतें. चंद्रबिंबांतील अमृताप्रमाणें त्याचा व्यवहार लोकांना आल्हाद देणारा व हितकर असतो. त्याला स्वपक्षाचा अभिमान, राग, लोभ इत्यादि नसतात व तो परहित-तत्पर असल्यामुळें दुसऱ्याच्या संतोषासाठीं त्याच्या इच्छेप्रमाणें वागतो. म्हणूनच तो सर्व लोकांना अतिशय प्रिय होतो. पवित्र कर्मांची त्याला मोठी आवड असते. त्यामुळें सर्व लोकांमध्यें तो उत्कृष्ट ठरतो, व त्याचा व्यवहार सर्वांना

---

१ यूप = यज्ञांतील पशु बांधावयाचा स्तंभ.

सुखकर होतो. त्याची नूतन संगति नवनीता-सारखी निर्मल, स्निग्ध, मृदु, मधुर व चित्ताकर्षक असते. ती सर्व लोकांना सुख देते. विवेकी पुरुषांचीं चरित्रें शीतल व पवित्र असतात. चंद्राच्या किरणसमूहाप्रमाणें सर्व लोकांना तीं आल्हाद देतात. साधुसमागमामध्यें जशी मनाला विश्रांति मिळते, तशी ज्यामध्यें पुष्पांचा थर पसरला आहे अशा उद्यानांतहि ती निर्भयपणें प्राप्त होत नाहीं. मंदाकिनीच्या जलाप्रमाणें विवेकी लोकांची संगति पातकांचें प्रक्षालन करते, व अतिशय पावन करते. बर्फाच्या किंवा पुष्पांच्या हारांनीं रचलेल्या गृहामध्यें जसें तापशमन होतें, त्याचप्रमाणें, संसारसागरांतून स्वतः परतीरास जाऊन इतरांसहि त्यांतून तारण्याची इच्छा करणाऱ्या विरक्त, विवेकी सज्जनांच्या संगतींत लोकांला सुख होतें. विवेकी लोकांमध्यें जें प्रेम व जी अनुरक्ति असते, ती सुर, गंधर्व व मानव यांच्या कन्यांमध्येंहि नसतें. उचित कर्म करणाऱ्या पुरुषाची बुद्धि प्रसन्न होते. निष्काम कर्में क्रमानें अनुष्ठिलीं असतां चित्तांतलि रागादि दोष निवृत्त होतात; त्यामुळें आत्म्याला जाणण्याची इच्छा उत्पन्न होते; आणि आरशामध्यें जसें पदार्थाचें प्रतिबिंब पडतें, त्याप्रमाणें शुद्ध चित्तांत गुरुमुखानें ऐकलेला शास्त्रार्थ स्थिर होतो. शास्त्रार्थरसानें शोभणारी सत्प्रज्ञा विवेकयुक्त हृदयांत उत्कर्ष पावते. महावनांत कदली वृक्ष जसा विकास पावतो त्याप्रमाणें सद्बुद्धींत प्रज्ञेची वाढ होते. शुद्ध प्रज्ञा आरशाप्रमाणें प्रतिबिंबित झालेल्या सर्व पदार्थांचा आंतल्या आंतच अनुभव घेते. साधुसंगतीनें ज्याचें अंतःकरण शुद्ध झालें आहे आणि शास्त्रार्थानें ज्याचा मल घालविला आहे, असा प्राज्ञ अग्नींत शुद्ध करून काढलेल्या जरतारी वस्त्राप्रमाणें अतिशय तेजस्वी दिसतो. सर्व लोकांना प्रकाशित करणाऱ्या सूर्याच्या योगानें जसें सर्व जगत् प्रकाशित होतें, त्याप्रमाणें देदीप्यमान अशा स्वतेजानें साधु म्हणजे विवेकी पुरुष चमकतो. विवेकी शास्त्र व साधुसमागम यांचें असें अनुकरण करतो कीं, स्वप्नांतहि तो मोठ्या अभिनिवेशानें तेंच पहातो, व त्याचाच अनुभव घेतो. शास्त्राभ्यासानें निःसंशय झालेला विवेकी क्रमानें सज्जनतेस प्राप्त होऊन पिंजऱ्यांतून बाहेर पडलेल्या शुकाप्रमाणें विषयभोगास तुच्छ मानून स्वातंत्र्याचा अनुभव घेतो. भोगांच्या सन्मुख मोठ्या आसक्तीनें जाणें हेंच दुर्भाग्य होय. पण विवेकी दिवसेंदिवस त्याचा त्याग करतो, त्यामुळें चंद्राच्या योगानें जसें तारामंडल तसें त्याच्या योगानें त्याचें कुल शोभतें. भोगांविषयींच्या दीनतेनें रहित असलेली त्याची मुखकांति राहूच्या मुखांतून सुटलेल्या चंद्राप्रमाणें कांहीं अवर्णनीयच दिसूं लागते. ज्यानें त्रिभुवनाला तृणासारखें मानलें आहे, तो मोठ्या प्रशंसेस पात्र होतो. देव स्वर्गांत कल्पवृक्षापाशीं जसे येतात, तसाच तो अपूर्व कीर्तीला पात्र होतो. प्राप्त झालेल्या भोगांचा परित्याग केल्यामुळें त्याला जरी मोठा संतोष वाटत असला तरी, मी सर्व द्वेषाचा त्याग केल्यावर आतां या भोगांचा तरी द्वेष कां करावा? असें ह्मणून मनांत केव्हां केव्हां लज्जित होतो. त्यामुळें त्याचा तो संतोष परिपूर्ण नसतो, पण भोगांचा लाभच न झाल्यास मनांत असें लज्जित होण्याचा प्रसंग न आल्यानें तो फारच संतुष्ट होतो. ज्याप्रमाणें एखादा अधमजातीचा चांडालादिक दैववशात् जातिस्मर झाल्यास, म्ह० त्याला पूर्वजन्मींच्या आपल्या जातीचें स्मरण झाल्यास तो जसा त्या जातींना मोठ्या खेदानें हंसतो, त्याप्रमाणें विवेकी पूर्वींच्या आपल्या चंचल व रागद्वेषयुक्त क्रियांना हंसतो. साधु

लोक भूमीवर उदय पावलेल्या चंद्राप्रमाणेंच त्याला मोठ्या प्रेमानें व विस्मयानें पाहावयास येतात. त्यानें नेहमीं विषयभोगांचा अनादरच केलेला असतो. त्यामुळें अनायासें प्राप्त झालेल्या सिद्धींचाहि आपल्या उचित बुद्धीनें तो बहुमान करीत नाहीं. कारण गुरु व शास्त्र यांच्या संपर्कामुळें पूर्वींच त्यानें वैराग्यादि साधनांचा पूर्ण अभ्यास केलेला असतो. त्यामुळें प्रसन्न झालेल्या सिद्धांपासून प्राप्त झालेल्या विहित भोगांचाहि तो उपभोग घेत नाहीं. रोगी वैद्याचा जसा आश्रय करतो, त्याप्रमाणें तो स्वतः परम कल्याणासाठीं सज्जनांचा सहवास करतो. त्यामुळें त्याची उदारमति शास्त्रार्थामध्यें निमग्न होते. ज्याप्रमाणें एखादा महागज एखाद्या प्रसन्न जलानें भरलेल्या सरोवरामध्यें निमग्न होतो, तशीच त्याची बुद्धि शास्त्रार्थविचारामध्यें गढून जाते. सूर्य जसा लोकांना अंधकारांतून काढून आपल्या प्रकाशांतच प्रविष्ट करतो, त्याप्रमाणें सज्जन आपल्या समीप असलेल्या पुरुषाला विपत्तींतून वर काढून संपत्तीमध्यें नियुक्त करतो. त्याच्या चित्तांत परधनादिकांच्या अपहाराविषयींची विरक्ति पूर्वींच उद्भवलेली असते. विवेकी पुरुष प्राप्त विषयामध्येंच संतुष्ट असतो. परधनाच्या अपहारापासून निवृत्त झालेला व संतोषामृतानें तृप्त झालेला विवेकी क्रमानें स्वार्थाचीहि उपेक्षा करतो. याचना करणाऱ्या भिक्षूला आपल्याजवळ जें कांहीं अल्पस्वल्प कदन्नादिक असेल तें देतो व त्याच अभ्यासानें तो आपलें स्वतःचें मांसहि देण्यास तयार होतो. धांवणाऱ्या मनुष्याला गायीचें पाऊल जसें तुच्छ वाटतें, त्याप्रमाणें विवेकाचें अनुसरण केल्यामुळें ज्यांचें चित्त हळूहळू क्षीण होत चाललें आहे, त्यांचें अज्ञान क्रमानें कमी होऊं लागतें. ज्ञानाची जशी जशी वाढ होऊं लागते तसें तसें अज्ञान नाश पावतें. दुसऱ्याच्या धनाचें ग्रहण करण्याची बुद्धि मोठ्या यत्नानें अगोदर कमी करावी. प्रथम परधनाविषयीं विरक्त व्हावें आणि मग स्वार्थाविषयीं आसक्ति धरूं नये. याप्रमाणें विषयोपभोगाच्या निरसनासह विवेकी व प्रयत्नशील मुमुक्षु स्वार्थाचें निराकरणही परम विश्रांतीसाठीं करतात. यावज्जीव द्रव्योपार्जन करीत राहणें यांत जितकें दुःख आहे तितकें कोट्यवधि नरकांतहि नाहीं. आसन, शयन, वाहन, क्रीडा, व आप्तजन यांविषयीं या लोकींच किती चिंता करावी लागते, याचा विचार मूढांनीं करावा. ह्मणजे त्यांना पारलौकिक दुःखाचें स्मरण जरी न झालें, तरी त्यांनीं लौकिक दुःखाला विसरूं नये. अर्थ हे विस्तृत अनर्थच आहेत. संपत्ति या निरंतर आपत्तिच आहेत, भोग हेच संसारमहारोग आहेत. पण मूढ लोक त्यांची विपरीत भावना करतात, ह्मणजे अनर्थांना अर्थ, विपत्तीला संपत्ति व रोगांनाच भोग समजतात. जोंवर व्यवहारांतील अर्थ हा महान् अनर्थच आहे असें मनुष्य समजत नाहीं, त्याला तो तुच्छ वाटत नाहीं आणि त्यामुळें स्वतःला दुःखी करण्यासाठींच तो त्याची इच्छा करतो, तोंवर त्याच्या चिंतेचे विषय सारखे वाढत जातात व त्यांविषयीं तो विरक्त होत नाहीं. पण ज्याला अनुत्तम सुखाची फार आवड असते, आपल्याला हें परम सुख असेंच चिरकाल लाभो असें ज्याला वाटत असतें, तो धनाला जगद्रूप तृणाच्या अग्राप्रमाणें अति तुच्छ पाहून मनांत शांत होतो. अर्थात् धनाची तृष्णा सोडणें हाच मोक्षाचा मुख्य उपाय होय. अर्थच चिंता, शोक, मोह इत्यादि विकारांचा, जरा व मरण या दुष्कर्मांचा, आणि दैन्य, दुरात्मता, दाह इत्यादिकांचा समूह

म्हटला आहे. या जगामध्यें जरा व मरण यांनीं युक्त असलेल्या जंतूंना, जरामरणापासून सोडविण्यास संतोष हेंच उत्तम रसायन आहे. वसंतऋतु, नंदनवन, चंद्र, अप्सरा हें सर्व एकीकडे आणि संतोषामृत दुसरीकडे अशी तुलना केल्यास संतोषामृतच अधिक ठरतें. वर्षाऋतूमुळें सरोवर जसें जलांनीं तुडुंब भरतें, त्याप्रमाणें मनुष्य संतोषानेंच अंतःकरणांत तृप्त होतो. गंभीर, शीतल, हृदयंगम, प्रसन्न आणि सरस अशा ओजस्वितेला संतोषानेंच प्राप्त झालेला साधु अतिशय शोभतो. वसंतऋतूमध्यें जसा वृक्ष, त्याप्रमाणें तो पुष्पित वनाकार दिसतो. पण जो असंतुष्ट असलेला पुरुष विषयांची इच्छा करून पायाखालीं चिरडलेल्या कीटकाप्रमाणें दीनप्रकृति बनतो, तोच विषयप्राप्तीसाठीं यत्न करतो व त्यामुळेंच दुःखपरंपरेंत पडतो. याचकांची मुखचर्या अतिशय दीन असते. त्यांना एखाद्या क्षुब्ध समुद्रांत पडलेल्या, व तरंगांनीं व्याकुळ झालेल्या जीवाप्रमाणें स्वस्थता कधींच मिळत नाहीं. पण संपत्ति व प्रमदा उंच तरंगाप्रमाणें क्षणभंगुर आहेत, तेव्हां त्यांमध्यें व सर्पाच्या फणांच्या छायेंत कोणता शहाणा पुरुष आसक्त होईल! धन संपादन करणें व रक्षण करणें यांमध्यें किती क्लेश होतात हें जाणत असूनहि जो त्याची इच्छा करतो, तो मूढ नरपशु होय. त्याला स्पर्शहि करूं नये. मनाचा बाह्यारंभ म्हणजे इंद्रियांच्या मागून धावणें व आंतरारंभ म्हणजे संकल्पादि, यांना जो वैराग्यशस्त्रानें एकदमच कापतो त्याचें क्षेत्र म्हणजे, ज्ञानबीजाच्या उद्भवाचें स्थान, किंवा मुक्तीचें निधानस्थान असें जें हृदय, तें प्रकाशित होतें. अज्ञजनांना दिसणारें जगद्वैचित्र्य, त्याच्या साक्षीमध्यें, असतूच आहे, असें जाणणाराहि ज्ञानी ज्ञानाच्या अपक्वतेमुळें त्या जगद्वैचित्र्याला जणूं-काय सत्यच समजतो, व त्याच भावनेनें व्यवहार करतो. पण तो वैराग्यादि गुणांचा अभ्यास न केल्याचा परिणाम आहे. यास्तव हे रामा! प्रथम संसाराविषयीं अगदीं विरक्त व्हावें. नंतर सत्समागम व शास्त्राभ्यास करावा. शास्त्रार्थाविषयीं भावना दृढ करावी, सर्व विषयोपभोगांचें निरसन करावें, म्हणजे वैराग्य दृढ होऊन, मुमुक्षु परमार्थ आत्मतत्त्वाला प्राप्त होतो. ४७.

---

## सर्ग ४८ वा.

—:०:—

१ परम वैराग्य दृढ झालें असतां, ज्या लक्षणांनीं मनुष्याची स्थिति होते व ज्ञान दृढ झालें असतां ज्या लक्षणांनीं स्थिति होते त्यांचें सविस्तर वर्णन.

श्रीवासिष्ठः—संसाराविषयींचें वैराग्य रूढ झालें असतां व साधुसमागम स्थित झाला असतां शास्त्रार्थाची भावना केली असतां व बुद्धीनें भोगांविषयींची तृष्णा सोडली असतां विषयांविषयींहि अरुचि उत्पन्न होते. सज्जनत्व उद्भवतें, आत्मप्रकाश उदय पावतो व हृदय प्रसन्न होतें. विवेकी पुरुष धनाची इच्छा करीत नाहींत. वाळलेलीं उच्छिष्ट पानें जशीं घरांतून बाहेर टाकलीं जातात, त्याप्रमाणें असलेली संपत्तिहि त्यांच्याकडून टाकली जाते. प्रवाशाला पात्रादि उपकरणांची आवश्यकता जरी असली तरी प्रवासांत त्यांचा भार होत असल्यामुळें तीं जशीं टाकून देतो, त्याप्रमाणें विरक्त पुरुष स्त्री, बंधु इत्यादिकांचा यथाशक्ति व यथाकालीं त्याग करतो. त्याचें मन शांत असल्यामुळें इंद्रियांशीं विषयांचा वारंवार संनिकर्ष जरी होत

असला, तरी भोगांचा अनुभव घडत नाहींत. तो विरक्त ज्ञानी कोठें दिगंतरीं, एकांतांत, सरोवराच्या कांठीं, अरण्यांत, उद्यानांत, पुण्यप्रदेशीं किंवा आपल्याच घरांत, सुहृदांबरोबर क्रीडा किंवा विलास करतांना, शुभ उद्यानांतून, भोजनादि प्रसंगीं, तर्कशास्त्राचा विचार करीत असतांनाहि तितकी आस्था ठेवीत नाहीं. कारण त्यांतील कशावरच त्याची आसक्ति नसते. कदाचित् दैववशात् त्यांतील एखाद्या ठिकाणीं त्यांना जरी रहावें लागलें, तरी ते अति शांत, दान्त, स्वात्माराम व मौनी होऊनच रहातात. प्रत्येक मनुष्य दैवाधीनच जरी असला, तरी तो आपलें ज्ञान दृढ व्हावें, म्हणून तत्त्ववेत्त्याचीच अपेक्षा करितो; व देह, इंद्रियें, बुद्धि इत्यादिकांचा साक्षी जो प्रत्यगात्मा, त्याचाच चित्तानें शोध करतो. आत्मव्यतिरिक्त वस्तूचा तो शोध करीत नाहीं. ज्ञानी पुरुषांना ज्ञानी पुरुषाच्या संगतीची अपेक्षा असते व ते केवल विज्ञानाचीच चर्चा करितात, दुसऱ्या कशाचीहि करीत नाहींत. याप्रमाणें अभ्यासानें शांत परमपदीं विश्रांति प्राप्त होते. शांत विवेकी स्वतःच त्या परमपदाकडे जातो. त्याचें ज्ञान सबाह्य-अभ्यंतर शांत असून तेंच परमार्थरूपानें उदय पावलेलें असतें. अर्थात् शांति हेंच परमपद होय. कोणताहि पदार्थ त्या शांतीहून भिन्न संभवतच नाहीं, असा निश्चय झाल्यामुळें ज्ञानाचा विषयच नाहींसा होऊन ती निश्चयरूप वृत्तिहि काष्ठ जळाल्यावर आपोआप विझणाऱ्या अग्नीप्रमाणें आत्म्यामध्यें शांत होते. यास्तव तेंच परमधाम होय. एक ज्ञानरूप आत्म्यावांचून दुसरा कोणताहि पदार्थ नाहीं. असा जो स्वानुभव तेंच परमपद होय. त्या परमपदाला बोधत्व नाहीं व विषयत्वहि नाहीं. कारण सर्व वस्तु एक अद्वितीय ज्ञानाशीं एकरूप होऊनच परिणाम पावलेल्या असतात. विषयावांचून त्याहून अगदीं भिन्न असलेलें ज्ञान सांगतां येत नाहीं व ज्ञानावांचून ज्ञेयाला ज्ञानविषयत्वहि येत नाहीं. तथापि विषयांच्या अभावीं, त्या अभावालाहि विषय करणारें ज्ञान नाहीं असें ह्मणतां येत नाहीं. ज्या सत्पुरुषांचें मन शुद्ध संविद्रूप आत्म्यामध्यें विश्रांति पावलेलें असतें, त्यांना विषयाची रुचि कळत नाहीं. पाषाणाला दुधाचें माधुर्य कळणें जसें शक्य नाहीं, त्याप्रमाणें मनोरहित झालेल्या साधूंना विषयाचा आस्वाद कळत नाहीं. ज्यानें आपल्या अंतःकरणाचा पूर्णपणें निरोध करून मनोनाश केला आहे, व त्यामुळें जो मौन धारण करून बसला आहे, तो चित्रांतील मनुष्याप्रमाणें स्वरूपांतच स्थित असतो. त्याचें चित्त आत्म्यामध्येंच निश्चल होतें. आत्म्यालाच जाणणें सर्वथा उचित आहे. यास्तव त्यालाच जाणणें ज्याचें शील आहे, त्याचें मन निर्विषय होतें, आणि सर्व तत्त्वतः मनोमात्र असल्यामुळें त्या अवस्थेंत तें सर्व विषयसंपन्नहि होतें. तसेंच ज्ञानी पुरुषाचें मन अपरिच्छिन्न ब्रह्माकार झालेलें असल्यामुळें वस्तुतः महत् परिमाणाचेंच होतें. तथापि ब्रह्माहून भिन्नरूपानें त्याचा अनुभव येत नसल्यामुळें तें परमाणूसारखें अति सूक्ष्म होतें. तें वस्तुतः अशून्यच असतांना शून्य असल्यासारखें भासतें. अहंता, जगत्, शरीरादिकांच्या चेष्टा, दिशा, काल इत्यादिकांच्या कल्पना, ज्ञानादि, शून्यादि वगैरे सर्व विद्यमान असतांनाच ज्ञानी पुरुषाला नसल्यासारखें होतें. दीप अंधकाराचें जसें निरसन करतो, त्याप्रमाणें निर्मलपदीं स्थित असलेल्या ज्ञानी पुरुषाकडून हृदयांतील अज्ञान, व बाह्य राग-द्वेष-भयादि दोष घालविले जातात. ज्याच्यामध्यें रजोगुणाचा लेशहि उरलेला नाहीं, जो सत्त्वगुणाच्याहि पार निघून गेला

आहे, त्या नररूपी सूर्याला नमस्कार करावा. द्वैताचा सर्वथा लय झाला असतां व चित्त अदृश्यत्वास प्राप्त झालें असतां, ज्ञानी पुरुषाची जी स्थिति होते, तिचें वाणीनें वर्णन करवत नाहीं. हे महाबुद्धिमान रामा! चिरकाल, अहोरात्र, परमभक्तीनें प्रसन्न करून घेतलेला परमेश्वर पूर्वोक्त निर्वाण देतो, ह्मणजे त्याच्या कृपेनें पूर्ण समाधान होतें.

**श्रीराम:**—हे मुनिश्रेष्ठ! ईश्वर कोण व भक्तीनें तो कसा प्रसन्न केला जातो, हें मला स्वतः सांगा. कारण आपण सर्व तत्त्ववेत्त्यांमध्यें श्रेष्ठ आहां.

**श्रीवसिष्ठ:**—हे महाबुद्धिमाना, ईश्वर कांहीं कोठें दूर नाहीं व तो अतिशय दुर्लभहि नाहीं. कारण ज्यांना आपल्या स्वाधीन ठेवावयाचें त्यांच्याविषयीं स्वातंत्र्य असणें हेंच ईश्वरत्वाचें लक्षण आहे व तें स्वात्म्यामध्येंच सर्व प्रकारें संभवतें. म्हणून महाबोधमय, एकरूप स्वात्माच परमेश्वर आहे. कारण रथ, गृह, प्रासाद इत्यादि सर्व अचेतन पदार्थ चेतनाच्या उपयोगासाठीं असतात. पण आत्म्याहून दुसरा कोणी चेतनस्वरूप उपलब्ध होत नाहीं. उलट सर्व आत्म्यासाठींच आहे, आत्म्यापासूनच झालें आहे. तोच सर्व आहे, सर्वतः आहे, सर्वांमध्यें आहे व सर्वमय आहे. त्या सर्वात्म्याला नमस्कार असो. त्या आत्म्यापासून या सर्व सृष्टि-प्रलय-विक्रिया उद्भवतात. ज्याप्रमाणें वायूपासून गति उत्पन्न होतात त्याप्रमाणें सर्व विक्रियांचें कारण असलेल्या या आत्म्यापासून स्वभावतःच त्या उत्पन्न होतात. भाविक लोक सतत या सर्व स्थावर-जंगमाची पूजा करतात, ईश्वरबुद्धीनें ते आपल्याला इष्ट असलेले पदार्थ त्यांना अर्पण करतात. म्हणजे कोणीं, कोणत्याहि रीतीनें, कोणाचीहि पूजा केली तरी तिचा मुख्य विषय आत्माच आहे. याप्रमाणें अनेक जन्म स्वेच्छेनें जेव्हां या देवाची पूजा करावी, तेव्हां तो प्रसन्न होतो आणि हा महादेव म्हणजे पुण्यकर्मीनीं प्रसन्न झालेला स्वतः महेश्वर आत्मा पुढें सांगितलेल्या पवित्र दूताला तत्त्वज्ञानासाठीं प्रेरणा करतो.

**श्रीराम:**—हे मुने, परमेश्वर जो आत्मा त्याच्याकडून कोणता दूत प्रेरित केला जातो व तो अधिकारी जीवाला तत्त्वज्ञानाचा बोध कसा करतो, तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठ:**—रामा, त्या दूताचें नांव विवेक आहे. आत्मदेवानें ज्याला प्रेरणा केली आहे, असा तो विवेकदूत अधिकारी पुरुषाच्या हृदयगुहेंत येऊन रहातो. स्वच्छ आकाशांत जसा चंद्र त्याप्रमाणें तो सदानंद ज्ञानप्रतिष्ठित होईपर्यंत हृदयांत स्थिर रहातो. तो वासनारूप जीवाला क्रमानें बोध करतो आणि त्या अविवेक्याला या संसारसागरांतून तारतो. विवेकदूताचा बोध हेंच त्याचें तारण आहे. सर्व जगाला जाणणारा जो हा ज्ञानरूप अंतरात्मा, तोच परमेश्वर आहे. वेदाला सम्मत असलेला 'परम' हाच त्याचा वाचक शब्द आहे, ह्मणजे हेंच त्याचें नांव आहे. मनुष्य, नाग, सुर, असुर यांच्याकडून, जप, तप, दान, होम, पाठ, यज्ञ इत्यादि अनेक कर्मीनीं हाच सतत प्रसन्न केला जातो. स्वर्गलोक हें त्याचें मस्तक आहे, पृथ्वी हेच चरण, तारका रोमपंक्ति, भूतें याच अस्थि व आकाश हेंच त्याचें हृदय आहे. हा परमेश्वर चिद्रूप असल्यामुळें सर्वत्र जातो, जागतो व पहातो, त्यामुळें स्वतः सर्व अवयवांनीं

१ याविषयीं 'अग्निर्मूर्धा चक्षुषी चंद्रसूर्यौ दिशः श्रोत्रे' इत्यादि श्रुति प्रमाण आहे.
[मुण्डकोपनिषद्भाष्यार्थ २. १, पृ. ५८,]

होतो. ज्यांना ही परम दृष्टि प्राप्त झालेली असते, ते कोणत्याहि प्रकारच्या विषयज्ञानाचा अभिमान धारण करीत नाहींत, तर जल स्वभावतःच सखल प्रदेशाकडे जसें वाहतें, त्याप्रमाणें ज्ञानी केवल प्रारब्धाचें अनुवर्तन करितो. जे ज्ञानी या परमदृष्टीला प्राप्त झालेले असतात ते यां दृश्यश्रीच्या पलीकडे असलेल्या परमतत्त्वाला पहातात. त्यामुळें ते जगांत प्राप्त व्यवहार जरी करीत असले, तरी जगाला पहातच नाहींत, तर त्याचें कारण जें ब्रह्म त्यालाच पाहतात. पाणी जेव्हां वेगानें वहात असतें त्या वेळीं व तें जेव्हां संथ असतें त्या वेळींहि तें आपलें जलत्व जसें सोडीत नाहीं, त्याप्रमाणें परमदृष्टीला प्राप्त झालेले ज्ञानी जगाचें भान व अभान हीं दोन्हीं ब्रह्मरूप पहातात. म्हणजे त्या दोन्ही अवस्थांत जगाचें ब्रह्मत्व नष्ट होत नाहीं. ज्ञानी विषयांचें चिंतन करीत नाहींत. त्यामुळें ते दाव्यापासून सुटलेल्या बैलाप्रमाणें स्वतंत्र असतात. अर्थात् त्यांच्याहि शरीरेंद्रियांची हालचाल जी दिसते, ती वाऱ्यामुळें हलणाऱ्या झाडाच्या पानाप्रमाणेंच होय. संसाराच्या परतीराला, म्हणजे परब्रम्हाला पहाणारे ज्ञानी, नदीच्या कांठीं राहणारे लोक विहिरीची जशी प्रशंसा करीत नाहींत, तसे कर्माची प्रशंसा करीत नाहींत. ज्यांच्या कर्मवासना दृढ झालेल्या असतात, तेच मूढ कर्माची प्रशंसा करितात आणि ज्ञानाच्या अभावीं ते श्रुतिस्मृतींनीं सांगितलेलें कर्मः करितात, व त्यामुळेंच त्याचें फलहि भोगतात. गिधाड भूमीवर पडलेल्या आमिषावर जशी झांप घालतो, तशीं इंद्रियें विषयांमध्यें आसक्त होतात. म्हणून त्यांचें मनानें संयमन करून, व चित्ताला स्थिर करून आत्मपरायण होऊन रहावें. सोनें जसें कोणत्याहि आकारावाचून रहात नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्म स्थूल किंवा सूक्ष्म सृष्टीवाचून रहात नाहीं. पण ज्याची बुद्धि सुसंकृत झालेली असते, त्याला ती सृष्टिहि ब्रम्हरूपच भासते. कल्पाचा क्षण होऊन सर्वत्र अंधकार पसरला असतां ज्याप्रमाणें व्यवहाराचा कोणताहि विभाग भासत नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्मरूप झालेल्या ज्ञानी पुरुषालाहि सर्वत्र एक ब्रह्म दिसतें; प्रपंच दिसत नाहीं. पळणाऱ्या ढगांमध्यें ज्याप्रमाणें त्यांचे अवयव स्थिरच असतात, तथापि त्या ढगांबरोबर तेहि त्यांच्या पूर्वीच्या स्थानापासून दूर होतात, त्याप्रमाणें चित्सत्ता भूतांमध्यें एका दृष्टीनें स्पंद पावते व एका दृष्टीनें स्थिर असते. जलामध्यें जलाचे अंश द्वैतमय व अद्वैतमयहि असतात, त्याप्रमाणें चिदात्मा भूतांमध्यें द्वैतमय व अद्वैतमय असतो. ज्याप्रमाणें आकाशांत आकाशाचे अंश द्वैत व अद्वैतमय असतात, त्याप्रमाणें निरवयव शिवामध्यें ही सृष्टि अनन्य भासते. जगामध्यें अहंरूप असतें व अहंरूपांत जगत् असतें. ह्मणजे जगत् व अहं हीं केळीच्या सोपटांप्रमाणें एकमेकांला आच्छादित करून रहातात. जीव आपल्यामध्येंच असलेलें जगत् संकल्पानें बाहेर असल्यासारखें पहातो. जीव कांहीं कारणावाचूनच आपल्याला जगद्रूपानें पाहतो. ह्मणजे ज्याप्रमाणें आकारांकडे दृष्टि दिल्यास सोनेंच निरनिराळ्या अलंकारांच्या रूपानें भासतें, पण तेंच सुवर्ण या दृष्टीनें पाहिल्यास सर्व अलंकार एकरूप दिसतात, त्याप्रमाणें ज्ञानी जीव जगाला ब्रम्हरूपानें पाहूं लागला कीं, त्याला सर्व जगत् एकरूप दिसतें. आत्मवेत्ते पुण्यवान् जीव जिवंत असले, तरी वस्तुतः जिवंत नाहींत, मृत्यु पावले तरी खरोखर मरत नाहींत, व विद्यमान असले तरी जणूं काय नसतात. जसा एखादा गृहस्थ घरांत बसलेला असूनहि गोठ्यांतील दुधाच्या भांड्याकडे त्याचें मन गेलेलें असल्यास घरांतील बाकीच्या गोष्टी

त्याला कळत नाहींत, त्याप्रमाणें ज्ञानी शरीरानें सर्व कर्मे करीत असूनहि मन आत्म्यामध्यें आसक्त झाल्यामुळें कर्मांना पहात नाहीं. ज्याप्रमाणें ब्रह्मांड्-हृदयामध्यें विराट् जीव हा चंद्र स्थित असतो, त्याप्रमाणें प्रत्येक जीवाच्या देहांत हृदयामध्यें बर्फाच्या सूक्ष्म कणाप्रमाणें जीव बीजरूपानें राहातो. बर्फाच्या कणांसारखा ज्याचा आकार आहे, असा जीव स्थूल शरीरांत स्थूल होतो, व सूक्ष्म शरीरांत सूक्ष्म होतो. 'अहं' हें त्याचें स्वरूप आहे. तोच पितृशरीरांतील सूक्ष्म जीव मातृ-शरीरांत प्रवेश करून तदाकार शरीर धारण करितो. वस्तुतः तें शरीर मिथ्या असतें. कारण तें निरनिराळ्या आकारानें विकार पावलेलें असतें. तथापि त्या असत् शरीरालाहि चेतनाच्या बळावर सद्रूप समजतात. ज्याप्रमाणें फुलामध्यें सुगंध त्याप्रमाणें देहबीज हेंच ज्याचें सार आहे, अशा स्वकर्मानें उत्पन्न केलेल्या कोशांत म्ह० त्या बीजापासून उत्पन्न झालेल्या देहांत कोशकार कृमीप्रमाणें तो जीव बद्ध होऊन रहातो. ज्याप्रमाणें ब्रह्मांडमंडपामध्यें चांदणें सर्वत्र पसरतें, त्याप्रमाणें हृदयांतील देहबीजामध्यें असलेलें ज्ञान नखशिखांत शरीरांत 'मी' या रूपानें पसरतें. बाष्प आकाशांत मेघरूपानें जसें अंतरिक्षाला व्यापून रहातें, त्याप्रमाणें ज्ञानरूप जल इंद्रिय द्वारें याच प्रनालिकेच्या द्वारा बाहेर पसरून त्रिभुवनाला व्यापतें. आत्म्याचें स्वरूपभूत ज्ञान जरी या समग्र देहामध्यें आंत व बाहेर असतें, तरी हृदयस्थ बीजामध्यें वासनांचा समुदाय रहातो. म्हणजे 'मी' अशा प्रकारचा विशेष अभिमान् हृदयांतच अनुभविला जातो. केवल संकल्प हेंच जीवाचें स्वरूप आहे. त्यामुळें जीव ज्या संकल्पानें दृढ होतो, तसाच तत्काल हृदयामध्यें बनून बाहेरचा व्यवहार करूं लागतो. म्हणूनच चित्त ब्रह्मामध्यें स्थिर झाल्यावांचून दुसऱ्या कोणत्याहि उपायानें अहंभाव शांत होत नाहीं. म्हणून हे रामा! मनन, निदिध्यासन, इत्यादि उपायानें ब्रह्माला जाणावें. अहंकाराचा समूळ नाश होण्यासाठीं योगाभ्यासाच्या भूमिकांचा उत्तरोत्तर जय करीत निर्विकल्प समाधींत स्थिर व्हावें, आणि त्या शेवटच्या भूमिकेंत आकाशाकार ब्रह्माचा अनुभव घ्यावा. रामा, साधकाला याच क्रमानें ब्रह्मस्थिति संपादन करावी लागते. पण जे तत्वज्ञ असतात, त्यांना असा अभ्यास करावा लागत नाहीं. कारण ते कळसूत्री बाहुलीप्रमाणें स्वतःच्या संकल्पावांचूनच प्रारब्धप्राप्त व्यवहार करितात. जो कधीं कशाचीहि चिंता वहात नाहीं, त्याला मुक्त असें म्हणतात. तो जीवंत असतानांहि आकाशासारखा निर्मल असतो, त्यामुळें शृंखलादि बंधनांपासून मुक्त झालेला पुरुष ज्याप्रमाणें स्वैर व्यवहार करूं शकतो, त्याप्रमाणें हा मुक्त पुरुष सर्व कर्मबंधनांपासून सुटून स्वतंत्र होतो. ब्रह्मांडांत सूर्याची प्रभा जशी पसरते, त्याप्रमाणें हृदयस्थ बीजामध्यें असलेली संविद् 'अहं' या रूपानें सर्व शरीरांत नखशिखांत पसरते. ही संविद् नेत्रामध्यें दृक्, जिव्हेंत रसना, कानांत श्रोत्र, इत्यादि प्रकारें पंचज्ञानेंद्रियरूप बनते, आणि त्यांतच निमग्न होते. ज्याप्रमाणें वसंतऋतूंत भूमिमध्यें सर्वत्र असलेला रस अंकुरत्वानें प्रकट होतो, त्याप्रमाणें चिद्भाव एका अंशानें मनोरूप होऊन इंद्रियरूपानें प्रकट होतो. जो प्रत्यक्ष दिसणाऱ्या या मन, अहंकार, देह इत्यादि पदार्थांमध्यें असद्भावना करीत नाहीं, म्हणजे हे सर्व पदार्थ मिथ्या आहेत अशी कल्पना करीत नाहीं, त्याच्या हातून वैराग्यपूर्वक मोक्षसाधनांचें अनुष्ठान घडत नाहीं. त्यामुळें त्याचें जन्मादि अनंत दुःख शांत होत नाहीं. वेळीं जें कांहीं प्राप्त होईल त्यानें ज्ञानी, शरीराला

आच्छादित करितो; जें मिळेल त्यावर क्षुधेची शांति करितो व प्रसंगीं जें प्राप्त होईल त्यावर शयन करतो. आणि असा पुरुष खरोखरच एखाद्या सम्राटाप्रमाणें शोभतो. ज्ञानी ब्रम्हाकार वासनांनीं जरी युक्त असला तरी जगद्वासनांनीं युक्त नसतो, ह्मणून तो वस्तुत: वासनारहित होय. त्याच्या मनांत जगांतील कोणत्याहि पदार्थाविषयीं संकल्प नसतो. त्यामुळें वस्तुत: तो जरी अंत:शून्य असला तरी आकाश ज्याप्रमाणें वायूनें परिपूर्ण असतें, त्याप्रमाणें त्याचें हृदयाकाश पूर्णब्रह्मानें परिपूर्ण असल्यामुळें तो अशून्य-आत्मा असतो. योगाच्या सातव्या भूमिकेमध्यें स्थित असलेला ज्ञानी कोणत्याहि अवस्थेंत जरी असला तरी तो मोठ्या प्रयत्नानेंहि जागा केला जात नाहीं. ह्मणजे तो आसन, शयन, यान, यांपैकीं कोठेंहि जरी असला, तरी त्याचें मन सर्व प्रकारचें मनन सोडून शांत झालेलें असल्यामुळें तो निजलेल्या मनुष्याप्रमाणें देहभान विसरतो.' त्यामुळें त्याला पुष्कळ प्रयत्नानेंहि देहभानावर आणतां येत नाहीं. हा पुरुष केवळ चिन्मात्र आहे. तो सर्व शरीराला व्यापून रहातो. सर्व जगालाहि तो व्यापतो, तथापि कमलामध्यें—कमलाच्या केसरामध्येंच जसा त्याचा वास विशेषेंकरून प्रतीत होतो, त्याप्रमाणें शरीराच्या बीजांत तो विशेषेंकरून प्रकट होतो. प्राणी चिन्मात्र आहे व जगत् हा त्या चैतन्याचाच विस्तार आहे, असें ज्ञानी समजतात. सर्व उपदेशाचें तात्पर्य यांतच आहे. आत्मनिष्ठ होऊन जगाला विसरणें, हीच परा निष्ठा आहे. यास्तव हे रामा, सर्व वैभवाविषयीं तूं विरक्त हो. आपल्या हृदयाला पाषाणासारखें दृढ कर ह्मणजे तुझा खरा उत्कर्ष होईल. हे साधो, तुझें हृदयाकाश पूर्ण परब्रम्हानें परिपूर्ण होवो. ज्ञानी व अज्ञानी यांच्यामध्यें जर कांहीं विशेष असेल तर तो हाच कीं, अज्ञ शुभाशुभ कर्मामध्यें आसक्त असतो, व ज्ञानी नसतो. आत्मसत्ता विकास पावली कीं, तीच जगत् बनते. पण ज्याला परमतत्त्व कळलें आहे, त्याला जगतच ज्ञानरूप दिसतें. आपल्याला जें जें कांहीं दिसतें, तें तें सर्व विनाश पावतें. विनाश पावलेली प्रत्येक वस्तु पुन: उत्पन्न होते आणि जें कधीं नष्ट होत नाहीं व उत्पन्नहि होत नाहीं, तेंच सत् होय. तेंच तूं आहेस. ही जगद्भ्रांति निर्मूल आहे. तिचा तूं कितीहि विचार केलास, तरी तिचें योग्य कारण तुला कधींहि सांपडणार नाहीं. मृगजलापासून खऱ्या जलाचा लाभ जसा कधींहि होत नाहीं, त्याप्रमाणें संसाराचें खरें मूळ तुला कळणार नाहीं. जसें भाजलेलें बीज अंकुर उत्पन्न करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें आत्मदर्शनानें आच्छादित झालेली अहं ही भावना, पुढचा जन्म हेंच आपलें कार्य करूं शकत नाहीं. विद्वान् पुरुष ज्ञानोत्तर कर्म करीत असला, किंवा त्यानें तें सोडलें तरी तो नेहमीं स्वरूपांतच स्थित असतो. कारण तो विरक्त, निष्काम, मननशून्य व नित्य शांत असतो. चित्ताची शांति झाली असतां सर्व भोगवासना पूर्णपणें शांत होतात, त्यांचा समूळ नाश होतो. कारण चित्त हीच त्यांची खाण आहे. चित्त, देह, इत्यादि रूपानें साकार होणें, हाच जीवभाव आहे; त्यामुळेंच सर्व संताप होतो. अर्थात् जेव्हां चित्त, देह, इत्यादि उपाधींना सोडून जीव केवळ चित्प्रकाशरूप बनतो, तेव्हां तो साक्षात् परमात्माच होतो. ह्मणजे ज्याप्रमाणें अपराण्हसमयीं सर्याचा ताप जरी अधिक भासला व त्यामुळें मकाळच्या उन्हाहून त्या वेळचें ऊन्ह निराळें आहे असें वाटलें, तरी सूर्यप्रकाश या दृष्टीनें त्याच्याकडे जो पहातो, त्याला मुळींच भेद

दिसत नाहीं, त्याच न्यायानें उपाधिदृष्टया भासणारे जीवभेद निरुपाधिक अवस्थेत अनुभवाला येत नाहींत. पुरुष जमिनीवर उभा राहून आकाशांतील चंद्राकडे पहातो, त्या वेळीं त्याच्या हृदयापासून चंद्रापर्यंत एक प्रकारची वृत्ति, म्हणजे ज्ञानाचा प्रवाह सुरू असतो. अर्थात् चंद्राला पहाणाऱ्या मनुष्याच्या नेत्रापासून चंद्रमंडलापर्यंत मध्यें असलेलें जें निर्विषय ज्ञान तेंच परमात्म्याचें रूप होय. चिदाकाशाचा मायिक चमत्कार हेंच जगत् आहे. यास्तव हे रामा, जगाचें तत्त्व जाणणाऱ्या पुरुषाला सर्व प्रकारच्या भ्रमानें रहित व अक्षय असें एक परमार्थतत्त्वच भासतें. परंतु तें अतत्त्वज्ञाला जगत् या रूपानेंच दिसतें. परमात्मा त्याचा नियामक आहे असें त्याला वाटतें, व विषयप्रीति हेंच त्यांतील सार आहे, अशी त्याची भावना असते; आणि ब्रम्हाकाशांत तें खरोखरच आहे अशी त्याची समजूत असते.२२

---

## सर्ग २३ वा.

१ एका रुक्ष अरण्यांत मंकीचा वसिष्ठाशीं समागम. २ वैराग्यानें तत्त्वजिज्ञासु बनलेल्या त्याला वसिष्ठाचा उपदेश.

**श्रीवसिष्ठः**—रामा, तूं आपली वैराग्याविषयींची वासना वाढवून विषयवासनेचा नाश कर, आणि या स्वाभाविक अज्ञानादिरूप संसारापासून तत्त्वबोधानें स्वतःचा उद्धार करून घेऊन शांत आत्मस्वरूपाला मंकीप्रमाणें प्राप्त हो. पूर्वीं मंकी नांवाचा एक ब्राम्हण होता, त्यानें उग्र व्रतें आचरिलीं होतीं, त्यामुळें ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे, अशा त्याला माझ्या उपदेशामुळें मोक्ष कसा प्राप्त झाला तें तूं ऐक. मी एकदा आकाशांतून पृथ्वीवर आलों. तुझ्या पितामहानें यज्ञादि कांहीं निमित्तानें बोलाविलें होतें, म्हणून सप्तर्षिलोकांतून भूलोकीं आल्यावर अयोध्येकडे जात असतांना मी एका मोठ्या अरण्यांत शिरलों. तें अरण्य इतकें रुक्ष होतें कीं, तेथील भूमि सूर्यकिरणांनीं अतिशय तप्त झाली होती. तेथील धूळ व तापलेली वाळू यांवर पाय टेकवत नसे. तें अरण्य इतकें अफाट होतें कीं, त्याचा अंत लागत नव्हता. कोठें कोठें एखादा कुग्राम दिसत होता व एखाद्या ठिकाणीं शांत व सुशोभित प्रदेश आढळत होता. त्यांत धूळ उडत नव्हती, वाऱ्यापासून त्रास होत नव्हता, व सूर्याच्या प्रखर तापामुळें मृगजलाचाहि भास होत नव्हता. जशी निर्मल ब्रम्हसत्ता सर्वत्र पसरलेली असते, त्याप्रमाणें तें अरण्यहि सर्वत्र अफाट पसरलें होतें. ब्रह्मप्राप्तीसाठीं साधकाला जसा भगीरथ प्रयत्न करावा लागतो, त्याप्रमाणें त्या दुर्गम अरण्यांतून पार पडण्यासाठीं प्रवास करणारांना मोठा प्रयत्न करावा लागत असे. संसारी जीव अविवेकाला जसा प्राप्त होतो, त्याचप्रमाणें त्यांतील प्रवाश्यांना मृगजलाचा वारंवार भ्रम होऊन त्या शून्य प्रदेशांत त्यांची दिशाभूल होत असे. रामा, अशा त्या भयंकर अरण्यांतून मी संचार करीत असतांना माझ्यापुढें कोणीएक प्रवासी श्रांत होऊन आपल्याशींच कांहीं बोलत आहे असें मला दिसलें.

पान्थः—"ज्याप्रमाणें दुर्जनाचा समागम अतिशय संताप देतो, त्याप्रमाणें हा तप्त झालेला सूर्यहि मला अतिशय ताप देत आहे. त्यामुळें माझीं मर्मस्थानें व्याकुळ होत आहेत. किरणांतून तो जणुं काय अग्नीचा वर्षाव करीत आहे. झाडांचीं पानेंहि कोमेजून गेलीं आहेत. त्यामुळें ही वनराजि जणुं काय जळतच आहे, असें वाटतें. यास्तव मी आतां या समोर दिसणाऱ्या ग्रामांत प्रवेश करितों. तेथें कांहीं काळ

विश्रांति घेऊन नंतर त्वरेनें पुढील मार्ग आक्रमीन." असा विचार करून तो समोर दिसणाऱ्या किराताच्या गावांत प्रवेश करण्याची जों इच्छा करीत आहे, तों मीं त्याला म्हटलें, "हे मित्रा, तुझें स्वागत असो. हे सुकुमारा, निष्कांचन लोकांना संचार करण्यास योग्य, व जेथें आतिथ्य करणारे जन पुष्कळ आहेत असा मार्ग तुला माहित नाहीं, म्हणूनच तूं असल्या रुक्ष व दुर्गम अरण्यांतून संचार करीत आहेस. परंतु बाबारे, या गांवांत तुला खरी विश्रांति मिळणार नाहीं. तेथें तूं पुष्कळ वेळ जरी राहिलास तरी तुला जी विश्रांति मिळेल, ती पुनः केव्हां तरी खचित क्षय पावेल. कारण मनुष्यलोकामध्यें कर्मानुष्ठान करून दक्षिणमार्गानें जीव पितृलोकीं जातो व उपासना करून उत्तरमार्गानें देवादि लोकीं जातो. तेथें कांहीं काल सुखहि भोगतो. पण, कर्म व उपासना या साधनांनीं तो जन्ममरणपरंपरेंतून मुक्त होत नाहीं. त्यामुळें त्याला नित्य विश्रांति मिळत नाहीं. हे मित्रा, तूं ज्या गांवांत जात आहेस, तेथें पामरजन रहातात. त्यामुळें त्यांच्या भाषणादिकांपासून तुला समाधान तर वाटणार नाहींच पण उलट क्षोभ मात्र होईल. खारट पाणी प्याल्यानें तृषा शांत न होतां अधिकच वाढते. त्याप्रमाणें पामरांच्या संगतीनें तुझें दुःख कमी न होतां अधिकच वाढेल. हे नेहमीं केवल ग्रामाचाच आश्रय करून रहाणारे भिल्ल, आमच्यासारख्या लोकांच्या संगतीला भीत असतात. ते हरिणाप्रमाणें नेहमीं उन्मार्गानें जात असतात. ते कधींहि विचार करीत नाहींत. विषयांचा भोग घेऊन त्यांतच अधिक आसक्त होतात. त्यांना दुराचरणाची मुळींच भीति वाटत नाहीं. ते पाषाणाच्या मूर्तीसारखे स्तब्ध असतात. काम, अर्थ, राग व द्वेष यांतच त्यांचा सर्व पराक्रम असतो. त्यांची बुद्धि अविचारानें दग्ध झालेली असते, म्हणून ते आपातरमणीय[1] कर्मामध्यें रममाण होतात. मेघपंक्ति जशी मरुभूमीवर, तशी शुद्ध कुलामध्यें उत्पन्न झालेल्या लोकांची उदार, शीतल व रसिक प्रज्ञा या लोकांवर विश्वास ठेवीत नाहीं. मित्रा, अंधकारानें भरलेल्या गुहेंत सर्प होऊन पडणेंहि बरें; एखाद्या मोठ्या शिळेच्या सांधींत किडा होऊन राहणें बरें; निर्जन प्रदेशांत पंगु मृग होणेंहि बरें; पण ग्राम्य जनांचा समागम बरा नाहीं. कारण ते शर्करावगुंठित विषकणासारखे असतात. विषकण तोंडांत टाकते वेळीं गोड लागतात, पण परिणामीं जीव घेतात. तसेंच ग्राम्य जनहि आरंभीं मोठा स्नेह दाखवितात, थोड्याच वेळांत विरक्त होतात, व शेवटीं जीव घेण्यास तयार होतात. ते अधार्मिक जन झंझावाताप्रमाणें धूळ उधळीत, वृक्षांचें उन्मूलन करीत व गवत, वाळलेलीं पानें इत्यादिकांना उडवीत जगांत क्षोभ उत्पन्न करीत असतात." रामा, याप्रमाणें मी बोललों असतां अमृतजलानें स्नान केल्याप्रमाणें, अत्यंत शांत होऊन तो पुनः बोलला, "हे भगवन्, तूं कोण आहेस? तुझ्या चर्येवरून तूं आपल्या अंतःकरणामध्यें अतिशय संतुष्ट आहेस असें दिसतें. तूं कोणी आत्मज्ञ महात्मा तर नाहींस? कारण, एखादा वाटसरू ज्या गांवांतून जात असतो त्या गांवांतील लोकांच्या व्यवहाराकडे तो उदासीन वृत्तीनें जसा पाहतो, त्याप्रमाणें तूं या सर्व लोकव्यवहाराला मनांत यत्किंचितहि क्षुब्ध न होतां पहातोस. तूं अमृतप्राशन केलें आहेस कीं काय? किंवा तूं कोणी मोठा सम्राट आहेस? कारण तुझ्यापाशीं कांहीं नाहीं, तूं निष्कांचन दिसतोस, तथापि पूर्ण चंद्राप्रमाणें भासतोस. तूं सांसारिक दुःखांनीं रहित आहेस.

१ विचार करीपर्यंतच रमणीय वाटणारें कर्म.

पण जीवन्मुक्ताच्या गुणांनीं परिपूर्ण आहेस. तुला देहादिकांचें भान नाहीं, त्यामुळें तूं मदानें मत्त झाल्यासारखा दिसतोस, पण परमार्थाविषयीं अतिशय दक्ष आहेस. वस्तुतः तूं कांहीं नाहींस, पण ज्ञानदृष्टीनें तूंच सर्व आहेस. व्यवहारांत जें जें कांहीं दिसतें त्याच्याशीं एका दृष्टीनें तुझा कांहीं संबंध नाहीं व दुसऱ्या दृष्टीनें संबंध आहेहि. तुझें रूप अति शांत, अत्यंत रमणीय, तेजस्वी, नित्यतृप्त, अत्यंत ऊर्जित व कोणत्याहि प्रतिकूल अवस्थेनें व्याकुळ न होणारें असें आहे. त्याचें कारण काय? तूं या वेळीं भूमीवर जरी स्थित आहेस तरी आकाशांत समस्त लोकांच्या वर असलेला भासतोस. तुला दुसऱ्या कशाविषयींहि आस्था नाहीं; पण माझ्यासारख्या दुःखी जीवांचा उद्धार करण्याविषयीं मोठी आस्था आहे, असें दिसतें. चंद्राहूनहि तुझें अमृतमय मन श्रेष्ठ आहे. कारण चंद्राचे किरण जगभर पसरतात. पण मन आत्मस्वरूपाला सोडून यत्किंचितूहि दूर जात नाहीं. तसेंच औषधि, वनस्पति, सोम, अन्न, इत्यादि रूपानें परिणत झालेलें चंद्राचें अमृत प्राण्यांच्या उपभोगाला योग्य होतें. त्यामुळें त्याचा क्षयहि होतो, पण तुझें अमृतमय मन कधींहि क्षीण होत नाहीं. तूं पूर्णचंद्राप्रमाणें कलांनीं युक्त आहेस, पण चंद्राप्रमाणें तुझ्यामध्यें कलंक मात्र नाहीं. चंद्राप्रमाणेंच तू शीतल आहेस, पण तसाच तेजस्वीहि आहेस म्हणजे, तपश्चर्येच्या योगानें तुझ्यामध्यें अपराधी लोकांचा निग्रह करण्यास समर्थ असें तेजहि दिसतें. तूं आनंदरसानें परिपूर्ण आहेस. तुझ्या इच्छेमध्यें हें सर्व संसारमंडळ स्थित आहे; व अंकुरामध्यें जसें फल असतें, त्याप्रमाणेंच तुझ्या चैतन्यामध्यें हें सद्रूपतत्त्व आहे, असें मला दिसतें. मुने, मी शांडिल्य कुलांत उत्पन्न झालेला एक ब्राह्मण आहें. मला मंकी म्हणतात. मीं तीर्थयात्रेच्या उद्देशानें पुष्कळ प्रवास केला, आणि अनेक तीर्थें पाहून आतां फार दिवसांनीं आपल्या घरीं परत चाललों आहें. पण माझें मन संसाराविषयीं विरक्त झाल्यामुळें घरीं जाण्याची मला उत्सुकता वाटत नाहीं. कारण या ब्रम्हांडांतील सर्व भूतें क्षणभंगुर आहेत, असें पाहून संसाराची मला आसक्ति राहिली नाहीं. यास्तव हे भगवन्, कृपा करून आपण कोण आहां, हें मला खरें सांगा. आपल्यासारख्या सत्पुरुषांचीं चित्तरूपी सरोवरें फार गंभीर व प्रसन्न असतात. केवल दर्शनानेंच मित्रत्व करणाऱ्या महात्म्यांच्या पुढें सर्व भूतें कमलाप्रमाणें विकास पावतात, व त्यांजवर विश्वास ठेवितात. माझें हें मन थोडेंसें विवेकी आहे. तथापि योग्य गुरूंनीं कृपा करून तत्त्वोपदेश केल्यावांचून तें सांसारिक दुःख टाळण्यास समर्थ होणार नाहीं.

श्रीवसिष्ठः—हे महाभागा, मी वसिष्ठ मुनि आहें. माझें निवासस्थान अंतरिक्षांत आहे. सूर्यवंशांतील 'अज' या नांवाच्या राजर्षीच्या कांहीं कार्यासाठीं मी या मार्गानें अयोध्येस चाललों आहें. हे सज्जना, तूं आतां खिन्न होऊं नकोस. कारण तूं आतां विद्वानांच्या मार्गांत प्रविष्ट झाला आहेस, त्यामुळें तूं बहुतेक संसारसागराच्या परतीरास पोंचलाच आहेस. कारण, वैराग्याचें वैभव, उदार बुद्धि, हीं अशा प्रकारची उक्ति व शांतरूप आकृति सामान्य मनुष्यांत संभवत नाहीं. त्यामुळें तूं महात्माच आहेस असें मी समजतों. जसा हिरा सहाणेवर चातुर्यानें घासला असतां चमकूं लागतो, त्याचप्रमाणें रागद्वेषादि दोषांनीं रहित झालेलें चित्त विवेकी संभवतें. साधो, तूं काय जाणूं इच्छितोस? तूं या संसाराचा त्याग कसा करणार? मला असें वाटतें कीं, जो पुरुष त्याला उपदेशिलेलें तत्त्व कर्मानें संपादन

करितो, तो उत्तम साधनांनीं संपन्न होतो. त्याची वासना रागादि—दोषरहित होते. त्याची मति नित्य-अनित्य, सार-असार, इत्यादिकांचा विवेक करण्यास समर्थ होते; आणि असा जो शिष्य असतो, तोच गुरूपदेशाच्या तेजानें आनंदरूप परमपदाला प्राप्त होण्यास समर्थ होतो. जो असा सुसंस्कृत नसतो, तो परमानंदास कधींहि प्राप्त होत नाहीं. तूं जन्ममरणादि सर्व दुःखांपासून मुक्त होण्याची इच्छा करीत आहेस, असें तुझ्या भाषणावरून स्पष्ट होतें म्हणजे तूं ज्ञानाचा उत्तम अधिकारी आहेस, याविषयीं मला मुळींच शंका नाहीं. म्हणून मी तुला ज्ञान सांगतों. २३.

## सर्ग २४ वा.

१ मंकी देह, इंद्रियें, मन, बुद्धि, यांच्या दोषांचें सविस्तर वर्णन करून आपल्या संसार-दुःखाचें निवेदन करितो.

श्रीवसिष्ठः—रामा, मीं असें सांगितलें असतां, मंकी माझ्या पायांवर मस्तक ठेवून मोठ्या संतोषानें मला म्हणालाः—

मंकीः—हे भगवन्, मी दहाहि दिशा फिरलों. जशी प्राण्यांची दृष्टि कांहीं तरी चांगली वस्तु पहाण्यासाठीं सभोंवार संचार करिते, त्याप्रमाणें एखाद्या श्रेष्ठ साधूची गांठ पडावी, यासाठीं मी सर्वत्र हिंडलों, पण माझे संशय घालवून मला कृतार्थ करील, असा एकही सत्पुरुष मला आढळला नाहीं. पण आज तुझें दर्शन झाल्यानें माझ्या या ब्राह्मणदेहाचें सार्थक झालें, असें मी समजतों. कारण—देव, असुर, तिर्यक् प्राणी इत्यादिकांच्या देहांमध्यें ब्राह्मणदेहच श्रेष्ठ आहे, आणि त्यांतहि ज्ञानाधिकारी ब्राह्मणदेह सर्वांत श्रेष्ठ आहे. तसा देह मला प्राप्त झाल्यामुळें व दैववशात् आज तुझें दर्शन घडल्यामुळें मला या जन्माचें फल मिळालें, असें मी समजतों. भगवन्, या संसारांतील अनेक दोष व विविध दशा यांचा अनुभव घेतां घेतां मी त्रासलों आहें. पुनः पुनः जन्म, पुनः पुनः मरण, सुखामागून दुःख व दुःखामागून सुख, असा हा क्रम सारखा चालला आहे. संसारांत कांहीं थोडेंसें सुखहि अनुभवाला येतें. पण त्याचाहि परिणाम दुःखांतच होत असल्यामुळें सर्व सुखेंहि दुःसह दुःखेंच आहेत. असें मी समजतों. हे मुने, त्या सुखांपेक्षां दुःखें पतकरलीं. कारण आपण या जगांत अत्यंत दुःखी प्राणी पहातों. जसे जलचर! त्या बिचाऱ्यांना एक क्षणभर विश्रांति घेण्यास योग्य असें स्थानहि मिळत नाहीं. ते पाण्यांतच विश्रांति घेतात व त्याचें त्यांना दुःखहि वाटत नाहीं. कारण भूमीवर विश्रांति घेण्यांत काय सुख आहे, याची त्यांना कल्पनाच नसते. त्यामुळें आमच्या दृष्टीनें त्यांचें दुःख तें त्यांच्या दृष्टीनें त्यांना सुखच वाटतें, म्हणून एकसारखें दुःखपरंपरेंत रहाणें फारसें वाईट नाहीं. पण, ज्या दुःखाच्या परंपरेचा क्षणिक सुखानें वारंवार विच्छेद होतो, तीं सुखेंहि मला दुःखेंच भासतात. कारण त्यापुढें दुःखाची तीव्रता अधिक भासते. म्हणून या संसारांतील सुखेंहि मला दुःखच देतात. तीं मला इतकें दुःखी करितात कीं, त्यांच्यापुढें मला संसारांतील दुःखेंहि प्रिय वाटतात. दांत, केश व त्वचा, यांसह माझें वय आतां जर्जर झालें आहे. पण तत्त्वज्ञानाच्या उपयोगीं न पडतां वृथा जीर्ण झालेलें हें सर्व शरीर अनर्थपरंपरेचें कारण मात्र होऊन राहिलें आहे भोगांच्या उत्कर्षाचाच एकसारखा अभिलाष धरणारी माझी बुद्धि परमपुरुषार्थाच्या साधनाचा निश्चय करीत नाहीं.

मन क्षणोक्षणीं वाढणाऱ्या आसक्तीनें विकास पावलें आहे. तें गत गोष्टींचें स्मरण करून व पुढील गोष्टींचा संकल्प करून दुःखी व मूढ होत आहे. त्यामुळें त्याला आत्म्याची भावनाच होत नाहीं. ज्या मनाला सुसंस्कार झालेले नसतात, त्याची स्थिति एखाद्या कुग्रामाच्या स्थितीप्रमाणें अतिशय हीन असते. ज्याप्रमाणें कुग्रामांत अनेक वृक्षांच्या पाचोळ्याचा ठिकठिकाणीं ढीग झालेला असतो, व हिंस्र पशुपक्षी स्वैर संचार करीत असतात, त्याप्रमाणें संस्कारहीन मनामध्यें निरनिराळ्या विषयवासनांचे ढीग झालेले असतात, व कामादि विकारांचा स्वैर संचार चाललेला असतो. कंटकवृक्षांच्या शाखेप्रमाणें बुद्धि क्रूर व कुटिल झालेली असते. अनेक प्रकारचे आयास देणाऱ्या चिंतेमुळें आयुष्य वृथा क्षीण होतें. तृष्णा एखाद्या शुष्क लतेप्रमाणें केव्हांही फलद्रूप होत नाहीं. त्यामुळें वस्तुतः ती नष्टच झालेली असते, परंतु सर्वथा नष्ट होत नाहीं; तर पुनः पुनः उत्पन्न होतेच. ती मनुष्याला विवेकरसाचा स्वाद घेऊं देत नाहीं. हे भगवन्, कर्मांच्या योगानेंच आपला उद्धार करून घ्यावा, तर तसेंहि शक्य नाहीं. कारण, आपण जें कांहीं नित्य किंवा नैमित्तिक कर्म करावें, तें प्राक्तन पापाच्या समुद्रांत कोठें गडप होऊन जातें, तें कळत नाहीं. कारण, भोगाविषयींची वासना मनुष्याला काम्य व निषिद्ध कर्मामध्यें त्याची इच्छा नसली तरी प्रवृत्त करते. हे भगवन्, पुत्र, स्त्री, बांधव इत्यादिकांच्या आसक्तीनेंच माझें जीवित क्षीण झालें, भवसागरही तरून गेलों नाहीं. भयंकर भोगाशा प्रतिदिनीं वाढत चालली आहे. धनामुळें मोठमोठ्या आपत्ति ओढवल्या. परिवाराविषयींच्या अनेक चिंतांनीं व्याकुळ केलें. संपन्न व सर्व परिवारानें युक्त असलेल्या मनुष्याला लक्ष्मी केव्हां फसवितें, हें कळत नाहीं. माझें चित्त, शुष्क सागराप्रमाणें अतिशय शून्य झालें आहे. त्यांत नानाप्रकारच्या इच्छा उद्भवतात, संकल्पकल्लोळहि उठतात. तथापि त्याला इष्ट वस्तूची प्राप्ति होत नाहीं. तें आशेनें धांवत असतें, पण त्याला कसलाहि लाभ होत नाहीं. त्याची कधीं तृप्तिच होत नाहीं. एखाद्या अमंगळ जागीं उगवलेल्या कंटकवृक्षाप्रमाणें केवळ विषयपरायण झालेल्या मला विवेकी जन स्पर्शीहि करीत नाहींत. मन एखाद्या उन्मत्ताप्रमाणें वृथाच वाटेल तेथें भटकत फिरतें, मोठमोठे संकल्प करितें. मी आतां जवळ जवळ मृतच झालों आहें, तथापि तें थकलें नाहीं. त्याचे संकल्प व विकल्प अधिकाधिकच चालले आहेत. पण त्याला इष्ट अर्थ प्रायः कधींच मिळत नाहीं. त्यामुळें तें मला दुःख मात्र देतें. माझी अज्ञानरूपी रात्र अद्यापि क्षीण झालेली नाहीं, त्यामुळें अहंभावरूप यक्षहि अद्यापि नाहींसा होत नाहीं. तो विद्यमान असल्यामुळें शास्त्र, सज्जन यांचा संपर्क माझ्या मनावर कांहीं परिणाम करूं शकत नाहीं, अहंभावामुळें शास्त्र व सज्जन यांच्या उपदेशाप्रमाणें मला मनाचा निग्रह करितां येत नाहीं. हे मुने, अज्ञानांधकाररूप मत्त गजाला मारणारा सिंह, कर्मरूप तृणाला जाळून टाकणारा अग्नि, वासनारूप रजनीचा नाश करणारा विवेकरूप सूर्य, माझ्या चित्तांत अद्यापि उदय पावला नाहीं. मला मिथ्या पदार्थ सत्य असल्यासारखे भासतात. चित्तरूपी मत्त हत्ती मला व्याकुळ करीत आहे. इंद्रियें माझ्या मर्मच्छेद करीत आहेत. संसारांतून तरून जाण्यासाठीं ज्ञानी लोक जिचा आश्रय करितात ती शास्त्रदृष्टिही मीं संपादन केली नाहीं. त्यामुळें मला स्वभावतःच प्राप्त झालेली दृष्टिही वासनारूप तिमिर वाढविण्यास कारण झाली आहे. यास्तव अशा या भयंकर

अविवेकाच्या प्रसंगीं मीं काय करावें म्हणजे माझें अत्यंत हित होईल ? मी संसारदुःखांतून कसा सुटेन तें मला सांग. कारण 'सत्पुरुषांची संगति लाधली म्हणजे सर्व अविवेक नाहींसा होतो व सर्व आशा क्षीण होतात, शरदृतूंतील आकाशाप्रमाणें अंतःकरण निर्मल होतें.' अशी जी सत्पुरुषाची वाणी मीं ऐकिली आहे, ती आज संसाराचा उपशम करणाऱ्या तुझ्या बोधानें खरी ठरो. २४.

---

## सर्ग २५ वा.

—:०:—

१ अविद्येपासून उत्पन्न झालेलीं बंधाचीं चार बीजें. २ परमात्मविद्येनें त्यांचा नाश.

श्रीवसिष्ठः—संवेदना, भावना, वासना, आणि कलना, असा हा चार प्रकारचा कारण-समुदाय अविद्येपासून उत्पन्न होतो. या संसारांतील सर्व अनर्थांचें तेंच बीज आहे. इंद्रियांनीं विषयांचा उपभोग घेणें हेंच संवेदन; विषय दूर झाला असतां त्याच्या गुणांचें अनुसंधान करून त्याचें चिंतन करणें ही भावना; चित्तांत त्याचाच दृढ संस्कार होणें ही वासना; व त्या वासनेमुळें मरणकालींहि त्या विषयाचें स्मरण होणें ही कलना, विषय मिथ्या असल्यामुळें त्या विषयाचीं हीं संवेदनादिक अनर्थबीजें देखील मिथ्या आहेत. त्यांतील संवेदना व भावना हीं सर्व दोषांचीं मुख्य कारणें आहेत. त्यांतल्या त्यांत संवेदनेपेक्षां भावना हा महान् अनर्थ आहे. वसंतऋतूमध्यें फल-पुष्पादिकांनीं समृद्ध झालेल्या लता त्यांतील रसाच्या योगानेंच जशा वृद्धि पावतात, तशाच सर्व आपत्ति भावनेमुळें उद्भवतात. या दुर्गम संसारांत वासनेमुळेंच प्रवृत्त होणारे सर्व लोक उत्तरोत्तर अधिक अनर्थांत पडतात. वसंतऋतु संपून ग्रीष्म ऋतु लागला असतां पृथ्वींतील रस हळूहळू जसा क्षय पावतो, त्याप्रमाणें विवेकी पुरुषाचा सर्व संसार वासनेसह क्षीण होतो.

विषयवासना क्षीण होण्यासाठीं विषयांतील दोषांचें चिंतन व ब्रह्माची भावना दृढ करावी. या संसाररूपी कंटक-वृक्षाला वाढविणारी ही विषयवासनाच आहे. वसंत ऋतूतील रस ज्याप्रमाणें वनशोभेला वाढवितो, त्याप्रमाणें विषयवासना संसाराचें रमणीयत्व वाढविते. जीवचैतन्यांत वासनारस संसारांधकाररूपानें परिणत होतो. ज्याप्रमाणें मधुमासांतील रस पृथ्वीवर वनरूपानें स्थित असतो, तसाच वासनारस संसाररूपानें परिणत होतो. पण तेथें शुद्ध व निराकार चिन्मात्राहून निराळें दुसरें कांहीं नसतें. आकाशाचें अवकाश हेंच रूप असल्यामुळें जसें त्यांत शून्यत्वाहून आणखी कांहीं भासत नाहीं, त्याचप्रमाणें या सृष्टींत सत्ता व स्फूर्ति यांवांचून दुसरें कांहीं भासत नाहीं; आणि सत्ता व स्फूर्ति हें चिन्मात्राचेंच स्वरूप आहे. याप्रमाणें सर्वत्र सर्वदा प्रतीत होणारा चिन्मात्ररूप आत्मा देह, इंद्रियें इत्यादिकांहून भिन्न नाहीं, तर तो देहादिरूपच आहे, अशी जी दृढ मति तीच अविद्या, तोच भ्रम, व तोच हा सर्व संसार आहे. केवल अविवेकामुळें सिद्ध झालेला हा संसार नुसत्या विवेकानेंच नाश पावतो. अज्ञ मनुष्यानें कल्पिलेल्या वेताळाप्रमाणें केवल कल्पनेनें भासणारा हा संसार मिथ्या आहे. म्हणूनच विवेकानें तो एका क्षणांत नाहींसा होतो. पृथ्वीवरील सर्व नद्यांचे ओघ समुद्राला जसे मिळतात, त्याप्रमाणें सर्व दृश्यांचें ज्ञान, दृश्याचा बाध झाला असतां केवल ज्ञानरूप होतें. नद्या आपलें नांव—रूप वगैरे सोडून जशा समुद्ररूप होतात, त्याचप्रमाणें सर्व विषयज्ञानें विषयांचा बाध झाला असतां एक—आत्मरूप बनतात. असें

मृण्मय पात्र मृत्तिकेवांचून केव्हांही उपलब्ध होत नाहीं, तर ज्या ज्या वेळीं तें दिसतें त्या त्या वेळीं तें मृत्तिकेसहवर्तमानच दिसतें; तसेंच चैतन्यावांचून कोणतेंहि दृश्य उपलब्ध होत नाहीं. कारण प्रत्येक दृश्य चिन्मयच असतें. ज्ञानानेंच ज्ञात होणारी जी वस्तु ती ज्ञानरूपच होय. कारण कोणताहि विषय ज्ञानावांचून केव्हांच प्रतीत होत नाहीं. त्यामुळें कोणतेंहि दृश्य त्याच्या ज्ञानाहून निराळें नाहीं. द्रष्टा, दर्शन, दृश्य, या प्रत्येकांत बोधरूपत्व हेंच सार आहे. त्यामुळें कोणतेंहि दृश्य ज्ञानाहून भिन्न नाहीं. सजातीय वस्तु सजातीय वस्तूशीं एकरूपच होते. तेजोरूप नेत्र तेजालाच म्ह० पदार्थांच्या रूपालाच पाहतात. त्यामुळें दृश्य व दर्शन म्ह० पहाण्याचें साधन यांचें एकत्व निश्चित होतें. याचा अनुभवहि त्यामुळेंच येतो. काष्ठ, पाषाण, इत्यादि पदार्थांना बोधरूपत्व जर नसेल तर त्यांचें अस्तित्व केव्हांहि प्रतीत होणार नाहीं. ज्याप्रमाणें मनुष्यांना शिंग कधींहि दिसत नाहीं, त्याचप्रमाणें ज्ञानावांचून हे पदार्थ कधींहि दिसत नाहींत. ही सर्व दृश्यश्री केवळ बोधरूप असल्यामुळें वस्तुतः बोधाहून अगदीं विलक्षण असली तरी बोधरूप होऊन बोधानेंच जाणली जाते. जसा वायु केवल स्पंदमात्र, किंवा समुद्र केवळ जलमात्र, तसें जगांतील हें सर्व दृश्य केवल बोधमात्र आहे. एकमेकांशीं जोडलेले काष्ठादि पदार्थ अविवेकावस्थेंत मिश्ररूपानें जरी दिसले तरी विवेकावस्थेंत ते केवल ज्ञानरूपच दिसतात. त्या वेळीं त्यांचा मिश्रपणा अनुभवाला येत नसून ऐक्य अनुभवाला येतें. दूध व पाणी एकमेकांत मिसळल्यानें तीं एकरूप दिसतात, त्याचप्रमाणें दृक् व दृश्य यांनाहि एकरूपत्व आहे. कारण तीं दोन्ही ज्ञानरूपच आहेत. ह्मणूनच दृश्याचा अनुभव येतो. देहाला ‘ अहं ’ असें म्हटल्यानें देहबंध उत्पन्न होतो व देह मी नव्हे, अशी भावना दृढ केल्यानें जीव बंधनांतून मुक्त होतो. तेव्हां बंध काय तो जर एवढाच आहे तर तो आपल्या स्वाधीनें आहे. त्याला घालविण्यास उशीर कितीसा? त्यांत अशक्य तरी काय आहे!

तिमिररोग्याला आकाशांत दोन चंद्र दिसूं लागतात. तृषार्ताला मरुभूमीवर मृगजल दिसूं लागतें. त्याप्रमाणें अविद्वानाला ‘ अहं ’ हा मिथ्याभ्रम होतो. हें माझें ही भावना बंधाला कारण होते व शरीरादिक मी नव्हे, ही भावना मुक्तीला कारण होते. याप्रमाणें बंध व मोक्ष जर आपल्या स्वाधीन आहेत, व आत्मज्ञान जर इतकें सुलभ आहे, तर बंधाचा व अज्ञतेचा अनुभव जीव कां घेतात? भांडें व बोरें किंवा घट व आकाश यांचा न्यायहि या अहंकाराला लागू होत नाहीं. कारण भांडें व बोरें हीं दोन्हीं साकार आहेत. त्यामुळें त्यांचा संबंध होऊं शकतो आणि घट मूर्त व आकाश अमूर्त जरी असलें, तरी घटाच्या योगानें अमूर्त आकाशहि मर्यादित होतें. पण अहंकार व आत्मा हे दोन्ही अमूर्त आहेत, त्यामुळें त्यांचा परस्पर संबंध केवल भ्रमावांचून दुसऱ्या कशानें संभवत नाहीं. आत्म्याच्या ठिकाणीं अहं ही भावना कांहीं कारणावांचून उत्पन्न झाली आहे. त्यामुळेंच ती सत्य नव्हे. अर्थात् नाहं किंवा सोहं अशा भावनेनें अहंकाराचा बाध झाला असतां आत्मस्थिति सहजसिद्ध आहे. पूर्वमीमांसक हे, जड व चैतन्य यांचें खरोखरीच ऐक्य आहे व तेंच आत्म्याचें रूप आहे असें समजतात. पण ती त्यांची समजूत चुकीची आहे. कारण आत्म्याला जड-चेतनरूप मानल्यास त्याचा जडांश नेहमीं जडच राहणार. मग त्या जडांशाचा अनुभव कसा येईल? ज्याचा अनुभवच येत नाहीं ती वस्तु आहे हें तरी कसें सिद्ध

होणार! त्याचप्रमाणें त्याचा चिदंश ज्ञानरूप जरी असला तरी त्याला प्रकाशित करण्याला योग्य असा विषयच रहात नाहीं. त्यामुळें आत्म्याच्या जडांशाला चेतनांशाचें भान होणार नाहीं व चेतनांशाला जडांशाचें भान होणार नाहीं. त्यामुळें परस्परांना न जाणणें हेंच आत्म्याचें ऐक्य होय. चेतन कधींहि जड होणें शक्य नाहीं व जड केव्हांहि चेतन होणें शक्य नाहीं. कारण प्रकृति ह्मणजे स्वभाव केव्हांहि बदलत नाहीं. किंवा जे केव्हांहि न बदलणारे धर्म त्यांनाच स्वभाव असें ह्मणतात. तूं अजड आत्मरूपालाच अंशतः जडरूपानें पहात आहेस, तें तुझें पहाणें अज्ञानामुळें आहे. त्यांत अजडाचें एकरूपत्व शक्यच नाहीं. त्यामुळें आत्मा जडबोधैक्यरूप आहे, हें तुझें ह्मणणें मिथ्या आहे. तर मग निरनिराळे वादी आत्म्याविषयीं परस्परविरुद्ध अनेक मतें कां प्रतिपादितात, ह्मणून विचारशील तर सांगतों. ते बहिर्दृष्टि असतात. त्यांचीं अंतःकरणें विचित्र वासनांनीं व अभिमानानें युक्त असतात. त्यामुळें ते तत्त्वाचें परीक्षण करूं लागले असतां पर्वतशिखरावरून घसरणाऱ्या दगडाप्रमाणें खालीं खालींच जातात. ह्मणूनच वैदिक दृष्टीला अंतरलेले ते विविध योनींत जन्म घेऊन नाना प्रकारचीं दुःखें भोगितात. त्यांच्या दुःखाचें वर्णन करवत नाहीं.

कारण वासनारूप वायूकडून ते गवताप्रमाणें इतस्ततः उडवले जातात. हे साधो, विषयरसानें अनुरक्त झालेले लोक तळहातानें आघात केलेल्या कंदुकाप्रमाणें निरनिराळ्या उच्च-नीच अवस्थांतून अतिशय भ्रमण करून नरकांत पडतात. नंतर तेथें दीर्घकाल क्लेश भोगून सर्व प्रकारें जर्जर झालेले ते कालांतरींहि स्थावर, कृमि, कीट इत्यादि योनींतच जन्म पावतात. त्या अनात्मज्ञांना पुनः मनुष्यजन्म मिळणें फार दुर्लभ होतें. २९.

# सर्ग २६ वा.

—:०:—

१ विषयासक्तियुक्त भावनेमुळें अनर्थ, २ विवेकजन्य तत्त्वदर्शनामुळें भावनाशांति व तिच्या योगानें अनर्थशांति.

**श्रीवासिष्ठ:**—पावसाळ्यांत हजारों किडे जसे पृथ्वीवर उत्पन्न होतात. त्याप्रमाणें स्थावरादिजन्मरूप संसारमार्गांत पडलेल्या जीवावर अनेक आपत्ति येऊन कोसळतात. क्षुधा, तृषा, जरा, भय, मरण इत्यादि अनेक संकटें त्याला भोगावीं लागतात. पण हे सर्व भाव एकमेकांहून अगदीं भिन्न असतात अरण्यांतील पाषाणाप्रमाणें त्यांचा परस्परसंबंध असतो. पण भावना त्यांना परस्पर गुंतविते. त्या भावनेचें मूळ विवेकाविषयीं अंध झालेलें, रागद्वेषादि विकारांनीं मलिन झालेलें, पूर्ववृत्तांताविषयींच्या वासनांनीं निबिड झालेलें चित्तच आहे. अरेरे! हीं भूतें वासनापरवश होऊन अनेक जन्मांमध्यें विचित्र सुखदुःखें अनुभवितात. अहो, ही वासना मोठी कठीण आहे. तिच्यामुळेंच वस्तुतः विद्यमान नसलेलेहि जन आपल्या चित्तांत त्या भ्रमाचा अनुभव घेतात. विवेकी जन व पूर्ण चंद्र यांमध्यें कांहीं अंतर नसतें. कारण चंद्राप्रमाणेंच ज्ञानीहि लोकांना आल्हाद देतो. मधुरवाणीच्या द्वारा अमृतस्राव करतो. तो शरीरानें व मनानें अत्यंत शुद्ध असतो. ज्ञानोपदेशानें लोकांना प्रकाश देतो व विरक्तीमुळें अत्यंत शीतल असतो. पूर्वापर विचार न करतां अप्राप्य वस्तूची इच्छा करणारा अमर्याद मूढ व बालक यांच्यांत अंतर कोणतें? प्राप्त झालेलें शुभ किंवा अशुभ आमिष प्राण जाईपर्यंत न सोडणारा मत्स्य व मूढ यांमध्यें फरक काय? देह, स्त्री, धन इत्यादि सर्व पदार्थ कोरड्या वाळूनें

बनविलेल्या पात्राप्रमाणें क्षणभंगुर असतात. हे साधो, आब्रह्मस्तंबपर्यंत ज्या शेंकडों योनि आहेत, त्यांत कल्पांतापर्यंत भ्रमण करणाऱ्या जीवाच्या चित्ताची शांति शमावांचून कधींहि होणें शक्य नाहीं. केवल विवेकानेंच बंधाचा लेशहि उरत नाहीं. मार्गानें जात असतां, पायाखालीं पाहून चालणाऱ्या मनुष्याला जसे कांटे, ठेंच वगैरे लागत नाहीं, त्याप्रमाणें तत्त्वज्ञाला बंधाची पीडा होत नाहीं. हे साधो, तुझें चित्त विवेक व अवधान यांनीं युक्त आहे. त्यामुळें तृष्णा त्याला व्याकुळ करूं शकणार नाहीं. कारण सावधान व जागरूक मनुष्याला पिशाच काय करणार? ज्याप्रमाणें रूपाचें आलोचन करणें हाच दृष्टीचा प्रसार आहे, म्हणजे दृष्टि स्वस्थानाला म्ह० नेत्राला सोडून जी बाहेर पसरते, ती रूप पाहण्यासाठींच होय. त्याचप्रमाणें अहंकार व सर्व जगत् हीं दोन्ही केवल संविद्चा प्रसार आहे. म्ह० तीं दोन्ही केवळ संविद्रूपच होतात. अर्थात् कामादि शत्रूंना जिंकणाऱ्या हे वीरा, डोळे मिटले म्ह० सर्व रूपांच्या प्रकाशाचा जसा उपशम होतो, त्याप्रमाणें ध्यानादि उपायांनीं विषयज्ञानाला स्वरूपज्ञानामध्यें स्थिर करणें हीच सर्व दृश्याची शांति होय. शुद्ध संविद्च आकाशांत किंचित् विकार पावून अहंकारासह सर्व जगत् बनते. वायु स्पंदन या रूपानें जसा विकार पावतो, तशी संविद् मिथ्या जगद्रूप बनते. माती किंवा सोनें यांमध्यें उत्पन्न झालेला घटाकार व कुंडलाकार जसा त्याहून पृथक्त्वानें प्राप्त होणें शक्य नाहीं, त्याचप्रमाणें हें जगत्‌हि चित्‌हून पृथक्त्वानें उपलब्ध होत नाहीं. म्हणून तें मिथ्या आहे. तें जर सत्य असतें तर निराळें उपलब्ध झालें असतें. आकाश जसें शून्यमात्र, वायु जसा स्पंदमात्र, तरंगादि जसें केवळ जलमात्र, त्याप्रमाणें हें जगत् केवल संविद्मात्र आहे.

हे सत्पुरुषा, हें त्रिभुवन सजातीयादि भेदरहित संविद्-मात्र आहे. तें आकाशाप्रमाणें शांत आहे. तूं जगाला जलांत प्रतिबिंबित झालेल्या पर्वताप्रमाणें पहा! सर्व दोषरहित व शांत—स्वभाव अशा ज्ञानी पुरुषाच्या चित्तांत अशी शीतलता उत्पन्न होते कीं, तिच्यापुढें चंद्राचे किरणहि प्रदीप्त अग्नीच्या ठिणगीप्रमाणें भासतात. हें जगत् अत्यंत शांत शिवरूप झालें असतां त्यांत हा द्वैताभास कसा, कोणत्या साधनानें व कोणत्या क्रियेनें उत्पन्न होणार? जी ब्रह्म या नांवाची सत्ता तेंच प्रत्येकाचें निज स्वरूप आहे. त्यांत कोणत्याहि प्रकारची बाधा नाहीं. तर हें सर्व तन्मय व अव्यय आहे. पण हें जें पदार्थत्व म्ह० नामरूपभाव त्याचा मात्र बाध होतो; आणि ज्याचा बाध होतो, ती वस्तु आहे असें म्हणण्यास आम्ही तयार नाहीं. आम्ही त्याला आकाशपुष्पाप्रमाणें असत् मानितों. बाधित होणारें तें जगद्रूप केवल मनोमात्र असतें. त्यामुळें ध्यानादिकांच्या योगानें तूं मनाचा निरोध कर. मनाला अमनस्त्व प्राप्त झालें असतां तें नामरूपांचा संकल्प करीत नाहीं. त्यामुळें चक्षुरादि इंद्रियांच्या द्वारा वृत्ति उत्पन्न होत नाहींत आणि वृत्तींच्या अभावीं ज्ञानरूप आत्मा अनंत, अज, अव्यय, ब्रह्मच होतो. यास्तव तूं सर्व मनन टाकून शांत होऊन रहा.

हे श्रेष्ठा, आकाशासारख्या आत्मस्वरूपांत मनाचा निरोध करून रहाणाऱ्या ज्ञानी पुरुषाला नाम व रूप यांची प्रतीतिच येत नाहीं. कारण आत्मस्वरूपामध्यें स्थिर होण्याचा दृढ अभ्यास न केल्यामुळेंच मनामध्यें स्वप्नांतील विकारांप्रमाणें नाम व रूप यांचा उदय होतो. जगत् मनोमात्र आहे, याविषयीं प्रमाण काय म्हणून विचारशील तर सांगतों. हिरण्यगर्भाचें मनच जगाला निर्माण करणारें आहे. तें कोण-

त्याहि प्रकारचा संभार न घेतांच जगच्चित्र निर्माण करतें. त्याला रंग, कुंचला, इत्यादि चित्राची सामग्री तर लागत नाहींच, पण त्याला चित्रफलकाची देखील अपेक्षा नसते. नुसत्या संकल्पानेंच तें विविध आकार उत्पन्न करतें व अनुभव घेतें. अर्थात् मनावांचून जगाचा कोणी कर्ता नाहीं, व त्यावांचून जगांतील कोणतेंहि कार्य नाहीं. स्वप्न, मनोरथ इत्यादि अवस्थांमध्यें मनच पदार्थांना उत्पन्न करतें व त्याचा अनुभव घेतें, हें प्रसिद्ध आहे. तें मन ज्याचा ज्याचा विस्तार करतें, त्या सर्वांमध्यें तें स्वतःच तदाकार होऊन रहातें. त्यामुळें दृश्य मनाहून निराळें नाहीं. तेव्हां दुसरा कोण, कशानें, कशाला, व कोठें उत्पन्न करणार ? मी सुखी किंवा दुःखी असें मनानें म्हटलें कीं, सुखित्व व दुःखित्व उत्पन्न होतें. म्ह० सुख, दुःख व त्याचे साधनभूत सर्व पदार्थ मनाच्या संकल्पाच्या अधीन आहेत, त्यामुळें मनःसंकल्प शांत झाला म्ह० सर्व जगत् शून्यरूप किंवा आत्मरूप बनतें. चिदाकाशरूप असलेल्याहि सर्व पदार्थांना पार्थिवत्व खोटेंच आलें आहे. पण स्वप्नांतील पदार्थांना जशी मनोमात्रता असते, त्याप्रमाणें त्या पार्थिवत्वालाहि वस्तुतः चिद्रूपत्व आहे. अर्थात् 'अहं' ही वृत्ति उत्पन्न झाली असतां, ब्रम्हसत्ताच भ्रामक पदार्थांच्या रूपानें विकार पावते, आणि अहं ही वृत्ति टाकली कीं, ब्रह्मसत्ता केवळ स्वरूपनिष्ठ व श्रमशालिनीच बनते. सोन्याचें कडें हा पदार्थ जसा सोन्याहून भिन्न नसतो, त्याप्रमाणें 'अहंपण' शमस्वरूप आत्मसत्तेहून निराळें नाहीं. ज्ञानी निर्विकार, विमनस्क, मौनी, कर्ता, अकर्ता, शीतल, शांत व शून्य हृदयाकाशांतहि चैतन्यपूर्ण होऊन रहातो. ज्याप्रमाणें कळसूत्री बाहुली कोणत्याहि प्रकारच्या वासनेवांचून शरीराची हालचाल करीत असतांना दिसते, त्याप्रमाणें ज्ञानी सर्व व्यवहार उत्तम प्रकारें करीत असतांनाहि अक्षुब्ध चित्तानें स्वरूपामध्यें स्थिर रहातो. त्याचें अंतःकरण वासनाशून्य झालेलें असल्यामुळें 'मी ही हालचाल करितों' असा अभिमान तो धरीत नाहीं. 'पण शरीराची हालचाल होत असतांना त्यांतील आत्म्याची हालचाल कशी होणार नाहीं ?' असें विचारशील तर सांगतों. पाळणा हालत असतांनाहि त्यांतील बालकाचीं अंगें जशीं स्थिर रहातात, त्याप्रमाणें शरीर व्यवहार करीत असतांनाहि देहाभिमानाच्या अभावीं स्वरूपामध्यें ज्ञानी स्थिर रहातो. चित्तवृत्तीला बहिर्मुख न होऊं देतां केवळ ज्ञाननिष्ठ, निष्काम, निःसंकल्प झालेला पुरुष अनात्मपदार्थांचें अनुसंधानच करीत नाहीं. कारण तो शांत, अनंत, आत्मरूप झालेला असतो. जो स्वतः अभिमान सोडल्यामुळें द्रष्टा बनतो, दृश्यापासून अगदीं दूर असतो, जो इंद्रियांशीं तादात्म्य पावत नाहीं, जो निराकार, अनपेक्ष व केवळ तद्रूप झालेला असतो, तो अनात्म्याचें अनुसंधान कोठून करणार ? अपेक्षा हाच घोर बंध व उपेक्षा हीच मुक्ति. निष्कामतेमध्यें जो स्थिर स्थित झाला आहे, तो मुक्तीवांचून दुसरें काय पाहणार ? शरीरासाठीं सर्व पदार्थांची अपेक्षा असते. पण तें शरीरच स्वप्नांतील शरीराप्रमाणें असत्–भ्रममात्र आहे, असें विवेकानें ठरल्यावर पुरुष कशासाठीं कसली अपेक्षा करणार ? ज्ञानी सर्व क्रिया टाकून, सर्व कौतुक सोडून, सर्व विषयज्ञानाचा त्याग करून, केवळ चिन्मात्र होऊन रहातो. हे रामा, माझा हा सर्व उपदेश ऐकतांच मंकीनें आपला महामोह निःशेष टाकला आणि कात टाकल्यावर सर्प जसा सुखी होतो, तसा तोहि सुखी झाला. त्यानंतर प्रारब्धप्राप्त कर्तव्य, वासनाशून्य मनानें करीत तो शंभर वर्षें पर्वतावर

शांत चित्तानें राहिला. शेवटीं ब्रह्मरूप होऊन अद्यापि पाषाणासारखा तो तेथें राहिला आहे. त्या योग्याचीं सर्व इंद्रियें शांत झालीं असून त्याला कोणी मुद्दाम जाऊन जागें करील, तेव्हांच तो देहभानावर येतो. हे राघवा, तूंहि याच विवेकोपायानें ज्ञानामध्यें उदय पावलेल्या मनानें आत्मानंदांत विहार करण्यासाठीं शांतीला संपादन कर. तुझी बुद्धि विषयासक्त होऊन शरदृतूंतील जलरहित मेघपंक्ति जशी क्षणांत नाहींशी होते त्याप्रमाणें ती विवेकहीन होऊन दीनतेला प्राप्त न होवो. २६.

## सर्ग २७ वा.

—:०:—

१ चित्स्पंदामुळें चित्तत्वाचें स्पंदन होत आहे, अशा भ्रामक समजुतीनें विश्वविभूति भासतात. २ चित्तशांतीनें त्यांची शांति होऊन स्वरूपस्थितीचा लाभ होतो.

श्रीवसिष्ठ:—हे रामा, तूं शांत हो, निर्विकार हो; प्रारब्धानुसार जी अवस्था प्राप्त होईल तिचें अनुवर्तन करणारा हो. स्फटिकाची प्रतिमा जरी विद्यमान असली तरी दृष्टीच्या प्रसाराला प्रतिबंध करीत नसल्यामुळें ती असत् असल्याप्रमाणें म्हणजे नसल्यासारखीच जशी होते, त्याप्रमाणें तूं विद्यमान असलास तरी म्हणजे शरीर असेपर्यंत तुझा जीवभाव जरी नष्ट न झाला तरी, अद्वैतदृष्टीच्या प्रसाराला तो प्रतिबंध करीत नसल्यामुळें तूं विद्यमान असतांही नसल्यासारखेंच वर्तन कर. आत्मा एकच असून सर्वव्यापकतेमुळें तो ज्ञानाच्या पूर्वीं सर्वांचा आत्मा होऊन राहिला आहे असें वाटतें. पण आत्मज्ञान झाल्यावर व्यष्टि व समष्टि या भावांचा बाध झाल्यामुळें तो एक आहे किंवा सर्वांमध्यें आहे ही कल्पनाच उरत नाहीं. सर्व चिदाकाश आदि-अंतरहित आहे. चित्त त्यानेंच परिपूर्ण आहे. तेव्हां शरीराची उत्पत्ति किंवा विनाश झाला तरी चित्तत्वांत कांहीं खंड पडत नाहीं. चैतन्याचा मिथ्या विकार असें जें मन, त्याच्या स्वाभाविक चपलतेमुळें जड वस्तूंच्या क्रिया दिसतात. जलांत जसे तरंग त्याचप्रमाणें वास्तविक अचपल चित्च्या सत्तेनें जड पदार्थांमध्यें हालचाल होते. ज्याप्रमाणें शुभ्र मेघ हें वस्त्रच आहे, अशी जरी कोणाला शंका आली तरी तो मेघ वस्त्राचें कार्य करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें "हा देहच मी आत्मा" ही समजूत खरी नव्हे. हे रामा, म्हणून तूं मिथ्या देहादिकांमध्यें अहंभाव धारण करून त्यांतच निमग्न होऊं नकोस. कारण देहाभिमानामुळें तुला अपार संसारसागरांत पडावें लागेल. तूं अनंत सुखासाठीं व मोक्षासाठीं आद्य तत्त्वाचें चिंतन कर. चिदाकाश अनंत आहे, त्याला इयत्ता नाहीं. तोच सर्वत्र सम असलेला आत्मा आहे. तीच परम वस्तु होय. तूं आपल्या आत्म्याला तत्परायण कर. तूं असा निश्चय केलास व मनाला आत्ममय बनविलेंस म्हणजे तूंच तो निरंजन नारायण होशील. ध्याता, ध्येय, ध्यान, हें सर्व खोटें आहे. त्यामुळेंच मनाला आत्ममय केलें म्हणजे ही त्रिपुटी बाधित होते. द्रष्टा, दृश्य, दर्शन या चित्च्याच विभूति आहेत. जड वस्तु चिद्वस्तूहून निराळी केव्हांच दिसत नाहीं. म्हणून दृश्य सर्वदा दर्शनानुसारीच असतें. म्हणजे जडवस्तूंचा अनुभव चित्-वस्तूच्या अधीन असतो. पण ध्येयाची गोष्ट तशी नाहीं. ध्येय ब्रह्म स्वतःसिद्ध असल्यामुळें ध्यानावांचूनही रहातें, व ध्यानावांचून त्याचा अनुभवही येतो. त्यामुळें चिद्वस्तु ध्यानानुसारी नाहीं. म्ह० ध्यान केलें

तरच त्याची सिद्धि होते, असें नाहीं. प्रतिपदेचा चंद्र उदय पावला असतां समुद्र क्षुब्ध होतो व प्रलयवायु वाहूं लागला असतां शुष्क होतो. पण आत्मतत्व सर्व अवस्थांमध्यें सम व सौम्य असतें, तें कधीं क्षुब्ध होत नाहीं व शांत होत नाहीं. असें जर आहे तर द्रष्टा, दृश्य इत्यादि त्रिपुटी आत्म्याची विभूति कशी, असें विचारशील तर सांगतों. त्याप्रमाणें नौकेंत बसून जात असलेल्या लोकांना तीरावरील वृक्षादि चालत आहेत असा भास होतो, किंवा शुक्तीला पाहून ही चांदी आहे असें वाटतें, त्याचप्रमाणें देहादि आत्मा आहे, असें वाटणें हा भ्रम आहे. याप्रमाणें देहदृष्टया चित्तहि कल्पित आहे. चित्त व देह या दोहोंच्या दृष्टीनें जीव कल्पित आहे. जीवदृष्टया देह व चित्त कल्पित आहेत आणि शुद्ध चित् हें त्या सर्व कल्पनांचें अधिष्ठान आहे. अर्थात् तिचेच देहादि हे सर्व मिथ्या परिणाम आहेत. पण ब्रम्हदृष्टीनें हें सर्व एक शांत व सर्वव्यापक आहे. जगदादिक दुसरें कांहीं नाहीं. इतकेंच नव्हे तर जगत् आहे व ब्रम्हसत्ता नाहीं असें जें तुला वाटत होतें, तें खरें नव्हे. आकाशांत जसें वन संभवत नाहीं, वाळूपासून तेल निघणें जसें शक्य नाहीं व चंद्रबिंबांत जशी विद्युत् संभवत नाहीं, त्याप्रमाणें चित्तत्त्वांत देहादिक संभवत नाहीं. हे रामा! अविद्यमानच असलेल्या या जगद्रूपाला भिऊं नकोस, हेंच परम सत्य आहे, असें समज. जगत् आहे आणि ब्रम्ह नाहीं, अशी जी तुला भ्रांति होती, ती आज माझ्या उपदेशानें शांत झाली आहे. संसारबंधाचें कारण त्या भ्रांतीवांचून दुसरें काय आहे? मृत्पात्रें जशीं मृन्मात्र असतात, तसें हें चिन्मात्र आहे आणि तत्त्वविचार केला असतां तें आपोआप क्षीण होतें. हे रामा, तूं माझ्या या सौम्य उपदेशानें अहंभावरूप संकल्पापासून मुक्त हो. संपन्न स्थितींत हृष्ट होऊं नकोस, व आपत्ति आली असतां खेद करूं नकोस. उत्कर्ष व अपकर्ष या दोन्ही अवस्थांमध्यें सम स्थित हो आणि माझ्या या उपदेशाला विसरून व स्वरूपस्थितीला सोडून राहूं नकोस. हे दाशरथे, हे रघुकुलाकाशांतील चंद्रा, तूं ब्रह्मात्मैक्यवस्तूला साक्षात् जाणून कृतकृत्य झालास म्हणजे मग चित्ताला संताप देणारे जे हर्ष, शोक, इच्छा, इत्यादि दोष त्यांचा वाटेल तर त्याग कर, किंवा प्रारब्धाच्या प्रबल दोषामुळें त्यांचा त्याग करणें अशक्य झाल्यास त्यांचें अनुवर्तन कर. त्याग केलास तर जीवन्मुक्तिसुखाचा अनुभव घेशील व अनुवर्तन केलेंस तर दृष्ट दुःखाचा क्षय होणार नाहीं, पण विदेह मुक्ति प्राप्त होईलच. २७.

---

## सर्ग २८ वा.

—:०:—

१ बीजांकुरभूत जन्म देणाऱ्या दैवनांवाच्या कर्माचें तत्त्व.

श्रीरामः—हे प्रभो, बीज, अंकुर, कर्ते पुरुष, त्यांचीं विहित-निषिद्ध कर्में, हीं दृष्ट सामग्री व दैव या नांवाची अदृश्य सामग्री यांच्या योगानें जन्ममरणपरंपरारूप संसारानर्थ उत्पन्न होतो. यास्तव त्यांचें तत्त्व थोडक्यांत सांगा.

श्रीवसिष्ठः—रामा, दैवाचें तत्त्व कर्म आहे. कर्माचें तत्त्व पुरुष आहे, पुरुषाचें तत्त्व मनोरूप चित्स्पंद आहे. मनाचें तत्त्व चिदात्माच आहे. तो चिदात्मा 'मीं बहुरूप व्हावें, उत्पन्न व्हावें,' अशा प्राथमिक संकल्परूप चित्स्पंदानें समष्टि—व्यष्टिमय होतो. त्यानंतर, देहावर मी असा अभिमान ठेविल्यामुळें तो चिदात्माच पुरुष होतो. नंतर कर्में करणारा तो पुण्यपाप-

रूप देवत्वाला प्राप्त होतो, त्याच्या भोगासाठीं घट-पट इत्यादि पदार्थ बनतो. सर्व भोग्य-पदार्थ हेंच जगत् आहे. त्यामुळें तो परमात्माच आपल्या स्पंदाच्या द्वारा हें सर्व बनला आहे. संविदूच्या स्पंदावांचून पुरुषत्व किंवा कर्म कसें होणार? सर्व पदार्थ संविदूच्या सत्तेनें व स्फूर्तीनें सत्ता-स्फूर्तियुक्त होतात. त्यामुळें संविद्चेच ते मिथ्या परिणाम होत. वासनायुक्त संवित्स्पंदापासून जगल्लक्ष्मी प्रवृत्त होते व वासनारहित संविद् स्पंदामुळें संसार निवृत्त होतो. संविदूचें वासनारहित स्पंदन हें अस्पंदनच आहे, असें विद्वान् समजतात. कारण तरंग आपल्या कारणांत लीन झाला ह्मणजे समुद्ररूप बनतो, मग त्याला तरंग असें ह्मणत नाहींत. संविदूचा स्पंद व आत्मा यांमध्यें केवल कल्पनानाशावांचून यत्किंचित्‌हि भेद नाहीं. ह्मणून हे रामा, सृष्टींतील पुरुष व कर्म हीं दोन्ही चित्स्पंदच आहेत. त्यामुळें जल व तरंग यांचें द्वित्व जसें केवल काल्पनिक, त्याप्रमाणें चित्स्पंदरूप पुरुष व कर्म यांचा भेद काल्पनिक आहे. अधिष्ठानाच्या दृष्टीनें त्यांत भेदच नाहीं. रामा, पुरुषच कर्म आहे व कर्मच पुरुष आहे. ते दोन्ही बर्फ व शीतत्व यांसारखेच अभिन्न आहेत. जें बर्फ तेंच शैत्य, जें शैत्य तेंच बर्फ, याप्रमाणें पुरुष तेंच कर्म, व कर्म तोच पुरुष. संविद्स्पंदरसाचेच दैव, कर्म, पुरुष इत्यादि सर्व पर्यायशब्द आहेत. कर्मादिक त्यांहून भिन्न नाहींत. स्पंदामुळें संविदच जगद्बीज होते आणि अस्पंदामुळें तिच्यांतील बीजत्व नष्ट होतें. बीजामध्यें जे सूक्ष्म अवयव असतात, तेच अंकुररूपानें व्यक्त होतात. चित् स्वभावतःच क्वचित् स्पंदयुक्त असते. क्वचित् स्पंदरहित असते. अपार सागराप्रमाणें ती दिशा काल, क्रम या रूपानें व्यक्त होते, कोठें व्यक्त होतांहि नाहीं. संवित्स्पंद वासनावान् होऊन वस्तुतः कारण नसतांनाहि कारण होतो; देहादि अंकुरांचें बीज बनतो. तृण, वल्ली, लता, इत्यादिकांच्या बीजामध्येंहि संविद्स्पंदच मुख्य बीजरूपानें रहातो. ह्मणजे इतर सर्व लौकिक बीजांचें तो बीज आहे, पण त्याचें बीज दुसरें कांहीं नाहीं. अग्नि व उष्णता यांचा जसा भेद नाहीं, त्याचप्रमाणें बीज व अंकुर हीं पृथक् नाहींत. बीजच अंकुर आहे असें तूं समज. तसेंच कर्मच मनुष्य आहे, असें तूं जाण. भूमीच्या उदरांत स्फुरण पावणारी चित् स्थावरांचे अंकुर उत्पन्न करिते. पाण्यावर जसे बुडबुडे त्याप्रमाणें तिच्यापासून स्थूल, सूक्ष्म, मृदु, व कठीण अंकुर उत्पन्न होतात. अहो, अतिशय मृदु असलेल्या भूतलापासून वज्रासारखे कठिण अंकुर उत्पन्न करण्यास चिदात्म्यावांचून कोण समर्थ आहे? ज्याप्रमाणें पुष्प व फल यांना लतेंतील रस उत्पन्न करितो, त्याप्रमाणें प्राण्यांच्या शरीरांतील साररूप रसांत असलेली संविद् प्राण्यांच्या शरीराला उत्पन्न करिते. ती सर्वव्यापिनी संविद् जर अशी अति बलाढ्य नसती, तर देव, असुर, राजे इत्यादिकांच्या उत्कर्षाला कशी कारण झाली असती? स्थावर व जंगम पदार्थांचें आद्य बीज संवित्स्फुरणच आहे. त्याचें बीज दुसरें कांहीं नाहीं. त्यामुळें बीज व अंकुर, क्रिया व पुरुष आणि दैव व तरंग, लाटा व उर्मी, यांचा अधिष्ठानदृष्ट्या भेद नाहीं व परस्परहि भेद नाहीं. जो मनुष्य व त्याचें कर्म यांमध्यें बीजांकुरन्यायानें द्वित्व पहातो त्या मोठ्या विद्वत्ताला नमस्कार असो. संविदेमध्यें असलेला जो वासनारस तेंच जन्माचें बीज आहे. त्याच्यापासूनच जन्माचा अंकुर उद्भवतो. रामा, तूं त्याला असंगरूप अग्नीनें जाळून टाक. शुभाशुभ कार्य प्रारब्धानुसार करीत असतांना किंवा त्याचा त्याग करतांना मनानें त्यांत

निमग्न न होणें यालाच ज्ञानी लोक असंगत्व म्हणतात; किंवा वासनांचा उच्छेद करणें हाच असंग होय. कोणत्याना कोणत्या तरी युक्तीनें त्याला तूं संपादन कर. म्हणजे वासना हाच संग आहे असें वाटत असेल, तर त्याचा उच्छेद करण्यासाठीं तूं तत्त्वज्ञानाचा अभ्यास कर. तुला राजयोगरूप युक्तीनें वासनाक्षय साध्य वाटत असेल, तर तूं त्याच्यायोगानें वासनाशून्य हो. हठयोगाचा आश्रय करावा असें तुला वाटत असेल तर तसें कर, पण दीर्घकाल अभ्यास करून तो संपादन कर. वासनाक्षयानंतर जें तुझें स्वरूप अवशिष्ट राहील, तेंच परम पद आहे असें समज. वाटेल त्या यत्नानें या अहंभावाचें निवारण कर. हाच वासनाक्षय आहे. पुरुषाच्या ध्यानादि प्रयत्नावांचून संसाराचें उल्लंघन करून जाण्यास दुसरा उपाय नाहीं. अहंकारत्याग हाच वासनाक्षय आहे, व त्यालाच संसारोत्तरण म्हणतात. जी आद्य संविद्, तोच अंकुर, तेंच बीज, तेंच कर्म, तोच पुरुष व तेंच शुभाशुभ दैव आहे. सृष्टीच्या पूर्वीं संविदेहून निराळें बीज नसतें, अंकुर नसतो, पुरुष नसतो, कर्म नसतें व दैवहि नसतें. तर केवळ चितच त्या त्या आकारानें उदय पावते. हे रामा, वस्तुतः बीज नाहीं, अंकुर नाहीं, कर्म नाहीं व पुरुषहि नाहीं, म्हणजे त्यांना स्वतः अस्तित्व नाहीं. अर्थात् एक चित्स्वरूपच देव, नर, असुर यांच्या नाममात्र आकारांनीं एखाद्या नटाप्रमाणें नटलें आहे. यास्तव, हे शांतस्वरूप रामा! तूं अशा रूपाचेंच निःशंकपणें चिंतन करून पुरुष, कर्म इत्यादि मिथ्या गोष्टींचा विचारहि टाकून वासनाशून्य हो; आणि मग तुझ्या इच्छेप्रमाणें वाटेल तर समाधिस्थ होऊन रहा किंवा प्रारब्धानुसार व्यवहार करीत रहा. रामा! तूं आपल्या सर्व इच्छा टाकून दे. निःशंक हो. केवल चिन्मात्र, सर्व कर्तव्यें करणारा, केवळ आत्म्यामध्येंच आराम पावणारा, पूर्णकाम व शमाच्या योगानें रमणीय व निर्भय हो. २८.

---

## सर्ग २९ वा.

१ व्यवहारांत प्रामलोकचर्या करणें व त्याचवेळीं स्वरूपामध्यें स्थिर रहाणें या दोन गोष्टींचा उपदेश.

श्रीवसिष्ठः—रामा! तूं नित्य अंतर्मुख होऊन रहा. वीतराग हो. वासनाशून्य हो. सर्वत्र चिन्मात्र, शुद्ध व शांत रूपाची भावना कर. तूं आकाशाप्रमाणें स्वच्छ, ज्ञानी, केवल चिन्मात्रस्वरूप, सर्वत्र सम, सौम्य, समानंद, सर्वव्यापक व सर्वत्र ब्रह्मरसाचा अनुभव घेणारा हो. शोक, घोर आपत्ति, अनेक संकटें, मोठे मोठे अनर्थ किंवा अशींच दुसरीं कांहीं अल्प किंवा महत् कार्यें जीं जीं प्राप्त होतील, तीं सर्व मनांत खिन्न न होतां यथाक्रम व त्या त्या देशांतील धर्माला अनुसरून तूं कर. डोळ्यांतून अश्रु ढाळून मोठ्यांनीं आक्रंदन करण्यापर्यंत जरी दुःख झालें, व निरनिराळ्या प्रकारें सुखानुभव आला, प्रिय मनुष्यांचा समागम झाला, उत्सव व उत्कर्ष यांचे प्रसंग आले, तरी तूं त्या सर्वांमध्यें आनंदाचा अनुभव घे. मूढाप्रमाणें वासनांनीं व्याकुल होऊं नकोस. संग्रामादिकांमध्यें यमासारखा क्रूर होऊन एखाद्या मूढाप्रमाणें सर्व भूतांना जाळून टाक. दावाग्नि गवताला जसा जाळतो, त्याप्रमाणें तूं संग्रामांत शत्रूंना जाळून टाक. तूं केव्हांहि खिन्न न होतां, धर्माच्या अविरुद्ध क्रमानें प्राप्त झालेल्या कार्यांमध्यें अर्थाचें चिंतन कर, व त्याला संपादनहि कर. एखादा भोगवासनांनीं

व्यापलेला मूढ धनाचें चिंतन जसें करितो, त्याप्रमाणें तूंहि बकवृत्तीनें त्याचें चिंतन कर. जसा वारा जलरहित मेघांना उडवून देतो, त्याप्रमाणें तूंहि सर्व शत्रूंना स्वसामर्थ्यानें पराभूत कर. त्या वेळींहि तूं वासनवान् मूढाप्रमाणेंच आपलें कर्तव्य कर. करुणेला योग्य असलेल्या उत्तम जनांवर धैर्यानें दया कर. बाह्य व्यवहार करतांना तूं सामान्य मनुष्यांप्रमाणेंच रहा. पण आपलें मन मात्र आत्म्याच्या ठिकाणीं स्थिर ठेव. आत्मस्वरूपांतच विश्रांति घे व आत्मश्लाघा करूं नकोस. तूं सामान्य माणसांप्रमाणेंच हर्षप्रसंगीं हृष्ट हो, दुःखप्रसंगीं दुःखित हो; दीनावर दया कर. व वीरासमोर वीर्यवान् हो; पण हें सर्व काम करीत असतांनाहि तूं अंतर्मुख रहा. सर्वदा आनंदित रहा, स्वात्म्यामध्येंच रममाण हो. रामा, याप्रमाणें शमानें युक्त होऊन जो प्राप्त कार्य करितो, तो वस्तुतः त्याचा कर्ताच नव्हे. हे साधो! आत्मभावनेनें ज्याला सतत अंतर्मुख स्थिति प्राप्त झाली आहे त्याच्या शरीरावर वज्रप्रवाह जरी झाला तरी तें वज्रच कुंठित होतें, त्याला कांहीं पीडा होत नाहीं. कारण सर्व संकल्पविकल्पापासून मुक्त झालेला, स्वसंविद्रूप कूटरांत शांतपणें बसलेला व आत्म्यामध्यें यथेष्ट विश्रांति पावलेला तो महेश्वरच आहे. त्याला शस्त्रें तोडीत नाहींत, पाणी भिजवीत नाहीं, अग्नि जाळीत नाहीं, व वायु सुकवीत नाहीं. जरामरणरहित, सुस्थिर, अज स्वात्म्याला आलिंगन देऊन धैर्यानें रहा. स्तंभाच्या आधारावर जसें घर रहातें, तसा तूं त्याच्या आधारावर रहा. जगद्वृक्षाच्या पदार्थरूप पुष्पांचा रम्य सुगंधच, अशा ब्रह्मसंविदेचा आश्रय करून सर्व बाह्य संविदांना अंतर्मुख कर. तूं स्वरूपामध्यें स्थित हो. कारण सतत अंतर्मुख राहून बाह्य कार्यें करणारे पुरुष जरी जीवंत असले तरी दगडाप्रमाणें त्यांच्यामध्यें वासना उत्पन्न होत नाहीं. रामा, तूं आपल्या मनाला आत्मानंदांत निजव; तें पुनः क्षुब्ध होणार नाहीं अशा रीतीनें त्याला निजव. सर्व कर्में करीत असतांनाहि कांसवाच्या अंगांप्रमाणें सर्व वृत्तिशून्य होऊन रहा. बाह्य व्यवहार कर, पण आंतील मनावर त्याचा परिणाम होऊं देऊं नकोस. ह्मणजे बाह्य व्यवहारांत जागणारें पण अंतर्व्यवहारांत निजलेलें अशा चित्तानें तूं व्यवहार कर. लहान बालक, उन्मत्त, इत्यादिकांच्या व्यवहाराप्रमाणें आंतून ज्यानें वासनांचा त्याग केला आहे असा तूं प्राप्त व्यवहार जरी करीत असलास तरी आकाशाप्रमाणें तुझें चित्त लिप्त होणार नाहीं. आंतून वृत्तित्याग केल्यामुळें लीन झालेलें, पण बाह्यव्यवहारांत किंचित् प्रसार पावणारें अशा चित्तानें तूं सर्व संतापशून्य होऊन रहा. चित्त आंतून अत्यंत सुप्तसें झालें ह्मणजे नुसत्या बाह्य व्यवहारानें तुला दुःख होणार नाहीं. ज्ञानामुळें चित्तक्ष याचा उदय झाला ह्म० मग संकल्पानें मलिन न झालेल्या शुद्ध संविदेमध्यें स्थित होऊन, मग तूं पाहिजे तर बाह्य व्यवहार कर, नाहींतर करूं नकोस. निद्रित पुरुषाच्या चित्ताप्रमाणें सर्व वृत्तिरहित चित्तानें जागृतींतील व्यवहार करतांना तूं पाहिजे तर इष्ट पदार्थांचा संग्रह कर किंवा त्याग कर. अथवा कशाचाच संग्रह करूं नकोस, व त्यागहि करूं नकोस. तूं जाग्रद्-अवस्थेंतहि स्थूल व सूक्ष्म उपाधींचा लय केल्यामुळें जर निद्रित राहाशील व सुषुप्तींतहि अज्ञानावरणाच्या अभावीं जागशील, तर जागृति व सुषुप्ति यांचें ऐक्य होईल. कारण अज्ञान व त्याचें कारण या दोघांचा बाध झाल्यावर त्या दोन्ही भिन्न अवस्था आहेत, असें म्हणण्यास कारण रहात नाहीं.

याप्रमाणें त्यांचें ऐक्य झाल्यावर जें सन्मात्र तत्त्व अवशिष्ट रहातें, तेंच तूं आहेस. त्या अवस्थेंत तूं सर्व दुःखशून्य होशील. रामा, याप्रमाणें हळूहळू अभ्यास करून तूं सर्व वस्तूंहून अगदीं विलक्षण, अद्वन्द्व, आद्यंतरहित फलाची प्राप्ति करून घेऊन जगत् द्वैतहि नाहीं व अद्वैतही नाहीं एवढाच निश्चय तूं ठेव, आणि त्या योगानें आपलें अंतःकरण आकाशासारखें स्वच्छ करून परम-विश्रांतीला प्राप्त हो.

श्रीरामः—हे मुनिश्रेष्ठ, सर्व द्वैताचा बाध झाल्यावर मी वसिष्ठ आहें, ही भावनाहि तुमच्यामध्यें अवशिष्ट रहाणें शक्य नाहीं. मग आपण उपदेशादि व्यवहार कसा करतां?

श्रीवाल्मीकिः—रामानें असें विचारलें असतां, वक्त्यांतील श्रेष्ठ वसिष्ठ क्षणभर स्तब्ध बसला. त्याची श्वासोच्छ्वासादि क्रिया स्पष्ट चालली असतां तो कांहीं बोलला नाहीं. तेव्हां सभेंतील महाजन मोठ्या संशयसागरांत पडले. तें पाहून राम पुनः म्हणाला—"भगवन्, आपण मजप्रमाणेंच असे स्तब्ध कां बसलांत? जगांत असा प्रश्नच नाहीं कीं, ज्याविषयीं शिष्यांनीं प्रश्न केला असतां, विद्वान् गुरु त्याचें उत्तर देऊं शकत नाहींत."

श्रीवसिष्ठः—रामा, मी तुझ्या प्रश्नाचें उत्तर देण्यास असमर्थ असल्यामुळें, किंवा सर्व उपाय खुंटल्यामुळें स्तब्ध बसलों. असें समजूं नको. तर हा प्रश्न गहन आहे व स्तब्ध बसणें हेंच याचें उत्तर आहे. प्रश्न करणारा दोन प्रकारचा असतो. एक तत्त्वज्ञ व दुसरा अज्ञ. अज्ञाला अज्ञतेनें व ज्ञान्याला ज्ञानदृष्टीनें उत्तर दिलें पाहिजे. हे महाबुद्धिमाना, तूं एवढा वेळ अज्ञ होतास. तें परमपद तुला ज्ञात झालेलें नव्हतें. त्यामुळें तूं सविकल्प उत्तरांचा अधिकारी होतास, पण आतां तत्त्वज्ञ झाला आहेस, परमपदीं विश्रांति पावला आहेस; त्यामुळें सविकल्प उत्तरांना मुळींच योग्य नाहींस. हे वाङ्मिन्, जेवढा म्हणून वाङ्मय उल्लेख असतो—मग तो मोठा असो कीं अल्प असो, त्याचा अर्थ गहन असो किंवा सुलभ असो, तो सर्व सापेक्ष असतो. निरपेक्ष शब्द संभवत नाहीं. पण तत्त्वज्ञाला अशा कलंकानें युक्त असलेलें उत्तर देणें योग्य नाहीं. कलंकरहित वाणीच नाहीं. तूं तर मोठा तत्त्वज्ञ झाला आहेस. आणि तुझ्यासारख्या ज्ञानी शिष्याला यथाभूत तत्त्व सांगणेंच योग्य आहे. अंतरहित, काष्ठमौन हाच तत्त्वार्थ आहे. कारण, तत्त्वज्ञानाचा उदय होण्यापूर्वींच उपदेश प्रवृत्त होतो, आणि त्या वेळीं सविकल्प वाणीचाच आश्रय करावा लागतो. पण विचारानें तत्त्वाची ओळख झाली म्हणजे शब्दाची प्रवृत्तिच कुंठित होते. सर्व संकल्प शांत होतात. अशा प्रकारचें जें मौन, तेंच परमपद होय. हे प्रिय शिष्या, तुझ्यासारख्या तत्त्वज्ञाला तसें मौनानें उत्तर देणेंच मला प्राप्त होतें. पुरुष जसा असतो, तसा बोलतो. मी केवळ ज्ञेयरूप असल्यामुळें वाणीचा विषय न होणाऱ्या परमपदीं स्थित आहें. जो वाग्-अगोचरपदीं स्थित असतो, तो वाग्रूप मल कसा धारण करील? त्यामुळें मी ज्याविषयीं कांहीं बोलतांच येत नाहीं त्याविषयीं बोलत नाहीं. कारण वाक् संकल्पानें मलिन् झालेली असते.

श्रीरामः—हे भगवन्, वाणीमध्यें जे जे दोष प्रवृत्त होतात, त्या सर्वांना सोडून तुम्ही कोण तें मला सांगा. म्हणजे त्या दोषांमध्यें शब्दाचें तात्पर्य न ठेवतां निरुपाधिक वस्तूंतच तें कसें राहील हें मला सांगा. म्ह० मला लक्षणेनें तत्त्वबोध करा.

श्रीवसिष्ठः—रामा, असें जर असेल तर वस्तूंचें स्वरूप जसें आहे, तसें मी तुला

सांगतों. हे तत्त्ववेत्त्यांतील श्रेष्ठा, तूं कोण, मी कोण, व हें जगत् काय आहे, तें ऐक. मी तर निरामय, चिदाकाश आहें. मी विषयविज्ञानशून्य व सर्व संकल्परहित आहें. मी स्वच्छ चिदाकाश आहें. तूंहि आकाशच आहेस, व हें सर्व जगत् आकाशमात्रच आहे. मी केवळ शुद्ध ज्ञानरूप आहें. शुद्ध ज्ञानामध्येंच स्थित आहें. विषयज्ञानानें रहित आहें. त्यामुळें प्रत्यग् आत्म्याहून अणुमामात्रहि अन्य वस्तु आहे असें मी समजत नाहीं. असें जर आहे, तर अज्ञ लोकांना बोध करावयास व प्रतिवाद्यांशीं वाद करावयास अहंकारयुक्त विद्वान् कसे तयार होतात, असें म्हणशील तर सांगतों. शिष्यांना संसारदुःखांतून सोडविण्यासाठीं व प्रतिवाद्यांना निःसंदेह करून मोक्षमार्गांत प्रवृत्त करण्यासाठीं उद्योगी विद्वान् श्रुति, युक्ति इत्यादि प्रमाणांनीं स्वपक्ष उत्थापित करून बाधित झालेल्या अहंकाराचाहि स्वतःवर मिथ्या आरोप करितात आणि एका आत्म्याचेच शतशः भाग कल्पितात, पण त्या कल्पित विभागानें अज्ञजनांप्रमाणें मोहित होऊन द्वैतदृष्टि बनत नाहींत. पण अशा रीतीनें पांडित्य प्रकट करण्याचा जो प्रकार तेंच परमपद आहे, असें मात्र समजूं नको. कारण जिवंत असतांनाहि अति शांत, व व्यवहार करीत असतांनाहि शवाप्रमाणें मनांत अतिशय जड, म्हणजे संवेदनशून्य होऊन रहाणें हेंच परमपद होय. तें परमपद अंतर्बहिःसाधनशून्य असल्यामुळें, मी कर्ता, भोक्ता या भावनेनेंहि शून्य असतें. त्यामुळेंच प्राप्त विषय भोगीत असतांनाहि तें सुख-दुःख-रहित असतें. तें स्वप्रकाश, निरतिशय व आनंदरूप असल्यामुळें शिवस्वरूप आहे. या अहंतेचा अभाव हाच मोक्ष व अहंता धारण करणें हाच बंध आहे. पण साधकावस्थेंत, या अहंतेलाच शिवरूप मानून तिच्या द्वारा मोक्षाचा शोध केला आहे. जन्मांधानें चित्र पहाण्याचा जसा उद्योग करावा, त्यांतलाच हा प्रकार आहे. शरीर हालचाल करीत असतांना किंवा तें स्थिर असतांना मनानें पाषाणाप्रमाणें असणें हेंच निर्वाण, व तेंच परमपद आहे. पण तें दुसऱ्या मनुष्याला दिसणें शक्य नाहीं. ज्याचा त्यानेंच अनुभव घेतला पाहिजे. जो लौकिक फलाविषयीं विरक्त झालेला असतो, त्यालाच आंतल्या आंत या स्थितीचा अनुभव येतो. याला विषयज्ञानाचाच दृष्टान्त आहे. विषयसंवेदन ज्याचें त्याला मनांतल्या मनांत होतें. एकाचें विषयज्ञान दुसऱ्याच्या अनुभवाला येत नाहीं. चिद्रूप परम पदामध्यें अहंता नाहीं, त्वत्ता नाहीं, अनहंता नाहीं व अन्यताहि नाहीं; तर एक कैवल्य आहे. तेंच निर्मल, कल्याणरूप निर्वाण आहे. या चेतनाचें विषयोन्मुखत्व हाच संसार आहे. तोच अतिशय क्लेश देतो. चैतन्यानें विषयोन्मुख न होणें हेंच अचेतनत्व आहे. त्यालाच मोक्ष व परम शांत अव्यय पद तूं जाण. दिशा, काल इत्यादिकांनीं परिच्छिन्न न झालेल्या शांत निर्विकार आत्म्यामध्यें स्थित झाल्यावर विषय संभवतच नाहीं. मग त्याला आत्मभिन्न वस्तूचें भान कोठून होणार! ज्याप्रमाणें स्वप्नांतील संविदेमध्यें उत्पन्न झालेला जगद्रूप संकल्प संविद्रूपच जरी असला तरी त्या रूपाला सोडून अन्यरूप होतो, त्याप्रमाणें हा आत्मा बहिर्मुख झाला असतां जडप्रपंचरूप बनतो. मन, बुद्धि, इत्यादि हे सर्व पदार्थ संविन्मात्ररूप आहेत, पण त्यांची मन, बुद्धि इत्यादि पदार्थरूपानें भावना केली कीं ते जडरूप होतात. याप्रमाणें सबाह्यअभ्यंतर एक, स्वच्छ, अज संविदच पसरलेली असतांना त्यांत बहिर्मुखतारूप भेदबुद्धि उत्पन्न होणें, हेंच एक सर्व अनर्थाचें

बीज आहे. तूं कदाचित् म्हणशील कीं, तर मग शुद्ध संविद् व शून्य यांत अंतर काय? तर सांगतों. ज्ञानी लोक त्यांतील अंतर स्वानुभवानें जाणतात. वाणीनें त्याचें वर्णन करतां येत नाहीं. त्या संविदेचा निरतिशय आनंदरूपानें तज्ज्ञ अनुभव घेतात. ज्याप्रमाणें अंधकारामध्यें मोठ्या यत्नानें एखाद्या वस्तूकडे पाहूं लागलें असतां ती दिसते, तसा हा सदसद्रूप आभास दिसतो. जर मी सर्व वासना सोडून शांत झालों तर मी आकाशच आहें. तूंहि वासना जर दृढ केली नाहींस, तर चिदाकाश आहेस. दुसऱ्याहि एखाद्या पुरुषानें जर आपल्या मनांत चिदाकाशच मी आहें असा निश्चय केला, तर तोहि तज्ज्ञच आहे. तो व्यवहारांत इतर अज्ञ पुरुषांप्रमाणें विद्यमान जरी असला तरी चिद्रूपच असल्यामुळें देहादि नसल्यासारखाच शांत होतो. 'जीवाची अविद्या चिद्रूपानें शांत होते कीं जड रूपानें?' असें विचारशील तर सांगतों. मी अज्ञ आहें, या प्रत्येक जीवाच्या प्रतीतीवरूनच त्याच्या अज्ञानाची सिद्धि होते. संसाररूप अविद्याग्नि त्या अज्ञानाकडूनच प्रज्वलित केला जातो. पण मी ब्रह्म आहें, अशा ज्ञानरूप वायूकडून शेवटीं त्याची शांति होते. अर्थात् अविद्येचा बाध त्याचें जें अधिष्ठान चिद्रूप त्यांत होतो. शांत होणाऱ्या चेतनाचें खांबाच्या अज्ञानासारखें जें जगाविषयींचें अज्ञान, तोच मोक्ष, तेंच अक्षय व अक्षुब्ध परमपद होय. मूलाज्ञान जोंवर आहे, तोंवर बाह्य वस्तूंचें ज्ञान नसणें याला अज्ञान किंवा मूर्खपणा म्हणतात; पण त्या अज्ञानाचा नाश झाला म्हणजे तो मानव मुनि होतो. अर्थात् ज्ञानानें अज्ञानाचा नाश करून ज्ञानित्व संपादन करणें, म्हणजेच मुनि बनणें आहे; व अज्ञानाचा आश्रय करून अज्ञ होणें म्हणजे पशु, वृक्ष इत्यादि बनणें आहे. मी, ब्रह्म व हें जगत् हा अविद्यामय भ्रम आहे. तो असत्य आहे. दिवा लावला असतां अंधकार जसा रहात नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानानें जगद्भ्रम दिसत नाहीं, म्हणून तो खोटा. ज्याची बुद्धि शांत झाली आहे, तो जीवन्मुक्त मनांत किंवा जनांत कसलाहि अनुभव घेत नाहीं. कारण त्याचा इंद्रियसमुदाय जरी व्यवहाराला समर्थ असला तरी तो स्वतः संकल्पशून्य असतो. त्यामुळें त्याला विषयांची संवेदनाच होत नाहीं. स्वप्न जसें सुषुप्तीमध्यें लीन होतें, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाच्या समाधींत सर्व दृश्य लीन होतें. नंतर तो जरी पुनः व्यवहार करूं लागला तरी त्याला सर्वत्र आत्माच दिसतो. आकाशामध्यें जसें नीलत्व, त्याप्रमाणें परमात्म्यामध्यें जगत्. तें केवळ भ्रांतिमात्र आहे. आणि जसें आकाश तसाच तो परमात्मा. हें सर्व दृश्य असत् आहे, अशी ज्याची भावना असते, तो सर्व वासनांनीं युक्त जरी असला तरी वस्तुतः वासनाशून्यच होय. रामा, ज्याप्रमाणें संकल्पानें निर्माण केलेल्या पदार्थांत स्वप्न, माया, इंद्रजाल, हे चमत्कार आहेत, त्याचप्रमाणें संसार हाहि एक चमत्कार आहे. त्यामुळें स्वप्नादि जरी प्रत्यक्ष अनुभवाला येत असले तरी त्यामध्यें आसक्ति ठेवणें जसें सर्वथा अयोग्य, त्याचप्रमाणें संसारांत आसक्ति ठेवणेंहि अयोग्य. कर्ता व भोक्ता यांचाच असंभव असल्यामुळें दुःख, सुख, पुण्य, पाप यांतील कांहीं नाहीं, व कोणाचें कांहीं नष्टहि होत नाहीं. दुःखादि सर्व मानस-संकल्प आहेत; ते सर्व शून्य व निराधार आहेत. फार काय, पण 'हें माझें' असा ममत्वप्रत्यय जो भासतो, तोहि चंद्राच्या द्वित्वाप्रमाणें किंवा स्वप्नांतील नगराप्रमाणें मिथ्या आहे. 'हें माझें' असा प्रत्यय ज्याला येतो त्यालासुद्धां आमच्या दृष्टीनें अहंकार नाहींच. वास्तव सर्व द्वैतशून्य झालेला तत्त्वज्ञ

व्यवहार करीत राहो, कीं काष्ठमौन धरून राहो, तो कसाहि जरी असला तरी ब्रम्हत्वास प्राप्त होतो. रामा ! याप्रमाणें मायिक विवर्तवादाचा आश्रय करून व आरोपित जगाचा अपवाद करून तत्त्वज्ञ परमपुरुषार्थामध्यें प्रतिष्ठित होतो, हें सांगितलें. पण जे दुसरे कित्येक तार्किक परस्परविरुद्ध सिद्धांत काल्पितात, त्यांना जगाची उत्पत्ति, स्थिति, लय, परमपुरुषार्थरूप परमार्थ यांची युक्तीनें व्यवस्था लावितां येत नाहीं. ' तर मग सर्व शून्यच आहे, असें म्हणावें लागेल. ' असें जर म्हणशील तर सांगतों. आम्हीं संविद्भिन्न विषयांचा अपवाद जरी केला, तें मिथ्या आहेत असें जरी ह्मटलें, तरी त्या अपवादाचेंहि ग्रहण करणारी संविद् रहात असल्यामुळें शून्यवादाची प्रसक्ति होत नाहीं. ती संविद् नाहींच असें म्हणतां येणें शक्य नाहीं. कारण संविद् नाहीं, असें म्हणणाऱ्या नास्तिकाचा अनुभवच तिची सिद्धि करितो. कारण स्वतःच्या अनुभवाचा कधींच कोणाला अपलाप करितां येत नाहीं, ह्मणजे त्यांना तो नाकबूल करतां येत नाहीं; आणि जो अनुभव तोच आत्मा, तोच सर्व प्रमाण-प्रमेय-व्यवहाराची पराकाष्ठा आहे. हेंच अनिर्वाच्य ब्रम्हतत्त्व होय. अशा सर्वगत ब्रम्हामध्यें हें जगद्वैचित्र्यस्वभावतत्त्व उत्पन्न होतें, असें म्हणतां येणें शक्य नाहीं. अर्थात तें मायिकच आहे, सत्य नव्हे. हे रामा, ब्रम्हवेत्त्यांनीं ज्याचें सेवन केलें आहे त्याचा परिहार करणें अशक्य आहे. तूं जें कल्याणस्वरूप, नित्य स्थित ब्रम्ह, तेंच होऊन रहा; आणि नंतर व्यवहारांत इतर लोकांप्रमाणें खा, पी व क्रिया कर. तूं तसा व्यवहार जरी करीत राहिलास तरी मुक्तच आहेस. कारण हा दृश्यबंध तुला नाहीं. २९.

---

# सर्ग ३० वा.

१ धैर्यवान् पुरुष ज्या दृष्टीनें अविद्येपासून उत्पन्न झालेली अहंतादि अनेकत्वभ्रांति सोडून ब्रह्ममध्ये स्थिर होतो, त्या दृष्टीचा उपदेश.

श्रीवासिष्ठः—अहंता जोंवर सोडली नाहीं, तोंवर ब्रम्हविचारहि प्रवृत्त होत नाहीं, व लाभ तर दूरच राहिला. अहंता हीच इतर सर्व अज्ञानाचें मूळ कारण आहे. ती निर्वाणपदाला झांकून टाकते. पण मूढ त्या अहंतेच्या योगानेंच निर्वाणपदाचा शोध करूं लागतात. तसें करणें हा वेडेपणाच आहे. अज्ञानापासून उत्पन्न झालेली अहंता हेंच मनुष्याच्या अज्ञतेचें चिन्ह आहे. धूर जसा अग्नीवांचून दिसत नाहीं; त्याप्रमाणें अहंता अज्ञावांचून दिसत नाहीं. शांत तत्त्वज्ञाच्या ठिकाणीं ' मम ' आणि ' अहं ' हे भाव नसतात. ज्ञानी सदेह असो कीं विदेह असो, अहंतारूप मल निःशेष टाकून आकाशाप्रमाणें शांत, निर्मल व दुःखरहित होतो. ज्याप्रमाणें ज्ञानी शोभतो त्याप्रमाणें शरत्कालचें आकाशहि शोभत नाहीं, शांत समुद्र शोभत नाहीं व पूर्ण चंद्राचें बिंब शोभत नाहीं. ज्याप्रमाणें युद्धाच्या चित्रांतील सैन्य अक्षुब्ध असतें, त्याप्रमाणें व्यवहार करीत असलेल्या ज्ञान्याची समता केव्हांहि ढळत नाहीं. पण ज्ञानी व्यवहार करतो, एवढ्यावरूनच त्याच्या ठिकाणीं पुनर्जन्माला कारण होणारी वासनाहि असेल असें अनुमान होतें. पण मी देह नव्हें, तर नित्य सिद्ध आत्मा आहें, अशा बोधानें ती वासनाहि लीन होते. ती जळलेल्या वस्त्राच्या विणीप्रमाणें नुसती भासमान असते. पण समुद्रावरील मोठी लाटहि जलाहून निराळी कांहीं वस्तु आहे हें जसें म्हणतां येत नाहीं, त्याप्रमाणें ती ज्ञानानें दग्ध झालेली वासना चिन्म-

यच आहे. समुद्र अतिशय क्षुब्ध झालेला असावा, त्यावर पर्वताच्या शिखरासारख्या मोठमोठ्या लाटा उंच उसळत असाव्या, तथापि तें सर्व जसें जलच, त्याप्रमाणें दृश्य जगाच्या आकारानें विकास पावलेलें ब्रह्महि निर्विकार ब्रह्मच आहे. 'तर मग ज्ञानी पुरुषाच्या सर्व वासना क्षीण झाल्यावर त्याचें लक्षण तरी काय असतें?' असें विचारशील तर सांगतों. जो मनामध्यें अनेक तरंग उठत असले तरी अक्षुब्ध, बाहेर शरीर—इंद्रियांनीं व्यवहार करीत असला तरी शांत, व अप्रिय गोष्टी घडल्या तरी प्रसन्न असतो त्याला युक्त म्हणतात. चिन्मय परमतत्त्वामध्यें चैतन्यच अहंत्वरूप सृष्टीच्या आकारानें जलतरंगन्यायानें स्फुरण पावतें. तेव्हां तरंगांच्या अनेकत्वाप्रमाणें जगांतील द्वैताची काय मोठी महती आहे! मेघांचे आकाशामध्यें हत्ती, रथ इत्यादि आकार असे दिसतात, पण ते मेघांतील धूमाहून केव्हांही भिन्न नसतात. तसे हे सर्व सृष्टींतील पदार्थ परमपदीं तद्रूपानेंच भासतात. अहो विद्वान् श्रोतृगण हो, तुम्ही विषाद मानूं नका. सर्व विषादांचें कारण प्रपंच आहे. पण तो संविदवर झालेला मिथ्या आभास आहे, असा विचार करून, त्याला अधिष्ठानरूपानें पहा. सर्व भ्रमांचें अधिष्ठान शुद्ध संविद् आहे, त्यामुळें सर्व प्रपंच संविद्रूप आहे असें पाहून तुम्ही मोठ्या आनंदानें आपलें आयुष्य घालवा. तुमचा विजय असो. माझ्या उपदेशानें तुम्ही आतां तत्त्वज्ञ झाला आहांत. पूर्वीप्रमाणें अज्ञ राहिलां नाहींत. जसा अंकुर वासनात्मक वृक्ष, पत्र, फल इत्यादिकांचा आपल्या स्वरूपांत संग्रह करतो, त्याप्रमाणें अज्ञ स्वात्मा वस्तुतः आकाशासारखा निर्मल असतांना त्यांत जगत् व अहंत्व यांचा अनुभव घेतो. म्हणजे अज्ञानानें आच्छादित झालेल्या चैतन्यांत तीं दोन्ही बीजरूपानें रहातात. यास्तव बाहेरील विषयसत्ता व आंतील मनःसत्ता या दोन्ही सत्ता अधिष्ठान चिद्रूपानें जरी सत्य असल्या तरी स्वरूपतः खऱ्या नाहींत. तर ज्याप्रमाणें पेटलेली उदबत्ती अतिशय वेगानें हालविली असतां अनेक आकारांचा भास होतो, त्याचप्रमाणें त्या सत्ता खोट्या असतात. किंवा एकाद्या विधुरानें मनोरथानें कल्पिलेल्या अबला जशा मिथ्या तशाच त्या सत्ता मिथ्या. यास्तव अहो श्रोते हो, सर्व जगाचा उदय कसा होतो, स्थितिकालीं त्यांतील व्यवहार कसे चालतात, त्याचा लय कसा होतो, त्यांतील देश व काल यांची काय स्थिति आहे, या सर्वांचा, उत्पत्ति, स्थिति व उपशम या प्रकरणांत सांगितलेल्या युक्तींनीं विचार करून व हें सर्व मिथ्या आहे असा निश्चय करून शांत रहा. व्यवहार करीत असतांना इष्ट व अनिष्ट यांची प्राप्ति होणें अपरिहार्य आहे. म्हणून तूं शवाप्रमाणें त्या दोन्ही प्रसंगीं शांत रहा. कारण जो मनांत अत्यंत शांत असतो, त्याला द्वैताचा अनुभवच येत नाहीं. जीवन्मुक्तांची मनोवासनारहित असलेली अहंता देहावसान होईपर्यंत ज्या जगाचें धारण करते, व त्याचा भोक्ता आयुष्य संपेपर्यंत जो जिवंत रहातो, तीं दोन्ही चिद्रूपच आहेत, त्यांत जडांशाचा लेशहि नाहीं; आणि तेंच परमपद आहे. चित्सत्ताच पाशानें बांधलेल्या मनुष्यांना दुःख भोगण्यासाठीं जीव व जगत् यांच्या प्रवाहानें, समुद्रांतील नौकेप्रमाणें, नेत असते. त्या संसारपाशानें बद्ध झालेल्या अज्ञ लोकांना मोक्षसत्तेचें कधीं स्वप्नहि पडत नाहीं. अज्ञान, जाड्य, यांचा अनुभव घेणें याच अपराधामुळें मोक्षसत्ता अज्ञानाचा आश्रय करीत नाहीं, भृगुपात[१], जल-

१ भृगुपात=स्वर्गाच्या इच्छेनें पर्वताच्या कड्यावरून स्वतःच उडी घेणें.

समाधि इत्यादि उपायांनीं मरण पावलेल्या मनुष्याला प्राप्त होणारें स्वर्गादि फळ जिवंतपणीं जसें मिळत नाहीं, त्याचप्रमाणें अज्ञ पुरुषाला ज्ञानानेंच मिळणारा मोक्ष दुर्लभ आहे. जें जें केवळ संकल्पानेंच प्राप्त होणारें असतें, तें तें त्याविषयींचा संकल्प टाकतांच नाश पावतें. असे संकल्पानें उत्पन्न झालेले पदार्थ जेथें संभवतच नाहींत, तेंच अक्षय सत्य पद होय. मी आत्मस्वरूपाहून भिन्न नाहीं अशी भावना करून तूं निर्भय हो. जसें मूढानें हें विष आहे अशा भावनेनें टाकलेलें अमृत तत्वज्ञाला टाकतां येत नाहीं, तो हें अमृतच आहे असें जाणून निर्भयपणें त्याचें प्राशन करतो, त्याप्रमाणें 'मी नाहीं' ही भावना अनात्मज्ञांना भयावह जरी वाटत असली तरी परमार्थदृष्टीनें तीच खरी व त्यामुळेंच ग्रहण करण्यास योग्य आहे. देहापासून चित्तापर्यंत सर्व शरीर जड आहे, असा विचार केल्यावर त्यांत 'अहं' कोठेंच सांपडत नाहीं. त्यामुळें 'मी आहें,' असें ह्मणणें खरें नव्हे. यास्तव सर्व शांतीची परमावधि जर कोठें असेल तर ती अहंताशांतींतच आहे. म्हणून दीर्घकाल विचार करून 'अहं' ही भावना शांत करावी. कारण तीच मुक्ति आहे. बर्फ जरी वितळलें तरी त्यांतील जलांश जसा थोडासाहि कमी होत नाहीं, त्याप्रमाणें अहंतेची जरी शांति झाली तरी आत्मस्वरूपांत कांहीं कमीपणा येत नाहीं. अहंताशांति ह्मणजे सर्वस्वाचा नाश आहे, असें समजूं नये. या अहंकारशांतिरूप मुक्तींत भोगत्याग, आत्मविचार व मनोनिग्रह यावांचून दुसऱ्या कशाचाहि उपयोग नाहीं. असा विचार करून अहो मुमुक्षूंनो, सर्व अनात्मवर्गाचा त्याग करा, व तत्त्वबोधानें आत्म्याचाच आश्रय करा. याप्रमाणें अहंतेपर्यंत सर्व द्वैताची शांति करून सर्व वासनाशून्य होऊन मनानें ब्रह्ममय होणें, ह्याच मोक्ष असें श्रुति व विद्वान् सांगतात. पण ही अवस्था ज्ञानावांचून केव्हांहि प्राप्त होणें शक्य नाहीं. तें ज्ञान—परम बोध म्हणजेच परब्रह्म जगद्भ्रमरूप बनतें. जगाचा आकार हा भ्रम आहे, सत्य नव्हे, ही गोष्ट मोक्षशास्त्रांत प्रसिद्ध आहे. परमात्मबोध झाला म्हणजे मग द्वैताचा अनुभव येत नाहीं, असें श्रुतीनें सांगितलें आहे; व विद्वानांचा अनुभवहि तसाच आहे. त्यामुळें अनेक जन्मांतील संस्कारांमुळें जगत् सत्य आहे, असा प्रत्यय जरी आला तरी त्यावर विश्वास ठेवूं नये. कारण जीवाच्या दीर्घ संसारबंधाला तोच कारण आहे. म्हणून शास्त्रादिकांवर विश्वास ठेवून हें जगत् व मी हीं दोन्ही असत् आहेत, वस्तुतः तीं नाहींत, असें श्रवण, मनन, अभ्यास यांच्या योगानें दृढ समजून, स्वशरीरापर्यंत सर्वांविषयीं निरपेक्ष होऊन, परमार्थतत्त्वाला जाणून व चिदाकाशस्वरूप होऊन पुरुष मुक्त होतो. पुनः जन्ममरणपरंपरेंत पडत नाहीं. आत्मज्ञान हाच त्याचा उपाय आहे. ३०.

---

## सर्ग ३१ वा.

—:०:—

१ चित्नें ग्रासलेलें अचित्रूप सत् असो कीं असत् असो, पण त्यांतील कांहींहि नष्ट होत नाहीं, याविषयीं निर्वाणस्थिति सांगितली जाते.

**श्रीवसिष्ठः**—मनांत जी असत्य वस्तु, किंवा अवस्तु कल्पिली जाते, तिचाच सर्वात्म्यामध्यें तत्काल अनुभव येतो. बाह्य वस्तूचा वारंवार परिचय केल्यानें मनांतील पदार्थच बाह्य पदार्थांच्या रूपानें स्फुरतो. याविषयीं आपलें स्वप्नाचाच दृष्टांत आहे. हें सर्व चिद्रूप आहे, चित् आकाशाहूनहि निर्मल आहे. घृत हिंवाळ्यांत जसें गोठून जातें, त्याप्रमाणें चित्च

जगदाकार धारण करतें, म्हणून जगत् चिद्रूपच आहे. या सृष्टींत वस्तुत: नाश नाहीं, अस्तित्व नाहीं, अनर्थ नाहीं, जन्म-मरण नाहीं, आकाश नाहीं, शून्यत्व नाहीं, अनेकत्व नाहीं; तर हें सर्व एक ब्रह्मच आहे. पण 'सर्व ब्रह्म आहे' हें ह्मणणें सुद्धां सापेक्ष आहे. तेव्हां वस्तुत: ब्रह्महि नाहीं. तर एक अनिर्वाच्य सच्चिदानंद-रूप आत्मतत्त्व मात्र आहे, बाकी सर्व भास आहे. जगत्, अहंत्व इत्यादिकांचा नाश झाला तरी वस्तुतः कांहीं नष्ट होत नाहीं. कारण असत् वस्तूचा नाश तरी कसा होणार? स्वप्नादिका-तील वस्तु मिथ्या आहेत, काल्पनिक आहेत, त्यामुळें त्यांतील कांहीं नष्टहि होत नाहीं. मिथ्या प्रतीत होणाऱ्या संकल्पनगरांतील पदा-र्थांचा नाश कसा होणार? त्याचप्रमाणें जगत्, अहंता इत्यादिकांचा नाश संभवत नाहीं. का-रण असत् पदार्थांच्या अधिष्ठानाचें स्वरूप कळल्यानें बोध होतो, नाश होत नाहीं. 'जर जगत् असें असत्च आहे, तर त्याची शास्त्रांत निंदा कां केली आहे? त्याला अनर्थ कां म्हटलें आहे? तें त्याज्य आहे असा निर्णय कां केला आहे?' असें विचारशील तर तें खरें आहे. असत् वस्तूची निंदा, त्या-विषयींचा विचार व निर्णय यांचा संभवच नाहीं. कारण आकाशपुष्पाची निंदा, विचार किंवा निर्णय कोणीहि करीत नाहीं. तथापि स्वाभा-विक स्वरूपस्थिति सिद्ध होण्यासाठीं असत् जगालाहि सत् मानून, त्याची निंदा करून, त्याविषयीं वैराग्य, विवेक, तत्त्वसाक्षात्कार इत्यादि उपाय कल्पिला आहे. कशाचीहि भावना न करतां यथाशास्त्र व यथासंप्रदाय योगभूमिकांचा क्रमानें अभ्यास करून पाषाणा-सारखें स्थिर होणें, हाच या शास्त्राचा सिद्धांत आहे. आत्मतत्त्वाचा हा असा निर्णय झाला. आतां स्वर्गादि जगत्स्वरूपाचा कसा निर्णय केला असतां तो फलद्रूप होतो तें सांगतों. जगत् केवळ संकल्पमात्र आहे. त्यांत तुला पुरुषार्थाचा जो आभास होतो, तो क्षणिक आहे, एका क्षणांत तो निःशेष शांत होतो, असा जगद्भ्रमाविषयीं निर्णय करावा. तूं कदाचित म्हणशील कीं, सुषुप्ति, मरण, व प्रलय या वेळीं जग आपोआपच क्षय पावत असतें. तेव्हां त्यासाठीं तें बोधमात्र आहे, असेंच ज्ञान संपादन करण्याची कांहीं गरज नाहीं. (म्हणून म्हणशील) तर सांगतों. जगत्, ब्रह्मरूप आहे असें जाणल्यानें जो त्याचा क्षय होतो, तो समूळ क्षय असल्यामुळें म्हणजे बीजासह त्याचा बाध होत असल्यामुळें तो सुषुप्ति व प्रलय यांतील क्षयासारखा पुन: उत्पन्न होत नाहीं. सुषुप्ति, मरण इत्यादि समयीं झालेला क्षय नित्य नसतो. त्या दशेंत संस्कारबीजरूपानें जगत् असतें; कार्यरूपानें नसतें, एवढेंच काय तें. ब्रह्मज्ञानानंतर जगाचा जो क्षय होतो, तो नित्य आहे. बीजरूपानेंहि जगत् रहात नाहीं. स्वप्नांतील जगाप्रमाणें ज्या असत् पुरुषांना जगाचें अस्तित्व भासतें, जगत् आहे असा भ्रम होतो, ते पुरुष व त्यांना भासणारा जग-द्भ्रम हे दोन्ही मृगजलांतील तरंगाप्रमाणें आहेत. वंध्यापुत्राच्या शब्दाप्रमाणें असत् असलेल्या सृष्टीचा सद्भाव मानणाऱ्या लोकां-च्या ज्ञानाचा निर्णय कसा करावा, हें आम्हांला कळत नाहीं. जगत्तत्त्व परिपूर्ण समुद्राप्रमाणें आनंदैकरस-पूर्ण आहे. ज्यांना ही पूर्णता अनुभवानें कळलेली असते, ते द्रष्टा, दृश्य,

१ रज्जूवर सर्पाचा भास होतो. पण रज्जूचें ज्ञान झालें, म्हणजे सर्पाचा भास खोटा ठरतो. यालाच बाध म्हणतात. २ नाश म्हणजे अदर्शन; स्थूल पदार्थांनें आपला आकार सोडून सूक्ष्म बीज-रूपानें रहाणें हाच नाश होय.

दर्शन इत्यादि द्वैतांत पडत नाहींत. ते वायुरहित प्रदेशांतील दिव्याप्रमाणें अचल असतात. प्रारब्धानुसार ते व्यवहार जरी करीत असले तरी व्यवहारशून्य असल्याप्रमाणेंच मनामध्यें अगदीं स्वस्थ रहातात. ज्ञानी पुरुषाची अंतःशीतलता परिपूर्ण समुद्राप्रमाणें कांहीं अपूर्वच दिसते. त्यांचें ज्ञान व त्यामुळें प्राप्त झालेली शांति हीं दोन्ही अवर्णनीय आहेत. वासनाच पुरुष आहे. तिच्याविषयीं विचार करूं लागलें असतां ती विद्यमान असलेली दिसत नाहीं. तिला कोणीहि कधीं पहात नाहीं. तिच्यापासून हा सर्व संसार झालेला आहे जें अंधकारामुळेंच भासणारें, तें प्रकाश आल्यावर रहात नाहीं. अंधकारांत भासणारें भूत, चोर वगैरे हेंच याचें निदर्शन आहे. स्थूल देहाची सामग्री पंचीकृत भूतांपासून उत्पन्न झालेली असते. त्याचप्रमाणें बुद्धि, अहंकार वगैरे सूक्ष्म शरीराची सामग्रीहि अपंचीकृत भूतांपासून झालेली असते. भूतें जड आहेत, त्यामुळें त्यांपासून झालेलीं स्थूल व सूक्ष्म शरीरेंहि जडच आहेत. यास्तव शरीररूपत्व टाकून, बुद्धि, अहंकार व चित्त, यांनाहि भौतिक समजून, त्यांच्या विषयींची आस्था सोडून, स्वप्रकाश चिन्मात्र स्वरूपानें अवस्थित होणें हाच भूमिकेचा उदय होय. आत्मचैतन्य लिंगशरीराशीं तादात्म्यभासानें मिळून गेलें असतां तें विषयोन्मुख होतें. त्यामुळें वासना उत्पन्न होते. पण केवळ आत्मस्थितीमध्यें चैतन्य विषयोन्मुखच होत नसल्यामुळें वासना कशी, कोठें व कोठून होणार ? ज्याला हा भ्रम होतो, तो स्वतःच जर मिथ्या आहे, तर मृगजलासारखा असलेला हा संसार, त्याला कोठून दिसणार ? कारण तत्त्वदृष्टीनें पाहूं लागलें असतां जीवच उपलब्ध होत नाहीं. मग त्याचा संसार कोठला ? यास्तव चित्तोदयच होऊं देऊं नये. आत्म्याला पहावयास प्रवृत्त झालेल्या पुरुषालाहि विषयाचें स्मरण होतें. त्यामुळें चित्ताचा उदय होतो. तोच पुनः संसाराची प्रवृत्ति करतो. यास्तव सर्व विषयांचा अनादर करून आकाशाप्रमाणें अंतःकरण शून्य करावें. पुनः विषयांचें स्मरण न होईल इतकें त्यांचें विस्मरण होणें, हेंच परम श्रेय होय. आत्माभ्यास करणारानें द्रष्टा, भोक्ता, आस्तित्व, नास्तित्व, इत्यादि कांहीं नसून सागरासारखें एक शांत आत्मस्वरूप आहे, अशी भावना करावी. सर्व दृश्य जगत् सत् ब्रह्म आहे, असा स्पष्ट अनुभव आला असतां जीव व त्याची उपाधि यांचा क्षय होतो. त्यानंतर जलाशयांतील जल आटून गेलें असतां बिंब-प्रतिबिंब भाव जसा नष्ट होतो, त्याप्रमाणें सर्व उपाधींचा बाध झाल्यावर संसाराचा क्षय होऊन एक शिवस्वरूप अवशिष्ट रहातें. परम तत्त्वामध्यें विश्रांति पावलेला समदर्शी पुरुष सर्व व्यवहार सोडून शांततेचा अनुभव घेतो, समाधि लावून बसतो, किंवा रागद्वेषरहित होऊन व्यवहार करतो. म्हणजे ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं प्रारब्धानुसार या दोन्ही गोष्टी संभवतात; किंवा जीवन्मुक्त पुरुषाची शांतिच अवशिष्ट रहाते, त्याचा व्यवहार संभवतच नाहीं. व्यवहार करणारा ज्ञानी सर्ववासनाशून्य होणें शक्य नाहीं. यास्तव आरंभीं व्यवहार सुटणें जरी शक्य नसलें, तरी सातव्या भूमिकेपर्यंत निश्चयानें अभ्यास करणाऱ्या पुरुषाला वासनाशून्य होतां येतें आणि निश्चयानें वासनाशून्य झालेला मुनि व्यवहार कसा करणार ? जोंवर त्याची शांति पूर्णतेला प्राप्त झालेली नसते, तोंवर त्यानें राग, द्वेष, भय, हर्ष सोडून व्यवहार करावा. कारण आसक्ति, भय व क्रोध यांना सोडून शांतचित्त व मुक्त झालेला मुनि वस्तुतः सचेतन असला

व प्राप्त व्यवहार करीत असला तरी नेहमीं शिळेप्रमाणें स्थिर रहातो. कमलबीजाच्या कोशांत सर्व कमलिनी जशी असते, त्याप्रमाणें आत्म्यामध्यें हा सर्व संसार आहे. स्वप्नांतील भ्रांति जशी मनोमय, तशीच सृष्टि आत्ममय बाह्य संसाराची कल्पना केली कीं तो बाहेर दिसूं लागतो व मनांत आत्मचिंतन केलें कीं, आत्माच दिसतो. परमतत्त्वामध्यें जी जी भावना करावी ती ती दिसूं लागते. मनांत जी स्वप्नादिकांची भ्रांति होते तीच ही बाह्य संसाररूपानें उदय पावली आहे. दोन पात्रां-तील पाण्याप्रमाणें स्वप्नभ्रांति व बाह्य संसार यांत मुळींच भेद नाहीं. दोन्हीं भ्रांतिमात्र आहेत. त्यामुळें दोन्हीं अवस्थांमध्यें स्थैर्य किंवा अस्थैर्य सारखेंच आहे. जल व तरंग यांच्या आधार-आधेयतेप्रमाणेंच स्वप्न व जागर किंवा चित् व त्या दोन अवस्था यांची आधार—आधेयता आहे. स्वप्नांत दिसणारे पदार्थ आत्ममात्र आहेत, असें अनुसंधान करीपर्यंतच ते भासतात. ते आत्ममात्र आहेत असें कळून आलें कीं तत्काल बाधित होतात. हाच न्याय जाग्रदवस्थेंतील संसाराला लागू आहे. संसार आत्म्याहून भिन्न आहे, अशी भावना केली कीं, तो दिसूं लागतो; व तो आत्मरूप आहे, असें चिंतन केलें कीं, तो निराळा दिसत नाहीं. साधक पुरुष, आत्म-भावनेनें सर्वसंकल्पशून्य व शांत परमात्मरूप बनतो व तशी भावना न केल्यास तो संसारी जीवच रहातो. स्वप्नादि सर्व विषयज्ञान शांत झालें असतां परमेश्वराचें शुद्धस्वरूप अवशिष्ट रहातें. तें आहे असें म्हणतां येत नाहीं, नाहीं असें म्हणतां येत नाहीं, वाणीचा विषयच होत नाहीं. 'तर मग गुरु त्याचा शब्दानें उपदेश कसा करतात?' असें म्हणशील तर सांगतों, सर्व भ्रांतीचा समूल लय झाला असतां, समाधिस्थ पुरुष स्वानुभवानेंच तें स्वरूप जाणतो. शब्दांनीं त्याचें वर्णन करतां येत नाहीं. अर्थात् गुरुहि शिष्यांना जो उपदेश करितात तोहि श्रोत्यांची बुद्धि मोक्षमार्गांत प्रवृत्त व्हावी, एवढ्यासाठींच असतो. गुरु किंवा शास्त्र उपाय सांगतात, त्याप्रमाणें अभ्यास करून आत्म-साक्षात्कार ज्याचा त्याला संपादन करावा लाग-तो. म्हणून हे रामा! तूं अहंकार टाक. भय, मान, विषाद, लोभ, मोह, मन, देह, मनन, इंद्रियें व चित्तजाड्य यांनीं रहित असलेलें शांत, अक्षय, अद्वय, अज आत्मस्वरूपच तूं हो. याप्रमाणें एक ब्रह्मरूप होऊन रहाणेंच उचित आहे. ३१.

---

## सर्ग ३२ वा.

—:०:—

१ साधूंचा समागम, सच्छास्त्रविचार व अभ्यास करणाऱ्या मुमुक्षूला अवश्य मोक्ष प्राप्त होतो, २ व तो त्याच्याच स्वाधीन असतो, असें उपपादन.

श्रीवसिष्ठ:—जेव्हां चिति विकास पावते, तेव्हांच अहंता व जगत् हा भ्रम खोटाच उदय पावतो. आकाशांत स्पंदामुळें जसें वायुत्व उत्पन्न होतें, तसाच हा जगद्भ्रम होतो. जगाला ब्रह्मरूप पाहिल्यानें उत्पन्न झालेला तो भ्रम खेदाला कारण होत नाहीं. पण त्याचें जगत् या रूपानें जर चिंतन केलें, तर तोच परम अनर्थाला कारण होतो. दृष्टि बाहेर पसरली असतां जशी रूपाचा अनुभव घेते, त्याप्रमाणें चिति विकास पावून म्हणजे बहिर्मुख होऊन जगद्भ्रमाचा अनुभव घेते; पण ती स्वत: निर्वि-कार आहे. त्यामुळें तिनें बाह्य विषयोन्मुख होणें हाहि एक चमत्कारच आहे. शिवाय, बाह्यविषय मिथ्या आहेत, त्यामुळेंहि स्वभाव-

त:च तिचें बहिर्मुखत्व संभवत नाहीं. पण आत्मज्ञान झाल्यावर ही गोष्ट कळते आणि त्यानंतर जगद्भ्रम खेदाला कारण होत नाहीं. चितीचा प्रसार असत् आहे. असत् वस्तूचें कार्य कसें दिसणार? वंध्यापुत्राकडून कधीं तरी कांहीं होणें शक्य आहे का? चैतन्याचा हा प्रसार अनुभवानेंच सिद्ध होणार. पण तो अनुभव आत्मज्ञानानें खोटा ठरला म्हणजे मग जगाचा जो भास होतो, तो लहान मुलाला दिसणाऱ्या बागुलबोवापेक्षां अधिक योग्यतेचा नाहीं. 'अहं' असें समजून अहंभाव धरणेंहि दुःखालाच कारण होतें. अहंभाव टाकला कीं, दुःख नाहीं. त्यामुळें बंध व मोक्ष स्वाधीन आहेत. विद्येमुळें मूळ अज्ञान नाहींसें झालें असतां चिदात्मैकरूपत्व प्राप्त होतें. त्यानंतर मन, बुद्धि इत्यादि सर्व अजड वस्तूंचें पाषाणादि जड वस्तूप्रमाणें जें निश्चल अज्ञान, वेद्यवेदभावरहित अवस्थान, तेंच ध्यान किंवा समाधि हो. त्यावरून मुक्ति ही उपलक्षित होते. हे पंडितंमन्य वादी जन हो! तुम्ही मूर्खाप्रमाणें द्वैतादि नाना विकल्प उत्पन्न करून वादविवादांनीं वृथा कंठशोष करूं नका. या परम सिद्धांताचेंच अवलंबन करा. बहिर्मुख पुरुषाला होणारें विषयज्ञान जसें अनिवार्य, तसेंच त्यांना होणारें दुःखहि अनिवार्य. पण अंतर्मुख पुरुषाला प्रारब्धप्राप्त दुःख भोगीत असतांनाहि स्वानंदानुभव येत असल्यामुळें जणुंकाय दुःखाचा अनुभव तो घेतच नाहीं. कारण स्वानंदानुभवानें त्या दुःखाला झांकून टाकलेलें असतें; त्यामुळें निजलेल्या पुरुषाला डांस, ढेंकूण वगैरे चावले तरी त्याला तें जसें समजत नाहीं, त्याप्रमाणें वासनारहित ज्ञानी पुरुषाला प्रारब्धप्राप्त दुःखाचा अनुभव येत नाहीं. अर्थात् वासना वाढली असतां ज्याप्रमाणें संसाराचा अनुभव येतो, त्याप्रमाणेंच ती अतिशय क्षीण झाली असतां मुक्तीचा अनुभवहि सिद्ध होतो. यास्तव योगाभ्यासादि उपायांनीं वासनेचा हळूहळू क्षय करावा. अत्यंत क्षीण झालेली वासना हीच मुक्ति होय. ती उपायानें क्षीण होतां होतां अगदीं निःशेष क्षय पावते. आकाशांतील ढग जसे उत्तरोत्तर क्षय पावून अगदीं नाहींसे होतात, त्याचप्रमाणें वासनांचा दीर्घ यत्नानें क्षय होतो. मीच ब्रह्म आहें, अशा भावनेनें ज्ञानाची अभिवृद्धि झाल्यावर वासना प्रतिदिवशीं सूक्ष्म होतां होतां शेवटीं स्वतः मुक्तिच बनते. म्हणजे ज्याप्रमाणें पंडितांच्या समागमामुळें व विद्याभ्यासामुळें ज्ञान वाढूं लागलें ह्मणजे मूढता क्षीण होऊं लागते व शेवटीं पूर्ण पांडित्य प्राप्त होतें, त्याप्रमाणें वासनेचा क्षय झाल्यावर मोक्ष मिळतो. किंबहुना, मूढतेचा क्षय ह्मणजेच जसें पांडित्य, त्याप्रमाणेंच वासनाक्षय म्हणजेच मुक्ति. पण हा बोध कोठवर वाढवावा, म्हणून विचारशील तर सांगतों. 'मी ब्रह्म आहें' या भावनेचा सतत अभ्यास केल्यामुळें येथें जिवंत असलेल्या किंवा परलोकीं गेलेल्या योग्याचा 'मी जीव नाहीं,' असा शमरूप निश्चय दृढ होईतों बोध दृढ केला पाहिजे. वायूमध्यें वायु हें द्रव्य व त्याचें स्पंदन ही क्रिया हें द्वंद्व जसें असतें, त्याप्रमाणेंच आत्मा व जगत् हें द्वंद्व भासतें. मी कोण व हें कसें, असा विचार केल्यानेंच त्याची शांति होते. मी नाहीं, इतका निश्चय केल्यानेंच जर शांति मिळणें शक्य आहे, तर तेवढ्यासाठींच मोहांत कां पडावें? सत्संगम व विचार यांच्या योगानें तत्त्वज्ञान तत्काल होतें. तत्त्ववेत्त्याच्या समागमानें 'मी' हें बंधन क्षीण होतें. प्रकाशानें जसा अंधकार जातो, किंवा दिवस उगवला असतां रात्र संपते, त्याप्रमाणें ज्ञानानें अहंरूप अज्ञान नाश पावतें. मी कोण, हें दृश्य

करणें? जीव कोण? व प्राणादिकांचें धारण करणें हें काय आहे? याचा तत्त्ववेत्त्यांच्या सहवासांत राहून मोक्षप्राप्तीपर्यंत विचार करावा. ज्याअर्थी तत्त्ववेत्त्यांच्या संपर्कानें जगत् बोधानें उज्ज्वलित झालें आहे असें भासतें व त्यामुळें सर्व पदार्थांच्या तत्वाला आच्छादित करणारें अहंरूप अज्ञान नाश पावून तत्काल वस्तुतत्व प्रतीत होतें. त्या अर्थी सत्समागम अवश्य करावा. रामा, जो जो अतिशय ज्ञानसंपन्न असेल त्या एकट्याचीच तूं उपासना कर. कारण एकाच वेळीं अनेक विद्वानांचा सहवास केल्यास त्यांच्या संभाषणांतूनच वादरूपी पिशाच उत्पन्न होतें, आणि विद्वान्हि एकदा अभिमानानें वाद करूं लागला म्हणजे त्याची बुद्धि कलुषित होते. तो स्वतःच्या मताविषयींच आग्रह धरतो, तर्कानें त्याचीच सिद्धि करूं लागतो, व त्यामुळें परमार्थापासून भ्रष्ट होतो. यास्तव शहाण्यानें निरनिराळ्या विद्वानांचा एकांतात सहवास करावा आणि त्यांनीं सांगितलेल्या सर्व गोष्टींचा स्वतःच्या बुद्धीनें चांगला विचार करावा. विचारशक्ति वाढविण्यासाठीं विद्वानांच्या उक्तींचें मनन करावें व सर्व संकल्पशून्य असलेलें जें सत्, तद्रूप व्हावें. विद्वानांच्या संगतीनें बुद्धीला अतिशय तीक्ष्ण करून अज्ञानरूपी लतिकेला छिन्नभिन्न करून टाकावें. मी जी गोष्ट सांगत आहे, ती सर्वथा संभवनीय आहे आणि म्हणूनच आग्रहानें सर्वांना सांगत आहें. हे श्रोते हो, आम्हीं त्याचा अनुभव घेतला आहे. व्यर्थ कांहीं तरी बोलत नाहीं. ज्याप्रमाणें आकाशांत मेघ, धुकें, ऊन्ह इत्यादि पसरल्यानें किंवा मोठ्या समुद्रावर तरंगादि उठल्यानें त्याचें कांहीं अनिष्ट होत नाहीं, किंवा कोणत्याहि इष्ट वस्तूची प्राप्ति होत नाहीं, त्याप्रमाणें संकल्परहित योग्याच्या इष्टानिष्टाचा नाश किंवा उदय होत नाहीं. परिपूर्ण परब्रह्माचा विचार केला असतां हें सर्व जगत् मृगजलासारखें भासतें. त्यामुळें 'अहं' असा पृथक् जीवभाव उरत नाहीं. आणि योग्याचा इतका उत्कर्ष झाल्यावर त्याच्या ठिकाणीं मननादि भ्रम कोठून होणार? ३२.

---

## सर्ग ३३ वा.

—:०:—

१. भ्रांतिकल्पना, २ प्रतिकल्पना, व ३ परलोकचिकित्सा.

श्रीवसिष्ठः—रामा, ज्ञानाधिकाराला योग्य अशा शरीरास प्राप्त झालेल्या पुरुषानें तत्त्वज्ञान जर संपादन केलें नाहीं, आपल्या शुद्धबुद्धीला सत्समागमानें विकासित करून ध्यान, समाधि इत्यादि प्रयत्नानें तो जर ज्ञानी झाला नाहीं, तर त्याला मोक्षप्राप्तीचा दुसरा कोणताहि उपाय नाहीं. ज्याप्रमाणें स्वभावतः मरणाला कारण होणारेंहि विष, रसायनशास्त्रांत सांगितलेल्या उपायानें अमृतासारखें रसायनहि होऊं शकतें, त्याप्रमाणें सर्व कल्पित वस्तु व वासना, अविद्या वगैरेंना शास्त्रीय उपायानें मोक्षसाधन करतां येतें, म्हणजे शास्त्रीय दृष्टीनें त्यांतील अशास्त्रीयता घालवून बंधाला कारण होणाऱ्याहि त्यांना मोक्षोपयोगी करणें, यांतच कौशल्य आहे. यालाच प्रतिकल्पना असें म्हणतात. सर्व कल्पनांची निवृत्ति होईपर्यंत अशी प्रतिकल्पना करीत राहिलें पाहिजे. सर्व कल्पनाराहित्य हीच मुक्तता. कारण पुरुष सर्व कल्पनारहित झाला म्हणजे त्याचें जें शुद्ध स्वरूप रहातें, तें निर्विशेष ब्रह्म होय. ही अवस्था वैराग्य व संन्यास यांच्या

योगानें सर्व विषयोपभोगांचा त्याग केल्यानेंच सिद्ध होते. त्यावांचून सिद्ध होत नाहीं. वैराग्य-पूर्वक भोगत्यागरूप संन्यास केल्यावर श्रवण व मनन यांच्या योगानें आत्मतत्वाचा निश्चय करून मनानें व वाणीनें शब्द व अर्थ यांची भावना करूं नये. म्हणजे वाणी व मन या दोन्हींचाही निरोध करावा. याप्रमाणें, वाक् व मन यांच्या क्रिया म्हणजे शब्दोच्चार व अर्थचिंतन यांना सोडून जो शांत रहातो, त्याच्या कल्पनेची शांति हळूहळू वाढत जाते. अहं या एका वृत्तीला सोडून अविद्या दुसरी कांहीं वस्तुच नाहीं; आणि सर्व भावनांना शांत करणारा तत्त्वसाक्षात्कार झाला व त्यामुळें अहंकार बाधित झाला, म्हणजे मग मोक्ष म्हणून दुसरें कांहीं रहात नाहीं. पण तत्त्वसाक्षात्कार झाल्यानंतरहि जगत्, जीव, संसार इत्यादिकांविषयीं आस्था ठेवून, हा स्थूल देह विद्यमान असेपर्यंत थोड्याशा अहंभावाचाहि तूं आश्रय करशील, तर परिपूर्ण परमानंदस्वरूपाला विसरल्यामुळें लागलीच संसारदुःखांत पडशील; आणि तूं अहंभाव टाकशील तर सर्व दुःखांपासून निवृत्त होशील. जो महात्मा बहिर्मुखवृत्ति न झाल्यामुळें हें सर्व सत् असलेलेंच जगत् असत्सें होऊन पहातो, ज्याला दगडाप्रमाणें त्याचें ज्ञान होत नाहीं, त्यामुळें जो अतिशय शांत असतो, त्याला खरोखर नमस्कार असो. पाषाणाला ज्याप्रमाणें कोणत्याहि वस्तूचें ज्ञान होत नाहीं, त्याप्रमाणें दृढ अंतर्मुख झाल्यामुळें ज्याला हें सर्व जगत् दिसत नाहीं, त्याचें चित्त परब्रह्मामध्यें लीन होऊन रहातें, त्यामुळें त्याला सर्व दृश्य शून्य होतें. केवळ चैतन्याचीच भावना केल्यामुळें ज्ञानी केव्हांहि बहिर्मुख होतच नाहीं आणि बहिर्मुख झाल्यावांचून दृश्य दिसत नाहीं. त्यामुळें शांतचित्त पुरुषाचें जगतूहि शांत होतें. रामा, हें दृश्य वस्तुतः असो कीं नसो, पण त्याचा प्रत्यय आला म्हणजे दुःखाची वृद्धि होते व त्याचा प्रत्यय येत नाहीं असें झालें म्हणजे सुख होतें. अर्थात् सुख व दुःख, बाह्य जगाला पहाणें किंवा न पहाणें यांवर अवलंबून आहे; तें खरें आहे किंवा खोटें आहे यांवर अवलंबून नाहीं. स्वप्नांत दिसणाऱ्या वाघाचेंहि भय वाटतें व दुःख होतें; पण गाढ निद्रावस्थेंत वाघाचा भास होत नाहीं. त्यामुळें भय, दुःखहि नाहींत. मन बहिर्मुख होऊन जगाची कल्पना करूं लागलें कीं, तें दिसतें व तें स्वरूपांत लीन झालें कीं कांहीं दिसत नाहीं. प्राण्यांच्यामागें दोन घोर व्याधि लागल्या आहेत. एक इहलोक व दुसरा परलोक. यांच्या योगानें तो असह्य दुःखें भोगतो. कारण, त्याला दोन्ही लोकांमध्यें आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक भाव अतिशय पीडा देतात. क्षुधा, तृष्णा इत्यादि या लोकांतील व्याधींची चिकित्सा सुज्ञ लोक अन्न-पानादि औषधांनीं मरेपर्यंत करतात, पण विषयोपभोग हें त्यांच्या निवृत्तीचें योग्य औषधच नसल्यामुळें त्यांना व्याधिरहित होतां येत नाहीं; आणि नरक, जन्मपरंपरा इत्यादि पारलौकिक व्याधींची चिकित्सा विषयोपभोगांनीं होऊंच शकत नाहीं. म्हणून जे पुण्यवान् पुरुष असतात ते पारलौकिक महाव्याधींचें निवारण, शम, सत्संग, ज्ञान इत्यादि अमृतांनीं करण्याचा यत्न करतात. जे परलोकाची चिकित्सा करण्यामध्यें अतिशय सावधान असतात, म्ह० विषयोपभोगरूप अपथ्याचें सेवन न करितां सत्संगादि औषधाचें सेवन करितात, ते शमरूप औषधाच्या शक्तीनें व्याधिरहित होतात; मोक्षमार्गांत निर्भयपणें संचार करितात; मुक्त होण्याची त्यांची इच्छा सफल होते. रामा, शम, सत्संग इत्यादि औषध येथेंच—या मनुष्यजन्मांतच सुलभ आहे.

यास्तव जो मानव नरकव्याधीची चिकित्सा येथेंच करीत नाहीं, तो साधुसमागम, सच्छास्त्र, जेथें मिळणें शक्यच नाहीं, अशा स्थावर-नरकादि योनींत जाऊन काय करणार ? हे अज्ञजनहो ! तुमचें जीवित इहलोकच्या व्याधींची चिकित्सा करण्यांतच क्षय न पावो. तर आत्मज्ञानरूप औषधानें परलोकव्याधीची चिकित्सा करा. आयुष्य वायूप्रमाणें चंचल व कमलाच्या पानावरील जलबिंदूप्रमाणें क्षणभंगुर आहे. यास्तव परलोकमहाव्याधीची चिकित्सा मोठ्या यत्नानें व सत्वर करा. परलोक-महाव्याधीची चिकित्सा मोठ्या यत्नानें व सत्वर केली असतां इहलोकरूप व्याधि आपोआपच शांत होते. त्यासाठीं निराळा यत्न करावयास नको. प्राणी संविन्मात्र आहे व त्या संविदेचें प्रसरण हेंच जगत् आहे, असें विद्वान लोक समजतात. त्यामुळें जगत् परमाणूंच्या उदरांतहि शेंकडों पर्वतांइतकें विस्तीर्ण आहे. कारण संविद् परिपूर्ण आहे. त्यामुळें ती परमाणूंतहि आपल्या स्वाभाविक पूर्णत्वानेंच रहाते. त्यामुळें परमाणूसारख्या अतिशय सूक्ष्म पदार्थांतहि रहाणाऱ्या तिच्यामध्यें अतिशय विस्तीर्ण जगाचें भान होणें अशक्य नाहीं. नेत्रांतील अति सूक्ष्म कनीनिकेंत हिमालयासारखा गगनभेदी पर्वतहि प्रतीत होतो हें प्रसिद्ध आहे. संवित्चें प्रसरण म्हणजेच बहिर्मुखतेनें मिथ्या विकास पावणें होय आणि तिनें बहिर्मुख होणें, म्हणजेच बाह्य विषय व काम-संकल्पादिक मनोविकार होत. त्या सर्वांचा अनुभव चिदाकाशांतच येतो. त्यामुळें जगद्रूप व्याधि सत्य नव्हे. तो मिथ्या असल्यामुळेंच सहस्रावधि प्रलय जरी झाले, तरी त्याची वास्तविक निवृत्ति होणार नाहीं आणि हजार वेळां जरी सृष्टि झाली, तरी ती खरीच आहे, तिला पारमार्थिक सत्ता आहे, असें म्हणतां येत नाहीं. कारण जगत् हा दृश्य या नांवाचा मोठा भ्रम आहे. केवळ भ्रांति हेंच त्याचें स्वरूप आहे. त्यामुळें केवल आत्मज्ञानानेंच त्याची निवृत्ति होईल. भोगरूप पंकार्णवांत रुतलेल्या आत्म्याला स्वतःच्या दीर्घ प्रयत्नानेंच जर वर न काढलें; तर त्याच्या उद्धाराला अन्य उपाय नाहीं. ज्यानें आपल्या मनाला जिंकलेलें नसेल, तो मूढ भोगरूप पंकांत रुततो, आणि सर्व जगाचें सागर हेंच जसें एक पात्र आहे, त्याप्रमाणें तो सर्व आपत्तींचें एक पात्र बनतो. आयुष्याची पहिली अवस्था बाल्य ही आहे, त्याचप्रमाणें मोक्षाचा पहिला उपाय भोगत्याग आहे. त्यामुळें आसक्तीची शांति होते. ज्ञानी पुरुषाची जीवितनदी अनेक तरंगांनीं जरी युक्त असली, तरी ती अक्षुब्ध असते. चित्रांतील नदीप्रमाणें ती सम व सौम्य वहाते. पण अज्ञ पुरुषाची जीवितनदी अतिशय भयंकर असते. अनेक प्रकारच्या ध्वनींनीं ती चित्तवृत्तीला अतिशय क्षुब्ध करते. नानाप्रकारचे दुःखरूपी तरंग त्यांत उद्भवतात. अज्ञ पुरुषांच्या अविचारामुळेंच सृष्टि, स्थिति, प्रलय इत्यादि संविद्चे मिथ्या विकास अनुभवास येतात. पण त्यांची योग्यता दोन चंद्र, बालकांनीं कल्पिलेला वेताळ, मृगजल व स्वप्न यांहून अधिक नाहीं. चिदाकाशामध्यें संविद् बहिर्मुख झाल्यामुळें मिथ्या जगत् सत्य असल्यासारखा अनुभव येतो. पण आकाशांत दिसणाऱ्या गंधर्वनगराप्रमाणेंच तो भासमात्र होय. सृष्टिभ्रम हा संविद्विकासरूप जलावरील बुडबुडा आहे. 'अहं' इत्यादि भावविकारांच्या रूपानें तो परिणत झाला आहे. संविद्ची शांति, ह्मणजे अंतर्मुखता हाच जगाचा अभाव, व तिचें उन्मीलन हेंच जगत्. तें वस्तुतः आंत नाहीं, बाहेर नाहीं; असत्य नाहीं व सत्यहि नाहीं; तर तें सर्व

चिद्रूप, अज, अव्यक्त, एक, अव्यय, ईश्वर, स्वत्व-भावत्वरहित व आकाशाहूनहि अत्यंत शांतरूप ब्रह्म आहे. तें ब्रह्म निर्विशेष असल्यामुळें सृष्टीचें ज्ञान वायूच्या स्पंदाप्रमाणें केवल काल्पनिक आहे. अविद्येमुळें झालेला तो भ्रम आहे. वायूच्या स्पंदाला जसें कांहीं कारण नाहीं, त्याप्रमाणें त्या भ्रमाल हि वास्तविक कांहीं कारण नाहीं. स्वप्नांतील अनुभवाप्रमाणें ती भ्रांति आहे, ब्रह्मसागरांतील ते ब्रह्मरूपतरंग: आहेत, पण वस्तुतः त्यांत स्वप्नहि नाहीं व सृष्टीहि नाहीं. हें एकच निराभास, चित्त्व या नांवाच्या धर्मांतरानें रहित, अजड, सम, अद्वय, अव्यय आहे. तें सत् नाहीं, असत् नाहीं व सदसत्‌हि नाहीं. रामा! अशा ब्रम्हभावानें स्थित असलेल्या ज्या योग्याच्या संविदेची पूर्णपणें शांति झालेली असते, त्याला मुनि असें म्हणतात. त्याची संविद् बाह्य विषयांचें ग्रहण करीत नाहीं. एखाद्या मृन्मय पदार्थाप्रमाणें ज्याला दृश्याचें ज्ञानच होत नाहीं व त्यामुळें ज्याचें अहंकारासह सर्व जगत् विगलित झालेलें असतें, त्याला श्रेष्ठ मुनि म्हणतात. जसें सकल्पनगर असंकल्पामुळें शांत होतें, त्याप्रमाणें चैतन्य बहिर्मुख झाल्यामुळेंच उद्भवणारें जगत् व अहं, चैतन्याला अभ्यासानें शांत करून बाह्य पदार्थांना विसरलें कीं, तीं दोन्ही चैतन्यांतच शांत होतात. सर्व जड वस्तूंमध्यें जाड्य अनुगत असतें. तोच स्वभाव व तीच मूळ अविद्या. त्या एका अविद्येला सोडून सर्व नाम व रूप सहेतुक आहेत. म्हणजे त्या अविद्येमुळें उद्भवलेलीं आहेत. त्या स्वभावाचा किंवा मूलविद्येचा साक्षी आत्मा असून त्याच्यामुळेंच अविद्येची सिद्धि होते. यास्तव साक्षीमुळेंच सिद्ध होणाऱ्या अविद्यादिकांचें निरसन करून त्यांची उपेक्षा करून मी साक्षिमात्र आहें, असा अनुभव घेणें, म्हणजे स्वतः साक्षी चिन्मात्र आहे असें समजणें ही मुक्ति होय. या सृष्टींत अविद्यानाशानंतर कोणत्याहि पदार्थाचें जाड्य अवशिष्ट रहात नाहीं, तर ज्ञानी योग्याला सर्व अनुभव चिदेकस्वरूप भासतात, त्याला सर्व जगत् आनंदमय दिसतें दुःख व अज्ञान यांचा गंधहि अनुभवास येत नाहीं. त्याचे सर्व अनुभव म्हणजे महाचिद्रूप वायूचे स्पंदच आहेत. ते अनुभव म्हणजे ब्रम्हाकाशाची शून्यता आहे, असें समजावें. वायु व त्याचा स्पंद यांचा भेद जसा काल्पनिक, त्याप्रमाणेंच ब्रह्म व जगत् यांचा भेदहि असत्य आहे. स्वप्नांत आपलें मरण आपणच जसें अनुभवतों, तशीच जगत् ही भ्रांति आहे. आणि कोणतीहि भ्रांति तत्त्वार्थाचा विचार करीपर्यंतच असते. योग्य मार्गानें विचार केला म्ह० जगत्-भ्रांति ब्रम्हत्वाला प्राप्त होते. भ्रांति मिथ्या असते, त्यामुळें विचार केला असतां भ्रामक पदार्थ सशाच्या शिंगाप्रमाणें उपलब्ध होत नाहींत. भ्रांतींतील सत्ता व स्फूर्ति हा ब्रम्हाचाच अंश असतो. त्यामुळें विचारानें भ्रामक पदार्थांचा बाध होऊन त्यांतील ब्रम्हांश ब्रम्हामध्यें जाऊन मिळतो आणि शेवटीं अतिशुद्ध ब्रम्हच अवशिष्ट रहातें. हे रामा, तूं देहावरील आसक्तीमुळेंच होणाऱ्या जरामोहादि भ्रांतींचा त्याग करून आदि-मध्य-अंतरहित, अनंत, निर्मल, सम, शिव, शाश्वत व एकच ब्रम्हाकाशत्वाला प्राप्त हो. ३२

---

# सर्ग ३४ वा.

—:०:—

१ जगत् दृष्टिसृष्टि आहे, त्यामुळें केवळ अदर्शनानेंच त्याचा क्षय होतो, असा जो वाद येथें सुरू केला आहे, त्याविषयीं उपपत्ति.

**श्रीवसिष्ठः**—हे रामा! प्राप्त झालेल्या सुखदुःखांतील जो अंश नाश पावतो, तो नाशिवंत म्ह० मिथ्या. जो नाश पावत नाहीं, तो अविनाशी म्ह० सत्य. एवढी एक गोष्ट समजली, म्हणजे शास्त्रोपदेशाचें कांहीं कारण उरत नाहीं. जो इच्छादि वृत्तींनीं युक्त असतो, तो नित्य दुःखी होतो. इच्छाशांतीनें त्यालाच केव्हां केव्हां सुखहि होतें. इच्छादि विकार चित्ताला होतात, आत्म्याला होत नाहींत, म्ह० वस्तुतः आत्मा सुखीहि नाहीं, व दुःखीहि नाहीं. यास्तव सुखदुःखांची पूर्णपणें चिकित्सा करावी असें ज्याला वाटत असेल त्यानें प्रथम इच्छेचाच त्याग करावा. 'हा मी, हें जगत्' ही भ्रांति परमपदीं नाहीं. हें सर्व शांत निराधार, अव्यय, निर्वाण आहे. मी, ब्रह्म, जगत् या शाब्दिक भ्रमाला अति शांत चिदाकाशांत विषयच नाहीं. तेव्हां त्याची कल्पना कोण कशी करणार? आणि येथें अहं, जगत्, ब्रह्म इत्यादि शब्दच जर नाहींत तर कर्ता व भोक्ता हे भाव तरी कोठले? कारण एक शांत चिद्रूपच हें सर्व आहे. 'अहो पण कर्ता, भोक्ता इत्यादि सर्वांचाच जर निषेध केला, तर मग ज्ञानाचा उपायहि रहाणार नाहीं!' म्हणून म्हणशील तर सांगतों. सर्व पदार्थांचा जरी निषेध केला तरी उपदेशाचा विषय जें ब्रह्म तोच स्वात्मा असल्यामुळें त्याचा निषेध होऊंच शकत नाहीं. सर्व मिथ्या पदार्थांच्या निषेधाची पराकाष्ठाच ब्रह्म आहे. त्यामुळें निषेधमुखानें सर्व विषयांचा बाध करून अवशिष्ट रहाणाऱ्या ब्रह्माचा लक्षणेनें उपदेश करतां येतो. सर्वांचा बाध झाल्यावर 'त्या बाधालाहि जाणणारें जें तत्त्व अवशिष्ट रहातें, तेंच ब्रह्म आहे, तोच आत्मा आहे.' असा उपदेश करतां येतो. तो ऐकून शिष्य सर्व अनात्मवस्तूंचा 'हें मी नव्हें' असें म्हणून बाध करितो, आणि शेवटीं तो स्वरूपानेंच अवशिष्ट रहातो. अर्थात् उपदेश केवल मार्गदर्शक आहे. आतां नुसत्या अदर्शनानेंच दृश्याचा बाध कसा होतो, म्हणून विचारशील तर सांगतों. आपल्या समोर सिद्ध, पिशाच वगैरे उभे असतात, पण त्यांच्यांतील अंतर्धानशक्तीमुळें, त्यांच्या भयंकर चेष्टाहि कशा होतात तें आम्हांला कळत नाहीं. किंवा एकाच जागीं असलेल्या दोन पुरुषांपैकीं एक स्वप्नांत मेघाचें गडगडणें ऐकतो व दुसरा जागा असून तें ऐकत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. कारण ज्या पदार्थाचें ज्ञान व्हावयाचें तदाकार वृत्ति बनली पाहिजे. अंतःकरणांत जो पदार्थ व्यक्त होतो त्याचाच अनुभव येतो असा नियम आहे. सिद्ध किंवा पिशाच यांचा संचार गुप्त असल्यामुळें अंतःकरण तदाकार होऊं शकत नाहीं. त्यामुळें त्याचा अनुभवहि येत नाहीं. एकाच्या स्वप्नांतील गडगडणें दुसऱ्याला न ऐकूं येण्याचें हेंच कारण आहे. अंतःकरणानें पदार्थाकार होणें म्हणजे त्यांतील ज्ञानानेंच तदाकार होणें आहे आणि ज्ञान हेंच आत्म्याचें रूप आहे. त्यामुळें जें जें भासतें, तें तें सर्व तन्मय आहे. तस्मात् अहंकारासह सर्व जगत् परमात्म्याहून भिन्न नाहीं. संकल्प आणि स्वप्न, यांतील पदार्थांप्रमाणें ज्ञप्तिच जगद्रूपानें भासते. ती वस्तुतः निरवय आहे, तथापि जलावरील ऊर्मींप्रमाणें सावयव जगाच्या आकारानें भासते. एक आत्माच, ज्ञप्ति बहिर्मुख झाली असतां, अज्ञानानें तिच्यामध्यें मिथ्या विकार उत्पन्न

झाला असतां, अनेकत्वास प्राप्त होतो. पण तें अनेकत्व मिथ्या असल्यामुळें तत्वदृष्टीनें त्याचा विचार करूं लागलें असतां तेंच उपलब्ध होत नाहीं. ज्याप्रमाणें वस्तुतः अवयवशून्य असलेला हा जीव आपल्या कल्पनेनें हस्तपादादि अवयवांनीं स्वप्नांत सावयव होतो, त्याप्रमाणें नित्य, निरवयव व शांत ब्रम्ह जगत् बनतें. चिद्रूप सोन्याची चीप जगद्रूप विविध अलंकाराकार धारण करते. ती ज्याचें ज्याचें स्मरण करते, तो तो पदार्थ पुढें पहाते, ह्मणजे तिच्या कल्पनेप्रमाणें जगत् दिसतें. समुद्र द्रवरूप असल्यामुळें तरंगादि आकारांनीं जसा भासतो, त्याचप्रमाणें ब्रम्हच चिद्रूप असल्यामुळें आपल्या सत्तेनें जणुं काय जगद्रूपानें परिणाम पावतें. तें स्वरूपांत ज्याची ज्याची कल्पना करतें, तें तेंच पहातें. त्याला वास्तविक रूप नसतांनाहि तें स्वरूप पहातें, आणि ज्याची कल्पना करीत नाहीं, तें त्याला दिसताहि नाहीं. ब्रम्हच सर्वेश्वर असल्यामुळें,—सर्व शक्तींनीं संपन्न असल्यामुळें, आपल्या देहभूत मात्रेंत चेतन व अचेतन या शब्दांना अवकाश देतें. पण चेतन व अचेतन ही उक्तिहि उपदेशार्थच आहे. त्यांचा विषय वस्तुतः विद्यमान नाहीं. जगत् सत्‌हि नाहीं व असत्‌हि नाहीं. तें चित्तत्त्वांत संकल्पामुळें भासतें. त्याविषयींचा संकल्प टाकला कीं भासत नाहीं. तेव्हां त्यांतील पदार्थांविषयीं आम्हीं काय आग्रह धरणार? वायूच्या स्पंदाप्रमाणें आत्म्याचे चेतन व अचेतन हे भाव आहेत. ते आपल्या स्वाधीन आहेत, यत्न व श्रम यांनीं साध्य होणारे नाहींत. निश्चल स्फटिकांत स्वभावतःच दिसणारीं व अदृश्य होणारीं सहस्रावधि प्रतिबिंबें जशीं यत्नसाध्य नसतात, त्याप्रमाणेंच आत्म्यांतील ते भाव स्वाभाविक आहेत. ज्याचें प्रमाणपूर्वक निरूपण करूं लागलें असतां सत्ता, आधार व कारण यांची उपलब्धि होत नाहीं, तो अहं या नांवाचा यक्ष कोठून उत्पन्न झाला आहे, हें कळत नाहीं. ज्या अहंयक्षाची वास्तविक सत्ताच संभवत नाहीं, त्यानें तुम्हांला परवश करून टाकलें हें मोठें आश्चर्य आहे. ब्रम्हामध्यें अहं हा भ्रम काकतालीयन्यायानेंच भासतो. आकाशांत केसासारख्या रेघा जशा दिसतात, त्याप्रमाणें दृष्टीला भ्रम झाला असतां, अहंचा उदय होतो. ब्रम्हच जर अहं व जगत् आहे, तर त्याचा नाश व उत्पत्ति कोठली? व त्यांच्या अभावीं हर्ष व विषाद यांना अवकाश कोठला? ईश्वर सर्वशक्तिमान् असल्यामुळें कल्पना केली कीं लागलेंच जगत् दिसतें. कल्पनेच्या अभावीं कांहीं दिसत नाहीं. यास्तव तूं कल्पनाशून्य हो. रामा, तुला जगाचें दर्शन न होवो. तीच सर्व दृश्यमार्जनरूप मुक्ति आहे. तोच परमपुरुषार्थ, व तेंच परमफल. हे रामा, वर वर्णन केल्याप्रमाणें जगालाहि चित्त्व आहे. त्यामुळें ब्रह्माकाश स्वप्न व संकल्पनगर याप्रमाणें अकस्मात् विपरीत रूपानें भासतें. पण वास्तविक पहातां तें त्याहून भिन्न कसें असणार? आणि जगत् ब्रह्माहून भिन्न आहे, असें जर म्हटलें तर त्याला सत्ता व स्फूर्ति कोठली? आणि सत्ता व स्फूर्ति यांच्या अभावीं त्याला खरें तरी कसें म्हणावें? निश्चल जलामध्यें जशा ऊर्मि, न खोदलेल्या लांकडामध्यें जशी प्रतिमा, भूमीमध्यें उत्पन्न न झालेले जसे घटादिक, तसें ब्रम्हामध्यें सृष्टित्व अव्यक्त असतें. निराकार, निरवयव, निर्मल सत्त्वामध्यें ज्याचा अनुभव घेतला जातो, तें तेंच आहे, असें वाटूं लागतें. पण विचार केला तर 'अहं' कोणता? व 'जगत्' कोणतें? वायूचें स्पंदवैचित्र्य जसें वायूच्या सत्तेनेंच भासतें, त्याप्रमाणें अविद्याशून्य ब्रम्ह-

सत्तेनें जगदादि व अहमादि भासतें. ज्याप्रमाणें मेघामध्यें वृक्ष, हत्ती, अश्व, हरिण इत्यादि मिथ्या भास दिसतात, त्याप्रमाणें परब्रह्मामध्यें जगत् व अहंता भासते. सर्व सृष्टि परमशिवामध्यें अवयवयुक्त भासते. कार्य व कारण यांचाच दृष्टांत तिच्या त्या प्रतिभासाला योग्य आहे. ज्याप्रमाणें वटादि वृक्ष हें कार्य असून त्याचें बीज कारण असतें, आणि त्या सूक्ष्म बीजापासून वृक्ष, शाखा इत्यादि कार्य विस्तार पावतें, त्याप्रमाणें अतिसूक्ष्म ब्रह्मापासून अति स्थूल सृष्टि उदय पावते. बीजामध्यें नसलेले अवयव कार्यांत व्यक्त होतात. अर्थात जगत् स्वात्मव्यतिरिक्त संभवतच नसल्यामुळें मनांत अतिशय शांत, आयासशून्य, उपाधिरहित व भ्रमशून्य आकाशाप्रमाणें सम रहावें. वस्तुत: तुम्ही नाहीं, आम्ही नाहीं, जगत् नाहीं, व आकाशांतील भूतें नाहींत, तर हें सर्व शांत व परिपूर्ण ब्रह्मच आहे. सर्व पदार्थ विचारानें समान झाले असतां, विशेषभ्रमाचा त्याग करावा. विशेषत: सर्व सोडणें व अविशेषरूप होणें, हीच परमार्थ स्थिति होय. तीच चित् मी आहें, अशी भावना करावी. बहिर्मुख होऊन विषयांना जाणणें, हेंच बंधन व स्वातिरिक्त वस्तूला न जाणणें हाच मोक्ष आहे, असें जाण. ही अवस्था प्राप्त झाल्यावर तूं प्राप्तव्यवहार करीत रहा. योगभूमिकांचा क्रमानें अभ्यास कर. द्रष्टा दृश्याकडे जात नाहीं. चिति चेत्य विषयाकडे जात नाहीं व चेत्याच्या अभावीं जगत्‌हि भासत नाहीं. अशा स्थितींत कोण, काय व कसें जाणणार ? द्रष्टा व दृश्य यांचाच अभाव झाल्यामुळें जाग्रदवस्थेंतच सुषुप्तीप्रमाणें निर्विषय होऊन रहावें. शरत्कालच्या आकाशकोशाप्रमाणें निर्मल होऊन रहावें. वायूच्या स्पंदाप्रमाणें ब्रह्मामध्यें अज्ञानानें द्वैत दिसतें. चित् व अचित् हा भेद पहाणें, हीच सृष्टि व ऐक्यदर्शन हाच मोक्ष होय. ब्रह्मरूप वायूचा चिद्रूप स्पंद हीच सृष्टि असल्यामुळें चित्स्पंदन न होणें हेंच निर्वाण आहे. बीजांत असलेला वृक्षच शाखा-पल्लवादि रूपानें विकास पावतो, म्हणजे तें जसें बीजाचेंच रूप आहे, त्याप्रमाणें महाचित्तत्वामध्यें असलेलें स्वरूपच सृष्टीला जाणतें. बीजच पर्णादिरूपानें विकास पावून त्यांत त्या आकारानें स्थित होतें, त्याप्रमाणेंच ब्रह्मचित्‌हि सृष्टीला जाणूं लागली, म्हणजे सृष्टि बनते. वृक्षाच्या सहा भावविकारांचाहि सृष्टीला योग्य दृष्टांत आहे. बीजापासून वृक्षाच्या पुष्प—फलापर्यंत ज्या अवस्था क्रमानें होतात, त्या सर्व बीजामध्यें पूर्वींच असतात; पण व्यक्त नसतात; तर बीजाला भूमीमध्यें पेरलें म्ह० त्यापासून अंकुर होतो. हीच जन्मरूप पहिली भावविक्रिया होय. नंतर त्याचें अस्तित्व सुरू होतें, तीच अस्तित्वरूप दुसरी विक्रिया. पुढें तोच अंकुर वाढूं लागतो. हीच वृद्धि या नांवाची तिसरी विक्रिया. त्यानंतर वृक्षाचे बुंधे व शाखा हे त्याचेच परिणाम होत, ही विपरिणाम या नांवाची चवथी विक्रिया होय, कांहीं काळानें त्यांचा क्षय होऊं लागतो, ही अपक्षय या नांवाची पांचवी विक्रिया, व शेवटीं त्याचा नाश होतो. हीच शेवटली सहावी विक्रिया होय. सृष्टीचें बीज चिति आहे. तिच्यापासूनच जगत् हा परिणाम होतो. बीजभूत चितीपासून स्थूल सृष्टीपर्यंत वरील सहाहि भावविक्रिया बीजरूप चितीमध्यें होतात. अर्थात् सृष्टि हा चित्‌चाच विकार असल्यामुळें चिद्रूप आहे. हें सर्व जगत् निर्विकार परब्रह्ममय आहे. त्याच्यामध्यें जे भावविकार दिसतात, तेहि काल्पनिक असल्यामुळें सर्व निर्विकार, आदि-अंतरहित, व निरामय आहेत, असें जाणावें. हा द्वैताद्वैत

विकार स्वसंकल्पमात्र आहे. त्यामुळें आपणच संकल्पाचा त्याग केला म्हणजे तो आपोआप क्षय पावतो. याविषयीं संकल्प–नगराचा योग्य दृष्टांत आहे. शून्यत्व व आकाश यांचा भेद जसा तूं केवल कल्पनेनें जाणतोस, त्याप्रमाणें ब्रह्म व सृष्टि यांचा भेद काल्पनिक व युक्तिशून्य आहे, असेंच तूं समज. सृष्टीच्या पूर्वी ब्रह्माची जी महाचिद्रूपिणी शांत सत्ता होती, तीच स्वतः अज्ञानामुळें अहंत्वाला प्राप्त झाली आहे. 'मी मनुष्य आहें' ही भावना सुद्धां अहंकारामुळेंच होते. या जगद्रूप ब्रह्मामध्यें वस्तुतः कांहींसुद्धां उत्पन्न होत नाहीं, व जलतरंगन्यायानें उत्पन्न झालेलें कांहीं नाशहि पावत नाहीं. पदार्थरूपानें व ब्रह्मरूपानेंहि स्थित असलेलें जगत्तत्व आपल्या निर्विकार स्वरूपांतच रहातें. जसा वृक्षादि अवयवी आपल्या अवयवांत, आकाश आकाशांत व जल जलांत एकरूप होऊन रहातें, तसें ब्रह्म एकरूप स्थित आहे. संवित् अर्ध्या निमिषांत आकाशांतील चंद्राला पहाते. आपल्या नेत्रापासून चंद्रापर्यंत मध्यें असलेलें जें अंतर त्यांतहि संविद् असतेच. पण विषयाच्या अभावीं प्रकट होत नाहीं. तोच तिचा स्वभाव होय. तेंच तिचें निरुपाधिक व निर्विषय स्वरूप आहे. रामा, त्याच स्वरूपाची तूं उपासना कर. हे दाशरथे! शास्त्रज्ञ विवेकी या संविदेचें स्वरूप दोन प्रकारचें सांगतात; एक सविवर्त, व दुसरें निर्विवर्त. पहिलें रूप अज्ञजनांच्या अनुभवांनीं सिद्ध झालेलें असतें व दुसरें कूटस्थ, पूर्ण, आनंद एकरस असतें. पहिल्याला क्षुब्ध व दुसऱ्याला अक्षुब्ध म्हणतात. त्यांतील ज्या स्वरूपाच्या आश्रयानें तूं परम पुरुषार्थ सिद्ध करण्याची इच्छा करीत असशील, त्यामध्येंच एकनिष्ठ हो. विचार न करितां कांहीं तरी समजून अविवेकी बनूं नकोस. ३४.

---

# सर्ग ३५ वा.

—:०:—

१ आत्मा अखंड एकरूप आहे, या गोष्टीचा अनुभव येण्यासाठीं सत्य व मिथ्या या दोन्ही रूपानें भासणाऱ्या ब्रह्माचे वर्णन.

**श्रीवासिष्ठः**—संविद् क्षणांत एका देशाहून दुसऱ्या दूर देशीं प्राप्त झाली असतां मध्यें जें निर्विषय रूप असतें, तेंच परमात्म्याचें परमरूप होय. तूं जातांना, ऐकतांना, स्पर्श करीत असतांना, वास घेतांना, निमिषोन्मेष करतांना, किंवा हंसतांना केवळ आत्ममय होऊन रहा. निर्विषय चिन्मात्र ब्रह्म तूं हो. म्हणजे तुला कांहीं पीडा होणार नाहीं. त्यामुळेंच तूं जीवन्मुक्तीचा अनुभव घेशील. त्या स्थितीचा अनुभव घेत असतांनाच आपला कुलाचार न सोडतां, तूं व्यवहार जरी केलास तरी स्वरूपापासून ढळणार नाहींस. कारण, तुझें चित्त वासनाशून्य झाल्यावर तुला द्वैताचें भानच होणार नाहीं. हीच परमस्थिति होय. द्वैत अविद्येचें कार्य आहे, हें जाणण्यास एकच प्रमाण पुरे आहे. तें कोणतें? तर विचारपूर्वक पाहूं लागलें असतां तें उपलब्ध होत नाहीं. प्रमाणपूर्वक निरूपण करूं लागल्यावरही जर अविद्या उपलब्ध झाली असती, तर तिला पराविद्याच म्हणतां आलें असतें. पण तसें होत नाहीं. आणि द्वैताचें कारण जी अविद्या तिचाच जर संभव नाहीं, तर विषय व त्यांचें ग्रहण करणारा जीव हे कोठून संभवणार? आणि द्वैताचा जर असंभवच आहे, तर विद्वानांच्या मनांत त्याची स्फूर्ति तरी कशी होणार?

याप्रमाणें विचार केला ह्मणजे मनांत शांतीचाच उदय होतो. ब्रह्म सत्य आहे, जगत्‌हि ब्रह्ममय असल्यामुळें सत्य आहे ब्रह्म व जगत् यांचा पारमार्थिक भेद नाहीं. एकच तत्त्व अनेकाकार होऊन राहिलें आहे. ब्रह्म सर्व आहे म्हणजे परिपूर्ण आहे, तथापि तें असर्व म्हणजे परिच्छिन्न असल्यासारखें भासतें. तें शुद्ध आहे, तथापि अशुद्ध असल्यासारखें दिसतें. अशून्य असूनहि शून्याप्रमाणें व शून्य अशून्यासारखें स्पष्ट दिसतें. तें व्यापक आहे, तथापि अव्यापक असल्यासारखेंच दिसतें. तें देशतः व कालतः परिच्छिन्न आहे, असा जरी भास झाला तरी स्वरूपतः अपरिच्छिन्न आहे. तें मूळचें निर्विकार, पण उपाधीमुळें विकार पावणारेंसें दिसतें. तें सम व शांत असूनहि विषम व अशांत असल्याचा अनुभव येतो. तें वस्तुतः सद्रूप असूनहि असत् असल्यासारखें भासतें. कारण तें दिसत नाहीं. तें तत्त्व आहे, पण अतत्त्वासारखें दिसतें. त्याच्यामध्यें विभाग नाहींत, पण पदोपदीं विभागांचा अनुभव येतो. त्यांत जाड्य म्ह० अज्ञान नाहीं, तरी तें जडासारखें दिसतें. वस्तुतः निर्विषय आहे, तथापि विषयरूपानें प्रतीत होते. त्याला अंश नाहींत. तथापि सांश असल्याप्रमाणें दिसतें. त्यांत अहंकार नाहीं, तथापि ' हा मी ' असें प्रत्येक जीव म्हणतो. तें अविनाशी आहे, तरी क्षणभंगुरसें भासतें. त्याच्यामध्यें कलंक नाहीं, तथापि तें कलंकित दिसतें. तें अज्ञेय आहे, तरी ज्ञेयासारखें प्रतीत होतें. स्वयंप्रकाश असूनहि गाढ अंधकाराप्रमाणें व पुरातन असूनहि नवीन असल्यासारखें भासतें. परमाणूहूनहि सूक्ष्म असलें तरी तें आपल्या स्वरूपांत हजारों सृष्टींना धारण करितें. तें सर्वात्मक जरी आहे तरी यज्ञ, दान, तप, चित्तशुद्धि, वैराग्य, श्रवण, मनन इत्यादि पुरुषप्रयत्नानें रहित, सर्व दृश्याला पाहणारें, बंधरहित असूनहि अनेक बंधांनीं युक्त व अनेक प्रकारांनीं दिसत असलें तरी अद्वितीय, मायारहित असूनहि विविधमायारूपी किरणसमुदायांनीं परिवेष्टित झालेला जणुंकाय सूर्यच, असें तें ब्रह्म तूं जाण. समुद्र जसा सर्व जलांचा निधि, त्याप्रमाणें तें सर्व ज्ञानांचा निधि आहे. ब्रह्मांडरूपानें तो जगद्रत्नांचा मोठा खजिना आहे. ब्रह्मांड अतिशय गुरु म्ह० जड जरी असलें तरी विवेकरूपी तागडींत घालून तोलूं लागलें असतां, त्याचा गुरुत्व हा धर्म मिथ्या ठरतो, त्यामुळें तें कापसाच्या सूक्ष्म अंशापेक्षांहि हलकें होतें. मायारूपी किरणांचा चंद्र असलेलें तें चक्षूचा विषय होत नाहीं. तें कालतः अनंत व देशतः अपार असूनहि कोठल्याहि देशीं अथवा कालीं अवस्थित नाहीं. शून्यप्रदेशांतहि वनाची रचना करण्यांत व मोठमोठे पर्वत निर्माण करण्यांत तें तत्पर असतें. तें सूक्ष्माहूनहि अति सूक्ष्म, स्थूलाहूनहि अति स्थूल, गुरुपदार्थांहूनहि अतिशय गुरु व श्रेष्ठांहूनहि श्रेष्ठ आहे. कर्ता, कर्म, करण ही त्रिपुटी ज्याच्या ठिकाणीं नाहीं. त्याचें कांहीं कारकहि नाहीं. त्यामुळें तें अंतःशून्य असूनहि कर्त्रादि कारकांनीं चिरकाल परिपूर्ण आहे. तें जगाचें संपुट असूनहि नेहमीं अरण्याप्रमाणें शून्य आहे. तें पर्वताप्रमाणें निरवकाश असलें तरी सर्वत्र सावकाश आहे. तें प्रत्येक वस्तूमध्यें आहे. प्रत्येक क्षणामध्यें आहे. अति पुरातन आहे. अति कोमल व नूतनहि आहे. तें प्रकाशरूप जरी असलें तरी अंधकारासारखें आहे. कारण तें आपल्या उदरांत सर्व जगाला झांकून टाकतें. म्हणून जणुं काय अंधकारच आहे. प्रत्यक्ष असूनहि दिसत नाहीं. परोक्ष म्हणावें तर अग्रभागीं स्थित असतें. चिद्रूप असून जड व अजड असून चिद्रूप असें

तें केवल 'अहं' या शब्दाचाच विषय असूनहि 'युष्मद्' ह्म० 'तूं' या शब्दाचा विषय होतें. एक ज्याला 'तूं' म्हणतो, त्यालाच तो स्वतः 'मी' म्हणतो. मी व तूं, यांहून निराळा असलेला एखादा तटस्थ पुरुषहि स्वतःला 'मी' असेंच म्हणतो. त्यामुळें 'मी' हें आत्म्याचें नांव आहे व त्या परिपूर्ण सागरांतील ऊर्मि म्हणजेच हें त्रिभुवन होय. तुषार शुक्लतेला जसे धारण करितात, त्याप्रमाणें ब्रह्म आपल्यामध्यें जगाला धारण करतें; आणि मोठ्या समुद्रांत जशा लाटा उसळतात, तसेंच ब्रह्मामध्यें हें जगत् स्फुरतें. तुषारांमध्यें त्यांची स्वच्छता जशी भासते, त्याप्रमाणें या ब्रह्मतत्त्वामध्यें सर्व भासतें. पाणी तरंगांना जसें आपल्या स्वरूपांतच उत्पन्न करतें, त्याप्रमाणें देश, काल व अवयव यांनीं रहित असलेलाहि देव अहर्निश मिथ्या जगाला जणुं काय व्यक्त करतो. या विस्तीर्ण आकाशारण्यांत प्रसार पावणाऱ्या व भूतपंचकरूप पर्णांनीं युक्त असलेल्या जगद्रूप जीर्ण मंजरी विकास पावतात. हा परमदेव अत्यंत निर्मलाकार आहे. तो स्वतःचें प्रतिबिंब पहाण्याच्या इच्छेनें स्वतःचाच आरसा झाला आहे. अपरिच्छिन्न ब्रम्हसंविदेंत आकाश-उदुंबर आहे. ब्रम्हांड हें त्याचें फल आहे. स्वेच्छेनें कल्पिलेलें त्रैलोक्य हे त्याचे अवयव आहेत. त्यांत चंद्रसूर्यादिक प्रकाशित होतात, त्यापासून प्राण्यांचीं चक्षुरादि इंद्रियें बनतात; आणि त्यांच्या द्वारा जविभूत आत्मा सृष्टींतील रूपादिकांचा अनुभव घेतो. अर्थात् आत्माच आपल्या दर्शनादि क्रियांचीं उपकरणें बनतो. तो अंतस्थ असल्यासारखा, बाहेर असल्यासारखा, एकरूप, अनेकरूप, भावरूप, अभावरूप वगैरे स्वतःच बनतो. सर्व पदार्थांची शोभा आत्मरूप आहे, म्ह० आत्मा हीच त्यांची शोभा आहे. जिव्हा विविध रसांना जशी प्रकट करते, त्याप्रमाणें आत्म्यामध्यें त्याच्या इच्छेनेंच सर्व पदार्थ प्रकट होतात. या आत्मजलाचें जें द्रवत्व तेंच हें जगत् आहे. नाना प्रकारचीं विषयज्ञानें व अनुभव हाच त्यांतील मधुर रस आहे, आणि अनेक जन्म व लोक हेच त्यावरील तरंग आहेत. चंद्र, सूर्य, अग्नि इत्यादि पदार्थांची रूपादि शोभा, सुषुप्ति व प्रलय या अवस्थांमध्यें, या स्वयंप्रकाश आत्म्यांतच शांत होते आणि जाग्रत् व स्वप्न या अवस्थांमध्यें, यापासूनच उत्पन्न होते. सूर्यादि आकाशस्थ तेजोगोलांपासून प्रभामंडल जसें उद्भवतें, अगदीं तसेंच हें समजावें. ज्याप्रमाणें बर्फामध्यें शुभ्रत्व, त्याप्रमाणें आत्म्यामध्यें हें सर्व जगत्, किंबहुना आत्माच हें सर्व जगत् आहे. चंद्रापासून जसे किरण, त्याप्रमाणें आत्म्यापासून सर्व अनुभव उद्भवतात. या निरवयव रंगापासूनच हें जगच्चित्र निर्माण होतें. म्हणून जन्मादि भावविकार व वैचित्र्य यांचा जरी अनुभव येत असला तरी वस्तुतः त्यांचा अभाव आहे व तें सर्व ब्रह्ममयच आहे, असें तूं समज. या वनवृक्षापासूनच दृश्यरूप शाखा आकाशांगणांत पसरल्या आहेत. त्यांना जगत्समुदाय हेच गुच्छ लागले आहेत. ही दृश्यरूप नदी खरोखर वृद्धि व ऱ्हास यांनीं युक्त आहे. ती या आत्मरूप निश्चल पर्वतावरून वहाते व तिच्या प्रवाहाबरोबर द्वैतरूपी असंख्य पुष्पें वहात असतात. या आकाशरूप रंगभूमीवर भुवनरूप अभिनय करून नियतिरूप नर्तकी कल्परूप उत्सवाच्या वेळीं सतत नृत्य करीत असते. ती नियतिनर्तकी ब्रह्मरंगरूप मायिक मंडपांत आपल्या 'काल' या नांवाच्या पुत्राला पुनः पुनः निरनिराळ्या वेषांत दाखविते. त्याला पुनः पुनः उत्पन्न करते व पुनः पुनः संहृत करते. तिचा तो पुत्र काळ आपल्या नेत्रांच्या

निमिषोन्मेषांनीं कोट्यवधि ब्रह्मांडांचे उदय व प्रलय करतो. पण एवढा मोठा क्षोभ होत असूनहि आत्मा जशाचा तसा शांतच असतो. आरशांत हजारों प्रतिबिंबें जरी पडलीं तरी तो जसा निर्विकार असतो, त्याप्रमाणें असंख्य सृष्टींचा उदय व अस्त जरी झाला तरी त्यांचा आधारभूत आत्मा इच्छादि सर्व विक्रियाशून्य असतो. भौतिक पदार्थांचें भूतपंचक हें जसें कारण आहे, त्याप्रमाणें भूत, भविष्यत् व वर्तमान सृष्टीचें आत्मा हें बीज आहे. पण तें स्वतः कारणरहित आहे. त्याचा विकास हीच जगल्लक्ष्मी व त्याचा स्वरूपामध्यें संकोच हाच प्रलय होय. जेव्हां आत्मा विकास व संकोच यांनीं रहित होतो, तेव्हां स्वरूपांतच रहातो. रामा! परिमाणानें व देश, काल, संख्या यांनीं फारच मोठीं असलेलीं जीं हीं ब्रह्मांडें त्यांतील पदार्थांची उत्पत्ति, स्थिति व लय, प्राण्यांच्या जन्म, बाल्य, तारुण्यादि दशा, जाग्रत्-स्वप्नादि अवस्था, उत्कर्ष, अपकर्ष इत्यादि भाव चिदाकाशांतच उदय पावतात; त्यामुळें तीं सर्व वायूच्या स्पंदाप्रमाणें अपरिच्छिन्न ब्रह्मस्वरूप आहेत, असें समजून तूं स्वस्थ रहा. ३९.

---

## सर्ग ३६ वा.

—:०:—

१ तुच्छ विषयांचा अनिच्छेनें उपभोग घेणें बंधाला कारण होत नाहीं. २ इच्छा हाच परमबंध आहे. ६ इच्छेचा त्याग हीच मुक्ति.

श्रीवसिष्ठः—जलांतील आवर्ताप्रमाणें सर्व पदार्थ प्रथम भिन्नरूप भासतात. ते स्वतः-विषयींची इच्छा उत्पन्न करून चित्ताला भ्रमण करावयास लावतात. नंतर राग, द्वेष, दुःख इ० अनर्थांत पर्यवसान पावतात. पण विचारानें तरंग जसे जलमात्र दिसूं लागतात, तसें सर्व पदार्थ एकरूप झाल्यावर चित्तांत भ्रम उत्पन्न करीत नाहींत व अनर्थांतहि पाडीत नाहींत. या सर्व विश्वाचें सत्तामात्ररूप परमाकाशत्व हेंच अविरुद्धस्वरूप आहे. त्या सत्तेला सर्व विशेष रूपापासून अगदीं पृथक् केल्यावर जें तिचें सन्मात्ररूप रहातें, तेंच स्वाभाविक रूप होय. म्हणून चित्ताला शांत करून त्याचाच आश्रय करावा. ज्याप्रमाणें बालकानें शून्य प्रदेशीं कल्पिलेलें यक्ष-पिशाचादिकांचें भयंकर रूप प्रौढ मनुष्याच्या दृष्टीनें कांहीं नसतें, त्याप्रमाणें माझ्या दृष्टीनें हें विश्व तत्त्वतः कांहीं नाहीं. पाषाणाच्या प्रतिमांचें सैन्य जसें अकिंचित्कर, त्याप्रमाणें सर्व विश्वहि केवल मनःसंकल्परूप असल्यामुळें निरुपयोगी होय. विद्वानाच्या दृष्टीनें त्यांत विश्वत्व कशाचें! अज्ञदृष्टया मात्र त्यांत विषयसंकल्प, उपभोग इत्यादि सर्व कांहीं आहे. पण विचार करूं लागल्यास त्यांतहि सारभूत चिन्मात्रावांचून कांहीं उपलब्ध होत नाहीं. त्यामुळें वस्तुतः त्यांना विश्वत्वहि नाहीं. अर्थात् जगाला जाणणारा जो पुरुष त्याचें ज्ञातृत्व, हीच जगाची भ्रांति व अनात्मपदार्थांचें अज्ञातृत्व, हीच त्या भ्रमाची शांति होय. म्हणजे एकाद्या गोष्टीचें स्मरण करणें, किंवा तिला विसरणें हें जसें प्रत्येकाच्या स्वाधीन आहे, त्याचप्रमाणें जगाचें ज्ञातृत्व, किंवा अज्ञातृत्व मनुष्याच्या हातीं आहे. हें सर्व चिदाकाशच आहे. त्यांत अनुभवास येणारी पदार्थांची सत्ता चित्सत्तेहून निराळी नाहीं. 'अहं' असा अहंकारहि नाहीं. ज्यांत विकारादिकहि नाहींत. त्यामुळें वस्तुतः चिद्व्यतिरिक्त कांहीं नाहीं. आकाशांतील अरण्य जसें शब्दमात्र, त्याचप्रमाणें 'त्वं, अहं,' इत्यादि शब्दभ्रम आहेत; सर्व शांत, शुद्ध, शिवस्वरूप आहे. त्यांत मला दुसरें कांहीं दिसत नाहीं. त्याच-

प्रमाणें माझें हें उपदेशवचनहि संविदाकाशरूप आहे, असें तूं समज. कारण हें वचन तुझ्या संविदाकाशरूप आत्म्यांतच स्वतः स्थित असतें. जड स्वरूपांत तें केव्हांहि स्थित होत नाहीं. शब्दतत्त्वहि चिद्रूप स्फोटात्मकच आहे, असें विचारानें ठरतें. चित्रांतील पुरुषाप्रमाणें किंवा पाषाणावर खोदलेल्या मूर्तीप्रमाणें इच्छाशून्य होऊन रहाणें हेंच परम पद होय. इच्छा जरी नसली तरी ज्याचें मन आत्म्यामध्यें विश्रांति पावलें आहे, असा मौनी पुरुष कळसूत्री पुतळ्याप्रमाणें प्रकृत कर्मामध्यें जरी हालचाल करीत असला, तरी मनांत व्याकुळ होत नाहीं. व्यवहार करणाऱ्या ज्ञानी पुरुषाचें जीवन वेळूप्रमाणें अंतर्बाहि-शून्य असतें. तें त्याला विरस भासतें आणि त्याविषयींच्या वासना त्याच्या मनांत नसतात. ज्याला दृश्य आवडत नाहीं व मनांत अदृश्याविषयींची रुचि असते. तो सबाह्य—अभ्यंतर शांत असलेला पुरुष संसारसागरांतून तरून गेलेला असतो. मुरलीप्रमाणें त्यानें कितीहि शब्द जरी उच्चारले तरी त्याच्या चित्तांत त्यामुळें विकार उत्पन्न होत नाहीं. कारण त्याची वासना क्षीण झालेली असते. प्रारब्धप्राप्त कर्मफलाचा तो अनुभव घेत असतो. त्यामुळें त्याच्या ठिकाणीं अहंममाभिमानहि नसतो. त्यांच्या अभावीं तो कोणत्याहि प्रकारें आसक्त न होतां वाग्-इंद्रियानें शब्दोच्चार करतो व शब्दोच्चार करतांनाहि त्याचें कर्तृत्व त्याचेकडे येत नाहीं. त्याचप्रमाणें वासनाशून्य मनानें प्रारब्धप्राप्त स्पर्शनीय पदार्थांना त्याला खुशाल स्पर्श करूं दे. नटांच्या परस्पर स्पर्शाप्रमाणें इच्छा व संकल्प यानीं रहित असलेल्या त्या स्पर्शानें तो बद्ध होत नाहीं. एका पळीनें स्वयंपाकांतील निरनिराळे पदार्थ ढवळले तरी तिच्यावर जसा त्या रसांचा परिणाम होत नाहीं, त्याप्रमाणें इच्छा, द्वेष, लोभ, क्रोध इत्यादि विकारांनीं रहित असलेल्या ज्ञानी पुरुषानें विविध रसांचा आस्वाद जरी घेतला, तरी त्याच्या मनावर त्याचा संस्कार घडत नाहीं. चित्रांतील नेत्राप्रमाणें ज्ञानी पुरुषानें प्रारब्धप्राप्त विविध रूपें जरी पाहिलीं तरी वासना, रस, मान, गर्व यांनीं रहित असल्यामुळें त्याचें मन विकृत होत नाहीं. वनांतील वायूप्रमाणें त्यानें अनेक सुगंधांचा वास जरी घेतला, तरी निरिच्छ मनावर त्याचा कांहीं परिणाम घडत नाहीं. रामा! याप्रमाणें सर्व जगत् नीरस आहे असें जाणून, भोगरूपी रोगांची चिकित्सा जर न केली तर दुःखशांतीचें नांवहि घ्यावयाला नको. जो हें समजतो, भोगरूपी विषाचा स्वाद घेत असतांना प्रतिदिवशीं जो अधिकाधिक संतुष्ट होतो, तो प्रदीप्त अग्नीमध्यें स्वमूर्तिरूप तृणाला सतत टाकीत रहातो. यास्तव वेदाला भूषित करणारे विद्वान् निरिच्छत्व हेंच समाधान आहे, असें ह्मणतात. मनाला निरिच्छ केल्यानें जसें तें शांत होतें, तसें शेंकडों उपदेशांनींहि होत नाहीं. इच्छेचा उदय हेंच दुःख आहे व इच्छाशांति हेंच सुख आहे. तसलें दुःख नरकांतहि होत नाहीं व तसलें सुख ब्रह्मलोकांतहि मिळत नाहीं. इच्छामात्र हेंच चित्त आहे. त्याची शांति हाच मोक्ष आहे. सर्व शास्त्रें, तप, यम, नियम हे सर्व इच्छाशांतीचेच उपाय आहेत. प्राण्याच्या मनांत जितकी जितकी व जशी जशी इच्छा उत्पन्न होते, तितकी तितकी व तशी तशी दुःखबीजमुष्टिच पेरली जाते. विवेकानें प्राण्याची इच्छा जशी जशी कमी होत जाते, तसा तसा दुःखचिंतारूप रोग शांत होत जातो. इच्छा आसक्तीमुळें जशी जशी वाढत जाते तशा दुःख व चिंतारूप विषाच्या ऊर्मि वृद्धि पाव-

तात. स्वयत्नरूप औषधानें हा इच्छारूप व्याधि जर घालविला नाहीं, तर त्यापेक्षां अधिक बलवान् औषध दुसरें नाहीं. इच्छेचा पूर्णपणें उपशम करतां येणें जरी शक्य नसलें तरी अल्पशः तरी उपशम करण्याचा प्रयत्न करावा. कारण त्या मार्गाला लागलेला मनुष्य अधोगतीला जात नाहीं. जो नराधम इच्छा कमी करण्याचा मुळींच प्रयत्न करीत नाहीं, तो प्रतिदिवशीं स्वतःलाच अंधकूपांत टाकतो. दुःख देणाऱ्या संसाराचें बीज इच्छाच आहे. तिला ज्ञानाग्नीनें जाळून टाकावें, म्हणजे जन्मरूपानें तिचा अंकुर पुनः उद्भवत नाहीं. इच्छा हाच संसार व तिचा अभाव हेंच निर्वाण, यास्तव इच्छा उत्पन्नच होणार नाहीं, असा यत्न करावा. व्यर्थ भ्रम काय कामाचा? शास्त्रोपदेश व गुरु यांचा व्यर्थ कशाला आश्रय करतां? इच्छेला शांत करण्याचा यत्न न करतां केवल त्यांचाच आश्रय करणें व्यर्थ आहे. त्याच्या जागीं इच्छेनें अनुसंधान न करणें या चित्तसमाधानाच्या उपायाचाच आश्रय कां करीत नाहीं? ज्याच्या बुद्धीला इच्छेचें अनुसंधान न करणें ही अतिशय सुलभ गोष्ट दुःसाध्य वाटते, त्याला गुरूपदेश, शास्त्र इत्यादि सर्व खरोखर व्यर्थ होय. ज्याप्रमाणें व्याघ्रादि हिंस्र पशूंनीं व्याप्त असलेल्या अरण्यांत हरिणीचा जन्म म्हणजे मरणच होय, त्याप्रमाणें दुःखाचा प्रसार करणाऱ्या व इच्छा-विषाचा विकार उत्पन्न करणाऱ्या संसारांत मनुष्यांचा सर्वदा अंतच होत असतो. या इच्छेनें पुरुषाला बालकासारखें चपल जर न केलें, तरच तो आत्मज्ञानासाठीं अल्प तरी यत्न करील. यास्तव इच्छाशांतिच करावी. इच्छा शांत झाल्यानेंच ज्ञान प्राप्त होतें. निरिच्छता हेंच निर्वाण व सेच्छता हेंच बंधन; यास्तव यथाशक्ति इच्छेला जिंकावें. त्यांत दुष्कर तें काय आहे? जरा, मरण, जन्म इत्यादि कंटकमय वृक्षाचें बीज इच्छाच आहे. यास्तव त्या इच्छेला मनांतल्या मनांत शमाग्नीनें जाळून टाकावें. ज्या ज्या विषयीं मनुष्य निरिच्छ होतो, त्या त्या बंधापासून तो मुक्त होतो. यास्तव आपलें सर्व सामर्थ्य खर्चून, धैर्य धरून, विवेक करून, वैराग्यादि उपायांनीं, उत्पन्न झालेल्या इच्छेला मारून टाकावें. ज्या ज्या विषयाविषयीं इच्छा उत्पन्न होते, तो तो विषयच बंध उत्पन्न करितो आणि असले पुण्यपापमय बंधपाश म्ह० दुःखाचे पर्वतच आहेत. त्यामुळें सर्व क्लेश उद्भवतात. एखाद्या अधिकारी मनुष्याचा एक क्षणहि जर इच्छेच्या निरोधावांचून गेला, तर त्यासाठीं चोरांनीं सर्वस्व लुटल्याप्रमाणें दीर्घकाल आक्रंदन करणेंच युक्त आहे. या पुरुषाची इच्छा आंतल्या आंत जशी जशी शांत होत जाते, तसे तसे मोक्षासाठीं त्याचे वैराग्यादि गुण वाढूं लागतात. या अविवेकी जीवाची इच्छा पूर्ण करूं लागणें, म्हणजे संसाररूप विषवृक्षाला जलसिंचन करण्यासारखेंच होय. हृदयरूप वृक्षापासून उत्पन्न झालेल्या इच्छा या पुरुष-पशूला सतत जाळीत असतात. त्या तीक्ष्ण खड्गाच्या अग्राप्रमाणें तीव्र असतात. पापरूप अग्नीच्या त्या ज्वालाच आहेत. त्या हृदयांत उत्पन्न होतात व तेथील जीवाला स्नेहपाशांनीं घट्ट बांधून, सुखदुःखादि बीजकोशांत टाकून अत्यंत संतप्त करितात. यास्तव रामा! सर्वथा इच्छात्याग करावा. ३१.

---

## सर्ग ३७ वा.

१ प्रथम इच्छा उत्पन्नच न होईल असा यत्न करणें, २ पण दैववशात् ती जरी झाली, तरी केवळ ब्रम्हच आहे, अशी भावना करणें, ३ औपपत्तिक ज्ञानयोग.

**श्रीवसिष्ठः**—इच्छा-विषाच्या विकाराचा जो वियोग, त्यालाच योग हें नांव आहे. योगाचें वर्णन पूर्वीहि जरी स्पष्ट केलें आहे, तरी शांतीसाठीं तें पुनः ऐक. आत्म्याहून निराळी जर एखादी वस्तु असेल, तर तिच्यासाठीं यत्न करणें उचित होईल; पण आत्म्याहून पृथक् वस्तुच नाहीं. तेव्हां आणखी कसली इच्छा करावयाची ? चित् निरवयव, सूक्ष्म, आकाशाहूनहि अधिक शून्य आहे. तीच अहंकार व जगदाकार आहे. तेव्हां तिच्याविषयीं निराळी इच्छा कशी संभवणार ? ती आकाशरूप आहे. विषय व विषयी हे दोन्ही आकाशरूप आहेत. जगाचा आभास मिथ्या आहे. तेव्हां त्यानंतर इच्छेचा विचार कोठून असणार ? बुद्धीनें विषयाचें ग्रहण केलें तरच त्याविषयीं इच्छा उत्पन्न होणार, पण विद्वानाची बुद्धि विषयाचें ग्रहण करीत नसल्यामुळें ग्राह्य-ग्राहक-संबंधच उत्पन्न होत नाहीं. तेव्हां त्याला इच्छा तरी कशी होणार ? आम्ही अतिशय शांतचित्त आहोंत, त्यामुळें अज्ञांच्या दृष्टीनें सिद्ध असलेला ग्राह्य-ग्राहक-संबंध आम्हांला प्रतीतच होत नाहीं. इतकेंच नव्हे, तर ज्यांना तो प्रतीत होतो, ते अज्ञहि आमच्या दृष्टीनें असिद्धच आहेत. तो संबंध स्वनिष्ठ जरी असला तरी उपलब्ध होत नाहीं. असद्वस्तूचा लाभ कसा होणार ? कृष्णवर्ण चंद्र कधीं तरी कोणी पाहिला आहे का ? ग्राहकादिक सर्व त्रिपुटींची सत्ता तात्त्विक आत्म्यामध्यें कधींच प्रतीत होत नाहीं. त्यांचें स्वरूप अज्ञानाहून भिन्न नाहीं. अशास्त्रीय दृष्टीनेंच ग्राहकादि पदार्थ सत्य भासतात, पण शास्त्रीय तत्त्वदृष्टीचा उदय झाला म्हणजे ते कोठें जातात, तें कांहीं कळत नाहीं. तत्त्वज्ञानाचाहि स्वभाव असा आहे कीं, असत्य अहंता आत्मतत्त्वच आहे, असें शास्त्रतः समजलें कीं, ती स्वरूपांत लीन होते; आणि अहंतेनें आत्म्यामध्यें लीन होणें, हाच द्रष्टा व व दृश्य यांचा क्षय व विशिष्ट निर्वाण आहे. निर्वाणावस्थेंत दृश्यादिक नाहीं. दृश्यादिकांचा जेव्हां अनुभव येतो तेव्हां निर्वाण म्हणजे शांति नाहीं. प्रकाश व अंधकार यांप्रमाणें परस्परविरुद्ध असलेल्या या दोघांचा अनुभव एकाच वेळीं येणें अशक्य आहे. जर त्यांचा अनुभव एकाच वेळीं येऊं लागला, तर परस्परबाधित होणाऱ्या त्या दोन्ही अवस्था मिथ्या ठरतील. पण शांति किंवा निर्वाण मिथ्या नाहीं. कारण आत्मानुभवी विद्वानांना अक्षय आनंदाचा अनुभव त्या अवस्थेंत येतो. दृश्यादि भ्रमभूत आहे, तें नित्य नाहीं व सुखप्रदहि नाहीं. म्हणून त्याची भावना न करतां निर्वाणामध्यें स्थिर व्हावें. दृश्याचें चिंतन केल्यामुळेंच अनर्थ ओढवतात. तें शुक्तिरजताप्रमाणें[1] प्रमाणांनीं निरूपण केलें असतां बाधित होतें. त्याच्यापासून कांहीं पुरुषार्थ प्राप्त होत नाहीं, तेव्हां त्याचा जर निषेध केला, तें असत् आहे असें म्हटलें, तर त्यांत हानि कोणती ? तें आहे, असें मानलें तर मोठें दुःख होतें, व मिथ्या आहे असें म्हटलें तर सुख होतें. त्याच्या मिथ्यात्वाचें सतत चिंतन केलें तर त्याचे संस्कार दृढ होतात. अस्तु, अहो अज्ञजनहो,

---

१ एखादा शिंपीचा किंवा कसलाहि चकाकणारा तुकडा दृष्टीस पडला असतां, ती चांदी आहे किंवा चवली वगैरे नाणें आहे, असा जो भास होतो, त्यालाच शुक्तिरजत असें म्हणतात.

तुम्ही परमार्थ वस्तूमध्यें स्थिर होऊन शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशाप्रमाणें सर्व विकार असत्य आहेत, असें करतलामलकवत् स्पष्ट दिसत असतांनाहि यांत आसक्त होऊन परमार्थ वस्तूला कां विसरतां? हें सर्व दृश्य बंध उत्पन्न करणारें आहे, हें तुम्हांला ठाऊक नाहीं का? तुम्हांला बंधाचीच का इच्छा आहे? म्हणून तुम्ही दृश्यासक्ति सोडीत नाहीं? ज्या वेळीं कार्य-कारणभावादि सर्व ब्रह्मच आहे, असा निश्चय होतो, तेव्हां देहच मी ही बुद्धि नाहींशी होऊन प्रत्यगात्मा ब्रह्मरूपच आहे, ही गोष्ट अनुभवानें सिद्ध होते. त्यानंतर दृश्य अणुमात्रहि अवशिष्ट रहात नाहीं. म्हणूनच जे परिपूर्ण सर्वात्म्यामध्येंहि, कार्यकारणतादि दृश्याचा अंगीकार करून ब्रह्माचा बोध करण्यासाठीं साधनें हुडकतात, त्या तार्किक वाद्यांचें किंवा शिष्यांचें आम्हांला कांहीं प्रयोजन नाहीं. कार्य व कारण यांचा अंगीकार करणारांना मोक्षाचा मार्गच सांपडत नाहीं. वायूच्या स्पंदनाचें, जलाच्या द्रवत्वाचें व आकाशाच्या शून्यत्वाचें जें कारण, तेंच चिदात्म्याच्या सृष्टित्वादिकांचें कारण आहे. स्वभाव म्हणजे अविद्या हेंच त्या सर्वांचें कारण. जेव्हां कार्यकारणभावादि सर्व ब्रह्मच झालें तेव्हां ब्रह्म सृष्टीचें कारण आहे, हें म्हणणें व्यर्थ आहे. त्या शिवस्वरूप परमात्म्यामध्यें दुःख नाहीं, सुख नाहीं व चिन्मात्रत्वाहून निराळें कांहीं नाहीं. हें जगत्‌हि शांत शिवमय आहे. तेव्हां त्यांत इच्छेचा उदय कोठून होणार? मातीच्या बनविलेल्या सैनिकांमध्यें ज्याप्रमाणें मातीवांचून दुसरें कांहीं नसतें, त्याप्रमाणें जगत्, अहंता, इत्यादि दृश्यामध्यें ब्रह्मावांचून दुसरें कांहीं नाहीं.

**श्रीरामः**—हे मुनीश्वर! असें जर असेल, तर इच्छा उत्पन्न होवो किंवा न होवो, ती ब्रह्मच आहे, तर तिचें विधान किंवा निषेध करण्यांत काय अर्थ आहे?

**श्रीवसिष्ठः**—रामा, आत्मसाक्षात्कार झाल्यावर इच्छा ब्रह्मच होते, ब्रह्माहून भिन्न रहात नाहीं, असें जें तूं समजला आहेस, तें अगदीं खरें आहे. तथापि त्याविषयीं मी आणखी कांहीं सांगतों, ऐक. जेव्हां जेव्हां ज्ञानाचा उदय होतो, तेव्हां तेव्हां इच्छा शांत होते व ती वस्तुस्वभावामुळें उदय पावते. सूर्यास्तानंतर जशी रात्र होते, त्याप्रमाणें अज्ञानदशेंत आपोआपच इच्छा उद्भवते; आणि सूर्योदय होतांच जसा अंधकार नाहींसा होतो, त्याचप्रमाणें ज्ञान होतांच इच्छा नाहींशी होते. अरुणोदय झाल्यापासून प्रत्येक क्षणीं अंधकार जसा विरल होऊं लागतो, त्याप्रमाणें ज्ञानाचा जसजसा उदय होऊं लागतो, तशी तशी द्वैताची शांति, व वासनेचा विलय होतो. त्यानंतर इच्छा कशी उद्भवणार? त्याची अविद्या शांत झालेली असते, व निर्मल मुक्तता उदय पावलेली असते. त्याला सर्व दृश्याविषयीं वैराग्य आलेलें असतें. त्यामुळें इच्छा केव्हांहि उत्पन्न होऊं शकत नाहीं. दृश्याविषयीं विरक्त झालेल्या पुरुषाला दृश्य आनंद देऊं शकत नाहीं. स्वभावतःच त्याला जगच्छोभा आनंद देत नाहीं. त्यामुळें तो दृश्यांत आसक्त होत नाहीं. एखादे वेळीं काकतालीयन्यायानें किंवा कोणाच्या प्रेरणेनें त्याला इच्छा होते, पण ती त्याच्या अंतःकरणांत वासनरूपानें परिणत होत नाहीं. किंवा ज्याचें ज्ञान अतिशय दृढ असतें, त्याला इच्छाच होत नाहीं. ज्ञानी पुरुषाची अशा प्रकारची इच्छा किंवा अनिच्छा हें ब्रह्मच आहे. किंवा त्याला नव्या नव्या विषयांना पाहून इच्छा होतच नाहीं. कारण ज्ञान बलवत्तर आहे. त्यामुळें तें उत्पन्न झाल्यावर इच्छा नियमानें शांतच होते. प्रकाश व अंध-

कार यांप्रमाणें ज्ञान व इच्छा यांचा एकत्र सहवास संभवतच नाहीं. त्यामुळें स्वभावतः प्राप्त होणारी जी विषयासक्ति तिच्या निषेधाचा विषय तत्त्वज्ञानी होत नाहीं. जो अंध नाहीं, त्याला 'अंधानें कूपांत पडूं नये असें सांगणें' केव्हांहि उचित नाहीं. ज्याच्या सर्व इच्छा शांत झाल्या आहेत, त्याला कोण काय सांगणार ? व कशासाठीं सांगणार ? बाह्य विषयांची इच्छा निवृत्त होणें, व स्वानंदानुभवानें तृप्त होणें हेंच ज्ञानित्वाचें लक्षण आहे. असा ज्ञानी सर्व लोकांना अभय देऊन सुखी करतो. जेव्हां दृश्य निरसन झाल्यामुळें पुरुषाचें मन त्यांत अनुरक्त होत नाहीं, तेव्हां त्या विषयींची इच्छाहि प्रसार पावत नाहीं. तीच विमुक्तावस्था होय. ज्ञानामुळें द्वैत व अद्वैत या भावना सोडून जेव्हां पुरुष शांतचित्त होऊन रहातो, तेव्हां त्याचे इच्छा, अनिच्छा इत्यादि सर्व भाव एक शिवस्वरूप बनतात. ज्ञानामुळें द्वैत, अद्वैत, द्वैताद्वैत इत्यादि भावना नष्ट होतात. तो अंतःकरणांत अत्यंत शुद्ध, अव्यग्र, शांत व स्वरूपनिष्ठ होतो. त्यानें कर्म जरी केलें, तरी त्याचा कांहीं उपयोग नाहीं. न केलें तरी त्यांत कांहीं दोष नाहीं. आब्रह्मस्तंबपर्यंत कोणत्याहि प्राण्यासाठीं सुद्धां त्याला कांहीं कर्तव्य नसतें. तो स्वेच्छेनें कांहीं करीत नाहीं, अनिच्छेनें करीत नाहीं, सद्वस्तूकरितां करीत नाहीं, असद्वस्तूकरितां करीत नाहीं. स्वतः करीत नाहीं, दुसऱ्याकडून करविला जात नाहीं, त्याला जीवितासाठीं व मृत्युनिवारणार्थहि कांहीं कर्तव्य नसतें. सृष्टींतील एकहि पदार्थ त्याला संपादन करावयाचा नसतो. ज्याला मोक्षसुखाचा अनुभव आलेला असतो, त्याच्या मनांत अगोदर इच्छाच उत्पन्न होत नाहीं, व झाली तरी ती शाश्वत ब्रह्मच असते. दुःख व सुख यांतील कांहींच नसून हें सर्व जगत् एक अज, शांत, शिवस्वरूप आहे, असें समजून जो मनांत शिळेप्रमाणें स्थिर असतो, त्याला विद्वान् लोक ज्ञानी समजतात. विषाला जसें अमृत बनवावें त्याप्रमाणें तो दुःखालाहि सुख बनवितो आणि जो धीर पुरुष मी दुःखालाहि आपल्या भावनेनें सुखाचें स्वरूप आणीन अशा निश्चयानें व्यवहार करतो, तो ज्ञानी होय. त्या अवस्थेंत त्याला विपरीत ज्ञान होत नाहीं, तर त्याला आकाशादि पदार्थांचें त्या त्या वस्तूच्या रूपानेंच ज्ञान होतें. तो ज्याला शांत, शिव, शून्य व सत् समजतो, तेंच वस्तुतः शांत, शून्य, वगैरे असतें. अज्ञ ज्याला शांत वगैरे समजतात, तें वस्तुतः शांत वगैरे नव्हे. आकाशांत आकाश, शांतवस्तूमध्यें शांति, कल्याणरूप वस्तूंत जसें कल्याण स्थित असतें तसें ब्रह्मामध्यें जगत् आहे. यास्तव बहिर्मुख होऊन जगाचा अनुभव घ्यावयाचा नाहीं, असा एकदा निश्चय केला, व त्याप्रमाणें वागूं लागलें म्हणजे जगत् सौम्य व शांत होतें. मग अहंताभ्रम आपोआप क्षय पावतो. हें जें कांहीं चराचर जगत् दिसत आहे, तें सर्व शांत आकाशच आहे. तें वस्तुतः मनोराज्यांतील नगरासारखें प्रतीत होतें. एखाद्या पुरुषानें आपल्या मनोरथानें कल्पिलेल्या नगरांत दुसऱ्या संकल्परहित पुरुषाला जसा सहज संचार करतां येतो; त्याला तेथें मनुष्यें, घरें वगैरे कांहीं दिसत नाहीं, त्याला कोणी प्रतिबंध करीत नाहीं, त्याप्रमाणें विद्वानाला या जगांत ब्रह्मावांचून कांहीं दिसत नाहीं. कारण समुद्रादि विविध पदार्थांचा जेथें अभाव आहे, अशा आत्म्यामध्यें द्रष्ट्याचें अंतःकरणच समुद्रादिकांच्या रूपानें विकास पावतें. जसें तृषित व श्रांत पुरुषांचें चक्षुरूप इंद्रियच निर्जल प्रदेशीं मृगजलाच्या आभासानें तद्रूप बनतें, तसेंच अंतः-

करण जगद्रूप धारण करितें. स्वप्नांतील नगराप्रमाणें किंवा लहान मुलानें कल्पिलेल्या वेताळाप्रमाणें दिसणाऱ्या या जगांत सत्यता व असत्यता तरी कशाची ? अहं ही वृत्ति वस्तुतः असत्य असतांनाच सत्य असल्यासारखी भासते. त्यामुळें ज्याला भ्रांति होते तो जीवहि जर खरा नाहीं, तर त्याचयावांचून भासणारी भ्रांति खरी कोठून असणार? या जगाला कांहींच म्हणतां येत नाहीं. त्याला सत् म्हणावें तर क्षणभंगुर दिसतें; असत् म्हणावें, तर प्रतीत होतें. सत् व असत् या दोन्ही धर्मांनीं युक्त आहे, असें म्हणावें; तर एकाच पदार्थाच्या ठिकाणीं असे परस्परविरोधी दोन धर्म संभवत नाहींत. ह्मणजे हें जगत् अनिर्वाच्य आहे. इंद्रियांच्या योगानें त्याचें यथार्थ ज्ञान होत नाहीं. तथापि आकाशांतील गंधर्वनगराप्रमाणें तें प्रतीत होतें. तत्त्ववेत्याचे विषय तत्वज्ञानाच्या बळानेंच शांत होत असल्यामुळें त्याची इच्छा व अनिच्छा या दोन्ही जरी सारख्याच आहेत, तरी हे रामा! इच्छेचा उदयच न होऊं देणें अधिक श्रेयस्कर आहे. कारण अंतःकरणांत इच्छा उदय पावली ह्मणजे शांतीचा भंग होतो, आणि शांतीचा भंग हाच विक्षेप व दुःख आहे. इच्छाच शान्त झाली म्हणजे अक्षुब्ध चित्तांत शांत सुखाचा निर्विघ्नपणें आविर्भाव होतो. आकाशाला आकाशरूपानें जाणणें, व चिदात्म्याला अहं, जगत्, असें जाणणें, हीं दोन्ही सारखींच. वायूच्या स्पंदाला जसें कांहीं कारण नाहीं, त्याप्रमाणें आत्म्याच्या तसल्या प्रतीतिला कांहीं कारण नाहीं चित्नें विषयोन्मुख होणें हाच चित्ताचा उदय होय आणि चित्तानें इच्छेनें युक्त होणें, हाच संसार होय. इच्छा टाकणें हीच मुक्ति; इच्छात्याग हाच मुक्तीचा उपाय आहे, असें जाणून शांत व्हावें. त्यानंतर, ईश्वरानें जगाची उत्पत्ति केली किंवा संहार केला तरी त्याला ज्याप्रमाणें कांहीं लाभ होत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाला इच्छा झाली, तरी त्यांत हानि, लाभ, कांहीं नाहीं. चिदाकाशांत इच्छा, अनिच्छा, सत्, असत्, भाव, अभाव, सुख, असुख यांतील कोणतीच कल्पना संभवत नाहीं. ज्याची इच्छा प्रतिदिवशीं कमी कमी होत जाते, व जो विवेक व शम यांनीं तृप्त होतो, त्यालाच मोक्षाधिकारी म्हणतात. ज्याचें हृदय इच्छारूपी तीक्ष्ण बाणाच्या अग्रानें विद्ध होऊन अतिशय दुःख देत असतें, त्याला मणि, मंत्र, औषधि, यांचा कांहीं उपयोग होत नाहीं. ब्रह्मदेवानें प्राण्याला दुःख होऊं नये, म्हणून औषधी, मंत्र, यंत्र, शरीर, इंद्रियें इत्यादि जें जें उत्पन्न केलें आहे, त्या सर्वांचा मीं पूर्वींच विचार केला आहे. त्यांत मला मिथ्या भ्रमावांचून दुसरें कांहींच दिसत नाहीं. आतां भ्रांतिसिद्ध अशाच एखाद्या उपायानें संसारदुःखाची चिकित्सा करावी म्हणून म्हटल्यास अनवस्थाच प्राप्त होते. म्हणजे एकाच्या भ्रांतिसिद्ध उपायानें दुसऱ्याच्या भ्रांतिसिद्ध दुःखाचें निवारण होऊं लागलें, तर एकाच्या कल्पित पदार्थाचा दुसऱ्यालाहि त्याच्याच सारखा अनुभव यावयास पाहिजे, पण तो येत नाहीं. शिवाय भ्रांतिसिद्ध पदार्थ मिथ्या असल्यामुळेंहि त्याच्या योगानें दुसऱ्याच्या दुःखाचें निवारण होणें शक्य नाहीं. सशाच्या शिंगानें आकाशाला भोंक पाडतां येईल काय? पाषाणाचें जसें जल व्हावें, त्याप्रमाणें चिदाकाश अहंभाव धारण करून अंतःकरण बनतें, आणि अंतःकरणच ईश्वराच्या अचिंत्य शक्तीनें साकार बनून, देहादिच मीं आहे, अशी कल्पना करतें. एखादा पुरुष स्वप्नामध्यें स्वतःचेंच मरण जसें पाहतो त्याप्रमाणें चिच्छक्ति चित्वामुळें मिथ्या संसारित्व अनुभवितें. आका-

शामध्यें नीलत्व दिसतें, पण तें सत्य नव्हे; असत्य होय. पण त्याचा अनुभव येतो. त्यामुळें त्याला सर्वथा असत्यहि म्हणतां येत नाहीं. तसेंच, या परमेश्वरामध्यें सृष्टि दिसते, म्हणून तिला मिथ्या म्हणतां येत नाहीं व एका क्षणांत तिच्यामध्यें विलक्षण बदल होत असल्यामुळें तिला सत्यहि मानतां येत नाहीं. अर्थात्, ती अनिर्वचनीय आहे. ज्याप्रमाणें शून्यत्व व आकाश किंवा स्पंद व वायु यांचा भेद नाहीं, त्याप्रमाणें एकरूप असलेली सृष्टि व ब्रह्म यांचा भेद नाहीं. या सृष्टींत कांहीं उत्पन्न होत नाहीं व नाश पावत नाहीं; तर निद्रित मनुष्याला जसें स्वप्न, त्याप्रमाणें मनुष्याला ही सृष्टि भासते. हे पृथिव्यादि पदार्थ केवल संकल्पमात्र व त्यामुळेंच अविद्यमान आहेत. तेव्हां त्यांतील कशाचा त्याग करावा, व कशाचें ग्रहण करावें? चिदाकाशांत कांहीं क्रियाच संभवत नाहीं. हें शरीर पृथिव्यादि कारणांपासून उत्पन्न झालें आहे. त्यामुळें तेंहि आपल्या कारणाप्रमाणें कल्पित आहे. केवळ ब्रह्म चिन्मात्र आहे, आणि तें आत्म्यामध्येंच स्थित आहे. बुद्ध्यादिकांचें करणत्व चैतन्याच्या अपेक्षेनें भिन्न आहे, किंवा अभिन्न आहे, असें म्हणतां येत नसल्यामुळें अमक्याकडून अमुक केलें जातें हा व्यवहारही वस्तुतः परमार्थ वस्तूलाच उद्देशून होणार, हें उघड आहे. कारण, त्रिकालीं जर कांहीं संभवत असेल तर ती एक परमार्थ वस्तुच होय. त्याच न्यायानें ब्रह्माच्या आधारानें प्रतीत होणारे कल्प, महाकल्प वगैरे व त्यांतील क्रियांचे समुदाय वस्तुतः स्वप्नांतील जन्म मरणादिकांप्रमाणें निष्कारण आहेत. त्यांच्यामध्यें योग्य क्रमहि अनुभवास येत नाहीं. कारण एका क्षणांतच त्यांच्यामध्यें विलक्षण फरक झालेला दिसतो. अर्थात् चिदाकाशच पृथ्वी आहे; तेंच पर्वत, किल्ल्याचे विशाल कोट, तेंच हे सर्व लोक, व त्यांच्या सर्व क्रिया आहे. कारण चैतन्याला स्वरूपामध्येंच सर्व सृष्टींचें भान होतें. या आकाशाधारावर हें जगच्चित्र चिन्मय रंगानें काढलेलें आहे. तें केव्हांहि उदय पावत नाहीं, अस्त पावत नाहीं, शांत होत नाहीं, व कोमेजत नाहीं. चैतन्यरूप जलामध्यें जगद्रूप मोठमोठे तरंग उत्पन्न होतात, व ते तद्रूपच असतात. तेव्हां त्यांत अमुक एक उत्पन्न झालें आहे, अमक्याचा नाश झाला आहे, हें कसें म्हणतां येणार? व जेथें सर्वच एकरूप असतें, तेथें तशा व्यवहाराला अवकाशच कोठें आहे? महाचिदाकाश शांत आहे. स्वभावतःच त्यांत जगाचा अभाव आहे. विषयांचा असंभव असल्यामुळें ते विद्यमान नाहींतच. तेव्हां त्यांचे उदय-अस्त कोठून होणार? ब्रम्ह ज्या वेळीं सृष्टिरूपानें अवस्थित होतें, त्या वेळीं विचित्र वासनेच्या अनुसार संकल्प करतांच पर्वत आकाशरूप बनतात व आकाश पर्वतासारखें दिसूं लागतें. म्हणूनच योगाभ्यासानें सिद्ध झालेले महायोगी संविद्रूप सिद्धौषधिचूर्णानें एका निमिषांत जगाला आकाशरूप बनवितात. ज्याप्रमाणें या प्रसिद्ध भूताकाशांत सिद्धांच्या संकल्पानें कल्पिलेलीं अनंत नगरें एकमेकांहून अगदीं भिन्न पण गुप्त असतात, त्याप्रमाणें ब्रह्मामध्यें असंख्य सृष्टि असतात. पण त्या वस्तुतः चिदाकाशच होत. महासागरांतील तरंग परस्परांशीं मिश्रित झालेले असले तरी जसे जलाहून पृथक् पृथक्च असल्यासारखे भासतात, पण वस्तुतः पृथक् नसतात, त्याप्रमाणें महाचितीमध्यें हे महासर्ग परस्परांशीं मिश्रित असूनहि पृथक्च रहातात. पण वस्तुतः ते त्याहून व्यतिरिक्त नसतात. ज्ञानी योगी आपल्या संकल्पित लोकांतून दुसऱ्या सिद्धांच्या संकल्पित लोकांमध्यें जाऊं शकतात, म्हणजे त्यांना

आपली उपाधि मूळ चैतन्यामध्यें लीन करून व दुसऱ्याच्या चित्तामध्यें प्रवेश करून त्या त्या लोकामध्यें जाणें शक्य आहे, असें अनुभवी योगी सांगतात. त्यावरूनहि एका चैतन्याचेंच सत्यत्व सिद्ध होतें. तथापि योग हा सर्व-साधारण लोकांचा विषय नव्हे. असो; कधींहि विनाश न पावणाऱ्या परमपदामध्यें हीं सर्व भूतें आकाशांतील मेघादिकांप्रमाणें किंवा गंधर्व-नगरादिकांप्रमाणें स्थित आहेत. स्फटिकामध्यें प्रतिबिंबित झालेल्या रेखा वगैरे जशा दिसतात, त्याप्रमाणें सर्व सृष्टिभ्रम परमार्थ आत्मानंदांतच सहज प्रतीत होतात. ते वस्तुतः उदय पावत नाहींत, कारण ते औपाधिक असतात. निरनिराळ्या पुष्पांचे सुवास एकमेकांत जरी मिसळले, तरी ते स्वभावतः जसे अगदीं भिन्न भिन्न असतात, त्याप्रमाणें सर्व सृष्टि आकाशरूप असून सिद्धांच्या भूमीप्रमाणें परस्पर भिन्नभिन्न असतात. ज्यांचा संकल्प व मोह अतिशय वाढलेला असतो, त्यांना प्रपंचहि स्थूल दिसतो, पण ज्या योगाभ्यासी लोकांचा संकल्प व मोह विचारानें सूक्ष्म, सूक्ष्मतर, झालेला असतो, त्यांना जगाचा अनुभवहि तशाच रूपानें येतो. रामा ! तत्त्वदृष्टीनें जर पाहिलें, तर आंतर विज्ञान हाच परमार्थ आहे, असा वाद करीत बसणें हेंहि खरें नव्हे. दृश्य पदार्थ दुःखाला कारण आहे, व अशा पदार्थांनींच हें सर्व जगत् भरलें आहे, हेंहि खरें नव्हे, असा वाद करणेंहि बरें नव्हे. ज्याच्या त्याच्या संकल्पाप्रमाणें ज्ञान फलद्रूप होत असतें. चैतन्यामध्यें जें चित्त्व आहे तेंच जगत् आहे, अशी भावना केली ह्मणजे मग त्यांत जल, व त्याचें द्रवत्व यांप्रमाणें भेद संभवत नाहीं. सर्वांचा आधार काल, तदंतर्गत चतुर्दश भुवनें, त्या भुवनांतील मी, तूं इत्यादि म्हणणारे भोक्ते जीव त्यांच्या उपभोगाचीं साधनें—इंद्रियें, शब्द-स्पर्शादि विषय, त्यांचा विचित्र भोग हें सर्व ईश्वररूप आहे. सर्वज्ञ, सर्वशक्ति, इत्यादि उपाधीनें युक्त असलेल्या परमेश्वराचें तें मायिक स्वरूप आहे अशी भावना केली, ह्मणजेच परमार्थतः एक शांत चिदाकाशच आहे, असा निश्चय होतो; आणि तो झाल्यावर रागादि दोष मुळींच संभवत नाहींत. इच्छादि दोषांना जिंकण्याचा हाच एक उपाय आहे. ३७.

---

## सर्ग ३८ वा.

—:०:—

१ चित् व चेत्य ( विषयी आणि विषय) यांचा संसर्ग व भेद या विषयींच्या भ्रमाचें निरसन. २ चित्च जगत् आहे, या सिद्धांताचें सत्तर्कानें उपपादन.

**श्रीवसिष्ठः**—चित् जेव्हां अब्रह्मताभ्रमानें क्षुब्ध होते, तेव्हां जगत् पहाते. माया दिसण्यासाठीं एक प्रकारचें अंजन नेत्रांत घातलें ह्मणजे आकाशांत जसा पर्वत दिसूं लागतो, तसेंच विक्षिप्त झालेल्या चित्‌ला जगत् दिसतें. संकल्पानें उत्पन्न केलेली सृष्टि व ब्रह्मसृष्टि या दोन्ही आम्ही सारख्याच मानतों. चित्रांतील सृष्टि जशी कधींहि क्षुब्ध होत नाहीं, त्याप्रमाणें ब्रम्हांतील सृष्टिहि ब्रह्मामध्यें क्षोभ उत्पन्न करीत नाहीं. कारण चित्रांतील सृष्टिप्रमाणेंच ही बाह्य सृष्टिहि भ्रांतिकृत आहे. तथापि ती जीवाच्या कल्पनेनें क्षुब्ध झाल्यासारखी दिसते. ज्याप्रमाणें भिंतीवरील चित्रसृष्टि वस्तुतः भिंतीच्या रूपानेंच रहाते, त्यामुळें ती वस्तुतः भिंतीहून भिन्न नाहीं, पण भ्रांत मनुष्याच्या दृष्टीची कल्पना मनांत न येतां चित्रांतील सृष्टिमात्र स्पष्ट दिसूं लागते त्याचप्रमाणें ही सृष्टि ज्ञानामध्यें कल्पित आहे, त्या-

मुळें वास्तविक ज्ञानरूप आहे. ती ज्ञानाच्या बाहेर नाहीं, तथापि भ्रांत मनुष्याच्या दृष्टीनें ती बाह्य आहे असें दिसतें. ज्ञान सत्यरूप आहे. म्हणून बाह्य विषयरूपताहि सत्यच आहे, असें तूं समज. यावरून तुला कदाचित् असें वाटलें कीं, हें आमचें मत बौद्धांचा 'बाह्य पदार्थ आहेत' हा वाद किंवा 'ते मुळीं नाहींतच, तर केवळ विज्ञानच पदार्थरूपानें भासतें, हा विज्ञानवाद यांशीं विरुद्ध नाहीं. पण त्या वादांचाहि आमच्या सिद्धांतांत अंतर्भाव होतो. कारण आम्ही चिद्हून भिन्न असलेलें विज्ञान व बाह्य प्रपंच यांना खोटे मानतों, त्यामुळें व्यवहारामध्यें कांहीं अपेक्षेनें दोन्ही वाद स्वीकारतां येतात. परमार्थतः मात्र ते दोन्ही खोटे! सर्व चिद्रूप आहे आणि चित् नेहमीं अक्षुब्ध असते, तिच्यामध्यें कोणत्याहि प्रकारचा विशेष नसतो. त्यामुळें क्षुब्ध झालेल्या आकाशादिक पंचभूतांची शांति अर्थात् सिद्धच आहे. त्यामुळें सर्व पूर्ण ब्रह्म सत्स्वरूप आहे, हीच गोष्ट सिद्ध होते. आम्ही जें कांहीं करतों तें सर्व त्या ब्रह्मसत्तेकरितां, व जें जें करतों तें तिच्यामुळेंच. तें सर्व ब्रह्मच सर्वतः आहे. तें सर्वमय आहे. त्या सर्वात्म्याला नमस्कार असो. विषय चिन्मात्र असल्यामुळें तो द्रष्ट्याच्या चितूस्वरूपाशीं जेव्हां एकरूप होऊन जातो, तेव्हांच दृश्य रूपानें त्याचा अनुभव येतो, त्यावांचून नाहीं. जेव्हां द्रष्टा, दर्शन व दृश्य ही दृष्टि केवल चिन्मात्रच आहे, असा निश्चय होतो, तेव्हां सर्व जगाचें स्वरूप केवल अनुभव-ज्ञान आहे, असें परमार्थतः सिद्ध होतें. द्रष्टा व दृश्य हीं दोन्ही चिदात्मक साक्षीमध्यें जर एकरूप न झालीं, तर ऊंस खावयास प्रवृत्त झालेला मनुष्य ऊंसाला पाहून व तो चोखीत असूनहि त्याचें माधुर्य जाणण्यास पाषाणाप्रमाणें समर्थ होत नाहीं. कारण जडाला रस कळणार कसा? स्वतः रसच त्याला आपला अनुभव देईल, असें म्हणावें, तर तोहि जडच आहे. चेत्य म्हणजे विषय चिन्मय असल्यामुळें जलामध्यें जलबिंदु जसे मिळून जातात, तसे ते चित्तीमध्यें निमग्न होतात, त्यामुळें अनुभव येतो. त्यावांचून तो येणें शक्य नाहीं. दोन काष्ठांना परस्परांचा अनुभव येत नाहीं. त्यांची काष्ठत्व ही जाति जरी एक असली तरी त्यांचें चितूशीं तादात्म्य न झाल्यामुळें जसें ज्ञान होत नाहीं, त्याप्रमाणें जड द्रष्टाहि जोंवर चितूशीं तादात्म्य पावत नाहीं, तोंवर त्याला जाणूं शकत नाहीं. दृश्य चिद्रूप होईतों काष्ठासारखेंच असतें. काष्ठाची स्थिति जशा प्रकारची असते, तशीच दृश्याची असते. काष्ठ चिन्मय झाल्यानें जसें द्रष्ट्याला दिसतें, तसें इतर दृश्यहि चिन्मय होऊनच त्याच्या अनुभवास येतें. त्यामुळें तें चिद्रूप आहे, असा तर्कानेंहि निश्चय करितां येतो. जल, वायु, पृथ्वी, इत्यादि सर्व महा चिद्रूपानेंच विस्तार पावलेले आहेत. त्यामुळें जगाचें ब्रह्मैक्य सिद्ध होतें. तर मग त्याला ज्ञान कां होत नाहीं, असें विचारशील, तर बाबारे! आपण ज्याला जड पदार्थ म्हणतों त्यांत बुद्धि, प्राण, जीव इत्यादि नसतात; त्यामुळें त्यांना ज्ञान होत नाहीं. प्राण, बुद्धि इत्यादिकहि भावनेनें कल्पिलेलें आहे व भावना म्हणजे चितूचा विकास आहे, तो इच्छेनें उदय पावत असतो. जेव्हां इच्छा नाहीं, तेव्हां पदार्थांची भावना नाहीं, व भावना नाहीं तेथें पदार्थ नाहीं. अर्थात् ब्रह्मसत्ताच जगत् या रूपानें भासते व सुषुप्ति, प्रलय, या रूपानेंच ती शांत होते. सर्व बीजांमध्यें आत्माच पुरुषत्वानें अनुगत होतो. जगांतील प्रत्येक पदार्थामध्यें जो अतिशय सूक्ष्म सारभूत अंश असतो, तोच तो परमात्मा होय. तोच अंकुरापासून शाखा, पुष्प,

बीज इत्यादि उत्तरोत्तर सर्व कार्यांत व्याप्त असतो. यास्तव जो जो अंश ज्यापेक्षां सूक्ष्म व त्यामुळेंच कारण म्हणून प्रसिद्ध असतो, त्याचा त्याचा ब्रम्हकोटीमध्यें प्रवेश करून जो जो स्थूल व त्यामुळेंच कार्यरूपानें प्रसिद्ध असलेला भाग, त्या त्या भागाला मायाकोटीमध्यें प्रविष्ट करावें; ह्मणजे कार्याच्या अपेक्षेनें सूक्ष्म असलेलें कारण ब्रम्हरूप आहे, व कारणाच्या अपेक्षेनें स्थूल असलेलें प्रत्येक कार्य मायामय व त्यामुळेंच मिथ्या आहे अशी भावना करावी. ब्रम्ह सर्व परमाणूंचा आत्मा आहे. त्यामुळेंच प्रत्येक पदार्थामध्यें असणारा जो साररूप सूक्ष्म अंश तीच परमार्थ वस्तु व तेंच ब्रम्ह होय. जसें घटादि कार्य सर्व मृण्मय असतें, मृत्तिका हेंच त्यांतील मुख्य द्रव्य होय, तिच्यावांचून त्यांत कांहीं नाहीं; तसेंच हें सर्व जगतादि आमूलाग्र ज्या ज्या पुरुषाकडून जसें जसें विचारपूर्वक पाहिलें जातें, तसें तसें तें सर्व सन्मात्ररूप ब्रम्हच दिसतें. अणुरेणूइतकेंहि त्यांत दुसरें कांहीं नाहीं. सुवर्णाचे हजारों अलंकार जरी पुढें मांडले तरी त्यांत जसें सुवर्णत्वाहून अन्य कांहीं नसतें, त्याप्रमाणें जगद्भाव व जीवभाव यांच्या समुदायामध्यें शांत ब्रम्हाचें शांतत्वच असतें. दुसरें कांहीं नाहीं. रामा, तुझ्याजवळच जर कोणी मनुष्य निजला असला, व तो स्वप्नांत मेघांचा मोठा समुदाय पहात असला, तरी तो जसा तुझ्या दृष्टीस पडत नाहीं, त्याप्रमाणें, माझ्या दृष्टीनें सृष्टि, स्थिति, लय इत्यादि सर्व क्षोभ शून्यरूप आहेत. आकाशाची मलिनता व गंधर्वपुत्रांची सेना जशी मिथ्या, तसेंच हें जगतहि शून्यरूप होय. तें केवळ शांततारूप आहे. अंतःकरणांतील संकल्पभ्रमच पुष्परूप होऊन बाहेर जगाच्या आकारानें फलद्रूप होतो. ज्याप्रमाणें भूमींत पेरलेलें वटवृक्षादिकांचें बीज जलानें आर्द्र झालें असतां अंकुरादि क्रमानें महावृक्ष बनून छाया, आश्रय, इत्यादिकांच्या योगानें प्राण्यांवर उपकार करण्यास समर्थ होतें, त्याप्रमाणेंच अंतःकरणांतील संकल्पबीजापासून हा जगद्वृक्ष विस्तार पावतो व प्राण्यांना त्यांच्या कर्माप्रमाणें सुखदुःखादि भोग देतो. ज्याचे अहंतादि प्रतिबंध नाहींसे होऊन निरतिशयानंद व्यक्त झाला आहे, त्या ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें, अणिमादि सिद्धि कस्पटाप्रमाणें तुच्छ होतात. ज्ञानी महात्म्याला देव, असुर, मनुष्य, इत्यादि विविध प्राण्यांनीं भरलेलेंहि हें विश्व एका केसाइतकें तुच्छ भासतें, त्यामुळें त्रैलोक्यांत मला असा एकहि पदार्थ दिसत नाहीं, कीं जो त्याच्या मनांत लोभ उत्पन्न करूं शकेल ! ज्याला आत्म्याचा साक्षात्कार झाला आहे, तो कसाहि वागला व कोठेंहि गेला तरी त्याच्या मनांत द्वैतसंकल्प उत्पन्न होत नाहींत. ज्या महात्म्याला सर्व विश्व आकाशासारखें शून्य भासतें, त्याला मिथ्या विषयांची इच्छा कशी होणार ? ज्याचे सर्व विषय शांत झाले आहेत, व सर्व इच्छा निवृत्त झाल्या आहेत, ज्याला वैभव व दारिद्य समान भासतात, त्याचा महिमा जाणण्यास कोण समर्थ आहे ? त्याचे बंधु-पुत्रादि इष्टजन मरण पावले तर त्याला खेद होत नाहीं, व त्यांचा उत्कर्ष झाला, तर त्यामुळें हर्ष होत नाहीं. आप्त-इष्टांच्या मरणानें हा मीच मृत झालों आहें असें तो समजत नाहीं, व त्यांच्या जीवनानें मीच जिवंत आहें असेंहि मानीत नाहीं. अज्ञजनांच्या भ्रांतीनें मृगजलाच्या प्रवाहाप्रमाणें भ्रांतीला पात्र झालेल्या आत्म्यामध्यें जन्म व मरण हे भाव खोटेच भासतात. पण आह्मी जों त्यांचें उत्तम रीतीनें परीक्षण करावयास जातों, तों आह्मांला भ्रांतिहि दिसेनाशी होते. आम्ही परीक्षक आहोंत, ही कल्पना

नाहींशी होते, व जन्म–मरणांचें नांव सुद्धां उरत नाहीं. तर केवळ शांत, अव्यय तत्त्व अनुभवास येतें. जो दृश्याविषयीं विरक्त झालेला असतो, जो आत्म्यामध्येंच रममाण होतो, व ज्याचें चित्त शमसंपन्न झालेलें असतें, तो वस्तुतः विद्यमानस्वरूप असूनहि अविद्यमान असा भासतो. त्यानें भवसागराचें उल्लंघन केलेलें असतें. त्यामुळें तो ब्रम्हरूपानें जरी स्थित असला तरी देहेंद्रियादिकांनीं रहित असतो. ज्याची मनोवृत्ति अतिशय शांत झाली आहे व त्यामुळें जो आत्म्यामध्यें एकरूप होऊन गेला आहे, तो वस्तुतः विद्यमान जरी असला तरी निर्वाण पावलेला असतो. कारण तो निरुपाधिक आत्मरूप झालेला असतो. दिवा मालविला असतां त्याचें जसें निर्वाण होतें म्हणजे तो जसा शांत होतो, त्याचप्रमाणें मनोवृत्तीच्या शांतीमुळें आत्म्याला निर्वाण प्राप्त होतें. ज्याला बुद्धीपासून घटपटादि स्थूल व सूक्ष्म पदार्थांपर्यंत सर्व दृश्य रुचेनासें होतें, त्या आकाशाप्रमाणें शांत असलेल्या पुरुषाला ज्ञानी लोक मुक्त असें म्हणतात. अविचारामुळें ‘ अहं ’ ही भावना उद्भवते व विचारानें ती नाहींशी होते. ‘ अहं ’ चाच अभाव झाल्यावर जगत् कोठचें व संसार तरी कोठचा ? चैतन्याच्या विपरीत भावनेमुळेंच बुद्ध्यादिकांच्या स्वरूपानें भासणारें चिदाकाश संकल्पमय जगाला जाणतें. ज्याप्रमाणें माझें मन सर्वविषयशून्य झालें आहे, तसेंच तुझेंहि होईल. तुला जर आत्म्याचें यथार्थ स्वरूप कळेल व त्यामुळें भ्रांतीचा नाश होईल तर तुझें मनहि सर्व विषयशून्य होईल. तूं भूतांचा आत्मा होशील. त्यानंतर सर्व आचरण मंगलरूप होईल, तुझी स्थिति निर्वाणरूप होईल. रामा, तूं जें करतोस, तूं जें खातोस, जो होम करतोस, जें देतोस, जें तप करतोस, जी हिंसा करतोस व दुसऱ्याहि ज्या ज्या क्रिया करतोस तें सर्व अव्यय शिवस्वरूपच आहे. मी, तूं, क्रिया, काल, आकाशादि भूतें, लोकालोकादिक पर्वत इत्यादि जें जें कांहीं आहे, तें सर्व मंगलरूप चिदाकाशच पसरलें आहे. मनाचे संकल्प व विकल्प, रूपादि विषयांचे अनुभव, त्रिकालीं अनुभवास येणारें जगत्, जन्म, जरा, मरण, रोग, इत्यादि सर्व महाचिदाकाशच आहे व तें सर्व शिवस्वरूप आहे. रामा, तूं आपल्या दुःखाच्या शांतीचे उपाय शोधीत बसूं नकोस, मनांत कांहीं शंका बाळगूं नकोस, विषयांचा अनुभव घेऊं नकोस, सर्व इच्छा टाकून दे, चिंतनहि करूं नकोस, मी अमुक आहे असा अभिमान धरूं नकोस, आणि या सर्व गोष्टी केल्यावर तूं जसा असशील तसाच रहा, तेंच निर्वाण होय. इच्छा व मनन हीं टाकल्यावर शांत, भावनाशून्य व वासनारहित होऊन तूं वाटल्यास व्यवहार कर किंवा करूं नकोस. वायूचा स्पंद व अस्पंद या दोन्ही प्रकारें जसा व्यवहार होतो तसाच तुझा व्यवहार होऊं दे. ज्याप्रमाणें लाकडाची नौका वल्ह्यांच्या योगानें चालविली जाते, त्याप्रमाणें तुझी पुरुषाला उचित् असलेली चेष्टा वासना व संकल्प यांनीं रहित, शांत व शास्त्रानुसार होऊं दे. हे रामा! तुझा व्यवहार स्नेहानें युक्त असा न होवो. माता, पिता, बंधु इत्यादि लोकांवर तूं अत्यंत आसक्तहि होऊं नकोस. फार काय, तूं ज्ञानी आहेस कीं अज्ञानी आहेस, दयाळू आहेस कीं निष्ठुर आहेस, हेंहि कोणाला कळू देऊं नकोस. तर तूं व्यवहारांतहि चित्रांतील दीपाप्रमाणें स्थिर रहा. प्राप्त भोगाविषयीं तूं विरक्त हो. पुढें प्राप्त होणाऱ्या भोगाची इच्छा करूं नकोस. तूं वासनाशून्य झालास म्हणजे मग शास्त्रावांचून तुला कांहींच प्रिय वाटणार नाहीं. शास्त्रच तुला विश्रांति

देईल. त्यामुळेंच तुला स्वसुखाचा अनुभव येईल. जोंवर देह आहे, तोंवर अवश्य तो व्यवहार केलाच पाहिजे. म्हणून तो शास्त्रानुसारच होईल व त्यामुळें चित्तदोष शांत होतील, असाच व्यवहार तूं कर. पण तसाहि तूं अभिनिवेश धरूं नकोस. मी शास्त्रानुसारच वर्तन करीन, सज्जनांचीच संगति धरीन, असा आग्रहहि तूं धरूं नकोस. कारण कोणत्याहि प्रकारचा अभिनिवेश न धरतां आपापल्या वर्णाश्रमाला उचित अशा आचरणांत व शमदमादिकांत आसक्त होणें, हेंच ज्ञानी पुरुषाचें मुख्य लक्षण आहे. यथेष्ट आचरण हें ज्ञानाचें लक्षण नव्हे. ३८

## सर्ग ३९ वा.

१ आत्म्यामध्यें विश्रांति पावलेला मनुष्य कोणत्या रूपानें अवशिष्ट रहातो, व जगत् त्याला कसें दिसतें, त्याचें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—जो पुरुष संकल्परहित असतो, तो शास्त्रानुसारच वर्तन करील हा नियम कसा संभवतो ? असें विचारशील तर सांगतों. रामा, परमार्थतत्त्वाचा साक्षात्कार झाल्यामुळें ज्याचा संसार क्षीण झाला आहे, असा पुरुष, नियमानें शास्त्रीय व्यवहारच करावा, असा संकल्प करीत नाहीं. कारण, प्रसंगप्राप्त व्यवहाराला कारण होणारा जो संकल्प, तोहि आभासरूप असल्यामुळें स्वात्माच आहे असें पाहतो. संकल्प या रूपानें त्याकडे पहातच नाहीं आणि कोणत्याही वस्तूकडे त्या त्या वस्तूच्या रूपानें पाहिल्यावांचून तिची सत्ताच सिद्ध होत नाहीं. त्यामुळें ज्ञानी पुरुषाच्या व्यवहाराला अवश्य असलेला संकल्प हा खरा संकल्प नसून, संकल्पाभास आहे. आरशावर तोंडाची वाफ सोडली असतां त्याला जशी मलिनता प्राप्त होते, त्याप्रमाणें चैतन्यामध्यें आत्म-साक्षात्कार होण्यापूर्वीं कांहीं अनिर्वाच्य कारणामुळें 'अहं' अशी अहंता उद्भवते, पण ती तत्त्ववेत्त्याच्या ठिकाणीं कांहीं कारणावांचून तत्काल नाहींशी झालेली दिसते. त्यानंतर मोठ्या यत्नानें जरी तिचा शोध केला, तरी ती हातीं लागत नाहीं. ज्याचें अज्ञानावरण क्षीण झालेलें असतें, ज्याच्या सर्व इच्छा शांत झालेल्या आहेत, जो परमामृताच्या लाभानें पूर्ण संतुष्टचित्त झाला आहे, तो निरतिशय आनंदस्वरूपसत्तेनेंच विराजमान् होतो. पूर्णचंद्राच्या योगानें आकाश जसें शोभतें, त्याप्रमाणें ज्ञानरूप प्रकाशानें चमकणाऱ्या बुद्धीनें ज्ञानी आसमंतांतील सर्व प्रदेश प्रकाशित करतो. तो जेथें असतो, तेथील लोकांच्या अंतःकरणांत संशयरूप धुकें राहूं देत नाहीं. वायु मेघादि आवरणाला दूर सारून सूर्यप्रकाशाला सर्व ब्रह्मांडभर पसरण्यास जसा अवकाश देतो, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाची बुद्धि अज्ञ जनांच्या अंतःकरणांतील अज्ञानावरणाला घालवून आत्मविचाराला अवकाश देते. ज्ञानी पुरुष आत्माच आहे, असें कोणालाहि सहज कळतें. कारण, त्याच्या ठिकाणीं संसारदोष किंवा संदेह यांचा अभाव असतो. त्याला आत्मप्रकाशाचा लाभ झालेला असतो, त्याच्या ठिकाणीं अज्ञानावरण नसतें. त्यामुळें तो शरत्कालांतील आकाशाप्रमाणें स्वच्छ असतो. त्याच्या ठिकाणीं संकल्प नसतो. तो निराधार असतो, शांत असतो. ब्रह्मलोकांतून आलेल्या वायूप्रमाणें तो अंतःकरणांत अति शीतल असतो. त्यामुळें अशा पुरुषाच्या समागमांत राहून प्रणाम, शुश्रूषा इत्यादिकांच्या योगानें तो इतर लोकांनाहि निष्पाप करीत असतो. स्वर्गादि पदार्थांना स्वप्नांतील पदार्थांप्रमाणें, किंवा वंध्या-

पुत्राप्रमाणें जाणणें, हा ज्ञानी पुरुषाचा स्वभावच आहे. पदार्थ नसतांना तो भासणें हेंच भ्रमाचें स्वरूप आहे. अविद्यमान असलेलेंहि हें जगत् अनुभवाला येतें, त्यावरूनच त्याचें मिथ्यात्व सिद्ध होतें. मिथ्या प्रत्ययांचा हा स्वभावच आहे. या असत्य संसारामध्यें अर्थ कोठून असणार? व तो कशाच्या आधारानें रहाणार! बंध व मोक्ष हे शब्दच वंध्यापुत्राप्रमाणें विकल्परूप आहेत. जगत् ब्रह्मरूपानें सत्य आहे. 'जगत्' या रूपानें त्याला कांहीं निमित्त नाहीं. तें संकल्पाचाहि विषय होऊं शकत नाहीं व त्याला योग्य आधारहि पण नाहीं. त्याला ब्रह्मरूप जाणलें म्हणजे मग अहं ही वृत्तिहि रहात नाहीं, व 'जगत्' ही भावनाहि उरत नाहीं. आत्मस्वरूपामध्यें अंतःकरण विश्रांति पावलें, म्हणजे 'मी, तूं' इत्यादि वृत्ति, सुख-दुःख इत्यादि अनुभव, व सृष्टि, स्थिति, इत्यादि अवस्था, यांचा अनुभव न येणें साहजिक आहे. एका क्षणामध्यें एक लक्ष योजनें दूर असलेल्या प्रदेशीं आत्मचिति जाऊन पोंचली असतां, तिचें मार्गांत जें निर्विषय स्वरूप असतें, तेंच वास्तविक आत्मस्वरूप होय. तें स्पंदरहित वायूप्रमाणें, किंवा शुद्ध आकाशासारखें निरुपाधिक असतें. निर्विषय व शांत चैतन्य हेंच सर्व प्राण्यांचें आत्मस्वरूप होय. त्यांत स्थिर अवस्थित झालेल्या विवेकी पुरुषाला जगाचा अनुभवच येत नाहीं. सुषुप्तावस्थेंत स्वप्नाचा अनुभव नाहीं, व स्वप्नांत सुषुप्तीचा अनुभव नाहीं. सृष्टि व प्रलय यांविषयींची भ्रांतिहि सुषुप्ति व स्वप्न यांसारखीच होय. हें स्वप्न, ही सुषुप्ति, इत्यादि विभागहि भ्रांतीमुळेंच प्रतीत होतात. तत्त्वामध्यें विभाग नसतांना, तो दाखविणें हा भ्रांतीचा स्वभावच आहे. वस्तुतः स्वप्न नाहीं, सुषुप्ति नाहीं, बंध नाहीं व मोक्ष नाहीं. सर्व एक सत्य व शांत तत्त्व आहे. भ्रांति मिथ्या आहे. विचार केला असतां ती केवल आभासरूप भासते. अहो, शुक्तिरजताप्रमाणें असत्य असलेली वस्तु प्राप्त कशी होणार? आणि जें प्रमाणाचा विषय होत नाहीं, तें नाहीं; त्यामुळेंच भ्रांतीचा संभवच नाहीं. याप्रमाणें विचार केला असतां, कोणालाहि साक्षिस्वभावाहून कशाचाही अनुभव येत नाहीं; ही गोष्ट सिद्ध होते. साक्षिस्वभावच भ्रामक पदार्थांच्या रूपानें प्रतीत होतो. शास्त्रानुसार भावना केली असतां, हा साक्षीचा स्वभावच सर्वांना परमप्रेमास्पदत्वानें अनुभवास येतो. तो वस्तुतः जरी एक आहे, तरी स्वरूपांतच ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय इत्यादि त्रिपुटी कल्पून ज्ञानादि रूपानें व्यवहार करूं लागतो. अर्थात् सर्व व्यवहार आत्म्याच्या या साक्षिस्वभावामुळेंच होतो. तो एकच असतांना अनेक असल्याप्रममाणें भासतो. तेव्हां आतां वाद करून त्यांत सिद्ध तें काय करावयाचें? आत्म्याच्या स्वभावाहून भिन्न वस्तूची कल्पना केली कीं, संसारदुःख होतें व त्याच्या अतिशांत स्वभावामध्येंच स्थिर झालें कीं, मोक्षसुख प्राप्त होतें, असें आपल्या विवेचक बुद्धीनें निश्चित समजून मग तुला त्यांतील ज्याचा आश्रय करावासा वाटेल त्याचा तूं आश्रय कर. सूक्ष्म बीजामध्यें स्थूल वृक्ष असतो ही गोष्ट अनुभवानें सिद्ध आहे, त्यामुळें अमूर्त शिवामध्यें मूर्त जगत् असतें, असें ह्मणणें यांत कांहीं दोष नाहीं. जलांतील द्रवत्वाप्रमाणें विषय, संकल्प, बुद्धि, अहंता इत्यादि परमात्म्यामध्यें स्वभावतःच रहातात, पण ते वस्तुतः आकाशस्वरूप आहेत. ज्याप्रमाणें मूर्त पदार्थ आपल्याच स्वरूपभूत अवयवांनीं निरनिराळ्या क्रिया करतो, त्याचप्रमाणें चिदाकाशस्वरूप भूत-आकाशादि भूतांच्या योगानें सृष्टि, स्थिति, इत्यादि ईश्वराचा

व्यवहार व जन्म, मरण, सुख-दुःखभोग इत्यादि जीवाचा व्यवहार करतो. आकाशादि भूतें हे त्या चिदात्म्याचेच अवयव आहेत. त्याच्या सत्तेनेंच तीं भूतें सत्तावान् होतात, अर्थात् तो चिदात्माच सर्व पदार्थांच्या रूपानें सर्व क्रिया करण्यास प्रवृत्त होतो, पण तो स्वतः अकर्ता आहे. पदार्थांच्या व्यवहाराप्रमाणेंच शब्दप्रयोगादि व्यवहारहि चिदात्म्याच्या सत्तेनेंच होतो. शरीर, वागादि इंद्रियें इत्यादि सर्व भौतिक पदार्थ जड असल्यामुळें स्वतः व्यवहार करण्यास असमर्थ असतात, त्यामुळें " मी वसिष्ठ, तूं राम, " इत्यादि व्यवहार जिव्हादि इंद्रियांच्या व्यापारानें जो होतो, तोहि हृदयस्थ चिदात्म्याच्या सामर्थ्यानेंच होतो. त्याला मृदंग, डफ इत्यादि वाद्यांचा योग्य दृष्टांत आहे. वस्तुतः मृदंगादि वाद्यें जड आहेत, पण त्यांतून वादकाच्या इच्छेप्रमाणें विचित्र ध्वनि उत्पन्न होतात हें प्रसिद्ध आहे जी प्रत्यक्ष भासणारीहि वस्तु प्रमाणपूर्वक विचारानें भासेनाशी होते, ती केव्हांहि नाहींच. जगद्रूपहि विचारानें नाहींसें होणारें आहे, त्यामुळें स्वतः स्वरूपशून्य असलेलें तें ब्रह्मामध्यें ब्रह्मरूपानेंच स्थित आहे. ज्यांना जगद्रूप स्वप्न दिसत आहे, ते स्वप्नपुरुषहि परस्परांच्या दृष्टीनें विद्यमान नाहींतच. स्वप्नामध्यें आपण ज्या मनुष्यांना पहातों ते त्याच वेळीं आपणाला पहात नसतात हें प्रसिद्धच होय. मग ते ब्रह्मभूत आत्म्यामध्यें कोठून रहाणार ? खरोखर संसारी जीव आकाशांतील पुष्पाप्रमाणें ब्रह्मामध्यें केवल कल्पनामय असतात. रामा ! मी केवल ब्रह्मरूप आहें, त्यामुळें सांसारिक सर्व जीव माझ्यामध्येंच वायूंतील स्पंदाप्रमाणें आपल्या सर्व व्यवहारांसह रहातात. स्वप्न पहाणाऱ्या पुरुषाचें स्वप्न जसें त्याहून भिन्न नसतें, त्याप्रमाणेंच त्यांचा सद्रूप आत्मा मी आहें. निद्रित पुरुषाच्या स्वप्नाप्रमाणें, खरोखर, ते संसारी जीव अविद्यमान आहेत. त्यांच्याशीं माझा जो व्यवहार होतो तो ब्रम्हामध्यें अवस्थित असलेलें ब्रम्हच आहे, तथापि त्यांच्या दृष्टीनें मी त्यांना उपदेश करीत आहें, असें दिसतें. रामा ! ते जर मला अशा दृष्टीनें पहात असतील, तर खुशाल पाहोत. मला त्यांच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. आत्म्यामध्यें अगोदर मीच नाहीं; मग माझा उपदेशादि व्यवहार कोठचा ? ही सर्व ब्रम्हासत्ताच पसरलेली आहे. ही माझी वाणी सुद्धां ब्रम्हरूपच असून ती जणुं काय तुझ्यासाठींच उदय पावते. सर्व वस्तु केवल आनंदरूप आहेत, असें पाहिल्यामुळें सर्वांशीं अविरुद्ध असलेल्या तत्त्वज्ञानी पुरुषाला दुःखादि विरुद्ध पदार्थहि अनुकूलच भासतात. तो शुद्ध संविद्रूप असतो, त्यामुळें त्याच्या हृदयामध्यें भोगेच्छाहि उत्पन्न होत नाहीं. मनुष्यांचा बंध व मोक्ष त्यांच्या अधीन आहे. त्यांनीं मनांत आणलें तर ते बद्ध होतात, व मुक्तहि होऊं शकतात. पण प्रत्येकाचा बंध व मोक्ष याप्रमाणें त्याच्या स्वाधीन असूनहि प्रत्येक जीव मोहित होऊन, स्वरूपानंदाला विसरून संसारदुःख भोगूं लागतो, व त्यांतून सुटण्यासाठीं मोक्षोपायाचें अनुष्ठान करूं लागतो. पण हा सर्व गाईच्या पावलाला समुद्र समजण्यासारखाच भ्रम आहे. मिथ्या दुःखाचा उपशम हेंच मोक्षाचें स्वरूप आहे, व केवल विवेकानें स्वभावतःच त्याची सिद्धि होते. मोक्षाला धन, मित्र, क्रिया यांचा कांहीं उपयोग होत नाहीं. पाण्यामध्यें टाकलेला तेलाचा थेंब जसा चक्राकार बनतो, त्याप्रमाणें विषयाचें चिंतन करतांच आत्मचित् जगदाकार बनते. जाग्रदवस्थेंत स्वप्नवृत्तांत जशा प्रकारचा होतो, तशाच प्रकारचें विवेकी पुरुषाला जगत् भासतें. जागें होतांच स्वप्नांतील पदार्थ जसे

नुसते स्मरणाच्या उपयोगीं, तसेंच आत्मज्ञान झाल्यावर 'मी, तूं, हें जगत्' यांचा स्मरणापलिकडे कांहीं उपयोग नाहीं. यास्तव रामा! मीं पूर्वीं सांगितलेल्या क्रमानें योगाभ्यास कर, आत्मभावना दृढ कर, ह्मणजे जगद्वासना हळूहळू क्षीण होत जाऊन, मी नाहीं, संसार नाहीं, तर केवल एक आत्मस्वरूप आहे, असा निश्चय होऊन तेंच एक अवशिष्ट राहील. हा स्वभावसूर्य जसा जसा उदय पावत जाईल तसा तसा भोगांधकार कमी कमी होऊन शेवटीं सर्वथा नाहींसा होईल. तो आहे, असेंहि कधीं वाटणार नाहीं. याप्रमाणें भोगांधकार नाहींसा झाला ह्मणजे अंतःकरणादि साधनसमुदाय अज्ञान व 'स्थूल देहच मी' इत्यादि अध्यास, यांनीं तो रहित होतो. त्याचप्रमाणें ब्रह्माकारवृत्तीनें प्रदीप्त झालेल्या ज्ञानानें चमकूं लागतो आणि त्यामुळें दीपापासून सभोंवार पसरलेल्या प्रकाशासारखा ज्ञानप्रकाशानें सर्व जगाला व्यापून तो ब्रम्हरूप झाला आहे, असा भास होतो. ३९

---

## सर्ग ४० वा.

—:०:—

१. संसारांत ब्रम्ह भासत नाहीं, व ब्रम्हामध्यें संसार भासत नाहीं, पण जीवन्मुक्तींत पर्यायाने दोन्ही भासतात, असें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—शब्दादि बाह्य पदार्थ मन, बुद्धि, इंद्रियें, विषयज्ञान, इत्यादि सर्व बाह्य व आभ्यंतर वस्तूंचें वास्तव स्वरूप साक्षी चैतन्यच आहे, असें विद्वान् समजतात. त्या स्वरूपांत विकाररूप मल केव्हांही उद्भवत नाहीं. जेव्हां अपरिच्छिन्न अविद्येचा क्षय झाल्यामुळें वास्तव स्वभावस्थिति उदय पावते, तेव्हां संसार भ्रमासारखा भासतो. जेव्हां स्वभावामध्यें अंतःकरण विश्रांति पावून, शांतिरूप स्थिति रूढ होते, तेव्हां जगद्रूप दृश्य, सुषुप्तींत जसें स्वप्न, त्याप्रमाणें शांत होतें. भोग हेच संसार-महारोग आहेत, बंधु हेंच दृढ बंधन आहे, अर्थसंपात्तिच अनर्थांत पाडणारी आहे; यास्तव विवेकयुक्त बुद्धीनें स्वरूपांतच शांत व्हावें. अविद्यारूपत्व हाच संसार, व विद्यारूपत्व हेंच परमार्थतत्त्व, यास्तव परमाकाशरूप व्हावें, शांति धरावी, या संसारामध्यें क्लेश भोगीत राहूं नये. अर्थात् सुख व दुःख किंवा बंध व मोक्ष आपल्याच स्वाधीन आहेत, ते कसे म्हणशील, तर माझा अनुभव सांगतों. 'मी वसिष्ठ जीव आहें,' असें समजत नाहीं, दृश्य किंवा जगद्भ्रम यांना पहात नाहीं. शांत ब्रह्मामध्यें मीं प्रवेश केला आहे. त्यामुळें मी केवळ आनंदस्वरूप ब्रम्हच आहें. रामा, तूं मला वसिष्ठ या रूपानें जें पहातोस, तेंहि तूं आपल्या संकल्पाप्रमाणेंच अवलोकन करतोस. मी तर स्वतःला शांत केवळ परमाकाशच पहातों. तुला सुद्धां शब्द, अर्थ, इत्यादिरूप जे मनोमय भ्रम होतात, तेहि वायूतील स्पंदाप्रमाणें परमाकाश जें ब्रह्म त्यांतच जणुं काय उत्पन्न झालेसे दिसतात. वस्तुतः ते उत्पन्न होत नाहींत. मी द्वैत पहात नाहीं, यावरून द्वैताचा द्वेष करतों असें कदाचित् तुला वाटेल; पण वस्तुस्थिति तशी नाहीं; तर द्वैत व अद्वैत यांचा एकाच काळीं प्रत्यय येणें अशक्य आहे. जो ब्रम्हरूप झालेला असतो, तो प्रपंचाला जाणत नाहीं व प्रपंचमय झालेला असतो, तो ब्रम्हाला ओळखीत नाहीं. निद्रित मनुष्य स्वप्नाचा अनुभव घेत नाहीं व स्वप्न पहात असलेला मनुष्य सुषुप्तीचा अनुभव घेत नाहीं, पण जागा झालेला मनुष्य स्वप्न व जागृति या दोहोंचा जसा अनुभव घेतो, त्याचप्रमाणें ज्याला ब्रम्हसाक्षात्कार झाला

आहे, तो शांतचित्त जीवन्मुक्त ब्रम्ह व जगत् या दोहोंचाहि एकाच वेळीं अनुभव घेतो. कारण तो ज्या वेळीं जगाला पहातो, त्याच-वेळीं तें ब्रम्ह प्रकाशमय आहे असेंहि समजतो. कारण जीवन्मुक्ताला प्रपंचाचें जर मुळींच भान नसतें, तर अज्ञ जीवांना उपदेश करण्याचें महत्कार्यहि त्याच्या हातून घडलें नसतें. ज्ञानी हें सर्व द्वैत जसें आहे तसेंच जाणतो, पण त्यांत आसक्त होत नाहीं. त्यापासून हळूहळू चित्ताचा निरोध करीत तो शुद्धात्मा शरत्कालीन मेघाप्रमाणें शांत होतो. स्मरणरूप व काल्पनिक संग्रामाचें जें स्वरूप असतें तेंच जीवन्मुक्ताच्या जगदनुभवाचें रूप असतें, त्याला सत् ह्मणतां येत नाहीं व असतूहि ह्मणतां येत नाहीं. त्यामुळें अहंत्व व जगत् हा शुद्ध भ्रम आहे. रामा! सर्व जीवांना दिसणारी ही जगन्माया परमार्थ सत्य आत्म्यामध्यें व शून्यामध्येंहि नाहीं. तिचा द्रष्टा जीवहि विद्यमान् नाहीं. त्यामुळें शून्य व अशून्य या दोहोंहूनहि अत्यंत विलक्षण असलेली ही भ्रांति अनिर्वचनीय आहे. ती जरी भासत असली, तरी तिची कार्यकारणपरंपरा लावतां येत नाहीं, त्यामुळें तिचें निश्चित स्वरूपहि सांगतां येत नाहीं. ४०.

---

## सर्ग ४१ वा.

—:०:—

१ अविद्यास्वभावामुळें त्रिभुवनरूप बाहुलीचें नृत्य, व २ विद्यास्वभावानें निर्वाण.

**श्रीवसिष्ठः**—' मी, तूं, ' इत्यादि या सर्व प्रपंचाचा अनुभव, हा अविद्येचा स्वभाव आहे. यास्तव शास्त्रीय उपायांनीं विद्या संपादन करून अद्वितीय, स्वप्रकाश, पूर्णानंदरूप होऊन, केवल विद्यास्वभाव बनून स्वतःला निर्वाणमय करावें. जेथें सूर्य असतो तेथें प्रकाश जसा अवश्य असतोच, त्याप्रमाणें जेथें आत्मसाक्षात्कार झालेला असतो, तेथें परम वैराग्य अवश्य असलेंच पाहिजे. तो साक्षात्कार म्हणजे विद्या, विद्वत्समागम, विवेक, विषयवैराग्य, यांमुळेंच सिद्ध होतो. कर्ता, कर्म, करण, द्रष्टा, दृश्य, दर्शन, इत्यादि सर्व सामग्रीनें रहित असेंच हें जगच्चित्र उद्भवलेलें आहे. आधारावांचून जसें एखादें चित्र असावें, तसेंच हें सर्व आहे. तें वस्तुतः उत्पन्न झालेलें नाहीं, त्यामुळें विविधाकारांनीं प्रतीत होणारेंहि जगत् शांत तत्त्वामध्यें शांत रूपानेंच स्थित आहे. तें अनामय परब्रह्मच असून सत्य व अव्यय आहे. जगद्रूपी चित्रांतील या असंख्य मूर्तींची गणना करण्यास कोण समर्थ आहे? त्या सर्व मूर्ति चिदाकाशांत केवळ जीवांच्या कल्पनारूप रंगानें रंगविल्या आहेत. तीं जगद्रूप चित्रें जणूं काय नवे नवे अभिनय करून शृंगारादि विकारांनीं युक्त असल्याप्रमाणेंच चेष्टा करीत असतात. परमाणूंप्रमाणें अतिसूक्ष्म पदार्थापासून ब्रम्हदेवासारख्या विराटपुरुषापर्यंत, प्रत्येकामध्यें त्यांचा असाच विलास चाललेला असतो. रामा! या जगच्चित्रपुत्रिका सर्व ऋतु, याच मस्तकावरील पुष्पमालांना धारण करतात. दिशारूपी बाहुलतांनीं त्या व्याकुल झालेल्या असतात. पाताललोक याच त्यांच्या पादलता आहेत. ब्रम्हलोक हीच त्यांची मान आहे. चंद्र व सूर्य हेच नेत्र आहेत, नक्षत्रसमुदाय हेच लोम आहेत, सप्तलोक हींच सात अंगें आहेत, सर्वत्र पसरलेलें स्वच्छ आकाश हेंच वस्त्र आहे. द्वीपांच्या सभोंवार असलेले समुद्र हींच त्यांचीं कंकणें आहेत. लोकालोक पर्वत याच मेखला आहेत, भौतिक शरीरादिकांचें धारण व पोषण यासाठीं धडपड करणारे जीव हेच त्यांचे प्राणवायु आहेत, पुराण व वेद

हींच त्यांचीं वचनें आहेत, निरनिराळ्या क्रियांचीं सुखदुःखादि फलें हेच त्यांचे विलास आहेत. तात्पर्य, अशा सर्व सामग्रीनें युक्त असलेल्या त्या त्रिजगत्-पुत्रिका सतत नृत्य करीत असतात, व तेंच आपल्याला जगद्रूपानें साक्षात् दिसत असतें. त्यांच्या या नृत्याचें कारण अविद्यायुक्त चित्तन आहे. कारण श्रुतीमध्यें अविद्याविशिष्ट ब्रह्मच जगाचें निमित्त सांगितलें आहे. ज्याप्रमाणें निद्रावस्थेंत अंतःकरणानें सर्वथा लीन न होणें हेंच स्वप्नाचें कारण, तसेंच अविद्यावस्थ ब्रह्म हेंच जगाचें कारण होय. हे रामा, तूं पारमार्थिक स्वभावाची भावना करीत, जागृतींतहि अज्ञाननाशामुळें असुषुप्त व सर्व द्वैतोपसंहारामुळें सुषुप्त अशा तूर्यपदामध्यें स्थिर हो. जागृतींतहि सर्व विक्षेप टाक. या प्रपंच-स्वप्नाचा आश्रय करूं नकोस. जागृतींतहि निद्रित असल्याप्रमाणें जगद्भावना-शून्य होणें, आत्मज्ञानानें आसक्ति व वासना यांनीं रहित होणें हाच स्वभाव आहे, असें तज्ज्ञ समजतात व त्याच स्वभावामध्यें दृढ होणें, हीच मुक्ति होय. कर्ता, कर्म, करण, द्रष्टा, दृश्य, दर्शन यांच्या अभावीं विषयाचें दर्शन व चिंतनहि संभवत नाहीं. त्यामुळें पूर्वोक्त स्वभावामध्यें स्थिर झालेल्या पुरुषाला व्यवहार-समयींहि जगत् चिदेकरसरूप भासतें. अति रमणीय आत्मतत्त्वामध्यें जगतहि रमणीय दिसतें. पूर्ण ब्रह्मामध्यें तें परिपूर्ण स्वरूपानें स्थित होतें. द्वैत व ऐक्य यांनीं रहित अशा प्रत्येक आत्म्यामध्यें द्वैत व ऐक्य यांनीं रहित असें ब्रह्म अखंड एकरूपानें भासतें. सृष्टिरूपानें स्थित असलेलें हें सत्य, सत्य आत्म्यामध्यें शांत राहिलें आहे. तें स्वरूपतःच शांत आहे. त्यामुळें आकाशाच्या मध्याप्रमाणें, मोठ्या शिलेच्या जठरासारखें, उत्तम रत्नाच्या मध्याप्रमाणेंच तें घनरूप असलें तरी आकाशोपम आहे. म्हणूनच त्यामध्यें जगत्प्रतिबिंब व्यक्त होतांच क्षुब्ध झाल्याप्रमाणें जरी दिसलें, तरी स्वतः अक्षुब्धच असतें. तें जगद्रूपानें असत् जरी भासलें तरी सद्रूपच असतें. ज्याप्रमाणें एखाद्या शिल्पशास्त्रज्ञाच्या मनांत पुढें होणाऱ्या एखाद्या विशाल नगराची रचना रहाते, त्याप्रमाणें जगत्कारण ब्रह्मामध्यें हें सर्व जगत् बीजरूपानें रहातें. त्या अवस्थेंत मन एकरस-रूप असतें. ज्याप्रमाणें कल्पित नगर संकल्पाहून भिन्न नसतें, त्याप्रमाणें हा जगाचा आभास परमार्थाहून भिन्न नाहीं. सुवर्णाच्या चौकोनी चिपेमध्यें, त्यापासून पुढें होणाऱ्या अनेक अलंकाराचे आकार जसे बीजरूपानें असतात. त्याप्रमाणें परब्रह्मामध्यें हें सर्व जगत् रहातें. पुढें होणारे विविध पदार्थांचे आकार जरी त्यांत असले तरी तें स्वतः शांत व अव्ययच असतें. त्यामध्यें सतत नाश व उत्पत्ति चालूच असते, तथापि तें स्वतः एकरूप, अनामय, उत्पत्तिनाशरहित व जरारहित असतें. तें तसें असूनहि अनेक असल्याप्रमाणें प्रत्ययाला येतें. हे रामा! ज्ञान झालें असतां केवळ शांत-स्वभाव ब्रह्मच आपल्या अद्वैत स्वभावामुळें अस्तोदयरहित असलें तरी सृष्टिरूप स्वराज्य-वैभवानें भासतें. म्हणजे ज्याप्रमाणें आकाशांत तिमिरयुक्त दृष्टीला अनेक केशाकार, गंधर्व-नगरें, नीलवर्ण इत्यादि दिसतात, तसेंच ब्रह्मामध्यें सृष्टिवैभव दिसतें; पण औषधादि उपायांनीं नेत्रदोष नाहींसे झाले असतां आकाश जसें जसें स्वच्छ भासतें, तसेंच विचारानें जगद्रहित ब्रह्म ज्ञानी पुरुषाला प्रतिक्षणीं दिसतें. ४१.

---

## सर्ग ४२ वा.

—:०:—

१ विश्व व विश्वेश्वर यांची एकता. २ विवेकानें पूज्य होणारा स्वात्माच परमेश्वर.

श्रीवसिष्ठः—शांत, कूटस्थ आत्म्यामध्यें जें प्रथमतः चित्ताचें स्फुरण होतें, तें चिदात्म्याहून भिन्न नाहीं. कारण तें चित्‌हि चिदात्म्याप्रमाणें अव्यक्त व निर्मल असतें व व्यवहारांत नाम व रूप यांच्या भेदामुळें वस्तूंचा भेद होतो, पण तो भेद नामरूप व्यक्त होण्यापूर्वीं चित्‌मध्यें संभवतच नाहीं. त्यामुळें चित् व चित्त यांचा भेद नाहीं. कारण चिद्‌हि निर्मल व चित्तहि निर्मल, त्यामुळें प्रभा व आकाश यांच्याप्रमाणें चिद् व चित्त यांचा भेद संभवत नाहीं. याच न्यायानें चित्ताच्या अधीन असलेला जगद्भेदहि असंभवनीयच आहे. निर्विकार प्रत्यगात्माकाशांत मननादि वृत्ति व शब्दादि विषय मृगजलाप्रमाणें भासतात, पण चित्तरूप सूर्य अस्त पावला असतां, ते सर्व विकार शांत होतात. वायूचें स्पंदन कोणत्याहि साधनाच्या अपेक्षेवांचून जसें होतें, त्याप्रमाणें परमात्म्याच्या प्रकाशाचा प्रसार हेंच जगत् आहे. पाण्यांतील द्रवत्वाप्रमाणें, आकाशांतील शून्यत्वाप्रमाणें, किंवा वायूंतील स्पंदाप्रमाणें, परमात्म्यामध्यें हें अनिर्वाच्य आत्ममय जगत् भासतें. महाचिद्रूप महाकाशांत जें हें जगत् दिसत आहे, तें रत्नांतील तेजस्वितेप्रमाणें चित्त्वच आहे. जसें जलामध्यें द्रवत्व, आकाशांत शून्यत्व, व वायूमध्यें स्पंदन, तसें महाचितीमध्यें जगत् आहे. ज्याप्रमाणें वायु आपल्या स्वरूपांत स्पंद पावतो, त्याप्रमाणें चिति स्वरूपांतच जगत् पहाते. त्यामुळें द्वैत, ऐक्य इत्यादि भेदांचा यत्किंचितूहि संभव नाहीं. अविवेकानें जगत् भयंकर भासतें, व विवेकानें क्षणभंगुर दिसतें. पण परमार्थबोध झाला असतां, तें सर्वदा ब्रह्ममात्र बनतें, त्यामुळें भयंकर किंवा क्षणभंगुर दिसत नाहीं. शुद्ध व आदि-मध्य-अंतरहित अशा केवल ज्ञप्तीवांचून त्यांत कांहीं नाहीं, असा ज्ञानी पुरुषांनीं निर्णय केला आहे—पण आत्मसाक्षात्कारानें तसा निर्णय होण्यापूर्वीं अनेक वाद प्रवृत्त होतात. कोणाला तें शांत शिवस्वरूप वाटतें, कोणी त्याला शाश्वत ब्रह्म म्हणतात, कोणी शून्य हेंच तत्त्व समजतात. कोणी केवळ विज्ञान हेंच या जगांतील सार समजतात. पण वस्तुतः तें अनंत चिद्रूपच आपल्या स्वरूपामध्यें जणूं काय विषयत्वाची भावना करीत, स्वरूपांतच ज्ञेयत्व, अज्ञत्व, इत्यादि अवस्थांस प्राप्त होतें. चित्वाच्या बलावरच आरोपित वस्तूंची स्फूर्ति होत असल्यामुळें चितत्त्वावांचून ज्ञेयाची सत्ता नाहीं व ज्ञेयसत्तेवांचून चितूला चित्त्व नाहीं. ज्याप्रमाणें शून्यरूप निर्विकार आकाशावांचून वायूचें कारण नाहीं, किंवा वायूवांचून स्पंदाचें दुसरें कांहीं कारण नाहीं, त्याप्रमाणें जगाचें चित्त्वावांचून दुसरें कांहीं कारण नाहीं. अतिस्वच्छ असलेली जी महाचिति तिच्यामध्यें सृष्टींतील निरनिराळ्या पदार्थांचें ज्ञान होण्यास, त्यांचें सत्त्व किंवा असत्त्व प्रतीत होण्यास दुसऱ्या कोणत्याहि कारणाची अपेक्षा नाहीं. चित् व जड यांच्या भेदाची व त्यांच्या कारणाच्या एकत्वाची सत्ता परब्रह्मामुळें सिद्ध होते. पण त्या कूटस्थ अद्वितीय चिदाकाशांत द्वित्व किंवा एकत्व यांची कल्पना कोण करणार? सत्ता व स्फूर्ति यांच्या योगानें त्यांचें समर्थन सृष्टींतलि जड पदार्थांपैकीं कोणीहि करण्यास समर्थ नाहीं. आकाशाच्या द्वित्वाचा, किंवा वायु व स्पंद यांच्या भेदाचा, कधींच कोणाला अनुभव येत नाहीं. कारण त्याच

भेद जरी कल्पिला तरी तो वास्तविक नसून शब्दमात्र असतो, हें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें विश्व व विश्वेश्वर यांचें द्वित्व असद्रूप आहे. जें महाचिन्मात्र तत्त्व तें सद्रूपच असून त्यांत द्वित्वाचा असंभव आहे. चिन्मात्रच विश्वासारखें भासतें. देश, काल इत्यादिकांनीं युक्त असल्यामुळें विश्वांतील कांहीं पदार्थ सत्य भासतात, कांहीं असत्य भासतात. जे थोडा वेळ राहतात, त्यांच्या अपेक्षेनें दीर्घ काल राहणाऱ्या पदार्थाला व्यवहारांत नित्य समजतात. न्यून प्रदेशांत रहाणाऱ्या वस्तूहून विस्तीर्ण प्रदेशांत राहणाऱ्या वस्तूला व्यवहारांत व्यापक समजतात. हें जरी खरें आहे, तरी वस्तुतः विश्व नाहीं, व विश्वत्व नाहीं. त्यामुळें सोन्याच्या अलंकारांमध्यें खरी सत्यता नसून सोन्यामध्यें जशी खरी सत्यता असते, त्याप्रमाणें देशकालांनीं परिच्छिन्न झालेल्या कोणत्याच वस्तूमध्यें सत्यत्व नसून चिन्मात्रालाच परमार्थ सत्यता आहे. जसें सुवर्णकंकण सोन्याहून निराळें आहे, असें ह्मणणें अशक्य, त्याचप्रमाणें विश्व परमात्म्याहून भिन्न आहे, असें ह्मणणें अयोग्य आहे. त्यांत द्वित्व किंवा ऐक्य यांतलि कशाचाच संभव नाहीं. त्यामुळें कार्यकारणता कोठची? बरें, 'काल्पनिक कार्यकारणभेद आम्ही स्वीकारितों,' असें म्हणशील, तर आकाशांतील शून्यत्वाप्रमाणें किंवा जलांतील द्रवत्वाप्रमाणें काल्पनिक भेदानें त्याच्या सत्यत्वाचा निर्वाह होत नाहीं. आकाश व आकाशांतील रेघ हीं दोन्ही जरी अत्यंत अभिन्न असलीं तरी त्यांच्या भेदाची कल्पना होते. त्याच न्यायानें चिन्मात्र, जगत् वगैरे यांचा जरी अभेद असला तरी काल्पनिक भेदाची सिद्धि होते. पण वस्तुतः ब्रम्हाचें जें रूप तेंच जगाचें रूप, तेव्हां त्यांत द्वित्व व एकत्व कोठलें? आकाश ज्या रूपाचें असतें, त्याच आकाराचें सर्व शून्यहि आहे. त्याच न्यायानें एक, निर्मल, व्यापक, सर्वात्मक चिन्मात्रांत हें सर्व जगत् आहे. शिळेवर सैनिकांचीं चित्रें कोरून त्यांची एक मोठी सेना बनविली असतां, त्यांत सर्वत्र पाषाणत्व अनुस्यूत असतें, तेव्हां त्यांत कार्यकारणवैचित्र्य कसें व कोठून संभवणार? आकाशामध्यें तद्भिन्न वस्तूचा जर असंभवच आहे, तर अनाकाशता कोठची? त्याचप्रमाणें महाचितीमध्यें तद्भिन्न प्रपंच तरी कसा असणार? अर्थात प्रपंचाचा जो भास होतो तो आत्मप्रकाशरूपच आहे. पाषाणावर कोरलेलें चित्र पाषाणाचाच विकार असल्यामुळें तद्रूप असतें, त्याचप्रमाणें हे साधो! या विश्वाविषयीं तशीच भावना करून स्वरूपामध्यें स्थित झालें असतां विश्वाचा लय होतो. त्यानंतर एखाद्या निश्चेष्ट मनुष्याप्रमाणें संसार अवशिष्ट रहातो. ज्याप्रमाणें नेत्र मिटले असतां बाहेरचे पदार्थ दिसेनासे होतात, त्याप्रमाणें अंतःकरण आत्म्यामध्यें लीन झालें असतां बाह्य जगत् दिसेनासें होतें. स्वप्नामध्यें जागृतींतील विषय असत् होतात व जागृतींत स्वप्नांतील विषय असत् होतात, कारण त्या दोन्ही अवस्थांत, त्या त्या विषयाची भावना होत नसल्यामुळें प्रपंचाचें भान भावनाधीन आहे, ही गोष्ट सिद्ध होते. रामा! तूं भावनेचा त्याग करून पाषाणासारखा निर्विकार होऊन रहा. कारण अंतःस्वभाव सर्वविकारशून्य आहे, म्हणून त्या आपल्या स्वरूपाप्रमाणेंच साम्यामध्यें स्थित व्हावें. जोंवर विवेक करण्याचें सामर्थ्य प्राप्त झालें नाहीं, तोंवर परमेश्वराची उपासना करावी. ती करीत असतांनाच विवेक, वैराग्य इत्यादि साधनांचा अभ्यास करावा. व्यापक विवेकरूप सामग्रीनें आत्मसाक्षात्कार होण्यासाठीं आत्मरूप परमेश्वराची प्राप्त पदार्थांनीं पूजा

करावी. भोग्यरूपानें जो जो पदार्थ प्राप्त होईल, तो विवेकबुद्धीनें परमेश्वराला समर्पण करावा. विवेकानें पूजिलेला स्वात्मा निरतिशय आनंदरूप वर सत्वर देतो. रुद्र, उपेंद्र इत्यादिकांची पूजा या पूजेपुढें अगदीं तुच्छ आहे विचार, शम, सत्संग इत्यादि हेच उपचार व पुष्पें यांच्या योगानें पूजिलेला स्वात्मा परमेश्वर तत्काळ मोक्ष हें फल देतो. यथार्थ ज्ञान, याच एका उपचारानें पूजिलेला तो परमात्मा, मोक्षासारखें सर्वोत्तम फल देतो. जेथें आत्मा हाच ईश्वर आहे असा निश्चय होतो, तेथें अनात्मरूप तटस्थ ईश्वराचा आश्रय कोण करील ? "अहो, पण तटस्थ ईश्वर पूजेनें प्रसन्न झाला असतां, शस्त्र, सर्प, विष, अग्नि इत्यादि घातुक पदार्थांपासून रक्षण करील, कूटस्थ आत्मा काय करणार?" म्हणून विचारशील; तर बाबारे, ज्यानें सत्संग, शम, संतोष, विवेक इत्यादिकांनीं आत्म्याला पूजिलें आहे, त्याला शस्त्रादि घातुक पदार्थांचा कांहीं उपसर्ग होत नाहीं, ते त्याला पुष्पाप्रमाणें कोमल वाटतात. देवपूजा, तप, तीर्थयात्रा, दानें, इत्यादि कितीहि जरी केलीं, तरी ज्यांच्यामध्यें विवेक नाहीं व ज्यामुळें ते महात्मेहि नाहींत, अशांना त्यांचा कांहीं उपयोग होत नाहीं. तीं त्यांना निरर्थकच असल्यामुळें क्षणिक फल देऊन जळून जातात. पण हे रामा! तींच जर विवेकपूर्वक केलीं तर सफल होतात. मग अंतःकरणामध्यें स्पष्ट विवेकच कां केला जात नाहीं? आत्म्याचें यथार्थ ज्ञान झालें असतां वासनेचा क्षय होतो, चित्त प्रसन्न होतें, आणि मग 'विवेक' या नांवाच्या यत्नाला आरंभ होतो. शमरूप अमृताच्या योगानें विवेकाची अशी वृद्धि करावी कीं, पुनः तो निरनिराळ्या भ्रमांनीं शुष्क होऊन जाणार नाहीं. परमार्थतत्त्वाच्या दर्शनानें अनित्य देहसत्तेचा अनादर करून लज्जा, भय, विषाद, ईर्ष्या, सुख, दुःख यांना एकाच वेळीं जिंकावें. जगदादि व शरीरादि आरंभींच जर नाहीं तर आज कोठून असणार? हें विश्व कारणापासून जर झालें असेल तर तें ब्रह्मरूपच आहे. तें केवळ कल्पनामात्र आहे. तें शुद्ध चिन्मय आहे. ज्ञप्तीहून घटादि पदार्थ भिन्न नाहींत. सर्व कल्पना ज्ञानरूप असते, आणि ती चिदाभासरूप ज्ञप्तिसुद्धां अज्ञात आत्मतत्त्वाची प्रतिबिंबरूप शोभा आहे. तिचें यथार्थरूप कळलें असतां म्हणजे ती आभासरूप ज्ञप्तिहि केवळ प्रत्यगात्मरूप आहे असें ज्ञान झालें असतां तत्काळ शांत होते. ज्ञेयाच्या अभावीं ती कोणत्या स्वरूपाची आहे, हेंहि सांगतां येत नाहीं. कारण प्रतिबिंबाच्या अभावीं बिंबभूत पदार्थाला बिंबहीं म्हणतां येत नाहीं. अर्थात् ज्ञेयाच्या अभावीं ज्ञप्तीचा अभाव होऊन केवळ शाश्वत शिवस्वरूप अवशिष्ट रहातें, त्यानंतर शरीरादिकांचा अभाव होतो. अखंड, निरुपाधिक, पूर्ण, शांत परमात्मतत्त्वच परिपूर्ण रहातें. ज्ञान, ज्ञेय व ज्ञप्ति यांनीं रहित असें तें तत्त्व, पाषाणाप्रमाणें निर्विकार स्थित होतें. ज्ञानी लोक पाषाणावर कोरलेल्या मूर्तीप्रमाणें आपल्या स्वरूपांतच रहातात, त्यांचीं अंतःकरणें शांत असतात. ते प्रारब्धानुसार शरीराची हालचाल जरी करीत असले, किंवा दुसऱ्याकडून करवीत असले तरी आत्मरूपच रहातात. ते प्राप्तव्यवहार जरी करीत असले, तरी परमात्मरूप झालेले असल्यामुळें आकाशाप्रमाणें मनांत निर्विकार असतात. ते ज्या अवस्थेंत असतात, तेथेंच जसेच्या तसेच रहातात. किंवा कोठें जाण्याचा प्रसंग आला असतां, जातातहि. तात्पर्य, जें प्राप्त होईल तें कर्म अखिन्न मनानें करणें, हा आत्मज्ञांचा श्रेष्ठ स्वभावच होय. किंवा ज्ञानी पुरुषानें सर्वदा समाधिस्थच रहावें;

ह्मणजे, सर्वस्वाचा त्याग करावा, अंतःकरण शांत व उज्ज्वल करावें, एकांतामध्येंच चित्रा-प्रमाणें रहावें. संकल्प शांत झाला असतां, कल्पित नगर जसें निःशेष नाश पावतें, किंवा जागृतींत स्वप्न असें अस्त पावतें, त्याप्रमाणें ज्ञानानंतर जगत् सर्वदा बाधित होतें. अज्ञ पुरुष शास्त्राचीं कांहीं वाक्यें ऐकूनच मी तत्त्वज्ञ आहें, असें समजतो, आणि मोक्षाचें वर्णन करूं लागतो. पण तें त्याचें करणें, एखाद्या जन्मांधानें डोळस पुरुषाच्या रूपानुभवाचें वर्णन करण्यासारखेंच आहे. असा तत्त्वज्ञानाभिमानी मनांत मानापमानाच्या योगानें संतप्त होत असतो, त्याला एखाद्या खऱ्या तत्त्वज्ञाप्रमाणें शांतिसुखाचा अनुभव येत नाहीं. अंधगोलांगुल-न्यायानें[1] असत् उपदेशानें फसून जाऊन स्वतःला कृतार्थ समजणारे पुष्कळ लोक आपणाला दिसतात. अज्ञानी पुरुष अज्ञत्वामुळेंच अल्पलाभा-नेंहि स्वतःला कृतार्थ समजतो. पण रामा! जो अज्ञानानें मोहित झालेला पुरुष वस्तुतः अकृ-तार्थ असतांना स्वतःला कृतार्थ समजतो, त्याला आपल्या अकृतार्थतेचा प्रत्यय थोड्याच वेळांत अनर्थ ओढवल्यानें येतो. एका निमिषांत भाव व अभाव यांच्या भ्रमांनीं कल्पित पदार्थ दुःख देत असल्यामुळें ज्ञानी लोक कल्पनात्मक उपाय, हा उपायच नव्हे असें समजतात. यास्तव पूर्वोक्त तत्त्वज्ञान हाच मोक्षाचा खरा उपाय आहे. वासनाक्षय होईपर्यंत त्याचा अ-भ्यास करावा, अभ्यासानें तत्त्वज्ञान दृढ झालें ह्मणजे त्याचेंच मोक्षामध्यें पर्यवसान होतें. त्या अवस्थेंत जगत् हा भ्रम आहे असा निश्चय होऊन ब्रह्मलोकापर्यंत सर्व विषय नीरस वाटूं लागतात. म्हणूनच हे रामा, मी ज्याचा उप-देश केला आहे, तो तत्वार्थ आहे. म्हणून ती केवल कल्पना आहे, लौकिक किंवा पौराणिक कथा आहे असें, बहिर्मुख होऊन समजशील तर कृतार्थ होणार नाहींस. कारण बहि-र्मुख अवस्थेंत तुझें चित्त वासनेनें भरलेलें अस-ल्यामुळें जगत्स्वरूप तुला अवश्य दिसेलच. पण तूं जर अंतर्मुख झालास तर सर्व विषय निर्वि-षय चिद्रूपच आहेत, असा साक्षात् अनुभव घेऊन आत्मस्वरूपांत विश्रांति पावशील. बहि-र्मुखत्वानें उपदेशवाक्यावरून ज्याचें तुला ज्ञान होईल तें जन्मांधाच्या अनुभवासारखें अज्ञानच आहे, असें समज. कारण, साक्षात् अपरोक्ष असलेल्या वस्तूचें परोक्ष ज्ञान होणें, हा भ्रमच आहे. यास्तव हे रामा! तशा बोधाचा तिर-स्कार करून तूं या नित्य अपरोक्ष प्रत्यगात्म-रूप बोधामध्यें तन्मय होऊन जा. त्याचा साक्षात् अनुभव घेऊन जन्मादि विक्रियाशून्य अनुभवच तूं हो. ४२.

---

१ एक अंध एका अरण्यांत एकटाच रडत व 'अरे, मला कोणी अमुक देशाला जाण्याचा मार्ग दाखवा,' असें ओरडत होता. त्याला पाहून एका निर्दय ठगानें 'या बैलाच्या पुच्छाला धरून त्याच्या मागोमाग जा,' असें सांगून, बैलाचें पुच्छ त्याच्या हातीं दिलें. तेव्हां तो बिचारा त्या लबाडाच्या वचनावर विश्वास ठेवून हातांतील पुच्छ न सोडतां त्याच्या मागोमाग चालला. बैलानें आपलें पुच्छ त्याच्या हातांतून सोडवून घेण्याचा प्रयत्न केला, पण तो भद्राळू अंध हातांतील पुच्छ सोडीना, बैल त्रासून पळूं लागला त्यामुळें अंधाला मोठे क्लेश झाले. तो अनर्थांत सांपडला, व शेवटीं एका मोठ्या खड्डयांत पडला. अंधानें धरलेलें गोलांगु-लाचें म्हणजे बैलाचें पुच्छ लबाडाच्या शब्दावर विश्वास ठेवून न सोडल्यामुळें तो संकटांत पडला, या गोष्टीला अनुसरून हा न्याय रूढ झाला आहे.

# सर्ग ४३ वा.

—:०:—

१ मनोरूपी यक्षाचें जणुं काय नगरच, अशा अज्ञानकल्पित जगाचें केवल ज्ञानानें निरसन झालें असतां ब्रम्हैक्यस्थिति प्राप्त होते.

श्रीवसिष्ठः—रामा ! आंतर अहंतादि व बाह्य जगत् म्हणजेच भोक्तृरूप व भोग्य असें हें सर्व अनुभवरूप भोगाच्या तत्त्वाचें ज्ञान झालें असतां असत्य होतें. कारण भोगाचें पर्यवसान चिद्मध्यें होतें. करण व भोग्य यांच्या संबंधाचा अनुभव हाच भोग आहे, त्या अनुभवानेंच अविवेकामुळें भोक्ताच आत्मा आहे अशी बुद्धि होते. त्यामुळें आत्मा अनुभवयुक्त आहे असा भ्रम होतो. पण साक्षी आत्मा साक्षात् अनुभवच आहे, त्यामुळें तो सत्य ब्रम्हच होय. अज्ञानरूपी ज्वरापासून मुक्त झालेल्या व बोधशैत्यानें शीतल झालेल्या ज्ञानी पुरुषाचें चिन्ह हेंच कीं, त्याला भोगरूपी जल नकोसें होतें. ज्वरिताला जशी तृषा लागते व पाणी हवेंसें वाटतें, पण ज्वर उतरून आरोग्य प्राप्त झालें असतां त्याची आवश्यकता भासत नाहीं, हें प्रसिद्ध आहे; त्याचप्रमाणें ज्ञानानें तृप्त झालेल्या पुरुषाला भोगांची गरज नसते. नाम व रूप यांच्या योगानें होणारे जे मिथ्या ज्ञानरूप भ्रम, ते सर्व व्यर्थ आहेत. विषयांविषयीं विरक्त झालेल्या पुरुषांनीं भोक्त्यांतील अहंकारांश टाकल्यानेंच चिन्मात्ररूप निर्वाण सिद्ध होतें. यास्तव अहंकारत्यागाचीच भावना दृढ करावी. स्वप्नांत पाहिलेले पदार्थ जागृत पुरुषाला जसे अनुरक्त करीत नाहींत, व ते विद्यमानहि नसतात, त्याचप्रमाणें मी व हें जगत् या भ्रमांत दिसलेले पदार्थ तत्त्वज्ञाला अनुरक्त करीत नाहींत व त्याला ते सत्यहि वाटत नाहींत. यक्षविद्येमध्यें निपुण असलेला मनुष्य आपल्या भावनेनेंच कल्पिलेल्या यक्षशरीरामध्यें स्थित होऊन स्वजनांसह एका मोठ्या नगराची कल्पना करून, त्या सर्वांला जसें पहातो, त्याप्रमाणें जीव संसाराला पहातो. पण तो यक्षाच्या संसाराप्रमाणेंच मिथ्या होय. तो यक्ष भ्रांतिकल्पित असतो. त्यानें कल्पिलेलें स्वजनयुक्त नगराहि कल्पितच असतें, तथापि तो स्वतः भोक्ता बनतो, व स्वजनादि सर्व त्याचें भोग्य बनतें व त्यांचा परस्पर व्यवहारहि होतो. त्यामुळें ते दोन्ही सद्रूप आहेत असें वाटतें, पण वस्तुतः ते कल्पित असल्यामुळें मिथ्या होत. अहंत्व व जगत् या भ्रमांनाहि हाच न्याय लागू आहे. साक्षी चैतन्य आवरणरहित असल्यामुळें अरण्यांतील भ्रमरूप यक्षांचा जसा त्यावर आरोप होतो, त्याचप्रमाणें हे चौदा लोक त्याला मिथ्याज्ञानामुळें दिसतात. मी भ्रममात्र आहें, त्यामुळें मिथ्याच आहें, असें जाणून तशीच भावना करणारा यक्ष जसा अयक्ष होतो, त्याप्रमाणें जगत् मिथ्या आहे, अशी दृढ भावना केल्यानें चित्त तात्त्विक चिद्रूपत्वास प्राप्त होतें. यास्तव हे रामा ! तूं सर्व कल्पना व शंका टाकून, त्याग व ग्रहण यांनीं रहित होऊन, सर्व इच्छांचा उपसंहार करून, त्यानंतर तुझें जें शांत स्वरूप राहील, त्यांतच स्थिर हो. हें दृश्य सत्तारहित आहे. त्यांत सत्तेची उत्पत्तिच होत नाहीं. किंवा तें द्रष्टृरूपच आहे. किंवा तें द्रष्टृरूपहि नाहीं. कारण परमार्थ चिद्रूप हेंच द्रष्टयाचें स्वरूप आहे व दृश्य तुच्छ आहे. तेव्हां तें तुच्छ जगत् चिद्रूप आहे, हें कसें सिद्ध करतां येणार ? वसंत ऋतूंतील रसानें भरलेल्या लतेला जशा नवीन शाखा व पल्लव फुटतात, त्याप्रमाणेंच चिन्मात्रस्वरूपानें भरलेल्या संविदेपासून हा सर्व प्रपंच विस्तार पावतो. हा जगाचा आभास, म्हणजे शुद्ध चिन्मात्रवेदन आहे. त्यांत ऐक्य कोठचें,

द्वित्व कोठचें व निर्वाण तरी कोठचें? यास्तव तूं शांत रहा. चिन्मय आकाशरूप व्हावें, निरतिशय आनंदाचा अनुभव घ्यावा व निर्वाणरूप आनंदनंदनवनांत निःशंक होऊन रहावें. या अतिशून्य संसारारण्यभूमींत, हे मानवांनो! असे भ्रांतचित्त होऊन हरणासारखे कां भटकतां? त्रिभुवनरूप मृगजलावर लुब्ध होऊन विवेकशून्य मनानें इतस्ततः धावूं नका. तृष्णेनें व्याकुल होऊन शांतीचा भ्रंश करून घेऊं नका. काल्पनिक विषयरूप मृगजल प्राशन करण्यांत आपलें आयुष्य व्यर्थ गमावूं नका, जगद्रूप गंधर्वनगराच्या दर्पानें आपला नाश करून घेऊं नका! व्यवहारांतील सुखें दुःखरूप आहेत, व तीं नाशालाच कारण होतात, ही दृष्टि कायम ठेवा. या महाकाशामध्यें जगद्रूप भ्रांति पाहूं नका. भ्रांतिरहित स्वरूपांत एकरूप होऊन जा. हे विचारी मानवा, उंच वृक्षाच्या पानांवरील जलबिंदूप्रमाणें क्षणभंगुर असलेल्या संसारांतील अज्ञानरूप अंधारांतील गर्भशय्येवर शयन करूं नको. तर आदि-अंत-शून्य स्वभावामध्यें सतत शांत रहा. द्रष्टा, दृश्य इत्यादि अस्वाभाविक दशेमध्यें आसक्त होऊन विनाश करून घेऊं नको. संसार अज्ञ जनांनाच प्रतीत होतो. पण तो यत्किंचित्‌हि विद्यमान नाहीं. अर्थात् त्यांतील सारभूत जें तत्त्व तेंच सत्य आहे. पण त्याचें नांवहि विद्यमान नाहीं. तृष्णारूपी लोखंडी शृंखलांनीं परिवेष्टित असलेल्या संसाररूपी पिंजऱ्याला ज्ञानबलानें तोडून सिंहाप्रमाणें सर्व उत्कर्षाच्या पराकाष्ठेमध्यें स्थित हो. 'अहं व मम' मी व माझें या भ्रांतिरूप आग्रहाची शांति हाच मोक्ष आहे. योगी कोणत्याहि स्थितींत जरी असला तरी ती स्वात्मसत्ताच होय. वासनाशून्यत्व हेंच निर्वाणत्व आहे. तीच त्रिविध तापांची शांति आहे व संसारमार्गामध्यें श्रांत झालेल्या पुरुषाची ती श्रांतविश्रांतिभूमि आहे. तत्त्वज्ञानी, जगद्रूप पदार्थाला जसे जाणतात, तसे अज्ञ जाणत नाहींत व अज्ञ लोक जगाला जसें पाहतात, त्या दृष्टीनें ज्ञानी पहात नाहींत. त्या दोघांनाहि परस्परांचा अनुभव परस्परांना शब्दानें सांगतां येत नाहीं. विश्वाविषयींची भ्रांति पूर्णपणें शांत झाली असतां, विश्व असलें तरी तें ज्ञानी पुरुषाला दिसत नाहीं. ज्याप्रमाणें गंगा, गोदा, नर्मदा इत्यादि नद्या महासागराला जाऊन मिळाल्यावर समुद्ररूपानें स्थित असूनहि, स्वरूपानें उपलब्ध होत नाहींत, त्याप्रमाणें जगद्भ्रांति शांत झाल्यावर ज्ञानी पुरुषांना जगद्रूपानें त्याचा अनुभव येत नाहीं, ब्रह्मरूपानें येतो. भ्रांति शांत झाल्यावर विश्व ब्रह्मरूप होतें, त्यामुळें अज्ञपुरुषांच्या दृष्टीनें विद्यमान असलेलें हें जगत् ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें अविद्यमान होतें. जळालेल्या गवताची राख जशी वाऱ्यानें कोठें तरी उडून जाते, त्याप्रमाणें सत्पुरुषांच्या स्वभावविश्रांतीमुळें जगत् अदृश्य होतें. 'ब्रह्म' या शब्दाचा मुख्य अर्थ अतिशय वृद्धि पावणें हा आहे. पण तो निर्विकल्प, स्वप्रकाश, निरतिशय, आनंद, प्रत्यगात्मरूप जर असेल तर उत्तम. पण तोच जर 'जगत्' या शब्दाच्या प्रवृत्तीला कारण होणारा जो विकार तद्रूप असेल तर उत्तम नाहीं. एखाद्या अर्भकाला जशा प्रकारानें हे सर्व पदार्थ दिसतात, तशाच प्रकारें वासनाशून्य होऊन राहिलेल्या ज्ञानी पुरुषाला ते दिसतात. सर्व प्राण्यांची जी रात्र, म्हणजे ज्ञानावस्था, त्यांत ज्ञानी जागतो व सर्व प्राण्यांची जी जागृति म्हणजे जी अज्ञानावस्था, ती ज्ञानी पुरुषाची रात्र होय. कारण सर्व लोक अज्ञानांधकारानें आवृत असल्यामुळें त्यांना सुषुप्तीप्रमाणें स्थित असलेलें आत्मतत्त्व दिसत नाहीं, पण तत्त्ववेत्याला सुषुप्तीप्रमाणें अज्ञानामध्यें

विश्रांति घेण्याचा प्रसंग येत नाहीं. कारण तो अज्ञानरहित असतो, आत्म्याला सतत पहातो, त्यामुळें तो आत्मतत्त्वाविषयीं जागृत असतो. चित्रांतील निरनिराळे पदार्थ पाहून मनुष्याच्या मनांत जसे कांहीं विकार उत्पन्न होत नाहींत, त्याप्रमाणें, आत्मज्ञाला जगांतील पदार्थ पाहून विषयतृष्णा होत नाहीं. जन्मांधाला रूपाचा अनुभव जशा प्रकारचा येतो, तसेंच अज्ञ मनुष्याला भ्रांतिरूप मिथ्या जगाचें ज्ञान होतें. पण ज्ञानी पुरुषाला तें ब्रह्मरूपानें भासतें, व जगद्रूपानें भासत नाहीं. अत्यंत मूढांना दुःखत्वानें प्रसिद्ध असलेलें हें त्रैलोक्य हा विमूढांचा विषय आहे, ज्ञानी पुरुषांचा नव्हे. कारण त्रैलोक्य सत्य नव्हे. तर मग विषयभोगाच्या अभावीं ज्ञानी कशानें तृप्त होऊन जिवंत रहातो, असें विचारशील तर सांगतों. स्वप्नांत हें स्वप्न आहे असें जर कळलें तर त्यांतील पदार्थ त्याला फारसे आवडत नाहींत, त्याचप्रमाणें जगद्-अवस्थाहि स्वप्नवतच आहे, असें कळल्यावर त्यांतील भोगांची त्याला इच्छा होणार नाहीं. हें जरी खरें आहे, तरी ज्ञानी सर्व विभागशून्य विश्रांति पावलेल्या अत्यंत अविरोधास प्राप्त झालेला असतो, त्यामुळें त्याचें अंतःकरण अतिशय शीतल असतें. व तो सर्व विक्षेपांनीं शून्य होऊन रहातो. ज्याच्या चित्ताला भोगवासना विषयाकडे ओढीत नाहींत, त्या मुक्त पुरुषाची समस्थिति चित्तनिरोधाविषयींच्या यत्नावांचूनच सिद्ध होते. म्हणजे चित्तनिरोधासाठीं त्याला ध्यान वगैरे करावें लागत नाहीं. भोगवासनाशून्य पुरुषाचा चित्तनिरोध स्वभावतःच सिद्ध असतो. ज्याप्रमाणें सरोवरांतील जल पाट काढल्यावांचून बाहेर जाणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें त्याचें चित्त बहिर्मुख होणें शक्य नाहीं. बाह्य पदार्थ हाच मनःसंकल्प व मन हाच बाह्य पदार्थांचा समुदाय होय. मनच त्याला जाणतें. मनःसंकल्प हाच विषयांचा आभास आहे. मग तो विषय बाह्य असो किंवा आंतर असो. ज्याप्रमाणें समुद्राला जाऊन मिळेपर्यंत निरनिराळ्या नद्यांचें जल अनेकरूप असतें व तें समुद्राला मिळाल्यावर जसें केवल एकरूप होतें, सामान्य जलाच्या आकारानेंच त्याचा प्रत्यय येतो, त्याप्रमाणें सबाह्याभ्यंतर सर्व पदार्थांच्या आकारानें एक मनच स्फुरण पावतें. विषय व मन यांच्यामध्यें जल व तरंग याप्रमाणें द्वित्व नाहीं. वायु व स्पंद यांप्रमाणें एकाच्या अभावीं दोहोंचीहि शांति होते. खरोखर एकाची शांति झाल्यानेंच परमार्थतः निःसार असलेल्या जगांत सत्य कांहींच भासत नाहीं. केवल एक आत्मतत्त्वाचा अनुभव अवशिष्ट रहातो. त्यामुळें विषय व मन यांची शांति एकाच वेळीं होते. यास्तव ज्ञानी पुरुषानें संकल्परूप विषयाची इच्छा करूं नये व यथार्थ ज्ञानानें मनालाहि मिथ्या मानावें, ह्मणजे त्या दोन्हींचीहि शांति होते. हा त्यांचा बाध म्हणजे स्वप्नांतील वाघाच्या नाशाप्रमाणेंच अनष्ट नाश होय. म्हणजे वस्तुतः त्याचा नाश होत नाहीं, तर तीं दोन्ही भ्रामक आहेत, असा निश्चय होतो. आपला शत्रु मृण्मय आहे, म्हणजे मृत्तिकेच्या पुतळ्यालाच आपण वैरी समजत होतों, असें कळतांच त्याविषयींचा शत्रुभाव व त्यामुळें वाटणारें भय, हीं दोन्ही जशीं बाधित होतात, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाचे विषय व मनहि जशींच्या तशींच स्थित असतांना मिथ्या भासतात. एखाद्या शूर पुरुषाला ज्याप्रमाणें पिशाचाचा भास होत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाला अज्ञ पुरुषांसह सर्व जगत् भासत नाहीं. ह्मणजे केवल जगत्च त्यांना दिसत नाहीं. असें नाहीं, तर अज्ञजनहि दिसत नाहींत. जवळच स्वस्थ घोरत पडलेल्या मनुष्याला

स्वप्नांत दिसणारे विविध पदार्थहि जवळच्याच जागृत असलेल्या मनुष्याला दिसत नाहींत. एखादा भित्रा पुरुष जसा काल्पनिक यक्ष आपल्यापुढें पहातो, तसा स्वप्न पहाणारा पुरुष स्वप्नांतील प्रपंच पहातो. अज्ञ पुरुष, अमुक ज्ञानी आहे ही सुद्धां एक कल्पनाच करतो. अज्ञाच्या दृष्टीनें वंध्येचीहि पुत्रपौत्रादि संतति वाढते. पण तत्त्वज्ञ आदिअंतरहित, ज्ञानस्वरूप ब्रह्मच हें सर्व आहे असें समजतात. ब्रह्म हाच सृष्टीचा स्वभाव आहे, असे ते जाणतात. मन या शब्दाचा कांहीं निराळा अर्थ आहे असें त्यांना वाटत नाहीं. ब्रह्मतत्त्व सर्वविभागरहित आहे, अशी त्यांची दृढ समजूत असते. बोधरूप जलावर मन, बुद्धि, अहंकार हे निर्मल तरंगच जणुंकाय उत्पन्न झाले आहेत. तेव्हां त्यांत, विषय व त्यांची कल्पना करणारें मन, हें सत्य कसें संभवणार ? रामा ! ही वृथा भ्रांति आहे. यास्तव तूं स्वभावामध्येंच स्थित हो. शरदृतूंतील आकाश जसें अति निर्मल असतें, त्याप्रमाणें जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति यांच्या पलिकडे जाऊन शुद्ध बोधस्वभावामध्यें स्थित असलेल्या पुरुषांना मनाचा अनुभवच येत नाहीं. या मिथ्या द्वैताचा बाध करून ह्मणजे तें सर्व मिथ्या आहे अशी भावना दृढ करून चिद्घन स्वभावामध्यें स्थिर हो. तो स्वभाव या सर्व अनंत द्वैताचें अधिष्ठान आहे. ज्ञप्तिच अंतःकरणांतील व बाहेरील पदार्थांचा आधार आहे. जसें शाखा, फळें इत्यादिकाचें मूळ कारण बीज आहे, तसेंच चित् हें सर्व स्थूल, सूक्ष्म प्रपंचाचें मूळ आहे. ज्ञेयाचा असंभव असल्यामुळें ज्ञप्तिहि अनिर्वाच्यत्वाला प्राप्त झाली आहे. जगाचें मूलतत्त्व सर्व विशेषशून्य आहे. त्यामुळें सर्व विशेषाचा बाध झाला असतां, स्वयंप्रकाश सत् अवशिष्ट रहातें. मनाचा संकल्प हाच विषय आहे. म्हणूनच तो अभावरूप भ्रम आहे. मन ह्मच विषयाचा संस्कार आहे व तोहि अभावात्मक असल्यामुळें भ्रम आहे. अज परमात्मा सर्वात्मक असल्यामुळें कांहीं कारणावांचूनच जगाचें अस्तित्व भासतें आणि भ्रामक अनुभवानें पदार्थ मिथ्याच अनुभवाला येतो. मन कांहीं कारणावांचूनच विषयाच्या आकारानें स्फुरण पावतें. विजेच्या चमकण्याप्रमाणें तें स्वभावतःच अस्थिर असलेलें मन विषयाकार बनतें. ह्मणजे ब्रम्ह जसें मनोरूपानें परिणाम पावतें, त्याप्रमाणें मनहि विषयरूपानें निष्काणरच भासतें. तूं केवल विषयसंकल्परूपानें संसारांत भ्रमण करतोस, पण केवल स्वभावाचें ज्ञान झाल्यावर 'तूं' हा पदार्थच उरणार नाहीं व असा भ्रमहि होणार नाहीं. हा संसार मनामुळेंच आहे. तो आत्मबोधानें शान्त होतो. शुक्तिरजत या भ्रमाप्रमाणें हे लोक वृथा क्लेश भोगीत असतात. त्यामुळें सर्व सृष्टीचा अभाव आहे, असें समजणें हेंच बोधाचें श्रेष्ठ स्वरूप आहे व तोच असंसार, ह्मणजे मोक्ष होय. निर्वाणाहून दुसरी सर्व सत्ता दुःखालाच कारण होते. 'मी' हा भ्रम आहे. तो मृगजलासारखा असत् व शून्यस्वरूप आहे. अशा प्रकारचें आत्मज्ञान झालें असतां 'अहं' ही वृत्ति शांत होते. यास्तव स्वरूपाला जाणून ज्ञानमय होऊन सबाह्य-अभ्यंतर विषयतेचा त्याग करावा. त्यांत असलेलें आपलें स्वरूप मात्र टाकूं नये. कारण जलच जसें तरंगत्वाला प्राप्त होतें किंवा वृक्षाची आमूलाग्र सत्ता जशी बीजरूप असते, त्याप्रमाणें सर्व विषयता ब्रह्ममय आहे. यास्तव विषयाकाराची उपेक्षा करून त्यांतील ब्रह्मरसाचाच तेवढा स्वीकार करावा. जसें एकच निर्मल आकाश असंख्य योजनें विस्तार पावलेलें आहे, त्याचप्रमाणें एकच निर्विकार व निर्मल ज्ञप्ति अनंत विषयांच्या आकारांनीं

भासतें. जसें एकच सर्वव्यापक आकाश शून्य-रूपानें सर्वत्र निर्मल असतें, त्याप्रमाणें एकच अखंड तत्त्व ज्ञेयाकार भासतें. घृत स्वतःला घनरूप बनवून जसें पाषाणरूप बनतें, त्याप्रमाणें एक शुद्ध ब्रह्महि ज्ञान ज्ञेय-दृशेमध्यें घनरूप बनतें. चित्‌च विषयरूपानें विकार पावून चित्तरूप बनते, त्याला कांहीं विशेष निमित्ताची अपेक्षा नसते. देश, काल इत्यादिकांच्या साह्यावांचूनच आत्मा केवल स्वरूपाला विसरून चित्तरूपास प्राप्त होतो. अज्ञ पुरुष निरनिराळ्या न्यायांनीं उपदेशिला जातो. श्रुत्यनुकूल तर्कांनीं एकच आत्मा अनेक आकारांनीं विस्तार पावला आहे, असें सांगितलें आहे. जरी या साक्षात् आत्म्याचें अज्ञान वगैरे कांहींच संभवत नाहीं, तथापि त्याचें ज्ञान होईपर्यंत त्यांची कल्पना केली जाते. परस्परांना आत्मतत्त्वाचा बोध व्हावा, ह्मणून शुद्ध चिदात्म्यामध्येंहि अज्ञानादिकांची भावना करावी लागते. रामा! याप्रमाणें जीवाचें वास्तविक अस्तित्वच संभवत नसल्यामुळें ज्यांचे देहादिसंघात अधिकारी असतात, ज्यांनीं अभिमान टाकलेला असतो, ज्यांचा अविवेक शांत झालेला असतो, ज्यांची सर्व भ्रांति पार नाहींशी झालेली असते व जे अनंत स्वरूपांत शांत झालेले असतात, ते अज्ञानाचा बाध करणाऱ्या ज्ञानांत लीन होऊन जातात व ते सतत चित्तसमाधानरूप परमविश्रांतीमध्यें तत्पर होऊन रहातात. ४३.

---

## सर्ग ४४ वा.

१ वर्धनीय समाधानकल्पवृक्षाचें वर्णन. २ श्रांत झालेल्या प्राण्याच्या मनोमृगाची त्याच्या छायेंत विश्रांति.

श्रीरामः—हे मुने, विवेकी जनांना सर्व प्रकारें उपजीविका करण्यास योग्य अशा समाधानवृक्षाची विश्रांति देणारी सत्ता, त्याच्या लता, पुष्पें यांसह क्रमानें सांगा. त्या वृक्षाचें बीज काय, क्षेत्र कोणतें, कोणत्या उदकाच्या सिंचनानें त्याला अंकुर येतो, पुढें त्याचीं पर्णें, शाखा, पुष्पें, फलें, छाया कोणती, इत्यादिकांचें सविस्तर वर्णन करून मला सांगा.

श्रीवसिष्ठः—रामा, ज्याच्यावर सर्व प्रकारें उपजीविका केली जाते, असा समाधानवृक्ष मी सांगतों. विवेकी-जनरूप अरण्यांत तो वृक्ष अतिशय वाढतो, व पत्र-पुष्प-फलांनीं युक्त होतो. शत्रु, स्वजन, अपमानादि यांपासून उत्पन्न होणाऱ्या दुःखानें किंवा भाग्यवशात् आपोआपच अकस्मात् या संसारवनाचा कंटाळा येतो, त्याविषयीं मन विरक्त होतें. शुभ कर्में याच नांगरानें नांगरलेलें, सतत आनंद-रसानें सिंचन केलेलें व श्वासोच्छ्वासरूपी बंधनांनीं विभक्त केलेलें अंतःकरण हेंच याचें क्षेत्र होय. विवेकीजनरूपी अरण्यांत विवेकानें अतिशय शुद्ध झालेल्या चित्तभूमींत संसारनिर्वेदरूप समाधिबीज आपोआप पडतें. आपल्या चित्तभूमीमध्यें पडलेल्या त्या वैराग्यरूप ध्यानबीजाला वाढविण्याविषयीं निश्चयानें उद्युक्त झालेल्या पुरुषानें पुढें सांगितलेल्या वस्तूंचें त्यावर सिंचन करावें. पुनः भोगामध्यें आसक्त होऊन इतर लौकिक क्षणिक वैराग्याप्रमाणें त्याचा नाश करूं नये. कामक्रोधादि वेगांना सहन करून त्यांना उत्तरोत्तर वाढवीतच जावें. प्रथम त्या वैराग्यबीजाला सत्संगमरूप ताज्या दुधाचें सिंचन करावें. नंतर त्याच्या मुखांतून निघालेल्या शुद्ध, स्निग्ध, मधुर व स्वतःला हितकर अशा चंद्रांतील अमृतासारख्या शास्त्रोपदेशामृतानें सेक करावा. नेति नेति, इत्यादि उपनिषद्वाक्यांनीं स्थूल, सूक्ष्म पदार्थांचा ह्मणजे सर्व द्वैताचाच निषेध केल्यामुळें अंतःकरणांत सर्व

संसार शून्य आहे, अशी भावना स्थिर होते. त्यामुळें सर्व तापाची शांति होते. यास्तव अतिशय मधुर व शीतल शास्त्रामृतरसांनीं वैराग्याला वाढवावें. आचार्यांच्या हृदयांत असलेल्या ब्रह्मसरोवरापासून व्याख्यानाच्या द्वारा अमृतप्रवाह निघतात. त्या श्रवणमननादिरूप श्रेष्ठ शास्त्रार्थजलानें वैराग्यबीजाला वाढवावें. विवेकयुक्त बुद्धीनें आपल्या चित्तभूमींत ध्यानाचें संसारवैराग्यरूप बीज पडलें आहे, असें जाणून त्याचें मोठ्या यत्नानें रक्षण करावें. शारीर, मानस व वाङ्मय असें त्रिविध तप, दान, अमानित्व, अदंभित्व इत्यादि ज्ञानसाधनें, ईश्वरार्पण केलेलीं कर्में, तीर्थयात्रा, पुण्यस्थानीं निवास, यांचेंच त्या बीजाच्या रक्षणार्थ कुंपण घालावें. याप्रमाणें अनेक उपायांनीं त्या वैराग्यरूप ध्यानबीजाला अंकुर आला असतां, त्याचें रक्षण कसें करावें हें जाणणारा व तें करण्यांत निपुण असलेला 'संतोष' या नांवाचा रक्षक नेमावा. त्याच्याबरोबर त्याची 'मुदिता' नांवाची भार्याहि असावी. हा रक्षक नेमण्यापूर्वी पूर्ववासनांमध्यें असलेल्या आशारूप पक्ष्यांना दूर घालवावें. पुत्र, मित्र, धन इत्यादि अनात्म्यांमध्यें असलेला जो अनुराग, तद्रूप पक्ष्यांना व काम, गर्व, इत्यादि गृध्रांना त्या संतोष-रक्षकाकडून हांकून द्यावें. कारण वैराग्यापासून उत्पन्न झालेल्या ध्यानांकुराला खुडून टाकण्यासाठींच ते येत असतात. अहिंसा, यम, नियम, आसन, प्राणायाम, ईश्वरोपासना, इत्यादि सत्क्रियारूप मृदु कुंचल्यांनीं या अंकुराच्या क्षेत्रांतील धूळ झाडून टाकावी. त्याचप्रमाणें अचिंत्य ब्रह्मलोक देणाऱ्या विवेकरूप सूर्यप्रकाशानें त्यांतील अज्ञानांधकारहि घालवावा. संपत्ति व स्त्रिया हे भोग क्षणभंगुर तरंग आहेत. पापरूप मेघापासून निघालेल्या उल्का त्या अंकुरावर पडतात. धैर्य, औदार्य, दया, मंत्र, जप, स्नान, तप, दम इत्यादि उपायांनीं प्रणवार्थरूप त्रिशूल ज्यानें आपल्या हातीं घेतला आहे, अशा रक्षकानें त्या सर्व उल्कांचें निवारण करावें. याप्रमाणें संरक्षण केलेल्या या ध्यानबीजापासून पुष्टि, सौंदर्य इत्यादिकांनीं उन्नत व तेजस्वी विवेक या नांवाचा नवा अंकुर उत्पन्न होतो. त्या अंकुरामुळें चित्तभूमि प्रकाशयुक्त व विकास पावलेली भासते. नुकत्याच उगवलेल्या चंद्रानें जसें आकाश, त्याचप्रमाणें चित्त विवेकप्रकाशानें अतिशय रम्य भासतें. त्या अंकुरापासून दोन पानें विकास पावतात. एक शास्त्रांविषयींची रुचि व दुसरें साधुसमागम. तो अंकुर कांड या रूपानें परिणाम पावतो. त्याचें मूळ दृढ होतें. तो उंच वाढूं लागतो. संतोषरूपी त्वचा त्याला वेढते. वैराग्यरसानें तो टवटवीत होतो. वैराग्यरसानें अतिशय पुष्ट झालेल्या त्याच्यावर शास्त्रार्थरूपी वर्षर्तूंतील विपुल वृष्टि झाल्यानें तो थोडक्या वेळांत परमोन्नतीस प्राप्त होतो. याप्रमाणें शास्त्रार्थ, साधुसमागम, व वैराग्यरस यांनीं पुष्ट झालेला तो समाधानवृक्ष राग, द्वेष इत्यादि कपींच्या क्षोभानें यत्किंचित्‌हि कंपायमान होत नाहीं. नंतर त्या विज्ञानानें अलंकृत झालेल्या व आनंदरसानें विकास पावणाऱ्या वृक्षाच्या या विस्तृत शाखा सभोंवार पसरतात. आत्मतत्त्वाची स्पष्टता, सत्यता, परमात्मरूपानें स्थिति, धीरता, विकल्पशून्यता, सर्वत्र शांतता, मैत्री, दयालुत्व, कीर्ति, आर्यता, या शांत्यादि पर्णांनीं युक्त असलेल्या शाखांनीं तो ध्यानतरु अत्यंत ऊर्जित झालेला दिसतो. ज्यांना यशोरूप पुष्पें आलीं आहेत, असा तो संन्यासी पुरुषाचा समाधानवृक्ष, पारिजातवृक्षाप्रमाणें सर्व कामना पूर्ण करतो. याप्रमाणें लता, पल्लव, पुष्पें यांनीं युक्त असलेला हा ज्ञानवृक्ष मूल

अज्ञानाचा उच्छेद करण्यास समर्थ असलेलें 'ब्रह्मसाक्षात्कार' हेंच फल देतो आणि तें प्रतिदिवशीं वाढत असल्यामुळें तो वृक्षहि उत्तरोत्तर रम्य दिसूं लागतो. तो यशोरूप पुष्पगुच्छांनीं संपन्न होतो. उत्तम गुण याच पल्लवांनीं विस्तार पावतो. वैराग्यरसानें वृद्धि पावतो. प्रज्ञारूप मंजरींनीं सुशोभित होतो. जसा मेघ पावसाळ्यांत सर्व भूपृष्ठाला शीतल करतो, त्याप्रमाणेंच हा समाधानरूपी वृक्ष सर्व आशा शांत करतो. जसा चंद्रमा सूर्याच्या तापाला शमवितो, त्याप्रमाणें हा वृक्ष त्रिविधतापाला नाहींसा करतो. वर्षाऋतु लागतांच, तो जसा सर्व भूपृष्ठावर छाया पसरतो, त्याप्रमाणें हा वृक्ष शमरूप छाया देतो. पूर्वेकडील वायु मेघाला ज्याप्रमाणें आकाशभर पसरवितो, त्याप्रमाणें शम चित्तस्थैर्य संपादन करतो. कुलाचल जसा स्थित असतो, तसें चित्त आत्म्यामध्यें स्थिर होतें. कैवल्यरूप फलाचें उंच घटियंत्र रचतो. त्यांत शांत्यादि कल्याणगुणांची शोभा सर्वत्र पसरलेली दिसते. पुरुषाच्या हृदयारण्यांत विवेकरूपी कल्पवृक्ष प्रतिदिवशीं वाढूं लागला असतां त्याच्या खालीं छायेचें छत पसरतें. त्यामुळें हृदयाचे सर्व ताप नाहींसे करणारी शीतलता प्राप्त होते. मतिरूपी लता उल्हास पावते. तिच्या पानांवर पडलेल्या गुण-तुषारांनीं ती रमणीय दिसते. असो. त्या वृक्षाच्या छायेंत संसाराच्या इतर प्रांतांत थकलेला मनोमृग विश्रांति घेतो. रामा! त्या मनोमृगाचें किती वर्णन करावें! तो जन्मापासून मरेपर्यंत एकसारखा भटकत असतो, दैववशात् एखादे वेळीं तो सन्मार्गामध्यें जरी आला, तरी तेथें निरनिराळ्या वाद करणाऱ्या शास्त्रकारांचा कोलाहल त्याच्या कानीं येतो. त्यामुळें व्यग्र होऊन तो त्या सन्मार्गापासून च्युत होतो. कामादि सहा व्याध ससामग्ररूप जो शारीर-पुरुष त्याच चर्मासाठीं त्याच्या मागें लागलेले असतात. त्यामुळें असार व साकार अशा शरीरादि असंख्य कंटकमय झुडपांत स्वतःला लपवून त्याचें रक्षण करतां करतां तो अतिशय थकून गेलेला असतो. संसारारण्यांत पसरणारा वासना-वायु त्याला त्या अरण्यभर पळावयास लावतो. अहतारूप मृगजलाची नदी त्याला जलाच्या आशेनें भटकावयास लावते. त्यामुळें अंगांत भिनलेल्या विषाप्रमाणें त्याच्या अंगाचा तृष्णेमुळें दाह होतो. त्याला नानाप्रकारच्या भोगाविषयीं अतिशय आसक्ति असल्यामुळें ते अधिकाधिक वाढावेत असें वाटतें. त्यामुळें तो अल्प भोगानें तृप्त होत नाहीं. त्यामुळेंच फार दूर व विषम प्रदेशीं असलेल्याही कोवळ्या गवतासारख्या सुशोभित दिसणाऱ्या विषयाकडे तो पळत सुटतो. त्यामुळें त्याचीं सर्व गात्रें शिथिल होतात. पुत्र-पौत्रादिकांचें परिपालन करणें हें आपलें कर्तव्य आहे, असें समजून त्यासाठीं तो त्रिविध ताप सहन करतो व शेवटीं त्यांनींच व्याकुळ होऊन अनर्थगर्तेंत पडतो. संपत्तिरूप वेलीमध्यें पाय अडकल्यामुळें ज्याची गति कुंठित झाली आहे, असा तो शत्रु, चोर, राजा, इत्यादिकांपासून बंधन, ताडण, दंड यांचा अनुभव घेतो. त्याचें अंग घटून जातें. तृष्णारूपी नदीमध्यें पडलेला तो क्षुधा, तृषा, शोक, मोह, जरा, मृत्यु या ऊर्मींकडून दूर वाहून नेला जातो. विविध व्याधिरूप व्याधांच्या भीतीनें तो इतस्ततः पळत सुटतो. ज्यानें दैवाचा कधीं विचारहि केला नाहीं, असा तो मनोमृग मृत्युरूप व्याध येऊन ठेपल्यामुळें भीतीनें आपला आकार संकुचित करून रहातो. विषयांच्या प्रदेशांतून प्राप्त झालेल्या दुःखरूपी बाणाची त्याला नेहमीं भीति वाटत असते. हिंसकानें फेंकलेले दगड आपल्या अंगाला लागतील कीं काय अशी

त्याला नेहमीं भीति वाटत असते. म्हणजे पूर्व-पूर्व दुःखानुभवाच्या संस्कारांनीं, तो चिन्हित झालेला असतो. दगडाचे प्रहारांनीं जसे अंगावर व्रण पडतात, त्याप्रमाणें पूर्व दुःखानुभव-संस्कार त्याच्यावर झालेले असतात. स्वर्ग, नरक, इत्यादि ऊर्ध्व व अधःप्रदेशीं क्रमानें संपात व निपात घडतात, ह्मणजे वर जातांना त्याला ठेंचा लागतात व खालीं जातांना त्याचें अंग ठेंचतें, त्यामुळें त्याला दुःख होतें. काम, क्रोध, भय इत्यादि विकाररूप पाषाणांच्या आघातांनीं निरंतर त्याच्या अंगांचें चूर्ण होत असतें. तृष्णारूपी कंटकमय लतेच्या जाळ्यांत अडकल्यामुळें त्या मनोमृगाच्या अंगाला शतशः कांटे टोंचलेले असतात. त्यानें आपल्या बुद्धीप्रमाणें आपला आचार ठरविलेला असतो. दुसऱ्यांच्या कपटांना ओळखण्याचें चातुर्य त्याच्यामध्यें नसतें. इंद्रियग्रामास प्राप्त होऊन लागलाच तो अतिशय धांवूं लागतो. ज्याला आपल्या ताब्यांत आणणें फार कठीण आहे, असा कामरूप गज आपल्या संचारामध्यें, त्याच्या अंगाचें मर्दन करून सोडतो. विषयरूप अजगराच्या भयंकर विषारी फूत्कारांनीं तो मूर्छित झालेला असतो. कामुक बनलेला तो मनोमृग, विषयरसाच्या आशेनें कामिनीरूप भूमींत बहुतकरून घसरून पडतो. क्रोधरूप दावाग्नीनें त्याची पाठ भाजून तींवर फोड उठतात, व त्याचा फार दाह होतो. विषयांमध्यें पुनः पुनः भ्रमण केल्यामुळें अनंत चिंता, शोक इत्यादिकांमुळें तो दीर्घदुःखी होतो. अभिलाषरूपी दंश म्हणजे डांस त्याला फार पीडा देतात. भोग, लोभ, विषयसुख इत्यादि शृगाल—कोल्हे त्याला एकसारखे पळवीत असतात. स्वकर्माच्या कर्तृत्वानें म्ह० कर्तृत्वाभिमानानें भ्रमण करीत असलेल्या दारिद्र्यरूपी व्याघ्राकडून त्याचा पाठलाग केला जातो. मोहांधकारामध्यें चांचपडत जाणाऱ्या त्याला उच्चनीच प्रदेशीं वारंवार अडखळावें लागतें. मानरूपी सिंहाच्या उत्कर्षानें त्याचें हृदय भयानें थरथर कांपत असतें. मृत्युरूपी व्याघ्रानें त्याच्याकडे एखाद्या सुखच्छेद्य पुष्पाप्रमाणें पाहिलेलें असतें. ह्मणजे पुष्पाचें विदारण करणें जितकें सुलभ आहे तितकेंच या मनोमृगाला मारणें सुलभ आहे, असें मृत्युरूप व्याध समजतो. गर्वरूप अजगर त्याला गिळून टाकण्यासाठीं फार दिवसांपासून टपून बसलेला असतो. निरनिराळ्या विषयांच्या इच्छांनीं तो दीन होऊन याचक बनतो व लोकांपुढें दांत विचकत फिरतो. तारुण्यरूप सुहृदाकडून तो स्त्रीसाठीं एक क्षणभर आलिंगन देऊन पुनः सोडला जातो. झंझावातासारखीं इंद्रियें त्या मनोमृगाला नरकस्थावरादि योनिरूप निबिड अरण्यांत वारंवार फेंकतात. हे रामा ! अशा प्रकारचा हा मनोरूप हरिण अनेक जन्मांतील पुण्याच्या परिपाकामुळें भाग्योदय झाला असतां उत्तम जन्म घेऊन शमादि साधनांचें अनुष्ठान करतो व वरील ध्यानतरूच्या छायेंत विश्रांतिसुखाचा अनुभव घेतो. ह्मणजे ज्याप्रमाणें रात्रीं सर्व प्राणी शीत व अंधकार यांनीं आर्त होतात, पण रात्र संपून सूर्योदय होतांच त्यांना सुख होतें, त्याप्रमाणें आर्त झालेल्या या मनोमृगाला शेवटीं ध्यान व ज्ञान यांच्या योगानें शांतीचा लाभ होतो. अहो श्रोते जनहो, ताल, तमाल इत्यादि वृक्षांच्याखालीं बसून विश्रांति मिळणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें भूमि, स्वर्ग इत्यादि ब्रम्हलोकापर्यंत जे विविध भोग आहेत, त्यांतच आनंद मानणाऱ्या आत्मज्ञानशून्य लोकांना

परमानंदाचा कधींच अनुभव येत नाहीं. यास्तव तुमचा मनोमृग मोक्षरूप विश्रांतिसुखाला वर वर्णन केलेल्या उपायांनीं प्राप्त होवो. ४४

---

## सर्ग ४५ वा.

—:०:—

१ मनाच्या ध्यानवृक्षाबरील आरोहणाचा क्रम. २ आरोहण करीत असतांना उत्तरोत्तर भूमिकांमध्यें सुखाचा उत्कर्ष.

श्रीवसिष्ठः—रामा! याप्रमाणें विश्रांति पावलेला हा मनोरूप मृग त्या ध्यानकल्पवृक्षावरच रममाण होतो, मग दुसऱ्या वृक्षाकडे तो जात नाहीं. त्या वृक्षाच्या गुच्छाच्या आरंभापासून मन विश्रांति पावेपर्यंत जो काल जातो, तेवढ्यांत तो विवेकयुक्त ध्यानवृक्ष आंतल्या आंत कैवल्यफलाला धारण करतो, आणि पारमार्थिक आत्मस्वरूपभूत कैवल्यफलाला हळूहळू प्रकट करतो. हा मनोमृग त्या वृक्षाच्या खालीं उभा राहून त्या पवित्र फलाला पहातो. ध्यानवृक्षाच्या एका शाखेला तें पवित्र फल लागलेलें दिसतें. नंतर तो मनोरूप मनुष्य[1] त्या फलाचा अस्वाद घेण्यासाठीं त्या विवेकयुक्त ध्यानवृक्षावर चढूं लागतो. तो सर्व परिवाराचा त्याग करतो. दृढ निश्चय करतो. अगोदर विवेकवृक्षावरील आपला पाय दृढ करून मग संसारभूमिवरील आपला पाय उचलतो. म्हणजे देहादिकांवरील अहं-ममाभिमान टाकतो आणि त्या वृक्षावर उच्चस्थानीं पाय पोंचला म्हणजे मग तो खालीं पहात नाहीं. तर पुढील पाऊल ठेवण्याच्या वरील शाखांकडेच लक्ष ठेवितो. त्या उत्तम फलासाठीं विवेकवृक्षावर आरूढ झालेला तो, सर्प जशी कात टाकतो, त्याप्रमाणें प्राक्तन संस्कारांना टाकतो. पूर्व व्यवहारांचें स्मरण करीत नाहीं. एखादे वेळीं दैववशात् त्याला जरी स्मरण आलें, तरी स्वतःला उच्चपदीं आरूढ झालेलें पाहून ‘मी एवढा वेळ विषयसुखलेशासाठीं किती दीन होत होतों?’ असें म्हणून स्वतःच स्वतःला हंसतो. सर्वभूतदया, अभय, सत्त्वशुद्धि इत्यादि त्या वृक्षाच्या निरनिराळ्या शाखांवरून संचार करणारा तो, लोभरूपी सर्पाला जमिनदोस्त करून एखाद्या सम्राटाप्रमाणें शोभतो. सद्बुद्धिरूप चंद्राला लुप्त करून सोडणाऱ्या अमावास्येच्या परंपरा, दुःखरूप चंद्राच्या अनेकत्वभ्रांतीला कारण होणारा जो तिमिर या नांवाचा नेत्ररोग त्याची जणु काय पंक्तिच, प्राण्याला बद्ध करणारी पोलादाची जणु काय शृंखलाच, अशा तऱ्हेची जी तृष्णा, ती प्राण्याला शुभेच्छा झाल्यापासून प्रतिदिवशीं क्षीण होत होत, शेवटीं अगदीं क्षीण होते. त्यानंतर तो मनुष्य प्राप्त स्थितीची उपेक्षा करीत नाहीं, अप्राप्त अवस्थेची अपेक्षा करीत नाहीं, सर्व वृत्तींमध्यें चंद्रासारखा सौम्य व शीतल रहातो. तो अध्यात्म शास्त्राचे—शम, दम, संतोषादि जे अर्थ तद्रूप कोमल पल्लवांवर स्थिर स्थित होतो, इतर शास्त्रानुसार प्रवृत्ति केल्यास प्राण्यांची ब्रम्हलोकापर्यंत उन्नति व स्वाभाविक प्रवृत्तीमुळें नरकांत अवनति होणें, या दोन्ही जगद्गति अज्ञानदशेंतच प्राप्त होतात, असें पाहून तो अध्यात्मशास्त्रांतच निश्चित होतो. तो विवेकवृक्षावर आरूढ झालेला पुरुष पूर्वीच्या अज्ञानभूमिकांना भयंकर विषवृक्षाच्या विषारी पुष्पांनीं अतिशय कठोर झालेल्या शाखांप्रमाणें पहातो व त्या भूमिकांतील दुर्दशेला हंसतो, त्या ध्यानवृक्षाच्या स्कंधप्रदेशीं उत्तरोत्तर भूमिकांमध्यें अभ्यासाच्या बलानें क्रमानें आ-

---

[1] हरिण वृक्षावर चढण्यास असमर्थ असल्यामुळें मनाला येथें मनुष्याची उपमा दिली आहे.

रूढ होऊन तेथेंच चित्तवृत्तीच्या योगानें खालीं-वर विहार करीत असलेला तो, एखाद्या राजाप्रमाणें शोभतो. स्त्री, पुत्र, मित्र इत्यादि सर्व संबंधी लोक व धन यांना दुसऱ्या जन्मांतील किंवा स्वप्नांतील पुत्रादिकांप्रमाणें पहातो. एखाद्या नटाच्या व्यवहाराप्रमाणें केवल दुसऱ्याचें मनोरंजन करणें हाच ज्यामध्यें प्रधान हेतु आहे, अशा कृत्रिम राग, द्वेष, भय, उन्माद, मान, मोह, इत्यादिकांच्या योगानें याचे सर्व व्यवहार होत असल्यासारखे दिसतात, पण त्याचें चित्त शीतल व निर्मल असतें. सन्मोर दिसणाऱ्याहि संसारमृगजलाच्या नदीची गति, एखाद्या उन्मत्ताच्या व्यवहाराप्रमाणें पाहून हा तिला हंसतो, कारण ती नदी मिथ्या व क्षणभंगुर तरंगांचीच आधारभूत असते. त्याला लोक, स्त्री, धन इत्यादिकांतील कशाचीहि इच्छा नसते. एका अपूर्व स्थानीं विश्रांति पावलेला तो जिवंत असतांनाच शवासारखा असतो. केवल अत्यंत शुद्ध बोधरूप व अतिउन्नत स्थानीं असलेल्या फळावर दृष्टि ठेवून तो त्या वृक्षावर उंच उंच चढत जातो. पूर्वीच्या आपत्तींचें पुनः पुनः स्मरण करून संतोषामृतानें अतिशय पुष्ट झालेला तो अज्ञानदशेत पुरुषार्थरूप भासणाऱ्याहि अनर्थांचा नाश झाला असतां, अतिशय संतुष्ट होतो. ज्याप्रमाणें गाढ झोंप घेत असलेल्या पुरुषाला एकाएकीं जागें केलें असतां तो निद्रासुखाचा विच्छेद झाल्यामुळें उद्वेगास प्राप्त होतो, त्याप्रमाणें हा ध्यानवृक्षावर आरूढ झालेला पुरुष अवश्य कर्तव्यरूप व्यवहारामध्यें दुसऱ्याकडून प्रेरणा केला गेला असतां, समाधिसुखाचा विच्छेद झाल्यामुळें उद्विग्न होतो. अतिशय प्रवास करून थकलेला वाटसरू जशी सतत व अबाधित विश्रांति इच्छितो, त्याप्रमाणें पूर्वीं दीर्घकाल अज्ञानामुळें प्राप्त झालेल्या जन्ममरणपरंपराप्राप्त श्रमानें थकून जाऊन आतां समाधिसुखाचीच इच्छा करतो. त्याचे श्वासोच्छ्वास चाललेले असतात, त्यावरून तो बाहेरून व्यवहार करीत आहे, जागा आहे, असें जरी वाटलें, तरी काष्ठरहित अग्नीप्रमाणें तो स्वरूपांतच शांत होतो. कारण केवल श्वासाच्याच दृष्टीनें पाहिल्यास तो इतर लोकांसारखा जरी दिसला, तरी आंतून अहंममाभिमानानें युक्त नसल्यामुळें परमात्म्यांत शांत होतो. पूर्वाभ्यासाच्या बलानें पदार्थाविषयींची अप्रीति आपोआप हळूहळू उत्पन्न होऊं लागते. त्या अप्रीतीचें निराकरण करण्यास तो समर्थ नसतो. प्रारब्धप्राप्त विषयोपभोगदृष्टीचें निराकरण करण्यास तो असमर्थ असतो, त्याचप्रमाणें या विरक्तीचें निराकरण त्याच्याकडून होत नाहीं. रामा! त्या परमार्थफल देणाऱ्या महापदवीला प्राप्त होणारा तो शब्दाचाहि विषय न होणाऱ्या सहाव्या भूमिकेस प्राप्त होतो. प्रवासी रूक्ष प्रदेशांतून प्रवास करण्याची जशी इच्छा करीत नाहीं, त्याप्रमाणें दैववशात् प्रयत्नावांचून प्राप्त झालेल्या भोगाविषयींहि तो विरक्त होतो. तो एखाद्या मत्त पुरुषाप्रमाणें निश्चिंत असतो. संसारव्यवहारामध्यें निजलेला तो आनंदांत रहातो. त्याचें अंतःकरण तृप्त असतें. तो मन व वाणी यांचा निरोध करून कांहीं अवर्णनीय अवस्थेस प्राप्त होतो. एखादा सिद्ध मेरुशिखरास जसा प्राप्त होतो, किंवा पक्षी वृक्षाच्या अग्रावर जाऊन बसतो, त्याप्रमाणें ध्यानाचा अभ्यास करणारा योगी क्रमानें परमार्थफलाच्या अगदीं समीप जाऊन पोहोंचतो. त्यानंतर सर्व वासना व सर्व प्रकारचें मनन सोडून आकाशासारखा अक्षुब्ध झालेला तो ब्रह्मानंदरूप फलाचें ग्रहण करतो, त्याचा आस्वाद घेतो, त्याचा अनुभव घेतो, व सर्व प्रकारानें तृप्त होतो. म्हणजे योगाच्या सप्तम

भूमिकेंत तो प्रतिष्ठित होतो. संकल्पाचा परित्याग केल्यामुळें प्रतिदिवशीं विस्तार पावणारी जी शुद्ध स्वरूपांतील विश्रांति तिलाच परमपुरषार्थप्राप्ति म्हटलें जातें. भेदबुद्धि विलीन होते. नंतर अभेदच अवशिष्ट रहातो. जें शुद्ध, एक, आदि-अंतरहित चित्स्वरूप तेंच ब्रम्ह होय असें ज्ञानी समजतात. जो लोकैषणेविषयीं विरक्त झालेला असतो, ज्याची स्त्री-पुत्रादिकांविषयींची एषणा शांत झालेली असते, तोच त्या पदीं विश्रांति पावतो. सूर्याच्या तापामुळें बर्फ किंवा दंव यांची पंक्ति जशी सुकून जाते, त्याप्रमाणें चित् व परमार्थ यांची परस्पर भेदबुद्धि लीन होऊन जाते. कारण ती निरतिशय आनंदरूपानेंच परिणाम पावते. धनुष्याला आकर्ण ओढून सोडलें असतां पुनः तें पूर्ववत ताठ होतें, पण परमात्म्यामध्यें लीन झालेलें चित्त पुनः बहिर्मुख होत नाहीं. तर त्याला जेथें व जसें स्थिर करावें तसेंच तें रहातें. ह्मणून त्याला कठोर धनुष्याची उपमा देतां येत नाहीं. तर मृदु पुष्पांच्या मालेचीच उपमा देतां येते. कारण पुष्पांची माला भूमीवर जशी सरळ किंवा वांकडी ठेवावी तशीच ती रहाते. ज्याप्रमाणें एखाद्या स्तंभावर स्पष्ट न खोदलेली प्रतिमा बीजरूपानें रहाते, तिला सत्‌हि ह्मणतां येत नाहीं, असत्‌हि म्हणतां येत नाहीं, तशी परमात्म्यामध्यें सर्व विश्वाची स्थिति होते. बीजरूपानें असलेल्या तिला सत् म्हणतां येत नाहीं व असत्‌हि म्हणतां येत नाहीं. याप्रमाणें ज्ञान होण्यापूर्वी प्रपंचानें युक्त असलेल्या ब्रम्हामध्यें निष्प्रपंचस्वरूपाचें अज्ञानामुळें ध्यानच करतां येत नाहीं. पण जो साक्षात् ज्ञानीच झालेला असतो, तो स्वतःच ब्रम्हरूपांत रहातो. तेव्हां स्वरूपांतच स्थिर झालेला तो, ध्यान करण्यास कसा समर्थ होणार ? कारण गाढ झोंप घेत असलेला किंवा जागा असलेला मनुष्य, मी स्वप्नरहित आहें, असें ध्यान करूं शकत नाहीं. जागृत पुरुष स्वप्नांतील पदार्थांविषयीं जसा विरक्त असतो, त्याप्रमाणें तत्त्ववेत्त्यांनीं प्रपंचाविषयीं तुच्छ बुद्धीनें अत्यंत वैराग्य धारण करावें. कारण तें शक्य आहे आणि या सर्व दृश्याविषयीं ज्यांच्या मनांत अत्यंत विरक्ति असते, तोच ज्ञानी होय. कारण जो अज्ञानी आहे, त्याला दृश्याचा त्याग करण्याचें सामर्थ्यच नसतें. दृश्याला जाणणें, हाच अज्ञान दशेंतलि बोध होय. तशा बोधामुळेंच अज्ञांना प्रपंच शाश्वत भासतो. त्या अवस्थेंत चित्ताचें समाधान होणें मुळींच शक्य नाहीं. तर मनाला द्रष्टा व दृश्य यांचा एकतारूप प्रत्यय जेव्हां येतो, तेव्हां पुरुष स्वतःच आत्मस्वरूपामध्यें स्थिर होऊन विश्रांति घेतो. दृश्य विषयांचें वैराग्य हाच तत्त्ववेत्त्याचा सहज स्वभाव आहे. ज्ञानी लोक दृश्याचें स्फुरण हेंच अतत्त्वज्ञत्व आहे, असें म्हणतात. अतत्त्वज्ञालाच विषय आवडतात, तत्त्वज्ञाला आवडत नाहींत. ज्यानें अमृत प्राशन केलें आहे, त्याला कडू कांजी आवडत नसते. तृष्णाशून्य झालेल्या व वरील तिन्ही एषणांचा त्याग करणाऱ्या ज्ञानी पुरुषाचें ध्यान त्याची इच्छा नसली तरी स्वभावतःच प्रवृत्त होतें. कारण तो आत्मनिष्ठच असतो व तृष्णादि दोषांमुळेंच चित्तामध्यें विक्षेप उत्पन्न होतो. त्यामुळें स्वरूपसंधानरूप ध्यान अविच्छिन्न रहात नाहीं. पण ती तृष्णाच ज्याच्या ठिकाणीं नसते, तो स्वरूपाला सोडून आणखी कोठें व कसा रहाणार ! किंवा तृष्णारहित ज्ञानी पुरुषाची विषयेच्छा अनंत असते, तिचा, अंतच लागत नाहीं. कारण तो स्वतः अपरिच्छिन्न आत्मरूप बनलेला असतो. त्यामुळें ज्याचें चिंतन करावयाचें त्या बाह्य विषयाचें

ज्ञान कसेंहि जरी झालें, तरी ते त्याच्या तृष्णेची पूर्ति करण्यास समर्थ नसतात. तशा तृष्णेचा निरोध नित्य, निरतिशय आनंदानेंच होतो. त्यामुळें पंख गळून पडलेल्या पर्वताची स्थिति जशी एकाच ठिकाणीं स्थिर होते, त्याप्रमाणें तृष्णाशून्य पुरुषाचें आनंदानुभवरूप अनंत ध्यान आपोआप अविच्छिन्न चालतें. म्हणूनच शुद्धबोधाचा उदय होईपर्यंतच समाधीसाठीं यत्न करणें उचित होय. शुद्ध बोधात्म्याचा साक्षात् अनुभव आला असतां, समाधीसाठीं यत्न करण्याची कांहीं आवश्यकताच रहात नाहीं. कारण साक्षात्कार व समाधीविषयींचा यत्न हे परस्परविरूद्ध असल्यामुळें दोघांची एकाच वेळीं स्थिति संभवत नाहीं, असें तत्त्ववेत्त्यांनीं सांगितलें आहे. अतिशय प्रदीप्त अग्नीमध्यें घृतबिंदूचें अस्तिव संभवत नाहीं. विषयाविषयींचें परमवैराग्य हेंच समाधान होय. तें ज्यानें संपादन केलें आहे, त्या मनुष्यरूपी ब्रह्माला नमस्कार असो. विषयविरक्ति अतिशय दृढ झाली असतां, इंद्रासह सुर व असुरहि त्याच्या ध्यानाला विघ्न करूं शकत नाहींत. विषयविरक्ति पूर्णपणें साध्य झाली असतां, वज्रासारखें दृढ ध्यान करावें. ज्ञानानें सर्व भेद नष्ट झाला असतां बाकीच्या ध्यानरूप तृणाचा काय उपयोग? जगत् हा शब्द, व त्याचा अर्थ मूर्खामध्येंच रूढ झाला आहे. ज्ञानी पुरुषांचा तो विषय नव्हे. जेथें तज्ज्ञ व अतज्ज्ञ, त्याचप्रमाणें विश्व व विश्वेश्वर, त्यांचें ज्ञान व अज्ञान हीं ज्या परमानंदामध्यें एकरूप होऊन भासतात, तेथेंच हे विद्वान्हो, तुम्ही विश्रांति घ्या. कारण विवेकी लोकांच्या मननादि बोधभूमीमध्यें, किंवा ज्ञानी लोकांच्या साक्षात्कारादि बोधभूमीमध्यें आत्म्याहून निराळी सत्ता किंवा असत्ता, द्वैत किंवा अद्वैत यांचा कोणाला निर्णयच करतां येत नाहीं. परमानंदामध्यें विश्रांति पावण्याचा पहिला उपाय अध्यात्मशास्त्राचा अभ्यास. मोठ्या आदरानें निरंतर शास्त्रार्थाचें चिंतन करणें, यालाच शास्त्राभ्यास म्हणतात. हा पहिला उपाय; ज्ञानी पुरुषाचा समागम हा दुसरा व ध्यान हा निर्वाणाचा तिसरा उपाय होय. त्यांतील शेवटचा ध्यान हा उपाय सर्वांत श्रेष्ठ आहे. कारण ध्यान हें चित्तविश्रांतिरूप फळाच्या अगदीं जवळ असतें. ही अपरिच्छिन्न, नित्य, अपरोक्ष ब्रह्मचित्, 'जीव' या नांवाच्या स्वप्नप्रतिबिंबाच्या आदर्शासारखें जें अंतःकरण त्याच उपाधीमुळें परस्परविरूद्ध रूप धारण करते. जगांत प्रिय व अप्रिय यांच्या संसर्गामुळें ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्व विशेषांस व्यापून आपल्या कर्मवैचित्र्यामुळें ती सम व विषम शरीरांत उदय पावते. याप्रमाणें अनादिकालापासून, जन्ममरणपरंपरारूप संसारांत पडलेल्या जीवांतील ज्या कोणा एखाद्याचा भाग्योदय झाल्यामुळें ज्ञानाधिकारानें योग्य असा जन्म प्राप्त होतो, त्याला शास्त्र, सत्संगति इत्यादि उपाय प्राप्त होतात. त्यामुळें बोध व विरक्ति या दोन दीपांतील एकाची सिद्धि झाली असतां, दुसऱ्याचीहि होते. त्यानंतर ज्ञानरूपी अग्नीनें जळून भस्म झालेला जगद्रूप तूल[1] चिदाकाशांत उत्तर भूमिकांचा अभ्यास करणें, एतद्रूप वावटळीनें वेगानें कोठें उडून जातो हें कांहीं समजत नाहीं. ज्याप्रमाणें चित्रांतील अग्नि शीतनिवारण करूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें आपात ज्ञान अज्ञानानें निवारण करूं शकत नाहीं. ज्याप्रमाणें अज्ञपुरुषाच्या अभिमानरूप मिथ्या ज्ञानामुळें संसारभ्रांति उत्तरोत्तर वाढतच जाते, त्याप्रमाणें तत्त्वज्ञाच्या ज्ञानाची जशी जशी

१. तूल=कापूस.

वृद्धि होऊं लागते, तसें तसें अज्ञान गळूं लागतें. तत्त्वज्ञाला अज्ञपुरुषाचें जगत् निर्विषय होऊन रहातें. त्याला चित्तांतील पदार्थांप्रमाणें सर्व जगत् भासतें. शून्यत्वानेंच रचलेली, स्वप्नांतील मिथ्या संकल्पानें निर्मिलेली सृष्टि जशी भासावी, त्याप्रमाणेंच ज्ञानी पुरुषाच्या चित्तांत जगद्रूप ज्ञप्ति केवळ संकल्पमात्र भासते. ज्ञानाविषयीं जो केव्हांहि मूढ होत नाहीं, त्याला अहंता व जगत्स्थिति यांतील कांहींच भासत नाहीं. तो परमात्मस्वरूप झालेला असल्यामुळें त्याची कोणत्याच प्रकारें स्थिति होत नाहीं. त्याचें चित्त शुष्क व आर्द्र काष्ठाप्रमाणें बोध व अबोधरूप झालेलें असतें. बोधाच्या आधिक्यामुळें तो सर्व लोकांशीं मैत्री संपादन करतो. आपल्या सुखदुःखाप्रमाणें त्यांचें सुखदुःख पहातो, त्यांच्यावर दया करतो. पण अबोधांशानें लोकांशीं विवादहि करतो. ज्ञानांशानें जगत् एकरूप पहातो व अज्ञानांशानें तें आत्मरूप आहे, हें त्याच्या ध्यानांत येत नाहीं. म्हणजे त्याच्यामध्यें ज्ञान व अज्ञान यांतील जो अधिक भाग असतो तन्मय तो होऊन रहातो. त्याचें ज्ञान परिपक्व झालेलें असतें. त्याला जगाचें सत्त्व व असत्त्व यथार्थ भासत नाहीं. म्हणजे ज्याप्रमाणें सातव्या भूमिकेवर आरूढ झालेला योगी जाग्रत्, स्वप्न, व सुषुप्त यांचा स्वभाव जाणत नाहीं; त्याप्रमाणेंच ज्ञानी जगाला सत्य मानीत नाहीं. वासना हेंच मन आहे. ती वासना आत्मविचारानें नाश पावते. कारण ती मिथ्या आहे, त्यामुळें तिचा नाश झाला असतां मोक्ष अनायासें प्रवृत्त होतो. अर्थात् आरंभीं मनोमृगाच्या ध्यानतरूवरील विश्रांतीसाठीं जें ध्वक आरंभिलेलें होतें त्याचा मोक्षामध्यें परिणाम होतो. मनोनाश झाला असतां मनोमृगाच्या रूपानें वर्णिलेल्या आत्म्याचें स्वरूपावस्थान सिद्ध होतें. तेंच त्याचा मोक्ष होय. मुमुक्षु म्हणजेच वर सांगितलेला मनोमृग अंकुर, कांड, शाखा, पल्लव, पुष्प, फळ, या क्रमानें परिणाम पावलेल्या विवेकवृक्षावरील बोधरूप फळाला प्राप्त होतो, आणि त्या ध्यानवृक्षावरील परम फळाचा म्ह० परमानंदाचा आस्वाद घेऊन तो संसारबंधनापासून मुक्त होतो. ४९.

## सर्ग ४६ वा.

१ ध्यानवृक्षाच्या फळाचा आस्वाद घेतला असतां मनाची स्थिति कशी होते, व विषयवैराग्य दृढ कसें होतें, याचें वर्णन.

श्रीवसिष्ठः—परमार्थफलाचा साक्षात अनुभव आला असतां आणि मुक्तीमध्यें त्याचा परिणाम झाला असतां, बोध म्ह० परमसाक्षात्कारवृत्तिहि, तिचें उपादान कारण जें अज्ञान त्याचा बाध होत असल्यामुळें असत् होते, आणि मनोमृग परम पुरुषार्थरूप आत्माच होतो. दिव्यांतील तेल संपलें असतां त्यांतील ज्योति कोठें जाते, तें जसें कळत नाहीं, त्याप्रमाणें ती पूर्वीची मृगता म्ह० विषयरूपतृणाला शोधण्याचा स्वभाव कोठें नाहींसा होतो. अनंत ब्रम्हस्वरूपाला प्रकाशित करणारी परमार्थदृष्टीच त्या वेळीं असते. ध्यानवृक्षाचें फल मिळालें असतां, बोधत्वास प्राप्त झालेलें मन, पंख तोडलेल्या पर्वताप्रमाणें अचल स्थिति धारण करितें. त्या अवस्थेंत मनाचें मनत्व कोठें तरी जातें, व केवल निरुपाधिक ज्ञान अवशिष्ट रहातें. मनानें बाह्य विषयांचें मनन करण्याचा आपला स्वभाव टाकून तें स्वतः निर्बाध, निरंश व सर्वव्यापक चिन्मात्रच होतें. चित्तामध्यें पूर्वी जी सत्ता,

देह व आत्मा यांचा विवेक न झाल्यामुळें जणुं काय जडरूप होऊन राहिली होती, तीच सत्ता आतां देहादि आत्म्याहून अगदीं भिन्न आहे, असें समजून ज्ञानरूपानेंच उदय पावली आहे. त्यामुळें ती आदि–अंतरहित, निर्मल व परमार्थप्रकाशरूप फल देणारी झाली आहे. त्यामुळें त्या अवस्थेंत सर्व इच्छांचें स्वभावतःच निरसन होतें. आणि मग आदि-अंतरहित, निरुपद्रव स्वात्मध्यानच अवशिष्ट रहातें. जोंवर ब्रह्माचा साक्षात्कार झाला नाहीं, व मन परमपदीं विश्रांति पावलें नाहीं, तोंवर दुसऱ्या विषयाच्या अनुसंधानामुळें केवळ ध्यानच अवशिष्ट रहात नाहीं, केवल ध्यानाचाच अनुभव येत नाहीं. पण ज्या वेळीं मन सर्व विषयचिंतन सोडून परमार्थाशीं एकरूप होऊन जातें, तेव्हां तें आहे कोठें तेंहि कळत नाहीं. मग वासना कोठच्या, कर्में कोठलीं व हर्ष, क्रोध इत्यादि विकार तरी कोठचे ? केवल ध्याननिष्ठ झालेला योगी, दृढ समाधानामध्येंच स्थिर स्थित आहे, तो पर्वतासारखा अचल आहे, असाच त्याचा अनुभव येतो. आत्मस्वरूपांतच रममाण होणारा योगी सर्व भोगांविषयीं विरक्त होतो. त्याच्या इंद्रियवृत्ति अतिशय शांत होतात. सर्व दृश्य त्याला नीरस वाटूं लागतें. क्रमानें त्याच्या सर्व वृत्ति गलित होतात, व त्याची विश्रांति उत्तरोत्तर वाढूं लागते. अशा स्थितींत ध्यानाप्रमाणें त्याची समाधिहि स्वभावतःच सिद्ध होते. उदार अंतःकरणाचे मुमुक्षु जोंवर चित्रांतील मनुष्याप्रमाणें विषयांना पहातहि नाहींत, तोंवर विषयविरक्तीचा अभ्यास करतात, म्हणजे चित्रांतील मनुष्याला जसे पुढील पदार्थ दिसत नाहींत, त्याप्रमाणें विषयविरक्तीचा अभ्यास करणाऱ्या मनुष्याला पुढें असलेले पदार्थहि चित्तांत विकार उत्पन्न करीत नाहींत. असें झालें म्हणजे तें वैराग्य दृढ झालें असें समजावें. त्यानंतर त्याला वैराग्याच्या अभ्यासाची गरज नाहीं. जगांतील पदार्थांना न पहाणारा व वासनाशून्यतेमुळें आत्मरूप झालेला ज्ञानी त्याची इच्छा नसतांनाहि कोणी बलात्कारानेंच निवृत्त केल्याप्रमाणें दृढ-समाधानांमध्यें प्रवेश करतो. गुळावर चिकटलेली मुंगी जशी त्याला सोडीत नाहीं, त्याप्रमाणें पहिल्याच समाधानामध्यें ज्याला निरतिशय आनंदाचा अनुभव आलेला आहे, त्याचें स्वभावतःच एकाग्र बनलेलें मन, आनंदाला सोडून दूर जात नाहीं. पावसाळ्यांत नदीला जसा मोठा पूर येतो, त्याप्रमाणेंच पूर्वोक्त ज्ञानी पुरुषाला समाधानाचा लाभ होतो. सर्व विषय-वासना शांत झाल्यामुळें बलात्कारानें जसें ध्यान प्राप्त होतें, त्याप्रमाणें ब्रह्मानंदाचा साक्षात्कार झाल्यावर अनात्मविषयांचें वैराग्य दृढ होतें. तीच समाधि होय. रागादि-दोषांनीं चित्त जोंवर संतप्त होत असतें, तोंवर केव्हांहि कोणालाहि समाधान होत नाहीं. यास्तव दृढ विषय-वैराग्य हेंच ध्यान होय आणि त्याचाच पूर्ण परिपाक झाला असतां तें ध्यानच समाधि बनतें. अर्थात् भोगांविषयींची विरक्ति हेंच बीज, ध्यान हाच त्या बीजापासून उत्पन्न झालेला अंकुर, आणि अचल ध्यान हीच समाधि होय. साक्षात्कारवृत्तीनें प्रकट झालेलें ब्रह्मच, अविद्येचा उच्छेद केल्यामुळें ज्ञान, वासनेचा उच्छेद केल्यामुळें ध्यान व सर्व दुःखांचा उच्छेद केल्यामुळें आनंदरूपानें निर्वाण म्हटलें जातें. पण हें सर्व विषयभोगांविषयीं विरक्ति असली तरच सिद्ध होतें, त्यावांचून नाहीं. त्यामुळें भोगांविषयींची विरक्ति जर असेल, तर निराळ्या ध्यानाचा आग्रह कशाला ? आणि विषयवैराग्य जर नाहीं, तर ध्यानादिकांच्या आग्रहाचा तरी काय उपयोग ? म्हणजे किती जरी ध्यान केलें तरी त्याचा काय उपयोग ? ज्यानें दृश्यावि-

यींचें प्रेम सर्वथा सोडिलें आहे त्या आत्मज्ञानवान् मुनीचें निर्विकल्प समाधान कोणत्याहि प्रकारच्या प्रतिबंधावांचून प्रवृत्त होतें. ज्याला दृश्य प्रिय वाटत नाहीं, त्यालाच ज्ञान झालें असें समजावें. ज्या वेळीं विषयभोग आवडेनासे होतात, तेव्हांच यथार्थ ज्ञान उदय पावलें आहे, असें समजावें. जो स्वरूपामध्यें विश्रांति पावलेला असतो. त्याला भोगित्व कोठलें ? कारण भोगित्व हा अस्वभाव आहे, तें स्वाभाविक नव्हे. अज्ञानामुळें त्याचा उद्भव होतो. तेव्हां ज्ञानानें अज्ञानाचा क्षय झाल्यावर भोगित्व कोठलें ! अभ्यासी पुरुषानें नियतकालीं ध्यानाचा अभ्यास केल्यावर वेदांतशास्त्राचें गुरुमुखानें सहाध्यायांसह श्रवण करावें. उपनिषदें, गीता इत्यादिकांचा पाठ करावा, प्रणवादिकांचा जप करावा आणि इतकें सर्व करून झाल्यावर ध्यान करावें, म्ह० समाधीचा अभ्यास[१] करावा. हे रामा ! अंतःकरणाच्या सर्व वृत्ति शांत कराव्या, सर्व खेद टाकावा, सर्व शंका सोडून आल्हादयुक्त व्हावें. झोपेंत असल्याप्रमाणें सौम्य असावें आणि चित्ताला सम, शांत व शरदृतूंतील मेघविस्तराप्रमाणें अति शुद्ध करावें. ४६

---

१ स्कंदपुराणांत—

जपश्रान्तः पुनर्ध्यायेद्ध्यानश्रान्तः पुनर्जपेत् ।
जपध्यानाभियुक्तस्य प्रसीदति परः शिवः ॥

असें म्हटलें आहे. याचा अर्थ—जप करून श्रांत झालेल्या साधकानें पुनः ध्यान करावें व ध्यान करून कंटाळा आला असतां पुनः जप करावा. जप व ध्यान यांनीं युक्त असलेल्या म्हणजे त्यांतच आपला सर्व काल घालविणाऱ्या पुरुषावर परमात्मा प्रसन्न होतो.

# सर्ग ४७ वा.

—:०:—

१ पुनरपि मुक्तीच्या साधनांच्या क्रमाचें दृढ वैराग्यापर्यंत सविस्तर वर्णन.

श्रीवसिष्ठः—हे रामा ! संसारभारानें अतिशय श्रांत झालेला व मरणमूर्च्छादि संकटांमध्यें ज्याचें शरीर खितपत पडलें आहे, अशा मनुष्याला विश्रांतीची इच्छा होते. म्हणून त्यानें त्या विश्रांतीसाठीं, कोणकोणते गुण कोणत्या क्रमानें संपादन केले पाहिजेत, तें सांगतों ऐक. जेव्हां कांहीं कारणानें, व कारणावांचूनहि आपल्या मनांत संसारवैराग्यरूप विवेकाचा लेश उत्पन्न होतो, तेव्हां मार्गींतील श्रम घालविण्यासाठीं उन्हानें संतप्त झालेले प्रवासी वृक्षछायेचा आश्रय जसा करतात, त्याप्रमाणें साधुत्वानें अतिशय विस्तार पावलेल्या पुढील गुणांचा आश्रय करावा. जसा मार्गस्थ मनुष्य यज्ञांतील यूपाच्या[१] छायेसाठीं आश्रय करीत नाहींत, त्याप्रमाणें सन्मार्गस्थ मुमुक्षु अज्ञजनांपासून फार दूर रहातो. तो सज्जनांचें अनुकरण करतो. स्नान, दान, तप, यज्ञ इत्यादि धर्मकार्यें करूं लागतो. त्याचा सर्व व्यवहार निष्कपटपणें होतो. त्याचें प्रत्येक कृत्य सौम्य व उदार असतें. चंद्रबिंबांतील अमृताप्रमाणें त्याचा व्यवहार लोकांना आल्हाद देणारा व हितकर असतो. त्याला स्वपक्षाचा अभिमान, राग, लोभ इत्यादि नसतात व तो परहित-तत्पर असल्यामुळें दुसऱ्याच्या संतोषासाठीं त्याच्या इच्छेप्रमाणें वागतो. म्हणूनच तो सर्व लोकांना अतिशय प्रिय होतो. पवित्र कर्माची त्याला मोठी आवड असते. त्यामुळें सर्व लोकांमध्यें तो उत्कृष्ट ठरतो, व त्याचा व्यवहार सर्वांना

---

१ यूप = यज्ञांतील पशु बांधावयाचा स्तंभ.

सुखकर होतो. त्याची नूतन संगति नवनीतासारखी निर्मल, स्निग्ध, मृदु, मधुर व चित्ताकर्षक असते. ती सर्व लोकांना सुख देते. विवेकी पुरुषांचीं चरित्रें शीतल व पवित्र असतात. चंद्राच्या किरणसमूहाप्रमाणें सर्व लोकांना तीं आल्हाद देतात. साधुसमागमामध्यें जशी मनाला विश्रांति मिळते, तशी ज्यामध्यें पुष्पांचा थर पसरला आहे अशा उद्यानांतहि ती निर्भयपणें प्राप्त होत नाहीं. मंदाकिनीच्या जलाप्रमाणें विवेकी लोकांची संगति पातकांचें प्रक्षालन करते, व अतिशय पावन करते. बर्फाच्या किंवा पुष्पांच्या हारांनीं रचलेल्या गृहामध्यें जसें तापशमन होतें, त्याचप्रमाणें, संसारसागरांतून स्वतः परतीरास जाऊन इतरांसहि त्यांतून तारण्याची इच्छा करणाऱ्या विरक्त, विवेकी सज्जनांच्या संगतींत लोकांला सुख होतें. विवेकी लोकांमध्यें जें प्रेम व जी अनुरक्ति असते, ती सुर, गंधर्व व मानव यांच्या कन्यांमध्येंहि नसते. उचित कर्म करणाऱ्या पुरुषाची बुद्धि प्रसन्न होते. निष्काम कर्में क्रमानें अनुष्ठिलीं असतां चित्तांतील रागादि द्वेष निवृत्त होतात; त्यामुळें आत्म्याला जाणण्याची इच्छा उत्पन्न होते; आणि आरशामध्यें जसें पदार्थाचें प्रतिबिंब पडतें, त्याप्रमाणें शुद्ध चित्तांत गुरुमुखानें ऐकलेला शास्त्रार्थ स्थिर होतो. शास्त्रार्थरसानें शोभणारी सत्प्रज्ञा विवेकयुक्त हृदयांत उत्कर्ष पावते. महावनांत कदली वृक्ष जसा विकास पावतो त्याप्रमाणें सद्बुद्धींत प्रज्ञेची वाढ होते. शुद्ध प्रज्ञा आरशाप्रमाणें प्रतिबिंबित झालेल्या सर्व पदार्थांचा आंतल्या आंतच अनुभव घेते. साधुसंगतीनें ज्याचें अंतःकरण शुद्ध झालें आहे आणि शास्त्रार्थानें ज्याचा मल घालविला आहे, असा प्राज्ञ अग्नींत शुद्ध करून काढलेल्या जरतारी वस्त्राप्रमाणें अतिशय तेजस्वी दिसतो. सर्व लोकांना प्रकाशित करणाऱ्या सूर्याच्या योगानें जसें सर्व जगत् प्रकाशित होतें, त्याप्रमाणें देदीप्यमान अशा स्वतेजानें साधु म्हणजे विवेकी पुरुष चमकतो. विवेकी शास्त्र व साधुसमागम यांचें असें अनुकरण करतो कीं, स्वप्नांतहि तो मोठ्या अभिनिवेशानें तेंच पहातो, व त्याचाच अनुभव घेतो. शास्त्राभ्यासानें निःसंशय झालेला विवेकी क्रमानें सज्जनतेस प्राप्त होऊन पिंजऱ्यांतून बाहेर पडलेल्या शुकाप्रमाणें विषयभोगास तुच्छ मानून स्वातंत्र्याचा अनुभव घेतो. भोगांच्या सन्मुख मोठ्या आसक्तीनें जाणें हेंच दुर्भाग्य होय. पण विवेकी दिवसेंदिवस त्याचा त्याग करतो, त्यामुळें चंद्राच्या योगानें जसें तारामंडल तसें त्याच्या योगानें त्याचें कुल शोभतें. भोगांविषयींच्या दीनतेनें रहित असलेली त्याची मुखकांति राहूच्या मुखांतून सुटलेल्या चंद्राप्रमाणें कांहीं अवर्णनीयच दिसूं लागते. ज्यानें त्रिभुवनाला तृणासारखें मानलें आहे, तो मोठ्या प्रशंसेस पात्र होतो. देव स्वर्गांत कल्पवृक्षापाशीं जसे येतात, तसाच तो अपूर्व कीर्तीला पात्र होतो, प्राप्त झालेल्या भोगांचा परित्याग केल्यामुळें त्याला जरी मोठा संतोष वाटत असला तरी, मी सर्व द्वेषाचा त्याग केल्यावर आतां या भोगांचा तरी द्वेष कां करावा? असें ह्मणून मनांत केव्हां केव्हां लज्जित होतो. त्यामुळें त्याचा तो संतोष परिपूर्ण नसतो, पण भोगांचा लाभच न झाल्यास मनांत असें लज्जित होण्याचा प्रसंग न आल्यानें तो फारच संतुष्ट होतो. ज्याप्रमाणें एखादा अधमजातीचा चांडालादिक दैववशात् जातिस्मर झाल्यास, म्ह० त्याला पूर्वजन्मींच्या आपल्या जातीचें स्मरण झाल्यास तो जसा त्या जातीला मोठ्या खेदानें हंसतो, त्याप्रमाणें विवेकी पूर्वींच्या आपल्या चंचल व रागद्वेषयुक्त क्रियांना हंसतो. साधु-

लोक भूमीवर उदय पावलेल्या चंद्राप्रमाणेंच त्याला मोठ्या प्रेमानें व विश्वासानें पाहावयास येतात. त्यानें नेहमीं विषयभोगांचा अनादरच केलेला असतो. त्यामुळें अनायासें प्राप्त झालेल्या सिद्धींचाहि आपल्या उचित बुद्धीनें तो बहुमान करीत नाहीं. कारण गुरु व शास्त्र यांच्या संपर्कामुळें पूर्वींच त्यानें वैराग्यादि साधनांचा पूर्ण अभ्यास केलेला असतो. त्यामुळें प्रसन्न झालेल्या सिद्धांपासून प्राप्त झालेल्या विहित भोगांचाहि तो उपभोग घेत नाहीं. रोगी वैद्याचा जसा आश्रय करतो, त्याप्रमाणें तो स्वतः परम कल्याणासाठीं सज्जनांचा सहवास करतो. त्यामुळें त्याची उदारमति शास्त्रार्थामध्यें निमग्न होते. ज्याप्रमाणें एखादा महागज एखाद्या प्रसन्न जलानें भरलेल्या सरोवरामध्यें निमग्न होतो, तशीच त्याची बुद्धि शास्त्रार्थविचारामध्यें गढून जाते. सूर्य जसा लोकांना अंधकारांतून काढून आपल्या प्रकाशांतच प्रविष्ट करतो, त्याप्रमाणें सज्जन आपल्या समीप असलेल्या पुरुषाला विपत्तींतून वर काढून संपत्तीमध्यें नियुक्त करतो. त्याच्या चित्तांत परधनादिकांच्या अपहाराविषयींची विरक्ति पूर्वींच उद्भवलेली असते. विवेकी पुरुष प्राप्त विषयामध्येंच संतुष्ट असतो. परधनाच्या अपहारापासून निवृत्त झालेला व संतोषामृतानें तृप्त झालेला विवेकी क्रमानें स्वार्थाचीहि उपेक्षा करतो. याचना करणाऱ्या भिक्षूला आपल्याजवळ जें कांहीं अल्पस्वल्प कदन्नादिक असेल तें देतो व त्याच अभ्यासानें तो आपलें स्वतःचें मांसहि देण्यास तयार होतो. धावणाऱ्या मनुष्याला गायीचें पाऊल जसें तुच्छ वाटतें, त्याप्रमाणें विवेकाचें अनुसरण केल्यामुळें ज्यांचें चित्त हळूहळू क्षीण होत चाललें आहे, त्यांचें अज्ञान क्रमानें कमी होऊं लागतें. ज्ञानाची जशी जशी वाढ होऊं लागते तसें तसें अज्ञान नाश पावतें. दुसऱ्याच्या धनाचें ग्रहण करण्याची बुद्धि मोठ्या यत्नानें अगोदर कमी करावी. प्रथम परधनाविषयीं विरक्त व्हावें आणि मग स्वार्थाविषयीं आसक्ति धरूं नये. याप्रमाणें विषयोपभोगाच्या निरसनासह विवेकी व प्रयत्नशील मुमुक्षु स्वार्थाचें निराकरणही परम विश्रांतीसाठीं करतात. यावज्जीव द्रव्योपार्जन करीत राहणें यांत जितकें दुःख आहे तितकें कोट्यवधि नरकांतहि नाहीं. आसन, शयन, वाहन, क्रीडा, व आप्तजन यांविषयीं या लोकींच किती चिंता करावी लागते, याचा विचार मूढांनीं करावा. म्हणजे त्यांना पारलौकिक दुःखाचें स्मरण जरी न झालें, तरी त्यांनीं लौकिक दुःखाला विसरूं नये. अर्थ हे विस्तृत अनर्थच आहेत. संपत्ति या निरंतर आपत्तिच आहेत, भोग हेच संसारमहारोग आहेत. पण मूढ लोक त्यांची विपरीत भावना करतात, म्हणजे अनर्थांना अर्थ, विपत्तीला संपत्ति व रोगांनाच भोग समजतात. जोंवर व्यवहारांतील अर्थ हा महान् अनर्थच आहे असें मनुष्य समजत नाहीं, त्याला तो तुच्छ वाटत नाहीं आणि त्यामुळें स्वतःला दुःखी करण्यासाठींच तो त्याची इच्छा करतो, तोंवर त्याच्या चिंतेचे विषय सारखे वाढत जातात व त्यांविषयीं तो विरक्त होत नाहीं. पण ज्याला अनुत्तम सुखाची फार आवड असते, आपल्याला हें परम सुख असेंच चिरकाल लाभो असें ज्याला वाटत असतें, तो धनाला जगद्रूप तृणाच्या अग्राप्रमाणें अति तुच्छ पाहून मनांत शांत होतो. अर्थात् धनाची तृष्णा सोडणें हाच मोक्षाचा मुख्य उपाय होय. अर्थच चिंता, शोक, मोह इत्यादि विकारांचा, जरा व मरण या दुष्कर्मांचा, आणि दैन्य, दुरात्मता, दाह इत्यादिकांचा समूह

म्हटला आहे. या जगामध्यें जरा व मरण यांनीं युक्त असलेल्या जंतूंना, जरामरणापासून सोडविण्यास संतोष हेंच उत्तम रसायन आहे. वसंतऋतु, नंदनवन, चंद्र, अप्सरा हें सर्व एकीकडे आणि संतोषामृत दुसरीकडे अशी तुलना केल्यास संतोषामृतच अधिक ठरतें. वर्षाऋतुमुळें सरोवर जसें जलांनीं तुडुंब भरतें, त्याप्रमाणें मनुष्य संतोषानेंच अंतःकरणांत तृप्त होतो. गंभीर, शीतल, हृदयंगम, प्रसन्न आणि सरस अशा ओजस्वितेला संतोषानेंच प्राप्त झालेला साधु अतिशय शोभतो. वसंतऋतूमध्यें जसा वृक्ष, त्याप्रमाणें तो पुष्पित वनाकार दिसतो. पण जो असंतुष्ट असलेला पुरुष विषयांची इच्छा करून पायाखालीं चिरडलेल्या कीटकाप्रमाणें दीनप्रकृति बनतो, तोच विषयप्राप्तीसाठीं यत्न करतो व त्यामुळेंच दुःखपरंपरेंत पडतो. याचकांची मुखचर्या अतिशय दीन असते. त्यांना एखाद्या क्षुब्ध समुद्रांत पडलेल्या, व तरंगांनीं व्याकुळ झालेल्या जीवाप्रमाणें स्वस्थता कधींच मिळत नाहीं. पण संपत्ति व प्रमदा उंच तरंगाप्रमाणें क्षणभंगुर आहेत, तेव्हां त्यांमध्यें व सर्पाच्या फणांच्या छायेंत कोणता शहाणा पुरुष आसक्त होईल! धन संपादन करणें व रक्षण करणें यांमध्यें किती क्लेश होतात हें जाणत असूनहि जो त्याची इच्छा करतो, तो मूढ नरपशु होय. त्याला स्पर्शहि करूं नये. मनाचा बाह्यारंभ म्हणजे इंद्रियांच्या मागून धावणें व आंतरारंभ म्हणजे संकल्पादि, यांना जो वैराग्यशस्त्रानें एकदमच कापतो त्याचें क्षेत्र म्हणजे, ज्ञानबीजाच्या उद्भवाचें स्थान, किंवा मुक्तीचें निधानस्थान असें जें हृदय, तें प्रकाशित होतें. अज्ञजनांना दिसणारें जगद्वैचित्र्य, त्याच्या साक्षीमध्यें, असतूच आहे, असें जाणणाराहि ज्ञानी ज्ञानाच्या अपक्वतेमुळें त्या जगद्वैचित्र्याला जणूं-काय सत्यच समजतो, व त्याच भावनेनें व्यवहार करतो. पण तो वैराग्यादि गुणांचा अभ्यास न केल्याचा परिणाम आहे. यास्तव हे रामा! प्रथम संसाराविषयीं अगदीं विरक्त व्हावें. नंतर सत्समागम व शास्त्राभ्यास करावा. शास्त्रार्थाविषयीं भावना दृढ करावी, सर्व विषयोपभोगांचें निरसन करावें, म्हणजे वैराग्य दृढ होऊन, मुमुक्षु परमार्थ आत्मतत्त्वाला प्राप्त होतो. ४७.

---

## सर्ग ४८ वा.

—:०:—

१ परम वैराग्य दृढ झालें असतां, ज्या लक्षणांनीं मनुष्याची स्थिति होते व ज्ञान दृढ झालें असतां ज्या लक्षणांनीं स्थिति होते त्यांचें सविस्तर वर्णन.

श्रीवासिष्ठः—संसाराविषयींचें वैराग्य रूढ झालें असतां व साधुसमागम स्थित झाला असतां शास्त्रार्थाची भावना केली असतां व बुद्धीनें भोगांविषयींची तृष्णा सोडली असतां विषयांविषयींहि अरुचि उत्पन्न होते. सज्जनत्व उद्भवतें, आत्मप्रकाश उदय पावतो व हृदय प्रसन्न होतें. विवेकी पुरुष धनाची इच्छा करीत नाहींत. वाळलेलीं उच्छिष्ट पानें जशीं घरांतून बाहेर टाकलीं जातात, त्याप्रमाणें असलेली संपत्तिहि त्यांच्याकडून टाकली जाते. प्रवाशाला पात्रादि उपकरणांची आवश्यकता जरी असली तरी प्रवासांत त्यांचा भार होत असल्यामुळें तीं जशीं टाकून देतो, त्याप्रमाणें विरक्त पुरुष स्त्री, बंधु इत्यादिकांचा यथाशक्ति व यथाकालीं त्याग करतो. त्याचें मन शांत असल्यामुळें इंद्रियांशीं विषयांचा वारंवार संनिकर्ष जरी होत

असला, तरी भोगांचा अनुभव घडत नाहींत. तो विरक्त ज्ञानी कोठें दिगंतरीं, एकांतांत, सरोवराच्या कांठीं, अरण्यांत, उद्यानांत, पुण्यप्रदेशीं किंवा आपल्याच घरांत, सुहृदांबरोबर क्रीडा किंवा विलास करतांना, शुभ उद्यानांतून, भोजनादि प्रसंगीं, तर्कशास्त्राचा विचार करीत असतांनाहि तितकी आस्था ठेवीत नाहीं. कारण त्यांतील कशावरच त्याची आसक्ति नसते. कदाचित् दैववशात् त्यांतील एखाद्या ठिकाणीं त्यांना जरी रहावें लागलें, तरी ते अति शांत, दान्त, स्वात्माराम व मौनी होऊनच रहातात. प्रत्येक मनुष्य दैवाधीनच जरी असला, तरी तो आपलें ज्ञान दृढ व्हावें, म्हणून तत्त्ववेत्त्याचीच अपेक्षा करितो; व देह, इंद्रियें, बुद्धि इत्यादिकांचा साक्षी जो प्रत्यगात्मा, त्याचाच चित्तानें शोध करतो. आत्मव्यतिरिक्त वस्तूचा तो शोध करीत नाहीं. ज्ञानी पुरुषांना ज्ञानी पुरुषाच्या संगतीची अपेक्षा असते व ते केवल विज्ञानाचीच चर्चा करितात, दुसऱ्या कशाचीहि करीत नाहींत. याप्रमाणें अभ्यासानें शांत परमपदीं विश्रांति प्राप्त होते. शांत विवेकी स्वतःच त्या परमपदाकडे जातो. त्याचें ज्ञान सबाह्य-अभ्यंतर शांत असून तेंच परमार्थरूपानें उदय पावलेलें असतें. अर्थात् शांति हेंच परमपद होय. कोणताहि पदार्थ त्या शांतीहून भिन्न संभवतच नाहीं, असा निश्चय झाल्यामुळें ज्ञानाचा विषयच नाहींसा होऊन ती निश्चयरूप वृत्तिहि काष्ठ जळाल्यावर आपोआप विझणाऱ्या अग्नीप्रमाणें आत्म्यामध्यें शांत होते. यास्तव तेंच परमधाम होय. एक ज्ञानरूप आत्म्यावांचून दुसरा कोणताहि पदार्थ नाहीं. असा जो स्वानुभव तेंच परमपद होय. त्या परमपदाला बोधत्व नाहीं व विषयत्वहि नाहीं. कारण सर्व वस्तु एक अद्वितीय ज्ञानाशीं एकरूप होऊनच परिणाम पावलेल्या असतात. विषयावांचून त्याहून अगदीं भिन्न असलेलें ज्ञान सांगतां येत नाहीं व ज्ञानावांचून ज्ञेयाला ज्ञानविषयत्वहि येत नाहीं. तथापि विषयांच्या अभावीं, त्या अभावालाहि विषय करणारें ज्ञान नाहीं असें म्हणतां येत नाहीं. ज्या सत्पुरुषचें मन शुद्ध संविद्रूप आत्म्यामध्यें विश्रांति पावलेलें असतें, त्यांना विषयाची रुचि कळत नाहीं. पाषाणाला दुधाचें माधुर्य कळणें जसें शक्य नाहीं, त्याप्रमाणें मनोरहित झालेल्या साधूंना विषयाचा आस्वाद कळत नाहीं. ज्यानें आपल्या अंतःकरणाचा पूर्णपणें निरोध करून मनोनाश केला आहे, व त्यामुळें जो मौन धारण करून बसला आहे, तो चित्रांतील मनुष्याप्रमाणें स्वरूपांतच स्थित असतो. त्याचें चित्त आत्म्यामध्येंच निश्चल होतें. आत्म्यालाच जाणणें सर्वथा उचित आहे. यास्तव त्यालाच जाणणें ज्याचें शील आहे, त्याचें मन निर्विषय होतें, आणि सर्व तत्त्वतः मनोमात्र असल्यामुळें त्या अवस्थेंत तें सर्व विषयसंपन्नहि होतें. तसेंच ज्ञानी पुरुषाचें मन अपरिच्छिन्न ब्रह्माकार झालेलें असल्यामुळें वस्तुतः महत् परिमाणाचेंच होतें. तथापि ब्रह्माहून भिन्नरूपानें त्याचा अनुभव येत नसल्यामुळें तें परमाणूसारखें अति सूक्ष्म होतें. तें वस्तुतः अशून्यच असतांना शून्य असल्यासारखें भासतें. अहंता, जगत्, शरीरादिकांच्या चेष्टा, दिशा, काल इत्यादिकांच्या कल्पना, ज्ञानादि, शून्यादि वगैरे सर्व विद्यमान असतांनाच ज्ञानी पुरुषाला नसल्यासारखें होतें. दीप अंधकाराचें जसें निरसन करतो, त्याप्रमाणें निर्मलपदीं स्थित असलेल्या ज्ञानी पुरुषाकडून हृदयांतील अज्ञान, व बाह्य राग-द्वेष-भयादि दोष घालविले जातात. ज्याच्यामध्यें रजोगुणाचा लेशहि उरलेला नाहीं, जो सत्त्वगुणाच्याहि पार निघून गेला

आहे, त्या नररूपी सूर्याला नमस्कार करावा. द्वैताचा सर्वथा लय झाला असतां व चित्त अदृश्यत्वास प्राप्त झालें असतां, ज्ञानी पुरुषाची जी स्थिति होते, तिचें वाणीनें वर्णन करवत नाहीं. हे महाबुद्धिमान रामा! चिरकाल, अहोरात्र, परमभक्तीनें प्रसन्न करून घेतलेला परमेश्वर पूर्वोक्त निर्वाण देतो; ह्मणजे त्याच्या कृपेनें पूर्ण समाधान होतें.

श्रीराम:—हे मुनिश्रेष्ठ! ईश्वर कोण व भक्तीनें तो कसा प्रसन्न केला जातो, हें मला स्वतः सांगा. कारण आपण सर्व तत्त्ववेत्त्यांमध्यें श्रेष्ठ आहां.

श्रीवसिष्ठः—हे महाबुद्धिमाना, ईश्वर कांहीं कोठें दूर नाहीं व तो अतिशय दुर्लभहि नाहीं. कारण ज्यांना आपल्या स्वाधीन ठेवावयाचें त्यांच्याविषयीं स्वातंत्र्य असणें हेंच ईश्वरत्वाचें लक्षण आहे व तें स्वात्म्यामध्येंच सर्व प्रकारें संभवतें. म्हणून महाबोधमय, एकरूप स्वात्माच परमेश्वर आहे. कारण रथ, गृह, प्रासाद इत्यादि सर्व अचेतन पदार्थ चेतनाच्या उपयोगासाठीं असतात. पण आत्म्याहून दुसरा कोणी चेतनस्वरूप उपलब्ध होत नाहीं. उलट सर्व आत्म्यासाठींच आहे, आत्म्यापासूनच झालें आहे. तोच सर्व आहे, सर्वतः आहे, सर्वांमध्यें आहे व सर्वमय आहे. त्या सर्वात्म्याला नमस्कार असो. त्या आत्म्यापासून या सर्व सृष्टि-प्रलय-विक्रिया उद्भवतात. ज्याप्रमाणें वायूपासून गति उत्पन्न होतात त्याप्रमाणें सर्व विक्रियांचें कारण असलेल्या या आत्म्यापासून स्वभावतःच त्या उत्पन्न होतात. भाविक लोक सतत या सर्व स्थावर-जंगमाची पूजा करतात, ईश्वरबुद्धीनें ते आपल्याला इष्ट असलेले पदार्थ त्यांना अर्पण करतात. म्हणजे कोणी, कोणत्याहि रीतीनें, कोणाचीहि पूजा केली तरी तिचा मुख्य विषय आत्माच आहे. याप्रमाणें अनेक जन्म स्वेच्छेनें जेव्हां या देवाची पूजा करावी, तेव्हां तो प्रसन्न होतो आणि हा महादेव म्हणजे पुण्यकर्मांनीं प्रसन्न झालेला स्वतः महेश्वर आत्मा पुढें सांगितलेल्या पवित्र दूताला तत्त्वज्ञानासाठीं प्रेरणा करतो.

श्रीराम:—हे मुने, परमेश्वर जो आत्मा त्याच्याकडून कोणता दूत प्रेरित केला जातो व तो अधिकारी जीवाला तत्त्वज्ञानाचा बोध कसा करतो; तें मला सांगा.

श्रीवसिष्ठः—रामा, त्या दूताचें नांव विवेक आहे. आत्मदेवानें ज्याला प्रेरणा केली आहे, असा तो विवेकदूत अधिकारी पुरुषाच्या हृदयगुहेंत येऊन रहातो. स्वच्छ आकाशांत जसा चंद्र त्याप्रमाणें तो सदानंद ज्ञानप्रतिष्ठित होईपर्यंत हृदयांत स्थिर रहातो. तो वासनारूप जीवाला क्रमानें बोध करतो आणि त्या अविवेक्याला या संसारसागरांतून तारतो. विवेकदूताचा बोध हेंच त्याचें तारण आहे. सर्व जगाला जाणणारा जो हा ज्ञानरूप अंतरात्मा, तोच परमेश्वर आहे. वेदाला सम्मत असलेला 'परम' हाच त्याचा वाचक शब्द आहे, ह्मणजे हेंच त्याचें नांव आहे. मनुष्य, नाग, सुर, असुर यांच्याकडून, जप, तप, दान, होम, पाठ, यज्ञ इत्यादि अनेक कर्मांनीं हाच सतत प्रसन्न केला जातो. स्वर्गलोक हें त्याचें मस्तक आहे, पृथ्वी हेच चरण, तारका रोमपंक्ति, मूर्ते याचें अस्थि व आकाश हेंच त्याचें हृदय आहे.[1] हा परमेश्वर चिद्रूप असल्यामुळें सर्वत्र जातो, जागतो व पहातो, त्यामुळें स्वतः सर्व अवयवांनीं

१ याविषयीं 'अग्निर्मूर्धा चक्षुषी चंद्रसूर्यौ दिशः श्रोत्रे' इत्यादि श्रुति प्रमाण आहे.
[ मुण्डकोपनिषद्भाष्यार्थ. २. १, पृ. ५८,]

असलेले जे स्फुलिंग त्यांनीं बनलेल्या कोलितांनीं बीजयुक्त ज्वालारूपी पल्लवांनीं शोभणाऱ्या, ब्रह्मरूप पाषाणरहित सरोवरांत उगवलेल्या कल्पांताग्निरूप पद्मिनीचीं प्रतिबंधक वायुप्रधान सर्प-पर्वतरूप मूळें पातालापर्यंत निखाऱ्याच्या चिखलांत निमग्न झालीं असतां तो कल्पान्त—मेघसमूह मोठा आवाज करीत आला. तो काजळासारखा काळा होता. आपल्या पाठीवरून पाण्याच्या पखाली वाहणाऱ्या उंटांच्या सैन्याप्रमाणेंच पश्चिमदिशेंतून येणारा तो मेघसमूह दिसत होता. ( पश्चिम देशांत उंटें पाणी वहातात हें प्रसिद्ध आहे. ) तो मेघसमूह म्हणजे स्थिर कल्पाग्नीच्या ज्वालांसारख्या विजांचा पर्वतच होता. त्याच्या एका लहानशा कोंपऱ्यांत सप्तसागरांतील सर्व पाणी भरलेलें होतें. त्याच्या सर्व बाजूंना भिंतीसारख्या भयंकर दहिंवरांच्या धारांनीं सर्व आकाश व्यापून टाकिलें होतें. ब्रह्मांडाच्या कवचापर्यंत दाट भरलेल्या भूमंडलाला फोडण्यांत तो मोठा चतुर होता. कल्पांतीं क्षुब्ध झालेला समुद्रच जणूं काय या मेघरूपानें आकाशांत आला आहे, असें भासलें. समुद्रांतील जे मोठमोठे भोंवरे तेच हे द्वादशादित्य होत, व चमकणाऱ्या विजा हेच त्यांतील जलचर प्राणी होत. किंवा हा मेघसमूह ह्मणजे पूर्वीं दग्ध होऊन गेलेला चंद्रच आहे. तो पूर्वींप्रमाणें दुप्पट शीतल होऊन दुसरा देह धारण करून पूर्वींपेक्षां अतिशय उंच असलेल्या परलोकीं येऊन राहिला आहे. सोन्याप्रमाणें चमकणाऱ्या विद्युद्गणरूपी जाड्यानें ज्यानें सर्व जलाला स्तंभित करून सोडलें आहे, त्यामुळें ज्याला काष्ठाप्रमाणें अचल केलें आहे, अशा हिमालयालाच तो जणूं काय धारण करीत होता. याप्रमाणें मेघ आल्यानंतर वृष्टि सुरू झाली. तिनें ब्रह्मांडाचा स्फोट होईल अशाच प्रकारच्या कठीण वज्राघातांनीं आकाश व्यापून टाकिलें. पूर्वीं सर्व दिशांना धुक्यानें भरून सोडलें. अग्निदाहाप्रमाणेंच वन व आकाश यांमध्यें भयंकर विजा चमकूं लागल्या. भयंकर गडगडाटांनीं ब्रह्मांडमंडल फुटूं लागलें. त्या वृष्टीची एकेक धार म्हणजे द्यावाभूमिरूप मंडपाला धारण करणारा स्तंभच आहे, किंवा पृथ्वीला धारण करणाऱ्या पर्वतांना तोडणारे ते टाकीचे आघातच आहेत असें वाटलें. पृथ्वीवर चटचट असा आवाज होऊन त्या वृष्टीमुळें निखाऱ्यांचे समूह फुटूं लागले. ती आपल्या गर्जनेच्या योगानें लोकांतरांना कोसळून पाडण्यांत व्यग्र झाली आहे, असें दिसलें. ती निखाऱ्यांनीं युक्त अशा जगद्रूप गृहांत विलास करणारी वृष्टि, भूमीचा ताप शांत करून व तिला झालेल्या दुःखामुळें स्वतःहि नेत्रांत अश्रु आणून एखाद्या सखीप्रमाणें जणूं काय तिला भेटावयासच आली. त्या वेळीं तें तशा प्रकारचें आकाश ज्यांत सूक्ष्म ज्वालांचा विलास चालला आहे, असें होऊन पुनरपि ज्यांत भूमीवरील कमलपत्रांचे समूह उद्भवले आहेत असें झालें. त्या आकाशांत स्फुरण पावणारे जलचर ज्वालांमध्यें भ्रमण करणाऱ्या भ्रमरपंक्तीप्रमाणें झाले. त्या वेळीं मेघ व अग्नि यांचा समागम होतांच चटचट असे फार मोठे ध्वनि निघूं लागले. त्यांनीं दाही दिशा व्यापून टाकिल्या. तो त्यांचा समागम दुर्वार वैऱ्यासारखा असह्य होता. त्यामुळेंच मोठ्या सैन्यांच्या शस्त्रांनीं प्रतिसैन्यांतील लोकांचीं शस्त्रें ज्यांत कुंठित होत आहेत, अशा प्रकारचा तो एक भयंकर संग्रामच आहे असें भासलें. ७६.

# सर्ग ७७ वा.

१ पुष्परावर्तक मेघांनीं केलेल्या वृष्टीच्या धारांनीं जगत् जलमय झालें. २ सात समुद्रांच्या क्षोभापासून जगाचा नाश.

**श्रीवसिष्ठः**—त्यानंतर युगाचा क्षय प्राप्त होऊन पृथ्वी, जल, तेज व वायु या चार महाभूतांचा अत्यंत क्षोभ झाला असतां त्रिभुवन कसें झालें त्याचें मी वर्णन करतों तें ऐक. तमालवृक्षाचें वन वर उडून जात असल्याप्रमाणें, भस्माच्या ढिगाप्रमाणें, किंवा भयंकर महासागराच्या महाआवर्ताप्रमाणें धूमाचें विवर्तन सुरू झालें. नील ज्वालांच्या लवोल्लासरूप लीलांनीं टिम टिम असा ध्वनि करणारें, ज्यानें भस्मसमूहाच्या संभारानें लोकांतराचा सर्व अवकाश भरून टाकला आहे असें, पुनः उत्पन्न होणाऱ्या दीर्घ छमछम ध्वनींनीं उसळणारें, तें विवर्तन भयंकर होतें. वर्षावांचा सर्वत्र पसरणारा जयघोष ऐकूं आला. भ्रमण करणाऱ्या भस्माच्या अभ्राप्रमाणें, धूम्राभ्र, महाकल्पांताचा अभ्रसंभ्रम, बाष्पाभ्र, शिखरांचें उग्राभ्र यांच्या समूहाप्रमाणें दिसणारे मेघ वायूच्या वेगामुळें ब्रम्हांडाच्या भिंतीवर होणाऱ्या भयंकर भांकारशब्दांनीं अधिकच भीषण झाले. ज्यांत इंद्रादिकांच्या नगरांचे समुदाय जळून गेले आहेत; जल, अग्नि, वायु यांच्या वेगांनीं फुटणाऱ्या पाषाणांचे ज्यांत कडकड आवाज होत आहेत, त्यामुळें ऐकणाराचें श्रोत्रेंद्रिय बधिर होत आहे, असे मेघ आकाशस्तंभाप्रमाणें सतत होणारी जी भयंकर वृष्टि तिचा कल्पवन्हीशीं संयोग होऊन त्यांतून छमछम असा घनध्वनि होऊं लागला. अशी भयंकर वृष्टि व झंझावाताचें असह्य नृत्य तेथें सुरू झालें. गंगानदी हा ज्यामधील एक नुस्ता तरंग आहे, अशा नद्यांच्या समुदायानीं व आकाशालाहि भयंकर वाटणाऱ्या अभ्रांनीं सर्व सागर भरून गेले. तमालपत्राच्या पल्लवामध्यें पुष्पगुच्छाप्रमाणें दिसणाऱ्या व संतप्त होणाऱ्या सूर्यांनीं कल्पमेघसमूहांचें अधिष्ठान जणुं काय शोषून टाकलें. इकडे वाहणाऱ्या जलप्रवाहाबरोबर पर्वत, द्वीपें, नगरें, वगैरे सर्व वाहून जाऊं लागलीं. कल्पवायूच्या भयंकर क्षोभानें पर्वतांचा चुराडा झाला. भयंकर ग्रह व तारागण परस्परांवर आपटून फुटूं लागले. ते खालीं पडत असतांना परस्पर घर्षणामुळें भूमीवरील आलातचक्राहून द्विगुणित चक्रें आकाशांत उत्पन्न करूं लागले. ‘ आवह ’ नांवाच्या भयंकर वायूपासून उत्पन्न झालेल्या जलपर्वतासारख्या फार मोठ्या तरंगांच्या परस्पर संघट्टणानें पर्वत फुटूं लागले. महाप्रलयसमयीं पर्वतप्रांत इतस्ततः पसरून त्यांची पाषाणमय भूमिच बनली. ज्यांत तुषार अतिशय दाट आहेत अशा बाष्पाभ्रांनीं व काळयाकुट्ट कल्पमेघांनींहि द्वादशादित्यांचे किरण अडवून धरून सर्वत्र अंधकार पसरविला. पृथ्वीपीठ छिन्नभिन्न झालें. तिचे तुकडे तुकडे झाले. समुद्रांचे तट कोसळूं लागले. पर्वत व नगरें जमिनदोस्त झालीं आणि याप्रमाणें सर्व समुद्र उग्र बनला. लाटांपासून लाटा उत्पन्न होऊं लागल्या. त्यांच्यामुळें उंच उडणाऱ्या पाषाणांनीं मेघांना छिन्नभिन्न केलें आणि या सर्व अनर्थाला कारण होणाऱ्या प्रलयवायूंनीं दिशांचे तट फोडून टाकले. ब्रम्हांडभित्तिरूप उरोदेशावर आघात करणारा, व त्यामुळेंच कल्पमेघरूप शाखालक्षण बाहुस्फोटांनीं परस्पर संघट्टणानें एकरूप झालेला समुद्र ऊर बडवून रडतच आहे, असें भासलें. स्वर्ग, पाताल, भूलोक यांचे तुकडे तुकडे होऊन ते एकमेकांमध्यें मिळून गेले आणि ते आपआपल्या स्वभावाप्रमाणें अंतरिक्षांत उभे राहिले. जलाची

वृष्टि त्यांच्या खालीं होत होती. त्यामुळें वर असलेल्या यांना त्याचा स्पर्श झाला नाहीं. त्यांतूनहि थोडासा जलसंसर्ग होत असे. त्यालाहि वायूनें सुकविल्यामुळें ते लोकत्रयाचे तुकडे निर्जल होते. अशा त्यांनीं आकाश व्यापून सोडलें. मेलेले, अर्धमृत, अर्धदग्ध आणि ज्यांचीं अंगें पूर्णपणें जळलीं आहेत, असे देव व दानव एकमेकांला पाहून आपापलीं आयुधें परजूं लागले. तात्पर्य, सर्वांवर एकसारखीच जरी विपत्ति आली होती, तरी तशा अवस्थेंतहि वैऱ्याला पहातांच त्यांचा स्वभाव जागृत झाला. यावरून हजारों विपत्ति जरी आल्या तरी अज्ञांची वैरबुद्धि ज्ञानावांचून नाहींशी होत नाहीं. हें ठरतें. अर्थात् **अज्ञान हीच सर्व आपत्तींहून मोठी आपत्ति आहे.** अर्जुनवात या नांवाचा एक रोग आहे, त्या रोगानें रोगी आकाशांत उडून भ्रमण करितात. पण त्या रोग्याला अर्जुनवर्णत्व म्हणजे शुभ्रवर्णत्व नाहीं, म्हणून त्याचें नांव व्यर्थ होऊं नये या आशयानें लोकांतरांतील तृणसमूहानें आपल्यापासून झाले ल्या भस्मानें वायूला शुभ्र करून अर्जुनवात हें नांव साधार करण्यासच जणुं काय आरंभ केला. उडविले जाणारे जे मोठमोठे पाषाण, त्यांच्या प्रहारांनीं तट कोसळूं लागले, त्याबरोबर लोकांतरहि पडूं लागले. त्या वेळीं त्या दुष्काळामुळें भयंकर आक्रोश ऐकूं येत होता. वायूच्या संघट्टणानें पर्वतांच्या गुहांतुन भयंकर भांकार येऊं लागला. असुरांप्रमाणें वायु कर्कश आवाज करूं लागला. वायूबरोबर उडून जाणाऱ्या वनव्यूहांत वारा घुटमळत होता. मशकांचा थवा जसा अंतरिक्षांत दिसतो, त्याप्रमाणें नगरें, देश, दैत्य, अग्नि, देव, नाग, सूर्य, इत्यादिकांचे समुदाय आकाशांत धारण केले जात होते. नाश पावणाऱ्या श्रेष्ठ पर्वतांच्या विस्तीर्ण भागांनीं, भग्न देवालयांनीं व भयंकर आवाजांनीं वर वृष्टीचें जल व खालीं बाधरहित दावाग्नि यांस धारण करणाऱ्या जलपर्वतांच्या घर्षणांनीं दिक्पालांच्या नगरांचें चूर्ण करणाऱ्या देव, दैत्य सिद्ध, गंधर्व यांच्या नगरांना पाडविणाऱ्या त्या जगत्त्रयाकडे पहावेना. त्या वेळीं तें त्रिभुवन अतिशय संकटांत पडलें होतें. शांत निखारे हेंच ज्यांचें स्वरूप आहे, अशा पर्वतादिकांचा चूर झाला. वायूच्या योगानें धुळीप्रमाणें पदार्थांचा असार भाग उडून जाऊं लागला. ज्याच्या भिंती डळमळूं लागल्या आहेत, अशीं दैव-दैत्यांचीं नगरें मेघांतील जलाप्रमाणें रत्नांच्या योगानें गडगड असा आवाज करीत तो पाडवूं लागला. ज्यांतून लोक खालीं पडत आहेत अशा सप्तलोकांतील मंदिरांनीं आकाश भरून गेलें. त्यामुळें तें सागराप्रमाणें भ्रमण करणाऱ्या देवांच्या योगानें चक्राकार दिसत होतें. सोसाट्याच्या वाऱ्यानें इतस्ततः उडणाऱ्या आणि दग्ध झालेल्या किंवा अर्धदग्ध झालेल्या पदार्थांनीं, वृक्षावरून तुटून पडणाऱ्या पानांप्रमाणें चक्राकार फिरण्यास आरंभ केला. स्वर्गांतून झणझण असा आवाज करीत सुवर्ण, स्फटिक, वैदूर्य इत्यादि रत्नांचीं मंदिरें पडूं लागलीं व त्यांनीं आकाश व्यापून टाकिलें. धूमाकार व भस्माकार मेघ अंतरिक्षांतून वेगानें धावूं लागले. वृष्टिजलानें नगरांचे समुदाय कोसळून पडले. तरंगांचे ओघ उसळूं लागले. भूतल व पर्वत बुडूं लागले. मोठमोठे पर्वतहि एकमेकांवर प्रहार करण्यास तयार झाल्याप्रमाणेंच आवर्ताकार फिरून घरघर आवाज करूं लागले व झाडाच्या पानांप्रमाणें समुद्रांत तरंगत राहिले. तात्पर्य, अवशिष्ट राहिलेले अमरगण ज्यांत आक्रंदन करीत आहेत ज्यांच्यामध्यें थोडें जीवन अवशिष्ट राहिलें आहे, असे प्राणी अंतकालचीं धडपड करीत आहेत, शेंकडों धूमकेतूंचे उत्पात

भ्रमण करीत आहेत, असें जगत् दुष्प्रेक्ष्य झालें. मृत व अर्धमृत अशा प्राणिसमूहानें आकाश भरून गेलें. ते प्राणिसमूह वायूमुळें चंचल झाले होते, त्यामुळें जीर्णपर्णासारखे दिसत होते. पडणाऱ्या पर्वतशिखरांप्रमाणें ज्यांत स्थूल धारांचा ओघ वेगानें खालीं पडत आहे, असें सर्व जगत् झालें. त्यांत शेंकडों नद्या तुडुंब भरून वाहूं लागल्या. त्याबरोबर पर्वत, नगरें व वृक्षहि वहात होते. त्या पुष्करावर्त मेघांनीं अशी भयंकर वृष्टि सुरू केली असतां, झमझम असा शब्द करीत शत शाखांनीं पसरलेला अग्नि शांत झाला. अतिशय वृद्धि पावलेल्या चंचल सागराच्या वेगानें पर्वतांचे तट डोलूं लागले. तत्त्वज्ञानानें प्रदीप्त झालेलें जें चिदाकाश त्यांत ज्ञानाग्नीनें एका क्षणांतच दग्ध होणाऱ्या या जगाचा प्रलयकालीं फार उशीरानें नाश होणें यांत आश्चर्य कांहींच नाहीं. वृष्टीमुळें शांत होणाऱ्या अग्नीच्या भस्माचा सुगंध चहूंकडे पसरला. त्यामुळें येथें पूर्वी चराचर जगत् होतें, पण आतां तें नाहीं, असें त्या सुगंधावरून देव म्हणूं लागले. त्यांत निरर्गल नाद उत्पन्न होत होता. सृष्टीचा लोप झाल्यामुळें हळुहळू शांति पसरत होती, सृष्टीचा लोप झाल्यामुळेंच वस्तुतः उत्पत्ति-विनाशरहित असा परत्मात्मा प्रकट झाला. किंवा तो परमात्मा सर्वदाच विपर्यास करणाऱ्या वायूनें संपन्न व बीजाच्या राशीप्रमाणें सतत पुनः पुनः भरला जाणारा आहे. म्हणजे तो नेहमींच सृष्टि, उत्पत्ति व नाश यांनीं युक्त आहे. कोटिंतें एकमेकांवर घर्षण पावून अग्नीचें चूर्ण याच सुवर्णरजांनीं आकाश सर्वतः व्यापल्यामुळें आकाशाचा अवकाश सुवर्णाच्या फरशीनें युक्त असल्यासारखा दिसला. ज्यांमध्यें दुसरीं पातालमंडलें आहेत अशा, द्वीपें व सागर यांसह गळून पडलेल्या भूमंडलाच्या मोठमोठ्या तुकड्यांनीं सुतल नांवाचें सातवें पाताळ भरून गेलें. पृथ्वीवरील पर्वतशिखरांपासून सुतल नांवाच्या सातव्या पातालापर्यंत व आकाशाच्या अन्तापर्यंत एक समुद्ररूप झालेल्या सर्व भागाला प्रलयवायूंनीं भरून सोडलें. मूर्खाच्या अन्तःकरणांत कोप जसा एकदम भरतो, त्याप्रमाणें वेगानें वाहणाऱ्या शेंकडों नद्यांच्या योगानें तो एकार्णव जलकल्लोलांनीं हळूहळू वाढूं लागला. त्या प्रलयमेघांनीं प्रथम मुसळाएवढ्या धारांनीं, त्यानंतर खांबासारख्या धारांनीं, पुढें तालवृक्षासारख्या धारांनीं, त्याच्याहि नंतर जोरानें वाहणाऱ्या नदीच्या प्रवाहाप्रमाणें भयंकर ओघांनीं व शेवटीं सप्तद्वीपयुक्त समग्र भूपीठाएवढ्या मेघांतून एक-धारारूपानें होणाऱ्या वृष्टीनें त्रिभुवनाला जाळणारा अग्नि शांत झाला. शास्त्र व सज्जन यांच्या संगतीनें सर्व आपत्तींचें मूळ कारण असें जें अज्ञान तें जसें शांत होतें, त्याप्रमाणें पूर्वोक्त अग्नि शांत झाला. दुष्ट बालकाच्या लीलांनीं चंचल झालेलें बिल्वफल जसें नाश पावतें, म्हणजे तो त्याला आपटून आपटून फोडून टाकतो, त्याप्रमाणें त्या ब्रह्मांडाचा त्या वेळीं विनाश झाला. त्यांतील सर्व पदार्थ मोठ्या वेगानें खालून वर व वरून खालीं असे परिवर्तन पावत होते व पर्वतांची धूळ होऊन आवाज करीत ते त्या प्रलयसागरांत बुडत होते. अशा रीतीनें त्याचा विनाश झाला. ७७.

---

## सर्ग ७८ वा.

—:०:—

१. नदीप्रवाहासारख्या जलवृष्टीनें आकाशाला भरून सोडणारा एकसागर कसा वृद्धि पावला त्याचें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—कलियुगांत राजा जसा वृद्धि पावतो, त्याप्रमाणें वायु, वृष्टि, हिम व उत्पात

यांच्या योगानें भूतल भग्न झालें असतां जलाचा वेग अतिशय वृद्धि पावला. आकाशगंगेच्या प्रवाहांत पडलेल्या त्या मेघांच्या धारापातांनीं अतिशय वाढलेला व हजारों नद्यांच्या समूहानें मर्यादेच्या बाहेर गेलेला तो एकार्णव—एक-समुद्र फारच भयंकर दिसूं लागला. एकाएकीं उठलेल्या मेरु-मंदरासारख्या त्याच्या प्रचंड तरंगांच्या योगानें त्याच्या बरोबर वहात जाणारे पर्वत व दऱ्या आदित्याच्या मार्गास प्राप्त झाल्या. त्या एकार्णवाचे आवर्त एकसारखे गरगर फिरत होते. त्यांबरोबर पर्वत-रूपी जीर्ण तृणहि फिरत होतें. त्याच्या उंच उंच उठणाऱ्या तरंगांच्या अग्रांनीं आदित्य-मंडलाला ग्रासून सोडलें. मेरु, मंदर, कैलास, विंध्य, सह्य हे पर्वत हेच त्यांतील जलचर प्राणी होत. (त्या एकार्णवाचें कमलाकराच्या रूपानें वर्णन—) पृथ्वीची माती गळून चिखल झाला. त्यांत लपून राहिलेले शेषादि सर्प हेच त्या एकार्णवरूप कमलाकराचे कमलनाल होत. त्यांतील अर्ध्या जळलेल्या वृक्षांच्या वनांचा समूह हेंच दाट शेवाळ होय. त्रैलोक्याचें भस्म भिजून त्याचाच त्यांत चिखल होता. त्या एकार्णवरूप कमलाकरांतील बारा आदित्य हींच कमलें असून नालांवरील आकाशरूप मोठ्या कार्णिकेंत जे त्यांचे किरण पसरले होते तींच कमलबीजें होत. मोठमोठे मेघ हींच एकार्णवाच्या जलांत झालेलीं नलिनीदलें होत. त्या समुद्रांत फेंसाचे पर्वत असून त्याच्या आसपास मेघ गर्जना करीत होते. इंद्र, वायु, सूर्य, चंद्र यांचीं नगरें व पुरें त्या एकार्णवांत वहात असून त्यांनीं तो भरून गेला होता. उग्र देव व असुर यांचे समूह त्या समुद्रांत काष्ठांप्रमाणें वहात होते. तो एकार्णव हळु-हळू पण क्रमानें वृद्धि पावून सूर्यमंडलाला स्पर्श करूं लागला. त्या वेळीं मेघ मोठी गर्जना करून धारास्राव करीत होते. त्यामुळें त्या समुद्रांत जे बुडबुडे उठत होते त्यांकडे पाहून हे मोठमोठे पर्वत वहात आहेत कीं काय, अशी आशंका येत असे. भ्रमण करणाऱ्या बुडबुड्यांवर टेंकलेले व स्वत: भ्रमण करणारे कल्पान्तमेघ मुखावांचून नेत्रांच्या नुसत्या कनी-निकाच वर करून जणुं काय दुसऱ्या मेघांस पहात होते. मोठ्या वेगानें वाहणाऱ्या जलौघाच्या घोषानें त्या एकार्णवानें आकाशाला दुमदुमून सोडलें होतें. त्याच्या एका प्रवाहांत आकाशा-सह कुलपर्वत बुडून गेले होते. त्या वेळीं झंझावात बेसुमार वाहूं लागला. त्यामुळें पाण्याचा अपूर्व ओघ व कुलपर्वत यांपासून फार मोठा घुरघुर असा ध्वनि होऊं लागला. त्यामुळें वायूचा भयं-कर वेगहि घर्घर असा आवाज करूं लागला. ब्रह्मांडाच्या तुकड्यांवर आपटून जोरानें परत फिरल्यामुळें पाण्याचा वेग अत्यंत असह्य झाला, व तो हजारों योजनें इतस्तत: व वर पसरला. जलाच्या प्रवाहाबरोबर गवत जसें वहात असतें त्याप्रमाणें वाहणाऱ्या व झोंपाळ्यांप्रमाणें झोके घेणाऱ्या पर्वतांचा सूर्यमंडळावर आघात होऊन त्याच्या दगडांच्या कठोर प्रहारांनीं तीं मंडळें फुटत होतीं. अर्थात् तो एकार्णव तरंगणाऱ्या पर्वतांच्या पाषाणांनीं सूर्यमंडलाला फोडित होता. जलसंघाताच्या शून्य ब्रम्हांडरूप विपुल घरट्यांत बसलेल्या काळ्या पर्वतरूप डोम-कावळ्यांस तो एकार्णव जणुंकाय बांधून घेऊनच जात होता. ते पर्वतरूप काक मेलेल्या व न मेलेल्या महद्भूतांच्या उन्मज्जन-निम-ज्जनांनीं आकुल झाले आणि त्यामुळें ते तरंग मकर, भोंवरें यांच्या प्रतिबिंबांनीं जणुं काय युक्त आहेत असे दिसले. असो; तो एकार्णव मरून राहिलेल्या व आपापल्या नगरांतून भ्रंश पावलेल्या देवांना फेंसाच्या पर्वताच्या तटांवर व शिखरांवर मशकांप्रमाणें धारण

करीत होता. कारण ते बिचारे देव जलाच्या वेगामुळें अतिशय श्रांत झाले होते. त्या एकाकार समुद्रावर त्या वेळीं सहस्रावधि बुडबुडे उठले होते ते त्यांच्या आंत सांपडलेल्या जीवांना आम्हांला आज हें प्रसिद्ध आकाश जसें दिसतें तसे दिसत होते व त्यांच्या बाहेर असलेल्या जीवांना इंद्राच्या नेत्रांप्रमाणें ते दिसत होते. अर्थात् त्या वेळीं तो सागर, सहस्रनयन इंद्र जसा आपल्या अंगावर नेत्र धारण करतो, त्याप्रमाणें सहस्रावधि बुडबुडे धारण करीत होता. शरत्कालच्या आकाशाप्रमाणें विस्तीर्ण व चंचल बुद्बुदरूप नेत्रांनीं तो एकार्णव जणुं काय नदीच्या प्रवाहाएवढ्या ज्यांच्या धारा आहेत अशा ताम्रवर्ण मेघांनाच पहात होता. पंखांनीं युक्त असलेल्या पर्वतासारख्या वर उठलेल्या असंख्य तरंगसमूहांनीं तो सागर पुष्करावर्त मेघांना जणुंकाय आलिंगनच देत होता. त्रिभुवनाला गिळून टाकल्यामुळें अतिशय तृप्त झालेला तो आपल्या घर्घरीनें जणुंकाय मोठ्यानें गातच होता. गातांना तो आपल्या हातांनीं अभिनय करीत असून पर्वत हींच त्यांतील कंकणें होतीं. ज्यांत पृथ्वीचा कोठें मागमूसहि लागत नव्हता, असा तो एकार्णव नदीच्या प्रवाहाएवढ्या ज्याच्या धारा आहेत अशा मेघांकडून वरून आच्छादित केला गेला. त्याचा मध्यभाग जळलेल्या पर्वतांनीं व्यापला व खालून चिखलांतील पृथ्वीधर नागांनीं व्याप्त झाला. आकाशगंगेप्रमाणें सतत कोसळणाऱ्या जलपूरांच्या वेगानें विपुल पर्वतांचीं शिखरें, फेंस व बुडबुडे पुनः पुनः बुडून पुनः पुनः वर येत होते. नाश पावणाऱ्या स्वर्गाच्या तुकड्यावरील आक्रोश करणारे देवादि आकाशचर हेच त्या एकार्णवाच्या प्रवाहाबरोबर वहात जाणारे हंस असून त्यांतून वाहणारे विद्याधरींचे समूह हींच कमलें होत. त्या कमलांमुळें तो सागर अतिशय सुशोभित झाला होता. त्याचा मध्यभाग फार सुंदर दिसत होता. याप्रमाणें मोठा घर्घर ध्वनि करून वेगानें वाहणाऱ्या त्या एकार्णवाच्या पुरांनीं त्रैलोक्याचा संहार होऊं लागला व एखाद्या लांकडाप्रमाणें तें त्याबरोबर वाहून जाऊं लागलें. त्या वेळीं त्याचें रक्षण करणारा कोणी नव्हता. किंवा अरेरे! त्या समुद्राच्या तरंगाधीन न झालेला असाहि कोणी एखादा जीव नव्हता. अहो, कालानें ज्याला ग्रासलें आहे त्याचें रक्षण करण्यास कोण समर्थ होणार? त्या वेळीं आकाश नव्हतें, दिगंत नव्हता, अधोलोकहि नव्हता व ऊर्ध्वलोकहि नव्हता. एखादें भूतहि नव्हतें व सृष्टि नव्हती. तर केवल एक जलच जिकडे तिकडे होतें. ७८.

---

## सर्ग ७९ वा.

—:०:—

१ देवर्षिगणांसह ब्रम्हदेवाचें निर्वाण, २ जागें होतांच स्वप्नाचा जसा बाध होतो, तसा त्या ब्रम्हांडाचा बाध व ३ त्याचें समर्थन.

**श्रीवसिष्ठः**—रामा! याप्रमाणें तपोलोकापर्यंत सर्व लोक एकार्णवाच्या जलानें भरून गेले असतां त्यानंतर सत्यलोकाजवळच्या आकाशांत स्थित असलेल्या मीं ज्यांत प्रकाशाचें बाहुल्य आहे अशा ब्रह्मलोकाकडे पाहिलें. प्रभातसमयीं सूर्याची प्रभा जशी दिसते, तसा तो लोक तेजःपुंज दिसत होता. मी त्याकडे जों पहात आहें तों प्रधान परिवारासह पितामह समाधि

---

१ प्राणादिकांची उपासना करून सालोक्यादि मुक्तीला प्राप्त झालेला व ब्रम्हदेवासह विदेहकैवल्यांत प्रवेश करण्याची इच्छा करणारा जीवन्मुक्तांचा परिवार. कारण 'ब्रम्हणा सह ते सर्वे संप्राप्ते प्रतिसचरे। परस्यान्ते कृतात्मानः प्रविशन्ति परं पदं' असें पुराणवचन आहे.

लावून बसला होता. तो त्या वेळीं पाषाणाच्या पुतळ्याप्रमाणें दिसत होता. इंद्रादि आधि-कारिक देवांचा व तशाच आत्मज्ञ शुक्रादि मुनींचा समूहहि मीं तशाच समाधींत असलेला पाहिला. शुक्र, बृहस्पति, इंद्र, कुबेर, यम, चंद्र, वरुण, अग्नि, तसेच दुसरेहि देवर्षि, देव, गंधर्व, सिद्ध व साध्य यांचें नियमन करणारे स्वामी इत्यादि सर्व चित्राप्रमाणें ध्यानपरायण झालेले दिसले. त्यांनीं पद्मासन घातलें होतें व ते निर्जीव असल्यासारखे दिसत होते. त्यानंतर ते बारा आदित्यहि तेथेंच आले व इतर देवर्षींप्रमाणें तेहि पद्मासन घालून लागलेच तसेच ध्यान-परायण झाले. पुढें ब्रम्हदेवाच्या द्विपरार्धआयुः-प्रमाणाच्या अगदीं शेवटच्या क्षणांत त्याच्या चरमसाक्षात्काररूप-आत्मज्ञानानें प्रदीप्त झाले-ल्या ब्रह्मचैतन्यानें अविद्येनें कल्पिलेल्या त्याच्या त्या देहासह त्याच्या सर्व प्रपंचाचा बाध केला. तेव्हां जागा झालेला पुरुष आपल्या पुढें दिसलेलेंहि स्वप्नांतील वस्तुजात बाधित झालेलें जसें पाहतो, त्याप्रमाणें मीं ब्रम्हदेवाच्या सर्व कल्पित देहादिकांचा बाध होऊन केवल आत्मा अवशिष्ट राहिला आहे असें पाहिलें. तेंच त्या ब्रम्हदेवाचें विदेह कैवल्य होय. तत्त्वज्ञ पुरुषांची ज्ञानानें बाधित झालेली पूर्व वासना जशी दिसत नाहीं किंवा जागा झालेला पुरुष समोर दिसलेलेंहि स्वप्ननगर जसें पहात नाहीं. त्याप्रमाणें मीं ब्रम्हलोकांतील इतर लोकहि ह्म० पूर्वोक्त जीवन्मुक्तहि आत्म-मात्र अवशिष्ट राहिलेले पाहिले. ते ब्रम्हलोकां-तील लोक आहेत, असें मला दिसलें नाहीं. ब्रह्मदेवाच्या संकल्पानें सिद्ध झालेलें तें ब्रह्मांड त्याच्या चरमसाक्षात्काराच्या वेळीं तत्काल शून्य अरण्याप्रमाणें झालें. ह्म० तें गृह जन व त्याचे व्यवहार यांनीं रहित झालें. एखादा घोर आकस्मिक उत्पात झाला असतां पृथ्वी-वरील नगर जसें उध्वस्त होतें, त्याचा विध्वंस होतो तसा त्या ब्रम्हांडाचा विध्वंस झाला. त्या वेळीं ऋषि, मुनि, देव, विद्याधर इत्यादि सर्व तसेच ह्म० शून्यच बनले. त्यांच्यापैकीं कोणी एखादाहि कोठें दिसला नाहीं व त्यांतील कोणी कोठें गेलाहि नाहीं. म्हणून मी आकाशांत उभा राहून सूक्ष्म दृष्टीनें विचार-पूर्वक पाहूं लागलों. तों ते सर्वहि ब्रह्मदेवा-प्रमाणें निर्वाणास प्राप्त झाले आहेत असें माझ्या लक्षांत आलें. ह्म० नामरूपांनीं ते जरी शून्यभावास प्राप्त झाले असले, तरी स्वरूपानें निर्वाण-आत्मरूप होऊन राहिले आहेत असें मला स्वानुभवानें कळलें. त्यांची वासना विलय पावली असतां त्यांचें कल्पित रूप गेलें व ते जागे झाल्याप्रमाणें आपल्या वास्तव नित्य-सिद्ध स्वरूपास प्राप्त झाले. खरोखर हा देह आकाशस्वरूपच आहे. तो वासनेमुळें स्पष्ट भासतो. जागें झाल्यावर स्वप्न जसें दिसत नाहीं त्याप्रमाणें वासनेच्या अभावीं देहहि भासत नाहीं. स्वप्नामध्यें देह अंतरिक्षामध्यें गेला आहे असें आपण पाहतों, पण जागें होतांच ती वासना शांत होते व त्यांतील कांहीं दिसत नाहीं. ( स्वप्नांतून जागृतींत आलें असतां स्वप्नांतील आधिभौतिकाचाच तेवढा बाध होतो, पण तत्त्वबोध झाला असतां आधि-भौतिक, आतिवाहिक, व कारण-वासनामात्र अशा तिन्ही देहांचा बाध होतो, असा स्वप्नां-तून जागें होणें व तत्त्वज्ञान होणें यांमध्यें फरक आहे, असें सांगतात—) वरील दृष्टांता-प्रमाणेंच जागृतींतहि[१] वासनेचा क्षय झाला असतां आतिवाहिक देह दिसत नाहीं किंवा

१ वासनाक्षयाला कारण होणारा तत्त्वबोध प्रमाणजन्य असल्यामुळें तो जागृतींत संभवतो. म्हणून ' जागृतींतहि ' असें येथें म्हटलें आहे.

आधिभौतिक देहाचा प्रत्यय येत नाहीं. अर्थात् स्वप्नाच्या मिथ्यात्वाचा अनुभव जगन्मिथ्यात्वाचा एकदेशच आहे, म्हणजे तो केवल एकांशमात्र आहे. तथापि तो आबालवृद्धांच्या परिचयाचा आहे, म्हणून त्याचाच नेहमीं दृष्टान्त दिला जातो. जगन्मिथ्यात्वाविषयीं श्रुतिप्रमाण आहे व स्मृतिप्रमाणहि आहे. स्वप्नादि न्यायानें त्याचा अनुभवहि येतो. पण असें असूनहि जो शठ आबालवृद्धांच्या व स्वतःच्याहि अनुभवानें सिद्ध झालेल्या गोष्टीचा निषेध करितो म्हणजे अनुभवसिद्ध गोष्टहि कबूल करीत नाहीं, स्वप्नादि सर्व दृश्य सत्य आहे असें म्हणतो, म्हणजे असा आग्रह धरितो, त्याचा त्याग करावा. त्याला बोध करूं नये. अहो, ज्यानें झोपेचें सोंगच घेतलेलें असतें त्याला कोण जागें करणार? ' अहो पण, असें जरी असलें तरी जागृतीला स्वप्नाचा दृष्टांत देणें उचित नाहीं. कारण हा जागृतींतील देह पिता, माता यांच्या देहापासून झालेला असतो. पण स्वप्नांतील देह तसा नसतो. त्यामुळें स्वप्नदेह अत्यंत असत् आहे. जाग्रद्देह तसा नाहीं; ' म्हणून ह्मणाल तर यज्ञादिकांच्या योगानें स्वर्गीं उत्पन्न होणारा पुरुषाचा देहहि अत्यंत असत् आहे असें म्हणण्याचा प्रसंग येईल. कारण स्वर्गस्थ देहहि दुसऱ्या देहापासून होत नाहीं. अर्थात् देहरहित अशा त्या स्वर्गस्थांना परलोक व त्यांतील सुखोपभोगहि नाहींत, असें ह्मणावें लागेल. शिवाय दुसरें असें कीं, देहापासून न होणारा देह असत् आहे असें मानल्यास आतिवाहिक देहांची समष्टि हेंच ज्याचें स्वरूप आहे अशा हिरण्यगर्भालाहि अत्यंत असत्त्व आहे, असें ह्मणावें लागेल. आणि तसें झालें असतां सृष्टि, स्थिति इत्यादि अर्थक्रियाहि मिथ्याच ठरेल. कारण तूं म्हणतोस त्याप्रमाणें शरीरापासून न झालेलें शरीर खोटें मानल्यास पूर्व सृष्टीचा प्रलय झाला तेव्हां सर्व शरीरांचा क्षय झालेला असल्यामुळें या सृष्टीच्या आरंभीं शरीराला कारण होणाऱ्या दुसऱ्या शरीराचा अभाव असल्यामुळें ही सृष्टि तरी कशी होणार? पण ती तर प्रत्यक्ष दिसते. प्रत्येक पूर्व पूर्व सृष्टीविषयींहि असेंच होणार! बरें, यावर मीमांसकांच्या मताप्रमाणें तूं म्हणशील कीं, " प्रलय केव्हांच होत नाहीं. या अनादि संसारांत सर्व देह देहापासूनच होतात. त्यांचा प्रवाह अविच्छिन्न चालू आहे आणि त्यांत पूर्व देहापासून झालेले उत्तर देह व्यवहार करण्यास समर्थ होतात. हिरण्यगर्भाच्या देहाची पूर्व पूर्व नारायणादिकांच्या देहांपासून उत्पत्ति होते. त्यामुळें हें जगत् सर्वदा असेंच आहे. त्याचा प्रलय होतच नाहीं." तर हें मत बरोबर नाहीं. कारण पृथिव्यादि भूतें सावयव आहेत. त्यामुळें व संयोगाचें पर्यवसान वियोगांत होत असल्यामुळें त्याच्या विनाशाचें निवारण करितां येणें शक्य नाहीं. यास्तव ' जगत् नेहमीं असेंच आहे, तें केव्हांही याहून भिन्न प्रकारचें नाहीं. ' हें जैमिनीय मत अप्रतिष्ठित आहे. भूम्यादि भूतांचा नाश झाला असतां जरायुजादि चतुर्विध भूतसमुदायांचा आधारच नाहींसा होतो. आधाराच्या अभावीं त्यांचें अवस्थान— त्यांची स्थितिच संभवत नाहीं. नारायणाचा देहहि सावयव असल्यामुळें त्याच्या विनाशाचें निवारण करितां येत नाहीं. ' नारायण जलामध्यें शयन करितो अशी त्याची प्रसिद्धि आहे. त्यामुळें त्याला जन्म—नाश नाहींत, ' असें ह्मटल्यास त्याच्या देहाचें दुसरा देह कारण आहे असें ह्मणतां येत नाहीं. त्यामुळें नारायणाचा देहहि तुझ्या मतानें असत् ठरतो. ( आतां प्रसंगानें चार्वाकमताचें निरसन करण्यासाठींहि त्याचा अनुवाद

१. ऐतरेयभाष्यार्थ अ. ४ ख. १ पृ. ५० पहा.

करितात.) पृथिव्यादि भूतचतुष्टयच चतुर्विध देहाकारानें व घटपटादिकांच्या आकारानें एकत्र संघटित झालें असतां जगत् बनतें. त्याचा पृथिव्यादि भूताकारानें कधींच नाश होत नाहीं. चार भूतांपासून झालेल्या देहांत ज्ञान, इच्छा, इत्यादि गुण उत्पन्न होतात. त्याचे विशिष्ट हातपाय इत्यादि अवयवांवरूनच त्याची जाति वगैरे अभिव्यक्त होते. ज्ञानादि हे सर्व त्याचे धर्म आहेत. आतां पृथ्वी, आप्, इत्यादि एकेका भूतामध्यें ज्ञान–चैतन्य दिसत नाहीं, हें खरें; सुरेचा आरंभ करणाऱ्या–पीठ, जल, क्षार, किण्व–मदद्रव्यें इत्यादिकांचा एकत्र संयोग झाला असतां काल–परिपाक इत्यादि कारणानें त्यांत मदशक्ति जशी उत्पन्न होते, त्याप्रमाणें देहाकारानें परिणत झालेल्या चार भूतांमध्यें ज्ञान–चैतन्य हा गुण उत्पन्न होतो. त्यामुळें ज्ञान हा ज्याचा गुण आहे असा देहच आत्मा आहे, असें जर हे चार्वाका! तूं म्हणशील, तर 'सर्व वस्तूंचा क्षय होतो; नित्य, नैमित्तिक, प्राकृत व वैज्ञानिक असा चार प्रकारचा प्रलय आहे,' असें प्रतिपादन करणारीं पुराणें, भारतादि इतिहास, आत्म्याचें पारलौकिक हित व अहित, धर्म–अधर्म, इत्यादि सांगणाऱ्या मन्वादि स्मृति व सदाचार हें सर्व वेदांसह व्यर्थ होणार! ( अहो पण वेदादिकांचें अप्रामाण्य चार्वाकाला इष्टच आहे, म्हणून म्हणाल तर–) रागद्वेषादि दोषशून्य व केवल परानुग्रहार्थ प्रवृत्त झालेल्या वेदादिकांचें प्रलय, धर्म, अधर्म, आत्मतत्त्व इत्यादि प्रतिपाद्य विषयांत अप्रामाण्य मानल्यास भोगांविषयीं लंपट असणें, लोभ, द्वेष इत्यादि हजारों दोषांनीं दूषित झालेल्या तुझ्या वाक्याला तरी प्रमाण कसें मानावें? कारण वेदादिकांचें वाक्य जर अप्रमाण तर तुझें वाक्य 'वंध्येला शंभर पुत्र झाले' या वाक्याच्या तोडीचेंच आहे, यांत शंका नाहीं. शिवाय वेदादिकांचें प्रामाण्य कोणाहि विचारी मनुष्याला कधींच अप्रमाण वाटत नाहीं. कारण त्यांना अप्रमाण मानल्यास कृत–हानि, अकृत–अभ्यागमादि दोष व बीजावांचून आणि फलावांचून सृष्टिस्थिति वगैरे होणें यांचा असंभव, यामुळें जगाचा उच्छेद होण्याचाच प्रसंग येणार! शिवाय 'देहच आत्मा' या वादांत–सर्वच अवयव हा आत्मा आहे, कीं त्यांचा समुदाय अवयवी हा आत्मा आहे? सर्वच अवयव चेतन असून तोच आत्मा आहे, असें म्हटल्यास त्या अनेक चेतनांचें सर्वदाच ऐकमत्य होण्याचा संभव नसल्यामुळें त्यांचें वैमत्य झाल्यास देहाचाच उच्छेद होण्याचा प्रसंग येणार! बरें, सर्व अवयवांचा समुदाय जो अवयवी तो चेतन असून तोच आत्मा असें म्हटल्यास त्या अनेक अवयवांतील एखादा हातपाय वगैरे अवयव तुटल्यास अवयवीचा नाश होऊन जीवाचाच अभाव होण्याचा प्रसंग येतो. असेच आणखी हजारों दोष येतात, म्हणून तें आतां राहूं दे. चार्वाका, या पूर्वोक्त दूषणानेंच मद्यद्रव्य, पीठ, जल इत्यादिकांचा संयोग झाला असतां मदिरेंत मदशक्ति उत्पन्न होते, त्याप्रमाणें शरीराकार परिणाम पावलेल्या भूतसंघातांत ज्ञान हा गुण उत्पन्न होतो, असें जें तूं ह्मटलें आहेस त्यांचेंहि उत्तर दिल्यासारखेंच आहे. ज्ञान हा गुण मदशक्तीप्रमाणें संघातापासून उत्पन्न होणारा आहे, असें मानल्यास त्या गुणाचा आधार ह्म० गुणी असा जो देह त्याचा नाश झाला असतां गुणाचाहि अवश्य नाश होणेंच योग्य असल्यामुळें दुसऱ्या देशांत मेलेल्या जीवांनीं पिशाचादि दुसऱ्या शरीरानें स्वदेशांत गमन करणें, दुसऱ्याच्या शरीरांत शिरून स्वजनांच्या ओळखीच्या कांहीं खुणा सांगणें, संभाषण करणें इत्यादि गोष्टींचा जो अनुभव येतो तो खरा ठरत नाहीं. आतां तूं

कदाचित् म्हणशील कीं, पिशाचादिकांची ही वृथा भ्रांति आहे. कारण पिशाचें प्रत्यक्ष नसतात व चार्वाकाच्या मतीं प्रत्यक्षातिरिक्त प्रमाण नाहीं. जेथें जेथें पार्थिवत्व असतें तेथें तेथें लोहलेख्यत्वहि असतें, म्हणजे पृथ्वीपासून झालेल्या पार्थिव पदार्थांवर लोखंडानें ओरखडे काढतां येतात, असें हजारों ठिकाणीं जरी आपण पहातों तरी वज्रमण्यासारख्या पार्थिव पदार्थांवर कशाचाहि परिणाम होत नाहीं, म्हणजे वरील व्याप्तीचा भंग होतो. त्याचप्रमाणें उत्पातादि कालीं गायींना गाढव होतें, देवतादि प्रतिमांतून अग्नि नसतांनाहि धूमादि निघतो. त्यामुळें कोणत्याहि अनुमानाला अत्यंत अवश्य असलेल्या लिंगाचा भिन्न प्रदेशीं भिन्न कालीं व्यभिचार होण्याची शंका येते व तिचें निवारणहि करितां येत नाहीं. यास्तव अनुमानाला प्रामाण्य संभवत नाहीं. उपमानप्रमाणाविषयींहि असेंच म्हणतां येतें. 'गायीसारखा गवय आहे' हें उपमान प्रमाणाचें[१] उदाहरण आहे. पण गवयाचें गोसादृश्य पूर्णपणें आहे कीं एकदेशीय आहे, इत्यादि विकल्प केले असतां त्याचेंहि प्रामाण्य टिकत नाहीं. ज्या शब्दाला दुसऱ्या प्रमाणांचा आधार नाहीं, त्याचा अर्थबोध नियमानें होतोच असें म्हणतां येत नाहीं व ज्यांचा अर्थबोध होतो ते शब्द अनुवादरूप असतात. त्यामुळें शब्द हेंहि स्वतंत्र प्रमाण ठरत नाहीं. व्यतिरेकव्याप्तीवर उपजीविका करणाऱ्या अर्थापत्ति व अनुपलब्धि या प्रमाणांनाहि स्वतंत्र प्रामाण्य नाहीं. कारण अगोदर अनुमानप्रमाणाची जेव्हां सिद्धि होईल तेव्हांच त्यांची सिद्धि होणार! पण अव्यभिचारिणी व्याप्तिच संभवत नसल्यामुळें अनुमानच जर सिद्ध होत नाहीं, तर अर्थापत्ति व अनुपलब्धि यांची सिद्धि कोठून होणार? संभव व ऐतिह्य यांना केवल संभावनामात्रत्व आहे. पण अनुमानादिकांमध्यें केवल संभावनेनेंच प्रामाण्याची कल्पना करून लोकांची प्रवृत्ति होत असते. फल जरी संदिग्ध, अनिश्चित असलें, तरी त्याविषयीं आतुर झालेल्या लोकांची नियमानें प्रवृत्ति होते. त्यामुळें अर्थनिश्चय–म्हणजे फलाविषयीं निश्चय हें प्रवृत्तीचें अंगच नव्हे. पण अर्थात् वृथाफलाशेनेंहि सर्व व्यवहार उपपन्न होतो. त्याचप्रमाणें पिशाचग्रस्ताचा पिशाचाप्रमाणें होणारा वाग्व्यवहारहि सन्निपात वायु झालेल्या रोग्याला जशी भ्रांति होते तशाच भ्रांतीनें होतो. मला भूत लागलें आहे, या भ्रमानें तो संभवतो. कारण देह असेपर्यंतच तसा व्यवहार होतो, मेल्यावर होत नाहीं; वगैरे म्हणशील, तर हे चार्वाका! तुझें हें सर्व म्हणणें व्यर्थ आहे. कारण तुझ्या शब्दांनींच तें मिथ्या ठरत आहे. कारण प्रत्यक्षावांचून बाकी सर्व प्रमाणें अप्रमाण आहेत असें म्हटल्यास चार्वाकाचें वरील म्हणणेंहि प्रमाण ठरत नाहीं. कारण तें त्याचें भाषणहि प्रत्यक्षाहून भिन्न आहे. कारण अनुमानादिकांना अप्रमाण म्हटल्यावर तुलाहि आपला सिद्धांत युक्तीनें सिद्ध करितां येणार नाहीं. कारण युक्ति हें अनुमानच आहे. अर्थात् तूं आपला विवक्षित अर्थ युक्तींनीं सिद्ध करूं लागलास कीं, अनुमानप्रमाण स्वीकारलेंस असेंच सिद्ध होणार. त्याचप्रमाणें तुला दृष्टान्तहि देतां येणार नाहीं. सादृश्य उपमानप्रमाणानेंच ज्ञात होतें. अर्थात् उपमानाला अप्रमाण मानल्यास दृष्टान्ताची सिद्धि होत नाहीं. तसेंच आपल्या पक्षीं अनुकूल व परपक्षीं प्रतिकूल असा तर्कहि तुला करितां येणार नाहीं. कारण तर्क अन्वयव्यतिरेकव्याप्तीनेंच युक्त असतो. त्यामुळें व्याप्तिच असिद्ध मानणाऱ्या

१ तर्कसंग्रहसार, पृ. ६५ पहा.

तुझा तर्कहि संभवत नाहीं. आपत्ति व व्यतिरेक हीं अनुपपत्ति व अनुपलब्धि यांच्या अधीन असल्यामुळें त्यांचा स्वीकार केल्यास अर्थापत्ति व अनुपलब्धि यांच्या प्रामाण्याचाच स्वीकार केल्याप्रमाणें होत असल्यामुळें सहाहि प्रमाणें तुह्मां चार्वाकांनाहि संमत आहेत, असेंच म्हणावें लागतें. आणि तीं प्रमाणें तुलाहि संमत आहेत असें म्हटलें कीं, मग निर्दोष शब्दरूप श्रुतीलाहि अवश्य प्रमाण मानावें लागतें. तेव्हां श्रुतीवरून होणारें परलोक, स्वर्ग, नरक इत्यादिकांचें ज्ञान खरें कां नव्हे? ज्ञानाला स्वतःप्रामाण्य आहे. तें करणदोष व बाधक ज्ञान यांच्या योगानें क्वचित् बाधित होतें; पण येथें तसा करणदोष किंवा परलोक, स्वर्ग-नरकादि नाहींत, असें बाधक प्रमाणजन्य ज्ञान नाहीं. तसेंच पिशाचग्रस्ताला पिशाचाविषयीं होणारें ज्ञान दुसऱ्याच्या देहांत असलेल्या पिशाचाला त्याच्या अनुभवानें सिद्ध असलेलें दर्शनश्रवणादि ज्ञान आणि आमच्यासारख्या द्रष्ट्यांचें परदेहानें पिशाचव्यवहाराचें ज्ञान हें सर्व यथार्थज्ञान आहे. कारण सर्व ज्ञानांना स्वतःप्रमाण्य आहे. कारण त्यांना जर सत्य न मानलें तर मद्यानें मत्त झालेल्या मनुष्याला मदिरादि मदशक्तियुक्त द्रव्याची मदशक्तिप्रतिभा जी होते तीहि खरी नव्हे असें मानावें लागेल. जो मत्त झालेला नाहीं, अशा पुरुषाच्या अनुभवानें सिद्ध असलेल्या अर्थाचा अपलाप करणाऱ्या तुला प्रमत्ताच्या प्रतीतीनें सिद्ध असलेल्या मदशक्तीचा अपलाप करितां येणार नाहीं. कारण एकाच्या अनुभवानें सिद्ध असलेली गोष्ट दुसऱ्याला कशी नाकारतां येईल? अर्थात् तुझ्या दृष्टांताचीच असिद्धि होते. त्यामुळें मदशक्तीप्रमाणें ज्ञान हा भूतांचा गुण आहे, हें सिद्ध होत नाहीं. तेव्हां परलोकरूप स्वर्गनरकादिकांची स्थिति तुला नाकारतां कशी येईल? अर्थात् सर्वलोकप्रसिद्ध अशा ज्ञानाच्या स्वतःप्रामाण्यानें पिशाच आहे ही संविद् जर सत्यार्थ आहे असें अनुभवबलानेंच ठरतें, तर मृत जीवाला परलोक–पुनर्जन्म आहे, ही श्रुतिवरून सिद्ध होणारी गोष्ट अनुभवबलानेंच सत्य कां नाहीं? शिवाय पिशाचग्रस्ताला पिशाचाविषयीं जो स्वानुभव येतो तो श्रुतीसारख्या दृढतर प्रमाणानें नव्हे, तर काकतालीय न्यायानें आकस्मिक होय. पण स्वानुभवाचा अपलाप करणें उचित नसल्यामुळें ती तसली प्रतीतिहि जर सत्य मानावी लागते, तर दृढतर श्रुत्यादि कारणांसह असलेली परलोकाची प्रतीति सत्य कां नव्हे? (यावर शंका–अहो पण केवल स्वानुभवाच्या बलावरच पदार्थाला सत्य मानतां येत नाहीं. कारण तसें मानल्यास शिंपीच्या ठिकाणीं भासणारें रुपेंहि सत्य आहे, असें म्हणावें लागेल! उत्तर–) जी संवित् आंत ज्या अर्थाचें अस्तित्व जसें जाणते, ती त्या अर्थाचें सत्त्व तसेंच अनुभविते. शुक्तिरजतसंविद् आपल्या प्रतिभासाच्या वेळीं पदार्थाचें सत्त्व अनुभविते. पुढें हें रुपें नव्हे, शिंप आहे असें ज्ञान झाल्यावर त्याचा बाध होतो; व शिंपीमध्यें त्रिकालीं रुपें नव्हतें, अशी संविद् उत्पन्न होते. त्यांतील पहिल्या संविदच्या बलावर रुप्याचें प्रातिभासिक सत्त्व असूं दे, किंवा दुसऱ्या संविद्च्या बलानें त्याचें असत्व अनुभवानेंच सिद्ध होवो, पण कांहीं जरी झालें तरी अनुभवावांचून पदार्थाच्या रूपाचा अपलाप करितां येत नाहीं. जिवंत असलेल्या मनुष्याला देह असतांनाच श्रुत्यादिप्रमाणाच्या द्वारा किंवा मृत मनुष्याला देह नसतांना स्वप्नाप्रमाणें केवल प्रतिभासामर्थ्यानें परलोक आहे अशी अनुभवरूप संविद् अवश्य झाली तर त्या मरणानें 'जीवंत मनुष्याच्या अनुभवानें सिद्ध असलेलें

तें सत् व मृताच्या अनुभवानें सिद्ध झालेलें तें असत्' असा अपलाप करतां येईल कीं याच्या उलट म्हणतां येईल? त्यांतील कांहींच शक्य नाहीं. त्यामुळें श्रुत्यादिकांचें प्रामाण्य सिद्ध आहे. म्हणून, म्हणजे वेदादिकांचें प्रामाण्य व ज्ञानाचें स्वतःप्रामाण्य सिद्ध असल्यामुळें ज्ञानस्वभाव परमात्म्याच्या स्वप्रकाशत्वामुळें सर्व व्यवहारापूर्वीं स्वरूपभूत नित्यसिद्ध संविदेला स्वतःच जाणतो. अग्नि उष्णता व प्रकाश यांची दुसऱ्या कोणापासून जशी अपेक्षा करीत नाहीं, त्याप्रमाणें तो परमात्मा त्या ज्ञानाचें फल दुसऱ्या कोणापासून इच्छीत नाहीं. असो. त्यानंतर म्ह. नित्यसिद्ध संविदेला स्वतःच जाणल्यावर सृष्टि व जाग्रत् यांच्या आरंभक्षणीं वासनांचें कारण —उत्पत्तीचें उपादान--सर्व जगद्वासनामय असा जो आतिवाहिक देह त्याला स्वरूपभूत चितूच्या बलानें जाणून त्यानंतर देहादि भ्रमाला पाहतो. त्यामुळें सर्वांच्या पूर्वीं सिद्ध असलेल्या संविदूची—ज्ञानाची सिद्धि देहाच्या अधीन नाहीं, ही गोष्ट निर्विवाद होय. ह्मणूनच वासनांचा क्षय झाला असतां द्रष्टृ-दृश्य-दृक् इत्यादिरूप अनर्थ निवृत्त होतो. वासनाक्षयामुळें आतिवाहिक देहाचा क्षय होतो व त्याच्या द्वारा अनर्थांचा क्षय होतो. पण तीच वासना असली तर ही संसृति--संसारसंज्ञक हडळ उत्पन्न होते. सृष्टीच्या आरंभीं अगोदर शबलब्रह्माचा वासनान्तर्गत प्रपंचपर्यालोचनरूप विचार उत्पन्न होतो. त्यापासून पूर्व जगद्वासनांचा जगद्रूपानें उद्भव होतो. यास्तव वासनांची शांति हेंच निर्वाण व वासनांची सत्ता हाच संसारभ्रम असें तूं समज. ती वासना पूर्वीं म्ह० प्रलयाचे वेळीं किंवा पूर्व सृष्टीच्या वेळीं उत्पन्नच झालेली नाहीं. कारण असंग चिद्रूप ब्रह्माचे ठिकाणीं तिचा संभवच नाहीं, असें तूंच म्हणतोस! तथापि अद्वितीय ब्रह्मबोधाचा उपाय या रूपानें शास्त्रानें कल्पिलेल्या सृष्ट्यादिकांची बीजावांचून उपपत्तिच लागत नसल्यामुळें ती वासनाहि कोणत्या तरी निमित्तानें पूर्वीं उत्पन्न झाली असें आत्मबोधाचा उदय होईतों मानावें. आत्मसाक्षात्कार झाल्यावर सर्व जगत् ब्रम्हच होतें, त्यामुळें ती वासनाहि परब्रम्हच आहे, असा निश्चय होतो. अशा प्रकारचें जें परिज्ञान तेंच निर्वाण होय असें ज्ञाते जणतात आणि असें न जाणणें हाच बंध आहे, असें हे राघवा! तूं समज. हा विज्ञानघन आत्माच--अज्ञात ब्रह्मच जगत्, त्याची वासना व त्याचें अज्ञान असून ब्रह्मच त्याची निवृत्ति, तीच विद्या व व तिचें फल निर्वाण होय. अर्थात् स्वतः ब्रम्हच तद्रूप भासतें व तेंच तद्रूप भासत नाहीं. मी बद्ध आहें, असें स्वभावतःच जाणणें हा बंध आहे, ह्म० आपली कल्पनाच आपला बंध आहे; व मी मुक्त आहें असें प्रमाणतः जाणणें हाच मोक्ष आहे. हा या सर्व शास्त्राचा निष्कर्ष कळला असतां मोक्षसाधनाचा क्लेश तो कितीसा होणार? संविद्ला अंतर्मुख करणें हें काम कठिण नाहीं, अगदीं सुलभ आहे. संविद् बहिर्मुख—जागृत् झाली असतां बंध व ती अंतर्मुख—निद्रित झाली असतां मोक्ष, या गोष्टीचा अनुभव व्युत्थान व समाधि किंवा जागृति व सुषुप्ति या समयीं सहज येण्यासारखा आहे. संविद् बहिर्मुख झाली कीं, तिच्या उदरांतच असत् असलेलें जगत्हि सत्सें भासतें. लीन न होतां निजलेलें—एकल स्थिर झालेलें ज्ञान हाच मोक्ष, असें म्हणतात; व जागृत

१ 'तदैक्षत बहु स्यां प्रजायेयेति' (तैत्तिरीयभाष्यार्थ, अ० ६, पृ० १३१ पहा.) या श्रुतीच्या अनुसार शबलब्रह्म आलोचन करितें.

झालेलें ज्ञान हाच बंध असें तज्ज्ञ सांगतात. 'यास्तव तूं आतां त्यांतील हवें तें स्वीकार. ( याप्रमाणें बंध व मोक्ष आपल्या इच्छेवर— भावनेवर अवलंबून आहेत, असें सांगून आतां मोक्षस्वभावाचा स्वीकार करणेंच निर्विक्षेप परमानंदरूप असल्यामुळें उचित होय, अशा आशयानें उपसंहार करितात— ) रामा ! सर्ववासनाशून्य, अनन्त, अनादि, निर्दोष बोधस्वरूप, अद्वैत, निराकाश, निःशंक ब्रह्मच होऊन बंधापासून मुक्त हो, व त्याच अवस्थेंत सदा स्थित हो. ७९.

---

## सर्ग ८० वा.

१ योगिगम्य प्राकृत प्रलयाचें वर्णन.

श्रीवसिष्ठः—( ब्रह्मदेवाच्या वासनेनें कल्पिलेल्या प्रपंचाचा म्ह० त्याचा ब्रह्मलोक, देव, भुवनें इत्यादिकांचा: त्याच्या प्रारब्धाचा क्षय होतांक्षणींच उत्पन्न झालेल्या साक्षात्कारानें बाध होणें हा वैज्ञानिक किंवा आत्यंतिक प्रलय वर्णिला. हा प्रलय स्वप्नाच्या बाधासारखा असतो. मुक्तांच्या दृष्टीनें त्याचें सोपपत्तिक वर्णन केलें. आतां बद्धदृष्ट्या ब्रह्मदेवाच्या देहाचा, तद्देहारंभक उपाधींचा व त्याच्या इंद्रियादिकांचा क्रमानें आपापल्या कारणांत लय होऊन शेवटीं मायारूप शबल ब्रह्ममध्यें लय होणें, या स्वरूपाच्या प्राकृत प्रलयाचें वर्णन करण्यास आरंभ करितात—) ज्यांतील वात संपली आहे, अशा दीपाप्रमाणें ते सर्व ब्रम्हलोकनिवासी अदृश्य झाले. नंतर ते बारा आदित्य ब्रम्हदेवाच्या शरीरांत मायाशबलब्रह्मत्वास प्राप्त झाले असतां ते पृथिव्यादिक्रमाणें त्या ब्रह्मलोकाला जाळूं लागले. ज्यांचें तेज अतिशय प्रखर आहे असे तेहि ब्रम्हदेवाच्या नगराला जाळून व ब्रम्हदेवाप्रमाणेंच ध्यान करून ज्यांतील तेलवात संपली आहे अशा दीपाप्रमाणें निर्वाण पावले. (कारण तेहि अधिकारी जीव असल्ल्यामुळें अधिकारप्रारब्ध संपतांच त्यांना चरमसाक्षात्कार झाला व त्यांच्या त्यांच्या प्रपंचाचा बाध होऊन ते ब्रम्हदेवाप्रमाणेंच विदेहकैवल्यास प्राप्त झाले. त्यानंतर रात्र होतांच भूलोकीं दाट अंधकार जसा प्रवेश करतो त्याप्रमाणें पूर्वी वाढूं लागलेल्या एकार्णवाच्या जलानें त्या ब्रम्हदेवाच्या नगरांत प्रवेश केला. आपल्या भयंकर लाटांनीं त्यानें तें नगर भरून सोडलें. ब्रम्हलोकापर्यंत सर्व जगत् जलानें भरून गेलें. त्यामुळें पिकलेलें द्राक्ष जसें रसानें भरलेलें असतें तसें तें झालें. त्या त्या ऊर्मींनीं, पाण्यांत तरंगणाऱ्या पर्वतांच्या समूहांनीं व देवशरीरांनीं ज्यावर आघात केले आहेत व त्यामुळें जे फुटले आहेत असे पूर्वोक्त पुष्करावर्तादिक कल्पांतमेघ त्या समुद्रजलांतच मिळून गेले. इतक्यांत मीं आकाशांतून उदय पावलेलें एक भयानक रूप पाहिलें. प्रथम तो रुद्रच आहे असें मीं ओळखिलें नाहीं. व त्याला ओळखीपर्यंत मलाहि त्याची भीति वाटली. तें रूप कल्पांतींच्या जगाच्या आकाराचें होतें. त्याचा वर्ण काळा होता. त्यानें सर्व आकाश भरून सोडलें होतें. त्यामुळें त्या कल्पाच्या आरंभापासून अंतापर्यंत प्रतिदिवशीं रात्रीं झालेला सर्व अंधकार एकत्र करून त्याचाच हा देह बनविला आहे कीं काय असा मला भास[1] झाला. त्याचा वर्ण जरी इतका काळा होता तरी त्याचें तेज दुपारच्या सूर्यासारखें प्रकाशमान होत

---

१ संहार करणाऱ्या अघोर रुद्राच्या कृष्णवर्ण मूर्तीला उद्देशून ही उत्प्रेक्षा केली आहे.

होतें. त्याचें मुख तीन सूर्यांसारख्या किंवा तीन स्थिर विद्युत्पुंजांसारख्या तीन नेत्रांनीं प्रकाशमान होत असून त्यांतून एकसारखे ज्वालापुंज निघत होते. त्याला पांच तोंडें, दहा हात व तीन नेत्र असून हातांत त्रिशूल होता. तो रुद्र वस्तुतः येतच होता व त्याचें शरीर परिच्छिन्न होतें, तथापि जणुं काय त्याचा आकार आकाशभर पसरला होता. त्यामुळें तरवारीसारखें घनश्याम आकाशच देह धारण करून स्थित आहे, असें वाटलें. तें एकार्णवानें भरून सोडलेल्या ब्रह्मांडाच्या बाहेरच स्थित होतें. त्यामुळें आकाशच हस्त-पादादि अवयवांनीं युक्त होऊन उभें राहिलें आहे, असें वाटलें. तें रुद्ररूप श्वासवायूच्या परिवर्तनांनीं–भ्रमणांनीं एकार्णवाच्या जलाला क्षुब्ध करीत होतें. त्यामुळें आपल्या भुजदंडानें क्षीरसागराला क्षुब्ध करणारा तो गोविंदच आहे, असें भासलें. त्या वेळीं तो कल्पांतींचा एकार्णवपूरच जणुंकाय पुरुषाच्या आकारानें उठून उभा राहिला आहे, असा भ्रम झाला. सर्वांचें कारण असल्यामुळें स्वतः कारणशून्य अशी सर्वांच्या अहंकाराची ती समष्टिच शरीर धारण करून जणुं काय आली होती. सर्व कुलपर्वतांचा समूह उड्डाण करण्यासाठीं आपले पंख पसरून आकाशाला व्यापीतच आहे, असा भास झाला. असो; त्यानंतर त्रिशूल व तीन नेत्र यांवरून हा रुद्र आहे असें मी दुरू-नच ओळखून त्या परमेश्वराला नमस्कार केला.

**श्रीरामः**–भगवन्! तो सर्व श्रुतींत प्रसिद्ध असलेला परमेश्वर असा भयंकर कां झाला? त्याचा वर्ण काळा कां? त्यानें फार मोठी आकृति कां धारण केली? त्याचीं पंचमुखें कोणतीं? दहा बाहु कोणते? तो कोणत्या आधारानें रहात होता? त्याचे त्रिनेत्र कोणते? त्यानें असें उग्र स्वरूप कां धारण केलें होतें? तो एकच कां होता? त्याला त्या वेळीं कोणतें प्रयोजन साधावयाचें होतें? म्हणजे तो स्वतंत्र होता कीं परतंत्र? जर स्वतंत्र असेल तर पूर्णकाम असलेल्या त्याची संहारामध्यें प्रवृत्ति कां? जर परतंत्र असेल तर त्याला कोणीं प्रेरणा केली? त्यानें काय केलें? तो रुद्ररूप ईश्वर जर होता तर त्याची छायारूप माया कोण होती? तें सांगा.

**श्रीवसिष्ठः**—हे काकुत्स्थ रामा! हा 'रुद्र' या नांवाचा ईश्वर अहंकारता या रूपानें उत्पन्न झाला. ती अहंकारता सर्व सृष्टि-स्थिति-संहाराविषयींचा संकल्प, निश्चय इत्यादिकांच्या बीजभूत सर्वाभिमानात्मक मायावृत्तिरूप होती. ती अहंकारता सर्व जगदध्यासाची मूलस्तंभभूत असून सर्व प्राण्यांच्या रोदनाचें व शरणागतांचें दुःख घालविण्याचें निमित्त असल्यामुळें तिला रुद्र हें नांव प्राप्त होतें. ती अभिमानिता प्रा-ण्यांना रडवावयाचें झाल्यास विषमाभिमानरूप व त्याचें दुःख घालवावयाचें झाल्यास एकाभिमानरूप होते. मीं पाहिलेली ती रुद्र-मूर्ति केवल शुद्ध आकाशच होती. अर्थात् तो भगवान् आकाशाकार होता. त्याचा वर्णहि आकाशाचाच होता, व तो महातेजोरूप होता. चिदाकाश हेंच त्यांतील सार असल्यामुळें त्याला आकाशात्मा म्हटलें जातें. सर्व भूतांचा आत्मा हाच त्याचा आत्मा असल्यामुळें व तो सर्वव्यापी असल्यामुळें त्याची आकृति फार मोठी होती. त्या अहंकाराचीं प्रत्येक शरीरांत नियमानें असणारीं जीं पांच ज्ञानें-द्रियें तींच या रुद्राचीं मुखें आहेत, असें तत्त्ववेत्ते सांगतात. त्यामुळेंच ज्ञानेंद्रियें सर्वतः प्रकाशस्वभाव असतात. पांच कर्मेंद्रियें हे त्याचे उजवे हात व वचन, आदान, विहरण, उत्सर्ग व आनंद हीं त्याचीं कर्में हे डावे हात होत. याप्रमाणें तो दशभुज होता.

( तर मग तो यापूर्वी तशाच स्वरूपानें कां दिसला नाहीं, म्हणून विचारशील तर सांगतों ) सर्व भूतें, चार प्रकारचीं भूतशरीरें, त्यांतील जीव या सर्वांसहवर्तमान आपल्या परम कारणांत म्हणजे मायाशबलब्रह्मास प्रलयाच्या योगानें प्राप्त होण्याची इच्छा करणाऱ्या चतुर्मुखानें, पटानें जसा तंतु सोडावा त्याप्रमाणें त्याला जेव्हां सोडलें, तेव्हां तो आपल्या पूर्वोक्त आकाशमात्ररूप मूर्तीला प्राप्त झाला. कार्याचा लय झाल्यावर तो कारणरूपानें प्रकट झाला. ( तो जर आकाशमात्ररूप होता, तर त्या अमूर्ताला वर वर्णिलेली आकृति कोठून आली ? उत्तर— ) तो रुद्र सर्व कार्यविशेषांचा प्रविलय झाल्यावर अवशिष्ट राहिलेला जो कारणैकांश तद्रूपच होता. त्यामुळें वस्तुतः मीं जशी वर वर्णिली तशी त्याला आकृति नाहींच. तथापि तशा आकारानें त्याची उपासना करणाऱ्या उपासकांना त्यांच्या वासनेनें तो तसा दिसतो. ( आतां तो कोठें राहतो, या प्रश्नाचें उत्तर— ) चिदाकाशांतील विस्तीर्ण भूताकाशांत तो राहतो. तसाच तो ईश्वर नेहमीं सर्व भूतांच्या देहांत वायूप्रमाणें अन्तर्यामी होऊन राहतो. सर्व भूतांनीं ज्याला सोडलें आहे असा तो आकाशाकार रुद्र त्या वेळीं एक क्षणभर क्षोभ उत्पन्न करून क्षीण होईल व परम शांतीस प्राप्त होईल. ( आतां त्याचे तीन नेत्र कोणते तें सांगतात— ) सत्त्वादि तीन गुण, भूत-वर्तमान-भविष्य हे तीन काल, चित्त-अहंकार-बुद्धि, प्रणवाचे अ-उ-म हे तीन वर्ण, तीन वेद, हेच त्याच्या पांच मुखांतील तीन तीन नेत्र आहेत. त्रैलोक्य हाच त्रिशूल त्यानें आपल्या हातांत धरिला होता. त्यामुळें तो उग्रात्मा दिसला. ज्याअर्थीं सर्व भूतगणांमध्येंहि त्या अहंकाररूप रुद्रावांचून दुसरें कांहींच नसतें, त्या अर्थीं तो सर्व भूतगण देहात्मा होता. ह्मणूनच अहंकारात्मक रुद्राच्या अभिध्यानामुळें सर्व भूतांना देहात्माभिमान होतो. ( आतां त्याचें प्रयोजन काय होतें, या प्रश्नाचें उत्तर— ) स्वतःच उत्पन्न केलेल्या सर्व भूतांचा स्वस्वकर्मानुरूप जो भोगानुभव व क्रमानें ज्ञान प्राप्त झालें असतां होणारा जो आत्मतत्त्वानुभव तद्रूप शास्त्रीय विहित-निषिद्धकर्म-ज्ञानफलदानरूप स्वभाव हेंच त्याचें प्रयोजन होय. म्ह० प्राण्यांना त्यांच्या त्यांच्या कर्माप्रमाणें सुख-दुःखरूप फल देणें व ज्ञानाप्रमाणें मोक्ष देणें हा त्याचा स्वभावच असल्यामुळें तेंच फल होय. ( आतां त्याला प्रेरणा कोणीं केली, या प्रश्नाचें उत्तर— ) चिन्मात्राकाशरूप शिवानें म्ह० निरतिशय आनंदरूप परमात्म्यानें त्याला प्रेरणा केली. परमात्म्यानेंच 'बहु स्यां प्रजायेय' अशा संकल्पात्मक मायावृत्तीनें त्याला सृष्ट्युन्मुख केलें, तेव्हां त्यानें सृष्टि रचली; आणि आतां परमात्म्यानें प्रेरणा केल्यामुळें सृष्टिक्रमाच्या उलट क्रमानें सर्व जगाला गिळून आकाशभावानें स्थित झाला असतां त्यालाहि तो परमात्मा गिळून सोडतो. याप्रमाणें त्यानें त्याला गिळलें असतां तो रुद्र आकाशभावालाहि सोडून भूमानंदामध्यें प्रतिष्ठित होतो, अर्थात् त्याला भूमानंदस्वरूप प्रतिष्ठारूप परम शांति प्राप्त होते. सारांश, हे रामा ! निर्मल आकाशस्वरूप व त्यामुळेंच कृष्णवर्ण अशा प्रकारचा हा ईश्वर कल्पामध्यें सर्व जगत् निर्माण करून कल्पांतीं त्या एकार्णवालाहि पिऊन परम शांतीला प्राप्त होतो. त्यानंतर तो पुनरपि रुद्रभावास प्राप्त होत नाहीं. ( याप्रमाणें रामाच्या प्रश्नांचीं उत्तरें देऊन

१ याविषयीं 'देवस्यैष स्वभावोऽयमाप्तकामस्य का स्पृहा' ( मांडूक्यभा. १-९, पृ. ५३ पहा. ) हें प्रमाण आहे.

वसिष्ठ पुढील कथा सांगतात-) रामा! त्यानंतर तो रुद्र मोठ्या प्रयत्नानें आपल्या श्वासवायूनें त्या महासागरास आकर्षण करून घेऊन पिऊं लागला आहे, असें मीं पाहिलें. जसा महासागर वडवाग्नींत प्रवेश करतो त्याप्रमाणें रुद्राच्या प्राणानें ज्याचें आकर्षण केलें आहे असा तो एकार्णव त्याच्या विस्तृत ज्वालामालांनीं आंतून व्यापलेल्या मुखांत शिरला. रामा, तो अहंकाररूप रुद्रच सर्व कल्पभर वडवाग्नि होऊन समुद्रांतील सर्व जल शोषीत रहातो. असो. पातालांत जसें पाणी, बिळामध्यें जसा सर्प, व आकाशांत जसा वायु त्याप्रमाणें तो एकार्णव एका क्षणांत त्याच्या मुखांत शिरला. ज्याचें सर्व अंग कृष्णवर्ण आहे असा तो रुद्र थोड्याच वेळांत तें सर्व जल पिऊन टाकता झाला. सूर्य अंधकाराला व सत्संग सर्व दोषांना जसा घालवितो, त्याप्रमाणें त्या रुद्रानें एकार्णवाचें सर्व जल आटवून सोडलें. तेव्हां ब्रम्हलोकापासून पातालापर्यंत सर्व अवकाश शांत व शून्य झाला. धूळ, धूर, वायु, समुद्र व इतर भूतें यांनीं रहित असलेलें आकाश सम म्ह० सर्ववैषम्यरहित झालें. हे रघुनंदना! त्या वेळीं आकाशासारखे निर्मल व स्पंदरहित असे केवळ चार पदार्थ तेथें दिसत होते. ते कोणते तें ऐक. एक हा रुद्र, तो मध्यभागीं असून कृष्णवर्ण आकाशाप्रमाणें त्याची आकृति होती. तो निश्चल सुगंधकलेप्रमाणें अंतरालीं निराधार उभा होता. दुसरा पदार्थ दूर दिसत होता. तो पृथिव्याकाशाच्या तलासारखा असून ब्रम्हांडसदनाच्या खालीं असलेल्या सप्तपातालापर्यंत जितके पदार्थ होते ते सर्व म्हणजे पाताल, भूतल, स्वर्ग, मोठमोठे पर्वत, देव, इतर पार्थिव भाग यांनीं व्याप्त पण आतां जळून राख झाल्यामुळें व ती राखहि एकार्णवजलानें भिजून तिचा चिखल झाल्यामुळें तो पंकाकार दिसत होता. ब्रम्हांडाचा ऊर्ध्वभाग हाच येथील तिसरा पदार्थ होय. तो फार दूर असल्यामुळें तेथपर्यंत नेत्राचे किरण पोंचत नव्हते. म्हणून तो नेत्रांचा विषय न होणाऱ्या आकाशाप्रमाणें नीलवर्ण दिसत होता. ब्रम्हांडाचें अधःखंड व ऊर्ध्वखंड यांमध्यें फारच अंतर होतें. त्यांच्यामधील जो अंतराल प्रदेश तेंच आदि-अंत-शून्य आकाश असून निर्मल ब्रम्हाप्रमाणें पसरलें होतें. हाच मला त्या वेळीं तेथें चवथा पदार्थ दिसला. या चार पदार्थांहून मला तेथें कांहीं दिसलें नाहीं.

**श्रीरामः**-भगवन्! आपण सांगितलेलीं जीं हीं ब्रम्हसदनाचीं दोन आवरणें त्यांना ब्रम्हांडकवच असेंहि म्हणतात. त्यांच्या पलिकडे काय आहे? त्यांचीं आवरणें कोणतीं? तीं किती आहेत व तीं सर्व आधारावांचून कशीं राहिलीं?

**श्रीवसिष्ठः**-रामा! ब्रम्हांडाचें अधःखंड व ऊर्ध्वखंड यांच्या पलीकडे दशगुण जल आहे. तें जल अनंत आहे. त्या दोन खंडांच्या मधील संध्याकाशाला[1] सोडून त्याच्या बाहेरच तें पसरलेलें आहे. त्या जलावरणाच्या पुढें दशगुण ज्वालारूप तेज स्थित आहे. त्या तेजोरूप आवरणाच्या पलीकडे जलाप्रमाणेंच पवित्र करणारा व स्वतः रजोमालिन्यरहित असा वायु स्थित आहे. त्याच्या पलीकडे अनंत मायाशबल ब्रम्हाकाश स्थित आहे. तें अति सूक्ष्म असल्यामुळें अतिशय स्वच्छ आहे. (अहो, पण पुराणामध्यें आकाशाच्या पलीकडे दशगुण अहंकारतत्व, त्याच्या पलीकडे दशगुण महत्तत्त्व, त्याच्या पुढें अनंत प्रकृति वर्णिलेली आहे. पण तुम्हीं तर त्या सर्वांना सोडून दिलेंत,

१. याविषयीं 'तद्यावति क्षुरस्य धारा यावद्वा मक्षिकायाः पत्रं तावानंतरेणाकाशः' ही श्रुति प्रमाण आहे. (बृह. भा. अ. ३, ब्रा. ३, पृ. १०१.)

तें कां ? उत्तर– ) त्या मायाशबल ब्रम्हाच्या स्वरूपाकाशांत योग, माहेश्वर, पांचरात्र, कापिल इत्यादि तंत्रांमध्यें अशा भिन्न भिन्न आवरणकल्पना केल्या आहेत, व त्यांचें पुराणामध्यें वर्णनहि आहे. पण श्रुतीमध्यें त्या नाहींत, म्हणून आम्हीं त्यांची उपेक्षा केली. कारण त्या तंत्रकारांच्या तांत्रिक कल्पना आहेत.

**श्रीराम**:—हे मुनीश्वर ! ब्रम्हांडखंडाच्या वर व खालीं ज्यांचा आकार फार मोठा आहे असें तें जलादि कसें राहतें ? कारण त्या आवरणांचा आकार ब्रम्हांडाहून उत्तरोत्तर दसपट अधिक आहे, असें तुम्हीं सांगतां. तेव्हां त्याला कोण व कोठें धारण करितें ?

**श्रीवसिष्ठ**:—वानरांचीं पोरें आपल्या आईच्या पोटाला जशीं बिलगतात व तिनें मोठमोठ्या उड्या मारल्या तरी पडत नाहींत, त्याप्रमाणें तीं सर्व आवरणें त्या पार्थिव ब्रम्हांडकपालाचाच आधारत्वानें आश्रय करितात. ब्रम्हांडाच्या ऊर्ध्वकपालावर असलेल्या जलादि आवरणांनाहि हाच न्याय लागू आहे. त्यामुळें तीं आवरणें खालीं पडत नाहींत. तात्पर्य, तृषित जीव पाण्याकडे जसे धांवतात, त्याप्रमाणें ते सर्व पदार्थ अगदीं समीप असलेलें जें ब्रम्हांड या नांवाचें महाशरीर त्याचा आश्रय करून राहतात. जसे आपले अवयव आपल्या शरीराला घट्ट चिकटून रहातात, त्याला सोडीत नाहींत, त्याप्रमाणें ते तैजसादिक शेवटीं त्याचाच आश्रय करून राहिले आहेत व आपली स्थिति सोडीत नाहींत.

**श्रीराम**:—हे ब्रह्मन् ! पण बाकीच्या सर्व आवरणांना आधारभूत असलेल्या त्या दोन ब्रम्हांडखंडांचा आधार काय आहे ? तीं कशीं राहतात ? त्यांनीं कोणती आकृति धारण केली आहे ? व त्यांचा नाश कसा होतो ?

**श्रीवसिष्ठ**:—वस्तुतः हें जगत् कोणींहि धारण केलेलें नाहीं व त्याला कोणीं वर उचलून धरलेलेंहि नाहीं. तें पडणारेंहि नाहीं व न पडणारेंहि नाहीं. त्याला आकार नसतांनाच तें साकार असल्याप्रमाणें दिसतें. खरोखर हें जगत् स्वप्नांतील नगराप्रमाणें आहे. अर्थात् त्याला जर सत्य मानलें तर ही आधारादिकांविषयींची चिंता करतां येते. मिथ्या दृष्टीमध्यें अतिशय जड पदार्थांनाहि आधारादिक लागत नाहींत. अरे रामा ! या मिथ्या जगांतील पडणार तरी काय व त्याला धारण करणारें तरी कशाला पाहिजे ? आपण जशी कल्पना करावी तसें तें होऊन रहातें. आकाशांत जशी केंसाची आकृति दिसते किंवा त्यांत शून्यता स्वभावतःच असते, अथवा वायूंत स्पंद असतो तसें चिदाकाशांत जगत् आहे. चित्‌मध्यें जसें संकल्पनगर तसेंच हें ब्रम्हांड या नांवाचें जगद्‌गृह आहे. आकाशांत निराकार आकाशच जसें असतें व त्यांत कांहीं निमित्तानें आकार दिसतो, तसें हें चिदाकाश जगदाकार भासतें. तें चंचल आहे, अशी कल्पना केल्यास अहोरात्र तसेंच दिसतें. तें जात आहे, अशी कल्पना केल्यास म्हणजे त्याच्या ठिकाणीं गमनाचा अध्यास केल्यास तें अहोरात्र गमनच करतें. स्थित आहे असें म्हटल्यास अहर्निश स्थित होतें. वर उडून जात आहे अशी कल्पना केल्यास तें तसेंच भासतें. नाशसंकल्पानें तें महाकल्पादिसमयीं नाश पावतें आणि जन्माच्या कल्पनेनें चिदाकाशांत उत्पन्न होतें. तात्पर्य हें सर्व कल्पनाधीन आहे. ज्याप्रमाणें शरत्कालच्या आकाशांत पहाणाऱ्या मनुष्याच्या दृष्टींत पडणाऱ्या बोरांच्या आकाराचा मौक्तिकगण भासतो, त्याप्रमाणें चिदाकाशांत भ्रांतीनें भासणाऱ्या या जगांची संख्या जाणण्यास व त्यांच्या आधारादि तत्त्वांची

गणना करण्यास कोण समर्थ आहे? कोणीच नाहीं. ८०.

## सर्ग ८१ वा.

—:०:—

१ तो रुद्र भैरवरूपानें प्रलयसमयीं नृत्य करतो; २ त्याची छाया कालरात्रीहि नृत्य करिते. ३ सर्व जगत् हें तिचें अंग आहे.

**श्रीवसिष्ठः**—हे राघवा! त्यानंतर मीं त्या महाकाशांत त्या रुद्राला नाचतांना पाहिलें. एखाद्या मत्त पुरुषाप्रमाणें तो नृत्य करूं लागला. त्याचा आकार अतिशय विस्तीर्ण होता. त्या वेळीं आपलें विभुत्व सोडून आकाशच साकार झालें आहे असें भासलें. त्याचें शरीर फारच मोठें, सजल मेघाकार, व दाही दिशांना व्यापून सोडणारें होतें. सूर्य, चंद्र, व अग्नि हे त्याचे नेत्र होते. दशदिशा हें त्याचें चंचल वस्त्र होतें. त्याच्या अंगाची प्रभा अतिशय दाट असून दूरवर पसरली होती. त्यामुळें तो जणुं काय नीलवर्ण प्रभेच्या ज्वालांचा बंधनस्तंभच आहे असें वाटत होतें. वडवाग्नि याच ज्याच्या दृष्टि आहेत, चंचल भुजा हाच ज्यांतील भयंकर लाटांचा समूह आहे, असा हा एकार्णव समुद्रच जणुं काय शरीर धारण करून उभा राहिला आहे, असें वाटलें. त्यानंतर त्याच्या शरीरापासून एक छाया उत्पन्न झालेली मीं पाहिली. ती त्या रुद्राच्या नर्तनाचें अनुकरण करीत होती. पण या आकाशांत सूर्य नसतांना व गाढ अंधकार पसरला असतां हा छाया कशी उत्पन्न झाली, अशी मला शंका आली. म्हणून मी जों विचार करीत आहें तोंच ती त्या रुद्राच्या पुढें उभी राहून नृत्य करूं लागली. तिला देदीप्यमान व विशाल असे तीन नेत्र होते. तिचा वर्ण काळा होता. ती कृश होती. तिच्या सर्व अंगांतील शिरा दिसत होत्या व ती जर्जर झाली होती, तथापि तिची आकृति विस्तीर्ण होती. ज्वालांनीं व्याप लेल्या अग्नीमुळें चंचल झालेल्या वनसमृद्धीप्रमाणें तिचें कृष्णवर्ण मस्तक पुष्प-पल्लवादिकांनीं भूषित केलें होतें. तेल घालून खललेल्या काजळाप्रमाणें ती काळी होती. त्यामुळें काळोख्या रात्रीनेंच तें स्वरूप धारण केलें आहे, असें वाटलें. ती तमःश्रीच देहयुक्त झाली आहे, किंवा आकाशाची शोभा साकार झाली आहे, असा भास झाला. ती अतिशय दीर्घ होती. तिचें मुख भयंकर होतें. ती जणुं काय आकाशाचें माप करण्यासच सज्ज झाली आहे, असें वाटलें. अनेक उपवास केल्याप्रमाणें ती कृश दिसत होती. तिचें तें फार मोठें शरीर सभोंवार सगर्त असल्यासारखें दिसलें; ह्मणजे तें उंचसखल होतें. दीर्घ जानु व भुजा यांच्या भ्रमणानें जणुं काय ती दिशांना मापण्यासच तयार झाली होती. ब्रह्मदेवानें अतिशय उंच व कृश असलेली ती उभी राहण्यास असमर्थ आहे असें पाहून शिरारूपी लांब लांब दोऱ्यांनीं तिला बांधूनच ठेवलें होतें. ती इतकी उंच होती कीं, मी मोठ्या प्रयत्नानें, योगबलानें मनोवेगानें अनेक सहस्र वर्षेंपर्यंत खालीं वर जेव्हां धांवलों तेव्हां तिचें मस्तक व पायांचीं नखें पाहिलीं. अर्थात् दुसऱ्या कोणाला नखशिखांत पहातां येणें शक्य नव्हतें. तिचे मस्तकापासून हातांच्या व पायांच्या नखांपर्यंत सर्व अवयव शिरांनीं व आंतड्यांनीं गुंफलेले होते. त्यामुळें मुळापासून अग्रापर्यंत सूत वेढलेल्या खदिरादि कांटेऱ्या झाडाप्रमाणें ती दिसत होती. विश्वरूपमय नाना रंगांच्या सूर्यादि देव-दानवांच्या शिरःकमलसमूहांनीं तिचा कंठ भूषित झाला होता. म्हणजे देवादिकांच्या

शिर:कमलांची चित्रविचित्र माला तिनें आपल्या गळ्यांत घातली होती. तिच्या वस्त्राचे अंचल वायूनें प्रदीप्त केलेल्या अग्नीचेच आहेत असें भासत होतें. तिच्या दीर्घ कर्णावरून नाग लोंबत होते. मनुष्याचीं दोन शवें हींच त्यांतील दोन कुंडलें होतीं. सुकलेल्या भोंपळ्याच्या वेलीप्रमाणें गुडघ्यांपर्यंत लोंबणारे व हालणारे असे तिचे दोन स्तन होते. तिच्या हातांतलि खट्वांगमंडल कार्तिकस्वामीच्या मोराच्या पिसाऱ्यांनीं व ब्रह्मदेवाच्या केशांनीं चिन्हित झालेल्या इंद्रादिकांच्या मस्तकांनीं युक्त होतें. ती दंतरूपी चंद्रमालेनें अतिशय विमल दिसत होती. त्यामुळेंच तिचें शुद्ध तेज पसरून तिची अतिशय वृद्धि झाली होती. वर्तुलाकार फिरणाऱ्या आवर्तांच्या योगानें चंचल झालेली तमोरूप समुद्राची ती जणुं काय ऊर्ध्व लेखाच म्हणजे त्या समुद्राचा ऊर्ध्वभागच होती. ती उंच व शुष्क तुंबीलतेप्रमाणेंच आकाशरूप व आकाशांत झालेल्या वृक्षाचा आश्रय करून राहिली होती. तिचे सर्व अवयव अतिशय चंचल असून त्यांपासून उत्पन्न होणाऱ्या वाऱ्यांचा ध्वनि निघत होता. समुद्राच्या मोठमोठ्या तरंगांप्रमाणें ती आपले हात वर उचलीत होती व त्यांच्या कृष्णवर्ण उल्हासानें शोभत होती. एकार्णवाच्या ऊर्मिमालेप्रमाणें ती नृत्यांतलि फेरे घेत होती. त्यामुळें समुद्रांतील भोंवऱ्याप्रमाणेंच ती दिसत होती. एका क्षणांत तिला एकच हात आहे असें ती दाखवीत होती. लागलीच दुसऱ्या क्षणीं ती अनेक भुजांनीं युक्त आहे असें दर्शवीत होती. ती आपल्या उग्र भुजांनीं जगद्रूप नृत्यमंडप व्याकुल करून सोडीत होती. एकदां ती एकमुखाकार दिसत होती. लागलेंच तिला बहुमुखें आहेत असेंहि वाटे. कांहीं वेळ अनंत उग्र मुखांनीं ती युक्त होत असे. केव्हां केव्हां तर तिचें मुळीं तोंडच दिसत नसे. त्यामुळें ती मुखरहितच आहे कीं काय असा भास होई. एक क्षणभर ती एकाच पायानें युक्त होई. दुसऱ्या क्षणीं शतपादांनीं भूषित झालेली दिसे. तिसऱ्या क्षणीं अनंत चरणांनीं युक्त होई व शेवटीं तर तिचा आकार निश्चरणच दिसे. हीच ती कालरात्री होय, असें मीं तिच्या देहावरून अनुमान केलें. हीच ती भगवती काली होय असा सज्जनांनीं तिच्याविषयीं निर्णय केला आहे. तिला तीन नेत्र असून ते ज्वालांनीं युक्त होते. त्यामुळें रहाटगाडग्यावरील काष्ठाला जीं तीन छिद्रें असतात त्यांसारखेच ते दिसत होते. तिच्या ललाटप्रदेशाला ज्यांतलि भूमि जळत आहे अशा इंद्रनील पर्वताच्या शिखराची उपमा होती. तिची हनुवटी लोकालोक पर्वताच्या प्रसिद्ध इंद्रनील श्वभ्राप्रमाणें खोल होती, त्यामुळें तिच्या कांहीं भागांवर कुंडलांची कांति पडत होती व कांहींवर पडत नव्हती. त्यामुळें ती तिची हनुवटी फार भयंकर दिसत होती. इंद्रनीलपर्वताची ज्याला उपमा आहे, अशा उंच पद्मरागादि रत्नांच्या प्रभेनें रंजित झालेल्या तोरणाच्या छिद्रांत अधोमुख कृत्रिम कांचशैलाप्रमाणें ‘भग’ या नांवाचा कावळा विश्रांति घेत होता. नाचणाऱ्या भुजलतारूप पुष्पांनीं व नखांनीं शुभ्र झालेल्या अभ्रमंडलांनीं म्हणजे त्यांच्या योगानें ती काली आकाशरूपी अंगणांत जणुं काय शेकडों पूर्णचंद्रांना फिरवीत होती. वर्षाव करणाऱ्या कल्पमेघाप्रमाणें भ्रमण करणाऱ्या भुजांनीं तिनें सर्व दिक्चक्र व्यापून सोडलें होतें व हत्तीच्या गंडस्थलांतून निघालेल्या मोत्यांप्रमाणें किंवा प्रलयकालीं गळून पडणाऱ्या नक्षत्रपंक्तीप्रमाणें दिसणारी नखांची विलक्षण शोभा सर्व दिशांमध्यें पसरत होती. नखें हींच ज्यांवरील पुष्पें आहेत अशा अंगुलिरूपी वेली-

च्या जाळ्यांनीं युक्त, कृष्णवर्ण व अतिशय उग्र अशा भ्रमण करणाऱ्या भुजवृक्षांनीं सर्व आकाशाला तिनें जणूं काय अरण्यच बनविलें होतें. चोहोंकडे फिरविलेल्या जंघासंघानें दग्ध झालेल्या खर्जूरादि महावनांनीं युक्त व जळून राहिलेल्या तमाल-तालवृक्षांच्या योगानें उंच दिसणाऱ्या भूमीचेंच ती अनुकरण करीत होती. अंतरहित महाकाशांताहि तिचे केंस दूरवर पसरले होते. त्यावरून असा भास होत असे कीं, संचार करणाऱ्या तिमिररूपी हत्तींचा ती आकाशांत वासच करवीत आहे, ह्मणजे त्यांना रहाण्यासाठीं निवासस्थानच उत्पन्न करीत आहे. ज्याच्या योगानें मेरुपर्वताहि तृणाप्रमाणें उडून जात होते, अशा निश्वासवायूच्या योगानें तिनें सर्व दिशा दुमदुमून सोडल्या व आकाशांतून त्याचा भयंकर प्रतिध्वनि निघूं लागला. त्या श्वासवायूच्या फूत्कारानेंच ती अति कर्कश गाऊं लागली. तिच्याबरोबर हावभाव करणारा असा तो निःश्वास वायु एखाद्या नटाप्रमाणेंच शोभला. तीहि त्याच्या बरोबर जणुं काय हालत आहे अशी दिसली. तिला त्या नृत्याचा आवेश आला, त्यामुळें तिचें शरीर अतिशय वाढूं लागलें. मीं आकाशांत फार दूर अंतरावर उभा राहून सूक्ष्म दृष्टीनें तिला पाहिलें. तों चंचलता हेंच जिच्या लीलेचें सार आहे अशा तिनें आपल्या शरीरावर मलय, कैलास, सह्य, मंदर, मेरु यांची माला धारण केली होती, असें दिसलें. तिच्या वक्षःस्थळीं प्रलयकालच्या सुप्रसिद्ध पुष्करावर्तादि मेघांची जी माला होती ती इंद्रनील मण्यांच्या पट्ट्याप्रमाणें शोभत होती. तीन लोक हे तिच्या अंगावरील रत्नजडित आदर्शच होते. कानांमध्यें हिमालय व मेरु हींच—एक रुप्याचें व दुसरें सोन्याचें—अशीं कुंडलें होतीं. ब्रह्मांडाची दाट माला हीच तिच्या कटिप्रदेशांतील फार मोठी मेखला होती. तिनें कुलपर्वतांची माला धारण केली होती. त्या पर्वतांचीं शिखरें, वनें व नगरें हेच त्या मालेंतील गुच्छ होत. जीर्ण नगरें, वनें, द्वीपें, व ग्राम हेच त्या मालांतील कोमल पल्लव होत. तिच्या अंगावर मीं पुरें व नगरें पाहिलीं. ऋतु, तीन लोक, मास व अहोरात्र यांच्या पंक्ति पाहिल्या. यमुना, गंगा इत्यादि नद्या हेच तिच्या गळ्यांतील मोत्यांचे सर होत. ज्या कानांत तिनें हिमालय व मेरु यांना कुंडलांप्रमाणें धारण केलें होतें, त्यांहून निराळ्या कानांमध्यें तिनें धर्म व अधर्म हीं दोन कर्णभूषणें घातलीं होतीं. सकल शास्त्रार्थ हेंच ज्यांतील दूध आहे असे, ऋग्-यजुः-साम-अथर्व-संज्ञक चार आकारांचीं ज्यांचीं अग्रें आहेत व ज्यांतून धर्मरूपी दुधाचे थेंब गळत आहेत असे तिला चार स्तन होते. त्रिशूल, पट्टे, प्रास, बाण, शक्ति, ऋष्टि, मुद्गल यांच्या योगानें ज्यांतून आयुधांचे समूह निघत आहेत अशा मालांचे सर ती धारण करीत होती. ज्या देवादिक चौदा प्रकारच्या भूतजाति त्याच तिच्या शरीरावरील रोमपंक्ति होत. तिच्या शरीरावरील नगरें, ग्राम व पर्वत नृत्य करणाऱ्या तिच्यासह आनंदानें नाचतच होते. त्या वेळीं हें जगत् सर्व स्थावर पदार्थरहित व केवल जंगमरूपच असल्याप्रमाणें नाचत आहे, असें मला दिसलें व त्यावरून परलोकामध्यें सुख आहे असें मी जाणलें. आपल्या अंगावरील सर्व जगाला गिळून तृप्त झालेली ती मत्त जगज्जीर्ण चातकी नृत्य करीत होती. तिच्या त्या विस्तीर्ण स्वरूपाच्या शरीरांत तसेंच रूप धारण करणारें हें सर्व जगत् आरशांतील प्रतीबिंबाप्रमाणें दिसत होतें. ती काली नाचत नसून पर्वत, उपवनें, अरण्यें यांसह नानाप्रकारचें सर्व जगत्च नाचत आहे, तें मरून पुनः जिवंत झालें आहे,

असेंच मला वाटलें. तें सुंदर जगन्नर्तन तिच्या देहरूपी आरशांत चिरकाल स्थित असलेलें मीं पाहिलें. त्यामुळें त्याचा नाश झालेला नाहीं, तें पूर्वीप्रमाणेंच स्थित आहे असें मला वाटलें. कारण ती काली स्वतः जरी नृत्य करीत नसली, तरी तिच्यांतील जगत् नृत्य करीत आहे, असें मला स्पष्ट दिसलें. त्या जगांतील सर्व तारकासमूह हालत होता. पर्वतमंडल भ्रमण करीत होतें. मशकांच्या समूहाप्रमाणें वायूबरोबर देव-दानव उडून जात होते. संग्रामांत शत्रूवर सोडलेल्या चक्रांप्रमाणें त्यांतील द्वीपें व समुद्र गरगर फिरत असून त्यांनीं आकाश भरून सोडलें होतें. वावटळींत गवत जसें वर्तुलाकार फिरत वर उडतें, त्याप्रमाणें सहज वर्तुलाकार फिरणाऱ्या वायूंनीं पर्वत व पृथ्वी यांना उडविलें. नीलमेघरूप वस्त्रांच्या फडफडण्यानें आकाश दुमदुमून गेलें व खालीं काष्ट, हाडें इत्यादि एकमेकांवर आपटल्यामुळें फार मोठा ध्वनि ऐकूं येत होता. जगांतील पदार्थ एकमेकांवर आपटून प्रतिक्षणीं दूर होत होते. त्यामुळें त्या पदार्थांत नानाप्रकारचीं भ्रमणें उत्पन्न होऊन मोठमोठे आवाज होत होते. त्या योगानें सर्व अंतरिक्ष मूर्तिमंत भयानेंच व्यापलें आहे असें वाटलें. त्या वेळीं मेरु नृत्य करीत होता. चंचल व उंच कुलपर्वत याच त्याच्या फार मोठ्या भुजा होत. तो भ्रमण करणाऱ्या अभ्ररूपी वस्त्रांनीं आच्छादित झालेला असून त्यावरील लवणारे वृक्ष हेच त्याचे निरनिराळे अवयव व केंस होत. आपली मर्यादा न सोडणारे समुद्र व वृक्ष भूमिवरून आकाशांत जात होते व आकाशांतून खालीं येत होते. कांहीं नगरें मोठी गर्जना करीत खालीं आपटत असलेलीं दिसलीं. त्यामुळें त्यांतील गृहादि एकहि वस्तु सुरक्षित राहिली नाहीं. ती रमणीय भ्रमण करूं लागली असतां चंद्र, सूर्य, दिवस, रात्र इत्यादि सर्व तिच्या नखाच्या अग्रांवरील रेखांच्या प्रकाशांत अंतर्भूत होऊन भ्रमण करूं लागले, तेव्हां ते सोन्याच्या सूत्राप्रमाणें दीर्घाकार दिसले. देवाच्या तुषारांनीं हारयुक्त झालेल्या व नीलमेघ हेंच वस्त्र नेसलेल्या तिच्या सृष्टि, मेघांनीं सोडलेल्या जलसमूहाप्रमाणें व स्वेदबिंदूप्रमाणें भासल्या. ( आतां सर्व जगत् तिचें अंग झालें असें वर्णन करितात— ) आकाश हेंच तिचें फार मोठें कबरीमंडळ झालें. पाताळ हे पाय, भूमि उदर, दिशा बाहू, द्विपांसह समुद्र यांच आंतड्यांसह वळ्या, सर्व पर्वत याच कुशी, आवह उद्वह, प्रवह इत्यादि वायुस्कंधरूप आकाशाचा उंच भाग हेच तिचे प्राणापानपंक्तीचे झोंके झाले. नृत्य करणाऱ्या त्या कालीच्या विस्तीर्ण शरीरावर हिमालय, मेरु, सह्य इत्यादि पर्वतांनीं आंदोलनभ्रमाचें सुख अनुभविलें. ज्यांत तरणाऱ्या पर्वतरूप मंजऱ्या आहेत अशा प्रकारच्या पूर्वोक्त मालांना जोरानें हालविणाऱ्या तिनें आपल्या तांडवलीलेनें पुनः प्रलयालाच आरंभ केला कीं काय असें वाटलें. जिचें शरीर देव, दानव, सर्प यांच्या समूहांनीं लोमयुक्त झालें आहे, अशी ती निश्चल उभी राहण्यास असमर्थ झाल्यामुळेंच तशी चक्राप्रमाणें भ्रमण करीत होती. कर्मफलभूत नानाप्रकारचें वैभव, कर्मानुष्ठानाला अवश्य असलेलें नानाप्रकारचें ज्ञान व कर्मानुष्ठानरूप यज्ञ या त्रिसूत्रांचें यज्ञोपवीत धारण करणारी ती आकाशांत नृत्य करीत असतांना जे मोठमोठे आवाज करीत होती, तेच तिचे वेदघोष असून ती ब्रह्मचारिणी असल्याप्रमाणें भासली. किंवा त्या वेळीं तिच्या त्या नृत्यानें वस्तुतः कांहीं हालत नाहीं, सर्व जसेंच्या तसेंच स्थिर आहे, पण भूतल व आकाश एकमेकांमध्यें प्रतिबिंबित होऊन एकमेकांसारखें बनतें, त्यामुळें एकदा

भूतल आकाश होतें व आकाश भूतल होतें. म्हणून पहाणाराला तीं दोन्हीं आपापल्या पदार्थांसह खालीं व वर भ्रमण करीत आहेत, असा भ्रम होतो. तिच्या नासिकारूपी फार मोठ्या गुहेंतून निघणारे व मेघाप्रमाणें गर्जना करणारे वायु मोठ्या वेगानें वहातात व वहातांना घोर घूत्कार करतात. तिच्या विचित्र हावभाव करणाऱ्या शेंकडों हातांनीं आकाश भयंकर वावटळीनें उडविलेल्या पानांनींच जणुं काय व्यापल्यासारखें दिसत होतें. माझी स्थिर दृष्टिहि युद्धांतील सैन्याप्रमाणें तिच्या अंगापासून झालेल्या जगांतील वस्तूंसह होणारीं जीं भ्रमणें त्यामुळें श्रांत होऊन कुंठित झाली. तिचे देहरूपी दर्पण फिरूं लागले असतां पर्वत गोफणींतून फेंकल्याप्रमाणें उडतात. आकाशांतून फिरणारे प्राणी भराभर खालीं पडतात व देवांचीं घरें कोसळतात. मेरु पर्वत सुकलेल्या पानाप्रमाणें उडून गेले. मलय पर्वत पल्लवासारखे हालूं लागले. हिमालय दंवाच्या कणासारखे उडूं लागले व पृथ्वीवर उत्पन्न झालेल्या कमललतेप्रमाणें त्यांचे तुकडे तुकडे झाले. पृथ्वीवर जसे पक्षी उडतात, त्याप्रमाणें सह्याद्रि उडूं लागले. विंध्य पर्वत विद्याधराप्रमाणें वृक्षाच्या भ्रमणाबरोबर फिरत असतांना आकाशांत राजहंसासारखे शोभले. द्वीपें गवताप्रमाणें व समुद्र कंकणाप्रमाणें उडूं लागले. तिच्या देहरूपी सरोवरामध्यें देवांच्या पंक्ति कमलाप्रमाणें शोभल्या. अनेक आदित्य जसे एकत्र गोळा व्हावे त्याप्रमाणें ज्याची कांति आहे, स्वच्छ आकाशाप्रमाणें जें दिसत आहे व स्वप्नांतील अंजनपुराची ज्याला उपमा आहे अशा तिच्या फार मोठ्या जंघारूपी अंगावर मेरुपर्वताच्या शिखरावरील वनांत विंध्य पर्वत आपलें फार दिवसांचें वैर साधूनच नाचूं लागला. पण ती गोष्ट सहन न झाल्यामुळें सह्याद्रि, कैलास, महेंद्र, मलय, क्रौंच, मंदर, गोकर्ण, हे पर्वत गगनांगणांत रागानें नाचूं लागले. त्यांच्या पक्षपातानें पृथ्वी व विद्याधरांचें नगर आणि सर्व वनभूमि नाचूं लागल्या. याप्रमाणें तिच्या शरीरावर सर्व स्थावर पदार्थ जंगमरूप झाले. समुद्र पर्वताच्या शिखरांवर नाचूं लागला. तो पर्वतहि अतिशय उंच आकाशकोटरांत नाचत सुटला. तें आकाशहि चंद्र-सूर्यांसह भूमीच्या खालीं चाललें. पण तें कोठें गेलें तें कळलें नाहीं. ज्यामध्यें पुष्पें सर्वतः पसरलीं आहेत तशा प्रकारचा द्वीपें, पर्वत व पत्तनें यांसह वनसमूह स्वर्गलोकांतील सूर्यादि स्थानीं जाऊन नाचूं लागला. ज्याप्रमाणें अतिशय चंचल झालेलें जगत् समुद्रांतील गवताप्रमाणें दिङ्मंडलांत भ्रमण करूं लागलें, तसेंच पर्वत आकाशांत भ्रमण करूं लागले. समुद्र दिगंतीं भ्रमण करूं लागले. नगरें व पत्तनें यांचे समूह, नद्या व सरोवरें आपल्या आश्रयभूत लोकांतून दुसऱ्या लोकांमध्यें जणुं काय आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणेंच प्रवेश करून अतिशय वाढलेल्या वाऱ्यामुळें उंच उडणाऱ्या गवताप्रमाणें भ्रमण करूं लागलीं. त्याप्रमाणेंच मत्स्य फार मोठ्या समुद्रांत जसे संचार करतात तसेंच माळभूमीवर संचार करूं लागले. नगरें भूलोकीं जशीं, तशींच आकाशांत स्थिर असलेलीं दिसूं लागलीं. पर्वत अंतरिक्षांत दिसले. आकाश व प्रलयकालच्या मेघांचे समूह उत्पातवायूनें उडविलेल्या पर्वतांवर स्थिर झाले. हें खरोखर फार मोठें आश्चर्य दिसलें. रत्नांचा जसा मनोहर वर्षाव व्हावा त्याप्रमाणेंच नक्षत्रसमूह हजारों दीपांच्या फिरणाऱ्या यंत्रचक्राप्रमाणें भ्रमण करूं लागला. हे रामा! विद्याधर व अमरगण यांनीं मोठ्या प्रेमानें तुझ्या सभेंत केलेली पुष्पवृष्टि आंत व बाहेर भ्रमण करते, त्याप्रमाणेंच तो नक्षत्रसमूह

पृथ्वीच्या आंत व बाहेर भ्रमण करीत होता. तिच्या देहावर संहार, प्रलय व सृष्टि यांचे समूह दिवस व रात्र यांच्या अल्प भागांप्रमाणें शोभत होते. त्याप्रमाणें दिवस व रात्री यांचे समूह मलिन व अमलिन अशा रुप्याच्या बिंदूप्रमाणें फारच लहान दिसत होते. कृष्ण व शुक्ल हे पक्ष सर्व बाजूंनीं ज्याला शुभ्रवर्ण व कृष्णवर्ण रत्नांनीं जडविलें आहे अशा सुंदर आरशांच्या समूहाप्रमाणें दिसत होते. त्याचप्रमाणें तिच्या शरीरावर सूर्य व चंद्र यांचीं मंडलें हींच ज्यांतील रत्नें आहेत, नक्षत्रसमूह हीच ज्यांची वर्तुलाकार कांति पसरत आहे असे हार झाले. स्वच्छ आकाशें हींच तिचीं शरीराला गुंडाळलेलीं फार मोठीं वस्त्रें झालीं. त्यांत सतत चमकणाऱ्या वैद्युताग्नीच्या पंक्ति फार मोठा प्रकाश पाडीत होत्या. तिच्या नृत्यांत कल्पांतकालीं भराभर गळून पडणारीं व झणत्कार करणारीं त्रिभुवनें रत्नें बनलीं. त्याचप्रमाणें झणत्कारानें खालीं व वर जाणारीं सूर्यादि तेजें हींच नानाप्रकारचीं नूपुरवलयादि भूषणें झालीं. ( आणखी एक मोठें आश्चर्य पहा—) संग्रामामध्यें मत्त योद्ध्यांच्या खड्गांच्या प्रभातरंगांनीं ज्यांचे दिवस कृष्णवर्ण प्रकाशयुक्त झाले आहेत, त्याचप्रमाणें त्या देवीच्या तांडवांतील भ्रमणानें छिन्नभिन्न झालेल्या पण अधिष्ठानभूत ब्रह्माच्या स्थैर्यामुळें जे सुस्थिर आहेत, अशा वरिजनसमूहांचा महान् युद्धकोलाहल ऐकूं येऊं लागले. जिचें शरीर अनंत कोटि भूत व भविष्यत् सर्ग व प्रलय यांनीं बनलें आहे अशा हिच्या तांडवांत ब्रह्मा, इंद्र, विष्णु, हर, अग्नि, सूर्य, चंद्र इत्यादि देव व असुर आपापल्या आधिकारिक प्रवृत्तींनीं दुसरे दुसरेच उत्पन्न होतात व वाऱ्यानें उडविलेल्या मशकांच्या, भ्रमरींच्या व विजांच्या सुप्रसिद्ध चांचल्यविलासानें नाश पावतात. तिच्या शरीरांत दिसणाऱ्या सृष्टींत उत्पत्ति, संहार इत्यादि परस्परविरुद्ध असलेलेहि सर्व भाव एकमेकांस स्पर्श न करतां अगदीं पृथक पृथक् अनुभवास येतात. पण क्वचित् त्यांचें मिश्रण झाल्यासारखेंहि दिसतें. तिच्या शरीरांत चिदाकाशामध्यें खोट्याच भासणाऱ्या व त्यामुळें शून्य असलेल्या संहार, उत्पत्ति, भुवन, पृथ्वी इत्यादि भ्रमांचेंहि अस्तित्व दिसतें. अधिष्ठानापासून अशा किती भ्रमांची उत्पत्ति, स्थिति, लय व व्यवहार होतात यांची यत्किंचितूहि संख्या करतां येत नाहीं. कोशामध्यें जशीं अनेक रत्नें असतात, त्याप्रमाणें तिच्या शरीरांत उत्पात, शांति, मरण, जनन, युद्ध, सख्य, द्वेष, राग, भय, विश्वास, इत्यादि परस्परविरुद्ध द्वंद्वें एकत्र भासतात. कारण तें तिचें शरीर परस्परविरुद्ध अशा अनेक सर्गपरंपरांनीं युक्त आहे. तिच्या पारमार्थिक चिदाकाशमय शरीरांत स्वभावभूत ह्मणजे अशास्त्रीय प्रतीतिसिद्ध जो मायावरणरूप अस्पष्ट अनुभव त्यामुळें जगद्व्यवस्था, सर्ग, क्षय इत्यादि भ्रम तिमिररोग्याला आकाशांत दिसणाऱ्या केंसाप्रमाणें स्फुरतात. अचल अधिष्ठानसन्मात्रस्थितींत ज्याची स्थिति आहे असें जगत् वस्तुतः अक्षुब्धच आहे, तथापि तें मायाक्षोभदृष्टीनें अतिशय क्षुब्ध झाल्यासारखें दिसतें. कारण बिंबरूपानें अचलच असलेला पर्वत चंचल आरशांतील प्रतिबिंबरूपानें जसा चंचल असलेला भासतो, तसेंच हें जगत् क्षुब्ध झालेलें भासतें. नृत्यांनीं जिचा प्रताप स्फुरण पावत आहे अशा मायेमध्यें अंतर्भूत होणारे हे सर्व जगत्पदार्थ प्रत्येक क्षणीं परिणाम पावून पूर्वस्थिति सोडतात व अन्यस्थितीचें ग्रहण करतात. याविषयीं बालकाच्या संकल्पसर्गाचाच प्रसिद्ध दृष्टान्त आहे. क्रिया, कारक, शक्ति, सर्व पदार्थांच्या उत्पत्तीच्याच उपयोगी आहेत. उत्पत्तीनंतरचे सर्व भावविकार योग्य

कालीं आपोआपच प्रवृत्त होतात. जसें मुगांची रास करतांना कारकक्रियाशक्तीचा उपयोग होतो, पण ती रास ढांसळतांना त्यांची स्निग्धता हाच स्वभाव कारण होतो. मुगांची रास ढासळतांना कारकक्रियाशक्तीची अवश्यकता नसते. यास्तव परिणाम पावणें हा ज्याचा स्वभाव आहे असें जें जड जगत् तन्मयच असल्यामुळें ती देवी प्रत्येक क्षणामध्यें निरनिराळ्या प्रकारची भासते. एका क्षणांत ती कोणत्या तरी रूपानें व्यक्त होते व दुसऱ्या क्षणीं ती निःस्वरूप बनते. क्षणभर हाताच्या अंगठ्याएवढी दिसते व लागलीच आकाशाला भरून सोडते. कारण ती संविच्छक्ति देवी सर्वजगन्मयी आहे. तिला अंत नाहीं. परमाकाशाच्या गाभ्याप्रमाणें तिचें शरीर अतिशय शुद्ध आहे; ती देवी त्रिकाळीं असलेल्या व असंख्य विचित्र परिणामांनीं शोभणाऱ्या त्रिभुवनांत रहाणारी चित् आहे. त्यामुळें चितकाराच्या उदार अंतःकरणामध्यें स्थित असलेल्या चित्रसमूहाप्रमाणें तिच्यामध्यें स्थित असलेल्या जीवाच्या काम-कर्म-वासना-परिपाकानुसार विचित्ररूपानें जगत् प्रकट होते. ती देवी अविद्येनें आच्छादित झालेलें जें एक चित्-तत्त्व तद्रूप असल्यामुळें सर्व संसारात्मक आकाराची, जणूं काय जगच्चित्राची भिंतच असते. पण वस्तुतः ती अविद्यावरणशून्य केवल चिद्रूप असल्यामुळें शान्त आकाशाकार असते. त्यामुळें ती प्रपंचशून्यच आहे. याप्रमाणें ती बद्ध जीवांच्या दृष्टीनें जगाचा आधार व मुक्त पुरुषांच्या दृष्टीनें प्रपंचशून्य असल्यासारखी दिसते. तथापि परमार्थतः ती चिदेकरूप आदि-अंतशून्य अशा स्वरूपाची दिसते. स्फटिकशिलेमध्यें ज्याप्रमाणें निरनिराळ्या आकाराचें दृश्य दिसतें, त्याचप्रमाणेंच तिच्यामध्यें हें जगत् दिसतें. कारण केवल चिदाकाश हेंच तिचें शरीर आहे, ह्मणजे जगत् हा तिचा अन्यथा परिणाम आहे, तिच्यावर भासणारा मिथ्या भ्रम आहे, असें जीवन्मुक्त समजतात व केवल तार्किक-समुद्रामध्यें जसे तरंग दिसतात, त्याप्रमाणें तिच्या ठिकाणीं हें जगत् दिसतें. कारण ती चिद्रूप आहे, असें परिणामदृष्टच्या समजतात. याप्रमाणें ती फार मोठी भैरवी देवी सर्व आकाशाला व्यापून त्या भैरवाकार कल्परुद्राच्या पुढें नाचत होती.ः कल्पांतरुद्राच्या उग्र ललाटस्थ तृतीय नेत्राचा ज्यानें आश्रय केला आहे, अशा अग्नीकडून दग्ध झालेली, त्यामुळेंच ज्यांत पर्णशाखारहित केवल झाडांचीं खोडेंच उभीं आहेत, अशा वनांनीं भूषित झालेल्या भूमीवर कल्पांतींची वावटळ जशी सुटावी, व तिनें सर्व वनपंक्ति हालवून सोडावी, तशीच ती नृत्य करीत होती. तिच्या गळ्यांत वर सांगितलेल्या पर्वतादि पदार्थांच्याच माला केवल नव्हत्या, तर कुदळ, मुसळ, उखळ, डेरे, घागरी, करंडे, स्थाली, स्तंभ, यांच्याहि जणुं काय पुष्पमालाच तिनें धारण केल्या होत्या. अशा अनेक प्रकारच्या माला एक मेकींवर आपटून त्यांतील कांहीं पदार्थ फुटत होते व इतस्ततः उडत होते. त्यामुळें एखादी लौकिक नर्तकी नृत्य करीत असतां तिच्या गळ्यांतील मालेचीं फुलें जशीं इतस्ततः उडतात, तसेच ते त्या वेळीं उडत होते. तथापि ती भैरवी त्या मालेंतील जो जो पदार्थ तुटून पडत असे त्याला फेंकून देऊन त्याच्या जागीं नवीन नवीन दुसरा पदार्थ उत्पन्न करून घालीत असे. असो, तिच्याकडून वंदन केला गेलेला तो आकाशभैरवहि तिच्याप्रमाणेंच विस्तीर्ण आकारानें त्या वेळीं जोरानें नर्तन करूं लागला. रक्तरूपी आंसवानें भरलेलें यमाच्या रेड्याचें

मोठें शृंग हातांत घेऊन ' डिंब डिंब ' इत्यादि तालव्यंजक शब्दवाद्यांनीं नाचणारा, वक्षस्थलावर रुंडमाला धारण करणारा, गरुडाच्या पंखांनीं आपलें मस्तक भूषित करणारा व प्रलयकालीं जगत् भक्षण करून आनंदित झालेल्या कालरात्रीकडून वंदन व स्तुति केली गेलेला तो भैरव तुमच्या ज्ञानप्रतिबंधक दोषांचें निरसन करून रक्षण करो. (आतां पूर्वोक्त डिंब डिंब शब्दाचा अर्थ–) हे भैरव! सर्व प्राण्यांच्या डिंबाला म्हणजे अनर्थभोगाची उपाधि अशा स्थूलशरीरादि प्रपंचाला खाऊन त्यानंतर डिंब म्हणजे सूक्ष्मशरीरादि प्रपंचालाहि भक्षण करून त्यानंतर सुडिंब–मूलोपाधिभूत कारणशरीरालाहि चरमसाक्षात्काराच्या वेळीं तत्त्वतः आविर्भूत होऊन पूर्णपणें भक्षण करून टाक. नंतर पांचव्या, सहाव्या व सातव्या योगभूमिकांवर क्रमानें आरूढ करून त्या सर्व प्राण्यांच्या जीवन्मुक्तीचा सत्वर परिपाक कर आणि शेवटीं विदेह कैवल्यानें त्यांना आपल्या उदरांत पचवून सोड. ८१.

---

## सर्ग ८२ वा.

—:०:—

१ चिद्रूप शिवाचें तत्त्व येथें अगदीं स्पष्ट करून दाखवितात. २ जोंवर तें अज्ञात असते तोंवर सविशेष व ३ परिज्ञात झाल्यावर निर्विशेष.

**श्रीरामः**—भगवन्! सर्वनाश झाला असतां ती देवी कोणत्या अंगानें नृत्य करते? नष्ट झालेल्या कुदळ, सूप, कुंभ इत्यादिकांची माला तिनें धारण केली असें तुम्हीं सांगितलेंत, पण तें कसें संभवनीय आहे? त्रिजगत् नष्ट झालें होतें. मग तें त्या कालीच्या देहावर कसें स्थित झालें? कारण नष्ट झालेलेंहि जगत् जर तिच्या शरीरावर स्थित होतें, तर उपरत झालेलें जगत् पुनः उत्पन्न होऊन त्यासह ती कशी नाचूं लागली? हें आपलें सांगणें परस्परविरुद्ध असल्यासारखें भासतें.

**श्रीवसिष्ठः**—रामा! वस्तुतः तो पुरुषहि नव्हे व ती स्त्रीहि नाहीं. तें नृत्य नव्हे व तीं दोघेंहि नव्हेत, आणि तशाच त्या दोघांच्या तशा प्रकारच्या व तसा आचार करणाऱ्या आकृतिहि नव्हेत. अनादि चिन्मात्र आकाश, कीं जें कारणाचेंहि कारण अनंत व शांत आहे तेंच अव्यय तत्त्व हें असें आभासमात्र पसरलें आहे. निरतिशय आनंदसरूप असलेलें तें सद्ब्रह्मच नीलकंठ, त्रिनेत्र इत्यादि शिवस्वरूप होऊन प्रलयकालीं उपासकांकडून भैरवाकार पाहिलें जातें. कारण त्यांच्या वासनेच्या अनुसार तो परमाकाशच त्या आकृतीनें जगत् शांत झालें असतां स्थित होतो. ज्याप्रमाणें सोनें केव्हांहि निराकार राहूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें तें शिवतत्त्व चेतन असल्यामुळें तशा प्रकारच्या स्वाभाविक वैभवावांचून राहूं शकत नाहीं. कारण हे बुद्धिमाना! चिन्मात्र चेतनावांचून कसें असेल? मिरें तिखटपणावांचून केव्हां तरी राहूं शकेल का? सोनें कटक, कुंडल इत्यादि कोणत्याना कोणत्या तरी आकारावांचून राहूं शकेल का? याचा विचार कर. अज्ञात चित्चा सविषयता हा स्वभावच असल्यामुळें त्याला आकार टाकतां येणें शक्य नाहीं. कारण स्वभावावांचून वस्तूची स्थिति कशी होईल? उंसाचा रस माधुर्यावांचून कसा राहूं शकेल, सांग बरें? जो उंसाचा रस तो जर माधुर्यरहित असेल तर तो उंसाचा रसच नव्हे. त्याच न्यायानें अचेतन असलेलें जें चिन्मात्र त्याला चिन्मात्रच

१ ' डिंबं डिंबं सुडिंबं पच पच सहसा झम्यझम्य प्रझम्यम् ' हे ते शब्द होत.

ह्मणतां येत नाहीं. चिन्मात्र आकाशाचें कांहीं-च व केव्हांहि नष्ट झालें असें ह्मणतां येत नाहीं. कारण त्यांत बाह्यदृष्टया नष्ट झालेल्या-हि पदार्थांचें स्मरण होत असतें. त्यामुळें चित्-दृष्टया कोणत्याहि पदार्थाचा निरन्वय नाश होत नाहीं. ह्मणजे त्याचें बीज अवशिष्ट रहातें. ब्रम्हा-हून जगत् भिन्न नसल्यामुळें ब्रम्हसत्तेहून त्याला निराळी सत्ताच नाहीं. त्यामुळें नाश झालेल्या-हि जगांतील ब्रह्मसत्ता कधींच नष्ट होत नाहीं. ( असें जर आहे तर ' निरुक्तं चानिरुक्तं च , तै. भा. २, ६ पृ. १३९ इत्यादि श्रुतींत ब्रम्हसत्ते-हून भिन्न रूप कसें सांगितलें आहे ? व पामर त्याचा अनुभव कसा घेतात ? उत्तर—) हा ब्रम्हा-त्मा ' बहुस्यां प्रजायेय ' या न्यायानें जगद्रूपानें अन्यत्व स्वीकारण्यासाठीं स्वतःलाच प्रथम आकाशाहून अभिन्न ह्मणजे आकाशरूप करतो. म्हणून त्याचें जें अक्षुब्ध सत्तामात्र आदि-अंत-मध्यशून्य सर्वशक्तिमय स्वरूप तेंच हें त्रिजगत्. सृष्टि, कल्पांत, आकाश, भूमि, दिशा, नाश, उत्पादन, नाम, अनाम, आभास, जन्म, मरण, माया, मोह, मांद्य, अवस्तुत्व, वस्तुत्व, विवेक, बंध, मोक्ष, शुभ, अशुभ, विद्या, अविद्या, वि-देहत्व, सदेहत्व, क्षण व दीर्घ काळ, चंचलत्व व स्थिरत्व, तूं, मी व तो हें सर्व तें शुद्ध चिदाकाशच आहे. सत्, असत्, सदसत्, मूर्खत्व व पांडित्य, देश, काळ, क्रिया, द्रव्य, कल्पना, क्रीडा, विषयज्ञान, मनःसंकल्प, कर्मे-द्रियें, ज्ञानेंद्रियें, तेज, जल, वायु, आकाश, पृथ्वी इत्यादि हें सर्व तो निरामय शुद्ध चिदाकाशच बनला आहे. आपली आकाशता न सोडतांच तो सर्वात्मा अशा रूपानें नटला आहे. हें सर्व शुद्ध चिदाकाशच आहे, यांत संशय नाहीं. समग्र जगत् विचित्र आकारानें जरी स्फुरत असलें तरी तें या चिदाकाशाहून भिन्न नाहीं. याvि-षयीं स्वप्नांतील पर्वत हाच उत्तम दृष्टांत आहे. मीं जो तुला चिन्मय परमाकाश सांगितला तोच हा शिव आहे. तो सनातन आहे. तोच हा चिन्मय हरि या रूपानें असतो. तोच पितामह होतो. चंद्र, सूर्य, इंद्र, वरुण, यम, वैश्रवण, वायु, अग्नि, मेघ, समुद्र व जी वस्तु आहे व नाहीं हे सर्व चिन्मय आकाशकोशाचे लेश आहेत. ते उत्तम प्रकारें अनुभवास येतात. वर सांगितलेल्या संज्ञांनीं व वृथा भावनेनें ह्मणजे विपरीत ग्रहण करविणाऱ्या अविद्येनें ते असे होतात. पण परमार्थ स्वभावमात्र बोधानें ते तसेच ह्मणजे चिन्मात्रस्वभाव बनतात. अबोध व बोध या रूपानेंहि चिदाकाशच स्वरू-पांत स्थित आहे. ह्मणजे कांहीं काल अज्ञ दृष्टीनें जीव-जगद्रूपानें तें स्थित होतें व त्यानंतर विद्वत्-दृष्टीनें बोध झाला असतां स्वरूपानें स्थित होतें. यास्तव भेद, अभेद, द्वैत, ऐक्य इत्यादि कांहीं नाहीं असें समजून तूं शांत हो. अर्थात् हा जीव जोंवर परब्रम्हरूप स्वस्वभाव जाणत नाहीं, तोंवर अज्ञात अशा स्वस्वरूपांत संसारमहासमुद्राची कल्पना करून जन्म, मरण, भ्रमण इत्यादि नाना तरंगांचा अनुभव घेतो आणि जेव्हां तो स्वरूपाला जाण-तो तेव्हां तन्मय होऊन निरतिशय आनंदाचा अनुभव घेतो. स्वरूपाचें ज्ञान झालें असतां तो इतका शांत होतो कीं, त्याला हा संसार-महासागरहि दिसत नाहीं व त्यावरील जन्मा-दि तरंगहि दिसत नाहींत. तर हें सर्व शांत, अनंत व निरतिशय स्वस्वरूपच जसेंच्या तसेंच त्याच्या अनुभवास येतें. ८२.

---

# सर्ग ८३ वा.

—:०:—

१ तो शिव चिन्मात्र आहे. २ कालीहि भैरवाकार नाहीं. ३ बोधासाठीं ती तशी दिसते असें कल्पनादृष्टीनें वर्णन केलें.

**श्रीवसिष्ठः**—रामा ! हा जो चिन्मात्रपरमाकाश मीं तुला सांगितला, तोच शिव आहे. अविद्याभ्रांतीचें निरसन करून तात्त्विक शिवस्वभावदृष्टि उघडावी म्हणून मीं वर जगत्प्रलय, रुद्राचें नृत्य इत्यादिकांचें स्वानुभवानुसार वर्णन केलें. पण तो परमार्थ आहे म्ह० तो सर्व प्रकार खरा—अबाधित आहे, असें तूं समजूं नको. हे धन्य पुरुषांतील श्रेष्ठा ! ती जी त्याची आकृति ती आकृति नव्हे. तें चिन्मात्रघन आकाश असून तेंच तसें नुसतें भासतें. त्यांत तत्त्वार्थ कांहीं नाहीं. कारण तत्त्वदृष्ट्या मीं त्याची आकृति केवल शांत चिदाकाशच पाहिली. पण दुसऱ्या कोणा अतत्त्वज्ञाला तशी ती दिसणें शक्य नाहीं. तो कल्पान्त, तो रुद्र, ती भैरवी इत्यादि सर्व मायामात्र आहे, असें मीं पूर्णपणें जाणलें. चिदाकाश वस्तुतः शून्यच आहे, तथापि काल्पनिक आकारानें तेंच भैरवाकार झाल्यासारखें दिसतें. कल्पनादृष्टीनें पाहिलेल्या त्या प्रलयादिकांचें तुझ्यापुढें वर्णन करणें वस्तुतः अयोग्य आहे. तथापि वाच्य अर्थ व वाचक शब्द यांच्या संबंधाची कल्पना केल्यावांचून निर्विशेष ब्रह्माचा बोध करतां येत नाहीं. म्हणून मीं कल्पनेनें पाहिलेलेंहि तें सर्व तुला निवेदन केलें. हे रामा ! दीर्घाभ्यासानें जगांत तुझी सत्यताबुद्धि दृढ झाली आहे. म्हणून जें वाणीनें आपण बोलतों तेंच एका क्षणांत मायारूप होतें. हें तुझ्या मनाला पटावें, म्हणजे काल्पित प्रक्रियेमध्यें तुझी सत्यता बुद्धि न व्हावी म्हणून त्याचें मीं निरसन केलें आहे. वस्तुतः ती भैरवी नाहीं, तो भैरव नाहीं, तो प्रलय नाहीं, तर स्वप्नांतील नगराप्रमाणें, संकल्पात्मक संग्रामवेगाप्रमाणें, कथेंतील सार्थ रसाप्रमाणें किंवा मनोराज्याच्या विलासाप्रमाणें तें सर्वच भ्रांतिमात्र आहे. चिदाकाशच त्या रूपानें भासत आहे. जसें स्वप्नांतील नगर भासतें किंवा आकाशामध्यें मौक्तिकांची कल्पना होते, किंवा रोगिदृष्टीला आकाशांत केसांचा भ्रम होतो, तसें चिद्घनामध्यें तें अचित् भ्रांतीनें भासतें. निर्दोष चिन्मात्र आकाश स्वरूपानेंच तसें भासत आहे, हें ज्ञानानें कळतें. विचित्र जगद्रूपानें जें भासत आहे तो आत्माच आहे. तंतुच पटाकार जसे भासतात, तसा चिदाकाशांत स्वतः आत्माच जगद्रूप भासतो. तो केवल कल्पनेनेंच कल्पांतींचा अग्नि बनतो. भैरव आणि भैरवी यांचें नर्तनहि चिदाकाशरूपच आहे. अर्थात् जगद्रूपानें भासणें हाच ज्याचा स्वभाव आहे, असें निर्विशेष चिदाकाशच त्या दोघां भैरवभैरवींचें तात्त्विक निराकार स्वरूप आहे हें सिद्ध होतें. आतां नृत्याची वस्तुतः अनृत्यता हीच स्थिति आहे, कारण तें नृत्य मायामात्र आहे, या अंशाचें मी वर्णन करतों तें तूं ऐक. चेतनाधातूचें चेतन स्पंदावांचून केव्हांहि राहूं शकत नाहीं. वस्तु अवस्तु जशी होऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें चेतन कोणत्याना कोणत्या तरी स्पंदावांचून रहात नाहीं. म्हणूनच सद्रूप ब्रह्म सर्व जगद्घटित वस्तु, रुद्र, देवी इत्यादि विपर्यासानें स्थित होतें. त्या सर्वांचें अधिष्ठान होणें हा त्याचा स्वभावच आहे. त्यामुळें तेंच जगद्रूपानें मिथ्या परिणाम पावतें. सोनेंच अलंकारांच्या आकारानें स्फुरतें. जेथें जेथें चेतन असेल तेथें तेथें स्वभावतःच तें अवश्य स्पंद पावणार. तें स्पंदधर्मानें युक्त आहे. कारण अधिष्ठानत्व हा त्याचा स्वभावच

आहे. जो चिद्घनाचा स्पंद, तोच या शिवाचाहि स्पंद होय. आपल्या वासनावेशामुळें तो आपोआपच तसा विराजमान होतो. ह्मणून तो कल्पान्त शिव, रौद्राकृति रुद्र, त्याचें तें भयंकर नृत्य हें आपलेंच चिद्घनस्पंदरूप आहे, असें तूं जाण.

श्रीरामः—हे भगवन्! प्रामाणिकांच्या दृष्टीनें हें दृश्य वस्तुतः नाहींच; त्यापक्षीं कांहींच प्रश्न विचारतां येत नाहीं. पण अप्रामाणिकांच्या दृष्टीनें मी विचारतों. जें कांहीं आहे असें भासतें, तें सर्व कल्पांतीं नाश पावतें. तेव्हां चित्‌ला चैत्यरहित किंवा चित् असें कसें म्हणतां येतें? त्याचप्रमाणें आश्रयाच्या अभावीं चेतायिता ह्मणजे वस्तुला प्रकाशित करणारा व करविणारा हें तरी कसें संभवतें? तसेंच आपल्याहून भिन्न अशी चितिक्रियाच जर नाहीं, तर तो चिद्घन आहे, किंवा तो इतर वस्तूंना प्रकाशित करतो हें तरी कसें समजावयाचें? म्हणजे त्याच्या ठिकाणीं त्रिपुटी उत्पन्न होत नाहीं. बरें, "अविद्या त्या वेळीं मिथ्या दृश्यालाहि दाखविते, ह्मणून त्या अविद्येनेंच त्रिपुटीची सिद्धि होते," असें म्हणाल, तर सृष्टि व प्रलय यांत विशेष कांहींच नाहीं. तसेंच सर्व जगद्घटित अशीं रुद्र व देवी यांचीं शरीरें किंवा त्यांचें नृत्य यांचाहि प्रकाशावांचून संभव नाहीं. कारण एकाच वेळीं द्वैत व अद्वैत यांची भावना करतां येणें शक्य नाहीं.

श्रीवसिष्ठः–(रामा! तूं जरी असें विचारलेंस तरी सुद्धां तुझा द्वैत व अद्वैत यांविषयींचा संशय, याच महासागराची शांति होण्यासाठीं हें उत्तर ऐक.) जर सर्व प्रलय झाल्यावर अवशिष्ट राहिलेल्या चिन्मात्र आकाशाचें कांहीं चेत्य नसेल, तर दुसरा पदार्थच नसल्यामुळें कोणत्याहि प्रदेशीं, केव्हांच, कोणाला कोणतीच वस्तु भासणार नाहीं. त्यामुळें प्रामाणिकांच्या दृष्टीनें सिद्ध असलेला नित्यमुक्त आत्मस्वभावच प्रलय आहे, असें तूं म्हणत आहेस हें सिद्ध होतें. त्यामुळें पूर्वोक्त दोन पक्षांतील पहिला पक्षच सिद्ध झाला. अर्थात् अप्रामाणिकांच्या दृष्टीनें दुसऱ्या पक्षाचा आश्रय करून प्रश्न विचारणें अयोग्य आहे. कारण पहिल्या पक्षीं कोठेंहि, केव्हांच, कांहींसुद्धां भासत नाहीं. तर सर्व शांत, निश्चल, विज्ञानघन आकाशच आहे. बरें, पहिल्या पक्षाहून दुऱ्यास पक्षांत कांहीं तरी विलक्षणता आहे हें दाखविण्यासाठीं प्रलयामध्यें अविद्यादि कांहीं चेत्य जर तूं स्वीकारशील तर त्यामुळेंच त्रिपुटी, जगद्घटित रुद्र व देवी यांचीं शरीरें, त्यांचें नृत्य इत्यादि सिद्ध होईल; आणि मी असंभवनीय असें कांहींच सांगितलें नाहीं, अशी तुझीहि खात्री होईल. हें जें कांहीं प्रलयांत दिसतें तो स्वभावच आहे, म्ह० अज्ञात आत्मस्वरूपच आहे. तें ब्रह्माचें अज्ञात स्वरूपच रुद्र, देवी, त्यांचें नृत्य या रूपानें भासतें. पण तेवढ्यानें वास्तव कूटस्थ चित्स्वभावाची हानि होत नाहीं. तो स्वभाव बाधित होत नाहीं. तर तो शांत चित्स्वभाव स्वसत्तेनच अवस्थित होतो. कारण भ्रांतीनें अन्यथा प्रतीतिहि जरी आली तरी वास्तवस्वभाव च्युत होत नाहीं. स्वप्नांत चित्च आंतल्या आंत नगर, ग्राम इत्यादिकांप्रमाणें भासते, पण वस्तुतः तें नगरादि कांहीं नसून केवल विज्ञानाकाशच आहे. त्यामुळें सर्व ज्ञेयाला जाणूनहि चित् स्वरूपानें स्वरूपांतच सर्वदा ज्ञेयशून्य असते; त्याचप्रमाणें प्रलयकालींहि सृष्टीच्या प्रथम क्षणापासून प्रलयाच्या शेवटच्या क्षणापर्यंत—जें जसें झालें तें

१ 'यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत्' (बृह. भा. अ. ४, ५ पृ. ३८२) ही श्रुति याविषयीं प्रमाण आहे.

सर्व आपलें काल्पनिक स्वरूपच आहे, असें ती जाणते. त्यामुळें तें ब्रह्म सदा सर्वज्ञ म्हणून प्रसिद्ध आहे. म्हणून तें सृष्टिकालींहि भूत कालीन व भविष्यत्कालीन हजारों सृष्टिप्रलयांसह प्रलय पहातेंच, असें समजावें. चित् आंतल्या आंत विकास पावते. तेंच तिचें स्वरूप आहे. तें चिदाकाशच आपल्या स्वभावाकाशांत ‘हा-तो, तो-मी, हा-तूं’ इत्यादि असंख्य कल्पना करतें. म्हणूनच येथें वास्तविक द्वैत नाहीं, अद्वैत नाहीं, शून्यता नाहीं, चेतन नाहीं व अचेतन नाहीं; तर तें अनिर्वाच्य तत्त्व आहे. स्वभावतः कांहींच भासत नाहीं. त्यामुळें त्याला जाणणाराहि कोणी नाहीं. अर्थात् तत्त्वाविषयीं विचार करूं लागलें असतां केवल मौनच अवशिष्ट राहतें. सर्व वाङ्मयांत निर्विकल्प समाधि हाच सिद्धान्त आहे व ती अवस्था म्हणजे जीवाचें निश्चल मौन आहे. यास्तव रामा, अगदीं निश्चल रहा! तूंहि ईश्वराप्रमाणेंच लोकदृष्टचा आपलें प्रकृत कर्तव्य म्हणजे राज्यपरिपालनादि सर्व आचार पिता, पितामह इत्यादिकांप्रमाणेंच करीत असतांनाहि आपल्या दृष्टीनें परमार्थमौन धारण कर व मान, मोह, मद, काम, क्रोध यांनीं रहित, अहंकारशून्य, आकाशाप्रमाणें निर्लेप हो, आणि शान्तीचा अनुभव घे. ८३.

---

## सर्ग ८४ वा.

—:०:—

१ शिव व शक्ति यांचें स्वाभाविक रूप, २ शूर्पादि मालांचें रूप, व ३ सत्यासत्यविचार.

श्रीरामः—हे मुने! तुम्ही ‘ती काली नाचते’ असें वर्णन केलेंत, पण तिचें स्वरूप काय होतें? व सूप, कुदळ, इत्यादि मालांनीं ती भूषित झाली होती असें जें तुम्हीं म्हटलेंत त्यांतील त्या शूर्पादिकांचें स्वरूप काय होतें तें मला सांगा.

श्रीवसिष्ठः—(पण शिवाचें स्वरूप न सांगतां त्याच्या शक्तीचें स्वरूप सांगतां येणें शक्य नसल्यामुळें दोहोंचें एकाच वेळीं निरूपण करतात—) तो भैरव चिदाकाश असून त्याला शिव असें म्हणतात; व त्याहून भिन्न नसलेली जी मनोमय स्पंदशक्ति तीच त्याची माया आहे असें जाण. (त्याच्या ऐक्याविषयीं दोन दृष्टांत—) ज्याप्रमाणें वायु व त्याचा स्पंद, उष्णता व अग्नि, यांचें ऐक्य असतें, त्याप्रमाणें चिन्मात्र व स्पंदशक्ति यांचें सर्वदा ऐक्य असतें. स्पंदावरून वायूचें ज्ञान होतें, उष्णतेवरून अग्नीचें ज्ञान होतें. त्याचप्रमाणें चिन्मय, शांत व शुद्ध ब्रह्म सर्व जगाच्या व्यवहारावरून ज्ञात होतें. त्याच्या स्पंदरूप मायाशक्तीवांचून त्याचें ज्ञान होणें शक्य नाहीं. जें शिव तेंच ब्रह्म असें ब्रह्मवेत्ते जाणतात. तें शान्त व मोठ्या वक्त्यांनाहि अवाच्य आहे. ‘सोऽकामयत बहुस्यां प्रजायेय’ इ० श्रुतींमध्यें त्या स्पंदशक्तीलाच शिवाची इच्छा असें म्हटलें आहे. तीच सत्यकाम अशा त्या शिवाच्या मनोराज्याप्रमाणें जगाचा विस्तार करते. साकार मनुष्याची इच्छा जसें कल्पनामय नगर रचिते, त्याप्रमाणेंच या निराकार शिवाची इच्छा हें सर्व जगत् निर्माण करते. ती आपल्यांतील चिदाभासानें प्रदीप्त झाल्यामुळें चिच्छक्ति व जीवचैतन्य अशी म्हटली जाते. ती जगदाकारानें परिणाम पावत असल्यामुळें ‘मायां तु प्रकृतिं विद्यात्’ इत्यादि श्रुतींत तिला प्रकृति म्हटलें आहे. दृश्याभासामध्यें अनुभव घेतलेल्या उत्पत्ति, आप्ति, विकृति व संस्कार अशा चार प्रकारच्या फलांना संपादन करीत असल्यामुळें तिला क्रिया म्हणतात. (‘द्वीपिचर्मपरीधाना शुष्कमांसातिभैरवा’

इत्यादि पुराणवचनांत तिला 'शुष्का' असें म्हटलें असल्यामुळें त्या शुष्कतेचें निमित्त सांगतात–) ज्याअर्थी समुद्रादिजलानें आर्द्र झालेला तिचा ब्रह्मांडदेह वडवाग्निशिखाकार ग्रीष्म ऋतूंतलि आदित्यादि ज्योतींच्या योगानें शुष्क होत असतो, त्या अर्थी ती 'शुष्का' अशी म्हटली जाते. ती अतिशय रागीट असल्यामुळें चंडिका होय. रक्तकमलासारखा तिचा वर्ण असल्यामुळें तिला उत्पला म्हणतात. केवळ जयामध्यें तिला निष्ठा असल्यामुळें तिला जया सिद्धींनीं तिचा आश्रय केल्यामुळें तिला सिद्धि म्हणतात. ज्याअर्थी जया, त्याअर्थींच ती जयंती. विजयानें आश्रय केल्यामुळें विजया, अतिशय वीर्यवती असल्यामुळें अपराजिता, तिच्या स्वरूपाचें ग्रहण अतिशय कष्टांनीं होत असल्यामुळें तिला दुर्ग्रहा हें नांव प्राप्त झालें आहे. ती ॐकाराची सारशक्ति असल्यामुळें तिला उमा असें म्हटलें आहे. (अ, उ, म, मिळून ॐ हें अक्षर होतें; आणि उ, म, अ, मिळून उमा हा शब्द बनतो.) ती गायनस्वरूप असल्यामुळें गायत्री किंवा गायन ह्मणजे जप करणारे जे लोक त्यांचा परमपुरुषार्थरूप असल्यामुळें ती गायत्री, स्वर्ग व मोक्ष यांचें साधन जें सर्व कर्म, उपासना व ज्ञान त्यांच्या दृष्टींचा प्रसार करीत असल्यामुळें तिला सरस्वती असें म्हटलें आहे. हिच्यापासून सर्व जगाचा प्रसव होत असल्यामुळें ही सावित्री होय. हिचें शरीर गौर अंगानीं युक्त असल्यामुळें ही गौरी. ज्याच्यापासून सर्व विश्व होतें तो भव म्हणजे ईश्वर, त्याच्या देहाशीं नित्यसंबद्ध असल्यामुळें ही भवा, निजलेल्या किंवा जागत असलेल्या त्रैलोक्यांतील सर्व प्राण्यांच्या हृदयांमध्यें अनाहत नादरूपानें अकारादि मात्रात्रयशून्य शब्दब्रम्हाच्या म्हणजे प्रणवाच्या नादभागाचा सर्वदाच उच्चार केल्यामुळें व अंगुष्ठाकार हृदयकमलछिद्रांत लिंगाकारानें स्थित असलेल्या दह्राराकाशसंज्ञक शंकराच्या मस्तकावरील भूषणभूत बिंदुरूप चंद्रकला असल्यामुळें हिला उमा[1] असें म्हणतात. शिव व शिवा अशा त्या दोघांनाहि आकाशरूपत्व असल्यामुळें त्यांचें शरीर कृष्णवर्ण दिसतें. त्यामुळें तिला काळी म्हणतात. (अहो पण चिद्रूप असलेल्या या दोघांना आकाशरूपत्व कसें ? उत्तर–) चिद्रूप असलेल्या त्या दोघांकडून आपल्या मांसमय शरीराप्रमाणें सर्गसंकल्पदृष्टीनें आपलें शरीर कृष्णवर्ण पाहिलें म्हणून कृष्णवर्ण व जड असल्यासारखें तें पाहिलें जातें. आकाशाप्रमाणेंच तीं दोघें निराधार स्थित आहेत. आकाशाप्रमाणेंच तीं दोघें अमूर्त आहेत, व आकाशाच्या वडील भावाप्रमाणेंच अति स्वच्छ आहेत. पण तीं जर अमूर्त आहेत, तर त्यांना हातपाय वगैरे कसे, व शूर्पादि माळा त्यांनीं धारण कशा केल्या, त्यांना नानात्व कोठून आलें, बहुत्व व अल्पत्व हा भेद त्यांच्या ठिकाणीं कोठून आला, म्हणून म्हणशील तर सांगतों. ती भगवती आदि-अंतरहित चितिशक्तिहि स्वेच्छेनेंच सर्व वैदिकक्रियात्मक होऊन 'दद्यात्–स्नायात्–जुहुयात्' इत्यादि वेदाविहित दान-स्नान-यागादि श्रेष्ठ शरीरानें युक्त झाली. त्यामुळें त्या देवीच्या ज्या नानाप्रकारच्या अभिनयासह नर्तनक्रिया त्याच या ब्रम्हाच्या कर्मफलरूप–सर्व प्राण्यांची उत्पत्ति-स्थिति-जरा-मरण इत्यादिरूप–रीति

१ वायुपुराणांत याविषयीं असें वर्णन आहे–'ओमित्येकाक्षरं ब्रह्म ब्रम्हणः प्रतिपादकम् । अउमेति त्रिमात्राभिः परस्तादर्धमात्रया । तत्राकारः स्थितो भागे ज्वालालिंगस्य दक्षिणे । उकारश्चोत्तरे तद्वन्मकारस्तस्य मध्यतः । अर्धमात्रात्मको नादः श्रूयते लिंगमूर्धनि' ॥

जाणाव्या. ज्याअर्थी ही देवी क्रिया आहे, त्या अर्थी निरवयव क्रियेची अप्रसिद्धि असल्यामुळें स्वरूपाच्या सिद्धीसाठींच ती हस्तपादादि अवयवांची कल्पना करिते व कल्पित ग्राम, नगरें, द्वीपें इत्यादिकांच्या समूहांच्या माळा आपल्या शरीरावर धारण करिते; आणि त्यांनीं स्पंदन करिते. म्ह० आपली क्रियारूपता प्रकट करिते. ( तिच्या ' काली ' या नांवाची व्युत्पत्ति जरी पाहिली तरी ती क्रियैकस्वभाव व ब्रह्मांडशरीरी असल्यामुळें सर्व लोक हेच अवयव धारण करणारी आहे, हें सिद्ध होतें. अशा आशयानें सांगतात– ) काली हें नांव ' कल–गतौ संख्याने च ' या धातूपासून झालें आहे. ( ' कल ' हा धातु धारणादि सर्व क्रियावाची आहे, असें वैयाकरण म्हणतात. ) त्यामुळें ही काली लक्षावधि ब्रह्मांडरूप बीजकोशांची कलिका म्हणजे कलन करणारी, उत्पन्न करणारी, धारण करणारी, परिणामादि विकारांस प्राप्त करविणारी क्रिया स्वतः होऊन कमलिनीप्रमाणें म्हणजे पद्मिनीलतेप्रमाणें काली शामवर्ण झाली आहे. त्यामुळेंच पुष्पादि अवयवभूत अशी जी पृथिव्यादि दृश्य लक्ष्मी ती आपल्या हृदयावर धारण करते. पण याप्रमाणें तिनें जगद्रूप अंग जरी धारण केलें, तरी ती चिद्देवी केव्हांहि असंग-उदासीन चिद्रूप शिवस्वभाव असल्यामुळें तिला निरवयवत्व आहे. कारण तिच्या अवयवांचा निर्देश करितां येत नाहीं. ती शिवत्वाहून भिन्न नाहीं. त्यामुळें तिचें शिवत्वच नेहमीं पहावें. ( पण अंगांच्या अभावीं तिच्या अंगांचा निर्देश कसा होऊं शकेल ? उत्तर– ) रामा ! जशी आकाशाची शून्यता, वायूचें स्पंदन किंवा चंद्राचें चांदणें हें अंग आहे, त्याप्रमाणें त्या कालीचें कालात्मक जगत् हें अंग आहे व क्रिया हें स्वरूप आहे. तथापि तिचें वास्तवस्वरूप शिव, शांत, अनायास, अव्यय व निर्मल आहे, असें जाण. त्यांतील तिचें क्रियास्वरूप केवळ अज्ञानदशेंतच तेवढें दिसतें. त्यामुळें तें मिथ्या आहे. पण ज्ञानामुळें जेव्हां तिचें तें क्रियास्वरूप बदलतें तेव्हां तिचें शिवस्वरूप प्रतीत होतें. तें ज्ञानानेंच दिसतें, म्हणून खरें आहे. कूटस्थाच्या चितिशक्तिरूप देवीचें आपल्या अविद्येमुळें जें स्वरूपांतच प्रतिकूल स्पंद, जाड्य, इत्यादि भावांनीं अवस्थान तीच क्रिया होय; आणि स्वरूपभूत, महाकृति व क्रियात्मक अशा देवी चिच्छक्तीची विद्येच्या योगानें यथाभूत स्वरूपास्थितिच सिद्ध होत असल्यामुळें तिलाच ' शिवा ' असें म्हटलें जातें. कल्पित आकार धारण करणाऱ्या तिचें सर्ग, सज्जनवर्ग, लोक, सर्व प्रकाश, द्वीपें व सागर यांसह पृथ्वी, वनोपवनांसह पर्वत, अंगोपांगांसह तीन वेद, विद्यास्थानांसह गीति, विधि व प्रतिषेध यांचे विषय, शुभाशुभ कल्पना, दक्षिणाग्नीसह पुरोडाशरूप जें अद्य–भक्षणीय तन्निरूप्य यज्ञ, राजे, उखळ, आसन, शूर्प, यूप इत्यादिकांसह श्रौत कर्में, आयुधसमूहांसह व शूल-शर-शक्ति यांसह संग्राम, भुशुंडी, गदा, प्रास, घोडे, हत्ती, योद्धे यांसह भयंकर युद्धें, भूतसंघाच्या देवादिकांसह चवदा जाती, चवदा सागर, द्वीपें, पृथ्वी व चवदा लोक हे सर्व तद्रूप अवयव आहेत.

श्रीराम:—भगवन् ! रुद्रकालीरूप चितीच्या अग्रभागीं प्रलयकालींहि भूत व भविष्यत् सर्व सर्ग व प्रलय स्थित होते असें जें आपण वर्णन केलेंत त्याविषयीं मी असें विचारतों कीं, ते तिच्यापुढें स्थित असलेले सर्ग आत्म्यामध्यें म्ह. व्यावहारिक क्रिया करण्यास समर्थ अशा सत्स्वभावामध्यें रहात होते, कीं तशा सत्स्वभावशून्य मृगजलासारखे ते होते ? म्हणजे ते सत्य होते कीं मिथ्या होते तें मला सांगा.

श्रीवसिष्ठः—रामा! ही खरोखर चिच्छक्ति आहे. त्या सत्यसंकल्परूप शक्तीनें विविध भोक्त्यांच्या वासना-कर्मबीजानुसार जी वस्तु उत्पत्तीसाठीं किंवा प्रलयासाठीं प्रेरिली, तसाच तिचा त्या भोक्त्यांनीं अनुभव घेतला. त्यामुळें त्या भोक्त्यांच्या दृष्टीनें हें जणुं काय सत्यच आहे. पण भोक्ता नसलेल्या साक्षीच्या दृष्टीनें तें अत्यंत असिद्ध असल्यामुळें जणुं काय असत्यच आहे. (सत्य कसें तें पहा—) कारण, मुखादि बाह्य निमित्तामुळें आरशांत पडलेल्या प्रतिबिंबाप्रमाणें पूर्वानुभव-वासना-निमित्तामुळें साक्षिचैतन्यामध्यें प्रतिबिंबित झालेलें तें त्याच्या आंतच आहे. त्यामुळें अर्थतः तें सत्यच आहे. (तर मग असत्य कसें? उत्तर—) त्याच्या अनुभवबलानें त्याला सत्यत्व जरी असलें तरी चिद्रूपांत अचिद्रूपाचा प्रवेश होणें अयोग्य असल्यामुळें तें संकल्पनगराप्रमाणें मिथ्याच होय. ह्मणूनच ध्यानाच्या दृढत्वानें वासनेचा क्षय केला असतां अत्यंत शुद्ध झालेल्या चितीमध्यें त्याची प्राप्तिच नाहीं. (तर मग तशा असत्य सृष्टीला सत्य मानून जीवांचा व्यवहार कसा होतो? उत्तर—) आरशांतील प्रतिबिंब, स्वप्नांतील सृष्टि, किंवा संकल्पानें रचलेलें नगर हीं सर्व त्या त्या कालीं सत्यच असतात. त्यामुळें त्यांच्या योगानें व्यवहारहि होतो हें प्रसिद्ध आहे. त्याच न्यायानें अज्ञदृष्ट्या कल्पित सृष्टिहि सत्य वाटणें व त्यांचा तसा व्यवहार होणें यांत कांहींच दोष नाहीं. आतां तूं कदाचित् ह्मणशील कीं, आरशांतील घटादि पदार्थ मला जरी दिसत असला तरी पाणी भरून ठेवणें इत्यादि बाह्य व्यवहाराच्या तो उपयोगीं नाहीं. तर तें खरें आहे. कारण आरशाच्या आंतील प्रतिबिंब बाहेरच्या व्यवहाराला कसें उपयोगी पडेल? पण तेवढ्यावरून म्ह. एके ठिकाणीं असलेली वस्तु दुसऱ्या ठिकाणचें कार्य करूं शकत नाहीं, म्हणून मिथ्या असें म्हणतां येत नाहीं. भिन्न भिन्न प्रदेशीं असलेले घटादि सर्व पदार्थ या क्षणीं तुझ्या घरांतील व्यवहार करण्याला तरी समर्थ आहेत का? नाहींत; पण आपापल्या ठिकाणीं ते आपले व्यवहार करण्यास समर्थ असतातच. त्याच न्यायानें आरसा, स्वप्न, इत्यादिकांतील पदार्थ त्या त्या अवस्थांचा अनुभव घेणाऱ्या पुरुषांच्या दृष्टीनें व्यवहारसमर्थ आहेतच. ह्मणूनच ती ती अर्थक्रिया तो तो व्यवहार पाहाणाऱ्या पुरुषाच्या दृष्टीनेंच सत्य आहे. इतराला तिचें सत्यत्व भासणें शक्य नाहीं. जागृतींतील व्यवहार स्वप्नद्रष्ट्याच्या दृष्टीनें व स्वप्नांतील व्यवहार जागृतावस्थेंतील मनुष्याच्या दृष्टीनें जरी खोटा असला, तरी त्या त्या अवस्थेचा अनुभव घेणाऱ्या पुरुषाच्या दृष्टीनें तो खोटा नाहीं. तस्मात् चिच्छक्तीच्या कोशामध्येंच या सर्व सर्गपरंपरा स्थित आहेत. आत्मा सत्य आहे असें समजून तद्रूप झालेल्या पुरुषालाच त्या तशा दिसतात. दुसऱ्या कोणाला त्या तशा दिसणें शक्य नाहीं. भूत, वर्तमान व भविष्य कालीं असलेले पदार्थसमूह, तसेच संकल्प व स्वप्न या अवस्थेंत प्रतीत होणारे सर्व पदार्थ खरेच आहेत. कारण ते जर सर्वथा असत् असते तर सर्वात्मा हें परमतत्त्व आहे असें कसें ह्मणतां आलें असतें? कारण अत्यंत असत् असलेल्या पदार्थाचें तत्त्व किंवा आत्मा कोठें प्रसिद्धच नाहीं. म्हणूनच दुसऱ्याच्या स्वप्नादि अवस्थांतील पदार्थहि योग्यांना प्राप्त होतात. योगी त्या स्वप्नपुरुषांहून जरी भिन्न असले तरी त्यांच्या हृदयांत प्रवेश करून व त्यांच्या मनोभावास प्राप्त होऊन त्यांचा स्वेच्छेनें अनुभव घेतात. ज्याप्रमाणें भिन्न प्रदेशीं विद्यमान असलेले पर्वत व ग्राम तेथें गमन केल्यानें प्राप्त होतात; त्याचप्रमाणें

योगी योगसामर्थ्यानें त्यांचा अनुभव घेतात. जसा एखादा मनुष्य गाढ झोंप घेत पडलेला आहे व तो स्वप्नांत एक मोठें-थोरलें नगर पहात आहे, पण पर्यंकावर निजलेल्या त्याला कोणी हळूच पर्यंकासह दुसऱ्या ठिकाणीं उचलून नेलें तरी तें त्याचें स्वप्न-नगर जसें कोसळत नाहीं, त्याचप्रमाणें ती काली मोठ्या वेगानें तांडवनृत्य जरी करीत असली तरी तिच्या शरीरावरील जगत् मोडून पडत नाहीं. तर तें आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें तसेंच स्थित असतें. हे रामा ! तो त्रैलोक्यरूपी महाआरंभ याप्रमाणें अधिष्ठान-सत्तेनें जरी सत्य असला तरी तो भ्रांतिमात्र आहे. भ्रांतिमात्र पदार्थ स्थित असणें किंवा तो कोसळून पडणें याचा संभव कसा आहे, तूंच सांग. स्वप्नपुर सत्य केव्हां, असत्य केव्हां, भग्न केव्हां व स्थित केव्हां असणार? त्याला केवल भ्रांतिमात्रत्व असतें. आपण जोंवर आपल्यासमोर स्वप्न पहात असतों तोंवरच तें दिसतें. तशीच ही जगल्लक्ष्मीहि भ्रांति आहे व त्यामुळेंच ती असत्य आहे असें तूं जाण. संकल्पावस्थेंत, मनोराज्यांत, स्वप्नांत किंवा भ्रमांत जसा एखाद्या नगराचा अनुभव येतो, तसाच या त्रैलोक्याचा अनुभव आहे असें तूं समज. चितीमध्यें 'अहं' असें किंवा 'जगत्' असें वस्तुतः कांहीं नाहीं. तथापि 'आकाश कृश आहे' अशा प्रकारची ही भ्रांति आहे. पण आकाशांत वस्तुतः कृशत्वहि नाहीं व कृष्णत्वहि नाहीं. विवेकपूर्वक सूक्ष्मदृष्टीनें विचार केला असतां तिचें तत्त्व कळून भ्रांति शांत होते. ८४.

---

## सर्ग ८५ वा.

—:०:—

१ देव याप्रमाणें नृत्य करणाऱ्या तिला पाहून व त्या शिवाला स्पर्श करून प्रेमानें तिच्या अंगामध्यें विलय पावले.

श्रीवसिष्ठः—याप्रमाणें अतिशय चंचल झालेल्या आपल्या दीर्घ भुजमंडलांनीं आकाशाला दाट अरण्य करणारी ती देवी वर वर्णन केल्याप्रमाणें नृत्य करीत होती. आपल्या तत्त्वाला न जाणणारी जी चितिशक्ति तीच ही क्रिया असून ती स्वभावतःच असें नृत्य करीत होती. त्या वेळीं तिनें शूर्प, कुदळ इत्यादि, बाण, शक्ति, गदा, मुसळ इत्यादि, शिलादि भाव-अभाव, पदार्थांचा समूह, कला, काल, क्रम इत्यादि भूषणें धारण केलीं होतीं. कल्पना आपल्या हृदयांत जसें नगर धारण करिते, त्याचप्रमाणें चित्स्पंद आपल्या स्वरूपांत जगाचें धारण करितो. किंवा कल्पना हेंच जसें नगर तसें चित् हेंच जगत् होय. जसा वायूचा स्पंद तशीच शिवाची इच्छा. जसा वायूमध्यें स्पंद शांत असतो, त्याप्रमाणें शिवामध्यें त्याची इच्छा शांत असते. म्हणजे जसा स्पंदरहित वायु शांत असतो, तसा शिव इच्छाशून्य व त्यामुळें अत्यंत शांत आहे. आकाशांत अमूर्त वायूचा स्पंद ज्याप्रमाणें मूर्त शब्दावडंबर करतो, त्याप्रमाणेंच त्या शिवाची इच्छा जगत् करते. नंतर त्या परमाकाशांत तसें भयंकर नृत्य करणारी ती जेव्हां काकतालीय संबंधानें प्रेमातिशयामुळें जवळच असलेल्या शिवाला स्पर्श करूं लागली, तेव्हां ती स्वतःच आपल्या प्रकृतीला जाऊन मिळण्यास प्रवृत्त झाली. म्हणजे ज्याप्रमाणें समुद्राचा जलांश आपल्या नाशाकरितांच वडवाग्नीला स्पर्श करतो, त्याप्रमाणें शिवस्वरूपाला आच्छादित करणाऱ्या आपल्या आवरणशक्तीला दूर

करून तिनें जेव्हां त्याला स्पर्श केला, तेव्हां ती तत्काल आपल्या परमकारणरूप शिवस्वरूपांत अव्यक्त रूपानें मिळून जाण्यास प्रवृत्त झाली. तिनें आपला तो अनंत आकार टाकला व ती एखाद्या पर्वताएवढी झाली. नंतर ती वृक्षाप्रमाणें सुंदर दिसूं लागली. शेवटीं आकाशाकार बनली; आणि एखादी महानदी आपला सर्व वेग शांत करून महासागरांत जशी जाऊन मिळते, त्याप्रमाणें ती शिवाच्या आकृतींतच मिळून गेली. तेव्हां त्या शिवेनें रहित असा तो एक शिवच अवशिष्ट राहिला आणि तोच कल्याणरूप शिव सर्वांचा संहार करणारा महेश्वर सर्व उत्पात शांत झाल्यामुळें सर्वत्र एक कल्याणरूप तत्त्व बनला.

**श्रीराम**:—हे भगवन्! शिवाचा स्पर्श होतांच ती परमेश्वरी शिवा शांत कां झाली? तें मला तत्त्वतः सांगा.

**श्रीवसिष्ठ**:—हे रामा! ती शिवाची इच्छा प्रकृति म्हणून म्हटलेली आहे. तिला परमेश्वराची जगन्माया असेंहि प्रख्यात नांव आहे. ती अकृत्रिम स्पंदशक्ति आहे. तो पवनाकार पुरुष प्रकृतीच्या अगदीं पलीकडे सांगितलेला आहे. तो शिवस्वरूप धारण करितो. तो शांत आहे. शरत्कालीं आकाशांत मेघांचा क्षोभ जसा नसतो, व त्यामुळें तें शांत असतें, तसाच तो पुरुष सर्वक्षोभरहित व शांतीनें युक्त असतो. परमेश्वराची ती इच्छा, ती केवळ स्पंदरूप चिच्छक्ति, ती भ्रमरूपिणी प्रकृति या संसारांत तोंवरच भ्रमण करीत असते, कीं जोंवर तिनें नित्यतृप्त, अनामय, अजर, परम, आद्यंतरहित, अद्वय शिवाला पाहिलें नाहीं. संविन्मात्रत्व याच धर्मानें युक्त असल्यामुळें ती संविद् देवी काकतालीयन्यायानें शिवाला स्पर्श करून जणुंकाय पूर्णपणें तन्मय होते. प्रकृति पुरुषाला स्पर्श करून आपलें प्रकृतित्वच ह्मणजे कार्यकारणपरिणामत्वच सोडून देते. नदीचें रूप जसें समुद्रांत मिळून जातें, त्याप्रमाणें ती त्या शिवस्वरूपांत एकरूप होते. नदी केवल जलमात्र असते, त्यामुळें समुद्राला मिळतांच ती तत्काल समुद्ररूपच होऊन त्यांत लीन होते. ज्याप्रमाणें लोखंडाच्या सुरी, चाकू, वस्तरा इत्यादिकांची तीक्ष्ण धार आपल्या जन्मस्थानभूत शिलेला प्राप्त होऊन शांत होते, त्याप्रमाणें ती चिति म्हणजे शिवाची इच्छा त्याच देवाला प्राप्त होऊन शांत होते. वनादि छायेंत प्रविष्ट झालेल्या पुरुषाची छाया जशी त्याचे शरीरांत प्रवेश करिते, त्याप्रमाणें ती प्रकृति सत्वर शिवांत प्रवेश करिते. ( असें जर आहे तर वनांतून बाहेर निघालें ह्मणजे जशी पुनः पुरुषाची छाया पडते, त्याप्रमाणें ब्रम्हाला प्राप्त झालेल्या जीवालाहि पुनः संसार प्राप्त होईल! उत्तर— ) ती चित् आपल्या पुरुषसंज्ञक सनातन स्वरूपास जाणून या संसारांत पुनः भ्रमण करीत नाहीं. कारण ती तद्रूपत्वास प्राप्त होते. एखादा साधुपुरुष चोरांच्या समूहांत, त्यांना जोंवर जाणलें नाहीं तोंवरच रहातो, हा चोरांचा संघ आहे असें कळल्यावर तो त्यांच्या संगतींत रहात नाहीं, त्याप्रमाणें चिति जोंवर त्या परमात्म्याला पहात नाहीं, तोंवर ती त्या असद्रूप द्वैतांत रममाण होते व त्यांतच भ्रमण करते, आणि त्याला साक्षात् पाहून तन्मय होते. ज्या अर्थीं चितीचें अत्यंत शांतरूप हेंच निरतिशयानंदपद आहे, त्या अर्थीं प्रकृति ह्मणजे अज्ञ चित्‌हि ज्ञानानें त्या परम पदाला प्राप्त होऊन, नदी समुद्राला मिळाल्यावर जशी समुद्रच होते त्याप्रमाणें, तद्रूपतेस प्राप्त होते. जोंवर चिति त्या निरतिशय आनंदस्वरूप परमात्म्याला पहात नाहीं, तोंवर मोहामुळें अनर्थरूप संसारांत जन्ममरणादि दशांचा

अनुभव घेत संसार करते. पण त्या परम पदाला जाणून, मधामध्यें जशी भृंगी, तशी तीहि त्यांतच निमग्न होते. रामा! त्या आत्मतत्त्वाला प्राप्त झाल्यावर त्याला कोण टाकणार? रसायनाला प्राप्त होऊन त्याचा स्वाद घेतल्यावर त्याचा कोणी तरी त्याग करतो का? जन्म, मरण, मोह इत्यादिरूप निरंतर प्राप्त होणारीं सर्व दुःखें ज्याच्या प्राप्तीनें सर्वथा शांत होतात त्याचा त्याग कोण करील? ८९.

---

## सर्ग ८६ वा.

१ ब्रम्हांडाचा ग्रास करणाऱ्या रुद्राचा देह अतिशय सूक्ष्म होऊन चिदाकाशांत गुप्त झाला. २ ब्रम्हामध्यें सर्व ठिकाणीं सृष्टिवैचित्र्य दिसतें.

**श्रीवसिष्ठः**—महाकाशामध्यें तशा आकारानें स्थित असलेला तो शरीराविषयींची भ्रांति टाकून कसा शांत होतो, तें ऐक. तो पूर्वोक्त प्रभावानें युक्त असलेला रुद्र आणि तीं दोन जगत्खंडें म्हणजे ब्रह्मांडाचें ऊर्ध्वकपाल व अधःकपाल असे तिन्ही पदार्थ त्या आकाशांत चित्राप्रमाणें निश्चल होते. मी त्या तिहींनाहि पहात उभा होतों. इतक्यांत द्यावाभूमि सूर्यरूप दृष्टीनें जशी पहाते, त्याप्रमाणें त्या रुद्रानें त्या दोन जगत्खंडांना पाहिलें आणि आपल्या श्वासवायूनें त्या दोन्ही खंडांना एका क्षणार्धांत आपल्यापाशीं आकर्षण करून घेऊन पातालासारख्या आपल्या मुखांत त्यांना टाकलें. नंतर सर्व आकाशांत जसें एक आकाशच असतें, त्याप्रमाणें ज्यानें ब्रह्मांडखंडरूप उग्र खंड आवरणासह खाऊन टाकलें आहे, असा तो एकटाच तेथें अवशिष्ट राहिला. त्यानंतर एका क्षणांत तो अभ्रासारखा लहान झाला. पुढें एखाद्या लांब काठीप्रमाणें दिसूं लागला. त्यानंतर त्याच्या देहाचें प्रमाण टीचभर झालें. पुढें त्याचा आकार कांचेच्या एका तुकड्याप्रमाणें झाला, असें मला दिसलें. पुढें तोच आकाशाहूनहि अति अणु झाला आहे, असें दिव्य दृष्टीनें मीं पाहिलें. शेवटीं तो परमाणूएवढा होऊन अंतर्धान पावला. याप्रमाणें शरत्कालच्या मेघखंडाप्रमाणें तो शांत झाला. रामा, क्षुधेनें व्याकुल झालेला हरिण एखादें लहानसें पान जसें खाऊन टाकतो, त्याप्रमाणें त्यानें आवरणांसह तीं ब्रम्हांडशकलें गिळून सोडलीं व त्याचा तो देह एवढा मोठा जरी होता तरी माझ्या डोळ्यादेखत तो अदृश्य झाला. त्यानंतर तें शांत निर्मल केवळ ब्रह्मच झालें. तें आदि-मध्य-अन्तरहित व संविद्-आकाशमात्र होतें. त्यांत दृश्यरूप मालिन्य नव्हतें. रामा! याप्रमाणें मीं त्या शिलाखंडाच्या उदरांत आरशांतलि प्रतिबिंबाप्रमाणें महाप्रलयरूप फार मोठा भ्रम पाहिला; आणि ती विद्याधरी, ती शिला, त्यांतलि तो विभ्रम या सर्वांना आठवून राजद्वारामध्यें गेलेल्या एखाद्या खेडवळाप्रमाणें मी अतिशय विस्मित झालों. मी त्या सुवर्णशिलेच्या इतर प्रदेशींहि अवलोकन केलें. तों तिच्या सर्व प्रदेशीं कालीच्या अंगाप्रमाणेंच असंख्य सर्ग आहेत, असें मला दिसलें. त्या कालीच्या शरीरांत सर्व ठिकाणीं असंख्य सर्ग मीं कसे पाहिले, तें तुला पूर्वीं सांगितलेंच आहे. त्याच न्यायानें मला त्या शिलेंतहि पूर्वीं पाहिलेल्या सृष्टीहून अन्य स्थानीं, सर्व ठिकाणीं असंख्य सर्ग बुद्धिदृष्टीनें दिसले. ते दिव्य दृष्टीनेंच दिसणें शक्य होतें. पण तीच शिला मांसदृष्टीनेंच दूर असलेल्या एकाद्या वस्तूप्रमाणें जर वरवर पाहिली तर ती एक शिलाच आहे, असें दिसत होतें. स्थूलदृष्टया ती एक शिलाच होती. त्यांत सर्गादि दुसरें कांहीं

नव्हतें. संध्याकाळचा मेघ जसा सुवर्णवर्ण दिसतो, त्याचप्रमाणें ती सोन्याची विस्तीर्ण शिला चर्मचक्षूंना फार रमणीय दिसत होती. तिच्यामध्यें जगद्वैचित्र्य मुळींच दिसत नव्हतें. त्यानंतर मीं आश्चर्यचकित होऊन पुनः आपल्या मनाशींच विचार केला, आणि त्या शिलेंतील दुसरा भाग तसाच सूक्ष्मदृष्टीनें पाहिला. तों तो भागहि जगाच्या असंख्य व्यवहारांनीं व्याप्त आहे, असें दिसलें. त्या शिलेच्या मीं पाहिलेल्या छिद्रांत पूर्वी पाहिलेल्या प्रपंचाप्रमाणेंच अनेक अर्थांनीं सुंदर झालेला प्रपंच माझे प्रत्ययास आला. वस्तुतः त्या शिलेला छिद्र नव्हतें. तथापि मला त्यांत छिद्राचा भास होऊन त्यांत प्रपंचाचाहि प्रत्यय आला. म्हणून तशाच सूक्ष्म दृष्टीनें मीं दुसऱ्या प्रदेशाकडे पाहिलें, तों तोहि तसाच सृष्टिव्यापारानें युक्त आहे, असें मला दिसलें. रामा! त्या शिलेचा जो जो प्रदेश मी पहात आहें तो तो जगद्युक्त आहे असें मला दिसलें. आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें त्या शिलेच्या प्रत्येक प्रदेशीं मला जगत् स्पष्टपणें दिसलें. तेव्हां मीं अतिशय कौतुकानें त्या पर्वताच्या सर्व शिला पाहिल्या. तसेंच, पृथ्वीचे तृण-गुल्मादि भाग पाहिले, तों त्यांत सर्वत्र तसेंच जगत् स्थित आहे, असें मला दिसलें. पण तें सूक्ष्म ह्मणजे आधिभौतिक देहभावरहित, सर्वसाक्षि- अहंभावबुद्धीनेंच विविधाकाराचें जगत् प्रत्येक पदार्थांत दिसत होतें, पण स्थूलदृष्टीनें कांहीं दिसत नव्हतें. त्यांतील एखाद्या सर्गाची अगदीं प्रथमावस्था असून त्यांत प्रजापति नुक्ता उत्पन्न झाला होता व तो नक्षत्रें, चंद्र, सूर्य, दिवस, रात्र, ऋतु, संवत्सर यांची कल्पना करीत होता. कोठें कोठें भूपृष्ठ तयार होऊन त्यांत जलसमूह नुक्ता कोठें होऊं लागला होता. कोठें सगरपुत्रांनीं चतुःसागररूप भयंकर खात अद्यापि खणलें नव्हतें. कोठें अद्यापि देव उत्पन्न झाले नव्हते. दानव मात्र उत्पन्न झाले होते. त्यांतील एकाद्या जगांत कृतयुगांतील श्रेष्ठ आचारांनीं सर्व सज्जन व इतर प्राणीहि सुखी होत होते; एकाद्या जगांत कलियुगांतलि दुराचारांनीं सर्व प्राणिवर्ग दुराचारी बनला होता; कोठें नगरांचे समूह व दैत्यांचे संग्राम यांनीं जगत् व्यापिलें होतें; कोठें मोठमोठ्या पर्वतांच्या समूहांनीं पृथ्वीला व्यापून सोडल्यामुळें तिच्यामध्यें नगर, ग्राम इत्यादिकांना वावच नव्हता. कोठें अद्यापि सृष्टीला आरंभ झाला नसून एक ब्रह्मदेवच काय तो उत्पन्न झाला होता. कांहीं जगांतील भूलोकस्थ मानव जरा-मृत्युरहित होते. कांहीं ठिकाणीं चंद्रच अद्यापि उत्पन्न झाला नसल्यामुळें शंकर शिरोभूषणरहित होता. क्षीरसागराचें मंथन झालेलें नसल्यामुळें मृत्यूनें व्यापलेल्या देवांनीं तें परिपूर्ण होतें. त्याचप्रमाणें अमृत, उच्चैःश्रवा, ऐरावत, धन्वंतरी, कामधेनु, लक्ष्मी व कालकूट यांनींहि तें रहित होतें. त्यांतील सर्व देव शुक्राचार्यांच्या संजीवनी विद्येचा नाश करण्याचा उद्योग करीत होते, म्हणजे शुक्राचार्य तपाच्या योगानें मृतसंजीवन या नांवाच्या अमरमहाविद्येचें साधन करूं लागला असतां त्याच्या तपाला विघ्न करून तिचा नाश करण्याविषयीं देव उत्कंठित झाले होते. कोठें आपल्या भावी शत्रूचा विनाश करण्यासाठीं इंद्र दितीच्या उदरांत प्रवेश करून त्यांचीं अंगें कापून टाकण्यास प्रवृत्त झाला होता. कांहीं ठिकाणीं धर्माचा अपकर्ष न होतां उत्कर्ष झाल्यामुळें सर्व लोक स्वतःसिद्ध, ज्ञानयुक्त होते. कोठें पूर्वसिद्ध रचनाक्रमाहून निराळ्या प्रकारची पदार्थरचना अनुभवास येत होती. कोठें अपूर्व

वेदशास्त्र, आचार व विचार यांचा अनुभव येत होता. कोठें कांहींएक अवशिष्ट राहिलें नसून जणूंकाय कल्पांतींचा क्षोभच राहिला होता. कोठें दैत्यांचा समूह देवांचा स्वर्गलोक उध्वस्त करीत होता. कोठें देवांच्या उपवनांतून गंधर्व व किन्नर गात होते. कोठें देव व असुर परस्परांवर प्रेम करण्यास आरंभ करीत होते. तात्पर्य हे रामा! मीं त्या मायाशबल चिदाकाशात त्या वेळीं अशा प्रकारें भूत, वर्तमान व भविष्यत् कालांतील विचित्र जगदाडंबर साक्षात् अनुभविलें. एके ठिकाणीं कल्पांत झाला असून पुष्करावर्त मेघ क्षुब्ध झाले आहेत व त्यामुळें तें ब्रम्हांड व्याकुल झालें आहे असें पाहिलें. दुसऱ्या एका ठिकाणीं सर्व भूतसमुदाय सौम्यावस्थेंत स्थित आहे, असें पाहिलें. एका जगांत मनूसह सर्व देव व दानव क्षुब्ध झाले आहेत असें भासलें. त्यांतील एका सृष्टींत अद्यापि सूर्यच उगवला नव्हता, त्यामुळें ती घन अंधकारानें व्यापली होती. दुसऱ्या एका जगांत अद्यापि अंधकाराचाच उदय झाला नव्हता. त्यामुळें त्यांतील सर्व आकाश अग्नीच्या ज्वालांप्रमाणें रम्य दिसत होतें. एके ठिकाणीं मधुकैटभ राक्षस कमलिनीच्या नालांत लपून राहिले होते. दुसऱ्या एका जगांत कमलरूपी मंजुषेंत बालब्रह्मदेव निजला होता. दुसऱ्या एके ठिकाणीं एकार्णवांतील उंच अक्षय वटवृक्षाच्या पत्रपुटावर माधव विश्रांति घेत होता. कोठें कल्परात्र सुरू असून प्रकाशरहित अंधकारानें तें जगत् व्यापलें होतें. शिळेच्या उदराप्रमाणें स्पंदरहित आकाशच पसरलें असून ह्मणजे केवल आकाशाचीच उत्पत्ति झाली असून सर्व जीवजात निजल्याप्रमाणें अप्रज्ञात, अलक्षण, अप्रतर्क्य व अविज्ञेय असेंच तें सर्वतः झोंपल्यासारखें होतें. एके ठिकाणीं पर्वतांचे पंख अद्यापि तोडले नसल्यामुळें ते कावळ्याप्रमाणें आपल्या पंखांनीं आकाशाला अत्यंत क्षुब्ध करीत होते. दुसऱ्या एका जगामध्यें इंद्र वज्रानें पंख तोडीत असल्यामुळें द्रवलेल्या पर्वतांची भयंकर स्थिति दृष्टीस पडत होती. आणखी एका जगामध्यें अमर्याद क्षुब्ध झालेला सागर पर्वतांसह पृथ्वीला हरण करीत होता. एके ठिकाणीं त्रिपुर, वृत्र, अंध, बलि यांच्या संग्रामानें सर्व जगत् व्याकुल झालें होतें. एके ठिकाणीं मत्त दिग्गजानें पृथ्वीला कांपवून सोडलें. एके ठिकाणीं कल्पांतानें शेषाच्या मस्तकावरून पृथ्वीला उलथून पाडिलें. एका जगांत बालक रामानें रावण राक्षसाला मारिलें. तर दुसऱ्या एका ठिकाणीं रावण राक्षसानें सीतेचें हरण करून रामाला ठकविलें. एके ठिकाणीं ज्याचे पाय भूमीवर आहेत व मेरुपर्वताच्या शिखराच्याहि पलिकडे मस्तक गेलें आहे अशा कालनेमि राक्षसानें अंतरिक्षाचें आक्रमण केलेलें मीं पाहिलें. कांहीं ठिकाणीं देवांना घालवून देऊन सतत दानवच स्वर्गाचें रक्षण करीत होते, तर कोठें दानवांना स्वर्गांतून हुसकून लावून देवच त्याचें रक्षण करीत होते. अर्जुनयुक्त कृष्णानें ज्यांचें रक्षण केलें आहे अशा पांडवांनीं कौरवांशीं युद्ध करून अठरा अक्षौहिणी सैन्य भारतयुद्धांत मारलें, असेंहि कोठें माझ्या प्रत्ययास आलें.

**श्रीरामः**—हे भगवन्! तर मग काय मी पूर्वींहि होतों? जर होतों तर याच शरीराकारानें होतों कीं दुसऱ्या कोणत्या?

**श्रीवसिष्ठः**—रामा! ज्याप्रमाणें शेर, पायली, इत्यादि मापें, त्याच त्या किंवा निरनिराळ्या धान्यांनीं पुनः पुनः भरलीं जातात, त्याप्रमाणें या जगांतील सर्व भाव त्याच त्या आकारांनीं किंवा निरनिराळ्या आकारांनीं पुनः पुनः विवर्त पावत असतात. कांहीं अनेकदा

जरी उत्पन्न झाले तरी आपला आकार सोडीत नाहींत, पण कांहीं अगदीं निरानिराळे आकार व गुणधर्म यांनीं उत्पन्न होतात. समुद्राच्या तरंगांप्रमाणें कांहीं भाव एकसारखेच स्फुरण पावतात. तूं पुनः होतोस; मीहि पुनः होतों व हे लोकहि पुनः पुनः उत्पन्न होतात. तत्त्वदृष्टीनें पाहिल्यास कांहींच केव्हांच उत्पन्न होत नाहीं. पण मायादृष्टीनें पाहिल्यास तेच ते पदार्थ उत्पन्न होतात, किंवा निरानिराळे होतात, याचा कांहींच निर्णय करतां येत नाहीं. किंवा समुद्रांतील तरंगांप्रमाणें त्याचा निर्णय करावा. या संसारभ्रमाबरोबर अनेक जीव येतात व अनंत भूतें जातात. समुद्रामध्यें उत्पन्न होणाऱ्या तरंगांची संख्या कोणालाच करतां येत नाहीं. किंवा एकदा लीन झालेला तरंगच पुनः उत्पन्न होतो असेंहि म्हणतां येत नाहीं. संसारचक्रांत भ्रमण करणाऱ्या भूतांना हाच न्याय लागू आहे. या संसारचक्रांत तींच भूतें उत्पन्न होतात किंवा अन्यहीं भूतें उत्पन्न होतात. तीं सर्व सारखींच असतात किंवा विषमही असतात. तात्पर्य, हे रघुनंदना! सर्व भूतें म्हणजे जगद्रूपी सागराचे तुषारसमूह आहेत, असें तूं समज. कांहीं जीव पुनः पुनः तेंच वित्त, तेच बंधु, तेंच वय, तेंच कर्म, तीच विद्या, तेंच विज्ञान व तोच आचार यांनीं युक्त असे उत्पन्न होतात; कित्येक त्यांतील अर्धभागानें युक्त असतात, कित्येक चतुर्थांश भागानें सम असतात. जीव जरी एक असला तरी त्याचीं शरीरें एकसारखींच असतात, असा कांहीं नियम नाहीं. जीव जरी तोच तो असला, तरी शरीरें अगदीं भिन्न भिन्न होतात. कांहीं जीव या सर्व वित्तादिकांनीं अगदीं सम असतात व तेच कांहीं कालानें अगदीं विलक्षण होतात. पूर्वीं सम स्थितींत नसलेले कित्येक कालानेंच वित्तादि बाबतींत अगदीं साम्य पावतात. कालानें त्यांच्या शरीरांमध्येंहि असाच विलक्षण फरक पडतो. कारण हे रामा! ते जीव राग, द्वेष, भोगलंपटता, इत्यादि दोषांनीं युक्त अशा विचित्र धर्माधर्मादि चेष्टेनें कालवशात् विचित्र नाना देह धारण करून भिन्न भिन्न होऊन अधोलोकीं व स्वर्गादि ऊर्ध्वलोकीं पुनः पुनः जातात. कारण या चंचल संसारमय सागरांत चक्रावर्तासारखीं जीं हीं भूतजलें तीं एकसारखींच असतात कीं असदृश असतात, तींच तीं असतात किंवा भिन्न भिन्न असतात याचा पूर्णपणें निर्णय करण्यास कोण समर्थ आहे? ८६.

---

## सर्ग ८७ वा.

१. स्वदेहांत विश्वकल्पना करून तिचें वर्णन करितात. २ शरीर, इंद्रियें इत्यादिकांच्या क्रमानें स्वतःचें स्वयंभूत्व.

**श्रीवसिष्ठः**—रामा! याप्रमाणें शिला, तृण, गुल्म, इत्यादिकांत विचित्र विचित्र सृष्टि पाहिल्यानंतर चिदाकाशरूप, व्यापी, अनंत, निरामय असा मी आपल्याच शरीरांतील निरनिराळ्या अवयवांमध्यें सूक्ष्म दृष्टीनें पाहूं लागलों, तों माझ्या प्रत्येक अवयवामध्येंहि अंकुर आलेल्या बीजाचीच ज्याला उपमा आहे असा सर्ग स्थित असलेला मला दिसला. खड्ड्यांत बीं पुरून त्यावर पाणी घातलें असतां त्यांतून जसा अंकुर वर येतो, किंवा पाण्याचा सेक केल्यावर बीजालाच जसा कोंब फुटतो, त्याप्रमाणें मूर्त किंवा अमूर्त चित् किंवा अचित् अशा सर्व वस्तूंमध्यें बीजांतून वर निघणाऱ्या अंकुराप्रमाणें हें जगत् आहे. ज्याप्रमाणें झोंपेंतून स्वप्नदर्शनास प्राप्त होणाऱ्या चिन्मात्र पुरुषाच्या आत्मरूप चेतनेपासूनच स्वप्नांतील दृश्यश्री विकास पावते,

किंवा स्वप्न जाऊन जागृत होणाऱ्या पुरुषाला जाग्रत्-प्रपंच जसा दिसतो, त्याचप्रमाणें मीं आपल्या अनुभवरूप स्वरूपांत सर्व सृष्टींना पाहिलें. हृदयांतील तो माझा सर्गोदय आकाशरूपाहून अन्य स्वरूपाचा नव्हता.

श्रीरामः—हे हृदयाकाश परमाकाशरूप वसिष्ठ मुने ! चिदाकाशरूप असलेल्या तुमच्या ठिकाणीं सृष्टीची प्रवृत्ति कशी होते, तें माझा बोध दृढ होण्यासाठीं पुन सविस्तर सांगा.

श्रीवसिष्ठः—रामा ! मीं त्या वेळीं स्वयंभूत्व कसें अनुभविलें तें तूं ऐक. तें वस्तुतः स्वप्नपुराप्रमाणें खोटें होतें, तथापि मला तें खरें असल्यासारखें भासलें. आकाशरूप अशा मीं त्या सुवर्णशिलेंत पूर्वीं वर्णन केलेला तो महाकल्पाचा संभ्रम पाहून शरीराच्या अन्यभागीं स्थित असलेली संवित् सृष्टि पाहण्याच्या संकल्पानें व कौतुकानें विकसित केली. ज्या वेळीं ती माझी शुद्ध संवित् थोडीशी विकास पावून स्थित झाली, त्याच वेळीं तिच्या एका प्रदेशांत मी जणुं काय आकाशता पाहिली. ह्मणजे तिच्यामध्यें अवकाशरूप आकाश उत्पन्न झालें आहे असें मीं पाहिलें. हे रामा ! जसा तूं निद्रेच्या योगानें पूर्वीं वर्णन केलेल्या स्वप्न-जाग्रल्लोकांत, स्वप्नांत किंवा स्वप्नलोकांत प्रवेश करतांना आपला आत्माच त्याचा आधार आहे, असें समजतोस, त्याप्रमाणें चिदाकाशच आकाशस्वभावास प्राप्त झालें. ( चिदाकाश अत्यंत सूक्ष्म आहे, त्यामध्यें झालेलें हें आकाश लौकिकदृष्ट्या जरी सूक्ष्म असलें, तरी चिदाकाशदृष्ट्या स्थूलच आहे. कारण त्यांत केवल चित्स्वरूपाहून जाड्यांश अधिक असतो. ) आकाशकल्पनेनेंच त्यांत चित्तचतुष्टयाचीहि कल्पना होऊन, म्हणजे तें आकाशच आरंभीं चेतनामुळें चित् होऊन तेंच 'मी आहें' अशा भावनेनें तोच अहंकार झाला. तें आकाशच आहे, अशा निश्चयामुळें व आपलें पूर्वस्वरूप विसरल्यामुळें तिलाच बुद्धि म्हटलें जातें. ती बुद्धिच संकल्प, विकल्प, काम, संशय इत्यादि कल्पनांनीं मन म्हटली जाते. तें मन शब्दतन्मात्र व इतर तन्मात्रें यांची कल्पना करून त्याच तन्मात्ररूप विषयांचें ग्रहण करणाऱ्या पंचज्ञानेंद्रियांचीहि कल्पना करतें. त्यामुळेंच सुषुप्तींतून स्वप्नांत शिरणाऱ्या पुरुषाला स्वप्नांतील सुखदुःखांचा जसा अनुभव येतो, त्याप्रमाणें पूर्वीं दुःखशून्य असलेल्या आत्म्याला या अंतर्बहिरिंद्रियांच्या द्वारा एका क्षणांत सृष्टींतील दुःख भासतें. ( अहो, पण स्वप्नांतील सृष्टि आकाशादि क्रमानें होत नाहीं, तर ती एकाच वेळीं एकाएकीं दिसते; पण जागृतींतील सृष्टि तशी नाहीं. ती क्रमानें दिसते. उत्तर—) 'परमेश्वरानें सृष्टीविषयीं आलोचन करून या सर्व लोकांना उत्पन्न केलें.' 'त्यानें तप करून हें सर्व उत्पन्न केलें' इत्यादि श्रुतींत क्रमावांचून एकाच वेळीं सृष्टि झाल्याचेंहि वर्णन असल्यामुळें आणि एका क्षणामध्येंहि दीर्घ कालाची कल्पना संभवत असल्यामुळें सृष्टीविषयीं दोन्ही पक्ष संभवतात. म्हणूनच या अनंत दृश्यजालावभासामध्यें कोणी क्रम सांगतात, कोणी सांगत नाहींत. एका क्षणा-

१. 'हृदयांतील सर्गोदय' येथील हृदयशब्दानें हृदयाकाश व 'आकाशरूप' येथील आकाश-शब्दानें चिदाकाश विवक्षित आहे. हा तुमच्या अभिप्राय मला कळला हें सुचविण्यासाठीं रामानें असें संबोधन योजिलें आहे.

१ 'स ईक्षत लोकान्नु सृजा इति । इमाँल्लोकानसृजत' ( ऐत भा. अ. ४ खं. १ पृ. ७१, ७३ )

२ 'स तपस्तप्त्वा इदं सर्वमसृजत' ( तैत्ति. भा. अ. २ अनु. ६ . पृ १३१ )

मध्यें दीर्घकालाची जशी कल्पना होते, त्याप्रमाणेंच परमाणूमध्यें दीर्घ देशाचीहि कल्पना करून त्यांत ब्रह्मांडात्मक चेतन आत्म्यालाच कल्पनेनें मी 'अहं' असें म्हटलें व तसाच 'अहं' बनलों. पण वस्तुतः मी शुद्ध आकाशच होतों. ज्याप्रमाणें आकाशांत वायु सतत स्वभावतःच वहात असतो त्याप्रमाणें मन स्वभावतःच सर्वत्र शरीरादिकांची कल्पना करतें. त्या पहिल्या मनाच्या कल्पनाशक्तीनें जसें रूप कल्पिलें, तसेंच तें दिसूं लागलें. कारण प्रथम मनःसंकल्पानें कल्पिलेल्या वस्तूला मोठ्या यत्नानेंहि अन्यथा करतां येत नाहीं. यास्तव ती पहिली कल्पनाच पुढील सर्व कल्पनांतील स्थिर नियति होय. म्हणूनच मी वस्तुतः अपरिछिन्न असूनहि त्या शक्तीच्या परिच्छेदकल्पनेनें अनुरूप म्हणजे परिच्छिन्न झालों. त्यानंतर मीं सूक्ष्म शरीराचा अनुभव घेतला. तें माझें लिंगशरीर चित्प्रतिबिंबव्याप्ती-मुळें तेजःकणाकार होतें. नंतर त्याचीच भावना करणारा मी स्थूलत्वास प्राप्त झालों, म्हणजे मीं माझ्या स्थूलदेहाचा अनुभव घेतला. पुढें मी सूक्ष्मबोधानें जों इकडे तिकडे पाहूं लागलों, तोंच माझ्या ठिकाणीं ज्ञानाचीं अनेक द्वारें उत्पन्न झालीं आहेत असें दिसलें. त्यातील कोणत्या द्वाराचें कोणतें नांव तुझ्या-सारख्यांनीं कल्पिलें आहे तें मी सांगतों. रामा! हीं त्यांचीं मुख्य नांवें आहेतः—ज्या छिद्रानें मी पहावयास प्रवृत्त झालों त्याला 'चक्षु' म्हणतात. त्यानें मला जें दिसतें तें दृश्य होय. दर्शन हें त्याचें फल आहे. जेव्हां मी पहातों तेव्हां तोच काल झाला. जसें पहातों, तोच क्रम, ज्यांत पहातों, तेंच आकाश, मी जेथें स्थित होतों, तो देश. याप्रमाणें ती देश-कालादि नियति तत्काल उत्पन्न झाली, आणि पुढें तीच कल्पना उत्तरोत्तर दृढ झाली. हल्लींच्या दृष्टीनें सर्व चिद्विकाररूपच आहे. त्यामुळें मीच तन्मात्रांचें कारण आहें, आणि आपल्या कल्पनेनेंच मीं हा सारा विस्तार केला आहे, असें मला कळलें. पुढें माझा बोध विकास पावला. तेव्हां मी कौतु-कानें दोन रंध्रांनीं जें पाहिलें तेंहि अशून्यच होतें. ज्या दोन रंध्रांनीं पाहिलें तेच हे नेत्र होऊन राहिले. इतक्यांत मी कांहीं तरी ऐकत आहें अशी भावना उत्पन्न झाली. मला कांहीं वेळानें मोठा झंकार ऐकूं आला. तो आका-शाचा स्वाभाविक शब्द असून शंखाच्या नादाप्रमाणें मला ऐकूं आला. पण ज्या द्वारांनीं मीं तो शब्द ऐकला, तींच हीं दोन श्रवणछिद्रें होत. सूं सूं असा आवाज करीत माझ्या आसपास संचार करणाऱ्या वायूच्या योगानें मला अगदीं सूक्ष्म स्पर्शसंवेदन झालें. मला शरीराच्या ज्या भागानें त्या स्पर्शाचा अनुभव आला त्याला त्वक् असें ह्मणतात. ज्यानें माझ्या अंगाला स्पर्श केला असें मला त्या वेळीं वाटलें, तोच वायु असून मला त्याच्या स्पर्शाचा अनुभव आला. अनुभव घेणारा जो मी त्या माझ्या ठिकाणीं वायूच्या स्पर्शाचें ग्रहण कर-णारें स्पर्शनेंद्रिय तन्मात्र होतें. माझ्यामध्यें रसाला जाणण्याची शक्ति होती, तेंच सर्व रसाला जाणणारें माझ्या ठिकाणचें रसनेंद्रिय होय. माझ्या घ्राणापासून घ्राणतन्मात्र उत्पन्न झालें. तें गंधतन्मात्ररूप असून गंधाचा अनु-भव घेत असे. याप्रमाणें ही सर्व देहेंद्रिय-विषयसंपत्ति कल्पनामात्र असल्यामुळें आका-शरूप अशा माझ्या ठिकाणीं त्यांतील कांहींच झालें नाहीं, अथवा सर्वच झालें. याप्रमाणें इंद्रियें व तन्मात्र म्हणजे विषय यांचा समूह सिद्ध होतांच माझी इच्छा नसतांहि त्यांच्याच बळानें पांच भोगरूप कल्पना माझ्या ठिकाणीं उत्पन्न झाल्या. शब्द, रूप, रस, स्पर्श, गंध,

हेंच ज्यांचें स्वरूप आहे अशा त्या विषयानुभवकल्पना मिथ्या असल्यामुळेंच निराकार व भ्रांतिमात्र भासणाऱ्या होत्या. याप्रमाणें सर्व शरीरसंपत्तीनें युक्त होऊन त्यालाच 'हा मी' असें जेव्हां समजूं लागलों, तेव्हां तुझ्यासारखे लोक त्याला 'अहंकार' असें बोलूं लागले. शरीरेंद्रियसमूहाला 'मी' असें समजणें हाच अहंकार असून त्यापासून बुद्ध्यादि पुढील कल्पना होत असतात. तो अभिमानच दृढ निश्चयानें जेव्हां स्थिर होतो, तेव्हां त्याला बुद्धि ह्मणतात. ती बुद्धि 'संकल्पविकल्प' करूं लागली ह्मणजे 'मन' या संज्ञेस प्राप्त होते. तें मनहि पुनःपुनः विषयांचें स्मरण करूं लागलें म्हणजे चित्त होतें. याप्रमाणें प्रत्येक शरीरांतील अंतःकरणचतुष्टय तयार होतें. असो, मी त्यांत स्थूलशरीररूपी बनून स्थित झालों, तथापि माझें वास्तविक स्वरूप चिदाकाशच होतें. शून्य—केवल आकाशरूप असलेला मीच पवनादिक आहें. ज्याअर्थी मी शून्याकार आहें त्याअर्थी कल्पना केल्या जाणाऱ्या सर्वच पदार्थांचा अनिवारक आहें. म्हणजे कोणाच्याहि अस्तित्वाला मी प्रतिबंध करीत नाहीं. याप्रमाणें भावना करून मी जेव्हां त्या कल्पनेंत चिरकाल स्थित झालों, तेव्हां मीं आपल्याला चतुर्मुख देहानें युक्त असल्याचें पाहिलें, म्हणजे मीच स्वतः ब्रह्मदेव आहें असा मला प्रत्यय आला. रामा! स्वप्नांत आकाशांतून उडून जाणारा पुरुष जसा शब्द करतो, त्याप्रमाणें मी तसल्या देहप्रत्ययानें शब्द करूं लागलों. आरंभीं मीं एखाद्या लहान मुलाप्रमाणें 'ओं' असा शब्द केला, तोच पुढें ओंकार या नांवानें प्रसिद्ध झाला. पुढें स्वप्नांतील पुरुष जसा कांहीं तरी बरळतो, त्याप्रमाणें मी पूर्वपरिचित व्याहृति, गायत्री, वेद इत्यादि कांहीं बोललों. तीच पुढें 'वाक्' या नांवानें प्रसिद्ध झाली. याप्रमाणें मी सृष्टीचा कर्ता जगद्गुरु ब्रह्मदेव झालों. त्यानंतर मनोमय चतुर्मुख देहानें मीं अनेक सृष्टि कल्पिल्या. याप्रमाणें मी उत्पन्न झालों, पण वस्तुतः त्यांतील कांहींच उत्पन्न झालें नाहीं. मीं आवरणयुक्त ब्रह्मांडाला आपल्या स्थूलदेहाप्रमाणें पाहिलें. ब्रह्मांडाच्या बाहेरचें मला कांहीं दिसलें नाहीं. याप्रमाणें माझें हें मनोमय जगत् जरी उत्पन्न झालें होतें, तरी त्यांतील कांहींच सत्य नव्हतें. तें केवल शुद्ध चिदाकाशच होय. रामा! हाच न्याय सर्व सृष्टींना लागू आहे. मीं वर वर्णन केल्याप्रमाणें हें सर्व आहे असें जरी भासलें तरी तें सर्व शून्यच होय. तें केवल कल्पनामय आहे. हे पृथिव्यादि पदार्थ यत्किंचित्हि नाहींत. चिदाकाशांत या जगद्रूपी मृगजळाच्या नद्या कल्पनामात्र भासतात. यांत बाह्य म्हणून कांहीं नाहीं व त्या बाह्यामध्यें आकाशहि नाहीं. तर एक ब्रह्माकाशच या सर्व आकारांनीं नटलें आहे. मरुभूमीवर पाण्याचा संभवच नसतो. तथापि तृषाक्रांत हरणाला तें तेथें दिसतें. त्याप्रमाणें संविद् तें सर्व तसें पाहते. आपल्या संभ्रमानें युक्त असलेली ती कांहीं कारणावांचूनच आंतल्या आंत क्षुब्ध होऊन भ्रम पाहते. ब्रह्मामध्यें जगत् नाहींच, तथापि अज्ञानावृत संविद् तें तसें पाहते. तिच्या जगद्भ्रमाला कांहीं कारण नाहीं. ती अज्ञानावृत झाल्यामुळें स्वभावानेंच तो पाहते. हें सर्व नसतांनाच भासत आहे. हें जगत् हृदयांतच असें विस्तारलें आहे. जसा संकल्प, मनोराज्य किंवा स्वप्नांतील नगर तसेंच हें आहे. आपल्या जवळच निजलेल्या मनुष्याचें स्वप्न योगसामर्थ्यानें त्या शरीरांत प्रवेश करून त्याच्या चित्तांत गेल्यावांचून दिसत नाहीं, त्याप्रमाणें शिलेंतील जगत्हि योगसामर्थ्यानें कल्पनाधिष्ठानभूत चिद्रूप शिलेच्या आंत प्रवेश केल्यावरच दिसणार हें उघड आहे. पण तें जरी दिसलें

तरी आरशांतील प्रतिबिंबाकारच असतें. तें दिसलें तरी सत् नव्हे, तर असत् होय. पण आधिभौतिक भावानें म्ह० बाह्य स्थूल दृष्टीनें पाहिल्यास तेथें जगत् वगैरे कांहीं दिसत नाहीं. तर तो केवल लोकालोक पर्वतच दिसतो. पण आतिवाहिक देहानें श्रेष्ठ बोधदृष्टीनें जर पाहिलें तर त्यांत सर्ग दिसतो; पण तो केवल परमात्माच आहे, असें योगी जाणतात. अत्यंत शुद्ध झालेली तत्त्वदृष्टि व योगिदृष्टि जें पहाते तें शंकर तीन नेत्रांनींहि पहात नाहीं व इंद्र सहस्र नेत्रांनींहि पाहूं शकत नाहीं. यास्तव तत्त्वदृष्टिच सर्वोत्कृष्ट होय. मी तत्त्वदृष्टीनें पाहिल्यामुळें त्या वेळीं जसें आकाश तशीच भूमिहि सर्व बाजूंनीं सृष्टीनें व्याप्त आहे असें मला दिसलें. तेव्हां मी पृथ्वीच्या ठिकाणीं धारणा स्थिर करून ध्यान करूं लागलों. 'मीच पृथ्वी आहें' अशा धारणेनें मी पृथ्वीरूपधारी झालों. जसा एखादा चक्रवर्ती राजा देहच मी हा अहंभाव न टाकतांच सर्व भूमंडलावर ममता ठेवतो, ह्मणजे हें भूमंडल माझें असें समजतो, तसाच मीहि आपल्या ब्रह्म-भावाला न विसरतांच पार्थिवाच्या ठिकाणीं अहंभाव धरल्यामुळें पृथ्वीरूपधर झालों. 'ही पृथ्वीच मी' या धारणेनें भूमीवर 'मी' असा अभिमान ठेवणाऱ्या जीवाच्या बुद्धीशीं तादात्म्य पावून माझा देह द्वीपें, पर्वत, गवत, वृक्ष इत्यादिकांनीं युक्त आहे असा अनुभव घेतला. मी भूपीठ बनलों. नानाप्रकारचीं अरण्यें हेच माझ्या अंगावरील केंस झाले. नानारत्नें याच वलयांनीं माझें शरीर व्यापलें. अनेक नगरें हींच माझीं भूषणें असून ग्राम, गुहा, याच पर्वांनीं तें युक्त होतें. पातालछिद्र हेंच माझें उदर, व कुलपर्वत याच भुजा असून त्या द्वीपें व समुद्र या वलयांनीं युक्त होत्या. तें माझें भूपीठरूपी शरीर अंगावरील लवीनें संपन्न होतें. पर्वतांचे उंचवटे हेच त्या शरीरांतील गुल्म-रोग होत. त्या माझ्या 'भू' शरीराला दिग्गजांनीं आपल्या मस्तकसमूहांनीं धारण केलें होतें. शेषाच्या सहस्र शिरांनीं त्याला उचलून धरलें होतें. राजे अतिशय शोभणाऱ्या मदोन्मत्त गजांनीं युक्त अशा सेनाजालांनीं परस्पर युद्ध करून त्याचें हरण करीत होते. सर्व प्राणी त्या भूपृष्ठाचा व्यवस्थेनें उपभोग घेत होते. हिमालय व विंध्य हेच माझ्या शरी-राचे उंच स्कंध असून सुमेरु हीच माझी उत्तम कंधरा (मान) होती. गंगादि नद्यांचे पूर याच मोत्यांच्या हारांनीं ती माझी तनु भूषित झाली होती. मोठमोठ्या गुहा हेच त्यांतील कच्छादि देश व समुद्र हेच आरशांचे समूह असून मरुदेश व शुभ्र आकाश यांनीं तें शरीर सुंदर दिसत होतें. तें पूर्वीच्या प्रलयकालांतील महार्णवांनीं परिपूर्ण झालेलें व त्यामुळेंच आतां स्नान करून वर आल्याप्रमाणें सर्व प्रकारें पवित्र झालें होतें. तें माझें भूशरीर पुष्पवनांनीं भूषित झालें होतें, त्यामुळें तें मालांनीं अलंकृत झाल्याप्रमाणें दिसत होतें. दाट धूळ याच चंदनाच्या उटीचा त्याला लेप दिला होता. शेतकरी त्याला नेहमीं नांगरीत होते, त्यामुळें अंग खाजविल्याचाच मला अनुभव येत होता. थंड वायु त्यावर वारा घालीत होते. तप्त सूर्य त्या माझ्या शरीराला तापवीत होते. पावसाचें पाणी त्याला भिजवीत होतें, समभूप्रदेश हेंच माझें उरःस्थल असून कमला-कर याच नेत्रांनीं मी पहात होतों. शुभ्रवर्ण व कृष्णवर्ण मेघ हेंच त्या माझ्या शरीराचें उष्णीष—शिरोवेष्टन होतें. दशदिशांतील अव-काश हेंच माझें गृह. लोकालोक पर्वताच्या समीप असलेलें जें महाखातवलय तद्रूप उग्रमुखानें तें माझें शरीर भयंकर दिसत होतें. भूतांचा परिस्पंद ह्मणजे हालचाल हीच त्या

शरीराची हालचाल व त्यांचें एकत्र झालेलें चेतन हेंच माझ्या शरीराचें चेतन होय. नानाभूतसमुदायांनीं तें आंतून व बाहेरून व्याप्त झालेलें होतें. देव, दानव, गंधर्व यांनीं त्याला बाहेरून व्यापलें होतें व मनुष्यादि इतर सर्व प्राणी याच कीटांनीं त्याला आंतून व्यापलें होतें. पातालछिद्रांतून नाग व असुर हेच कृमींचे सयुदाय असून सात समुद्रांच्या कोशामध्यें जलचररूपी कृमि वास करीत होते. सारांश हे रामा! हें माझें भूशरीर नद्या, वनें, समुद्र, दिगंत, पर्वत, द्वीपें या प्राण्यांना उपभोग्य अशा स्थल व जंगलरूप ओघांनीं व्यापिलेलें होतें. त्यांतील निरनिराळे प्रदेश पर्वत व नद्या इत्यादिकांच्या समूहांनीं व लोकांनीं व्यापले होते. त्याचप्रमाणें वेली, सरोवरें, लहानलहान नद्या, शत्रुगण व कमलाकर यांनींहि तें व्याप्त होतें. ८७

## सर्ग ८८ वा.

—:०:—

१ स्वदेहभूत भूपीठांत ठिकठिकाणीं व्यवस्थित असलेल्या व कौतुकानें स्वतः पाहिलेल्या विशेषांचें वर्णन.

श्रीवसिष्ठः—मनुवंशांत उत्पन्न झालेल्या बा रामा! वर वर्णन केल्याप्रमाणें भूपीठरूप झालेल्या मीं आपला देह याप्रमाणें साधारण सर्व भूधर्मांनीं युक्त आहे असें पाहिल्यानंतर त्यांतील प्रत्येक पदार्थांचे विशेष आकार आपलेच आहेत, असें पाहण्याच्या इच्छेनें त्यांचा कसा अनुभव घेतला तें तूं ऐक. त्या माझ्या भूशरीरांतील कांहीं प्रदेशीं पति, पुत्र, भ्राता इत्यादिकांच्या मरणामुळें आक्रोश करणाऱ्या स्त्रियांविषयीं करुणा उत्पन्न होत होती. कांहीं ठिकाणीं स्त्रीसमूहांच्या स्वैर महोत्सवांचें महासुख अनुभवास येत होतें. कांहीं ठिकाणीं भयंकर दुर्भिक्ष झाल्यामळें जीव 'हाय हाय' करून वाटेल तें दुराचरण करण्यास प्रवृत्त झाले होते, तर कांहीं ठिकाणीं वृष्टि चांगली झाल्यामुळें सर्व प्रकारच्या धान्यांनीं संपन्न व त्यामुळेंच अतिशय प्रेमळ—परस्परांवर प्रेम करणारा जनसमूह दिसत होता. कांहीं ठिकाणीं अग्नीच्या भयंकर दाहानें देह दग्ध झाल्यामुळें जीवांना भयंकर वेदना होत होत्या. कांहीं ठिकाणीं पाण्याचा भयंकर पूर आल्यामुळें पुरें[1], पत्तनें वाहून गेलीं होतीं. कांहीं ठिकाणीं चपल सामंतांकडून म्हणजे मांडलिक राजांकडून देश लुटला जात होता. कांहीं ठिकाणीं राक्षस व पिशाच यांचा भयंकर दुष्टपणा अनुभवास येत होता. कांहीं ठिकाणीं जलाशयांच्या पूर्तीनें व शेतें, उपवनें, इत्यादिकांच्या सेकांनीं सृष्टीला सर्व बाजूंनीं शोभा आली होती. वायूनें ज्यांना उडविलें आहे असे मेघ पर्वतांच्या दऱ्यांतून भराभर निघून चालले होते. हर्ष झाला असतां अंगावर जसे शाहारे येतात, त्याप्रमाणें माझ्या पृथ्वीरूप शरीरांतून अंकुर उत्पन्न झाले होते. जलाच्या वाहण्यानें क्षोभ उत्पन्न होऊन भूपृष्ठ कांहीं ठिकाणीं नम्र झालेलें व कांहीं ठिकाणीं उंच झालेलें दिसत होतें. त्यामुळें कांहीं ठिकाणीं मोठमोठ्या शिला आंत पडून दऱ्याहि शृंगयुक्त असल्यासारख्या दिसत होत्या व कांहीं ठिकाणीं तशा प्रकारचीं नगरेंहि दृष्टीस पडत होतीं. माझ्या भूरूपी शरीरावर नगरांतील जन चालूं लागले असतां त्यांचीं पावलें रुपतील या शंकेनें मी आपलें

---

१. जेथे योद्धे अधिक असतात तें पुर, व ज्यांत वैश्यवर्ग मोठा असतो ते पत्तन.

अंग अगदीं मृदु केलें होतें. कोठें राजांचा संग्राम सुरू असून अतिशय क्षुब्ध असलेल्या दोन्ही सैन्यांचा संहार चालला होता. कांहीं ठिकाणीं सर्व सामंतचक्र अतिशय सौम्य व सुखानें राहिलें होतें. कांहीं ठिकाणीं शून्य अरण्य असून त्यांत वायूचा झंकार सुरू होता. कांहीं ठिकाणीं जंगल तोडून व भूमि शेतकीला योग्य अशी करून त्यांत शेतें पेरलीं होतीं. कांहीं ठिकाणीं हंस व कारंडवपक्षी यांनीं व्याप्त असलेलें सरोवर प्रफुल्लित कमलांनीं अतिशय शोभत होतें. कांहीं ठिकाणीं माळ-जमीन असून तींत वारा जोरानें वहात होता. त्यामुळें धूळ उडून मोठमोठे स्तंभाकार प्रतीत होत व वायुहि त्या धुळीनें शुभ्रवर्ण असल्यासारखा भासूं लागे. कांहीं ठिकाणीं नदी व नद यांच्या प्रवाहांपासून सहज निघणारा कर्कश ध्वनि ऐकूं येत होता. कांहीं ठिकाणीं अंकुर हें कार्य उत्पन्न व्हावें म्हणून पाट, घट इत्यादि साधनांनीं ज्यावर जलसेक केला आहे असें शेतांतील बीज अंकुरभाव धारण करीत होतें. कांहीं ठिकाणीं 'हे वसिष्ठा! मी शिलादि संकटामध्यें पडलों आहें हें जाणून तूंच आतां माझें रक्षण कर,' असें म्हणून जणुं काय कीट आपल्या मुखांनीं मला सूचनाच करीत आहेत असें वाटे. कांहीं ठिकाणीं पर्वतांच्या अस्थिच अशा शिलांना निबिड वृक्षांनीं परस्परांना दृढालिंगन देऊन जणुं काय पीडाच देण्यास आरंभ केला, तों समुद्राच्या भरतीनें त्यांना येऊन वेढलें, असेंहि दिसत होतें. कांहीं ठिकाणीं दाट वृक्षांनीं आपल्याला भूमीवर पसरण्यास निरोध केला आहे असें समजून त्या अपराधामुळें रागावलेल्या सूर्यकिरणांनीं त्यांच्या अंगांतील रस शोषून घेतला. त्यामुळें जणुं काय त्या वृक्षांचीं पानें सुकून संकोच पावलीं आहेत, असें वाटत होतें. कांहीं ठिकाणीं पर्वतशिखरावर राहणारे हत्ती वृक्षांवर आपल्या दांतांचे भयंकर प्रहार करीत होते. पण ते वृक्षहि अतिशय बळकट असल्यामुळें ते जेव्हां मुळापासून उपटून पडत तेव्हां मलाहि वेदना होत असे. कांहीं ठिकाणीं नेत्र मिटून तत्त्वाचा अनुभव घेत असल्यामुळें ज्यांचीं शरीरें आनंदित झालीं आहेत अशा योग्यांप्रमाणें माझ्या अंगावर अपूर्व रोमांच आल्यानेंहि मला भासत होतें. माझ्या भूपृष्ठाचा कांहीं प्रदेश माशा, उवा, डांस यांच्या निवासस्थानासारखा दिसत होता, तर कांहीं ठिकाणीं कमलांना जसे भ्रमर त्याप्रमाणें माझ्या अंगाला हत्ती आपल्या दंतरूपी नांगरांनीं नांगरीत होते. हिमालयादि कांही प्रदेशीं माझें शरीर अतिशय शीत होतें. त्यामुळें थंडीनें ज्यांचें सर्व शरीर फुटलें आहे, अशा मनुष्याप्रमाणें त्या प्रदेशांतील माझी त्वचा जर्जर होऊन गेली होती. कांहीं ठिकाणीं पाणी पाषाणासारखें घट्ट झालें होतें. कांहीं ठिकाणीं भयंकर वायु वहात होता. कांहीं विदीर्ण झालेल्या मृदु अंगांमध्यें कृमींचे समूह लिवलिवत होते. कांहीं ठिकाणीं अंगादिकांचें मूळ उद्भवत होतें. कांहीं ठिकाणीं मी जलनिमज्जनाचा अनुभव घेत होतों. कांहीं ठिकाणीं बीजांवर वर्षाव होत होता, त्यामुळें अंतर्गत जलानें माझ्या शरीराला आल्हाद होत होता. त्यामुळेंच त्यांवर अंकुररूपी रोमांच बाहेर व्यक्त होत होते. सरोवरांनीं माझ्या अंगावर मंद वायूंनीं हालविलेल्या कोमल कमलदलास्तरणांनीं अतिशय आनंदरूप विहारच केला. ८८

---

## सर्ग ८९ वा.

—:०:—

१. धारणेनें पाहिलेल्या या भूमंडलाप्रमाणेंच चिदाकाशांत सर्व जगत् मनोमय आहे.

**श्रीरामः**—हे गुरो! कौतुकानें आपल्या स्वरूपांत जगें पाहण्यासाठीं प्रवृत्त झालेले आपण पार्थिव धारणा धरून आम्हांला दृश्य असलेला हा मृत्पाषाणादिमय लोक झालां, कीं मनोमात्रमय मृदादिकांनीं युक्त नसलेला स्वप्नमय लोक झालां?

**श्रीवसिष्ठः**—रामा! तूं कल्पनादृष्टीनें जर विचारीत असशील तर मृत्पाषाणादिमयत्वानें तुला प्रसिद्ध असलेलें व तेंच मनोमात्र विकाररूप असल्यामुळें मानस अशा दोन्ही प्रकारच्या जगांचा माझ्या ठिकाणीं समुच्चय झाला; आणि तत्त्वदृष्टच्या जर विचारीत असशील तर मी दोन्ही प्रकारचा झालों नाहीं. हें भूपीठ मनावांचून केव्हांच संभवत नाहीं. जें सत् किंवा असत् तूं जाणतोस तें सर्व मनोमात्रच होय. मी शुद्ध चिदाकाश आहें. त्या तत्पदरूप असलेल्या माझें जें चिन्मात्ररूप स्फुरण तोच संकल्प होय. तें मन, तें भूपृष्ठ, तें जगत् व तो पितामह हें सर्व संकल्पपुराप्रमाणें चिदाकाशांत मनोमयरूप विकास पावतें. याप्रमाणें माझ्या संकल्पानेंच तें मनोमय भूपृष्ठ विकास पावलें. धारणाभ्यासानें त्याचीच वासना दृढ होऊन हें भूमंडल असें प्रत्ययास आलें. वस्तुतः पहातां तें भूमंडलहि नव्हे व दुसरेंहि कांहीं नव्हे; तर तें केवळ मनोमय आकाशमात्र स्फुरण आहे. चितीनें जडरूपानें प्रतीत होणें हा भ्रामक अन्यथाभाव आहे. आकाशरूप असलेलें तेंच चिरकाल त्याचरूपानें स्थित असतें. तथापि 'इदं म्हणजे हें.' या प्रत्ययाचा तें विषय होतें व तेंच जगत् होय. त्रिभुवन हें चिद्रूप बालकाचें म्हणजे ब्रह्मदेवाचें मनोराज्य आहे असें तूं समज. हें सर्व महीतलादि दृश्य सर्व कालीं चिन्मय आहे. कारण चिद्रूप आत्म्याचा संकल्प त्याहून निराळा नसतो. जगत् संकल्पमय आहे. त्यामुळें तें सत्यस्वरूप नाहीं. वस्तुतः त्याला कांहीं आकार नाहीं व तें असें भेसुराहि नाहीं. जोंवर तत्त्वतः जाणलें नाहीं तोंवर हें दृश्य आहे, पण तत्त्वतः जाणलें असतां तेंच चिन्मात्र बनतें. म्हणजे अज्ञात चिन्मात्रच जगत् आहे. ज्ञात चिन्मात्र जगत् नव्हे. मी आज बरेच दिवस ज्याचा उपदेश करीत आहें व तूं जें ऐकत आहेस तेंच ज्ञात चिन्मात्र होय, हें तुला कसें कळत नाहीं? सर्व शांत चिन्मात्रच असून तें आत्मस्वरूपांत आत्मरूपानेंच विकास पावतें. तें भूमंडलरूप नाहीं, दृश्यरूप नाहीं; द्वैत व ऐक्य यांनीं रहित आहे. ज्याप्रमाणें वैडूर्यादि मणी शुभ्र, पिवळी इत्यादि कांति स्वभावतःच —स्वतः कोणतीहि क्रिया न करतांच उत्पन्न करतो, त्याप्रमाणें चिदाकाश हें जगत् करतें. तें स्वतः कांहींच करीत नाहीं व आपलें स्वरूपहि सोडीत नाहीं. तस्मात् आपल्याला मनोमय भासणारें सूक्ष्म जगत्हि नाहीं व पृथिव्यादि बाह्य जगत्हि नाहीं. जसें स्वरूपतः निर्मल असलेलेंहि आकाश मल व तल यांनीं युक्त असल्यासारखें दिसतें, त्याप्रमाणें निरंतर चिदाकाशच भूतलाप्रमाणें भासतें व त्याचें स्वाभाविक स्फुरण हेंच जगाचें स्वरूप असून तेंच जगद्रूपानें अवस्थित आहे. भेद पावण्याचा किंवा स्वतः अंतर्धान पावण्याचा जो त्याचा स्वभाव तेंच हें भूमंडल होय. हें भूमंडल व तें धारणेनें कल्पिलेलें भूमंडल हीं दोन्ही वस्तुतः एकच आहेत. दोन्ही चित्चे अन्यथा परिणाम आहेत. तुझें चिद्रूप स्वप्नांतील नगर जसें होतें, तसेंच तें दोन प्रकारचें भूमंडल महाचितीमध्यें भासतें. हें

भूमंडलहि केवल चिदाकाशरूप आहे व तेंहि तसेंच आहे. अज्ञानोपहित ह्मणजे सोपाधिक आत्म्याच्या अज्ञानामुळें तें भासतें. पण ज्ञानामुळें हेंहि नाहीं व तें धारणास्थ भूतलहि नाहीं. त्रिकालीं असलेलें त्रैलोक्यजाल व भूतसमूह ही भ्रांति आहे. स्वप्नांतील संकल्प किंवा मनोराज्यदर्शेतील वस्तु यांसारखाच तो भ्रम आहे. भूत, भविष्यत् व वर्तमान अशीं जीं त्रैकालिक भूमंडलें त्या सर्वांचें सत्तासामान्य आत्मसत्ताच आहे. ह्मणजे तीं सर्व आत्म्याच्या सत्तेनेंच आहेत अशीं भासतात. त्यामुळें सर्व वस्तूमध्यें मीच अशी धारणा ठेवल्यामुळें तीं सर्व भूमंडलें व त्यांतील सर्व वस्तु यांचा मीं मनानें अनुभव घेतला, ह्मणजे साक्षिदृष्टया त्यांतील सर्व माझ्या अनुभवाचा विषय झालें. हे रामा! परमात्मतत्त्वच अज्ञानदशेंत आपली सिद्धात्मता न सोडतां हें सर्व जगत् बनतें. तें आपलें स्वरूपच आहे, सद्रूप आहे, खरें आहे असें भासत होतें, पण तेंच ज्ञात झालें असतां आपल्या स्वरूपांत असला कोणताहि भ्रम धारण करीत नाहीं व तीच मुक्ति होय. ८९.

---

## सर्ग ९० वा.

१ पृथ्वीच्या हृदयांत सर्व अनंत सृष्टि, व २ जलधारणेनें पूर्वींप्रमाणें सर्व जललीला.

**श्रीरामः**—हे ब्रह्मन्! ज्याप्रमाणें या जगांतील सुवर्णशिलादि असंख्य भिन्न प्रदेशांमध्यें अनेक ब्रम्हांडें आहेत, तशीं तीं धारणेनें पाहिलेल्या भूमंडलांतील प्रत्येक वस्तूमध्यें आहेत कीं नाहींत? ह्मणजे तुम्ही धारणेनें पाहिलेल्या भूमंडलांत तशींच असंख्य भूमंडलें पाहिलींत कीं काय?

**श्रीवसिष्ठः**—हे रामा! 'पृथ्वीच मी' या धारणेनें परमात्म्याच्या जागृतींतील भूमंडलरूपानें व स्वप्नांतील भूमंडलरूपानें त्यांतील प्रत्येक पदार्थांत ईश्वरसाक्षिदृष्टीनें सर्वांचा साक्षात् अनुभव घेतला व मनानेंहि अनंत जगांची कल्पना केली, तों मला सर्व ठिकाणीं जगज्जाल असलेलें दिसलें. वास्तविक तत्त्व जरी शांत असलें तरी सर्व दृश्यमय व द्वैतमय भासलें. सर्व ठिकाणीं विश्वें आहेत व सर्वत्र ब्रम्हहि आहे. सर्व शून्य, परम शांत आहे व अनेक आरंभांनीं व्याप्त आहे, असें मीं पाहिलें. सर्व ठिकाणीं स्थूल पृथिव्यादि आहे, पण तें सर्व असत् आहे. स्वप्ननगर जसें खरोखर उत्पन्न होत नाहीं पण भासतें, तसेंच चिदाकाशच तें सर्व मिथ्या भासतें. या आत्मस्वरूपांत नानात्व नाहीं, अभेदहि नाहीं, नास्तित्व नाहीं व अस्तित्वहि नाहीं. 'मी' ही भावनाहि खरी नाहीं. मग दुसरें कोठें काय असणार? हें सर्व खरें आहे, मी आहें, असा जरी अनुभव येत असला तरी त्यांतील कांहींच खरें नाहीं. जर कांहीं खरें असलेंच तर तें अनामय ब्रम्ह आहे. कारण सृष्टीच्या पूर्वीं एक चिदाकाशच होतें. त्यामुळें सृष्टीनंतर चिदाकाशांत हें सर्व जरी दिसलें तरी तें स्वप्ननगरासारखेंच आहे. तेव्हां अस्तिता किंवा नास्तिता यांतील कशाचा त्यांत संभव असणार? ज्याप्रमाणें मीं संकल्पानें पृथ्वीचें रूप धारण करून तीं सर्व विश्वें पाहिलीं, त्याचप्रमाणें जलधारणेनें जलतत्त्वरूप होऊन तसेंच तें जगन्मंडल पाहिलें. जलधारणेनें मी जलरूप होऊन व चिद्रूप असतांना जड बनून समुद्रमंदिरांतून चिरकाल गुलगुल असा ध्वनि करूं लागलों. तुझ्या अंगावर एखादी ऊ किंवा मुंगी जशी चढून जाते, त्याप्रमाणें मी तृण, वृक्ष, गुल्म, लता, वल्ली यांच्या गाभ्यांत शिरांतून अगदीं हळू व त्यांना न कळत चढून

गेलों. ज्याप्रमाणें कर्णाहि नांवाचा एक सूक्ष्म तंतूसारखा किडा हळूच कानांत प्रवेश करतो, त्याप्रमाणें मी त्या तृणगुल्मादिकांच्या निरनिराळया अवयवांमध्यें पेरांतून—उदरांतील छिद्रांतून संचार केला. वेली, तमाल, ताल इत्यादि वृक्षांचे पल्लव, फळें यांमध्यें रसरूपानें विश्रांति घेऊन पर्णादिकांच्या रूपानें यथाकालीं पुष्ट होऊन, त्या त्या पर्णादिकांच्या आकृतींतील शिरारूपी रेखांची रचना केली. त्याचप्रमाणें प्राण्यांच्या शरीरांत जलपानसमयीं मुखांतून हृदयांत प्रवेश करून, वसंतादि ऋतूंमुळें प्राप्त होणारें जें वैषम्य त्यांचें धारण करणाऱ्या मीं, वात्त, पित्त कफ, या नांवाच्या धातूंचें हरण केलें. केव्हां त्यांना नाहींसें केलें, कोठें त्यांचा भोग घेतला, म्हणजे जठराग्नीच्या द्वारानें त्यांना शुष्क करून ठेवलें, व कोठें खंडित करून ठेवलें. एकाच वेळीं सर्व दिशांतील सर्व पल्लवरूप शय्येवर दंवाचे कण या रूपानें सुखानें शयन केलें. डोहरूपी जे नद्यांचे हितावह निवास ( राहण्याचीं स्थानें ) त्यांकडे नित्य वहात जाऊं लागलों. कांहीं कांहीं ठिकाणीं धरण याच मित्राच्या प्रसादानें मीं विश्रांतिहि घेतली. चैतन्यानें जडांशाचें विषयत्वानें अनुसंधान केल्यामुळें व जडानें त्याचा आश्रय न केल्यामुळें मी भोंवऱ्याप्रमाणें गरगर फिरणाऱ्या जलानें तेथें विलास केला. म्हणजे ज्याप्रमाणें मूढांच्या अंतःकरणांत अनेक भ्रम उद्भवतात, त्याप्रमाणें जलरूप अशा माझ्यामध्यें अनेक विवर्त उत्पन्न झाले. एखादा दुराचरणी मनुष्य जसा शतधा अधःपात पावतो, त्याप्रमाणें मी पर्वतांच्या उंच शिलांवर स्वस्थ असूनहि आपल्याच सखल प्रदेशाकडे गमन करणें या स्वभावदोषामुळें दऱ्यांतून शेंकडों गतींनीं पळत सुटलों. लांकडांतून धूमरूपानें निघून मी गगनरूपी समुद्रांतील जे नीलवर्ण नक्षत्रमणी त्यांतील एक रत्नकण होऊन राहिलों. शेषाच्या अंगावर जसा श्रीविष्णु विश्रांति घेतो, त्याप्रमाणें मीं आपल्या विद्युद्रूपी भार्येसह इंद्रनील मण्यासारख्या नीलमण्यांनीं अभ्रपीठावर विश्रांति घेतली. ज्याप्रमाणें सर्वांचा आत्मा असें ब्रह्म सर्व पदार्थांमध्यें व्यापून असतें, त्याप्रमाणें मी परमाणूसारख्या अति सूक्ष्म शरीरांतील नाड्यांतूनहि गुप्तपणें जलरूपानें राहिलों. त्या तसल्या अतिसूक्ष्म शरीरांतहि मधुरादि रसरूपांनीं असलेल्या मीं त्यांच्या जिव्हारूप अणूंशीं संयुक्त होऊन त्यांचा रसस्वाद या रूपाची अति अनुभूति केली, म्हणजे रसस्वाद घेतला. पण तो रसानुभव नुसत्या देहाचाहि नव्हे, व ज्ञानाचाहि नव्हे; तर तें आत्म्याचेंच विषयानंदरूपानें प्रकट झालेलें रूप आहे, असें मीं समजतों. जें चेत्य —विषयरूप त्याचा मीं किंवा त्याच्या देहानें किंवा त्याच्या जीवानेंहि स्वाद घेतला नाहीं. कारण विषयांमध्यें सुखाचा लेशहि नसतो. त्यामुळें त्यांच्यामध्यें आस्वाद घेण्याची योग्यता नसते. तें तशा प्रकारचें विषयरूप चित्तानें आंतल्या आंत प्रकाशित केलें आहे व तें जीवांच्या मोहाला कारण होतें. विषयांप्रमाणेंच तें अज्ञानहि मिथ्या आहे. अर्थात् सामान्य लोक विषयच आनंदरूप आहे असें जें समजतात तें खोटें आहे. त्यामुळें विषय आस्वाद घेण्यास योग्य आहेत, असें ह्मणतां येत नाहीं. पण तसाहि जरी पक्ष स्वीकारला तरी विषयाधिष्ठान चित्तत्त्वानें ज्यांचा आस्वाद घेतला आहे, अशा उच्छिष्ट विषयांसच प्रायः इतर जीव भोगतात, अशीच कल्पना करणें भाग आहे. कारण सर्व दिशांमध्यें सर्व ऋतूंतील रसरूपानें स्थित असलेल्या

१. याविषयीं ' एतस्यैवानंदस्यान्यानि भूतानि मात्रामुपजीवन्ति ' बृह. भा. ४, ३२ पृ. २१३ ही श्रुति प्रमाण आहे.

चित्तत्वानें नानाप्रकारच्या सुवासांनीं युक्त असलेलीं पुष्पें भोगून ह्मणजे त्यांचा वास घेऊनच भ्रमराला दिलेलीं असतात, ह्मणजे मीच सर्व ऋतूंतील रसरूपानें पुष्पांचा स्वाद घेतों, व मग ती उष्टीं पुष्पें सर्व प्राण्यांच्या उपभोगासाठीं देतों. चौदा प्रकारच्या भूतांच्या अंगसंधींमध्यें मीं वास केला. मी कल्पनेनें जरी जडरूप झालों होतों, तरी स्वरूपानें अजडच होतों. सुवासाप्रमाणें मींहि वायुरूपी रथावर शीकरसमूहरूपानें आरोहण करून निर्मल आकाशमार्गांतून विहार केला. रामा ! त्या अवस्थेंत मीं प्रत्येक परमाणूच्या कणांत या जगासारखेंच जगत् पाहिलें. मी अजड असूनहि जड असल्याप्रमाणेंच त्या जलविषयक तुल्य धारणेनें सर्व पदार्थांत अज्ञातरूपानें राहिलों. त्यांतील प्रत्येक अवयवामध्यें लक्षावधि विश्वें माझ्या दृष्टीस पडलीं. त्यांत शेकडों विनाश व उत्पात माझ्या दृष्टीस पडले. केळीच्या सोपटांप्रमाणें एकांत एक अशीं असंख्य जगें त्यांत होतीं. तात्पर्य, रामा ! जगत् किंवा अजगत्, साकार किंवा निराकार असें जें जें कांहीं आहे, तें सर्व चिन्मात्राकाश आहे. तें सर्व आकाशाहूनहि निर्मल आहे. हे दाशरथे ! तीन अवस्थांसह देह इत्यादिकांचा समूह वस्तुतः नाहीं. हा आकाशादि बाह्य प्रपंचहि नाहीं. तर तो सर्व उपाधिशून्य शुद्ध बोधच आहे. तोच या सर्व आकारांनीं भासतो. तो बोध दृश्यस्वभाव नाहीं, अदृश्यस्वभाव नाहीं व अदृश्यशून्यस्वभावहि नाहीं. तर अखंड आकाशस्वरूपच आहे. तोच तूं आहेस. यास्तव हा सर्व द्वैतसंकोच टाकून तूं अखंड एकरूपानें रहा. ९०.

---

# सर्ग ९१ वा.

—:०:—

१. तेजोधारणेनें तेजोभावास प्राप्त होऊन पाहिलेल्या सूर्य, चंद्र, अग्नि, रत्नादि चमत्कारांचें वर्णन.

**श्रीवासिष्ठः**—हे रामा ! त्यानंतर अतिशय उज्जवल तेजोधारणेनें मी चंद्र-सूर्य-तारा-अग्नि इत्यादि विचित्र अवयवांनीं युक्त झालों. सतत सत्त्वप्रधानत्वामुळें सर्व जगाला व्यापून मी प्रकाशाकार बनलों. त्यामुळें अंधकार सर्व दृश्याला सोडून चोराप्रमाणें पळून गेला. ज्याप्रमाणें एखादा चांगला राजा अनेक वेषांनीं विहार करणाऱ्या आपल्या स्निग्ध हेरांच्या द्वारा प्रत्येक गृहांतील सर्व वृत्तांत प्रत्यक्ष जाणतो त्याप्रमाणें शेंकडों वातींतून विहार करणाऱ्या स्नेहयुक्त दीपादिकांच्या योगानें सर्व विषय मीं प्रत्यक्ष पाहिले. परप्रकाशामध्येंच रत असलेल्या व त्यामुळें लोक आणि भुवनें यांच्या प्रकाशानें अति संतुष्ट झालेल्या चंद्र-सूर्यादि किरणरूप रोमांनीं आकाशरूप वस्त्र वर उंच उचललेलें आहे, असा भास होत असे. किंवा चंद्र-सूर्यकिरणरूप रोमांनीं तें तेज अंधकाररूप वस्त्राला दूर करीत होतें. ( त्या अंधकाराला तें तेज दूर कां ठेवीत होतें म्हणून म्हणशील तर सांगतों—) कारण विद्यमान जगत् रूपादि सर्व गुणांचा नाश करणाऱ्या अंधकाररूप दैन्याचा विषय आहे व सर्वगुणशाली म्हणजे दुसऱ्याचें दैन्य घालविण्यास समर्थ असलेल्या पुरुषाच्या दर्शनास तें उत्तम जगत् पात्र आहे, ह्मणून तें तेज अंधकाराला घालवितें, हें योग्यच होय. तमोरूपी तमालवृक्षांना तोडणारा तो परशुच आहे. तेज हें एक उत्कृष्ट शुद्धि करणारें स्थान आहे. तें सुवर्ण, रत्न, माणिक, मोतीं इत्यादिकांना जीवन देणारें आहे. तेज हें त्याच्या प्रकाशरूपी अंगावर नित्य शयन

करणाऱ्या शुक्ल, कृष्ण, रक्त इत्यादि सर्व वर्णांना पुत्राप्रमाणेंच देह देणारा पिता आहे. या तेजाचा पृथ्वीशीं अतिशय स्नेह आहे. पृथ्वीवर त्याची फार प्रीति आहे. कारण त्यानें अग्निदहनापासून तिचें रक्षण केलें आहे. अग्नि सर्वदाहक असूनहि मृत्तिकेला जाळीत नाहीं, हेंच त्याच्या प्रीतीचें लक्षण आहे. तसाच पृथ्वीचाहि त्यावर अतिशय स्नेह आहे व तो प्रकट करण्यासाठींच तिनें प्रत्येक घरांत भिंती, प्रासाद इत्यादिरूपानें आच्छादित करून त्याच्या दीपकपुत्राला वायूपासून रक्षिलें आहे. तमोरूप पातालांत अग्नीचें प्रकाशन अगदीं थोडें होतें. भूतसंघानें युक्त असलेल्या रजोरूप भूतलीं तो अर्धवट प्रकाशित होतो व सत्त्वरूप देवांच्या गृहांमध्यें तो नेहमीं महाप्रकाशानें युक्त असतो. तेज हा जगद्रूप जीर्ण कुटींतील दीप आहे. जल व तम यांना भक्षण करणारा तो फार मोठा कूप आहे. दिग्वधूंना प्रकाशित करणारा स्वच्छ आरसाच आहे. रात्र व धुकें यांना उडविणारा तो वायुच आहे. चंद्र, सूर्य व अग्नि यांचें जीवितसर्वस्व आहे. स्वर्गलोकाचें कुंकुमलेपन आहे, ह्मणजे द्युलोकाच्या अंगाला तेजोरूप केशराची जणुंकाय उटीच लावली आहे. तें तेज म्हणजे दिवसरूपी धान्याचें क्षेत्र आहे. तमानें आच्छादित होणाऱ्या रूपांचा अनुग्रह आहे. तें आकाशरूप मोठ्या कांचपात्राचें प्रक्षालन करण्यास योग्य असें जल आहे. सर्व पदार्थांना तें सत्ता देत असल्यामुळें व सर्वांना प्रकाशित करीत असल्यामुळें चिन्मात्र पदार्थाचा सख्खा धाकटा भाऊच आहे. कारण चिन्मात्रलक्षण परमार्थ चेतन, व हें जड एवढाच या दोहोंमध्यें फरक आहे. हा क्रियारूप कमलिनींचा सूर्य ह्मणजे त्यांना विकसित करणारा असून भूतलोदराचें जीवित आहे. नेत्रांनीं रूप पाहणें व त्यामुळें रूपाची कल्पना होणें, यांच्या योगानें वृत्त्यारूढ झालेल्या चैतन्याप्रमाणें विषयावरील आवरणरूप अंधकार घालविणारा चमत्कार आहे. ह्मणजे वृत्त्यवच्छिन्न चैतन्य आवरणाचा जसा नाश करतें, तसें हें तेज विषयाला आच्छादित करणाऱ्या अंधकाराचा नाश करतें. किंवा प्रस्तुत तेज हा ब्रम्हांडरूप भयंकर खातांतील मोठा सागरच आहे. आकाशतलावर चमकणारीं असंख्य नक्षत्रें हेच त्यांतील रत्नांचे समूह आहेत. सर्व बाजूंनीं अतिशय वाढणाऱ्या दिन-ऋतु-वत्सरादि वडवाग्नीकडून क्षोभ होत असल्यामुळें हा फेनयुक्त झाला आहे. चंद्रार्कादिरूप तरंगांत पसरलेल्या रजांनीं जलावांचूनच हा महासागर पंकिल ह्मणजे पंकयुक्त झाला आहे. याप्रमाणें हा ब्रम्हांडखातांतील अक्षय एकार्णवच आहे. रामा! याप्रमाणें मी तेजोरूप होऊन सुवर्णादिकांमध्यें सुवर्णत्व झालों. पुरुषादिकांमध्यें पराक्रम झालों. रत्नादिकांतील चकाकी झालों. वृष्ट्यादिकांमध्यें विद्युत्प्रकाश झालों. मुखासारख्या इंदुबिंबांतील चांदणें झालों व पापण्यांनीं युक्त असे नेत्र, हेंच ज्यांतील चिन्ह आहे, अशा मुखरूप इंदुबिंबांमध्यें चांदण्यासारख्या स्नेहामृताचा पूर ज्यांतून स्रवत आहे असा हास-सौहार्दयुक्त भास झालों. कामिनीजनांमध्यें मी कपोल, बाहु, नेत्र, भ्रू इत्यादिकांना लावण्यातिशयानें प्रकाशित करणारा अजिंक्य म्हणून प्रसिद्ध असलेला स्वाभाविक कामविलास झालों. ज्यांनीं सर्व त्रिभुवनाला तृणासारखें तुच्छ केलें आहे व तलहाताच्या चापटीनें ज्यांनीं शत्रूंना छिन्नभिन्न करून सोडलें आहे अशा महापराक्रमी वृत्रादिकांच्या मस्तकावरील वज्रप्रहार झालों. सिंहादिकांच्या चित्तांतील वीर्य बनलों. अतिशय कठीण कवचांना तोडणाऱ्या

खड्गांच्या संघट्टणानें ज्यांतून खणखणाट निघत आहे असें योद्ध्यांचें रणांगणांतील भयंकर अटन व त्याला कारण होणारें त्यांचें वीर्य मी स्वतः बनलों. देवांमधील दानवशत्रुत्व व दानवशत्रूंतील देवशत्रुत्व मींच झालों. सर्व भूतांतील ओजस्त्व व स्थावरादिकांतील उंची, त्याचप्रमाणें वायूच्या वेगानें स्थावर पदार्थ न नमण्यास कारण होणारें त्यांतील बळ मी झालों. हे कमलनयन रामा! त्यानंतर मी आपल्या धारणेनें कल्पिलेल्या जगदाकाशकोशांत स्वतः सूर्य बनून पुढें सांगितलेलें सर्व आपल्याच स्वरूपांत पाहिलें. तुझी मरुभूमि आपल्यामध्यें नद्यादिकांची कल्पना जशी अनुभविते, त्याप्रमाणें मी आपल्या स्वरूपांत या सर्वांचा अनुभव घेतला. मी स्वतः सूर्य झालों आहें असें पाहिलें, व दाही दिशांमध्यें आपले किरणरूपी हात पसरून पर्वत हींच ज्याचीं अंगें आहेत, अशा जगद्रूप पक्ष्याला धरूं लागलों. मीं एका लहानशा गांवाप्रमाणें सर्व भूतल पाहिलें. चंद्रविकासी कमलांमध्यें त्यांच्या कोशबंधनाला कारण होणारें चक्र झालों. अंधकाररूपी सागरांतील मी वडवाग्नि बनलों. ब्रह्मांडरूप गृहांतील दीप झालों. दिवसरूप फलपंक्तीचा आधारभूत वृक्ष झालों. त्याचप्रमाणें द्युलोकाचें वदन व रसायनाचा जणुं काय डोहच असा मी बनलों. निशारूपी राक्षसीचें जणुं काय हंसणेंच व निशाचरांचा प्रकाशक असा चंद्र होऊन मीं चंद्रत्वाचा अनुभव घेतला. त्यामुळें मी जगल्लावण्यरूप सर्व लक्ष्मींचें उपमास्पद झालों. रजनी, रोहिणी, स्त्रिया व चंद्रविकासी कमळें यांना अतिशय प्रिय झालों. त्याचप्रमाणें सर्व प्राण्यांचा नेत्रसमूह व मुख यांच्या आल्हादाला व विकासाला कारण झाल्यामुळें त्यांना मीं प्रिय झालों. आकाशरूप लतेचा पुष्पसमूह बनलों. स्वर्गसुखरूप ओघांत म्हणजे त्याच मकरंदरूप प्रवाहांत आसक्त झालेल्या मशकसंघाप्रमाणें अतिशय क्षुद्र नक्षत्रपटलहि मीच बनलों. त्याचप्रमाणें मीं रत्नत्वाचाहि अनुभव घेतला. त्यामुळें वैश्यांच्या हातांनीं व ताजव्यांतील तोलण्यांनीं मला आंदोलनाचा अनुभव आला. पूर्वीं समुद्रांत असतांना तरंगरूपी हस्तांनीं जसें आंदोलन अनुभविलें होतें, तसाच येथेंहि अनुभव आला. समुद्रांमध्यें जलाचें प्राशन करणारा वडवाग्नि होऊन मला भ्यालेल्या क्षुद्र मत्स्यांच्या परिभ्रमणाचें कौतुक मीं पाहिलें. तसाच सर्व ठिकाणीं जलाचें शोषण करणारा सूर्यकिरणसमूहरूप होऊन मी आपल्या शरीरांत प्रकाशाचा अनुभव घेतला. मेघ पर्वतादिकांत प्रवेश करून वीज व दावाग्नि यांचा त्या त्या शरीरांत अनुभव घेतला. तसाच मी अग्निभावास प्राप्त होऊन काष्ठांचा ज्या रीतीनें नाश होईल, तसा प्रदीप्त झालों. त्यामुळें काष्ठांचा कठोर ध्वनि होऊं लागला. तसाच मी यज्ञाग्नि होऊन नाना प्रकारच्या हविर्द्रव्यांचा दाह करणें या कल्याणाचा अनुभव घेतला. त्या अग्निस्वरूपांत असतांना लावण्यातिशयानें देदिप्यमान होणाऱ्या सुवर्णादिमय महज्ज्योतीला, कोशागाराला जाळून, मीं तुच्छ केलें व त्यांच्या स्वामींना अतिशय संताप दिला. अनेक बळवान् पामर पंडिताच्या पांडित्याला वितंडवादांनीं जसे तुच्छ करतात, त्याप्रमाणें मीं सुवर्णादि तेजाचा पराभव केला. मी मोत्यांचा हार होऊन असुर, नाग, गंधर्व, मनुष्य, यांच्या मुख्य मुख्य स्त्रियांच्या स्तनाग्रावर विश्रांति घेतली. खद्योत झालेला मी रस्त्यांतून जाणाऱ्या लोकांच्या पायाखालीं तुडविला गेलों. स्त्रियांच्या मुखांवरील तिलकत्वास प्राप्त झालों. यावरून भिन्नभिन्न स्थानीं एकाच वस्तूचा उत्कर्ष व अपकर्ष कसा होतो तें पहा. मेघ स्थिर असतां केव्हां केव्हां विद्युद्रूपानें, समुद्रांतून जशा शफरी,

त्याप्रमाणें मी चमकलों. कांहीं ठिकाणीं कळी-सारख्या कोमल अंगांनीं युक्त अशा दीपत्वाचा अनुभव घेऊन अंतःपुरांतील स्त्रीविलासांना मी अवलोकन केलें. ज्वालारूप सोन्याला खंडित करणाऱ्या वातीच्या अग्रांवर वाढलेल्या कज्जल-समूहाच्या संगानें खिन्न झालेल्या म्हणजे ज्याची प्रभा कमी आहे अशा दीपाच्या रूपानें आपल्या ज्वालादि अवयवांचा संकोच करून घनकूर्मासारखें रूप धारण केलें. मी कल्पांतींचा अग्नि झालों व सर्व जगांत भ्रमण केल्यामुळें झालेल्या श्रमानें आकाशांत लीन झालों. पण तें आकाशहि त्या वेळीं काजळानें श्यामवर्ण झालें होतें. त्यामुळें मेघवाहन रुद्राच्या वाहन-भूत मेघांत विद्युत् जशी लीन असते, तसाच मीं भासलों. सर्व आकाश शून्यत्वास प्राप्त झालें असतां मीं जलराशींत नृत्य केलें. कांहीं ठिकाणीं कोलित याच दांतांनीं, ज्वाला याच भुजांनीं, चंचल धूमाग्रें याच केशांनीं युक्त अशा बलाढ्य अग्निरूपानें नगरें, वाढलेलें गवत, पल्लव यांना जाळलें व त्याच वेळीं काष्ठादि पदार्थांना भक्षण-योग्य केलें. दयादि अष्टगुणांनीं युक्त असले-ल्या रामा! लोहारांच्या शाळांसारख्या कांहीं ठिकाणीं शस्त्रें, लोखंडी मुद्गल, पाषाण, परस्पर आघातांनीं उडणाऱ्या ठिणग्या व पाषाणाचे तुकडे सभोंवार फेंकले. लोहार लोखंड तापवून त्यांवर घणाचे आघात करूं लागला असतां, जणुं काय रागावूनच मी त्या आघात करणा-ऱ्याच्या अंगावर ठिणग्या उडविल्या. कांहीं ठिकाणीं महाशिलेच्या कोशांत मी पाषाणमय होऊन शंभर युगें राहिलों, त्यामुळें कोणत्याही प्राण्यांनीं मला पाहिलें नाहीं.

श्रीरामः—हे मुने! त्या अवस्थेमध्यें तूं सुखाचा अनुभव घेतलास कीं दुःखाचा? हें मला कळावें म्हणून सांग.

श्रीवासिष्ठः—जसा मनुष्य चेतन असूनहि निजल्यावर जड होतो, त्याप्रमाणें चिदाकाश दृश्यत्वाला प्राप्त होतें व जडहि होतें. जेव्हां ब्रह्म आपल्यालाच जणुं काय पृथिव्यादिरूप झाल्यासारखें पहातें, तेव्हां तें आंतल्याआंत सुप्त म्हणजे निद्रित व जड असल्यासारखें असतें. त्यामुळें त्याचें खरें सच्चिदानंदरूप बदलत नाहीं आणि त्याच्या ठिकाणीं दुःखाचीहि प्राप्ति होत नाहीं. कारण आकाश, पृथ्वी इत्यादि हें त्याचें रूप असत्हि नव्हे व वस्तुतः सत्हि नव्हे. तें द्रष्टा, दृश्य याप्रमाणें जरी भासलें तरी सम व अविकृतच स्थित असतें. हें सत्य ज्ञान ज्याच्या ठिकाणीं अखंड उत्पन्न होतें, त्याला पंचभूतें नाहींत व द्रष्टा-दृश्य इत्यादि विभ्रमही नाहींत. त्या वेळीं मीं शुद्ध ब्रह्मरूप होऊन तें सर्व केलें. ब्रह्मरूपा-वांचून त्यांतील कांहीं करतां येणें शक्य नाहीं. ज्या वेळीं हें सर्व दृश्य निरतिशय आनंदरूप ब्रह्मच झालें, तेव्हां ब्रह्मपदामध्यें स्थित होऊन मीं आत्माच त्या त्या रूपानें पाहिला. कारण मी जर पंचभूतेंच झालों, तर जडच होणार हें उघड आहे. मग चैतन्याच्या अभावीं मला त्याचा अनुभव येणें शक्य नाहीं आणि अनुभ-वाच्या अभावीं आतां मला त्याचें स्मरणहि झालें नसतें. अर्थात् मी जरी धारणेनें पृथि-व्यादिरूप झालों होतों, तरी आपलें ब्रह्मस्वरूप सोडलें नव्हतें. सुषुप्तींत मी चेतन असतांना देखील निजलों आहें असा माझा दृढभाव झाला होता. त्यांतील निद्रेमुळें प्राप्त झालेलें अज्ञानच जागें झाल्यावर 'मला कांहीं कळलें नाहीं' या प्रतीतीवरून सिद्ध होणारें जाड्य होय. तथापि त्या अवस्थेंतहि स्वप्रकाश वस्तु असतेच. कारण ती जर नसती तर त्या काळीं अनुभाविलेल्या अज्ञानादिकांचें स्मरण कसें झालें असतें? ज्याचें अंतःकरण ज्ञानानें प्रबुद्ध झालेलें

असतें त्याच्या स्थूल व्यष्टि-समष्टि देहांचा आधिभौतिकभाव म्हणजे स्थूलत्व निवृत्त होतें, आणि त्या ज्ञानाबरोबर शुद्ध ज्ञानरूप सूक्ष्म-भाव उदय पावतो. त्यानंतर तो जीवन्मुक्त आपल्या इच्छेप्रमाणें त्या सूक्ष्मदेहानें ह्मणजे ज्ञानरूप अणुभावानें किंवा स्थूलभावानें रहातो. तो ज्ञान-देहानें कधींहि न तुटणाऱ्या शिलांच्या उदरांतहि प्रवेश करतो व त्यांतून बाहेर निघतो, पातालांत व आकाशांतहि जातो. त्यामुळें हे रामा! मीं त्या वेळीं आपल्या ज्ञानदेहानें ह्मणजे अनंत चिन्मय आकाशरूप होऊन तें सर्व केलें. त्यामुळें माझ्या ठिकाणीं दुःखाची प्राप्तिच नाहीं. कारण वज्र, पाषाण, पाताल, आकाश, अंतरिक्ष यांतून जा-ये करणाऱ्या तशा बोधरूपी आकाशाला कोठेंच विघ्न उत्पन्न होत नाहीं. कारण ज्ञानी बोधमात्र-शरीरानें जोंवर जडपदार्थांमध्यें असतो, तोंवर तो त्यांत तसाच होऊन रहातो. एकादा मनुष्य आपल्या इच्छेनेंच एका जाग्यावरून उठून दुसऱ्या जागीं जर गेला व तेथें जाऊन राहिला, आणि जसा गेला तसा आपल्या इच्छेनें परत आला तर त्याला त्यापासून दुःख काय होणार? कारण **स्वेच्छेनें केलेल्या व्यवहाराचें कोणी दुःख मानीत नाहीं.** आतिवाहिक देह केवल बोधमात्र व अव्यय आहे, असें तत्त्ववेत्ते जाणतात. तुझी इच्छा असल्यास तंहि आतांच त्या आतिवाहिक देहाचा व धारणेनें जगद्भावाचा अनुभव घेऊं शकशील. मी चिन्मात्र आकाश-रूप आहें, अशी सूर्यादिकांमध्यें धारणा केल्यानें आत्मज्ञाला सूर्यादि सर्व जगांचा अस्त करून त्याला आत्ममात्ररूपानें स्थापितां येणें शक्य आहे. कारण तें सर्व जगत् आत्मरूपानें जरी सत् असलें तरी जगद्रूपानें त्याचा बाध होत असल्यामुळें जणुं काय असत् असल्याप्रमाणें होतें. ( अहो, पण आपण जगाला विद्यमान असलेलें पहातों, मग त्याला असद्रूपानें स्थित कसें म्हणतां येईल? उत्तर—) ज्याप्रमाणें जागृत् पुरुषाच्या दृष्टीनें सत् ह्मणजे विद्यमान असलेलेंच जगत् निजलेल्या पुरुषाच्या दृष्टीनें असत् होतें, किंवा स्वप्नांतील जगत् इतर अवस्थांमध्यें शून्यरूप होतें, गाढ निद्रेंत तर सर्व शून्यच होतें, हें प्रसिद्ध आहे; त्याच न्यायानें अज्ञदृष्टया विद्यमान असलेलें जगत् ज्ञानि-दृष्टया बाधित होतें. जसा कोणी एखादा आपल्या मनोराज्यानें निखाऱ्याची नदी उत्पन्न करतो व त्या नदीची लाट त्याच्या अंगाला जरी जरी लागली तरी त्याला कांहीं दुःख होत नाहीं, तो नुस्ता कौतुक पहात रहातो; त्याप्रमाणें मी आपल्या इच्छेनेंच पाषाणादिरूप झालों होतों. त्यामुळें मला दुःख झालें नाहीं. पुढें अग्नि झालेल्याच मीं कज्जल हाच जिच्यांतील भ्रमरसमूह आहे अशा किंशुक, अशोक इत्यादिकांच्या पुष्पासारख्या लाल प्रदीप्त ज्वालांनीं अरण्य व्यापून टाकलें व त्यामुळें तें सर्व स्थल फुललेल्या कमलांनीं युक्त असल्याप्रमाणें केलें. रामा! दुष्टांच्या दीप्त लक्ष्मीप्रमाणें चंचल असलेल्या ज्वालांनीं झटकन उत्कर्ष पावून मी एकाएकीं क्षीण झालों. असो; हे रघुनंदना! मीं तेजोरूप होऊनहि प्रत्येक परमाणूंत जी ही अशी जगच्छोभा पाहिली, ती व आतां तुम्ही पहात असलेली ही जगच्छोभा या दोन्ही चिदाकाशाहून भिन्न नाहींत. याविषयीं तुमच्या स्वप्नांतील नगरसमूह व पर्वतगण यांचाच दृष्टांत आहे. ९१.

—

## सर्ग ९२ वा.

१ वायुधारणेनें वायुभावाची प्राप्ति. २ त्याच्या कर्मांचा विस्तार, ३ आकाशासह सर्वात्मरूपानें स्थिति.

श्रीवसिष्ठः—नंतर जगत् पाहाण्याच्या कौतुकानें मीं वातमय धारणा धरून धीर-वृत्तीनें वायुभावस्थिति प्राप्त होईपर्यंत त्याच धारणेचा अभ्यास केला व मी वायु झालों. त्या कारणानें लतारूपी स्त्रीसमूहाला नाचविणारा कमल, उत्पल, कुंद इत्यादि पुष्पसमूहांचा सुगंध आपल्यामध्यें धारण करून त्याचें रक्षण करणारा, पाण्याचे तुषार व दंव यांना सहज लीलेनें उडविणारा, सुरतानें श्रांत झालेल्या स्त्रीपुरुषांच्या सर्व अंगांना आल्हाद देणारा, तृण, गुल्म, लता, वेली व इतर पानें यांच्याकडून तांडवनृत्य करविणारा, लता, ओषधि, फलें, पुष्पें यांच्या सुगंधांनीं मंडित असा वायु मी झालों. मंगलसमयीं भावी कल्याण सुचविण्यासाठीं मी मृदु, शांत, मंद व सुगंधी झालों. पण उत्पातकालीं फार भयंकर झालों. अतिशय उष्ण, अतिशय प्रखर व अतिशय कठोर बनलों. प्रलयसमयीं मोठमोठ्या पर्वतांनाहि मीं पानांप्रमाणें उडविलें. नंदनवनांत कुंद, मंदार इत्यादि पुष्पांच्या मकरंदजलांनीं अरुणवर्ण झालों. नरकांत अग्नीच्या संभारांनीं युक्त व त्यामुळेंच अतिशय भयंकर बनलों. सरळ उडलेल्या तरंगपंक्तींवरून लोक माझ्या वाहण्याचें अनुमान करीत होते. मी अंतरिक्षांत मेघांना दूर सारून चंद्ररूपी आरशास स्वच्छ करीत होतों. केव्हां केव्हां त्यांच्या आच्छादनानें त्याला मलिन करीत होतों. मी नक्षत्ररूप राजसेनेचा अतिशय वेगवान् व ध्वनियुक्त रथ* झालों. तिन्ही लोकांत सिद्धांचा संचार होण्यास व देवांचीं विमानें धारण करण्यास मी अनुकूल झालों. चंचलपणामुळें मी या मनाचा जणूंकाय सखा भाऊच बनलों. मी वस्तुतः जरी अनंग होतों, तरी सर्व अंगांनीं परिपूर्ण व आपल्या स्पंदानें आनंद देणारा चंद्रच होतों. तुषारादिरूप शुभ्र रोमांनीं मी जणुंकाय वृद्ध असल्याप्रमाणेंच दिसलों. पुष्पादिकांच्या सुगंधांनीं यौवनोन्मादानें युक्त असल्याप्रमाणेंच झालों. मौन व मृदुत्व हेंच जणूंकाय माझें बालपण होय. इंद्राच्या उद्यानामध्यें मी सुगंधानें मधुर व उदार होऊन वाहूं लागलों. चैत्ररथनामक कुबेराच्या उद्यानांत मी स्त्रियांचा श्रमपरिहार करीत हिंडूं लागलों. गंगेच्या तरंगरूपी झोंपाळ्यावर झोंके घेऊन जणुं काय श्रमयुक्त झालों. तथापि दुसऱ्याच्या श्रमाचें निवारण करण्याच्या उत्सुकतेनेंच आपले श्रम विसरून मीं इतरांचे श्रमपरिहार केले. वसंतऋतूच्या जणुंकाय स्त्रियाच, अशा पुष्पभारानें नम्र झालेल्या लतांना मीं आपल्या स्पर्शानें दीर्घकाल चंचल केलें. त्या वेळीं चंचल पल्लव हेच त्यांचे हस्त व भ्रमर हेच नेत्र होते. मीं चंद्रबिंबामध्यें दीर्घकालपर्यंत श्रेष्ठ अमृताचा आस्वाद घेतला. पूर्ण अभ्रशय्येवर शयन केलें. कमलसमूहांना हालवून आपला व दुसऱ्यांचा रतिश्रम घालविला. सर्व प्रकारच्या धुळीचा मी एकच आकाशगामी अश्व होतों. सुगंध, मद, मातंग यांना आनंद देणारा मी त्यांचा मोठा मित्रच झालों. तडित् या नांवाचें शृंग मोठ्यानें वाजवून मी मेघरूपी पशूंचा पालक बनलों. तुषाररूपानें पडणाऱ्या व धुळीचा नाश करणाऱ्या देवादि-

* 'प्रवह' नांवाचा वायु नक्षत्रचक्राला भ्रमण करावयास लावतो असें ज्योतिषशास्त्रांत प्रसिद्ध आहे.

कांना सुकविणारा, व त्यामुळेंच त्यांच्या शत्रूसारखा झालों. आकाशरूपी पुष्पांचा जणुंकाय सुवासच व त्यामुळेंच आकाशाचे गुण असे जे सर्व शब्द त्यांचा सहोदर झालों. सर्व प्राण्यांच्या अंगांमध्यें व उपांगांमध्यें संचार करणारा मी त्यांच्या नाडीरूप पाटांतून वाहणारें जलच बनलों. त्याचप्रमाणें मी भूतांचा प्राण बनल्यामुळें हृदयादिमर्मस्थानेंहि मीच झालों. अर्थात् मर्मरूपी सर्व लोहारांचा मी एक आत्मा झालों. हृदयरूपी गुहागृहांतील सिंह बनलों. सतत संचार करणारा प्रवासी बनलों. अग्नीचें बल जाणणारा झालों. कारण दीपादि दुर्बलाग्नीला मी घालवीत असें आणि दावाग्नीसारख्या प्रबल अग्नीचा मित्र होऊन त्याला वाढवीत असें. आमोदरूपी रत्नांना लुबाडणारा होऊन बलात्कारानें कलिकारूपी सुगंधाची गांठ सोडून त्यांचें हरण करीत असें. मी विमानसमूहरूप नगराला धारण करणारा, तापरूपी अंधकाराचा चंद्रमा, शैत्यरूपी इंदूचा क्षीरसागर म्हणजे जन्मभूमि, अर्थात् थंडी वाढविणारा, प्राण आणि अपान यांच्या कलारूपी रज्जूनें प्राणांचें शरीरयंत्र वहाणारा, तरंगांनीं माती खोदित असल्यामुळें द्वीपांचा शत्रु व धुळीनें त्यांची वृद्धि करीत असल्यामुळें मित्र, असा मी द्वीपांतून संचार करण्यामध्यें निमग्न झालों. मी अगदीं पुढें जरी असलों तरी अदृश्यस्वरूप असल्यामुळें मला मनोराज्यांतील नगराचीच उपमा होती. कारण त्या कल्पित नगराप्रमाणेंच मी कोणाला दिसत नसें. स्पंदरूपी हत्तींचें बंधनस्थान असून ताडाचे पंखे याच तिळांतील तेल मी होतों. प्रलयकालीं मी एका क्षणार्धांतच सर्व पर्वतांना हलवीत असें. अनेक प्रकारचे वर्ण याच तरंगांचे गंगाप्रवाहाप्रमाणें धूलिमिश्रणानें एकत्व करणारा, धूर, मेघ, धूळ, जल यांचा महाआवर्त करणारा, आकाशगंगेचा प्रवाह हाच ज्यांतील मकरंदजलाचा ओघ आहे, अशा आकाशरूप नीलकमलांतील मी भ्रमर झालों. वावटळीनें शरीराला परिवेष्टित करून व वर उंच नेऊन टाकलेल्या जीर्ण तृणाच्या मंदगतीला कारण झालों. सामान्य क्रियारूप कमलवनांला विकासित करणारा सूर्य मी झालों. शब्दांच्या वृष्टीचा मी मुख्य मेघ बनलों. आकाशरूपी अरण्यांतील हत्ती, शरीरगृहांतील सदा शब्द करणारें एक यंत्र, धूलिरूपी नायिकासमूहाचें व अरण्यमालारूपी नायिकांचें आलिंगन करणारा नायक बनलों. हिम-घृतादि पदार्थांना गोठविणें, पंकादिकांना सुकाविणें, मेघादिकांना धारण करणें, तृणादिकांना हालविणें, सुवासाला हरण करणें आणि शैत्य व ताप घालविणें, या सहा कर्मांमध्यें सतत तत्पर झाल्यामुळें प्रलयापर्यंत मला एक क्षणभरहि विश्रांति मिळाली नाहीं. भूमीवरील रस शोषून घेण्यामध्यें मी अतिशय व्यग्र झाल्यामुळें जणुंकाय तेजाचा भ्राताच झालों. घेणें, देणें इत्यादि कर्में करणाऱ्या हस्तादि अंगांचा चालक मी झालों. शरीरमार्गांत नाडीमार्गांनीं माझा निष्प्रतिबंध संचार होत असे. अन्नरसमय देहरूपी भांड्यांत प्राणापानादि रूपानें माझें परिवर्तन सुरू असल्यामुळें आयुष्यरूपी रत्नांचें रक्षण करणारा मी मोठा व्यापारीच होतों. शरीररूपी नगराचा नाश करणें व त्याला उत्पन्न करणें याच एका कामामध्यें परायण, अन्नरसाचा मल व त्याचे अति सूक्ष्म भाग, अर्थात् त्वक्, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र या सहा धातूंचें किंवा वात, पित्त व कफ या तीन धातूंचें पृथक्करण करण्यांत अतिशय कुशल झालों. रामा! त्या वायुभावामध्येंहि

परमाणूपर्यंत प्रत्येक द्रव्यामध्यें मीं त्या सुवर्णशिलेप्रमाणेंच जगत् पाहिलें आणि त्या जगांतहि असाच मी पृथिव्यादि जगद्रूपवान् झालों. प्रत्येक परमाणूमध्यें अज्ञदृष्टया असंख्य सर्ग होते. पण परमार्थदृष्टीनें त्यांतलि कशांतच कांहीं नव्हतें. कारण तें सर्व शून्याकार असल्यामुळें त्यांत काय असणार ? 'पण प्रत्येक परमाणूमध्यें असलेले ते सर्ग कोणकोणत्या पदार्थांनीं युक्त होते ?' म्हणून विचारशील तर सांगतों. चंद्र, सूर्य, इंद्र, वायु, अग्नि, कुबेर, ब्रह्मदेव, हरि, गंधर्व, विद्याधर, महानाग, सागर, पर्वत, द्वीपें, दशदिशा, महासागर, निरनिराळे लोक, लोकेश, क्रिया, काल, क्रम, कला, स्वर्ग, भूमि, पाताल, आणखीहि दुसरे लोक, भाव-अभाव, जरा-मरण, त्यांचें राहित्य इत्यादि सर्व संभ्रमांनीं युक्त असे ते सर्व सर्ग होते. हे रामा ! त्या वेळीं मीं अशा रीतीनें धारणेनें आकाशासह पंचभूतरूप होऊन त्रैलोक्यरूपी कमलाच्या उदरांत विहार केला. प्राण्यांच्या म्हणजे भू, जल, वायु व तेज यांच्या समवायरूप वृक्षांच्या देहांत राहणाऱ्या मीं मुळांच्या समूहानें भूमींचा रस प्यालों व अनुभवहि घेतला. अमृतरसानें ज्यांचीं अंगें पुष्ट झालीं आहेत, व चंदनद्रवाप्रमाणें शैत्य, शुक्लत्व, इत्यादि गुणांनीं शोभणाऱ्या चंद्रबिंबामध्यें, तुषारशयनावर जसा, तसाच मी लोळलों. सर्व ऋतूंनीं संपन्न अशा वनसमूहानें युक्त असलेल्या सर्व दिशांतील अनेक सुवासांनीं विचित्र झालेल्या पुष्पसमूहाचा मीं अनुभव घेतला व आपलें उच्छिष्ट भ्रमरांना दिलें. त्यानंतर लोणी पसरलेल्या भूमीवर जसें, त्याप्रमाणेंच आकाशरूपी अंगण्यांत उंच, मृदु व उत्तम रीतीनें पसरलेल्या शुभ्र मेघपंक्तींत मीं शयन केलें. शिरीषादि पुष्पांच्या पाकळ्यांप्रमाणें मृदु असलेल्या सुर व सिद्ध यांच्या स्त्रियांच्या अंगावर कामवासना सोडून मीं शयन केलें. कुमुद व कल्हार जातीचीं कमलें ज्यांत आहेत, अशा नलिनीवनांत कलहंसींबरोबर मीं लीलेनें मंजुळ कलकल रव केला. तसेंच ब्रह्मांडरूप झालेल्या मीं वेगानें वाहणाऱ्या नद्या याच ज्यांतील शिरा आहेत अशा भूमंडलासह भुवनपंक्तींना आपल्या अंगावर लोमपंक्तीप्रमाणें धारण केलें. जगामध्यें जे आकाशपर्वत म्हणून प्रसिद्ध आहेत त्यांनीं नदीरूपी दीर्घसूत्रासह व समुद्रासह माझ्या अंगावर जणुंकाय प्रतिबिंबयुक्त आरशाप्रमाणें विश्रांति घेतली. सिद्ध, विद्याधर, इत्यादि भूतसृष्टीनें माझ्या शरीरावर माशा व उवा यांप्रमाणें विश्रांति घेतली. 'तर मग त्यांच्यामुळें तुम्हांला पीडा झाली असेल,' म्हणून म्हणशील तर तसें नाहीं. कारण स्थिर असलेल्या वृक्षांवर जसे इतर जीव राहातात, त्याप्रमाणें माझ्या प्रसादानेंच ते सूर्यादि सर्व आनंदानें राहिले होते. मीं समुद्रधारणेनें सप्त द्वीपांनीं युक्त व सात प्रकारच्या संनिवेशानें प्रसिद्ध असलेली जी भूमि, तिला आपल्या मनगटांत कंकणाप्रमाणें धारण केलें. मीं विद्याधरांच्या तरुण स्त्रियांना स्पर्श केला व त्यांना न दिसतांच मीं त्यांचीं अंगें रोमांचित केलीं. नदीरूप शिरांनीं ज्यांतील छिद्रें शुद्धरसानें भरून सोडलीं आहेत, अशीं पर्वतादि विश्वें माझ्या देहांत स्थित होतीं. त्यांतील कठिण भाग याच अस्थि व मऊ भाग हेंच मांस होय. औदुंबरफलामध्यें जसे किडे असतात, तसे असंख्य दिग्गज माझ्या हृदयाकाशांत राहिले. चंद्र व सूर्य ह्याच त्यांच्या मस्तकावरील चवऱ्या होत्या. रामा ! सर्व पाताल हेच पाय, भूतल हेंच उदर व आकाश हेंच मस्तक अशा अति विस्तृत ब्रह्मांडरूप झालेल्या मीं आपलें अति सूक्ष्म चिन्मात्रस्वरूप सोडलें नाहीं. मी सर्व दिशांमध्यें, सर्व कालीं, सर्व ठिकाणीं, सर्वांचा

आत्मा होऊन सर्व कांहीं जरी करीत होतों, तरी त्याच वेळीं सर्व द्वैतशून्य चिन्मात्ररूपानें स्थित होतों. त्या वेळीं माझ्या ठिकाणीं सविकल्पत्वहि होतें व निर्विकल्पत्वहि होतें. मीं साकारहि होतों व निराकारहि होतों. मी जडहि होतों व माझे चेतनत्वहि अखंडित होतें, असा मीं अनुभव घेतला. समुद्रामध्यें मैनाक पर्वत जसा लपून राहिला आहे, त्याप्रमाणें पर्वतशिलादिकांनीं अतिशय पुष्ट व अत्यंत विस्तृत असलेल्या समुद्राच्या प्रत्येक प्रदेशामध्यें स्तंभासारखीं स्थिर असलेलीं सहस्रावधि विश्वें मीं पाहिलीं. आरशांत नगरांचीं प्रतिबिंबें जशीं असतात, त्याप्रमाणें चेतनरूप असलेल्या मीं आपल्या अंगावर गुप्त व प्रकट अशीं जगें पाहिलीं. याप्रमाणें मी पृथ्वी, जल, अग्नि, वायु, व आकाशरूप होऊन स्वप्नांत चैतन्यच जसें सर्व करतें, त्याप्रमाणें हा असा मायेचा विलास केला. त्या अवस्थेंत मीं आकाशकोशांतील प्रत्येक परमाणूमध्यें असंख्य विश्वें पाहिलीं. एका स्वप्नांत दुसऱ्या स्वप्नांतील नगर जसें पहावें त्याप्रमाणें परमाणूंतील प्रत्येक अवकाशांत दुसऱ्या परमाणूंतील सृष्टिसमूह दिसला. मी स्वतःच दीपरूपी कुंडलांनीं भूषित झालेलें भूमंडल बनलों. तथापि मी जरी सर्व जगाचा आत्मा झालों होतों, तरी कशालाच स्पर्श केला नाहीं. कारण मी असंग व अद्वय असून माझें पृथिव्यादिरूप आरोपित होतें. पुरुषादि शरीर धारण करणाऱ्या जीवांसाठींच लता, वृक्ष, तृण, अंकुर इत्यादि सर्व उत्पन्न करणाऱ्या मीं वृष्टीच्या द्वारा पडलेले रस भूतलांतून आकर्षण करून घेतले. युद्धाप्रमाणें सर्व द्वैताचा संहार करणाऱ्या, बोधकालास प्राप्त होणाऱ्या व अतिशय शुद्धस्वरूप अशा माझ्या ठिकाणीं लक्षावधि विश्वें रहातात व त्यांतील कांहीं रहातातहि नाहींत. आतां 'कोणत्या रूपानें रहातात व कोणत्या रूपानें रहात नाहींत,' म्हणून विचारशील तर सांगतों. अज्ञात चैतन्यामध्यें असलेल्या ज्या स्फूर्ति, त्या स्वतःच सत्तास्फूर्तिरूप चमत्कार उत्पन्न करतात व त्याचाच जगावर आरोप करून त्यांना प्रकट करतात. यास्तव मीं जें जें कांहीं अनुभविलें व केलें, तें तें सर्व कल्पनामात्र असून परमार्थचमत्कारावांचून त्यांत कांहीं उपलब्ध होत नाहीं. म्हणूनच अध्यारोपांत हा विश्वरूप आत्मा सर्वांना आपली सत्ता देतो व सर्वकर्ता होतो; तथापि तो सर्व अनर्थशून्य आहे. पुढें त्या सर्वांचा अपवाद करून ज्ञानी झालेला तो शुद्धबोधरूपच होतो. कारण हें सर्व ब्रह्मात्मक आहे. म्हणूनच एकेक वस्तूंतील ब्रह्मामध्यें सर्व जगाचा अध्यास होत असल्यामुळेंच तोच सर्व, सर्वत्र, सर्वात्मा, सर्वव्यापी व सर्वांचा आश्रय आहे. असें हें ज्ञानी पुरुषाला विषय होणारें जगाचें रूप सिद्ध होतें. पण अज्ञानी पुरुषाला दिसणारें जगद्रूप कसें आहे हें मला सांगतां येणें शक्य नाहीं. आकाशाच्या उदराप्रमाणें अतिशय स्वच्छ असलेल्या चित्स्वरूपांत जी ही सर्गपरंपरा स्फुरत आहे, ती तें तत्त्वच आहे. कारण जो ताप तोच उष्मा, त्यामध्यें भेदप्रतीति नाहीं. अर्थात् सर्वांना सत्ता देणारें सत् अनंत आहे. ९२.

---

## सर्ग ९३ वा.

१ वसिष्ठांच्या कुटींत ध्यानस्थ सिद्धाचें दर्शन, २ कुटीचा उपसंहार केल्यामुळें त्याचा पात, व ३ स्वतःचा वृत्तांत.

श्रीवसिष्ठः—धारणासिद्धजगद्देहदर्शनानंतर पूर्वोक्त कौतुक पाहण्याच्या कल्पनेपासून मोठ्या प्रयत्नानें परावृत्त होऊन मी

त्या आपल्या पूर्वींच्या समाधिस्थानीं ह्मणजे ती आकाशांतील कुटी जेथें होती, त्या ठिकाणीं आलों आणि जों पहातों तों माझा देह तेथें कोठेंच दिसेना. माझ्यापुढें असलेला कोणी एक दुसराच सिद्ध मला दिसला. तो समाधिनिष्ठ होऊन बसला होता. परमप्रेमास्पद निरतिशय आनंदरूप ब्रम्हपदाला तो प्राप्त झाला होता. ज्याचा उदय अतिशय सौम्य आहे, अशा सूर्याप्रमाणें किंवा ज्यानें काष्ठाला जाळून टाकलें आहे अशा अग्नीप्रमाणें तो शांतस्वरूप होता. त्यानें पद्मासन घातलें होतें. इष्ट विषयामध्यें चित्ताचें स्थैर्य झाल्यामुळें तो निश्चल होता. तो गुडघे टेंकून, व पायाचे चवडे उचलून टांचांवर बसला होता. त्यानें सर्व विषयांचें अतिक्रमण केलें होतें. त्याची मान ज्यांवर भस्माचे त्रिपुंड्र लावले आहेत अशा तुळतुळीत, सौम्य, गंभीर व वर्तुळ स्कंधांनीं सुशोभित झाली होती. उदार वस्तूमध्यें त्याच्या मनानें विश्रांति घेतल्यामुळें त्याचें मुख प्रसन्न असून मस्तक स्थिर होतें. नाभिप्रदेशीं त्यानें आपले दोनहि हात उताणे ठेवले होते. ते दोन कमलांप्रमाणेंच शोभत होते. त्यामुळें हृदयकमलांतील तेज बाहेर पडून त्याचे योगानेंच ते प्रकाशमान झाले आहेत असें वाटलें. त्याचे नेत्र कमलाप्रमाणें मुकुलित झाले होते. सर्व बाह्येंद्रियांचे व्यापार शांत झाले होते. तो स्वच्छत्वास प्राप्त झाला होता. त्यामुळें रात्रीं ज्यांतील कमलें मिटलीं आहेत, अशा निजलेल्या सरोवराप्रमाणें तो दिसत होता. त्याचें अंतःकरण अक्षुब्ध व त्यामुळेंच अतिशय शान्त होतें. आपल्या धैर्ययुक्त वृत्तीनें अंतःकरणाला शान्त ठेवणारा तो ज्यांतील सर्व उत्पात क्षय पावले आहेत अशा आकाशाप्रमाणें दिसला. आपल्या कुटींत आपला देह तर दिसत नाहीं, पण हा दुसराच कोणी मुनि बसला आहे असें पाहून मी आपल्या शुद्ध चित्तानें असें चिंतन केलें:– 'हा कोणी एक महासिद्ध या दिशेकडे आला असावा आणि विश्रांतीची इच्छा करणारा हा माझ्याप्रमाणेंच विचार करून महाकाशांतील या एकान्तस्थानीं बसला असावा. आपल्याला समाधि लावण्यास योग्य असें एखादें स्थान मिळावें या इच्छेनें सत्यसंकल्पानें शोभणाऱ्या यानें ही कुटी पाहिली असावी. मी पुनः येईन याची त्याला कल्पनाहि न झाल्या कारणानें माझ्या त्या शवीभूत झालेल्या देहाला येथून काढून टाकून त्यानें पुष्कळ दिवस येथें वास्तव्य केलें असावें. अर्थात् माझें येथील शरीर नष्ट झालें आहे. आतां मी सूक्ष्म देहानें आपल्या सप्तर्षि-लोकीं जातों.' असा निश्चय करून मीं जों जाऊं लागत आहे तों त्याविषयींचा माझा संकल्प क्षीण झाल्यामुळें ती कुटी तत्काल नाहींशी झाली व तेथें केवल आकाशच झालें. तो समाधिस्थ सिद्धहि निराधार झाल्यामुळें खालीं पडला. स्वप्नांतील संकल्प शांत झाला असतां स्वप्नसंकल्पानें कल्पिलेलें नगर जसें शांत होतें, तसा त्या कुटीचा प्रकार झाला. माझा संकल्प शांत झाल्यामुळें ती कुटीहि नष्ट झाली. त्याबरोबर मेघांतून जलाचा ओघ जसा पडतो, त्याप्रमाणें तो ध्यान करणारा योगी खालीं पडला. वायूनें ज्याला उडविलें आहे, असा मेघ आकाशांतून वगैरे कोणीकडे तरी जातो किंवा कल्पक्षय झाला असतां चंद्राचें बिंब जसें खालीं पडतें, तशी त्या योग्याची अवस्था झाली. पुण्य क्षीण झालें असतां देवलोकीं जाऊन विमानांतून विहार करणारा मनुष्य जसा भूतलीं पडतो किंवा मुळें तोडलेला वृक्ष जसा खालीं पडतो किंवा आकाशांतून खालीं टाकलेला पाषाण जसा खालीं येतो, तसा तो योगी भूमीवर पडला. 'ही कुटी मी येथें असेपर्यंत असो,' अशा प्रकारचा माझा सत्यसंकल्प गमन-

संकल्पानें क्षीण झाला असतां तत्काल त्या कुटीचा क्षय होऊन तो सिद्ध खालीं पडला. तें पाहून मला फार वाईट वाटलें व सौजन्यानें त्या सिद्धाची काय अवस्था होते तें पाहण्यासाठीं खालीं पडत असलेल्या त्या सिद्धाबरोबरच मनानें ह्मणजे त्या सूक्ष्म देहानेंच मी आकाशांतून भूतळीं आलों. वावटळींतील पानें जशीं गरगर फिरत असतात, त्याप्रमाणें तो प्रवहादि वातस्कंधांतून भ्रमण करीत खालीं पडला. सप्तद्वीपयुक्त समुद्राच्या तीरीं देवांच्या क्रीडेचें स्थान, अशा सुवर्णभूमींत तो पडला. पण त्या वेळीं त्याचें आसन ढळलें नाहीं. कारण त्याच्या प्राणापानांची गति ऊर्ध्व होत होती. त्यामुळें विहिरींत सोडित असलेला घट रज्जूमुळें जसा ऊर्ध्वमुखच असतो, किंवा तुंबीफल देठानें वर आकर्षण केल्यामुळें जसें ऊर्ध्वमुखच असतें, त्याप्रमाणें तो ऊर्ध्वमुख भूमिवर आला. त्यानें पूर्वीं जसें पद्मासन घातलें होतें तसेंच तें कायम राहिलें. तो इतक्या उंचीवरून जरी पडला होता, तरी पृथ्वीवर जशाचा तसाच येऊन पोंचला. फार काय, पण तो देहभानावरहि आला नाहीं; त्याचें चित्त स्वरूपामध्यें अत्यंत आसक्त झाल्यामुळें पाषाणदेहाप्रमाणेंच तो अचेतन होता. पण इतक्या दूर अंतरावरून पडूनहि त्याचें शरीर छिन्न-भिन्न कसें झालें नाहीं, म्हणून विचारशील तर सांगतों. त्याचा देह योगबलानें वज्रासारखा झाला होता. तसाच तो कापसाच्या गोळ्याप्रमाणें हलका झाला होता. त्यामुळें त्याचें शरीर छिन्न-भिन्न झालें नाहीं. त्या वेळीं त्याला समाधींतून उठविण्यासाठीं मीं बराच यत्न केला. मीं स्वतः आकाशांत मेघ होऊन त्याच्यावर पाण्याचा वर्षाव केला, मोठमोठ्यानें गर्जना केली. गारांची वृष्टि केली. त्यामुळें त्या दुसऱ्या प्रदेशीं मीं त्याला आपल्या बुद्धिसामर्थ्यानें समाधींतून जागें केलें. मी मेघ बनल्यामुळें तो त्या वेळीं जणूं काय मयूरच झाला होता. तो देहभानावर येतांच त्याची अंगश्री विकसित झाली. त्यानें डोळे उघडले. पावसाळ्यांत कमलाकर पावसाच्या धारांनीं जसा प्रफुल्लित होतो, तसा तो देहभानावर येऊन चांगला सावध झाला. नंतर त्याची दृष्टि अत्यंत शांत झाली असतां मी त्याच्यापुढें जाऊन परमार्थस्थितीपासून निवृत्त झालेल्या त्याला स्वच्छ वृत्तीनें विचारिलें– 'हे मुनिनायका! तूं कोठें आहेस? हें काय करीत आहेस? तूं कोण आहेस? तूं केवढ्या दूर अंतरावरून खालीं पडलास तें तुला कसें कळलें नाहीं?' याप्रमाणें मजकडून बोलला गेलेला तो मला पाहून व आपली पूर्वगति आठवून चातक मेघाला जसा बोलतो, तसा तो मला असें सुंदर वचन बोलला– "हे श्रेष्ठा! जोंवर मी आपला सर्व वृत्तांत आठवीत आहें तोंवर जरा धीर धर. मला पूर्वींचा सर्व वृत्तांत आठवला म्हणजे मी तो तुला तसाच सांगेन." असें बोलून व मनांत विचार करून त्याला जन्मांतरीय वृत्तान्तासह पूर्वींचें सर्व वृत्त आठवलें. ज्याप्रमाणें मनुष्याला सकाळीं केलेली गोष्ट संध्याकाळीं आठवते, त्याप्रमाणें त्याला सर्व आठवलें आणि तो मला असें वचन बोलला. त्याचें तें वचन विवेकवैराग्ययुक्त असल्यामुळें फार रमणीय, चंद्रकिरणाप्रमाणें शीतल, आल्हाद देणारें, अत्यंत प्रशंसनीय, निर्दोष व सुखावह होतें.

सिद्धः—हे ब्रह्मन्! आतां मी तुला ओळखलें. मी नमस्कार करतों. तुझें दर्शन होतांच तुला नमस्कार केला नाहीं, ही माझी चूक झाली. मला क्षमा कर. क्षमा हें सज्जनाचें शीलच आहे. मुने! मीं देवांच्या उद्यानभूमींतून दीर्घकाल भ्रमण केलें. भ्रमर जसा पद्मिनींमध्यें त्याप्रमाणें मी तेथील भोग व सुगंध

यांत आसक्त झालों. चित्तरूपी जलाचे कल्लोल ज्यांत एकसारखे उठत आहेत अशा दृश्य नदीमध्यें मी अनंत काल चक्राकार भ्रमण करीत राहिलों. फार दिवसांनीं माझ्या मनांत विचाराचा उदय होऊन स्वप्नासारख्या या संसाराविषयीं मी उद्विग्न झालों. वृष्टीला प्रतिबंध झाला असतां चातकाला जसा उद्वेग होतो, त्याप्रमाणें या संसारसागरांतील दृश्य-रूपी तरंगांनीं मी व्याकुल झालों. फार दिव-सांनीं माझें मन उद्विग्न झालें. केवल संवित् हेंच ज्यांतील सार आहे, अशा या भोगा-गध्यें रम्य तरी काय आहे? आणि जर त्यांत संविद्रूपानें अनुभवास येणारें सुखच रम्य असेल तर त्याहून अतिरिक्त अशीं जीं त्याचीं साधनें तीं दुखःरूपच असल्यामुळें तेंच त्याचें सार आहे. यास्तव सर्व दुःखां-शाचा त्याग करून सारभूत सुखसंविद्रूपांतच मी स्थिर होतों. त्याहून इतर असार पदार्थ घेऊन मला काय करावयाचें आहे? शब्द रूप, रस, स्पर्श व गंध या पांच विषयांना सोडून या जगांत एक सुद्धां सुखाचें साधन नाहीं. मग अपरिच्छिन्न सुख सोडून या इतक्या अल्पशा असुखांत रममाण होणें उचित नाहीं. शब्द-स्पर्शादि हें सर्व विषय-जात चिन्मात्र आकाश किंवा प्रत्यक्ष चिन्मात्रच आहे. तेव्हां एखाद्या उन्मत्ताप्रमाणें या अस-दाकार शब्दादिकांमध्यें मी कसा रममाण होऊं? हे शब्दादि विषय विषाप्रमाणें मरण, उन्माद इत्यादि वैषम्याला कारण होतात. स्त्रिया कामोत्पत्तीच्या द्वारा मोह पाडणाऱ्या आहेत. राग म्हणजे निरनिराळे रस सरस पुरुषाच्या ठिकाणींहि वैरस्य उत्पन्न करणारे आहेत. यांमध्यें आसक्त असलेला कोणता पुरुष आपला घात करून घेत नाहीं? सत्वर आलेली जरा हीच मोठी बगळी असून जीवितरूपी चिखलांत शरीर ही मोठी मासळीच सांपडली आहे असें समजून, त्याला गिळ-ण्याची इच्छा करीत आहे. सागरांतील बुडबुड्याप्रमाणें हें शरीर क्षणभंगुर आहे. दीपज्योतीप्रमाणें तें अकस्मात् विझून जातें. जीविताविषयीं आशा धरणेंहि व्यर्थ आहे. कारण ती सुखदुःखांची नदीच आहे. नाना-प्रकारचे विक्षेप हेच तिच्यांतील तरंग असून चक्रा-प्रमाणें सुखानंतर दुःख, दुःखानंतर सुख, असें तिचें एकसारखें भ्रमण चाललेलें असतें. मरण व जन्म हेच तिचे फार मोठे तीर आहेत. तारुण्याचा उल्हास हाच त्यांतील गढूळपणा असून, जरा हाच शुभ्र फेंस आहे. केव्हां केव्हां दैववशात् तिच्यामध्यें सुखाचे बुडबुडे उठत असतात. व्यवहाररूप महा-प्रवाहपंक्तीनें वहात असतांना तिच्यामध्यें मूर्खांचे प्रलाप हींच खळखळ चाललेली असते. रागद्वेषरूपी मेघांच्या योगानें ती एकसारखी वाढत असते. भूतलावर तिचा देह चंचल होत असतो. लोभ व मोह हे तिच्यांतील फार मोठे भोंवरे असून, वर उठणें व खालीं जाणें ह्मणजे उत्कर्ष व अपकर्ष यांच्या योगानें ती फिरत असते. हाय हाय! ही जीविताख्य नदी तापत्रयांनीं संतप्त होऊन एकसारखी वहात आहे. तिला केवल शब्द-मात्र सुखरूप ह्मणतां येतें. वस्तुतः ती तशी नाहीं. या संसाररूपी नदींतील जला-प्रमाणें असलेले पुत्र-मित्रादि प्रियसमागम व नानाप्रकारचें धन पूर्वीं असलेलें नष्ट होतें व नसलेलें प्राप्त होतें. त्यांतील जे पूर्वींच प्राप्त असलेले दृढ भाव निवृत्त झाले, ते आतां पुरे आहेत; आतां पुनः त्यांची इच्छा नाहीं. तेव्हां आतां जे नवीन नवीन प्राप्त होत आहेत त्यांत काय आस्था ठेवावयाची? ही जीवितनदी लौकिक नद्यांसारखीहि नाहीं.

लौकिक नद्यांचें पाणी जातहि असतें व मेघ व पर्वत यांपासून तें येतहि असतें. पण या देहनदींतील आयुष्यरूपी जल नेहमीं जातच असतें. त्यांत भर कधींच पडत नाहीं. प्रत्येक देहामध्यें प्रत्येक क्षणीं भोग्य पदार्थ कुंभाराच्या चक्रावर चढविलेल्या घट-शरावादि पदार्थांप्रमाणें निरनिराळे येत असतात. या भवसागरांतील त्या लाटाच होत. हे विषयरूपी अतिशय दुर्धर शत्रु किंवा चतुर चोरच असून एकसारखे फिरत असतात. ते माझें विवेकरूपी सर्वस्व हरण करितात. तेव्हां आतां मी जागूं कीं निजूं? म्हणजे त्यांच्याविषयीं सावध होऊं कीं बेसावध राहूं? आयुष्याचे पुनः पुनः बारीक बारीक तुकडे होऊन खालीं पडत आहेत, पण हा आपला नाश कोणाच्याहि लक्षांत येत नाहीं. काय चमत्कार आहे! काळानें आयुष्याचे सर्व दिवस क्षीण करून सोडले. 'आज मला हें मिळालें; तसेंच हेंहि प्राप्त झालें. हें आतां मजपाशीं आहे व हें लवकरच प्राप्त होईल.' असा विचार करतां करतां फुकट गेलेलें आयुष्य व जवळ आलेला मृत्यु कोणी पहात नाहीं. अनेक दिवस मीं खाल्लें, प्यालों, असंख्य वनभूमींतून विहार केला, सुखदुःखांचा अनुभव घेतला. आतां येथें साधावयाचें तें काय राहिलें? जीवितांत आह्मांला सुखदुःखावांचून दुसरा कशाचाहि अनुभव आला नाहीं. पुनः पुनः तेच ते पदार्थ व त्याच त्या क्रिया यांचा प्रत्यय आला. सर्व पदार्थ अनित्य आहेत अशी खात्री झाली, व आतां आम्ही अगदीं निरिच्छ होऊन राहिलों आहों. असंख्य भोग भोगले व अनित्यतेचा पूर्णपणें अनुभव घेतला. या संसारांत आम्हांला विश्रांति कोठेंहि दिसली नाहीं. मेरुपर्वताच्या उंच शृंगावरील उपवनांतून मीं भ्रमण केलें व लोकपालांच्या नगरांतूनहि विहार केला, पण त्यांत मला नित्य असें काय मिळालें? कांहींच नाहीं. जेथें जावें तेथें काष्ठांचेच वृक्ष, मांसाचींच शरीरें असून दुःख व अनित्यता कोठेंहि कमी नाहीं. तेव्हां आतां मीं मनाचें समाधान कसें करावें, सांग? काळानें ज्याला ग्रासलें आहे, त्याचें धन, मित्र, सुखें, बांधव यांतील कोणीच रक्षण करूं शकत नाहीं. धुळीच्या राशीप्रमाणें अस्थिर व अदृढ असलेला हा जन पर्वतांच्या दऱ्यांतून पडलेल्या मेघजलाप्रमाणें विषयांमध्यें आसक्त होऊन क्षणोक्षणीं क्षय पावून कोणत्याहि प्रकारचा पुरुषार्थ संपादन न करितां मरून जातो. मला विषय मनोहर वाटत नाहींत, विभूतिहि रम्य दिसत नाहींत. मदोन्मत्त स्त्रीच्या चंचल कटाक्षांप्रमाणें हें जीवित चंचल आहे. हे मुने! कोणता विचारी पुरुष कोणत्या पदार्थावर कसा व कोणत्या कारणानें विश्वास ठेवील? निर्दय मृत्यु आज किंवा उद्यां मस्तकावर अवश्य पाय ठेवणार, यांत संशय नाहीं. शरीर पानाप्रमाणें गळून पडणारें आहे. जीवित एखाद्या जीर्ण कुटीसारखें आहे. बुद्धीला अधैर्यानें ग्रासलें आहे. रस निरस झाले. क्षुद्र भोगांनीं किंवा त्यांविषयींच्या मनोरथांनींच माझें एवढें मोठें आयुष्य हरण केलें. चमत्कार उत्पन्न करील अशा प्रकारचें कोणतेंहि पुरुषार्थरूप धन मीं संपादन केलें नाहीं. 'मी व माझें' हा मोह मंद झाला आहे. देह निरुपयोगीच बनला आहे. विषयाविषयीं अनास्था हीच उत्तम अवस्था व जीविताविषयींची आस्था हीच अधम स्थिति होय. काय सांगावें? मोह पाडणारी संपत्ति प्राप्त झाली असतां ही आपल्यावर आपत्तिच आली आहे, असेंच विवेक्यानें नित्य समजावें, व या संसारांत आसक्त होऊं नये. विवेकी पुरुषाला कर्मशास्त्रेंहि मोह पाडणारींच आहेत असें मला वाटतें. कारण जल जसें उंच-

सखल प्रदेशीं यथेष्ट गमन करतें, त्याप्रमाणें विधि व निषेध, शाश्वत व आशाश्वत फळें यांच्या योगानें हा सर्व लोक यथेष्ट व्यवहार करीत असतो. विषयरूपी विषारी वायु वित्तरूपी पुष्पकोशांतून विवेकरूपी सुगंधसर्वस्वहरण करून जीवाला मूर्च्छित करतात. वस्तुतः हें विषयरूप असत् असतांनाच अविवेक्याकडून तें सद्बुद्धीनें ग्रहण केलें जातें. अर्थात् त्याची सत्ता काल्पनिक आहे, खरी नव्हे. जसें सद्रूप आवरणानें असत्च झालें आहे, तसें असत्च विक्षेपानें सत् बनलें आहे. कारण आवरण व विक्षेप यांनीं युक्त असलेली मायाशक्ति अघटित घटना करण्यांत मोठी चतुर आहे. ज्याप्रमाणें नद्या आपल्या दोन्ही तीरांवर आपल्या प्रवाहरूपी देहाला झोंके देत समुद्राकडेच धांवत जातात, त्याचप्रमाणें सर्व जनता विषयांकडे धांवते. आपल्या आधारस्थानापासून सुटलेले चित्तरूपी बाण विषयरूपी लक्ष्याकडे एकसारखे धांवत असतात. धनुष्यापासून सुटलेले बाण जसे गुणाला ह्म० धनुष्याच्या दोरीला पुनः स्पर्श करीत नाहींत, त्याप्रमाणें ते चित्तबाण विवेकवैराग्यरूप दोरीस स्पर्श करीत नाहींत. कृतघ्नांच्या ठिकाणीं प्रीतीचा जसा सर्वथा अभाव असतो त्याप्रमाणें विषयी पुरुषांच्या ठिकाणीं वैराग्यादि गुणांचा अभावच असतो. आयुष्य हा उत्पातवायुच आहे. बंधु हीं बंधनेंच आहेत, व विविध संपत्ति हें मरणाचें साधनच आहे. सुखें आसक्ति उत्पन्न करीत असल्यामुळें अतिशय दुःखेंच आहेत. संपत्ति ही आपत्तिच आहे. भोग हे संसारमहारोगच आहेत. आसक्तिच मोठा उद्वेग आहे. सर्व संपत्ति, आपत्ति, व सुख हें केवल दुःखालाच कारण होतें. जीवित मरणालाच कारण होतें. अरे अरे! मायेचा हा विलास किती विचित्र आहे! प्रत्येक मनुष्य अनेक इष्टानिष्ट कालपरिवर्तनांचा व थोड्याशा सुखाचा अनुभव घेत जर्जरतेस प्राप्त होतो. विषयाचे संभोग या सर्पांच्या फणाच आहेत. त्यांना थोडासा जरी स्पर्श झाला तरी ते विषयभोगरूपी सर्प लागलीच दंश करतात व प्रत्येक क्षणीं पहातां पहातां नष्ट होतात. आयुष्य अतिशय कष्टकर व क्षणभंगुर फल देणाऱ्या भयंकर व्यवहारांनीं क्षीण होतें. त्यामुळें निरतिशय आनंदरूप फलाची प्राप्ति होत नाहीं. बंधनस्थानीं बांधून खान, पान, उपवास इत्यादिकांच्या योगानें कृश केलेल्या वनांतील हत्तीप्रमाणें भोगाशेनें बद्ध झालेल्या सकाम मनुष्यांचे पदोपदीं हाल होतात. संपत्ति व स्त्रिया तरंगाच्या उंचीप्रमाणें क्षणिक आहेत. सर्पांच्या फणारूपी छत्राच्या छायेप्रमाणें त्यांच्या ठिकाणीं कोणता शहाणा पुरुष रममाण होणार! विषय मनोहर आहेत व विभूति अतिशय रम्य आहेत, असें जरी मानिलें तरी मत्त तरुणींच्या कटाक्षांप्रमाणें जीवित चंचल आहे. तेव्हां जे आरंभीं अतिशय रमणीय वाटणाऱ्या पण शेवटीं विरस करून सोडणाऱ्या विषयांत रममाण होतात, ते नरकांत पडतात. द्वंद्वदोषांनीं युक्त असलेलीं दुःसाध्य, अस्थिर व अभाग्यांनाच आवडणारीं धनें केव्हांच संतोष देत नाहींत. केवल आरंभींच अतिशय गोड वाटणारी, पण परिणामीं दुःख देणारी क्षणविलासिनी लक्ष्मी सर्व लोकांना मोहच पाडते. दुष्टांच्या संगतीप्रमाणेंच धनादिकांची संगति आरंभीं अतिशय रम्य वाटते, मध्यें क्लेश देते व शेवटीं दुःख व आपत्ति देते. तारुण्याची शोभा शरत्कालच्या मेघच्छायेप्रमाणें क्षणिक आहे. विषय आपातरमणीय पण परिणामीं संताप देणारे आहेत. मोठमोठ्यांच्या जीवितावरहि मृत्यु घाला घालतो. प्राण्यांचें आयुष्य शाखाग्रावरून टिबकणाऱ्या जलबिंदूप्रमाणें क्षय पावत असतें. वृद्धाचे केंस पिकतात. तो जसा जसा वृद्ध होत जाईल

तसे दांतहि गळून पडतात. तात्पर्य, त्याच्या शरीरांतील सर्व कांहीं जीर्ण व क्षीण होतें; पण एक तृष्णा मात्र क्षीण होत नाहीं. या जन्मीं भोग भोगून जन्मांतरीं विवेकवैराग्यादिकांस प्राप्त होईन, ही आशा देखील व्यर्थ आहे. कारण विषयानुभवाच्या विस्तारानें अतिशय गहन झालेल्या अनेक देहपरंपरारूप शरीर-अरण्यांत एक तृष्णा हीच विषयमंजरी एकसारखी अतिशय वाढत जाते. बाळपण जसें झटकन निघून जातें, तसेंच तारुण्यहि न कळत संपतें व तारुण्य जसें हां हां म्हणतां निघून जातें, तसेंच बाळपणहि केव्हां संपतें तें कळत नाहीं. या दोन्ही अवस्था एकसारख्याच क्षणभंगुर असल्यामुळें त्यांना परस्पर उपमानोपमेयत्व आहे. ह्मणजे बाळपणाला तारुण्याची उपमा देतां येते, व तारुण्याला बाळपणाची उपमा देतां येते. ओंजळींतील पाणी जसें गळतें, तसें जीवितहि सत्वर संपून जातें. नदीचा प्रवाह जसा परत येत नाहीं, तसें गेलेलें आयुष्य पुनः परत येत नाहीं. जो जो देह येतो, तो तो कांहीं तरी निमित्त होऊन, झटकन, पाहतां पाहतां, तरंग, मेघ किंवा दीप यांप्रमाणें अस्त पावतो. आम्ही रम्य विषयांमध्येंहि अरम्यता पाहिली आहे, स्थिर पदार्थांमध्येंहि अस्थिरतेचा अनुभव घेतला आहे व सत्य वस्तूमध्येंहि असत्यतेचा निश्चय केला आहे. त्यामुळें आम्ही आतां त्याविषयीं विरस झालों आहों. मन आत्म्यामध्यें विश्रांति पावून वासनाशून्य झालें असतां जें सुख होतें, तें पाताल, भूतल किंवा स्वर्ग यांतील कोणत्याच विषयांमध्यें नाहीं. माझें हृदय आतां संतुष्ट झालें आहे, त्यामुळें या पांचहि इंद्रियवृत्ति सर्व विषयांसह मला कशा जिंकूं शकणार? अर्थात् विषय व इंद्रियवृत्ति या सर्वांनीं मिळून एकदम जरी माझ्यावर हल्ला केला, तरी माझें वैराग्य अतिशय दृढ असल्यामुळें, चित्रांत काढलेल्या लता भ्रमराला ज्याप्रमाणें आसक्त करीत नाहींत, त्याप्रमाणें मला त्या आसक्त करूं शकत नाहींत. आज दीर्घकालानें निरहंकार झालेल्या मीं आपल्या बुद्धीनेंच स्वर्ग व मोक्ष यांविषयींचें हें वैराग्य संपादन केलें आहे. त्यानंतर चिरकाल एकान्तांत विश्रांति ध्यावी या हेतूनें तुजप्रमाणेंच मी या आकाशस्थानीं आलों व मीं येथें ती कुटी पाहिली. ही कुटी तुझी आहे हें मला आतां कळलें. तूं पुनः येथें येशील अशी मला कल्पनाहि नव्हती. त्यामुळें मला असें वाटलें कीं, हा कोणी एक योगी स्वतःच देहत्याग करून येथें निर्वाणास प्राप्त झाला आहे. भगवन्! हा माझा पूर्व वृत्तांत आहे. मी हा अशा प्रकारचा विरक्त मनुष्य आहें. वस्तुस्थिति जशी होती, तशी मीं तुला सांगितली. आतां तुला योग्य वाटेल तसें कर. वाटल्यास या अपराधाबद्दल दंड कर किंवा अनुग्रह कर. हे मुने, तुमच्यासारखे सिद्ध सुद्धां जोंवर अवधान देऊन शुद्ध बुद्धीनें विचार करून निर्णय करीत नाहींत, तोंवर त्यांनाहि त्रैकालिक वृत्तान्त बरोबर कळत नाहीं. ब्रम्हदेवादिकांच्या मनाचाहि हाच स्वभाव आहे, मग माझ्यासारख्याला तुझा वृत्तान्त न कळला तर काय आश्चर्य आहे! यास्तव माझ्या अपराधाची क्षमा कर. ९३.

---

# सर्ग ९४ वा.

१ त्या दोघांचें सिद्धलोकीं गमन २. पिशाचांची व देवतांची मनोमात्रानुसारिणी स्थिति.

**श्रीवसिष्ठः**—त्यानंतर आकाशाप्रमाणें विस्तीर्ण असलेल्या त्या सुवर्णमय महाभूमीमध्यें त्या सिद्धाच्या सुहृद्भावामुळें मी असें बोललों. हे साधो! हा अविचाररूपी अपराध माझ्या हातूनहि झाला आहे. केवळ तूंच नव्हेस, तर मींहि या गोष्टीचा विचार केला नाहीं. सिद्ध जोंवर चित्ताचें ऐकाग्र्य करून पहात नाहींत, तोंवर त्यांना त्रिकालज्ञान होत नाहीं, हें तुझें म्हणणें अगदीं खरें आहे. योग्यांनाहि चित्ताच्या स्थिरतेवांचून भूत-भविष्यत्काळाचें ज्ञान होत नाहीं. कारण चित्तैकाग्र्यावांचून जर असें ज्ञान झालें असतें, तर मीं तुझ्या वृन्ताताचा विचार करून ही कुटी आकाशांत तशीच स्थिर केली असती व त्यामुळें तूं इतक्या उंचीवरून खालीं पडला नसतास. परस्परांचा अपराध परस्परांना सहन करणें उचित आहे. तर आतां हे साधो, ऊठ; आपण आपापल्या सिद्धलोकीं जाऊन राहूं या. कारण आपली निर्विक्षेप स्थिति होण्यास आपापलीं स्थानेंच अत्यंत उपयोगी असतात. यास्तव मी आपल्या सप्तर्षिलोकीं जाऊन रहातों व तूं आपल्या नंदनवनांत जाऊन रहा. असा निर्णय करून नक्षत्रांचीच ज्यांना उपमा आहे असे आम्ही गोफणींतून एकाच वेळीं सोडलेल्या दोन दगडांप्रमाणें एकाच वेळीं आकाशांत उडालों. एकमेकांना प्रणाम करून व परस्परांचें विसर्जन करून तो नंदनवनांत गेला व मी सप्तर्षिलोकीं गेलों. हे राघवा! मीं तुला हा सर्व वृन्तात सांगितला. संसाराची विचित्रता किती आश्चर्यकारक आहे ती तूं पहा.

**श्रीरामः**—भगवन्! आपला देह त्या सिद्धानें कुटींतून फेंकून दिल्यावर तो पृथ्वीवर पडून धुळीला मिळून गेला असला पाहिजे! मग आपण सिद्ध लोकांत कोणत्या शरीरानें भ्रमण केलेंत?

**श्रीवसिष्ठः**—हां, मला आतां आठवलें. आतां पुढचा वृत्तांत ऐक. त्यानंतर या जगद्रूपी गृहांत सिद्धांच्या सेनांतून व लोकपालांच्या नगरींतून भ्रमण करणाऱ्या मीं काय काय केलें तें ऐक. मीं इंद्रपुरांत गेलों, पण मला तेथें कोणीं पाहिलें नाहीं. कारण मी देहरहित होतों. त्या वेळीं मी सूक्ष्मदेहानेंच युक्त होतों. रामा! त्या प्रसंगीं मी आकाशाप्रमाणें अस्थूल होतों. मी कोणाचा आधार नाहीं व आधेयहि नाहीं अशा स्थितीमध्यें चिदाकाशप्रचुर जें मन तद्रूप होतों. तुझ्यासारखे जे स्थूल पदार्थांना जाणणारे लोक होते, त्यांना मी दिसत नव्हतों व मीहि कोणाचें ग्रहण करीत नव्हतों. सूक्ष्मदर्शी योग्यांना मात्र मी दिसत होतों. देश व काल यांचें परिवर्तन करणाराहि मी नव्हतों. कारण पहाणें, प्रेरणा करणें, इत्यादि कोणतीच क्रिया मी करीत नव्हतों. मी मनोमननमात्ररूप होतों. पृथिव्यादिकांनीं रहित होतों. संकल्पपुरुषाच्या आकाराप्रमाणें मी होतों. भिंत, खांब यांचा स्पर्श न झाल्यामुळें त्यांना मी निरोध करीत नव्हतों. इतर पदार्थांकडूनहि मला प्रतिबंध होत नसे. मी स्वतः स्वानुभवोन्मुख झालों होतों. स्वप्न किंवा मनोराज्य याप्रमाणें स्वप्नांतील व मनोराज्यांतील भूतांशीं मी व्यवहार करीत होतों. याविषयीं स्वप्नांतील अनुभव हाच पूर्ण दृष्टान्त आहे असें समजावें. आतां "कोणत्याहि ज्ञानाला देह अवच्छेदकतासंबंधानें कारण होतो, त्वचा व मन यांचा संबंधहि ज्ञानाचें निमित्त आहे, पण सुषुप्तीमध्यें त्या दोन्ही

कारणांचा अभाव असल्यामुळें त्या अवस्थेंत ज्ञान नसणेंच युक्त आहे." असें आपल्या अनुभवाचा अपलाप करून बोलणारा जो मूर्ख नैयायिक त्याच्याशीं तूं संभाषणहि करूं नयेस. कारण मी 'सुखानें निजलों होतों,' या स्मृतीवरून झोंपेमध्यें सुखशयनादिकांचा अनुभव आला, ही गोष्ट निर्विवाद आहे. ज्याप्रमाणें स्वप्न पहाणारा पुरुष आपल्या घरांत व्यवहार करीत असलेला दिसत नाहीं, त्याप्रमाणें मी पुढें असूनहि अंतरिक्षांतील देवादिकांना दिसलों नाहीं. मी दुसऱ्या सर्वांना पार्थिव स्थूल आकारानें युक्त असलेले पहात होतों, पण सूक्ष्मस्वरूप अशा मला मात्र कोणी पहात नव्हतें.

**श्रीराम:**—आपण स्थूलदेहरहित व चिदाकाशरूप असल्यामुळें जर कोणाला दिसत नव्हता, तर त्या सिद्धानें आपल्याला सुवर्णभूमींत कसें पाहिलें?

**श्रीवासिष्ठ:**—'ज्या अर्थी आमच्यासारखे ज्ञानयोगसिद्ध जन सत्यसंकल्पस्वरूप असतात, त्या अर्थी त्यांना संकल्पानें कल्पिलेले पदार्थच प्राप्त होतात. त्यांनीं ज्याचा संकल्प केलेला नसतो, त्याची त्यांना प्राप्तिहि होत नाहीं. 'अहो, पण ज्ञानसिद्धांना नेहमीं सूक्ष्म देहच आहे, स्थूल देह नाहीं, असें आपण अनेक वेळां सांगितलें आहे. तेव्हां त्यांच्या स्थूलदेहबुद्धीनें दुसऱ्याला पहाणें, त्याच्याशीं संभाषण करणें इत्यादि सत्यसंकल्प कसा संभवतो?' असें विचारशील तर सांगतों. लौकिक व्यवहारामध्यें निमग्न झालेल्या शुद्धचित्त पुरुषाला आपल्या सूक्ष्मदेहत्वाचें एका क्षणांत विस्मरण होतें; अर्थात् समाधिकाल व विवेकदशा या अवस्थेंत त्याचें शरीर सूक्ष्मच असतें. समाधि सोडून जागें होणें व व्यवहार करणें या अवस्थांमध्यें सूक्ष्मभावाचें विस्मरण होऊन स्थूल देहाची कल्पना संभवते. त्या वेळीं 'हा सिद्ध मला पाहो,' असा मी सत्य संकल्प केला. त्यामुळें तो स्वतःहि सिद्ध म्हणजे सत्यसंकल्प असल्यामुळें त्यानें मला पाहिलें. इतर जन 'मी ब्रह्म नव्हे' या दृढ भावनेनें जरठ बनलेला असतो. त्यामुळें तो संकल्पार्थाचें पात्र होत नाहीं. पण हा सिद्ध भेदवासनाशून्य असल्यामुळें सत्यसंकल्पाचें पात्र झाला होता. 'तर मग दोन सिद्धांनीं एकमेकांच्या विरुद्ध संकल्प केले तर काय होतें? मी याला पहावें असा एकानें संकल्प केला व मी याला दिसूं नये असा दुसऱ्यानें संकल्प केला तर त्यांतील कोठला सिद्धीस जातो?' तर अशा अवस्थेमध्यें ज्याच्या ठिकाणीं आत्मज्ञानाचें विशदत्व अधिक असतें त्याचा संकल्प प्रबळ ठरतो. जसें—एका राज्याच्या सिद्धीसाठीं यत्न करणाऱ्या दोन राजपुत्रांतील ज्याच्यामध्यें शौर्यादि गुण जास्त असतात त्याचाच जय होतो. असो. पण त्या सिद्धांच्या समूहांतून व लोकपालांच्या नगरांतून भ्रमण करणाऱ्या माझें तें सूक्ष्मत्व व्यवहाराच्या ओघाबरोबर कोठल्या कोठें गेलें. मी जेव्हां त्याला विसरलों तेव्हां त्या महाकाशांत दुसऱ्यांबरोबर व्यवहार करण्यास प्रवृत्त झालों, पण व्यवहारवशात् चंचल झालेल्या मला तेथें कोणीच पाहीना. मी मोठमोठ्यांनीं जरी ओरडत होतों, तरी माझा शब्द त्या देवलोकांतील कोणीहि ऐकेना. ज्याप्रमाणें स्वप्नांत ओरडणाऱ्याचा शब्द कोणाला स्पष्ट ऐकूं येत नाहीं, त्याप्रमाणें माझें ओरडणें कोणाच्याही कानीं पडलें नाहीं. त्या वेळीं मी मनोमननरूप असल्यामुळें कोणी पडत असलें किंवा रथादिकांवर चढत असलें तर त्याला धरण्यासाठीं आपला हात पुढें केल्यास तो दुसऱ्या कोणाच्या उपयोगीं पडला नाहीं. हे रघुनंदना! याप्रमाणें मी

आकाशांतील पिशाच झालों. अशा प्रकारें मीं देवलोकांतील अवर्णनीय पिशाचतेचा अनुभव घेतला.

**श्रीराम**:—भगवन् ! या लोकीं पिशाच आहेत का? त्यांचा आकार कसा आहे? ते रहातात कोठें? त्यांची जात कोठली? त्यांचा आचार काय? ते कशा प्रकारचे असतात व त्यांचा आशय काय ?

**श्रीवसिष्ठ**:—हे रामा ! या जगांत पिशाचें कशा प्रकारचीं असतात तें मी सांगतों, ऐक. प्रसंगीं प्राप्त झालेल्या प्रश्नाचें जो निरसन करीत नाहीं, तो सभेंत बसण्यास योग्यच नाहीं. कांहीं पिशाच आकाशासारखे असतात; त्यांचीं शरीरें मनोमय असतात. स्वप्नाप्रमाणें मनोमय हस्तपादादिकांनीं तीं युक्त असतात. तूं जसा हें सर्व जगत् पहातोस त्याप्रमाणें तीं पिशाचेंहि सर्व पाहातात. तीं दुसऱ्या मनुष्यामध्यें त्याच्या चित्तभ्रमरूप व त्यामुळेंच नाना प्रकारचें भय दाखविणाऱ्या अशा आपल्या छायेनें—प्रतिबिंबानें प्रवेश करून, ह्मणजे जणुं काय त्याच्या चित्ताशीं तादात्म्य पावून त्याच्या दुःखभोगप्रद कर्मवासनादिकांस नानाप्रकारच्या भ्रांति व चेष्टा यांना अनुरूप अशा रीतीनें जागृत करतात. ते ज्याच्या शरीरांत प्रवेश करतात त्याचें कर्म मरणाला अनुकूल असलें तर त्याला मारतात. त्यांचा तसाच कांहीं ऋणानुबंध असला तर त्याच्या देहांतील धातूंना क्षीण करतात. रक्ताला शोषून घेतात. त्याचें बल कमी करतात. याप्रमाणें जीवांच्या चित्ताचें आक्रमण करून त्याची हिंसा करतात. [ याप्रमाणें त्यांचा आचार सांगून आतां आकार व जाति यांविषयीं सांगतात—] कांहीं आकाशासारखे असतात. कोणी धुक्याच्या आकाराचे असतात. कित्येक स्वप्नरांसारखे असतात. कांहीं मेघसमूहासारखे असतात. कित्येकांचीं शरीरें वायूच्या स्वरूपाचीं असतात. कांहीं साकार असले तरी आकाशरूप असतात. कित्येक भ्रमात्मक असतात, ह्मणजे त्यांना ज्याचें आक्रमण करावयाचें असतें, त्याच्या भ्रमानुसार ते शरीर धारण करितात. त्यांना कोणाला धरतां येत नाहीं व ते स्वतःहि कोणाला धरूं शकत नाहींत. त्यांचीं शरीरें आकाशासारखीं शून्य असतात. ते आपल्या स्वतःच्या आकृतीला पहातात. थंडी, ऊन्ह यांमुळें होणारें सुख-दुःख त्यांना भासतें, पण ते पिशाच बाह्य-जल पिण्यास, अन्न खाण्यास, एखादी वस्तु धरण्यास व देव-घेव वगैरे करण्यास समर्थ नसतात. ते इच्छा, द्वेष, भय, क्रोध, लोभ व मोह यांनीं युक्त आहेत. मंत्र, औषधि, तप, दान, धैर्य व धर्म यांच्या योगानें ते वश केले जातात. (मग मनुष्यांना ते दिसतात कसे ? उत्तर—) 'सत्त्वावष्टंभ' या नांवाच्या योगधारणेनें, यंत्रानें, मंत्रानें व देवतेच्या आराधनेनें ते भूतविद्येनें युक्त असलेल्या लोकांना दिसतात, त्यांच्या अधीन होतात, सेवादिकांमध्यें नियुक्त केले जातात. पण ही गोष्ट सर्वांनाच साध्य होत नाहीं. देवांच्या ज्या अकरा प्रकारच्या योनि आहेत, त्यांमध्येंच पिशाचयोनीचा अंतर्भाव होत असल्यामुळें अणिमादि ऐश्वर्याच्या न्यूनाधिकतेप्रमाणें त्यांना न्यूनाधिक सुखोपभोगाहि होतो. ह्मणजे त्यांतील कित्येक देवांसारखे असतात, कित्येक मनुष्यांसारखे असतात. कित्येकांमध्यें नागांचें सादृश्य असतें. कोणी घोडा, कुत्रा यांसारखे असतात. कोणी गावांतील ओसाड प्रदेशीं रहातात, कोणी जंगलांत रहातात, कोणी पाण्यांतील नाल्यावर रहातात, कोणी उकिरडे, चवाठे व इतर अशुचि प्रदेश यांवर वास करतात. याप्रमाणें त्यांचा आकार कसा असतो, ते कोठें रहातात व त्यांचा

आचार कसा असतो तें सांगितलें. आतां त्यांचा जन्म कसा होतो तें सांगावयाचें आहे. यास्तव अगदीं आरंभापासून तें सर्व तूं ऐक. जें निर्विषय चिन्मय ब्रह्म तें सर्व शक्तींनीं युक्त असल्यामुळें आंतल्याआंत विषयाचा संकल्प करीत असल्याप्रमाणेंच जागृत होतें. म्हणजे मुख्य ब्रह्म कार्यब्रह्माहून अगदीं विलक्षण असतें. म्हणूनच त्याला निर्विषय चिन्मय म्हणतात. मन एखादा मनोरथ करूं लागलें असतां तें जसें जागृत होतें, तसेंच तें निर्विषय ब्रह्महि संकल्प करूं लागतें. तोच जीव किंवा चित्चा प्रथम अंकुर आहे, असें तूं समज. तोच संकल्प अभिमानानें ऊर्जितावस्थेस प्राप्त झालेला अहंकार बनतो. तो अहंकार संकल्पानें अतिशय पुष्ट झाला म्हणजे त्यालाच विद्वान् लोक 'मन' असें नांव देतात. त्यालाच ब्रह्मदेव किंवा चतुर्मुख असें म्हटलें जातें. संकल्पाकाश हेंच त्याचें स्वरूप आहे. असत् जगाचें असत् मन हेंच बीज आहे. त्याला आकृति कशी ती मुळींच नाहीं. याप्रमाणें समष्टि मनच चतुर्मुख होऊन राहिलें आहे. तो सदेह जरी असला तरी निर्मल आकाश आहे. स्वप्नांतील पुरुषाचा जसा आकार असतो, तसा कल्पित आकाराचा तो असून, अधिष्ठानरूपानें जरी सत् असला तरी स्वरूपानें सदा असदाकार आहे. तो पृथिव्यादि मूर्त भौतिक शरीरानें रहित असून, केवळ सूक्ष्म लिंगशरीरानें युक्त आहे. आकाशांतील संकल्पपुरुषाला पृथिव्यादि भौतिक देह कोठून असणार ? तुझें मन जसें कल्पित आकाशनगर पहातें, तसेंच मन आत्म्यामध्यें कल्पित चतुर्मुखत्व पहातें. म्हणूनच तो ब्रह्मदेव जें जें कांहीं कल्पितो तें तें सर्व पदार्थरूपानें पहातो व त्याचा अनुभवहि घेतो. जो जेवढा म्हणून जीव प्रसिद्ध आहे तो सर्व चिद्रूपच आहे. त्यामुळें तो परमार्थ सत् आहे. तो ज्ञानशक्तीनें युक्त आहे. तेव्हां तो आपला संकल्पित पदार्थ कां पहाणार नाहीं ? निराकार मनोरूप असलेला तो ब्रम्हा चिदकाशांत शून्याकारच असें जें ब्रह्मांड पहातो, तेंच हें जगत् होय. ज्याप्रमाणें दीर्घकालीन स्वप्न अगदीं खरें व रमणीय भासावें, त्याप्रमाणें ब्रह्मच ब्रम्हामध्यें ब्रम्हदेवरूप होऊन चिरकाल या जगाचीच भावना करतें. त्यामुळें आतां तो त्याचा भासच अतिशय दृढ होऊन राहिला आहे. तो चतुरानन वस्तुतः ब्रम्हस्वरूप जरी असला तरी सूक्ष्मशरीरानें युक्त असलेल्याहि त्याच्या दीर्घभावनेनें सृष्ट्यादिकांचा पूर्ण अनुभव घेतो. तो त्याचा अनुभवच अत्यंत प्रकट होऊन आधिभौतिक देहत्वास प्राप्त झाला आहे. त्यामुळें भेदपरंपरेनें अतिशय विस्तीर्ण दिसणारा हा सर्ग 'सृष्टि' या नांवास प्राप्त झाला आहे. तो ब्रम्हा ब्रम्हमात्ररूप आहे. जगत्हि ब्रम्हरूपच आहे. त्यांतील एकाचाहि जन्म झालेला नाहीं. तीं आकाश व शून्यत्व यांप्रमाणें अत्यंत अभिन्न आहेत. वायु व त्याचा स्पंद हीं जशीं एकरूपानें रहातात, त्याप्रमाणें हा ब्रम्हदेवरूपी जीव व जगत् तादात्म्यानें रहातात. चतुरान 'मी पृथिव्यादि भूतमय आहें' असें जाणतो. पण तें मिथ्या आहे, खरें नव्हे. ज्याप्रमाणें तूं स्वसंकल्पानें निर्माण केलेल्या असत् पुरुषाच्या सत् नगरादिकांना भूतमय समजतोस, त्याप्रमाणेंच तो आपल्याला भूतमय समजतो. त्यानंतर ब्रह्मांडरूप स्वशरीराच्या कठिण, द्रवरूप इत्यादि भागांना त्या ब्रह्मदेवानें पृथ्वी, जल इत्यादि नावें दिलीं. त्या सर्वांना मिळून 'जगत्' हें नांव आहे. ज्याप्रमाणें असत्य असलेलाहि तुझा संकल्प कौतुक, मनोराज्य इत्यादि व्यवहारांच्या उपयोगी असल्यामुळें तो सत्यच आहे असा तूं अनुभव घेतोस, त्याप्रमाणें हा ब्रह्मदेवहि

आपला संकल्प सत्य आहे असा अनुभव घेतो. आणि तो तुजप्रमाणें व्यष्टिरूप नसून समष्टिरूप असल्यामुळें त्याच्या संकल्पानें उत्पन्न झालेल्या जगाचा सर्वलोकसाधारण व्यवहार सुरू आहे. तो ब्रम्हदेव वस्तुतः स्वतः चिन्मय आकाशच आहे. त्याचा संकल्पहि चिदाकाशच आहे; त्यामुळें सर्व जगत् हें स्वप्न आहे. उत्पत्ति व नाश हेहि खरे नव्हेत. ज्याप्रमाणें हें मन सत्य, त्याप्रमाणेंच त्याचे ते अंश म्हणजे वृत्ति सत्य होत. चंद्र, सूर्य, रुद्र, इंद्र, वायु हे सर्व त्याच्या अंशामुळें उद्भवतात. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें सर्व जगत् हें मनोराज्य आहे. तें आकाशांतील शून्य, निराधार स्फुरण आहे. ज्याप्रमाणें स्वप्नांतील नगरहि आकाश, संकल्पपर्वतहि आकाश, त्याप्रमाणेंच चतुर्मुख व जगत् हीं दोन्ही स्वच्छ व निराकार आकाशच आहेत. याप्रमाणें अहर्निश आभासमात्र भासणाऱ्या या अव्यय जगाचे उत्पत्ति, स्थिति व लय हे भाव व्यर्थ भासत असतात. हे निष्पाप रामा! जगद्रूप आकाशकोशांतील तुझें किंवा माझें यांतील काय जाणार किंवा काय येणार? कारण आत्मा चिदाकाशरूप आहे, असें अनुसंधान केल्यावर तुझे, माझे किंवा दुसऱ्या कोणाचेहि उत्पत्ति, स्थिति व लय संभवत नाहींत. तर मग आतां आम्ही उगीच आपणावरच अनर्थ ओढवून घेण्यासाठीं राग, द्वेष, भय यांची कल्पना काय ह्मणून करावी, तूंच सांग बरें? अरे बाबा, वस्तुतः सर्गाचें कारण नाहीं. सर्ग नाहीं व असर्गत्वहि नाहीं. हें असें सर्वदाच आवरणरहित आहे. हें प्रत्यक्स्वरूपच सतत तें ब्रम्हच आहे; पण तशाहि त्या चिदाकाशरूप क्षेत्रांत अज्ञानकल्पनांचा चिखल झाला असतां त्या स्वात्मरूप बीजापासूनहि असंख्य भूतांची परंपरा होते. यामागें जी भूतपरंपरा झाली ती याच अक्षय क्षेत्रांत झालेली असून पुढील भूतपरंपराहि यांतच होणार आहे. ती आकाशरूप आहे. अज्ञानरूपी कल्पनापंक ज्ञानसूर्याच्या तापानें सुकून गेला असतां येथें कांहीं क्षेत्र नाहीं, त्यांत कोणीं कांहीं पेरलेलें नाहीं. बीज नाहीं व त्यापासून कांहीं झालेलेंहि नाहीं. तर हें सर्वदा आपल्या मूळ स्वरूपांतच स्थिर आहे. (याप्रमाणें पिशाचांच्या जन्माचें वर्णन करण्याच्या प्रसंगानें सृष्टीचें तत्त्व सांगून प्रस्तुत विषयाला अनुकूल असल्यामुळें पूर्वोक्त भूतशिलेच्या अवयवादि भेदत्वानें जातिभेद दाखवितात.) त्या कल्पनारूप चिखलानें भरलेल्या आत्मक्षेत्रामध्यें ज्या शिलापंक्ति वाढतात, त्याच देवादिकांच्या जाति होत. त्यांतील ज्या कांतीनें उज्ज्वल, रत्नरूप शिला ज्ञानसंपन्न असतात, त्याच देव, ऋषि इत्यादिकांच्या जाति होत. ज्या अर्ध कांतीनें उज्ज्वल असतात त्या मनुष्य, नाग इत्यादि जाति होत. ज्या म्लान शिला असतात, त्या तमोगुणानें युक्त असल्यामुळें कृमि, स्थावर यांच्या जाति होत. ज्या अतिशय भारभूत, कांति, प्रकाश इत्यादि फलांनीं रहित, ह्मणजे भूमीवरील वृथा पाषाणासारख्या शरीररहित किंवा देहाकार अशा शिला असतात, त्या पिशाचादि जाति सांगितल्या आहेत. संकल्प करणाऱ्या मनुष्याची इच्छा स्वतंत्र असते. 'ती तशीच कां?' असा कोणाला प्रश्न करतां येत नाहीं. ब्रम्हदेवाच्या इच्छाहि तशाच स्वतंत्र आहेत. त्यानें जशी जशी इच्छा केली, तशा तशा भूतजाति झाल्या. अर्थात् ब्रम्हदेवानें त्या आकाशक्षेत्रांत उत्तम देवादि रत्नेंच होवोत, असा संकल्प कां केला नाहीं? वृथा पाषाणरूप पिशाचादि जाति उत्पन्न करण्याचा संकल्प त्यानें कां केला? कारण त्या हिरण्यगर्भाला ज्या इच्छा होतात त्या निष्कारण नसतात. उत्पन्न होणाऱ्या जीवांच्या प्राक्तनकर्माप्रमाणें त्याला

इच्छा होत असतात. त्यामुळें ब्रह्मदेवाला जशी इच्छा उत्पन्न झाली, तशाच त्या पिशाच-जाति उत्पन्न झाल्या. या जातींना शिळा असें म्हटल्यामुळें त्या भौतिक आहेत असें कोणाला वाटेल. पण वस्तुतः त्या सर्व भूतजाति चिदाकाशरूप आहेत. त्यांचे देह सूक्ष्म असतात, पृथिव्यादि भूतांनीं रहित असतात. ' तर मग आमचें शरीर पांचभौतिक आहे असा अनुभव कां येतो ? ' असें विचारशील तर सांगतों. दीर्घ स्वप्न हीच जागरावस्था जशी झाली आहे, त्याप्रमाणें दीर्घ अभ्यासानें ' मी शरीर आहें ' ही वासना पुष्कळ दिवस दृढ केल्यामुळें आधिभौतिक देहाचा अनुभव येतो. पिशाचादि हे सर्व तसेच आहेत. दीर्घ अभ्यासानें त्यांना आधिभौतिकत्व प्राप्त झालें आहे. आपापल्या योनींतील भोग्य विषयांच्या भोगांनीं ते संतुष्ट असतात. त्यामुळें पिशाचांनाहि त्यांचा पिशाचदेह व अत्यंत निंद्य असा भोग प्रियच वाटतो, बीभत्स वाटत नाहीं. एका गांवांतील लोक परस्परांना जसे पहातात व त्यांच्याशीं व्यवहार करितात, त्याप्रमाणें त्या भूतजातींतील कांहीं जाति एकमेकांस पाहतात. एकाच स्वप्नांतील लोक जसे परस्परांस पाहतात व एकमेकांशीं व्यवहार करितात, तसाच हा सर्व प्रकार आहे. अनेक आकारांनीं स्थित असलेल्या दुसऱ्या कांहीं जाति, अनेक स्वप्नांतील लोक परस्परांस जसे पहात नाहींत, त्याप्रमाणें परस्परांस पहात नाहींत. जगांत या पिशाचादि दुष्ट जाति जशा आहेत, प्रायः तशाच कुंभांड, यक्ष, प्रेत, इत्यादि दुसऱ्या जातिहि आहेत. भूमीचा सखलपणा जसा न्यूनाधिक असेल तसेंच त्यांत न्यूनाधिक जल असतें. त्याच न्यायानें पापाच्या न्यूनाधिकतेप्रमाणें या भूतजातींत तमोगुणाचें तारतम्य असतें. भर दोन प्रहरींहि पिशाच एखाद्या उन्हानें व्यापलेल्या चव्हाठ्यावर जरी उभा राहिला, तरी तेथें सुद्धां त्याचें स्वाभाविक तम त्याला सोडीत नाहीं. सूर्य बाकीच्या सर्व अंधकाराला आपल्या प्रकाशानें जरी दूर करीत असला तरी त्या पिशाचाकार अंधकाराला दूर घालवूं शकत नाहीं. दुसरा कोणी मनुष्य त्याला पाहूं शकत नाहीं. तो आपण आपल्याला मात्र पाहतो. मायेची अघटित घटना कशी आहे ती पहा. रामा ! आम्हांला प्रकाश मिळावा म्हणून अग्नि, सूर्य, चंद्र, यांचें जसें प्रकाशमंडल आहे तसें पिशाचादिकांचें रात्रीं तामस मंडळ असतें. प्रकाशांत त्यांचें सामर्थ्य कमी होतें व अंधकारांत तें वाढतें. अशा प्रकारच्या पिशाचयोनींचा असंभव आहे, असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण उलूकांसारखे रात्रिंचर प्राणी आपण या लोकीं प्रत्यक्ष पाहतों. खरोखर हें जगत् स्वभावतःच मोठें आश्चर्य आहे. रामा ! पिशाचयोनींत उत्पन्न झालेल्या जीवांची ही जाति मीं तुला सांगितली. कोणी कांहीं प्रश्न केल्यास त्याचें उत्तर अवश्य सांगितलें पाहिजे, असा जो वक्त्यांचा संप्रदाय आहे त्याला अनुसरून ' देव व लोकपाल यांच्या लोकीं मी पिशाचासारखा झालों ' असें जें मी सांगितलें त्या प्रसंगानेंच तूं विचारलेल्या प्रश्नाचें हें उत्तर दिलें आहे. ९४.

---

## सर्ग ९५ वा.

—:०:—

१ सत्यसंकल्पत्वाच्या स्मरणानें लोकांशीं पुनः व्यवहार, व २ आपल्याला आकाशवसिष्ठत्वादिकांची प्राप्ति यांचें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—त्यानंतर आकाशरूप व भूतपंचकरहित असा मी आकाशांतून विहार करीत असतांना पिशाचासारखा होऊन राहिलों.

मला चंद्र, सूर्य, इंद्र, हरि, हर इत्यादि कोणी पहात नव्हते. देव, सिद्ध, गंधर्व, किन्नर व अप्सराहि मला पाहूं शकल्या नाहींत. मी त्यांच्या आंगावर पाय दिला, आरोहण केलें, व बसलों, तरी तें त्यांना समजलेंहि नाहीं. त्यांना माझें भाषण ऐकूं येत नव्हतें. एखाद्या सज्जनाला गुलाम म्हणून विकलें असतां त्याची जशी अवस्था होते त्याप्रमाणें मी मोहवश झालों. पुढें काय करावें हें मला कळेना. पण मी विचार केला कीं, असें कां व्हावें? तों मला आठवलें. अहो, आम्ही सत्यकाम आहों! आम्ही जी जी इच्छा करतों ती ती परिपूर्ण होते. मग असे क्लेश कां भोगावे? लागलेंच 'मला हे देवगण पाहोत' असें मीं मनांत म्हटलें. त्याबरोबर त्या देवांच्या गृहांत राहणारे सर्वच आबालवृद्ध मला आपल्यासमोर प्रत्यक्ष पाहूं लागले. त्याबरोबर इंद्रजालांतील वृक्षांप्रमाणें मी देवनगरांस प्राप्त झालों. लागलीच मी देवांच्या घरांत संभाषणादि व्यवहार करूं लागलों. माझे सर्व व्यवहार पूर्वीप्रमाणें होऊं लागले व मी निःशंकपणें राहिलों. ज्यांनीं माझा पूर्व वृत्तांत जाणला नव्हता व मला प्रथमच देवांगणांतून व्यक्त झाल्याचें पाहिलें, ते पृथ्वीपासून मी झालों असें समजूं लागले व पृथ्वीपासून झालेला हा पार्थिव वसिष्ठ आहे अशी माझी तेथील सर्व लोकांत ख्याति केली. ज्या आकाशस्थ देवादिकांनीं आकाशांत सूर्याच्या किरणांपासून मी अकस्मात् प्रकट झालों असें पाहिलें, त्यांनीं हा तैजस वसिष्ठ आहे, अशी लोकांमध्यें माझी प्रसिद्धि केली. अंतरिक्षांतून संचार करणाऱ्या ज्यांनीं मला वायूपासून एकदम प्रकट झालेलें पाहिलें, त्या सिद्धांनीं हा वातवसिष्ठ आहे असें जाणलें. ज्या मुनीश्वरांनीं मी जलांतून एकदम प्रकट झालों आहें असें पाहिलें, त्यांनीं हा वारिवसिष्ठ आहे असें म्हटलें. याप्रमाणें पृथिव्यादिकांपासून दुसऱ्याच्या कल्पनेनेंच माझ्या जन्मांची परंपरा लागली. त्या दिवसापासून त्या लोकांमध्यें कोठें पार्थिव, कोठें जलमय, कोठें तैजस व कोठें मारुत देहानें मी प्रसिद्धी पावलों. नंतर कांहीं दिवसांनीं त्याच माझ्या आतिवाहिक देहामध्यें आधिभौतिकता प्रकट झाली. दीर्घ अभ्यासानें परिपक्क झालेल्या अंतर्मेनानेंच मला ती दशा प्राप्त करून दिली. तथापि हें आतिवाहिकत्व व ती आधिभौतिकता हीं दोन्ही आकाशच आहेत. आकाशरूपानें तीं दोन्ही एकच आहेत असें मी तत्त्वतः जाणलें. त्यामुळें माझें चैतन्य हाच आत्मा आहे, देह आत्मा नव्हे, याचें मला पूर्णपणें भान होतें. त्यामुळें क्वचित् मी आकाशादि भूतरूपानें जरी दिसलों तरी चिदेकरूप परमाकाशच आहें, भूताकाशादिरूप परमाकाश नव्हें. कारण भूताकाशादि हा माझा स्वभाव नव्हे. 'तर मग साकार कसे दिसतां?' म्हणून विचारशील तर सांगतों. तुला उपदेश करणें इत्यादि व्यवहार सिद्ध होण्यासाठीं मी साकार दिसतों. जीवन्मुक्त जरी व्यवहार करीत असला तरी तो ब्रह्माकाररूपच जसा असतो, तसा विदेहमुक्तहि ब्रह्ममात्ररूप असतो. अर्थात् सदेहमुक्त व विदेहमुक्त या दोघांचेंहि स्वरूप वस्तुतः एकसारखेंच असतें. त्यामुळें मी तसा व्यवहार जरी करीत असलों तरी माझें ब्रह्मत्व जात नाहीं. तुमच्या दृष्टीनें मी वसिष्ठदेह झालों आहें, तरी माझ्या दृष्टीनें मी चिदाकाशच आहें. एखादा अज्ञ मनुष्य स्वप्नांत एखाद्या मनुष्याला पहात असतो; त्याचा वास्तविक जन्महि झालेला नसतो व त्याला कांहीं आकारहि नसतो, तथापि त्या स्वप्नद्रष्ट्याला त्याचा आधिभौतिक देह दिसतच असतो, त्याचप्रमाणें मी ह्या जगाला दिसतों. याच न्यायानें सर्व जगत् व ब्रह्मदेव यांचीं शरीरें, त्यांनीं केलेली सृष्टि वगैरे हें सर्व

केवळ भासत असतें. त्यांतील कांहींहि उत्पन्न होत नाहीं. तत्त्वदृष्टीनें जे पाहतात, त्यांना त्यांतलि कांहीं दिसत नाहीं. अज्ञदृष्ट्यामात्र हा सर्व आधिभौतिक प्रपंच प्रतीत होतो. अशा प्रकारचा हा मी आकाशवसिष्ठ आपल्याच संकल्पाध्यासानें अशा साकार स्थितीस प्राप्त झालों आहें. किंवा तुमच्या बुद्धीच्या अनुसार माझ्या भौतिक देहाची ही स्थिति झाली आहे. माझ्याप्रमाणेंच हिरण्यगर्भाच्याहि दृष्टीनें हें सर्व जगत् व त्यांतील सर्व जीव ब्रह्माकाशमय आहेत. विचारी लोकांच्या दृष्टीनें सर्व जगत् मनोमात्र आहे व हे सर्व सर्गहि तसेच मनोमात्र आहेत. मी व हा सर्व प्रपंच अज्ञानदोषामुळेंच, बालकांना जसा वेताळ भासतो, तसा सर्व अज्ञजनांना भासतो. आणि तोच भास अज्ञानामुळें वज्रासारखा दृढ होऊन बसला आहे. पण आपलाच बंधु दूर गेला असतां कांहीं काळानें त्यावरील स्नेह जसा कमी होतो, त्याचप्रमाणें या तत्त्वाला पूर्णपणें जाणलें असतां तो शांत होतो. ज्याप्रमाणें स्वप्नांत पाहिलेल्या निधीला ग्रहण करावें ही इच्छा जागें होतांच नाहींशी होते, त्याप्रमाणें अहंकाररूप स्थूलत्वहि तत्वज्ञान होतांच नाहींसें होतें. ज्याप्रमाणें हें मृगजल आहे, खरी नदी नव्हे, असें कळतांच त्यांतील पाणी घेण्याची बुद्धि मावळते, त्याप्रमाणें दृश्याविषयींची सर्व भावना त्याचें मूळस्वरूप कळलें असतां शांत होते. महारामायणासारख्या शास्त्राचें नित्य अवलोकन केल्यानेंच हें जीवन्मुक्तत्व प्राप्त होतें. असल्या सुलभ गोष्टींमध्यें दुष्करत्व तें काय आहे ? ज्या मनुष्याची बुद्धि संसारवासनेमुळें मिथ्या देह, इंद्रियें, विषय इत्यादिकांत आसक्त असते व मोक्षाविषयीं निरिच्छ असते, तो मनुष्य अपवित्र भोगांमध्यें आसक्त असणें, या गुणामुळें कुत्रा किंवा कीटच आहे; मनुष्य नव्हे. कारण ज्ञानाधिकाराला योग्य अशा मनुष्यदेहाला तो पात्र नाहीं. जीवन्मुक्तबुद्धीनें भोगला जाणारा विषयसमूह कोणत्या प्रकारचा असतो व विपरीत भावनेनें युक्त असलेल्या मूर्खांकडून भोगला जाणारा विषयसमूह कोणत्या प्रकारचा असतो, त्याचा विचार करावा. जसें एकच अन्न, हविःपुरोडाशादि अत्यंत पवित्ररूपानें देव-ब्राम्हणांकडून खाल्लें जातें व उच्छिष्ट-पुरीषादि अशुचिरूपानें कुत्रे, कावळे यांजकडून खाल्लें जातें, त्याप्रमाणें जीवन्मुक्तांकडून शुद्ध, चिन्मात्र, आनंदस्वरूप भोग भोगला जातो आणि मूर्खांकडून अपवित्र विषयरूप भोग भोगला जातो. तसेंच महारामायणासारख्या शास्त्राचें अवलोकन केल्यानें अंतःकरणांत अत्यंत शीतलता उत्पन्न होते. त्यांचें अंतःकरण बर्फाप्रमाणें शीतल असतें. पण अज्ञांचें चित्त विषयांविषयीं तृष्णा, क्रोध, लोभ इत्यादि वृत्तींनीं संतप्त होतें. शीतलचित्तत्व हाच मोक्ष व संतप्तचित्तत्व हाच बंध. पण अशा मोक्षाविषयींहि लोकांना इच्छा नसते, हें केवढें आश्चर्य आहे ? हा जन स्वभावतःच विषयपरवश आहे. त्यामुळें तो युद्ध, चोरी, अपहार इत्यादि उपायांनींहि स्त्री, धन इत्यादि संपादन करण्याची इच्छा करतो. पण मुमुक्षूंच्या शास्त्रांचा विचार करून त्यांचेंच निदिध्यासन करणें या उपायानें यथार्थ वस्तूचें ज्ञान होऊन तो सुखी, संतापशून्य व आनंदपूर्ण होतो; दुसऱ्या कोणत्याहि उपायानें होत नाहीं.

श्रीवाल्मीकिः-मुनि वासिष्ठ इतकें बोलत आहे तों सूर्य अस्त पावला आणि सर्व सभा नमस्कार करून सायंकाळचे होमादि विधि करण्यासाठीं वसिष्ठादिकांना नमस्कार करून स्नान करावयास गेली. रात्र संपल्यावर दुसऱ्या दिवशीं सूर्यकिरणांसह सर्व सभा पुनः स्वस्थानीं प्राप्त झाली. ९९.

**सतरावा दिवस व पाषाणाख्यान संपलें.**

## सर्ग १६ वा.

—:०:—

१ पाषाणाख्यानाचें तात्पर्य २ जगद्भ्रम हा चित्‌चा विवर्त आहे. ३ चित्‌च आत्मा व अजरामर ब्रम्हानंद आहे, असें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—हे कार्यज्ञा! मीं हें तुला पाषाणाख्यान सांगितलें. या आख्यायिकेच्या योगानें विकास पावणाऱ्या चिन्मात्रपूर्णतादृष्टीनें सर्व सृष्टि चिदाकाशांत व शून्यभावांत स्थित आहेत, असा निश्चय कर. यांतील कांहींहि, कोठेंहि व केव्हांच स्थित नाहीं, तर मिठाच्या खड्यांत जसा सैंधव रस, तसें एक अखंडित ब्रह्मच आनंदएकरस घनस्वरूपांत स्थित आहे. ब्रह्म केवळ चिन्मात्रस्वरूप आहे असें तूं जाण. ज्याप्रमाणें स्वप्नांतील नगर तुझ्या स्वरूपाहून केव्हांहि भिन्न नसतें, त्याप्रमाणें जगत् चिन्मात्राहून केव्हांहि भिन्न नाहीं. ब्रम्हावर जगाचा आभास जरी होत असला तरी तें स्वरूपापासून च्युत न होतां तो रूपांतरप्रतिभास होतो. ह्मणून त्याला चिन्मात्रविवर्त ह्मणणेंच योग्य आहे. समष्टि जीवाला स्वयंभू, चतुर्भुज किंवा हिरण्यगर्भ असें म्हणतात. त्या रूपानें व्यवस्थित होऊन दृश्य स्थिति प्राप्त झाली असतांहि चिदाकाश निर्विकार स्थित असतें. परमार्थदृष्टच्या स्वयंभू नाहीं, जगत् नाहीं व स्वप्नांतील नगरहि नाहीं. या ज्ञानरूप महादृष्टीनें केवळ एक चिन्मात्रच स्थित आहे. स्वप्नांत नगराकारानें भासणारें चिद्रूप स्वरूपांतच स्थित असतें, त्याप्रमाणें सृष्टीपासून महाप्रलयापर्यंत जगद्रूप होणारें तें अखंडच असतें. सोनें व सोन्याची चीप, स्वप्ननगर व चेतन जीव यांचा भेद जसा संभवत नाहीं, त्याप्रमाणें चिति व सर्ग यांचा भेद संभवत नाहीं. एक चितिच आहे, सर्ग नाहीं. हें सोनेंच आहे, त्यावरील आकार नाहीं. स्वप्नांतील पर्वतामध्यें एक चित्‌च आहे, पर्वतत्व नाहीं. स्वप्नांत चित्‌च स्वरूपापासून न ढळतां पर्वताकार भासते, त्याप्रमाणें निराकार ब्रह्मच सृष्टीसारखें भासतें, दुसरें कांहीं नाहीं. चिन्मात्र आकाश अनंत, अज व अव्यय आहे. हजारों महाकल्पांतांहि तें उदय पावत नाहीं व नाश पावत नाहीं. पुरुष म्हणजे जीव चिदाकाश आहे. तूंहि चिदाकाश आहेस. मी अमर चिदाकाश आहें. हें त्रिभुवन चिदाकाश आहे. चिदाकाशाला सोडून शरीर शवच म्हणजे निर्जीव आहे. हें चिदाकाश अच्छेद्य आहे, अदाह्य आहे. तें केव्हांहि शांत होत नाहीं. त्यामुळें या जगांतील कांहींच उत्पन्न होत नाहीं व मरतहि नाहीं. कारण चित् मेल्यावरच सर्व मरणार. पण तिच्या मरणाविषयीं कांहीं प्रमाणच नाहीं. कारण चित्‌चा विलास हेंच जगत् असा अनुभव चित्त्वामुळेंच येतो. हा जंतु चिन्मात्र पुरुष आहे. तो जर खरोखरच मेला, तर त्याचा पुत्रहि निःसंशय मेला पाहिजे. कारण पुत्र हा पित्याचा आत्मा आहे, असें 'आत्मा वै पुत्रनामासि' या श्रुतींत सांगितलें आहे. त्याचप्रमाणें एकच भूतात्मा सर्व भूतांमध्यें व्यवस्थित आहे, असेंहि श्रुतिवचन असल्यामुळें एक जंतु मरण पावला असतां सर्वांच्या मरणाचा प्रसंग येतो. त्यामुळें हें जगत् सर्वदा शून्यच होणार! पण हे रामा! अद्यापि केव्हांच कोणाचेंहि चिन्मात्र स्वरूप मरण पावलें नाहीं व भूमिहि शून्य झालेली नाहीं. म्हणून चित् पुरुष अक्षय आहे. 'एक चिन्मात्रच मी आहें. शरीरादिक माझीं नव्हेत,' असें अनुसंधान केलें असतां जन्ममरणादि कोठचें? मी चिन्मात्ररूपच आहें, अशा प्रकारच्या आत्मानुभवाचा जे अपलाप करतात, म्हणजे कुतर्कांनीं त्या अनुभवाचें खंडन करतात, तेच आत्महिंसक होत. ते

संकटसमुद्रांत बुडतात. मी गहनाहूनहि अति स्वच्छ, नित्य, अनंत, निरामय, चित् आहें; तेव्हां माझें जीवित कोणतें, मरण कोणतें? व सुखासुख तरी कोणतें? मी आकाशरूप आत्मचेतन आहें. शरीरादिक माझें कोण? असा विद्वानांनीं ज्याचा अनुभव घेतला आहे, त्याचें कुतर्कानें जो खंडन करतो, तो आत्मघाती होय. त्याला धिक्कार असो. मी स्वच्छ चिदाकाश आहें, हा अगदीं स्पष्ट अनुभव ज्याच्या ठिकाणीं अस्त पावला आहे, त्या मूढाला जिवंत प्रेत समजतात. मी निर्विशेष ज्ञानरूप आहें, शरीर व इंद्रियें हीं माझीं कोण? अशा भावनेनें ज्याला शुद्ध आत्मस्वरूप प्राप्त झालें आहे, त्याच्यावर मरणादि आपत्ति ओढवत नाहींत. कारण अविद्यादि मल गेल्यामुळें तो स्वच्छ होतो. जो शुद्ध चिन्मात्र आत्म्याचा आश्रय करून स्थिर स्थित असतो, त्याला मानसिक व्यथा, बाण जसे मोठ्या शिळेला, त्याप्रमाणें पीडा देत नाहींत. जे आपला चित्स्वभाव विसरून या क्षुद्र शरीरावर आस्था ठेवतात, ते खरें सोनें टाकून वस्तुतः भस्मच सुवर्ण म्हणून घेतात. मी देह आहें अशी भावना केल्यानें बल, बुद्धि व तेज यांचा नाश होतो. पण चिदात्माच मी आहें ही भावना स्थिर होतांच त्यांचा उदय होतो. मी शुद्ध चिदाकाशच आहें, मला जन्म व मरण कोठचें? असा निश्चय झाल्यावर लोभ, मोह. मद इत्यादि कोणाच्या आश्रयानें राहणार! त्या वेळीं ते आत्मनिष्ठ असूं शकत नाहींत. त्यांच्या योगानें आत्मा दूषित होऊं शकत नाहीं. जो स्थूल, सूक्ष्म व कारण देहांना चिदाकाशाहून भिन्नत्वानें पहातो व आत्मा हें त्यांतील सार आहे असें समजतो, त्या मूढालाच लोभादिक आहेत असें म्हणणें शोभतें मी तुटत नाहीं व जळत नाहीं. तर मी चिन्मात्र आहें. चिति वज्रासारखी दृढ आहे. मी देही नव्हें, असा ज्याचा निश्चय असतो त्याला मृत्यु तृणासारखा वाटतो. अहो, पंडितांनाहि कसा व्यामोह पडतो पहा. ते शरीररूप जड-वर्गाचा एकदेश नष्ट होण्याचा प्रसंग आला असतां आमचाच नाश होत आहे असें समजून भयभीत होतात. ‘मी चिदाकाशच आहें’ हा सत्यभाव स्थिर झाला असतां वज्रपात, युगांतींच्या अग्नीचा दाह इत्यादि सर्व पुष्पासारखे तुच्छ होतात. ‘मी अमर चिन्मात्र नव्हे, त्यामुळें माझा नाश होत आहे,’ असें समजून जो प्राणी रडतो, तो आत्मा नाश पावत नसतांनाच रडतो. विवेकी पुरुषाच्या दृष्टीनें तें त्याचें रोदन म्हणजे अपूर्व थट्टाच आहे. एखाद्या नटाच्या रडण्यासारखेंच तें रडणें होय. हें नित्य अपरोक्ष चेतनच मी आहें, देहादि दृष्टि मी नव्हें, असा ज्यानें आपल्या मनांत निश्चय केलेला असतो, तो केव्हांही मोहित होत नाहीं. मी चेतन आकाश आहें, त्यामुळें माझा नाश संभवत नाहीं, चेतनानें हें सर्व जगत् परिपूर्ण आहे, याविषयीं तुम्हांला शंका ती काय आहे? जन्ममरणादिकां-विषयीं शंका येण्यास कांहीं जागाच नाहीं. आम्ही चेतनाहून निराळेच कोणी आहों असें चेतन जीवांनाच म्हणतां येणें शक्य नाहीं. कारण ते आपल्या चेतनस्वभावाचा अनुभव घेत असतात. तेव्हां आम्ही चेतनभिन्न आ-होंत असें त्यांना म्हणतांच येणार नाहीं. बरें, अचेतन पदार्थ ‘आम्ही अचेतन आहों’ असा अनुभव घेऊन ‘आम्ही चेतन नाहीं’ असें म्हणत असतील तर तेंहि शक्य नाहीं. कारण स्वतः जड असलेल्या त्यांना कशाचाहि अनुभव घेतां येणें शक्य नाहीं. तसाच चेतनाचा त्यांना

अपलापहि करतां येणार नाहीं. तेव्हां अहो महामूढांनो, तुम्ही स्वतःच चेतनरूप असतांना स्वात्म्याचा अपलाप कां करतां, सांगा ! अहो जनहो ! आणि तें चेतन जर मरत असेल तर तुम्हींहि नित्य मेलें पाहिजे. तुमचें तें चेतन जर मेलें आहे, तर तुम्ही कां मेलां नाहीं? तस्मात् कांहीं मरत नाहीं व कांहीं जिवंत रहात नाहीं. मी जिवंत आहें किंवा मी मेलों, ही भ्रांति अज्ञात चितूलाच होते. पण ती स्वतः कधींच नाश पावत नाहीं. चित् जशी जशी कल्पना करते, तशी तशी ती लागलीच पहाते. हा अनुभव लहानांपासून थोरांपर्यंत एक सारखाच येतो. त्यामुळें ती कधींच नाश पावत नाहीं. ती चितिच संसार पहाते. तीच मुक्ततेचा अनुभव घेते, सुखदुःख तीच जाणते आणि आपल्या चित्स्वभावापासून कधींच च्युत होत नाहीं. विषयांचा भेद, देशाचा भेद, कालाचा भेद जरी प्रतीत होत असला तरी चित् आपल्या स्वभावापासून ढळत नाहीं. ती जेव्हां आपल्या स्वरूपाला जाणत नाहीं, तेव्हां स्वतःच मोहरूप बनते, आणि स्वरूपाला जाणून स्वतः मोक्षसंज्ञक होते. केव्हांहि कांहींच अस्त पावत नाहीं व उदय पावत नाहीं. सर्व स्वच्छ चिन्मात्र आकाशच आहे. जगांत सत्यत्व व मिथ्यात्व प्रत्येकाच्या निश्चयानुसार आहेत. त्यांत एकहि पदार्थ असा नाहीं कीं, जो सत्य नाहीं व बाह्यदृष्टच्या असा एकहि पदार्थ नाहीं कीं जो मिथ्या नाहीं. ज्यानें जसा निर्णय केलेला असतो तसें तसें त्याला सर्व दिसतें. चेतनात्मा या जगांत जें जें जसें जसें कल्पितो त्याचा तसा तसाच अनुभव घेतो, ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. प्रत्येक पदार्थ कालभेद, भोक्तृभेद, सहकारी भेद या निमित्तानें भिन्न भिन्न कार्यें करतो. एकाच्या दृष्टीनें जें विष, तें दुसऱ्याच्या दृष्टीनें अमृत होतें व एकाला जें अमृत तें दुसऱ्याला विष होतें. तस्मात् प्राण्याच्या कल्पनेचें अनुवर्तन न करणारें असें या जगांत कांहीं नाहीं. ९६.

---

## सर्ग ९७ वा.

—:०:—

१ ब्रम्ह सर्वशक्ति असल्यामुळें सर्व बाधांची उक्ति सत्य आहे. २ सर्वांची भोगाशक्ति. ३ व तत्त्वज्ञांची विरक्त स्थिति.

श्रीवसिष्ठः—हे रामा! परमात्म्याचें जणुं काय स्वप्नच अशा या जगाला परमार्थसत्य ब्रह्मकारत्वच आहे. सर्व ब्रम्हच असल्यामुळें जगत् सत्य आहे, असाच सर्वांना अनुभव येतो. त्यामुळें जगांत असत्य कांहीं नाहीं असें मीं वर सांगितलें. (अहो, ब्रह्म जगद्रूपानें जरी सत्य असलें तरी त्याचें जें स्वरूप दिसतें त्या रूपानें तें सत्य कसें असेल? रज्जुरूप जरी सत्य असलें, तरी त्यावर भासणारा सर्प सत्य संभवत नाहीं. उत्तरः—) हा जगद्भ्रम अगदीं स्पष्ट दिसतो. पण त्याचें अधिष्ठान जी महाचिति ती अदृश्य आहे. रज्जुसर्पदृष्टांतांतील सर्पहि दृश्य असतो व रज्जुहि दृश्य असते. त्यामुळें रज्जूचा बाध झाला कीं सर्प मिथ्या ठरतो. पण या दृष्टांतांत तसें होत नाहीं. चिदात्मा मदशक्तीप्रमाणें स्वतः अदृश्य असून दृश्य भ्रमाला कारण होतो. तो कार्यरूपानेंच आपली सत्ता प्रकट करतो. ह्मणून जगद्रूपाची सत्यता प्रमाणसिद्धच आहे. (तर मग या जगांत मिथ्या असें कांहीं नाहीं हें ह्मणणें कसें संभवतें? उत्तर—) बंधकालीं सर्व दृश्याची शांति या स्वरूपाचा मोक्ष नसतो, त्यामुळें दृश्याची विश्रांति संभवत नाहीं. दृश्याची शांति झाल्यावांचून महाचितीचें अद्वितीय चित्स्वरूप सिद्ध होत नाहीं. मोक्षकालींहि ज्ञाता

जो अंतःकरणोपहित जीव त्याचा व प्रमाणादिकांचाहि बाध होत असल्यामुळें ती शांति प्रायः अप्रसिद्धच असते. त्यामुळें परमार्थसद्वस्तूलाहि एक प्रकारें शून्यच म्हणावें लागतें. ( अर्थात् सर्व वादी आपापल्या अनुभवानें सिद्ध झालेला सिद्धांतच प्रतिपादित असल्यामुळें त्यांतील प्रत्येकाचें म्हणणें त्याच्या त्याच्या दृष्टीनें खरेंच आहे. अशा आशयानें भगवान् वसिष्ठ प्रथम सांख्य सिद्धांताची सत्यता दाखवितात–) " हें जगत् सुख-दुःख-मोहरूपानें व्यक्त आहे. वास्तव त्याची सामान्य परंपरा जेथें पर्यवसान पावते, अशा गुणत्रयसाम्यावस्थारूप प्रधानसंज्ञक अव्यक्त मूलकारणापासून महत्–अहंकारादि क्रमानें व्यक्त होतें. पुरुष चिन्मात्र व अकर्ता आहे, त्याचा भोग व मोक्ष यांच्या सिद्धीसाठीं सृष्टि प्रवृत्त होते," अशी कपिलाची दृष्टि असून त्याच्या सिद्धांताप्रमाणें तेंच खरें आहे. जगत् हा ब्रह्मावरील आभास आहे, म्ह० ब्रह्माचा विवर्त आहे, असें वेदांती म्हणतो. त्याचेंहि तें मत खरेंच आहे. कारण त्याच्या दृष्टीनें विचार करूं लागलें असतां तसाच अनुभव येतो. त्याचप्रमाणें कणाद, गौतम, सौत्रांतिक, वैभाषिक, आर्हत इत्यादिकांची ' परमाणुसमूहात्मक जगत् आहे,' ही कल्पनाहि त्यांच्या अनुभवानुसार असल्यामुळें खरीच आहे. त्याचप्रमाणें दृष्टि-सृष्टिवाद्यांचें 'ऐहिक व पारलौकिक जगत् अनिर्वचनीयच आहे. सत् व असत् यांतील कोणत्याच कोटींत त्याला घालतां येत नाहीं ' असें जें म्हणणें आहे तेंहि खरें आहे. मनःकल्पनामात्ररूप जगत् आहे, असें ते समजतात व तेंहि त्यांच्या अनुभवानुसार खरें आहे. त्याचप्रमाणें जे दुसरे चार्वाक, बाह्य पृथिव्यादि भूतचतुष्टयच आहे; दुसरें आंतील आत्मरूप नाहीं, असें म्हणतात, तेंहि खरेंच बोलतात. कारण ते चक्षुरादि इंद्रियगणांच्या पलीकडे असलेलें म्ह. इंद्रियातीत आत्मस्वरूप देहांत पहात नाहींत. पुष्कळ विचार करूनहि त्यांना त्याचा लाभ होत नाहीं. त्याचप्रमाणें 'सर्वं क्षणिकं' असें म्हणणारे जे बौद्ध त्यांची क्षणभंगदृष्टिहि योग्यच आहे. कारण प्रत्येक क्षणामध्यें परिणाम पावणाऱ्या सर्व पदार्थांचा सतत विपर्यास होत असल्याचें त्यांना दिसतें. कारण तें परम पद सर्वशक्तिसंपन्न आहे. 'जसा घटामध्यें झांकून ठेवलेली चिमणी, त्याच्या तोंडावरील झांकण काढतांच बाहेर उडून जाते, त्याप्रमाणें देहांत परिच्छिन्न असलेला जीव कर्मांचा क्षय होतांच परलोकीं उडून जातो,' ही जैनांची कल्पनाहि खरीच आहे. त्याचप्रमाणें यवनादि म्लेच्छांचा 'ईश्वरानें उत्पन्न केलेला देहाकारच जीव आहे. तो देह जेथें पुरून ठेवलेला असतो तेथेंच रहातो. त्यानंतर पुष्कळ कालानें ईश्वरानें ज्याच्यावर अनुग्रह केला आहे, त्याच्या इच्छेनेंच तो मुक्त होतो. सतत स्वर्गांत किंवा नरकांत पाठविला जातो.' ही कल्पनाहि त्यांच्या अनुभवानुसार असल्यामुळें खोटी नव्हे. त्याचप्रमाणें सर्व ठिकाणीं समबुद्धि ठेवणारे, सन्मात्र वस्तूकडे दृष्टि लावणारे, संत, ब्राह्मण, अग्नि, विष, अमृत, मरण इत्यादि पदार्थांमध्येंहि वैषम्य न पहाणारे असेहि संत आपल्याला जगामध्यें दिसतात. कारण हें सर्व सर्वात्मक ब्रह्मच आहे. त्यामुळें त्यांत दुर्लभ असें कांहीं नाहीं. अर्थात् सर्वेहि वाद्यांच्या सर्व अभिलषित वस्तूंची सिद्धि होते. याप्रमाणेंच ' स्वभावतःच हें सर्व जगत् उत्पन्न होतें व स्वभावतःच नाश पावतें. या जगाचा कर्ता कोणी नाहीं.' असें स्वभाववादी चार्वाकाचें मत युक्तच आहे. कारण घटपटादि पदार्थांचा कोणी तरी बुद्धिमान् कर्ता असतो, असा जरी अनुभव

येत असला, तरी वृष्टि, वात, तृणांकुर इत्यादिकांचा कर्ता पुष्कळ शोध करूनहि उपलब्ध होत नाहीं. अकालीं वृष्टि होणें, चांगल्या शेतांत गवत उगवणें इत्यादि शेतकऱ्यांना अनिष्ट असलेल्या गोष्टी कर्त्यावांचून स्वभावतःच उत्पन्न होतात. त्यांना कर्त्याची कल्पना सहन होत नाहीं आणि सर्वांचें अनिष्ट करणारा कोणी आहे व त्याला अकाल-वृष्टि, चांगल्या क्षेत्रांत गवत उगवणें इत्यादिकांचा कांहीं उपयोग आहे, अशीहि कल्पना करतां येत नाहीं. त्यामुळें त्यांच्या दृष्टीनें यांत कांहीं दोषहि नाहीं. पृथ्वी, तींत उत्पन्न होणारे अंकुर इत्यादि सर्व कार्यांचा एक कर्ता आहे, अशी जी कित्येकांची कल्पना आहे, तीहि बरोबर आहे. कारण ते तन्मय झालेले असतात. आणि त्या उपासकांचा ज्याअर्थी असा निश्चयच झालेला असतो, त्याअर्थी ते आपल्या अंतःकरणांत सर्वकर्त्या उपास्याला प्राप्त होतात. पूर्व-वाद्याप्रमाणें तो बाधित होतो असें तें समजत नाहींत. अकालीं वृष्टि होणें, चांगल्या क्षेत्रांत गवत उगवणें इत्यादि गोष्टीहि सर्वांनाच अनिष्ट असतात असें म्हणतां येत नाहीं. सर्वांच्या कर्मांचें फल देणारा जो ईश्वर त्यानें दुष्कर्मांचें अनिष्ट फल दिलें तर त्यांत त्याच्याकडे कांहीं दोषहि येत नाहीं आस्तिकांच्या दृष्टीनें या लोकाप्रमाणें परलोकहि आहे. त्यामुळें परलोकाची इच्छा करणाऱ्या त्यांचें तीर्थस्नान व अग्निहोत्रादि पुण्यकर्म निष्फल होत नाहीं. कारण त्यांच्या भावनेप्रमाणें तें त्यांना अवश्य प्राप्त होणारच. 'हें सर्व शून्यच आहे,' असा जो बौद्धांचा सिद्धांत तोहि खराच आहे. कारण शून्यवादांत प्रमाणाच्या अभावीं प्रमेयाचाहि अभाव होतो अशी कल्पना संभवते. याप्रमाणें सर्व वाद्यांचा इष्ट सिद्धांत सिद्ध कसा होतो, ह्मणून विचाराल तर सांगतों. चिति चिंतामणीप्रमाणें किंवा कल्पवृक्षाप्रमाणें प्रत्येकाचें इष्ट सत्वर संपादन करते. तथापि ती स्वरूपामध्यें आकाशरूप आहे. 'हें शून्यहि नाहीं व अशून्यहि नाहीं; तर अनिर्वचनीय आहे' असें ह्मणणाऱ्या वाद्याचें ह्मणणेंहि खोटें नव्हे. कारण सर्वशक्ति ब्रम्हाची ती अनिर्वचनीय मायाशक्ति आहे. त्यामुळं तिला शून्य म्हणतां येत नाहीं. तसेंच जें त्रिकाळीं विद्यमान असलेलें ब्रह्म तेंहि तें नव्हे. यास्तव ती शून्य व अशून्य या दोन्हीहून विलक्षण आहे. म्हणून जो ज्या आपल्या निश्चयामध्यें स्थित असतो, त्याला त्या निश्चयाचें फल अवश्य प्राप्त होतें. पण तो अविश्वासानें त्या पूर्वनिश्चयापासून जर न ढळेल तरच त्याचें फल मिळणें शक्य आहे, एरवीं नाहीं. अर्थात् जोंवर आत्मज्ञान नाहीं तोंवरच ते ते सिद्धांत सत्य आहेत. आत्मज्ञान झालें ह्मणजे एक आत्माच सत्य ठरून बाकी सर्व मिथ्या ठरतें. यास्तव अविचारानें वाटेल त्याचा सिद्धांत स्वीकारूं नये. पंडितांबरोबर श्रेष्ठ वस्तूविषयीं चांगला विचार करून बुद्धिमान् पुरुषानें विचारानें रूढ झालेला निश्चयच स्थिर करावा व बाकीचे सिद्धांत सोडून द्यावे. (आतां पंडितश्रेष्ठाचें लक्षण सांगतात—) शास्त्राध्ययनानें व आचरणानें जो ज्या प्रदेशीं एखादा विरळा उत्तम ज्ञानी असेल त्याचा आश्रय करावा. सच्छास्त्राचा व्यवहार करणारे संत एखाद्या गोष्टीविषयीं वाद करीत असतां त्यांचें समाधान करणारा, निषिद्धाचरणानें रहित ह्म० अनिन्द्य व श्रेष्ठ असेल त्याची संगति धरावी. (तर मग बाकीच्या निश्चयांमध्यें निष्ठा ठेविली तर ती व्यर्थ होते कीं काय? उत्तर—) सर्व प्राणी आपआपल्या निश्चयानुरूप इष्ट फलाला प्राप्त होत असतात. पाणी जसें सखल प्रदेशाकडे धांवत असतें, त्याप्रमाणेंच ते आप-

आपल्या इष्ट फलाकडे धावत असतात. तृणावरून पडणारे जलबिंदु जसे त्याला न कळतांच भराभर खालीं पडतात, त्याप्रमाणें संसारसागरांतील कल्लोलांनीं वाहून नेल्या जाणाऱ्या मनुष्यांचे दिवस त्यांना न कळतांच जात असतात. यास्तव श्रेष्ठांचा सत्वर आश्रय करावा. विलंब लावूं नये; कारण आयुष्याचा कांहीं भरंवसा नाहीं.

**श्रीरामः**—भगवन्! विषयोपभोगाची तृष्णा अतिशय प्रबल आहे. त्यामुळें या जगांत विषयाविषयीं विरक्त असलेले मुमुक्षुच दुर्लभ आहेत. मग परमात्मतत्त्वाचा साक्षात्कार झालेले व आपण वर सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असे पंडितश्रेष्ठ तर त्यांहूनहि दुर्लभ असणार, हें उघड आहे. यास्तव भगवन्! मला हीच गोष्ट पुनः सांगा. या विस्तीर्ण ब्रह्माकाशांत भोगतृष्णा इतकी विस्तार पावलेली असतां पूर्वापर विचार करून जगत् अनर्थावह आहे असें ठरविणारे व सारासारविचार करून परमार्थाचेंच ग्रहण करणारे पंडित कितीसे सांपडणार?

**श्रीवसिष्ठः**—रामा! तूं म्हणतोस त्याप्रमाणें तत्वज्ञ पंडित दुर्लभ आहेत ही गोष्ट अगदीं खरी; तथापि देव, असुर, गंधर्व इत्यादि निरनिराळ्या योनींमध्यें कांहीं थोडे लोक आहेतच कीं, ज्यांचा पंडित ह्मणून उल्लेख करतां येतो. त्यांचे दिवस प्रकाशानें जातात. सूर्याला जसा अंधकार केव्हांहि दिसत नाहीं, त्याप्रमाणें त्यांना अज्ञान केव्हांहि भासत नाहीं. पण बाकीचे सर्व मूढ मोहमहासागरामध्यें भोगतृष्णातरंगांनीं खालीं व वर असे तृणाप्रमाणें वाहविले जातात. ज्यांची आत्मस्थिति नष्ट झालेली असते असे देवसुद्धां स्वर्गांत भोगरूप अग्नीमध्यें जळत असतात. दावाग्नीनें पर्वतावरील वृक्ष जसे करपून जातात, त्याप्रमाणेंच त्यांची स्थिति होते. मदोन्मत्त दानव नारायणरूप दानवशत्रूकडून अति घोर श्वभ्रामध्यें, मोठ्या विहिरींत बंधनरहित गज जसे पाडावे-त्याप्रमाणें पाडविले गेले. गंधर्वांना विवेकाचा नुस्ता गंधहि नसतो. गायन व पान यांत ते गुंग असतात व हरणाप्रमाणें यथेच्छ बागडत असतात. विद्याधर विद्यांच्या आधारत्वानें मोहित झालेले असतात. त्यांना आपल्या विद्यांचा मोठा गर्व वाटतो. त्यांच्या ठिकाणीं ब्रह्मविद्येची योग्यता असते, पण ते स्फुरलेल्या विवेकाचाहि अनादर करतात आणि भोगसाधनभूत विद्येंत रममाण होतात. यज्ञ, भय, ज्वर, उन्माद इत्यादि दोष उत्पन्न करून भूलोकाला क्षुब्ध करून सोडतात. आपण जणुं काय अक्षत आहों म्हणजे आपला देह स्थिर आहे, असें समजणारे ते मणि-मंत्रादि बलांनीं शून्य असलेल्या एकाकी बाल-वृद्ध-आतुरादिकांच्या ठिकाणीं आपली दक्षता दाखवितात. कामबल, शौर्य इत्यादिकांनीं हत्तीप्रमाणें मदोन्मत्त असलेल्या राक्षसांचा शत्रुरूपी विष्णूनें सिंहरूप धारण करून पूर्वीं अनेक प्रकारें क्षय केला व पुढेंहि तूं करशील. म्हणजे त्यांच्या प्रमादाचें फल त्यांना प्रत्यक्ष मिळत असतें. पिशाच नेहमीं भुकेलेले असतात. त्यामुळें प्राण्यांना मारून खाण्याचीच त्यांना चिंता लागलेली असते. त्यामुळें अग्नींत पडलेल्या आहुति, आपल्याला सदाच धूमयुक्त ज्वालेकडून दग्ध होत असलेल्या जशा पहातात, त्याप्रमाणें ते पिशाच पूर्वोक्त चिंता आपल्याला जाळीत आहे असें पहातात. त्यामुळें त्यांच्या ठिकाणीं विवेकाचा संभवच नसतो. त्याचप्रमाणें नागयोनींतहि विवेक दुर्लभ आहे. कारण नागांचे समूह कमलनालाप्रमाणें भूतलीं म्हणजे पाताळांत मग्न झालेले असतात. त्या सर्व नागजाति वृक्षांच्या मुळाप्रमाणें अचेतन ह्मणजे विवेकहीन असतात.

कीटांप्रमाणें भूतलांतील विवर हेंच ज्यांचें बल आहे त्या असुरबालकांच्या विवेकाचें नांव कशाला पाहिजे? याप्रमाणें बल, वीर्य, प्रभाव इत्यादिकांनीं संपन्न असलेल्या देवादिकांच्या ठिकाणींहि जर विवेक दुर्लभ आहे, तर इतरांची काय कथा? पुरुषहि प्रायः मुंग्यांसारखे अहोरात्र अल्प कणांसाठीं संचार करीत असतात. मदोन्मत्त पुरुषांप्रमाणें वृथा दीर्घ चिंतेनें व्यग्र झालेल्या सर्व भूतयोनींचे दिवस दुराचरणांत जातात. ज्याप्रमाणें जलामध्यें बुडणाऱ्या धुळीला शुष्क धुलिकण कधींच भेटत नाहीं, त्याप्रमाणें विषयचिंतेमध्यें बुडणाऱ्या कोणत्याच मनुष्याला शुद्ध आत्मविवेक प्राप्त होत नाहीं. देहाभिमान याच वायूकडून अक्रोधादि नियमांपासून ढळविणारे मानव क्रोधादिकांच्या वश केले जातात. कांडलेल्या धान्यांच्या राशीवर सुपानें वारा घातला असतां भुसा जसा उडून जातो, त्याप्रमाणेंच त्यांचे अक्रोधादि नियम अभिमानाकडून उडविले जातात. योगिनींचा समूह, पामराप्रमाणेंच सुरा, रक्त इत्यादिकांचें प्राशन, मांसादिकांचें भोजन इत्यादिकांनीं युक्त असलेल्या तामसधर्मफलरूप दुर्गंधांत पडतात. अविवेकामुळें त्यांची तामसधर्माकडेच प्रवृत्ति होते. (याप्रमाणें देवादि सर्व योनींमध्यें विवेकज्ञानाची दुर्लभता दाखवून त्यांतील कांहीं ज्ञान्यांचीं नांवें सांगतात—) केवळ यम, चंद्र, इंद्र, रुद्र, सूर्य, हरि, ब्रह्मदेव, गुरु, शुक्र व अग्नि इत्यादि जीवन्मुक्त देवयोनींमध्यें झाले. प्रजापतींमध्यें दक्षादि व कश्यपादि सप्तर्षि, देवपुत्रांमध्यें नारदादि, कुमारादि व सनकादि, दानवांमध्यें हिरण्याक्ष, बलि, प्रल्हाद, शंबर, मयासुर, वृत्रासुर, अंधकासुर, नमुचि, केशिपुत्र मुरारि; राक्षसांमध्यें बिभीषणादि, प्रहस्त, इंद्रजित वगैरे; नागांमध्यें शेष, तक्षक, कर्कोट, महापद्म इत्यादि; ब्रह्मलोक, विष्णुलोक व इंद्रलोक यांत रहाणारे ते सर्व जीवन्मुक्त होते. तुषित, सिद्ध, साध्य यांतील कांहीं थोडेच मुक्तस्वभावाचे असतात. हे रामा! मनुष्यांमध्यें राजे, मुनि, उत्तम ब्राह्मण यांतील कांहीं थोडेच जीवन्मुक्त संभवतात. सर्व दिशांमध्यें अनेक प्रकारचीं अनेक भूतें आहेत. पण त्यांतील थोडींच ज्ञानानें युक्त असतात. फळें व पानें यांच्या समूहांनीं युक्त असे वृक्ष पुष्कळ असतात, पण कल्पद्रुम फारच विरळा संभवतात. ९७.

---

## सर्ग ९८ वा.

—:०:—

१ तत्त्ववेत्या संतांचीं लक्षणें, २ त्यांची परीक्षा करून व दोषांची उपेक्षा करून त्यांचा आश्रय करावा.

श्रीवसिष्ठः—जे विवेकी विरक्त असतात व जे परमपदीं विश्रांति घेतात, त्यांचे लोभमोहादि शत्रु अल्पत्वास प्राप्त होतात. लोभादि दोषांचें अल्पत्व हेंच जर त्यांचें लक्षण आहे तर त्यांचें निर्दोषत्व काय सांगावें! ते इष्टप्राप्तीनें हृष्ट होत नाहींत, कोणीं अपकार केला तर रागावत नाहींत. कोणत्याहि विषयाविषयीं अभिनिवेश धरीत नाहींत. विषयसमूहांचा संग्रह करीत नाहींत. लोकांपासून ते स्वतः उद्विग्न होत नाहींत व दुसऱ्या कोणाला उद्विग्न करीत नाहींत. तसेंच, शुष्क वैदिकाप्रमाणें हठानें अत्यंत शरीरक्लेशावह पारलौकिक कर्मांमध्यें ते आसक्त होत नाहींत. परलोक आहे अशा आस्तिक्याविषयींच्या आग्रहानें, किंवा परलोक नाहीं अशा नास्तिक्याग्रहानें ते कर्मठ बनत नाहींत. तर त्यांचे सर्व आचार अत्यंत रमणीय व सुखावह असतात. ते नेहमीं अत्यंत प्रिय व सौम्य भाषण करितात. चंद्राच्या

किरणांप्रमाणें ते आपल्या संगतीनें चित्ताला आल्हाद देतात. करण्यास अत्यंत उचित अशा लौकिक व वैदिक कर्मांचा परस्पर विरोध येऊन अनुष्ठानसंकट उद्भवलें असतां त्यांतील कर्तव्य कोणतें व अकर्तव्य कोणतें, यांचा एका क्षणांत निर्णय करतात. ते कोणालाहि उद्वेग न होईल असेंच आचरण करतात. ते जणुंकाय सर्वांचे चतुर बांधवच असतात. बाहेरून इतरांप्रमाणेंच त्यांचा आचार असतो, पण आंत ते सर्व विषयांविषयीं शीतल—शांत असतात. शास्त्रार्थाचें त्यांना मोठें प्रेम असतें. ते तत्त्वज्ञ असतात. लोकांतील श्रेष्ठत्व व निकृष्ठत्व ते बरोबर जाणतात. त्याज्य काय आहे व ग्राह्य काय आहे तें त्यांना कळतें. जें प्राप्त होईल त्याप्रमाणें ते अनुवर्तन करणारे असतात. विरुद्ध कार्यापासून ते विरत—निवृत्त झालेले असतात. सदाचारांत आसक्त असतात. उपदेशानें हृदयकोशाचें उद्घाटन करून त्यांतून बाहेर पडणाऱ्या ज्ञानसौगंध्यानें, श्रेष्ठ आश्रय देऊन व सुखकर अन्नांनीं ते आलेल्या अतिथींचें पूजन करतात. फुललेलीं कमलें भृंगाला जशीं सुगंध, आश्रय व अमृताशन यांच्या योगानें संतृष्ट करितात, तसेच संत त्यांना तृप्त करितात. जनतेच्या पापाचें हरण करणारे ते जनतेला आपल्या गुणांनीं वश करून घेतात. उद्यानादि शीतल स्थानांप्रमाणें ते स्निग्ध असतात. पावसाळ्यांत मेघ जसे वर्षाव करतात, तसे ते उपदेशामृताचा वर्षाव करतात. राजांचा देशोच्छेद करणारा क्षोभ, दुर्भिक्ष, परचक्र, जनक्षोभ इत्यादिकांचें ते तपःप्रभाव, सत्कर्मानुष्ठान, सामादि उपाय यांच्या योगानें निवारण करतात. पर्वत भूकंपाला जसा प्रतिबंध करतात, तसेच ते आपल्या सात्त्विक कर्मांनीं व गुणांनीं सर्व क्षोभ शांत करितात. विपत्तींत ते उत्साह धरतात आणि संपत्तींत सुख देतात. चंद्रबिंबाप्रमाणें त्यांचे आकार असून, पतिव्रता स्त्रियांप्रमाणें रूप, माधुर्य, प्रेम इत्यादि गुणांची ते जणु खाणच असतात. हे असले साधु ह्मणजे वसंत ऋतुच होत. ते यशोरूपी पुष्पांनीं सर्व दिशांना प्रफुल्लित करतात. भावी सत्फलाला कारण होतात. कोकिलेप्रमाणें त्यांचा आलाप असतो. कमलखंडांतून अतिशय थंड पवनाच्या योगानें उडणाऱ्या तरंगांच्या मिषानें कमलिनीला व्याकुळ करणाऱ्या हेमंताप्रमाणें देशाला व्याकुळ करणाऱ्या, राग-द्वेषादि सहा ऊर्मींनीं चपल झालेल्या, लोभद्वेषादिकांनीं मोहित झालेल्या अशाहि राजादिकांच्या चित्तमहासागरास साम-दाम-दानादिकांच्या योगानें व विवेकोपदेशांनीं प्रतिबंध करण्यास ते समर्थ असतात. त्यामुळें अशा प्रकारचे साधु म्हणजे क्षुब्ध समुद्राच्या तीरावरील पर्वतच होत. त्यामुळेंच विवेकी पुरुषांवर आपत्ति आली असतां, त्यांचा बुद्धिनाश झाला असतां, चित्त क्षुब्ध झालें असतां किंवा भयंकर संकटें आलीं असतां, तहान-भूक, शोक-मोह, जरा-मृत्यु या सहा ऊर्मि उद्भवल्या असतां, संतच त्यांची गति होय. या व अशाच दुसऱ्याहि चिन्हांनीं त्या उदारात्म्यांना ओळखून संसारमार्गांत दीर्घकाल प्रवास करून थकलेल्या पुरुषानें अद्वितीय ब्रम्हामध्यें विश्रांति मिळण्यासाठीं त्यांचा आश्रय करावा. सर्पाप्रमाणें भयंकर असलेला हा संसारसागर तरून जाणें फार कठीण आहे. सत्संगावांचून दुसऱ्या कोणत्याहि उपायानें त्याचें उल्लंघन करतां येत नाहीं. "एखाद्या वस्तूविषयीं उगाच विचार व चिंता करून मला काय करावयाचें आहे! जें प्राप्त होईल तें होवो." असें म्हणून व मनांत बेसावध राहून एखाद्या खड्ड्यांतील कीटाप्रमाणें प्राप्त स्थितींत संतुष्ट राहूं नये. वर सांगितलेल्या गुणांतील एक गुण जरी

**एखाद्याच्या ठिकाणीं असेल तरी त्या तेवढ्याच गुणाला उद्देशून त्याच्या इतर दोषांकडे लक्ष न देतां त्याच्या तेवढ्याच गुणाचा आश्रय करावा.** अगदीं लहानपणापासून प्रयत्नानें गुण व दोष जाणण्यासाठीं यथासंभव सत्संग व सच्छास्त्र यांच्या योगानें अगोदर आपली बुद्धि कुशाग्र करावी. दोषाचा जेवढा लेश असेल तेवढ्याचा अनादर करून सतत सज्जनांचें सेवन करावें. ज्यांच्यामध्यें मोठमोठे दोष आहेत, अशा पूर्व परिजनांचा हळूहळू त्याग करावा. त्यांचा त्याग न केल्यास कोणते दोष उद्भवतात ह्मणून म्हणशील तर सांगतों. शुद्ध केलेलें चित्तहि रागादिकांनीं कलुषित होतें. स्थिर विश्रांतिसुखहि विच्छेदामुळें अस्थिर होतें. कारण व्यवहारांत तसा नेहमीं अनुभव येतो. साधुहि संगतीनें असाधुत्वास प्राप्त होतो. पण साधूनें दुष्ट होणें हा एक उत्पातच ह्मणजे जगाचें अनिष्टसूचक चिन्हच आहे. लोकांच्या दुष्कर्मामुळें देशकालवशात् मोठमोठे उत्पात होत असलेले दिसतात. जसें—विश्वामित्र मोठा साधु असूनहि लोभी अमात्यादिकांच्या संगतीनें वसिष्ठाच्या कामधेनूचें हरण करण्यास प्रवृत्त झाला. त्यामुळें एकमेकांचें वैर वाढलें, आणि आडीबकाच्या युद्धापर्यंत जगाचें अनिष्ट झालें. त्याचप्रमाणें कश्यप, विश्रवा इत्यादिकांची, भार्येच्या संगतीनें जगाचें अनिष्ट करण्यास कारण होणाऱ्या दैत्य राक्षसांना उत्पन्न करण्याची प्रवृत्ति झाली. तात्पर्य, देशकालवशात् धूमकेतुप्रभृति प्रसिद्ध महोत्पातांप्रमाणें जगांत उत्पात दिसतात. यास्तव सर्व कर्मांचा त्याग करून सज्जनांचा समागम करावा. हेंच दोन्ही लोकांच्या प्राप्तीचें निष्प्रतिबंध साधन आहे. हा सज्जनसमागम गुणार्जनाच्या क्रमानें ज्ञानप्रतिष्ठा सिद्ध होईपर्यंत सोडूं नये. सज्जन गुरूपासून केव्हांहि दूर होऊं नये. विनय, सेवा इत्यादि गुणांनीं युक्त होऊन सर्वदा त्याला भजावें. म्हणजे त्याच्या समीप असलेल्या शिष्याला सर्वतः पसरणारे शम-दमादि गुण हेच पुष्परेणु यत्नावांचूनच प्राप्त होतात. फुललेल्या वृक्षाजवळ बसलेल्या पुरुषाला त्याचा सुवास जसा अनायासानें येतो, त्याचप्रमाणें साधूचे शमादिगुण त्याच्या संनिध असलेल्या मुमुक्षूंना सहज प्राप्त होतात. ९८.

— —

## सर्ग ९९ वा.

—:०:—

१. कृमि, कीट, पतंग, तिर्यक् व स्थावर जीवांचा भोग या संसारांत कसा असतो त्याचें वर्णन.

**श्रीरामः**—भगवन! आह्मां मनुष्यजातीच्या जीवांच्या ऐहिक व पारलौकिक दुःखाचा क्षय होण्यासाठीं शास्त्र, सत्संग इत्यादि उपाय आहेत. मंत्र, औषधि, तप दान, तीर्थ व पुण्याश्रम यांचाहि आम्हांला आश्रय करतां येतो; पण कृमि, कीट, पतंग इत्यादि तिर्यक् प्राणी व वृक्षादि स्थावर जाती यांच्या दुःखाचा क्षय कोणत्या उपायानें होतो? आणि तो जर होत नसेल तर ते जिवंत कसे रहातात? व ते काय करतात? कारण तात्कालिक दुःखोपशमाचा उपायच जर नसेल तर त्यांचें जीवनच दुर्लभ होईल.

**श्रीवसिष्ठः**—रामा! सर्व स्थावरजंगम भूतें आपआपल्या भोगाला उचित अशा सुखसत्तेमध्यें खुशाल विश्रांति घेत रहातात. ज्यांच्या शरीराचें प्रमाण परमाणूएवढें आहे, अशा जीवांनाहि त्यांच्या त्यांच्या जातीला उचित अशा सुखोपभोगाच्या इच्छा आम्हां-

प्रमाणें असतात. त्यांना त्या त्या जातीला योग्य अशा विषयसुखाचा लेश मिळाला ह्मणजे तोच मोठा पुरुषार्थ वाटतो. तेवढ्यानेंच ते तृप्त होतात, व त्या सुखलवाच्या आशेनेंच फार मोठें दुःखहि सहन करीत ते जिवंत रहातात. रामा ! आह्मांप्रमाणेंच त्यांनाहि विषयेच्छा जरी असली तरी आम्ही त्या भोगांमध्यें थोडी आस्था ठेवतो व आह्मांला त्यांत विघ्नेंहि थोडीं येतात. पण त्यांना विवेक नसल्यामुळें व त्यांच्या ठिकाणीं मोहकामादि दोषांचें प्राबल्य असल्यामुळें आस्था फार व विघ्नेंहि पर्वताएवढीं मोठीं व असंख्य (पण त्यांची भोगाविषयीं आसक्ति अधिक असते, हें तुम्ही कशावरून जाणलेंत? उत्तर—) अरे ! ब्रह्मदेव म्हणजे ब्रह्मांड हें ज्याचें शरीर आहे, असा जीव आपला अधिकार चालविण्यास योग्य अशा व्यवहारांनीं स्वभोगासाठीं जसा यत्न करतो, तसेच केशाच्या अग्राएवढे ज्यांचे देह आहेत असे कृमि, कीट, मशक, मत्कुणादिकांहि आपापल्या अवकाशांत स्वभोगासाठीं यत्न करतात. त्यांच्या त्या अल्प शरीरामध्यें अवकाश तो केवढा असणार? तथापि त्यांचा सुखासाठीं प्रयत्न केवढा चालतो ! अहंकाराचा परिणाम कसा विचित्र आहे तो पहा ! वर सांगितलेले आकाशपक्षी निराकार आकाशांतच उत्पन्न होतात व त्यांतच मरतात. शून्य हाच एक त्यांचा देश आहे. त्यांना एक क्षणभरहि विश्रांति मिळत नाहीं. सतत प्रयत्न करीत जिवंत रहावें लागतें. मुंगीसारखे प्राणी अन्न व निवासस्थान यांना संपादन करण्यासाठीं अहर्निश यत्न करीत असलेले दिसतात. कुटुंबपोषणासाठींहि त्यांची धडपड एकसारखी सुरू असते. आमच्या दिवसासारखा दीर्घकालहि, अन्नाचा कण संपादन करण्यासाठीं प्रयत्न करीत असतांना, त्यांना एका क्षणासारखाहि वाटत नाहीं. 'तिमि' या नांवाचा एक अतिसूक्ष्म जीव आहे. त्रसरेणूएवढें त्याचें शरीर असतें. पण गमन करण्याविषयीं गरुडाप्रमाणें त्याची व्यग्रता दिसते. आम्ही देह व भोग्य पदार्थ यांच्या ठिकाणीं 'हा मी' व 'हें माझें' असा अहंताध्यास व ममताध्यास जसा करितों, व सर्व जगत् श्रेष्ठ गुणांनीं आमच्या आस्थेला अतिशय योग्य आहे, असें समजतों, त्याप्रमाणेंच कृमिहि त्यावर अध्यास करितो व आस्था ठेवतो. देश, काल, क्रिया, द्रव्य, यांविषयींच्या आस्थेनें जर्जर झालेल्या आमच्या जीविताप्रमाणेंच त्या कृमींचेंहि आयुष्य व्यर्थ क्षीण होतें. वृक्ष थोडेसे जगतात, पाषाण गाढ झोंप घेतात. कृमिकीटादिक आपापल्या विषयभोगांमध्यें मनुष्याप्रमाणें स्वप्न व जागर यांनीं युक्त असतात. आम्हांप्रमाणें शरीरकालीं सुखानें असलेल्या त्या कृमि-कीट-स्थावरादिकांनाहि शरीरनाशच दुःखद वाटतो. शरीरांत प्राण असणें हेंच त्यांचें जीवन असून आम्हांप्रमाणेंच त्यांचें जीवित सुखमय होतें. (आमचें गृह, मोठा वाडा, धन, रत्न इत्यादिकांना ते कसे पहातात? उत्तर— ) ज्याप्रमाणें विकलेला मनुष्य दुसऱ्या द्वीपाकडे उदासीनतेनें पहातो, त्याप्रमाणें ते पशु-पक्ष्यादिक आपल्या भोग्य पदार्थांना उदासीनतेनें—मुग्ध दृष्टीनें पहातात. आह्मांप्रमाणेंच तिर्यक् प्राण्यांचा संसारहि सुखदुःखद आहे. ते केवळ उत्कर्ष, अपकर्ष इत्यादि बुद्धीला कारण होणाऱ्या गुण, क्रिया, उपयोग इत्यादि विभागानें रहित असतात. (पशु व विकलेले जन यांच्यामध्यें साम्य कसें आहे, तें दाखवितात— ) द्वीपांतरीं नेऊन विकलेले पामर जन सर्वथा जसे पराधीन असतात, त्याप्रमाणें बैलादि पशु हृदयांतून सुखदुःखांनीं आकर्षिले जातात व बाहेर

नासिकेंतील वेसणीनें ओढले जातात. याप्रमाणें दोन्ही बाजूंनीं पराधीन होऊन आकर्षण केले जात असले तरी आपल्या दुःखाचा परिहार करण्यास किंवा तें कोणाला सांगण्यास समर्थ होत नाहींत. (वृक्षांचा सुखदुःखानुभव कोणत्या प्रकारचा असतो तें सांगतात—) ज्याची त्वचा सुकुमार आहे असे आपण निद्रापरवश झालों असतां आह्मांला शीत, उष्ण, मशक, मत्कुण इत्यादिकांपासून पीडा होऊं लागतांच निद्राभंग होऊन जसें दुःख होतें, तसेंच वृक्ष, गुल्म, अंकुर इत्यादिकांना दुःख होतें. मोठ्या वृक्षापेक्षां अंकुर अत्यंत सुकुमार असल्यामुळें कृमि-कीटादिकांच्या दंशापासून त्याला अतिशय दुःख होतें. देशामध्यें क्षोभ उत्पन्न होऊन आपण पळून जाऊं लागलों असतां आपल्याला अनेक प्रकारचें दुःख अनुभवावें लागतें. जीव घेऊन पळावें लागतें. पळतांना कांटे वगैरे लागतात. तापलेल्या वाळूंतून चालावें लागतें. डोक्यावर भार सहन करावा लागतो. अशा प्रकारें अनेक प्रकारचें दुःख भोगावें लागतें. पक्षि-सर्पादि तिर्यक् प्राण्यांनाहि सर्वदा तसेंच दुःख होतें. आह्मांप्रमाणेंच त्यांचेंहि मन सर्वतः भयाविषयीं साशंक असतें. मन विक्षेपरहित जर होईल, तर सर्वसाधारण स्वरूपानंदांत व आहार-निद्रा-मैथुनादि सुखांत इंद्र व कीट यांचें मनःप्रसादरूप सौम्यत्व एकसारखेंच आहे. पण त्या दोघांनाहि विक्षेप टाळतां येत नाहीं. राग, द्वेष, भय, आहार, मैथुन यांपासून होणारें सुखदुःख व जन्ममरणादिकांचा खेद तिर्यक् प्राणी व इंद्र यांच्या ठिकाणी समान असतात. मनुष्यांना शास्त्रावरून पुण्य, पाप, ब्रह्मतत्त्व इत्यादिकांचें ज्ञान होतें. मागील पदार्थांचें स्मरण होतें. पुढें होणाऱ्या फलादि पदार्थांचें अनुसंधान करतां येतें. यावांचून बाकीचें सर्व ज्ञान मनुष्य, मुंगुस, सर्प, कोल्हा, हत्ती, इत्यादि सर्वांमध्यें एकसारखेंच असतें. आतां पर्वतादिकांना सुखदुःखांचा अनुभव कसा येतो म्हणून म्हणशील तर सांगतों. सुषुप्तींत स्थित असलेल्या वृक्षांची गाढमूढत्वानें जी स्वसत्ता, तिचा अनुभव घेत पाषाणादिक स्थिर स्थित आहेत. पण दुसरे जे हिमालय, मेरु वगैरे तत्त्वज्ञ पर्वत आहेत, ते अखंडित चिदाकाशाचा अनुभव घेत सदा समाधींत स्थित असतात. याप्रमाणें वृक्षादि जीवांच्या दृष्टीनें जगत्कल्पना नाहीं. कारण त्यांची निद्रा दृढ असते. पर्वतादि जीवांच्या दृष्टीनेंहि जगत्-कल्पना नाहीं. कारण स्वसत्तेमध्यें ते स्थित असतात. जंगम जातींतीलहि तत्त्वज्ञांच्या दृष्टीनें जगत्कल्पना नाहीं. कारण ते केवल चिदाकाशरूप झालेले असतात. तेव्हां कांहीं अज्ञ जीवांच्या दृष्टीनेंच जगत्कल्पना सिद्ध होते. पण ती त्यांची कल्पना अनेक जीवांच्या दृष्टीविरुद्ध असल्यामुळें जगत्सत्ता सिद्ध करण्यास समर्थ नाहीं. अर्थात् ज्या जंगम जीवयोनि आहेत, त्या सुषुप्ति, मरण, मूर्च्छा, मोक्ष इत्यादि अवस्थांमध्यें चिदाकाशच असतात. त्यांतील कित्येकांना स्वप्नांत अर्धविकास व जागृतींत सर्वविकास होऊन भासणारें जगत् पुष्कळ जीवांच्या दृष्ट्यनुसार चिदाकाशच आहे, असें म्हणणें युक्तच होय. त्यांतील शैलादिकांची सत्ता व वृक्षांची निद्रा या दोन्ही स्थिति द्वैतदर्शनशून्य असल्यामुळें तें आकाशच आहे. त्यामुळें त्यांच्या दृष्टीनें जगत् एक अज्ञानोपहित चिन्मात्रच आहे. इतरांच्या दृष्टीनेंहि स्वतत्त्व जोंवर कळलें नाहीं, तोंवरच जगत्; स्वतत्त्वाचें साक्षात् ज्ञान झालें म्हणजे तूं नाहींस, मी नाही, सत्ता नाहीं, असत्ता नाहीं, भूत नाहीं, भविष्यत् नाहीं, तर हें जसें स्थित

आहे तसें सत्च आहे. तें शिलेप्रमाणें घनमौन आहे. तें आदि-अंतशून्य निरवकाश व निद्रा-रहित आहे. पण अज्ञांच्या दृष्टीनें तें निद्रा-युक्त आहे. ह्मणजे निजल्याप्रमाणें स्वरूपा-मध्येंच जगद्वैचित्र्याची कल्पना करतें. सृष्टीच्या पूर्वी तें जसें होतें, तसेंच आतांहि एकच स्थित आहे. भविष्यत्कालींहि तें तसेंच अनंत कालपर्यंत रहाणार. अशा प्रकारच्या त्या एकरूप सत्तत्त्वामध्यें आत्मता नाहीं, परता नाहीं, जगत्ता नाहीं, शून्यता नाहीं, मौनता नाहीं, अ-मौनत्व नाहीं. सारांश, त्या तत्त्वांत कोणताहि भाव नाहीं. तूं जसा आहेस तसाच रहा. मीहि जशाचा तसाच स्थित आहें. या शांत पर-माकाशांत सुख व दुःख यांतील कांहीं नाहीं. स्वप्ननगरामध्यें परमाकाशतेवांचून दुसरें काय आहे सांग बरें ! खरोखर तें शांत, स्वच्छ व निरामय चिदाकाशच आहे. अज्ञात ज्ञप्तिच काय ती एक हा सर्व संभ्रम उत्पन्न करणारी आहे. या सर्व भ्रमाचें तत्त्व जाणलें कीं ला-गलीच ती कोठें नाहींशी होते. जगत्स्वप्नाला जाणलें कीं, त्यांत सत्य कांहीं रहात नाहीं. तेव्हां त्याविषयीं काय अभिनिवेश धरावयाचा आहे! वंध्यापुत्रावर स्नेह कसा कराव-याचा ? स्वप्नकाळीं दिसणाऱ्या जगद्रूप प्रत्येक परमाणूंत ग्राह्यता कोठची? त्यावर काय आस्था ठेवावयाची आहे ? कारण जागृत झाल्यावर तो स्वप्नमणी किती शोधला तरी सांपडत नाहीं. ' अहो, जागरावस्थेंत स्वप्नप्रत्यय जरी खोटा असला तरी स्वप्नकाळीं तो खराच भासतो,' ह्मणून ह्मणशील तर ती पूर्वावस्था अज्ञताच आहे व तीच त्या वेळीं स्वप्नरूपानें दिसत असते. यास्तव प्रबोधकालीं जें नसतें तें स्वप्न-काळीं असतें. ' तर मग काय तीन काळ, अ-ज्ञान व त्यांचें ज्ञान हीं सर्व सत्यच आहेत?' असें जर ह्मणशील तर त्यांतील कांहीं एक सत्य नाहीं. सर्व वस्तु शान्त आहे. एका ऊर्मीनें जर दुसऱ्या ऊर्मीला नाहींसें केलें, तर त्यांत जलाची काय हानि होणार ? त्या-प्रमाणें एका देहानें दुसऱ्या देहाला मारल्यास तदधिष्ठानभूत आत्म्याची कांहीं हानि नाहीं. आकाशरूप चितीमध्यें मी देह अशी भ्रांति उत्पन्न होते. त्यामुळें तो भ्रांतिसंविद्रूप देह जरी नष्ट झाला तरी चितीची काय हानि हो-णार ? ज्याला आत्मज्ञान झालें आहे, त्याला जगत् हें अज्ञात चिदाकाशाचें स्वप्न आहे, तें पृथिव्यादिरहित आहे, असा निश्चय होतो. ह्मणून हें जगत् स्वप्नात्मक आहे. प्रत्येक सृष्टीच्या आरंभीं पूर्व चित्स्वप्नाच्या संस्कारा-पासून पृथिव्यादि पदार्थविषयींची बुद्धि उत्पन्न होते, पण स्वप्नांतील विषयाविषयीं जी सत्यत्वभ्रांति होते, ती केवल कल्पनारूप आहे. याप्रमाणें पूर्वपूर्व संस्कारांपासून अनादि प्रवाहानें स्वप्नाच्या अवयवांची स्थिति होते. त्यामुळें ती असत्यरूपच आहे. तथापि मूढ तिला सत्य मानतात. या वेळीं आम्हांला दिसणारे हे पृथिव्यादि पदार्थ त्या स्वप्नाचे अवयव असूनहि अज्ञजनांनीं आपल्या कल्पनेनें त्यांना सत्य ठरविलें आहे व तीच भ्रांति पुढें रूढ झाली. त्यामुळें असत्य असलेली सृष्टिच अत्यंत सत्य होऊन बसली. वस्तुतः तिचें अधिष्ठानभूत तत्त्व सत्य व अत्यंत निर्मल आहे. पण चिद्रूप ब्रम्हच अशा सृष्टिरूपानें विस्तार पावलें आहे. तथापि त्यांतलि एकहि पदार्थ परमार्थसत्तेनें युक्त नाहीं. तेव्हां अशा अत्यंत अप्रसिद्ध जगाचें स्मरण करणारा किंवा त्याला विसरणारा चितूहून दुसरा कोणी संभवत नाहीं. पण असें न समजणें, असें ज्ञान नसणें, हेंच जगाचें सत्यत्व भासविणारें आहे. चिद्ब्रह्माच्या अज्ञानामुळेंच जगत् सत्य आहे, असा भ्रम होतो. म्हणूनच

तत्त्वाचा साक्षात्कार अज्ञान-आवरणरूप द्वार उघडतो व जगत् सत्य आहे इत्यादि भ्रांति-विक्षेपाला घालवितो. त्यानंतर ह्मणजे कार्यासह अज्ञानाचा बाध झाल्यावर केवळ चिन्मात्रच अवशिष्ट रहातें. मग पृथिव्यादि कोठेंच कांहीं संभवत नाहीं. जो द्रष्टा व जें दृश्य तें एक शुद्ध शिवस्वरूप होतें. आरशांत बिंबामुळें जसें प्रतिबिंब भासतें, तसेंच जगत् चिदाकाशांत आपोआप भासतें. पण आरशांतील प्रतिबिंबापेक्षां जगत्प्रतिबिंबांत फरक आहे. तो कोणता, तर जगत्प्रतिबिंब बाह्य बिंबावांचूनच प्रकट होतें. आरशांत प्रतिबिंब जरी दिसलें तरी तें जसें खरें नव्हे, वास्तविक पदार्थ नव्हे, त्याचप्रमाणें चिदाकाशांतील विश्व जरी दिसलें, तरी खरें नव्हे. हेंच त्या दोहोंतील सादृश्य आहे. शास्त्रीय विचार केल्यावर जें सकारण व सप्रमाण सिद्ध होतें तेंच परमार्थ-सत्य होय. बाकीचें सर्व कल्पनामात्र असून त्रिकाळीं असत्य होय. ‘जगत् कल्पनामात्र असल्यामुळें जर असत् आहे, तर व्यावहारिक क्रिया करण्यास तें समर्थ कसें होतें?’ ह्मणून विचारशील तर सांगतों. जगत् भ्रमरूप जरी असलें तरी व्यावहारिक क्रिया करूं शकतें. स्वप्नांगनाहि पुरुषाच्या ठिकाणीं सत्य परिणाम करूं शकते. अर्थात् ‘अहं,’ ‘त्वं’ इत्यादि ही सर्व विश्वरचना केवळ भासमात्र आहे, ही गोष्ट सिद्ध झाली. आणि जो जो भास तो तो आत्मस्वरूप चित्प्रकाशच होय. दुसरें कांहीं नाहीं. यास्तव दृश्य रूपाला भानाहून पृथक् केलें असतां तें शून्यच होतें व केवल त्याला प्रकाशित केलेलें चिदाकाशच रहातें. असा विचार केला असतां मीं कोठचा? ही विश्वश्री कोठची? तूं कोठचा व हे दृश्य पदार्थ कोठचे? हे रामा? ज्याची बुद्धि उदार आहे, असा तूं विज्ञानदृष्टीनें चिन्मात्ररूप झालास म्हणजे मग देहवियोगामुळें तूं मरून पुनः उत्पन्न होतोस, म्हणजे तुला दुसऱ्या देहाची प्राप्ति होते, असें जरी मानलें, मोक्ष नाहीं असें जरी क्षणभर समजलें, तरी काय हानि आहे? कारण निरतिशय आनंदरूप आत्म्याला नाश व उत्पत्ति यांचा स्पर्शही होत नाहीं. बरें, मेल्यावर पुनः जन्म प्राप्त होत नाहीं, म्हणजे ज्ञानी मुक्तच होतो असें जरी म्हटलें, तरी सर्व प्रपंचाची शांतिच होते. तस्मात् या दोन्ही पक्षीं दुःखाचा प्रसंगच नाहीं. तर मग मूर्खाला जन्म व मरण या प्रसंगीं दुःखाची प्राप्ति कशी होते म्हणून विचारशील तर तें तोच जाणे! अज्ञ मनुष्याचा अनुभव आह्मांला येणें शक्य नाहीं. जो मृगजलाच्या नदींतील मी मासा आहें असें समजतो, तोच त्या नदीच्या चंचल तरंगांना व त्यांतील आपल्या विहारांना जाणतो. ज्याला मृगजलाची भ्रांति झाली नाहीं त्याला तें कळणें शक्यच नाहीं. त्याच न्यायानें तत्त्ववेत्त्याच्या दृष्टीनें आंत व बाहेर तें चिदाकाशच आहे. तूं, मी, जगत् इत्यादि सर्वात्मक होऊन तेंच एक स्फुरत असतें. ज्याप्रमाणें चिदाकाशमात्ररूप असलेला संकल्पवृक्ष शाखा, पल्लव, उपशाखा, पानें, फळें इत्यादि रूपानें भासतो, त्याप्रमाणें चिदात्माच संसाररूपानें भासतो. पण त्या दोन्हीमध्यें बोधात्मा हेंच सार आहे. ९९.

---

# सर्ग १०० वा.

१ चार्वाकादिकांच्या मतांमध्यें ज्यांची बुद्धि आसक्त झाली आहे, त्यांचा तत्त्वज्ञानांत प्रवेश होण्याचा उपाय.

**श्रीराम:**—हे भगवन्! संसारांतील दुःखशांति होण्यासाठीं कोणता उपाय योजावा? 'मरेपर्यंत सुखानें जिवंत रहावें. मृत्यु अप्रत्यक्ष नाहीं, तर प्रत्यक्ष आहे. भस्मीभूत होऊन शांत झालेल्या देहाची पुनरुत्पत्ति कोठून होणार?' असा ज्यांचा पक्ष आहे त्याचें निरसन आपण कसें करणार?

**श्रीवसिष्ठ:** संवित आंतल्याआंत जो अखंडित निश्चय करते, तसाच बाहेर अनुभव घेते. ही गोष्ट प्रत्यक्ष सिद्ध आहे. सर्व लोकांना या गोष्टीचा अनुभव येत असतो. जसें आकाश सर्वव्यापी व शांत आहे, तसेंच चिदाकाशहि आकाशादि सर्वांना व्यापणारें व शान्त आहे. तेंच विद्वानांचें ऐक्य व पामर जनांचें द्वैत आहे. कारण चित्हून भिन्न पदार्थाचा अत्यंत असंभव आहे. त्याविषयीं 'सदेव सोम्य इदमग्र आसीत्' या श्रुतीनें अनुगृहीत युक्तिहि आहे. ती कोणती म्हणशील तर पहा. सृष्टीच्या पूर्वावस्थेंत म्ह० अद्वितीय ब्रम्हरूप महाप्रलयांत ब्रम्हावांचुन इतर पदार्थच नसतो. ब्रम्हाचें दुसरें कांहीं कारण नसल्यामुळें त्यापूर्वीं आणखी कांहीं विद्यमान् होतें असेंहि म्हणतां येत नाहीं. म्हणून हें ब्रह्मच व्यापलेलें आहे. 'अहो, पण ब्रह्मरूप महाप्रलयच आम्हांला कबूल नाहीं. कारण बीजांकुरांच्या परंपरेप्रमाणें पृथिव्यादि भूतांचा प्रवाहहि अनादि आहे. त्यामुळें हें जगत् सर्वदा असेंच आहे. तें असें नाहीं, असें केव्हांहि होत नाहीं,' असें कर्मजड मीमांसकांच्या सिद्धान्ताप्रमाणें तूं म्हणशील तर सांगतों. जे महामूढ समस्त वेदशास्त्रांचा अर्थ म्हणजे महाप्रलय व जीवांना ब्रह्मप्राप्तिरूप मोक्ष व त्यांचीं साधनें हीं मानीत नाहींत, ते शास्त्ररहितच होतात. कारण त्यांनीं मोक्षशास्त्राचें व्यर्थत्व सिद्ध केल्यास त्याच न्यायानें कर्मशास्त्रहि व्यर्थ ठरत असल्यामुळें मीमांसकांना शास्त्रच नाहींसें होतें. त्यामुळें ते आम्हां तत्त्ववेत्त्यांच्या दृष्टीनें मेल्यासारखेच आहेत. ते तत्त्वोपदेशाच्या वार्तेलाहि योग्य नाहींत. ज्यांचें देहेन्द्रियांना सर्व व्यवहारामध्यें नियुक्त करणारें प्रत्यगात्मचैतन्य किंवा मन कोणत्याहि शास्त्राच्या अविरुद्ध असें हें सर्व ब्रह्मच आहे या अनुभवानें नित्य तृप्त होऊन रहातें, त्या कृतकृत्य पुरुषांबरोबरहि उपदेशवार्ता होऊं शकत नाहीं. कारण ते अगोदरच पूर्ण परब्रह्म झालेले असतात. अर्थात् जे जिज्ञासु असतात त्यांच्यासाठींच उपदेशवार्ता संभवते. रामा! पुरुषाच्या चित्तांत जशा प्रकारची नित्य व

१ वसिष्ठांनीं पूर्वीं 'चार्वाकाचें म्हणणेंहि खरेंच आहे' असें म्हटलें होतें, पण सर्व आस्तिक मतांच्या विरुद्ध असलेलें तें मत खरें कसें असेल व त्यापासून पुरुषार्थसिद्धि कशी होईल? अशा आशयानें राम हा प्रश्न विचारीत आहे.

२ देहात्मवादी चार्वाकांच्या मतीं मृत्यु प्रत्यक्ष संभवत नाहीं. कारण आपण आपलेंच मरण पहात नाहीं. दुसऱ्याच्या मरणावरून त्याची कल्पना करावी, तर चार्वाकाला प्रत्यक्ष प्रमाणाहून दुसरें प्रमाण कबूल नाहीं. देहनाश हाच मृत्यु. तथापि चार्वाक पुनर्जन्म मानीत नाहींत. यास्तव सर्व दुःखनिवृत्तिरूप मृत्यु हाच त्याचा मोक्ष होय.

१ 'सर्वे वेदा यत्पदमामनन्ति' (का. भा. १-२, १५ पृ. ५६) 'तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषंति' (बृह भा अ.४,पृ.३३७) या श्रुतींत सांगितलेला समस्त वेदशास्त्रार्थ ब्रह्मस्वरूप आत्मा आहे.

निरंतर संविद् उदय पावते, तसाच तो पुरुष होतो, मग देह असो किंवा नसो. चार्वाकांचा 'देहच आत्मा' असा भाव दृढ झालेला असतो. त्यांच्या चित्तांत तशी निश्चयात्मक संविद् उदय पावते. यास्तव सर्व निश्चयाचें तेंच एक अव्यभिचारी कारण आहे, देह नव्हे. त्यामुळेंच आत्मा जरी आनंदैकरस असला तरी त्याविरुद्ध 'मी दुःखी आहें' ही कल्पना दृढ केल्यास त्याचें दुःखमयत्वहि सर्वानुभवसिद्ध आहे. जोंवर विरुद्ध संकल्प आहे तोंवर जीवहि तन्मयच असणार हें उघड आहे. हें सर्व जगत् चिदाकाशस्फुरणरूपच आहे, अशी भावना केली असतां दुःखादिकांचा बोध कोणाला कसा होणार? आकाशाला धूळ जशी लिप्त करीत नाहीं, त्याप्रमाणें ज्यांचा एकत्व निश्चय दृढ झाला आहे त्या पुरुषांना कोणतेंहि सुख अथवा दुःख प्राप्त होत नाहीं. मग ती कल्पना सत्य असो कीं असत्य असो. पण निश्चय हा अशा प्रकारचा असतो, ही गोष्ट आबालवृद्धांच्या अनुभवानें सिद्ध झाली आहे. तेव्हां तिचा अपलाप कोण कसा करणार? चार्वाकांना अभिमत असलेला देह हा पुरुष नव्हे. सांख्यांना अभिमत असलेला जीव किंवा मीमांसकादिकांना अभिमत असलेला भोक्ता संविदेहून पृथक् उपलब्ध होत नाहीं. यास्तव हें सर्व संविद्च आहे. ती जसें जाणते, तसेंच जगत् बनतें. ती संविद् सत्य असो कीं असत्य असो, तिच्या योगानें देहाचा अनुभव घेतला जातो. पण तोहि केवल आपल्या कल्पनेनेंच; पृथिव्यादि कारणसापेक्ष नव्हे ज्याप्रमाणें स्वप्नामध्यें आपण पाताळांत, आकाशांत, जलांत किंवा स्वर्गांत कल्पनेनें पदार्थ पहातों, तसेच या सृष्टींत कल्पनामय पदार्थ अवलोकन करतों. संविद् सत्य असो कीं असत्य असो, पुरुष संविन्मात्र सांगितलेला आहे. खरोखर तो जसा निश्चय करतो तशा व्यवहाराला पुरुष सर्वथा समर्थ होतो. यामुळेंच सर्व शास्त्रांचें प्रामाण्य सिद्ध होतें. सर्व सिद्धान्तांचा सिद्धान्त हाच आहे, असें मी समजतों. संविदेमध्यें जी अविद्या आहे ती त्या त्या वाद्यांच्या संविदेप्रमाणें परिणाम पावते. तीच तत्त्वबोधरूपानें परिणाम पावली कीं शुद्ध चिदाकार बनते व तशीच मोक्षरूप फल देणारी होते. म्हणूनच पुण्यदेश, पुण्यकाल इत्यादिकांतील स्नान-दानादि क्रियांनीं, रसायन—मंत्र-औषधादि द्रव्यांनीं, कर्मशास्त्रांनीं सांगितलेल्या स्वर्ग, पशु, पुत्रादि एषणाभ्रमांनीं ती अबोधता व तिच्यामुळें होणारी विक्षेपसंविद् केव्हांहि नाश पावत नाहीं. पण ज्ञानानें जिचा बाध झाला आहे, अशी ती पुनः उदय पावेल अशी शंकाहि घ्यावयास नको. कारण एकदा जिचा कारणासह बाध झाला आहे ती अविद्या पुनः जर क्षणांत आविर्भूत होऊं लागली, तर जीवाचें दुःख केव्हांच व कोणत्याच उपायानें शांत होणार नाहीं. संविद् हाच मनुष्याचा जीव आहे. त्यानें जशी दृढ भावना केली असेल तसाच तो सुखी किंवा दुःखी होईल, हा अबाधित सिद्धान्त आहे. प्रत्यगात्मरूप संविद्च तत्त्वतः ज्ञात झाली असतां आपलें कार्य असा जो बंध त्याचें हरण करिते. यास्तव तीच मुमुक्षूंचा आश्रय आहे. तिच्या अभावीं सर्व जगत् अंधच होईल! मग मोक्षाची आशा दूरच राहिली. कारण स्वप्रकाशस्वरूप अशा त्या प्रत्यगात्मसंवितीमुळेंच हा प्रपंच उपलब्ध होतो. पुरुष निद्रेच्या योगानें आपल्या जाड्याची कल्पना जशी करतो, त्याप्रमाणें

१ 'तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः' (ईश. भा. मं. ७ पृ. १६) ही श्रुति याला प्रमाण आहे.

ती संवित् आपल्या ठिकाणीं अज्ञानाची कल्पना करूनच या प्रपंचाला पहाते. यास्तव तीच नाहीं, असें म्हटल्यावर ज्याला कोणी साक्षीच नाहीं असें केवल आंध्यच म्हणजे अप्रकाशच अवशिष्ट रहातो.

**श्रीरामः**—भगवन्! या संसाराचा पूर्व, पश्चिम, इत्यादि दिशांमध्यें खालीं व वर कोठेंच अंत नाहीं, तसाच या जगाचा क्षयहि होत नाहीं, अशी ज्यानें दृढ भावना केलेली असते; जगाचा प्रागभाव, प्रध्वंसाभाव व अंत्यताभाव यांतील एकहि अभाव संभवनीय नाहीं, असा ज्याचा निश्चय असतो, जो हें सर्व विज्ञानघनच आहे असें पहात नाहीं, तर हें जसें दिसत आहे तसेंच तें आहे, असें जो समजतो, या सर्वांचा क्षय होईल असें ज्याच्या मनांतहि येत नाहीं, त्याच्या या व्यथेचा नाश करण्यास कोणत्या प्रकारची युक्ति योजावी तें मला सांगा. हे ब्रम्हन्! माझ्या बोधाची अभिवृद्धि व्हावी म्हणून या माझ्या संशयाचें पुनः निरसन करा.

**श्रीवसिष्ठः**—रामा! या शंकेचें निरसन मीं एकदा केलें आहे. कोठें म्हणशील तर मी त्याची आठवण करून देतों. 'ते शास्त्रशून्य पुरुष आम्हांला मेल्यासारखेच आहेत. आम्हांला त्यांच्याशीं भाषणहि कर्तव्य नाहीं' असें जें वर सांगितलें आहे; तेंच तुझ्या शंकेचें योग्य उत्तर होय. आतां दुसरें न्याय्य उत्तर मीं सांगतों तें ऐक. हे पुरुषोत्तमा! तशा भावनेचा जो मनुष्य असतो म्हणजे तूं सांगितल्याप्रमाणें ज्याची दृढभावना असते. तोहि चेतनमात्र असतो, असा आपणाला अनुभव येतो. त्यामुळें क्रमानें त्यालाहि आत्मतत्त्वाचा अनुभव येऊं लागतो. कारण तो जर देहातिरिक्त चेतनात्मदर्शी असेल, तर देहादि आकार या उपाधीचा नाश झाला असतां परमात्म्याशीं एकरूप होतो. बरें, तो जर नित्य सूक्ष्म देहात्मदर्शी असेल तर विनाश पावणाऱ्या अन्नमय देहाला आत्मा समजल्यानें सर्वतः विनाशाची शंका येऊन दुःख होतें, पण आत्मा अविनाशी आहे असा निश्चय झाल्यावर त्याला देहाकार समजणें एवढ्याच अपराधानें दुःखप्राप्ति होत नाहीं. त्यामुळें त्याला बोध करूं लागलें असतां क्रमानें तो तत्त्व ओळखतो. 'स्थूल देहच आत्मा' असें जो समजतो, त्याला आपल्या नाशाची कल्पनाच होत नाहीं. पण त्याचा देह सावयव असल्यामुळें व तोच आत्मा असें तो समजत असल्यामुळें 'अरे बाबा, जी जी सावयव वस्तु असते, ती ती अवश्य विनाश पावते,' असा बोध करूं लागल्यास त्यालाहि आत्मा स्थूलदेहाहून भिन्न आहे असा बोध होतो. तो जर शुद्ध संविदात्मदर्शी असेल तर तो जीवन्मुक्तच होय. तो सर्वदा सर्व ठिकाणीं लीलेनें जगत् जरी पहात असला तरी मरतांक्षणींच कैवल्यास प्राप्त होतो आणि पुनः संसाराचा अनुभव घेत नाहीं. तसेंच जो वादी अज्ञानावृत्त संविदात्मदर्शी असतो, त्याची संविद् तत्त्वज्ञानानें शुद्ध झालेली नसते. त्यामुळें त्याच्या संसाराचा बीजभाव नष्ट होत नाहीं. त्यामुळें तो अवश्य संसारच करीत रहातो. तथापि केव्हांना केव्हां तरी त्यालाहि संसाराविषयीं विरक्ति उत्पन्न होऊन विचारानें ज्ञान होतें व शेवटीं संसार क्षीण होतो. किंवा संविद्च नाहीं असा ज्याचा निश्चय असतो, तोहि आपल्या दृढ निश्चयाप्रमाणें दगडासारखा जड म्ह० सर्व विशेषज्ञानशून्य होऊन चिरकाल रहातो. तर मग त्यानें त्या आपल्या भावनेमध्यें श्रेय कोणतें व कसें पाहिलें म्हणून विचारशील, तर सांगतों. मरेपर्यंत दृढ केलेल्या भावनेच्या अनुसारच देहपातानंतर त्याचें विशेष विज्ञान नष्ट

होऊन गाढ सुषुप्तीसारखी जी मरणावस्था तेंच परमश्रेय असें तो समजतो. कारण त्या अवस्थेंतहि दुःखाचा अभाव असतो. नैयायिकांचा मोक्षहि याच स्वरूपाचा आहे.' निरतिशय आनंदाचा अनुभव हेंच श्रेय आहे' असें त्याला वाटत नाहीं. आतां जे शून्यवादी 'आत्मा नाहींच' असा दृढ निश्चय करतात, त्यांना शुद्ध ज्ञान केव्हांच होऊं शकत नाहीं. ते मेल्यावर पाषाणासारखे जड होतात. त्यांचें अज्ञान दुर्भेद्य असतें. जे विज्ञानवादी बौद्ध हें जगत् स्वप्नासारखें क्षणिक विज्ञानमय आहे असें पहातात, त्यांच्याहि व्यवहाराची सिद्धि तशीच होते. कारण ते क्षणिक विकारी चिदात्मभूत असतात. जे जगत्स्थैर्यवादी किंवा क्षणिकत्ववादी असतात, त्यांचाहि सुखदुःखभोगापर्यंत सर्व व्यवहार एकसारखाच सिद्ध होतो. कारण हीं भूतें स्थिर असलीं किंवा अस्थिर असलीं तरी त्यांपासून होणारें सुख किंवा दुःख सारखेंच असतें. जगत् स्थिर असो किंवा अस्थिर असो, पृथिव्यादि महाभूतें क्षणिक आहेत किंवा नित्य आहेत याविषयीं तत्त्ववेत्ते आग्रह धरीत नाहींत; कारण शुक्तीवर भासलेल्या रूप्याचें मूल्य किती याचा विचार करणें जसें व्यर्थ, त्याचप्रमाणें त्या सर्व आरोपित महाभूतांचें अधिष्ठान सद्ब्रम्ह हेंच स्वरूप असल्यामुळें त्यांच्या सत्यत्वासत्यत्वाचा विचार व्यर्थ आहे. जोंवर अज्ञान आहे तोंवर हें सर्व केवळ चित्प्रकाशरूपानें भासत आहे, असें समजणें मात्र सर्वथा उचित होय. कालतः असत्ता ह्मणजे क्षणिकत्व व देशतः असत्ता म्ह० जाड्य या दोन्ही प्रकारच्या असत्तेला न व्यापतां, स्पर्श न करतां जी नष्ट झाली आहे त्या क्षणिक संविदेच्या योगानें जाड्याचा निर्णय करून ज्यांनीं त्याचा अंगीकारहि केला आहे, त्या मूढांशीं भाषणहि करणें व्यर्थ होय. म्हणूनच कूटस्थ चित्-पासून मिथ्यापरिणाम असा हा सर्व जड प्रपंच उत्पन्न झाला आहे असें जे समजतात, ते धन्य होत. ते पुरुषोत्तम सर्वथा वंद्य होत. कारण हा सर्व विकार वाङ्मात्र व त्यामुळेंच मिथ्या आहे, ही भावना दृढ केली असतां एक चित्च अवशिष्ट रहाते व तीच सत्य होय. 'जड देहादिकांपासून चित् उत्पन्न होते,' असें म्हणणारे जे चार्वाक, कणाद, वगैरे अज्ञ त्या पुरुषाधमांशीं आम्हांला कांहीं करावयाचें नाहीं. जीवांच्या बीजांचा ओघ, ह्मणजे बीजसमष्टिरूप हिरण्यगर्भ चिद्रूप आहे. आकाशांत कृमिकीटादिकांचा समूह जसा असतो, तसाच तो आहे. डेरा, मोगऱ्याची वेल इत्यादिकांत भरला जाणारा जलाचा ओघ जसा खालीं, वर, वांकडातिकडा आपोआप पसरतो, त्याप्रमाणें तो हिरण्यगर्भ अनेक जीवरूपानें ऊर्ध्व-अधोलोक इत्यादिकांत गमन करून संसार वगैरे करतो, ही कल्पनाहि योग्यच आहे. ती नाना कर्तृजीवांची समष्टिताहि हिरण्यगर्भाच्या चित्च्या कल्पनाभिनिवेशामुळेंच आहे. त्यामुळें जीवबीजांचा ओघच, अशा हिरण्यगर्भाच्या चिदाभासाकडून आपल्या समष्टित्वाची कल्पना अगोदर केली जाते. नंतर त्या वासनेच्या अनुसार कल्पाच्या आरंभीं दुसरा व्यष्टिरूप बहुविध कर्ता आंतल्याआंत स्फुरतो. तो त्यांतच आसक्त होतो, त्यामुळें स्वतःच नानाकर्तृरूपांचा अनुभव घेतो आणि तसाच संसार करतो. तात्पर्य, जो जशी कल्पना करितो, तो तसाच आपल्या चिद्रूपानें बनतो, ही गोष्ट आबालवृद्धांना माहीत असून ती अबाधितपणें सिद्ध आहे. त्यामुळें आकाशांत धूमाच्या

१. 'असुर्या नाम ते लोकाः' ही श्रुति याविषयीं प्रमाण आहे. (ईशा. भा. ३ पृ. १४)

किंवा महासागरांत जलाच्या जशा विचित्र आवर्तवृत्ति दिसतात, तसें जीवचिदाभासांच्या वासनावैचित्र्याप्रमाणें विचित्र संकल्प उत्पन्न होऊन संसारवैचित्र्य अनुभवास येतें व त्याचा अंत लागत नाहीं. स्वप्नांत पुरुषाला चिदाकाशच जसें नगर दिसतें, त्याप्रमाणें आदिसर्गापासून तें चिदाकाशच हें जगत् होऊन स्थित आहे. जशीं स्वप्नांत दिसणाऱ्या सृष्टीचीं सहकारी कारणें नसतात तशीं सृष्टीच्या आरंभीं पृथिव्यादि भूतें नसतात. त्यांवांचूनच सृष्टि होते. म्हणूनच ती मिथ्या. स्वप्ननगरांत त्याच्या अवयवभूत गृहांची भूमि अनेक प्रकारची केलेली असते. तिचे उंच, सखल इत्यादि अनेक भेद कल्पिलेले असतात. पण असल्या लौकिक स्वप्नांत अंतःकरणाच्या अर्ध-विकासानें जे कोमल भूमिभाग कल्पिलेले असतात, तेच पुढें पूर्ण विकासानें जगद्रूप स्वप्न-नगरांत पुष्ट होतात. या सर्व प्रजा द्वैत-ऐक्य-रहित चिन्मात्राकाशच आहेत. तेव्हां त्यांत आणखी दुसरी कोणती कल्पना असणार? जें भासतें तें सर्व आकाशच आहे. ही चिच्चंद्रिका त्रिविधतापांची शांति करून आल्हाद देणारी आहे. ती चारी दिशांमध्यें विषयस्फुरणप्रकाश पसरते. तो चेतनप्रकाशच विषयरूपानें भासतो. त्याचें स्फुरण हेंच जगत् आहे. सृष्टीच्या पूर्वी व प्रलयानंतर सर्गशून्यस्वभाव चिन्मात्राकाशांत आतां दिसत असणारें हें जगत् असतें, हें प्रसिद्ध आहे. तें आकाशरूप ब्रह्मच, त्याच्या चितचा परिच्छिन्नरूपानें उन्मेष झाला असतां व अपरिच्छिन्नरूपानें निमेष झाला असतां स्वतःच स्वप्नरूपानें उदय पावतें व अस्त पावतें. हें श्रुतिप्रसिद्ध तत्त्व सृष्टीच्या आरंभीं जें जें जसें जसें कल्पितें, तें तें तसेंच अद्यापि अनुभव घेतें. ज्याअर्थी हें सर्व चिन्मात्र आहे, त्याअर्थी त्यांत काय असूं शकणार नाहीं, कीं ज्याला असत् म्हणतां येईल? ज्यांना तत्पदाचा साक्षात्कार झाला आहे, ते संत शांतचित्त असतात. त्यांचीं मनें शरत्कालच्या आकाशाप्रमाणें स्वच्छ असतात. ते चिद्व्यतिरिक्त रूपानें अविद्यमान व चिद्रूपानें विद्यमान असतात. त्यांच्या ठिकाणीं मान व मोह यांचा अभाव असतो. आसक्ति-रूप दोषाला त्यांनीं आपल्या अंतःकरणांतून घालविलेलें असतें. जलादि प्रवाहामुळें होणाऱ्या काष्ठादिकांच्या चेष्टेप्रमाणें ते प्रारब्धप्राप्त व्यव-हार करीत असतात. त्यामुळें कळसूत्री यंत्रांतील बाहुल्याप्रमाणेंच त्यांचा व्यवहार निर्हेतुक व शांत चाललेला असतो. त्यांच्याकडे पाहणाऱ्या इतर लोकांना ते व्यवहार करीत आहेत असें वाटलें तरी ते स्वतः कांहीं करीत नाहींत. १००

---

## सर्ग १०१ वा.

१ सर्वदा सर्व ठिकाणीं संविदेकात्मरूप पहाणाऱ्या विद्वानाला भयाचें निमित्तच नसल्यामुळें अभय-स्थिति सांगितली जाते.

श्रीवसिष्ठः—चिन्मात्रच पुरुष आहे आणि तें चिन्मात्रच अशा रितीनें अवस्थित आहे. म्हणजे तें चिन्मात्रच अनेक वाद्यांनीं कल्पिलेल्या स्थायिक, क्षणिक इत्यादि रूपानें व जन्म-मरण-भय-शोकादि रूपानें अवस्थित आहे. चिन्मात्रावांचून दुसरें कांहींच संभवत नाहीं. तें चिन्मात्र निर्मल आकाशच आहे. द्रष्टा व दृश्य हा त्या चिन्मात्राचाच अन्यथा परिणाम आहे. सर्व जगाचें स्वरूप काय तें तेवढेंच, तेव्हां त्या-विषयीं हेय व उपादेय बुद्धि कोठून होणार?

बृहस्पतीनें केलेल्या बुद्धशास्त्रानुसारी ज्या वाद्यांचें मत 'क्षणिक विज्ञानाहून जगत् निराळें नाहीं' असें आहे, त्यांत तरी संविदेवांचून दुसरें काय सार असणार? कारण त्यांच्या ठिकाणीं रागद्वेषांचा उद्भव होतो. रामा! जगत् हें चिदाकाशमय स्वप्न आहे, तेव्हां त्यांतील इष्टानिष्ट दृष्टि व रागद्वेषदोष हे दुसऱ्या कोणत्या स्वरूपाचे असूं शकतील, याचा विचार कर. हें त्याज्य आहे व हें ग्राह्य आहे, असें चिदाकाशच आपल्या स्वरूपांत जाणतें. निर्मल ब्रह्मांतच ती विरुद्ध बुद्धि उत्पन्न होते. तेव्हां त्या आकाशाहून विपरीत असलेली ग्राह्याग्राह्य बुद्धि सत्य कशी असणार? संविदच मनुष्य, देव व नाग आहे. संविदच स्थावर व जंगम आहे. भाव, अभाव इत्यादि हे सर्व या संविद्रूप सागराचे तरंग आहेत. मी संविदाकाशच आहें. तूं व हे जनहि संविदाकाशच आहेत. त्यामुळें आम्ही कोणीहि कधीं मरत नाहीं. कारण संविद् मेलेली कधीं कोणीं पाहिली आहे का? सर्वच जर संविद्रूप आहे, तर विषय निराळे कोठून असणार? ती संविद्च स्वतः विषयरूप झाल्यासारखी नुस्ती भासते. त्यामुळें विषयत्व तिच्याहून भिन्न आहे. क्रिया, कर्म, कारक इत्यादि भेदरूप द्वित्व व तद्विरुद्ध एकत्व रहाणार कोठें! कोणतेंहि भूत संविन्मात्राहून निराळें कोठून असणार? व त्या संविदेहून निराळी नित्य वस्तु तरी कोठची? तूंच सांग. ती संविद् जर मरत असेल तर हे आम्ही आज जिवंत कसे आहोंत? सौगतादिक किंवा लोकायतिकादिक जें जें कांहीं कल्पितात त्यांत या संविदाकाशाला सोडुन काय असतें, तें सांग पाहूं. हें सर्व संविदाकाशच आहे. त्यालाच कोणी 'ब्रह्म' असें म्हणतात, कोणी 'विज्ञान' म्हणतात, कोणी 'शून्य' म्हणतात. जशी मदशक्ति मद्यामध्यें व्यक्त होते, तसेंच चैतन्य देहाकारपरिणत झालेल्या भूतांत व्यक्त होतें, असें कोणी देहात्मवादी म्हणतात. सांख्य त्यालाच 'पुरुष' असें ह्मणतात. योगी त्यालाच 'चिदाकाश' ह्मणतात. शैव 'शिव' असें म्हणतात. तोच त्यांचा आत्मा ह्मणजे अणुप्रमाण जीव होय. याप्रमाणें वाद्यांनीं चिन्मात्राला भिन्नभिन्न नांवें जरी दिलीं, तरी त्यामुळें चितूची कांहीं हानि होत नाहीं. कारण ती स्वतः या सर्व विकल्पांची साक्षिभूत असून स्वरूपानें सर्व विकल्पशून्य असते. ती स्वरूपावांचून दुसऱ्या कशालाहि जाणत नाहीं. यास्तव माझ्या अंगांचें चूर्ण होवो किंवा तीं मेरूसारखीं जगाच्या अंतापर्यंत स्थिर राहोत, चिद्रूपशरीर असलेल्या माझी त्यापासून कांहीं हानि होत नाहीं व लाभहि होत नाहीं. आमचे पितामहादिक मरून गेले, पण त्यांची चित् मेली नाहीं. कारण ती जर मेली असती तर ज्यांची संविद्च मेली आहे अशा त्यांचा पुनर्जन्म आला नसता. संविदाकाश उत्पन्न होत नाहीं व मरत नाहीं. तें अक्षय आहे. आकाशाचा क्षय कां व कसा होणार, तें सांग पाहूं? याप्रमाणें क्षयाचाच असंभव झाल्यामुळें जगाचें होणारें जें हें स्फुरण तें अविनाशी चिदाकाशच आहे. तें उदयास्तरहित अशा आपल्या स्वरूपांतच नित्य स्थित आहे. चिदाकाशरूप आदि-अन्त मध्यरहित स्फटिकपर्वत आपल्या स्वरूपांत स्वतःच जगाचें भान धारण करतो, पण स्वतत्त्वसाक्षात्काररूप अग्नीनें त्या जगद्भानाचा दाह करून स्वच्छ आत्म्यामध्येंच तो रहातो. [ ह्म० जसा एखादा स्फटिकमणिमय पर्वत अगोदर धारण करीत असलेलें प्रतिबिंब-वन कदाचित् प्रतिबिंबाग्निभावास प्राप्त होऊन जणुंकाय स्वतःच जाळतो व स्वरूपांत स्थिर होतो, त्याप्रमाणें चिदाकाश स्वरूपांत प्रतिबिंबित झालेल्या जगाला स्वरू-

पांतील प्रतिबिंबभूत ज्ञानाग्नीनें जाळून आपल्या निरुपाधिक स्वरूपांत स्थिर होतें, असा याचा भावार्थ. आतां ज्ञान जसें जसें दृढ होत जातें, तसें तसें अज्ञान कार्यासह क्षय पावतें, याविषयीं दृष्टांत— ] रात्रीं अंधकारानें अभ्रचक्रासारखें जगाला घातलेलें आवरण प्रातःकालीं जसें हळूहळू कमी होत जाऊन शेवटीं निःशेष क्षीण होतें, त्याप्रमाणें अज्ञानांधकारानें आत्म्याला आच्छादित करून भासविलेलें हें जगत् आत्मज्ञानाचा उदय होऊं लागतांच हळुहळू क्षय पावूं लागून शेवटीं ज्ञानदार्ढ्यानें निःशेष क्षय पावतें. अज्ञानाचा क्षय होतांच त्याचें आवरण व विश्व हीं दोन्ही आपोआप क्षय पावतात. जसा जलाचा प्रवाह स्वतःच तरंग, फेंस, बुडबुडे, भोंवरे इत्यादि रूप धारण करून राहतो त्याप्रमाणें चिदाकाशाहि आपल्या स्वरूपांत जगद्रूप अंग धारण करून राहतें. चिन्मात्रच पुरुष आहे. तो आकाशाप्रमाणें केव्हांच नाश पावत नाहीं. तेव्हां माझा नाश होतो असें मानून शोक करणें व्यर्थ आहे. जीर्ण देहाचा त्याग करून दुसरा नवीन देह धारण करण्यास कारण होणारें जें मरण तें उपस्थित झालें असतां, आनंद मानणेंच उचित आहे. तथापि हे मूढांनो ! हर्षस्थानीं तुम्ही दुःखी कां होतां ! पुनर्जन्म जर मुळीं नसेलच, ह्मणजे मेलेला जीव पुनः दुसरा देह धारण करीत नाहींच, असा जरी भ्रम तुम्हांला झाला असला, तरी त्यासाठीं विषाद मानणें योग्य नाहीं. कारण असल्या मरणामुळेंच भाव, अभाव, ग्रहण, त्याग इत्यादिकांविषयींची सर्व चिंता नाहींशी होते. त्यामुळें तोच मोठा उत्कर्ष होय. तेव्हां अशा सर्व अनर्थनिवृत्तिरूप पुरुषार्थासाठीं आनंद मानावयाचा सोडून शोक कां करतां? याप्रमाणें जन्म व मरण हीं दोन्ही विद्यमान आहेत असें जरी मानलें तरी मुद्दां जेथें दुःखाची प्राप्ति नाहीं, तेथें त्यांचा जर सर्वथा अभावच आहे, तर सुखदुःखांला अवकाशच कोठला ? ह्मणून वस्तुतः मरण नाहीं, जीवित नाहीं, सुख नाहीं, दुःख नाहीं, तर चिदाकाशच या अशा रूपानें विकास पावत आहे. 'मेलेल्या जीवाला पुनः देह आहे कीं नाहीं ? असा संदेह असल्यामुळेंच मरणाची भीति वाटते,' ह्मणून म्हणशील तर सांगतों. मृताला जर दुसऱ्या देहाचा लाभ होत असेल तर तो नवीन देहाचाच होणार हें उघड आहे; त्यामुळें दुःख न मानतां हर्षच मानणें उचित आहे. बरें 'मरण ह्मणजे देहाचा सर्वथा नाश' ह्मणून ह्मणाल तर तें मरण ह्मणजे परम सुखच आहे. कारण मरण म्हणजे जर अत्यंत नाश असेल तर त्यामुळें संसाररूपी रोगाचा सर्वथा क्षयच होईल. बरें, मरणानंतर दुसरा देह मिळत असेल तर तोहि नवा देहच मिळत असल्यामुळें त्यासाठीं मोठा उत्सवच केला पाहिजे. बरें, 'वाईट कर्म करणारांना मरणानंतर नरकप्राप्ति होते' असें सांगितलें असल्यामुळें मरणाचें भय वाटतें, म्हणून म्हणाल तर कुकर्में करणारांना येथें जिवंतपणींहि राजदंडादिकांचें भय असतेंच; यास्तव अरे बाबा ! तूं दोन्ही लोक सिद्ध होण्यासाठीं कुकर्में करूं नको म्हणजे झालें. अरे 'मी मरेन, मरेन,' म्हणून बोकीत बसतोस, पण त्याबरोबर 'मी पुनः होईन, होईन,' याचा विचार करीत नाहींस ! अरे, जन्ममरण कोठचें आणि संसार व असंसार या अवस्था तरी कोठच्या ? हें सर्व संविद्रूप आकाशच आकाशांत विवर्त पावतें. संविदाकाशमात्ररूप असा तूं खा, पी व निर्मम होऊन रहा. आकाशकोशाप्रमाणें अति स्वच्छ असलेल्या तुझ्या इच्छादिकांचा उदय कसा होणार ? ज्ञानानें पूर्ण झालेले लोक निरिच्छ व्यवहार करीत असतात. त्यामुळें

त्यांच्या ठिकाणीं दुःखाचा संभवच नाहीं. प्रारब्धप्राप्त प्रवाहामुळें होणारा प्रयत्न व देशकाल इत्यादिकांमुळें प्राप्त झालेल्या अतिशय पवित्र विषयांचाच तो अनुभव घेतो. पण मनाला मलिन करून विक्षेप उत्पन्न करणाऱ्या विषयांचा उपभोग घेत नाहीं. देशक्षोभ, दुर्भिक्ष इत्यादि कारणांनीं वेळोवेळीं प्राप्त होणाऱ्या दुःखांचा अनादर करून कोठें तरी एकांतस्थानीं समाधिसुखाचा अनुभव घेत तो आनंदानें रहातो. मध्यें मध्यें प्राप्त होणाऱ्या विक्षेपांकडे तो लक्षहि देत नाहीं. मरणामुळें तो दुःखी होत नाहीं व जीवितामुळें सुखी होत नाहीं. इष्ट वस्तूची इच्छा करीत नाहीं व अनिष्ट वस्तूचा द्वेष करीत नाहीं, तर सर्वदा सर्व वासनाशून्य होऊन रहातो. मरण, जीवित, जन्म, जरा इत्यादिकांना कल्पटाप्रमाणें मानून ज्ञानी निरिच्छ व वासनाशून्य होऊन रहातो. एखादा मूढ जसा निर्भय असतो त्याप्रमाणेंच हा मनांत निर्भय व पर्वताप्रमाणें अचल असतो. १०१.

---

## सर्ग १०२ वा.

१ ज्ञानी पुरुषाचीं लक्षणें त्यांच्या अभ्यासानें बोध दृढ व्हावा म्हणून पुनः सांगतात.

**श्रीराम**:—हे भगवन्! आदि-अंतशून्य अशा परमात्मवस्तूचें ज्ञान झालें असतां तो श्रेष्ठ पुरुष कोणत्या लक्षणांनीं युक्त होतो?

**श्रीवसिष्ठ**:—रामा! ज्याला आत्म्याचा साक्षात्कार झाला आहे, असा श्रेष्ठ पुरुष कोणत्या लक्षणांनीं युक्त असतो, तो यावज्जीव कोणत्या स्वभावानें व आचारानें कसा असतो तें ऐक. (अगोदर ज्ञान्याचीं स्वभावभूत अंतरंग—लक्षणें सांगतात--) वनामध्यें रहाणाऱ्याहि त्याला मित्र पाषाणासारखे होतात. बंधु वनांतील वृक्षासारखे होतात, व हरिणशिशु स्वजन होतात; म्हणजे मित्रादि व पाषाणादि यांचा संयोग व वियोग झाला असतां त्याची मनःस्थिति सारखी असते. जीवांनीं व्यापलेलें स्थान त्याला शून्य भासतें. धन, बंधु इत्यादिकांचा नाश हीच मोठी संपत्ति भासते. महाराज्यावर स्थित असलेल्याहि त्याला वध, बंध, परवशता इत्यादि संकटें मोठे उत्सव वाटतात. तो समाधि लावून बसला तरी समाधानवान असतो. त्याला दुःख हेंच महत्सुख भासतें. वाचिक व्यवहारहि उत्तम मौन आहे, असें तो मानतो. शरीराचीं कर्में हेंच त्याचें नैष्कर्म्य आहे. तो जागत असला तरी सुषुप्तींत स्थित असतो. जिवंत असूनहि मृतोपम असतो. तो बाह्य दृष्टच्या सर्व आचार करितो, पण स्वदृष्टच्या कांहीं करीत नाहीं. तो आत्मसुखाविषयीं रसिक असूनहि विषयाविषयीं अत्यंत विरस असतो. तो निर्ममत्वामुळें अतिशय निष्ठुर भासतो. तथापि आत्मताबुद्धीनें बंधुवत्सल असतो. तो द्वैतभावरहित असल्यामुळें अतिशय निर्दय पण मनांत आत्मौपम्यानें मोठा दयाळु; स्वतः पूर्ण असल्यामुळें अतिशय विरक्त, पण लौकिकदृष्टच्या अज्ञजनांचा उद्धार करण्याची इच्छा असलेला, असा असतो. (आतां त्याचा आचार कसा असतो, म्हणून जें वर विचारलें आहे त्याचें उत्तर देण्यासाठीं त्याचीं बाह्य लक्षणें सांगतात—) त्याच्या आचाराचें सर्वांकडून अभिनंदन केलें जातें. पण तो स्वतः सर्व आचारशून्य असतो, म्हणजे लोकांनीं उन्मार्गी होऊं नये म्हणून तो स्वतः शास्त्रीय विधिनिषेध जरी पाळीत असला तरी स्वतः कर्तृत्वाभिमानशून्य असल्यामुळें कांहीं करीत नाहीं. सर्व आचारशून्य असतो. तो स्वतः शोक, भय व आयास यांनीं रहित

असतो. तथापि अज्ञजनांचे क्लेश पाहून दुःखी होतो. 'अरेरें! हे बिचारे आपल्या अज्ञानदोषामुळें वृथा दुःख भोगीत आहेत.' असें ह्मणून जणुंकाय शोकयुक्तसा होतो. लोकांना त्याची भीति वाटत नाहीं, व तो दुसऱ्या कोणालाहि कधींच व कोणत्याच कारणानें भीत नाहीं. आत्मरसाचा त्याला मोठा अभिलाष असतो, पण संसाराविषयीं तो अतिशय उद्विग्न झालेला असतो. प्राप्त झालेल्या इष्ट वस्तूचें अभिनंदन करीत नाहीं व प्राप्त न झालेल्या विषयाची आकांक्षा करीत नाहीं. हर्ष व विषाद यांना कारण होणाऱ्या पदार्थांचा अनुभव घेत असूनहि तो हर्ष व विषाद या विकारांत निमग्न होऊन रहात नाहीं. तो जेव्हां दुःखी लोकांत असतो तेव्हां स्वतः दुःखी झाल्याप्रमाणें बोलतो व जेव्हां सुखी लोकांत असतो तेव्हां सुखी झाल्याप्रमाणें गोष्टी सांगतो. सर्व अवस्थांमध्यें सम असतो. त्याचें चित्त सुखदुःखांच्या द्वारा त्याला पराभूत करूं शकत नाहीं, ह्मणजे सुख व दुःख यांना निर्विकार चित्तानें तो सहन करितो. पुण्यकर्माहून त्याला दुसरें कांहीं आवडत नाहीं. कारण, अरे बाबा! अशास्त्रीय आचरण न करणें हा महात्म्यांचा स्वभावच आहे. तो कशामध्यें आसक्ति ठेवीत नाहीं, व कोणाशीं द्वेषहि करीत नाहीं. **धनाच्या इच्छेनें याचक बनून तो विरक्त पुरुष कृपणांच्या दारोदार धनलोलुपांप्रमाणें फिरत नाहीं.** प्रसंगप्राप्त सुख व दुःख यांचा त्याला स्पर्श जरी होत नसला तरी यथाशास्त्र व्यवहार करणारा तो जणुं काय सुखी व दुःखीच होतो; पण त्यांना तो कधींच जुमानीत नाहीं. ज्ञानी लोक अतिशय हृष्ट झाल्यासारखे दिसतात व दुःखी झाल्यासारखेहि दिसतात, पण निरतिशय आनंदप्रतिष्ठेमुळें प्राप्त होणारें आपलें स्वाभाविक धैर्य ते कधींच सोडीत नाहींत. ते संसाररूपी रंगभूमीवरील नटच होत. त्यामुळें बाहेरून सुखित्वाची व दुःखित्वाची नुसती बतावणी ते करीत असतात. आपल्या नानाप्रकारच्या धनांमध्यें व पुत्रादि मिथ्या आत्म्यांमध्यें तत्त्वदर्शी लोक पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणेंच स्नेह ठेवीत नाहींत. तत्त्वज्ञ अंतःकरणांत स्नेहशून्य असूनहि बाहेरून आपलें हृदय अत्यंत स्नेहार्द्र आहे असें दाखवितात. ज्ञानी सर्वांशीं प्रेमळ वृत्ति दाखवितो, तथापि मनांत आपली विरक्तवृत्ति कायम ठेवतो. प्रारब्धाच्या प्रवाहांत पडलेले ते तत्वज्ञ वायूप्रमाणेंच विषयांना वृथा स्पर्श करितात, ह्मणजे त्यांत आसक्त न होतांच त्यांचा उपभोग घेतात. पण अज्ञ जन तसा अनासक्त मनानें विषयोपभोग घेऊं शकत नाहींत. त्यांना ही युक्ति अवगतच नसते. त्यामुळें आपला देह कामादिकांनीं संतप्त झाला आहे असें पाहून ते विषयांच्या उदरांतच लीन होतात. विषयासक्त झाल्यानें आमच्या कामादि संतापाची शांति होईल असें त्यांना वाटतें, पण ती त्यांची आशा कधींच पूर्ण होत नाहीं. तत्त्वज्ञ बाहेरून सर्व आचार जरी करीत असले, इतर शिष्टांप्रमाणेंच जरी त्यांचा सदाचार असला, तरी अंतःकरणांत ते अतिशय शीतल असतात. त्यांना कोणत्याहि फळाची इच्छा नसते. त्यामुळें सतत निष्काम असूनहि ते सकाम असल्याप्रमाणें रहातात.

**श्रीराम**:—हे मुनिश्रेष्ठ! आपण सांगितलेल्या या लक्षणांवरून तत्त्वज्ञाचा परिचय होणें फार दुर्घट आहे. कारण मूर्ख, दांभिक व वंचक तापसांमध्येंहि हठानें संपादन केलेलीं हीं लक्षणें दिसतात. त्यामुळें अशा लक्षणांनीं युक्त असलेला मनुष्य खरोखरच तत्त्वज्ञ आहे, कीं तो दांभिक आहे, किंवा त्याचीं पूर्वोक्तलक्षणें हें ढोंग आहे हें कसें ओळखावें? कारण एखादा अज्ञ

दांभिकहि बाहेरून अशा लक्षणांनीं युक्त असणें शक्य आहे. हे मुने ! ढोंगी पुरुष मान, द्रव्य, कीर्ति इत्यादिकांच्या लोभानें विद्वानासारखे दिसतात. तत्त्वज्ञाच्या या पूर्वोक्त लक्षणांचें ते अनुवर्तन करितात. तेव्हां खऱ्या तत्त्वज्ञाची ओळख कशी पटेल तें मला सांगा.

**श्रीवसिष्ठ:**—रामा ! खरें असो कीं खोटें असो, पण अशा प्रकारचें स्वरूप केव्हांहि चांगलेंच आहे. कारण साधुत्वाचें ढोंगहि परिणामीं खरें ठरत असतें. कारण वेदार्थतत्त्वज्ञांचीं हीं सर्व लक्षणें स्वरूपानुभवबलानेंच प्रतिष्ठित होतात. तीं नुसत्या ढोंगानेंच संपादन करतां येत नाहींत. याम्तव एखादा ढोंगी पुरुषहि जर या लक्षणांनीं युक्त असेल तरी त्याचीहि उपेक्षा करूं नये. कारण तशा ढोंग्याचें अनुवर्तन करीत असतांनाच दैववशात् स्वभावसिद्ध लक्षणांनीं युक्त असा एखादा श्रेष्ठ तत्त्ववेत्ता भेटण्याचा संभव असतो. विरक्त लोक कर्मफलाची इच्छा न ठेवतांच एखाद्या सकाम पुरुषाप्रमाणेंच चेष्टा करीत असतात. करुणेनें आकुल झालेले तत्त्वज्ञ वस्तुत: हास्यरहित असूनहि अकस्मात् अज्ञांना पाहून हंसतात. ते सर्व दृश्याला चित्तरूप आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें मिथ्या पहातात. स्वप्नांत हातांत घेतलेलेंहि सोनें जसें भ्रामक तसें दिसणारेंहि हें सर्व खोटें असें समजतात. सामान्य प्राणी चंदनाच्या लाकडांचा वास जसा दुरून ओळखीत नाहींत, त्याप्रमाणें या तत्त्वज्ञांची ती प्रसिद्ध अंत:शीतलता कोणाला कळत नाहीं. सर्पाचे पाय जसे सर्पच ओळखतो, त्याप्रमाणें ज्यांना तत्त्वस्वरूपाचा साक्षात्कार झाला आहे असे शुद्धचित्त पुरुषच तत्त्वज्ञांना ओळखूं शकतात. अज्ञजन मात्र त्यांना ओळखूं शकत नाहींत. श्रेष्ठ तत्त्वज्ञ आपला उत्तम स्वभाव गुप्त ठेवण्याचा यत्न करतात. दांभिकांप्रमाणें ते त्याला प्रकट करीत नाहींत. कारण गांवांतील किंवा नगरांतील धनांनीं ज्यांचें मूल्यच होऊं शकत नाहीं, असा चिंतामणी बाजारांत विकायला मांडला जात नाहीं. अर्थात् जर एखाद्या मूर्खानें चिंतामणीलाहि बाजारांत मांडलें तर ग्राहक हा खरा चिंतामणी नव्हे, चिंतामणीसारखा दिसणारा नुसता दगड आहे, असें समजतील; त्याच न्यायानें जो पूर्वोक्त चिन्हें प्रकट करूं लागतो तो तत्त्वज्ञ नसून दांभिक आहे असें निःसंशय जाणावें. कारण जे तत्त्वज्ञ असतात ते आपले गुण गुप्त ठेवण्याचाच यत्न करीत असतात. इतरांना ते दिसावे अशी त्यांची मानापासून इच्छा नसते. कारण आपली ख्याति व्हावी, आपला मान वाढावा, असें ते इच्छित नाहींत. त्यांच्या ठिकाणीं वासना नसते, द्वैत नसतें, व मान नसतो; उलट निश्चयानें होणारा अपमान, अकिंचनत्व व लोकांची अवज्ञा यांमुळें जसें त्यांना सुख होतें, तसें मोठ्या समृद्धीपासूनहि होत नाहीं. कारण आपली ख्याति झाल्यास, लोक आपली पूजा करूं लागल्यास व धनादिकांची समृद्धि झाल्यास आपल्या सभोंवार मोठा जनसमूह जमेल, आपला अभिमान वाढेल व त्यामुळें आत्मसुखानुभवामध्यें विघ्न येईल, असें ह्मणून ते त्यापासून दूर रहातात. अहो, आत्मज्ञान नेहमीं स्वसंवेद्य आहे. त्यापासून प्राप्त होणाऱ्या निरतिशय आनंदाचा अनुभव आंतल्याआंत येत असतो. त्यामुळें तो दुसऱ्या कोणाला दाखवितां येत नाहीं. फार काय, पण तत्त्ववेत्त्यालाहि ज्ञान प्रत्यक्ष दिसत नाहीं. तो सुद्धां स्वप्रकाशत्वानेंच त्याचा अनुभव घेतो. लोकांना माझा हा गुण कळो व ते माझी पूजा करोत, अशी इच्छा अहंकारवानालाच होते. ज्यांचें चित्त सर्व बंधापासून मुक्त झालें आहे, त्यांना अशी

इच्छा केव्हांहि होत नाहीं. राघवा ! आकाशांतून गमन करणें इत्यादि सिद्धिहि मंत्र, जप इत्यादि क्रियांचीं फलें आहेत. तीं प्रयत्नशील अज्ञांनाहि प्राप्त होतात. ज्ञानी असो कीं अज्ञानी असो, जो जशा प्रकारचा क्लेश सहन करण्यास समर्थ असतो, त्याला तशा प्रकारचें फल अवश्य प्राप्त होतें. चंदनामध्यें जसा सुवास असतो त्याप्रमाणें सर्व प्राण्यांच्या हृदयांत विहित-निषिद्ध कर्माचें फल अव्यक्तरूपानें असतें, आणि तें योग्यकाळीं अभिव्यक्त होऊन भोक्त्याला प्राप्त होतें. सिद्धिरूप दृश्य वस्तूविषयीं मीं भोक्ता व्हावें असें अहंतावासनारूप द्वैत ज्याच्या ठिकाणीं असतें, ह्मणजे जे परिच्छिन्न आत्म्याची कल्पना करतात ते आकाशगमनादि क्रियाफल संपादन करतात. पण ज्ञानी या सिद्धि वगैरे सर्व तुच्छ आहेत, ही भ्रांति आहे, हें नुसतें आकाश आहे, असें जाणतो. तो सर्ववासनाशून्य असतो. तेव्हां तो कर्मरूपी वावटळींत सांपडून कर्मफल संपादन कसें करणार ? वायूबरोबर उडणारीं पानें व सिद्धीसाठीं केलेल्या मंत्रौषधादि क्रिया यांत तत्त्वज्ञ कांहींच अंतर पहात नाहीं. कारण त्यानें त्या क्रिया केल्या तरी त्यांचा कांहीं उपयोग नसतो, न केल्या तरी त्यापासून कांहीं तोटा नसतो. आब्रह्मस्तंबपर्यंत जेवढे पदार्थ आहेत त्यांतील कोणा एखाद्यासाठींहि त्याला कांहीं कर्तव्य नसतें. ज्याला आत्म्याचा अनुभव आला आहे व त्यामुळें ज्याची मनोवृत्ति उदार झाली आहे,अशा श्रेष्ठ पुरुषाला ज्याविषयीं लोभ उत्पन्न होईल असा एकहि पदार्थ या भूलोकीं किंवा स्वर्गांत नाहीं. ज्याला हें जगत् तृणासारखें किंवा रज:कणासारखें तुच्छ वाटतें, त्याला ग्रहण करण्यास योग्य असें दुसरें काय वाटणार ? ज्यानें ही जगद्यात्रा केवळ लोकशिक्षणार्थ कशी तरी चालविली आहे, असा संतुष्टचित्त मुनि प्राप्त स्थितींत आनंदानें रहातो, शिष्टाचारानें अनुवर्तन करतो. तो अंत:करणांत नित्य शीतल असतो, मौन धारण करून रहातो. त्याची मनोभूमि सात्त्विक झालेली असते. त्याचा आकार एखाद्या महासागरासारखा अक्षुब्ध असतो. त्याचें अंत:करण अज्ञांना अतिशय गंभीर पण तज्ज्ञांना अगदीं प्रकट असलेलें दिसतें, ह्मणजे अविवेक्यांना त्याच्या अंत:करणाचा ठाव लागत नाहीं. तज्ज्ञ मात्र त्याला लगेच ओळखतात. रसायनानें परिपूर्ण असलेल्या डोहाप्रमाणें किंवा सर्व कलांनीं पूर्ण असलेल्या शुद्ध चंद्राप्रमाणें तो स्वत:हि आल्हादाचा अनुभव घेतो व दुसऱ्यांनाहि आल्हाद देतो. पंडितांच्या बुद्धि जशा संतोष देतात, त्याप्रमाणें मंदारमंजरींतील परागांचा जेथें सडा झाला आहे अशा नंदनवनांतील भूमिहि संतोष देत नाहींत. विवेकी सारग्राही असतो. ग्रीष्म ऋतूंतील प्रकाशाचा उपभोग घेणाऱ्या भोगी लोकांतील सार चंद्रबिंबाच्याद्वारा ग्रहण करतो. सुगंधाचा उपभोग घेणारांतलि सार वसंताच्या द्वारा घेतो व सौभाग्याचा अनुभव घेणाऱ्या लोकांतील सार तत्त्ववेत्त्यांच्या रागद्वेषरहित अंत:करणाच्या द्वारा घेतो. ( महात्म्यांच्या अंत:करणद्वारा विवेकी कोणतें सार ग्रहण करतो, म्हणून विचारशील तर सांगतों— ) हें विश्व भ्रांतिमात्र आहे, हें इंद्रजाल आहे, हें मिथ्या आहे, असा निश्चय करून दिवसेंदिवस सर्व एषणांचा त्याग करणें हेंच तत्त्व तो समजतो. ज्ञानी आपल्या देहांतील शीतोष्णादि दु:खांना दुसऱ्याच्या देहांतील सुखदु:खांप्रमाणेंच तुच्छतेनें पहातो, हें दुसरें सार आहे. तो सर्व भूतांवर दया करणें या श्रेष्ठ वृत्तीचा आश्रय करून आपल्या सवस्वाचा नाश करूनहि आर्तांचें रक्षण करतो. वेळी-

प्रमाणें धीरवृत्तीनें तो केवळ दुसऱ्यासाठीं संग्रह करतो. म्हणजे लता आपल्या अंगावर पानें, फुलें, फळें यांचा भार केवळ दुसऱ्यासाठीं जसा धारण करते व छाया, आहार, सुवास यांच्या योगानें परोपकार करते, त्याप्रमाणें हा **तत्त्वज्ञ केवल अज्ञ जनांचा उद्धार करण्यासाठीं जीवित धारण करितो.** दृष्टान्तांतील वेल ज्याप्रमाणें नुसत्या जलावर आपला निर्वाह करते, तसाच हा सर्वदा संतुष्ट वृत्ति धारण करून प्रसंगीं प्राप्त झालेल्या नुसत्या जलावरहि आपला निर्वाह करतो. लौकिकांत इतरांप्रमाणें प्राप्तव्यवहार करीत असूनहि चराचर भूतांमध्यें श्रेष्ठ होऊन रहातो; किंवा सर्व चराचरांचें जें ऊर्ध्वमूल ब्रह्म त्यांत स्थित होतो. ज्ञानरूपी मोठ्या प्रासादावर आरूढ झालेला हा स्वत: अशोच्य होऊन इतरांच्या अज्ञानाला उद्देशून शोक करितो. पर्वतावर चढलेला मनुष्य भूमीवरील लोकांना जसा पाहतो, तसा हा ज्ञानी सर्व अज्ञांना पाहतो. क्षुधा, तृषा, राग, द्वेष, जन्म, मरण या कल्लोलांनीं दीर्घ काल विक्षिप्त झालेला हा संसारसागरांत भ्रमण करीत राहतो, पण शेवटीं ज्ञान होतांच त्या सागराच्या परतीरास पोंचून सर्व विक्षेपदु:खांपासून मुक्त होतो व पूर्ण विश्रांतीचा अनुभव घेतो. त्यानंतर मागील जगद्गतींना शांतवृत्तीनें हंसत तो सुखानें राहतो. सर्व जनता अत्यंत भ्रान्त झाली आहे असें पाहून तो मनांतल्या मनांत आश्चर्यचकित होतो. अरण्यांत मार्गापासून भ्रंश पावलेला अंध जसा अनर्थांत पडतो, त्याप्रमाणें आजवर अनर्थांत पाडणाऱ्या या सर्व संसारदृष्टि खोट्या असूनहि त्यांनीं मला व्यर्थ मोहित केलें, असें समजून तो मनांतल्या मनांत विस्मित होतो. 'मोठी आनंदाची गोष्ट आहे कीं, हें आठ प्रकारचें ऐश्वर्य मला तृणासारखें अनिष्ट वाटतें!' असें म्हणून ज्ञानी शांतचित्त होतो. तो मनांतल्या मनांत हंसत असतो; पण प्राप्त झालेल्या श्रेष्ठ स्थितीचा गर्व वहात नाहीं. अशा ज्ञानी पुरुषाच्या स्थानादिकांविषयीं कांहीं निश्चय करितां येत नाहीं. कोणी ज्ञानी पर्वताच्या गुहेला आपलें घर—निवासस्थान बनवितो. कोणी पुण्याश्रमाचा आश्रय करितो. कोणी गृहस्थाश्रमाचाच स्वीकार करितो. कोणी नित्य पर्यटनच करितो. कोणी भिक्षाचरण करणारांचें आचरण करितो म्ह. भिक्षा मागून निर्वाह करितो. कोणी एकान्तप्रदेशीं तपश्चर्या करीत राहतो. कोणी मौनव्रत धारण करितो, कोणी ध्यानपरायण होतो. कोणी प्रख्यात विद्वान् असतो. कोणी श्रुति आणि स्मृति यांचें श्रवण करणारा असतो. कोणी राजा असतो, कोणी ब्राह्मण असतो. कोणी तत्त्वज्ञ तर अज्ञासारखाच राहतो. कोणीं गुटिका, सिद्धांजन, खड्ग इत्यादि सिद्धींना संपादन केलेलें असतें. कोणी आकाशगमनादि सिद्धींनीं संपन्न असतात. कोणी शिल्प व गायनादि कला यांवर उपजीविका करितात. कोणी पामरांचाच वेष धारण करितात. कोणीं आपला सदाचार सोडलेला असतो. कोणी श्रेष्ठ श्रोत्रिय असतो, कोणी उन्मत्ताप्रमाणें आचरण करतो व कोणी संन्यासाश्रमाचा आश्रय करून रहातो. ( आतां पुरुष कोण तें सांगून त्याचें उत्तमत्वहि प्रदर्शित करतात—) शरीरादि हा पुरुष नव्हे. चित्तादिकहि पुरुष नव्हे, तर चेतनच पुरुष आहे व तो केव्हांहि नाश पावत नाहीं. तो अच्छेद्य आहे, अदाह्य आहे, अक्लेद्य आहे व अशोष्यच आहे; नित्य, सर्वगत, स्थिर, अचल व सनातन आहे, असें ज्यानें स्वानुभवानें जाणलें तो पुरुषोत्तम जेथें जसा असेल तेथें तसाच असूं दे. त्याचा वर्ण, आश्रम, मर्यादा, स्थिति यांतील कोणत्याहि उपायानें त्याला

कांहींच साध्य करावयाचें नसतें पातालांत शिरो, कीं आकाशाचें उल्लंघन करून जावो, कीं दिङ्मंडलांत भ्रमण करो, आणि त्या भ्रमणाच्या योगानें लोकलोकादि पर्वतांच्या शिलांवर घर्षण पावून त्याच्या अंगांचें चूर्ण होवो; त्याचें चिन्मात्रत्व केव्हांहि क्षय पावत नाहीं. कारण तें अजर व अमर आहे. आकाशकोशाप्रमाणें तें शांत, अज व कल्याणरूप आहे. १०२.

— —

## सर्ग १०३ वा.

—:०:—

१ चैतन्याच्या नित्यत्वाची, एकत्वाची व स्वातंत्र्याचीहि सिद्धि. २ या सच्छास्त्राचें माहात्म्य व ३ हितोपदेश.

श्रीवसिष्ठः रामा! जाग्रत् व स्वप्न या दोन अवस्थांमध्यें अंतःकरणाच्या साक्षित्वानें व सुषुप्तींत अज्ञान, गाढ निद्रा इत्यादिकांच्या साक्षित्वानें प्रत्यगात्मप्रकाशरूप व विषयप्रकाशरूप भासणारें जें प्रसिद्ध शांत व आद्यंत-शून्य चिन्मात्र त्याचा नाश कोणत्या निमित्तानें व केव्हां होणार? अशा प्रकारचें चिन्मात्र हाच पुरुष आहे. तो केव्हांहि नाश पावत नाहीं. आणि जर त्याचा नाश झाला तर पुढें सृष्टिच नाहींशी होणार. कारण चिन्मात्राच्या अभावीं सृष्टीचा कोणी साक्षीच रहात नाहीं आणि साक्षीच्या अभावीं सृष्टीची सिद्धि होऊं शकत नाहीं. "अहो, पण एक चिन्मात्र जरी नाश पावलें तरी त्याच्याजागीं दुसरें उत्पन्न होईल" असें जर ह्मणशील तर चिन्मात्र हें केव्हांहि कोठेंच भिन्न भिन्न असूं शकत नाहीं. कारण अनुभव हेंच त्या चिन्मात्राचें स्वरूप आहे, व सर्व शरीरांत आणि सर्व प्रदेशीं अनुभवाचें सादृश्य आहे. मग चिन्मात्राला अन्यत्व कोठचें? सर्वांनाच बर्फ थंड वाटतें, अग्नि उष्ण भासतो, जल मधुर लागतें; मग याप्रमाणें सर्वत्र एकसारख्याच असणाऱ्या व सर्वेत्र सारखाच अनुभव घेणाऱ्या शुद्ध चिन्मात्राला अन्यत्व कोठचें? शरीरनाश होतांच त्या चिन्मात्राचा जर नाश होत असेल तर बरेंच झालें. कारण मेलें कीं संसार संपला. मग त्याबद्दल हर्ष मानावयाचा सोडून विषाद कां करतां, तें सांगा बरें. पण वस्तुतः शरीराचा जरी नाश झाला तरी चिदाकाश नाश पावत नाहीं. कारण देहाचा नाश झाल्यावरहि पुनर्जन्म न मानणारे म्लेच्छ आपले बंधु पिशाच झालेले पाहतात, त्यांची त्यांना पीडा होते. पिशाच बहुतकरून आपल्या बांधवांनाच त्रास देतात, हें प्रसिद्ध आहे. शिवाय शरीरांचा नाश झाला ह्मणजे चेतनाचा नाश होतो हें म्हणणें असंगतच आहे. कारण शरीर असेपर्यंत चेतन जर असतें तर शरीर अखंड असेपर्यंत शवहि चाललें असतें; पण तसें दिसत नाहीं. उलट मृत शरीर जसेंच्या तसेंच पडलेलें असतांना त्यात चितूचा प्रत्यक्ष अभाव दिसतो. यावर कदाचित् चार्वाक ह्मणेल कीं, पिशाचाचा अनुभव हा जीवाचाच धर्म आहे, तर मग तो नेहमींच पिशाचाला कां पहात नाहीं? बंधु मेल्यावरच त्याला पिशाच झालेलें कां पहातो? अर्थात पिशाच हा जिवंत मनुष्याचा धर्म नव्हे. बरें, यावर कोणी असें म्हणेल कीं, ज्याला बंधूच्या मरणाचें ज्ञान आहे त्या जीवाचा पिशाचदर्शन हा धर्म आहे. तर तसाहि नियम करतां येत नाहीं; कारण बंधूच्या मरणाची खोटी वार्ता ऐकल्यास म्हणजे खरोखर तो जिवंत असल्यास पिशाच झालेला दिसत नाहीं. तस्मात् हें चिन्मात्र सर्वात्मक आहे, परिच्छेदशून्य आहे; देश,

काल, वस्तु यांतील कोणीहि त्याला मर्यादित करूं शकत नाहीं. तें चिन्मात्र जी जी वस्तु ज्या देशीं अथवा कालीं जाणतें, ती ती स्वतःलाच त्या त्या आकारानें जाणते. त्यामुळें त्याचें वेद्य पृथक् नाहीं. सृष्टीच्या आरंभीं सत्यकामत्वामुळें अबाधित असलेली संविद् स्वसंकल्परूपानें जशी होते, तसाच तिचा सृष्टिकालीं सर्व लोकांना अनुभव येतो. तिचा स्वभाव हेंच याचें कारण आहे. अहो, सत्यसंकल्प ब्रह्मसंविदूहून भिन्न कोणतेंच कारण संभवत नाहीं. सृष्टीच्या आरंभीं प्रधान, परमाणु इत्यादि सर्वच कारणांचा अभाव असतो. ब्रह्माहून निराळें कांहीं कारण आहे असें ज्याचें म्हणणें असेल त्या वाद्यानें तें कोणतें व कोणत्या प्रकारचें आहे तें आतांच माझ्यापुढें येऊन सांगावें. म्हणजे मी श्रुति व युक्ति यांच्या आधारें त्याचें आतांच निरसन करीन. ( तर मग तुमचा सिद्धान्त काय आहे? उत्तर–) सृष्टीच्या आरंभींच ही विकल्पश्री जगद्रूपानें उत्पन्न झालेली नाहीं व ती आतां भासते असेंहि नाहीं. तर हें सर्व चिदाकाशच भासत आहे. ( अहो, पण सर्व चिदाकाशच जर भासत आहे, तर लोक त्याला दृश्य कां समजतात? उत्तर–) दृश्य म्हणून जें लोक समजतात तो चिदाकाशाचा केवल आभास आहे. तो मिथ्या परिणाम आहे. कारण दृश्य या रूपानें ग्रहण केल्या जाणाऱ्या शुक्तिरजत, मृगजल इत्यादिकांला त्या चिदाकाशावांचून सत्यता कोठें आहे? अर्थात् चिदाकाशाचें जें स्वचमत्कारचातुर्य तेंच दृश्य आहे. त्यामुळें तें स्वेच्छेनें जाग्रत्स्वप्नबोधानें जाणलें जातें व सुषुप्तींत अबोधामुळें जाणलें जात नाहीं. ( तर मग हे बोधाबोध काय आहेत? उत्तर–) बोध व अबोध हें त्या चिदाकाशाचेंच स्वरूप आहे. जडाचें तें स्वरूप नव्हे. त्यामुळें त्या रूपानें तें एकच व निरामय आहे. बोधावांचून अबोधाचें स्वरूप सिद्ध होत नाहीं. पण बोध झाल्यावर अर्थ दुर्लभ होतो. यास्तव भेद वाङ्मात्र—शब्दमात्र आहे. त्याच्या अर्थांत भेद नाहीं. त्यामुळें दृश्यता नाहींच. अथवा स्वतत्त्वाचा विचार न केल्यामुळेंच जी चित्‌ची दृश्यता भासत होती ती आतां विचारानें सर्वथा नष्ट झाली आहे. तेव्हां ती आतां कोठून उपलब्ध होणार? म्हणून या आत्मज्ञानविचाराविषयींच बुद्धिमानानें यत्न करावा. मोठ्या यत्नानें केलेला जो श्रेष्ठ अभ्यास तोच या लोकीं किंवा परलोकीं ज्ञानरूप सिद्धि देणारा आहे. 'अहो, पण विचाराचा अभ्यास कशाला करावयास पाहिजे? नित्य अपरोक्ष असलेल्या वस्तूचा उपदेश ऐकतांच अविद्येचा उपशम होईल.' म्हणून म्हणशील तर हे साधो! अविद्येचा उपशम एक क्षणभर जरी झाला तरी तो अभ्यासावांचून सिद्धीला प्राप्त होणार नाहीं. तो दृढ होण्यासाठीं अभ्यासच केला पाहिजे. तर मग कोणत्या ग्रंथाच्या आधारानें विचाराभ्यास करावा? कोणत्या ग्रंथानें शीघ्र प्रबोध होईल? म्हणून विचारशील तर सांगतों—शमादि संपत्तीनें युक्त असलेल्या पुरुषानें आलस्य—अरति इत्यादि उद्वेगांचा त्याग करून, त्याला कारण होणारें यथेष्ट भोजन, दुःसंग इत्यादिकांचाहि त्याग करून गुरुशुश्रूषादि नियम धरून या महारामायण नांवाच्या शास्त्राचा प्रतिदिवशीं विचार करावा. हें शास्त्र दोन्ही लोकीं हितावह व पथ्यकर आहे. हें आत्मज्ञान जरी आपण समजून घेतलें तरी पुनः त्याचें विस्मरण होतें. कारण तुमच्या ठिकाणीं असंभावनादि नानाप्रकारचे दोष संभवतात. यास्तव अनेक सतीर्थ्यांनीं एकत्र जमून एकमेकांचा अनुभव एकमेकांना सांगून विचाराचा अभ्यास करावा; म्हणजे ज्ञान दृढ

होतें. असा अभ्यास केल्यावांचून तें दृढ होत नाहीं. आत्मज्ञान दुर्लभ आहे ह्मणून उद्वेगानें त्याचा त्याग करूं नये. कारण जो ज्या अर्थाची इच्छा करतो व ज्यासाठीं यत्न करतो आणि मरेपर्यंत ज्यापासून निवृत्त होत नाहीं, त्याला त्याची अवश्य प्राप्ति होते. यास्तव अनात्मशास्त्राच्या विचारापासून निवृत्त व्हा आणि या सच्छास्त्राच्या अभ्यासानें शांतीला प्राप्त व्हा. रणांत भूजयलक्ष्मी किंवा स्वर्गजयलक्ष्मी जशी अवश्य प्राप्त होते तशी सच्छास्त्राच्या अभ्यासानें मुक्ति अवश्य प्राप्त होते. ही मनोनदी विवेकाकडे वहात असते. यास्तव मोठ्या यत्नानें विरोधी प्रवाहाला प्रतिबंध करून जिकडे तिला वहावयास लावावें, तिकडे ती स्थिर होते. या शास्त्राचा विचार केल्यावांचून आजवर कोणालाहि विवेकाचें उत्तम साधन सांपडलें नाहीं व पुढेंहि सांपडणार नाहीं ह्मणून परम बोधासाठीं या शास्त्राचाच विचार करावा. स्वतःच याचा विचार केल्यानें आत्मबोध आपोआप अनुभवास येतो. तो संसारमार्गांतील सर्व श्रम घालविणारा आहे. वर किंवा शाप यांचें फल मिळण्यास जसा उशीर लागतो, त्याप्रमाणें तत्त्वज्ञानाच्या फलाला उशीर लागत नाहीं. जें पित्यानें केलेलें नाहीं, जें मातेनें केलेलें नाहीं किंवा जें पुण्यकर्मांनींहि केलेलें नाहीं, तें तुमचें कल्याण विचारानें हें शास्त्र समजून घेतल्यानें होईल. हे साधो ! ही संसारबंधमयी महामारी अतिशय कठिण आहे. ती लौकर संपत नाहीं. आत्मज्ञानावांचून सतत वाढत जाणाऱ्या तिचा कधींच उपशम होत नाहीं. ही महामोहमयी माया मिथ्याच ' अहं ' या रूपानें स्थित झाली आहे व तिच्यामुळें हें असह्य दुःख होत आहे. यास्तव शास्त्रार्थाचा विचार करून तिचा सत्वर उच्छेद करावा. विचार करीपर्यंतच फार रमणीय वाटणारे, पण वस्तुतः शून्यरूप अशा या विषयांचें सेवन करीत केवळ आकाशरूपिणी जी अनंत संसृति तिला प्राप्त होऊं नका. भुकेलेले सर्प रसशून्य वायूचाच स्वाद घेत रहातात; तसे तुम्हीहि नीरस विषयांचें सेवन करूं नका. तुमचे दिवस केव्हां येतात व जातात हें न कळतांच जात असतात. या व्यवहारांत त्या दिवसांच्या योगानेंच तुम्ही आपल्या मरणाची वाट पहात असतां. ही स्थिति किती वाईट आहे ! मरणरूप आयुष्याचा अवधि जोंवर प्राप्त झाला नाहीं तोंवर ह्मणजे कांहीं थोडे दिवसच तुम्हांला सच्छास्त्राचा अवलंब करण्याची योग्यता असते. केवळ भयालाच पात्र होणाऱ्या तुमच्या समाधानाला जर कांहीं कारण असेल तर तें एवढेंच. यास्तव मरणकाल येईपर्यंतच तुम्हांला जो पुरुषार्थ करावयाचा असेल तो करा. कारण मरणकाल समीप आला ह्मणजे तुम्हांला इतका संताप होईल कीं, त्या अवस्थेंत होणारा प्रत्येक अंगाचा विच्छेदहि शांति चंदनाच्या लेपाप्रमाणें मोठ्या आनंदानें पण अवश्य भोगावा लागेल. ज्यांचा भ्रम अतिशय दृढ झालेला असतो ते मूर्ख युद्धादिकांत प्राणांचें मूल्य देऊनहि धन-जयाभिमान विकत घेतात, पण शास्त्रोक्त विवेक-वैराग्य-श्रवणादि उपायांनीं प्राप्त होणाऱ्या तत्त्वबुद्धीनें अजर मोक्षपद प्राप्त करून घेत नाहींत, हें मोठें आश्चर्य आहे. ज्या विवेकी लोकांकडून कोणत्याहि प्रकारच्या प्रयत्नावांचून ह्मणजे केवल आत्मतत्त्वज्ञानानेंच ब्रम्हाकाशांत स्थान केलें जातें, त्या तसल्या सर्वोत्कृष्ट ह्मणजे अज्ञानशत्रूचा वध करण्यास समर्थ असलेल्या पुरुषाकडून सच्छास्त्राच्या उपेक्षेनें स्वतःच्या मस्तकावर अज्ञानशत्रूचा पाय कसा सहन केला जातो ? अहो जनहो ! तुम्ही मान-मोहरहित होऊन

दृढ विवेकास प्राप्त व्हा. विवेकामुळेंच तुमचे मान व मोह नाहींसे होतील आणि तत्त्वाला साक्षात् जाणून मोक्षगतीला प्राप्त व्हाल. संसार-गतीला प्राप्त होऊं नका. आत्मबोधाकडून मोठमोठ्या आपत्तींचा समूल उच्छेद केला जातो. जगत्प्रसिद्ध असा हा मी तुम्हांला बोध करण्यासाठीं उद्युक्त होऊन अहोरात्र तुम्हांला तत्त्वज्ञानाचा उपदेश करीत आहें. कंठशोष होईपर्यंत श्रम करीत आहें. त्यामुळें नित्य क्लेश मला होत आहेत. असें पाहून निदान तुमच्या मनांत मजविषयीं दया तरी उत्पन्न होऊं द्या आणि त्या दयेनें माझें वचन लक्षपूर्वक ऐकून ज्ञानी व्हा. देहेंद्रियादि परिच्छिन्नात्मभाव टाका आणि ब्रह्मरूप होण्याची इच्छा करा. 'पण इतकी घाई कशाला हवी ? पुढें केव्हां तरी ज्ञान संपादन करूं' असें म्हणाल तर बाबांनो, जो मरणरूपी आपत्तीची चिकित्सा आजच करीत नाहीं, तो मूढ मरण जवळ येऊन ठेपल्यावर व्याकुळ झालेल्या स्थितींत काय करूं शकणार ? आत्मज्ञान करून देण्यास या ग्रंथा-सारखा दुसरा ग्रंथ नाहीं. तेलाची ज्याला इच्छा असते त्याला आपला इष्ट अर्थ संपा-दन करणारा तिळच ग्राह्य असतो, हें प्रसिद्ध आहे. हें शास्त्र दीपाप्रमाणें आत्मज्ञान प्रकाशित करतें, पित्याप्रमाणें सत्वर बोध करतें व कांतेप्रमाणें चित्तरंजन करतें. जें नित्य प्राप्त असलेलेंहि आत्मरूप ज्ञान दुसऱ्या शास्त्रांवरून ज्ञात होत नाहीं, तें दुर्बोध व मधुर ज्ञान या शास्त्रावरून ज्ञात होतें, यांत संशय नाहीं. शास्त्रसृष्टींतील जीं मुख्य मुख्य आख्यानें आहेत, त्यांत हें उत्तम आख्यान आहे. तें अनायासें आत्मबोध करून देतें. ऐकणाऱ्याच्या हृदयाचें रंजन करतें. यांत तत्त्ववेत्त्यांच्या अनादिसिद्ध संप्रदायाला सोडून दुसरें कांहीं सांगितलेलें नाहीं. यांत मनः-कल्पित असें कांहीं नाहीं. अनेक आख्या-नांनीं व कथांनीं हें मोठें विचित्र झालें आहे. जो कोणी या शास्त्राचा केवल कौतुकानेंहि विचार करतो, तोहि परमात्मबोधाला प्राप्त होतो, यांत संशय नाहीं. सोन्याच्या खाणीं-तील वाळूचें क्षालनानें शोधन केलें असतां तींत जसें सोनें सांपडतें, त्याप्रमाणें सर्व शास्त्रज्ञ पंडितांनाहि जो बोध अद्यापि झालेला नसतो तो या शास्त्रापासून होतो. ( अहो, पण या शास्त्रापासूनच जर ज्ञान प्राप्त होत असेल तर याच्या कर्त्याला ज्ञान कसें झालें ? ज्या शास्त्रापासून त्याला ज्ञान झालें असेल त्याचेंच आम्ही अध्ययन करूं. याचेंच अध्ययन करण्याविषयीं इतका आग्रह कां ? ' उत्तर— ) हें शास्त्र जर युक्तियुक्त नसेल व साक्षात्कारा-मध्यें याचें पर्यवसान होत नसेल तर याचा कर्ता कोण ? त्याला ज्ञान झालें होतें कीं नव्हतें ? व तें कोठल्या शास्त्रावरून झालें ? इत्यादि विचार करणें युक्त होईल. पण हें शास्त्र स्वतः सहस्रावधि युक्तींनीं युक्त असतां व साक्षात् अनुभव देत असतां स्वानुभवानेंच सर्व शंकांची निवृत्ति होणें शक्य असल्यामुळें या शास्त्रांतच नित्य निमग्न होणें युक्त आहे. 'शास्त्रकर्त्याला ज्ञान होतें कीं नव्हतें ? ' या विचारांत कांहीं अर्थ नाहीं. म्हणून अज्ञानामुळें, मत्सरानें, मोहानें जे आपलाच घात करून घेणारे अविचारी लोक शास्त्रार्थाचा तिरस्कार करतात त्यांच्याशीं कधींहि मैत्री करूं नये. तर मग तुम्ही आमच्याशीं व या दुसऱ्या सर्व अज्ञ श्रोत्यांशीं मैत्री कशी करीत आहां व दयेनें आम्हांला उपदेश करण्यास कसे प्रवृत्त झालांत ? म्हणून विचारशील तर सांगतों. रामा, हा श्रोतृसमुदाय कशा प्रकारच्या अधिकारी विशेषणांनीं युक्त आहे, तूं कोणत्या अधि-कारी विशेषणांनीं युक्त आहेस व तुमच्या

बुद्धि श्रवण, धारण, अभ्यास इत्यादिकांस कितीशा तयार आहेत, मला तुम्हांला उपदेश करण्यासाठीं कशी आज्ञा झाली, हें सर्व मी जाणतों. त्यामुळें तुमच्या भाग्योदयानें माझी करुणा जागृत होऊन मी तुम्हांला उपदेश करण्यास प्रवृत्त झालों. माझा स्वभावच असा आहे. मला दीनांची नेहमीं दया येते. मी निष्ठुर नसल्यामुळें तुमचें हित व्हावें अशीच माझी इच्छा आहे. यास्तव दयेनें सांगत असलेल्या या माझ्या वचनाचा तुम्ही आदर करा. किंवा, मी तुमचा आत्मा आहें. तुमच्या पुण्यामुळें तुम्हांला उपदेश करण्यास मी येथें आलों आहें. तुम्हीहि माझा आत्मा आहांत. त्यामुळें माझ्या परम प्रेमानें आस्पद आहां. म्हणूनच तुमच्या मित्रत्वास मी प्राप्त झालों आहें व तुम्हांस हें तत्त्वज्ञान सांगत आहें. मी मनुष्य नव्हें, गंधर्व नव्हें, देव नव्हें किंवा राक्षसहि नव्हें. तुम्ही सर्व चिन्मात्ररूप आहांत. मीहि त्या चिन्मात्राचाच अति निर्मल भाग आहें. तुमच्या पुण्यामुळें येथें वसिष्ठरूपानें स्थित आहें. मी तुमच्या आत्म्याहून भिन्न नाहीं. यास्तव मी परम आप्त आहें. जोंवर ते काळेकुट्ट मरणाचे दिवस आले नाहींत, तोंवर मीं सांगितलेलें सर्व वस्तूविषयींचें वैराग्यरूप सार संग्रहीत करा. जो जिवंतपणींच नरकरूप व्याधींची चिकित्सा करीत नाहीं, तो औषधरहित स्थानीं गेल्यावर नरकयातना भोगीत असतांना काय करणार? जोंवर सर्व विषयांविषयीं वैराग्य प्राप्त होत नाहीं, तोंवर विषयवासना क्षीण होत नाहीं. ह्मणून वैराग्य हेंच परम सार आहे. हे महाबुद्धिमाना! वासनाक्षयावांचून आत्मोद्धार करण्यास दुसरा कोणताच उपाय नाहीं. जर पदार्थ सत्य असते तर त्यांतील हितावह वस्तूविषयींहि माझी अशी भावना अवश्य झाली असती. पण शशशृंगादिकांप्रमाणें ते विद्यमानच नाहींत. जगांतील सर्वच पदार्थ विचार करीपर्यंत रमणीय दिसणारे आहेत. त्यांचा सद्भाव नाहीं. विचार करूं लागलें असतां ते आपोआप क्षय पावतात; प्रमाणपूर्वक विचार करूं लागलें असतां ज्यांचें अस्तित्वच सिद्ध होत नाहीं, ते कोणत्या स्वरूपाचे असणार? ते काय, एकेक वस्तुरूप आहेत? कीं सर्ववस्तुरूप आहेत? केव्हां केव्हां असतात? कीं सर्वदा असतात? याचा कांहींच निश्चय करतां येत नाहीं. योग्य कारणाच्या अभावीं हे सर्व जगद्भाव सृष्टीच्या आरंभींच उत्पन्न झालेले नाहींत. अर्थात् हें जें कांहीं भासत आहे तें परम तत्त्वच आहे. इंद्रियांचा विषय न होणाऱ्या स्वप्रकाश चिदेकरस ब्रह्मामध्यें हे इंद्रियांचे विषय प्रलयकालीं असतात असें म्हणतां येत नाहीं. त्यामुळें मनासह सहा इंद्रियांचें इंद्रियरूप कारण कांहींच नसतें. नामरूपात्मक जगाचें नामरूपरहित कारण संभवत नाहीं. अवस्तूचें कारण वस्तु व अशून्याचें कारण शून्य आहे, असेंहि म्हणतां येत नाहीं. कारणच कार्यरूपास प्राप्त होतें असा नियम असल्यामुळें भिन्न जातींच्या वस्तूंचें तादात्म्य संभवत नाहीं. वटबीजादिकांप्रमाणें साकार वस्तुच साकार वस्तूचें कारण होऊं शकते. निराकार वस्तू साकार वस्तूचें कारण कधींहि होऊं शकत नाहीं. साकार बीजच साकार वृक्षाचें कारण आहे. तेव्हां या नियमाचा बाध करून निराकारापासून साकार होईल कसें? या सृष्टीचें आकारानें युक्त असें यत्किंचितूहि बीज दिसत नाहीं. तेव्हां हें साकार जगत् त्यापासून होतें हें म्हणणें व्यर्थ आहे. त्या परम पदामध्यें कार्यकारणभावादि कांहीं नाहीं. तथापि वाचालपणानें त्याला कारण म्हणणें, तेंच जगाचें कारण अशी कल्पना करणें, हें मौर्ख्य आहे. सहकारी निमित्तांच्या अभावीं कारणा-

पासून कार्य उद्भवत नाहीं ही गोष्ट व्यवहारांत अज्ञांच्या अनुभवानेंहि सिद्ध आहे. चिति जगद्वेदनरूप आहे. त्यामुळेंहि ती जगाचें कारण होऊं शकत नाहीं. कारण घटज्ञान घटाचें कारण होत नसतें, हें प्रसिद्ध आहे. प्रकाशामध्यें अंधकार कसा संभवणार ? परमाणूंचे समूह हें जगाचें कारण आहे, हें ह्मणणेंहि खोटें आहे. सशाचें शिंग धनुष्याकार आहे, असें अज्ञानामुळेंच म्हटलें जातें. परमाणूंचा समूह एकत्र संघात पावून जगत् उत्पन्न करतो असें जर म्हटलें तर परमाणु आकाशांत नेहमीं उडत व तरंगत असलेले दिसत असल्यामुळें प्रत्येक घरीं प्रतिदिवशीं अकल्पित परिणाम घडून येतील. कोठें पर्वतशृंगाप्रमाणें परमाणूंचा संघ दिसेल तर कोठें मोठा थोरला कूप दृष्टीस पडेल. कारण परमाणूंचें अंग एकसारखें हालत असतें. त्यामुळें कोणत्याहि प्रदेशीं किंवा कोणत्याहि गृहांत तीच तीच स्थिति नियमानें अनुभवास येणार नाहीं. ईश्वराच्या इच्छेनें परमाणूंमध्यें क्रिया उत्पन्न होऊन परमाणूंच्या संयोगापासून जगद्रचनेस आरंभ होतो, असें तार्किक म्हणतात. पण ईश्वराला अशी इच्छा निष्कारण कां व्हावी ? परमाणु तर स्वतः जड आहेत. ईश्वराची इच्छा नित्य आहे म्हणून म्हणावें, तर नित्य सृष्टि झाली पाहिजे. परमाणु स्वतःच सृष्टीमध्यें प्रवृत्त होतात म्हणून म्हणावें, तर ते जड असल्यामुळें त्यांचें कर्म संभवत नाहीं. सृष्टि हें कर्म कोणीहि अबुद्धिपूर्वक केलें आहे, असें म्हणता येत नाहीं. कारण मनानेंहि ज्याच्या रचनेविषयीं कोणत्याहि प्रकारचा विचार करतां येत नाहीं असें अत्यंत विचित्र सुखदुःख भोगणाऱ्या चतुर्विध भूतसमुदायांनीं युक्त असलेलें हें जगत् कांहीं प्रयोजनावांचून अबुद्धिपूर्वक उगीच कोण करील ? यास्तव तें बुद्धिपूर्वक कोणीं तरी केलें असलें पाहिजे. एखादा उन्मत्तहि एखादें व्यर्थ कर्म बुद्धिपूर्वक करीत नाहीं. अर्थात् वायुच परमाणूंचा संघात करील, बुद्धिपूर्वक व्यापारावांचूनच परमाणूंचा संघ आपोआप बनेल, ही आशाहि व्यर्थ आहे. जड वायूला बुद्धिपूर्वक चेष्टा करतां येत नाहीं. तिच्यावांचून परमाणूंचा समुदाय संभवत नाहीं. प्रलयकालीं जड व सर्वज्ञ यांहून भिन्न असलेले सर्व जीव देहादिकांच्या अभावीं जगत् रचण्यास समर्थ नसतात. त्यामुळें सृष्टीच्या आरंभीं दुसरा कोणीच कर्ता संभवत नाहीं. 'अहो, पण कर्त्याच्या अभावीं हें जगत् जर उत्पन्नच झालेलें नाहीं, तर आम्ही कोणत्या स्वरूपाचे आहों व या जगांत स्थित कसे आहों ?' ह्मणून विचारशील तर सांगतों. हे आह्मी सर्व देहादिमूर्तताशून्य चिदात्मेच आहों. इतर सर्व जीवहि चिदात्मेच आहेत; तथापि स्वप्नांत तुमचे स्वप्नमानव जसे असतात, तसेच आमच्या कल्पनेनें हे सर्व स्थित आहेत. तस्मात् विश्व यत्किंचित्‌हि उत्पन्न होत नाहीं व तें विद्यमानहि नाहीं. याप्रमाणें हें सर्व स्वच्छ चिदाकाशच असून तें स्वरूपानें स्वरूपांतच विकास पावत आहे. हें विश्वाकाश चिदाकाशांत सर्वत्र विश्रांति पावलें आहे. वायूमध्यें स्पंद, जलामध्यें द्रवत्व व आकाशांत शून्यत्व जसें असतें, तसें हें चिदाकाश आहे. संवित् एका पदार्थापासून दुसऱ्या अतिदूर असलेल्या प्रदेशीं एका निमिषांत जाते, तेव्हां तिचें मध्यें जें स्वरूप असतें, तेंच चिदाकाशाचें स्वरूप आहे, असें तूं जाण. सर्व पदार्थांचा चिदाकाश हाच परमस्वभाव आहे. त्यामुळें ते तन्मय असतात. म्हणूनच विश्व चिदाकाशरूपानेंच आकाश आहे, शून्यभावानें नव्हे. त्या चिदाकाशाची स्वभावतः एकरूप असलेली जी अन्यथा परिणति ह्मणजे विवर्तरूपानें वृत्ति

तेंच हें अज्ञांचें जगत् होय. त्यामुळेंच जगत् व चिदाकाश यांमध्यें भिन्नता मुळींच नाहीं. वायु व स्पंद यांप्रमाणें त्या दोघांचें एकच रूप आहे. चित् एका देशाहून दुसऱ्या देशीं गेली असतां मध्यें शांत, सर्वविशेषशून्य असें जें तिचें स्वरूप अनुभवास येतें, तेंच तिचें मुख्य स्वरूप होय. रामा, सर्व भूतांचा तोच स्वभाव आहे. पंडित तेथेंच रहातात. हरादि हे सर्व देव नित्य ध्यानानें त्यापासून ढळत नाहींत हें सर्व विश्व चिद्दर्पणांतील आभासमात्रच आहे, त्याचा अवभास प्रकाशमात्र आहे. विश्वाला कोणत्याहि प्रकारचा आकार नाहीं, व हाच त्याचा अक्षय स्वभाव आहे, असें पंडित समजतात. विश्व उत्पन्न होत नाहीं व नाश पावत नाहीं. तें केव्हांहि नसून, होणारें नाहीं. आकाशाहून शून्यत्व जसें भिन्न नाहीं, तसें जगत् चिदाकाशाहून पृथक् नाहीं, तर तद्रूपच आहे. हें विश्व वर्तमान समयीं नाहीं, पूर्वीं नव्हतें व पुढेंहि नसणार. हें शांत चिदाकाशच परमात्म्यामध्यें असें भासत आहे. स्वप्नांत चिन्मात्रच जसें नगररूपानें भासतें तसेंच जाग्रद् नांवाच्या या स्वप्नांत तेंच जगद्रूप दिसत आहे. सृष्टीच्या आरंभीं पृथिव्यादि भावांचीच असत्ता आहे. तेव्हां त्या वेळीं हा पार्थिवादि क्षुद्र देह कोठचा ? वास्तव हें भासणारें शरीरत्व आकाशरूप चितीचें स्वप्नच आहे. चतुर्मुखाचें शरीर हें महाचितीचें पहिलें स्वप्न होय. एका स्वप्नांतून दुसऱ्या स्वप्नाचा उदय जसा व्हावा, त्याप्रमाणें आम्ही सर्व त्या स्वयंभूच्या शरीरांतून निघालों आहों. म्हणूनच गालगुंडावर झालेल्या फोडाप्रमाणें आमची स्थिति आहे. त्यामुळेंच आम्हीं कितीहि जरी प्रयत्न केला तरी आमचें मन ब्रम्हाकडे एकाएकीं प्रवृत्त होत नाहीं. स्वतः चतुर्मुख हाच असत्य पुरुष आहे; पण तो सत्य असल्यासारखा भासतो. आपल्या भावनेनेंच मी मूळ तत्त्वाहून निराळा आहें असा तो अनुभव घेतो. आणि जेव्हांपासून तें ब्रम्हच असें समष्टिजीवरूप झालें, तेव्हांपासून हें मिथ्या जगत् अशा आकारानें स्थित झालें आहे. स्वप्नांत जसें मिथ्या जगत् भासतें व जागें होतांच नाश पावतें, त्याप्रमाणें हें आब्रम्हस्तंबपर्यंत जगत् उत्पन्न होतें. स्वप्नांत चिदाकाशच विश्वत्वाला प्राप्त होऊन जसें नाश पावतें, तसेंच या जाग्रत्संज्ञक स्वप्नांत विश्वत्व उत्पन्न न होतांच भासतें. हें मिथ्या असूनहि सत्य असल्यासारखें भासतें. संविद्च स्वप्नांत नगरादि रूपानें जशी भासते, तशीच ती निराकार असलेलीहि संविद् जगद्रूपानें साकार असल्याप्रमाणें झाली आहे. मेरूहून परमाणु जितका सूक्ष्म, तितकेंच संविदाकाश भूताकाशाहून सूक्ष्म आहे, तेव्हां त्या चिदाकाशाला आकाशाहून सूक्ष्म म्हणणें, हें तरी कसें शोभतें? पण जगाचा स्थूल आकार उत्पन्न होत नाहीं. कारण त्याला तसें योग्य निमित्त नाहीं, हें सांगण्यासाठींच चिदाकाशाला महाकाशाहून अणु म्हटलें जातें. यावर कदाचित् तूं असें म्हणशील कीं, आतां या व्यवहारकालीं विटा, दगड, माती यांपासून नगररचना होते, तेव्हां जगापासूनच जगद्रचना होऊं द्या; ब्रम्हापासून कशाला?—तर सांगतों. अरे, जें नगर वगैरे सृष्टीच्या आरंभींच झालेलें नाहीं तें जगापासून तरी कसें होणार? स्वप्नांतील नगर विटा, माती यांवांचूनच होतें, हें प्रसिद्ध आहे. यास्तव जाग्रद्वेदनाकाशांत जें नगर तेंच आमच्या सिद्धांतांत स्वप्नांतलि नगर होय. याप्रमाणें स्वप्न व जाग्रत् या दोन अवस्थांतील पदार्थांचा भेद नाहीं असें सिद्ध झालें असतां स्वप्नांतील पदार्थ जसे केवल चिदाकाशरूप, त्याप्रमाणें जागृतींतील पदार्थहि चिदाकाशाहून

भिन्न नाहींत. शून्य व आकाश यांचा जसा अभेद त्याचप्रमाणें स्वप्नपर्वत व चिदाकाश यांचा अभेद आहे. ज्याप्रमाणें स्पंदन हाच वायु, त्याप्रमाणें जें चिदाकाश तेंच स्वप्ननगर. स्पंद व अस्पंद या दोन्ही प्रकारचा वायु आकाशासारखा आहे, ह्मणजे वायु व स्पंद यांचा जसा भेद नाहीं, त्याचप्रमाणें स्पंदरहित वायु व आकाश यांचाहि भेद नाहीं. तस्मात् चिदाकाशच असें हें जगदाकारानें दिसत आहे. चित्सूर्याचें हें सर्व निराधार व शून्य भासन आहे. हें सर्व शान्तच आहे, अस्तोदयशून्य आहे, अखंड स्फुरणरूप आहे, पाषाणाप्रमाणें अचल आहे व सर्व उपद्रवशून्य आहे. तेव्हां त्यांत हे पदार्थ कसे रहाणार ? कोणत्या कारणानें रहाणार ? व पदार्थबुद्धि तरी कशी होणार ? हें सांग बरें. अरे, द्वैत कोठचें व एकत्व कोठचें ? मी कोठचा व हे पदार्थ कोठचे ? आणि त्यांविषयींच्या भावना तरी कोठच्या ? हे रामा, तूं निरुपद्रव शुद्ध बोधरूप तत्त्वाच्या साक्षात्कारानें तदेकत्वाला प्राप्त होऊन, नित्य व्यवहार करीत असूनहि त्याविषयींचा अभिमान ठेवूं नकोस; चित्तामध्यें निर्विकार रहा; द्वित्व व एकत्व या परस्परविरुद्ध कल्पना सोड; मनांत अगदीं शांत होऊन रहा आणि निरतिशय आनंदानें सुखी हो. कारण विक्षेपाला कारण होणारे हे सर्व पदार्थ विद्यमान नाहींत. १०३.

---

# सर्ग १०४ वा.

—:०:—

१. आकाशादिकांचें वाय्वादिकत्व जसें अनुभवसिद्ध आहे, त्याचप्रमाणें चित्चा जगद्भाव अनुभवसिद्ध आहे.

श्रीवसिष्ठः—हे रामा ! आकाश शब्दतन्मात्र आहे, वायु स्पर्शतन्मात्र आहे, त्यांच्या अतिशय संघर्षणामुळें रूपतन्मात्र तेज व तेजाची शांति हेंच रसतन्मात्ररूप आप आहे. या सर्वांचा संघ होऊन त्यांना घनभाव प्राप्त झाला असतां तेंच गंधतन्मात्र होतें. याप्रमाणें स्वप्नतुल्य जगद्भावांत हा असा क्रम आहे. अमूर्त आकाशापासून ही मूर्ति कशी प्रवृत्त होते, असा विचार करतां करतां कितीहि दूर जरी गेलें, ह्मणजे परमाणु, प्रकृति येथपर्यंत जरी पदार्थकल्पना केली, तरी शेवटीं अनुभवरूप भगवती ज्ञप्तीचाच आश्रय करावा लागतो. अर्थात् ती ज्ञप्तिच स्वप्न-मनोरथांत जशी, तशीच विवर्तरूप सर्व जगद्वेषाचा निर्वाह करूं शकते. तेव्हां सृष्टीच्या आरंभीं सर्वपदार्थरूप, शुद्ध, सर्वदोषशून्य ब्रह्मच असतें, असा सिद्धांत करण्यास काय प्रत्यवाय आहे ? अतिशुद्ध ज्ञप्तिच स्वरूपांत जें कांहीं पहाते त्यालाच 'जगत्' असें म्हटलें आहे. त्याचें अधिष्ठान परमार्थसत्य असल्यामुळें 'सर्वं खल्विदं ब्रह्म' इत्यादि यथार्थवादी श्रुतींच्या बळानें तें सत्य आहे, हेंच आमच्या सिद्धांताचें रहस्य होय. चितीमध्येंहि पंचमहाभूतें किंवा भ्रांतिकल्पित पदार्थ त्रिकालींहि विद्यमान नाहींत. स्वप्नदर्शेतील पदार्थांप्रमाणें ते सर्व पदार्थ तत्त्वतः नसतांनाच भासतात. स्वप्नांत शुद्ध चित्स्वभावच जसा पर्वत-नगरादि रूपानें प्रतीत होतो, त्याप्रमाणें जागृतींतहि चित्स्वभावच जगद्रूपानें अनुभवास येतो. पण तें सुखमय चिद्रूपच आहे. मी चेतनाकाशच आहें व तेंच हें जगत् होऊन राहिलें

आहे. त्यामुळें मी व जगत् यांचें ऐक्य असून हें सर्व शिलेप्रमाणें एक आकाश आहे. त्यामुळें जी प्रथमसर्गाची उत्पत्ति, जो कल्पांतींचा नाश किंवा स्थितिअवस्थेंतील जी जगद्रचना तें सर्व निराकार चिदाकाश आहे. आपलें शुद्ध स्वरूप ज्ञात झालें असतां जें सर्वदुःखशून्य अक्षय सुख प्राप्त होतें, तोच मोक्ष होय. हा मोक्ष देह असला तरी व नसला तरी सारखाच. असल्या मोक्षस्वरूपांत तुला परिपूर्ण विश्रांति प्राप्त होवो. तिच्या योगानेंच तूं कृतार्थ होशील? १०४.

---

## सर्ग १०५ वा.

—:०:—

१ चित्च जाग्रदवस्थेप्रमाणें भासते. तशीच ती स्वप्नवत् भासते. याप्रमाणें चित्स्वभावानें जाग्रत् व स्वप्न यांचा भेद नाहीं असें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—रामा! चिद्रूप आत्मा जगदाकार स्वभावाचाच अनुभव घेत राहिला आहे. आपली कल्पनाच असें हें जगत् स्वप्नाप्रमाणें स्वतःहून भिन्न नाहीं. हें जाग्रत् जगत्वानें मोडलेलें असें नाहीं. म्हणजे तें जगद्रूपानें असूनहि सुषुप्तिज्ञानच आहे. त्यामुळें जागृतींत जगद्रूपानें भासणारें तें मूलतः अज्ञान आहे. अधिष्ठानदृष्ट्या तें शिलेच्या उदराप्रमाणेंच घन आहे व स्वतः शून्यच आहे. याविषयीं नगरसमूहांनीं भूषित झालेलें स्वप्न हाच उत्तम दृष्टान्त आहे. स्वप्नांतील जगत् यत्किंचित्हि सत् नाहीं. तथापि तें असें भासुर भासतें. ज्याप्रमाणें स्वप्नांत हें त्रैलोक्य असत् भासतें, तसेंच हें जागृतींतहि भासतें. त्याहून तें थोडेंसें सुद्धां विपरीत नाहीं. जागृति व स्वप्न यांतील कोणत्याच अवस्थेंत जगत् हा शब्द व त्याचा अर्थ यांतील कशाचाच संभव नाहीं. वस्तुतः चिदाकाशाचें जें स्वाभाविक भान तेंच जगद्रूपानें जाणलेलें आहे. स्वयंभू चिदाकाशानें आपल्या अज्ञानावृत स्वरूपांत पर्वत, नद्या, समुद्र यांनीं युक्त असें जगत् हाच स्वचमत्कार धारण केला. त्यानें जाग्रत्स्वप्नांत त्याची कल्पना केली. त्यामुळें 'जगत्' हेंहि कांहीं नाहीं, व चिद्रूपहि कांहीं नाहीं. दोन्ही भाव कांहीं कारणावांचून भासतात. ज्याप्रमाणें स्वप्नांत वस्तुतः कांहीं नसतांच त्रैलोक्य भासतें, त्याप्रमाणें जागृतींत निराकार शून्यच हें असें जगद्रूप बनतें. हे महाबुद्धिमान् रामा! अनेक प्रकारच्या पदार्थांनीं शोभणाऱ्या स्वप्नांत जरी अनेक आरंभ दिसले तरी ते सर्व जसे आनारंभच असतात, त्याप्रमाणेंच हे असत् असूनहि सत्रूपानें विस्तारले आहेत. ब्रह्मच अतिशय विस्तीर्ण असें आकाश प्रथम झालें. नंतर तें आकाशच वायु, तेज इत्यादि क्रमानें पर्वतांचा संघात, अनेक प्रकारचीं नगरें, ग्राम, यांच्या आकारांनीं नटलें. त्यामुळें हें सर्व आश्चर्यच आहे. स्वप्न पहाणाराला स्वप्नांत मेघ, समुद्र, पर्वत यांचा घोष ऐकूं येतो. पण वस्तुतः त्या वेळीं मौनच पसरलेलें असतें. कारण त्या स्वप्नद्रष्ट्याच्या अगदीं समीप असलेल्याहि दुसऱ्या कोणाला तो ध्वनि ऐकूं येत नाहीं. फार काय पण तो स्वप्नद्रष्टाहि जागा झाल्यावर तो ध्वनि ऐकत नाहीं. कधीं न झालेलाहि वंध्यापुत्र स्वप्नांत झालेला दिसतो. तसेंच या दार्ष्टान्तिकांत समजावें. ज्याप्रमाणें मरून उत्पन्न झालेलाहि पुरुष आपल्या मरणाचें विस्मरण झालें असतां मी अनुत्पन्नच आहें असें समजतो, त्याप्रमाणेंच हें समजावें. स्वप्नामध्यें स्वप्नद्रष्टा जेथें निजलेला असतो त्या स्थलाचाहि त्याला अनुभव येत नाहीं. त्यामुळें तें स्थान वस्तुतः जसेंच्या तसेंच विद्यमान्

असूनहि अविद्यमान असल्यासारखें होतें. एक अवस्था सोडून दुसऱ्या अवस्थेंत गेलें कीं सत् असलेली वस्तु असत् होते व असत् असलेली सत् होते. जशी स्वप्नांत रात्रच दिवस बनते व दिवसच रात्र होतो, जी न संभवणारी गोष्ट तीहि संभवते, स्वतःचें मरणहि दिसतें, त्याच न्यायानें असंभवनीय असलेलेंहि हें जगत् आकाशांत संभवनीय असल्यासारखें भासतें. अंधकारहि प्रखर प्रकाश होतो. इतर लोक ज्या वेळीं झोंप घेत असतात, त्या वेळीं उलूकादिकांना दिवस वाटतो व दिवस रात्रीसारखा भासतो. त्यांना प्रकाशच अंधकार होतो. दिवसाहि ते स्वस्थ झोंप घेतात व स्वप्नहि पाहतात. स्वप्नद्रष्टा आपल्या शय्येवर सुखानें निजलेला असतांहि स्वतःला मोठ्या खड्यांत पडलेला पाहतो. ह्मणजे तेथील भूमिच आकाश बनते. याप्रमाणें स्वप्नांत जगत् जसें असत्यरूप भासतें, तसेंच जागृतींतहि तें मिथ्या प्रतीत होतें. स्वप्न व जागृति यांमध्येंहि यत्किंचित फरक नाहीं. कालचा व आजचा हे दोन्ही सूर्य जसे एकसारखे, किंवा कालचा व आजचा पुरुष एकच, त्याप्रमाणें जाग्रत् व स्वप्न हीं दोन्ही एकच, त्यांत यत्किंचित्‌हि भेद नाहीं.

**श्रीरामः**—भगवन्! आपलें हें ह्मणणें माझ्या मनाला पटत नाहीं. कारण स्वप्नप्रत्यय जागें होतांच बाधित होतो, त्यामुळें स्वप्नप्रत्यय आभासरूप आहे, अशी मनाची खात्री पटते. पण जाग्रत्प्रत्यय तसा बाधित होत नाहीं. तेव्हां त्या दोघांचें साम्य कसें असेल ?

**श्रीवसिष्ठः**—रामा ! स्वप्न पाहणारा स्वप्नसृष्टिमध्यें स्वप्नांतील बंधुजनांसह विहार करून तेथें मरण पावतो. म्हणजे तें स्वाप्नशरीर सोडतो व त्या स्वप्नजगांत मरून स्वप्नांतील आप्तांशीं वियोग पावून याच सृष्टींत जागा होतो. त्यालाच निद्रेपासून मुक्त झालेला असें म्हणतात. सुखदुःखदशा, मोह, दिवस व रात्र यांचे विपर्यास इत्यादि अनेक गोष्टींचा अनुभव घेऊन स्वप्नद्रष्टा स्वप्नसंसारांत मरण पावतो. त्याची झोंप उडाल्यामुळें तो पुनः या जगांत उत्पन्न होतो. आणि निद्रावस्थेच्या अंतीं हें सत्य नव्हे असा प्रत्यय त्याला येतो. ज्याप्रमाणें स्वप्न पहाणारा स्वप्नसंसारांत मरण पावून दुसरें जाग्रन्मय स्वप्न पहाण्यासाठीं पुनः उत्पन्न होतो, त्याप्रमाणें जाग्रदवस्थेचा अनुभव घेणारा जीव जाग्रत्संसारांत मरण पावून दुसरें जाग्रन्मय स्वप्न पहाण्यासाठीं पुनः उत्पन्न होतो. एका जाग्रदवस्थेंत मरून दुसऱ्या जागृतींत उत्पन्न झालेला पूर्वीच्या जाग्रद्रूप प्रपंचांत ‘स्वप्न असत्’ असा प्रत्यय पुनः जसा ग्रहण करितो, त्याप्रमाणें एका स्वप्नांतून दुसऱ्या स्वप्नांत गेलेला तो पुढील स्वप्नांत पुनः जाग्रत्‌प्रत्यय धारण करितो, म्हणजे त्या स्वप्नालाच जागृति समजतो. पण त्या उत्तरस्वप्नाला जागृति समजणें हा जसा भ्रम, त्याचप्रमाणें पूर्वजागृतीला स्वप्न किंवा असत् न समजणें, तीहि सत्यच आहे असें मानणें, हा भ्रम आहे. कारण त्या अवस्थेंतहि तो दुसऱ्या स्वप्नाचाच अनुभव घेत असतो. कारण त्या स्वप्नांत तो दुसरें स्वप्नच पहात असतो; तथापि त्या स्वप्नालाच जाग्रत् समजतो. याप्रमाणें जाग्रत् व स्वप्न या नांवाच्या या दोन अवस्था असून त्या जीवात्म्यास क्रमानें प्राप्त होतात. त्या अवस्थांबरोबर जीव स्वतः उत्पन्न होत नाहीं व मरतहि नाहीं. पण त्या त्या अवस्थेंतील देहांवर तो अभिमान ठेवूं लागला ह्मणजे तो उत्पन्न झाला व त्यावरील अभिमान सोडला म्हणजे तो मेला असें लोक समजतात. स्वप्नद्रष्टा स्वप्नांत मेला, स्वप्नदेहावरील अभिमान त्यानें

टाकला म्हणजे या जाग्रतींत आला, असें म्हणतात व या जाग्रतींत मेलेला, या शरीरावरील अभिमान सोडलेला स्वप्नांत जागा झाला असें म्हणतात. याप्रमाणें एका स्वप्नांतून दुसऱ्या स्वप्नांत जीव गेला असतां पूर्वस्वप्नाच्या अपेक्षेनें हें स्वप्न वर्तमानकालीन असल्यामुळें जाग्रत् म्हटलें जातें. त्याचप्रमाणें एका जागृतींत मरून स्वप्नांत किंवा दुसऱ्या जागृतींत जागा झालेल्या पुरुषाची पूर्वजागृति हें सर्वथा स्वप्नच होतें. अर्थात् पूर्वीची जागृति किंवा स्वप्न हे दोन्ही इतिहासच आहेत. म्हणजे भूतकालीं घडलेल्या वृत्तान्तासारखेच आहेत, खरे नव्हेत. त्यामुळें ते एकमेकांच्या उपमान-उपमेयतेला प्राप्त झाले आहेत. स्वप्न जागृतीसारखें भासतें व जाग्रत् स्वप्नासारखें दिसतें. पण वस्तुतः त्या दोन्ही अवस्था असत् असून तें केवळ चिदाकाशच तसें दिसतें. स्थावर-जंगम भूतजात व तसेंच दुसरेंहि सर्व चिन्मात्रावांचून कसें उपलब्ध होणार! मातीचें भांडें मृत्तिकेवांचून कधीं तरी दिसतें का? कधींच नाहीं. त्याचप्रमाणें काष्ठपाषाणादिही चिच्चमत्काररूप आहे. स्वप्नांतील वस्तुजात जसें चिद्भिन्न नाहीं, तसेंच आम्हांला जागृतींत चिद्वांचून कांहीं दिसत नाहीं. स्वप्नांत दिसणारा जो मोठा पाषाण तो चिद्विवर्तावांचून निराळा कोठून असणार? हे प्राज्ञ रामा! याविषयीं तूं विद्वानांशीं युक्तीनें वादविवाद कर आणि त्यांच्या अनुभवाशीं आपला अनुभव जुळतो आहे असें पाहून निश्चय कर. विचारानें तत्त्वदर्शन झालें म्हणजे ती प्रसिद्ध चितच स्वप्नांतील पाषाण आहे, याविषयीं संशय राहणार नाहीं. स्वप्न जशा आकाराचें आहे तसेंच जाग्रत्‌हि अखंडित चित्स्वरूप आहे. चिन्मात्र ब्रह्मच अध्यारोपप्रसंगीं जगदाकारानें विभक्त झालें आहे; पण त्या अध्यारोपाचा अपवाद झाला असतां सर्व जगत् चिन्मात्र ब्रम्हमय होतें. मातीचें भांडें मृत्तिकेवांचून जसें उपलब्ध होत नाहीं, तसें चिन्मय चेत्य म्हणजे विषयजात चिद्रहित उपलब्ध होत नाहीं. पाषाणमय पात्र पाषाणावांचून जसें उपलब्ध होत नाहीं, त्याप्रमाणें चिन्मय चेत्य चिच्छक्तीवांचून उपपन्न होत नाहीं. द्रवरूप जल द्रवरहित जसें दिसत नाहीं, तसें चिन्मात्र चेत्य चिद्वांचून उपलब्ध होत नाहीं, ऊष्मरूप अग्नि निरूष्म जसा दिसत नाहीं त्याप्रमाणें चिन्मय चेत्य चिच्छून्य दिसत नाहीं. स्पंदस्वभाव वायु स्पंदशून्य जसा नसतो, त्याप्रमाणें चित्स्वभाव चिच्छून्य संभवत नाहीं. अहो, जें ज्या स्वभावाचें असतें, त्याला सोडून तें कसें दिसणार? शून्यरहित आकाश कधीं तरी दिसतें का? अमूर्त पृथ्वी कधीं कोणीं पाहिली आहे का? स्वप्नांतील घटपटादि पदार्थ जसे केवल चिदाकाशस्वभावच असतात, तसें हें जागृतींतील पर्वतादिक जगत् चिदाभासमात्र आहे. स्वप्नांत दिसणारीं नगरादिक जशीं चिन्मात्रस्वरूपाचीं असतात, तशींच जागृतींतील नगरेंहि चिन्मयच आहेत. यास्तव हे ऐश्वर्यसंपन्न रामा! स्वप्न व जाग्रत् हा विचार सोडून दिला म्हणजे शान्त, अनंत असें एक चिन्मात्रच अवशिष्ट रहातें. परंतु या इतक्या स्पष्ट तत्त्वाविषयींहि वादी व्यर्थ वाद करीत असतात. १०५.

---

# सर्ग १०६ वा.

१ लक्षणांसह चिदाकाशाचें पुनः वर्णन, २ आणि तेंच हें जगत् आहे असें पुनरपि प्रतिपादन.

**श्रीराम:**—हे ब्रह्मन्! जें परब्रह्म म्हणून म्हणतां तें चिदाकाश कशा प्रकारचें आहे तें मला पुनः सांगा. तुमचें हें वागमृत ऐकत असतां माझी तृप्ति होत नाहीं.

**श्रीवसिष्ठ:**—रामा! दोघां जुळया भावांचीं दोन निरनिराळीं नांवें व्यवहारासाठीं जशीं ठेवतात, त्याप्रमाणें अखंड चित्-स्फटिक-शिलेंतील प्रतिबिंबासारख्या दोन प्रपंचांना जाग्रत् व स्वप्न हीं दोन नांवें ठेविलीं जातात. वस्तुतः त्यांचा भेद नाहीं. दोन ठिकाणच्या पाण्यामध्यें जसा वास्तविक भेद नाहीं, त्याप्रमाणें त्या दोन्ही अवस्था हें एकच निर्मल चिन्मय आकाश आहे. एका निमिषांत डोळ्यापासून फार दूर असलेल्या चंद्रबिंबापर्यंत जाऊन पोंचलेल्या संविदूचें मध्यें जें स्वरूप असतें, त्याला चिदाकाश म्हणतात. मूळांच्या द्वारा स्वच्छ रसांचें आकर्षण करीत असलेल्या वृक्षाचा जसा आल्हादभाव असतो, म्हणजे त्या वेळीं तो जसा अतिशय सुखानुभव घेत असतो, तसाच श्रुतिप्रसिद्ध जो स्वाभाविक आल्हाद तेंच चिदाकाश होय. ज्याच्या सर्व इच्छा पूर्णपणें निवृत्त झाल्या आहेत, व त्यामुळें ज्याचें चित्त पूर्णपणें शांत झालें आहे, तो जसा सर्व विक्षेपशून्य होऊन सहज सुखस्वरूपाचा अनुभव घेतो, त्याप्रमाणेंच चिदाकाश नित्य सुखानुभवांत स्थित असतें. गाढ झोंप लागण्यापूर्वी मन निर्विषय झालें असतां स्वस्थ झालेल्या पुरुषाचें जें स्वरूप त्याला चिदाकाश म्हणतात. पावसाळ्यांत किंवा शरदृतूंत वृद्धि पावणाऱ्या तृण—गुल्म—लतादिकांचा जो ममताशून्य आनंदभाव त्यास चिदाकाश म्हणतात. संकल्प-विकल्पशून्य जिवंत मनुष्याचा जो शरदाकाशासारखा स्वच्छ भाव तेंच चिदाकाश होय. काष्ठ, पाषाण, पर्वत इत्यादिकांचें ब्रह्मदेवानें स्वभावतःच जें निष्क्रिय अवस्थान नियत केलें आहे, तेंच जर चेतन जीवांचें सत्तास्वरूप असेल, तर तेंच चिदाकाश होय. द्रष्टा, दर्शन, दृश्य या तिहींचा ज्याच्यापासून उदय होतो व ज्यांत अस्त होतो, म्हणजे ज्या सुषुप्तीच्या साक्षीपासून स्वप्न व जाग्रत् या अवस्थांमध्यें त्रिपुटीचा उदय होतो व ज्यांत अस्त होतो, तेंच निरामय चिदाकाश आहे, असें तूं समज. हे सर्व विचित्रपदार्थानुभव ज्याच्यापासून उदय पावतात व संकल्प, विकल्प, निश्चय, त्याग, ग्रहण इत्यादि रूपानें उत्तरोत्तर ज्यामध्यें परिणाम पावतात तें चिदाकाश होय. ज्यामध्यें हें सर्व आहे, ज्याच्यापासून हें सर्व होतें, जो हें सर्व आहे व जो नित्य सर्वतः व सर्वमय आहे, त्याला चिदाकाश म्हणतात. स्वर्गांत, भूलोकीं, त्याचप्रमाणें आंत व बाहेर जो अवभासरूप व समसंज्ञक आत्मा भासतो, त्यालाच चिदाकाश म्हणतात. त्या नित्य व्यापक चिदाकाशांत हें मूर्तामूर्त जगत् ओंवलेलें आहे. त्याच्यापासूनच याचा उद्भव झाला आहे व तंतूमध्यें जशी पुष्पमाला रहाते, त्याप्रमाणें या दृढ तंतुरूप चिदाकाशांत सर्व विश्व राहिलें आहे. तात्पर्य, सर्व विश्वाला जें धारण करतें तेंच चिदाकाश होय. ज्यापासून उत्पत्ति, स्थिति व लय या विक्रिया होतात, ज्याच्यामध्यें त्यांचा लय होतो, तें चिदाकाश होय. सर्व विकार तन्मय असतात. निद्रा निवृत्त झाली असतां ज्यापासून हें विश्व प्रवृत्त होतें, म्हणजे जाग्रत्स्वप्नरूप व आकाशादिरूप विश्व प्रकट होतें, आणि ज्याची विक्षेपशक्ति

शांत झाली असतां विश्व निवृत्त होतें, तें चिदाकाश होय. ज्याच्या उन्मेषनिमेषानें जगाच्या सत्तेचा लय व उदय होतो व जें आपल्या अंतःकरणांत स्वानुभवरूपानें स्थित आहे, तेंच चिदाकाश आहे असें तूं समज. हें स्थूल जगत्‌हि ब्रम्ह नव्हे व सूक्ष्म जगत्‌हि ब्रम्ह नव्हे, अशा सर्व जगाचा निषेध केल्यावर त्याचा अवधि या रूपानें जें सर्वात्मक तत्त्व रहातें, पण ज्याच्याविषयीं शब्दव्यवहार करतां येत नाहीं, तें चिदाकाश होय. इंद्रिय व विषय यांच्यामध्यें जें निर्विषय संविद्रूप असतें तेंच चिदाकाश म्हटलेलें आहे. हें विश्व तन्मयच आहे. तें निरनिराळ्या गुणधर्मांचें जरी दिसत असलें तरी तें संविद्रूपच आहे. त्याच्यामध्यें थोडासा विकार होतांच तें जणुं काय अन्यत्वास प्राप्त होतें. पण वस्तुतः तें नित्य, निर्विकार व एकरूपच आहे. ही अन्यत्वभ्रांति वासनेमुळेंच होते. यास्तव हे रामा, तूं इंद्रियांनीं विषयांना जरी पहात असलास तरी खरोखर सर्व वासना सोडून केवळ ज्ञानस्वरूप व सुषुप्तावस्थसा होऊन रहा. सर्व वासनाशून्य —शांतचित्त होऊन मग भाषण कर, गमन कर, जलादिकांचें प्राशन कर, किंवा वाटेल त्या विषयांचें सेवन कर. पाषाणाप्रमाणें नित्य घनमौनवान्‌ हो. तूं हें जें दृश्य आपल्यासमोर पहात आहेस तें संभवत नाहींच. मृगजलाप्रमाणें किंवा चंद्रांतील द्वैताप्रमाणें हें मिथ्या भासत आहे. योग्य कारणांचा अभाव असल्यामुळें हें आरंभींच उदय पावलेलें नाहीं. कारणावांचून कार्य कधींच उपपन्न होत नाहीं. किंवा जें कांहीं बीजापासून अंकुरादिक उत्पन्न होतेंसें दिसतें, तेंहि कारणशून्य अद्वय ब्रम्हापासूनच होतें. अहो पण निर्विकार ब्रम्हापासून अंकुरादि कार्य कसें उत्पन्न होईल, म्हणून विचारशील तर तें परमतत्त्व जसेंच्या तसेंच स्थित असतांना जणुं काय उद्भवल्यासारखेंच भासतें. रामा ! तें परब्रम्ह जसेंच्या तसेंच आहे. त्याचें पूर्वरूप नित्य अवस्थित असतें. पण जसें एक चंद्रबिंबहि भ्रांतीनें दोन असल्यासारखें दिसतें, त्याप्रमाणेंच तें भ्रमानें द्वैतरूप भासतें. पण ब्रम्हच असतांना तें जड द्वैत कसें भासेल म्हणून विचारशील तर सांगतों. स्वरूपाहून भिन्न असें हें सर्व आहे, हाच अनुभव अतिशय दृढ झाला कीं हें भ्रामक स्वप्नांतील स्त्रीप्रमाणें दिसूं लागतें. तें दृढ वासनेमुळेंच असें भिन्नरूपानें भासतें. यास्तव दृश्य उत्पन्न झालेलें नाहीं, तें विद्यमान नाहीं व पुढेंहि नसेल. कारण ज्याला अस्तित्वच नाहीं त्याचा नाश कोठून होणार ? जगांतील प्रत्येक पदार्थ शांत व चिदाकाश आहे. तेंच तशा विश्वरूपानें स्थित आहे. तें आपल्या स्वरूपापासून कधींहि च्युत होत नाहीं, स्वरूपांतच स्थित आहे. तें सदा निर्विकार आहे. तथापि जणुं काय जगद्रूपानेंच उदय पावलें आहे. आतां आपण जें पहात आहों तें दृश्य उत्पत्तीच्या पूर्वीं नसतें. तेव्हां त्याला सत्‌ कसें म्हणतां येईल ? जेव्हां दृश्य नसतें तेव्हां द्रष्टाहि नसतो. दृश्य अर्थाच्या अभावीं द्रष्टृत्व तरी कोठलें ?

श्रीरामः—हे भगवन्‌ ! असें जर आहे, ह्मणजे द्रष्टा व दृश्य हे दोन्हीं जर अत्यंत असत्‌ आहेत तर त्यांचा अवभास कसा होतो ? व हें द्रष्टृ-दृश्य म्हणजे आहे तरी काय ? कारण अत्यंत असत्‌ असलेली वस्तु दिसणार कशी ? हें मला पुनः एकदां सांगा. हे वक्त्यांतील श्रेष्ठा ! आपण पूर्वीं हें सांगितलेलें आहे, तथापि पुनः सांगा.

श्रीवसिष्ठः—हे रामा ! कारणाचाच अभाव असल्यामुळें या असद्रूप दृश्याची उत्पत्ति संभवत नाहीं. तथापि त्याला दृश्य म्हणणें हा नुस्ता प्रौढिवाद आहे. दृश्यतेचा सर्वथा

असंभव आहे. द्रष्टा व दृश्य या भ्रमरूपानें जें हें कांहीं जगदादिक दिसत आहे, तें परमात्म्याचें परमरूप आहे, असें तूं जाण. स्वप्नांतील आकाशादि विश्व व अरण्य जसें चिन्मात्रच असतें, तसें चिन्मात्रच स्वरूपांत स्वतः जगद्रूपानें भासतें. याचें आदिसर्गापासूनच उपादानकारण कांहीं नाहीं. तथापि केवल ब्रह्म हें असें भासत आहे. जें चिदाकाशाचें स्फुरण आपोआप स्वरूपांत विकास पावतें, तेंच हें भासणारें सर्व द्वैत होय. त्याचाच हा जगद्रूप आकार दिसत आहे. जसें पदार्थाचें पदार्थत्व, शून्याचें शून्यत्व, साकार पदार्थाचा आकार, तसेंच चिदाकाशाचें जगत् आहे. हा चिदाभासच आहे असें समज. तें परमार्थानें परिपूर्ण आहे. तें आनंदैकरसरूप आहे. स्वतःच द्रष्टा, दृश्य, दर्शन या रूपानें भासत आहे. पण वस्तुतः द्वैताचा अभाव असून त्याचा भासहि होत नाहीं व त्याचें प्रकाशनहि होत नाहीं. हें कांहीं तरी अनिर्वचनीय तत्त्व आहे. त्याला सत् किंवा असत् असें कोण जाणणार?

**श्रीरामः**—हे ब्रह्मन्! परमार्थतत्त्व जर द्रष्टा व दृश्य यांनीं रहित आहे, तर मग हा कार्यकारणतादि भेद कसा भासतो? द्रष्ट्यावांचून त्याची सिद्धि होणें शक्य नाहीं. कोणत्या उपादानकारणापासून किंवा निमित्तापासून तो झालेला आहे? तो जर असत्यच असेल तर सर्व लोकांना सत्यत्वानें कसा भासतो!

**श्रीवासिष्ठः**—हे रामा! वस्तुतः स्वात्मा चित्प्रकाश ईश्वर स्वतः जेव्हां ज्या प्राण्यांत काम-कर्म-वासनानुसार जशी भावना करतो तसें तसें तूं तात्काल पहातोस. तुझ्या रूपानें तोच आपल्या सत्यसंकल्पानें पूर्वोक्त द्रष्टृदृश्यभावाचा अनुभव घेतो. हा कार्यकारणभावादि आकार चिदाकाशच आहे. ज्याप्रमाणें मृत्तिकाच घट असते त्याप्रमाणें चिद्रूपच जगदाकार आहे. चिदाकाशच याचें उपादान कारण असून मोह हेंच निमित्त आहे. हें कशावरून ह्मणशील तर सांगतों. कारण हा जीव 'हें सर्व आकाशच आहे' असें कळलें कीं, मोहित होत नाहीं व तसें जोंपर्यंत कळलेलें नसतें तोंवर मोहित होतो. जसा स्वप्नांत तो स्वतःच मोहित होतो व जागा होतांच तो मोह टाकतो त्याप्रमाणेंच हें होतें. अहो, पण स्वात्मबोधाविषयीं समर्थ असलेला हा ईश्वर स्वतःच जीव होऊन मोहित कां होतो? असा त्या स्वतंत्र ईश्वराला प्रश्न करणारा कोण आहे? दुधाचें दही होणें, मातीच्या गोळ्याला घटभाव प्राप्त होणें इत्यादि प्रसंगीं पूर्वरूपाची निवृत्ति होऊन उत्तरभावाची उत्पत्ति होईपर्यंत मध्यें जें एक क्षणभर संविन्मात्ररूप असतें तें परमार्थसत्य संविदेचें स्वरूप असून तेंच चिदाकाश म्हणून मीं पूर्वीं सांगितलें. तेंच हें सर्व वस्तुजात आहे. त्या चिद्रूपामुळेंच याला सत्यत्व प्राप्त झालें आहे. ईश्वराच्या जीवभावकल्पनेविषयीं जसा प्रश्न करतां येत नाहीं, त्याचप्रमाणें जीव आपल्या अविद्येनें कार्यकारणरूप अवस्थात्रय जरी कल्पित असला तरी त्याविषयीं प्रश्न संभवत नाहीं. कारण कार्यकारणभावादि दृष्टि हा अविद्येचा विलास आहे व स्वतः जीवच जगाप्रमाणें त्याची कल्पना करीत असतो, ह्मणजे तो स्वतःच तें सर्व करीत असल्यामुळें व प्रश्न करणाराहि त्याहून निराळा कोणी नसल्यामुळें 'मी असें कां करतों' असा प्रश्नच संभवत नाहीं. जर द्रष्टा, भोक्ता किंवा कर्ता आत्म्याहून कोणी दुसरा असता, तर 'हें दृश्य कसें झालें? कां झालें,' असे प्रश्न करणें युक्त झालें असतें. पण येथें सर्व तोच आहे, त्यामुळें प्रश्न संभवत नाहीं. अहो, स्वप्नांत जेथें एक, अनन्य, शुद्ध निराभास चिदाकाशच विराजमान होत

असतें, तेथें कोण, काय, कसें इत्यादि प्रश्न संभवत नाहींत. चतुर्मुखापर्यंत सर्वांना ही चिन्मात्रांतील सृष्टिकल्पना प्रतीत होत आहे. तत्त्वाचें अज्ञान हेंच तिचें कारण आहे. तिचें यथार्थ स्वरूप कळलें कीं, तीच एका क्षणांत ब्रम्ह होते. ही सृष्टिभ्रांतिच तत्त्वतः अज्ञात असणें हिलाच शास्त्रांत 'माया' असें म्हणतात, व्यवहारांत जगत् असें म्हणतात, अज्ञलोक तिला अविद्या असें व विवेकी दृश्य असें म्हणतात. चिदाकाशाच्या प्रकाशानें चित्स्वभाव प्रकट होणें हेंच दृश्यपिशाच होय. वस्तुतः तें दृश्यपिशाच नसतांनाच बालकानें कल्पिलेल्या वेताळाप्रमाणें विद्यमान असल्यासारखें भासतें. आत्म्यामध्यें नसलेली ही जगत्ता चिदाकाशाकडूनच अनुभविली जाते. स्वप्नांतील नगराप्रमाणें किंवा पर्वताप्रमाणें ती असत्य असूनहि सत्य असल्यासारखी व निरवयव असूनहि सावयव असल्यासारखी भासते. स्वप्नांतील नगरादिकांप्रमाणें 'मी पर्वत, मी रुद्र, मी समुद्र, मी विराट' असें चिदाकाशांत चित्कडून कल्पिलें जातें. 'चिदनुभव हाच सर्ग, असें कां वर्णन करतां? प्रधान, परमाणु इत्यादि दुसऱ्या कारणांपासूनच हा झाला आहे असें कां वर्णन करीत नाहीं?' असें विचारशील तर सांगतों. कारणाच्या अभावामुळें हें साकार बनलेलें कार्य वस्तुतः कांहींच नाहीं. महाप्रलयरूप चिदाकाशांत ही चित् इदंरूपानें अशी स्थित झाली आहे. हें कारणशून्यच आकाश आकाशाकडून अनुभविलें जातें. त्याला 'जगत्' असें म्हणतात. तें निरवयव आहे. चिदात्म्याच्या आधारानें चिन्मात्ररूप स्थित आहे. सर्वच जंतु आरशाप्रमाणें आपल्या स्वरूपांत जगद्भेदाची कल्पना करतात, विचाराच्या अभावीं स्वरूपदर्शनाचें सामर्थ्य नाहींसें होऊन जड बनतात, आणि व्यर्थ आयुष्य घालवितात. पण विचार करणारे जे श्रेष्ठ पुरुष त्यांचा परम पुरुषार्थ प्रत्यगात्मरूप असल्यामुळें अगदीं समीप असतो. विचारानें स्वरूपाला जाणून कसें रहावें तें ऐक. तें तें नामरूपस्वरूप टाकून अवशिष्ट राहिलेलें चिन्मात्रच जगत् आहे, असें जाणून चिदेकरूप होऊन पाषाणाप्रमाणें अचल रहावें. मायिक देहादिकांवरील आस्था चांगली नव्हे. 'चित् जगद्रूपानें कसें स्थित आहे,' म्हणून विचारशील तर सांगतों. जसें जल आपल्या स्वरूपाला हालवून आवर्तादिरूप होतें, त्याप्रमाणें चित्हि स्वरूपामध्येंच चित्त्वाची कल्पना करून त्याचा अनुभव घेत रहाते. तें तिचें अनुभवरूप कर्म हीच जगद्दृष्टि होय. जसा कल्पद्रुम इष्ट मनोरथ पूर्ण करतो, किंवा चिंतामणी जें जें चिंतावें तें तें देतो, त्याप्रमाणें ही चित् मनांत ज्याची ज्याची भावना करावी, तें तें देऊन एका क्षणांत कर्त्याची इच्छा पूर्ण करते. चिंतामणीप्रमाणें किंवा कल्पवृक्षाप्रमाणें ही चिति स्वरूपांत आकाशरूपानेंच स्थित असली तरी सत्वर मनोरथ पूर्ण करते. दोन प्रदेशांमध्यें असलेलें जें चितीचें स्वरूप तन्मयच हें सर्व दृश्य आहे. तेव्हां त्यांत द्वैत व ऐक्य हे भ्रम कोठले? चितीची कांतिच जगद्वेषानें स्फुरण पावते. ती अति स्वच्छ, अनंत व व्यापक आहे. ती निरवयव आहे. तथापि आकाशांतील नीलवर्णाप्रमाणें दृश्यानें परिपूर्ण असल्यासारखी भासते. हे रामा, सृष्टीच्या आरंभीं चितूहून अगदीं विलक्षण असलेलें जें जड कार्य त्याचा अनुभव संभवत नाहीं. कारण त्याच्या उत्पत्तीला अवश्य असलेलीं जीं निमित्तभूत कारणें ती त्या वेळीं नसतात. त्यामुळें चित्स्वरूपांत वैलक्षण्य उत्पन्न होणें शक्य नाहीं. यास्तव जी आद्य चित् तेंच हें दृश्य आहे. त्याहून अतिरिक्त असें कांहीं अणुमात्रहि नाहीं. ही गोष्ट स्वप्नदृष्टान्तानें सिद्ध केली आहे. १०१.

## सर्ग १०७ वा.

—:०:—

१ पृथिव्यादिकांचें अवस्तुत्व. २ चिन्मर्णाचें स्फुरण हेंच जगत् होय.

श्रीवासिष्ठः—हे रामा, हें चिदाकाशच सभोंवार भासत आहे. निर्विषय चिन्मय हेंच विश्व. त्यामुळें त्याची सिद्धि केवळ चिन्मात्राच्या अधीन आहे. चित्, चेतनाक्रिया व चेत्यविषय ही त्रिपुटी चिन्मात्र आहे. त्यामुळें सर्व प्राणिवर्ग जिवंत असूनही मेल्यासारखाच होऊन राहिला आहे. हा, मी व तूं हें सर्व जिवंत असून मेल्यासारखेंच राहिलें आहे. आह्मी जरी व्यवहार करीत आहों, तरी काष्ठाच्या मौनाप्रमाणें अत्यंत निष्क्रिय आहों. त्यामुळें जणूं काय मृतच आहों. हे सर्व चराचर पदार्थ आकाशांत अमूर्तभावास प्राप्त झाले आहेत. चिदाकाशाच्या चकाकीप्रमाणें जें हें सर्व पसरलें आहे किंवा आकाशाच्या नीलत्वाप्रमाणें जें हें दिसत आहे, तें कांहींच नाहीं, असें तूं समज. कारण आकाशांत दुसरें काय असणार व कोठून असणार? केसाचा आकार, नदीचा प्रवाह, धूमपंक्ति, आकाशमौक्तिक इत्यादिकांप्रमाणें जें आकाश स्फुरतें तें वस्तुतः कांहींच नाहीं. त्याचा जरी अनुभव येत असला तरी त्यांत सत्यत्व नाहीं. त्याचप्रमाणें या जगत्संज्ञक चिदाकांशात हा सर्व भास जरी दिसत आहे, त्याचा साक्षात् अनुभव जरी येत आहे, तरी तें सर्व शून्य आहे. अशा आभासरूप जगांत आस्था काय ठेवावयाची? व अशा आस्थेला उत्पन्न करणारा त्यांत पदार्थ तरी कोणता आहे? पृथिव्यादिक हा भ्रांतिमात्र आकाशोदय आहे. ती सर्व चिद्बालकाची कल्पना आहे. ती शून्यरूप आहे, निरर्थक आहे, अवस्तुभूत आहे. अहो अज्ञजन हो! 'हें माझें, हा मी' अशी आस्था कां ठेवतां? ती सर्वथा अनुचित आहे. हां, समजलों! बाह्यसंकल्पामध्यें बालच रममाण होतो. अर्थात् त्याचें अज्ञानच त्याच्या त्या आस्थेचें कारण आहे. पृथिव्यादि असत् वस्तूच्या विचारानें तुमचें जीवित व्यर्थ जाईल. आकाशाचें क्षालन करण्यास तयार झालेल्या मनुष्याला कांहीं मिळणें शक्य नाहीं. सुवर्णादिकांचा लाभ व्हावा अशी इच्छा असल्यास त्यांच्या त्यांच्या खाणींचेंच क्षालन करावें लागतें. पृथिव्यादिकांचें सहकारी कारण कांहीं नाहीं, हें आम्ही पूर्वींच सांगितलें आहे. जें आरंभींच उत्पन्न झालें नाहीं तें आतां कोठून असणार? जे उत्पन्न न झालेल्या असत् वस्तूशीं आकाशांत व्यवहार करतात, ते मूढ मृत किंवा उत्पन्न न झालेल्या पुत्राचें पालन करतात. पृथिव्यादिक हे कोठून झाले? त्यांला कोणीं उत्पन्न केलें! त्यांचें स्वरूप काय आहे व ते कसे उद्भवले? या सर्व प्रश्नांचें उत्तर एकच आहे व तें हें कीं, चिदाकाशच हें असें जगद्रूपानें भासत आहे, पण तें शांत आहे. कार्य, कारण, काल इत्यादि कल्पनांनीं ज्याचें चित्त व्याकुळ झालें आहे, त्याच्या दृष्टीनें हे पृथिव्यादि पदार्थ आहेत. पण त्या मूढाशीं आम्हांला कांहीं कर्तव्य नाहीं. स्वप्नादिकांत चिदाकाशच जसें चिद्रूपानें भासतें त्याप्रमाणें जागृतींतील जगत्‌हि आकाशरूपच आहे. स्वप्नांत तें अपृथिव्यादिरूप असतें व जागृतींतील पृथिव्यादिरूपानें युक्त आहे. तथापि तें सर्व चिदाकाश आहे. रामा! स्वानुभव हेंच ज्याविषयीं प्रमाण आहे, असें हें चिदाकाशाचें निराकार स्वरूपच पृथिव्यादिरूपानें भासतें व त्यालाच वेद्य, दृश्य इत्यादि नांवें ठेविलीं आहेत. १०७.

———

# सर्ग १०८ वा.

१. अविद्यानाश होई तों जगाचा नाश सभवत नाहीं. २. याविषयीं विचित्र अविद्याख्यान. ६ त्यांतील विपश्चिचरित्रांतील शत्रूंच्या उत्थानाचें कथानक.

**श्रीरामः**—हे भगवन् ! ही चिदाकाश-स्वप्ननगरी विद्यमान असली तरी शून्यभूत आहे, ही अविद्याच दृश्यरूपानें अनुभवास येत आहे. पण अज्ञ पुरुषाला ही अशी किती दिवस दिसणार ? तिचें स्वरूप काय आहे ? तिचें तत्त्व काय आहे ! तिचा विस्तार किती मोठा आहे ? हें मला सांगा.

**श्रीवसिष्ठः**—हे रामा ! ज्या अज्ञपुरुषांना ही भूतलादिक अविद्या विद्यमान असल्यासारखी भासते, त्यांना ब्रम्हाप्रमाणेंच हिचाहि अंत लागत नाहीं. याविषयीं मी एक कथा सांगतों ती ऐक. आकाशाच्या एका कोंपऱ्यांत याच जगासारखें एक त्रिजगत् आहे. याच कालादि व्यवस्थेनें तें व्यवस्थित झालें आहे. जंबुद्वीपलक्षण भूस्थितीचें जणुं काय भूषणच असा एक भूमीचा भाग आहे. त्यांत पर्वत, कडे, वाळवंटें इत्यादि वैषम्य नसून सर्वत्र सपाट आहे. त्यामुळें तेथें मनुष्य, हत्ती, घोडे, रथ यांचा संचार अनायासें होतो. अशा त्या सम नगरींत 'तत्' या नांवाची एक पुरी आहे. त्या नगरींत विपश्चित् या नांवानें प्रसिद्ध असलेला एक राजा होता. तो मोठा विद्वान् असल्यामुळें श्रेष्ठ सभ्यांनीं युक्त असलेल्या सभेंत फार शोभत असे. कमलिनींमध्यें जसा राजहंस, नक्षत्रचक्रामध्यें जसा चंद्र व पर्वतसमूहांत जसा सुमेरु, त्याप्रमाणें तो आपल्या सभेंत शोभत होता. सर्वत्र उत्तरोत्तर गुणोत्कर्षांचें वर्णन करण्यास प्रवृत्त झालेलें कवींचें वचन या विपश्चित् राजापासून निवृत्त होत असे. कारण त्याचे गुण अनंत व निरुपम असल्यामुळें कवींमध्यें त्याचें वर्णन करण्याचें सामर्थ्य रहात नसे. तथापि कवि त्याचा आश्रय करून रहात असत. कारण या विपश्चित् राजापासून त्यांची संपत्ति, ख्याति व गुण यांचा उत्कर्ष होऊन त्यांची शोभाहि वाढत असे. त्यामुळें तो राजा मेरूप्रमाणें स्वाश्रितांना आपल्यासारखें करीत असे. प्रत्येक दिवशीं सकाळीं विकास पावणाऱ्या, व सर्व दिशांना शोभविणाऱ्या कमलाप्रमाणें त्याची शोभा प्रतिदिवशीं वाढत असून त्याचे आश्रितहि नित्य अधिक उत्कर्ष पावत असत. त्याची मति ब्राह्मणांचें हित करण्यांत तत्पर असे. तो मोठा मानी होता. तो अग्नीलाच आपलें अधिदैवत समजून अग्नि व ब्राह्मण यांचें समबुद्धीनें पूजन करीत असे. तो दुसऱ्या देवांना मुळींच ओळखीत नसे. त्याच्या मंत्र्यांतील धीर, बाहुबलानें अधिक, निर्भय, सैन्यानें युक्त असे चार मंत्री चार महासागरांप्रमाणें चार दिशांमध्यें परचक्राचा निरोध करून आपल्या देशाची मर्यादा पालन करण्यामध्यें तत्पर होते. सागर मत्स्य, मकर इत्यादि जलचरांच्या समूहानें युक्त असतात; हे मंत्री हत्ती, घोडे इत्यादिकांच्या समूहानें युक्त होते. समुद्र आवर्तांनीं युक्त असतात, हे मंत्री चक्रव्यूहांनीं युक्त होते. समुद्र मोठमोठ्या लाटांनीं युक्त असतात, हे मंत्री सैन्यांनीं युक्त होते. समुद्र अचल पर्वतांनीं बलाढ्य झालेले असतात, हे मंत्री विपुल सैन्यांनीं अजिंक्य होते. तो राजा त्या मंत्र्यांसह सर्व दिक्चक्रांची जणुं काय नाभिच असा आधारभूत होऊन सुदर्शनचक्राप्रमाणें शत्रूंना अत्यंत दुर्जय व स्वतः त्यांना जिंकणारा होता. एकदा त्याच्याकडे एक चतुर दूत पर्वदिङ्मुखांतून आला व एकांतांत कालाच्या वेगाप्रमाणें

प्रमाणें अनिवार्य व त्यामुळेंच भयंकर शब्द-युक्त असें वचन बोलला.

दूतः—हे देव, ही पृथ्वी सर्वदा तुझ्या भुजवृक्षाचा आश्रय करून सुखानें राहिली आहे. तिला सर्वदा तुझ्या बाहुबलाचाच आधार आहे. तिचें रक्षण करणें या आपल्या कर्तव्या-पासून तूं कधींहि च्युत झाला नाहींस. यास्तव महाराज, माझ्या तोंडून आपण एक वार्ता ऐका, आणि मग जें योग्य दिसेल तें करा. पूर्व दिङ्मुखांतील मर्यादेचें रक्षण करण्यासाठीं तूं ज्या मंत्र्याला नियुक्त केलें होतेंस तो तुझा मांडलिक मंत्री ज्वरानें अस्त पावला. ज्यानें सर्व शत्रूंना जिंकलें आहे, अशा तूं दिग्विजया-चा आरंभ करून आज्ञा केल्यामुळें दक्षिण-दिशेचा लोकपाल जो यम त्याला जिंकण्या-साठींच जणुं काय तो गेला आहे, असें मला वाटतें. तो मृत झाला असतां दक्षिण दिशेचा नायक असा जो तुझा सामंत मंत्री तो पूर्व व दक्षिण या दोन्ही दिशा आपल्या स्वाधीन करून घेण्यास प्रवृत्त झाला. पण त्यालाही शत्रूनें मारिलें. पूर्वापर सैन्याच्या साह्यानें त्याच्यावर आक्रमण करून तो शत्रु विजयी झाला. याप्रमाणें दक्षिण दिशेंतील तुझा सामंत मरण पावला असतां पश्चिम दिशेचा स्वामी असा तुझा सामंत सैन्य घेऊन जों पूर्व व दक्षिण या दोन दिशा आपल्या स्वाधीन करून घेण्यासाठीं मोठ्या आदरानें येत आहे, तोंच पूर्व देशांतील राजांनीं दक्षिण दिशेंतील राजांशीं एकमत होऊन त्याला अर्ध्या रस्त्यांतच गांठून ठार मारलें.

श्रीवसिष्ठः—हा दूत असें जो बोलत आहे तों प्रलयकालीं जलाचा प्रवाह—ओघ जसा ब्रह्मांडांत शिरतो तसा दुसरा एक दूत मोठ्या त्वरेनें राजगृहांत शिरला.

दूतः—हे महाराज, उत्तरदिशेंतील सेना-ध्यक्षावर शत्रूंनीं चढाई करून त्याला रणांतून मागें हटविलें आहे, त्यामुळें धरण फुटलें असतां जलाचा समूह जसा वेगानें वाहूं लागतो त्याप्रमाणें तो तुझा मंत्री सैन्यासह इकडेच येत आहे.

श्रीवसिष्ठ—ही वार्ता ऐकून तो राजा, या वेळीं कालक्षेप करणें वस्तु व वास्तु यांना हितावह नाहीं असें समजून, आपल्या श्रेष्ठ मंदिरांतून बाहेर पडतांपडतां जवळच्या लोकांस म्हणाला—"सामंत राजे व मंत्री यांना सज्ज करून सत्वर आणवा. आपलीं शस्त्रागारें उघडा. भयंकर शस्त्रें त्यांच्या हातीं द्या. अंगांत चिलखतें घाला. पायदळांतील लोकांना एकदम तयार होऊन येऊं द्या. सैन्याची सत्वर गणना करा. त्यांत श्रेष्ठ लोकांची योजना करा. सेना-ध्यक्ष नेमा व चहूंकडे गुप्त हेर पाठवा."

श्रीवसिष्ठः—राजा त्वरेनें युक्त होऊन असें बोलत असतां व त्याच्या मनांत मोठा क्षोभ उत्पन्न झाला असतां, द्वारपाल मोठ्या गडबडीनें व आकुल चित्तानें येऊन वंदन करून असें म्हणाला.

प्रतिहारः—देव! उत्तरदिशेंतील सेनाध्यक्ष द्वारावर येऊन उभा आहे. कमल सूर्यदर्शनाची जशी अपेक्षा करतें, त्याप्रमाणें तो देवाधि-देवांच्या दर्शनाची आकांक्षा करीत आहे.

राजाः—तर मग सत्वर जा व प्रथम त्यालाच घेऊन ये. त्याच्या तोंडून सर्व वृत्तांत ऐकून दिगंतीं काय घडलें तेंच अगोदर समजून घेऊं या.

श्रीवसिष्ठः—राजानें असें सांगतांच प्रति-हार उत्तरदिशेंतील सेनापतीला आंत घेऊन आला व राजा आपल्यापुढें प्रणाम करीत असलेल्या सेनाध्यक्षाला पहाता झाला. त्याचें सर्व अंग छिन्नभिन्न झालें होतें. त्याच्या सर्व

शरीरांत बाण रुतलेले होते. तो श्वासानें व्याकुल झाला होता. तोंडानें रक्त ओकीत होता व अंगांत शक्ति न राहिल्यामुळेंच शत्रूकडून पराभूत झाला होता. तथापि धैर्यानें प्रणाम करून आपली शरीरव्यथा सहन करून धापा टाकीत असलेला तो हें अशा प्रकारचें वचन सत्वर बोलला.

सेनाध्यक्षः—हे देव! आपले तिन्ही दिक्पाल सैन्यासह जणुंकाय तुझ्या आज्ञेनेंच यमाला जिंकण्यासाठीं यमलोकीं गेले आहेत. त्यानंतर त्यांच्या देशांचें पालन करण्यास असमर्थ असलेल्या मजवर पुष्कळ राजे सैन्यासह चाल करून आले. आपल्या ह्या मंडलावर फार मोठें शत्रुसैन्य चाल करून आलें आहे. तरी त्यांनीं जिंकलेल्या आमच्या सैन्याची जशी दुर्दशा झाली आहे, तशाचि आपण त्यांची दुर्दशा करा. आपल्याला त्यांचा पराभव करणें अशक्य नाहीं.

श्रीवसिष्ठः—रामा! रणांगणांत शस्त्रप्रहारांनीं जर्जर झालेला तो आर्त सेनाध्यक्ष असें जो बोलत आहे तों दुसरा एक पुरुष एकाएकीं प्रवेश करून असें म्हणाला—'हे नरेश्वर! हे नरेश्वर! या देशाचे लोक, अश्वत्थाची पानें जशीं वाऱ्यानें हालतात, तसे भयानें कांपूं लागले आहेत. कारण चारहि दिशेंत शत्रूंचें सैन्य येऊन स्थित आहे. लोकालोक पर्वताच्या तटांनीं भूमीला जसें वेढलें आहे, त्याप्रमाणें चक्र, गदा, प्रास, भाले इत्यादि शस्त्रांनीं उग्र दिसणाऱ्या शत्रूंनीं आमची भूमि वेढली आहे. आकाशांतून उड्डाण करणाऱ्या त्रिपुरसमूहाप्रमाणें रथ सभोंवार फिरत आहेत, त्यांवरून ध्वज फडकत आहेत. त्यांवर असंख्य आयुधें व भयंकर योद्धेहि आहेत. पायांनीं चालणाऱ्या योध्यांची त्यांच्या सभोंवार मोठी गर्दी झाली आहे. वर्षाऋतूंमधील मेघसमूहाप्रमाणें त्या सैन्यांत गर्जना करणारे हत्तींचे समूह असून ते आपल्या सोंडा वर करीत असल्यामुळें जणुं काय आकाशांत मांसवृक्षांचें वनच असल्याचा भास होत आहे. वायूनें हालणाऱ्या महासागराप्रमाणें घोड्यांचे समूह खिंकाळत आहेत व आपल्या गतीनें पृथ्वीच्या उंचसखल प्रदेशांप्रमाणें स्वतः तेहि उंचसखल होत आहेत. म्हणजे उंचवट्यावर चढतांना ते आपलीं शरीरें उंच करतात व उतरणीवरून उतरतांना ते खालीं वांकतात. अश्वांचे समूह हेच मोठे जलाचे पूर असून जलाप्रमाणें त्यांनाहि फेंस आलेला असतो व भोंवऱ्याप्रमाणें ते वर्तुलाकार फिरत असतात, त्यामुळें ते क्षार समुद्राच्या पाण्याप्रमाणेंच दिसतात. प्रलयकालच्या समुद्राचा पूर मोठमोठ्या तरंगांनीं जसा दाही दिशांना व्यापून सोडतो, त्याप्रमाणें त्या सैन्यांनीं दशदिशा व्यापून टाकल्या. त्यांच्या अंगांत आकाशाप्रमाणें स्वच्छ चिलखतें आहेत व तशींच चकाकणारीं शस्त्रें त्यांनीं धारण केलीं आहेत. त्या सैन्याच्या अंगावरील बाण, अस्त्र, शस्त्र, कवच, मुकुट, अलंकार यांच्या कांति तुझ्या प्रतापाग्नीच्या ज्वालाप्रमाणें इतस्ततः पसरत आहेत. समुद्राचे मोठमोठे तरंग, मकर, मत्स्य, चक्र, आवर्त यांसह जसे उठतात, त्याप्रमाणें सैन्याचे समूह परस्पर संघट्टन करून वर उठत आहेत. त्यांतील कांहीं सैन्यांनीं मत्स्याकारव्यूह रचला आहे. कांहींनीं मकराकार रचला आहे. कित्येकांनीं आवर्ताकार व चक्राकार रचना केली आहे. भाले, तरवारी इत्यादि आयुधें एकमेकांवर आपटून जणुं काय रागावल्याप्रमाणें हुंकारासारखे झणत्कार करीत आहेत. त्यांतून ठिणग्या निघत आहेत, व मोठा आवाजहि होत आहे. महाराज! आपल्याला ही गोष्ट कळविण्यासाठीं माझ्या स्वामीनें म्हणजे आपल्या

सामंतानें मला आपल्याकडे पाठविलें आहे. या देशाच्या सीमेवरील आपल्या किल्ल्यांतून युद्धासाठीं बाहेर जाणाऱ्या त्यानें हें कळविण्यासाठींच मला आपल्याकडेच पाठविलें आहे. आतां शक्ति, ऋष्टि, बाण यांनीं युक्त होऊन आपल्या स्वामीकडे मी जातों. त्याचें वचन आपणापुढें निवेदन केलें आहे. याउपर काय करावयाचें तें आपलें आपण ठरवा.

श्रीवसिष्ठः—असें बोलून व प्रणाम करून तो दूत त्वरेनें निघून गेला. सागराचा तरंग गुडगुड आवाज करून जसा शांत होतो, तसाच तो प्रकार घडला. रामा, त्या वेळीं त्या राजमंदिरांत मोठीच गडबड उडाली. भयंकर वायूनें व्याकुळ केलेलें वन जसें दिसतें, तसेंच तें गृह त्या वेळीं दिसलें. मंत्री, राजे, योद्धे, राजाच्या आज्ञेप्रमाणें वर्तन करणारे इतर लोक, हत्ती, घोडे, रथ, स्त्रिया, इतर परिवार व नागरिक जन हे सर्व भयानें व्याकुळ होऊन राजगृहांत आले. सर्वांनीं भयभीत होऊन आपापलीं शस्त्रें उचललीं. १०८.

---

## सर्ग १०९ वा.

१ मंत्र्याचें वचन ऐकून ज्यानें आपला देह अग्नींत हवन केला आहे, त्या राजाचें अग्नींतून चार देहांसह समुत्थान.

श्रीवसिष्ठः—इतक्यांत ज्याचे आकाश व भूमि हे दोन्ही लोक दैत्यांनीं आक्रमिले आहेत अशा इंद्राजवळ जसे मुनि येतात, तसे राजाजवळ त्याचे सर्व मंत्री आले.

मंत्रीः—महाराज! आम्ही सर्व गोष्टींचा पूर्णपणें विचार करून निर्णय केला. हे शत्रु साम, दान व भेद या तिन्ही उपायांना योग्य राहिले नाहींत. यास्तव त्यांना आतां दंडच करावा. आजपर्यंत आपण कधीं दान, मान, इत्यादिकांनीं स्नेह केलेला नाहीं, किंवा त्यांच्या सेनेमध्यें कांहीं मिषानें प्रवेश करून काकोलूकन्यायानें कपट करून शत्रूचा वधहि केला नाहीं. आजपर्यंत आपण उघड उघड शौर्यानेंच विजय मिळविला आहे. तेव्हां आतांच साम, दान, भेद करण्याची व त्यामुळें या शत्रूंना पराभूत करण्याची वार्ताच कशाला पाहिजे! हे शत्रु पापी आहेत, म्लेच्छ आहेत व धनाढ्य आहेत. अनेक देशांतील ते एकत्र जमले आहेत. ते असंख्य आहेत, व त्यांना आमचें छिद्र कळलें आहे. यास्तव ते आतां सामादि उपायांनीं अनुकूल करून घेतां येणें शक्य नाहीं. ते त्या उपायांना योग्यच नाहींत. त्यांनीं हें मोठें साहसच केलें आहे. यास्तव त्यांचा प्रतिकार करण्यावांचून दुसरा उपाय नाहीं. करितां आतां सत्वर रणोद्योग करा. वीरांना आज्ञा द्या. इष्ट देवतांचें पूजन करा, सर्व सामंतांना बोलवा, रणदुंदुभि वाजवा, सर्व योद्ध्यांना सज्ज करा व त्या सर्वांना रणांगणांत जाण्यासाठीं बाहेर पडूं द्या. सर्व दिशा कल्पांतींच्या मेघांप्रमाणें मत्त हत्तींनीं भरून सोडा. धनुष्यांचे टणत्कार सुरू करा. त्यांवरून गुण चढवा. अर्धमंडलसदृश धनुष्यांनीं दिशा मेघाप्रमाणें काळ्याकुट्ट होऊं द्या. सिंहनाद करणाऱ्या शूरांना मेघांप्रमाणें बाणांची वृष्टि करूं द्या. त्या वृष्टिसमयीं धनुष्याच्या ज्या विजेप्रमाणें चमकोत व टणत्कार मेघगर्जनेसारखे भासोत.

राजाः—"युद्धासाठीं सत्वर निघा. नगररक्षण, व्यूहरचना इत्यादि सर्व पूर्व तयारी करा. मी स्नान करून व अग्नीचें पूजन करून रणांगणांत येतों." असें बोलून त्याला त्या वेळीं अनेक कर्तव्यें जरी होतीं, तरी एका

क्षणांत पावसाळ्यांतील नवोद्यानाप्रमाणें गंगाजलानें भरलेल्या घटांनीं त्यानें स्नान केलें. लागलीच तो अग्निगृहांत गेला. यथाशास्त्र आदरानें अग्नीची पूजा केली, आणि तो आपल्या मनांत असा विचार करूं लागला. " मीं आपलें आयुष्य अनायासानें प्राप्त झालेल्या ऐश्वर्याचा उपभोग घेत विलासानें घालविलें. आपल्या शासनमुद्रेनें मुद्रित केलेलें अभय आसमुद्रान्त सर्व प्रजेला दिलें. ज्यांनीं भूपीठाचें आक्रमण केलें आहे अशा शत्रूंना पराभूत करून अधीन ठेवलें. फलभारानें वेली जशा नमतात, त्याप्रमाणें दाही दिशांतून करादि फल घेऊन त्यांना नमविलें. प्रजांचें चित्त याच चंद्रबिंबावर धवल यश कायमचें कोरून ठेवलें. भूमींत तिन्ही लोकांत पसरणारी कीर्तिलता लावली. सुहृद्, मित्र, व बंधु यांना कोशाप्रमाणेंच रत्नांनीं भरून सोडलें. नारिकेलरसासव समुद्राच्या तीरावर बसून प्राशन केलें. शत्रूंचे प्राण बेडकाच्या गळ्याखालील त्वचेप्रमाणें कांपविले. द्वीपान्तरांतील कुलपर्वत माझ्या शासनानें अंकित झाले. दिगंतीं प्रसिद्ध असलेल्या सुवर्णादि भूमींत सिद्धसैन्यांतून विहार केला भूमीवरील लोकालोकपर्वतापर्यंत असलेल्या पर्वतांच्या व राजांच्या मस्तकावर मेघाप्रमाणें विश्रांति घेतली. ज्याप्रमाणें ज्ञानपूर्ण बुद्धि एकांतीं समाधिनिष्ठ होऊन ब्रम्हपदीं विश्रांति पावते त्याप्रमाणें प्रजेचे इष्ट मनोरथ पूर्ण करणाऱ्या मीं सर्व राष्ट्रांची वृद्धि केली. अनम्र राक्षसांनाहि दृढशृंखलांनीं बद्ध केलें. धर्म, अर्थ व काम यांच्या परस्पर अविरोधानें मीं आपलें आयुष्य घालविलें, म्हणजे सर्व जन्मभर त्यांचेंच अविरोधानें संपादन केलें आणि आतां जणुंकाय धवल यशाचें यथेच्छ पान केल्यामुळें मला वार्धक्य प्राप्त झालें आहे. त्यामुळें तृणावर पडलेल्या दंवाप्रमाणें माझें सर्व अंग शुभ्र केसांनीं धवल दिसत आहे. सर्व भोगांविषयीं माझें मन आतां विरक्त झालें आहे. अशा वेळीं माझ्यावर हे भयंकर व बलाढ्य शत्रु युद्धाची इच्छा करून व सर्व मिळून चाल करून आले आहेत. युद्धांत जय होईलच अशी खात्री नाहीं. यास्तव आतां या जय देणाऱ्या अग्निदेवालाच मी आपल्या मस्तकाची आहुति देतों.

राजाः—हे कृशानो देवा! हें माझें मस्तक आतां तुझ्या आहुतित्वास प्राप्त झालें आहे. हे देवाधिदेवा! पूर्वीं इष्टींतून मी जसा पुरोडाश देत होतों तसें आतां हें मस्तक देत आहे. भगवन्! या माझ्या कृतकर्मानें जर तूं संतुष्ट झाला असशील तर तुझ्या कुंडांतून माझे चार देह उत्पन्न होवोत. बलवान्, श्रीनें दीप्त अशा नारायणाच्या चार भुजांप्रमाणेंच ते माझे देह बलवान् व दीप्त असोत. त्या चार देहांनीं मी चार दिशेंतील शत्रूंना निर्विघ्नपणें मारीन. हे मतिमान प्रभो! तूं मला दर्शन दे.

श्रीवसिष्ठः—असें बोलून त्या राजानें हातांत खड्ग घेऊन, एखादें बालक लीलेनें जसें कमल तोडतो तसें आपलें शिर:कमल तोडलें व तो आपलें तोडलेलें मस्तक अग्नींत टाकीत आहे तों त्याचें शरीरहि कुंडांत पडलें. तेव्हां अग्नीनें त्याच्या देहाला भक्षण करून त्याला चतुर्गुण फल दिलें. महात्म्यांनीं ज्याचा स्वीकार केला आहे, तें तत्क्षणीं वृद्धि पावत असतें. त्यानंतर तो विपश्चित् राजा चतुर्मूर्ति होऊन अग्नींतून निघाला. सागरांतून निघालेल्या नारायणाप्रमाणें आपल्या तेज:पुंज शरीरांनीं तो प्रज्वलित होऊं लागला. त्याचे ते चारहि देह सूर्यासारखे चमकत होते. ते सहज उत्तम भूषणांनीं युक्त होते. सहज आयुधें व वस्त्रें यांनीं युक्त होते. त्याच्या शरीरांत सहज कवचें असून मस्तकावर रत्नजडित शिरस्त्राणें होतीं. ते

देह शिरोरत्नें, कटक, बाहुभूषणें, हार, कुंडलें इत्यादिकांनीं अलंकृत झाले होते. सर्वांचें रक्षण करणारे ते सर्व महाशय समर्थ होते. सर्वांचे आकार एकसारखे होते. ते चौघेहि सदृश अवयवांनीं युक्त होते. चंचल उच्चैः-श्रव्यासारख्या श्रेष्ठ घोड्यांवर ते बसले होते. त्यांचे भाते सुवर्णशरांनीं भरले होते. त्यांचीं अंतःकरणें अतिशय उदार होतीं. त्या चौघांचीं धनुष्यें व त्यांचे गुण एकसारखेच होते. त्यांचें शुभ शरीरहि समान होतें. ते ज्या नर-वाहनांत, हत्तीवर, रथांत, किंवा घोड्यावर आरोहण करीत असत, तो तो पदार्थ शत्रूंच्या मंत्र, यंत्र, शस्त्र, अस्त्र, इत्यादिकांपासून उद्भ-वणाऱ्या दोषांचा विषय होत नसे. ते चार देह ह्मणजे ते चार सागरच असून वडवाग्नीच्या ज्वालारूपी मातेनें प्रथम त्यांचें प्राशन करून व त्यानंतर दीर्घकाल आपल्या उदरांत धारण करून पुरुषाकारास प्राप्त केलें. त्यामुळें-च ते जणुं काय त्या अग्निकुंडांतून उद्भवलेले, रत्नांनीं भूषित व स्वतः रत्नभूत अशा अश्वांच्या पृष्ठांवर बसलेले, पुष्पांच्या मालांनीं पूर्ण-देह झालेले व चंद्रासारख्या शुभ्र हास्यांनीं दिशांना प्रकाशित करणारे ते चार विपश्चित् राजे आहुतींनीं तृप्त केलेल्या अग्नीपासून जणुं काय चार विष्णुच किंवा मूर्तिमंत चार सागरच किंवा साक्षात् चार वेदच निघाले.

---

## सर्ग ११० वा.

—:०:—

१. नगरासमीप प्राप्त झालेल्या शत्रूंबरोबर चारहि दिशांत प्रवृत्त झालेल्या भयंकर युद्धाचें सविस्तर वर्णन.

श्रीवसिष्ठः—हे रामा, इतक्यांत नगराच्या समीप प्राप्त झालेल्या शत्रूंशीं भयंकर युद्ध सुरू झालें. त्यांत नगर व ग्राम जमिनदोस्त झालें. प्रजेचा समूह अतिशय व्याकुल झाला. अग्नि-दाहानें देह जळूं लागले. धुराच्या अभ्रपटलांनीं तें रणांगण आच्छादित झालें. शरसमूह व तो महाधूम यांच्या योगानें सूर्य आच्छादित झाल्यामुळें सर्वत्र अंधकार पसरला. त्यात एका क्षणांत सूर्य दिसत असे व एका क्षणांत दिसे-नासा होई. अग्निदाहाच्या महातापानें त्याच्या आसपासचीं पानें सुकून—कोमेजून जाऊं लागलीं. चंचल अलातचक्रें, शूल, मुसळ, पाषाण, यांनीं आकाश भरून गेलें. अग्नीच्या प्रतिबंधसमूहानें त्यांत ज्वलनायुध द्विगुणित होत होतें. मरण पावलेल्या शूरांना त्या युद्धांत अप्सरा व सुरा यांची प्राप्ति होत होती, उद्दाम हत्तींच्या आवाजांनीं तें रण रणो-त्सुक शूरांना मोठा हर्ष देत होतें. त्यांत भुशुंडीमंडल, प्रास, शूल, तोमर यांचा वर्षाव होत होता. त्यांत शूर योद्ध्यांचा कोलाहल ऐकूनच भीरूंचीं हृदयें फाटून ते मरत होते. धुळीचें पटल व शुभ्र मेघ यांनीं अंतरिक्ष-मार्गाचा निरोध केला होता. मरणामध्यें व्यग्र झालेल्या योद्ध्यांचे समूह मोठा आक्रोश करून तेथून निघून जात होते. इतस्ततः पडणाऱ्या उत्पात-विद्युताग्नीनें त्यांतील प्रजा नाश पावत होती. त्या युद्धांत अग्नीनें दग्ध झालेल्या व त्यामुळेंच पडणाऱ्या गृहांनीं अग्निमय धूममेघ सोडले, ह्मणजे धूरासह अग्नीची वृष्टि केली. मरणामुळें आल्हाद देणाऱ्या व असंख्य शर-

धारांची वृष्टि करणाऱ्या मेघांची त्यांत समृद्धि झाली. तो संग्राम अश्वरूपी तरंगांनीं सागराच्या कल्लोलास जिंकीत होता. हत्तींचे दांत एकमेकांवर आपटून त्यांतून कर्कश ध्वनि निघत होता. दुर्गांच्या ज्या भयंकर भिंती त्यांवर चढत असतांना योद्धे अतिशय उग्र दिसत होते. तटांच्या भिंतविरून निरनिराळ्या आयुधांचे मोठे ध्वनि निघत होते. हत्तींच्या दांतांवर शस्त्रें, पाषाण इत्यादिकांचें घर्षण होऊन त्यापासून जो मोठा ध्वनि निघत होता, त्याच्या योगानें ते जणुं काय ऐरावताला आव्हान करीत होते. वेगानें वहाणाऱ्या बाणनदीच्या पुरानें आकाशरूपी महासागर भरला जात होता. चंचल चक्रें, भाले, तरवारीच्या धारा याच मकरांच्या योगानें तो आकाशमहार्णव कर्कश झाला होता. आक्रोश करणाऱ्या योद्धयांच्या ध्वनींत चिलखतांच्या संघट्टनानें होणारा ध्वनि मिळून त्यापासून जो एक मोठा झणत्कार उत्पन्न होत होता, त्याच्या योगानें द्वीपमंडलें व्यापून गेलीं होतीं. त्या अंबर-महार्णवांत हत्तींचे पाय पडून चूर झालेल्या व बाणानें छिन्नभिन्न झालेल्या शरीरावयवांचा चिखल झाला होता. त्या रणांगणांत रक्ताची नदी वाहूं लागली. तिच्या प्रवाहाबरोबर रथ व हत्ती वाहून जाऊं लागले. त्या नदीवरून मांसाहारी पक्षी आमिषाच्या आशेनें संचार करूं लागले. शररूप जलतरंगांनीं आर्त झालेल्या योद्धयांचीं भग्न आयुधें हेच त्यांतील जलचर प्राणी होत. शस्त्रांचा एकमेकांवर प्रहार होऊन त्यांतून निघणाऱ्या ज्या ज्वाला त्यांच्या योगानें सर्व आकाश पेटलें. शूरांना देवत्वाची प्राप्ति झाल्यामुळें ते जरारहित होऊन स्वर्गलोकावर चढून गेले. शुभ्र धूलिरूप मेघांत चंचलचक्रें याच विजा चमकूं लागल्या. त्यांतील भूतल शस्त्रांनीं निरवकाश झालें. त्यामुळें त्यांत प्रहारांना आधारच नाहींसा झाला. एकापेक्षां एक अधिक अशा योद्धयांच्या परस्पर संघर्षणानें तें रणांगण अतिशय बिकट झालें. भूमीला आच्छादित करणाऱ्या संघट्टनानें रथांचीं लाकडें मोडून गेलीं. कबंधादिकांनीं मिश्रित झालेले जे शत्रु, त्यांच्या योगानें तें रणांगण दुरवगाह झालें, म्हणजे त्यांत प्रवेश करण्यास जागाच राहिली नाहीं. शूरांनीं तोडलेलीं अर्धीं मस्तकें, सबंध मस्तकें, हात, पाय, मांड्या, यांचा ढीग पडला. कबंधांच्या भुजारूपी वृक्षांनीं आकाशाला वनस्थल बनविलें. ज्यांचीं मुखें अतिशय लोलुप झालीं आहेत, अशा वेताळांनीं मोठ्या हर्षानें असंख्य शवें आपआपल्या पेट्यांतून भरलीं. तें समरांगण रणमद चढलेल्या योद्धयांच्या भ्रुकुटींनीं भयंकर झालें होतें. 'एक मारूं किंवा मरूं' याच निश्चयरूपी भूषणानें तेथील योद्धे भूषित झाले होते. प्रहार करणें व दुसऱ्याचा प्रहार अंगावर घेणें, याविषयींचें असामर्थ्य हेंच तेथें अपार दूषण मानलें जात होतें. मत्त हत्ती व शूर मांडलिक राजे यांचा मद तेथें पार नाहींसा होत होता. त्या रणांगणांतील प्रत्येक योद्धा दुसऱ्याला मारण्यासच अतिशय उत्सुक झाल्यामुळें तो संग्राम यमाचा आनंद वाढविणारा झाला. आपलें शौर्य आपल्या मुखानें बोलून न दाखविणें या स्वभावामुळें तेथें जे प्रच्छन्न शूर होते त्यांच्या क्रियेनेंच म्हणजे त्यांचें शौर्य पाहूनच लोक त्यांचा जयजयकार करीत असत. तसेंच जे भीरु होते, त्यांचें अशौर्यहि लोकांच्याच द्वारा त्यांच्या स्वामींना कळत होतें. तें रण शौर्यादिकांना जागें करणारें, गुणी लोकांचा उत्कर्ष करणारें आणि भुजशाली व त्यामुळेंच राष्ट्रांतील दुर्बल लोकांना आधारभूत अशा शूरांना धनाप्रमाणें प्रिय वाटणारें होतें.

हत्तीवर बसलेले वीर व रथी यांचें परस्परयुद्ध होऊन त्या हत्तींचीं गंडस्थळें फुटत असत. त्या संग्रामांत मत्त हत्तींच्या मदजलाचें आपोआप शोषण होत होतें, ह्मणजे त्यांचा मद आपोआप जिरत असे. मत्त हत्ती सरोवरांत प्रविष्ट झाले असतां सारस पक्षी जसा मोठा आक्रोश करूं लागतात, त्याप्रमाणें तरुण मांडलिक राजेहि मत्त हत्तींच्या पुढें उभे न राहतां आक्रोश करून पळत होते. तेव्हां वृद्ध पण खड्गविद्येंत अतिशय निष्णात अशा वीरांनीं आपल्या खड्गांचें समर्थन करून त्या मत्त गजांना परत फिरविलें. त्या रणांगणांत कांहीं ठिकाणीं योद्ध्यांचा समूह आला नसतांच, तो येईल या भीतीनें कांहीं लोक पळत असतांना एकमेकांच्या पायांखालीं तुडविले जात असत. त्यामुळेंच दिवस सूर्याला जसा शरण जातो, त्याप्रमाणें ते सर्व राजचरणालाच शरण आले. अभिमानरूप उन्मादवायूच्या बलानें उन्मत्त झालेल्या शूरांनीं नम्र लोकांचाहि संहार सुरू केला. तेथें एक नवनिच बाजार उत्पन्न झाला. त्यांत प्राणरूपी धनाचाच व्यापार चालू होता. वस्त्राच्छादित पताकांचे ओघ हेच त्यांतील संचारी बाहुवृक्ष झाले. ती रणभूमि रक्तानें उज्ज्वल झाल्यामुळें त्रैलोक्यलक्ष्मीचें तें विद्रुम म्हणजे माणकाचें भूषणच झालें होतें. मंदरपर्वताच्या घर्षणामुळें उडालेल्या क्षीरसागराच्या जलबिंदूप्रमाणें सुंदर दिसणाऱ्या छत्रांनीं सर्व शस्त्रांचे ओघ आच्छादित केले. त्यामुळें गगनांगण पुष्पांनीं संपन्न असल्यासारखें झालें. त्यांत प्रथम, गंधर्व व देव शूरांच्या उत्साहांचें वर्णन करीत होते. त्या गंधर्वादिकांच्या कांतींनीं, चंचल झालेल्या तालाग्रांनीं, ध्वजाग्रांनीं व शस्त्राग्रांनीं उन्मत्त झाल्यामुळें सर्व योद्धे जणुंकाय बलरामच बनले. एकत्र जमून लीलेनें प्रहार करणाऱ्या असंख्य राक्षसांनी कित्येकांना मुकाट्यानें तेथल्या तेथेंच स्वतः भक्षण केलें व शवादिकांच्या भारांना पर्वतगुहारूप स्वगृहांत नेवून ठेवलें. कांहीं राक्षस तेथें विषवृक्षासारखेच शोभत होते. कित्येक चकचकित भाल्यांनी शत्रूंचीं मस्तकें व हात तोडून त्यांच्यायोगानें आकाशाला झांकून टाकीत होते. कित्येक आपल्या भुजास्फोटामुळें उत्पन्न होणाऱ्या ध्वनींनीं मोडून पडणाऱ्या वृक्षांचा भास करीत होते. स्त्रियांच्या आक्रोशांनीं तें नगरमंदिर दुमदुमून गेलें होतें. आयुधांच्या योगानें सर्व आकाश पेटल्यासारखें दिसत होतें. आपलें धन, गृह वगैरे सोडून सर्व प्रजा त्या वेळीं पळत सुटली. शस्त्रें सर्व बाजूंनीं उडत असल्यामुळें प्रेक्षकांनीं तें स्थान सोडून दिलें. सर्प गरुडसमूहाला जसे सोडतात, त्याप्रमाणें भीरूंनी तें रणांगण सोडलें. हत्तींच्या दांतांत सांपडून पुष्कळ योद्धे छिन्नभिन्न झाले व जे कांहीं अवशिष्ट राहिले होते ते त्यांच्या गंडस्थलांच्या आघातांत सांपडले. हत्तींचें गंडस्थल म्हणजे मृत्यूचें मनुष्यरूपी द्राक्षांना पिळण्याचें एक यंत्रच होतें. यंत्रपाषाणांच्या संघट्टनानें आयुधांचा चूर होऊन तो आकाशांत उडून जात होता. योद्ध्यांचा सिंहनाद व गर्जना करणाऱ्या हत्तींचा चीत्कार यांच्यायोगानें ती रणांगणरूपी नदी दुमदुमून गेली. ती गर्जना आसपासच्या पर्वतांच्या दऱ्यांत शिरून त्यापासून प्रतिध्वनि निघूं लागले. जन्मापासून संपादन केलेलें प्राणसर्वस्व खर्चून शूर योद्धे तेथें लढूं लागले. तें रण शस्त्रापासून उत्पन्न झालेल्या अग्नींनीं व संतत अग्निदाहांनीं भाजल्यासारखें झालें. वीर त्या त्या शत्रूंशीं व दुसऱ्यांशीं युद्ध करूं लागले. पण त्यांचें तें युद्ध संपलें नाहीं. ती भूमि मरून राहिलेल्या प्रधान योद्ध्यांनीं व्यापून गेली. अतिशय शुद्ध कैलास पर्वत ईश्वराचे आधार-

भूत असल्यामुळें ते जसे शेवटपर्यंत रहातात, त्याप्रमाणें आपल्या स्वामीशीं लबाडी न करणारे प्रधान योद्धेच शेवटीं तेथें अवशिष्ट राहिले. जे मृत्यूचेहि मृत्यु होते, त्या उदार शूरांनींच तें समरांगण त्या वेळीं व्यापलें. रणांत मरण हेंच ज्यांचें जीवीत आहे व जीवित हेंच मरण आहे, त्या उदार पुरुषांनीं त्रैलोक्यालाहि जिंकलेलें असतें. सरोवरांत जसे सारस पक्षी, तसे ते अति शूर योद्धे त्या रणांगणांत अतिशय शोभूं लागले. यंत्रापासून सोडलेल्या दगडांचा जो प्रवाह त्याच नद्यांच्या ध्वनींनीं, त्याचप्रमाणें नुकत्याच तोडून आकाशांत उडविलेल्या चंचल मस्तकांच्या फूत्कारांनीं, शररूपी जल सोडणाऱ्या सैनिकांच्या ध्वनींनीं, आकाशांत पसरणाऱ्या आयुधांच्या नादांनीं आणि अश्वांच्या व हत्तीच्या शब्दांनीं व्यापिलेलें तें युद्ध कानाला बधिर करून सोडतें झालें आणि संधिबंधरहित पाषाणाच्या जठराप्रमाणें जड झालें. ११०.

---

## सर्ग १११ वा.

—:०:—

१ आपलें सैन्य पराभूत होत आहे तों विपश्चित् राजा आला व त्यानें वायव्यास्त्रानें चारी दिशांतील शत्रूंचा क्षय आरंभिला.

**श्रीवसिष्ठः**—याप्रमाणें कल्पांतासारखें भयंकर युद्ध सुरू झालें असतां, समरांगणांत सर्व प्रकारच्या सेना उत्कर्ष व अपकर्ष यांस प्राप्त होत असतां, अंतरिक्षांत रणवाद्यांचा व महाशंखांचा ध्वनि दुमदुमूं लागला असतां, खड्गांचा खणखणाट, धनुष्यांचा टणत्कार व वीरांचा सिंहनाद होत असतां, योद्ध्यांचा समूह निष्ठुरपणें परस्परांवर भयंकर आघात करून त्यांचीं कवचें व शस्त्रास्त्रादि यांना तोडीत असतां, विपश्चित् राजाच्या पक्षाची सेना जराशी पराभूत होऊं लागली असतां, समरांगणांत तिला किंचित् मूर्च्छा येऊन तोडल्या जाणाऱ्या वेलीप्रमाणें तिची अवस्था झाली असतां, राजाच्या निर्याणाचा दुंदुभि सर्व दिशांना दुमदुमून सोडीत निघाला. कल्पांतींच्या मेघांचा कडकडाट जसा सभोंवार पसरतो, त्याप्रमाणें तो ध्वनि सर्वत्र पसरला. एकाच वेळीं सर्व कुलपर्वत फुटूं लागले असतां जसा भयंकर ध्वनि होतो, त्याप्रमाणें त्या राजाच्या प्रयाणदुंदुभीनें आपल्या ध्वनीनें सर्व दिक्तट जड करून टाकले. तो राजा मूर्तिमान् चार लोकपालांप्रमाणें किंवा शरीर धारण करणाऱ्या नारायणाच्या भुजांप्रमाणें चार देहांनीं चार दिशांमध्यें गेला. फार मोठ्या चतुरंग सैन्यांनीं युक्त होऊन तो आपल्या नगरांतून मोठ्या संकटानें बाहेर पडला आणि आपलें सैन्य पराभूत झालें आहे व शत्रुसैन्य विजयी होत आहे, असें त्यानें पाहिलें. तो युद्धरूपी उद्धत समुद्र गर्जना करीत असून आपल्या चंचल आकृतीनें भयंकर झाला आहे, बाणरूपी सीकरांनीं तो भरून गेला आहे, मकरव्यूहानें तो व्याप्त आहे, हत्तीरूपी गजव्यूहानें तो व्याकुल झाला आहे, अश्वसमूहानें विस्तार पावला आहे, चक्रावर्ताप्रमाणें सैन्याच्या भिन्न भिन्न रचनांनीं व लोकांच्या कल्लोलांनीं त्याचा मध्यभाग परिपूर्ण आहे, शेंकडों चंचल रथ हेच त्यांतील आवर्त असून पताका हाच त्यांतील लाटांचा समूह आहे, चमकणारीं शस्त्रें याच फेसांनीं तो युक्त आहे, घोड्यांचें खिंकाळणें हाच त्यांतील जलजंतूंचा शब्द आहे, चमकणारीं शस्त्रें हेंच त्यांतील जल आहे, तो रणसमुद्र तीक्ष्ण धारांचा जणुं काय आकरच आहे, चंचल हत्ती व घोडे यांचा समूह हेच त्यांतील तरंग होत, शस्त्ररूपी जलांत चमकणारे पापी म्लेच्छ

हेच त्यांतील कृष्णसर्प होत. खालीं वांकलेल्या व उन्नत अशा हत्तींनीं त्या समुद्रांतील पर्वतांचेंच स्थान भरून काढलें होतें. संक्षुब्ध वायूमुळें तेथें मोठा ध्वनि उत्पन्न झाला होता. मरणारे हत्ती व घोडे यांच्या आक्रोशांनीं तो रणसागर दुमदुमला होता. त्यांतील सेनारूपी जल अपरंपार भरलेलें होतें. तो अकालीं उत्पन्न झालेल्या कल्पांतींच्या मेघाप्रमाणें भयंकर दिसत होता. रक्त हेंच ज्यांतील जल आहे अशा त्या रणसागरानें द्यावाभूमीला व्यापून सोडलें होतें. आयुधांचे तुकडे हींच त्यांतील चकचकणारीं रत्नें होतीं. चंचल सेनासमूहांतून फेकले जाणारे पाषाण हेच त्या समुद्रांतील पाषाण होते. रत्नरूपी तुषार हेंच त्यांतील हिम असून संध्याकाळच्या मेघपटलाप्रमाणें तो रणसागर अतिशय शोभत होता. तेथें धुळीचे मोठमोठे लोट उठल्यामुळें तेच त्या समुद्रांतून जलाकर्षण करणारे मेघ आहेत असा भास होत होता. असो. अशा त्या रणसमुद्राला पाहून राजा 'मी आतां याला प्राशन करणारा अगस्त्य होतों' असा मनांत विचार करून त्या रणसागराचें प्राशन करण्यासाठीं त्यानें वायव्यास्त्राचें स्मरण केलें व त्याचा चारहि दिशांत प्रयोग केला. पर्वतशिखरासारख्या धनुष्यावर त्यानें त्या अस्त्राचें संधान केलें, त्यामुळें शिखरांचा आधार असा जो मेरुपर्वत त्याचें धनुष्य करून त्यावर शरसंधान करणाऱ्या त्रिपुरांतकासारखा तो शोभला. आपल्या देशांतील सैन्याचें कल्याण व्हावें व अग्नि शांत व्हावा म्हणून त्या अस्त्राला नमस्कार करून व जप करून त्यानें तें भयंकर अस्त्र सोडलें आणि त्याबरोबरच त्याला साह्य करण्यासाठीं त्यानें दुसरें पर्जन्यास्त्रहि सोडलें. शत्रुरूपी आतपांची शांति करण्यासाठींच त्यानें या महाअस्त्रांची योजना केली होती. त्या घोर अस्त्रांनीं युक्त असलेल्या धनुष्यापासून चारी दिशांमध्यें अस्त्रांच्या नद्या प्रवृत्त झाल्या. प्रत्येक दिशेंत दोनदोन याप्रमाणें त्या अष्टमूर्ति घोर धनुष्यापासून दिशारूपी कुहरांना भरून सोडणाऱ्या बाणांच्या नद्या, त्रिशूलांच्या नद्या, भुशुंडींच्या नद्या, मुद्गलांच्या नद्या, प्रासांच्या नद्या, चक्रांच्या नद्या व परशूंच्या नद्या निघाल्या. रामा, काय चमत्कार सांगावा! राजानें असा अस्त्रप्रयोग करतांच तोमर, भिंदिपाल, पाषाण यांचे प्रवाह सुरू झाले. कल्पान्तच ओढवला आहे, असें सुचविणारे भयंकर वायु सुटले. अशनींचे प्रवाह सुरू झाले. विजांचे प्रवाह प्रवृत्त झाले. जलांच्या धारा अविच्छिन्न सुरू झाल्या. खड्गांचा प्रवाह सुरू झाला. बाणांचा वर्षाव झाला. महावृष्टीच्या योगानें अतिशय वृद्धि पावलेले असे भयंकर सर्पच युगांतीं फुटलेल्या पर्वतापासून जसे, तसे त्या धनुष्यापासून निघाले. महावायूच्या योगानें धुळीचा ढीग जसा उडून जातो, त्याप्रमाणें त्या अस्त्रवृष्टीच्या योगानें तो शत्रुसैन्याचा सागर झटकन आटून गेला. त्याला फार वेळ लागला नाहीं. जल, अशनि, शस्त्रें, यांच्या वृष्टींनीं व भयंकर वायूंनीं शत्रुसैन्याला उडवून दिलें. धरण फुटलेल्या सरोवरांतील पाण्याप्रमाणें सर्व सैन्यें वाट सांपडेल तिकडे पळूं लागलीं. तो चतुरंग सैन्याचा ओघ चारी दिशांत पराङ्मुख झाला व पावसाळ्यांत पर्वतावरून वहाणाऱ्या महाप्रवाहाप्रमाणें तो वेगानें धावूं लागला. त्या सैन्यांतील रथावर जे ध्वज होते ते छिन्नभिन्न झाले. तरवारी तुटून गेल्या, कवचें फुटलीं, अंगांतून रक्तांचे प्रवाह वाहूं लागले. तो सेनासमूह मोठ्यानें आक्रोश करूं लागला. तो ऐकून कोणाहि सदय मनुष्याचें हृदय विदीर्ण होत असे. शस्त्रांच्या संघट्टनांनीं मोठमोठ्या हत्तींचे दांत छिन्नभिन्न होत असतां मोठा भयंकर ध्वनि झाला; तो मेघाच्या कडकडाटा-

प्रमाणेंच भयंकर होता. शस्त्रावर पाषाणादिकांचा आघात झाला असतां जो ध्वनि उत्पन्न होत असे, तो एखाद्या नदीच्या तीरावरील पुष्पवृक्षांवर गुंजारव करणाऱ्या भ्रमरांच्या ध्वनीप्रमाणें भासला. अतिशय चंचल झालेले घोडे हेच त्यांतील तरंगाप्रमाणें भासत होते. भयभीत झालेल्या सर्व जीवांचा एकच कोलाहल झाला. योद्धे 'मेलों मेलों' असें ओरडूं लागले. त्यांत जे निश्चयें शूर होते ते पराङ्मुख न होतां भराभर मरून पडूं लागले व जे भीरु होते ते हरिणशिशूप्रमाणें जीव घेऊन आक्रोश करीत पळूं लागले. त्या संग्रामसमुद्रांत मेलेले हत्ती, घोडे, योद्धे याच जीर्ण पर्णांचा मोठा समुदाय जमला. चूर्ण झालेले देह, वसा, मांस यांचा चिखल झाला. छिन्नभिन्न झालेले पशूंचे खूर व तुटून पडलेल्या अस्थि हेंच त्या समुद्राचें वाळवंट होतें. त्या रणसमुद्रांत जे अनेक पदार्थ वाहून जात होते, त्यांचा एकमेकांवर आघात होऊन विशेष प्रकारचा ध्वनि होत होता. त्या वेळीं प्रलयकाळचे मेघ गर्जना करूं लागले, प्रलयकाळचे वायु वाहूं लागले व प्रलयकाळाप्रमाणें वृष्टि होऊं लागली. भयंकर अशनिपात होऊं लागला. सर्व भूपीठ चिखलानें माखलें. पाण्यानें सर्व स्थलें वाहून गेलीं. तीक्ष्ण शैत्यानें शरीरें सुकून गेलीं, तथापि आकाशांतून जलधारा पडतच होत्या. समग्र नगरें, ग्राम, गृहें यांस अग्नि लागला. सर्व प्रजा व पशु आक्रोश करूं लागले. भूमीवर पळणाऱ्या रथांचा भयंकर आवाज झाला व आकाशांत मेघांचा कडकडाट सुरू झाला. याप्रमाणें चारी दिशांत हाहाकार उडाला. विजांचे चकचकाट, मेघांचे कडकडाट व शर, शक्ति, गदा, प्रास, भिंदिपाल इ० शस्त्रांचे वर्षाव, यांच्या योगानें तीं अस्त्रें सर्व शत्रुसैन्याला व्याकुल करूं लागलीं. बलशाली राजांचीं असंख्य सैन्यें मशकांच्या समूहाप्रमाणें पळूं लागलीं व विनाश पावूं लागलीं. हे रामा! प्रत्यंत देशांतील राजांचीं सैन्यें, उद्दाम अग्नीच्या वनाचीच ज्यांना उपमा आहे, अशा शस्त्रांनीं व्याकुल झालीं. मेघांनीं त्यांना भयंकर पीडा दिली. अशनींच्या वृष्टिपातांनींहि त्यांचा भयंकर संहार झाला. सारांश वडवाग्नीमध्यें वेगानें प्रवेश करणाऱ्या समुद्रजलांत शिजणाऱ्या निर्बल जलजंतूप्रमाणें त्यांची अवस्था झाली. १११.

---

## सर्ग ११२ वा.

१ कोणकोणत्या देशांतील लोक कसे कसे पराभव पावले, व शत्रूंचे सर्व योद्धे चारहि दिशांत कसे पळाले, त्याचें वर्णन.

श्रीवसिष्ठः—(प्रथम चेदिदेशाच्या योद्ध्यांच्या नाशाचा प्रकार सांगतात—) हे रामा! चेदिदेशांतील योद्धे हेंच चंदनाचें अरण्य असून त्याला परशूंनीं तोडलें असतां तें दक्षिण सागरामध्यें पडलें. त्यांचे दर्शनीय हार व वस्त्रें हे त्या चंदन वृक्षांवरील सर्प होत. पारसिक योद्ध्यांना अस्त्रपुरानें आपल्या प्रवाहाबरोबर पानांप्रमाणें वाहून नेलें. त्यामुळें ते योद्धे मोहित होऊन आपआपसांत लढून एकमेकांवर प्रहार करूं लागले. अशा प्रकारें ते वंजुला-वनामध्यें जाऊन नष्ट झाले. त्याप्रमाणें दरद योद्धे दानवांप्रमाणें दुर्दर पर्वतांवरील अगाध दऱ्यांमध्यें शिरून खोल गुहांतून जाऊन लपले. शरण, प्रास, तरवार व परशु या चार प्रकारच्या आयुधांच्या धाराग्रांनीं केलेलें शिलांचें व कवचांचें चूर्ण याच भुकटीला धारण करणारे व विजांनीं परिवेष्टित झालेले असे वारुणास्त्रापासून निघालेले मेघ व वात वेगानें

वाहूं लागले. तेव्हां त्यामुळें हत्ती एकमेकांवर दंतप्रहार करून व परस्परांचे दांत फोडून अतिशय पीडित झाले. त्यामुळें ते मृत्यूच्या उदरांत भरून सोडणारे ग्रासपरिमित मोठमोठे पिंडच झाले. त्यांचीं शरीरें रक्तानें माखलीं होतीं. त्या दरदेशांतच झालेले कित्येक रैवतक भयंकर तोमरांनीं रात्रीं अतिशय ताडित झाले. म्हणजे तोमरांचा त्यांना भयंकर मार बसला. इतक्यांत आपल्या स्वरूपानें पुरुषाला फसविणाऱ्या पिशाचींनीं त्यांच्या अंगाचे तुकडे तुकडे करून त्यांना खाऊन टाकलें. दशार्ण देशांतील योद्धे ताली व तमाल यांच्या गहन अरण्यांत शिरले. तों त्यांना सिंहांनीं गांठून व गळ्यावर पाय देऊन त्यांचीं आंतडीं बाहेर काढलीं. त्यामुळें ते गतप्राण झाले. पश्चिम सागराच्या तीरावर रहाणारे यवन नारळीच्या वनांत शिरले व गतप्राण झाले त्यांना मकरांच्या समूहांनीं खाऊन टाकलें. शकांना पोलादी नलिवर्ण बाणांचा समूह सहन झाला नाहीं. त्याचप्रमाणें रमठहि वायूच्या सोसाट्यांत सांपडल्यामुळें त्यांचे प्राण कमलिनीच्या समूहाप्रमाणें तांडवनृत्य करूं लागले. श्रवण नक्षत्राच्या आकाराप्रमाणें ज्याला तीन शृंगाग्रें आहेत, अशा महेंद्रपर्वतावर नील जातीचे क्षत्रिय पळून गेले व त्यांनीं त्याला अगदीं वेढून टाकलें. त्यामुळें मेघांच्या समूहांनीं युक्त असल्यासारखाच तो दिसला. तंगण योद्धयांची सेना सुवर्णाकार होती, तिचा पराभव झाला व ती पळूं लागली. तेव्हां अगोदर चोरांनीं त्यांचीं वस्त्रें चोरलीं, नंतर एकांतांत निशाचरांनीं तिला खाऊन टाकलें; याप्रमाणें तिचा नाश झाला. ज्या वेळेला त्या तंगण सेनेला निशाचर खात होते त्या वेळीं तेथील भूतळ हातांत दिवट्या घेऊन सभोंवार संचार करणाऱ्या निशाचरांच्या योगानें नक्षत्रयुक्त अंतरिक्षाप्रमाणें शोभलें. याप्रमाणें त्या विपश्चित् राजाचा विजय झाला असतां जगत् हेंच जिचें गृह आहे, अशी त्याच्या तळघरांत बसलेली द्यौ जणुं काय त्याचें यश गाण्यासच उद्युक्त झाली. त्या वेळीं मेघांच्या गर्जनेचा भुरंध्रांतून जो प्रतिध्वनि निघत असे, तोच जणुं काय त्या गाण्यांतलि मृदंगध्वनि होता. चक्रांच्या योगानें जर्जर झालेल्या द्वीपांतरांतील लोकांनीं आपलें जीवित सोडलें. त्यामुळें, माशांच्या विहाराचें जणुं काय जंगलच असें शेवाळानें युक्त असलेलें सरोवर दैववशात् शुष्क झालें असतां त्यांतलि मत्स्य जसे अशरण होतात, तशीच त्यांची अवस्था झाली. सर्व द्वीपांतील कुलीन योद्धे सह्याद्रीवर लपून राहिले. सात दिवस औषधोपचारांनीं शरीरावरील क्षतांचा उपशम करून व थोडेसे सशक्त होऊन पर्जन्यवृष्टीमुळें अतिशय क्लेश भोगीतच ते हळुहळूं स्वदेशीं परत गेले. हूण, चीन, विरात यांचीं मस्तकें विपश्चित् राजानें सोडलेल्या चक्रांच्या वृष्टींनीं कमलाप्रमाणें तोडून टाकलीं. त्या वेळीं वायु अनुकूल असल्यामुळें तीं चक्रें फारच वेगयुक्त झालीं होतीं. गंधमादन, पुंनाग इत्यादिकांच्या वनांमध्यें एकत्र जमलेले जे गांधार त्यांचें गंधर्वकुमारींनीं परिरक्षण केलें. नीलिप नांवाच्या देशांतील योद्धे नलिनीच्या नालांवरील कांट्याप्रमाणें निश्चल झाले. या राजाच्या भीतीनें ते प्रत्येक वृक्षावर चढून दीर्घकाल वृक्षमय होऊन राहिले. हरणें व पक्षी यांच्या विहारांचें स्थान अशा रंगभूमिभूत पर्वत व अरण्य यांच्या भूमीमध्यें त्या विपश्चित् राजाच्या शस्त्राघातामुळें अतिशय क्षोभ उत्पन्न झाला. कंटकस्थल नांवाचे कंटकयुक्त स्थलाप्रमाणें कठोर असलेले योद्धे चोरांच्या देशांतील करंजवनांत जाऊन लपून

राहिले. पारसीकांना शस्त्रांच्या पुरांनीं समुद्राच्या परतीरावर नेऊन पोंचविलें. प्रलयसमयीं नक्षत्रें जशीं पटापट खालीं पडतात, त्याप्रमाणें वायूनें ज्यांचें शोधन केलें आहे असे ते समुद्रतीरावर जाऊन पडले. त्या वेळीं प्रलयकाळाचीच शंका उत्पन्न करणारे वायु वेगानें वाहूं लागले. पाषाणांच्या प्रहारांनीं त्यांनीं पर्वतांच्या कड्यांवर चिन्हें केलीं. समुद्रांना क्षुब्ध केलें. दाही दिशा अतिशय क्षुब्ध आयुधांनीं व वायूंनीं वृष्टियुक्त झाल्या. पंक व जल यांनीं भरून गेल्या, त्यामुळें त्या अदृश्य झाल्या. मोठा ध्वनि करणाऱ्या वायूंनीं, ज्यांतील जल 'छप-छप' असा ध्वनि करून वेगानें वाहूं लागलें आहे, असे नीहार महासागराच्या वेगाप्रमाणें भूमीवर प्रसार पावूं लागले. वायूंनीं उडविले जाणारे विदूरदेशांतील रथी तरंगाप्रमाणें चीत्कार करीत सरोवरांतील जलांत पडले. कमलांवर भ्रमर जसे पडतात तसे ते खालीं पडले. त्यांचें पायदळ, आयुधांचा ओघ जरी चालूच होता तरी विपश्चित् राजाच्या चक्रओघामुळें रडूं लागलें; आणि पावसाच्या धारा पडत असतां धुळीचे समूह जसे उडत नाहींत त्याप्रमाणें तें पळून जाण्यास असमर्थ झालें. हूण उत्तरसागराच्या वाळवंटांत मस्तकापर्यंत रुतले. त्यामुळें भूमींत पुरल्यानें गंजणाऱ्या लोखंडी शूळांप्रमाणें चिखलांत रुतलेल्या त्यांना अतिशय क्लेश झाले. विपश्चित् राजानें शकांना पूर्व सागराच्या तीरावरील वेलचीच्या वनांत नेऊन एक दिवसभर बांधून ठेवलें. नंतर दयेनें प्रेरित होऊन त्यांना बंधमुक्त केलें. त्यामुळें ते मेले नाहींत. मंद्रयोद्धे महेंद्रपर्वतावर आक्रोश करूं लागले व उंच उंच शिखरांवरून खालीं पडले. तेव्हां मुनिश्रेष्ठांनीं आपल्या आश्रमांतील हरणाप्रमाणें त्यांचें हळुहळू आश्वासन केलें. सह्यपर्वतावर जाऊन लपलेले योद्धे दैववशात् मूकांबिकेच्या सन्निध असलेल्या देवबिळांत शिरले. त्यामुळें त्यांना ऐहिक व पारलौकिक इष्टफल प्राप्त झालें. ज्या अर्थी मरणालाच कारण होणाऱ्या सुरबिलांत प्रविष्ट झालेल्या त्यांना सिद्धि मिळाली, त्या अर्थी भाग्योदयाची वेळ आली असतां अनर्थांतूनहि अर्थप्राप्ति होते. दाशार्ण वीर दर्दुरपर्वतावरील अरण्यांत जीर्ण पानांप्रमाणें जाऊन पडले. आणि ते मूर्ख तेथील विषारी फळें खाऊन आपोआपच मृत्युमुखीं पडले. हैहयदेशांतील योद्धे हिमालयावरील विशल्यकरणी औषधी खाऊन विद्याधरांप्रमाणें आकाशांतून संचार करणारे होत्साते आपआपल्या देशीं निघून गेले. त्याचप्रमाणें वंगहि हैमवती औषधि खाऊन ज्याच्यामागें लोक लागले आहेत, अशा मनुष्याप्रमाणें अतिशय म्लान होऊन, भात्यांतील सर्व बाण संपल्यामुळें नुस्तीं धनुष्येंच घेऊन आपापल्या घरीं परत आले व भयानें अद्यापिहि बाहेर पडत नाहींत. ते जणुंकाय पिशाचत्वालाच प्राप्त झाले आहेत. अंगांनीं विद्याधर पद देणाऱ्या वनफलांना भक्षण केल्यामुळें ते विद्याधर होऊन स्वर्गांत विद्याधरींसह क्रीडा करीत राहिले. पारसिक ताली—तमाल वनांत प्रवेश करतांच शत्रूंकडून छिन्नभिन्न केले गेले व मूर्छित झाले. तेथें ते वैमानिकाप्रमाणें स्थिर झाले. रामा! कलिंगांचें चतुरंग सैन्य छिन्नभिन्न होऊन पळूं लागलें असतां तें तंगणाच्या अंगण्यांत येऊन पडलें. त्यांतील हत्तीसुद्धां पानांसारखे उडून जात होते. बाण, शिलासमूह व उदक ज्यांच्यामध्यें आहे असें शत्रुसैन्य आक्रमण करूं लागलें असतां शाल्वयोद्धे आपल्या स्वामीसह जे एकदा पडले, ते अजूनहि त्या देशांतील ग्रामदेवतारूप पाषाणप्रतिमा होऊन राहिले आहेत. प्रत्येक दिशेकडे वेगानें पळत जाणारे

असंख्य लोक क्षुब्ध सागरामध्यें लय पावले आणि केवळ सागरांतच नव्हे, तर क्षेत्र, अरण्य, नगर, जल, स्थळ, पर्वत, नद्यादिकांचे तीर, कालवे, अग्रहार, नद्या, समुद्र, पर्वतांचे कडे, वृक्ष, ग्राम, जकातीचीं स्थानें, डोंगर, विहिरी, गुहा व गृहें यांत पडून मेलेल्या त्या शत्रूच्या दुर्बल सैन्याची गणना करण्यास कोण समर्थ आहे! कोणी नाहीं. ११२.

---

## सर्ग ११३ वा.

—:०:—

१. अस्त्रांच्या योगानें शत्रूंची शान्ति झाल्यामुळें साधनांचा क्षय व समुद्रांचें वैभव.

श्रीवसिष्ठः—ते चार विपश्चित् राजे याप्रमाणें पळणाऱ्या शत्रुसैन्याच्या मागोमाग धांवत फार दूरवर गेले. सर्व शक्तिमय व सर्व देहांमध्यें एकरूप, अशा चेतन ईश्वराकडूनच ते दिग्विजयासाठीं पाठविले गेले असल्यामुळें त्यांनीं असा मोठा जय मिळविला. त्या चौघांचाहि आशय एकच होता. नद्यांचे प्रवाह समुद्रापर्यंत जसे अविच्छिन्न चालतात, त्याप्रमाणें ते समुद्राच्या तीरापर्यंत त्या सैन्याच्या मागोमाग एकसारखे धांवत होते. क्षणभरहि विश्रांति न घेतां दूरवर एकसारखें गमन केल्यामुळें त्या विपश्चित् राजांच्या सैन्याचें जीवन—युद्धादिकांचें धन—शस्त्रास्त्रादि साधन प्रत्यहीं थोडें थोडें क्षीण होत शेवटीं ओहोळाच्या पाण्याप्रमाणें अगदीं संपून गेलें. मुमुक्षूंच्या पुण्यपापाप्रमाणें धांवत असलेल्या आपल्या शत्रुसैन्यांचा क्षय झाला आहे असें पाहून तीं अस्त्रें कृतकृत्य होऊन आकाशांत आपोआप शांत झालीं. दाह्यपदार्थांना जाळल्यावर, त्यांचा असंभवच झाला असतां अग्नीच्या ज्वाला जशा शांत होतात, तसाच तो प्रकार घडला. शस्त्रें आपापल्या स्वस्थानीं म्हणजे तरवार म्यानांत, बाण भात्यांत, वगैरे आणि रथ, अश्व, हत्ती इत्यादि वृक्षादिकांच्या स्थानीं लीन होऊन जणुंकाय झोंप आल्याप्रमाणें निश्चेष्ट झालीं. संध्याकाळीं पक्षी जसे आपापल्या घरट्यांतून निश्चेष्ट राहातात, त्याप्रमाणें तीं शस्त्रें आपल्या कोशांत स्थिर झालीं. जलांतील तरंगाप्रमाणें, मेघांतील नीहाराप्रमाणें, वायूंतील मेघांप्रमाणें व आकाशांतील सुवासाप्रमाणें तीं शस्त्रें स्वस्थानीं लीन झालीं. मेघधारांमुळें झालेल्या चिखलांत रुतलेलीं व त्यामुळें शांत झालेलीं जीं शस्त्रें तेच ज्यांतील मत्स्यादि जलचर आहेत, जो बाणरूपी जलवृष्टीनें रहित आहे, ज्यांतील मेघाच्या संरंभामुळें होणारी वृष्टि शांत झाली आहे, लोपलेलीं नक्षत्रें हेच ज्यांतील रत्नांचे समूह आहेत, एका कोंपऱ्यांत असलेला सूर्य हाच ज्यांतील वडवानल आहे, शून्यता हेंच ज्यांतील जल आहे, अशा तऱ्हेचा आकाशसागर प्रलयकालच्या एकार्णवासारखा पसरला. आकाश महात्म्यांच्या मनांप्रमाणें अतिशय स्वच्छ, गंभीर, प्रसन्न, सूर्यप्रकाशानें युक्त व रजोरहित झालें. त्यानंतर त्या विपश्चित् राजांनीं आकाशाचे जणुंकाय कनिष्ठ बंधुच असे चार सागर पाहिले. ते अतिशय विस्तीर्ण होते. त्यांचा आकार अतिशय शुद्ध होता. सर्व दिक्तट त्यांनीं व्यापून टाकले होते. तरंग एकमेकांवर आपटून त्यांतून एकप्रकारचा गुलगुल ध्वनि निघत होता. त्या सागराचें शरीर फारच सुंदर दिसत होतें. कारण मेघ त्यांतील जलाचें आकर्षण करण्यासाठीं त्यांवर विश्रांति घेत होते. ज्याप्रमाणें व्याधीनें आतुर झालेले लोक भूमीवर हातपाय पसरून पडतात, त्याप्रमाणें ते सागर आपल्या शरीराला भूमीवर पसरून राहिले

होते. रोगी श्वास लागल्यानें जसा व्याकुल होतो, त्याप्रमाणें ते समुद्रहि वायूच्या योगानें आर्त झाले होते. त्यांचे देह हालत होते. एकसारख्या जोरानें उडणाऱ्या ऊर्मि याच त्यांच्या महाभुजा असून रोगी जसा आपले हातपाय झाडतो, त्याप्रमाणेंच ते सागर आपल्या त्या भुजा झाडीत होते. ते जरी स्वतः जड होते तरी कल्लोलांच्या चांचल्यामुळें स्पंदमय असल्यासारखे दिसत होते. संसाराप्रमाणें ते विस्तीर्ण होते. संसारी जीव चक्रनेमीप्रमाणें पुनः पुनः प्राप्त होणाऱ्या उच्च-नीच अवस्थांप्रमाणें आवर्तादिकांनीं आकुल झाले होते. सूर्याच्या उदयकालीं जणुंकाय ते आपल्या तटांवर पडलेल्या रत्नराशींच्या प्रकाशांनीं सूर्याला पुष्ट करीत होते. शंखांच्या राशीमध्यें शिरणाऱ्या वायूचा जो शब्द तोच त्यांचा दुसऱ्यांना भिवविणारा ध्वनि होय. ते आपल्या लाटांच्या घरघर ध्वनींनें आकाशाला दुमदुमून सोडीत होते. ते आपल्या वर्तुलाकार फिरणाऱ्या भोंवऱ्यांनीं विद्रुम वृक्षांना भ्रमण करावयास लावीत होते. मकरसमूहाच्या ध्वनीनें ते समुद्र दुमदुमून गेले होते. मत्स्यांच्या पुच्छाग्रांचे आघात झाल्यामुळें त्यांतील नौका फुटून त्यांचे ध्वनि निघत होते. त्या समुद्रांत ज्यांनीं आपल्या माना वर काढल्या आहेत असे कूर्म व मकर लोकरीचीं वस्त्रें पांघरणाऱ्या लोकांना[1] खात होते. मोठा आवाज करणाऱ्या वायूच्या योगानें त्यांतील नौका मोठ्या वेगानें खालीं व वर होत होत्या. सोसाट्याच्या वाऱ्यामुळें त्या नौकांवरील शिडें अतिशय ताणलीं जात होतीं. समुद्रांतील लाटांबरोबर त्यांतील रत्नें तीरांवर उडत असल्यामुळें त्यांचा झणझण असा आवाज होत होता. तो समुद्र आपल्या उंच तरंगरूपी भुजांनीं जणुंकाय सूर्यमंडळाला स्पर्श करीत होता. लाटांबरोबर खालीं व वर होणारीं रत्नें व माणकें यांचें किरणमंडल सभोंवार पसरत होतें. त्यांतील मकरांचे समूह वर उड्या मारून व फेनयुक्त भोंवऱ्यांत पडून त्यांबरोबर गरगर फिरत होते. कोठें कोठें जलहस्ती आपल्या सोंडा वर उचलून जणुंकाय वेळूचें वनच बनवीत होते. लाटांमध्यें हत्तींचीं पुच्छें वेलींसारखीं दिसत होतीं. ते समुद्र हत्तींच्या पुष्ट समूहरूप पंक्तींत वसंताप्रमाणें फेनपुंजांनीं पुष्पित झाले होते. श्वेत द्वीपामध्यें माधव आपल्या परिवारासह विश्रांति घेत होता. त्या समुद्राच्या निरनिराळ्या प्रदेशांत असंख्य देव व असुर यांनीं आपलीं घरें केलीं होती. नक्षत्रप्रतिबिंबयुक्त नवतरंगांनीं ते समुद्र आकाशाला जणुंकाय हंसतच होते. गुहांतील मशकांप्रमाणें पातालगर्तेंत शिरलेले व त्यांतून बाहेर निघण्यास भ्यालेले असे पर्वत त्यांत अचल होऊन राहिले होते. जलतरंगांच्या ओघांनीं ते समुद्र आपल्या तीरावरील पर्वतांस ठेंगू ठरवीत होते. त्यांनीं आपल्या क्षेत्रामध्यें अनेक रत्नांचे रश्मिप्रसररूप अंकुर रोवले होते. मोत्यांच्या शिंपल्यांतून उडालेलीं मोत्यें वाळवंटभर पसरलीं होतीं. विविध रत्नांचें किरण याच रेशमी दोऱ्यानें त्यांचे तरंग चित्रविचित्र तऱ्हेनें गुंफले होते. त्यांत सर्व दिशांनीं प्रवेश करणाऱ्या नद्या मागांवर विणल्या जाणाऱ्या वस्त्रांप्रमाणें दिसत होत्या. शेंकडों मुक्ताशुक्तींनीं चिन्हित झालेल्या इंद्रनील तटांनीं शेकडों चंद्रांप्रमाणें दिसणारी आपली नखश्री ते दाखवीत होते. त्यांच्या तरंगांमध्यें तीरावरील तालीवनांचें प्रतिबिंब पडून तरंगांबरोबर तें वनहि फिरत आहे, असा भास ते करवीत होते. तीरस्थ वनलतां-

१ समुद्रांवरून प्रवास करणाऱ्या लोकांचीं वस्त्रें प्रायः लोकरीचीं असतात हें प्रसिद्धच आहे.

वरून खालीं पडलेले वेलदोडे, लवंगा, कंकोल इत्यादि फलपंक्ति धरण्यासाठीं जलचरच त्या समुद्राच्या तीरावर पुनः पुनः ये-जा करीत असत. त्यांच्या तीरावर जे आम्र, नीप, कदंब इत्यादि वृक्ष होते, त्यांवर पक्षी येऊन बसत व त्यांचीं प्रतिबिंबें समुद्राच्या पाण्यांत पडत. त्यांना खाण्यासाठीं जलचर धांवत येत, पण त्यांची फसगत झाली म्हणजे ते चडफडत परत जात. आकाशांतून उडणाऱ्या पक्ष्यांच्या प्रतिबिंबाला धरण्यासाठीं इकडून तिकडून धांवून येणारे जलचर प्राणी तरंगांना आपल्या जवळ ओढून घेऊन मोठा ध्वनि करीत असत. ते चार समुद्र आकाशासारखे विस्तीर्ण होते. ते चारहि दिशांमध्यें पसरले होते. त्यामुळें अमूर्तादि साधर्म्यानें नारायणासारखेच ते शोभत होते. त्यांच्या हृदयांत जगत्त्रय प्रतिबिंबरूपानें स्थित होतें. अतिगांभीर्य, निर्मलता, व विस्तार, या वैभवांनीं आकाशाला गिळून ते हृदयांत बिंबित झाल्याप्रमाणें दाखवीत होते. पद्मकोश आपल्यामध्यें असलेल्या भ्रमराला जसे व्यक्त करितात, त्याप्रमाणें ते समुद्र आकाशासह जलचारी पक्ष्यांचें प्रतिबिंब आपल्या हृदयांनीं धारण करीत होते. ते सागर तरंगांच्या चंचलतेनें विस्तार पावणाऱ्या वायूंनीं अंतरिक्षावर प्रहार करीत होते. पर्वतांच्या दऱ्यांतून बाहेर निघणारा जो भयंकर वायु त्यावरून ते चारहि समुद्र कल्पांतींच्या मेघांचें निवासस्थानच आहेत कीं काय असें भासत होतें. गुहांतील गुलगुल ध्वनीनें ते अशनीप्रमाणें भयंकर वाटत होते व त्यावरून स्वतःला ग्रासणारे अगस्त्य व और्वानल गुहांच्या उदरांत ग्रस्त होत आहेत, अशीच ते संभावना करीत होते. तरंगांचे समूह हेच वृक्ष, सीकरसमूह हींच पुष्पें व लहरी याच मंजिऱ्या, यांनीं युक्त असलेलीं तीं जलवनेंच जणुं काय आकाशाला जाऊन भिडलीं होतीं. ज्यांत मत्स्यादि प्राणी उडत आहेत असे तरंगांचे समूह शस्त्रांनीं तोडलेल्या आकाशाच्या तुकड्यांप्रमाणेंच खालीं भूमीवर पडले आहेत, असें पाहून त्या राजांना भ्रम झाला. याप्रमाणें हे रामा! तरंगांच्या योगानें सामोरे येत असलेल्या क्षारसमुद्रांच्या दीर्घ तीरांवर विपश्चित् राजाचें सैन्य येऊन पोंचलें असतां सभोंवार दूरवर पसरलेल्या तीरावरील आकाशाला जाऊन भिडलेल्या पर्वतांच्या मस्तकावर वेलचीलवंगादि वृक्षांच्या मूळांशीं तरंगांच्या तांडवांनीं खंडीत झालेली भ्रमरासारखी काळी वनरेखा फार शोभली. ११३.

---

## सर्ग ११४ वा.

१ विपश्चित् राजाला त्याच्याबरोबरचे लोक वन, वृक्ष, मेघ, पर्वत, समुद्र, व वनचर दाखवितात त्याचें वर्णन.

श्रीवसिष्ठः—त्यानंतर त्या राजांचे पार्श्ववर्ती लोक त्यांना वन, वृक्ष, समुद्र, शैल, मेघ व वनचर यांस दाखविते झाले. " हे देव, मध्यदेशापासून क्रमानें अग्रावरील शिलाप्रचुर भागास प्राप्त होणाऱ्या या पर्वताची उंची आकाशाला जाऊन भिडली आहे. त्यामुळेंच याच्या शिखरभूमीवर विहार करणारे देव, गंधर्व वगैरे आहेत पहा. बकुल, पुन्नाग, नारिकेल इत्यादिकांच्या फुलांनीं आकुल झालेल्या या अरण्यपंक्ति आपल्या अंगांतून नानातऱ्हेचे सुगंध वायु सोडीत आहेत. समुद्र आपल्या तरंगरूपी कोयत्यांनीं पर्वताच्या जवळची भूमि छाटीत आहे. त्याचप्रमाणें पर्वतावर शोभणाऱ्या ज्या शिलपंक्ति त्यांनाहि छेदीत आहे. तसेंच मुळापर्यंत फलपल्लवांनीं व्यापलेल्या वन-

पंक्तीला हा तोंडीत आहे पहा. एखादा बालक घरांतील धूमपंक्तीला पंख्याच्या वाऱ्यानें जसा बाहेर घालवितो तसा हा समुद्र वाऱ्यानें हाल-विलेल्या तरूंच्या शाखा याच भुजादि अभिनयांनीं नाच करणाऱ्या व स्वेदबिंदूसा-रख्या आपल्या जलकणांनीं माखलेल्या पर्व-तांच्या शिखरप्रदेशीं विश्रांति घेत असलेल्या वाऱ्यांना उडवून देत आहे. पूर्ण चंद्राच्या उदयसमयीं वाढलेल्या समुद्राच्या पुरांनीं ज्यांच्या शाखांवरून शंख अडकविले आहेत, असे या समुद्राच्या तीरावरील वृक्ष, चंद्रबिंबा सारखीं अमृतरसपूर्ण व शुभ्र फळें अस-लेल्या कल्पवृक्षांसारखे भासत आहेत पहा! लतारूपी स्त्रियांनीं युक्त असलेले हे वृक्ष रक्त-पल्लवरूप हातांत रत्नासारखीं पुष्पें घेऊन स्वगृहीं आलेल्या तुज अतिथीचें पूजनच करीत आहेत. हा ऋक्षवान्नामक पर्वत लाटां-बरोबर आलेल्या मकरांना ग्रासून शुक्लपाषाण रूप दंतांनीं युक्त असलेल्या गुहामुखांनीं भालूप्रमाणें गुरगुर आवाज करीत आहे. ज्याप्र-माणें विजययुद्धकुशल योद्धा आपल्या शत्रूची कठोर वाक्यांनीं निर्भत्सना करतो, त्याप्रमाणें हा महेंद्रपर्वत वर गर्जना करणाऱ्या मेघांना खालून प्रतिध्वनिरूप मंद गर्जना करून जणुंकाय त्यांची निर्भत्सनाच करीत आहे. ज्यानें आपल्या अंगाला चंदनाची उटी लावली आहे, असा हा श्रीमान् मलयपर्वत एखाद्या मल्लाप्रमाणें समुद्ररूप प्रतिमल्लाच्या तरंगरूपी भुजांचा वेग जिंकण्यासच जणुंकाय तयार झाला आहे. सर्व बाजूंनीं रत्नतरंगांनीं युक्त असलेला हा सागर आकाशचर देवादिकां-कडून नेहमीं भूमीच्या रत्नजडित कंकणाप्रमाणें पाहिला जात आहे. अरण्यांनीं पूर्णपणें आच्छा-दिलेले लहान लहान पर्वत वायु वनाला हालवूं लागला असतां, चंचल होऊन सर्पा-प्रमाणें खालीं वर होऊं लागतात. त्यांच्या शिखरावर रत्नें असून तीं आपल्या गुहारूपी मुखांनीं वायूचें प्राशन करीत असतात. ( सर्पांच्या मस्तकांत मणि असतो, व ते वायु भक्षण करतात असें प्रसिद्ध आहे. ) लाटांच्या शिखरांवरून भ्रमण करणारे समुद्रांतील मकर व अरण्यांतील हत्ती, लाटा खालीं जाऊं लागल्या असतां व वर उठूं लागल्या असतां एकमेकांला धरण्यासाठीं भयंकर सोंडा व पस-रलेलें मुख यांच्यायोगानें वृष्टि करणाऱ्या मेघासारखेच दिसत आहेत. ह्मणजे पाठीमागून येणारे मेघ मागें लागले असतां पुढचे मेघ वृष्टि करीत जसे पळूं लागतात, त्याप्रमाणें हे दिसत आहेत. त्यामुळें ते पहाणारांचें मन आकर्षण करीत आहेत. त्यांतील एक हत्ती दैववशात् अगाध जलावर्तात सांपडून गर-गर फिरूं लागला आहे. त्यानें सोंडेनें पाणी फेंकून दशदिशा व्यापून टाकल्या आहेत. पण त्या जलांतून बाहेर निघण्याचें सामर्थ्य नस-ल्यामुळें आपलें मस्तक वर काढण्यास अशक्त झालेला तो मरत आहे. पहा! महाराज, हे समुद्र नानाप्रकारच्या प्राण्यांनीं भरलेले आहेत. ते जलांनीं परिपूर्ण जरी असले तरी ते पर्व-तामुळें उंचसखल झाले आहेत आणि या समुद्राप्रमाणेंच द्वीपभूमिहि आहेत असें सम-जावें. ब्रम्ह आपल्यामध्यें जगाला जसें धारण करतें त्याप्रमाणें हा सागर आपल्यामध्यें आव-र्तांना धारण करीत आहे. ते वस्तुतः त्याहून भिन्न नसले तरी भिन्न असल्यासारखे भास-तात. प्रत्यक्ष दिसत असले तरी असद्रूप आहेत. तरंगांच्या द्वारा चंचल जरी दिसले तरी ते जड आहेत. आणि ते शांत जरी दिसत असले तरी अनंत आहेत. हा सागर इंद्राप्रमा-णेंच आपल्यामध्यें चंद्रासारखीं असंख्य रत्नें धारण करतो. कारण देवांनीं एकदा त्याचें

सर्वस्व हरण केलें आहे, त्यामुळें तो त्या रत्नांना देवांपासून लपवून ठेवीत आहे. इंद्रहि असुरांना भिऊन पुष्कळ रत्नें लपवून ठेवतो हें प्रसिद्ध आहे. म्हणूनच हा समुद्र महातेजोरूप असंख्य मण्यांना आपल्या शरीरांत धारण करून नक्षत्रप्रतिबिंबाच्या रूपानें असत्य मणि दाखवितो. त्यांतील एकेक मणि पश्चिम समुद्रामध्यें फेंकण्यासाठीं तो नित्य बाहेर काढतो, व मला असें वाटतें कीं, त्यामुळेंच दिवस होतो. एखाद्या यात्रेमध्यें लोकांचा जसा मोठा समुदाय जमतो व त्यांच्या परस्पर भाषणांनीं मोठा कोलाहल होतो, त्याप्रमाणें अनेक दिशांतील जलांचा समुद्रांत साधुसमागम झाला आहे व त्यामुळेंच हा एवढा कलकलाट होत आहे. युद्धाविषयीं उत्सुक असलेल्या प्राण्यांमध्यें जलचरच श्रेष्ठ होत. कारण पूर्वपश्चिम समुद्रांचा जेथें संगम होतो, तेथें त्याचें युद्ध अहोरात्र चाललेलें असतें, तें कधींच थांबत नाहीं. तरंगाबरोबर नाचून थकलेल्या मत्स्यांना सीकरयुक्त मौक्तिकांचें पारितोषिक देतच जणुंकाय हा वायु एखाद्या प्रभूप्रमाणेंच येत आहे. पहा, नदीरूपी मोत्यांच्या सरांत मध्यें मध्यें असलेले ते मेघरूपी मणिश्रेष्ठ या समुद्राच्या गळ्यांत लोंबत असून एकमेकांवर आपटल्यामुळें त्यांचा खणखणाट होत आहे. महेंद्रपर्वताच्या गुहेंतून परतणाऱ्या प्रतिध्वनींनीं दुमदुमणाऱ्या भूमि सिद्ध व साध्य यांना सुखावह वाटतात. मंदरपर्वताच्या दऱ्यांतून पसरणारे वायु तेथील वनाला कांपवून त्यांवरील पुष्पांना आकाशांत मेघाप्रमाणें पसरवितात. आम्र, नीप, कदंब या वृक्षांनीं संपन्न असलेल्या गंधमादन पर्वताच्या गुहांत विजा हेच ज्याचे चंचल नेत्र आहेत, असे मेघहरिण फिरत आहेत. हिमालयाच्या गुहांतून निघालेले व लतापंक्तिंकडून तांडवनृत्य करविणारे वायु मेघांना व समुद्राच्या तरंगांना दूर दूर करीत आहेत. महाराज! गंधमादन पर्वतावरील वायु च्यूत, कदंबादि वृक्षांच्या संसर्गानें सुगंधित होऊन समुद्रामध्यें लाटा उत्पन्न करीत आहेत. अलकानगरीच्या केशत्वास प्राप्त झालेल्या मेघास उडवीत व वनपंक्तींमध्यें पुष्पांचें अभ्र पसरीत येथें येत आहेत. कुंद व मंदार यांच्या पुष्पांचा ज्याला मधुर सुगंध येत आहे व जो तुषार-सीकरांनीं मिश्र झाला आहे, अशा या वायूला स्पर्श करा. नारीकेलवृक्षांच्या व मल्लीकादि लतांच्या नृत्यानें ज्याला मद्याचा उग्र वास येत आहे, असा हा वायु पारसीकांच्या नगरीकडे वहात आहे, पहा. हे वायु ईशानाच्या फुललेल्या प्रमदवनास व त्यांतील कापूरकदलीच्या सुवासांनीं सुगंधित झालेल्या मेघास हालवीत व कैलास पर्वतावरील कमलाकरांस डोलवीत वहात आहेत पहा. विंध्यपर्वताच्या दऱ्यांतून निघालेले हे वायु गजेंद्राच्या कुंभांतून गळणाऱ्या मदानें मंद होऊन हळुहळू वहात आहेत पहा. शबरीच्या शरीरावर वस्त्राप्रमाणें रहाणाऱ्या पानांचा जेथें ढीग जमला आहे, अशा मलय-पर्वतावर पानें नेसणाऱ्या शबरांनीं व त्यांच्या बाणांनीं परिपूर्ण झालेलीं व जेथें पशु-पक्षी फार थोडे अवशिष्ट राहिले आहेत, अशी मलयवनपंक्ति नगराप्रमाणें आचरण करीत आहे. समुद्र, पर्वत, नद्या, मेघ, वनपंक्ति हींच ज्यांचीं अंगें आहेत अशा दिशा तुझ्या प्रतापवलांनीं सूर्यकिरणाच्या द्वारा जणुंकाय हंसतच आहेत. या प्रदेशीं पर्वताजवळील वनपंक्तींत क्रीडेसाठीं विद्याधरांनीं रचलेल्या पुष्पशय्या त्यांचे नानाविध विलास सुचवीत आहेत ११४.

---

## सर्ग ११५ वा.

१ चारी दिशांतील वनें, पर्वत, वृक्ष, नद्या, वायु, पक्षी, ग्राम व मेघादिक यांचें वर्णन.

**पार्श्वस्थः**—हे उत्तमाशय राजा ! या पर्वतावर ज्यांच्या स्त्रिया लीलेमध्यें आसक्त आहेत असे किन्नरगण आपलीं दिनकृत्यें सर्व विसरून व विलासानें श्रांत होऊन कर्ण-मधुर गायन करतात व ऐकतात. हे हिमालय, मलय, विंध्य, सह्य, क्रौंच, महेंद्र, मधु, दर्दुर इत्यादि पर्वत दूर असल्यामुळें प्रेक्षकांच्या दृष्टीला शुष्क पर्णांनीं चिन्हित झालेल्या मातीच्या ढिगांचें साम्य दाखवितात. त्यांच्या शिखरांवर व दऱ्यांतून शुभ्र मेघपटल विश्रांति घेत असल्यामुळें ज्यांवर वाळलेलीं पानें आहेत अशा मातीच्या ढिगाप्रमाणें ते दुरून दिसतात. हे कुलपर्वत दुरून पाहाणाराला त्यांच्यामध्यें फार मोठें अंतर असलें तरी एकमेकांला अगदीं चिकटल्यासारखे दिसतात व त्यामुळें नगरांच्या तटाचा भ्रम उत्पन्न करतात. त्याचप्रमाणें समुद्रांत प्रवेश करणाऱ्या व त्वरेनें युक्त असलेल्या या नद्या वस्त्राच्या आंतून शिवलेल्या अंचलांप्रमाणें दिसत आहेत. हे राजा ! ज्यांनीं सभोंवार शैलावरून मेघांचें पांघरूण घेतलें आहे व मेघाप्रमाणें कृष्णवर्ण दिसणाऱ्या पक्ष्यांचा कलकलाट हें ज्यांचें भाषण आहे अशा, व वेलींवरून पडणाऱ्या पुष्पांनीं युक्त असलेल्या सुशोभित वनपंक्ति याच ज्यांच्या भुजा आहेत, अशा या दहा दिशा तुझ्या अंतःपुरांतील राण्यांना जणुं काय हंसतच तुझ्यापुढें उभ्या आहेत असें भासतें. ताली, तमाल, बकुल या वृक्षांनीं ज्यांतील उंच पर्वतशिखरें आकुल झालीं आहेत, दुरून तटाप्रमाणें भासणाऱ्या पर्वतांवर ज्याची आकृति एकरूप झाली आहे, अशा वायूनें चंचल झालेलें वन समुद्राच्या तरल तरंगांनीं वेगानें स्पर्श केल्यामुळें तीरावर चिकटून राहिलेल्या दाट शेवाळाप्रमाणें दिसत आहे. एकीकडे केशव शयन करीत आहे, व दुसरीकडे त्याच्या शत्रूचें कुल सुखानें रहात आहे. एकीकडे शरण आलेले पर्वतरूपी पक्षी विश्रांति घेत आहेत, तर दुसरीकडे समस्त कल्पान्तमेघांसह वडवाग्नि वास करीत आहे. अहाहा ! या समुद्राचें समस्त शरीर किती विस्तीर्ण, ऊर्जित व किती भार सहन करणारें आहे ! ( उत्तर दिशेंत स्थित असलेल्या विपश्चित् राजाला त्याचा एक अनुचर मेरुपर्वताच्या पायथ्याशीं असलेले सुवर्णाचे जंबुनदीचे तट दाखवीत म्हणतो—) ज्यांतील हे सर्व ग्राम, अरण्यें, नगर, स्थळें, पर्वत, वृक्ष, स्थाणु, अग्रहार वगैरे सर्व सोन्यासारखें दिसत आहे, असे हे जंबुनदीचे तट सूर्यकिरणांनीं व्याप्त होऊन सभोंवार सुशोभित झाले आहेत. ते ज्वालापंक्तींनीं युक्त होऊन आकाशांत सभोंवार आपलें तेज पसरीत आहेत. राजा ! येथें अशा प्रकारची असलेली ही सर्व भूमि देवांच्याच उपभोगास योग्य आहे, मनुष्यांच्या नाहीं. या पर्वतांचे सूर्यमार्गामध्यें गेलेले हे ऊर्ध्वप्रदेश, मेघाप्रमाणें ज्यांची कांति आहे, असे कदंबवनरूपी कंबल पांघरलेले दिसत आहेत. यास्तव या प्रदेशामध्यें पृथ्वीप्रमाणेंच हाहि तटच आहे अशी तुझी मति न होवो. सूर्याला प्रतिबंध करणारे हे आकाशांतील मेघसमूह आहेत, अशी शंका तुला न येवो. ( दुसरा एक पार्श्वस्थ दक्षिण दिशेंत असलेल्या राजाला मलयाद्रीचें वर्णन करून सांगतो—) हा समोर दिसणारा मलय पर्वत होय. याचा प्रभाव असा आहेः—या पर्वतावरील लवलीवल्लींनीं शोभणाऱ्या चंदनांच्या विस्तीर्ण सुगंधामुळें

बाकीचे वृक्षाहि चंदनासारखे सुगंधयुक्त होतात आणि देव, मनुष्य व दानव हे आपल्या मस्तकांवर त्यांचा तिलक करतात; ह्मणजे गंध, लावतात. शिवाय याच्या आमोदमदामुळें ज्याच्या तृतीय नेत्रामध्यें अग्नि राहिलेला आहे अशा शंकराच्या दोन्ही गालावर तांडवामुळें घाम आला असतां तो शांत होतो, त्याचप्रमाणें स्त्रियांना श्रांतीनें आलेले स्वेदबिंदु हा आमोद अतिशय शांत करतो समुद्राच्या तरंगांनीं धुतलेल्या सुवर्णमय तटांवर प्रादुर्भूत झालेल्या श्रेष्ठ नागांच्या शरीरांनीं या पर्वतावरील चंदनवृक्ष परिवेष्टित झालेले असतात. त्याचप्रमाणें विद्याधरींच्या मुखकमलदीप्तींनीं ज्यावरील दुसऱ्याहि सर्व शिला सुवर्णवर्णाच्या केल्या आहेत असा हा मलय पर्वत आहे. हा दुसरा क्रौंच या नांवाचा पर्वत आहे. यावरील भ्रमर कीचकस्तंभाचा गीतध्वनि श्रवण करण्यांत आसक्त होऊन कमलकोशामध्यें मौन धारण करून बसलेले असतात. त्या कीचकांचें गायन चाललें असतां आवाज करणारे कुंज, शिलाकटकादि कठोर प्रदेश, गुहा व नद्या यांचे ध्वनि हे तालनृत्य करीत आहेत. या पर्वतावर बलाकयुक्त चंचल नीलमेघ ज्यांना प्रिय आहेत अशा मयूरांच्या केकांनीं भयभीत झालेले सर्प, जुनाट वृक्षांच्या ढोलींतून आपलीं शरीरें संकुचित करून बसतात. हे राजा! या पर्वतांच्या तटांवर कोमल कनकलतांनीं रचलेल्या गृहांत आपल्या कांतांसह विलास करणाऱ्या ललनांच्या चंचल झालेल्या कंकणांचे व इतर भूषणांचे कर्णाला अतिमधुर लागणारे ध्वनि ऐक. हत्तींच्या गंडस्थळांतून गळलेल्या मदजलांनीं मिश्रित झालेला व त्यामुळेंच चंचल तरंगांत भ्रमरसमूहांनीं चर्वण केलेला समुद्रांतील कणसमूह जणुंकाय रडतच आहे, पहा. हे राजा! समुद्रांत पडलेलें हें चंद्राचें चंचल प्रतिबिंब पहा. अमृतमंथनाच्या वेळीं क्षीरसागरांतून निघालेला हा लोण्याचा गोळाच आहे. हा निर्मल पूर्णचंद्र त्याच्यासारख्याच शरीरांनीं युक्त अशा नक्षत्रसुंदरींनीं परिवेष्टित झाला आहे, आणि आपल्या सर्व परिवारासह या क्षीरसागरांत प्रतिबिंबित झाल्यामुळें तो आपल्या पित्याच्या मांडीवर जणुंकाय जलक्रीडाच करीत आहे, पहा. (दुसरा कोणी म्हणतो) महाराज! या मलयपर्वताच्या निर्मल शिखरावर या बाललता कशा नाचताहेत पहा. मत्त कोकिलांचे ध्वनि हेच त्यांच्या नृत्यांतील अव्यक्त ध्वनि आहेत. चंचल भ्रमरसमूह हेच त्यांचे नयन आहेत. कोमल पल्लवरूपी हस्तांत त्यांनीं पुष्पें धारण केलीं आहेत. मधूत्सवविलास याच परागांचे तिलक त्यांनीं लावले आहेत. महाराज! मेघवृष्टींतील बिंदु पर्वतावरील वेळूंच्या उदरांत शिरतात. कांहीं समुद्रांतील पाण्याची इच्छा करणाऱ्या शुक्तींच्या उदरांत शिरतात. किंवा कांहीं गंधहत्तींच्या गंडस्थळांत शिरतात व तेच मुक्ताफलरूपानें परिणाम पावतात. मोत्यांच्या अशा तीन जाती आहेत. स्थान शुद्ध असलें ह्मणजे जसें तें मोठें होतें, तसेंच त्याचे गुणहि उत्तम असतात हाच न्याय सर्व पदार्थांना लागू आहे. शुद्ध स्थानीं श्रेष्ठ, उत्तम गुणसंपन्न वस्तुच निपजतात, त्याप्रमाणें रत्नांच्या खाणीहि अनेक प्रकारच्या आहेत. पर्वतावर, समुद्रांत, पुरुषांमध्यें, पृथ्वीमध्यें, मेघांमध्यें, बेडकांमध्यें शिलेंत, हत्तींत अशा अनेक ठिकाणीं अनेक आकाराचे मणि उद्भवतात. पण त्यांतील कर्मे व गुण यांचें वैचित्र्य कसें असतें तें ऐक. तापशांति, शत्रूंचें उच्चाटन, जारण, मारण, ज्वर, भय, भ्रांति, प्रकाश, अंधत्व, खेद व संताप, त्याचप्रमाणें रत्नाच्या स्वामीला दृष्टिआड किंवा दूर असलेल्या पदार्थांचें ज्ञान

होणें, भूगति, दूर गमन करण्याची किंवा भूमींत गुप्त होऊन जाण्याची शक्ति, आकाशगति, भूत व भविष्यत् पदार्थांचें ज्ञान, व्याधि, दुर्भिक्ष इत्यादिकांचा नाश आणि शत्रूनें केलेले विषप्रयोग, चेटक, यंत्रतंत्र इत्यादिकांचें प्रतिविधान अशीं त्यांचीं विलक्षण कृत्यें असतात. या प्रदेशीं चंद्रोदय झाला असतां नगरें वातायनादिरूप आपल्या मुखांनीं व मंदरपर्वत गुहा, श्वभ्रें, दऱ्या, वेळू इत्यादि रंध्रांच्या योगानें अमृताचा जणुं काय समुद्रच अशा त्याची स्तुति करतात. हा वायु या हिमालयाच्या शिखराला उडवूनच नेतो आहे कीं काय, असें म्हणून मुग्ध सिद्धांगनांनीं आपलीं मुखें वर करून मोठ्या आश्चर्यचकित दृष्टीनें शिखरांवरून दूर होणाऱ्या अभ्रपटलाकडे पाहिलें. किंवा भूमीनें आकाश व पाताळ यांतील अधिक जड कोण आहे हें पहाण्यासाठीं जणुंकाय तो तुलास्तंभच उभारला आहे असें त्यांना वाटलें. राजन् ! हे महेंद्रपर्वताचे तट पहा. ते गंगेचे तरंग व हिमसीकर यांनीं शीतल झाले आहेत. विद्याधर त्यांवरील सुंदर शिलातलावर बसले आहेत. त्यांवरील पुष्पित वनें पुष्पासारख्या शुभ्र मेघांनीं वेष्टित झालीं आहेत. महाराज ! देशांतरांतील विस्तीर्ण वनप्रदेश, पुष्पस्थलें, उपवनें, नगरें, सर्व जगाला पावन करणारीं तीर्थें, यांच्या दर्शनानें दौर्भाग्यभीति मोठ्या वेगानें पळून जाते. साधुजनांनीं भरलेलीं दिगंतमंडलें, श्रीशैलादि शिखरें, तीर्थ, कूप, वापी इत्यादि श्वभ्रें हिमालयपर्वताच्या दऱ्या, चंपकादिक अरण्यें, आकाशाचीच ज्यांना उपमा आहे व जीं निकुंजकुलांनीं व्यापलेलीं आहेत, अशीं सेतुबंधादि तीर्थें पाहून प्राण्यांचीं ब्रह्महत्त्यादि मोठीं पापेंहि नाश पावतात. हे राजा ! मलयावरील चंदनवृक्षांच्या रम्य पंक्ति, विंध्यपर्वतावरील मदांध गज, कैलासपर्वतावरील श्रेष्ठ सुवर्ण, महेंद्रपर्वतावरील चंद्र या नांवाचा एक धातु, हिमालयपर्वतावरील दिव्य औषधि व दुसऱ्याही सर्व ठिकाणीं असलीं अनेक रत्नें आहेत. पण असें असूनही भाग्यहीन जन त्यांचें दर्शन न घेतां अंधमूषकाप्रमाणें जीर्णगृहांमध्यें आयुःक्षय करतात, हें केवढें आश्चर्य आहे ? ( कोणी मेघयुक्त अंधकारानें आच्छादित झालेल्या दिशांचें वर्णन करतो—) मेघांधकारानें आच्छादित झालेल्या या दिशा युगान्तसमयीं जलांनीं परिवेष्टित झालेलें व त्यामुळेंच अंतरिक्षलोकापर्यंत वाढलेलें हें जगत् एक सरोवरच आहे असें भासवितात. मेघांतील चपल विजा त्या सरोवरांतील शफरिकांप्रमाणें म्हणजे क्षुद्र मत्स्यांप्रमाणें भासतात. स्वतः हिमयुक्त असून ज्यांनीं भूम्यादिकांवरील नीहारधारा शोषणानें कृश करून टाकलेल्या आहेत, असे वायु धारांचें वमन करणाऱ्या मेघांस मत्त करीत आहेत व ते आपल्या शीतल स्पर्शानें लोकांच्या अंगावर रोमांच उत्पन्न करीत आहेत, अहाहा, केवढें आश्चर्य आहे, पहा ! हा नीलमेघाच्या प्रसारानुसार गमन करणारा वारा कसा वहात आहे पहा ! तो अंकुर, वृक्ष इत्यादिकांच्या वनांतून संचार केल्यामुळें सौगंध्ययुक्त झाला आहे. मेघवृष्टीच्या तुषारसमूहाहूनहि तो अधिक धीट आहे व वेलींचे पल्लव, पुष्पगुच्छ इत्यादिकांना इतस्ततः पसरीत आहे. स्वर्गांतून च्युत झालेल्या व त्यामुळेंच पूर्वपुण्याच्या वासनेचा लेश वहाणाऱ्या जीवांप्रमाणें हे वायु क्रीडेमुळें वाढलेल्या स्त्रियांच्या निःश्वसितांनीं वृद्धि पावत आहेत व सुगंधाला वहात आहेत. भूमंडलीं जीं कमलें आहेत त्यांचा विकास करण्यास व पुष्पलतांच्या कळ्यांना खुलविण्यास उद्युक्त झालेले व मेघलक्षण वस्त्रें फाडण्यांत पटु असलेले

हे वायु उपवनांना हालवीत वहात आहेत. ज्याप्रमाणें पुष्पांच्या विचित्रपंक्तींनीं सुवासित झालेल्या नृपांगणामध्यें राजाचे श्रेष्ठ भृत्य तीं पुष्पें न तुडवितांच संचार करतात, त्याप्रमाणें हे वायु नभःस्थलांतील संध्याकाळच्या अभ्रपंक्तीस किंचित् हालवून संचार करीत आहेत. कोठें पुष्पाप्रमाणें त्यांना वास येत आहे व कोठें निरनिराळ्या कमलांचा त्यांना सुगंध येत आहे. कोठें ते पुष्पांचा वर्षाव करीत आहेत व कोठें सुंदर परागांचा पाऊस पाडीत आहेत. कोठें बर्फामुळें शुभ्रवर्ण तर कोठें हिरव्या, पिंवळ्या, काळ्या पर्वतधातूंनीं त्या-त्या वर्णाचे झालेले असे शिखरसंबंधीं वायु श्रांत झालेल्या स्त्रीपुरुषांचा घाम सुकवीत वहात आहेत. ज्याचा मूर्खाशीं संसर्ग झालेला आहे अशा मनुष्याप्रमाणें हा सूर्य आपल्या किरणांच्या द्वारा सेवकाप्रमाणें आज्ञांकित अशा सूर्यकांत मण्यांकडून गुहादिकांतून जळणाऱ्या प्राण्यांच्या आक्रंदनशब्दासह निखाऱ्यांचा वर्षाव करीत आहे. पुरुषरूप रसायनाविषयीं अतृप्त असलेल्या व त्यामुळेंच मदानें लज्जारहित झालेल्या प्रमदेकडून आलिंगिलेल्या पुरुषाच्या इतर वार्ता विषमूर्च्छेप्रमाणें सहन केल्या जात नाहींत. कमलांना हालविणारे, मृदुशीकरानें युक्त असलेले, चंद्रकिरणांशीं संसर्ग पावणारे वनवायुहि विरहिणींना अग्नियुक्त असल्याप्रमाणें तापदायक होतात. हे राजा! या पूर्वसमुद्राच्या सखल किनाऱ्यावरून या शबरास्त्रिया कशा जात आहेत. त्या पहा. त्यांनीं निर्गुंडीचीं पानेंच वस्त्राप्रमाणें परिधान केलीं आहेत व कांस्याचे कंकणादि अलंकार घातले आहेत व त्यांच्या ठिकाणीं मदोत्पादक नवतारुण्य वसत आहे. ही स्त्री ज्यांत सुरत-रसास्वाद यथेच्छ घ्यावयास सांपडतो त्या रात्रीचा क्षय होईल कीं काय, रात्र संपेल कीं काय, या भीतीनें मनांत व्याकुळ होऊन आपल्या आर्द्रभावानें युक्त असलेल्या कांताला सोडीत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. त्या स्त्रीसारखीच ही सर्पांनीं परिवेष्टित झालेली चंदनलता पुढें दिसत आहे. दिवसांनीं भिवविल्याप्रमाणेंच ही आपल्या प्रियकराच्या हृदयाला चिकटून राहिलेली दयिता प्रभातसमयींच्या मंगलवाद्यांनीं मनांत अतिशय घाबरली. ज्यांतील पलाशवृक्ष प्रफुल्लित झाले आहेत अशी ही दक्षिणसमुद्राच्या तीरावरील वनपंक्ति जणुंकाय पेटल्यासारखीच दिसत आहे. त्यामुळें समुद्र आपल्या जलतरंगांनीं तिच्यावर वारंवार जलसेक करीत राहिला आहे. या फुललेल्या पलाशवृक्षपंक्तीपासून वायूंच्या योगानें ज्यांचे ऊर्ध्वभाग धुरासारखे काळे आहेत असे मेघ धूमाप्रमाणेंच निघत आहेत. पुष्पें निखाऱ्यांप्रमाणें पडत आहेत व विझलेल्या निखाऱ्यांप्रमाणें पक्षी व भ्रमर उडत आहेत. (याप्रमाणें जिच्या ठिकाणीं अग्नीची उत्प्रेक्षा केली आहे अशी वनपंक्ति दाखवून आतां खरोखर पेटलेली वनपंक्ति दाखवितो) अशीच ही दुसरी उत्तरदिशेंतील पर्वतशिखरांवर दूर खऱ्या अग्नीकडून जाळली जात असलेली वनपंक्ति पहा. आकाशांत वायु तिला हालवीत आहे. हे राजन्! क्रौंचपर्वताच्या भूमींतून मंदगतीनें चालणाऱ्या मेघसमूहाच्या गंभीर गर्जना ऐकून मोर नाचत आहेत व तसल्या नृत्य करणाऱ्या मयूरसमूहानें युक्त असा हा उंच वनसमूह समोर दिसत आहे. वृष्टियुक्त वायु, त्यांतील वृक्षांचीं पुष्पें, फळें, पल्लव यांना हालवीत आहे. हा सूर्याचा प्रसिद्ध रथ अस्ताचलावरील विकट सुवर्णमय शृंगावर घर्षण पावल्यामुळें त्याचा सुंदर संधिप्रदेश जर्जर झाला आहे व ध्वनियुक्त चक्रासह त्याच्या कूबराचाहि मोठा कर्कश आवाज होऊन तो

निम्नप्रदेशीं उतरत आहे, पहा. भुवनरूप गृहाच्या तटाप्रमाणें असलेल्या मानसोत्तरपर्वताच्या उदयगिरिशिखरांवर चंद्ररूप मांगलिक पुष्प उदय पावलें व तें मालिन्याला भिऊन सभोंवार आपल्या प्रकाशानें विकास पावलें. तथापि दैववशात् अमंगल करणाऱ्या विधीनें त्या तसल्या पुष्पामध्येंहि कलंकरूपी भ्रमराची योजना केलीच. यावरून ही गोष्ट सिद्ध होते कीं, या **जगांत अशी कोणतीही श्रेष्ठ वस्तु नाहीं कीं जिला हा दुष्ट विधि एका क्षणांत कलंकित करीत नाहीं** ! अहो, भूमीला स्पर्शहि न करणाऱ्या व पर्वतशिखरावर रहाणाऱ्या चंद्राची ही दशा, तर इतरांविषयीं काय बोलावें ! ( सर्वतः पसरलेल्या चंद्रप्रकाशावर तीन उत्प्रेक्षा—) हा गगनसागरांतील चंद्रप्रकाश प्रदोषकालीं नृत्य करणाऱ्या, त्रैलोक्यसंहार करणाऱ्या रुद्राचा अट्टाहास आहे. किंवा हा चंद्रप्रकाश नसून भुवनरूप मोठ्या गृहाला सुधालेप दिला आहे, म्ह० चुना लावला आहे. किंवा क्षीररूपी जलाचा हा शुद्ध पूर आहे. संध्याधातुरागांचा ज्यास स्पर्श झाला आहे असा प्रदोषमय मंदर पर्वताकडून मंथन केला जाणारा जो हा चंद्ररूप क्षीरसागर त्यापासून उसळणाऱ्या तरंगांसारख्या प्रभापटलांनीं उग्र झालेला जो शिव त्यांनीं सोडलेल्या गंगानदीच्या पसरणाऱ्या पुरांनीं या सर्व दिशा भरून गेल्या आहेत, पहा; हे निरुपम राजा ! तालवृक्षांप्रमाणें भयंकर असलेल्या वेतालबालकांनीं युक्त असे हे गुह्यकांचे समूह रात्रीं शांतिकर्म, स्वस्तिवाचन इत्यादि मंगलकर्में बंद झाल्यामुळें उत्पातांनीं व्याकुळ झालेल्या हूणेश्वराच्या म्हणजे तुझ्या शत्रूंच्या नगरांत त्यांतील लोकांना खाण्यासाठीं पळत आहेत, पहा. हा पूर्णचंद्र आकाशांत तोंवरच शोभतो, कीं जोंवर वधूचें मुख गृहाच्या बाहेर येत नाहीं. एकदां अंगणाकाशांत अबला मुखचंद्राचा उदय झाला कीं मग चंद्र व शुभ्र मेघखंड यांत काय फरक ! ( आतां कोणी चंद्राच्या किरणांनीं व्यापलेल्या हिमालयाचें वर्णन करतो )— हिमालयाचीं हीं शिखरें अतिशय वृद्धि पावलीं आहेत. त्यांनीं चंद्रकिरणरूप नूतन वस्त्रें परिधान केलीं आहेत. गंगाजलांनीं त्याच्या शिला धुतल्या जात आहेत. त्यांवर बर्फ पसरलें आहे. उग्र वेली याच त्यांच्या जटा आहेत. हा आकाशांत मंदरपर्वत दिसतो आहे, पहा. मंदारवन हेंच त्याच्या कानांतील भूषण आहे. झोल्यांत बसलेल्या अप्सरांच्या गीतांना सभोंवार पसरविणारा वायु त्यांवरून वहात आहे. कांहीं ठिकाणीं रत्नांच्या कांतीनें तो चित्रविचित्र दिसत आहे व तो अतिशय उंच असल्यामुळें आकाशमयच भासत आहे. उमललेलीं व दाट भरलेलीं जीं शिलींध्र पुष्पें तिच जणुंकाय अर्घ्यपात्रें धारण करणार मोठे पर्वत, मेघांच्या ध्वनींनीं गंभीर झालेल्या दऱ्यांतून असलेलें जें नक्षत्रयुक्त अन्तरिक्ष त्याची शोभा धारण करीत आहेत. उत्तरेकडे हा प्रसिद्ध कैलासपर्वत आहे. त्याच्या श्रेष्ठ व व्याप्त प्रभाप्रवाहानें आकाश अधोभागीं शंभुयुक्त स्कंधाच्या मुक्ताचूर्णानिर्मित क्रीडागृहाप्रमाणें भासत आहे व ऊर्ध्वभागीं चंद्रहि क्षीरसागरांत निमग्न झाल्याप्रमाणें भासतो. हे राजन्, हा क्रीडासक्त इंद्र कुऱ्हाडीनें ज्यांच्या शाखा तोडल्या आहेत अशा स्थाणूंची व अग्नीनें ज्यांवरील पानें वगैरे जाळून टाकलीं आहेत अशा भिंतींची परस्पर गांठ घालण्यासाठीं जलवृष्टि करून दोन्ही ठिकाणीं अंकुर उत्पादन करीत आहे. त्यामुळें ते केस मोकळे सोडल्याप्रमाणें दिसत असून वायूच्या द्वारा त्यांची परस्पर गांठ घालण्याचा प्रयत्न करीत आहे, पहा. हे कदंब व कुंद यांच्या सुवासानें सुगंधित झालेले वायु मकरंद-

वृष्टीसाठीं त्याच्या प्राशनानें पुष्ट झालेल्या भ्रमरसमूहांनीं नीलवर्ण व त्यामुळेंच मेघासारखे होऊन सर्व परिमल आपल्याबरोबर घेऊन आकाश व प्राण्यांचीं घ्राणेंद्रियें यांना लेप करीत आहेत. वर्षाऋतूमध्यें ज्यांतील फुलें उमललीं आहेत अशा वनस्थलींत, छायायुक्त कोमलतृणांनीं भरलेल्या जंगलांत, फलांनीं ओथंबलेल्या वृक्षांनीं युक्त असलेल्या ग्रामांत लक्ष्मी जणुंकाय स्वतःच येऊन निवास करते. हा पुढें दिसत असलेला ग्राम मनोदेवतांचें नगरच आहे असें वाटतें व त्यांत पुष्पें, फलें, पल्लव यांची अतिशय समृद्धि झाली आहे. हे पर्वतावरील ग्राम रम्य दिसतात. कारण त्यांत फुललेल्या चंपकादि वृक्षांच्या शाखांना झोपाळे बांधून त्यांवरून स्त्रिया क्रीडा करीत आहेत. झऱ्याचें पाणी झुळझुळ वाहत आहे. आसपासचे तालवृक्ष फुलले आहेत. फुललेल्या मंजऱ्यांनीं भूषित झालेल्या लतागृहांतून उंच वृक्षांवरील मेघांना पाहून मयूर नाचत आहेत. त्याचप्रमाणें त्यांतील कोमल तृण उगवलेलीं स्थलें वाऱ्यांनीं हालणाऱ्या लतांनीं व्यापलीं आहेत. त्यांत मधुर ध्वनि करणारे क्षुद्र पक्षी व गायन करणाऱ्या पुलिंदांच्या स्त्रिया आहेत. गुराख्यांचे लहान लहान बालक रक्षण करीत असल्यामुळें त्यांतील वासरें निर्भय आहेत. त्याचप्रमाणें ते बालक व तीं वासरें दहीं, दूध, तूप व मध यांच्या भक्षणानें पुष्ट झालीं आहेत. अशा प्रकारचे हे गिरिग्राम ह्म० ब्रम्हदेवाच्या विश्रांतीसाठीं रम्य अमृतपूर्ण मंडपच रचले आहेत कीं काय असा भास होतो. ११५.

---

## सर्ग ११६ वा.

१ संग्राम, आकाश, विरही, पर्वत, ग्राम, गुहा, मेघ व मूर्ख कावळे यांचें वर्णन.

अनुचरः—हे प्रभो! संग्रामांत आसक्त झालेल्या सीमान्तराजांचे शस्त्रसमूह स्फुरत आहेत व चतुर्विध सैन्य चालत आहे. वीरांकडून संग्रामांत संमुख मारल्या गेलेल्या वीरांना पुनः पुनः रथांवर घालून अप्सरा आकाशांत नेत आहेत, पहा. तारुण्यांत सुरत जसें शोभतें त्याप्रमाणें बलाढ्य विजिगीषूला शत्रूंशीं भयंकर संग्राम करण्याचा पुनः प्रसंग आला असतां धर्मयुद्ध अतिशय शोभतें. लोकांनीं न निंदिलेलें ऐश्वर्ययुक्त आरोग्य व परार्थासाठीं धर्मयुद्ध हें जीविताचें उत्तम फळ आहे. धर्माशीं विरोध न येईल अशा रीतीनें सन्मुख आलेल्या योद्ध्याला जो धर्मयुद्ध करून मारतो, तोच शूर स्वर्गाला पात्र होतो. हे राजा, सज्ज सत्रसमूह, याच भूषणास पात्र असलेल्या या शूर पुरुषांच्या ठिकाणीं हा त्या अंधकाररूप रात्रीचा प्रारंभ संग्रामभूमींत कसा प्राप्त होत आहे तो पहा. संग्रामलक्ष्मीच्या हातांतील तरवाररूपी नीलकमलानें शामवर्ण व घोड्यांच्या पायापासुन उडालेल्या धुळीनें काळा कुट्ट झालेला हा निशागम जरी या पुरुषापाशीं येत आहे, तरी या रात्रीं लक्ष्मी स्वयंवरांत याला वरते किंवा नाहीं, हें कौतुक पहा. शर, शक्ति, गदा, भुशुंडी, खड्ग, शूल, कुंत, तोमर, चक्र यांनीं पूर्ण असलेले हे योद्धे तांडवनृत्य करीत असलेल्या पुरुषाच्या केंसाप्रमाणें हालत असलेल्या तृणकाष्ठमय पर्वतावरील दावाग्निप्रमाणें शोभत आहेत. त्यांत शरशक्त्यादि समूह समुद्रामध्यें प्रतिबिंबरूपानें हालूं लागले असतां त्यांतील नागांचे संघ भूमीवर

प्रसूतच झाले कीं काय, असे भासतात. मोठमोठ्या जलधारांनीं परिपूर्ण असलेलें हें आकाश पहा. चंचल तारकारूपी हार घातलेल्या या आकाशाकडे पहा. दाट पसरलेल्या अंधकारांनीं व्यापलेलें हें आकाश पहा व स्वच्छ चंद्रकिरणांनीं माखलेलें हें आकाश पहा. ज्यांत अनेक देव व असुर यांच्या विमानांचे समूह हींच नक्षत्रें बनलीं आहेत, जें अश्विन्यादि नक्षत्रांचें स्थान आहे, जें संचार करणाऱ्या चंद्रसूर्यादिकांचेंहि आस्पद आहे, तें आकाश सर्व बाजूंनीं परिपूर्ण असूनही अज्ञांची 'तें शून्य आहे' ही प्रतीति अद्यापि नाहींशी होत नाहीं. जेथें एवढें मोठें समर्थ आकाशहि अज्ञांचा शून्यतापवाद घालविण्यास समर्थ नाहीं, तेथें दुसरा कोण समर्थ होणार? मेघांचे भयंकर ख्टाटोप चालले असतां त्यांनीं प्रलयकालच्या अग्नींनीं, पर्वताच्या पक्षाभिघातांनीं नक्षत्रांच्या पुरांनीं, देव व दानव यांच्या असंख्य क्षुब्ध संग्रामांनीं आकाश अद्यापिहि आपला स्वभाव सोडून विकृतीस प्राप्त होत नाहीं. यावरून अंतःकरणांत अतिशय गंभीर असलेल्या गुणवानांचा महिमा कोणालाहि कळत नाहीं, हें सिद्ध होतें. हे साधो गगना, तूं सतत आपल्या अंकावर सूर्यनारायणाला व त्याच्या परिजनांसारख्या इतर देवांना, चंद्राला व इतर गृहांना, त्याचप्रमाणें विजेसारख्या भयंकर तेजांना डोलवीत आहेस. तथापि तूं आपल्यामधील तम टाकीत नाहींस हे मोठें आश्चर्य आहे. हे आकाशा, तूं मलीन आहेस. जेथें तूं चंद्रबिंबाला छिद्ररूपानें व्यापलें आहेस, तेथें कलंकरूपानें तूं मलीन असल्याचें प्रत्यक्ष दिसत आहे. तथापि तूं स्वसंगानें सर्व चंद्रबिंबाला काळें करीत नाहींस, हें मोठें आश्चर्यच होय. अथवा जो अंतर्यामींच मलीन असतो तो मलीनाच्या संसर्गानें बाहेरूनहि मलीन होतो. पण जो आंतून निर्मल असतो त्याला कोण मलीन करणार! किंवा मालिन्यादि सर्व दोष जरी असले तरी निर्विकारताबलानें त्या दोषांमुळें प्राप्त होणारे अनर्थ टाळतां येतात आणि निर्विकारतेनें सुखहि सुलभ आहे. कारण आकाश सर्व जगद्दोषानें परिपूर्ण असूनहि एखाद्या ज्ञानी पुरुषाप्रमाणें सर्वदा निर्विकार असल्यामुळें सर्वार्थशून्य व त्यामुळें सुखी असतें. अरे बाबा, उदारबुद्धे आकाशा, तूं प्रलयकालचे मेघ, वृक्ष, वेली, लता इत्यादि उन्नतींची इच्छा करणारांना अवकाश देऊन त्यांची उन्नति करतोस! त्याचप्रमाणें तूं चंद्र, मेघ, सूर्य, किन्नर, वायु, मरुत्स्कंध व देव यांचाहि आधार आहेस. त्यामुळें सम व स्वच्छ स्वभावानें युक्त असलेल्या तुझें सर्व कर्म रम्यच आहे. पण अग्नि व सूर्य यांच्या प्रज्वलनाला अवकाश देऊन दुसऱ्यांना संताप देण्याचें जें तुझें शील आहे तें आमच्या खेदाला फारसें निमित्त होत नाहीं. कारण बाकीच्या तुझ्या गुणांकडे लक्ष दिलें असतां या दोषांकडे दुर्लक्ष करतां येतें. हे आकाशा, तूं मेघादि आवरणांनीं शून्य आहेस, प्रकाशरूप आहेस, उंच असल्यामुळें देवादि उत्तम जीवांचा उत्तम आधार आहेस. परंतु गारांचा वर्षाव करणारा हा मेघ हळूच तुझा आश्रय करून लोकांना दुःख देतो. त्यामुळें त्याच्या दोषानें तूं अतिशय हीन झाला आहेस. हे आकाशा! सुवर्णाप्रमाणें कसोटीवर तुझें चिरकाल घर्षण होणेंच उचित आहे. कारण त्यावांचून तुझ्या परीक्षेचें योग्य स्थान दुसरें कोण तेंहि नाहीं. कारण तूं शून्य आहेस, तथापि मेघांना, नक्षत्रांना, विमानांना, चंद्राला, सूर्याला, वायूला वहातोस व स्वतः प्रयोजनशून्य असतोस. वास्तव सोन्याचा सर्व गुणांनीं युक्त असलेल्या तुझी परीक्षा करावयास त्याच्या

परीक्षेचेंच स्थान पाहिजे. हे आकाशा! तूं दिवसा प्रकाशरूप असतोस, संध्याकाळीं संध्यारागानें रक्त वर्ण धारण करतोस, रात्रीं कृष्णवर्ण होतोस, आणि नेहमीं कोणतीच सद्वस्तु धारण करीत नाहींस, त्यामुळें तूं सर्व वस्तुशून्य आहेस. यास्तव तुझी माया व तुझें चेष्टित तत्त्ववेत्त्यालाहि कळत नाहीं. ज्याप्रमाणें अति **विपुलबुद्धि तत्त्ववेत्ता निष्कांचन जरी असला तरी आपलीं इष्ट कार्यें साधतो,** त्याप्रमाणें हें आकाश अंतःशून्य असूनहि सर्वांची उन्नति करतें. आकाशमार्गांत प्रवाशाच्या विश्रांतीचें साधन असें तृण व जल नाहीं, गांव नाहीं, नगराचें तर नांव नको. पानांच्या भरानें ज्याची दाट छाया पडत आहे, असा वृक्ष नाहीं, रम्य पाणपोयी नाहीं, तरी पण हा सूर्य प्रतिदिवशीं आकाशमार्गाचें आक्रमण करून जातो. **सत्त्ववान् लोक इतरांना असाध्य असलेलेंहि आरंभिलेलें कर्म सोडीत नाहींत. आपल्या सामर्थ्यानें तें अवश्य साधतात.** दिवस सूर्यप्रकाशरूप नूतन वस्त्रानें स्वतःला भूषित करतो. रात्र, तारामंडल याच पुष्पसमूहानें आपल्याला भूषित करते. वसंतादि ऋतु मेघांतील तुषाररूपी जलपुष्पानें स्वतःला भूषित करतात. याप्रमाणें हे सर्वजण मिळून त्रिभुवनाचे स्वामी असे जे कालकलारूप सूर्य-चंद्र त्यांच्या आकाशांगणरूप क्रीडास्थानाला भूषित करतात. उदारात्म्यांची स्थिति खरोखर मोठी चमत्कारिक व उन्नत दिसते. कारण हें अंतरिक्ष धूम, धुळ, मेघ, अंधकार, चंद्र, सूर्य, नक्षत्रें, विमानें, गरुड, पर्वत, देव, दानव, यांच्या क्षोभांनींहि आपली पूर्वावस्था सोडीत नाहीं. ( आतां कोणी एक अनुचर या त्रिभुवनाचें एक जीर्णगृह या रूपानें वर्णन करतो— ) दिशा याच भिंतींनीं अंतरिक्षाला उंच पटईप्रमाणें धारण केलें आहे. भूमि हेंच त्याचें अधःस्थल असून दाट नगरें व पर्वत हींच ज्यांतील अनेक जातीचीं पात्रें आहेत, विद्याधरादिक हेच ज्यांतील जाळें विणणारे कोळी आहेत, त्याचप्रमाणें चार प्रकारचा भूतसमुदाय याच मुंग्यांच्या थव्यांनीं तें संपन्न आहे, अशा प्रकारच्या या भुवनरूप गृहाचें काल व क्रिया हें दांपत्य फार दिवस रक्षण करीत आहे. ज्याप्रमाणें माळ्याचें जोडपें फुलबागेचें रक्षण करतें त्याप्रमाणेंच काळ व क्रिया हीं या भुवनाचें रक्षण करीत आहेत. जरी काळ व क्रिया त्याचें प्रतिदिनीं रक्षण करीत नाहींत व तें नाश पावलें नाहींच असें जरी म्हटलें, तरी तें अद्यापि नाश पावत नाहीं व एका दृष्टीनें नाश पावतेंहि. तें प्रवाहरूपानें एकसारखें अनुवृत्त होत आहे. त्यांतले कांहीं पदार्थ नाश पावतात, व कांहीं पावत नाहींत. त्यामुळें हें नाश पावत असूनहि नाश पावत नाहीं. याप्रमाणें हें विरुद्ध धर्मानें युक्त असल्यामुळें ही माया आहे. हें जगत् इंद्रजालासारखें आहे. मला असें वाटतें कीं, आकाश वृक्षादि सर्व वृद्धि पावणाऱ्या पदार्थांची अधिक उन्नति होऊं देत नाहीं. वस्तुतः अकर्ता असलेल्याच महात्म्याची कर्तृता त्याच्या महिम्यामुळें उदय पावते. ज्या आकाशांत लक्षावधि विश्वें उत्पन्न होऊन नाश पावतात, त्या आकाशाला जे शून्य म्हणतात, त्यांच्या अखंडित पांडित्याला धिक्कार असो. आकाश ईश्वराहून भिन्न आहे, असें वेड लागलेले वादीच म्हणत असतात. कारण सर्व विश्वें आकाशांतच लीन होतात, आकाशापासूनच उद्भवतात व आकाशांतच स्थित होतात. यास्तव शास्त्रसिद्ध ईश्वराचें लक्षण आकाशांतच दिसत असल्यामुळें तोच ईश्वर आहे. पण ईश्वराविषयीं भ्रांत झालेल्या वाद्यांनीं आकाश व ईश्वर यां-

मध्यें भेद् कल्पिला आहे. अग्नीपासून उडालेल्या ठिणग्यांप्रमाणें या सर्व सृष्टीच्या शोमा ज्यांत येतात, जातात, स्थिर होतात, व उद्भवतात तें एक आद्यंत-मध्यशून्य निर्मल आकाशच त्यांचें कारण आहे असें मी समजतों. तटस्थ ईश्वर त्याचें कारण नाहीं. त्रिजगन्मणींचा जो अति विस्तीर्ण आधार आपल्या अंगावर असंख्य वस्तूंना धारण करतो, ज्यांत हा जगद्भ्रम उदय पावतो, तें आकाशच चिद्रूप परब्रह्म आहे, असें मी समजतों. ( कोणी पर्वतावरील कौतुक दाखवितो. ) पर्वताच्या शिखरावरील वनभूमींत, मनोहर लतागृहांत बसून कोणी एक कामी वनचर गात आहे, व खालून जाणारा वियोगी पुरुष तें गायन ऐकून व मनांत व्याकुल होऊन त्या गाणाराकडे वर पहात आहे. ( दुसरा तसलेंच एक कौतुक दाखवितो. ) हे महाराज ! पर्वतशिखरांवरील वनांत उंच वृक्षांच्या छायेंत वियोगानें दुःखी झालेली एक विद्याधरी दीर्घ श्वास सोडून कंठ दाटून आल्यामुळें अस्पष्ट अक्षरांनीं गायन करीत आहे, तें खालून जाणारा हा एक प्रवासी मोठ्या दुःखी अंतःकरणानें ऐकत आहे. त्याचें चित्त चंचल झाल्यामुळें तो पुढें जात नाहीं व त्याचे अनुचरहि त्याला ‘ चल ’ असें म्हणत नाहींत. केवढें आश्चर्य आहे, पहा ! ती वियोगानें व्याकुळ झालेली विद्याधरी पर्वतशिखरावरील वृक्षाखालीं बसून श्वास सोडून नेत्रांत अश्रु आणून तिलकरहितमुखानें असें गात आहे. ‘ हे नाथ ! तुझ्या उत्संगरूप गृहांतील हनुवटी धरून व किंचित् हंसून तुझ्या चुंबनरूपी रसायनाचा आस्वाद पुनः पुनः आठवून मी येथें हा निंद्य संवत्सररूप काल मोठ्या कष्टानें घालवीत आहें.’ हिच्या तरुण विद्याधरपतीला कोणी मुनीनें शाप देऊन बारा वर्षे वृक्ष केलेलें असल्यामुळें ही त्याच वृक्षावर बसून एकेक दिवस मोजीत आहे. हे प्रभो ! हा इतिहास मीं याच मार्गातील जाणाऱ्या लोकांच्या तोंडून ऐकला. आपलें दर्शन होतांच हा विद्याधर शापापासून मुक्त होईल, असें मुनीनें तिला सांगून ठेवलें होतें. त्याप्रमाणें आतां आपलें दर्शन होतांच त्याचा शाप निवृत्त झाला आहे. त्यामुळें तो विद्याधर आपलें वृक्षत्व सोडून आपल्या दयितेला त्या शाखाकृति बाहूंनीं दृढ आलिंगन देत आहे. त्या वेळीं त्या वृक्षाचीं फुललेलीं जीं फुलें तेंच त्याचें हास्य झालें. महाराज, पर्वतरूप हत्तीच्या वृक्षरूपी स्पष्ट रोमांमध्यें हा पुष्पांचा समुदाय वसंतऋतूंतील शिखरावरील हिमकणांसारखा किंवा नक्षत्रांसारखा शोभत आहे.

( दुसरा अनुचर कावेरीचें वर्णन करितो. ) महाराज ! ही कावेरी नदी कशी शोभत आहे पहा. मत्स्यांचे थवे त्यांत वेगानें उड्या मारीत आहेत. त्यामुळें तिच्या चंचल लाटा अधिकच चंचल होत आहेत. तिच्या तीराकर टिटव्या आवाज करीत इकडे तिकडे फिरत आहेत व तिच्या सभोंवारचे जलप्रदेश हरिणांनीं व्यापिले आहेत. हे राजा ! येथील सुवेलपर्वताच्या कड्यावरील सर्व सुवर्णशिला सूर्याच्या प्रकाशानें चमकत आहेत. व त्यामुळें त्या समुद्राच्या तरंगांनीं इतस्ततः पसरलेल्या वडवाग्नीच्या कणांप्रमाणें भासत आहेत. त्याचप्रमाणें पर्वतावर येऊन टेंकलेल्या मेघांनीं ज्यांचीं घरें वेढलीं आहेत, ज्यांच्या गृहसीमेवर प्रफुल्लित वनवृक्ष आहेत व पलाशवृक्षांनीं जेथील आकाश आच्छादित करून टाकलें आहे, अशा या भिल्लांच्या गृहांची शोभा तर पहा. त्याचप्रमाणें फुललेल्या पुष्पांनीं ज्यांतील पुष्पवाटिका अतिशय शुभ्र झाल्या आहेत, मंदारवृक्ष हींच ज्यांतील अनेक पुष्पपात्रें आहेत, अनेक प्रकारच्या मयूरांचीं नृत्यस्थानें

असल्यामुळें ज्यांत जलमय शिशिरप्रदेश आहेत व त्या मोरांच्या नृत्यामध्यें धबधब्यांचे प्रतिध्वनि करणाऱ्या गुहा हींच वाद्यें व गीतें आहेत, असे ग्रामस्थ लोकांनीं भरलेले हे गिरि-ग्राम स्वर्गालाहि जिंकीत आहेत. कारण या गिरिग्रामांतील गोकुलामध्यें नुकत्याच फुललेल्या पुष्पांच्या पाकळ्यांवर बसून व मधुपान करून मदांध होऊन गुंजारव करणाऱ्या भ्रमरांना पहाणारे व पर्वतांच्या गुहेंत रहाणारे भिल्ल, भिल्लिणी यांना जो संतोष होतो, तो नंदनवनामध्यें क्रीडा करणाऱ्या देवांनाहि होत नाहीं. भृंगांनीं ज्यांना आपला झोंपाळा केला आहे, अशा लतांनीं भरलेल्या अरण्यांतील दऱ्याखोऱ्यांतून गात असलेल्या तरुण भिल्लिणींच्या मुखाकडे ज्यांनीं दृष्टि दिली आहे व त्यांच्या शृंगारचेष्टांनीं जे व्याकुल झाले आहेत, असे किरात मुग्ध मृगाला शत्रूप्रमाणें कधीं तरी मारतील का? नानाप्रकारच्या पुष्पांपासून ज्यानें शीतलत्व, सुगंधत्व व परागादि सारभाग घेतला आहे, अशा वायूमुळें ज्यांतील जलाशयांत तरंग उत्पन्न होत आहेत, असे गिरिग्राम आपल्या गुणाधिक्यानें चंद्रालाहि जिंकतात. अर्थात् चंद्रमंडळांत राहाणाऱ्या देवांहूनहि या ग्रामांतलि लोकांना अधिक सुख होतें. ज्यांतून निर्झरांचें पाणी झुळझुळ ध्वनि करीत आहे, सभोंवारचे तालवृक्ष फुलले आहेत, वाऱ्यानें सहज हालणाऱ्या पुष्प-पल्लवयुक्त वेलींनीं आकाश व्यापलें आहे, सीमेवरील सालवृक्षांवर मेघ विश्रांति घेत आहेत; असे हे रम्य पर्वतग्राम स्वर्गस्थ चंद्रनगरांतील उद्यानभागाप्रमाणें असून चंद्रामृताचा स्राव करणाऱ्या अश्वत्थानें युक्त असलेल्या ब्रह्मलोकांतील भूमीस ते जिंकीत आहेत. ज्यांच्याजवळ पिवळ्या विजा चमकत आहेत, अशा गर्जना करणाऱ्या मेघांच्या नादांनीं नाचणाऱ्या मोरांच्या नूतन तांडवांत इकडे तिकडे उडणाऱ्या चंद्रक मण्यांचाच भास करणारे ते ग्राम ब्रह्मलोकांस जिंकितात. ज्यांच्या एका बाजूला सुंदर चंद्रमंडल आहे व दुसऱ्या बाजूला जलानें भरलेले मेघ आहेत, अशा पर्वतांच्या तटावरील ग्रामांत जी विलासलक्ष्मी आहे, ती वैभवसंपन्न ब्रम्हदेवाच्या राज्यांत तरी कोठची? स्वाभाविक सुगंधानें युक्त अशा नंदनवनांतील अन्तर्भागांप्रमाणें सुंदर, संतान कल्पवृक्षाच्या स्तबकांना हंसणाऱ्या निकुंजांनीं युक्त, फुललेल्या व गुंजारव करणाऱ्या मत्त भ्रमरांनीं व्यापलेल्या निंबवृक्षांनीं परिपूर्ण अशा गिरिकंदरांमध्यें माझें मन अतिशय रमतें. हरिणांच्या आवाजांनीं रम्य झालेल्या आणि पक्ष्यांच्या मंजुल किलकिलाटांनीं चित्त आकर्षण करणाऱ्या गिरिग्रामामध्यें मदनाच्या पुराप्रमाणेंच मनुष्यांची प्रीति आहे. राजन्! स्फटिकाच्या स्तंभाप्रमाणें रम्य निर्झरधारा ज्यांत वहात आहेत, अशा या पर्वतावरील ग्रामांत हे मोर कसे नाचताहेत पहा! ज्यांत निर्झरजल मंजुळ आवाज करीत आहे, अशा या ग्रामांतील कुंजांत पुष्पभारांनीं नम्र झालेल्या वेलींविलासी मयूरस्त्रिया नाचत आहेत. हारीतपक्ष्यांनीं ज्यांतील उपवनवृक्ष मनोहर झाले आहेत व ज्यांतील हंस, सारसादि पक्षी विहिरींवर बसून मधुर ध्वनि करीत आहेत आणि ज्या गिरिगव्हरांनीं झांकलेल्या आहेत, अशा या ग्रामस्थलींमध्यें हा सर्व जगत्प्रसिद्ध काम मोठ्या प्रेमानें रममाण होत आहे, असें मला वाटतें. (आतां येथून सर्गसमाप्तीपर्यंत अन्योक्ति आहेत.)

श्रीमानांच्या औदार्याप्रमाणें ज्याचें औदार्य आहे, जगत्परिपालनाची इच्छा असल्यामुळें ज्याचें अंतःकरण फार मोठें आहे व सूर्यताप घालविण्यासाठीं ज्याची गंभीर आकृति आहे, अशा हे मेघा! तूं पर्वतांच्या मस्तकांवरील

भूषण आहेस. भूमींतील क्षेत्र—उपवनादि संपत्तीला कारण होणाऱ्या जलाचें एक आस्पद आहेस. याप्रमाणें हजारों सद्गुणांनीं युक्त असलेल्याहि तुझ्या ठिकाणीं सदसद्विवेक नाहीं. कारण तूं एकदा हर्षानें वर्षाव करूं लागलास ह्मणजे तुझ्या वृष्टीला पात्र नसलेल्या ऊषर देशीं, समुद्रादि जलपूर्ण स्थानीं व कंटकादि वृक्षांवरहि एखाद्या सुक्षेत्राप्रमाणेंच वृष्टि करीत सुटतोस. पण हें तुझें सदसत्पात्रविभागाविषयींचें अज्ञान सज्जनांच्या मनाला फार दुःख देतें. अरे, तुझ्यासारखे महात्मेहि सुपात्राच्या गुणोत्कर्षाला जर मान न देतील तर दुसरे कोण देणार? हे मेघ! तूं समुद्र, गंगादि उत्तम तीर्थांच्या जलप्रवाहांत नित्य स्नान करतोस. उच्चपदीं स्थित होऊन सर्व जीवांना जल देतोस, शुद्ध होऊन अरण्यभूमींत मुनींचें व्रत धारण करून रहातोस, शरत्कालीं अगदीं रिकामा झालेला असाहि तूं अतिशय शुभ्रकांति दिसतोस, तुझ्या शरीराची शांति अतिशय रम्य दिसते, असा असलेलाहि तूं ज्या वेळीं दान देण्यास तयार होतोस, तेव्हां विद्युदग्नीसह कर्णकटु ध्वनि करतोस. हें क्षुद्र जीवांना उचित असलेलें वर्तन तुझ्या ठिकाणीं कसें बरें शोभावें? शुभ वस्तुहि अयोग्य स्थानीं गेली ह्मणजे अशुभच होते. पाणी मेघासारख्या दुःस्थानीं प्राप्त झालें ह्मणजे काळें पडतें. एखाद्या दीन सुहृदाप्रमाणें मेघानें जलाची वृष्टि केली, त्या पाण्यानें सर्व पृथ्वी भरून सोडली आणि भूमींतील म्लान होणारे तृणांकुरादि परिपुष्ट झाले. हें सर्वच आश्चर्य आहे! निर्दयता, अस्थिरता, अशुचित्व, रस्त्यांतून भटकणें आणि सर्व प्रकारें निंदितत्व हे गुण मूर्खांपासून कुत्र्यांनीं घेतले कीं, कुत्र्यापासून मूर्खांनीं घेतले हें कांहीं कळत नाहीं. जर मूर्ख निंद्यच आहेत, तर राजेहि त्यांचा संग्रह कां करतात? शौर्य संतोष, भक्ति इत्यादि कांहीं थोड्या गुणांमुळेंच पुष्कळ दोषांनीं युक्त असलेलाहि एखादा मूर्ख कुत्र्याप्रमाणें एखाद्या दुर्गुणी राजाला संग्राह्य वाटतो. भोगपरंपरेमध्यें ज्यानें आपलें सर्व शरीर आसक्त करून टाकलें आहे, असा विषयलंपट मूर्ख धत्तुरादि खाऊन उन्मत्त झालेल्या, प्रमाद, क्रोधावेश इत्यादिकांमुळें कूपादिकांत पडूं लागलेल्या, पिशाचादिकांचा संचार झाल्यामुळें धांवणाऱ्या, तत्त्वज्ञानाच्या आधिक्यामुळें देहादि परिच्छेदाला विसरून मी ब्रम्ह ही भावना दृढ झाल्यामुळें सर्वोत्तम असलेल्या पुरुषांस जो तृण मानतो, त्याचा हे तृणा, तूंच विचार कर. या विषयलंपट पुरुषाला इच्छा आहे कीं तो जड आहे, या रहस्याचा तूं विचार कर. त्याच्या ठिकाणीं जर इच्छा असेल तर तो कुत्र्यासारखा आहे. जर जड असेल तर तृणाग्राहूनहि त्याच्या ठिकाणीं विषयलांपट्यादि दोष अधिक असल्यामुळें तो त्याच्याहूनहि नीच आहे अशी तुझी खात्री होईल. व त्याला तृणाचेंहि जर साम्य नाहीं तर उन्मत्तादिकांची बरोबरी तो कशी करणार? याचा तूंच विचार कर. सिंह मेघगर्जनाप्रभृति कोलाहल अक्षुब्ध मनानें व अनादरानें सहन करतात व श्वान भयभीत होऊन व भीतीनें डोळे झांकून घेऊन मोठ्या कष्टानें ती गर्जना ऐकतात. हे श्वाना, चित्तवृत्तीनें तूं आपल्या बरोबरीचा आहेस असें जाणून आपले गुण शिकविण्यास तूं योग्य आहेस असें समजून कोणा मूर्खाकडून नित्य अशुचित्व, अप्रिय लोकांवर भों भों करून भुंकणें, रस्त्यांतून भटकत व्यर्थ काळ घालविणें इत्यादि गुण तूं शिकविला गेला आहेस? त्या तुज शिष्याहून त्या गुरूमध्यें गुणाधिक्य असतें. कर्मांच्या वैषम्यामुळें नित्य विषम जगत् निर्माण करणाऱ्या ब्रम्हदेवानें आपल्या सर्मा नांवाच्या

मुलीचा मुलगा जो हा श्वान त्याच्या ठिकाणीं त्याला अनुरूप असे सर्व धर्म पहाण्यासाठीं हें सर्व एकसारखेंच निर्माण केलें. उकिरड्यां-मध्यें खड्डा करून त्यांत रहाणें, विष्ठादि अशुचि पदार्थ खाणें, सर्व लोकांच्या समोर विषयो-पभोग आणि सर्वनिंद्य शरीर, अशा अरे कुत्र्या! तुझ्यापेक्षां अधम कोण आहे! असें विचार-णाराला तो कुत्रा हंसून उत्तर देतो कीं, अज्ञान, अपवित्र देहादिकांवरील अभिमान व विचारदृष्टिराहित्य हे धर्म ज्याच्या ठिकाणी असतात तो माझ्याहून अधम होय. तर मग मूर्खापेक्षां तुझ्यांत काय आधिक्य आहे? असें विचारलें असतां लागलेंच तो म्हणतो, शौर्य, **अकृत्रिम भक्ति आणि अल्प संतोष हा गुणसमूह दीर्घ काळ शोधित जरी बसलें तरी मूर्खाच्या ठिकाणीं सांपडत नाहीं.** अपवित्र पदार्थ खातो, अमंगळ जो ठिकाणींच रहातो, क्षुद्रप्राण्यांना स्वतः मारून खातो व मोठ्या प्राण्यांचीं शवें फाडतो; तात्पर्य, ब्रम्ह-देवानें सर्वथा असमर्थ असा हा कुत्रा एक खेळच करून ठेवला आहे. ( नदीतीरावर निर्माल्य अक्षता भक्षण करण्यासाठीं शिवलिंगावर बसून ओरडणाऱ्या कावळ्याला पाहून त्याच्या ओरडण्याचें तात्पर्य कवि कल्पितो. ) अधो-गतीला कारण होणाऱ्या सर्व पातकांमध्यें शिवस्व भक्षण करण्यासाठीं शिवलिंगाचा आश्रय करणें हें सर्वांत फार मोठें पातक आहे व त्याचेंच मी काक हें प्रत्यक्ष उदाहरण आहें, पहा. ( सरोवरावर ओरडत फिरणाऱ्या कावळ्याला उद्देशून कोणी असें म्हणतो. )

हे निंद्य कावळ्या, का-का-का अशा कर्कश आवाजानें तूं हंससारसादिकाचे गुण आपणा-मध्यें आणूं पहात आहेस, पण त्यामुळें तूं चिखलांतून भ्रमण करून भ्रमरांचे आवाज झांकून टाकतोस. त्यामुळें तुला पहातांच माझ्या मस्तकांत वेदना उठत आहे. भ्रमरांचे गुंजारव ऐकूं न येण्यास कारण झाल्यामुळें तूं माझ्या मस्तकांत शल्य होऊन राहिला आहेस. हे राजन्, कावळा कमलनाल सोडून अमंगल पदार्थ उचलतो म्हणून तूं विस्मित होऊं नकोस. कारण अभ्यासानें निंद्य खाद्यहि स्वा-दिष्ट वाटूं लागतें. अनेक उद्यानांतून संचार केल्यामुळें नानाप्रकारच्या पुष्परागानें शुभ्र झालेला कावळा हंसासारखा जरी दिसला तरी कृमींनीं भरलेलें व सडलेलें मांस वगैरे तो उचलीत आहे असें पाहून तो कावळा आहे असें तेव्हांच ओळखतां येतें. कोकिलाबरोबर अस-लेला कावळा त्याचा कृष्ण वर्ण व त्याच्या-सारखे पंख या सादृश्यामुळें प्रथमदर्शनीं ओळ-खतां न येऊन जरी कोकिलच भासला तरी त्याच्या शब्दावरून तो कावळा आहे, असें तेव्हांच जाणतां येतें. पण तो जर मुकाट्यानेंच बसला तर हा कावळा आहे, असें कोण जाण-णार? रात्रीं सर्व लोक निजले असतां एखाद्या चव्हाठ्यावरील उंच वृक्षावर चढून चोर जसा दाही दिशांची टेहेळणी करतो, तसा हा कावळा या महा अरण्यांतील जीर्ण भित्तिस्तंभावर बसून निरीक्षण करीत आहे, पहा. उतावीळ सारसांकडून फाडल्या जाणाऱ्या कमलांच्या परागांनीं सुंदर झालेल्या या सरोवरांत वाह-णाऱ्या वायूनें उडविलेल्या धुळीनें ज्याचा स्कंध-प्रदेश मलिन झाला आहे असा हा कावळा कसा विहार करीत आहे! हें सर्वथा अनुचित होय. फुललेल्या शुभ्र कमलांची जणुं काय खाणच अशा या अत्यंत सुंदर सरोवरांत बस-लेल्या राजहंसाबरोबर ज्याचें तोंड दगडांनीं फोडणेंच उचित आहे असा हा काकपिशाच या वाईट डबक्यांत बसून मी राजहंसच आहें असें भासविण्यासाठीं नानाप्रकारच्या लीला करीत आहे. अरे! अरे! फार वाईट, राजन्!

तूं त्यांच्याकडे पहा तर खरें. आपल्या कर्कश रवानें श्रोत्यांचे कान किटविणें हें ज्याचें लक्षण आहे, अशा हे कावळ्या, आपला भाग दुसरा कोणी काकेतर प्राणी न खावो, म्हणून तूं कावळ्यांना नेहमीं बोलावीत असतोस. पण तें तुझें का–का–का म्हणून बोलाविणें आज कोठें गेलें? तूं आज एकटा माझाच पुत्र जिवंत राहो, या आशेनें कोकिळाच्या पिलाला उगीच कां पोशीत आहेस? कारण कटु भाषण करणें हेंच ज्याचें शील आहे, अशा तूं भ्रांतीनें सुस्वर कोकिलाचें जरी पोषण करीत असलास तरी त्यामुळें तुझे मनोरथ सिद्ध होणार नाहींत. ती तुझी कृति उपहासासच पात्र होईल. ( कमलवनांत विलास करीत असलेल्या व कर्कश आवाज करणाऱ्या कावळ्याला पाहून कोणी म्हणतो. ) अरे कावळ्या, जो पुरुष तुझ्या किंवा दुष्ट लोकांच्या क्रूर शब्दांनीं अतिशय खिन्न होऊन व निश्चेष्ट होऊन रडत नाहीं, त्याला तूं आपल्या कटु ध्वनिरूपी करवतीनें काप; पण मी तसा नाहीं; मग कां उगाच ओरडतोस? ( दुष्टांच्या सभेमध्यें बसण्यास दुसरे दुष्टच योग्य होत, अशा आशयानें दुसरा एक अनुचर म्हणतो– ) संचार करणाऱ्या हिंस्र प्राण्यांनीं युक्त अशा बक, मद्गु, जलकाक यांनीं भरलेल्या पाण्याच्या डबक्यांत जर उलूक व काक येऊन बसतील तर ती सभा फार शोभेल. ती योग्य सभासदांनीं युक्त आहे असें म्हणतां येईल. सभेमध्यें पंडित जसा आपल्या भाषणावरूनच पंडित ठरतो, तसा कोकिळ वर्ण, पंख व आकृति यांनीं कावळ्यासारखाच जरी दिसला तरी व्यक्त वाणी उच्चारतांच व्यक्त होतो. साधूंचा अपराधहि सहन करतां येतो, पण दुष्टाचा संबंधहि दुःसह होतो, अशा आशयानें एक म्हणतो. पुष्पलता आपल्यावरील मृदु पुष्पांचे अंकुर कोकिलानें जरी तोडले तरी तें सहन करते; पण कंक, गृध्र, बक, मद्गु, कुक्कुट व काक यांचा स्पर्शहि तिला सहन होत नाहीं. खलसभेंत आपल्या सद्विद्येचा उपन्यास करण्यास उत्सुक असलेल्या एका मनुष्याला कोणी म्हणतो, अरे हे मधुरकंठ कोकिल! पतिपत्नींच्या विग्रहाचे वेळीं त्यांचा संधि करून देण्यास समर्थ असलेला हा तुझा मंजुळ व कानांना आल्हाद देणारा ध्वनि येथें कोण ऐकणार? कारण येथें निंबांच्या गुल्मांत कावळे व उलूक यांच्या कलहामुळें जो मोठा कर्कश ध्वनि होत आहे, त्याच्या योगानें आमच्या कानठळ्या बसल्या आहेत. उपवनामध्यें श्रवणाची ज्यांना अतिशय आसक्ति आहे अशा लोकांच्या पुढें हा कोकिलपुत्र आपल्या कोमल वाणीनें मोठी रमणीय कथा करून जों सर्व श्रोत्यांचें मनोरंजन करीत आहे तों कावळा येऊन त्यानें हा कोकिळशिशु माझा पुत्र आहे, इत्यादि तिरस्कारस्वरूप कर्णकटु आवाजानें सर्व श्रोत्यांना विरस केलें. ( अयोग्य श्रोत्यांच्या पुढें अकालीं त्यांना योग्य समजून आपल्या गुणांचें प्रदर्शन करणाऱ्या एकाला दुसरा म्हणतो. ) अरे कोकिला! तूं श्रोत्यांच्या योग्यतेचा वगैरे विचार न करतांच आपल्या गुणाचें प्रख्यापन करणाच्या उत्सुकतेनें, मोठ्या हर्षानें हें उगीच काय बोलत बसला आहेस! अरे बाबा, हर्षानें तुझ्या कंठांतून बाहेर निघणारें हें आपलें कूजन आंत दाबून ठेव. आपले गुण दाखविण्याला हा योग्य काल आहे व हे सर्व श्रवणाला योग्य आहेत असा भ्रम तूं कधीं होऊं देऊं नकोस. अरे पुष्पांनीं भरून गेलेला हा वसंतसमय नव्हे, तर हेमंतानें हे वृक्ष दंवानें करपून टाकले आहेत. या वेळीं तुझ्या वाणीचा कांहीं उपयोग होणार नाहीं. ज्यांत चित्र-

विचित्र नूतन अंकुर येतात, अशा चैत्र महिन्यांत एक विरहिणी म्हणते, ज्याची आकृति अतिशय प्रशस्त आहे, अशा हे कोमल कूजन करणाऱ्या कोकिला, हा मधुवास कोणाचा? या माझ्या प्रश्नावर तूं मधुवृक्षावरून त्वरेनें 'तुझा तुझा' असें कोमल स्वरानें जें म्हटलेंस तसलें खोटें व दुःखद भाषण तुला कोणीं शिकविलें? अरे अरे! या मज विरहिणीला हा मधु नव्हे, तर आपल्या प्रियेसह मंजुळ गायन करणाऱ्या तुझा तो मधु आहे. त्यामुळें 'माझा माझा' असें म्हणावयाचें सोडून 'तुझा तुझा' असें जें तूं म्हणत आहेस तें मला दुःख देण्यासाठींच होय. कावळ्यांच्या समूहांत कांहीं न बोलतां पंखादि हालविणें, विहार, वर्ण, शरीर, यांचें जरी साम्य असलें, तरी कांतीनें रमणीय असलेला हा कोकिल मूर्खांच्या समूहांतील पंडिताप्रमाणें दुरूनच ओळखतां येतो. कारण रमणीय आकारावरून ज्याच्या शुभ क्रियेचें अनुमान होत आहे, असा पुरुष कोठेंहि जरी असला, त्यानें आपल्याला गुप्त ठेवण्याचा प्रयत्न जरी केला, तरी तो प्रख्याति पावतोच. हे मित्रा कोकिला, कर्णकटु आवाज करणाऱ्या कावळ्यांच्या पंक्तींनीं युक्त असा हा शिशिरकाल आहे; वसंतोत्सव नव्हे. या वेळीं तूं कितीहि सुंदर ध्वनि केलास तरी तो अनर्घ्य गुण प्राप्त होणार नाहीं. यास्तव तूं आपलें कूजन पुरे कर. अरे बाबा, वाळून पडलेल्या पानांनीं जिचें मुख झांकून गेलें अशा एकाद्या उंच वृक्षाच्या ढोलीमध्यें मुकाट्यानें बैस. (आतां कोणी कांहीं आश्चर्यें दाखवितो.) हा कोकिकशिशु आपल्या काकी मातेला टाकून निघून गेला हें एक आश्चर्य! त्यानंतर ती कावळी त्या कोकिलपुत्राला चोंच व नखें यांनीं पीडा देते हें दुसरें आश्चर्य! पण असें जों मी क्षणभर मनांत म्हणत आहें, तों तो कोकिलशिशुहि उत्साहानें आपल्या मातेप्रमाणेंच उद्युक्त झाला, हें आणखी आश्चर्य! यावरून भाग्यवान् मनुष्य ज्या ज्या दिशेस जातो, ती ती दिशा त्याचें माहात्म्य वाढविते, ही गोष्ट सिद्ध झाली. ११६.

---

## सर्ग ११७ वा.

—:•:—

१ नानाप्रकारच्या कमलांनीं भूषित झालेल्या सरोवरांचें वर्णन. २ व त्या प्रसंगानें कमल, भ्रमर, इत्यादिकांचें वर्णन.

सहचरः—हे राजन्! या पुढील पर्वतशिखरावर कल्हार, पद्म, उत्पल इत्यादि नाना जातींच्या नालांवर मृणालासाठीं क्रीडा करणाऱ्या व विचित्र ध्वनि करणाऱ्या पक्ष्यांनीं व्यापलेलें व त्यामुळेंच नक्षत्र व पक्षी यांसह प्रतिबिंबित आकाशासारखें असलेलें हें सरोवर पहा. हें पर्वतशिखर सरोवरांच्या अत्यंत शोभेमुळें कामोद्दीपक झालें आहे. त्यामुळें तें कामदेवाचा प्रधान भृत्यच आहे. फुललेल्या व त्यामुळेंच ज्याचे नाल वर उंच निघाले आहेत अशा सहस्रपत्र कमलांच्या कोशांत असलेले राजहंस ज्यांची शोभा वाढवीत आहेत, त्याचप्रमाणें इंद्रनील पीठस्थानीय भ्रमरांनीं व सारस क्रौंचादि पक्षांनीं जें युक्त आहे, असें हें सरोवर ब्राम्हणादिकांनीं सेवन केलेल्या ब्रम्हलोकाप्रमाणें भासत आहे. इतस्ततः उडणाऱ्या सीकरांनीं ज्याच्या सर्व दिशा हिमयुक्त केल्या आहेत, फुललेल्या कमलसमूहांतील रेणूंनीं जें गौरवर्ण झालें आहे, सुगंधानें मत्त झालेल्या भ्रमरांच्या व पक्ष्यांच्या गायनांनीं रमणीय झालेलें असें हें सरोवर आकाशस्थ छत्राप्रमाणेंच दिसत आहे. यांत नानारंगी कमळें फुललेलीं असून त्यांच्या उन्मत्त करणाऱ्या सुगंधानें

मत्त झालेले भ्रमर गुंजारव करीत आहेत. कोठें विक्षिप्त चित्राप्रमाणें चंचल तरंग आहेत. कोठें भ्रमर शत्रूप्रमाणें भांडत आहेत. कोठें निश्चल व स्वच्छ जलाच्या योगानें ते निजल्याप्रमाणेंच निश्चल आहेत, व कोठें तर फुललेल्या दाट कमलांच्या योगानें ते सुकूनच गेले आहेत, असा भास होतो. महाराज, हें सरोवर मोत्यासारख्या जलबिंदूंनीं ताप दूर करतें. तीरावरील सिंहाला पाण्यांतील आपलेंच प्रतिबिंब पाहून दुसऱ्या सिंहाची शंका आल्यामुळें जलपानाविषयीं साशंक करतें. कांहीं ठिकाणीं वृक्षांच्या अग्रांपासून जलापर्यंत लोंबणाऱ्या शाखांनीं प्रतिबिंबदर्शनालाच विरोध करून तें सिंहाला यथेच्छ जलपान करूं देतें. तें तरंगांच्या योगानें आपल्या कांठावरील सर्व शिला धुवून टाकतें, जलप्राय प्रदेश पंकांनीं उग्र करतें व अनंत कच्छांनीं युक्त झालेलें तें अनंत मेघांच्या योगानें भूलोकीं आलेल्या आकाशाप्रमाणें दिसतें. याचा मध्यभाग मेघांना उडविणाऱ्या वायूनें कांपविलेल्या कमलसमूहांतील रजानें विजेसारखा पिंवळा केला आहे. पण दुसरीकडे तें आपल्या स्वच्छ जलानें काळेंभोर दिसत आहे. त्यामुळें तें संध्याकाळच्या आकाशाचेंच अनुकरण करीत आहेसें दिसतें. म्हणजे तें स्पष्ट प्रकाशरूप दिसत नाहीं. आपल्या शिशूंचें पोषण करण्यासाठीं हंस कमलनालांचे ग्रास आपल्या घरट्यांकडे नेत आहेत. त्यांच्या भारानें त्यांची गति मंद झाली आहे. त्यामुळें ते हंस कालानें एकत्र संचय करून ठेवलेल्या चंद्रबिंबाप्रमाणें दिसत आहेत. पण अशा हंसांनीं युक्त असलेलें हें सरोवर वायूनें ज्यांत शरत्कालीन मेघाचे तुकडे केले आहेत, अशा आकाशाप्रमाणें दिसतें. या सरोवराच्या अमोदभरानेंच मंद झालेल्या, मकरंदसंपर्कानें आर्द्र झालेल्या, वायूंनीं हलविलेल्या, व पंकपुटाचें शोधन करण्यांत पटु असलेल्या तरंगपंक्तींमध्यें तीरावरील पुष्पित वृक्षांकडून पुष्पवृष्टि होत आहे. त्यामुळें तें सरोवर आपल्या अंगावर पांघरूणच घेत आहे असा भास होतो. तें सरोवर राजासारखें आहे. कारण हाळणाऱ्या महाकमलपल्लवरूपी तालवृंदांनीं त्यावर वारा घातला जात आहे. सुंदर केंस हींच त्यावरील चामरें आहेत. भ्रमर व कोकिला यांचे मंजुळ शब्द हेंच गायन आहे. त्याचप्रमाणें कमललतारूप सुंदर स्त्रीसमूह त्याच्यापाशीं आहे. त्यामुळेंच तें राजासारखें दिसतें. ज्यांत भृंगांचेंच मनोहर गायन चाललें आहे, पद्मपरागांनीं जें व्याप्त आहे, त्यामुळेंच ज्यांतील जल पितवर्ण झालें आहे, फेंसांनीं जें अलंकृत झालें आहे व तीरावरील पुष्पसमूहांनीं ज्यानें आपलें शिरोभूषण केलें आहे असें तें सरोवर फार शोभतें. अनेक उत्तमोत्तम वस्तूंनीं सुशोभित झालेलें हें सरोवर सत्संगाप्रमाणें रसयुक्त व आल्हाद देणारें आहे. शास्त्रार्थाचा परिणाम झाल्यामुळें महात्म्यांचें मन जसें अतिशय स्वच्छ व सौम्य होतें, त्याप्रमाणें शरत्कालच्या आकाशाचें प्रतिबिंब पडल्यामुळें हें महासरोवर दिसत आहे. हे राजा! तर मग हेमंत ऋतूंत हें कसें दिसतें म्हणून विचारशील तर सांगतों. सर्व बाजूंनीं धुक्यांनीं व्यापल्यामुळें हें सरोवर पूर्णपणें दिसत नाहीं. त्याचा अगदीं लहानसा भाग दिसत आहे. धुक्यांनीं त्याला आपला धूसर वर्ण दिल्यामुळें त्यांतील शामवर्ण अगदीं दिसेनासा झाला आहे. त्यावरून अंगाला झोंबणारा वायु वहात आहे. त्यामुळें सरस सारसांनीं युक्त असलेलें हें सरोवर हिमाभ्राप्रमाणें भासतें. ब्रह्माहून पृथक् नसलेलें हें जगत् ब्रह्माच्याच आधारानें पृथक् असल्यासारखें भासतें, पण वस्तुतः तें पृथक् नसतें, त्याप्रमाणें हें सरोवर

जलाहून पृथक् नसलेल्या तरंगादिकांच्या योगानें पृथक्सें भासतें. खरोखर ज्यांचें अंतःकरण जड आहे, त्यांची कल्लोलपरंपरा फार विषम असते. हे जलविकार ब्रह्मविवर्तरूप जगाप्रमाणेंच सत्य नव्हेत, असत्य विकार आहेत. तथापि काय चमत्कार आहे ? असले हे असद्भावहि त्याला क्षुब्ध करून सोडीत आहेत. कूप, वापी, तडाग इत्यादि उपाधींमुळें जलांत जसा न्यूनाधिक भाव दिसतो, त्याप्रमाणें स्त्रीपुरुष इत्यादि शरीरांच्या उत्कर्षापकर्षाप्रमाणें आत्म्यामध्येंहि तारतम्य भासतें. प्राण्यांच्या चंचल मनांतील असंख्य वृत्तींप्रमाणें यांतील असंख्य कमलांची गणना करण्यास कोण समर्थ आहे? मूर्खसमागमाप्रमाणें या जलसमागमाचा परिणाम कांहीं विचित्रच आहे. कारण सुगंधाचा जणुंकाय निधिच असें हें कमलहि आपल्या सौंदर्य, सौगंध्य, मकरंद इत्यादि गुणांस आपल्या कंठाशीं दोषाप्रमाणें मुकुलित होऊन झांकून ठेवतें, आणि कांट्यासारख्या आपल्या दौर्भाग्यास बाहेर प्रकट करतें. कमलाच्या तंतूंना गुण असें म्हणतात. पण तेहि सच्छिद्र, अदृढ, सूक्ष्म, गुप्त, व जाड्ययुक्त असतात. ते पुष्कळ असले तरी निःसार असतात. त्यामुळें ते गुण जरी असले तरी दोषयुक्त असल्यामुळें अग्राह्य होत. गुण व सौंदर्य यांनीं शोभणाऱ्या मोठ्या कुलकमलांचा प्रभाव वर्णन करण्याचें वासुकीलाहि सामर्थ्य नसतें. हरीच्या वक्षःस्थलीं बसणारी लक्ष्मीहि शोभेसाठीं ज्या कमलाला आपल्या हातांत धरते, त्या कमलाची याहून अधिक प्रशंसा ती कोणती ? सूर्यविकासी कमलें व चंद्रविकासी कमलें यांचे जडाशीं जडत्व हें साम्य आहे. कारण तीं कमलें चंद्र व सूर्य यांचा द्वेष करणें या वृत्तीनें आपलें जडत्व प्रकट करतात. तथापि शीत व अशीत या रूपानें त्यांचें वैलक्षण्य अगदीं स्पष्ट आहे. सरोवरामध्यें फुललेल्या कमलवनाची नूतन उदय पावलेली शोभा फुललेल्या मंदारादि अरण्याशीं साम्य पावत नाहीं. नक्षत्रयुक्त आकाशाशींहि साम्य पावत नाहीं. एकत्र संचय केलेल्या चंद्रबिंबाशींहि साम्य पावत नाहीं. तर नृत्य करणाऱ्या वधूच्या हास्ययुक्त मुखशोभेशीं मात्र ती साम्य पावते. ज्या अनन्यचित्त भ्रमरांचें पुष्पलतांचा आस्वाद घेण्यांतच दीर्घ आयुष्य गेलें, तेच सर्वोत्तम भाग्यवान होत. आम्रवृक्षाच्या सुवासिक मकरंदरसाचा व नवांकुरांच्या कषायरसाचा जे स्वाद घेतात ते भृंग व कोकिलच धन्य होत. बाकीचे केवळ आपल्या जातीची संख्या भरून काढतात. मधुमोदामोदांनीं मत्त होऊन कमलांतील मकरंदाचा स्वाद घेत जे भ्रमर सरोवरांत गुंजारव करीत असतात, ते इतर पुष्पांच्या स्वादांनीं संतुष्ट होणाऱ्या भ्रमरांना हंसतात. ज्या भ्रमरानें चंद्रांतील छिद्राप्रमाणें कोमल असलेल्या कमलोदरांत वास केला, विहार केला, गुंजारव केला, व शयन केलें, तो भ्रमर कमलोदरें शिशिर ऋतूंत रसशून्य झालीं असतां इतर वृक्षांच्या फुलांवर प्रीति कशी करील ? न फुललेल्या मल्लिकेच्या कळ्यांवर बसलेला भ्रमर कालरुद्रानें सुळीं दिलेल्या अंधकाराप्रमाणें दिसत आहे. अरे भृंगा, तूं नानाप्रकारच्या पुष्पांतील मधूचा अस्वाद घेत सर्व पर्वतांच्या लतागृहांतून नित्य भ्रमण करीत असतांहि अद्यापि तृप्त कां होत नाहींस ? तुला वनांतील सार अजूनपर्यंत मिळालेंच नाहीं कीं काय ! कारण तें जर मिळालें असतें तर अशा असंतुष्ट मनानें तूं भ्रमण केलें नसतेंस. कमलवनांत मकरंदाचा आस्वाद घेण्यांत कुशल असलेल्या हे भ्रमरा ! तू कमलानें भरलेल्या सरोवरांत जा. मकरंदानें पुष्ट झालेल्या आपल्या

देहाला बद्रिवनांतील कांट्यांनीं विदीर्ण करून घेऊं नकोस. हे भ्रमरा ! ज्या हेमंत-शिशिरादि काळकलांमध्यें तुला कमलें मिळत नाहींत, अशा काळकालांतहि तुझ्यासारख्याच कृष्ण-वर्ण कोरांटीच्या फुलांत, नीलकमलांत, व तमालपुष्पांत जेवढा प्राप्त होईल, तेवढ्याच मधूवर आपलें आयुष्य घालीव. कारण पंडित पुरुष आपल्याला अनुरूप असा स्वामी व समाज यांचा लाभ न झाल्यास अननुरूप प्रभूपाशींही कधीं तरी विद्वानांची प्राप्ति होईल या आशेनें रहातो. भिल्लांच्या समूहांत कधीं रहात नाहीं. ( आतां हंसपंक्तीचें वर्णन— ) हे राजन् ! सरोवरांतील कमलांचीं केसरें खाल्यामुळें त्यांच्यासारख्याच रंगाच्या शोभेनें जिचें पालन केलें आहे, अशी ही हंसमालारूप वल्ली पहा. सामगायना-प्रमाणें तिच्यामध्यें गंभीर कूजन चाललें आहे. अंतरिक्षांत हंसीच्या मागोमाग जाणारा हा हंस खालीं सरोवरांतील कमलनीडांत प्रतिबिंबित झालेल्या आपल्या प्रियेला पाहून व ती पाण्यांत पडून बुडत आहे असें समजून व्यर्थ कसा व्याकुल होत आहे पहा ! महाराज ! अशा प्रकारची स्त्रीव्यसनिता कोणालाहि न होवो. हा पहा मूर्ख हंस प्रतिबिंबित झालेल्या हंसीच्या मागोमाग पाण्यांत पडून मेला आहे. राजहंस सहज लीलेनें जें सुंदर कूजन करितो तें बकाला शंभर वर्षें शिकवीत राहिलें तरी करितां येणें शक्य नाहीं. हंस व राजहंस यांचें जन्मस्थान, आकार, आहार, नाम, वर्ण इत्यादि जरी समान असलें तरी त्यांच्यामध्यें फार मोठें अंतर असतें. कारण राजहंस मानस सरोवरांतील सुवर्णकमलवनांत क्रीडा करितात. समुद्रांत बुडून मोत्यें खातात. कोणत्याही पक्ष्याला जातां येत नाहीं, अशा आकाशाच्या उंच प्रदेशीं संचार करितात. इतर हंस तसें करूं शकत नाहींत. चंद्र शुक्ल पक्षांत आकाशांत स्थित होतो व कुमुदवनाला प्रफुल्लित करितो व लोकांच्या मनाला आल्हाद देतो, हें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें हंस आपल्या दोन शक्लवर्ण पंखांनीं आकाशांत स्थित होतो, कमलांना शोभा आणतो व लोकांना आनंद देतो. ज्यांचीं नालें उंच आहेत अशा नाललक्षणकदलीस्तंभांनीं व्यापलेल्या म्हणजे कदलीवनासारख्या कमलवनांत विहार करणाऱ्या हंसांची शोभा दुसऱ्या कोणत्या पक्ष्याला प्राप्त होणार आहे ? ( हा याचा अक्षरार्थ झाला. तात्पर्यार्थ असा आहे—योगाभ्यासानें जिचें नाल वर केलें आहे, अशी जी हृदय-कमलरूप नलिनी तिचा प्राणायामाभ्यासानें विकास होऊन कदलीवनाप्रमाणें स्तंभनरूप स्तंभांनीं व्यापलेल्या हृत्पद्मवनांत त्रिविध तापांच्या उपशमनपूर्वक निरतिशय आनंदाचा अनुभव घेत विहार करणाऱ्या हंसांची म्ह. यतींची जीवन्मुक्तिसुखसाम्राज्यरूप लक्ष्मी दुसऱ्या कोणा देवाला तरी प्राप्त होईल कां ? नाहीं. )

( आंता त्या सरसीचें स्त्रीसाम्यानें वर्णन— ) राजाधिराज ! ही सरसी एखाद्या सरस नारीप्रमाणें पुरुषाचें चित्त कसें आकर्षण करीत आहे, पहा. तरंग हींच तिच्या हातांतील कंकणवलयें आहेत. चंचल तुषारसमूहांनींच ती हारवती झाली आहे. कुमुद, उत्पल, कल्हार, यांनींच ती पुष्पसंभारयुक्त होऊन सुंदर दिसत आहे. भ्रमर हेच तिचे चंचल केस आहेत. ध्वनियुक्त सारस हींच नुपूरें आहेत. वंतुलाकार आवर्त हीच तिची नाभि आहे. चंचल लाटा हेच नेत्र आहेत. ती जलरूपी मनोरथ पूर्ण करणाऱ्या पर्वताकडे पहात आहे व सुंदर हंसरूपी दोन मंजरींनीं युक्त आहे. ( आतां

१ राजहंसाची चोंच व पाय लाल असतात, व सर्व अंग शुभ्र असतें.

कोणी एक दुसऱ्याच्या मिषानें म्हणतो–)

अरे हंसा! तूं जलकाक, बक व स्थलकाक यांचेंच ज्यांत प्राधान्य आहे, अशा या सरोवरांत एकटाच वास करूं नकोस. कारण आपत्समयींहि समान शील, वय, वचन यांनीं युक्त अशा आप्तवर्गाबरोबर ह्मणजे हंसांबरोबरच राहणें, त्यांचीच संगति धरणें तुला सुखावह होईल. त्या हिंस्र पक्ष्यांची संगति तुला परिणामीं सुखद होणार नाहीं. ज्यानें आपल्या सहाहि पायांनीं मोठमोठ्या हत्तींच्या गंडस्थळांचें आक्रमण केलें आहे, कमलवन हेंच एक ज्याचें गृह आहे, कल्हारादि कमलवधूच्या संभोगानें जो शृंगारवान् झाला आहे, असा हा मोठा प्रभावशाली भ्रमर दैववशात् मातीचें ढेंकूळ व तृण यांचा स्वाद घेत शुष्क बकाप्रमाणें आचरण करितो. अरेरे! आपत्ति आली असतां मोठे लोकहि दैन्यांत पडतात, त्यांचेंहि मन दीन होतें, हें केवढें आश्चर्य आहे! राजन्! हंसाच्या पंखांनीं हालणाऱ्या कमलनालवनांत प्रवेश केलेल्या मला प्रकाशमान् कमलदलांत बसलेल्या हंसपुत्रानें उच्च स्वरानें आपल्या पित्याला सांगितलेलें वचन आठवलें. तो म्हणालाः–" बाबा, ही कमलिनी शुभ्र मोत्यांच्या समूहाप्रमाणें आपले जलबिंदु उडवीत आहे. आपल्या मस्तकावर मध्यान्हसमयींहि एकाएकीं विकास पावणारें हें हिम प्रत्यक्ष पहा!" हे राजा! आकाशांतील चंद्राप्रमाणें या सरोवरांतील प्रसन्न जलांत मुकाट्यानें संचार करणाऱ्या हंसांच्या पंखांनीं ताडित झालेल्या चंचल नालापासून ब्रह्मदेवाच्या कमलासनापासून उडालेल्या जलबिंदूप्रमाणें जे जलबिंदु त्या हंसाच्या अंगावर पडत आहेत, त्यांना मत्स्यादि जलचर मोठ्या आनंदानें गंगेच्या जलाप्रमाणेंच तत्काल प्राशन करीत आहेत. ११७.

# सर्ग ११८ वा.

१ बक, जलकाक, मयूर, वियोगी पांथ. मत्स्य व चातक यांच्या चरित्रांचें वर्णन.

सहचर-सहचरीः–या निर्गुण बकामध्येंहि एक मोठा गुण आहे, पहा. तो 'प्रावृट् प्रावृट्' असें म्हणत वर्षाकालाचें स्मरण करवितो. हे बका! तूं सरोवरांत असलास म्हणजे हंसासारखा भासतोस. कारण तुझा वर्ण हंसासारखाच आहे. यास्तव जलकाकाची मैत्री, निर्दयपणा व कर्कश वाणी हे तीन दोष टाकून हंस हो. हे अत्यंत चतुर राजा! मत्स्यांना मारण्यांत अतिशय पंडित असलेले जलकाक ज्यांत जलचर प्राणी सर्वत्र पसरलेले आहेत, अशा जलांत वारंवार प्रवेश करून पूर्वीं माशांना चोंचा भर-भरून खात होते, तेच हे आतां दैववशात् मृत मत्स्यांकडून गळ्यांत कांहीं रोग उत्पन्न केला गेल्यामुळें तीरावर रांगेनें बसले आहेत, पण अगदीं तीराजवळ आलेल्या व सहज धरतां येण्यासारख्या मत्स्याला सुद्धां ते धरीत नाहींत! हे अगदीं हातपाय मोडल्यासारखे बसले आहेत, हें केवढें आश्चर्य आहे! " याप्रमाणेंच स्वार्थासाठीं सर्व लोकांना मारणें योग्य आहे, असें प्रदर्शित करणारा मद्गु ह्मणजे जलकाक माझ्या गुरुत्वास प्राप्त झाला आहे, " अशी दुर्जन मद्गूची प्रशंसा करितो. या आकाशांत ज्यानें आपले शुभ्र व सुंदर पंख पसरले आहेत व मान वर केली आहे असा हा हंसच आहे असा पूर्वीं लोकांनीं ज्याच्याविषयीं निश्चय केला होता, त्यानेंच जेव्हां झटकन झडप घालून पाण्यांतील माशाला धरिलें, तेव्हां हा बगळा आहे असें लोकांनीं जाणलें. मत्स्यांसाठीं चंचल होऊन दीर्घकाल धडपड करणारे बगळे या सरोवरांवर तपाचें ढोंग करून डोळे मिटून अंध-

कार पडेपर्यंत बसतात, असें पाहून जिला धूर्तांचें चरित्र ज्ञात झालें आहे अशी कोणी एक तीरावरील स्त्री व्यवहारांत विषयलोलुप धूर्त असेंच तपाचें ढोंग करून भोळ्या लोकांना फसवितात, असें मनांत म्हणून विस्मित झाली. एक पांथस्त्री कमलें नेणाऱ्या स्त्रियांना पाहणाऱ्या पांथाला म्हणाली—"हे प्रियकरा, या जलांत हिमाची पर्वा न करणाऱ्या या गावंढळ स्त्रिया शुभ्र कमलें हरण करीत आहेत व तूं त्यांच्या मागोमाग जाण्याची इच्छा करीत आहेस. मी तुला प्रिय नाहीं; म्हणून मी जातें." असें बोलून रागावलेल्या त्या कांतेचें सांत्वन करण्यांत हा पांथ अगदीं गढून गेला आहे. रस्त्यांतच तीरावरील पुष्पित लतामंडपांत हा तिची मनधरणी करूं लागला आहे. राजा, तूं याच्याकडे पहा तर खरें! ही श्रेष्ठ स्त्री हावभाव, विलास, मुरडणें, कोपानें नेत्रकटाक्ष फेकणें, थोडेंसें हंसणें इत्यादि चिन्हांनीं या पुरुषाचा स्त्रैणपणाच व्यक्त करीत आहे.

हे राजन्, बक, जलकाक इत्यादि हिंस्र प्राणी व निषादादिक हिंस्र मनुष्य एकत्र जरी रहात असले तरी मूर्ख व पंडित यांच्या बुद्धीचा जसा संकर होत नाहीं, त्याचप्रमाणें त्यांच्या बुद्धीचाहि संकर कधीं होत नाहीं. पतंग पक्षी नेहमीं किटकिट असा ध्वनि करीत असतो. चोंचीच्या अग्रावर तो कांपत असल्यासारखा रहातो. ही पूर्व पापाची उंच पताकाच होय. जलाशयाच्या तीरावरील वृक्षांवर राहणारा बक जो मोठ्यानें ओरडत आहे तो थोड्याशा जलानें आर्द्र झालेल्या गायींच्या पावलांत शफरीनें मोठ्या जोरानें बुडी मारली व प्रियकराच्या वक्षःस्थलीं प्रेमानें जसें लीन व्हावें तशी ती त्या चिखलांत भयानें मग्न झाली; व तिनें मरूनहि आपल्या शरीराचें रक्षण केलें. या संसारांत मोठी आपत्ति आली असतां हृदयभंग होऊन मरण्यापेक्षां अधिक सुखकर असें कांहीं नाहीं. यास्तव त्या क्षुद्र मत्स्यीनें मरूनहि स्वदेहसंरक्षण केलें, हें सर्वथा योग्यच होय. बक, अजगर व मद्गु यांच्या उदरांत गेलेल्या ह्मणजे त्यांनीं न चावतांच गिळलेल्या मत्स्यादि प्राण्यांची जी चित्तस्थिति असते ती सुषुप्तीसारखी जणुंकाय मूर्च्छाच आहे, असें मला वाटतें. 'जलाशयांत रहाणाऱ्या मत्स्यादिकांना जवळ आलेल्या मद्गु, बक, गृध्र, मार्जार, सर्प इत्यादिकांना पाहून जें भय वाटतें त्याच्यापुढें अशनिपाताचें भय अगदींच अल्प आहे,' असें हें रहस्य पूर्वीं मला एका मत्स्यादिकांच्या योनींतील दुःख आठवणाऱ्या जातिस्मर विद्वानानें सांगितलें, ह्मणजे त्यानें आपल्या अनुभवाचाच अनुवाद केला, त्यामुळें त्याला असत्य मानतां येत नाहीं. या सरोवराच्या तीरावरील तरूंच्या खालीं पुष्पांनीं सुशोभित होणारा भ्रमर असतांना ज्यांनीं नूतन कमलें व केतकें उत्तम प्रकारें इतस्ततः पसरलीं आहेत अशा या मुग्ध मृगांना आपल्या प्रियजनांस दाखीव. हा मोर उन्नतचित्त असल्यामुळें इंद्रापाशीं जलाची याचना करितो. महात्मा इंद्रहि त्याच्या उन्नतचित्तत्वामुळें प्रसन्न होऊन त्याला संतुष्ट करण्यासाठीं सर्व पृथ्वीला जलानें भरून सोडतो. हे मोर स्तनपान करणाऱ्या वत्सांप्रमाणें मेघांना अनुसरतात. मलिन मोर मलिन मेघाचा पुत्र आहे, असें अनुमान होतें. हा वाटसरू पुढील पदार्थांमध्यें सुंदर नेत्रांनीं युक्त असलेल्या हरिणांना पाहून प्रियेचें स्मरण झाल्यामुळें तिचेंच चिंतन करीत चित्रासारखा उभा राहिला आहे. मोर भूमीवरील पाणीहि घेत नाहीं, पण सर्पाला बलात्कारानें उचलून तोंडांत टाकतो. तेव्हां त्यांत सर्पाचें दौरात्म्य आहे कीं मोराचें, हें

कळत नाहीं. सज्जनांच्या हृदयांप्रमाणें स्वच्छ असलेल्या मोठ्या सरोवरालाहि सोडून पावसानें थुंकलेलें पाणी तो पितो. त्या सरोवरापुढें आपलें मस्तक नमवावें लागेल, या भीतीनेंच तो तसें करीत असावा. हे मोर वर्षाऋतूच्या मुळांप्रमाणेंच आपले पिसारे हालवीत कसे नाचत आहेत पहा. या श्रेष्ठ वनांत वनवातांनीं चंचल झालेल्या व चपल चंद्रिकांनीं युक्त अशा पिसाऱ्यानें शोभणाऱ्या या मोरांना मोत्यें देऊन नाचविणारा हा समुद्रच आहे.

अरे चकित झालेल्या चातका! ग्रीष्म ऋतूंत वनभूमि अग्नीनें दूषित होण्याचा संभव आहे. तथापि तेवढ्यानें तुझी 'मी या शुष्क तरूंच्या ढोलींतच बसून राहीन' ही आग्रहयुक्त अतिमानिता तुला सुखावह होत नाहीं. यास्तव कदलीवनाजवळील शीतल हिरवीं पानें खा, पाटांतील पाणी पी व कदलीवनांत विश्रांति घे. अरे मोरा! हा पुढें दिसणारा—आकाशांत जात असलेला पदार्थ समुद्राच्या पाण्यानें ज्याचें उदर भरलें आहे असा मेघ आहे, ही भ्रांति तुझ्या मनाला न होवो. कारण हा दावाग्नीनें जाळलेल्या वनवृक्षांच्या कोटराग्नींतून निघालेला धूम आहे. तो पर्वतावरून उठलेला धूमस्तंभ पाहून नाचूं लागणें तुला उचित नाहीं. तुझा हा नृत्यसंभ्रम अस्थानीं आहे. ज्या मेघानें शरत्कालींहि मोराला जलानें तृप्त केलें, तो वर्षाऋतूंतहि जर सरोवराला न भरील तर तें त्याचें कृत्य मूर्खाला शोभेसेंच होईल, महात्म्याला शोभण्यासारखें तें होणार नाहीं; आणि औदार्याला योग्य अशाहि समर्या त्यानें आरंभिलेलें हें अनौदार्य पाहून पामर जन हंसतील व त्यांच्या उपहासानें सज्जन दुःखित होतील. असें जाणून हा मोर आपली तृषाच सहन करण्यास तयार होतो; पण अनावृष्टि झाल्यास भूमीवरील जल प्राशन करीत नाहीं. (तर मग तो मोठा मूर्खच होय. उत्तर—) मोर मेघांतील स्फटिकासारखें निर्मल जल पिऊन पुनः रस्त्यांतील गढूळ पाणी तृषेनें व्याकुळ होत असला तरी पीत नाहीं. (तर मग तहानेनें मरत कसा नाहीं? उत्तर—) तो कृतज्ञ मोर मेघाला पुनः पुनः आठवून आनंदित होतो व मेघ मला पुनः जल देईल या आशेनें मरतहि नाहीं. कारण **गुणवान् जनांवर ज्यांनीं आशा ठेवलेली असते त्यांचा श्रमहि सुखावह होत असतो, दुःखद केव्हांच होत नाहीं.** हे वियोगी पथिक पावसाळा आला असतां, आत्मज्ञानहीन मूर्खांप्रमाणें, मार्गांत कोठें तरी राहून परस्पर वार्तालापादि करीत मोठ्या कष्टानें दिवस घालवितात. हे नाथ! या तरुण स्त्रिया या सरोवरापासून कमलें, उत्पलें, कुमुदें, बिसें, मृणाल, कल्हारपत्रनिबद्ध जल यांचे भार घेऊन निघाल्या आहेत पहा. हा सर्व भार तुम्ही कशासाठीं नेत आहांत, असें त्यांना विचारलें असतां त्यांनीं मला म्हटलें—"बा पथिका! आम्ही वियोगरूप व्यसनज्वरानें संतप्त झालेल्या एका अबलेच्या बालसख्या आहों; यास्तव तिच्या उपचारासाठीं हें सर्व नेत आहों." त्यानंतर त्या स्वकांतांमध्यें ज्यांचें चित्त आसक्त आहे अशा त्या पाहणाऱ्या मार्गस्थांना स्वगृहांतील प्रियांचें स्मरण करून देत्या झाल्या; कारण आपल्या एखाद्या वस्तूसारखी दुसरी वस्तु पाहिली कीं आपल्या वस्तूची आठवण होते. त्या मार्गस्थांतील एक मार्गस्थ आपल्या प्रियेचें स्मरण करून म्हणतो—"खरोखर ती माझी कांता सुस्निग्ध मेघरूपी तमानें काळें झालेलें आकाश, सुस्निग्ध मेघ व काळें वन पाहून प्रलाप करीत असेल. भूमीवर लोळत असेल, व चालतांना अडखळत असेल. भ्रमरपंक्तीनें कमलरूप पानपात्रानें अर्पण केलेलें

नलिनीमधु प्राशन करून मत्त झालेला, त्याच-प्रमाणें तीरावरील वृक्ष व वेली यांच्या पल्लव-नृत्यानें प्राप्त झालेला, जो मृदु व मंद शब्द-गण त्यानें वर्णिलेला अर्थात् शीत, मंद व सुगंध असा हा वायु वाहूं लागला आहे. हाय हाय!" ११८.

—:०:—

## सर्ग ११९ वा.

१ एक पथिक–प्रवासी आपल्या प्रियेजवळ येऊन पोंचल्यावर तिला आपली वियोगजन्य दशा सांगतो.

**सहचरः**—राजन्! हा पथिक मंदरपर्वता-वरील वृक्षगुल्मांत बसून फार दिवसांनीं भेट-लेल्या आपल्या प्रियेला मागें घडलेली आपली विरहकथा सांगत आहे. 'हे प्रिये! तुझ्या वियोग-दशेंत एके दिवशीं माझी काय चमत्कारिक अवस्था झाली ती मी सांगतों, ऐक. आपला वृत्तान्त तुला कळविण्यासाठीं तुजकडे दूत पाठवावा असा विचार करीत असतां मीं असें म्हटलें—" या महाप्रलयासारख्या वियोगरूप मह्ा आपत्तींत येथें असलेल्या माझा वृत्तान्त कळवून तिच्याकडून माझा सत्कार करविण्या-साठीं माझ्या घरीं जाईल असा दयाळू दूत कोण बरें आहे? परदुःखाच्या शांतीसाठीं प्रीतीनें व सरळ मनानें निरंतर यत्न करील, असा पुरुष जगांत नाहींच! हां, बरें आठवलें. या पुढील पर्वतशिखरावर दिस-णारा मेघ सतत परदुःखाचा उपशम करणें इत्यादि गुणांनीं युक्त आहे. कामदेवाच्या अश्वा-प्रमाणें तो शीघ्र माझ्या घरीं जाण्यास समर्थ आहे. तो परोपकाररसिक आहे व आपल्या विद्युद्रूपी विलासिनीनें युक्त आहे. यास्तव मी याचीच प्रार्थना करितों." असें मनांत आणून म्हटलें—' अरे भ्रात्या मेघा! ज्याच्या कंठांत गुण आहे अशा तुज गुणवानाला उचित अस-लेलें जें महेंद्रचाप–इंद्रधनुष्य तें घेऊन हे नभो-मार्गगामिन्! माझ्या प्रियेपाशीं जा व प्रथम तिला ज्याच्याबरोबर जलाचे कण गळत आहेत अशा आपल्या वायूंनीं धीर दे. तिचें समाधान कर. नंतर माझा संदेश–निरोप सांगण्यासाठीं तूं मंद गर्जना कर. क्षणभर मजवर दया कर. कारण माझ्या विरहदुःखामुळें जिचे नेत्र बाष्प-पूर्ण झाले आहेत व जिचें शरीर बालमृणाला-प्रमाणें कोमल आहे अशी ती बाला तुझी कठोर गर्जना सहन करूं शकणार नाहीं. हे मेघा! मीं त्या आपल्या प्रियेला हृदयरूप कुंचल्यानें चित्रांत काढून आलिंगन दिलें, पण ती आतां माझ्या हृदयांतून कोठें गेली कांहीं कळत नाहीं.' हे कृशोदरि! मेघाला असें बोलून चिंतापरवश झालेल्या माझी स्मृति ह्मणजे पूर्वापरप्रतिसंधान करण्यास असमर्थ असलेली बुद्धि कोठें तरी गेली. स्मृतिलोप झाल्यामुळें माझें शरीर पर-वश झालें. माझीं अंगें काष्ठासारखीं बनलीं. कारण विरहशोकजन्य पराभव सहन करण्यास कोण समर्थ आहे? कोणी नाहीं. नंतर मला तशा अवस्थेंत पाहून माझ्या सभोंवार जम-लेल्या प्रवाशांच्या समूहांत मोठा हाहाकार उडाला. तो ऐकून तेथें आलेल्या पथिकस्त्रिया मोठ्यानें ऊर बडवून रडूं लागल्या. 'हा पांथ मेला' असा सर्वत्र कोलाहल झाला. त्यांतील कित्येक पांथ आपल्या दाटून आलेल्या कंठानें दीन आलाप काढून मेघाची निर्भर्त्सना करूं लागले. त्यानंतर सर्व प्रवाशांनीं 'हा मेला आहे' असा निश्चय करून नेत्रांत अश्रु आणून त्यांनीं गंधपुष्पादिकांनीं शवाला उचित अशी अलंकरणरूप पूजा केली; व मला जाळण्या-साठीं काष्ठें गोळा करून पेटलेल्या व आवाज

करणाऱ्या चितांनीं युक्त अशा भयप्रद स्मशानांत नेलें. हे कमलनयने ! तेथें ज्यांचे नेत्र बाष्पांनीं भरले आहेत अशा कांहीं पांथांनीं ज्याच्या सभोंवार लोकांची गर्दी होऊन ते रांगेनें उभे आहेत, जें धुराच्या लोटांनीं व्याप्त आहे, मृत्यूच्या मस्तकावरील उत्तम रत्नाप्रमाणें दिसणाऱ्या अग्निरूप सोन्याचा अंश ज्यांत दिसूं लागला आहे अशा चिताशयनावर मला ठेवलें. त्या वेळीं, कुवलय-लतेप्रमाणें कोमल, मृदु, तशीच उष्ण, काळी व आपल्या दीर्घत्वाचा संकोच केल्यामुळें वांकलेली अशी धुराची एक रेघ, नकुलानें जिला भिवविलें आहे अशी कृष्णसर्पी सूक्ष्म भूच्छिद्रांत जशी त्वरेनें शिरते त्याप्रमाणें माझ्या नासिकारंध्रांतून मृदु कंठच्छिद्रांत शिरूं लागली. पण हे प्रिये, ज्याप्रमाणें वज्रशरीरी ब्रह्मदेव मृत्यूच्या कठोर शूलाघातांनीं व्यथित होत नाहीं, त्याप्रमाणें मी तुझ्या संकल्पाकार अमृतकवचानें आच्छादित झाल्यामुळें तो धूम मला पीडा देऊं शकला नाहीं. उलट हृदयांतील तुज मदननदींत मग्न झालेल्या मला अग्निदाह मर्मच्छेद करूं लागला असतांहि त्याच्या वेदना मला झाल्या नाहींत. हे सुंदरि, एवढा वेळपावेतों मी आपल्या हृदयांत तुझ्या सहवर्तमान जी चंचल लीला केली व जो सुखानुभव घेतला त्याला खरोखर उपमाच नाहीं. खरोखर अमृताच्या डोहांत बुड्या मारल्यानें जसें सुख होतें तसें तें विलाससुख अनुभविल्यावर हें प्रसिद्ध त्रैलोक्यराज्याचें सुखहि मर्मच्छेदासारखें दुःखद आहे व तें अल्पाहून अल्प, अत्यंत तुच्छ आहे, अशी भावना होते. हे प्रिये ! ती तुझी केवळ अनुभवगम्य निरतिशय आनंदरूप अनुपम लीला, ते तुझे भ्रूविक्षेपादियुक्त विलास, तसेंच अनुपम वचन, तें स्मित, ते कटाक्ष, ती रत्नमयी प्रधानभूषणभूत एकावली—मोत्यांची एकपदरी माळ—ती आनंदरसरूप सुरतसमयींची आलिंगनक्रिया, त्या नखक्षतादि चेष्टा, रतिकूजितादि ध्वनि, त्यांनीं युक्त असें हास्य, चलनवेगानें होणारा चित्तक्षोभ इत्यादिकांतील ज्याचें ज्याचें स्मरण करावें तें तें चित्ताला अमृताल्हाद देतें. असो; हे बाले ! त्यानंतर त्या तुझ्या मानसिक समागमांत सुरतसुखरूप रसयनानें अतिशय तृप्त व श्रान्त झालों आणि शरद्दतूंत ज्याचें तेज थंड आहे अशा चंद्रबिंबांत जसा तसाच मी मृदुशय्येवर स्वस्थ पडून राहिलों. इतक्यांत चंदनाच्या गंधाप्रमाणें शीतल असलेल्या दीर्घ चंद्रखंडांतून जसा एखादा अशनि गर्जना करीत निघावा, त्याप्रमाणें आपल्या शय्येंतून उठलेला व अंगाला लागलेला सशब्द अग्नि क्षीरसागरांतील वडवाग्नीप्रमाणेंच चितातळीं प्रदीप्त झालेला मीं पाहिला.'

सहचरः—तिचा तो कांत इतकें जों सांगत आहे, तों मुग्ध झालेली ती स्त्री मूढपणामुळें हा श्रेष्ठ प्रलयच उपस्थित झाला आहे, असें समजून 'हाय हाय ! मी मेलें.' असें ह्मणत मूर्च्छित झाली. त्या या आपल्या प्रियेला कमलपत्रानें वारा घालीत व मस्तकावर पाणी शिंपडीत हा पांथ तिला हृदयाशीं घट्ट आवळून धरून सावध करीत, या सुंदर कुंजांत स्थित आहे. त्यानंतर ती सावध होऊन 'पुढें काय झालें' असें विचारूं लागली असतां हा पांथ आपल्या जवळ बसलेल्या प्रियेच्या हनुवटीला हात लावून पुढील कथा सांगत आहे, पहा "हे प्रिये, तें पाहून मला थोडासा खेद वाटला, व 'अरे अरे अग्ने,' असें जों मी ह्मणत आहें, तों त्या हृष्ट झालेल्या पांथांनीं खरखर ध्वनींनीं आकुल झालेली ती चिता झटकन् विझवून टाकली. मेलेला मी पुनः जिवंत झालों आहें, असें पाहून इतर सर्व पांथांना आनंद झाला. त्यांनी

हर्षानें टाळ्या वाजविल्या. चितेवरून मला उठविलें. मंगलासाठीं वृक्षाच्या मंजरींनीं माझें अंग भरून सोडलें. मला आलिंगन दिलें. सर्व माझ्या सभोंवार उभे राहिले. ते अत्यंत आनंदानें गाऊं लागले, हसूं लागले, ओरडूं लागले, नाचूं लागले व उड्या मारूं लागले. त्यानंतर क्रूर विनायकांना सुख देणारें, भस्म, सर्प, शवांचीं शिरें यांच्या समूहांनीं युक्त असलेलें, चंद्राप्रमाणें शुभ्र अस्थि व कपालें यांनीं भूषित झालेलें तें भयंकर स्मशान संहाररुद्राच्या शरीराप्रमाणें मीं पाहिलें. त्या स्मशानांत सोसाट्याचे भयंकर वारे वहात होते. त्यामुळें राख उडून जवळच्या वनाची हिरवी कांति लोपून गेली होती. जळणाऱ्या शवांच्या वसादिकांचा दुर्गंध सभोंवार पसरत होता. आकाशांत धुक्याप्रमाणें धुळीचा लोट पसरला होता. शवांच्या अंगावरील केंस हालत होते. जळलेलीं हाडें एकमेकांवर हापटून त्यांपासून रूक्ष शब्द निघत होते. ज्यांत अग्नि पेटले आहेत, अशा चितांपासून प्रवाहानें निघणारा धूर व किटाळें यांनीं युक्त असलेल्या, वायूनें ज्यांच्यावर आघात केला आहे व त्यामुळेंच ऊष्म्यानें ज्यांचीं पानें वाळून गेलीं आहेत, अशा वृक्षांनीं युक्त असलेली ती श्मशानभूमि अग्नि, वायु व सूर्यपुत्र शनैश्चर यांना क्रीडा करण्यास योग्य असें गृहच आहे. म्हणजे स्मशान त्यांच्या क्रीडास्थानाचींच सर्व लक्षणें धारण करितें. अर्ध्याच जळलेल्या अनंत शवांनीं व्यापलेलें व अत्यंत दुर्गंधानें भरलेलें तें स्मशान मीं पाहिलें. तें मत्त भालू, कावळे, कंक, गृध्र, पिशाच व वेताळ यांच्या ध्वनींनीं भयंकर झालें होतें. जाळावयासाठीं आणलेल्या प्रेतांच्या आप्तवर्गाच्या आक्रोशांनीं त्या स्मशानांतील दिशा व कुंज दुमदुमून गेले होते व त्यांतील वृक्षसमूह पक्ष्यांनीं ओढून काढलेल्या शिरा व आंतडीं यांनीं युक्त झाल्यामुळें दग्धप्राय झाले होते. त्यांत कांहीं ठिकाणीं चितांचा क्षोभ होऊन ज्वाला उठल्यामुळें त्यांत प्रकाश पडत होता. त्यांतलि महाकेशांनीं जणुं काय तें कोठें कोठें मेघसमूहाप्रमाणें दिसत होतें. कांहीं ठिकाणीं ज्यानें पर्वत सोडला आहे असें, कोठें ज्यांतील भूतल रक्तानें माखलें आहे असें व कांहीं ठिकाणीं ज्यांत रात्रीं मेघ गर्जना करीत आहेत असें तें मला भासलें." ११९.

---

## सर्ग १२० वा.

१ वायु, वृक्ष, भ्रमर, वनपंक्ति, देवस्त्रिया, समुद्राच्या लाटा व हेमचूड पक्ष्यादिक यांचें वर्णन.

सहचर:—हे कमलनयन विपश्चिद्राजा! अशा प्रकारच्या गोष्टी बोलणारें हें स्त्रीपुरुषयुग्म आतां उत्तम रसपान करावयास प्रवृत्त झालें आहे, पहा! (आतां कोणी वायूचें वर्णन करितो–) कदली, कंदली, स्वच्छ गुच्छ यांना हालवून विकसित करण्यांत अत्यंत पटु असलेले व पुष्पपरागांनीं मंडित झालेले हे विविध वायु वहात आहेत. वनांतून निघणाऱ्या नाना प्रकारच्या सुगंधांनीं पुष्ट झालेले, तरुण जोडप्यांच्या मुखावरील घर्मकण सुकविणारे, तोंडावर इतस्तत: पसरलेल्या स्त्रियांच्या केसांना नाचविणारे वायु वहात आहेत. कुलपर्वताच्या गुहागृहांत प्रवेश करून भ्रमण करण्यास उद्युक्त झालेल्या सिंहाप्रमाणें असुरांच्या मेरुशिखरावर आक्रमण करण्याच्या उद्योगांनीं हे क्षारसागरावरील वायु वाहत आहेत. तमाल व ताल वृक्षांवर एखाद्या चंचल शिशूप्रमाणें हे लीलेनें झोंके घेत आहेत. यांनीं जलतरंगांवरून उडी मारून वृक्षाग्रांवरील कोमल पल्लवांचें

आक्रमण केलें आहे. हालणाऱ्या नूतन लतांपासून उडालेल्या पुष्पधुळीनें अत्यंत मलिन झालेले हे वायु राजाप्रमाणें उद्यानांतून फिरत आहेत. वेळूंच्या वनांत विश्रांति घेणारा हा वायु हस्तिनापुरांतील गायनपटु स्त्रियांनीं शिकविल्याप्रमाणें मधुरगायन करण्यासच जणुंकाय प्रवृत्त झाला आहे. कर्णिकार पुष्पांनीं आपला गंध व पराग न देतां वायूचा तिरस्कार केला आहे, असें पाहून भ्रमरहि त्या कर्णिकाराचा दुरूनच परिहार करीत आहेत. हा तालवृक्ष खांबासारखा सरळ उभा असल्यानें त्यावर चढतां येत नाहीं. अर्थात हा कोणा याचकाला फळ देत नाहीं व पल्लवहि देत नाहीं. त्यामुळें याची आकृति उन्नत जरी असली तरी याचकाचा अभिलाष पूर्ण न केल्यामुळें ती मुळींच शोभत नाहीं. औदार्यादि गुणांनीं हीन असलेले जे मूर्ख त्यांच्या शरीराला वस्त्रालंकारादि अवडंबरानेंच शोभा आणणें उचित आहे. शरीरालंकरण हेंच त्यांच्या शोभेला कारण होतें. हे राजन्! हा फुललेला पलाशवृक्ष बाह्यरंजनेनेंच राजासारखा शोभत आहे. चल, आपण दुसऱ्या चांगल्या वृक्षाकडे जाऊं! हा वृक्ष आहे. त्याच्या जवळ गेल्यास 'अरेरे, आपण याच्याजवळ उगीच आलों,' असा विषादरूप चित्तविकार हा उत्पन्न करितो. हा कर्णिकार निर्गुण जीवाप्रमाणें सुगंधशून्य आहे. चंचल मंजरीजालरूप विद्युत्संगानें स्थित असलेला हा काळा तमाल वृक्ष चातकाच्या मनांत उगीच मेघाची भ्रांति उत्पन्न करीत आहे. उंच कुलांतील राजाप्रमाणें हे वेळू पानांनीं भूषित झालेले असतात. त्यांचा संघात दुर्भेद्य असतो. आपल्या उत्तम छायांनीं त्यांनीं पर्वतांना आच्छादित केलेलें असतें. राजे उत्तम वाहनांनीं भूषित झालेले असतात. त्यांचा संग्रहि अजिंक्य असतो व चांगले लोक त्यांच्या आश्रयाची अपेक्षा करितात. राजे मानादि गुणांना योग्य असतात व वेळू धनुष्याच्या गुणाला योग्य असतात. मेघ मेरूच्या सुवर्णशिखररूप आसनावर बसतो व हरि सुवर्णशिखरासारख्या आसनावर बसतो. म्हणून मेघ हरीप्रमाणेंच अग्रेसर आहे. मेघाच्या तटावर वायु हाच मोठा व्याधि असतो. हरीच्या संनिध वातव्याधि म्हणजे उद्धव असतो. मेघ विजांनीं आकाशाला—अंबराला पीत—पिवळें करितो व हरि विजेसारखें पीतवर्ण वस्त्र नेसतो. याप्रमाणें मेघाचें हरीशीं साम्य आहे. आंत प्रवेश करणें व बाहेर निघणें, या कार्यांत व्यग्र झालेले पक्षी ज्यावर आहेत असा हा फुललेला पलाश वृक्ष ज्याच्या अंगांत बाण शिरत आहेत व बाहेर पडत आहेत, अशा रक्तानें माखलेल्या वीराप्रमाणें दिसत आहे. ज्याचीं घरें मंदार पुष्पांच्या परागांनीं व सुगंधांनीं भरलीं आहेत, अशा महेंद्र पर्वताच्या शिखरावर मद्यपान करून मत्त झालेले कामी गंधर्व निजले आहेत. हे राजन्! हे प्रवासी सिद्ध व विद्याधर वीणादि वाद्यांनीं युक्त होऊन कल्पवृक्षांच्या वनछायेंत गात व विश्रांति घेत बसले आहेत पहा. या वनांतील प्रत्येक कल्पवृक्षाच्या पल्लवावर या देवस्त्रिया विश्रांति घेत बसल्या आहेत. त्या गात आहेत व हंसत आहेत पहा. मृदुमंदिरांनीं युक्त असलेल्या मंदर पर्वतावर हें उदार मंदपाल मुनींचें मंदिर आहे. त्याची भार्या गृध्री आहे. सिंह—हत्ती, नकुल—सर्प इत्यादि परस्परांशीं जन्मतःच वैर करणारे प्राणी आपसांतील वैर विसरून ज्यांत प्रेमानें क्रीडा करीत आहेत, असे हे मुनींचे आश्रम पहा. विद्रुमद्रुमांशीं

१ ही कथा महाभारतांत आहे.

मिश्रित झालेल्या समुद्रतीरावरील वेलीच्या पानांवर हे जलबिंदु पडलेले असून त्यांत सूर्य प्रतिबिंबित झाला आहे. त्यामुळें ते फार शोभतात. विलासी पुरुषांच्या वक्षःस्थलीं विलासिनी स्त्रिया जशा लोळून क्रीडा करितात, त्याप्रमाणें रत्नें व माणकें यांच्या आकारांवर या लाटा आवर्तवृत्तींनीं क्रीडा करीत आहेत. नागलोकांतील व इन्द्रलोकांतील स्त्रियांच्या जाण्यायेण्यानें होणारा हा भूषणांचा दिव्य ध्वनि अन्तरिक्षांतून ऐकू येत आहे, पहा. ऐरावताच्या स्नानाचें स्थान अशा या पर्वताच्या गुहा त्याच्या गंडस्थलांतून गळलेल्या मदानें मत्त झालेल्या भ्रमरींच्या स्वरांनीं जणु काय गातच आहेत. कृष्णपक्षांत चंद्राच्या ऱ्हासाबरोबर ऱ्हास पावणाऱ्या सागराच्या काळ्या रेघांच्या पंक्ति निवासभूमिभूत वेलातटावर कशा क्रमानें दिसत आहेत त्या पहा.

(कोणी वनाचेंच स्त्रीरूपानें वर्णन करितो—) सुवास हाच जिचा श्वासोच्छ्वास आहे, दाट छाया हेंच जिचें शीतल अंग आहे, एकान्तांत जिनें आपलें अंग दाखविलें आहे, नाना प्रकारच्या पुष्पांनीं जी परिपूर्ण आहे, वनरचना हेंच जिचें वस्त्र आहे, निर्झर हेंच जिचें शुद्ध हास्य आहे, खालीं पडलेलीं पुष्पें हेंच जिचें शय्यास्तरण आहे अशी वनविलासिनी धन्य आहे. ज्यांतील पशुपक्ष्यादिकांचे शब्दहि शांत झाले आहेत अशा शुद्ध वनभूमींत देवादि श्रेष्ठ जीव जसे रममाण होतात तसे ते नन्दनवनांतहि रममाण होत नाहींत. रम्य व निर्जन वनभूमि अत्यंत विरक्त मुनींच्या चित्ताला व अत्यंत विषयासक्त मनुष्याच्या अनुरक्त चित्ताला एकसारखेंच रममाण करितात. ज्याचे तट पाण्यानें धुतले जातात, अशा समुद्राच्या तीरावरील पर्वतांचे पाद म्हणजे प्रत्यन्त पर्वत—पायथ्याजवळच्या टेंकड्या—कामिनींच्या नूपुरयुक्त पायांप्रमाणें रत्नांच्या योगानें शोभतात व ध्वनि करितात. पुष्पांगवृक्षावर विश्रांति घेत असलेले व रम्य सोन्याप्रमाणें कांतिमान् दिसणारे हे हेमचूड पक्षी स्वर्गांतील देवगणाप्रमाणें शोभतात. वणवा लागलेल्या पर्वताप्रमाणें भ्रमर व मेघ याच धूमानें संपन्न असलेलीं फुललेल्या सोनचांफ्याचीं वनें वाऱ्यानें हालत आहेत, पहा. करवीरवृक्षाच्या—कण्हेरीच्या अग्रशाखारूप झोंपाळ्यावर झोंके घेणाऱ्या प्रिय कोकिलाला त्याची प्रिया कोकिला आलिंगन देऊन मधुर गीतालाप करीत आहे. हे राजा! या लवणार्णवाच्या भूमि ज्याच्या हातांत भेटी आहेत अशा कलकल करणाऱ्या राजाकडून भरून गेल्या आहेत पहा. हे भूपाला! पूर्व लवणसागरापासून पश्चिम लवणसमुद्रापर्यंत व दक्षिमहासागरापासून उत्तर समुद्रापर्यंत या सर्व जम्बूद्वीपांत भयंकर संग्रामांत जे राजे अवशिष्ट राहिले आहेत त्या सर्वांच्या मस्तकावर पाय ठेवून त्यांच्यावर अनुग्रह कर. शिवाय त्या त्या देशांतील पृथ्वीचें प्रत्येक दिशेंत रक्षण करण्यासाठीं नीतिशास्त्रोक्त प्रकारानें समाधानपुरःसर शांत बुद्धीनें आज्ञा दे. त्यानंतर वस्त्रें दे व अतुल स्वसैन्य दे. १२०.

---

## सर्ग १२१ वा.

—:०:—

१ देशमर्यादा स्थापून अग्नींत प्रवेश करणाऱ्या राजांचा अग्नीच्या वरानें दिशांचा अंत पाहण्याचा उद्योग.

श्रीवसिष्ठः—नंतर त्या समुद्रतटावर ते विपश्चित् राजे बसून वर मंत्र्यांनीं प्रार्थना केल्याप्रमाणें मंडलमर्यादादिस्थापनारूप सर्व राजप्रयोजन केलें. तेव्हां तेथेंच ते निवासभूमि करून राहिले व अक्षत देशमर्यादा प्रस्थापित करिते

झाले. नंतर श्रीमान् सूर्य त्या राजांचा प्रताप वर्णन करण्यासाठींच समुद्रांत बुडून लोकांतरीं गेला. मेघपंक्तीप्रमाणें कृष्णवर्ण रात्र विस्तार पावली. तेव्हां आपलीं सर्व दिनकृत्यें आटोपून ते आपापल्या शय्येवर बसले. नदीच्या प्रवाहाप्रमाणें दुरून प्राप्त झालेल्या त्यांनीं विस्मयाकुलचित्त होऊन असा विचार केला. "अहो, काय चमत्कार आहे! आम्ही यत्नावांचूनच देवाधिदेव अग्नीच्या प्रभावानें आपल्या दिव्य वाहनांनीं दूर मार्ग चालून आलों. ही पसरलेली दृश्य श्री अशी आणखी किती लांबवर पसरलेली असेल! या जंबुद्वीपाच्या सभोंवार लवणसमुद्र आहे. त्याच्यापुढें प्लक्षद्वीपभूमि आहे. त्यानंतर या लवणसमुद्राच्या दुप्पट विस्तीर्ण इक्षुरससागर आहे. इक्षुरससमुद्रापलीकडे कुशद्वीप आहे. त्यापुढें सुरोदसागर आहे. याप्रमाणें सात द्वीपें व सात समुद्र यांच्या पलिकडे काय असेल? ही दृश्यरूपी माया केवढी मोठी असेल व वस्तुवैचित्र्यानें ती कशा प्रकारची असेल बरें? हें सर्व जाणण्यासाठीं आपण अग्निदेवाची प्रार्थना करूं या; त्याच्या वरामुळें आम्ही या सर्व दिशा अगदीं सीमेपर्यंत अनायासानें पाहूं" असा विचार करून ते सर्व आपआपल्या स्थानीं ह्म० चार सागरांच्या तीरावर स्थित होऊन एकाच वेळीं भगवान् अग्नीचें आवाहन करते झाले. तेव्हां तो भगवान् अग्नि त्यांच्या पुढें स्थूल शरीरानें युक्त होऊन प्रकट झाला आणि 'पुत्रांनो! वर मागा' असें म्हणाला.

**विपश्चित:**—हे सुरेश्वरा, या पंचभूतात्मक दृश्याचा अंत जोंवर या देहानें जाणें शक्य आहे तोंवर या देहानें, पुढें वैदिकमंत्रप्रभावानें संस्कृत झालेल्या याच देहानें व त्याचीहि गति कुंठित झाल्यावर मनानेंहि आम्ही पाहूं. प्रत्यक्षयोग्य, अनुमानगम्य व श्रुत्यादि शब्दगम्य जेवढे पदार्थ आहेत, ते सर्व आह्मांला प्रत्यक्ष दिसतील, असा उत्तम वर तूं दे. योगी आपल्या योगप्रभावानें जेथवर जातात तेथवर आम्ही याच शरीरानें जाऊन पहावें. त्याच्या पुढें हे प्रभो, आम्ही मनानेंच सर्व दृश्य पहावें. जेथवर योगी जातात तेथवर आम्हांला मृत्यु न येवो आणि जेथें ह्मणजे ज्या उत्तरायण-दक्षिणायनादि मार्गांत मरूनच जातां येणें शक्य आहे तेथें आमचें मन जावो.

**श्रीवसिष्ठ:**—याप्रमाणें त्यांनीं वर मागितला असतां अग्नि 'एवं अस्तु' असें बोलून एका क्षणांत वडवाग्निरूपानें समुद्रांत जाण्याविषयीं त्वरा झाल्याप्रमाणें एकाएकीं गुप्त झाला. रामा! असा वर देऊन अग्नि अदृश्य झाला व इतक्यांत रात्रीला आरंभ झाला. ती रात्रहि चार प्रहर राहून गेली आणि सूर्य वर आला. त्याबरोबरच त्या विपश्चितांना गंभीर सागरानें उल्लंघन करण्याची इच्छा झाली. १२१.

---

## सर्ग १२२ वा.

—:०:—

१. विपश्चित राजे पायांनीं समुद्रतरंगांवरून जात असतांना आवर्त व मकरादि यांचें विदारण करून कसे निघाले त्याचें वर्णन.

**श्रीवसिष्ठ:**—त्यानंतर प्रभातसमयीं पृथ्वीची व्यवस्था करून ह्मणजे राज्याचा विभाग त्याच्या परिपालनोपायांचा उपदेश, मर्यादास्थापन इत्यादि करून दिगंत पाहाण्याविषयींच्या उत्कट उत्कंठेनें ज्यांच्या शरीरांत ग्रहादिकांप्रमाणें संचारच केला आहे असे ते, मुख्य मुख्य मंत्र्यांनीं पर्यायानें न जाण्याविषयीं सुचविलें असतांहि, आक्रोश करणाऱ्या व रडणाऱ्या सर्व परिवाराला पुढें न येण्याविषयीं आज्ञा करून वैराग्यामुळें अभिमान, मात्सर्य, लोभ,

शत्रूंच्या पराभवाविषयींची इच्छा, राज्य, स्त्री-पुत्र, इत्यादिकांविषयींची एषणा वगैरेचें निरसन करून ' समुद्राच्या पलीकडील दिगंत पाहून एका क्षणांत आम्ही परत येतों ' असें बोलणारे ते निघाले. अग्निप्रसादानें प्राप्त झालेल्या मंत्रशक्तीनें भूमिजलादि भूतांचा जय करून सिद्धत्वास प्राप्त झालेल्या त्यांनीं नौकादि उपायांची अपेक्षा न करतां त्या वेळीं पायांनींच समुद्रांत प्रवेश केला. ते विपश्चित राजे चारहि दिशांत समुद्रांत प्रवेश करणाऱ्या पुष्कळ भृत्यांकडून अनुसरण केले जाणारे असे होत्साते पायांनींच चालले. ज्याप्रमाणें भूपृष्ठावर पाय ठेवून आपण चालतों, त्याप्रमाणें ते समुद्राच्या लाटांवरून पाय ठेवीत पाण्यांतून चालले. ते चारहि राजे प्रत्येक दिशेस एकेक असे निघाले. ते आपल्या सेनेनें सर्वथा वियुक्त होते. ते महासागरामध्यें पावलें टाकीत जात आहेत आणि त्यांनीं समुद्रांत प्रवेश केला आहे, इतकें जों तीरावरील त्यांचे भृत्य पहात आहेत तों शरदृतूंतील मेघखंडाप्रमाणें ते अदृश्य झाले. महात जसा हत्तींना प्रेरणा करतो व ते बद्धकक्षा हरण करतात, त्याप्रमाणें दृढनिश्चयानें ज्यांना प्रेरणा केली आहे असे ते पादचारी विपश्चित् राजे त्या जलमार्गांचें अतिक्रमण करते झाले. पर्वताप्रमाणें उंचसखल असलेल्या जलतरंगांची शोभा स्वतः तसे होऊन ते हरण करीत होते. त्यामुळें ते मंथनसमयीं मंदर पर्वताची जलतरंगांमुळें होणारी उन्नतावनत श्री हरण करणाऱ्या हरिमूर्तीप्रमाणें शोभले. मत्त अभ्रांमध्यें प्रवेश केलेल्या चंद्रमंडलाप्रमाणें आपल्या प्रवेशानें शोभणाऱ्या आवर्तांत तृणाप्रमाणें ते पुष्कळ वेळ भ्रमण करीत राहिले. मंत्रविद्या, तिच्यामुळें प्राप्त होणारें ओज व बल यांनीं दुर्जेय झालेले, हातांत शस्त्रें धारण करणारे, ज्यांच्या शरीरांना मत्त मकरांनीं पूर्वीं गिळून त्यांना पचविण्यास असमर्थ झाल्यामुळें पुनः बाहेर ओकून टाकलें आहे असे ते वेगानें पुढें चालले. जलतरंगांवर विश्रांति घेणाऱ्या वायूनें ज्यांना पुढें ढकलिलें आहे, असे ते एका क्षणांत शंभर शंभर योजनें पुढें जाऊन पुनः तितकेच मागें परत येत असत. जलतरंगरूप हत्तीवर आरोहण केल्यामुळें आपल्या राज्यांतील हत्तींच्या पाठीवर बसल्याप्रमाणेंच ते शोभत होते. विस्तीर्ण ऊर्मिसमूहरूप शिलापटाचें विदारण करण्यांत कुशल असलेल्या वायूप्रमाणें जलरूपी मेघांतून बाहेर पडण्याची लीला ते दाखवीत होते. चंचल हत्तीप्रमाणें तरंगसमूहाकडून आघात केले जात असलेलेहि तट आपलें धैर्य जसें सोडीत नाहींत, त्याप्रमाणें त्यांनींहि आपलें धैर्य सोडलें नाहीं. मोटमोठ्या ऊर्मि व मोत्यें, माणकें यांचे समूह यांत प्रतिबिंबित होऊन ते एकेकटे असूनहि पुरुषसमूहानें परिवेष्टित असल्याप्रमाणें भासत होते. पांढऱ्या फेंसाच्या गोळयांवर हलकेच पाय ठेवणारे ते श्वेतपद्मावर पाय देऊन उभ्या राहिलेल्या राजहंसाच्या शोभेला धारण करते झाले. मेघांच्या कडकडाटाप्रमाणें त्या समुद्राचा भयंकर ध्वनि होत होता. पण वेलातटीं वेगानें आपटणाऱ्या लाटांच्या त्या वेगाला ते विपश्चित राजे असल्यामुळेंच भ्याले नाहींत. आकाशाला स्पर्श करणाऱ्या जलमय श्रेष्ठपर्वतावरून ते खालीं पडत होते व पुनः तितकेच उंच चढून जात होते. ते एका क्षणांत पातालांत येत होते व क्षणांत सूर्याइतके उंच जात होते. उत्पाताचा अधःपात झाला असतां खालीं पडणारे जे मेघांचे समूह त्यांनीं ते जणुंकाय परिवेष्टित झाले होते. याप्रमाणें ते विपश्चित राजे सागरांतून जाऊं लागले. त्या वेळीं त्यांतील मकर हेच त्यांचे सहचर होते. ज्यांचे व्यक्ताव्यक्त किरण सभोंवार पसरत आहेत अशा मोत्यें व माणकें

यांच्या समूहांनीं व जलमय तरुलतारूप तरंगांच्या सीकररूपी पुष्पांनीं त्यांचें शरीर भूषित झालें होतें. मकराप्रमाणेंच शूर नक्र व खेंकडे यांच्या सभोंवारच्या आवर्तीत ते फिरत होते. त्यामुळें त्यांचें तें समुद्रगमन अतिशयच शोभलें. १२२.

---

## सर्ग १२३ वा.

—:०:—

१ द्वीपें व समुद्र यांतून गमन करणाऱ्या विपश्चित राजांना पाश्चात्यादि क्रमानें प्राप्त झालेल्या विविध देशांचें वर्णन.

श्रीवसिष्ठः-- याप्रमाणें समुद्र व द्वीपें यांतून पायानें संचार करणारे हे विपश्चित राजे दृश्यरूप अविद्येचा अंतापर्यंत विचार करण्यास प्रवृत्त झाले. ते समुद्रांतून द्वीप, पुनः द्वीपांतून समुद्र, याप्रमाणें द्वीप, पर्वत, वनें यांतून मोठ्या वेगानें जाऊं लागले. ते छेद व भेद यांनीं रहित होते. ह्मणजे त्यांना मार्गांत कोठल्याहि प्रकारें पीडा झाली नाहीं. त्यांतील पश्चिम दिशेचा अंत पाहावयास गेलेला विपश्चित राजा 'मी अमर आहें' अशा अभिमानानें युक्त असलेल्या माशाकडून गिळला गेला. तो मासा विष्णुमीन-कुलामध्यें उत्पन्न झाला असून अति वेगानें गमन करणाऱ्या वितस्ता नदींतील नौकादि वाहनांचा जसा वेग असतो तसा शीघ्र वेगानें युक्त होता. त्या माशानें राजाला क्षीरसागरांत आणून तोंडांतून बाहेर टाकलें. कारण त्याला आपल्या पोटांत जिरवणें अशक्य होतें. तेव्हां त्या राजानें क्षीरसागराचें उल्लंघन करून दूर दिगंतरीं गमन केलें. दक्षिण दिशेकडे गेलेल्या विपश्चित् राजाला इक्षुरसार्णवांतील यक्षनगरांत पाहून वशीकरणविद्या शिकविण्यामध्यें कुशल असलेल्या यक्षिणीनें विद्याबलानें आपणाविषयीं कामुक बनविलें. पूर्व दिशेंतील राजा गंगेचीं हजारों मुखें पहात होता. तों त्याला खावयास तयार झालेला एक मकर त्याच्यापाशीं आला. पण त्याचें बलानें आक्रमण करून त्याचा उद्धार करण्यासाठीं त्यानें त्याला गंगेंत आणून विदीर्ण केलें, तेव्हां गंगेनें त्याला पुनः कान्यकुब्ज देशांत आणून टाकलें. उत्तर दिशेकडे गेलेला विपश्चित उत्तर कुरूंतील देवीसह क्रीडा करीत असलेल्या ईश्वराची आराधना करून अणिमादि ऐश्वर्यास प्राप्त झाला. त्यामुळें त्या दिशेमध्यें वाटेल तेथें जाणाऱ्या त्याला मरणाचें भय वाटलें नाहीं. म्ह० तो अमर झाला. त्या ऐश्वर्याच्या बळावर मकर व जलहस्ती यांनीं त्याला गिळून पुनः जरी ओकून टाकलें, तरी कोणत्याहि प्रकारची पीडा न पावतां अनेक द्वीपांतरें व कुलपर्वत यांचें तो अतिक्रमण करता झाला. पश्चिमदिशेकडे गेलेल्या राजाला गरुडपक्ष्यानें आपल्या पाठीवर बसवून कुशद्वीपांत समुद्राच्या पलीकडे पोंचविलें. सुवर्णमय कुशासारखी त्याची कांति झाली. पूर्वेकडे गेलेल्या राजाला द्वीपपर्वतावरील वनांत एका राक्षसानें भक्षण केलें. पण राजानें पोटांतील आंतडीं फाडून त्या राक्षसाला मारलें. दक्षिण दिशेंतील विपश्चित शाकद्वीपांत दक्षाच्या शापानें एका क्षणांत यक्ष झाला. पण शंभर वर्षांनीं तो त्या शापापासून मुक्त झाला. उत्तर दिशेंतील राजा आपल्या वेगानें नक्षत्रांचें उल्लंघन करून गेला.

---

टीप. १, कुशद्वीपांत कुशस्तंबावर असलेल्या गरुडाची पूजा करून त्याला प्रसन्न करून घेतलें असतां तो त्या द्वीपांतून व समुद्रांतून तारतो, असें पुराणांत वर्णन आहे.

लहान मोठ्या नद्यांचें व समुद्रांचें त्यांनीं उल्लंघन केलें. पण महार्णवाच्या पलीकडे असलेल्या सुवर्णभूमींत सिद्धांच्या शापानें तो शिलात्वास प्राप्त झाला. त्यानंतर शंभर वर्षांनीं अग्नीच्या प्रसादानें त्या सिद्धांकडूनच तो शापमुक्त केला गेला. त्यामुळें त्याच्या मनाला मोठें समाधान वाटलें. पूर्वेकडील विपश्चित राजा कान्यकुब्ज देशाच्या उत्तरदिशेस गेला. तेथें ज्यांत नारळाचीं झाडें पुष्कळ आहेत अशा देशांतील प्रजेचा आठ वर्षे राजा होऊन राहिला. तो मोठा धर्मनिष्ठ होता. त्यामुळें त्याला आपल्या पूर्ववृत्तांताची आठवण झाली. मेरु पर्वताच्या उत्तरेस असलेल्या कल्पवृक्षवनांत अप्सरेसह नारळाचें सेवन करीत तो दहा वर्षे राहिला. पक्ष्यांना वश करण्याचें रहस्य जाणणारा पश्चिम दिशेंतील राजा शाल्मली द्वीपांतील शाल्मली वृक्षांवर पक्षिणीच्या घरट्यांत तिच्यासह क्रीडा करीत दहा वर्षे राहिला. त्यानंतर मंदरपर्वतावर गेलेल्या त्याला मंदरी नांवाच्या किन्नरीनें वश करून घेतलें. त्यामुळें मंदारतरुमंदिरांत त्यानें तिचें सेवन केलें. पूर्व देशांतील राजा नारिकेलवनांतून क्षीरोद-तीरास प्राप्त झाला. तेथील कल्पवृक्षवनाच्या पंक्तींत कामाकुल होऊन अप्सरांसह त्यानें सत्तर वर्षे घालविलीं. १२३.

---

# सर्ग १२४ वा.

—:०:—

१. एकाच विपश्चित् राजाच्या चार देहांनीं अनेक द्वीपांतून व पर्वतावरून होणाऱ्या व्यवहाराचें समर्थन.

श्रीरामः—हे ब्रह्मन्, ते चार विपश्चित् राजे एक संविद्रूमय व एकाच देहानें संपन्न असूनहि त्यांच्या इच्छा अशा परस्परभिन्न कशा ?

श्रीवसिष्ठः—हे रामा, एक साक्षिचैतन्यरूप असलेल्या जीवाला स्वप्नांत अविद्येमुळें नानादेहांची कल्पना होते व त्यांच्या ठिकाणीं शत्रु, मित्र, उदासीन अशी भावना केल्यानें नाना इच्छा होतात, असें आपण पहातों. सृष्टीच्या आरंभीं ब्रम्हरूप जीव जागत असला तरी विचित्र कर्मामुळें विचित्र देह संभवतात. एकसंविन्मय असतांनाहि भिन्न भिन्न इच्छा संभवतात. तें संविदाकाश स्वच्छ असल्यामुळें नानात्मतेला प्राप्त झालेलें त्याचें स्वरूपच त्यांत प्रतिबिंबित होतें. स्वच्छ आरशांत पर्वत, नद्या इत्यादिकांसह महाकाश जसें दिसतें तसेंच त्यांत नानात्व दिसतें. तशा स्वच्छ असलेल्याहि संविदाकाशाला विचित्र जगदाकार प्राप्त होण्यास आरशासारखी त्याची स्वच्छताच कारण आहे. "अहो, पण जगत्‌हि वस्तुतः चित्‌च आहे, तेव्हां तिच्यामध्यें तिचेंच प्रतिबिंब कसें पडणार ?" म्हणूम विचारशील तर सांगतों. एक-द्रव्यमय असलेले आरसे जसे परस्परांत प्रतिबिंबित होतात त्याप्रमाणें हे परमार्थतः चिद्रूप असलेलेहि पदार्थ परस्परांत प्रतिबिंबित होतात. माया ही उपाधि ह्मणजे अचिन्त्य शक्ति आहे. त्यामुळें गंधर्वनगर, स्फटिकाची भिंत इत्यादि आकाशांत चंद्र, सूर्य, अभ्रें, महाकाश इत्यादिकांचें प्रतिबिंब दिसत असल्यामुळें चितीचें चितींतच प्रतिबिंब पडण्यास

कांहीं हरकत नाहीं. म्हणूनच ज्याच्यापुढें जी जी वस्तु प्रकट होते, तिला तिला तो चिद्धनैकस्वभावामुळें भोक्ता या रूपानें प्राप्त होतो. म्हणजे अध्यस्त भोग्य जगद्रूप झालेलें ब्रह्म विषय व इंद्रियें यांचा संयोग झाला असतां, बुद्ध्यवच्छिन्न जीवचैतन्यांत प्रियाप्रियविषय-भोगाकारानें प्रतिबिंबित होतें. अर्थात् ज्या ज्या भोग्य वस्तूशीं इंद्रियांचा संयोग होतो, त्याचा भोग घेण्यासाठीं हा जीव तयार होतो. जर भोग्य वस्तु बुद्धीमध्यें प्रतिबिंबित न झाली तर भोगच संभवत नाहीं. हें चित्तत्त्व नानात्मकहि नाहीं व अनानात्मकहि नाहीं. त्यामुळें तें अनिर्वाच्य आहे. म्हणून ज्या विपश्चित् राजाच्या पुढें जें आलें त्याच्याशीं तादात्म्य पावून तो तद्रूप झाला. अगस्त्यादि योगी मलयादि नियत एकदेशीं नित्य स्थित असूनहि नानादेशांतील व तिन्ही काळांतील सर्व वस्तूंना योगबलानें व्यापितात, सर्व कर्में करतात व सर्वांचा अनुभव घेतात. हें प्रसिद्ध आहे. तेव्हां भिन्न देशांत गेलेल्या विपश्चित् राजांविषयीं काय सांगावें? मेघहि अतिशय व्यापक असल्यामुळें एक असूनहि एकाच वेळीं पृथक् वृष्टि क्रिया करतो. उन्हानें व्याकुळ झालेल्यांना आपल्या अंशानें आल्हाद देतो. अनेक नगरांत, पर्वतावर, नद्या, क्षेत्रें इत्यादिकांवर एकाच वेळीं वृष्टि पाडतो. कोठें विजेच्या योगानें वृक्षादिकांचा उच्छेद करतो. कोठें अतिवृष्टीनें ग्रामादिकांचा विध्वंस करतो. कोठें अनावृष्टीनें शेतांना सुकवितो व त्याचा अभिमानी जीव 'मी हें सर्व करतो' असा अभिमान धरतो. अणिमादि ऐश्वर्य प्राप्त झाल्यामुळें ईश्वरासारखे असलेले योगी एकाच वेळीं असंख्य जगत्कार्यें करितात व त्यांचा अनुभव घेतात. एक विष्णु आपल्या चार बाहूंनीं व चार शरीरांनीं पृथक् पृथक् क्रिया करतो, कोठें योगनिद्रा घेतो. कोठें तप करतो, कोठें इंद्राचा अनुज होऊन त्याला साहाय्य करतो, कोठें वैकुंठामध्यें नानाप्रकारचे भोग भोगतो. अशा पृथक् क्रिया करीत जगाचें रक्षण करतो व श्रेष्ठ स्त्रियांचा उपभोग घेतो. पण जेव्हां दोन बाहूंनीं दोन कार्यें करण्याचा प्रसंग येतो, तेव्हां द्विबाहु होतो व संग्रामांत वगैरे बहुबाहु होण्याचा प्रसंग असतो तेव्हां तसा होऊन अनेक भुजांनीं अनेक कार्यें करतो. त्याचप्रमाणें विपश्चित राजांनीं चारहि दिशांमध्यें भिन्न भिन्न शरीरांनीं स्थित होऊन एकसंविन्मय असूनहि तसा भिन्न भिन्न व्यवहार केला, व पृथक् सुखदुःखांचा अनुभव घेतला. त्यांनीं भूमिशय्यांवर शयन केलें, द्वीपांतर्गीं भोजन केलें, वनपंक्तींतून विहार केला, मरुभूमींतून प्रवास केला, पर्वतांच्या पंक्तींत वास केला, सागरांच्या तीरांवर भ्रमण केलें, द्वीपांत विश्रांति घेतली. ते मेघपंक्तींमध्यें गुप्त झाले, समुद्रमालांवर, वावटळींत व जलतरंगांवर आरोहण केलें. पर्वत व समुद्र यांच्या तटांवर व मोठमोठ्या नगरांतून क्रीडा केली; व पूर्व दिशेंतील विपश्चित राजानें शाकद्वीपांत प्रसिद्ध उदयपर्वताच्या तटावर पर्णरहित वृक्षांत एका यक्षानें संमोहनविद्येनें संमोहित केल्यामुळें सात वर्षें शयन केलें, पुढें याच पूर्व विपश्चितानें याच पर्वतावर कोठें पाषाण बनविणारें जल प्राशन करून बलात्कारानें प्राप्त झालेल्या पाषाणत्वाचा अनुभव घेत भूमींत भौमपदार्थ बनून सात वर्षें काढलीं. शाकद्वीपांतील अस्तपर्वताच्या शिखरावर अभ्रयुक्त गुहागृहांत पिशाचाप्सरेनें पाश्चात्य विपश्चिताला एक महिना कामुक करून सोडलें. शांतभय या नांवाच्या एका भूप्रदेशीं जलधर नांवाच्या महापर्वतावर हरितकीवनांत कोणा मुनीच्या शापानें हरीतकी

वृक्ष होऊन पूर्व विपश्चित् सत्तर वर्षें राहिला. यक्षानें ज्याला आपल्या स्वाधीन करून घेतलें आहे असा तो पूर्व विपश्चित् रैवतक पर्वतावरील शिशिर-नामक भूप्रदेशीं दहा रात्रीं सिंह झाला. पिशाचमायेनें ज्याला फसविलें आहे असा तो दहा वर्षें कांचनशैलादि दऱ्यांतील बेडूक होऊन राहिला. उत्तर दिशेकडे गेलेला विपश्चित् कौमारवर्षास प्राप्त होऊन शामपर्वताच्या तटावरील शाकद्वीपांतील अंधकूपांत अंध दर्दुर बनून शंभर वर्षें राहिला. पाश्चात्य विपश्चित मरीबकवर्षांत विद्याधरत्व देणाऱ्या विद्येनें विद्याधरत्वास प्राप्त होऊन चौदा वर्षें राहिला. शीत, मंद व सुगंध वायूचा आश्रय करून त्यानें तो काल सुखानें घालविला. १२४.

---

## सर्ग १२५ वा.

१ विपश्चित् राजांचे विपत्तीत परस्पर उपकारित्व, व २ जीवन्मुक्तांचे चरित्र.

**श्रीवसिष्ठः**—शांतभय या नांवाच्या वर्षामध्यें जलधार पर्वतावरील वृक्षांमध्यें मुनिशापानें प्रवेश करून मुळांच्या द्वारा पृथ्वीचा रस शोषून घेत पूर्व विपश्चित् राजा सत्तर वर्षें राहिला होता. ही गोष्ट कळतांच पाश्चात्य विपश्चित् तेथें आला. त्यानें शाप देणाऱ्या मुनीला प्रसन्न करून घेतलें आणि त्यानें दिलेल्या विद्येच्या योगानें त्याला वृक्षत्वापासून मुक्त केलें. कर्वतीनें वृक्षाला जसें कर्वतावें, तसाच त्यानें त्याच्या वृक्षत्वाचा छेद केला. पाश्चात्य विपश्चित् शिशिर–वर्षामध्यें पाषाणत्वाला प्राप्त झाला होता, पण तें ऐकतांच दक्षिण विपश्चित् तेथें आला व गो-मांसादि प्रयोगानें शाप देणाऱ्या पिशाचपतीला प्रसन्न करून घेऊन त्यानें त्याला सोडविलें. अस्ताचल-पर्वतावरील शिववर्षामध्यें गो-पिशाचीनें वृषभ केलेल्या पश्चिम-विपश्चिताला दक्षिणविपश्चितानें येऊन सोडविलें. क्षेमक वर्षांतील आंबिकेय-पर्वतावरील तरूंमध्यें यक्षत्वास प्राप्त झालेल्या दक्षिण विपश्चिताला पश्चिम विपश्चितानें, यक्षपतीला प्रसन्न करून घेऊन, यक्षत्वापासून सोडविलें. वृषक-वर्षांतील केसर नांवाच्या पर्वतावर सिंहत्वास प्राप्त झालेल्या पूर्व विपश्चिताला पाश्चात्यानें शापमुक्त केलें.

**श्रीरामः**—भगवन्! एका मर्यादित जागीं असलेले योगी त्रिकाळीं सर्व कर्मे कसे करूं शकतात? त्यांना सर्वव्यापक कसें होतां येतें?

**श्रीवसिष्ठः**–हे रामा, या जगांत अज्ञांच्या दृष्टीनें भूतभौतिकादि जें कांहीं स्थूल वस्तुजात आहे, तें कसें असतें इत्यादिकांविषयींची चिंता आम्हां प्रबुद्धांना कशाला पाहिजे? आम्हां प्रबुद्धांच्या दृष्टीनें जी वस्तु चिन्मात्र व मनोमात्र असते, ती सर्व ठिकाणीं अर्थक्रिया करण्यास समर्थ कशी असते तें ऐक. तत्त्वज्ञांच्या दृष्टीनें चिन्मात्रसत्तासामान्यावांचून दुसरें कोणतेंच जगद्रूप विद्यमान नाहीं. दृश्याचा अत्यंत अभाव आहे असें ज्ञान होऊन सृष्टि व सृष्टीचा अभाव या दोन्ही दृष्टींचा क्षय झाल्यावर तें सर्व तत्त्वशून्य ठरतें. चिन्मात्रसत्तासामान्यांत ज्यानें निरंतर विश्रांति घेतली आहे, अशा सर्वेश्वराला सर्वदा सर्वत्व व सर्वात्मत्व आहे. जो सर्वव्यापी सर्वात्मा, त्याला कोण, कसा, कोठें, केव्हां व काय म्हणून निरोध करील? कोणत्याही क्रियेविषयीं कोणालाहि निवारण करतां येणें शक्य नाहीं. तो जेथें जेव्हां जसा भासतो, तसाच तो असतो. त्याच्यापासून ज्याला सत्ता प्राप्त होत नाहीं, असें काय आहे?

भूत, वर्तमान व भविष्यत्कालांतील स्थूल किंवा सूक्ष्म, दूर किंवा जवळ, एक निमिषभर किंवा कल्पभर असलेली कोणतीहि वस्तु स्वरूपाचा त्याग न करतांच सामान्य तत्त्वामध्येंच सर्वदा रहाते. ती सर्वात्म्यामध्यें स्थित असते. मायेचें हें अघटित सामर्थ्य किती विचित्र आहे पहा! उत्पन्न न झालेलें व नष्टहि न झालेलें असें तें सर्वदा जसेंच्या तसेंच स्थित आहे. म्हणूनच हें सर्व जगत्त्रय विज्ञानमयच आहे. आपलें आकाशत्व न टाकतांच तो सर्वात्मा आकाशरूप झाला आहे. जगदात्माच जगद्रूप बनला आहे. तो द्रष्टा व दृश्य या रूपानेंच उदय पावला आहे. शबल विश्वात्म्याचें जें दृङ्मात्र स्वरूप तें विकार कसें पावणार? त्याच्यापासून बीजवृक्षन्यायानें जगाचा आरंभ तरी कसा होणार? यास्तव या शबल ब्रह्मापासून जगाचा विवर्त भासतो, असेंच म्हणणें युक्त आहे. अरे तत्वज्ञा, साध्यासाध्यस्वरूपी शबल ब्रह्माला दुःसाध्य काय आहे सांग! कांहींच नाहीं. त्यामुळें त्याच्यापासून सर्वदा सर्व ठिकाणीं सर्व अर्थक्रिया उपपन्न होतात. ईश्वरचित्च उपाधिभेदानें विपश्चितादि जीव होत असल्यामुळें एक असलेल्याहि तिला औपाधिक नानात्व प्राप्त होऊन अनेकभावापन्न झालेल्या तिचें अग्न्यादिकांच्या प्रसादानें सर्व कार्य सर्वत्र संभवतें. बोधाबोधरूप शबल ब्रह्मामध्यें 'असाध्य तें काय आहे? परम बोधाला प्राप्त न झालेल्या तिची पदार्थाकुलता योग्यच आहे. किंचित् बोधामध्यें प्रविष्ट झालेल्या म्हणजे कामक्रोधरहित होऊन थोडासा उत्कर्ष पावलेल्या तिची ती सिद्धताहि योग्यच आहे. त्याप्रमाणें ते सर्व देशांमध्यें असणारे विपश्चित् राजे परस्परांना पहातात, त्यांच्या सर्व संकटांचा अनुभव घेतात व लागलीच त्यावर उपाययोजनाहि करतात. बोधाकाशस्वरूपापासून थोडेसें च्युत झालें म्हणजे तें अन्यत्वास प्राप्त होतें. म्हणजे त्याला मनोभाव प्राप्त होतो. ही गोष्ट उत्पत्तिप्रकरणांत अनेक प्रकारें वर्णिली आहे.

श्रीरामः—भगवन्! विपश्चित् राजे जर प्रबुद्ध होते तर निरनिराळया दिशांत सिंहवृषादि भावांस कसे प्राप्त झाले, हें माझ्या बोधासाठीं सांगा.

श्रीवसिष्ठः—रामा! वर तूं मला योगी सर्वत्र कर्में कशीं करतात असें विचारलेंस व मीहि ज्ञानी योग्यांचें वर्णन केलें. विपश्चित् राजे ज्ञानी व योगी आहेत असें मीं सांगितलें नाहीं. मीं तुझ्या त्या प्रासंगिक प्रश्नाचें उत्तर दिलें. पण विपश्चित् राजे प्रबुद्ध नव्हते. हे रामा, ते अगदींच मूढ होते, असें नाहीं; तर ते पूर्णपणें प्रबुद्ध झाले नव्हते. बोधदृष्टि व अबोधदृष्टि यांच्यामध्यें ते होते. त्यामुळें झोपाळ्याप्रमाणें ते बोध व अबोध यांकडे क्रमानें झोंके घेत होते. त्यांच्या ठिकाणीं विवेकादि भावी मोक्षचिन्हेंहि दिसत होतीं व रागादि वर्तमान बंधचिन्हेंहि दिसत होतीं. वर सांगितलेल्या प्रकारची चंचल धारणा ते धारण करीत होते. नित्य धर्माविषयीं ते जागृत होते. म्हणून त्यांना धारणायोगी असें म्हणतां येईल. पण ते योगपारंगत झालेले नव्हते. ते धारणायोगी असल्यामुळें म्हणजे आपल्या हृदयादि प्रदेशांत अग्निदेवतेमध्यें चित्ताचा निरोध करून अग्नीचा प्रसाद संपादन केल्यामुळें त्यांना ध्यानयोगी म्हणतां येतें, पण ज्ञानयोगी म्हणतां येत नाहीं. कारण ज्ञानयोग्यांच्या ठिकाणची अविद्या नष्ट झालेली असते. ते ज्ञानयोगी जर असते तर त्यांनीं अविद्येलें कां पाहिलें असतें! त्यांना दिशा पहाण्याची इच्छा झाली, यावरूनच ते ज्ञानी नव्हते ही गोष्ट सिद्ध होते. तथापि त्या

धारणा-योग्यांना धारणेचा परिपाक झाल्यामुळें देवताप्रसादजन्य वरानें सिद्धि मिळाली. त्यांना आत्म्याविषयींचें अज्ञान होतें, त्यामुळें ते आत्मविचार करणारे नव्हते. रामा, जीवन्मुक्त शरीरी व अज्ञ यांमधील आणखी एक सूक्ष्म भेद सांगून ठेवतों, तो ऐक. जीवन्मुक्तांना व्यवहारकालीं देहादिकांचें भान असतें, पण समाधींत—विदेहकैवल्याचें साम्यच असतें. विपश्चित राजांना ही स्थिति प्राप्त नव्हती. जो बद्ध असतो, त्याच्या बंधाची निवृत्ति हाच मोक्ष आहे. चित्तच बद्ध होतें, आत्मा बद्ध होत नाही. मोक्ष हा चित्ताचा धर्म आहे, आत्म्याचा नव्हे. त्यामुळें समाहित चित्तांतच तो मोक्ष रहातो. देहभानावर आल्यावर व्युत्थित दशेंत तो नसतो. देहधर्म देहापासून केव्हांही निवृत्त होत नाहीं. एकदां मुक्त झालेलें मन पुनः बद्ध होत नाहीं. रामा, देंठापासून गळलेलें फळ मोठ्या यत्नानें तरी पुनः देंठाशीं जोडतां येतें का? नाहीं. त्यामुळें मुक्त व अमुक्त या दोघांचीहि देहधर्मानुवृत्ति एकसारखीच असते. देह असेपर्यंत देहधर्म त्यांतील कोणालाच सुटत नाहींत. पण चित्तधर्माला हा न्याय लागू नाहीं. कारण जीवन्मुक्ताचे चित्तधर्म निराळे व बद्धाचे निराळे. त्यामुळें जीवन्मुक्ताचें चित्त देहांत असलें तरी तें अचलच असतें. मोक्ष धारणादिकांच्या अभ्यासाप्रमाणें दुसऱ्याला कळण्यासारखा नाहीं. मधादि मधुर पदार्थांच्या आस्वादामुळें होणारें सुख जसें स्वसंवेद्य, तसाच मोक्षहि आत्मसंवेद्य आहे. हा जो सुखदुःखांनीं युक्त असलेला जीव तो स्वतःच बंधाचा अनुभव घेतो. पण त्याचें मन मुक्त ह्मणजे मनोधर्मरहित झालें असतां शास्त्रांत त्यालाच मुक्त असें म्हणतात. स्वानुभव देणाऱ्या आत्म्यामुळें बंध व मोक्ष हे आंतल्या आंत ज्याचे त्यालाच भासतात. ज्याचें चित्त आंत अगदीं शीतल असतें, त्याला मुक्त असें म्हणतात, आणि चित्त संतप्त असणें हाच बंध होय. पण शान्ति किंवा संताप यांचा देहादिकांच्या ठिकाणीं संभवच नाहीं. शरीराचे रायीरायीएवढे तुकडे केले, किंवा त्याला राज्यावर बसविलें, किंवा तो रडत असला अथवा हंसत असला, तरी जीवन्मुक्ताच्या अंतःकरणाला दुःख होत नाहीं किंवा सुख होत नाहीं. कारण तीं दोन्हीं देहामुळें होणारीं आहेत. अहो, माझ्या पायाला कांटा लागल्यामुळें वेदना होत आहेत, मस्तकावर चंदनाचा लेप घातल्यामुळें सुख होत आहे, अशा रीतीनें लोक देहांमध्येंहि सुखदुःखादिकांचा अनुभव घेतात. तेव्हां त्या मनोधर्मांचा आत्म्यावर आरोप होत आहे, असें कसें ह्मणतां येईल? म्हणून म्हणशील तर सांगतों. देहसंबंधानें सुखदुःखादिक देहामध्यें आहेत असें समजणाऱ्या मनुष्याला मी सुखी, मीं दुःखी असें वाटतें हें खरें; पण सुखदुःखांच्या अनुभवाचें पर्यवसान आत्म्यामध्येंच होत असल्यामुळें, मी सुखी-दुःखी आहें वगैरे कल्पना आत्म्यांतच होते, बाह्य देहादिकांत होत नाहीं. म्हणूनच सुखदुःखादिकांचा आत्म्यामध्यें अध्यास होतो. हा सिद्धांत कबूल न करणारे चार्वाक, बौद्ध, सांख्य, नैयायिक, काणाद, इत्यादिकांना देहादिकांच्या ठिकाणीं आत्मभ्रम झाला आहे व त्यामुळें मोक्षोपायांपासून च्युत झालेले ते वादांत पराभूत होतात. किंवा सुखदुःखादि बंधाचा देहामध्येंच अनुभव येत असल्यामुळें ते देहधर्मच कां असेनात, पण मोक्ष हा देहधर्म नव्हे. कारण जीवन्मुक्त समाधींत देहादिकांचें भान नसतांना मोक्षाचा स्पष्ट अनुभव घेतात आणि व्युत्थानसमयीं मंद व मध्यम ज्ञानी बंधाचा अनुभव घेतात. जीवन्मुक्तांना नित्य अशरीर आत्मस्वभावापासून पृथक् अवस्थेचा केव्हांच अनुभव येत नाहीं. जीवन्मुक्त

देह मृत झाला तरी मरत नाहीं, तो हंसत असला तरी हंसत नाहीं. तो महोदयास प्राप्त झालेला असतो. तत्त्वदर्शी विरक्त असले तरी अविरक्तासारखे दिसतात. कोपरहित असूनहि कोपसंयुक्त असल्याप्रमाणें भासतात. मोह-शून्य असूनहि मोहयुक्त दिसतात. हें सुख व हें दुःख इत्यादि कल्पना त्यांच्यापासून फार दूर गेलेल्या असतात. आकाशांत अंकुराचा जसा असंभव त्याप्रमाणेंच त्यांच्या ठिकाणीं सुखदुःखादि भावनांचा असंभव असतो. जगाचें स्वरूप नाहींच, त्याचें मूळ जें अज्ञान तेंहि नाहीं, तर सर्व एकरस सत् आहे, असा ज्याचा निश्चय झालेला असतो, त्या जीवन्मुक्ताला सुखदुःखादि आहे, असें म्हणणें म्हणजे 'आकाशाला शाखा आहेत' असें म्हणण्यासारखेंच आहे. शोकमोहांना जिंकून त्यांच्या विजयानें शोभणारे जीवन्मुक्त शोकशून्यच असतांना शोक करतात. तत्त्वदर्शी विद्वानांचा अद्वितीय आत्मभाव त्यांचीं मस्तकादि अंगें जरी तोडलीं तरी अविच्छिन्न असतो. याविषयीं ब्रम्हदेवाचेंच उत्कृष्ट उदाहरण आहे. सामगायनामध्यें तत्पर असलेले ब्रम्हदेवाचें शिर एखाद्या सुकुमार कमलाप्रमाणें शंकरानें नखानें तोडलें. ब्रम्हदेव त्या जागीं दुसरें शिर उत्पन्न करण्यास समर्थहि होता. पण तो आकाशाशीं एकरूप झालेला असल्यामुळें त्या चिदाकाशाला मिथ्याभूत पांचवें शिर घेऊन काय करावयाचें होतें! त्याला कोणत्याहि कृतकर्माचा उपयोग नव्हता व अकृताचीहि कांहीं हानि नव्हती. जें जसें झालें तें तसें असूं दे. त्यापेक्षां अधिक इच्छा करून काय करावयाचें आहे! अर्थात् 'तर मग त्याला चार मस्तकांचें तरी काय काम होतें!' असें म्हणणें व्यर्थ आहे. प्राण्याच्या प्राणिकर्मवशात् वेदाचा उपयोग करण्यासाठीं त्यांची गरज होती. ईश्वराचाहि प्राणिकर्माच्या अनुसारच व्यवहार होतो, स्वार्थासाठीं नाहीं. शंकर अनुगृहीत कामामुळें हरिणाक्षीला अर्धांगीं धारण करतो व त्याच वेळीं क्षीरसागर आपल्यामध्यें गुप्त अमृतकलेला जसा आश्रय देतो त्याप्रमाणें तो त्याच मदनाचा निग्रह करून निष्प्रतिबंध समाधीमुळें प्रवृत्त झालेला आनंदाश्रुहि धारण करतो. ज्याचें अंतःकरण अतिशय उदार आहे असा तो समर्थ असूनहि रागित्वाला सोडीत नाहीं. म्हणजे अत्यंत विषयासक्त असल्यासारखा दिसतो. पण मदनदाह करण्याच्या वेळीं त्याची नीरागिताहि स्पष्ट अनुभवास आली आहे. अर्थात् त्यानें आसक्त होऊन असें कांहीं केलें तरी त्यांत कांहीं दोष नाहीं व न केलें तरी लाभ नाहीं. कोणत्याहि भूतापासून त्याला कोणत्याहि प्रकारचा प्रयोजनलाभ संपादन करावयाचा नाहीं. ही रागिता असो किंवा नसो, त्या रागितेमुळें किंवा अरागितेमुळें कोणता लाभ किंवा हानि होणार आहे? प्राणिकर्मवशात् जें जसें प्राप्त होतें तें तसें खुशाल असो, त्याच्या विरुद्ध कांहीं व्हावें अशी इच्छा करून काय करावयाचें आहे! जीवन्मुक्त जनार्दन स्वतः करतो, करवितो, मरतो, मारवितो, अवताररूपानें उत्पन्न होतो व सतत वृद्धि पावतो. म्हणजे भगवान् निरानिराळे अवतार घेऊन हें सर्व करतो. तथापि आपली जीवन्मुक्त अवस्था सोडीत नाहीं. प्राणिकर्मवशात् प्राप्त झालेली व्यवहारव्यग्रता सोडण्यास समर्थ असूनहि तो ती सोडीत नाहीं. ती सोडल्यानेंहि त्याला कांहीं मोठासा लाभ होत नाहीं व तिचा आश्रय करण्यानेंहि कांहीं दोष नाहीं. यास्तव येथें जें जसें प्राप्त होईल तें तसें असो, असें म्हणून सर्व वासना सोडून हरि शुद्ध चिन्मात्ररूप धारण करून निरिच्छच असतो. (सूर्यादि इतर अधिकारी

जीवहि निरिच्छ असतांनाच प्राणिकर्मानुसार आपापल्या अधिकाराचें परिपालन करितात, असें वर्णन--) कालाच्या हातांतील कंदुकत्वास प्राप्त झालेला आदित्य जगद्रूप गृहाच्या आकाशरूप अंगणांत आपल्याला सतत, नित्य भ्रमण करवितो. तो दिनेश्वर आपल्या देहाचा निरोध करण्यास समर्थ नाहीं. तो स्वतः निरिच्छ जीवन्मुक्तच आहे, तथापि जगन्मर्यादेप्रमाणें व्यवहार करीत असतोच. प्राप्त झालेल्या स्थितींत जीवन्मुक्ततेमुळें अखिन्न मनानें राहणारा चंद्र कल्पान्तापर्यंत अक्षय राजयक्ष्म्याचा अनुभव घेतो. जीवन्मुक्त अग्नि प्राप्त झालेल्या स्थितींत आनंदानें राहून मरुत्ताच्या यज्ञांत बारा वर्षें सतत हत्तीच्या सोंडेएवढी घृताची धार प्राशन केल्यामुळें प्राप्त झालेल्या अजीर्णाचा अनुभव घेता झाला. त्याचप्रमाणें स्कंदोत्पत्तीच्या वेळीं ब्रम्हद्याच्या आज्ञेनें त्याला शंकराचें वीर्य प्राशन करून त्यामुळें होणाऱ्या दाहाचा अनुभव घ्यावा लागला. शुक्र व बृहस्पति हे दोघेहि देवासुरांचे गुरु जीवन्मुक्त होते, तथापि प्रारब्धप्राप्त व्यवहारांत परस्पर विजयेच्छेनें कृपणाप्रमाणें राहिले. ज्याचें मन जीवन्मुक्त झालें आहे असा जनक मुनि या पृथ्वीवर उग्र संग्रामांत शरीराला जर्जर करून घेत प्राप्त राज्य करीत राहिला. नल, मांधाता, सगर, दिलीप, नहुष इत्यादि जीवन्मुक्त चित्तांत आकुल झाल्याप्रमाणेंच दीर्घकाल राज्य करीत होते. व्यवहारांत जसा अज्ञ तसाच खरोखर पंडितहि असतो. कारण वासना व अवासना हें बंध व मोक्ष यांचें कारण आहे. बलि, प्रल्हाद, नमुचि, वृत्रासुर, अंधक, मुर इत्यादि जीवन्मुक्त विरक्त असूनहि अनुरक्त असल्याप्रमाणें व्यवहारांत वागले. तात्पर्य, जीवन्मुक्त चिदाकाशांत रागद्वेषांचा आभास जरी होत असला, त्यांचे उदयास्त जरी होत असले तरी त्यांच्या स्वरूपभूत मोक्षाविषयीं मुळींच संदेह नाहीं. फार काय, पण तो सुचरित किंवा दुश्चरित जरी असला तरी त्याचा मोक्ष सिद्धच आहे. जे जीवन्मुक्त चरमसाक्षात्काररूप ज्ञानानें देह, मन, प्राण इत्यादिकांना धारण करणाऱ्या जीवांना अखंड--अद्वय--पूर्ण--ब्रम्हभावानें आकाशतुल्य जाणतात, त्यांच्या ठिकाणीं भेदभ्रमाला कारण होणारें अज्ञानच नसल्यामुळें, त्या अज्ञानाचाच नाश झाल्यामुळें, भेदबुद्धि कोणत्या निमित्तानें होणार ? इंद्रधनुष्य प्रत्यक्ष दिसतें, त्यांत अनेक रंग दिसतात, तथापि तें शून्यच --आभासमात्रच असतें; तसाच दृश्यरूप भ्रम आभासमात्र आहे. त्यामुळें तत्त्वसाक्षात्कारानें त्याचा बाध होतो. आकाशांगणांत इंद्रधनुष्यामध्यें जसे अनेक रंग भासतात, त्याचप्रमाणें हे ब्रम्हांडरूपी परमाणु शून्यरूपच आहेत. हें जगत् असत् भासत आहे. तें असत् असतांनाहि सत् स० विद्यमान असल्याप्रमाणें प्रकट झालें आहे, पण आकाशांतील शून्यत्वाप्रमाणें तें उत्पन्नहि झालें नाहीं व नाशहि पावलें नाहीं. तें आद्यंतयुक्त असलें तरी आद्यंतशून्य आहे. अशून्य असूनहि शून्य आहे. उत्पन्न झालें असूनहि उत्पन्न न झालें आहे व नष्ट होत असूनहि अनष्टच आहे. कारण जगद्रूपानें ग्रहण केलेल्याहि नित्य, कूटस्थ, अद्वय, असंग वस्तूमध्यें आद्यंतादिकांची प्राप्तिच नाहीं. जगद्भावाप्रमाणें त्याचा जन्म व नाशहि ब्रह्ममध्यें कल्पनेनें उत्पन्न होतो, म्हणून म्हणाल तर तें इष्टच आहे. कारण जन्म-नाश, अस्तित्व इत्यादि सर्व कल्पनामात्र आहे, असें म्हटल्यावर आत्म्याच्या निर्विकारत्वाची हानि होत नाहीं. ज्याप्रमाणें काष्ठमय स्तंभ काष्ठरूपच असतो किंवा त्या स्तंभावर कोरलेली बाहुलीहि तद्रूपच असते, त्याप्रमाणें हें सर्व ब्रम्हमयच आहे. समाधीच्या योगानें सर्व

कल्पना सोडून व निद्रितहि न होतां जें सम अवस्थान म्हणजे चित्ताची निश्चल स्थिति तन्मात्रच हें जगत् आहे, असें जाणावें. संविद् एका देशांतून दुसऱ्या देशीं गेली असतां मध्यें जें तिचें निर्विषय स्वरूप तन्मय जगत् आहे, असें समजावें. म्हणजे व्युत्थानावस्थेंत शाखेवरील चंद्र पहात असतां—बुद्धिवृत्ति शाखाप्रदेशावरून चंद्रापर्यंत पोंचली असतां शाखा व चंद्र यांच्या मध्यभागीं जें वृत्तीमध्येंच व्यक्त झालेलें संविद्रूप तेंच निर्विकार चिदाकाश असून जगत् तन्मयच आहे, असें समजावें. तशा प्रकारच्या चिदात्म्यामध्यें जें द्वैत म्हणजे विशेषरूप व ऐक्य ह्मणजे सामान्यरूप भासतें, तेंहि त्या चिदाकाशस्वभावामुळेंच भासतें. त्यायोगें तें चिदाकाश नाहीं, असें ह्मणतां येत नाहीं. भासणारें जगत् नाहीं, असेंहि ह्मणतां येत नाहीं. तें केवळ शून्य आहे असें भासतें, तेंहि खरें नव्हे. कारण पूर्ण आनंदैकरस ब्रह्मामध्यें शून्यत्वहि संभवत नाहीं. हें जगत् आकाशरूपच आहे. तो आत्माच स्वरूपामध्यें स्थित आहे. जसें भावी नगर त्याविषयीं कल्पना करणाऱ्याच्या मनामध्यें स्पष्ट असतें, त्याप्रमाणेंच जगत् आत्म्यामध्यें स्थित आहे. आकाशकोशाप्रमाणें ज्याचें अंतःकरण अतिशय विशद आहे अशा हे रामा ! जें दृश्यजात शिलाघनासारखें शांतब्रह्मच निश्चल स्थित आहे, त्यालाच जगत् असें नांव देऊन हा आत्मा मोहित झाल्यासारखा रहातो. खरोखर त्या परमात्म्याची माया विचित्र आहे, १२९.

---

# सर्ग १२६ वा.

१ मृत झालेल्या त्या सर्व राजांना मनांतल्या मनांत संसारभ्रम होतो. २ त्यांतील उत्तरदिशेंतील विपश्चिताला तमःखाताचें दर्शन.

श्रीरामः—हे मुनिश्रेष्ठ ! त्यानंतर ते विपश्चित राजे द्वीपें, वन, समुद्र व पर्वत यांनीं युक्त असलेल्या दिगंतरांत काय करीत राहिले ?

श्रीवसिष्ठः—बा रामा ! ताली, तमाल इ. वृक्षांनीं संपन्न असलेल्या द्वीपांतून, पर्वतांतून व वनांतून संचार करणाऱ्या त्या विपश्चितांचें पुढें काय वर्तमान झालें तें तूं ऐक. पश्चिम दिशेच्या एका प्रदेशांतील क्रौंचद्वीप पर्वताच्या तटावर एका हत्तीनें आपल्या गंडस्थळानें विपश्चिताचें चूर्ण करून टाकलें. कोमल कमलाला जसें चूरडून टाकावें, त्याप्रमाणें त्याच्या मस्तकाचा त्यांनीं चूर करून टाकला. दुसऱ्या विपश्चित राजाला एका राक्षसानें युद्धांत छिन्नभिन्न करून आकाशमार्गानें नेलें, समुद्रांतील वडवाग्नींत टाकलें व तेथें त्याचें भस्म झालें. तिसऱ्या विपश्चित् राजाला विद्याधरानें देवांच्या लोकीं नेलें. तेथें इंद्रसभेंत गेल्यावर त्यानें कोणालाच नमस्कार केला नाहीं, त्यामुळें रागावलेल्या इंद्रानें शाप देऊन त्याचें भस्म केलें. चवथ्या विपश्चित राजाला कुशद्वीपपर्वताच्या तटावर नदीच्या दलदलींत एका दुर्वार मकरानें फाडून त्याचे तुकडे केले. त्यामुळें तो मरण पावला. अशा रीतीनें ते चारी विपश्चित् राजे मरण पावले. कल्पांतीं चार लोकपाल जसे क्षय पावतात, तसाच त्यांचा क्षय झाला. मरणानंतर त्यांचा संविदाकाशात्मा त्या आकाशांतच पूर्वीप्रमाणें भूमंडल पाहूं लागला. आकाशांत आकाशरूपी असलेल्या त्यांची संविद् पूर्वसंस्कारामुळेंच भूमंडळ पाहूं लागली.

तें भूमंडळ सप्तद्वीपयुक्त समुद्रवलयांनीं भूषित होतें. नगरें व पत्तनें यांनीं संपन्न होतें. मेरु-पर्वत हेंच त्याचें शिरःपीठ होतें. ब्रह्मलोक हेंच शिरोभूषण होतें. चंद्र व सूर्य हेच त्याचे नेत्र होते. नक्षत्रें हींच मौक्तिकमेखला होती. चंचल मेघ हेंच हलणारें वस्त्र होतें. नाना-प्रकारचीं अरण्यें हेच त्याच्या मस्तकावरील केंस होते. ती संविद् विपश्चित् राजाच्या चारहि देहांना पहाती झाली. ज्याप्रमाणें नवीन कल्प सुरू झाला असतां प्रथम उत्पन्न केलेले प्रजापति विस्तीर्ण दिगंताला पहातात, त्या-प्रमाणेंच त्या संविदूनें त्या देहांना पाहिलें. चिदात्म्यामध्यें भूताकाशाची जशी प्रतीति होते, त्याप्रमाणेंच त्या विपश्चितांनीं मानस-प्रतिभास-मात्र सूक्ष्म देहाच्या ठिकाणीं आधि-भौतिक देहत्व पाहिलें. म्हणजे त्यांच्या सूक्ष्म देहाच्या ठिकाणीं स्थूलता, जाड्य इत्यादि भाव अग्रभागीं दिसले. त्याबरोबर लागलेच ते ही दृश्य पृथिव्यादिरूप अविद्या केवढी आहे, हें पहाण्यासाठीं पूर्वसंस्कारवशात् प्रवृत्त झाले. दृश्य व दर्शन यांच्यामध्यें पृथ्वीमंडलरूप अनुभवाकार अविद्येची इयत्ता पहाण्यासाठीं ते चौघेहि राजे द्वीपांतरांत भ्रमण करूं लागले. सप्तद्वीपांचें उल्लंघन करून सात महार्णवांच्याहि पलीकडे जाऊन पश्चिम विपश्चित् राजा पूर्वोक्त सुवर्णघनभूमींत क्रीडा करीत असलेल्या जनार्दनापाशीं भाग्योदयवशात् प्राप्त झाला. त्या जनार्दनापासून ब्रह्मविद्या प्राप्त करून घेऊन त्याच दशेंत तो पांच वर्षें समाधि लावून बसला. त्यानंतर देहभावाचा त्याग करून चित्त असत्तेला प्राप्त झालें असतां तो विपश्चित् परम-कैवल्यास प्राप्त झाला. त्याचा प्राण आकाशभावास प्राप्त झाला व सर्व शक्ति आपआपल्या कारणांत लीन झाल्या. पूर्व दिशेंत प्रवृत्त झालेला विपश्चित राजा पौर्णिमेच्या पूर्ण चंद्रापाशीं आपलें शरीर स्थित आहे, असें दीर्घकाल चिंतन करीत राहिला. त्यामुळें त्याचा देह नष्ट होऊन तो चंद्रलोकीं स्थित झाला. हे रामा, दक्षिण दिशेंतील विपश्चित सर्व शत्रूंचा उच्छेद करून शाल्मलीद्वीपामध्यें अद्यापि राज्य करीत राहिला आहे. पारमार्थिक सत्त-त्वाचा बाध झाल्यामुळें ज्याला बाह्य विष-यांचें विस्मरण झालें आहे असा तो झाला नाहीं. उत्तर विपश्चित् चंचल व उग्र तरंगांनीं दुस्तर झालेल्या सातव्या समुद्रांत स्वादूद मक-रानें गिळल्यामुळें त्याच्या उदरांत एक सहस्र वर्षें राहिला. तेथें तो त्या मकराच्या उदरांतील मांस खात असे. हजार वर्षांनीं तो श्रेष्ठ मकर मरण पावला असतां तो मकराच्या उदरांतून व सागरां-तून एखाद्या नक्राप्रमाणें बाहेर आला. त्यानंतर ज्यांतील जल बर्फासारखें थंड आहे अशा स्वादूदसागराचीं अवशिष्ट राहिलेलीं ऐशीं सहस्र वर्षें उल्लंघून जिचें उदर अतिशय उदार आहे, अशा सुवर्णाच्या महाभूमीस तो प्राप्त झाला. ती भूमि दशसहस्र योजनें विस्तीर्ण होती. त्यांतून देवांचा संचार होत होता. त्या भूमींत येतांच तो विपश्चितराजा मरण पावला. अग्नीमध्यें टाकलेलें काष्ठ जसें अग्नित्वास प्राप्त होतें, त्याप्रमाणेंच तो त्या देवभूमींत मृत झाल्या-मुळें देवत्वास प्राप्त झाला. याप्रमाणें तो विप-श्चित् देवश्रेष्ठ होऊन पूर्वींच्या दिगंत पहाण्या-च्या वासनेनें लोकालोकपर्वतास प्राप्त झाला. तो लोकालोकपर्वत म्हणजे मेरुशिखरापर्यंत उंच वाढलेल्या या भूमंडलवृक्षाचें जणुंकाय अळेंच होतें. या लोकालोकपर्वताचा पन्नास सहस्र योजनें उंच, असा प्रथम भाग सूर्यप्रकाशानें लोकांच्या व्यवहारानें संपन्न आहे. दुसरा कोण-ताहि भाग तसा नाहीं. त्या लोकालोकपर्वतावर चढून त्याच्या शिखरास प्राप्त झालेल्या या देव-

विपश्चिताला खालचे लोक, हें नक्षत्रच आहे कीं काय, असें पाहूं लागले. त्या महागिरीच्या त्या प्रदेशाच्या पलीकडे तम पसरलें आहे व सभोंवार फार मोठें खात आहे. एखाद्या किल्ल्याच्या सभोंवार जसा खंदक असतो तसेंच तें होतें. आकाशाप्रमाणें तें सर्व प्राणिशून्य व अनेक योजनें विस्तीर्ण आहे. तेथें या वर्तुलाकार भूगोलाची समाप्ति होते. त्यापुढें आकाशासारखें शून्य व अंधकारानें भरलेलें महाखात आहे. हे रामा! त्या खातामध्यें भ्रमराप्रमाणें, काजळाप्रमाणें, तमालवृक्षाप्रमाणें एक नीलवर्ण तमच काय तें आहे; पृथ्वी नाहीं, जंगमादि प्राणिजात नाहीं व आश्रयहि नाहीं, व दुसरें कोणत्याहि प्रकारचें वस्तुजात तेथें केव्हांच संभवत नाहीं. १२६.

---

## सर्ग १२७ वा.

१ भूमि व नक्षत्रचक्र इत्यादिकांची स्थिति. २ त्यांच्या पलीकडे आकाश. व ३ दोन ब्रह्मांडकपालांची स्थिति.

**श्रीराम:**—हा भूगोल निराधार कसा राहिला आहे! नक्षत्रचक्र कांहीं आधारावांचून भ्रमण कसें करतें? तुम्हीं सांगितलेला लोकालोक पर्वत कसा आहे? व त्याला लोकालोक हें नांव कां पडलें?

**श्रीवसिष्ठ:**—ज्याप्रमाणें एखाद्या बालकानें आपल्या संकल्पानें कल्पिलेला चेंडू अंतराळीं रहातो, त्याप्रमाणें चिन्मात्रबालकानें म्हणजे हिरण्यगर्भानें कल्पिलेली ही भूमि आकाशांत अंतराळीं रहाते, खालीं पडत नाहीं. ज्याप्रमाणें डोळ्याला तिमिररोग झालेल्या लोकांना आकाशांत केंस, दोन चंद्र वगैरे दिसतात, त्याप्रमाणें चिदाकाशाला सृष्टीच्या आरंभीं पृथिव्यादिकांचें दर्शन होतें. ज्याप्रमाणें संकल्पनगर कोणत्याहि आधारानें धारण केलें असें दिसत नाहीं, सांकल्पिक स्तंभ, भिंति यांनीं त्यांना धारण केलेलें असतें, तथापि सांकल्पिक स्तंभादिकांना अवस्तुत्व असल्यामुळें ते कोणाकडूनहि धारण केले जात नाहींत. तोच न्याय पृथिव्यादिकांसहि लागू आहे. चितूच्या ठिकाणीं चित्त्वामुळेंच स्वभावतः जें जसें जितकें भासतें, तें तेथें तेथें तितकेंच व तसेंच भासतें. ज्याच्या नेत्राला तिमिररोग झाला आहे, त्याला आकाशांत केशपुंज जसा दिसतो, त्याप्रमाणें चिन्मात्राला दिसणारा जो भूगोल तोहि चिन्मात्ररूपच आहे. म्हणजे आकाशांतील केंस जसे भ्रांतिमात्र त्याप्रमाणें भूगोलहि भ्रांतिमात्र आहे. सर्व वस्तुस्वभाव चिन्मात्रसत्तेनेंच सिद्ध होत असतो, त्यामुळें नद्यांचें सखल प्रदेशाकडे वहाणें या स्वभावाप्रमाणें त्याचा विपरीत स्वभाव जरी चितूनें कल्पिला, तर त्याची सुद्धां तीच तशीच प्रतीति येईल. म्हणजे नद्या डोंगरावर चढून जात आहेत असेंहि दिसेल. स्वप्नामध्यें तशा विपरीत कल्पना होतात. आपण मनुष्यदेहानेंहि पक्ष्याप्रमाणें आकाशांतून उडत असतों. सृष्टीच्या आरंभीं अग्नीच्या ज्वाला खालीं पसरत आहेत असें जर चितूनें पाहिलें असतें तर आतांहि आम्हांला तसाच अनुभव आला असता. म्हणूनच कांहीं वादी "पृथ्वी जड असल्यामुळें या महाकाशांत एकसारखी खालीं पडतच आहे. पण आकाशाला खालीं मर्यादा नसल्यामुळें भूमीचें पतन कधींच कोठें विश्रांति पावत नाहीं. ती पृथ्वी फार मोठी असल्यामुळें तिचें पतन आम्हांला कळत नाहीं. मेरूशीं संलग्न असलेल्या दोन ध्रुवांवर बांधलेलें ज्योतिश्चक्र त्याबरोबरच पडत आहे, पण तें अधिक

हलकें असल्यामुळें अनादि काळापासून भ्रमण करीत आहे, " असें मानतात. दुसरे कित्येक "भूमीचा आधार समुद्र आहे. त्यांत न बांधलेल्या नौकेप्रमाणें ही पृथ्वी सारखी भ्रमणच करीत आहे. प्रलयकाळीं ती त्यांतच निमग्न होते. आणि सृष्टिकालीं जलतुंबिकान्यायानें वर येते,' असें म्हणतात. दुसरे कित्येक म्हणतात कीं, "पृथ्वीच्या खालीं, वर व समोंवार अपरिच्छिन्न जलच आहे. भूमींतील छिद्रांमध्यें सप्तलोक आहेत. त्यांचा अंतरालभाग वायूनें भरलेला आहे. त्या आंतील वायूच्या अतिशय हलकेपणामुळें जळांत बुडलेल्या तुंबीफळाप्रमाणें पृथ्वी नेहमीं वरच जाते."

दुसरे कित्येक म्हणतात कीं, "भुगोलाच्या समोंवार आकाशच आहे. तें आकाश अनंत आहे व पृथ्वी गुरु आहे. मेरुपर्वतावरील देवांच्या दृष्टीनें त्याचा दक्षिण भाग हाच अधोभाग आहे. म्हणून दक्षिणेस ती सर्वदा पडते." आणखी कित्येक आसुरवादी पातालासच ऊर्ध्व देश समजतात, आणि देवांना अभिमत असलेल्या ऊर्ध्व देशाला अधोदेश समजतात व पृथ्वी जड असल्यामुळें ती दक्षिणेकडेच पडते असें मानतात. याच न्यायानें प्राच्य व पाश्चात्त्यहि आपापल्या देशालाच ऊर्ध्व देश मानून प्राची व प्रतीची यांमध्येंच तिचें पतन कल्पितात. दुसरे कित्येक "ज्योतिश्चक्र भ्रमण करीत नाहीं, तर भूमिच स्वस्थानीं भ्रमण करते, पण तें आम्हांला कळत नाहीं. त्यामुळें नावेंतील लोकांना तीरावरील वृक्ष जसे चाललेले दिसतात, त्याप्रमाणें ज्योतिश्चक भ्रमण करीत आहेसें आम्ही पहातों " असें समजतात. आणखी कांहीं वादी " भूमिच सर्वांच्या खालीं आहे, तिच्या समोंवार असलेल्या लोकांच्या दृष्टीनें त्यांच्या त्यांच्या शिरोभागीं दिसणाऱ्या सर्वच ऊर्ध्व दिशा आहेत. त्यामुळें पृथ्वीचें पतन ज्या अधोदिशेमध्यें होऊं शकेल अशी निश्चित अधोदिशाच नाहीं, म्हणून पृथ्वी कधींच व कोठेंच पडत नाहीं " असेंहि म्हणतात. त्या त्या वाद्यांच्या आपआपल्या बुद्ध्यवच्छिन्न चित्सत्तेनें सर्व सत्यच आहे. पण स्वतः कांहींच सत्य नाहीं. प्रत्येकाच्या कल्पनेप्रमाणें ती नानाप्रकारची होते. पृथ्वी स्तब्ध म्हणजे निश्चल आहे, असें वाटलें म्हणजे ती स्तब्ध स्थित होते; प्रकाशयुक्त आहे म्हटलें तर प्रकाशिनी होते; प्रकाशरहित आहे, अशी कल्पना केली तर तशी अनुभवास येते. म्हणजे ज्यांची दृष्टि अप्रतिहत असते त्यांना ती सर्वदाच प्रकाशवती दिसते, व जात्यंधाच्या दृष्टीनें ती नेहमींच प्रकाशरहित असते. तात्पर्य, बुद्ध्यवच्छिन्न चैतन्यामध्यें ती स्थित असते. केवळ चित्प्रकाशाच्या अनुसार ताराचक्र, तशीच पृथ्वी असत् असतांनाच सत् असल्याप्रमाणेंच भासते. जगाचा असा हा भास अखंडित होतो. ही भूमि लोकालोकपर्वतापर्यंतच स्थित आहे. त्यापुढें आकाशरूप वलयाकार खात आहे. त्यापुढें फार मोठें तम आहे. त्यांतील कांहीं ठिकाणीं एकार्णवाचा भास होतो. लोकालोकपर्वताचीं दोन शिखरें आहेत. त्यांच्या अंतराळीं सूर्यप्रकाशाचाहि थोडासा प्रवेश होतो.

( आतां त्या पर्वताला लोकालोक हें नांव पडण्याचें कारण सांगतात—) त्या खाताच्या समोंवार परिवर्तन करणारें नक्षत्रचक्र फार दूर असल्यामुळें व तो पर्वत फारच मोठा असल्यामुळें

१ ' योऽप्सु नावं प्रतिष्ठितां वेद प्रत्यवतिष्ठति ' या श्रुतीच्या आधारें ते कल्पना करतात.

२ पाण्यांत बुडविलेला भोपळा जसा वर एकदम येतो त्याप्रमाणें.

त्यामुळें त्याच्या कांहीं प्रदेशीं तम असतें, व कांहीं भागीं प्रकाश असतो, म्हणून त्याला लोकालोक म्हणतात. (आतां नक्षत्रचक्राचें दूरत्व व्यक्त करतात—) लोकालोकपर्वताच्या पार असलेलें जें आकाशमंडल त्याच्या दाही दिशांमध्यें फार दूर अंतरावरून नक्षत्रचक्र भ्रमण करीत असतें. तें खालीं व वर किती विस्तृत आहे म्हणून विचारशील तर सांगतों. पाताळापासून द्युलोकापर्यंत आकाशांत वृद्धि पावलेलें सर्व नक्षत्रचक्र एका ध्रुवावांचून दाही दिशेंतहि पसरतें. हें नक्षत्रमंडळ पाताळासह सर्व भूलोकाला व लोकालोकपर्वताला अनुलक्षून प्रदक्षिणा घालतें. पण तें चित्कल्पनेवांचून दुसरें कांहीं नाहीं. लोकालोकपर्वतासह या भूलोकाच्या दुप्पट असलेल्या आकाशांत त्याच्याहि पलीकडे पिकलेल्या अक्रोडाच्या फळांतील गराप्रमाणें तें स्थित आहे. त्या नक्षत्रचक्राचा विस्तार किती आहे म्हणून विचारशील तर सांगतों. लोकालोक पर्वतासह भूलोकाचा जेवढा विस्तार आहे, त्याच्या दुप्पट आकाशाच्या पलिकडे असलेलें नक्षत्रचक्र त्या आकाशाच्या दुप्पट भागांत पसरलें आहे. दाही दिशांमध्यें भ्रमण करणाऱ्या त्याची बेलफळाच्या कवचीसारखी स्थिति आहे. शबलब्रह्माच्या सत्यसंकल्पानें जशी जशी कल्पना केली, तशी तशीच या ब्रह्मांडाची कल्पना होऊन त्याच्या अवयवरूपानें जगाची स्थिति झाली आहे. नक्षत्रचक्राच्या पलीकडे त्याहून दुप्पट दुसरें आकाश आहे. तें कांहीं ठिकाणीं प्रकाशसंपन्न आहे व कांहीं ठिकाणीं गाढ अंधकारानें युक्त आहे. त्या आकाशाच्या शेवटीं दोन बाजूंस दोन कपालें असून त्यांतील एक अधःकपाल व दुसरें ऊर्ध्व कपाल आहे. त्या दोन्हींमध्यें हें महाकाश आहे. त्याचें प्रमाण शेंकडों कोटि योजनें आहे. तें वज्राप्रमाणें दृढ आहे. तें संवेदनमय म्हणजे कल्पना मात्र आहे. वस्तुतः तें भूताकाश चिदाकाशच आहे. अशा या महागोलाकाररूप आकाशांत सूर्य व तारा यांसह सर्व ज्योतिश्चक्र स्थित आहे. तेव्हां या ज्योतिश्चक्रामध्यें ऊर्ध्व काय व अधः काय? सर्वच ऊर्ध्व व सर्वच अधः. याप्रमाणें सर्व वस्तु आपआपल्या नियतीप्रमाणें खालीं, वर, तिरकस इत्यादि दिशेनें भ्रमण करीत असतात. त्यांची एकत्र स्थिति जी भासत असते, तो प्रत्यगात्म्याचा केवळ भास आहे. कारण, वस्तुतः पाहिल्यास त्यांचें गमनादिक जसें नाहीं, तसें अवस्थानहि नाहीं. तर सर्व एक अद्वय आत्मरूप आहे. १२७.

---

## सर्ग १२८ वा.

१ तमःश्वभ्र व ब्रह्मांडावरणें यांचें उल्लंघन करून विपश्चित् राजा अविद्येंत भ्रमण करीत राहिला.

श्रीवसिष्ठः—हे रामा, आमच्यासारख्या योगिजनांना ज्ञानयोगाभ्यासानें शुद्धबोध प्राप्त होतो. सर्व जगाच्या तत्त्वाचा आम्हांला साक्षात्कार होतो. त्या शुद्ध बोधप्रधान शरीरानें आम्ही हें ज्योतिश्चक्रादिकांचें प्रमाण जाणलें आहे, आधिभौतिक स्थूलरूपानें नव्हे. त्याचप्रमाणें हें आमचें प्रमाणकथन आनुमानिक नव्हे. मी जें हें लोकालोकज्योतिश्चक्रादि तुला सांगितलें तें आम्हीं पाहिलेल्या जगत्स्वप्नांत प्रसिद्ध असलेलें सांगितलें. दुसऱ्या जगांतील सांगितलेलें नाहीं. दुसऱ्या ब्रह्मांडरूप जगत्स्वप्नांतहि सामान्यतः हीच स्थिति असून कांहीं ठिकाणीं निराळ्या प्रकारचीहि स्थिति संभवते. (तर मग तीहि सांगा; उत्तर—) दुसऱ्या जगत्स्वप्नांतील रचना सांगून काय करावयाचें आहे? बुद्धिमान् लोक उपयुक्त गोष्टींहून भिन्न गोष्टी

कधीं बोलत नाहींत. हे पंडितहो! सामान्यतः सर्व ब्रम्हांडांमध्यें सर्व द्वीपें व समुद्र यांच्या उत्तरेला मेरु असून लोकालोक दक्षिणेला आहे. यावरून ज्यांना ज्या लोकांविषयीं जिज्ञासा असेल त्यांनीं त्याविषयीं तसें अनुमान करावें. आतां त्यांतील प्रत्येक लोकामध्यें जे अवांतर विशेष असतात ते त्यांतील लोकांनाच प्रत्यक्ष दिसतात. ते जगद्भ्रम आम्हांला प्रत्यक्ष दिसत नाहींत. सप्तद्वीपनिवासी सर्व पदार्थांच्या उत्तरेस मेरु व दक्षिणेस लोकालोकपर्वत आहे, हा निश्चय आहे. पण ब्रह्मांडाच्या बाहेरील पदार्थांविषयीं असा निश्चय करतां येत नाहीं. हे रामा! आतां तूं प्रकृत ब्रह्मांडकपाटाविषयींच ऐक. वर सांगितलेलें कपालद्वय शतकोटि योजनें प्रमाण आहे, असें सांगितलें. त्याच्या पलीकडे दशगुण जलावरण स्थित आहे. तें ब्रह्मांडकपाटच पार्थिव असल्यामुळें आकर्षणशक्तीनें त्या जलाला धारण करितें. जसा तृणचुंबक मणी आपल्या आकर्षणशक्तीनें तृणाला स्वभावतःच आकर्षण करून घेतो, त्याप्रमाणें तें ब्रह्मांडकपालद्वय स्वभावतःच जलाला धारण करतें. ज्याप्रमाणें कल्पवृक्ष या लोकांची इच्छा पूर्ण करण्यासाठीं त्यांच्या इच्छेप्रमाणें रत्नें धारण करतो, त्याप्रमाणें पृथ्वी सर्व पदार्थांना धारण करते. 'तर मग मेघांतून सुटलेले जल, गारा वगैरे समुद्र, नद्या इत्यादि जलप्रदेशीं पडूं नयेत. कारण जलामध्यें आकर्षणशक्ति नाहीं. म्हणून फार दुरूनहि त्या तीरावरच येऊन पडल्या पाहिजेत,' म्हणून म्हणशील तर सांगतों. जलादि सर्वच पदार्थांना हा पार्थिव भाग सर्वदा धारण करतो. त्यामुळें जलधारा वगैरेहि जलाच्या आधारभूत पार्थिव भागाच्या आकर्षणानें जलांत पडतात. जलाच्या बाहेर निरिंधन दशगुण तेज स्थित आहे. तें आकाशाप्रमाणें विशद असून त्यांतील ज्वाला आंतल्या आंत स्तब्ध होऊन राहिलेल्या असतात. या तेजोरूप आवरणाच्या पलीकडे दशगुण वायु स्थित आहे. तो अतिशय विस्तीर्ण आहे. या वायवीय आवरणाच्या पलीकडे निर्मल दशगुण आकाश स्थित आहे. त्यांच्या पलीकडे शांत व अनंत ब्रह्माकाश आहे. तें प्रकाशरूपहि नाहीं व तमोरूपहि नाहीं; तर अव्यय महा चिद्घन आहे. त्याला आदि-अंत-मध्य नाहीं. महाचित् या नांवाच्या त्या सर्वात्म्यामध्यें निरवकाश, निर्वाणरूप ब्रह्म-महाकाशांत वर वर्णन केलेल्या स्वरूपाचीं लक्षावधि ब्रह्मांडें दूर दूर अशीं पुनः पुनः उत्पन्न होतात व पुनः पुन तीं लय पावतात. त्यामध्यें अशीं जीं लक्षावधि ब्रह्मांडें उत्पन्न होतात त्याचें कारण काय, म्हणून विचारशील तर सम व केवल स्फुरणरूप अशा ब्रह्मामध्यें त्यांचें कांहींच कारण उपलब्ध होत नाहीं. तर तें ब्रह्मच स्वरूपांत अविद्येनें तद्रूपसें होऊन राहिलें आहे. रामा, याप्रमाणें मीं तुला हा दृश्यानुभवाचा सर्व क्रम सांगितला. आतां लोकालोकपर्वतावर त्या विपश्चित् राजाचें काय झालें तें तूं ऐक. ज्याचा पूर्वसंस्कार अभ्यासानें अतिशय दृढ झाला आहे व त्याच्या अनुसार दिगंतदर्शनाविषयीं ज्यानें फार मोठा उद्योग केला आहे, असा त्या निश्चयानेंच प्रेरित झालेला विपश्चित् राजा त्या लोकालोक पर्वताच्या शिखरावरून पूर्वोक्त तमःश्वभ्रांत शिरला. तेथें त्यानें आपलें देवशरीर पर्वतशिखराप्रमाणें ज्यांचे देह आहेत अशा गृध्रादिकांनीं फाडून खाल्लें आहे, असें पाहिलें. त्यानंतर आपल्या अत्यंत इष्ट अशा दिगंतदर्शनास त्याचा मनोदेहच प्रवृत्त झाला आहे असें त्यानें पाहिलें. तो प्रदेश अतिशय पुण्यकारक असल्यामुळें व स्थूल देहांविषयींचा संस्कार उद्बुद्ध होण्यास तो योग्यहि नसल्या-

मुळें म्हणजे तो पुण्यप्रदेश जरायुजादि चतुर्विध भूतसमूहांनीं शून्य असल्यामुळें त्या प्रदेशाच्या माहात्म्यानेंच राजाच्या आतिवाहिक देहाला आधिभौतिक बोधास प्राप्त होऊं दिलें नाहीं. म्हणजे तो आपला सूक्ष्म भाव सोडून स्थूलभावास प्राप्त झाला नाहीं. त्या विपश्चित् राजाला 'मी स्थूलदेहातिरिक्त मनोदेहरूप आहें,' एवढाच त्या वेळीं बोध झाला. त्याहून अधिक म्हणजे 'मी देहत्रयातीत शुद्ध चिन्मात्रस्वरूप आहें' असें ज्ञान त्याला झालें नाहीं. त्यामुळें आपलें दिगंतदर्शनरूप कार्य संपलें आहे असें त्याला वाटलें नाहीं व तो त्या आपल्या निश्चयापासून ढळला नाहीं; म्हणने दिगंतदर्शनाविषयीं त्यानें आपला उद्योग तसाच पुढें चालविला.

श्रीरामः—हे मुने, देहावांचून हें चित्त बाहेर कसें जातें ? व तें जातें असें जरी समजलें तरी पूर्वी देवशरीरानेंहि जो आकाशमार्गामध्यें अप्रतिहत गमन करीत होता, तोच आतां त्या शरीराचा नाश झाल्यावरहि मनोदेहानें आकाशमार्गानें जात आहे. तेव्हां पूर्वदेहापेक्षां या मनोमात्रमय देहांत विशेष तो काय आहे ?

श्रीवसिष्ठः—रामा, अंतःपुरामध्यें असलेल्या मनुष्याचेंहि हें मन संकल्पानें प्रवास करूं शकतें, हें प्रसिद्ध आहे. त्याप्रमाणें विपश्चित् राजाचें मन आकाशमार्गानें प्रवास करूं लागलें. भ्रमांत, स्वप्नांत, मनोराज्यांत, मिथ्या ज्ञानामध्यें व कथाश्रवण करतांना जसें आपलें मन संचार करतें, त्याप्रमाणेंच त्याचें मन संचार करूं लागलें. ज्या देहामध्यें ते भ्रमस्वप्न-मनोराज्यादि प्रसार पावतात त्याला आतिवाहिक शरीर म्हणतात. या आतिवाहिक देहांतच सूक्ष्मत्वाचें विस्मरण झाल्यामुळें आधिभौतिक बुद्धि दीर्घकालानें उदय पावते. पण विचारानें आधिभौतिक भ्रम निवृत्त झाला असतां हा आतिवाहिक भाव अवशिष्ट रहातो. कारण रज्जुसर्पभ्रमाप्रमाणेंच आधिभौतिक भाव कल्पित असतो. पुढें आतिवाहिक देहाचीहि निवृत्ति होऊन चिन्मात्र तत्त्व अवशिष्ट रहाण्यासहि विचार हाच उपाय आहे. यास्तव रामा, या आतिवाहिक देहाचा सूक्ष्म दृष्टीनें विचार करावा. चिन्मात्रावांचून या सूक्ष्म देहांत दुसरें कांहीं नाहीं, असें ज्ञान विचारानें होऊं शकतें. निर्विषय संविदेचें जें स्वरूप आम्हीं पूर्वी पुष्कळदां सांगितलें आहे, तेंच या अनंत एकरूप चिन्मात्राचें रूप आहे; त्यांत द्वैत कोठचें ? द्वेष कोठचा ? व रागादि तरी कोठचें ? सांग बरें ? सर्व शिव आदिअंतशून्य व परमबोधच परमात्मा आहे. मनोमननरहित जें शांत अवस्थान तोच उत्तम बोध होय. पण आतिवाहिक देहामध्यें असलेला विपश्चित राजा त्या बोधाला प्राप्त झाला नव्हता. तर आतिवाहिक देहच माझा आत्मा आहे असें तो समजत होता. त्यामुळें माझें मनच पुढें चाललें आहे असें त्यानें पाहिलें. सूक्ष्म बोधानें गर्भवासाप्रमाणें तम त्यानें पाहिलें. त्या तमाच्या शेवटीं ब्रम्हांडाच्या कपाटासारखा जो भूतलरूप खंड तो त्याला वज्रासारखा दृढ सुवर्णमय व कोटि योजनें विस्तीर्ण होता. त्याच्या पलीकडे आठपट जलावरण होतें. तें कपाट भूमीसारखेंच असून समुद्राच्या पृष्ठासारखेंच स्थित होतें. म्हणजे तें जल निराधार असणें शक्य नसल्यामुळें त्या ब्रह्मांडकपाळाचा आश्रय करूनच स्थित होतें. त्याचें उल्लंघन करून गेल्यावर तो तेजाला प्राप्त झाला. सूर्याच्या समुदायाप्रमाणें तें तेज अतिशय भयंकर होतें. तैजसादि आवरणांना जलाप्रमाणें आधाराची अपेक्षा नसते. त्यामुळें तें तेज

प्रलयाग्नीच्या दाट ज्वालासमूहाचें जणुंकाय कोटरच, असें भासुर दिसत होतें. दाह-शोकादिकांनीं रहित अशा त्या मानसशरीरानें तैजसावरणांतून जाणारा तो त्यापुढें आपण वायूच्या आवरणांतून संचार करीत आहों, असें समजला. पूर्ववासनेच्या अनुरोधानेंच त्याला हें असें ज्ञान झालें होतें. वायूच्या आवरणांतील तें त्याचें गमन स्वप्नकल्पनेसारखें होतें, खरें नव्हे. म्हणूनच आपला आतिवाहिक देह जणुंकाय वाहून नेला जात आहे, असें तो समजला. त्याबरोबरच चित्तमात्ररूप असलेल्या आपल्याला अशा रीतीनें कां बरें नेलें जात आहे, अशी कल्पना त्याला आली. त्या कल्पनाबलानेंच तो धीरात्मा त्या वायूच्या समुद्रांतून तरून गेला व त्याहूनहि दसपट विस्तीर्ण असलेल्या आकाशास प्राप्त झाला. त्या आकाशाचें उल्लंघन करून अनंत शबल ब्रह्माकाशास जाऊन पोंचला. ज्याच्यापासून हें सर्व होतें, ज्यांत हें सर्व आहे, जें वस्तुतः कांहीं नाहीं, पण अविद्यादृष्टच्या सर्व आहे, अशा त्या शबल ब्रह्मांत तो मनानें भ्रमण करीत दूराहूनहि अतिदूरवर गेला. पूर्वसंस्कारवशात् त्यानें पृथ्वी, आप, तेज, वायु व तसेंच जगत् पाहिलें. पुनः संसाररचना, पुनः सृष्टि, पुनः दिशा पाहिल्या. पर्वत, आकाश, देव, पृथ्वी व नर यांस वारंवार पाहिलें. मग पुनः पंचमहाभूतांच्या शेवटीं अखंड ब्रह्म पाहिलें. पुनः त्यांत मोठमोठीं विश्वें पाहिलीं. पुनः सर्ग पाहिले, पुनः दिशा पाहिल्या, पुनः शबलब्रम्हाकाश पाहिलें. त्यानंतर पुनः दुसरे अव्यवस्थित सर्ग पाहिले. याप्रमाणें दीर्घकाल विहार करीत तो अद्यापि तसाच राहिला आहे. दीर्घकाळ अभ्यासानें जगत् सत्य आहे, हा निश्चय दृढ झाल्यामुळें तो त्या आपल्या उद्योगापासून निवृत्त होत नाहीं. अविद्येचा अन्त नाहीं. तिचा सत्यस्वभाव काय आहे, असा जर विचार केला तर ती ब्रह्मच आहे. वस्तुतः या अविकल्प आत्मरूप ब्रम्हामध्यें अविद्या नाहींच. हें सर्व दृश्य एक अविद्याच आहे व हा सर्व आत्माच विकास पावला आहे. रामा! तूं जें ब्रम्ह जागृतींत व स्वप्नांत जसें ज्या वासनेच्या उद्भवानें पूर्वीं पाहिलेंस, सांप्रत पहात आहेस व पुढेंहि पहाशील, तें ब्रम्ह तसेंच आहे, होतें व असेल. त्यामुळेंच तें सदसद्विलक्षण व अनिर्वचनीयच आहे. हें होतें, आहे व असेल, या क्रमानें जरी भासत आहे तरी तें अविद्यामात्रच आहे. नेत्र मिटले असतां जसें अंधारचक्र दिसतें, तसेंच तें दिसत आहे. तें चिन्मात्र आत्मरूपानें पाहिल्यास विद्यमान नाहीं व या प्रसिद्ध प्रतिभासरूप अज्ञदृष्टीनें पाहिल्यास असद्रूप नाहीं आणि या दोन्ही दृष्टि प्रमाणभूत असल्यामुळें तें अनिर्वचनीयच आहे. हे रामा, तो विपश्चित् राजा अतत्त्वज्ञतेमुळें त्या त्याच किंवा तत्सदृश अन्य ब्रह्मांडोदरांत एखाद्या वनांतील हरिणाप्रमाणें आपल्या दृढ वासनेमुळेंच पुनः पुनः भ्रमण करीत राहिला आहे. तो ज्यांत भ्रमण करीत आहे तीं विश्वें वासनामात्र असल्यामुळें अतिशय सूक्ष्म आहेत. १२८.

---

## सर्ग १२९ वा.

१. राहिलेल्या दोघां विपश्चितांचा वृत्तांत. २ त्यांतील एकाला मृगत्वाची प्राप्ति व शेवटीं त्या दोघांचा समागम.

श्रीरामः—हे ब्रह्मन्! चार विपश्चितांपैकीं एक भगवान् विष्णूच्या प्रसादानें ज्ञानवान् होऊन मुक्त झाला. दुसरा अद्यापि अविद्येमध्येंच भ्रमण करीत आहे. पण चंद्रलोकामध्यें

व शाल्मली द्वीपांतील राज्यांत भोगैश्वर्यामध्यें अडकून पडलेल्या पूर्व व दक्षिण विपश्चितांची पुढें काय अवस्था झाली तें मला सांगा.

श्रीवसिष्ठः—रामा, त्या दोघांतील एकजण दीर्घकाल अभ्यासानें दृढ केलेल्या वासनेनें परवश केल्यामुळें देहसमूहांनीं द्वीपांतून भ्रमण करीत उत्तर विपश्चित् राजाच्याच पदवीला प्राप्त झाला. दक्षिण विपश्चित् ब्रम्हांडावरणाचें उल्लंघन करून शबलब्रम्हामध्यें लक्षावधि संसारांतून भ्रमण करणें याच अवस्थेस प्राप्त झाला. तोहि तशींच ब्रम्हांडावरणें उल्लंघून परमाकाशकोटरांत हजारों संसार पहात अद्यापि तसाच राहिला आहे. त्यांतील दुसरा म्हणजे पूर्व विपश्चित् चंद्राच्या सांनिध्यामुळें त्याच्या लांच्छनभूत मृगाशीं अतिशय स्नेहसंबद्ध झाला आणि त्या आसक्तीमुळें चंद्राबरोबर प्रतिमारूप अनेक देहांनीं उपलक्षित होणारीं अनेक जन्मांतरें अनुभवून व त्यांचा त्याग करून आतां एका पर्वतावर हरिण होऊन राहिला आहे.

श्रीरामः—ब्रम्हन्, चारहि विपश्चित् राजांमध्यें एकच वासना उदय पावली व तीच दृढ झाली. असें असतांना अंतःकरणें व शरीरें चार प्रकारचीं असलीं तरी त्या वासनेचा विभाग होऊन ती हीनोत्तम फल देणारी कशी झाली?

श्रीवसिष्ठः—रामा, प्राण्यानें ज्या वासनेचा अतिशय अभ्यास केलेला असतो ती वासना देश, काल व क्रिया या निमित्तानें कोमल व पूर्ण परिपक्क झाल्यामुळें दृढ होते. या दोन प्रकारावांचून तिसरा प्रकार संभवतच नाहीं. आतां वासना एक असतांना तिचा विभाग होण्याचें कारण काय तें सांगतों. जेव्हां भोग्य फलाला अनुकूल असलेल्या—देश, काल, कर्म व प्रयत्न—या सामग्रीची एकता असते, तेव्हां वासनेचेंहि एकत्व असतें. पण त्या सामग्रीचा जेव्हां विभाग असतो तेव्हां वासनेमध्येंहि विभाग होतो. आतां परस्परविरोधी अशा दोन वासना जेव्हां उत्पन्न होतात, तेव्हां त्यांत जी प्रबल असते तिचाच जय होतो. फलावरूनच तिच्या प्रबलतेचें अनुमान होऊं शकतें. याप्रमाणें हे चार विपश्चित राजे एका वासनेनें जरी युक्त होते, तरी देशकालादि विभागांमुळें त्यांच्या फलांत अनेकता उत्पन्न झाली. निरनिराळ्या देशांमध्यें त्यांच्या वासनाहि परस्परविरुद्ध उद्भवल्या व त्यामुळें त्यांतील दोघे अविद्याविषयामध्येंच प्रतिबद्ध होऊन राहिले. तिसरा वासनावैचित्र्यामुळेंच हरिण झाला व चवथा अनुकूल देशकालामुळें जनार्दनाच्या दर्शनानें व अनुग्रहानें मुक्त झाला. त्याला सोडून बाकीच्या तिघांना अद्यापि अविद्येचा अंत लागला नाहीं. कारण त्यांची बुद्धि अनेक भ्रांतीनीं परिवेष्टित झालेली आहे. हजारों भ्रांतीनीं परिपुष्ट झालेली ही अविद्या अनंत आहे. सूर्योदय होतांच अंधकार जसा निःशेष नष्ट होतो त्याप्रमाणें विज्ञानप्रकाश येतांच ती तत्काल शांत होते.

( आतां पश्चिम विपश्चिताला मुक्ति कशी मिळाली तें सांगतात. ) रामा, आपल्या वासनेनें कल्पिलेल्या ब्रम्हांडांत पश्चिम विपश्चिताचें काय वर्तमान घडलें तें ऐक. फार दूर असलेल्या त्या प्रदेशीं एका संसारभ्रमांतील एका ब्रम्हमहाकाशांत एक दृश्यमंडल होतें. वस्तुतः ब्रम्हरूप असलेल्याच त्याच्या ठिकाणीं दृश्यात्मता प्राप्त झाली असतां स्वादूदसागराच्या पलीकडील सुवर्णभूमीमध्यें असलेल्या पश्चिम विपश्चिताला शम, दम, भगवद्भक्ति इत्यादि शुभ गुणांच्या संगतीनें जीवन्मुक्तांचा सहवास घडला. विद्वानांच्या समूहांतच येऊन पडल्यामुळें दृश्याचें यथार्थ स्वरूप जाणून तो पूर्णपणें ब्रम्हस्वास प्राप्त

झाला. ज्ञान होतांच ती अविद्या व तो त्याचा देह हीं दोन्ही मृगजलाप्रमाणें बाधित झालीं. कारण अविद्या व अविद्याकार्य देह हीं दोन्ही कामाधीन असतात. त्यामुळें मनुष्याच्या हृदयांतील सर्व काम जेव्हां शांत होतात, तेव्हां तो अमृत होऊन ब्रह्मत्वाचा अनुभव घेतो, असें उपनिषदांत वर्णन आहे. याप्रमाणें मीं तुला विपश्चित राजाचें सर्व चेष्टित सांगितलें. ही कार्याविद्या सर्व दिशांमध्यें अनंत आहे. म्हणून त्या राजांना तिचा अंत लागला नाहीं. अर्थात् कारणब्रह्म जसें अनंत तशीच ती कार्याविद्या अनंत होय. कारण जेथें लक्षावधि विश्वें दिसतात, तेथें स्वभावभूत चित्कडूनच तें कांहीं तरी पाहिलें जातें. त्यामुळें अज्ञानावस्थेंत त्याचा अंत लागत नाहीं. त्याची कल्पना करणारी अज्ञात चित् अनंत असल्यामुळेंच त्यालाहि अनंतत्व आहे. आणि हें कळेपर्यंतच या सृष्टीला ' मिथ्या अविद्या ' असें म्हटलें जातें. पण तत्त्वसाक्षात्कार झाला म्हणजे तें सर्व कार्य शांत होतें. मग त्याला ब्रम्ह असें म्हणतात. पण अविद्या व ब्रम्ह असा जो भेद आहे तो अविद्याच जर ब्रम्ह असेल तर कसा संभवतो, म्हणून विचारशील तर सांगतों. हा भेद वास्तविक नव्हे. कारण तो अविद्यामयच आहे आणि अविद्या ब्रम्हच आहे. शिवाय अविद्या चित्प्रकाश्य आहे. म्हणजे चित्कडून तिचा प्रकाश केला जातो. त्यामुळें तिचा भेद चित्-हून पृथक् नाहीं. त्यांची ती भिन्नताहि चिद्रूपच आहे. ( ज्ञानशून्य उत्तर-विपश्चित् राजाला शंभर युगांतहि अविद्येचा अंत लागला नाहीं, असें सांगतात—) याप्रमाणें भ्रमण करीत असलेल्या अज्ञ विपश्चित् राजाला या अविद्येचा म्हणजे या ब्रह्मांडमंडपाचा शंभर वर्षांनींहि अंत लागला नाहीं.

श्रीरामः—भगवन्, विपश्चित् राजाला तें ब्रह्मांडकपाटच सांपडलें नाहीं कीं काय ! तो त्याला फोडून बाहेर कसा गेला तें आपण सांगितलें नाहीं !

श्रीवसिष्ठः—रामा, पूर्वी उत्पन्न झालेल्या चतुर्मुखानें आपल्या जन्माबरोबर आपल्या दोन हातांनीं हें ब्रम्हांडमंडल फाडलें. त्यानें आपला एक हात खालीं पसरला व दुसरा वर पसरला. त्यामुळें त्याचा एक भाग खालीं गेला व दुसरा वर गेला. ब्रह्मदेवानें आपल्या दोन्ही हातांनीं याचें जोरानें विदारण केल्यामुळें वरचा भाग फारच दूर गेला. त्याचप्रमाणें खालचा भागहि अतिशय अंतरावर जाऊन उभा राहिला. जलादि आवरणें या दोन भागांचाच आश्रय करून रहातात. कारण ब्रह्मांडकपालांच्या विभागाबरोबर त्या आवरणकपालांचाहि विभाग झाला. त्यांतील केवल जलावरण विभक्त झालें व त्यासह बाकीचीं सर्व त्या कपालांचा नुस्ता आश्रय करून राहिलीं, हें आम्हीं वर सांगितलेंच आहे. या ब्रह्मांडकपाटाचा जो मध्यभाग त्यालाच आकाश असें समजतात. तेंच आपल्याला नीलवर्ण व पारावारशून्य असें दिसत आहे. जलादिक आवरणें त्या आकाशामध्यें नाहींत व त्याच्याशीं त्यांचा संबंधहि होत नाहीं. तें निर्मल व शून्य असून इतर भूतांचा आधार आहे. प्रलयकालपर्यंत तें तसेंच राहणार. आकाशाला अपार म्हणून जें म्हटलें आहे, तेंहि इतर भूतांच्या अपेक्षेनेंच त्याची विपुलता दाखविण्यासाठीं होय. कारण तसें जर न मानलें तर वायूच्या आवरणाहून तें दशगुण अधिक आहे, हें म्हणणें उपपन्न होत नाहीं. तसेंच त्याच्यापुढें शबलब्रह्माकाश जें सांगितलें आहे, तेंहि

१ 'यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि स्थिताः' ही श्रुति याविषयीं प्रमाण आहे. ( का. भा. २, ३, १४ पृ. २५५ )

उपपन्न होत नाहीं. असो. त्या मार्गानें हा विपश्चित् राजा नक्षत्रचक्राप्रमाणें गेला. अविद्येचा अंत पहाण्यासाठीं ज्यानें नित्य दीक्षाच घेतली आहे असा तो मोक्षापर्यंत तसाच भ्रमण करीत राहिला. जें ब्रह्म तीच ही अनंतरूपा अविद्या आहे. कारण ती ब्रह्ममयी आहे. जोंवर ती तत्त्वतः कळली नाहीं तोंपर्यंतच ती आहे. तिचें तत्त्व कळलें म्हणजे ती नाहीं. याप्रमाणें ते विपश्चित् राजे परमाकाशांत फार दूरवर जाऊन अविद्येच्या कांहीं दुसऱ्याच जगद्रूप भ्रमांत भ्रमण करीत राहिले आहेत. एक मुक्त झाला, एक हरिण होऊन राहिला, व बाकीचे दोघे प्राक्तन दृढसंस्कारांच्या अधीन होऊन तसेंच अविद्येत भ्रमण करीत राहिले आहेत.

श्रीरामः—हे मुने, आपली माझ्यावर जर पूर्ण कृपा असेल तर ते तिघे विपश्चित् राजे कशा प्रकारच्या दूर जगामध्यें भ्रमण करीत आहेत? हे ब्रह्मन्, ज्या संसारांत ते उत्पन्न झाले ते संसार केवढ्या मार्गावर आहेत? आपण मला हें फारच मोठें आश्चर्य सांगितलेंत!

श्रीवसिष्ठः—रामा, ते दोघे विपश्चित् ज्या दोन जगांमध्यें राहिले, तीं जगें मोठ्या यत्नानेंहि आमचा विषय होत नाहींत. तिसरा विपश्चित् मृगत्वाला प्राप्त होऊन जेथें राहिला आहे तो संसार केव्हां केव्हां आमच्या अवलोकनांत येतो.

श्रीरामः—हे महाबुद्धिमान् मुने, मृगत्वाला प्राप्त झालेला विपश्चित् ज्या जगामध्यें स्थित आहे तें जगत् कोठें आहे, तें आपण मला यथावत् सांगा.

श्रीवसिष्ठः—परब्रह्म-महाकाशांत अतिशय दूर जाऊन तो विपश्चित हरीण कोठें राहिला आहे, कोणत्या जगांत रहात आहे, तें जगत् तूं ऐक. ज्यामध्यें तो राजा हरिण होऊन राहिला आहे तें जगत् त्यांच्या मूळ जन्मदेशाहून फारच दूर अंतरावर स्थित आहे. तें जगत् म्हणजे परमाकाशच होय.

श्रीरामः—ब्रह्मन्, हा विपश्चित् याच जगांतून त्या गतीला गेला. दिगंत पहाण्याच्या इच्छेनें तो तेथें गेला. मग त्यांतच तो हरिण झाला, हें म्हणणें कसें सयुक्तिक आहे? कारण तेथून परतून आल्यावांचून त्याला मृगाचा जन्म प्राप्त होणें शक्य नाहीं.

श्रीवसिष्ठः—अवयवी आपल्या सर्व अवयवांना जसा नित्य जाणतो, त्याप्रमाणें मी हें सर्व ब्रम्हरूप आत्म्यामध्येंच स्थित आहे असें जाणतों. अर्थात् दूराहून दूर, अति दूर इत्यादि हें सर्व ह्मणणें परिच्छिन्न आत्मदर्शी लोकांनाच शोभतें, अपरिच्छिन्न आत्मदर्शी लोकांना सर्व अगदीं समीपच आहे. म्हणून मी सर्व ब्रम्हांडें ब्रम्हामध्येंच पाहतों. प्राकृत मनुष्याच्या दृष्टीनें फार पूर्वी होऊन गेलेल्याहि ब्रह्मांडांना ब्रम्हदृष्टया अत्यंत सामीप्यच आहे. त्यामुळें कालतःहि कोणालाच दूरत्व नाहीं. त्यामुळें भविष्यत्काळीं फार दिवसांनीं होणारीं ब्रम्हांडें सांप्रत काळीं उत्पन्नच झालेलीं नसतात. त्याचप्रमाणें फार दिवसांपूर्वीं होऊन गेलेलीं ब्रम्हांडें नाश पावलेलीं असतात. तीं अनेक आकारांचीं व विचित्र असतात. परस्परांना तीं अदृश्य असतात. तथापि एका चितीमध्येंच त्या सर्वांचा आरोप झालेला असल्यामुळें तीं तिन्ही काळांतील ब्रम्हांडें एकमेकांमध्यें ओंवल्याप्रमाणें स्थित आहेत. पृथ्वीचे विकार असे जे पट, तंतु वगैरे त्याप्रमाणेंच तीं सर्व स्थित आहेत. त्या ब्रम्हांडांतील एका भागांत घडलेलें जें वृत्त मीं तुला याच ब्रम्हांडांत झाल्याप्रमाणें सांगितलें तें तत्त्वतः भिन्न नाहीं. त्याचा प्रकारहि अगदीं विलक्षण नाहीं. ते विपश्चित राजे पूर्वोक्त दिगंतरांत आपापल्या वासनेनें काल्पिलेल्या निरनिराळ्या संसारांत

तसल्याच देहांनीं भ्रमण करूं लागले. त्या अनंताकाशांत ते अखिन्न चित्तानें वाऱ्याप्रमाणें भ्रमण करीत होते. पूर्व विपश्चित् याच ब्रह्मांडांतील एका गिरिकंदरांत काकतालीयन्यायानें पुष्कळ जगद्भ्रमणांनीं भ्रमण करून हरिण झाला. तो दूरच्या जगामध्यें भ्रमण करीत असतांना ज्या सर्गामध्यें हरिण झाला तो सर्ग हाच आहे. तो काकतालीयन्यायानें ब्रम्हाकाशांत स्थित आहे.

**श्रीराम:**—ब्रह्मन्, असें जर असेल तर तो मृग कोणत्या दिशेंत, कोणत्या देशांत, कोणत्या पर्वतावरील वनांत हरिण होऊन राहिला आहे, तें मला सांगा. तो काय करतो ? विपुल धान्यानें सुशोभित झालेल्या कोणत्या भूमींत तो दूर्वांचें चर्वण करीत आहे ? आणि तो जरठ ज्ञानी आपल्या त्या श्रेष्ठ विपश्चित् जन्माला केव्हां स्मरेल ?

**श्रीवसिष्ठ:**—रामा, त्रिगर्तनाथानें हा जो तुला क्रीडामृग दिला आहे तोच तुझ्या क्रीडामृगबंधनागारांत असलेला मृग विपश्चित् आहे; असें जाण.

**श्रीवाल्मीकि:**—त्या सभेंत वसिष्ठांच्या तोंडून असें ऐकून राघवानें पुष्कळ बालकांना तो मृग आणण्यासाठीं पाठविलें, तेव्हां तो त्यांकडून आणला गेलेला मुग्ध मृग त्या भव्य सभेंत प्रविष्ट झाला. सर्व सभ्यगणांनीं पुष्टिमान् व तुष्टिमानूहि असलेल्या त्याला पाहिलें. आपल्या अंगावर पांढऱ्या ठिपक्यांनीं नक्षत्रबिंदूंनीं युक्त असलेल्या आकाशाचेंच तो अनुकरण करीत होता. कटाक्षरूपी कमलवृष्टींनीं तो जणुंकाय सुंदर स्त्रियांना नेत्रकटाक्षांचें शिक्षणच देत होता. सर्व सभा त्याला पहाण्यासाठीं उत्सुक जरी असली तरी तो आपल्या चाकित नेत्रांनीं सभेचा मुळींच आदर करीत नव्हता. रत्नखचित स्तंभांतील मरकतमणींच्या पाचूच्या छायेनें सभा नलिवर्ण दिसत असल्यामुळें हिरव्या गवताची भ्रांति होऊन तो तें खाण्याच्या इच्छेनेंच इकडे तिकडे धांवत होता. तो आपले कान, डोळे व मान वर करून क्षणभरहि एका जागीं उभा रहात नव्हता. तो आपल्या चपलतेनें सभेंतील लोकांना भयभीत करीत होता. हा आपल्या चंचल नेत्रांनीं व दीर्घ ग्रीवेनें उपलक्षित होणारा हरिण आमच्या अंगावर उडी टाकतो कीं काय असें त्यांना वाटत होतें. अशा त्या हरिणाला पाहून राजा दशरथ, सभासद, मुनि व मंत्री हे सर्व आश्चर्यचकित झाले व 'खरोखर ही माया अनंत आहे' असें म्हणून दीर्घकाल ते सर्व स्तब्ध झाले. आपल्या कमलवृष्टीसारख्या दृष्टिपातांनीं सर्व सभेला नीलवर्ण करणाऱ्या, आश्चर्यकारक चर्वणानें सर्व लोकांना विस्मित करणाऱ्या व अनेक प्रकारच्या रत्नकिरणांनीं अधिकच भूषित झालेल्या त्या हरिणाला अवलोकन करणारी ती सर्व सभा अतिशय विस्मित झाली आणि कमलिनींच्या चित्राप्रमाणें स्तब्ध राहिली. १२९.

---

## सर्ग १३० वा.

—:०:—

१ वसिष्ठांच्या ध्यानजन्य अग्नींत मृगाचा प्रवेश. २ त्याला विपश्चित् देहाचा लाभ व ३ पूर्वजन्माची स्मृति, यांचें वर्णन.

**श्रीवाल्मीकि:**—श्रीरामानें विचारिलें कीं, हे मुने, या विपश्चित् राजांच्या प्राचीन विपश्चित् देहांचा पुन: आविर्भाव होऊन व ज्ञानानें वास्तविक आत्म्याचा आविर्भाव होऊन त्यांच्या दु:खाचा अंत कोणत्या उपायानें केव्हां होईल ?

**श्रीवसिष्ठ:**—हे राघवा ! ज्यानें ज्या देवतेची पुन्हां पुन्हां उपासना करून आपली

इष्ट सिद्धि मिळविलेली असते, त्या पुरुषाला त्याच आपल्या उपास्य देवतेची आराधना केल्यावांचून दुसरी गति नसते. तिच्या उपासनेवांचून त्यास सिद्धि प्राप्त होत नाहीं; व जरी झाली तरी ती शोभत नाहीं--सुखद होत नाहीं; व जरी सुखद झाली तरी त्यास पारमार्थिक हित केव्हांहि प्राप्त होत नाहीं व तें शुभफलदायकहि होत नाहीं. अग्नि हेंच विपश्चित् राजांचें दैवत असल्यामुळें त्यानें अग्नींत प्रवेश केला म्हणजे सोनें अग्नींत घातलें असतां जसें शुद्ध होऊन निघतें, त्याप्रमाणें तो मृगशरीर सोडून पूर्वदेहानें युक्त होईल, हें मी तुला आतां प्रत्यक्षच दाखवितों, पहा. मी हें सर्व घडवून आणतों. आतां तुम्हां सर्वांच्या समोरच हा हरिण अग्निप्रवेश करील.

वाल्मीकिः—ज्यांचें आचरण अतिशय श्रेष्ठ आहे असा वसिष्ठमुनि असें बोलून व आपल्या कमंडलूंतील जलानें यथाशास्त्र आचमन करून ज्वालापुंजमय अनिंधन अग्नीचें ध्यान करता झाला. त्याच्या ध्यानानें सभेच्या मध्यभागीं ज्वालांचा समूह उत्पन्न झाला. त्यांत निखाऱ्यांचा आकार दिसत नव्हता. कारण तो ज्वालासमूह काष्ठरहित, स्वच्छ, धमधम असा आवाज करणारा, धूमरहित, कज्जलरहित, अतिशय तेजस्वी, कांतिमान्, सुवर्णमंदिराप्रमाणें सुंदर, फुललेल्या पलाशाकार, संध्यासमयींच्या मेघाप्रमाणें रक्तवर्ण, असा तो ज्वालासमूह तेथें उद्भवला. त्या ज्वालासमूहास पाहून सभेंतील लोक दूर होऊं लागले. तो हरिण मात्र पूर्वीच्या भक्तिभावानें अतिशय हृष्ट होऊन मोठ्या आदरानें त्याच्याकडे पाहूं लागला. ज्याचें पाप क्षीण झालें आहे असा तो त्या अग्नीला पहात त्यांत प्रवेश करण्याची इच्छा करून सिंहाप्रमाणें उड्या टाकीत त्या अग्नीपाशीं आला. इतक्यांत मुनिश्रेष्ठ वसिष्ठ आपल्या एकाग्रचित्तानें विचार करून, कृपादृष्टीनें त्या हरिणाला पापरहित करीत, अग्नीला असें बोलला--"हे भगवन् अग्ने! प्राचीन भक्तीचें स्मरण करून कारुण्यानें या रम्य हरणाला विपश्चित् कर." मुनि इतके जों बोलत आहे, तोंच धनुष्यापासून वेगानें सुटलेला बाण लक्ष्याला जसा वेध करतो, त्याप्रमाणें तो हरिण राजसभेंत दुरून धांवत येऊन अग्नींत शिरला. ज्वालासमूहांत प्रविष्ट झालेला तो आरशांत प्रतिबिंबित झाल्यासारखा दिसूं लागला. संध्याकाळच्या अभ्रामध्यें विश्रांति घेत असल्याप्रमाणें त्याचें शरीर लोकांना स्पष्ट दिसलें. अंतरिक्षांत मेघाचा अंश एका क्षणांत जसा रूपांतर पावतो त्याप्रमाणें ज्वालांच्या उदरांत तो हरिण सर्व सभ्य पहात असतांनाच मनुष्याकारास प्राप्त झाला. ज्वालांमध्यें सोन्याप्रमाणें तो कांतिमान् दिसला. तो पवित्राकार पुरुष झाला. कांतिमान् अवयवांनीं तो सुंदर दिसला. सूर्यबिंबांत जसा सूर्य, किंवा चंद्रबिंबांत चंद्र, महासागरांत जसा वरुण, किंवा संध्याकाळच्या अभ्रामध्यें जसा शशि, नेत्राच्या कनीनिकेंत, आरशांत, स्वच्छ जलांत, रत्नांत जसें प्रतिबिंब, त्याप्रमाणें अग्नि ज्याचा आधार आहे असा तो भक्तिरूप पुरुष सूर्यासारखा दिसला. त्यानंतर वारा लागला असतां जसा दीप, किंवा आकाशांतून संध्यामेघ जसा कोठें तरी जातो, त्याप्रमाणें सभेंतून तो ज्वालासमूह कोठें अदृश्य झाला. देवालयाच्या भिंती पडल्या असतां त्यांतील देवमूर्ति प्रतिमारूपानें दिसते, किंवा पडद्यांतून नट जसा बाहेर येतो त्याप्रमाणें तो पुरुष मात्र तेथें अवशिष्ट

१ 'यः स्वां देवतामतियजति प्रस्वायै देवतायै च्यवते न परां प्राप्नोति०' ही श्रुति याला प्रमाण आहे.

राहिला. त्यानें रुद्राक्षमाला धारण केली होती. तो शांत होता. त्याच्या गळ्यांत सुवर्णाचें यज्ञोपवीत होतें. अग्निदाहानेंच ज्याला निर्मलता प्राप्त झाली आहे अशा वस्त्रांनीं तो आच्छादित झाला होता, व नुकत्याच उदय पावलेल्या चंद्राप्रमाणें तो दिसत होता. सर्व सभ्यांनीं त्याला पाहतांच 'अहो भाः' असें म्हटल्यामुळें, त्याचा वेष भासमान होत असल्यामुळें व सूर्याप्रमाणें त्याची भाः म्ह० कांति अतिशय विस्तीर्ण असल्यामुळें तो 'भास' या नांवानें लोकांकडून बोलला गेला. हा जणुंकाय मूर्तिमंत आभासच आहे, त्यामुळें 'भास' या नांवानेंच जगांत प्रसिद्ध होईल, असें सभेंतलि कांहीं सभ्यांनीं म्हटल्यामुळें तो 'भास' असें म्हटला जातो. नंतर तेथेंच बसून ध्यान करणारा तो भास प्राक्तन शरीरांतील आपला सर्व वृत्तांत जाणता झाला. त्याला आपल्या पूर्व जन्माची चांगली आठवण झाली. सर्व सभेंतलि लोक आश्चर्यचकित होऊन चित्राप्रमाणें आपल्या ठिकाणींच निश्चल राहिले असतां तो भास एका क्षणांत आपला सर्व अक्षत वृत्तांत पाहून पूर्व जन्मापासून परत आला; म्हणजे ध्यान सोडून तो देहभानावर आला. त्यानें सर्व सभा पाहिली आणि उठून मुनि, राजे, सामंत यांच्या क्रमानें तो वसिष्ठापाशीं आला. मोठ्या आनंदानें त्यांना प्रणाम केला आणि 'मला ज्ञानरूप सूर्य व प्राण देणाऱ्या हे ब्रह्मन्! तुला नमस्कार असो.' असें बोलला. तेव्हां वसिष्ठहि हातानें त्याच्या मस्तकाला स्पर्श करीत म्हणाला, "हे राजन्, आज फार दिवसांनीं तुझ्या अविद्येचा क्षय होवो.' रामाला 'तुझा जयजयकार असो' असें म्हणणाऱ्या व आपल्या पुढें नम्र होणाऱ्या त्याला दशरथ राजा आसनावरून किंचित् उठून हंसत म्हणाला—

श्रीदशरथः—भो राजन्! तुझें स्वागत असो. या आसनावर बैस. अनेक संसारांत भ्रमण करणाऱ्या तुला येथें थोडीशी विश्रांति मिळो.

श्रीवाल्मीकिः—दशरथराजा असें बोलत असतां 'भास' हें नांव धारण करणारा विपश्चित् राजा विश्वामित्रादि मुनींस प्रणाम करीत आसनावर बसला.

दशरथः—कायहो हा चमत्कार आहे! वन्य हत्तीला बंधनस्थानापासून जसें दुःख होतें त्याप्रमाणें या विपश्चित् राजानें अविद्येमुळें दीर्घकाळ दुःखानुभव घेतला आहे. अज्ञानामुळें प्राप्त झालेल्या दूर दृष्टीची गति मोठी कठीण आहे. ती आकाशांतच सर्गाबडंबरभ्रम दाखविते. या विपश्चित् राजानें सर्वव्यापक आत्म्यामध्यें एकसारखीं दीर्घकाळ हीं किती तरी जगें पाहिलीं व त्यांतून भ्रमण केलें! खरोखर हें मोठें आश्चर्य आहे! मायास्वभावरूप असें हें वैभव वस्तुतः शून्य जरी आहे तरी त्याचा हा महिमा किती विलक्षण आहे पहा. तो स्वतः शून्यच आहे, तथापि आकाशाप्रमाणें शून्य असलेल्या परमात्मघनामध्यें अशा प्रकारचीं विचित्र जगें उत्पन्न होऊन भासतात. खरोखर सर्वच चमत्कार आहे! १३०.

---

## सर्ग १३१ वा.

१ विश्वामित्र बटधानाराजपुत्राची कथा सांगून विपश्चित् राजाला आपल्या भ्रांतीचें सविस्तर वर्णन करण्याची प्रेरणा करतो. २ विपश्चित् आपल्या भ्रांतीचें वर्णन करतो.

श्रीदशरथः—हा विपश्चित् राजा दिगंतदर्शनरूप म्हणजे अपुरुषार्थरूप अविद्येला उद्देशून जो इतका क्लिष्ट झाला, म्हणजे त्यानें जे

इतके क्लेश भोगले, तें सर्व आत्मज्ञानशून्य असलेल्या याचें भ्रांतिरूप वृथा चेष्टित आहे असें मी समजतों. कारण असल्या मिथ्याभूत वस्तूविषयीं आग्रह धरणें नेहमीं क्लेशदायकच असतें.

श्रीवाल्मीकिः—ब्रम्हन्! इतक्यांत ज्याचा वटधानाराजपुत्राच्या कथेचा संस्कार जागृत झाला आहे असा विश्वामित्र राजाच्या जवळच बसला होता; तो असें प्रसंगप्राप्त वचन बोलला. हे राजा! तूं खरें सांगितलेंस. कारण ज्यांना तत्त्वज्ञान झालेलें नाहीं, असे या विपश्चित् राजासारखे विचित्र भ्रांतिरूप बोधांनीं युक्त असलेले पुष्कळ लोक या जगांत आहेत व ते वासनामय अनंत कोटि जगद्रूप पदार्थ साक्षात् पहातात. ज्यांचा निश्चय क्षीण झालेला नाहीं, असे वटधाना नांवाचे राजपुत्र आज सतरा लक्ष वर्षें भूलोकीं असेच भ्रमण करीत राहिले आहेत. भूमीचा अंत पाहाण्यासाठीं ते प्रवृत्त झाले, पण अद्यापि त्यांना त्याविषयीं उद्वेग होत नाहीं. नद्या जशा आपला प्रवाह कधींच थांबवीत नाहींत, त्याप्रमाणें ते आपल्या संकल्पापासून निवृत्त होत नाहींत. हा वर्तुलाकार महालोक आकाशामध्यें स्थित आहे. एखाद्या लहान मुलाच्या संकल्पवृक्षाप्रमाणें हा हिरण्यगर्भाचा संकल्पनिश्चयच आहे. आतां तो निराधार असलेला भूलोक सर्व जीवांचा आधार कसा होऊं शकतो? ज्याप्रमाणें मधानें भरलेला चेंडू आकाशांत अंतराळीं लोंबत ठेविला असतां त्यावर दाही दिशांस मुंग्या भ्रमण करितात त्याप्रमाणें भूलोकाच्या आधारानें सर्व भूतें नित्यभ्रमण करितात. भूलोकाच्या अधोभागीं असलेलीं व ऊर्ध्वभागीं असलेलीं जीं त्याचीं अंगें त्यांत प्रवेश करून, जेव्हां, जेथें, जीं भूतें राहतात तेव्हां तेथें तीं भ्रमण करितात. अंतरिक्षांतून वहाणाऱ्या मंदाकिन्यादि नद्या व ज्योतिश्चक्ररूप नक्षत्रमंडल त्या भूगोलाचाच वायुबंधनवशात् दुरून आश्रय करून त्याला स्पर्श न करतांच वरून चंद्रसूर्यांसह सतत भ्रमण करितात. ज्योतिश्चक्रासह त्या भूमीला वेढून द्यौ या भूमीमध्येंच व्यवस्थित आहे. त्यांत सर्व दिशांमध्यें आकाश वर व महितल त्याच्या खालीं आहे. पण भूगोलाच्या खालीं असलेल्या आकाशाला ऊर्ध्वत्व कसें व त्याच्या अपेक्षेनें भूतलाला अधस्त्व कसें, म्हणून विचारशील तर सांगतों. त्या भूतलाच्या खालीं जे पदार्थ संचार करतात ते त्याच्या सर्व प्रदेशीं प्राप्त होऊनच संचार करितात. ज्या भागांत पक्ष्यादि उडून जातात, त्याला ऊर्ध्व असें म्हटलें आहे. त्याला अधः किंवा तिर्यक् असें म्हणत नाहींत. त्या भूगोलाच्या एका दिशेमध्यें वटधाना या नांवाचे देश असून त्यांचे राजे वटधाना नांवाचेच क्षत्रिय आहेत. त्यांच्या कुळांत पूर्वीं तीन राजपुत्र झाले. तेहि या विपश्चित् राजाप्रमाणें 'दृश्य भूम्यादि जगाचा अंत कोठें होतो, तें पाहूं या' असा एकच संकल्प करून व दृढ निश्चयी होऊन तो अंत पाहण्यासाठीं निघाले. निरनिराळीं द्वीपें व समुद्र यांतून जात असतांना त्यांना पुनः पुनः जल व पुनः पुनः भूमि लागली. पण तसेच ते पुढें आक्रमण करीत गेले. ते पुष्कळ दिवस प्रवासच करीत होते. मध्यें मध्यें मरून त्यांनीं नवीन शरीरें धारण केलीं. याच क्रमानें त्यांचा दीर्घ काळ निघून गेला. वर्तुल कंदुकावर बसलेल्या मुंगीप्रमाणें ते अहर्निश भ्रमण करीत होते. पण त्यांना या दृश्याचा अंत लागला नाहीं. किंवा त्यांना कोठें देशांतरहि आढळलें नाहीं. आकाशांतील चेंडूवर भ्रमण करीत असलेल्या मुंगीप्रमाणें ते अद्यापि त्या भ्रमणांतच व्यग्र होऊन राहिलेले आहेत. त्यांना त्याचा कंटाळाहि येत नाहीं. या भूगोलाच्या ज्या ज्या खालच्या,

वरच्या किंवा मधल्या प्रदेशीं ते जातात, तेथें तेथें त्यांना खालीं वर अशाच दिशा दिसतात. महाराज ! ते ह्मणतात "जर इतक्या उद्योगानेंहि आम्हांला याचा अंत लागला नाहीं तर आम्ही असेच पुढें आणखी संचार करीत राहूं." याप्रमाणें दिसत असलेलें हें सर्व दृश्य कांहीं नाहीं. हा सर्व ब्रम्हदेवाच्या संकल्पाचा विलास आहे. स्वप्नांतील दृश्याप्रमाणें किंचित संकल्पमय असलेलें हें अज्ञान अनंत आहे. पण जी संकल्पकल्पना तेंच परब्रह्म व जें परब्रह्म तीच संकल्पकल्पना. सर्व चिद्रूप आहे. त्यामुळें शून्यत्व व आकाश याप्रमाणें त्यांत भेद नाहीं. जलप्रवाहांतलि तरंगादिकांप्रमाणें जें जें भासत आहे तें चिन्मात्र आहे. अर्थात् अन्य वस्तूचा तर असंभवच आहे. मग अन्य असल्याप्रमाणें दिसणारें हें जगत् खरें कसें असेल? हें जगत् उत्पत्तीच्या पूर्वीं अभावरूप असतें. त्यामुळें तें शून्यच आहे. सृष्टीच्या आरंभीं तें ब्रम्हाकाशच असतें ही गोष्ट निर्विवाद आहे. त्यामुळें या वर्तमान समयींहि तेंच जगाच्या रूपानें भासतें. या दृष्टीनें पाहिल्यास प्रलय व सृष्टि हीं त्याहून भिन्न नाहींत. तें चिद्रूप काम, कर्म व वासना यांच्या अनुसार जशी जशी कल्पना करते तसेंच तेथें आसक्त होतें; आणि दृष्टादृष्ट, वेद्यावेद्य, जड-चिद्रूप यांच्या परस्पर तादात्म्याध्यासानें जसें पूर्वीं होतें तसेंच पुढेंहि दीर्घकाल रहातें. याचें एक दृश्यात्मक व दुसरें अक्षयरूप आहे. तें स्वतः अजच त्या दोन्ही रूपांनीं भासतें. पण वस्तुतः तें मुळींच भासत नाहीं. चिदणूच्या उदरांत समस्त अनुभवाणु आहेत. पर्वताच्या उदरांत जशा शिला, त्याप्रमाणें ते स्वच्छ अनुभवाणु आकाशात्म्यांत आकाशरूपानेंच राहतात. 'तर मग काय ते शुद्ध चिदणूच्या उदरांत रहातात?' म्हणून विचारशील तर नाहीं, तसें नाहीं. ते स्वभावभूत होऊन राहतात. ह्मणजे अव्याकृतसंज्ञक आवृत आत्मस्वरूपांत ते राहतात. परमपदामध्यें म्हणजे शुद्ध चैतन्यामध्यें ते रहात नाहींत. कारण हें परमपद एकरूप आहे. त्यामुळें ते जर त्यांत रहातील तर अभिन्नरूपच दिसतील; भिन्न रूपानें त्यांचा प्रत्यय केव्हांच येणार नाहीं. अर्थात् त्यालाच जगत् असें म्हटलें आहे. ब्रह्म प्रकाशरूपानें पसरलेलें आहे. हे सूक्ष्मदृष्टि श्रोतेहो ! मीं चांगला पूर्वापर परामर्श करून हें तुम्हांला सांगितलें आहे. याप्रमाणें शुद्ध चिदैक्यरूप परमस्थानापासून च्युत न झालेलाहि हा जीव नानात्वबुद्धीनें 'मी जीव आहें' अशी कल्पना करून क्लेश भोगतो, हें महदाश्चर्य आहे. अरे बा भासा ! अथवा 'विपश्चित्' हें ज्याला दुसरें नांव आहे अशा हे राजा ! सांग, तूं कितीसें दृश्य पाहिलेंस व किती भ्रमण केलेंस ? त्यांतलि तुला कांहीं आठवतें आहे का ?

भासः---मीं पुष्कळ दृश्यें पाहिलीं. अगदीं खिन्न न होतां पुष्कळ भ्रमण केलें. खरोखर मीं पुष्कळ गोष्टींचा अनेक प्रकारें अनुभव घेतला. त्या सर्व मला आठवतात. त्या अनंत अव्याकृत आकाशास प्राप्त होऊन हे राजा ! मी विविध शरीरांनीं फार दूरवर चालून गेलों. दीर्घ कालपर्यंत मोठमोठीं सुखदुःखें अनुभविलीं. अनंत जगें पाहिलीं. वर व शाप यांच्या योगानें विचित्र देहांनीं, हे महात्मन् ! मीं असंख्य दृश्यांचा अनुभव घेतला. अग्नीच्या वरामुळें दृढ एकचित्तानें जन्मांतरांतील विवर्तरूप अशा अनेक गोष्टी पाहिल्या. मीं प्रत्येक ब्रह्मांडांत निरनिराळ्या देहानें भ्रमण करीत असूनहि प्राक्तन दृढ निश्चयाचें स्मरण असल्यामुळें दृश्यात्मक पृथिव्यादि अविद्येचा अंत पाहाण्यासाठीं मोठ्या वेगानें भगीरथ यत्न करीत राहिलों. त्यानंतर त्या विस्ताच्या

वेगानें ह्मणजे मरणसमयीं पाहिलेल्या वृक्षाच्या संस्कारामुळें देहग्रहण करण्याविषयीं मला इच्छा झाली व हजार वर्षे मी वृक्ष बनलों. त्या वेळीं बाह्य प्रवृत्तीला कारण होणारी प्राणचेष्टा व्यक्त झालेली नसल्यामुळें माझें मन आंतल्या आंत राहिलें. त्या अवस्थेंत वृक्षदेहावर अभिमान ठेवणाऱ्या माझ्या सूक्ष्म देहानें आंतल्या आंत दुःख भोगलें. पूर्वापर परामर्शाला कारण होणारें चित्त नसल्यामुळें पुष्पफलादिकांना उत्पन्न करून त्यांचा विस्तार करण्याविषयीं मी एखाद्या कंदाप्रमाणें भूमींतील रस, ऋतु इत्यादिकांच्या अधीन होऊन राहिलों. त्यानंतर शंभर वर्षे मी मेरुपर्वतांतील हरिण होऊन राहिलों. त्या वेळीं माझा वर्ण सोन्यासारखा होता. कान वृक्षाच्या पर्णाप्रमाणें होते. दूर्वांकुर खाण्यामध्यें व गायन ऐकण्यामध्यें माझी मोठी निष्ठा होती. वनवासी जीवांमध्यें मी कनिष्ठ ह्मणजे अल्पदेह व अल्पबल असल्यामुळें कोणाची हिंसा केली नाहीं. एकदा शरभानें माझ्या पाठीवर आपल्या आठहि पायांनीं आक्रमण केलें असतां माझें मरण ओढवलें, पण त्या वेळीं तो शरभ गर्जना करणाऱ्या मेघांतून गारांचें पाणी पिण्यासाठीं मेघांशीं युद्ध करण्याकरितां पर्वतशिखरावरून उड्या मारीत असतां मला क्लेश झाले व त्या क्लेशांमुळेंच मला मरण आलें तेव्हां क्रौंच पर्वताच्या कांचन दऱ्यांमध्यें मी शंभर वर्षे शरभ होऊन राहिलों. त्यानंतर मला विद्याधराचा जन्म प्राप्त झाला. मलयपर्वताच्या शिखरावर कालागरु वृक्षांच्या शाखांनीं आलिंगन दिल्यामुळें शीत, मंद व सुगंध झालेला वायु वहात असतां मीं विद्याधरींशीं विविध क्रीडा केल्या व त्यांच्या कलारूपी अमृताचा अनुभव घेतला. पुढें मी ब्रम्हदेवाच्या हंसाचा पुत्र झालों व पंधरावें वर्षे मेरुपर्वतावरील निर्झरणीच्या तीरावर रममाण होणाऱ्या मीं सुवर्णकमलांच्या मकरंदानें गढूळ झालेलें पीतवर्ण जल प्राशन केलें. पुढें शंभर वर्षे क्षीरोदसमुद्राच्या तीरावरील वनाला हालवून येत असलेल्या वायूनें ज्यांचे नीलकेश चंचल केले आहेत अशा माधवसुंदरींचें जरा व शोक यांचा परिहार करणारें गायन मीं ऐकलें. त्यानंतर कालंजर पर्वतावरील करंज वृक्ष व गुंजा यांचें ज्यांत प्राधान्य आहे, अशा वनांत मला जंबुकाचा जन्म प्राप्त झाला. तेथेंहि हत्तीनें माझ्या अंगावर पाय देऊन माझा चूर केला. पण त्या अर्धमृतावस्थेंत मीं त्या हत्तीला सिंहानें मारिलें आहे, असें पाहिलें. त्यानंतर संतानक नांवाच्या कल्पवृक्षांच्या समूहांनीं हंसत असल्याप्रमाणेंच शोभणाऱ्या सह्य पर्वताच्या शिखरावर मी एका सिद्धाच्या शापामुळें इंदुमुखी अप्सरा होऊन कल्पद्रुमाच्या स्तबकमंदिरांत अर्धे कृतयुग होई तों एकटाच राहिलों. त्यानंतर मी त्या पर्वताच्या जवळच जलप्रायप्रदेशीं वाढलेल्या कण्हेरीच्या शाखांमध्यें सदा आवाज करणारा वाल्मीकि नांवाचा पक्षी झालों व तेथें त्याच शरीरानें शंभर वर्षे काढलीं. त्यानंतर त्या करवीर वनांत भार्यापुत्रादिकांसह सर्वांचा उच्छेद झाला असतां दूरस्थ महेंद्र पर्वतावर वियोगानें अत्यंत आर्त होऊन अवशिष्ट आयुष्य घालविलें. याप्रमाणें दोन जन्मांनीं सिद्धाच्या शापापासून मुक्त झालों. त्या सिद्धाच्या अनुग्रहानेंच स्वतः सिद्ध होऊन महेंद्रपर्वताच्याच दाट छायेनें युक्त असलेल्या चंदनवनानें परिवेष्टित झालेल्या शिखरावरील लतारूपी झोंपाळ्यावर झोंके घेत असलेल्या स्त्रिया त्या लतांच्या फलाप्रमाणेंच मीं पाहिल्या व सिद्ध पांथांनीं त्यांचें जरी हरण केलें तरी मीं त्यांचा उपभोग घेतला. त्यानंतर अविद्येचा अंत पहावा अशा प्रकारचा जो अभिनिवेश त्यामुळें पराधीनचित्त

झालेल्या मीं तापसवृत्ति धारण केली. कारण मला त्या स्थितीचा थोडासा कंटाळा आला होता. माझी मति थोडीशी खिन्न झाली होती. म्हणून मीं पर्वतावरील जलप्राय प्रदेशीं उत्तम तापसवृत्तीनेंच कांहीं काल घालविला.

( याप्रमाणें आपल्या जन्मपरंपरेचें वर्णन करीत असतांना मध्येंच आठवलेलीं कांहीं आश्चर्ये सांगण्यास आरंभ करितो— ) हे मुने ! आणखी एक फार मोठें आश्चर्य आहे तें तूं ऐक. अनंत ब्रह्मांडांनीं भरलेलें, ज्यांत जलचरांप्रमाणें सर्वत्र प्राणी भरलेले आहेत असें, ज्यांतील तेज, वायु व आकाश या तीन महाभूतांची सत्ता संदिग्ध आहे असें व जलांतील प्रतिबिंबाप्रमाणें जिची आकृति आहे अशा भूमीनें युक्त असें हें एक ब्रह्मच महदाश्चर्य आहे. त्यांतील नामरूपादि पदार्थजात किंचित् व्यक्त झालें होतें. अशा त्या ब्रह्मामध्यें एके ठिकाणीं मीं एक स्त्री पाहिली. तिच्या शरीरांत आकाश, पर्वत, दिशा इत्यादिकांनीं युक्त अशीं हीं त्रिभुवनें आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें दिसत होतीं. मीं तिला विचारलें—"हे सुंदरी! तूं कोण आहेस व तुझें शरीर असें का ?" ती म्हणाली "अरे बाबा ! या सर्व वस्तूंमध्यें सर्वांना प्रकाशित करणारी जी शुद्ध चित् ती मी आहें. हीं महाजगें हें माझें मूर्तामूर्तात्मक[1] शरीर आहे. हे श्रेष्ठा ! मी जगद्घटित असल्यामुळें जसें एक आश्चर्य आहे, त्याप्रमाणें हें सर्व वस्तुजात तसेंच जगद्घटित असल्यामुळें आश्चर्य आहे. तर मग सर्व लोकांना तें कां दिसत नाहीं, म्हणून म्हणशील तर सांगतें. जोंवर प्रत्येक वस्तूचा हा असा स्वभाव आहे हें कळलें नाहीं तोंवर कोणीच असें पहात नाहींत. पण जेव्हां आतिवाहिक भाव मात्र दृढ होईल व त्याचें तत्त्व कळेल, तेव्हां सर्व असेंच पहातील. ज्या जगामध्यें वेदशास्त्रासारखें विधिनिषेध सांगणारें शास्त्र नाहीं, त्या जगांतील भूतेंहि हें करावें व हें करूं नये अशा प्रकारचा अनाहत् ध्वनि आपोआपच ऐकतात. आपल्या देहाच्या एकदेशद्वारा ऐकला जाणाऱ्या त्या सामान्य ध्वनींत सर्व जगाचा अंतर्भाव होतो. सर्व पदार्थांमध्यें अनुवृत्त असलेली सत्ता ही जशा प्रकारचा हा शब्दसामान्यस्वभाव म्हणजे अनाहत ध्वनि आहे तशा स्वभावाची म्हणजे सर्व जगद्घटित सामान्य स्वभावाचीच आहे. कारण या जगांतील हे प्रसिद्ध पर्वतादि पदार्थहि ती ब्रह्मसत्ताच होय. पण त्यांतील भिंत, दगड इत्यादि पदार्थ बोलत नाहींत, यास्तव ते अचेतनच आहेत, असें समजून भ्रांत होऊं नये. कारण ते स्वप्नादिकांत प्रसिद्ध असलेल्या मायेप्रमाणें आतांहि माझ्यासमोर बोलत आहेत. अर्थात् अत्यंत जड म्हणून प्रसिद्ध असलेल्या भिंत, दगड इत्यादिकांत जर सर्व जगद्घटित चेतनत्व संभवतें तर चेतनप्राय असलेल्या तुम्हांमध्यें व तुमच्या देहांमध्यें तें कसें संभवणार नाहीं ? अवश्य संभवेल." पुढें मी अशा एका संसारांत गेलों कीं, ज्यांत स्त्रिया मुळींच नव्हत्या. त्यामुळें तेथें परस्पर विषयेच्छेचाहि अभाव दिसला. तेथें एका भूतापासूनच दुसरीं भूतें उत्पन्न होत असत व भूतांमध्येंच भूतें प्रविष्ट होत. एके ठिकाणीं मीं असें पाहिलें कीं, आकाशांत मेघांची दाटी होऊन गर्जनापूर्वक जी वृष्टि होत होती, तीच आपल्या निरनिराळ्या भागांनीं लोकांचीं आयुधें होत होतीं. म्हणजे त्या वृष्टीबरोबर जे पदार्थ खालीं पडत होते, तींच लोकांचीं तीक्ष्ण शस्त्रें होत होतीं. या जगांत जितके ग्राम व जितकीं

१ 'द्वे वाव ब्रह्मणा रूपे मूर्तं चैवामूर्तं च' 'यस्य सर्वाणि भूतानि शरीरम्' इत्यादि श्रुति याला प्रमाण आहेत. ( बृ. भा. )

गृहें आहेत तीं सर्व आंधळ्याप्रमाणें आकाश-मार्गांतून जात आहेत व दूर कोणत्या तरी दिशेंत जात आहेत असें मीं पाहिलें. तुमचा येथें असलेला ग्रामच मी दुसऱ्या ठिकाणीं पाहिला. एके ठिकाणीं मला असें दिसलें कीं, हे देव, हे सर्प, असे प्राणिविभाग मुळीं नाहींतच. सर्व भूतें सारखीं आहेत. तीं सर्व आकाशापासून उत्पन्न होतात व कांहीं कालानें त्यांतच लीन होतात. एक जगत् मला असेंहि दिसलें कीं, ज्यांत चंद्र, सूर्य व नक्षत्रें नाहींतच. पण असें असूनहि तेथें अंधकारहि नाहीं. कारण त्या जगांतील सर्व भूतें स्वयंप्रकाश होतीं. तें जगत् फारच रमणीय असून ज्वालेच्या मध्यभागाप्रमाणें प्रकाशमय होतें. त्यांत दिवस आणि रात्र हा विभाग नव्हता. ज्यांत अपूर्व दैत्य, सर्प, मनुष्य, अमर इत्यादि भूतें आहेत, ज्यांत वृक्ष व नगरेंहि अपूर्व म्हणजे पूर्वीं कधीं न पाहिलेलीं आहेत त्याचप्रमाणें ज्यांतील लोक अपूर्व कार्यें करीत आहेत अशीं अनंत महाविश्वें पाहिलेलीं मला आठवतात. फार काय सांगावें, महाराज! ज्या दिशेमध्यें मी हिंडलों नाहीं अशी एकहि दिशा नाहीं. मीं न पाहिलेला असा एकहि देश नाहीं. मीं ज्याचा अनुभव घेतला नाहीं असें एकहि कौतुक नाहीं व माझ्या विमर्शाहून म्हणजे अनुभवरूप सर्व साक्षीहून दुसरें आश्रयस्थानहि नाहीं. क्षीरसागरामध्यें मंथनासाठीं फिरविलेला जो मंदर पर्वत त्याच्या रत्नमय शिखरांच्या तीक्ष्ण धाराग्रांनीं भगवानाचीं बाहुभूषणें तासलीं जात आहेत व त्यामुळें होणाऱ्या ध्वनीकडे मेघगर्जनेच्या शंकेनें लोक पहात आहेत, असेंहि मीं पाहिलें. इतकेंच नव्हे तर त्या आश्चर्यकारक शब्दाची मला चांगली आठवण आहे. १३१.

---

# सर्ग १३२ वा.

—:०:—

१ भास पुनः जन्मपरिभ्रमाचें वर्णन करितो. २ अनेक आश्चर्यें सांगतो व ३ संसाराचें निःसारत्व व्यक्त करतो.

भासः—मंदरपर्वतावरील मृदु मंदारमंदिरांत मंदार नांवाच्या अप्सरेला आलिंगन देऊन निजलेल्या मला नदीनें प्रवाहांत पडलेल्या तृणाप्रमाणें आपल्या बरोबर वाहून नेलें. मीं तापसस्वभाव दीर्घकाल स्वीकारल्यामुळें मला ही सिद्धि प्राप्त झाली होती. त्यायोगें मला मंदरपर्वतावर असा विहार करतां आला. नदीच्या प्रवाहाबरोबर मी तिच्यासह वाहून जाऊं लागलों असतां जलानें व्याकुल झालेल्या त्या अप्सरेला धीर देऊन मीं विचारिलें, 'हे बाले! आम्ही या जलप्रवाहांतून असे एकाएकीं वाहून कां जाऊं लागलों आहों?' तेव्हां जिचे नेत्र चंचल आहेत, अशी ती स्त्री मला म्हणाली—'येथें चंद्रोदय झाला असतां चंद्रकांतशिलामय पर्वतकड्यांपासून निघालेल्या नद्या वाढतात. त्या कड्यांतून जलाचा स्राव होऊं लागतो व त्यामुळें त्यांला पूर येतो. ज्याप्रमाणें रात्रीला आरंभ झाला असतां आपल्या प्रियतमांच्या सहवासांत असलेल्या स्त्रिया कामानें मदयुक्त होतात, तशीच या नद्यांची स्थिति होते. शयन करण्यापूर्वीच वस्तुतः मीं ही गोष्ट सांगावयास पाहिजे होती, पण काय करूं? तुमच्या समागम-रसास्वादांत निमग्न झाल्यामुळें मीं तें विसरूनच गेलें.' असें बोलून गंगेतील सुवर्णकमलावर बसलेली भ्रमरी आपल्या सहचरभृंगाला घेऊन आकाशांत जशी उडून जाते, त्याप्रमाणें ती मला घेऊन आकाशांत उडून गेली. त्या जलानें भिजलेला मी त्यानंतर कर्दमाचा ज्याला गंधहि नाहीं

अशा मंदरपर्वतावर तिच्यासह सात वर्षे राहिलों. दुसऱ्या जन्मामध्यें मीं आणखी एक जगत् पाहिलें. तें नक्षत्रचक्रानें रहित होतें. केळीच्या सोपटांप्रमाणें एकाच्या आंत एक असे असलेल्या एका जातीच्या स्वप्रकाश लोकांनीं तें व्यापलेलें होतें. तेथें या पूर्वादि दिशांचा विभाग नाहीं, दिवस नाहीं, शास्त्रें नाहींत, वेदवाद नाहींत व देवासुरादि भेद नाहीं. ' तर मग तेथें लौकिक व वैदिक व्यवहार प्रवृत्त कसा होत होता ? ' म्हणून विचाराल तर सांगतों. तशा प्रकारचें जगत् स्वतःच प्रकाशमान होत होतें. दुसऱ्या एका जन्मामध्यें समुद्राच्या तीरावरील अति उंच पर्वततटावर मी अमरसोम नांवाचा तपस्वी विद्याधर होऊन चौदा वर्षें राहिलों. तो प्रदेश विद्याधर, देव यांच्या विहाराची विमानभूमिच होती. त्यानंतर मी अग्नीच्या वरवैभवानें जगामध्यें सर्भोवार अविद्येचा अंत पाहण्याचा इच्छेनें संचार करूं लागलों. मीं पृथ्वीवरून वायूसारख्या वेगानें युक्त असे नानाप्रकारचे जातिवंत अश्व, मेघांप्रमाणें ज्यांचे देह आहेत असे लोक, हरिण, मृगेंद्र, वृक्ष, वेली, इतर पशु, पर्वत, सूर्य, पक्षी यांनीं व्यापलेल्या अनंत कोश रूप आकाशांत येऊन गरुडाप्रमाणें वेगानें पुढें चाललों. कोठें त्या जगांतून बाहेर पडलेला मी एकार्णवासारख्या विस्तृत आकाशामध्यें पडलों. त्यांतच निवास करणाऱ्या नक्षत्रसमूहांत बद्ध होऊन दिवस, रात्र, मास, ऋतु इत्यादि समयांचा अनुभव घेतला. याप्रमाणें दिशांतील गमनाचाहि अनुभव घेतला. याप्रमाणें आकाशकोशामध्यें गमन करणें हाच एक ज्याचा मुख्य व्यापार आहे असा मी दीर्घ काल गमन केल्यानें श्रांत झालों. मला झोंप आली. त्यामुळें मी तेथेंच निजलों. निद्राशरीरानें स्थित असतां, मला स्वप्नात्मक जागृतीचा अनुभव येऊं लागला. त्या अवस्थेंत मीं आपल्या स्वरूपांतच विश्व पाहिलें. वाऱ्यानें हालणाऱ्या लतेकडून जसा पक्षी, त्याप्रमाणें त्या स्वप्नांतहि पुनः दिगंत, भुवनें, देव, मंदरपर्वत इत्यादि संसाराच्या चंचललतेकडून हालविला जाणारा मी पूर्वसंकल्पित व त्याच प्रमाणानें युक्त असलेल्या जगद्गुहेमध्यें पडलों. नेत्राची विषयाशा जेथवर पसरली होती तेथवर मी एका क्षणांत गेलों आणि पुनः पूर्वीप्रमाणेंच पाहूं लागलों. अविद्येचा अंत पहाण्याच्या कौतुकानें मी पुनः पुनः दृश्याला प्राप्त झालों. याप्रमाणें दृश्य व अदृश्य, गम्य व अगम्य अशा प्रदेशांचें वेगानें उल्लंघन करणाऱ्या माझीं हजारों वर्षें निघून गेलीं. पण या दृश्यसंज्ञक अविद्येचा मला अंत लागला नाहीं. हृदयामध्यें मिथ्याच रूढ झालेल्या पिशाचीचा अंत जसा बालकाला लागत नाहीं, तशीच माझी अवस्था झाली. मी जरी ' हें सत् नव्हे, हें सत् नव्हे ' अशा विचारानुभवामध्यें स्थित होतों, तरी ' हें सत्य आहे, हेंहि सत्य आहे, ' अशा प्रकारची प्रत्येक विषयाविषयींची माझी दुर्वासना निवृत्त झाली नाहीं. कारण फार दिवसांच्या अभ्यासानें दृढ झालेली द्वैतसत्यत्वभावना फारच प्रबल होती. विचारानें घालविलेल्याहि दुर्दृष्टि प्रतिक्षणीं प्राप्त झालेल्या सुखांनीं, दुःखांनीं, देशकालभेदांनीं व इष्टानिष्ट जनांच्या समागमांनीं नदीच्या पाण्याप्रमाणें नवीन नवीन येत होत्या. मला आतां आणखी एका पर्वतशिखराची आठवण झाली आहे. तें ताली, तमाल, बकुल यांनीं युक्त असलेलें शृंग फार उंच होतें. तेथें सोसाट्याचा वारा वहात होता. तें सूर्यादिकांनीं रहित होतें. आपल्या कांतीनेंच प्रकाशमान होत होतें. विश्व हें त्या शृंगाच्या स्थावर-पर्वताचे कडे व जंगम प्राणी यांनीं युक्त असलेलें जें एक उंच शिखर त्याच्या

स्थानीं होतें. म्हणजे विश्व हें जणूं काय त्याचें शिखरच होतें. ( अर्थात् सर्वाधिष्ठान ब्रह्मच हें येथील आश्चर्यकारक शृंग होय. ) हें शृंग एकांतामध्यें रहाणाऱ्या तत्ववेत्त्यांना फार मनोहर वाटतें. तें स्वतंत्र, एक, अमर्याद, निर्विकार आहे. तें त्रिविध परिच्छेदशून्य आहे. तें क्वचित् ब्रह्मवेत्त्यांच्या समाजांत दिसतें. देवांची राजलक्ष्मीहि त्याची बरोबरी करूं शकत नाहीं. १३२.

---

## सर्ग १३३ वा.

१. भासानें पाहिलेलें आणखी एक आश्चर्य. २ सप्तद्वीपप्रमाण शवाचें आकाशांतून पतन.

विपश्चित्:—हे मुने ! या जगाहून भिन्न अशा एका अपूर्व जगांत मीं एक विचित्र आश्चर्य पाहिलें, तें तूं ऐक. ब्रह्महत्त्यादि महा पातकांच्या फलभूत रौरवादि नरकवृत्तांतासारखेंच अतिशय बीभत्स असलेलेंहि हें आश्चर्य अविद्येनें अंध झालेल्या मीं अग्नीच्या वरामुळें पाहिलें, इतकेंच नव्हे तर त्याचा अनुभवहि घेतला. तुम्हांला जाण्यास अशक्य अशा एका आकाशांत एक जगत् आहे. त्यांत सूर्यादिदीप्तीनें विचित्र झालेला एक सर्ग आहे. तें जगत् आकारानें या ब्रह्मांडासारखेंच आहे, तरी आकाशदृष्टया पाहिल्यास शून्य असल्यामुळें याहून निराळ्याच प्रकारचें आहे. जसें स्वप्नांत पाहिलेलें नगर जागृतींत पाहिलेल्या नगरासारखेंच जरी असलें तरी जाग्रद्दृष्टया शून्य असल्यामुळें निराळेंच असल्याप्रमाणें चित्तांत भासतें, तसेंच तें निराळें होतें. त्या जगांत विहार करीत असलेल्या मीं स्वाभिलषित अर्थ दिगंतीं पहाण्यासाठीं आपले चक्षु सभोंवार फिरविले आणि जों मी पहातों तों पृथ्वीवर भ्रमरांच्या थव्यासारखी काळी व पर्वताएवढी मोठी छाया भ्रमण करीत असलेली मला दिसली ! ती फारच मोठी असल्यामुळें अत्यंत आश्चर्यकारक अशी ही छाया कशाची बरें असावी, असा विचार करीत मी आपली दृष्टि वर अन्तरिक्षांत जों लावीत आहें, तों एका पर्वताकार पुरुषाचें शरीर आकाशांतून खालीं पडत आहे, असें मला दिसलें. तें धिप्पाड शरीर खालीं पडत असतांना वावटळींतील पानाप्रमाणें गरगर फिरत होतें. " पर्वताप्रमाणें गुरु व आकाशाला भरून सोडणारा असा ज्याचा देह आहे तो हा पुरुष कोण बरें असावा ? एखादा पर्वत ढांसळून जसा खालीं पडावा तसा हा खालीं पडत आहे ! हा ब्रह्मा आहे, कीं ब्रह्मांड हें ज्याचें शरीर आहे असा विराट्-पुरुष आहे ? त्याच्यामुळें परमाकाश असा जो सूर्य तोहि दिसेनासा झाला आहे. त्याची सर्व दिनशोभा लुप्त झाली आहे. " मीं अशा प्रकारचा विचार आपल्या मनांत जों करीत आहे, तों आकाशांतून एकाएकीं सूर्य वेगानें खालीं पडला ! त्या वेळीं म्हणजे तो पडतांना कल्पान्तवायूंनीं ज्याला गरगर फिरविलें आहे अशा ब्रह्माण्डाच्या ऊर्ध्व कपालाचा पात झाल्याप्रमाणेंच मोठा भयंकर ध्वनि झाला. ती भयानक स्वरूपाची पारावारशून्य पुरुषाकार वस्तु पडत असतांना व सप्तद्वीपयुक्त पृथ्वीला क्षणांत भरून सोडीत असतांना आपलें शरीर त्याच्या खालीं अवश्य चिरडून जाईल आणि द्वीपें व भुवनें यांसह नाश पावेल असें जाणून मीं समीप असलेल्या अग्नींत प्रवेश केला. पूर्वीच्या अनेक जन्मांतरीं ज्याची पूजा केली आहे असा तो भगवान् अग्नि चंद्राप्रमाणें शीतळ होऊन 'भिऊं नको' असें मला साक्षात् म्हणाला. तेव्हां 'हे देवा, तुझा जयजयकार असो, प्रत्येक जन्मा-

मध्यें आमची परमगति तूंच आहेस. हा अकालींच कल्पांत ओढवला आहे. यास्तव हे प्रभो, माझें रक्षण कर,' असें मीं बोललों. मजकडून बोलला गेलेला तो अग्नि 'भिऊं नको' असें मला पुनः बोलला. 'ऊठ, ये; हे निष्पापा! आपण अग्निलोकीं जाऊं या.' असें बोलून त्या भगवानानें मला पोपटाच्या पाठीवर बसविलें व खालीं पडत असलेल्या शवाच्या कांहीं भागाला जाळून व छिद्र करून तो त्यांतून वर आकाशांत निघून गेला. तेव्हां आकाशांत येऊन, ज्याची आकृति अतिशय कष्ट देणारी आहे अशा त्या भयप्रद महोत्पातरूप भूतसंपाताला मीं पाहिलें. ती विशाल आकृति खालीं पडली असतां समुद्र, पर्वत, वनें, जंगलें यांच्या समूहानें युक्त असलेली पृथ्वी चळचळ कांपूं लागली. ज्यांचा जलप्रवाह निरुद्ध झाला आहे अशा नद्या दोन्ही तीरांचें उल्लंघन करून वाहूं लागल्या. त्यामुळें पर्वतांच्या कड्यांवरून दोन मोठे धबधबे पडूं लागले. पृथ्वींतून फार मोठा ध्वनि निघाला. उत्तरदिशेतून आवाज निघाला. दक्षिण व पूर्व दिशांतूनही आवाज निघाला. आकाश जणुंकाय रडूंच लागलें! पर्वतासह सर्व भूतें आक्रोश करूं लागलीं. सर्व भूतें भयभीत झालीं. या वेळीं प्रलयच ओढवला आहे कीं काय असें वाटलें. सर्व आकाशामध्यें 'घुम घुम' असा ध्वनि होऊं लागला. वायूचा क्षोभ सुरू झाला. मेघांचे कडकडाट होऊं लागले. दऱ्या व पर्वत यांचें विदारण होऊं लागलें व त्यापासून भयंकर शब्द निघाला. सर्व भूतें क्षुब्ध झालीं व कल्पांताप्रमाणें सर्व प्राणी व्याकुल झाले. तें भयंकर शव पृथ्वीवर जोरानें येऊन आपटलें असतां पृथ्वीला शतशः वेध झाले. कुलपर्वतांचे मोठमोठे तट त्याच्या खालीं चुरून गेले. हिमालयाचीं शिखरें पातालांत शिरलीं. मेरुपर्वतावरील शिलेप्रमाणें ज्याची आकृति आहे, अशा त्या शवाच्या पतनानें पर्वतशिखरांचें व भूमीचें विदारण केलें. समुद्रामध्यें क्षोभ उत्पन्न झाला. त्यानें पर्वतांना भूमीबरोबर सपाट करून टाकलें. सर्व भूतांना पीडा झाली, व प्रलयाची इच्छा करणाऱ्या रुद्रगणांना तो एक खेळच झाला. त्यानें सूर्याला भूतलीं पाडविलें. द्वीपपरंपरेला आच्छादित केलें. सर्व पर्वतांचें पीठ केलें व निरनिराळ्या देशांना विदीर्ण केलें. तें जणुंकाय मूर्तिमंत दुसरें भूपीठच किंवा ब्रम्हांडाचा तुकडाच होतें. आकाशचरांनीं जणुंकाय आकाशच साकार होऊन खालीं पडलें आहे असें पाहिलें. पण मी जों त्याकडे पहात आहें, तों तो मांसमय पर्वतच आहे असें मला वाटलें. सप्तद्वीपयुक्त पृथ्वींत त्याचें एकेक अंगहि मावेना. त्याला पाहून माझ्यावर प्रसन्न असलेल्या व अनुग्रह करण्यास तयार असलेल्या भगवान् अग्निदेवाला मीं विचारलें कीं, हे प्रभो, हें काय आहे? हा मांसमय देह कसा पडला? त्याच्याबरोबर आकाशांतून हा सूर्यहि कसा पडला? पर्वत, वनें व सागर यांसह सर्व भूपृष्ठांतहि हा मावत नाहीं!

अग्निः—पुत्रा! तूं एक क्षणभर अगदीं शांतपणानें धीर धर. याच्या पतनामुळें उत्पन्न झालेला दोष पूर्णपणें शांत होऊं दे, मग मी तुला सर्व सांगेन. भगवान् अग्नि जों असें बोलत आहे तो सर्व दिशांतून आकाशचर जीव तेथें जमले. त्या जगांत उत्पन्न झालेल्या निरनिराळ्या जातींचे ते सर्व आकाशांत झालेल्या वस्त्रभूषणादिकांनीं युक्त होते. सिद्ध, साध्य, अप्सरा, दैत्य, गंधर्व, नाग, किन्नर, ऋषि, मुनि, यक्ष, पितर, मातृदेवता, देव, हे सर्व तेथें जमले आणि ते नमश्चर भक्तीनें आपलीं मस्तकें नम्र करून शरण जाण्यास योग्य अशा सर्वेश्वरी कालरात्रिदेवीचें स्तवन करूं लागले.

"जी देवी कल्पांतीं संहार केलेल्या ब्रम्हदेवाचें फार मोठें पिंगटवर्ण जटामंडल आपल्या खट्वांगाच्या टोंकावर बांधून, त्याचप्रमाणें दैत्यांच्या मस्तकांची माला गळ्यांत घालून, मारलेल्या गरुडाच्या पंखांचें शिरोभूषण व कर्णभूषण करून, सर्व प्राण्यांना खाऊन, पर्वत, भूपृष्ठ व भूतें यांसह सर्व जगाला प्राशन करते, त्याचप्रमाणें सर्व जगाचा संहार करूनहि जिला दोषाचा लेश लागत नाहीं. आणि शुद्ध चिन्मात्रस्वभाव असूनहि जी आम्हांवर अनुग्रह करण्याकरितां शरीर धारण करते, ती ज्यांचें पालन करणें अवश्य आहे अशा आमचें आज रक्षण करो." १३३.

---

## सर्ग १३४ वा.

—:०:—

१ आविर्भूत झालेल्या देवीच्या शरीराचें वर्णन २ तिनें केलेलें शवाचें रक्तप्राशन ३ व तिच्या गणांनीं त्या शवाचें केलेलें मांसभक्षण.

विपश्चित्:—इतक्यांत आकाशांतून पडणारा व ज्यानें सर्व भूपृष्ठाला आच्छादित केलें आहे असा तो पुरुष शवरूप ह्मणजे निर्जीव आहे असें मीं ओळखलें. पण ज्या शवभागानें सप्तद्वीपयुक्त पृथ्वीलाहि झांकलें आहे व जो पर्वतासारखा भाग सर्व पृथ्वींतहि मावत नव्हता, तो त्याचा केवल उदरभागच होता; व मीं त्या भागालाच तेवढें पाहिलें! पण अतिशय दूर असलेल्या तुला हें कसें कळलें ह्मणून विचाराल तर सांगतों. तें शरीर अनंत होतें. मला त्याचे अवयव दिसणें शक्य नव्हतें; पण अग्नीनें 'या त्याच्या भुजा आहेत, हें मस्तक आहे, या मांड्या आहेत,' असें मला सांगितलें. मनुष्याच्या इंद्रियादिकांची जेथें गतिच होत नाहीं अशा लोकालोकपर्वताच्या पलीकडे तें त्याचें शरीर गेलें होतें. असो. ते आकाशचर देवीची मोठ्या आदरानें स्तुति करूं लागले. तेव्हां ती देवी आकाशांतूनच प्रकट झाली. ती जणुंकाय त्या वेळीं अगदीं शुष्क म्ह० रक्तरहितच होती. तिच्या मागोमाग प्रेतांचा समुदाय येत होता. मातृदेवतांच्या समूहांनीं ती भूषित झाली होती. कुष्मांड, यक्ष, वेताळ यांच्या समूहानें तिनें आकाशाला जणुंकाय नक्षत्रयुक्तच केलें होतें. ज्यांतील शिरा अगदीं स्पष्ट दिसत आहेत अशा दीर्घ भुजदंडांनीं तिनें नभस्तलाला जणुंकाय वनच केलें होतें. ती सर्व दिशांना जाळणाऱ्या आपल्या दृष्टिपातांनीं जणुंकाय सूर्यांनाच फेंकित होती. चमकणाऱ्या नानाप्रकारच्या आयुधांनीं आकाशांत पक्षिसमूहाचे शतशः तुकडेच करीत होती. देहज्वालांनीं व नेत्राग्नीच्या उष्णतेनें युक्त असलेल्या शरीरावयवांनीं दीर्घ वेणुवनाकार अंगकांति कोटि योजनें दूर पसरीत होती. ती आपल्या दंतकांतिरूप इंदुप्रकाशांनीं जणुंकाय दिशांच्या मुखांना दुग्धस्नानच घालीत होती. तिचें शरीर अति कृश, अति दीर्घ व अति विस्तीर्ण असून तिनें सर्व आकाशाला व्यापून सोडलें होतें. त्यामुळें संध्याकाळची अभ्रमालिका जशी पसरलेली असावी त्याप्रमाणें ती निराधार स्थित होती. ती प्रेताच्या आसनावर बसली होती. ब्रम्हामध्यें चांगल्या प्रकारें प्राविर्भूत झाली होती. मगनरूप महासागरांत वडवाग्नीच्या शोभेला धारण करीत होती. शवें, शवांचीं अंगें, मुसल, प्रास, तोमर, मुद्गल, आसनें, उखळ, नांगर यांच्या चंचल माला ती आपल्या अंगावर धारण करीत होती. कडाकड दांत चावून गगनांगणांत लोकांच्या शरीरमालेला वहात होती. ज्याप्रमाणें वर्षर्तूतील पर्वत घरघर आवाज करणाऱ्या

निर्झरांनीं युक्त अशी पाषाणमाला आपल्या अचल देहावर धारण करतो, त्याचप्रमाणें ती मनुष्यशरीरांची माला धारण करीत होती. देव तिला म्हणाले– 'हे अंबिके, हें शव तुझ्या उपहारासाठीं अर्पण केलें आहे, तें आपल्या परिवारासह तूं शीघ्र भक्षण कर.' देवसमूहानें अशी प्रार्थना केली असतां ती देवी आपल्या प्राणवायूनें त्या शवांतील रक्तरूपी सार आकर्षण करून घेऊं लागली. ती देवी स्वतः प्राणशक्ति होती व प्राणच रक्ताचा आधार आहे. म्हणून प्राणवायूनेंच ती त्याचें रक्त शोषून घेऊं लागली. प्राणाकडून आकर्षण केलें जाणारें तें रक्त भगवतीच्या मुखांत प्रविष्ट झालें. त्या वेळीं मेरूच्या गुहेंत शिरणाऱ्या सांध्य मेघांच्या समूहाप्रमाणें तें शोभलें. आकाशामध्यें स्थित असलेल्या तिनें प्राणानें आकर्षण करून घेतलेलें रक्त इतकें प्राशन केलें कीं, जी पूर्वी शुष्क होती ती तृप्त होऊन मागून अतिशय पुष्ट होऊन राहिली. रक्तानें जिचें शरीर अतिशय पुष्ट झालें आहे, अशी ती चंडिका वर्षाकाली वीज हेच जिचे चंचल नेत्र आहेत अशा रक्तवर्ण अभ्रमालेप्रमाणें शोभली. तिचें उदर लांब होतें. त्या भगवतीनें भयंकर सर्पांचीं भूषणें धारण केलीं होतीं. रक्तरूपी आसवाच्या मदानें ती मत्त झाली होती. समस्त आयुधांनीं भूषित झाली होती. आपल्या शरीरानें जिनें अर्धे आकाश भरून सोडलें आहे, अशी ती नृत्य करूं लागली. लोकालोक पर्वताच्या शिखरपंक्तीवर अग्रभागीं बसलेल्या देवांनीं तिला पाहिलें. त्यानंतर पिशाच, कूष्मांड, रूपिका इत्यादि महागणांनीं त्या शवाला चोहों बाजूंनीं घेरलें. मेघ महापर्वताच्या सभोंवार जसे उभे रहातात, त्याप्रमाणेंच ते त्याच्या सभोंवार जमले. त्या शवरूपी महापर्वताला कूष्मांडांनीं कटिप्रदेशीं ग्रहण केलें. रूपिकासमूहांनीं उदरापासून धरलें. यक्षांनीं आपल्या दंतांनीं क्षत करून पार्श्व-पृष्ठभागाला ग्रहण केलें. भुजा, मांड्या, स्कंध इत्यादि त्याचे जे दुसरे अवयव होते, ते ब्रम्हांडाच्या पलीकडे गेलेले होते. ते फारच विस्तृत असल्यामुळें त्या भूतसंघातापासून फार दूर दिगंतरीं होते, म्हणून त्यांच्या तावडींत ते सांपडलेच नाहींत. कालानेंच त्यांना आपल्या उदरांत पचवून सोडलें. याप्रमाणें ती चंडिका आकाशांत नृत्य करूं लागली असतां, तिच्या बरोबरीचा भूतसमुदाय त्या शवाला खाण्यांत निमग्न झाला असतां व देव पर्वतावर बसले असतां सर्व भुवन असें झालें:—त्यांतील सर्व दिशा पिंडशः खाल्या जाणाऱ्या व नेल्या जाणाऱ्या दुर्गंधयुक्त मांस-वसादिकांनीं व्यापून गेल्या. सर्व भूभाग रक्तानें माखल्यामुळें अभ्रसमूहासारखा दिसूं लागला. खदिरांगाराप्रमाणें सर्व भुवन उज्ज्वल झालें. भूतें मांसाचें चर्वण करीत असतां त्याचा चोहोंकडे 'छव छव' असा ध्वनि निघूं लागला. लतांसारख्या शिरा व अस्थि यांच्या खंडनामुळें आकाशांत 'कट कट' असा मोठा आवाज होऊं लागला. भूतांचें परस्पर संघट्टण व विश्लेष यांमुळें भयंकर आवाज झाला. या भुवनांत हिमालय, विंध्य यांच्यासारखा प्रचंड हाडांचा पर्वत झाला. देवीच्या मुखांतून निघालेल्या अग्निज्वालांनीं पक्व झालेल्या मांसानें भूतल भरून गेलें. त्यांतील सर्व दिशा रक्ताच्या तुषारांनीं व बाष्पांनीं रक्तवर्ण झाल्या. सर्व बाजूंनीं पाहाणाऱ्या देवांनीं दिशांमध्यें जणुंकाय तटच उभारला होता. रक्ताचा एकार्णव होऊन त्यांत सप्तद्वीपवती पृथ्वी बुडून गेली होती. सर्व पर्वतमंडल अतिशय झांकून गेलें होतें. दिग्वधू रक्तवस्त्रानें आच्छादित झाल्याप्रमाणेंच दिसत होती. वर्तुल व चंचल भुजांनीं देवी व तिचे गण आकाशांत आपापलीं आयुधें

फिरवूं लागले. त्यामुळें नभःस्थल झांकून गेलें होतें. नगरें, पट्टणें, देश यांचा तर तेथें पत्ताहि लागत नव्हता. सर्व स्थावर व जंगम यांना अत्यंत असंभवनीय रूप प्राप्त झालें होतें. अनंत कूष्मांड, रूपिका इत्यादिकांचा एकच संगम झाला होता. नृत्यामध्यें प्रवृत्त झालेले जे भूतगण, त्यांचे जे अभिनयाकार, तद्रूप पक्ष्यांच्या बंधनासाठीं पसरलेल्या जाळ्याप्रमाणेंच व आकाशांत दुसरें जगत् रचित असलेल्या विधीच्या मानसूत्राप्रमाणेंच भासणारीं त्या शवाचीं आंतडीं सूर्यलोकापर्यंत सभोंवार त्या पिशाचांनीं पसरलीं होतीं. तशाप्रकारचें तें जगत् पाहून देव खिन्न झाले. लोकालोकपर्वताशिखरावर असलेल्या त्यांना पूर्वीची भूपीठस्थिति रक्तसागरमय झाली आहे असें वाटलें व या शवाच्या अंगांनीं सप्तद्वीपांपर्यंत त्याचें आक्रमण केलें आहे असें पाहून अकस्मात् उद्भवलेल्या या उत्पातानें त्याचा नाश केला आहे, असेंच त्यांना भासलें.

श्रीरामः—हे ब्रह्मन्! ज्याचे हस्तपादादि अवयव ब्रह्मांडांतूनहि निघून पलीकडे गेले, त्यानें तो लोकालोकपर्वत आच्छादित कसा केला नाहीं?

श्रीवसिष्ठः—हे रामा! या द्वीपसप्तकामध्यें त्याचें उदर म्ह० मध्यशरीर स्थित होतें. मस्तक, पाय, भुजा इत्यादि अंगें ब्रह्मांडाच्या पलीकडे स्थित होतीं. तथापि त्या शवाच्या कुशी, दोन्ही मांड्यांचा मध्यभाग, कटि, पार्श्वभाग, शिर व दोन खांदे यांच्या मधला भाग यांनीं शृंगांना आच्छादित केलेलें नसल्यामुळें तो लोकालोकपर्वत वर दिसतच होता. ते देव त्या शिखराच्या मस्तकावर बसलेले दिसत होते. (याप्रमाणें रामाच्या प्रश्नाचें उत्तर सांगून वसिष्ठ भासाला माहित नसलेलाहि कथेचा अवशिष्ट भाग सांगतात-) बा रामा, त्या पर्वतशिखरावर बसलेले देव, अतिसंतापामुळें किंवा शरत्कालच्या सूर्यतापामुळें जलरहित मेघ जसे दिसतात, त्याप्रमाणें अत्यंत शुद्ध कांतीचे दिसत होते. तें शव आपले हातपाय पसरून अधोमुख पडलें होतें व त्याला तो भूतसमुदाय खात होता. मातृकागण नाचत होता. रक्ताचे प्रवाह वाहत होते व मेदाचा दुर्गंध सभोंवार पसरत होता. तेव्हां दुःखित झालेले देव आपल्याशींच असें चिंतन करूं लागले. "अरे अरे! मोठी कष्टतर गोष्ट घडली. पृथ्वी कोठें गेली! समुद्र कोठें गेले! पर्वत कां दिसत नाहींत? जनसमूहांचें काय झालें? चंदन, मंदार, कदंब यांच्या वनांनीं मंडित झालेला व पुष्पराशीचा जणुंकाय मंडपच असा मलय कोठें नाहींसा झाला? अरेरे! त्या अतिशय उंच, अतिशय शुद्ध व अफाट अशा हिमालयाच्या भूमि किती शुभ्र दिसत होत्या! पण या रक्तानें त्या शुभ्रत्वाच्या मत्सरानेंच जणुंकाय त्यांना आपल्यासारखेंच करून सोडलें. क्रौंचद्वीपांतील क्रौंच पर्वतावर जो मोठा कल्पद्रुम होता, ज्याच्या शाखा ब्रह्मलोकाप्रमाणें सुशोभित दिसत होत्या, त्याचाहि चूर उडाला! पारिजात, लक्ष्मी, चंद्र, अमृत यांचा जनक अशा हे क्षीरसागरा! लोण्यांनीं भरलेले जे पर्वत त्यांवर ज्याचें वेलावन उद्भवलें आहे अशा दधिसागरा! तीरस्थ नालिकेरप्रधान पर्वतावर योगेश्वरी ज्याचें सेवन करीत आहे अशा हे मधुसागरा! खरोखर तुम्ही सर्वांहि शोचनीय अवस्थेस प्राप्त झालां आहां! आतां तुम्ही आम्हांला कोठें दिसाल? स्फटिकादि रत्नशिलांच्या योगानें देवस्त्रियांच्या व दिशांच्या दर्पणत्वास कोठें प्राप्त झालां आहां? कल्पद्रुम व निर्मल सौवर्णलता यांच्याशीं ज्याचा निरुपाधिक संबंध आहे अशा क्रौंचपर्वतयुक्त असलेल्या

हे क्रौंचद्वीपा! त्याचप्रमाणें ब्रह्मदेवाचे हंस व नलिनी यांनीं ज्याचें दिक्चक्र भरून सोडलें आहे अशा व कदंबाच्या अरण्यांनीं युक्त असलेल्या दऱ्यांतून विश्रांति घेणाऱ्या विद्याधरांचें व रतिक्रीडेमध्यें प्रवीण असलेल्या देवांचें जणुंकाय गृहच अशा हे पुष्करद्वीपा! तुम्ही दोन्ही कोठें गेलां आहांत? स्वादूद पर्वताच्या व तत्संबंधीं उग्र तापाला घालविणाऱ्या पुष्पाच्छादित वनांच्या, गोमेद द्वीपांच्या, त्यांतील कल्पद्रुमांच्या कनकलतांनीं रमणीय झाले. ल्या दऱ्यांच्या, त्याचप्रमाणें कल्पवृक्षांच्या वनांनीं आच्छादित झालेल्या व त्यांच्या पुष्पांनीं शुभ्र दिसणाऱ्या क्रौंचद्वीपसहित त्या द्वीपाच्या स्मरणानेंच मनुष्यांना स्वर्गसुख देणारें पुण्य लागतें. मंद मंद वायूनें ज्यांचे पल्लव हालविले आहेत अशा लहान लहान वल्लींनीं युक्त असलेल्या संतान कल्पवृक्षांनीं ज्यांच्या सर्व दिशा प्रकाशीत केल्या आहेत तशा प्रकारचीं तीं सर्व वनें उध्वस्त झालीं. अरे अरे! आतां यापुढें आमच्यासारखी जनता चित्तसमाधानास कशी प्राप्त होईल, कांहीं कळत नाहीं. इक्षुरससागराच्या तीरावर खडिसाखरेच्या पर्वतांनीं व्यापलेल्या भूमींतील तीं अतिशय गोड वनें व गुडमोदक आम्हीं केव्हां पाहूं? साखरेच्या बाहुल्या आह्मांला केव्हां दिसतील? ताली व तमाल यांच्या वनांनीं युक्त असलेल्या पर्वताच्या, कदंब व कल्पद्रुम यांनीं शीतल झालेल्या कनकलतावलयांत बसून पूर्वी पुष्कळ वेळां अनुभविलेलें चंदनलिप्त अप्सरांचें नृत्य आम्ही केव्हां पाहूं बरें! जंबुद्रुमाचीं तीं हत्तीएवढालीं मोठीं, अमृतासारखीं गोड व सुवर्णाला कारण होणारीं अशीं प्रसिद्ध जम्बुफळें हरहर, नामशेष झालीं! द्वीपें व समुद्र हीच जिची मेखला आहे अशा प्रकारची ही जंबूद्वीपरूप पृथ्वी त्या फळाच्या रसरूपी जलांनीं उत्पन्न झालेल्या नदीला वहाते. शिलींध्र वृक्षांनीं भरलेल्या पर्वतांच्या गुहांमध्यें मधूनें मत्त झालेल्या अप्सरांनीं जेथें गायनयुक्त नृत्य केलें आहे, अशा सुरोदसमुद्राच्या तीराला पुनः पुनः आठवून माझें हृदय प्रातःकालच्या कमलाप्रमाणें व या वेळच्या पृथ्वीप्रमाणें विदीर्ण होत आहे. हे मित्रा! रक्त हेंच ज्यांतील जल आहे अशा या नूतन समुद्राच्या ऊर्ध्वभागीं मेरुप्रभृति पर्वतांचीं सुवर्णशिखरें उत्तर दिशेंत सूर्याच्या उदयास्ताजवळच्या भूमींत संध्यासमयीं किंचित् उदय पावलेल्या रक्तवर्ण इंदुकलेप्रमाणें दिसत आहेत, पहा. अशा प्रकारचे सागररूप जलसमूह हींच जिचीं वलयें आहेत व निरनिराळ्या द्वीपांनीं जी भूषित झाली आहे; उंच पर्वतावरील मेघसमूहरूप नीलकमलांची जणुंकाय आधारस्थलीच, नद्या, जंगलें, योद्ध्यांनीं उग्र झालेलीं नगरें, ग्राम, ब्राह्मणांचे अग्रहार हींच जिचीं वस्त्रें आहेत, तरुपल्लवांकुरादि हीं जिचीं भूषणें आहेत अशी पृथ्वी, अरेरे! कोठें गेली, कांहीं कळत नाहीं! १३४.

---

## सर्ग १३५ वा.

१ भूतसमूहांनीं मांस खाऊन व देवीनें रक्त पिऊन भूमीला मेदानें मेदिनी केली. २ व अवशिष्ट रक्तानें मदिरार्णव केला.

श्रीवसिष्ठः—त्या मत्त भूतसमूहानें त्या शवाला किंचित् अवशिष्ट राखलें असतां दिगंतांतील पर्वतावर इंद्रासह बसलेले देव असें म्हणाले.

देवः—विद्याधर व देव यांच्या विहारासाठीं असलेलीं जीं विमानें त्यांच्या संचार-

भूमींत म्हणजे आकाशांतहि संताप उत्पन्न करण्यासाठीं देवीच्या गणांनीं मेदप्रचुर व वाऱ्यानें पसरलेल्या शुभ्र अभ्रखंडांनीं व्यापलेल्या आकाशासारखीं मोठमोठीं आंतड्याचीं जाळीं पसरलीं आहेत, पहा. सातहि द्वीपांमध्यें या भूतांनीं मेदोजल शिंपडलें आहे. त्यांनीं शवांतलि सर्व मांस भक्षण केलें आहे, व त्यांतील सर्व रक्त पिऊन टाकलें आहे. त्यामुळें आतां भूमीचा थोडासा भाग दिसूं लागला आहे. सर्व प्राण्यांना आनंद देणारी ही भूमि या वेळीं मेदोरूप पटांनीं आच्छादित होऊन राहिली आहे आणि वनें मेदोमय शरत्कालीन मेघजलांनीं व धूसुर कंबलांनीं झांकल्याप्रमाणें दिसत आहेत, हीं पहा! त्या शवाचीं हाडें मोठमोठे पर्वतच बनलीं आहेत. म्हणजे पर्वताएवढे त्यांचे ढीग झाले आहेत व तीं हिमालय पर्वताच्या शिखरांप्रमाणें सर्व दिशांना झांकित आहेत.

श्रीवसिष्ठः—देव असें बोलत असतां या पृथ्वीला मेदसमूहानें मेदिनी करून म्हणजे मेदांनीं सारवून तो देवीचा भूतगण मत्त झाला व आकाशांत नाचूं लागला. तो भूतसमुदाय याप्रमाणें नाचूं लागला असतां देवांनीं पृथ्वीवरील अवशिष्ट रक्त आपल्या संकल्पांनीं केलेल्या सात समुद्रांपैकीं एका समुद्रांत नेऊन टाकलें. देवांनीं त्याच या आपल्या संकल्पाला सुरार्णव बनविलें. तेव्हांपासून अद्यापि तो मदिरार्णवच होऊन राहिला आहे. तीं भूतें आकाशांत नृत्य करून त्या मदिरेचें प्राशन करितात आणि पुनरपि आकाशांतलि आनंदमंदिरांत नृत्य करितात. त्या भूतांप्रमाणें हल्लींचीं भूतेंहि मदिरार्णवांतलि मदिरेचें प्राशन करून योगेश्वरीच्या गणासह नृत्य करतात. त्या भूतांनी पिऊन अवशिष्ट राहिलेला मेद भूतलावर पडून सुकून गेला. त्यामुळें या पृथ्वीला मेदिनी हें नांव पडलें. त्याचप्रमाणें देवांनीं सूर्यालाहि स्वपदावर आरूढ केलें. पर्वतादिकांचीहि पूर्वींप्रमाणें व्यवस्था केली. रामा, याप्रमाणें हळूहळू तें शव क्षय पावलें असतां दिवस व रात्र यांचा क्रम पूर्वींप्रमाणेंच सुरू झाला. प्रजापतीनें नवीन प्रजा उत्पन्न केल्या आणि या भूतलीं पूर्वींप्रमाणें सृष्टि झाली. १३५.

---

## सर्ग १३६ वा.

१ भासानें प्रश्न केल्यामुळें अग्नीनें शवाचा आरंभापासून वृत्तांत सांगितला. २. असुर, मशक हरिण व व्याध यांचें वर्णन केलें.

भासः—हे पृथ्वीपते दशरथा! त्यानंतर मीं शुकाच्या पंखावर बसून त्या देवाधिदेव अग्नीला काय विचारलें तें तूं ऐक. 'भगवन्, हे सर्व यज्ञेश्वरा, हे स्वाहापते, हे हुताशना, आतां हें जें शव झालें तें पूर्वीं काय होतें व तें शव कां झालें?'

अग्निः—हे राजा, सर्व ऐक. मी तुला त्रैलोक्यासारख्या विशाल व अनंत अशा या शवाचा पहिल्यापासून अक्षतवृत्तांत सांगतों. अनंत, निराकार, परम व चिन्मय एक आकाश आहे. त्यांत हीं असंख्य जगें परमाणूंसारखीं रहातात. त्या सर्वगत शुद्ध चिन्मात्र आकाशांत एके ठिकाणीं सर्वात्म्यामध्यें सर्व विषयाकार ज्ञानमयी संविद् उत्पन्न झाली. तीं आपल्या विषयत्वानें तेजःपरमाणुभावाला आपल्याच वेदनास्वभाववशात् पाहती झाली. ज्याप्रमाणें तूं पान्थाची भावना करीत निजलास म्हणजे स्वतःलाच पांथत्व प्राप्त झालेलें पाहतोस, त्याप्रमाणें तिनें आपलें तेजःपरमाणुत्व पाहिलें. त्या परमाणूनेंहि अज्ञानवृत चित्त्वामुळें कमलांत उत्पन्न झालेल्या रजासारखी स्पष्ट

भासणारी संकल्पनात्मक अणुता स्वतःच अनुभविली. नंतर ती अणुता आपल्या वृद्धीची भावना करीत स्वतः वृद्धि पावली आणि चक्षुरादि इंद्रियांचा अनुभव घेती झाली. तीं इंद्रियें आपल्या शरीरांतच चिकटलीं आहेत, असें तिनें पाहिलें. त्या चक्षुरादि इंद्रियांच्या स्वभावानें शब्दस्पर्शादि-गुणाधाराधेयवत् भूतमय जगत् स्वप्ननगराप्रमाणें पाहिलें. त्या वेदनेपासून विषयापर्यंत अध्यारोपरूप कार्यकरणसंघातामध्यें असुर या जातीचा कोणी एक प्राणी होता. तो असुरस्वभावाचा असल्यामुळें मोठा मानी होता. त्याचे पिता, माता, पितामह इत्यादि होते. पण ते पूर्वोक्त विदूरथाच्या पित्रादिकांप्रमाणें असत्यप्रतिभासरूप होते. दर्पानें फुगल्यामुळें त्या असुरानें तेथें कोणा महामुनीच्या सुखाचें स्थानच अशा आश्रमाला छिन्नभिन्न करून टाकलें. तेव्हां मुनीनें त्याला असा शाप दिला—“ ज्यापेक्षां आपल्या मोठ्या शरीरानें तूं माझ्या आश्रमाचा नाश केला आहेस, त्याअर्थी तूं मरून अति क्षुद्र मशक हो.” तेव्हां वडवानल जसा समुद्राला जाळतो, त्याप्रमाणें मुनीच्या त्या शापाग्नीनें त्याचें एका क्षणांत भस्म करून सोडलें. तेव्हां त्या असुराचें चित्त चेतनयुक्त असूनहि निराकार व निराधार आकाशवल्याप्रमाणें सुषुप्तमूर्छित असल्यासारखें झालें. तें अव्याकृतरूप चेतन भूताकाशाशीं साम्य पावल्यामुळें तद्रूपत्वास प्राप्त झालें. तें भूताकाश आपल्या आधारभूत वायूशीं ऐक्य पावलें. प्राण या नांवाचा चेतनवात देहलाभ होतांच प्राणी या नांवाचा झाला. तो पृथ्वी, जल, तेज व आकाश यांच्या सूक्ष्म भागांनीं व्याप्त होता. याप्रमाणें तो पंचतन्मात्रमय असलेला चिन्मात्र अणु स्वभावतःच आकाशांतील वायूच्या अणूप्रमाणें स्पंदास प्राप्त झाला; म्हणजे त्यामध्यें क्रियाशक्तीचा आविर्भाव झाला. पुढें वर्षादिकाल, पूर्वेकडील वायु व भूमि यांच्या संयोगानें अंकुर उत्पन्न करणारें बीज जसें वृद्धिभावास प्राप्त होऊन जणुंकाय जागेंच होतें त्याप्रमाणें स्पंदामुळें लिंगदेहामध्यें असलेली ज्ञानशक्ति अभिव्यक्त झाली. मुनीचा शाप जाणणारी शुद्ध संविद् प्राणामध्यें स्थित होती. ती स्वमशकत्वरूप आसुरसंविदेला वेध करती झाली. म्हणजे तिनें त्या असुराच्या संविदेला असुररूपानें वेध केला. त्यामुळें त्या असुरसंविदेनें पंख, पाय वगैरे मशकाच्या अंगांची भावना केली. तेव्हां तो स्वतःच मशक बनला. मशक हा प्राणी स्वेदज आहे. त्याचा देह इतका अल्प असतो कीं, प्राण्यांच्या निःश्वासानेंहि तो खालीं पडतो. या मशकाचें जीवित दोन दिवस असतें.

श्रीरामः—भगवन्! सर्व प्राण्यांचा जन्म सर्व ठिकाणीं योनितःच होतो, कीं जन्माचा दुसराहि कांहीं प्रकार आहे? कारण आपण स्वप्नाप्रमाणेंच जाग्रत् असें सांगितलें आहे व स्वप्नदेहाचा जन्म योनितः होत नाहीं हें प्रसिद्ध आहे. जाग्रत्-देहाचा होतो. ह्मणून मी विचारतों. तर हे ब्रह्मन्, माझ्या या शंकेचें आपण समाधान करा.

श्रीवसिष्ठः—ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत सर्व भूतांचा दोन प्रकारें जन्म होतो. एक ब्रह्ममय व दुसरा योनिजन्म. ( विवर्तोपादान या अंशीं ब्रह्ममय व परिणामोपादान या अंशीं योनिजन्म. ) पूर्वी ज्या योनीचा अनुभव रूढ होऊन त्या योनींतील देहाशीं तादात्म्यभ्रांति दृढ झालेली असते, तिच्या बळावर त्या त्या भूतमात्रांचा संस्कार मनांत राहून त्या आकारानें प्राण्याचा जो संभव तोच भ्रांतिजन्य जन्म होय. एखाद्या योनींतील शरीराविषयींची आसक्ति दृढ झाल्यामुळें तिच्याच संस्कारांनीं तद्रूप असा हा जन्म होत असतो. नित्यमुक्त ब्रह्माला

केव्हांहि जगद्भ्रांति झालेली नसतांनाच सृष्टीच्या आरंभीं स्वतःच विवर्तरूपानें जीव होणें हाच ब्रम्हमय जन्म होय. हा जन्म योनिजन्य नव्हे. हा अशा प्रकारचा जन्म जन्मतःच सिद्ध असलेल्या कपिलसनकादिकांनाच प्राप्त होतो; अज्ञ जीवांना असला जन्म प्राप्त होत नाहीं. प्रकृत मशकाचा जन्म भ्रांतिजन्यच आहे. ( याप्रमाणें रामाच्या प्रासंगिक प्रश्नाचें उत्तर देऊन भास सांगत असलेल्या कथेचा अवशिष्ट भाग पुढें वसिष्ठच ऐकवितात. ) हे रामा ! अशी जगत्स्थिति असल्यामुळें तो मशक जगद्भ्रांतीमुळेंच उत्पन्न झाला. तो ब्रम्हजन्य केव्हांहि नव्हे. रामा ! त्याच्या व्यवहाराचा क्रम ऐक. पृथ्वीवर उंसांचे गुल्म, कोमल तृण, काश-मुंजादि तृणांचे समूह यांवरून गुं गुं गुं असा अव्यक्त ध्वनि करणाऱ्या इतर मशकांबरोबर स्वतःहि ध्वनि करीत व क्रीडा करीत असलेल्या त्यानें आयुष्याचा अर्धा भाग ह्म० एक दिवस संपविला. कोमल तृणयुक्त भूमींत कोमल तृणाच्याच झोंपाळ्यावर बसून एखाद्या बालकाप्रमाणें आपल्या मशिकाभार्येसह पुष्कळ वेळ झोंकें घेतले. याप्रमाणें झोंके घेऊन शांत झालेला तो मशक जों एके ठिकाणीं बसून विश्रांति घेत आहे तों हरिणाचा पाय हेंच पर्वतशिखर त्याच्या अंगावर कोसळल्यामुळें म्ह० हरिणाचा पाय त्याच्या अंगावर पडल्यामुळें त्याच्या देहाचा चूर उडाला. हरिणाचा आकार पाहून व त्याचें चिंतन करीत त्यानें प्राण सोडल्यामुळें पूर्वी मशकशरीर धारण करतांना सांगितलेल्या क्रमानेंच त्यानें सर्व इंद्रियादिकांचा उपसंहार करून, मशकदेह सोडून, हरिणदेह धारण केला. अंत्य भावनेप्रमाणें तो हरिण झाला. पुढें अरण्यांत स्वेच्छ विहार करीत असतांना व्याधानें आपल्या धनुष्यापासून तीक्ष्ण बाण सोडून त्याचा प्राण घेतला. तें शरीर सोडतांना व्याधशरीराकडे त्याची दृष्टि लागल्यामुळें तो स्वतः व्याधच झाला. तो व्याध वनांतून विहार करीत असतांना मुनिकाननांत शिरला. तेथें सत्संगाचा लाभ झाल्यामुळें त्याला विश्रांति मिळाली. मुनीनें त्याला उपदेश केला—" अरे बाबा, तूं दीर्घ दुःख भोगण्यासाठींच असा कां भटकत आहेस ? धनुष्यानें या गरीब बिचाऱ्या हरणांना कां मारतोस ? या क्षणभंगुर जगामध्यें महाफल देणारी अहिंसा, अभयदान इत्यादि शास्त्रमर्यादा कां पाळीत नाहींस ?" " अहो, मृगाला मारणें हा आमचा कुलाचार आहे, व त्यावर आम्ही आपली उपजीविका करीत असतों. तेव्हां कुलपरंपराप्राप्त असें जीवितार्चे साधन आम्हीं कसें सोडावें ? आणि तें सोडल्यावर आम्हीं जीवंत कसें रहावें ?" या त्याच्या प्रश्नाचें मुनीनें पुनः असें उत्तर दिलें— " जीवन किंवा भोग हा कांहीं पुरुषार्थ नव्हे. उलट हिंसादि दोषांनीं त्यांचें संपादन केल्यास अनंत काल स्वीकारावा लागणारा पारलौकिक अनर्थच भोगावा लागतो. जीवित नित्य नाहीं. आयुष्य वायूनें उडविलेल्या अभ्रसमूहांतील जलकणाप्रमाणें क्षणभंगुर आहे. त्या आयुष्यांतील भोग मेघविस्तारामध्यें चमकणाऱ्या विजेप्रमाणें चंचल आहेत. त्या भोगांना योग्य असलेले जे यौवनविलास ते पाण्याच्या वेगाप्रमाणें चंचल आहेत. शरीर हें त्या भोगांचें आश्रयस्थान आहे, पण प्रत्येक क्षणीं त्याचा नाश होण्याचा संभव असतो. हे पुत्रा, यास्तव पारलौकिक भावी अनर्थपरंपरारूप संसाराला भिऊन अभयदान, अहिंसा इत्यादि उपायांनीं नित्य अनर्थनिवृत्तिरूप निरतिशय आनंदात्मक निर्वाणाचा म्हणजे ब्रम्हाचा गुरु व शास्त्र या उपायानें शोध कर.' १३६.

———

## सर्ग १३७ वा.

—:०:—

१ व्याधानें प्रश्न केला असतां मुनि धारणाभ्यासानें स्वतः परशरीरांत प्रवेश करून त्याचें पाहिलेलें स्वप्न सांगूं लागला.

**व्याधः**—हे मुने ! हिंसादि व्यवहार जर दुःखाला कारण होत असेल तर असा कोणता व्यवहार आहे कीं, जो व्यवहार कर्मकर्कशहि नाहीं व मृदुहि नाहीं, तो मला सांगा.

**मुनिः**—तूं याच वेळीं धनुष्यासह बाण टाकून व मुनींमध्यें प्रसिद्ध असलेला यम-नियम-विचारादि आचार स्वीकारून व सर्वदुःखरहित होऊन येथें रहा. कारण मुनींचा आचारक्रमच दुःखक्षयाला कारण होतो व तो आचार त्यांच्या सहवासानेंच शिकला पाहिजे.

**श्रीवसिष्ठः**—याप्रमाणें त्या मुनींकडून उपदेश केला गेलेला तो व्याध धनुष्यबाण टाकून मुनीप्रमाणें आचरण करीत राहिला. याचना न करतां जें प्राप्त होईल तें खाऊन तो त्या आश्रमांत राहिला. त्यानंतर मनानें तो मौनी होऊन सत्संग, शास्त्र यांनीं सिद्ध होणारी जी सारासार विवेकशीलता तिच्यामध्यें थोड्याच दिवसांत प्रविष्ट झाला. ज्याप्रमाणें पुष्प क्रमानें विकसित होऊन आपल्या सुगंधानें मनुष्याच्या हृदयाला आल्हादित करीत त्यांत प्रवेश करितें, त्याप्रमाणें तो मनानें शास्त्रविवेकशीलतेंत प्रविष्ट झाला. हे शत्रूचें दमन करणाऱ्या रामा ! पुढें एकदा त्या मुनिश्रेष्ठाला तो म्हणाला, हे भगवन् ! प्राण्यांच्या आंत असलेलें स्वप्न जाग्रत्प्रमाणें बाहेर असल्यासारखें कसें दिसतें व बाहेर स्थित असलेला प्रपंच, स्वप्न होऊन आंत कसा दिसतो ? प्राण्यांच्या अंतरंगांतील स्वप्न कोणत्या उपायानें दिसतें ? तसेंच आंत व बाहेर असलेला प्रपंच स्वप्नरूप कसा दिसतो ? प्रपंच जर स्वप्नच आहे तर तो आंत व बाहेर असा दोन प्रकारें असलेला कां दिसतो ?

**मुनिः**—हे साधो ! माझाहि विवेक जेव्हां दृढ झाला नव्हता तेव्हां प्रथम माझ्याहि चित्तांत हा असाच वितर्क होता. तो तसा कां होता तें कांहीं सांगतां येत नाहीं. पण आकाशांतील अभ्राप्रमाणें तो होता खरा. तेव्हां निर्णय करून घेण्यासाठीं मी धारणेचा अभ्यास केला. पद्मासन घालून व परकायाप्रवेशाला अनुकूल अशी बहिःकुंभक धारणा धरून सर्व लोकांच्या आत्मत्वानें प्रसिद्ध असलेल्या संविदेंतच मी स्थिर झालों. सायंकाळीं सूर्य आपल्या मंडलकांतीनें आतपाला—उन्हाला जसा आपल्यामध्यें आकर्षण करून घेतो, त्याप्रमाणें मीं त्या संविदेंत स्थिर होऊन दूर गेलेल्या आपल्या चित्ताला त्याच संविदेनें स्वहृदयांत ओढून घेतलें व त्याचा स्वहृदयांत उपसंहार केला. प्राणांतर्गत चित्च्या प्रेरणेनें ह्मणजे प्राणासह जीवाच्या बहिर्गमनास अनुकूल अशा योगशास्त्रप्रसिद्ध प्रयत्नानें जीवाची उपाधि असें जें चित्त त्यासह प्राणाला शरीराच्या बाह्यप्रदेशीं रेचकानें घालविलें. पुष्पापासून सुवासाला जसें उपायानें दूर करावें, त्याचप्रमाणें मीं चित्तासह प्राणाला बाहेर घालविलें. त्यानंतर बाह्याकाशस्थ जीवोपाधिभूत चित्तानें परिवेष्टित झालेला तो प्राणवायु मीं पुढें असलेल्या एका छात्राच्या प्राणाशीं संयुक्त केला. माझ्या प्राणानें युक्त झालेला जो त्या जंतूचा प्राण, त्यानें मला त्याच्या हृदयांत नेलें. ज्याप्रमाणें मुंगुस बिळामध्यें आपलें मुख घालून, त्या बिळांतून, आपल्या मुखवायूनें आकर्षण करून घेणें या उपायानें आपल्या आहारभूत सर्पाला तोंडानें ओढून घेतो व मारून आपल्या हृदयांत नेतो, त्याप्रमाणें त्याच्या प्राणानें मला आपल्या हृद-

यांत नेलें. मीं प्राणरूपी अश्वावर आरूढ होऊन त्याच्या हृदयांत प्रविष्ट झालों. याप्रमाणें परस्परमिश्रित झालेल्या त्या प्राणाच्याच मागोमाग जाणारा मी त्याचा अनुचर होऊन देहांत गेल्यावर आपल्या बुद्धीनें मोठ्या संकटांमध्यें स्थित झालों. सर्व बाह्य प्रदेश लहानथोर जलप्रवाहांनीं जसा युक्त असतो, त्याप्रमाणें त्याचें तें शरीर, ज्यांतून रस वहात आहे अशा पुष्कळ नाड्यांनीं सर्व बाजूंनीं परिवेष्टित होतें. बरगड्यांचा पिंजरा, त्यांतील प्लीहा, यकृत, रक्तादिकांचे पिंड यांची ज्यांत गर्दी झाली आहे, असें तें त्या जीवाचें गृह होतें. एखादें लौकिक गृह भांडीं वगैरे उपकरणांनीं जसें भरलेलें असावें, तसेंच तें शरीर त्या सर्वांनीं भरलेलें होतें. ग्रीष्मऋतूंतील उन्हानें संतप्त झालेल्या ऊर्मिजालांनीं युक्त असलेल्या समुद्राप्रमाणें तें शरीर जाठराग्नीमुळें आंतून सळसळत असलेल्या उष्ण अवयवांनीं युक्त होतें. जीवनासाठीं चित्त व प्राणादि वायु त्याला नेहमीं सचेतन करीत होते; व बाहेरील सोमात्मक अपानवायूचा नासाग्रांतून आंत प्रवेश होत असल्यामुळें त्यांत प्रत्येक क्षणीं नवीन नवीन बाहेरील शैत्य शिरत होतें. म्हणूनच तें जीवसदन सचेतन होतें. रक्ताच्या नाडीद्वारांतून स्वभावतःच होणाऱ्या संचाराला प्रतिबंध करणारे जे अन्नरस व श्लेष्मादिक त्यांच्या स्रावांनीं तें अपवित्र झालें होतें. त्यांत दाट अंधकार होता. तें उष्ण होतें व नरकाप्रमाणें त्यांत एकच गर्दी झाली होती. रस, रक्त, कफ, पित्त यांचा बहात्तरहजार नाड्यांमध्यें कोठें उदय होत होता व कोठें ते अडकून रहात होते. कोठें त्यांचे संचार सहज होत असल्यामुळें ते स्पष्ट दिसत होते, कोठें मार्गाचा निरोध झाल्यामुळें अस्पष्ट होते. त्यांत प्राणांची क्रीडा चालली होती. सप्तधातूंमध्यें स्थित असलेल्या त्यांमध्यें वैषम्य असल्यामुळें तें शरीर म्हणजे भावी रोगांचें सूचकच होतें. अपानादि वायु शरीरांतून जोरानें वाहूं लागला असतां यांतून गुडगुड इत्यादि ध्वनि निघतो. हृदयांतून निघालेल्या कमलनालांत समुद्रांतील वडवाग्नीप्रमाणें तो जठराग्नि एकसारखा पेटत असतो. वासनामय पदार्थांनीं तें निबिड झालेलें होतें. वातयुक्त इंद्रियांनीं तें बद्ध केलेलें होतें. साक्षिआत्मस्वभावानें तें स्वच्छ होतें. रात्रीं चोरांच्या योगानें एखादें नगर जसें, त्याप्रमाणें निरनिराळ्या प्रदेशीं कोठें तें सौम्य होतें व कोठें क्षुब्ध होतें. कोठ्यांतील अन्नरसांचा ध्वनि उत्पन्न करण्यांत तत्पर असलेल्या व त्यामुळें नाडीमार्गांत गायन करणाऱ्या विद्याधर पांथाप्रमाणें संचार करणाऱ्या वायूंनीं तें व्यापलेलें होतें. जसा एखादा श्रेष्ठ पुरुष लोकांच्या गर्दींत जोरानें शिरतो, त्याप्रमाणें मी त्या जंतूच्या दाट हृदयांत शिरलों. रात्रीं दूर असलेल्या चंद्राकडे सूर्यप्रभा जशी मोठ्या यत्नानें येते, त्याप्रमाणें मी त्याच्या हृदयांतील तेजोधातूस म्हणजे जठराग्निरूप तेजाच्या सारास मोठ्या यत्नानेंच प्राप्त झालों. तें तेज जरी अगदीं जवळ होतें, तरी असंख्य नाडीमार्गानेंच त्याला प्राप्त व्हावयाचें असल्यामुळें तें जणूं काय अति दूर असल्यासारखें भासतें. कारण सर्व त्रिभुवनहि त्यांत भासत असल्यामुळें तो तेजोधातु आरशासारखा आहे. त्रैलोक्यवस्तूंतील दीपाप्रमाणें तो प्रकाशक आहे. परमात्माहि तद्रूप आहे. त्यामुळें जीव त्या तेजामध्यें असतो. म्हणून त्याला 'तेजःसार' असें म्हटलें आहे. ज्याप्रमाणें सूर्यानें विकसित केलेल्या पुष्पामध्यें सर्वत्र असलेलाहि सुगंध व शैत्य त्याच्या परागावरून उपलक्षित झालेल्या मुखामध्यें विशेषतः रहातात, त्याप्रमाणें सर्वगत आत्मा जीव होऊन शरीरांत नखाग्रापर्यंत जरी प्रविष्ट

झाला आहे, तरी तेजोधातूमध्यें विशेषतः रहातो. ज्याप्रमाणें वायु घटादिकांत ठेवलेल्या दीपज्योतीला सूक्ष्म घटछिद्रांतून प्रवेश करून रक्षितात, त्याप्रमाणें इंद्रियाभिमानी देवांकडून सभोंवार चारी द्वारांमध्यें रक्षिलेल्या त्या जीवाच्या आधारभूत ओजामध्यें मी त्याला न कळतां प्रवेश केला. पुढें सुगंध जसा वायूमध्यें, सूर्य जसा चंद्रामध्यें, किंवा पाणी जसें मृत्पात्रामध्यें प्रवेश करतें, त्याप्रमाणें मीं साक्षात् त्या जीवाच्या उपाधिभूत मनोमय विज्ञानमयकोशयुक्त आनंदमय कोशांत प्रवेश केला. तो आनंदमय कोश जणुंकाय दुसरा चंद्रच होता. तो शुभ्र मेघाच्या खंडाप्रमाणें कोमल होता, किंवा लोण्याच्या गोळ्याप्रमाणें मृदु होता, व दुधाच्या बुडबुड्याप्रमाणें सुंदर होता. कारण त्यांत स्नेह व आनंद यांचा स्वभावतःच अनुभव येत होता. पूर्वस्थानामध्यें प्रवेश केल्यामुळें मला जी व्यग्रता प्राप्त झाली होती व श्रम झाले होते, ते सर्व येथें नाहींसे झाले. आपल्या हृदयांतील ओजाप्रमाणेंच त्याच्या तेजोधातूमध्यें मी स्वस्थ राहिलों व स्वतःच्या स्वप्नाप्रमाणें त्याचें अखंडित स्वप्नरूप विश्व पाहूं लागलों. सूर्यासह, पर्वतासह, समुद्रासह, सुर, असुर, मानव यांसह नगरें व वनविस्तार यांसह, लोकांतर व दिङ्मुखें यांसह, द्वीपें, सागर, महासागर, काल, क्रिया, कल्प, क्षण, ऋतु, स्थावर, जंगम यांसह त्याचें सर्व विश्व मी पाहिलें. तें तेथील स्वप्नदर्शन अनादिप्रवाहरूपानें प्रसिद्ध जगासारखेंच स्थिर स्थित होतें. मी त्या वेळीं जागृत अवस्थेमध्येंच होतों. कारण मला जाग्रदवस्थेच्या शेवटीं निद्रा आलीच नाहीं. तेव्हां झोंप नसतांनाच मी हें स्वप्न काय पहात आहें असा जेव्हां विचार करूं लागलों तेव्हां हे व्याधा! सावध असलेल्या मीं असें जाणलें—या प्रत्यगात्मरूप चिद्धातूचें हें ऐश्वर्यस्वरूप आहे. हा ईश्वर आकाशरूप अशा आपल्याला 'घट' असें किंवा 'पट' असें किंवा 'जगत्' असें किंवा 'जीव असें जें नामरूप कल्पितो, तसाच तो स्वतःच त्या त्या नांवानें होतो. हा चिद्धातु जेथें जेथें असतो तेथें तेथें आपली आकाशता न सोडतांच आपल्या स्वरूपाला जगद्रूप पहातो. सर्व लोक यालाच स्वप्न असें ह्मणतात, हें मला आतां कळलें. स्वप्न म्हणजे आपल्याच चैतन्याचा विकास आहे. चिद्धातूचें जें आकाशरूप स्फुरण त्यांतीलच कांहीं भागाला स्वप्न म्हणतात व कांहीं भागाला जाग्रत् म्हणतात. पण स्वप्न व जागर या दोन पृथक् अवस्थाच नाहींत. कारण स्वप्न हें जागरावस्थेंत स्वप्न व तें स्वप्नकालीं जागरच आहे. त्याचप्रमाणें जागरावस्था स्वप्नामध्यें स्वप्न असून जागरावस्थेंत मात्र जागृति आहे. याप्रमाणें एक जागृतिच दोन प्रकारानें अनुभवास येते. मरणहि त्या दोन अवस्थांहून भिन्न नाहीं. कारण पुरुष चिन्मात्रच आहे. लक्षावधि शरीरें जरीं मेलीं तरी हे महाबुद्धे! तो केव्हां मेला, कोणचा मेला व कसा मेला हें अप्रसिद्धच आहे. आत्म्याचें शरीरग्रहण व मरण या दोन्ही गोष्टी गृहित धरून हें सांगितलें आहे; वस्तुतः खरें नव्हे. तें चेतन आकाशच आहे. तेंच देहाप्रमाणें स्फुरण पावत राहिलें आहे. तें अनंत आहे. सर्व विभागशून्य आहे व भ्रांतीनेंच मूर्ताकार व अमूर्ताकार दिसतें. म्हणजे अमूर्तता हाच ज्याचा स्वभाव आहे व जो नित्य अनंत उदितात्मा आहे, त्या चित्संज्ञक परमाणूची जगद् ही मज्जा आहे असें सांगितलें आहे. म्हणजे त्यांतील जो सारभूत अंश त्याला देहयुक्त जगत् असें म्हटलें आहे. चिदाकाशाच्या उदरांत सगळे अनुभवाणु भासतात. असंख्य जगद्भ्रांति त्यांतच अनुभवास येतात. ज्याप्रमाणें अवयवी पदार्थाला विचित्र अवयवाणु भास-

तात, तसेच ते जगदनुभव घेतात. जगद्भोग देणाऱ्या कर्माचा उपशम झाला असतां त्यापासून निवृत्त झालेला जीव, त्याच्या आधारभूत हृदयांत स्थित होऊन आपल्याच रूपाला ह्मणजे संस्काराच्या अनुरोधानें चिद्विवर्तालाच हा बाहेर दिसणारा स्वप्नसर्ग आहे, असें समजतो. जेव्हां चित्त बाह्योन्मुख होतें, तेव्हां जाग्रत् या नांवाचें आपलेंच रूप बाहेर स्फुरत असलेलें तो पहातो. व चित्त जेव्हां आंतल्या आंत रहातें, तेव्हां तो जीव आपल्याच रूपाला स्वप्न असें पहातो. एकात्मक असलेलाच जीव आंत व बाहेर अंतरिक्ष, पृथ्वी, वायु, आकाश, नद्या, पर्वत, दिशा या रूपानें प्रसार पावला आहे. ज्याप्रमाणें सूर्य आपल्या बिंबामध्यें जरी स्थित असला तरी तो आपल्या कांतीनें या भूलोकींहि स्थित असतो, त्याप्रमाणें जीव जगद्रूप होऊन बाहेर व आंत स्थित आहे. चिदात्मक जीव ' मीच आंत स्वप्न व बाहेर जागृत आहें ' असें जर यथार्थ समजला तर क्रमानें तो सर्ववासनाशून्य होऊन मुक्त होतो. तो वस्तुत: अदाह्य व अच्छेद्यहि आहे. तरी जीव त्याविषयीं विपरीत भावना करतो. लहान बालक बागुलबुवाला जसा भितो, त्याप्रमाणें द्वैतरूप संकल्पयक्षानें हा मोहित होतो. हा मनांत आपल्यालाच जगद्रूपानें पाहूं लागला म्हणजे स्वप्न होतो व बाहेर जगद्रूपानें पाहूं लागला ह्मणजे जागृत होतो. म्हणजे तो स्वत:च त्या दोन अवस्था होऊन रहातो. त्याच याच्या स्वप्न व जागृति या दोन अवस्था आहेत. याप्रमाणें जाग्रत् व स्वप्न यांचें तत्त्वत: चिंतन करणाऱ्या माझ्या मनांत सुषुप्त हें काय आहे आहे अशी चिंतनरूप मति उत्पन्न झाली. त्यामुळें मी सुषुप्तांशाचाहि विचार करण्यास तयार झालों. आणि ' मला या दृश्य सृष्टीला घेऊन काय करावयाचें आहे ? मी दीर्घकाल अगदीं मुकाट्यानें निश्चित होऊन रहातों, असें ह्मणून मी आंत जोंवर तसाच शांतरूप असतों तोंवर सुषुप्त असतें. चित्ताच्या निश्चलतेवांचून सुषुप्त म्हणून दुसरें कांहीं नाहीं. चित्तव्याप्तीच्या अभावीं चित्हि व्यक्त होत नाहीं. त्यामुळें सुषुप्त हें घटादिकांप्रमाणें जड आहे. ( अशी शंका घेऊन तो मुनि म्हणतो ) विशेषत: अहं या रूपानें सुषुप्त अविदित जरी असलें तरी नखकेशादिकांप्रमाणें सामान्यत: विदित आहे. म्हणून विदित-अविदितरूप असलेलें तें सुषुप्त त्याच्या चेतनरूप साक्षीमध्यें जड नव्हे व अजडहि नव्हे, असें स्फुरतें. 'जाग्रत व स्वप्न यांतील भ्रमणानें मी श्रांत झालों आहें. मला आतां ही विशेष संवित् काय करावयाची आहे ! मी आतां कांहीं काळ शांत रहातों.' अशा संकल्पांत गाढ निद्रारूप परिणाम पावून रहाणें हेंच सुषुप्त होय. ही गाढ निद्रा जाग्रदवस्थेंतहि आपोआप संभवते. ' मीं आतां कशाचेंहि चिंतन करीत नाहीं; शांत राहतों,' ह्मणून एकरूप झालें कीं ही अवस्था प्राप्त होते. जेव्हां गाढ एकरूपता असते तेव्हां तिलाच निद्रा म्हणतात. पण तीच जेव्हां आपली घनता सोडून किंचित् विक्षेपरूपानें शिथिल होते तेव्हां तिलाच स्वप्न म्हणतात. मी याप्रमाणें सुषुप्ताचा निश्चय करून तुरीयावस्थेचा शोध करूं लागलों. परम बुद्धीनें युक्त होऊन तुरीयेचा निश्चय करण्यास जों मी उद्युक्त होत आहें, तों मला शुद्ध सम्यग्बोधावांचून दुसरें कांहींच त्याचें स्वरूप दिसेना. प्रकाश आला असतां अंधकाराचा जसा लोप होतो त्याप्रमाणें सम्यग्बोधानें हें यथास्थित असलेलें विश्व लीन होतें. यास्तव सम्यग्बोध हेंच तुरीय होय, असा मीं निश्चय केला. त्या तुरीयांत विलीन झालेल्या विश्वाचें आत्यंतिक अविलीनत्व जसेंच्या तसेंच असतें. म्हणूनच स्वप्न, जागृति,

व सुषुप्त या तिन्ही अवस्था तुरीयांत अंतर्भूत होतात. यथास्थित जगांसह तें एका दृष्टीनें त्यांत आहे व एका दृष्टीनें नाहींहि ! हें जगत् आपल्या योग्य कारणापासून उत्पन्न झालेलें नाहीं. तर ब्रह्मच हें असें जगद्रूपानें अवस्थित आहे. तें नित्य, अज व शांत आहे व असा बोध हीच सदा तुर्यता आहे. जन्माच्या कारणांचा अद्वय ब्रम्हामध्यें असंभव असल्यामुळें सर्ग ह्मणून दुसरा कांहीं पदार्थच उत्पन्न होत नाहीं. तर जल द्रवत्वाचें जसें ग्रहण करितें, त्याप्रमाणें चित्‌च्या जगदाकार चेतनानेंच सर्गसंवित् स्वतःच ग्रहण केली आहे. १३७.

---

## सर्ग १३८ वा.

—:०:—

१ त्या प्राण्याचा जीव व आपला जीव यांना एकत्र मिळविलें असतां मला द्विगुण विश्व दिसलें व २ ऐक्य केलें असतां एकच विश्व दिसलें, असें वर्णन.

तापसः—याप्रमाणें जागृतीपासून तुर्यावस्थेपर्यंत चारी अवस्थांचें तत्त्व जाणून नंतर मीं त्या प्राण्याच्या संविदेनें चिदाभासरूप जीवाशीं एकरूप होण्याचा यत्न केला. ज्याप्रमाणें वायूनें पद्माकरांत नेलेला पुष्पित आम्रवृक्षाचा सुगंध त्या कमलापासून निघणाऱ्या वायुस्थ सुगंधाशीं एकरूप होतो, तसाच मी त्याच्याशीं एकरूप होऊं लागलों. मी त्या प्राण्याच्या चिदाभासांत प्रवेश करण्यासाठीं त्याच्या त्या पूर्वोक्त चिद्धातूला जों सोडीत आहें, त्याच्या साक्षिस्वरूपांतून जों बाहेर पडत आहें, तों मध्येंच माझी समस्त इंद्रियरूप संविद् बाह्य विषयाभासांत बलात्कारानें प्रवृत्त झाली. ती माझी इच्छा नसतांनाच बहिर्मुख झाली. मीं त्या बाह्य विषयांकडे प्रवृत्त झालेल्या इंद्रियसंविदांचा अंतर्मुख प्रयत्नानें बलात्कारानें निग्रह केला. तेव्हां तेलाचा बिंदु पाण्यांत जसा पसरतो, तसा मी आंतहि एका क्षणांत प्रसार पावलों. याप्रमाणें उपाधीच्या द्वारा मी जों त्या प्राण्याच्या चिदाभाससंविदेंत मिळून तद्रूप परिणाम पावत आहे, तों तेवढ्या वेळांत मला सर्व भुवन द्विगुणित असलेलें दिसलें. त्याची वासना व माझी वासना अशा दोन्ही वासनांमुळें तें तसें दिसणें साहजिक होतें. दिशा दुप्पट झाल्या. दोन सूर्य आकाशामध्यें तळपूं लागले. दोन भूमंडलें झालीं. दोन स्वर्ग उद्भवले. ज्याप्रमाणें दोन आरशांत दोन प्रतिबिंबें दिसतात, त्याप्रमाणें दोन जगें मला दिसलीं. तीं दोन्हीं मिश्रित झालेलीं होतीं. त्यामुळें जगच्चित् द्विगुण वृद्धि पावली. तिलद्वयांतील तेलाप्रमाणें जें बुद्धिकोशस्थ चेतन भासतें, त्या संमिश्रित उपाधिस्थ—चिदाभासद्वयांत द्विगुणीभूत जगत् तसेंच मिश्रित भासूं लागलें. दोन संवित्कोशांत मिश्रित व अमिश्रित अशीं दोन्हीं जगें, दूध व जल यांच्या मिश्रणाप्रमाणें भासलीं. तेव्हां त्या प्राण्याच्या चिदाभाससंविदेला आपल्या संविदेनें परिच्छिन्न करून आत्मरूपत्वास प्राप्त केलें. दोन्ही उपाधींचें ऐक्य बनवून तिला एकात्मतेस पोंचविलें. एक ऋतु एका ऋतूशीं, एक अल्प नदी दुसऱ्या मोठ्या नदीशीं, सुगंधलेखा वायूशीं, किंवा धूमपंक्ति मेघाशीं एकरूप होते, त्याप्रमाणें त्याची संविद् माझ्या संविदेशीं एकरूप झाली. दूषित दृष्टीनें दिसत असलेले दोन चंद्र सुदृष्टीमध्यें जसे एकत्वास प्राप्त होतात, त्याप्रमाणें वासनांच्या एकत्वानें संविदेचें एकत्व होऊन पूर्वी द्विगुणीभूत झालेलें जगतूहि एकत्वास प्राप्त झालें. त्यानंतर स्वतःविषयींचा पूर्वापर संबंध न सोडतां त्याच्या चितीमध्यें स्थित असलेल्या मीं आपला संकल्प कमी कमी

केला व त्या प्राण्याच्या संकल्पानुसार स्थितीस प्राप्त झालों. त्यानंतर त्याच्या चित्त-वृत्तीनेंच त्याचें बाह्य शब्दादि विषय पहाणाऱ्या मीं त्याचें हृदय न सोडतांच त्याच्या जाग्रत्-व्यवहाररूप दिनाचाराचा अनुभव घेतला. त्या-नंतर तो प्राणी अन्न खाऊन व पाणी पिऊन श्रांत झाला व सायंकालीं कमल जसें निद्रो-न्मुख होतें, त्याप्रमाणें तो निद्रोन्मुख झाला. त्याचें शरीर भूमिवर हातपाय पसरून पडलें. सायंकाळीं सूर्य आपल्या कांतीला जसा आक-र्षण करून घेतो, तसा प्राण सर्व दिशां-मध्यें पसरून विषयानुरूप क्रिया करणाऱ्या त्याच्या चित्ताचा आंत उपसंहार करिता झाला. कासवाचे अवयव जसे त्याच्या पोटांत शिरतात, त्याप्रमाणें चित्तासह सर्व इंद्रिय-वृत्ति त्याच्या हृदयकोशांत गुप्त रीतीनें शिरल्या. चक्षुरादिक निमीलित होऊन हृदयकमलाकार झाली. मरणसमयीं इंद्रियांची जी स्थिति होते तशीच प्रायः त्यांची स्थिति झाली. मातीच्या बाहुल्यांसारखीं किंवा चित्रांतील चित्रांसारखीं तीं व्यापारशून्य होऊन राहिलीं. मी सुद्धां त्याच्या चित्तानुसार अनुवर्तन करणारा झाल्या-मुळें त्याच्या चित्तवृत्तीसहवर्तमानच त्याचीं इंद्रियगोलकें सोडून त्या त्या नाडीमार्गानें हृदयामध्यें प्रविष्ट झालों. सर्व बाह्यानुभवाचा उपसंहार करून शय्येप्रमाणें मऊ असलेल्या त्याच्या ओजांत म्हणजे पूर्वोक्त तेजांतील आ-नंदमय कोशांत एक क्षणभर सुषुप्तीचा अनु-भव घेतला. त्या वेळीं समान या नांवाचा वायु छिद्रयुक्त नाड्यांतून ठिकठिकाणीं अन्नपानरस-विकारांकडून निरुद्ध केला जात असल्यामुळें जरी बाहेर पडत नाहीं, तरी आंतल्या आंत त्याचा संचार होतोच. जेव्हां ही अशी सुषुप्ता-वस्था प्राप्त होते, तेव्हां प्राण एक, अद्वैत, संप्र-सन्न आत्ममात्रपरायण होऊन हृदयांतील पुरांत प्रवेश करून राहिलेल्या चित्ताला स्वा-धीन करून घेतो. कारण प्रत्यगात्मा हाच त्याचा पुरुषार्थ असून तो तद्रूप होऊन जातो. ( अहो, पण तो जरी असा स्वार्थामध्यें प्रसक्त झालेला असतो, तरी इंद्रियें, मन इत्यादि दुस-ऱ्यांचीं कार्यें कां करीत नाहीं ? उत्तर—) कारण निरतिशय आनंदरूप—स्वार्थसत्तारूप सुषुप्तींत हेंच एक निरतिशय आनंदस्वरूप अनुभवास येतें. त्यांत दुसरें कोणाचेंहि कोणतेंच कृत्य अनुभवास येत नाहीं. त्या अवस्थेंत विक्षेप-दुःखाचा लेशहि भासत नाहीं.

श्रीरामः—चित्त आतांहि प्राणामुळेंच आपले मननादि व्यापार करतें. त्यामुळें सुषु-प्तींत प्राणानें त्याला ग्रासून—अधीन करून घेतल्यामुळें तें मनन करीत नाहीं, असें जर म्हटलें तर मग तें आतां मनन कां करतें ? प्राणाहून त्याला पृथक् केलें म्हणजे त्याचें कांहीं स्वरूपच रहात नाहीं. कारण प्राणानें ज्याला सोडलें आहे असें मन म्हणजे कांहींच नाहीं.

श्रीवसिष्ठः—( अधिष्ठान सन्मात्राहून पृथक् केल्यावर देह, प्राण, इत्यादि जगद्रूप कांहींच नाहीं. पण त्याला पृथक् करीपर्यंत त्याच्या सत्तेनें सर्व आहेच. तेव्हां प्राणाहून पृथक् केलेलें एकटें मनच नाहीं असें कां म्हण-तोस ? अशा आशयानें उत्तर देतात—) रामा, हा आपला देह साक्षात् अनुभवास जरी येत असला तरी वस्तुतः नाहींच. स्वप्नामध्यें जसा पर्वत, त्याप्रमाणें हें शरीर मानसकल्पनामात्र आहे. त्यामुळें मनाहून पृथक केलेलें तें मुळीं वि-द्यमानच नाहीं. त्याचप्रमाणें चित्तहि विषयनिरूप्य असल्यामुळें म्ह० विषयांवरूनच त्याची सिद्धि होत असल्यामुळें विषयांच्या अभावीं त्याचा पृथक् स्वभावच रहात नाहीं. सृष्टीच्या आरंभीं त्याच्या योग्य कारणांचा अभाव असल्यामुळें

दुसऱ्याची उत्पत्तिच संभवत नाहीं. अर्थात् पूर्व-पूर्व विषयांवरून मनाची सिद्धि होते, असेंही म्हणतां येत नाहीं. म्हणून हें सर्व ब्रह्म आहे. तें सर्वात्मक असल्यामुळें त्याच्या सत्तेनेंच सर्व विश्वाची सत्ता आहे, असें म्हटल्यास मात्र मन इत्यादि सर्व पदार्थ आहेतच. चित्त, देह इत्यादि सर्व आहे. कारण तें सर्व तत्त्ववेत्त्याच्या दृष्टीनें ब्रह्मच आहे. पण अब्रह्मज्ञांच्या दृष्टीनें हें चित्त, देहादिक जसें आहे, तसें तें आम्हां तत्त्ववेत्त्यांच्या दृष्टीनें नाहीं. म्हणने ते त्याचें अस्तित्व कोणत्या प्रकारें मानतात तें आम्हांला कळणें शक्य नाहीं. हे राजपुत्रा रामा, ज्याप्रकारें हें त्रिभुवन ब्रह्मच आहे आणि ज्याप्रकारें तें विविधात्मक झालें आहे, तो सर्व अध्यारोपादि क्रम मी सांगतों ऐक. एक शुद्ध, अनंत, आकाशाकार चिन्मात्र आहे. तेंच सर्वदा व सर्वरूपानें असतें. वस्तुतः जगत् नाहीं व दृश्यता नाहीं. पण तें सर्वज्ञ असल्यामुळें त्यानें स्वतःच या मनस्त्वाचा प्रथम आपल्यावर आरोप केला आणि तो केवल आरोप असल्यामुळेंच त्यानें शुद्ध, ज्ञानस्वरूप, सर्वचिंताशून्य असें आपलें रूप सोडलें नाहीं. म्हणने त्या आरोपप्रसंगींहि त्याच्या स्वरूपांत कांहीं बदल झाला नाहीं. त्या मनानें आत्म्याच्या संसाराची जी कल्पना केली तोच हा प्राणवायु होय, असें हे ज्ञानश्रेष्ठा ! तूं समज. त्या मनानें कल्पिलेली ही प्राणता जशी अनुभवास येते, त्याचप्रमाणें इंद्रियें, देह वगैरे व दिक्कालक्रिया वगैरे त्याच्या कल्पनेमुळेंच अनुभवास येतात. त्यामुळें हें सर्व विश्व अखंडित चिन्मात्र आहे; आणि चित् तर परब्रह्म आहे. त्यामुळें हें सर्व ब्रह्मच विस्तारलेलें आहे. हें सर्व जगत्स्वरूप निराकार, आदिअंतशून्य, निराभास, निरामय, शांत चिन्मात्र व सन्मात्र ब्रह्मच आहे. परब्रह्म सर्व शक्तींनीं युक्त आहे. त्यामुळें आपल्या पहिल्या मनःशक्तीनें जसें पूर्वीं सिद्ध होतें, तसेंच जागरावस्थेंत व स्वप्नदर्शेंत तें, आपलें स्वरूपच जगद् झालेलें पहातें. संकल्पात्मक मनच कार्यब्रह्म असून, तें ज्याप्रमाणें पृथिव्यादि लोक व दुसरेंहि सर्व कांहीं कल्पितें, तसाच त्याचा अनुभव घेतें. ही गोष्ट आबालवृद्धांस माहित आहे. अरे बा रामा ! आकाशरूप असलेला चेतनात्माच आरंभीं चित्तामुळें प्राणवान् झाला; म्हणजे चित्तानेंच त्या आद्य पुरुषाला प्रथम प्राणयुक्त केलें. त्यानेंच त्याला देहयुक्त केलें. व त्यानेंच त्याला त्रिभुवनरूप बनविलें. या गोष्टीचा सर्वांना आपापल्या शरीरांतील संकल्पनगरांत व स्वप्नांत चांगला अनुभव येतो. १३८.

---

## सर्ग १३९ वा.

१ प्राणाहूनहि चित्ताचें प्राधान्य आहे. २ मुनीच्या सुषुप्तीपासून स्वप्नाची प्राप्ति झाली असतां प्रलयदर्शन.

**श्रीवसिष्ठः**—चित्तच जगत्कर्तृ आहे. तें ज्या सत्, असत्, किंवा सदसत् पदार्थाची जशी कल्पना करितें, तसा तो त्याच्यापुढें उभा राहतो. त्या चित्तानेंच प्राणाचा संकल्प केला. प्राणच माझ्या सर्व व्यवहाराचा निर्वाह करणारा आहे, त्या प्राणावांचून मी अस्तित्वांतहि राहणार नाहीं, अशीहि त्यानें कल्पना केली. त्यामुळें तें चित्त प्राणाधीन आहे असें म्हटलें जातें. ( पण स्वप्न-मनोराज्यादि-प्रसिद्ध देहांत प्राणांच्या अभावींहि मनाचा व्यापार दिसत असल्यामुळें ' त्याच्यावांचून मी अस्तित्वांतहि रहाणार नाहीं ' हा संकल्प बाधित होतो, अशी आशंका घेऊन सांगतात—) मी कांहीं काळ प्राणावांचून कधींच रहाणार

नाहीं, अशी कल्पना करून पुनः खरोखर त्यावांचूनहि मी राहीन, अशी कल्पना केली. त्या मनानें जेथें जेथें प्राणासह शरीर कल्पिलें, तेथें तेथें तें एका क्षणांत विस्तृत मायानगराप्रमाणें उदय पावलेलें त्याला दिसलें. प्राण व देह यांच्या कल्पनेनंतर 'मी पुनः केव्हांहि प्राणदेहविरहित होणार नाहीं,' असा जीव अत्यंत दृढ निश्चयवान् होतो. पण तो चिन्मात्रस्वभावाविषयीं दृढनिश्चयवान् मात्र होत नाहीं. त्यामुळेंच थोड्याशा विचारानें संदेहप्रचुर अज्ञानापासून निस्तार होत नाहीं. संदेहामुळें चित्त डळमळत रहातें. असत्[1]—निश्चयानें युक्त असलेल्या त्याला दुःख होतें. दृढ झालेला विपरीत निश्चय, यथार्थ दृढ निश्चयावांचून निवृत्त होत नाहीं. हें भ्रांतिज्ञान अत्यंत दृढ आहे, त्यामुळें अल्प विकल्पानें तें निवृत्त होत नाहीं. ज्याला 'हा मी' असा दृढ प्रत्यय येत असतो त्याचा तो भ्रांत प्रत्ययहि आत्मविज्ञानावांचून दुसऱ्या कोणत्याच उपायानें शांत होत नाहीं. मोक्षोपायाचा विचार केल्यावांचून ज्ञान केव्हांच सिद्ध होत नाहीं. यास्तव मोक्षोपायाचा मोठ्या प्रयत्नानें विचार करावा. 'मी' व 'हें' अशी दोन प्रकारचीच अविद्या आहे. त्यापलिकडे तिसरी अविद्या नाहीं; आणि मोक्षोपायावांचून दुसऱ्या कोणत्याहि साधनानें ती जात नाहीं. 'माझें प्राण हेंच जीवित आहे, तेंच माझ्या परमप्रेमाचें आस्पद असें माझें स्वरूप आहे;' असा मनानें दृढ अभ्यास केला. तें त्या प्राणांतच आसक्त होऊन राहिलें. त्यामुळें त्यानें तसेंच पाहिलें. त्याला प्राणच आपलें स्वरूप आहे, असा अनुभव आला. ( त्याचप्रमाणें मनाची देहाधीनता प्रकट करितात—)

[1] येथें सत् म्हणजे व्यावहारिक, असत् म्हणजे मिथ्या व सदसत् म्हणजे प्रातिभासिक वस्तुजात.



देह सौम्य स्थित असला कीं प्राणहि सौम्य आहे, असें मन मनन करूं लागतें. पण देह क्षुब्ध झाला कीं, तो क्षोभ प्राणांतच आहे, असें जाणणारें मन दुसरें कांहींच म्हणजे आत्मतत्त्वविवेकहि पहात नाहीं. म्हणूनच जेव्हां प्राण स्वकर्मरूप स्पंदांत अत्यंत व्यग्र असतो, तेव्हां त्या मनाच्या इष्ट व्यवहारांत व्यग्रता येते. तें देहाधीन झाल्यामुळें आत्मतत्व जाणण्यास समर्थ नसतें. यास्तव प्राणनिरोधाचा अभ्यास केल्यावांचून आत्मज्ञानोन्मुख होतां येत नाहीं. प्राण व मन हे परस्पर रथ व सारथि आहेत. म्हणून ते परस्परांचें अनुकरण करितात. परस्परांचें अनुवर्तन करीत नाहींत, असे रथ व सारथि कोण आहेत? कोणी नाहीं. त्यांचा संभवच नाहीं. याप्रमाणें परस्परानुवृत्तिस्वभावांत प्राणमनोरूपानें परमात्म्यानें आदिसृष्टींत आत्मा कल्पिला. त्यामुळें अद्यापि अज्ञांची ती नियति कायम आहे. तिच्यामध्यें मुळींच बदल होत नाहीं. परमपदामध्यें आरूढ झालेल्या मन, प्राण व शरीर यांत देश, काल, क्रिया व द्रव्य यांनीं होणाऱ्या क्रिया—त्यांचे व्यवहार प्रवृत्त होतात. त्यांतील प्राण व मन हीं जोंवर साम्यांत स्थित असतात व आपलें कर्म करितात, तोंवर 'जागृति' या नांवाचा सम व्यवहार होतो. जेव्हां प्राण इंद्रियांच्या वैषम्यापासून निवृत्त होतो, तेव्हां 'विषम स्वप्न' या नांवाचा केवल मानसव्यवहार होतो; व मन लीन झालें कीं, सर्वविक्षेपशांतीवरून उपलक्षित होणारी सुषुप्ति प्रवृत्त होते. अन्नरसांनीं व पित्तादिकांनीं नाड्या रुद्ध झाल्या असतां पिंडित झालेला प्राण जेव्हां जड होतो म्हणजे त्याचा संचार मंद मंद होऊं लागतो व तो कोठें तरी असतो, तेव्हां मनःशांतीनें सुषुप्त्यवस्था प्रवृत्त होते. याप्रमाणें नाड्या अन्नरसानें पूर्ण झाल्या असतां, किंवा त्यांतील

अन्नरस क्षीण झाला असतां प्राण थकतो व श्रमामुळेंहि जेव्हां तो निःस्पंद होतो, तेव्हां सुषुप्तता उदय पावते. मर्दनादिकांच्या योगानें नाड्यांना मार्दव आलें असतांहि निद्रा येते, किंवा बाणानें क्षत होणें, व्रण होणें व त्यामुळें रुधिरादिकांची नाड्यांत पूर्णता होणें, या कारणानेंहि प्राण कोठें तरी लीन होऊन राहतो व निःस्पंदरूप सुषुप्तता प्रवृत्त होते.

( याप्रमाणें रामाच्या प्रश्नाचें प्रासंगिक उत्तर देऊन वसिष्ठ प्रस्तुत तापस-उक्तीचाच आश्रय करितात. )

तापसः—मी ज्याच्या हृदयांत प्रविष्ट झालों होतों तो प्राणी रात्रीं आहारानें अत्यंत तृप्त होऊन गाढ निद्रेनें व्याकुळ झाला होता. त्याच्या बरोबर मीहि निद्रालु झालों, त्याच्या चित्ताशीं एकरूप होऊन गेलों. मीं आपलें स्वातंत्र्य सोडून गाढ सुषुप्तनिद्रेचा अनुभव घेतला. त्यानंतर त्या प्राण्याच्या उदरांतील अन्न जीर्ण झालें असतां आणि स्वाभाविक नाडीमार्गांतून प्राणस्पंदन सुरू झालें असतां सुषुप्तावस्था अल्पत्वास प्राप्त झाली, म्हणजे तिचा गाढपणा जाऊन ती थोडी शिथिल झाली. सुषुप्त अल्पत्वास प्राप्त झालें असतां मीं तेथेंच जणूं काय त्याच्या हृदयांतून निघालेलें सूर्यादिकांनीं युक्त असें भुवन म्हणजे त्याचा स्वप्नप्रपंच पाहिला. तें त्याचें स्वाप्नभुवन प्रलयकालीं क्षुब्ध झालेल्या सागरापासून उद्भवलेल्या महाजलानें भरलें जात आहे, असें मीं पाहिलें. ( त्या महाजलाचेंच वर्णन— ) कल्पांतींचे मेघ मुसळासारख्या धारांनीं त्याची वृष्टि करीत होते. त्याच्या लाटा मेघाला स्पर्श करीत होत्या. त्यांतून पर्वत वहात होते. मोठमोठ्या आवर्तांपासून त्यांचा फार मोठा ध्वनि निघत होता. वाहणारी वनपंक्ति हाच तृणसमूह, त्यानें युक्त असलेल्या पर्वतांनीं तें जल व्याप्त होतें. जिनें वृक्ष व पर्वतसमूह उपटले आहेत अशा वावटळीनें व अग्नीच्या ज्वालासमूहानें पूर्वींच दग्ध केलेल्या त्रिलोकीच्या खंडांनीं—तुकड्यांनीं परिपूर्ण अशा जलानें तें भुवन भरलें जात होतें. त्या त्रैलोक्याच्या तुकड्यांत आकाशांतील सुप्रसिद्ध मोठमोठीं देवासुरादिकांचीं नगरेंहि होतीं. असो; मी तेथेंच असें जों पहात आहें, तों मीं कोणा एका प्रदेशांतलि एका नगरींत एका गृहांत आपल्या भार्येसह स्थित आहें असें पाहिलें. पण त्या प्रलयकालच्या जलानें मला माझी भार्या, भृत्य, पुत्र, बांधव, घरांतील सर्व भांडीं, उपकरणें वगैरे व तें घरहि यांसह वाहून नेलें. ( त्या अवस्थेंतलि तें गृह व तें नगर यांचें वर्णन— ) तें प्रलयकालचें जल त्या गृहाला व नगराला वाहून नेऊं लागलें असतां त्यांत चोहोंकडून पाणी शिरलें. वृक्षाएवढाले उंच तरंग त्याच्यावरून जाऊं लागले. मोठा कलकलध्वनि करून तें जणुंकाय समुद्राला जिंकण्यासच तयार झालें होतें. त्या नगरींतील सर्व लोक अत्यंत क्षुब्ध झाले. कोणी आपल्या पुत्राचीहि चिंता केली नाहीं. तें जल भयंकर वर्तुलाकार आवर्तवृत्तींनीं सर्वांना व्याकुळ करीत वाहूं लागलें. सर्व लोक उरस्ताडनपूर्वक मोठा आक्रोश करूं लागले. तसले लोक व चिखल यांनीं तें नगर भयंकर दिसूं लागलें. भिंती कोसळूं लागल्या, काष्ठें कडाकड मोडूं लागलीं. तुटणाऱ्या शंकूंचा मोठा ध्वनि होऊं लागला. घरांवरील छपरें खालीं पडून वाहूं लागलीं. त्या नगरांतील जीं घरें उंच होतीं, त्यांतील खिडक्यांत उभ्या राहिलेल्या भयभीत स्त्रियांचीं मुखें म्लान कमलांप्रमाणें दिसत होतीं. असो; त्या प्राण्याच्या भावास प्राप्त झालेला मीं असें जों एक क्षणभर पाहात आहें व दीनचित्त होऊन मोठा आक्रोश करीत आहें तों तें सर्व गृह चारी भिंतींचें विदारण हो-

ऊन—त्याच्या चारी भिंती फुटून वृद्ध, बालक, स्त्रिया यांसह शतशः विदीर्ण होऊन जलप्रवाहांत गेलें. शिळेमध्यें जसा निर्झर जातो तशीच त्याची दशा झाली. त्यानंतर मीहि त्या प्रलयजलांत वाहून जाऊं लागलों. मीं त्या वेळीं आपल्या कुटुंबांतील सर्व लोकांची आस्था सोडली व केवल प्राणपरायण झालों. आपले प्राण वांचविण्याच्या खटपटींत पडलों. तरंगसमूहानें फेंकल्यामुळें मी योजनेंच्या योजनें दूर जाऊं लागलों. त्या जलाबरोबर वृक्षहि वहात होते. त्यांचीं अग्रें जळत होतीं. त्यांच्या ज्वालांमध्यें सांपडून मी जर्जर झालों. काष्ठें, भिंती, डोंगरांचे तटादिक यांवर झापटून मला फारच भयंकर वेदना होऊं लागल्या. माझ्या शरीरावर त्यांचे दुःसह आघात झाले. भोंवऱ्यांच्या भ्रमणाबरोबर मी खोल पातालांतच जणुं काय जाऊन फार वेळानें वर आलों. वेगानें वाहणाऱ्या व क्वचित् संथ चालणाऱ्या, कोठें अप्रतिहत गमन करणाऱ्या व कोठें अडून राहणाऱ्या, गुलगुल असा ध्वनि करणाऱ्या, असंख्य कल्लोळांनीं युक्त असलेल्या जलांत मी वारंवार बुडालों व वर आलों. जलप्रवाहाच्या संघट्टनानें तुटलेल्या मोठ्या पर्वताजवळील पंकयुक्त जलांत मी क्षणभर एखाद्या डबक्यांत हत्ती जसा रुतावा तसा रुतून राहिलों. पण दैववशात् वरून आलेल्या दुसऱ्या पाण्याच्या उपकारक लोंढ्यानें माझा त्यांतून उद्धार केला. त्यांतून वर निघाल्यावर मी जों एक क्षणभर फेंसाच्या गोळ्यावर व पर्वताच्या तुकड्यावर विश्रांति घेत आहें, तों फार मोठ्या तरंगानें एखाद्या वैऱ्याप्रमाणेंच वेगानें मला पुनः प्रवाहांत पाडलें. त्यामुळें मी पुनः मोठमोठ्या तरंगांतून त्यांच्या बरोबरच भ्रमण करीत जाऊं लागलों. फार काय सांगूं! पण त्या वेळीं दुःखरूप झालेल्या मीं ज्याचा अनुभव घेतला नाहीं असें एकहि दुःख राहिलें नाहीं. इतक्यांत हे कमलनयन व्याधा, यावज्जीव चिरकाल अभ्यास केल्यामुळें व त्या वेळीं अतिशय विषाद झाला असल्यामुळें किंचित् देहभानावर आलेल्या मला आपल्या पूर्वींच्या समाधिमय स्वरूपाचें स्मरण झालें. मी म्हटलें, ‘ अरे, मला आतां आठवलें. मीं दुसऱ्या जगांतील एक तापस आहें. दुसऱ्या कोणाचा स्वप्नानुभव पहाण्याच्या इच्छेनें मी या शरीरांत प्रविष्ट झालों आहें. आणि हा स्वप्नांतील भ्रम पाहात आहें.’ याप्रमाणें मी त्या वेळच्या दृढाभ्यासानें मिथ्याज्ञानरूप स्वरूपांत तरंगांकडून जरी वाहून नेला जात होतों, तरी आपल्या मूळस्वरूपाचें स्मरण होतांच मी सुखी होऊन राहिलों. या सर्व प्रलयकालच्या लाटा म्हणजे मृगजल आहे असें मी पाहूं लागलों. त्यांतून पर्वत, नगरें, ग्राम, पृथ्वी, निरनिराळीं खंडें, वृक्ष, देव, नाग, स्त्रिया, पुरुष, आकाशचर हें सर्व वाहात चाललें होतें. मोठमोठीं लोकपाळांचीं नगरेंहि त्यांतून चाललीं होतीं. ज्यांतून पर्वत वहात आहेत अशा मोठमोठ्या लाटा परस्परांवर आपटत असलेल्या मला दिसल्या. आणि हा सर्व जगाचा नाश पुनः पुनः पाहून मीं आपल्या मनांत असा विचार केला—“ या मायामहार्णवामध्यें अवस्थात्रयरूप तनि नेत्रांनीं युक्त असलेला हा ईश्वरहि जीव होऊन जीर्ण तृणाप्रमाणें वहात चालला आहे, हें केवढें आश्चर्य आहे! खरोखर या दुष्ट दैवाला अकार्य असें कांहींच नाहीं.” ज्याप्रमाणें प्रातःकालीं सूर्याच्या प्रभा पाण्यामध्यें विकसित होणारीं कमलें दाखवितात, त्याप्रमाणें गृहेंसुद्धां चार बाजूंच्या भिंती पडल्यामुळें आंतील सर्व भाग अगदीं प्रकट दाखविताहेत असें मला वाटलें. या अनेक भ्रमांनीं व विभ्रमांनीं उपलक्षित झालेल्या परागांनीं धवल झालेली भ्रमरांची रांग हाच हार आपल्या देहावर वहाणाऱ्या पद्मिनी मुख, हस्त,

पाद इत्यादि पद्मांनीं युक्त असलेल्या नद्याच होत. पण त्या सर्व शुद्ध नाहींत व जंगमसंज्ञकहि नाहींत. तर या स्वप्नांतील नद्या त्या प्रसिद्ध नद्यांहून अगदीं विपरीत आहेत. कारण त्या आपल्या तरंगपंक्तींमध्यें गंधर्व, किन्नर, मनुष्य, देव, नाग यांच्या स्त्रियांना विचित्रपणें वहात होत्या. विद्याधरींच्या भुजलतांमध्यें असलेल्या चंद्रकांत मण्यांतील जणुंकाय विभागच याप्रमाणें भासणारे, त्याप्रमाणेंच ज्यांत रत्नजडित गवाक्षांची शोभा आहे असे देव, असुर, नाग यांच्या मोठमोठ्या गृहांचे भित्तिभाग या प्रलयकालच्या जलभरांत सुवर्णाच्या नौकांप्रमाणें भ्रमण करीत होते. हळू हळू विस्तीर्ण होणाऱ्या रत्नजडित गृहामध्यें असलेला इंद्र या प्रलयसागरामध्यें सांपडून, कुंकुमाचें ज्यावर चिन्ह आहे अशा व मत्त हत्तीच्या गंडस्थलाप्रमाणें विशाल अशा शचीच्या पयोधरभरावर रतिखेदानें खिन्न होऊन विश्रांति घेत पडला व आपले श्रम घालविण्यासाठीं जलक्रीडासुखाच्या उद्देशानें तरंगांवर जणुंकाय झोकेंच घेत होता. त्या प्रलयसागराच्या जलवेष्टनांनीं अन्तरिक्षाला भरून सोडून व नक्षत्ररूप पुष्पप्रकरांना सभोंवार उडवीत देवमंदिरांनीं युक्त असलेल्या मेरूवरील उद्यानांत जाऊन, प्रलयवायु मंगलासाठीं अक्षतांसह पुष्पवृष्टि करणाऱ्या लोकांप्रमाणें वहात होते. आकाशांत क्षुब्ध झालेल्या पर्वताप्रमाणें भयंकर दिसणाऱ्या जलतरंगांच्या शिखांनीं उडविलेलें हें गोफणींतून उडविलेल्या सोन्याच्या पाषाणाप्रमाणें दिसणारें जलरूप ब्रह्मलोकीं पत्रांनीं परिवेष्टित असलेल्या व कर्णिकेमध्यें ज्ञाननिष्ठ होऊन राहिलेल्या ब्रह्मदेवाच्या आसनभूत कमलास प्राप्त होऊन पुनः परत फिरत होतें. हत्ती, घोडे यांप्रमाणें ज्यांचे आकार आहेत, अतिशय दाट घुं घुं घोषानें जे भयंकर झाले आहेत, देवासुरांचीं सुवर्णमय नगरें ह्याच ज्यांतलि विंसा आहेत, अशा प्रकारचे हे तरंगसमूह मेघाप्रमाणें आकाशांत भ्रमण करीत आहेत. अतसी पुष्पासारखी जिची शोभा आहे अशा लाटेमध्यें प्रलयार्णवरूप, दुसऱ्या यमरूपी जलपूराकडून हा एक यमच वाहून नेला जात आहे, असें मला वाटलें. म्हणजे यमालाहि वाहून नेणारा जलपूर दुसऱ्या यमासारखा भयंकर दिसला. हे सर्व लोकपाल, नाग, लक्षावधि पर्वत व नगरें ह्यांसह पाण्यांत बुडत आहेत. त्यांतील निधानादि लक्ष्मीच्या खाणींच अशा पर्वतगुहांत शिरून पुनः परतणाऱ्या वायूच्या गुड गुड शब्दांनीं युक्त होऊन वेगानें जे पूर चालले होते त्याबरोबर ते वहात आहेत. दुर्वार जलसमूहानें परिपूर्ण झालेल्या पाताल, भूतल व नभःस्थल यांच्या दिक्तटांवर इंद्र, यम, यक्ष, देव, असुर यांचे समूह, ग्राम, नगरें, विमानें, वृक्ष यांसह जणुंकाय मत्स्यांप्रमाणेंच भ्रमण करीत होते. वाहिल्या जाणाऱ्या कृष्णाची तनुच जलरूपी होती. दोहन करण्याच्या वेळीं वांसराला गाईच्या पायालाच जसें बांधतात, तसाच तो प्रकार झाला. देव व दैत्य हे त्या पाण्यांतहि एकमेकांला वेढूं लागले. त्यामुळें बुड बुड असा ध्वनि होऊं लागला. तो त्यांच्या स्त्रियांच्या हलाहल शब्दांनीं युक्त होता. कोलाहलानें आकुल झालेल्या देव व दानव यांच्या उत्तमोत्तम नगरांचा विध्वंस होऊन तीं वेगानें पाण्यांत पडत होतीं. त्यामुळें पाणी अतिशय क्षुब्ध होत होतें. तें क्षुब्ध जल आकाशाला भरून सोडीत होतें. दिशांमध्यें भ्रमण करणाऱ्या मेघसमूहांनीं त्याला वेढलें होतें व त्यामुळें तो एक जलमय स्पष्ट कुड्यबंधच आहे, असें भासत होतें. अरे अरे! हा सर्व लोकांना प्रत्यक्ष दिसणारा सूर्य तरंगभ्रमांनीं वेगानें

खालीं नेला आहे. हे कुबेर, यम, नारद, इंद्र इत्यादि जलाच्या भ्रमणांनीं आपले प्राण धारण करण्यास असमर्थ होऊन आतां प्राणत्याग करीत आहेत. याप्रमाणें ब्रम्हदेव, इंद्र, विष्णु यांच्या नगरांना छिन्नभिन्न करून त्यांच्या खंडांनीं व्यापलेल्या पाण्यांतून ज्यांचे देह वहात जात आहेत असे तत्त्ववेत्ते आपलीं शरीरेंहि शवाप्रमाणें पाहूं लागले. कारण त्यांवर त्यांचा अभिमान नव्हता. त्यामुळें निरनिराळ्या पदार्थांशीं संघट्टण पावून दुःखी होणाऱ्याहि देहांना ते मृत व जड असल्याप्रमाणेंच पहात होते. त्यामुळें ते प्राज्ञच तेवढे त्या वेळीं शरीराच्या छेद-भेद-अभिघातादि दुःखानें दःखित झाले नाहींत, बाकी सर्व प्राणी दुःखी होत होते. स्त्रियांचा समुदाय तेथें जणुंकाय अर्धवट चूर्णच होऊन गेला होता; पृथ्वीवर अतिजड म्हणून प्रसिद्ध असलेल्या त्याला त्यांतून तारण्यास दुसरा कोण समर्थ होता? कारण अंतकाच्या तीक्ष्ण दाढांखालीं चर्वण केल्या जाणाऱ्या जनसमूहाला परस्परांचें रक्षण करतां येत नाहीं. जनता आपापसांत आपलें रक्षण करण्यास त्या वेळीं समर्थ नसते. पर्वतांचें विदारण करून सर्पांप्रमाणें वेगानें गमन करणारे हे जलकल्लोल मोठ्या वेगानें वहात आहेत. त्यांमध्यें देवांचीं नगरें प्रथम कांहीं वेळ नौकांप्रममाणें पाण्यावर तरंगून शेवटीं भग्न झालेल्या नौकेप्रमाणेंच त्यांत बुडून जातात! अरे अरे, काळानें या त्रिभुवनाचें निर्मूलन केलें आहे. पाण्यानें ज्यांचें विलोडन केलें आहे अशा द्वीपांनीं, श्रेष्ठ पर्वतांनीं, देवांनीं, असुरांनीं, नागांनीं, मनुष्यांनीं, गजांनीं व चारणांनीं, ज्यांचीं मूळें तोडलीं आहेत अशा जणुंकाय कमलांनींच व्याप्त असल्याप्रमाणेंच तें एक सरोवर होऊन राहिलें. हाय हाय! ऋद्धीनें संपन्न असलेले ते जगन्नायक इंद्रादि देव कोठें गेले? १३९.

# सर्ग १४० वा.

—:०:—

१ प्रलयाब्धीचा क्षय. २ गांवामध्यें ब्राम्हणरूपानें स्थिति. ३ मुनीचें त्या प्राण्याच्या शरीरांतून बाहेर निघणें.

**व्याधः**—हे भगवन्! तुमच्यासारखा ज्ञानयोगसिद्धहि त्या त्या नानाप्रकारच्या अवस्थेला कसा प्राप्त झाला? ध्यानरूप योगांगांच्या प्रयोगानें लागलीच सर्व भ्रांतींच्या उपशमास कसा प्राप्त झाला नाहीं?

**मुनिः**—कल्पांतीं नानाप्रकारच्या नाशांनीं भ्रांतिरूप विश्वें विनाश पावतात. ते नाश आकाशांत आभासरूप असतात. कदाचित् कल्पांतीं क्रमानें नाश प्रवृत्त होतो. केव्हां केव्हां अकस्मात् दिशांमध्यें विकार उत्पन्न होऊन एकप्रकारचा नाश प्रवृत्त होतो. क्रमिक कल्पामध्यें योगानें भूत व भविष्यत् पदार्थांचें पर्यालोचन करण्यास अवकाश असतो. पण आकस्मिक कल्पामध्यें तसा अवकाश नसतो. मलाहि त्या आकस्मिक प्रलयांत तसा विचार करण्यास अवकाश मिळाला नाहीं. आकस्मिक प्रलयामध्यें जेव्हां जलाचा विकार उद्भवतो व तो हिरण्यगर्भाला निवेदन करण्यासाठीं देव जों जाऊं लागतात, तों जल त्यांनाहि वाहून नेतें. मग देवांचीहि जेथें अशी स्थिति, तेथें माझी काय कथा? शिवाय हे व्याधा! काल हा सर्वांचा नाश करणारा आहे. ज्या काळीं जी गोष्ट अवश्य व्हावयाची ती होतेच. नाशाचा काळ उपस्थित झाला असतां मोठमोठ्या लोकांचेंहि बल, बुद्धि व तेज यांचा सर्वत्र सर्व प्रकारें विपर्यास होतो. शिवाय हे अरण्यांतील व्याधा! मी हें सर्व स्वप्नांत पाहिलेलें तुला सांगितलें आहे. मी त्या वेळीं दुसऱ्याच्या चित्ताचें अनुवर्तन करीत होतों. त्या अवस्थेंत मोठमोठ्या

लोकांनाहि विवेक होत नाहीं. आणि स्वप्नांत कोण काय पहात नाहीं?

व्याधः—जीवाचें कल्याण कशांत आहे हें समजणाऱ्या हे पंडिता! तुम्हीं सांगितलेलें हें सर्व जर स्वप्नभ्रमासारखें आहे तर तें मला सांगण्यांत तरी काय अर्थ आहे?

मुनिः—हे बुद्धिमन्, तुला बोध करणें हें यामध्यें फार मोठें प्रयोजन आहे. कारण मीं वर्णिलेल्या प्रपंचाप्रमाणेंच हें आतां दिसत असलेलेंहि दृश्य भ्रमात्मक आहे, असें तूं जाणशील, आणि सर्व दृश्य भ्रमात्मक ठरलें असतां तूं दृग्रूप पुरुषच अवशिष्ट रहाशील. म्हणून अन्वयव्यतिरेकांनीं हा अन्यशोधन-उपायभूत कथाशेष माझ्या तोंडून तूं ऐक. त्यानंतर त्या प्राण्याच्या तेजोधातूंत स्थित होऊन स्वप्नांतील मीं त्या मत्त एकसागराच्या वेगांत भ्रमण करीत असतांना असें पाहिलें—(मी ती भ्रांति किती वेळ पहात राहिलों, याचें उत्तर—) क्षुब्ध वज्राला भिऊन पंखयुक्त पर्वतसमूह जसे दूर जाऊं लागतात, त्याप्रमाणें क्षुब्ध आवर्त व कल्लोल यांसह तें पाणी कोठेंसें दूर जाऊं लागलें. त्या पाण्याबरोबर वहात जाणारा मी दैववशात् एका पर्वत-शिखराच्या एकदेशासारख्या तटाला लागलों व त्याचाच आश्रय करून राहिलों, तों एका क्षणांत तें सर्व पाणी माहींसें झालें. तरंगांच्या अग्रापासून उडालेल्या जलकणासारख्या ग्रह-नक्षत्रादि देवांनीं आकाश तारकायुक्त झालें. पातालांतील तारागणांनीं त्याचें उदर रत्नमय दिसूं लागलें. आवर्तामध्यें परावर्तन पावलेल्या अद्रिरूप जीर्ण तृणांनीं तें विस्तारलें. सुवर्णद्वीपा-सारख्या देवनगरींतील मंदिरांनीं व्यापलें. भ्रमण पावणाऱ्या ज्या देवस्त्रिया, त्याच लीन नलिनीजालानें तें मालायुक्त झालें होतें. त्याच्या मध्यभागीं वहात जाणारें कल्पाभ्राप्रमाणें नीलवर्ण शेवाळ होतें. विद्युत हेच ज्यांतील गोरोचनासा-रखे पराग होते, अशा प्रकारच्या मेघरूप नील-कमलांनीं तें निर्भर झालें होतें. स्फुरण पावणारे सीकर व निहार यांनीं युक्त असलेले मेघ व पर्वत यांनीं ज्याच्या सभोंवार तट निर्माण केले आहेत असे कल्पद्रुमसमूह त्यांत वहात होते. अशा प्रकारचें तें जल निशेःष निघून गेलें, त्यानंतर तो एकार्णवखात एक शुष्क कोटर बनला. त्यांत कांहीं ठिकाणीं सह्याद्रि कोसळला होता. कांहीं ठिकाणीं मंदार पर्वत कोसळून विछिन्न झाल्यामुळें हा मंदारच आहे कीं दुसरा कोणता पर्वत आहे असा संशय येत होता. कांहीं ठिकाणीं चंद्र, सूर्य, यम, इंद्र, तक्षक हे चिखलांत रुतले होते. कांहीं ठिकाणीं कल्पद्रुमांचा अधःशाखा-समूह चिखलांत गडप झाला होता. कांहीं ठिकाणीं कमलांप्रमाणें लोकपालांचीं मस्तकें व हस्त अडकून राहिले होते. कांहीं ठिकाणीं कमलाप्रमाणें विश्रांति पावलेल्या रक्ताच्या डोहांनीं तो एकार्णवखात रक्तवर्ण दिसत होता. कांहीं ठिकाणीं विद्याधरींचा समूह आकंठ बुडून आक्रोश करीत होता. कांहीं ठिकाणीं मेलेल्या हत्तींप्रमाणें यमाच्या उग्र महिषांनीं त्याला आच्छादित केलें होतें. कांहीं ठिकाणीं महाशरीररूप देवपर्वत हातपाय पसरून पडला होता. भूमीवर पडलेल्या यमदंडानें मत्त झाल्या-प्रमाणें जलनिरोध करण्यास असमर्थ असा महासेतु ज्यांत आहे व ब्रह्मदेवाच्या मेलेल्या हंसाच्या योगानें ज्यांतील पंकयुक्त भूमि जणुं काय सस्मित आहे व कांहीं ठिकाणीं देवांच्या हत्तीचा अर्धा देह चिखलांत बुडून गेला आहे, असा तो एकार्णवखात त्या वेळीं झाला. इतक्यांत त्या पर्वततटाच्या शिखरावर कोणा एका मुनीच्या आश्रमास प्राप्त होऊन श्रमानें मी जों थोडीशी विश्रांति घेत आहें, तों मला

अतिशय झोंप आली. त्यानंतर सुषुप्तोत्तरकालीं प्रवृत्त झालेल्या निद्रेंत त्या प्राण्याच्या तेजोधातूंत: राहून पाहिलेल्या प्रलयाप्रमाणेंच त्या वासनेनें युक्त असलेला मीं स्वत:च्या तेजोधातूंत स्थित होऊन तसाच कल्पांत पाहिला. तें द्विगुण दु:ख पाहून पुष्कळ वेळानें व्याकुळ झालेला मी जागा झालों आणि जों पहातों तों त्या प्राण्याच्या हृदयामध्यें स्थित असलेल्या पर्वतशिखरालाच मीं पाहिलें. त्यानंतर तेथें दुसऱ्या दिवशीं सूर्याच्या उदयानें सुंदर झालेलें—लोक, आकाश, भूमि, पर्वत यांनीं युक्त असें—भुवन पाहिलें. शाखेपासून जसे पल्लवादिक होतात, त्याप्रमाणें द्युलोक, पृथ्वी, वायु, आकाश, पर्वत, नद्या, दिशा इत्यादि सर्व माझ्या मनापासून उत्पन्न झालें. त्यानंतर त्याच्या शरीरांत तशा प्रकारचें भूतल पाहिलें असतां किंचित विस्मृतबुद्धि होऊन त्या पदार्थांनीं मी व्यवहार करण्यास प्रवृत्त झालों. म्हणजे यापूर्वीं जो अनुभव घेतला होता तो सर्व विसरल्यासारखा करून माझ्या बुद्धीनें मला पुन: व्यवहारांत प्रवृत्त केलें. आज मला उत्पन्न होऊन सोळा वर्षें झालीं. हा माझा पिता, ही माझी माता, हें घर इत्यादि प्रतिमा उत्पन्न झाली. मीं एक लहानसा गांव पाहिला. त्यांत एक ब्राह्मणाश्रम होता. त्यांत एक घर होतें. तसाच एका आश्रमांत कोणी एक बंधु होता. याप्रमाणें जाग्रदादि तीन अवस्थांचा अनुभव घेत, मी त्या ग्राममंदिरांत आपल्या आप्तांसह राहूं लागलों. अशा स्थितींत अहोरात्र भराभर जाऊं लागले. ते ग्रामादिकच मला खरे भासले. त्यानंतर कांहीं कालानें माझी ती बोधधी नाहींशी झाली. मला त्याचें विस्मरण झालें आणि पूर्वीं दाम-व्यालकटाख्यानांत सांगितलेल्या वासनाशून्य कटाला मत्स्याच्या सहवासांनीं पूर्व बोधाचें विस्मरण होऊन मत्स्यत्व जसें प्राप्त झालें, त्याप्रमाण मलाहि ग्रामीणत्व प्राप्त झालें. मी देखील एक खेडवळ ब्राह्मण झालों. देहावर सर्व आस्था ठेवली. विवेकभूमि दूर सारली. शरीर हेंच माझें आत्मस्वरूप असें मी समजलों. केवळ स्त्रीकडूनच अनुरंजित झालों. केवळ वासना हाच स्वभाव किंवा देह बनला. केवळ धनामध्येंच तत्पर झालों. जीर्ण गायी व बैल हेंच माझें धन होतें. गृहांगणांत सभोंवर षावटे, घेवडा यांच्या वेलींचीं मीं वयी घातली. अग्नि, भूमि व प्राणी यांचा मीं संचय केला. एक कमंडलु संपादन केला. तुळशीसारख्या अल्पकाल जिवंत राहाणाऱ्या वृक्षांवर मोठी आस्था ठेविली. देशधर्म, ग्रामधर्म वगैरे लोकाचारांत रत झालों. घराच्या आसपास हिरव्याचार कोमल गवतांनीं भरलेल्या स्थलांमध्यें रमूं लागलों. परसांत भाजीपाला, फुलझाडें वगैरे लावून त्यांची जोपासना करण्यांत वेळ घालवूं लागलों. नद्या, पर्वत, तीर्थें, सरोवरें, यांमध्यें स्नान करण्यांत तत्पर झालों. गोमय, अन्न, जल, जळाऊ लांकडें, विटा इत्यादिकांचा मोठ्या कष्टानें संचय करणें हा माझा स्वभावच बनला. हें माझें कर्तव्य आहे व हें नाहीं, या पाशांनीं मीं अगदीं परवश केला गेलों. याप्रमाणें जिवंत राहाणाऱ्या माझीं तेथें शंभर वर्षें गेलीं. एकदा कोणी एक आत्मज्ञ तापसी दुरून अतिथिरूपानें तेथें आला. मीं त्याची पूजा केली. तो स्नान करून माझ्या घरांत विश्रांति घ्यावयास राहिला. भोजनोत्तर रात्रीं शय्येवर बसून तो गोष्टी सांगूं लागला. नाना दिशांतील देश, पर्वत, पृथ्वी, व्यवहार यांनीं नानाविध रसाश्रयभूत अशा एका मनोरम कथाप्रसंगीं त्यानें मला बोध केला. हें सर्व अनंत, निर्विकार चिन्मात्रच आहे, व तें जसेंच्या तसेंच स्वरूपांत स्थित असूनहि जगद्रूपानें भासतें, असा त्यानें मला

बोध करतांच बोधैकरूपतेस प्राप्त झालेल्या मला धारणावशात् आपला वृत्तान्त आठवला, आणि ज्याच्या हृदयांत मी स्थित होतों, त्याला विराड्रूप मानून त्यांतून बाहेर पडण्यास उद्युक्त झालों. पण त्या वेळीं त्याचें मुख म्हणजे त्या शरीरांतून बाहेर पडण्याचें द्वार मला जेव्हां कळेना, तेव्हां त्या प्राण्याच्या विस्तीर्ण देह-भुवनांत मी भ्रमण करूं लागलों. त्याचें तें शरीर, भूमि, सागर, पर्वत, नद्या यांनीं आवृत झालेलें होतें. त्यामुळें एकाद्या व्यूहांत शिर-ल्याप्रमाणेंच माझी अवस्था झाली आणि बाहेर पडण्याचें द्वार असें जें त्याचें मुख तें न सांपडल्यामुळें मी त्या बंधुजनांनीं युक्त असलेल्या देशाला न सोडतांच बाहेर निघून जाण्यासाठीं त्याच्या प्राणवायूंत प्रविष्ट झालों. ‘येथील प्राण्यांच्या बाहेरील व आंतील सर्व विराड्रूप मी पाहीन,’ असा निर्णय करून व तदनुकूल धारणा धारण करून, त्या आपल्या प्रदेशाला सोडलें आणि पुष्पाबरोबर जसा सुवास जातो त्याप्रमाणें त्याच्या प्राणवायूबरोबर मी बाहेर आलों. त्याच्या पवनस्कंधावर आरूढ होऊन त्याच्या मुखकोटरास प्राप्त झालों. आणि वायुरथावर बसून मी जों बाहेर येत आहें, तों पद्मासन घालून स्थित असलेला माझा देह आपल्यापुढें तसाच पाहिला. बाहेर कोठें गिरिकंदरीं एक मुनीचा आश्रम होता. त्यांत शिष्य माझ्या देहाचें रक्षण करीत होते. ते माझें संरक्षण करण्यामध्यें अतिशय दक्ष होऊन पुढेंच उभे होते. अशा स्थितींत त्यांचा एक मुहूर्तमात्रच काल गेला होता. ज्याच्या हृदयामध्यें मीं प्रवेश केला होता, तो माझा शिष्यरूप पुरुष एका ग्रामांतील उत्सवांत प्राप्त झालेल्या मिष्ट अन्नानें तृप्त होऊन उताणा निजला होता. तें आश्चर्य पाहून मी कोणाला कांहींच बोललों नाहीं. पुनः कौतुकानें त्याच्याच हृदयामध्यें प्रवेश केला. त्याच्या ओजः-प्रदेशीं शिरलों. त्या पूर्ववासनेनेंच युक्त होऊन आपल्या बंधूंना पाहाण्यासाठीं त्याच्या हृदयामध्यें जाऊन जों पहात आहें, तों तेथें अति भयंकर युगान्त प्रवृत्त झाला होता. तें भुवन आपल्या सर्व रचनेसह विपर्यासास प्राप्त झालें. त्यांतील पर्वत निराळेच होते. वसुधा पूर्वींहून निराळीच होती. दिशांचा प्रकारहि निराळाच होता. भुवनस्थितिहि अगदीं विलक्षण होती. ते पूर्वींचे बंधु, तो ग्राम, तो भूभाग, तो दिक्तट हें सर्व कोठें गेलें तें कांहीं कळेना! जणुंकाय त्या सर्वाला वाऱ्यानेंच उडवून नेलें होतें. त्या वेळीं निराळ्याच आकाराचें भुवन तेथें अवस्थित असलेलें मीं पाहिलें. त्याची रचना अगदीं विलक्षण होती. तें निराळेंच एक जगत् उत्पन्न झालें होतें. त्यांत बारा आदित्य तापूं लागले. दाही दिशा प्रज्वलित झाल्या. थंडीनें गोठलेल्या पाण्याप्रमाणें पर्वत वेगानें गळूं लागले. प्रत्येक पर्वतावर प्रत्येक दिशेमध्यें वन-पंक्ति जळूं लागल्या. समस्त रत्नभूमि जळून नामशेष झाल्या. सर्व सागर शुष्क झाले. महा-वायु पूर्व दिशेमध्यें जोरानें वाहूं लागले. सर्व भूतल जळून निखाऱ्यांचा ढीग पडला. प्रथम पाताळांतून, नंतर भूतलांतून, त्यानंतर सर्व दिशांतून ज्वाला निघूं लागल्या. सर्व विश्व एकच ज्वालामय मंडल होऊन संध्याकाळच्या अभ्राप्रमाणें आरक्त झालें. त्या ज्वालामय गृहांत सुवर्णपद्मकोशांत भ्रमण करणाऱ्या भ्रमराप्रमाणें प्रविष्ट झालेला मी दाहरूप विकारदुःखास प्राप्त झालों नाहीं. एखादा पतंग जसा दीपज्योतीवर पडावा, त्याप्रमाणें जरी मी त्या अग्नींत पडलों होतों, तरी मीं सूक्ष्म देहमात्र आहें. हा आपला निश्चय न सोडल्यामुळें दग्ध झालों नाहीं. मी वायुरूप आहें अशी धारणा धरून वायुरूप झालों व

मोठ्या मेघांत जशी वीज त्याप्रमाणें त्या ज्वालामय जगांत सहज भ्रमण करूं लागलों. ज्वालांमध्यें ज्याचें शरीर चंचल आहे असा होऊन भूमीवरील कमलखंडामध्यें भ्रमण करणाऱ्या भ्रमराच्या शोभेस प्राप्त झालों. १४०.

## सर्ग १४१ वा.

१ वन्हिज्वालांनीं आकुल झालेल्या लोकीं भयंकर वायूचा निर्गम, २ व निखाऱ्यांचा वर्षाव करणाऱ्या ज्वालामेघाचें वर्णन.

मुनिः—स्वप्नामध्यें हें स्वप्न आहे असें जाणणारा स्वप्नांतील अग्नीमध्यें जरी पडला तरी जसा दुःखी होत नाहीं, त्याप्रमाणें हें स्वप्न आहे असें जाणत असल्यामुळें मी त्या अग्नींत जळत असूनहि दुःखभाक् झालों नाहीं. ज्वालासमूहांच्या वर उडणाऱ्या नव्या नव्या मंडळांनीं मीं सर्व आकाशभर अलातचक्राप्रमाणें भ्रमण केलें. मी तत्त्ववित्वामुळें अखिन्न चित्तानें त्या दावाग्नीविषयीं विचार करीत आहें, तों तेथें मोठा वायु आला. त्या वेळीं भ्रमणाच्या योगानें माझें मन किंचित् शांत झालें होतें. अग्नीच्या फूत्काराप्रमाणें अतिगंभीर मेघाच्या गडगडण्यासारखा फार मोठा ध्वनि करणारा तो वायु आपल्याबरोबर उडविणाऱ्या जगांतील अनेक पदार्थांनीं व्याप्त झाला होता. मोठमोठ्या घुम घुम अशा आवाजांनीं मेघ पहिल्यापेक्षां दुप्पट ध्वनि करूं लागला. तो आवाज करणाऱ्या मेघांना वेगानें उडवूं लागला. सूर्यहि त्या वायूमुळें गरगर फिरूं लागले. आणि अलातचक्राप्रमाणेंच आकाशांतील अग्निज्वालांत मिसळून गेले. ज्वालारूप संध्यासमूहांनीं त्या वायूनें शेकडों अग्निनद्या प्रवृत्त केल्या. पर्वतापेक्षांहि दुप्पट भूमीचे तुकडे, दानव व देव यांचीं नगरें यांना तो सहज पानाप्रमाणें उडवूं लागला. आकाशकुक्षीमध्यें भ्रमण करणाऱ्या भूतांनीं पूर्वोक्त नद्यांचीं पात्रें दुप्पट वाढविलीं. दग्ध झालेल्या, दग्ध न झालेल्या व अर्धदग्ध झालेल्या देवस्त्रिया एकमेकांच्या अंगांवर पडूं लागल्या व त्यांनीं अग्नीच्या ज्वाला दुप्पट वाढविल्या. तो वायु ज्यांतून निखारे पडत आहेत अशा जलधारासमूहांनीं व अग्निकणरूप तुषारांनीं दंतुर झाला होता. तो विजांना अलातचक्राप्रमाणें फिरवीत होता. त्यांतून ज्यावरील राख पार उडून गेली आहे असे रखरखीत निखारे इतस्ततः उडत होते. तो धूमांधकारानें ऊर्ध्वदिशेचें म्लानमुख आच्छादित करीत होता. भूमीपासून, आकाशांतून व दिङ्मुखांतून ते वर्णन केलेल्या प्रकारचे ज्वालारूप संध्यामेघ निघाले. ज्या मेघांच्या योगानें आकाशांत राहणाऱ्या देवादिकांसह सातहि लोक ज्वालापर्वतासारखे होऊन राहिले तो वर वर्णिलेला चंड मारुत त्या वेळीं कालाग्निरुद्राप्रमाणें नृत्यलीला करण्यास प्रवृत्त झाला. त्या वेळीं ऊर्ध्व प्रदेशीं वर उडून पसरणारे जे अग्निकण त्याच त्याच्या पिंगटवर्ण व हालणाऱ्या जटापंक्ति होत्या. खालीं तो आपल्या पायाच्या प्रहारांनीं भिंतींना उडवीत होता. अतिशय कर्कश ध्वनि करीत होता. त्याचीं अंगें भस्मानें अवगुंठित झालीं होतीं. मध्यप्रदेशीं सभोंवार पसरणारी जी ज्वालापंक्ति तेंच त्याचें वस्त्रपरिधान होतें. याप्रमाणें तो आपल्या नित्य लीला करूं लागला. १४१.

# सर्ग १४२ वा.

१ स्वप्नादि जगाचें तत्व ब्रह्म आहे असें वर्णन. २ तत्वदृष्टया जगद्बीजभूत कर्मांचा अभाव.

**मुनिः**—त्या वेळीं तो तसा अतिशय कष्टकर संभ्रम सुरू असतां व त्याबरोबरच मीहि वाहून नेला जात असतां अत्यंत श्रमप्रयुक्त दैन्यास प्राप्त झालों. तेव्हां त्या खेदामुळें मीं मनांत विचार केला कीं, या दुसऱ्याच्या हृदयांत मी हें स्वप्न पहात आहें. पण मीं हें दुःस्वप्नदुःख वृथा कां भोगावें! यास्तव मी आतां हें स्वप्नदर्शन सोडून जागृत होतों व स्वास्थ्याचा अनुभव घेतों.

**व्याधः**—भगवन्! स्वप्नाचें तत्त्व काय आहे या गोष्टीचा निर्णय करून आपला संदेह घालविण्यासाठीं तूं दुसऱ्याच्या शरीरांत त्याचें स्वप्न पहाण्यासाठीं प्रवेश करून काय निर्णय करून त्या स्वप्नदर्शनापासून निवृत्त झालास? आपण हें काय पाहिलें? हृदयामध्यें महासागर कोठचा? जठरामध्यें कल्पवात कसा रहाणार? हृदयांत कल्पानलाची संभावना तरी कशी आहे? अंतरिक्ष, पृथ्वी, वायु, आकाश, पर्वत, नद्या, दिशा इत्यादि हें सर्व जगत् हृदयामध्यें कसें संभवतें? इत्यादि या सर्व प्रश्नांचा आपण जसा निर्णय केला असेल तसाच मला सांगा!

**मुनिः**—सर्गाच्या आरंभींच कारणाचा असंभव असल्यामुळें जगाचा उदय केव्हांच होत नाहीं. त्यामुळें सर्ग हा शब्द व अर्थ हे दोन्ही अज्ञातच आहेत. सर्ग हा शब्द व त्याचा अर्थ परमात्म्यामध्यें ज्याअर्थीं अज्ञात आहेत, त्याअर्थीं अज्ञात परमार्थरूपच हें आहे. त्यामुळें तें पद अज्ञानज्ञानात्मक अनामय आहे. यास्तव हे सुभगा! तुला अभिप्रेत असलेल्या स्वप्नादि जगत्तत्त्वाचा बोध झाला असतां व अज्ञानाची शांति झाली असतां परम सिद्धांतांत परमपावनपदीं स्थित होऊन मी सर्ग हा शब्द व त्याचा अर्थ हे दोन्ही संभवत नाहींत असें सांगतों. पण अज्ञलोकांना सर्ग हा शब्द व त्याचा अर्थ यांचा जो प्रत्यय येतो तो कसा येतो हें कळत नाहीं. कारण त्याचा विचारानें असंभवच ठरतो. कोणत्याहि वस्तूपासून उत्पन्न न झालेली ही आत्मवस्तु प्रकाशमात्र आहे. हें सर्व बोधमात्र पसरलेलें आहे. अहो, त्या तत्त्वामध्यें शरीर कोठचें, हृदय कोठचें, स्वप्न कोठचें व जलादिक कोठचें! बोध कोठचा व बोधाचा विच्छेद कोठचा? हें सर्व स्वच्छ चिन्मात्रच आहे. ज्याच्या अपेक्षेनें आकाशहि जणुंकाय जवळील पर्वताप्रमाणें स्थूलच आहे, तें चिदाकाश स्वभावतःच चिंतारूपानें किंचित् विकास पावतें. जें आपलें आकाशरूप स्वरूप त्यालाच तें आकाशरूपानें जाणतें. ज्याप्रमाणें स्वप्नांत नगररूपानें केवल चित्तच भासतें, त्या वेळीं त्यांत वास्तविक नगर वगैरे कांहीं नसतें, त्याप्रमाणें हें जगत् आकाशांत चिन्मात्रच आहे. हें शांत, आभासशून्य एकरूप तत्त्व आहे. चिद्रूप चक्षूमध्यें तुला हें सर्व भासत आहे. नेत्राला तिमिररोग झाला असतां आकाशांत जसें चक्र वगैरे भासतें, त्याप्रमाणेंच तुझ्या स्वरूपांत अज्ञानदोषामुळें तुला हें सर्व भासत आहे. पण आम्हांला तें भासत नाहीं. तें सत्‌हि वाटत नाहीं, असत्‌हि वाटत नाहीं व शून्य आहे असाहि प्रत्यय येत नाहीं. आकारशून्य, आदिअंतशून्य, एक केवल चिदाकाशच आहे व कांहीं कारणावांचून तें भासतें. स्वप्नांत एक शुद्ध द्रष्टाच असतो हें प्रसिद्ध आहे. त्यामुळें या जगाला योग्य कारण नाहीं. कारणाच्या अभावीं द्रष्टा नाहीं व दर्शन नाहीं. दृश्याचा अगदीं स्पष्ट अनुभव जरी येत असला तरी तें

शुद्ध तत्त्वच तसें भासतें. तथापि तें अवाच्य, आदिअंतशून्य, एक व द्वैतैक्यरहित आहे. जसा काळ, कल्प म्हणजे प्रलय व प्रकाश म्हणजे सर्ग या दोन्ही रूपानें असतो, किंवा बीज अंकुर, कांड, वृक्ष, शाखा, पल्लव, फल, पुष्प येथवर स्वतःच नटून रहातें, तसेंच ब्रह्म सर्वात्मक आहे. जें एकाला फार मोठ्या भिंती सारखें दिसतें, तेंच दुसऱ्याला निर्मल आकाश दिसतें. ही गोष्ट स्थिर—स्वप्न, संकल्प, भ्रम इत्यादि भूमीमध्यें प्रसिद्ध—आहे. ज्याप्रमाणें आत्मा चिन्मात्र आकाशच असून स्वप्नांत जाग्रत्प्रमाणें भासतो, त्याप्रमाणें जाग्रन्मय स्वप्नांतही तो तसाच भासतो. जाग्रदवस्था स्वप्नाहून अणुमात्रहि भिन्न भासत नाहीं. हेंच त्याचें आतांहि अद्वयत्व आहे. अदृश्य वायूमध्यें जसा अदृश्य सुगंध रहातो, त्याप्रमाणें सूक्ष्म चिन्मात्रामध्यें सूक्ष्म जगत् स्थित असतें. सर्व मननाचा त्याग केल्यावर जो तूं आहेस तोच निरामय रहाशील. मनन सोडून पाहूं लागल्यास त्रिकालींहि जगत् भासणार नाहीं. मग निरंतर अद्वय अनंतात्माच अंतर्बहिः सुस्थित होईल.

**व्याधः**— भगवन्! प्राक्तन-कर्मानुसारच मन मनन करतें. त्याला सोडून तें कर्म करीत नाहीं. त्यावरून कर्मच संसारबंधाचें बीज आहे असें सिद्ध होतें. ज्यांचें कर्म निःशेष नष्ट झालेलें असतें त्यांचाच समस्त मननत्याग संभवतो. तेव्हां या जगांत प्राक्तनकर्म कोणाचें असतें व कोणाचें नसतें? ज्यांचें नसतें त्यांच्या कर्मावांचूनच मनन व त्याचा त्याग कसा संभवतो?

**मुनिः**—सर्गाच्या आरंभीं जे ब्रह्मादिक स्वयंभू भासतात, त्यांचे देह विज्ञानमात्र असतात. त्यांना जन्मकर्म नाहीं. त्यांचें तत्त्वज्ञान उत्पत्ति-सिद्ध असतें. त्यांनीं पूर्वजन्मांत जी उपासना केलेली असते, तिच्या फलांतच त्यांच्या सिद्धींचा अंतर्भाव झालेला असतो. सनक, कपिल इत्यादि या कोटींतलेच होत. त्यांची देहस्थिति दग्धपटन्यायानें भासमात्र असते. त्यांना संसार नाहीं, द्वैत नाहीं, कल्पना नाहीं. ते विशुद्धज्ञानदेह असतात. म्हणजे विशुद्ध ज्ञान हाच त्यांचा देह असतो. आणि त्यांना आत्मत्व असल्यामुळे ते सर्वांचे आत्मे होऊन सदा स्थित असतात. 'अहो, पण कर्मशून्य असलेले ते कर्मवान् जीवांचे आत्मे कसे' म्हणून विचारशील तर सांगतों. सृष्टीच्या आरंभीं त्यांच्या दृष्टीनें कोणाचेंच कर्म उरत नाहीं. सृष्टीच्या आरंभीं सृष्टिरूपानें ब्रह्मच हें असें विकास पावतें. सर्गाच्या आरंभीं ब्रह्मरूपीं ब्रह्मादि जसे भासतात, त्याचप्रमाणें इतर शेकडों हजारों जीवहि भासतात. 'तर मग कर्म कोणाच्या दृष्टीनें असतें?' म्हणून विचारशील तर सांगतों. जे अज्ञानावृत होऊन स्वतःचें ब्रह्मत्व जाणत नाहींत, उलट मी ब्रह्म नव्हे, असें ब्रह्माहून आपलें अन्यत्व जाणतात, ते तशा प्रकारचे जीव जडसंज्ञक हें द्वैत सत्य आहे असें समजून व त्या वासनेनें वासित होऊनच पूर्वीं मृत झालेले असतात. त्यांचा उत्तरकालीन जन्म कर्मासह झालेला दिसतो. कारण त्यांचा तो उद्भव केवळ सात्त्विक म्हणजे सत्त्वपरिणामरूप नसून रज व तम यांनीं मिश्र सत्त्वपरिणामामुळें झालेला असतो. कारण त्या स्वतःच जडदेहरूप झालेल्या मूढांनीं परमार्थवस्तूला विसरून अवस्तुत्वाचा आश्रय केलेला असतो. ज्यांनीं बोधरूप महाआत्म्यामध्यें ब्रह्माहून अन्यत्व जाणलें आहे तेच येथें ब्रह्मा, विष्णु, हर इत्यादि निर्दोष अधिकारी जीव होत. सर्वात्मसंविदेचें स्वच्छत्व स्वाभाविक आहे. तें क्वचित् मलिनोपाधींत स्वरूपांतस्थ जीवासारखें भान आपणच पहातें. आणि जेथें

तें स्वतःचें जीवत्व जाणतें, तेथेंच अविद्या रहाते. शुद्ध आत्मरूपांत अविद्या रहात नाहीं आणि जेथें जीवोपाधिअवच्छेदानेंच अविद्या रहाते, तेथेंच आत्मा 'संसृति' या नांवाचें रूप धारण करतो. पण तोच पुढें दीर्घ कालानें आपलें स्वाभाविकरूप जाणून स्वतःच स्वरूपस्थ ब्रम्हच होतो. अज्ञात ब्रम्हाचा सर्गत्वादि भ्रांति हा स्वभावच आहे. जल आपल्या द्रवत्वामुळें आपल्या स्वरूपांतच तरंगत्वास जसें प्राप्त होतें, तसें ब्रह्म, चित्त्वामुळें जणुं काय सर्गत्वास प्राप्त होतें. हा सर्ग ब्रम्हभानमय आहे. त्याला स्वप्नहि म्हणतां येत नाहीं व जागरहि म्हणतां येत नाहीं. तेव्हां त्याची सर्गता कोठची ? व तिच्या अभावीं कर्मे तरी किती व कशा प्रकारचीं असणार ? वस्तुतः कर्म नाहींच; अविद्या नाहीं व सर्गबुद्धिहि नाहीं. स्वसंवेदनामुळें सर्व मिथ्याच प्रवृत्त होत आहे. ब्रम्हच सर्ग, भूतात्मा, कर्म, जन्म, अशा कल्पना स्वतःच करीत हें असें भासत आहे. तें सर्वशक्तिसंपन्न व सत्यसंकल्प असल्यामुळें आपल्या सर्व कल्पित अर्थाला पात्र होतें. कोणत्याहि जीवाचें सृष्टीच्या आरंभीं कर्म संभवत नाहीं. आपण अविद्येमध्यें स्थित आहों, अशी कल्पना केल्यावर देहादिकांच्या योगानें काल्पनिक कर्म निर्माण करून त्याचें कर्म भोगतो. जलामध्यें उत्पन्न झालेल्या आवर्ताला देह कोठचा व कर्मे कोठचीं ? सांग बरें ! जसा आवर्त जलमात्र तसें जगत् ब्रम्हमात्र आहे. जसें स्वप्नांत पाहिलेल्या पुरुषांचें प्राक्तन कर्म संभवत नाहीं. तसेंच आदि सर्गांत चिन्मात्ररूप शुद्ध सात्त्विक जीवांचें कर्म संभवत नाहीं. सर्ग या रूपानें रूढ झाला कीं प्राक्कर्माची कल्पना होते. नंतर कर्मपाशांनीं परवश झालेले हे जीव भ्रमण करतात. हा सर्ग मुळीं सर्गच नव्हे, ब्रह्मच हें असें सर्गरूपानें स्थित आहे, असेंच जेथें ज्ञान झालें तेथें कर्मे कोठचीं, कोणतीं व कोणाचीं असणार ? त्यामुळें कर्मप्रयुक्त बंध संभवत नाहीं. तर तो अज्ञानप्रयुक्तच संभवतो. यास्तव अज्ञानच कर्माचें बीज आहे, असें निःसंशय समजावें. अर्थात् परमात्म्याचें जें स्वाभाविक अपरिज्ञान तेंच हें बंधाला कारण होणारें कर्म आहे. ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणचें तें अज्ञान शांत झालेलें असतें. म्हणूनच जों जों पंडिताचें आत्मज्ञान दृढ होऊं लागतें तों तों त्याचें बंध उत्पन्न करणारें कर्महि शांत होत जातें. पण नुसत्या ज्ञानानें वस्तुभूत कर्माचा नाश कसा होईल, म्हणून म्हणशील तर—कर्माला मुळीं वस्तुत्वच नाहीं; तेव्हां नुसत्या ज्ञानानें त्याची निवृत्ति होण्यास कोणता प्रतिबंध आहे? परमार्थावांचून बंध म्हणून या जगांत कांहीं विद्यमानच नाहीं. जोंवर पांडित्य नाहीं, तोंवरच माया संसारमय उत्पन्न करते; आणि ज्यामुळें संसारचक्रामध्यें तूं पुनः पडणार नाहींस तेंच पांडित्य होय. शुष्क तर्कादि वगैरे करणें हें पांडित्य येथें कांहीं कामाचें नाहीं. यास्तव शुद्ध ज्ञानानें अतिशय उत्तम झालेल्या पांडित्यासाठीं श्रवणादि यत्न सतत करावा. पांडित्यावांचून दुसऱ्या कोणत्याहि उपायानें तुमच्या भयाची शांति होणार नाहीं. १४२.

---

१ 'ब्रम्ह वा इदमग्र आसीत् तत् आत्मानमेवावेदहं ब्रम्हास्मीति तस्मात्तत्सर्वमभवत् ।' ( बृ. भा. अ. १. ४. पृ. १८८ ) 'ब्रम्ह वेद ब्रम्हैव भवति' ( मुं. भा. ३. २९ पृ. ११८ ) या श्रुति याविषयीं प्रमाण आहेत.

## सर्ग १४३ वा.

—:०:—

१ पांडित्याची प्रशंसा. २ चिन्मात्रदर्शन हेंच पांडित्य. 'चित्च जगत्' या सिद्धान्ताचें पुनः युक्तीनें समर्थन.

**मुनि:**—ज्याप्रमाणें शुभ कमलांना विकसित करण्यामध्यें सूर्य हेंच आकाशमंडन आहे, त्याप्रमाणें सर्व धर्मांचा निर्णय करण्यासाठीं, धर्माशीं अविरुद्ध अशा लौकिक कर्माच्या निर्णयासाठीं व त्या उभयतांचें फल अशा ऐहिक व पारलौकिक सुखाच्या तारतम्याचा निर्णय करण्यासाठीं पंडित हेच सभेचें भूषण होत. ते श्रोत्याच्या हृदयांतील संदेहग्रंथि तोडून त्यांच्या बुद्धीचा विकास करतात. पारलौकिक सर्व सुखाहि आत्मज्ञानी पंडिताला प्राप्त होणाऱ्या आत्मसुखसागरांतलि तुषाराहूनहि अल्प आहे. गती जाणणारे आत्मज्ञानी पंडित ज्या गतीला जातात, त्या गतीपुढें इंद्राची राज्यलक्ष्मीहि जीर्ण तृणाच्या अग्राप्रमाणें आहे. पांडित्याचें फल असा जो आनंद त्या आनंदाहून ज्याची योग्यता अधिक आहे असें सुख किंवा ऐश्वर्य पाताळ, भूतळ किंवा स्वर्ग यांतलि कोठेंच मला दिसत नाहीं. शरत्कालच्या प्रसन्न पूर्ण चंद्रमंडलाकडे पाहिलें असतां दृष्टीला जसा आल्हाद होतो, त्याप्रमाणें पंडिताची सच्छास्त्राच्या विचारानें उत्पन्न झालेली परमार्थवस्तुरूप दृष्टि स्वरूपांतच आल्हाद पावते. हें अविद्यारूप दृश्य एका क्षणांत ब्रह्म होतें. पंडिताला आत्मज्ञान होतांच, ही पुष्पाची माला आहे असें कळतांच तिच्या ठिकाणचें सर्पत्व जसें नाश पावतें, त्याप्रमाणें ज्ञानाच्या बोधामुळें सर्गादि दृश्यजात शांत होतें. तर मग देह, सर्ग इत्यादिकांची शांति ब्रह्मस्वभावाहून निराळीच उत्पन्न होते असें म्हटलें पाहिजे, म्हणून म्हणाल तर सांगतों. ब्रह्म स्वतत्त्वज्ञानानें आपल्या स्वभावांत स्थित होतें व त्यानेंच स्वभावैकरूप सर्ग, देह, प्रलय इत्यादि संज्ञा स्वतःलाच दिल्या आहेत. हाच परमार्थ आहे. जेथें ही सृष्टिच मुळीं विद्यमान नाहीं, तेथें त्यांचीं धर्मकर्में व तद्बोधक—पदवाक्यरूप अक्षरमालिका ही कोठची? पृथिव्यादि जर असेल तर तें सकारण असलें पाहिजे. पण तेंच मुळीं संभवत नाहीं, तेव्हां त्याचें कारण तरी कोठचें? ब्रह्माचा जो प्रतिभास त्यालाच जगत् म्हणतात. तेव्हां ही पृथिव्यादि कोठची? व भासमान घटाला दंडचक्रादि कारणांची जशी अपेक्षा नसते, त्याप्रमाणेंच या मिथ्या जगालाहि कारणाची काय अपेक्षा आहे? स्वप्न पहाणाराला दृश्य पुरुषाचें भान जसें केवल काल्पनिक असतें, खरें नव्हे, त्याप्रमाणें या जाग्रद्रूप स्वप्नांतहि पिता, माता इत्यादि कारण काल्पनिक आहे. ज्याप्रमाणें स्वप्नांतील पुरुषांच्या पुरुषत्वाचें कारण प्राक्तन कर्म ह्मणतां येत नाहीं त्याप्रमाणें भासणाऱ्याहि या जाग्रद्रूप स्वप्ननरांचें कारण कांहीं नाहीं. जीव सर्व सृष्टींमध्यें सर्व स्वप्नपदार्थच परस्पर पहातो. या सर्गात वासनेप्रमाणेंच सर्व व्यवहार मिथ्याभूत होत असतो. त्यामुळें प्राक्तनकर्मीचें अस्तित्वहि वासनेप्रमाणें मिथ्याच आहे. भूत-भुवनादि सर्गापासून देहसिद्धीपर्यंत संसारांत सर्व पदार्थ स्वप्नपदार्थाप्रमाणेंच मिथ्या भासतात. त्यांना आपापल्या संवेदनेप्रमाणें भ्रांति होत असते. त्यामुळें जीव संवेदनांशीं विद्यमान आहेत व असंवेदनांशीं मिथ्या आहेत. भावना करणाऱ्या पुरुषाला सर्व पदार्थ भावनेप्रमाणें भासतात.

---

१ एतस्यैव आनंदस्य अन्यानि भूतानि मात्रामुपजीवन्ति ( बृ. भा. ब्रा. ४३ पृ, २१३ ) ही श्रुति याविषयीं प्रमाण आहे.

त्यामुळें ते भावनेप्रमाणें स्वप्नांतहि विद्यमान आहेत व परस्पर जागृतीप्रमाणेंच अर्थक्रिया करूं शकतात. तुझ्या स्वप्नांत बाह्य पदार्थ नसतांनाहि भोजनादि संकल्पसंविद्च पाकादि संविद्-क्रमानें पुढील ग्रासादि वस्तूपर्यंत परिणाम पावून तृप्त्यादि फलाचाहि अनुभव घेते, त्याच न्यायानें जाग्रत्संकल्पसंविद्हि क्रमानें सर्व व्यवहार करते. स्वभावामध्यें स्थित असलेली शुद्ध संविद् जें स्वतःच आपल्या अज्ञात स्वरूपांत पहाते, त्यालाच जाग्रत् व स्वप्न हीं नांवें दिलीं आहेत. सृष्टीच्या आरंभापासून देहसिद्धि होईपर्यंत जें वेदन जसें भासलें तसेंच तें मोक्षापर्यंत रहातें, त्यालाच सर्ग असें म्हणतात. जाग्रत्, स्वप्न, त्यांतील सर्व पदार्थ व त्यांची संविद् यांमध्यें भेद नाहीं. प्रकाश व आलोक यांमध्यें जसा भेद नाहीं त्याप्रमाणें अमूर्त संविद् व पूर्वोक्त पदार्थ यांत भेद नाहीं. अग्नि व उष्णता यांप्रमाणें किंवा वात व स्पंदन यांप्रमाणें किंवा तरंगांना व्यापून असलेलें द्रव व जल यांप्रमाणें किंवा शैत्य व वायु यांप्रमाणें अमूर्त संविद् व पदार्थ यांत भेद नाहीं. सर्व अमूर्त शांत चिन्मात्र असून हें जगत् असद्रूप उत्पन्न झालें आहे. पण तें अधिष्ठान चित्स्वभावत्वरूपानें सन्मयच आहे. तें 'नेति नेति' या श्रुतीनें निषेध केल्यामुळें प्रतियोगी अर्थरूपानें युक्त नाहीं. ब्रह्म जगद्रूपानें उत्पन्न होऊन व प्रलयरूपानें मरून दृश्यानुभवरूप असल्यामुळें सर्व व्यवहार करूं शकतें. तथापि परमार्थदृष्ट्या तें चिन्मात्र, अजर, शांत, एक व अमलच स्थित आहे. नगरांतील मातीची भिंत, लांकडी खांब इत्यादि पदार्थांची पुरुषांनीं जशी कल्पना केलेली असते, त्याप्रमाणें आकाश, वायु इत्यादि पदार्थांची कार्यकारणता ब्रह्मानें जी जशी कल्पिलेली असते ती तशीच रहाते. हें शास्त्र नियतीचा भंग करण्यासाठीं प्रवृत्त झालेलें नाहीं. तर त्याचें सत्यत्व व भेदादिक यांचा भंग करण्यासाठीं तें प्रवृत्त झालें आहे. तुझ्या हृदयांत स्वप्ननगर जसें असतें तसाच ब्रह्माच्या हृदयांत हा सर्ग आहे. स्वप्नांत कार्यकारणता जशी सांगितली आहे तशीच ती त्यांत आहे. अर्थात् त्याच्या सत्यतेचा भंग झाला असतां स्वप्नवस्तूच्या नियतीप्रमाणें ती नियतिहि चिन्मात्रसिद्ध होते. तूं जसें कल्पनापुर कल्पितोस, तसेंच तें तुला दिसतें. त्याच न्यायानें सृष्टीच्या आरंभीं ब्रह्मानें जशी कार्यकारणकल्पना केलेली असते, तशीच ती संविद्घनाकार सर्गांत असते. संकल्परूपी चितीनें सर्गरूप संकल्पनगरांत तुजप्रमाणेंच कार्यकारणरूपी संस्था स्थापिली आहे. तूंहि आपल्या संकल्पनगरांत स्वेच्छेनें कार्यकारणरूप व्यवस्था करीत असतोस. संकल्पनगर व त्यांतील व्यवस्था यांना चिदाकाशमात्ररूपत्व आहे, हें स्वानुभवसिद्ध आहे. हा दिसणारा सर्गहि हिरण्यगर्भाच्या संकल्पापासून उत्पन्न झालेला असल्यामुळें संकल्पसर्गान्तर्गतच आहे, असें श्रुति, पुराणें इत्यादिकांत म्हटलें जातें. तो त्याच्या बहिर्भूत नाहीं. तुझ्या हृदयांतील संकल्पनगरांत जी चित्सूर्याची स्वप्रकाशतारूप अवस्था सर्वदा असते तीच ही कार्यकारण अर्थापासून झालेली स्वभावसंसिद्धि आहे. ती त्याहून अणुमात्रहि भिन्न नाहीं. (त्याचेंच उपपादन—) हिरण्यगर्भाच्या हृदयस्थ चितीमध्यें सृष्टीच्या आरंभीं जें पृथिव्यादि मार्गानें गंधकाठिण्यादि प्रकारानें चित्त्व स्फुरतें, तेंच आतांहि तसेंच असतें. तसें असलेल्या त्याचीच 'नियति, काल, देश' इत्यादि संज्ञा केली आहे. (पृथ्वीची गंध-काठिण्य-नियति, जलाची द्रवत्व-नियति, तेजाची उष्ण प्रकाश-नियति, वायूची स्पंदनियति व आकाशाची सौक्ष्म्य नियति इत्यादि रूपानें, भूत-भविष्यत् इत्यादि

कालरूपानें, पूर्व–पश्चिम इत्यादि देशादि रूपानें स्थित असलेल्या त्याला तसें तसें नांव दिलें आहे.) जी चेतनाकाशशून्यता जशी भासते तशीच तिनें वस्तुत्वानें कार्यकारणता स्वीकारली आहे. (जसें—गाय दुधाचें कारण, घट जलादि वस्तूला धारण करण्याचें कारण. हाच न्याय सर्वत्र लागू आहे.) या संकल्पात्मक चिच्चमत्कारमात्ररूप सर्गाभासांत प्रथम पदार्थ प्रवृत्त होतात व मागून त्यांचें नांव प्रवृत्त होतें. म्हणजे 'यद्धि मनसा ध्यायति तद्वाचा वदति' अशी श्रुति असल्यामुळें मनांत प्रथम रूपकल्पना होते व मागून नामकपना होते. जेथें जी कल्पना करावी ती शून्य जरी असली तरीं तन्मात्ररूपच आहे. त्रिजगद्रूपशून्यता चिदाकाशांतच स्थित आहे. सौम्य वायूंत स्पंदसत्ता जशा त्या वायूहून भिन्न नाहींत, त्याप्रमाणेंच चिदाकाशांतील त्रिजगद्रूप शून्यता भिन्न नाहीं. आकाशांत छिद्रता व निबिडता यालाच जसें आपण नीलत्व म्हणतों त्याचप्रमाणें चितीमध्यें चेतनाचें जें निबिडत्व तोच सर्ग होऊन राहिला आहे. हा सर्ग त्रिविध परिच्छेदशून्य चिन्मात्रस्वभावानें भासूं लागला असतां साधनाभ्यासाच्या क्लेशानें ब्रह्मांतील सर्गराहित्य अनुभवास येतें. रज्जूमध्यें भासणारें सर्परूप उपायानें बाधित केलें असतां रज्जुरूप जसें पुनः दिसतें, तसाच साधनाभ्यासानें ब्रह्माचा अनुभव येतो. ऐहिक सर्गाप्रमाणेंच पारलौकिक सर्गहि तसाच मिथ्या आहे. म्हणूनच मेलेला प्रत्येक जीव स्वप्नाप्रमाणें निराळें जगत् पहातो. या लोकाहून भिन्न भासणारा परलोक व परलोकाहून भिन्न भासणारा इहलोक हें सर्व अमूर्त चिदाकाशच आहे.

व्याधः—हे भगवन्! या देहपातानंतर दुसरा देह सुखदुःख भोगण्यासाठीं कसा उत्पन्न होतो? त्याचें उपादान कारण काय व सहकारी निमित्त कारणें कोणतीं? धर्माधर्मच आपलें फल देण्यासाठीं सर्व करितात, असें जे समजतात, त्यांच्या मतीं कर्मानें निर्मिलेल्या देहादिकांची ज्ञानानें निवृत्ति होत नाहीं, असें आपण पहात असल्यामुळें मोक्षाचाच अभाव होण्याचा प्रसंग येतो. अनित्य देहादि भावानें स्थित असलेल्या याचें नित्य मोक्षरूप फळ कर्में करतील ही गोष्ट संभवत नाहीं. कारण कर्मांनीं उत्पन्न केलेल्या प्रत्येक फळाचें अनियतत्व स्पष्ट दिसतें.

मुनिः—धर्म, अधर्म, वासना, कर्मात्मा, जीव हे सर्व पर्यायशब्द आहेत. ते शब्द जरी अनेक असले तरी वास्तविक अर्थ एकच आहे. कारण संस्काररूपानें रहाणाऱ्या विहित आचरणाला धर्म व निषिद्ध आचरणाला अधर्म म्हणतात. तसल्या संस्कारांचा समूह हेंच मनाचें रूप आहे. चिदाभासानें व्याप्त असलेल्या मनालाच जीव म्हणतात. तो प्राणादिचेष्टाप्रधान असल्यामुळें कर्मात्मा असून आपल्या वासनानुसारी देहादिकांची कल्पना करतो व तद्रूप होतो. याप्रमाणें चित्‌चेच हे सर्व भिन्न भिन्न प्रतिभास आहेत. त्यांना निरनिराळीं नांवें जरी कल्पिलीं, तरी फलतः त्यांत कांहीं भेद नाहीं. दृश्य देहादिप्रपंच म्हणून कोणी एक आहे, असें चित्तानें कल्पून चिदाभासरूपानें आपल्या चिदाकाशस्वरूपांत आपणच हीं धर्माधर्मादि व तत्फलभूत सुखदुःखादि नांवें ठेविलीं आहेत. हा संविदात्मा स्वतः चिद्रूप असल्यामुळें देहाला जाणतो. मी देह असा अभिमान धरतो. संकल्प व स्वप्न या अवस्थांमध्यें मरून, विद्यमान नसतांना विद्यमान असल्याप्रमाणें कल्पितो. शून्यांत जशी शून्याची कल्पना करावी तसाच हा सर्व प्रकार आहे. मृत जीवाला परलोकबुद्धि स्वप्नाप्रमाणेंच भासते म्हणजे निजलेला मनुष्य स्वप्नांत

आपल्या दुसऱ्या देहाची जशी कल्पना करतो, त्याप्रमाणें मरणोत्तरकाळीं ह्या देहादिकांची कल्पना करतो व त्यालाच चिरकाल पहातो. पिता वगैरे, किंवा ईश्वर मृताला पुनः उत्पन्न करतो, असें समजणें हा भ्रम आहे. कारण त्याला जर दुसरा कोणी उत्पन्न करीत असेल तर 'हा तोच' असें कसें म्हणतां येईल! पण श्रुतीनें 'देहाला निर्माण करून त्यानें त्यांत प्रवेश केला' असें म्हणून शरीराला निर्माण करणाराच त्यांत प्रवेश करतो असें सांगितलें आहे. पण तो तर स्वतः आकाशरूप आहे. बरें, तो उत्पन्न केला जाणारा पूर्वींचाच नसून दुसरा कोणी आहे असें म्हणावें, तर क्षुधानिवृत्तीसाठीं आपण स्तन्यपानादि करावें अशी त्याला आठवण कशी होते? पूर्वसिद्ध आत्म्याचा आश्रय करूनच झालेल्या जीवाचें जें चेतनात्व प्रसिद्ध आहे तेंहि शून्यच आहे. अर्थात् जो मरतो तोच पुनः जन्म घेत नाहीं. तर चित्तानेंच तो 'मी हा येथें असा उत्पन्न झालों आहें' असें खोटेंच जन्मादिविक्रियाशून्य आत्म्यामध्यें कल्पनेनें जाणतो. तें त्याचें जाणणें केवळ वासनात्मक आहे. तो आपल्याच अभ्यासानें दृढ केलेल्या भावांचा चिरकाल अनुभव घेत राहातो. त्याचा त्याला अगदीं स्पष्ट अनुभव येत असल्यामुळें त्याला सत्य मानतो आणि लौकिक व वैदिक व्यवहारांत जन्मादि सत्य आहे अशी त्याला प्रतीति येते. वस्तुतः तें सत्य नसतें. तो स्वतःहि आकाशात्मा असून त्यावर स्वप्नाप्रमाणें शून्य दृश्याचा अध्यारोप करतो. पुनः आपलें मरण पहातो, व पुनः जन्म व पुनः जगत् पहातो. हा प्रत्येक जीव आकाशांत असें मिथ्या जगज्जाळ पहात राहिला आहे. तो आकाशात्मा आपल्या केवळ सांनिध्यानेंच स्वाध्यस्त कार्यकरणांना विषयांमध्यें प्रवृत्त करतो. जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति, प्रलय, मोक्ष यांत सुखादिकांचा अनुभव घेतो; पण परमार्थतः त्यांत कांहीं भक्षणीय नाहीं व कोणी भक्षण करीतहि नाहीं. याप्रमाणें जगांच्या कोटींच्या कोटि त्यामध्यें आहेत. त्यांना तत्त्वतः जाणलें असतां त्या ब्रह्मच आहेत व अज्ञानदर्शेत तें केवल दृश्य आहे. त्या जगत्कोटींनीं कोणाचें कांहींच आच्छादित केलेलें नाहीं व वस्तुतः त्या विद्यमानहि नाहींत. पण हा आत्मा त्यांतील प्रत्येकामध्यें एकेक जीव होऊन 'हेंच एक जगत् आहे, दुसरें नाहीं' असें जाणतो. त्या जगत्कोटींतील प्रत्येक जगांत पृथिव्यादि पंचभूतें व चतुर्विध भूतग्राम स्थित आहेत. त्या त्या जीवाला अभिमत असलेल्या जगांत तीं तशींच आहेत, विसदृश नाहींत. तीं असत्य व्यवहारदृष्टीनें सत्य आहेत व सत्य परमार्थदृष्टीनें अज ब्रह्मपद आहेत, म्हणूनच ज्याला सर्व वेद्याचें ज्ञान झालें आहे त्याला जें सत् वाटतें तें अज्ञाला असत् वाटतें व ज्ञानी पुरुषाला जें असत् वाटतें तें अज्ञाला सत् भासतें. किंवा चितीला जें जें जसें भासतें तें तें तसें सत्यच आहे. त्यामुळेंच हीं सर्व भूतें परस्पर सद्रूपच आहेत. किंवा जगद्रूप सत्य आहे कीं असत्य, हें सत्य संविदेनेंच ठरविणें योग्य आहे. ती भगवती संविद् 'तें सत्य आहे,' असा जर निर्णय करील तर त्याच्यामध्यें विपरीतपणा आणण्यास दुसरा कोण समर्थ आहे? कारण संविदेचें स्वरूप नित्य अप्रतिहत आहे. हें सर्व केवळ संविदेनेंच निर्णय करण्यास योग्य आहे. त्यांत अन्यता किंवा अनन्यता यांची वार्ताच नाहीं. हा वस्तूचा ओघ आपल्या कल्पनेप्रमाणें भासतो. तेव्हां त्यांत द्वित्व किंवा एकत्व कोठलें? हें ज्ञेय तेंच ज्ञानच आहे. त्यामुळें ज्ञान व ज्ञेय यांच्या अभेद बुद्धीमुळें हें दृश्यजातहि ज्ञानच होतें. याप्रमाणें सर्व दृश्याचा बाध होऊन चित् अद्वैत आहे ही गोष्ट सिद्ध होते.

'अहो पण याच्या उलट ज्ञानाचा अपलाप करून ज्ञेय मात्र अवशिष्ट रहातें असें कां म्हणूं नये,' म्हणून विचारशील तर सांगतों. ज्ञानाच्या अभावीं ज्ञेयाची सिद्धि कशी होणार? ज्ञेय विषय असल्यामुळें जड आहे व कोणतीहि जडवस्तु स्वतःसिद्ध नसते. यास्तव परिशेषन्यायानें ज्ञानच ज्ञेय असून हा प्रपंच या प्रपंचज्ञप्तीहून पृथक् स्थित नाहीं. याप्रमाणें सर्व विषयजात ज्ञप्तीमध्यें स्थित असतांना हा द्रष्टा आपल्या अज्ञानानेंच ज्ञप्तिस्वभावापासून च्युत होतो, वस्तुतः नाहीं. त्यामुळें जें ज्ञान तेंच ज्ञेय आहे आणि ज्ञेयाचा पृथक् असंभव असल्यामुळें तें ज्ञानच ज्ञेय जगद्रूपानें आपल्याला विस्तारितें. त्यामुळें पृथक् नसणाऱ्या व ज्ञप्तिरूपानेंच विद्यमान असणाऱ्या सर्गांना पहाणाऱ्या तत्त्ववेत्त्याच्या दृष्टीनेंहि दिसणारे सर्व सर्ग ज्ञप्तिव्यतिरिक्त नाहींत. पण मूर्खांना ज्ञात होणारे जे सर्ग त्यांना मी जाणत नाहीं. ज्ञानानें सर्व सर्ग एक चिन्मात्रच आहेत, ते आत्माकाशच आहेत. पण अज्ञ जीवांच्या अनेकाकार दृष्टीनें अनेकाकार झाले आहेत. एकच चिन्मात्र स्वप्नांत एक लक्ष पदार्थरूप होतें व स्वप्नांतील तें एक लक्ष पदार्थरूप जगत् सुषुप्तींत एक चिन्मात्ररूप होतें. चिदाकाशांत जी स्वप्नसंविद् तिलाच जगत् म्हणतात व जें सुषुप्त तिलाच प्रलय म्हटलें आहे. हाच न्याय सृष्टि व प्रलय यांनाही लागू आहे. एकच संविद् भोग्यरूपानें नानात्वास व भोक्तृरूपानें लक्षावधि जीवरूपांस प्राप्त होते. स्वप्न व संकल्प या अवस्थांतील प्रपंचाप्रमाणें त्या प्रपंचालाहि शून्यत्व आहे. हें सर्व अप्रतिहत वेदनमात्र आहे. तें शुद्ध तत्त्व जेथें जसें भासेल तसेंच तें तेथें बनतें. एकच संविद् सृष्टीच्या आरंभीं, सर्गसिद्ध्यर्थ स्वप्न व संकल्प याप्रमाणें. अग्नि, जल, आकाश, पृथिव्यादिरूप होते. आकाशरूप संविद्च पृथिव्यादि नांवांनीं भासते. जें चिदाकाश तेंच हें जगत् दिसतें. संविद्च नश्वर मूर्तरूप बनते व तीच नित्य अमूर्तरूपशी भासते. पण वस्तुतः तिचा नाशच नाहीं. कारण नश्वर पदार्थ जरी निवृत्त झाले तरी शेवटीं संविद्च अवशिष्ट रहाते. तूं मनानें पूर्व व पश्चिम दिशेंत चिरकाल जातोस व त्यांतील प्रत्यक्ष दिसलेले, ऐकलेले व अनुमित पदार्थ जाणतोस. त्यांतील संविद्रूप अशा तुझा नाश कधींच होत नाहीं. त्यामुळें संविद् केव्हांच नश्वर नाहीं ही गोष्ट सिद्ध होते. जो दृष्ट व संकल्पित अर्थांचा चिरकाल भावनाभ्यास करतो तो पुरुष त्याला अवश्य प्राप्त होतो. पण कांहीं दिवस त्याविषयींची इच्छा करून नंतर त्यापासून त्यानें निवृत्त होतां कामा नये. कारण कोणताहि अदृढ संकल्प कार्यक्षम होत नाहीं. किंवा अदृढ संकल्प अदृढच मनोरथादिरूप फल देतो व दृढ संकल्प दृढ फल देतो. तूं मनानें पूर्व व पश्चिम दिशेस जातोस, तेथें त्या त्या पदार्थांचा चिरकाल अनुभव घेतोस. जो संकल्प करणारा असतो, तो आपल्या संकल्पानुसार स्वसंकल्पित दिशेंत जाणें, तेथील पदार्थ पहाणें इत्यादि संकल्पास प्राप्त होतो. पण दुसरा मनुष्य संकल्प सोडून इतर दिशेला मनानेंहि जात नाहीं. ज्याची संविद्, मी दृष्ट व संकल्पित अर्थ होईन, अशी निश्चल असते, त्याच्या संकल्पाप्रमाणें तीं दोन्ही प्रथम प्रातिभासिक व तो संकल्प दृढ झाल्यावर व्यावहारिक होतात. पण दुसरा संकल्प करणारा जो पुरुष त्यानें संकल्प न केल्यास किंवा तो दुसऱ्याच विषयाविषयीं दृढ संकल्पयुक्त झालेला असल्यास त्याला त्यांतील कांहीं दिसत नाहीं. त्याचप्रमाणें दक्षिण दिशेंतून मी उत्तर दिशेस किंवा दुसऱ्या कोणत्या दिशेस जाईन, अशी ज्याची अचल संविद् असते, त्याचें मानस व शारीर कर्म

तसेंच होतें व पूर्वपश्चिम दिशेकडील गमन नाश पावतें. आकाशांत मी नगर होईन व भूमीवर मृग होईन, अशी ज्याची दृढ संविद् असते त्याला त्याच दोन अवस्थांचा अनुभव येतो, बाकी त्याचें सर्व बाधित होतें. ज्ञानानें सर्व एक चिन्मात्र आत्माकाश आहे व तेंच अज्ञानानें, अनेकाकार संविद् दृढ केल्यानें, जीवांना अनेकरूप दिसतें. शरीर चिद्रूपानें स्थिर असो कीं अचिद्रूपानें नाशवंत असो, तें कसेंहि असलें तरी अधिष्ठानाला कोणत्याहि प्रकारचा बाध करूं शकत नाहीं. कारण जीवांचा हा ऐहिक व पारलौकिक संसार स्वप्नात्मक आहे. शरीराचा नाश झाला असतां त्याबरोबर जीवाचा नाश होत नाहीं, ही गोष्ट या दोन्ही प्रमाणांनीं सिद्ध होते. म्लेच्छादि देशांत मेलेले जीव पिशाचदेहानें येथें येतात, असें भूतविद्यावेत्ते प्रत्यक्ष जाणतात व ते आपल्या पूर्वगृहांतील व्यापारादि स्मृतिपूर्वक कथन करतात. त्यावरून जीवचैतन्याचें मरणोत्तर सत्त्व प्रत्यक्ष अनुभवास येतें. ' जिवंत असलेल्या भूतवैद्यादिकांचा पिशाचदर्शन-संभाषणादिकांविषयीं हा भ्रम आहे. वस्तुतः मृत जीव येथें येत नाहीं व संभाषण करीत नाहीं,' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. देशांतरांतील मनुष्य वस्तुतः मेलेला नसतांना भ्रांतीनें तो मेला असें कळल्यासहि त्याचा जीवाशीं दर्शन-संभाषणादि व्यवहार कां होत नाहीं ? बरें, तो जीवधर्महि जर सत् असेल तर मृतधर्महि सत् कां नाहीं ? याविषयीं जसा अनुभव येत असेल तशीच कल्पना केली पाहिजे; कारण दोन्ही न्याय जर समच आहेत, तर त्यांत फरक कसा करतां येईल ? याप्रमाणें अनुभवच अर्थसाधक आहे. जाग्रत् व स्वप्न यांतील अनुभवांनाहि बाध होईपर्यंत अर्थसाधकत्व एकसारखेंच आहे. प्रबोधानें अनुभवमात्र परिशेष राहातो. यास्तव स्वप्नप्रमाणेंच हें जगाचें भान आहे, असें आम्हीं जें वर म्हटलें आहे तें सिद्ध झालें. श्रेष्ठ शास्त्रांची या सिद्धांताशीं एकवाक्यता होते. तत्वज्ञानीपुरुषांचे अनुभव व शास्त्रें यांच्या परस्पर संवादानें एकवाक्यता होणेंच सर्वथा योग्य होय. चंद्रबिंबामध्यें पाषाणाच्या जलसमूहांचें दृष्टिजाल जसें परस्पर प्रतिघातरहित सदसद्रूप असतें, तसेंच हें जगत्‌हि कोणाला सत् वाटतें, कोणाला असत् वाटतें. सर्व ग्राह्य सन्मात्राचे जे निरनिराळे अंश त्यांच्या अनुसार रहाणारें आहे व ग्राहक निर्दोष अनुभवमात्र आहे. सन्मात्र केवल आभासमात्र आहे असें सिद्ध होत नाहीं. यास्तव तें सत्‌च आहे. म्हणून तें सर्व अर्थरहित जरी असलें तरी सर्वार्थरूपानें स्फुरतें. त्यामुळें सर्व नित्य व शांत आहे. हें जगत् चिदाकाशांत कल्पनारूपानें स्थित आहे. यास्तव सर्व विचार सोडून, सर्व कल्पना टाकून, स्थिर चितानें आत्म्यामध्यें रहावें. ही संविद् स्थिर करून जशी जशी ती अचल होऊं लागते तशी ती तत्काल बनते. मन स्थिर केलें कीं स्वरूप आपोआप प्रगट होतें. त्यांत सत् काय व असत् काय ? मग शरीरें, कर्में, सुखें, दुःखें जशीं यावयाचीं तशीं येवोत, जावयाचीं तशीं जावोत. त्यांतील कशाचें काय ग्रहण करावयाचें ? हें जगत् सत् असो कीं असत् असो, तें होवो किंवा न होवो, त्याविषयीं तूं भ्रांत कां होतोस ? तूं आतां ज्ञानी झाला आहेस. तेव्हां अवश्य फल देणारा यत्न टाक. या क्षुद्र फलाविषयींचें तुझें परिभ्रमण पुरे झालें. १४३.

---

## सर्ग १४४ वा.

१ चित्‌च जगत् व जगत्‌च चित् याविषयीं युक्ति व २ ब्रम्हच सर्व शक्तिमत् आहे, असें समर्थन.

मुनिः—सर्वथा अभावभावरूप असलेल्या, स्वप्रसंवेदनात्मक व नित्य अप्रतिघरूप असलेल्या या चिन्मात्रांत बद्ध काय असणार व मुक्त काय असणार? अर्थात दृश्य चिन्मात्र आहे असें ठरल्यावर बंध-मोक्षचिंता नाहींशी होते. आकाशांत जसा विविध प्रकारचा दृष्टिभास होतो त्याप्रमाणेंच हें जगत् आहे. म्हणजे दृष्टीच्या किरणांचें आकाशांत जसें नानाप्रकारचें स्फुरण भासतें, त्याप्रमाणें हें जगत् सतत परिणाम पावून विपर्यास पावत असतें व अधिष्ठानाचा विवेक न झाल्यामुळें त्याच्या स्थैर्यानें स्थिर दिसतें. जशी प्रसिद्ध नगराची रचना पुष्कळ दिवसांनीं बदलून जाते, त्याप्रमाणेंच जगत्‌हि, पाण्याच्या आवर्तभ्रमाप्रमाणें, सतत परिणाम पावतें. भूमि, जल, आकाश, पर्वत इत्यादि हें असत् ज्या काळीं होतें, त्याच काळीं क्षण, लव, घटि इत्यादि अवयववृत्तान्तांनीं युग, कल्प इत्यादि संज्ञा विद्वानांनीं केल्या आहेत. हें सर्व जगत् स्वप्नाप्रमाणें असत्—मिथ्या असूनहि अनुभवाला येतें—प्रतीत होतें. जें जगत् नाहीं असें म्हणून अपलाप केला जातो तेंच निःशेष चिद्रूपानें स्फुरतें. चित्‌च जगत् होते. जसें हें आमचें जगत् आहे तशीं शंभर मनुष्यांना आकाशांत शंभर जगें दिसोत. पण त्यांचा परस्परांना अनुभव येत नाहीं. सरोवरें, समुद्र, कूप, यांतील प्रत्येकांत जंतु म्ह० प्राणी आहेत, पण ते एकमेकांना जाणत नाहींत; त्यांच्या दृष्टीनें दृश्यादि अन्य नियति नाहींच. ज्यप्रमाणें एकाच घरांत अनेक लोक अनेक स्वप्ननगरें पहातात, तशींच आकाशांत असंख्य जगें आहेत. तीं आकाशरूप असल्यामुळें आहेत असेंहि म्हणवत नाहीं व नाहींत असेंहि म्हणवत नाहीं. मनुष्य आपल्या एका घरांत अनेक नगरें पहातो, पण तीं त्याच्या दृष्टीनेंच आहेत, इतरांच्या दृष्टीनें नाहींत. त्याचप्रमाणें आकाशांत अनंत जगें आहेत व नाहींतहि. चिच्चमत्कारमात्र असलेलें स्वरूप आपल्या अवयवांप्रमाणेंच या सर्व दृश्याला अद्वय पहातें. त्यामुळें तें सरूपहि आहे व नीरूपहि आहे. नित्यसिद्ध चित्‌मुळेंच एकाला जी वस्तु सुरूप व सकारण वाटते, तीच दुसऱ्याला नीरूप व अकारण भासते. संस्कार केवळ चित्‌लाहि नाहींत व देहप्रतिमेलाहि नाहींत, तर अनेक दृश्याकार परिणाम धारण करणाऱ्या व चिदाभासव्याप्तीनें चित्स्वभाव झालेल्या बुद्धीलाच संस्कारादि नांवें दिलेलीं आहेत. बुद्धिप्रभावानेंच प्रभावयुक्त झालेलया अंतःकरणाहून संस्कारादिक पृथक् नाहींत. पूर्वदृष्ट अर्थासारख्या संकल्पार्थानुभूतीमध्यें स्मृतिच अपूर्णत्वामुळें स्वप्न होते. त्या स्वप्नांत आपल्या मरणाचे अनुभव वगैरे जे येतात, ते या जन्मीं जरी अननुभूत असले, तरी जन्मांतरीं अनुभूत असतात व त्या संस्कारांनीं युक्त असलेल्या बुद्धीवरच त्यांचा आरोप होतो. हें जाग्रत्सर्गरूप जगत्‌हि स्वप्नप्रतिभेप्रमाणें सृष्टीच्या आरंभीं विकास पावतें. पण ती केवळ प्रकाशरूप स्वच्छ चित्‌च आहे. दुसरें नांवहि त्यांत संभवत नाहीं. ब्रह्मच हें जगत् भासतें असें सांगितलें पण तें नवीनच भासलें आहे व पूर्वी भासलेलें नाहीं असें नाहीं. तर तें अनादि भा-रूप आहे व त्याच्याशीं ऐक्य पावलेलें हें जगत् अनादि ब्रह्मच आहे. ही गोष्ट सिद्ध झाली. तो परमात्माच कारण व कार्य म्हणून म्हटलेला आहे. कारण तोच पूर्व आहे व पूर्व हेंच सामान्य-

रूप आहे. तोच विशेष रूप होतो व विशेष रूप हेंच कार्य आहे. कार्यसंस्काराचा आधार हेंच बीज व कारणाला चांगल्या प्रकारें व्यक्त करतें तें कार्य. अशी व्युत्पत्ति असल्यामुळें हा आत्माच संस्कार असें म्हटलें आहे. कृति म्ह० कार्यानुकूल यत्न व सम्यक्करण हाच संस्कार. या व्युत्पत्तीनें कृतिलक्षण संस्कार हा आत्माच आहे. स्वप्नादि अवस्थांमध्यें जाग्रत्-अर्थाहून विलक्षण असा जो अर्थ जाग्रदर्थाचा दृष्टांत म्हणून भासतो तोच सूक्ष्मार्थत्वामुळें संस्कार, वासना, राग, द्वेष, इच्छा इत्यादि नांवांनीं प्रसिद्ध आहे. संस्कार या नांवाचा कोणी एखादा बाह्य अर्थ अंतःकरणांत जाऊन बसला आहे असें मुळींच नाहीं; तर ती संस्काराख्य वस्तु स्वप्नामध्यें दृश्य व जागरामध्यें अदृश्य असते. केवल अदर्शन झाल्यानेंच तें नाहीं असें म्हणतां येत नाहीं. कारण चित्ताकाशांत तें चेतनेप्रमाणेंच सर्वदा रहातें. स्वात्माहि साक्षिस्वभावामुळेंच स्वप्नांत भासतो व जागृतींत पाहिलेल्या पदार्थांप्रमाणें अतिशय विस्तार पावतो. तेंच साधनसंपत्तिसहित श्रवणानें निश्चित केलेलें अद्वितीय प्रत्यग्ब्रह्मलक्षण वेदांतविषयरूप आत्मतत्त्व आहे. तें पूर्वीं प्रसिद्ध असलेल्या द्वैतरूप सृष्टीचा बाध करतें व यथास्थित स्वभावांत प्रवृत्त होतें. अशा प्रकारच्या त्याच्या स्वभावाचा निश्चय करून पंडितांनीं परमपुरुषार्थाचा आपल्या शिष्यांनाहि लाभ व्हावा म्हणून पूर्वीं अज्ञात असलेला आत्माच जाग्रत्संस्कार असून विचारपूर्वक जाणलेला तोच अद्वयब्रह्म व मोक्ष आहे, अशी शास्त्रांमध्यें व्यवस्था केली आहे. दुसरे कित्येक असें म्हणतात कीं, स्वप्नामध्यें जो जाग्रत्संस्कार असतो त्यामुळें झालेलें अपूर्व रूप अजाग्रत्प्रमाणेंच जाग्रदनुभवानें केलें आहे. म्हणजे जाग्रदनुभवामुळेंच स्वप्नांत जाग्रत्चा आभास. पण हें मत बरोबर नाहीं. कारण वायूंतील स्पंदाप्रमाणें स्वप्नादि भाव स्वतःच स्थित आहेत व ते स्वतःच स्वप्नाकारानें प्रवृत्त होतात. तेव्हां जाग्रत्ला संस्कारकर्तृत्व कोठचें? ( सर्व भाग चित्तामध्यें स्थित आहेत हें कशावरून कळतें म्हणून ह्मणाल तर सांगतात–) चिन्मात्र एक आहे व तेंच स्वप्नांत लक्षरूपानें होतें. पुनः स्वप्नांतील लक्षत्व सोडून एक सुषुप्त होऊन रहातें. चिदाकाशांत जें स्वप्नसंवेदन होतें त्याला जगत् ह्मणतात. सुषुप्ताला प्रलय म्हटलें आहे. तेव्हां हाच न्याय सर्वत्र लागू आहे. एकच चिदाकाश स्वरूप न सोडतांच अनेकरूप साकारत्व धारण करतें, त्यामुळें स्वप्नांतील जगाप्रमाणेंच तें जगत् आहे. वर सांगितलेल्या उपपत्तीनें चित्परमाणूच्या आंत हें जगद्रूप स्थित आहे. तें अतिशय विस्तीर्ण जरी दिसत असलें तरी स्वप्नांत किंवा आरशांत दिसणाऱ्या वस्तूप्रमाणें चिद्भिन्न नाहीं. जें संविन्मात्र चिदाकाश तेंच परमाणूप्रमाणें अति सूक्ष्म असून हें असें पसरलें आहे. कालतःहि तें आदि-अंत-मध्यशून्य आहे. त्यालाच जगत् असें म्हणतात. तस्मात् जेथें अनंत चिदाकाश सतत स्थित आहे, तेथें जगाचें भानहि आहे. तें त्याच्या अंगाप्रमाणें अभिन्नरूप आहे. हें भुवन चिन्मात्रच आहे. तूं, मी व हें जगत् चिन्मय आहे. गुरु व शास्त्र यांनीं सांगितलेल्या या युक्तिसमूहानें तत्त्वज्ञान झाल्यावर परमाणूच्या उदरामध्येंहि जगत् शिरतें. म्हणजे तें आपली स्थूलता सोडून परम सूक्ष्म चिन्मात्रत्वास पात्र होतें. म्हणून मी सूक्ष्मरूप आहें. समस्त जगदाकार आहें. मी सर्व ठिकाणीं आहें. परमाणूच्या उदरांतहि मी स्थित आहें. चिन्मात्र परमाणुरूप होऊन व जगदात्मरूप होऊनहि मी चिदाकाशच आहें. मी जेथें रहातों तेथें त्रिभु-

वन पहातों. शुद्ध जलामध्यें टाकलेलें जल जसें तद्रूप होऊन जातें त्याप्रमाणें शोधित त्वंपदार्थरूप असलेला मी त्या शोधित तत्पदार्थरूप ब्रह्माशीं त्याचे साक्षात्कारानें तादात्म्य पावतों, म्ह० ब्रह्मास प्राप्त होतों. (याप्रमाणें प्रश्नोत्तरप्रसंगानें आत्मज्ञानरहस्य सांगून प्रस्तुत कथेचा आश्रय करून मुनि म्हणतो--) त्या प्राण्याच्या ओजामध्यें प्रवेश करून मी त्याचा अनुभव साक्षात् घेत राहिलों. ज्याप्रमाणें कमलाच्या अंकुरामध्यें भावी बीज असतें, त्याप्रमाणेंच मी अंतःस्थ त्रिजगद्रूप बनलों. तेथें माझ्या अंतरात्म्यामध्यें त्याचें, माझें व दुसऱ्याचें सर्व वासनामय त्रिजगद्रूप प्रत्येक चैतन्यांत स्फुरलें. तें जगद्रूप बाहेर मुळींच विद्यमान नव्हतें. कारण त्याच्या बाहेरचा प्रदेश अगदींच अप्रसिद्ध होता. जेव्हां प्राण्याला स्वप्नांत विस्तीर्ण जगदानंद भासतो, तेव्हां तो भास चिदणूचाच आहे. स्वप्नस्थानरूप आत्माच तें सर्व पहातो.

व्याधः--भगवन् ! हें सर्व दृश्य जर कारणरहित आहे तर तें अनुभवास कसें येतें ? कारण शशशृंगादि कारणरहित पदार्थांची स्वरूपसिद्धि होत नाहीं. आणि हें जर सकारण असेल तर स्वप्नांत घटादि सर्गाचें कारण असें जें दंड-चक्रादि त्याच्या अभावीं स्वप्नसृष्टि कशी दिसते ?

मुनिः--हा सर्ग प्रथम कारणावांचूनच प्रवृत्त होतो. सर्वकारणाच्या आरंभीं हें चिदाकाशच सर्गरूपानें दिसतें. ज्यांना योग्य कारणच नाहीं अशा पदार्थांचा अत्यंत असंभवच असतो, त्यामुळें कारणशून्य स्थूल सर्ग केव्हांहि संभवत नाहीं. पण मिथ्याभूत प्रातिभासिक सर्गांत सकारणत्वाचा नियम नाहीं. ब्रह्मच चित्स्वभावामुळें असें भास्वर भासत आहे. सर्गादिक हा त्याचाच सर्गपर्याय आहे. तें आद्यंतरहित आहे. याप्रमाणें सर्ग कारणांवांचून अत्यंत असंभवनीय आहे, असें ठरलें असतां व तो परब्रह्मरूपानें स्फुरण पावत असतां परमात्म्याच्या मायाप्रतिबिंबचैतन्यांत नित्य आत्म्याच्या औपाधिक रूपानें अनानात्वामध्येंहि नानात्व भासतें. ब्रह्मामध्येंहि अब्रह्मत्व, अनाकारामध्येंहि साकार व अस्थूलामध्येंहि स्थूल तें ब्रह्मच भासमान होतें; व तेंच देव, ऋषि, मुनि, स्थावर, जंगम, सर्व नियति, विधि, प्रतिषेध, इत्यादि करतें. भाव, अभाव, ग्रह, उत्सर्ग, स्थूल, सूक्ष्म, चर, अचर, इत्यादि सर्व अर्थ व्यभिचार पावतात. पण त्याची नियति मोक्षापर्यंत व्यभिचार पावत नाहीं. त्यामुळें सृष्टीच्या आरंभीं एकदा त्यानें नियतीची कल्पना केली म्हणजे मग नियतिविशेषरूप कार्यकरणतेवांचून पदार्थांचा संभवच होत नाहीं. त्या ब्रह्माची नियति व तिची कल्पना करणारा नायक--भोक्ता--जीव हे दोन्ही दोन हातांसारखे ब्रह्मापासून स्वतःच प्रवृत्त झाले आहेत. ब्रह्म त्यांतील एका अंगानें दुसऱ्या अंगाचें नियमन करतें. आपण आपल्या एका हातानें दुसऱ्या हाताचें जसें नियमन करतों, तसेंच तें नियतीनें भोक्त्याचें नियमन करतें. म्हणूनच जलामध्यें स्पंदामुळें तरंग जसे उद्भवतात, त्याप्रमाणें जीवाचा जाग्रत्स्वप्नरूप सर्ग अबुद्धिपूर्वक व इच्छेवांचूनच काकतालीय न्यायानें प्रवृत्त होतो. कारणामुळें कार्याची अमुक एक प्रकारची रचना व्हावी असा जो नियम तीच नियति. त्या नियतीवांचून अज्ञात ब्रह्म एक क्षणभरहि राहूं शकत नाहीं. जशी मृत्तिका धूळ, गोळा, घर, कपाल यांतील कोणत्या तरी एका संनिवेशावांचून रहात नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्म सन्निवेशावांचून रहात नाहीं. आणि 'ज्ञानानें सर्वात्मत्व' हाच ज्याचा आत्यंतिक क्षय आहे,

अशा मोक्षापर्यंत तें त्याचें संनिवेशधारण अनुवृत्त होत रहातें. याप्रमाणें सर्व दृश्यमंडल सर्वदा सकारण आहे. ज्या पुरुषाला उद्देशून ज्या वेळेपासून ज्या सर्गांत जशी नियति प्रवृत्त झालेली असते, तशीच ती त्याच्या ठिकाणीं असते. दुसऱ्या पुरुषाला किंवा कालांतरभावी पदार्थाला ती नियत करूं शकत नाहीं. अज्ञ पुरुषाला कारणशून्य ब्रम्हहि सर्गरूपानें भासतें. हा कार्यकारणदृग्भ्रमहि त्यालाच भासतो. विवेकी दृष्टीनें काकतालीय न्यायानें हा सर्ग स्थित झाला असतां पूर्वापर भावनियम पाहूनच हें घटादि कार्य दंड-चक्र-मृदादि सामग्रीपासून झालें. हें पटादि कार्य तंतु, तुरी, वेमा इत्यादिकांपासून झालें. असें पाहून नित्य वेदाच्या पद-वाक्य-व्याकरण नियतीप्रमाणें ती नियति स्थित आहे. भावांचें सकारणत्व याप्रमाणें अवश्य आहे असें ठरलें असतां जाग्रद्दृष्टि व स्वप्नदृष्टिहि कारणावांचून संभवत नाहीं. ज्याप्रमाणें मी दुसऱ्याच्या स्वप्नांत सर्व भूमीला व्यापून असलेला जलक्षोभ व प्रलयभ्रम पाहिला, त्याप्रमाणेंच दिसणाऱ्या या भ्रमाचें कारण तुला काय दिसतें ? श्रुति किंवा दुसरें कांहीं प्रमाण, यांवरून तरी तें काय संभवतें ? वस्तुतः कांहींच संभवत नाहीं. ज्याप्रमाणें स्फटिकमणी किंवा शुक्ति प्रकाश असला कीं आपोआपच चकाकतात, त्याप्रमाणें वर सांगितलेल्या प्रकारच्या ब्रम्हप्रपंचैक्यप्रतिपादक युक्ति न सांगितलेल्या दुसऱ्या वस्तूविषयींहि बुद्धिमानांच्या मनांत आपोआप स्फुरतात. म्हणून शास्त्रानुसारी युक्तिभावनेचा अनुभवच सर्व निर्णयाविषयीं समर्थ आहे व प्रमाण जीवितरूप असा तो भावनानुभवच सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे. १४४.

---

## सर्ग १४५ वा.

—:०:—

१ कफ, वात व पित्त यांनीं पूर्ण असलेल्या जीवाच्या तेजोधातूंत कल्पिलेले स्वप्नभेद व २ इंद्रियांनीं होणारे बाह्य विभ्रम, यांचें वर्णन.

मुनिः—हा जीव बाह्य इंद्रियांनीं बाह्य स्वप्न पहातो व अंतःस्थ इंद्रियांनीं अंतःस्थ स्वप्न पहातो. बाह्य व आंतर अशा दोन्ही इंद्रियांनीं दोन्ही ठिकाणीं व्यापार सिद्ध व्हावा अशी ज्यांची तीव्र भावना असते, त्यांना दोन्ही प्रकारचें स्वप्न दिसतें. ‘ तर मग काय, बाह्य इंद्रियांनीं जेव्हां तो बाह्य व्यवहार करतो तेव्हां त्याचा आंतर व्यवहार मुळीं होतच नाहीं कीं काय?’ तर तसें नव्हे. त्या वेळीं आंतर व्यवहार होतो, पण तो मनोराज्यासारखा मंद असतो. स्वप्नाप्रमाणें स्पष्ट नसतो. जेव्हां इंद्रियें अंतर्मुखच झालेलीं असतात. तेव्हां जीव वासनामात्र असल्यामुळें अति सूक्ष्म दिसणारेंहि स्वात्मजगत् स्थूल असल्याप्रमाणें पाहतो. हाच त्याचा अम्लान किंवा स्पष्ट अनुभव होय. बाह्य किंवा आंतर जगत् वस्तुतः स्थूल नाहीं. जीवाच्या इंद्रियांची स्थौल्यकल्पनेविषयींची जी अप्रतिहत दृष्टि तीच जगाची स्थूलता होय. त्यामुळें जीवाचीं प्रवर्तक इंद्रियें जेव्हां बहिर्मुख होतात तेव्हां तो बाह्य स्थूल जगत् पहातो, व जेव्हां अंतर्मुख होतात तेव्हां तो आंतहि स्थूल जगत् पाहतो. श्रोत्र, त्वक्, चक्षुः, घ्राण, जिव्हा व वागादि इंद्रियें, पंचप्राण, इच्छाप्रधान अंतःकरणचतुष्टय यांचा जो समूह तोच आतिवाहिक देह होय व तोच देह कूटस्थ चिदाभासानें युक्त झाला म्हणजे चिद्रूप जीव म्हटला जातो. ‘ तशा स्वरूपाचा जीव आंत वासनामय जगत् पाहो, पण बाहेर वासनांचा

अभाव असल्यामुळें तन्मय जगत् कसें पाहील?' म्हणून विचारशील तर सांगतों. कूटस्थ चितूच समष्टि आकाशमय होऊन सर्वत्र सर्वदा सर्वेंद्रियमय होऊन राहिली आहे. त्या सर्व वासनांच्या अधिष्ठानांत बाह्य जगाचा अध्यास होणें योग्यच आहे. जेव्हां जीव श्लेष्मात्मक रसानें परिपूर्ण होतो, तेव्हां तो स्वतः अणुरूप असलेला जीव आपल्या इंद्रियरूप अणूंत असे स्वप्नभ्रम पाहतो. क्षीरसागरांत आपण उडत आहोंत असें पाहून चंद्रोदयानें युक्त असलेल्या आकाशास तो पहातो. सरोवरें प्रफुल्लित कमलांनीं व कल्हारपुष्पांनीं सुशोभित झालीं आहेत असें त्याला दिसतें. पुष्पमय दिव्य अभ्रांच्या प्रतिनिधिभूत सरोवरांत वसंतराजाच्या अंतःपुराप्रमाणें आपल्या जीवाकाशांत पहातो. स्त्रीसमूह उत्सवामध्यें मंगलकारक वेष व लीला यांनीं युक्त असलेला पाहतो. भक्ष्य, भोज्य, अन्न, पान यांच्या शोभांनीं गृहांगण परिपूर्ण असलेलें दिसतें. ज्याप्रमाणें तरुण स्त्रिया पुष्पांच्या हारांनीं भूषित होऊन व आपल्या चंचल नेत्रांनीं अवलोकन करीत विलासानें आपल्या प्रियकरांकडे गमन करितात, त्याप्रमाणें पुष्पयुक्त व फेनयुक्त, चंचल तरंगांनीं सुशोभित झालेल्या नद्या विलासानें सागराकडे जात असतात. हिमालयाच्या शुभ्र शृंगांप्रमाणें शुभ्र दिसणारीं सौधस्थळें त्याला दिसतात. चंद्र आंथरल्याप्रमाणेंच त्यांतील भूमि शीतल असते व भिंतीला सुधालेप दिलेला असतो. त्यामुळें त्याला तीं पूर्वोक्त हिमशिखरासारखींच भसतात. स्वप्नांमध्यें तो जीव शिशिर, हेमंत व वर्षा या तीन ऋतूंत मेघाच्छादित झालेलीं स्थळें पहातो. नीलकमलिनींच्या लतांनीं युक्त व कोमल तृणांनीं हिरवीं दिसणारीं स्थळें त्याला दिसतात. पुष्पांच्या थरानें आच्छादित झालेल्या पुरोपवनांतील भूमि त्याच्या दृष्टीस पडतात. त्यांत स्निग्ध पर्णांनीं युक्त असलेल्या वृक्षांच्या छाया दूरवर पसरलेल्या असतात व त्यांत हरिणें व पांथ विश्रांति घेत बसतात. स्वप्नांत कुसुमस्थलीहि दिसतात. कदंब, कुंद, मंदार यांच्या मकरंदांनीं चंद्राप्रमाणें शोभतात, व त्यांत बसण्याकरिता रम्य स्थानेंहि केलेलीं असतात. कमलिनींचीं नीलवर्ण जाळीं दिसतात. त्यामुळें तीं पुष्पस्थलालाच धारण करणारीं आहेत, असा भास होतो. ज्यांत मेघ विश्रांति घेत आहेत अशा निर्मल आकाशासारख्या स्निग्ध वनपंक्ति दिसतात. कदली, कंदली, कुंद, कदंब यांनीं आपलें शिरोभूषण केलेल्या पर्वतांच्या पंक्ति दिसतात. त्यांवर वृक्षांच्या सुंदर पल्लवपंक्ति हालत असतात. सहज हालविलेल्या केशपाशांतून फुलें गळत असल्यामुळें वाऱ्यानें हलणाऱ्या मालतीलतेप्रमाणें दिसणाऱ्या बालांगना नृत्य करीत असतात. त्यांचीं शरीरें अतिशय कोमल असतात. फुललेल्या श्वेत कमलांनीं युक्त अशा कमलिनींप्रमाणें सुंदर चामर व सुवर्णासारख्या शेंकडों वितानांनीं आच्छादित झालेल्या राजांच्या सभा दिसतात. झुळझुळ वहाणाऱ्या जलप्रणालींतून निघणाऱ्या ध्वनींनीं युक्त अशा वनमाला दिसतात. पृथ्वीला जलवृष्टीनें भरण्यासाठीं ज्यांनीं उग्र शरीर धारण केलें आहे अशा मेघांनीं ज्यांतील पर्वत सुशोभित झाले आहेत व तुषार-निहार यांचे हार ज्यांनीं आपल्या हृदयावर धारण केले आहेत, अशा दश दिशा दिसतात. [ याप्रमाणें श्लेष्मपूर्ण नाडींत दिसणारे स्वप्नभ्रम सांगून आतां पित्तरसपूर्ण नाडींत दिसणारे स्वप्नभ्रम सांगतात—] वायूच्या स्पंदानें शुष्क केलेल्या पलाशवृक्षाप्रमाणें शोभणाऱ्या ज्वालापंक्ति दिसतात. त्या उज्ज्वल कमलपत्राप्रमाणें कोमल असतात. त्यामुळें तापलेल्या वाळूच्या सेकांनीं बाष्पयुक्त

सरिद्रूप शिरा संतप्त होतात. अग्नीप्रमाणें सूर्य अतिशय प्रखर झालेले दिसतात. त्यांच्या कांति चक्रधाराप्रमाणें तीक्ष्ण असतात. दावाग्नि पेटलेला दिसतो. विषाचा आवेश झालेला दिसतो व जलाशयहि अग्नीनें विशेषेंकरून व्याप्त झालेले दिसतात. समुद्र उष्ण होतात व त्यांतून सार्द्र उष्मा निघूं लागतो. सर्व त्रैलोक्यमंडलाला घाम सुटतो. वृक्ष, गुल्म, तृण इत्यादिकांची दाटी झाल्यामुळें गहन अरण्येंहि क्षाराचा स्राव करूं लागतात. वहात असलेल्या मृगजळांतून सारसपक्षी विहार करीत आहेत अशी शोभा दिसते. पूर्वी कधीं न पाहिलेलींहि स्थानें दिसतात व कांहीं पूर्वीं पाहिलेले वृक्षहि दिसतात. क्वचित् भीतीनें ज्यांतील धूळ अतिशय तापली आहे, अशा रस्त्यानें आपण धांवत आहों, असें दिसतें. त्याच भ्रमांत दूर एक स्निग्ध छायेनें युक्त असा वृक्ष दिसतो. आपल्याच मार्गांत दिसलेल्या त्या वृक्षापासून आपल्याला मोठें सुख होईल अशीहि तो कल्पना करतो. सर्व भुवन अग्नीप्रमाणें तप्त झालें आहे, ज्वरज्वालांनीं परिवेष्टित झालें आहे, सर्व देश धुळीनें माखले आहेत, दिशा व अंतरिक्ष यांतून त्यांचे लोट चालले आहेत, ग्रहसमूह, समुद्र, पर्वत, समुद्राच्या आसपासचीं वनें व आकाश यांना आग लागली आहे, असें त्याला दिसतें. अग्नीचा वर्षाव करणारे हजारों मेघ शरद्, ग्रीष्म व वसंत ऋतूंतहि दिसतात. ते सर्व प्राण्यांना अतिशय ताप देत आहेत असाहि अनुभव येतो. तृण, पानें, लतांचे समूह, मेघराशि व उष्मा यांनीं सर्व भूप्रदेश आच्छादित झालेले दिसतात. आकाशतल, भूतल व दिग्तट अग्निज्वालांमुळें सोन्यासारखे पिवळे दिसतात. हजारों सरोवरें, हिमालयपर्वताचीं स्थळें व दुसरेहि सर्व प्रदेश तप्त झालेले तो पहातो. अन्नरसांनीं व श्लेष्म-पित्तादिकांनीं जेव्हां नाड्या रिक्त होतात व केवळ वायूनेंच पूर्ण होतात, तेव्हां त्या वायुपूर्ण नाडीप्रदेशांत प्रविष्ट झालेला अणुमात्र जीव वायूनें परिवेष्टित होतो व आपल्याच स्वरूपांत अशीं स्वप्नें पाहतो. त्याची संवित् वातानें अतिशय क्षुब्ध झालेली असल्यामुळें तो भूतलाला अगदींच निराळ्या स्वरूपाचें पाहतो. नगर, ग्राम, पर्वत, समुद्र व वनें यांचे अपूर्व समूह पाहतो. आपण उडून जात आहों असें पाहतो. शिळांना पर्वतस्थलाप्रमाणें पाहतो. मेघांच्या गर्जनांनीं दुमदुमून गेलेले अनेक प्रदेश पहातो. कुलालचक्रावांचूनच घटादिकांचें भ्रमण झालेलें पाहतो. घोडा, उंट, गरुड, मेघ, हंस यांवर स्वतःला बसलेलें पाहतो. यक्ष, विद्याधर इत्यादिकांचें येणें व जाणें, व त्यांचा दूर होत असलेला संचार, यांचा अनुभव घेतो. पर्वत, द्युलोक, पृथ्वी, नद्या व लहान लहान टेंकड्या यांसह वनांतील वृक्षादिक, ग्राम, नगरें, दिशा, ज्यांचीं शरीरें भयभीत झालीं आहेत असे मनुष्य या सर्वांचा समुद्रांतील बुद्बुदाप्रमाणें कंप अनुभवितो. ३०
हीं सर्व थरथर कांपत आहेत असें पाहतो, आपण अंधकूपांत किंवा भयंकर संकटांत पडलों आहों, असें त्यास वाटतें. किंवा आपण एकाद्या सुशोभित वृक्षावर किंवा पर्वतावर चढलों आहों, असाहि त्याला भास होतो. (याप्रमाणें श्लेष्मादि एकेका दोषानें नाड्या परिपूर्ण झाल्या असतां स्वप्नें कशीं दिसतात त्याचें दिग्दर्शन करून तिन्ही दोषांनीं जेव्हां नाड्या भरतात, तेव्हां कोणतीं स्वप्नें दिसतात तें सांगतात—) जेव्हां जीव वात, पित्त, श्लेष्मा यांनीं युक्त होतो, तेव्हां वातवश झालेल्या कांहीं भागांनीं आर्त झालेला तो अशीं स्वप्नें पाहतोः— पर्वतांची वृष्टि होत आहे, मोठमोठ्या शिळांच्या वृष्टींमध्यें आपण सांपडलों आहों; मोठ-

मोठे तट व पर्वतसमूह भराभर फुटत असून त्यांतून ध्वनि निघत आहेत. वृक्षसमूह भ्रमण करीत आहेत. पर्वतांवरील वनरचना गरगर फिरत असून त्यामुळें मेघ छिन्नभिन्न होत आहेत. दिशांतील मध्यभाग सिंह, हत्ती व वृष्टि करणारे मेघ यांनीं भरून गेले आहेत. तसेंच ते दिगंतभाग ताली, तमाल, हिंताल या वृक्षपंक्तींच्या दाहानें व्यापलें आहे व गुहेंतून 'घुमघुम' असा निघणारा प्रतिध्वनि मेघगर्जनेशीं मिळून जात आहे, असें पहातो. पाषाण एकमेकांवर आपटून जिचें विदारण दुर्वार झालें आहे अशा दरीला पहातो ! मंदरपर्वतानें क्षीरसागराचें मंद मंथन करीत असतांना जसा ध्वनि निघतो, तसा त्या वेळीं तिच्यांतून सुंदर ध्वनि निघत आहे, दोन पर्वतशिखरांमधील प्रवाहध्वनींनीं शृंगाचें संघट्टनच होत असल्याप्रमाणें, चक्रवाकादिकांच्या 'क्रें क्रें!' अशा ध्वनींनीं कर्कश झालेल्या व ज्यांनीं आपल्या मौक्तिकमालेसारख्या धबधब्यांनीं आकाशाला पुष्पमालेनें युक्त असल्याप्रमाणें केलें आहे अशा नद्या पहातो. मीं जसा प्रलयार्णव वगैरे पाहिला, तसा प्रलयकालहि अशाच अवस्थेंत दिसतो. शिलाशकलांनीं भरलेल्या जलांनीं—महार्णवांनीं आकाशाला व्यापलें आहे असें दिसतें! जलप्रवाहांतून वहात जाणाऱ्या वनांच्या व मेघांच्या धक्क्यानें महर्षिलोक फुटत आहेत, असें दिसतें! परस्परांवर तरंगांचा सेक करून धुतल्या जाणाऱ्या दाही दिशा हंसत असल्याप्रमाणें दिसतात! त्या दिशांतून नानाप्रकारचे आवाज ऐकूं येतात. सोंसाट्याचे वारे सुटून वनें व वेली तांडवनृत्यच करीत आहेत असें वाटतें. आपल्या अंगावर आपणच शेवाळ माखून घेत आहों, असा भास होतो. समुद्राच्या आक्रमणामुळें, शूरांच्या परस्पर प्रहारांमुळें, वायूंच्या सोंसाट्यामुळें व क्रूर प्राण्यांच्या आक्रोशामुळें त्रिभुवन दुमदुमून गेलें आहे, असा भास होतो. नाड्या वातादि तीन धातूंनीं परिपूर्ण झाल्या असतां अशा रीतीनें काष्ठें, पाषाण, धूलियुक्त वात, योद्धे, यांनीं परिवेष्टित झालेला जीव स्वप्नांत जड बनतो, व अत्यंत दुःख भोगतो. मृत्तिकेंतील सूक्ष्म कीटाप्रमाणें, शिलेंतील बेडकाप्रमाणें, गर्भाशयांतील अपक्व बालकाप्रमाणें, फलांतील बीजाप्रमाणें, बीजाच्या उदरस्थ अंकुराप्रमाणें, द्रव्याच्या—गोळ्याच्या परमाणूप्रमाणें, कळसूत्री बाहुल्यांच्या खेळांतील लांकडी बाहुल्यांच्या शरीराप्रमाणें, तो जीव आंतल्या आंत दुःखी होत असतो. ('तर मग तो सुषुप्तावस्थेचा केव्हां व कोणत्या निमित्तानें अनुभव घेतो?' म्हणून विचारशील तर सांगतों—) जेव्हां हा जीव पुरीतती नांवाच्या नाडीपंजरांत प्रविष्ट होतो तेव्हां त्याला पुढें जाण्यास अवकाश नसतो. त्यामुळें ज्या वेळीं तो प्राणवायुप्रयुक्त स्पंदानें रहित होऊन बरगड्यांतील अस्थींनीं परिवेष्टित होतो आणि शिलांनीं भरलेल्या बिळांत निरुद्ध करून ठेवल्याप्रमाणें कोणत्याहि व्यापारास असमर्थ केला जातो, तेव्हां तो सुषुप्तीचा अनुभव घेतो. त्या वेळीं तो अज्ञानामध्यें निमग्न झालेला असतो. अंधकूपामध्यें पडल्याप्रमाणें त्याची अवस्था होते. शिलाकोशामध्यें अडकून पडल्याप्रमाणें तो तेथें रहातो. पण जेव्हां पुनः तो बाहेर येण्याचा यत्न करतो, तेव्हां पुनः प्राणसंचारानें नाड्यांत शिरतो. प्राणानेंच ज्याला थोडेंसें जागें केलें आहे, असा तो जीव स्वप्न पाहूं लागतो. ज्या वेळीं देहामध्यें परिणाम पावणारे अन्नरस जीवासह नाडीच्या एका भागांतून दुसऱ्या भागीं जाऊं लागतात, त्या वेळीं त्याला पवतांचा वर्षाव होत असलेला दिसतो. जाठराग्नीनें अत्यंत व्यापलेल्या वात—पित्तादिकांच्या योगानें तो

आंत व बाहेर पुष्कळच संभ्रम पहातो. हा जीव आंतल्याआंत वातापित्तादिकांनीं परिवेष्टित होऊन व परवश होऊन जसे अनेक भ्रम पहातो, तसेच ते त्याला बाहेरहि दिसतात. वात, पित्त व कफ यांच्या योगानें क्षुब्ध झालेल्या अन्नरसांनीं तो आंत व बाहेर भ्रांतीनें दृश्य पहातो. ते रस सम असल्यास सम दृश्य पहातो व ते अति क्षुब्ध असल्यास अति भयंकर भ्रम पहातो. प्रकोप पावलेल्या अन्नरसांनीं आवृत झालेला हा जीव बाहेर भूमि, पर्वत व आकाश यांचा स्पंद पहातो, किंवा अग्नीचा भयंकर दाह होत असलेला पहातो. आपण आकाशांत गेलों आहों, असें पहातो. अमावास्येच्या रात्रींहि चंद्रोदय झालेला पहातो. हिमालयपर्वत अवलोकन करितो. वृक्ष व पर्वत यांचें गहन वन पहातो. जळ आकाशांत वहात असलेलें पहातो. समुद्रांत आपण बुडून वर येत आहों, असा त्याला भास होतो. देवगृहांत सुरतसुखाचा अनुभव घेतो. आपण पर्वत, उपवन, शुभ्र अभ्रपीठ यांवर बसलों आहों, असा अनुभव घेतो. त्याचप्रमाणें शुभ्र अभ्रांचा उंच ढीग पाहतो. आपलें अंग मोठ्या करवतानें करवतलें जात आहे, असें त्याला दिसतें. नरकाचा त्याला अनुभव येतो. आकाशात ताली, तमाल, हिंताल इत्यादि वृक्षांचें वेष्टन त्याला दिसतें. आपण चक्राप्रमाणें गरगर फिरत खालीं पडत आहों, असा भास होतो. इतक्यांत अन्तरिक्षांत आपण झटकन् उडून जात आहों, असेंहि त्याच्या अनुभवास येतें. शून्यप्रदेशींहि त्याला जनसमूह दिसतो. स्थलावरहि तो समुद्रस्नानाचा अनुभव घेतो. तो विचित्र व विपरित व्यवहार पाहतो. दिवसाप्रमाणेंच रात्रीं सूर्याचें दर्शन घेतो किंवा दिवसा दुर्भेद्य अंधकार पहातो. आकाशांत त्याला पर्वतयुक्त भूतलाचा भास होतो. जेथें जाड भिंत असते, तेथेंच त्याला भिंत नसलेलें स्थल भासतें. आकाशांत भिंत बांधली आहे, असें भासतें. शत्रूच्या ठिकाणीं तो मित्रत्वबुद्धि ठेवतो. स्वजनाचे ठिकाणीं परकेपणा पहातो. दुर्जनाला सुजन समजतो. उंच गीतालापांनीं मनोहर व सफेती लाविल्याप्रमाणें अत्यंत चित्रित दिसणारे पर्वत श्वेतस्फटिक व रजत यांनीं युक्त असल्यासारखे त्यास दिसतात. अथवा ते लोण्याचेच असल्यासारखे भासतात. कदंब, नीप, जंबीर यांच्या पल्लवस्तबकरूप गृहांत तो स्त्रियांसह, कमलांवरील भ्रमरांप्रमाणें, सुखानें विश्रांति घेत असलेली पहातो. आंत निद्रेनें निमीलित झालेल्या इंद्रियवृत्ति धातूंच्या वैषम्यामुळें जणुंकाय उन्मीलितच झाल्याप्रमाणें बाहेर त्या भ्रांति पहातात. ज्याचे वातादि धातु सम नसून विषम झालेले आहेत, असे पुरुष स्वप्नांत जणुंकाय बाहेरच पहात असल्याप्रमाणें अशा प्रकारच्या अनेक वस्तु पहातात व त्यांचा अनुभव घेतात. ज्यांचे वातादि धातु विषम झाले आहेत अशा जीवांकडून आंत व बाहेर अत्यंत विपरीत व कर्कश अनेक कार्यें पाहिलीं जातात. वातादि धातूंचें साम्य झालें असतां आपल्या तेजोधातूंत असलेलाच हा जीव या समव्यवहारास्थितीला स्वतःच अनुभवितो. नगर, ग्राम, पत्तन, अरण्य यांचा समूह जसा असतो तसाच दिसतो. जल सौम्य दिसतें. दाट व शीतल तरुच्छायेचा अनुभव येतो आपल्याच देशामध्यें आपण जा-ये करीत आहों, असें भासतें. चंद्र आपल्या प्रकाशानें सर्व भूमंडलाला भूषित करीत आहे असें दिसतें. सूर्य आपल्या सौम्य आतपानें सर्वांना सुख देत आहे असा भास होतो. नक्षत्रें व अहोरात्र यांनीं त्रिभुवन मंडित झालें आहे असें

भासतें. याप्रमाणें हें सर्व असत् असतांनाहि सत् असल्याप्रमाणें दिसतें. वायूंतील स्पंदनाप्रमाणें चित्तत्त्वांत हा दृश्याचा अनुभव येतो. असत्च सत् असल्यासारखें व अभिन्नच भिन्न झाल्यासारखें भासतें. शांत म्हणजे निष्प्रपंच ब्रह्मापासूनच सकल जगाचा उदय होतो. पण शांत असलेलें कांहींच कधींहि अन्यथा होत नाहीं. यास्तव आकाशासारख्या अनंत चितीच्या शरीरांत प्रतिभासमात्र असलेलें हें जगत् अनंताकार भासत आहे. पण त्या चितीहून अन्य कांहीं नाहीं. १४९.

## सर्ग १४६ वा.

—:०:—

१ स्वप्नानंतर आपली सुषुप्ति व २ पुनः स्वप्नप्रसंगानें अद्वैत ब्रह्माचें सविस्तर वर्णन.

**व्याध:**—हे मुनिश्रेष्ठा! त्या भ्रांतिरूप प्राण्याच्या हृदयस्थ ओजांत स्थित असलेल्या आपलें त्यानंतर काय वर्तमान घडलें?

**मुनि:**—हे व्याधा! त्यानंतर काय झालें तें ऐक. ज्याचा लिंगदेह त्या जीवाशीं मिश्रित झाला आहे अशा तेजोधातूमध्यें बसलेल्या माझें पुढें काय झालें तें मी तुला सांगतों. त्या वेळीं तो घोर कल्पांत सुरू असतां, मोठमोठे पर्वतश्रेष्ठ तृणाप्रमाणें उडवीत प्रलयवायु वहात असतां, पर्वतवृष्टि कोठूनशी अकस्मात आली! वनें, विस्तीर्ण शिखरें, ग्राम, पत्तनें, इत्यादि सर्व तिच्या बरोबर वहात जाऊं लागलीं. जेव्हां मी त्या प्राण्याच्या ओजामध्यें त्याच्या जीवरूपानें परिणत झालों, तेव्हां तेंच पूर्वीचें शैलवर्षण मीं पाहिलें. त्या प्राण्याच्या नाड्यांतील अन्नरसांत परिणाम पावलेल्या अन्नलवरूप पर्वतांच्या मोठ्या पुरानें मी निश्चेष्ट झालों आणि अज्ञानरूप अंधत्वानें युक्त अशा गाढ सुषुप्तीचा अनुभव घेतला. नंतर कांहीं काळ झोंप घेऊन जेव्हां बाहेर निघण्याच्या मार्गाला प्रतिबंध करणारा अन्नरस जीर्ण झाला तेव्हां प्रातःकालीं पद्माकर जसा बोधोन्मुख होतो तसा मी हळूहळू जागा होऊं लागलों. अंधकारामध्यें निमीलित झालेली दृष्टि जशी पुष्कळ वेळानें तेजश्चक्राच्या आभासाप्रमाणें भासते, त्याप्रमाणें सुषुप्तच आत्मरूप स्वप्नत्वाला प्राप्त होऊन सुषुप्तविश्रांतिपासून मी स्वप्ननिद्रेमध्यें प्रविष्ट झालों. ज्याप्रमाणें समुद्र आपल्यामध्यें हजारों तरंगरूप विक्षेपांचा अनुभव घेतो त्याप्रमाणें मींहि त्याच्या ओजामध्यें सहस्रावधि विक्षेप पाहिले. स्पंदरहित वायूमध्यें स्पंद जसा तद्रूप होऊन रहातो, त्याप्रमाणेंच संविद्कोशात्मक असलेलें दृश्य मला तसें भासलें. अग्न्यादिकांमध्यें जसें उष्णत्व, जलादिकांत जसें द्रवत्व, मिर्च्यामध्यें जसें तीक्ष्णत्व तसें चिदाकाशांत जगत् असतें. चित्स्वभाव हेंच एक त्याचें रूप असल्यामुळें मातेच्या उदरांतून बालपुत्राप्रमाणें तें स्वाप्न जगत् त्या सुषुप्तरूप दृश्यापासून प्रसवलें.

**व्याध:**—सर्व दृश्याचा विलय झाला असतां सुषुप्ति सिद्ध होते. पण तुम्ही तर सुषुप्तरूप दृश्यापासून स्वप्नदृश्य उत्पन्न झालें असें सांगत आहां! तेव्हां सुषुप्तांतहि कांहीं दृश्य भासतें असें सिद्ध होतें. पण तें कोणतें? तें मला सांगा. शिवाय त्या प्राण्याच्या व तुमच्या सुषुप्तरूप दृश्यापासून दुसरें कोणतें अन्य जगद्रूप उत्पन्न होतें? किंवा दुसरी कोणती सुषुप्तताच उत्पन्न होते?

**मुनि:**—उत्पन्न होतो, भासतो, स्फुरतो, घटादिक, जगदादिक, इत्यादि हा सर्व द्वैतदृष्टीनें मूढ झालेल्या लोकांचा कल्पनात्मक प्रलाप आहे. मीं त्याच्याच अनुवाद केला.

तो तत्त्ववाद नव्हे. पंडितांच्या विचारांत तर 'उत्पन्न होतो' इत्यादि शब्दांचा सन्मात्र हाच अर्थ आहे. तो कसा म्हणून विचारशील तर सांगतों. 'जायते' म्ह० उत्पन्न होतो, यामध्यें 'जन्' हा धातु आहे व 'प्रादुर्भाव होणें' हा त्याचा अर्थ आहे. प्रादुर्भावाची भूमि शरीर आहे. 'भू' हा धातु 'सत्' या अर्थी आहे. तस्मात् संजात म्ह० प्रादुर्भूत झाला. असें म्हटलें जातें. सर्गापासून झाला, असें जरी म्हटलें तरी सर्ग 'सत्' म्हणजे विद्यमान् आहे असाच त्याचा अर्थ होतो. म्हणजे सत्ता हाच त्या सर्वांचा फलितार्थ असून नित्यसिद्ध स्वप्रकाशचिदात्माच सत्तारूप आहे. त्यामुळें आमच्यासारख्या तत्त्वज्ञांच्या दृष्टीनें कांहींच उत्पन्न होत नाहीं व कशाचा नाशहि होत नाहीं. सर्व शांत, अज, सत् आहे. ब्रह्म सर्वसत्तात्मक आहे. जगत्हि सर्वसत्तात्मक आहे. ब्रह्माच्या ठिकाणीं अस्ति किंवा नास्ति या विधिप्रतिषेधांना अवकाशच नाहीं. जी प्रसिद्ध मायाशक्ति तीहि त्याच्या ठिकाणीं आहे व नाहींहि; आणि ज्या अर्थी तें ब्रम्ह मायाशबल आहे त्या अर्थी अज्ञांना हें सर्व तद्रूप भासतें. म्हणजे जशी जशी मायाशक्ति विकास पावते तसाच आत्मा सर्वशक्तियुक्त होतो. जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति यांतील परमार्थतत्त्व जाणणाऱ्या विद्वानांच्या दृष्टीनें जाग्रत्, स्वप्न व सुषुप्त या अवस्थाच नाहींत, तर सर्व निर्विकार तुरीयपदच अवस्थित आहे, असें त्यांना वाटतें. स्वप्ननगर व संकल्पनगर यांचा अनुभव जरी येत असला तरी वस्तुतः त्यांना जसें कांहींच रूप नाहीं, त्याप्रमाणें सृष्टीच्या आरंभीं जगाला वास्तविक रूप कांहींच नाहीं. या स्वप्नदृष्टीचा द्रष्टा प्राणादिकांनीं युक्त असलेला जीव संभवतो. पण सृष्टीच्या आरंभीं निर्विषय चित्च असते. ती आकाशाहूनहि स्वच्छ भासते. त्या चिदेकरस ब्रम्हामध्यें द्रष्टाहि नाहीं व भोक्ताहि नाहीं. तर सर्व एकरूप चित् आहे. तिला किंचित् व अकिंचित् यांतील कांहींच म्हणतां येत नाहीं. चित् हें केवळ मौन आहे. ती वाणीचा विषय होत नाहीं. सृष्टीच्या आरंभीं कारणाचाच अभाव असल्यामुळे चितीमध्यें जसें स्फुरण झालें तसेंच तें चिरकाल स्वरूप धारण करून रहातें. स्वप्न व संकल्प यांतील नगरांप्रमाणेंच तें असतें. तसेंच त्या चेतनरूप द्वैताला पुरुष आपल्याच अज्ञतेनें भितो. पण तत्त्वबोध झाल्यावर तो भीत नाहीं. बालक आपल्याच अंगावर काढलेल्या व्याघ्रसिंहादि चित्रांस भितो, पण प्रौढ मनुष्य भीत नाहीं, हें प्रसिद्धच आहे. तत्त्वतः आदि-अंत-मध्यशून्य अति स्वच्छ ब्रह्मच भ्रांतीनें अतिविकारी व नाना होऊन भासतें. वस्तुतः तें आपल्या स्वरूपांत जसेंच्या तसेंच शान्त असतांना अशान्त जगद्रूप दिसतें. तथापि तत्त्वतः ज्ञान झाल्यानें तें अत्यंत शांतच आहे, असा साक्षात् अनुभव येतो. १४६.

---

## सर्ग १४७ वा.

१ सुषुप्तींत पाहिलेला स्वप्नाचा क्रम. २ त्यांत पूर्वकुटुंबादिकांचें दर्शन व ३ तत्वाचें वर्णन.

**मुनिः**—हे महाबाहो! त्यानंतर त्या सुषुप्तावस्थेंतून जागा झालेल्या मीं समुद्रांतून निघालेल्याप्रमाणें स्वाप्न जग्रत् पाहिलें. तें आकाशांत कोरल्याप्रमाणें, किंवा पृथ्वीवर खोदल्याप्रमाणें, किंवा चित्तांतून उत्पन्न झाल्याप्रमाणें किंवा दृष्टींतून निघाल्याप्रमाणें मला भासलें. वृक्षाच्या प्रफुल्लतेप्रमाणें मला ती पूर्व-

सिद्ध सृष्टिच दिसली. तीराजवळील समुद्राच्या तरंगजालाप्रमाणें किंवा दृष्टींच्या केश, द्विचंद्र इत्यादि भ्रमांप्रमाणें तें दिसलें. जणुं काय आकाशतलांतूनच आलेलें, दिशांतूनच उद्भवलेलें, पर्वतांतून खोदून काढलेलें, भूमींतूनच वारुळाप्रमाणें वर निघालेलें, हृदयांतून बाहेर पडलेलें, किंवा मेघांनीं आकाशांत प्रवेश केल्याप्रमाणें, वृक्षापासून प्रसवलेलें, सस्ययुक्त भूमींतून विरूपानें परिणाम पावलेलें, जणुंकाय अंगापासूनच निघालेलें, इंद्रियांनींच दिशांमध्यें कोरलेलें किंवा पसरलेल्या वस्त्रापासूनच जणुंकाय त्यावरील चित्राप्रमाणें प्रकट झालेलें, घरांतूनच जणुंकाय निघालेलें, आकाशांतूनच जणुंकाय कोठूनसें उडून येऊन पडलेलें, प्रजांनीं राजाला आणून दिलेली जणुं काय भेटच, इहलोकीं संचित केलेलें व परलोकीं उपस्थित झालेलें, जणुं काय पुण्यच, किंवा भूमींतून खननादि उपायांनीं काढून घेतलेलें निधानच ब्रम्हरूप वृक्षाचें कालानें आणून दिलेलें जणुं काय फूलच, समुद्राचा जणुं काय तरंगच, चित्स्तंभावर खोदल्यावांचून प्रकट झालेली जणुं काय सुंदर बाहुलीच, आकाशरूप मृद्विकारभूत असंख्यात भिंतच, आकाशांत दिसणारें जणुं काय नगरच, मनाचा मत्त गजासारखा जणुं काय विलासच, जीवाचें जणुं काय मिथ्या जीवितसर्वस्वच, भित्तीवांचून व रंगावांचून आकाशांत काढलेलें विचित्र चित्रच, 'अविद्या' नांवाच्या कोणा समर्थ गारुड्याचें जणुं काय मायासर्वस्वच; अनेक आरंभांनीं युक्त व स्थिर असूनहि देशकालरहित, विविध पदार्थांनीं संपन्न असलें तरी एकरूप, अनेकरूप असूनहि जें कांहीं नाहीं, अवस्तुत्वानें गंधर्वनगराच्या दृष्टान्तासारखें, जें भ्रांत असूनहि जागरावस्थेंत उपलब्ध होणारें, रज्जु, सर्प, मृगजलादि यांसारखें चित्प्रतिभासमान, अनारब्ध असूनहि जणुं काय कोणीं आरंभच केलेला असल्याप्रमाणें, देश, काल, क्रिया द्रव्य, सर्ग, संहार यांनीं युक्त, सुर, असुर, नर इत्यादिकांवरून उपलक्षित होणाऱ्या त्रैलोक्याचे आधारगर्भ व त्यांचे गर्भ यांनीं केळीच्या खांबाप्रमाणें मनोहर, त्यांतहि अवांतर गर्भांमध्यें अनंत ब्रह्मांडकल्पना होत असल्यामुळें निरनिराळ्या भागांतील बीजसमूहांनीं भरलेलें जणुंकाय डाळींबफळच असें दिसणारें, नद्या, पर्वत, वनें, आकाश, तारा, अभ्र यांनीं संकुल, गीतध्वनि, समुद्रांतील घरघर, विद्यार्थी जनांचा पाठध्वनि, वायूचा आवाज यांनीं दुमदुमलेलें; असें तें स्वप्नांतील जगद्दृश्य मीं पाहिलें. त्यानंतर मीं पूर्व प्रवेशाच्या वेळीं स्वप्नांत पाहिलेला ग्राम व त्यांतील आपलें गृह पाहिलें. ते पूर्वींचेच सर्व बंधु व तशीच त्या सर्वांची वयोवस्था वगैरे मला दिसली. त्याच पुत्रांना, त्याच भार्येला व त्याच आपल्या गृहाला मीं पाहिलें. ज्याप्रमाणें महासागरांतील तरंग तीरावरील आपलेंच व्याकुल अंग पहातो, त्याचप्रमाणें त्या सर्वांना पाहून तीच पूर्वींची ग्राम्य–गृह, क्षेत्र, पुत्र, बंधु इत्यादि अभिमानरूप—वासना बलात्कारानें माझ्या मनांत जागृत झाली. त्यानंतर मी तेथें त्यांच्या आलिंगनानें अतिशय सुखी झालों. मीं त्याविषयींचीच वासना दृढ केली आणि पूर्वींची सर्व स्मृति विसरलों. आरसा जसा पुढें जें जें उपस्थित होतें त्याचें प्रतिबिंब धारण करतो, त्याप्रमाणें हा चिद्रूप आरसा, वासना जें जें पुढें स्थापिते त्या त्याप्रमाणें भासूं लागतो. पण जो हें सर्व चिन्मात्र आकाश आहे असें जाणतो, तो वासनामय द्वैताकडून प्रतिबिंब ग्रहण करणें, इत्यादि रूपानें विकृत केला जात नाहीं; तर तो आपल्या केवल निर्विकार रूपानेंच स्थित असतो. ज्याची शुद्ध बोध-

झालिनी स्मृति नाश पावत नाहीं, त्याला हा द्वैतपिशाच यत्किंचित्‌हि पीडा करूं शकत नाहीं. अभ्यासयोगानें व साधु, सच्छास्त्र यांच्या समागमानें ज्याची बोधधी उदय पावलेली असते, त्याची ती बोधधी आपला उदय कधीं विसरत नाहीं. तर ती नेहमीं ब्रम्हानुसंधानरूपानें रहाते. पण माझी बोधधी त्यावेळीं अदृढ होती. त्यामुळें बंधु, आप्त इत्यादिकांच्या वासनेनें ती त्या वेळीं प्रतिहत झाली. पण आतां माझ्या बुद्धीला तसा प्रतिबंध करण्यास कोणता दुराग्रह समर्थ होईल ? हे व्याधा ! तुझी बुद्धिहि सत्संगवर्जित आहे, त्यामुळें ती आतांच शांत होत नाहीं. तथापि ती पुढें सांगितलेलें तप, शरीरवृद्धि, मरण, जन्मांतरांतील राज्य इत्यादि कष्टकर द्वैतबोधानें साधनाभ्यासाचा परिश्रम केल्यावर ज्ञानाला प्राप्त होऊन शांत होईल !

व्याधः—हे मुने ! आपण म्हणतां तें खरें आहे. तुमच्या या अशा प्रकारच्या अत्यंत पावन उपदेशानेंहि माझी बुद्धि सत्पदीं विश्रांति पावत नाहीं. हें खरोखरच का असें असेल ? कीं नसेल ? ही संदेहजालिका या स्वानुभवसिद्ध गोष्टीविषयींहि अद्यापि शांत होत नाहीं. अहो, काय चमत्कार सांगावा ! अभ्यासानें अतिशय दृढ झालेली ही अविद्या अपार आहे. ती वस्तुतः अविद्यमानच आहे. ती त्यामुळें सदा शांतच आहे. तथापि शांत होत नाहीं. सच्छास्त्र, उत्तम गुरुसंप्रदाय व विचार इत्यादिक मनोहर अंगांनीं युक्त अशा सत्संगमांनीं उत्पन्न झालेली जी पदपदार्थविवेकबुद्धि तिचाच अभ्यास केल्यानें तत्त्वबोध उत्पन्न होतो व ज्ञानभूमिकाक्रमानें हा जगद्रूप भ्रम शांत होतो, दुसऱ्या कोणत्याहि उपायानें तो शांत होत नाहीं, असा माझा निश्चय झाला आहे. १४७.

———

# सर्ग १४८ वा.

—:०:—

१ स्वप्नाच्या सत्यत्वाचा व असत्यत्वाचा हेतु. २ जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति यांचें ऐक्य, व ३ चित् सर्वात्मत्व, ऐक्य व शुद्धि यांनीं युक्त आहे असें वर्णन.

व्याधः—हे भगवन् ! जर वासनानुसारी चिद्वेदनच स्वप्न आहे व जाग्रत् हाहि स्वप्नाचाच एक प्रकार आहे, तर पहाटे पाहिलेलें एखादें स्वप्न खरें ठरतें व बाकीचीं खोटीं ठरतात, हें कसें ? त्याचप्रमाणें हिरण्यगर्भाचा मनोरथरूप सर्ग अर्थक्रिया करण्यास समर्थ असल्यामुळें सत्य आहे व आमचा मनोरथरूप सर्ग असत्य आहे, असें कां ?

मुनिः—जी स्वप्नसंविद् स्वप्नेश्वरीसांनिध्यादिप्रदेशीं, प्रातःकाळीं, देवताराधन, तप. व्रत इत्यादि क्रिया, हविष्य, कुशास्तरण इत्यादि द्रव्यें, शास्त्रादि प्रमाणें यांच्या योगानें अशा स्वप्नाचें असें असें फळ अवश्य होतें अशी निश्चित उदय पावलेली असते, ती संविद् काकतालीयन्यायानें फळ देणाऱ्या शकुनादिकांप्रमाणें उत्तर काळीं फळ देते व फललाभ झाल्यानें आपण तिलाच सत्य म्हणतों. मणिमंत्रादि निमित्तांनीं उत्पन्न होणारी संविद् योग्य पुरुषामध्यें अव्यभिचारिणी असते व अयोग्य पुरुषामध्यें व्यभिचारी बनते. याप्रमाणें शास्त्रमर्यादेचें उल्लंघन न केल्यामुळें दोन्ही ठिकाणीं तिला सत्य स्वप्न हेंच नांव देतात. पण त्या दोन्ही ठिकाणीं काकतालीयन्यायाचाच आश्रय करावा लागतो. सत्य स्वप्नस्थितिहि लोकांमध्यें अशा स्वरूपाचीच स्थित असल्यामुळें तिचा कांहीं दृष्ट नियामक हेतु आहे अशी कल्पना करतां येत नाहीं. हिरण्यगर्भादिकांची संविद् प्राक्तन उपासनापरिपाकामुळें उत्पन्न झालेली असते. त्यामुळें ती सत्यसंकल्परूप होऊन

जो जो निश्चय करते, तशी तशी होते; कारण प्राक्तन उपासनेच्या फलप्रयुक्त स्वभावामुळें तिचा निश्चय व्यभिचार पावत नाहीं. 'पण तिलाहि दुसऱ्याचा विरुद्ध सत्यसंकल्प प्रतिबंध कां करीत नाहीं,' म्हणून म्हणशील, तर पूर्व उपासनाकालीं 'मी जगत्स्रष्टा आहें' असा दृढ केलेला व प्रयाणकाळीं उद्भूत झालेला निश्चय फलद्रूप कसा होईल? यास्तव त्या हिरण्यगर्भाच्या सत्यसंकल्पाशीं अविरुद्ध असाच इतर सिद्धांचा संकल्प उदय पावतो. त्यांच्या ठिकाणीं अविरुद्ध संकल्प उत्पन्नच होत नाहीं. कोणतेहि पदार्थ केव्हांहि आंत किंवा बाहेर नाहींत. एक संविद्च जशी इच्छा करते तशी जगद्रूपानें स्थित होते. हें स्वप्न सत्य आहे, अशा अंतर्निश्चयानें जेव्हां ती उदय पावते तेव्हां तशीच होते. पण शास्त्रादि प्रमाणसंशयामुळें ती फलसंशयास प्राप्त होते. फळ दुसऱ्याच कारणानें जरी प्राप्त झालें असलें तरी फळाच्या सत्यत्वाची कल्पना करून स्वप्नानें हें फल सुचविलें असेंच तो समजतो. याच न्यायानें जागृतींत प्रसिद्ध असलेल्या घटादिसंविदाहि काकतालीयच होते. कारण निरनिराळ्या पुरुषसंविदेमेंच अतिशय परिचित झालेले दृष्ट घटादि स्वभावहि देश, काल, यत्न यांच्या योगानें अन्यथाभावास प्राप्त होतात, पूर्व परिचित स्वभाव सोडतात, असें दिसतें. अर्थात् आपला स्वभाव कधींहि न सोडणारी अशी जी सत्य चित् तीच असत्य व स्थूलजगद्वेश धारण करते. एक चिन्मात्र ब्रह्माला सोडून बाकीचें सर्व सत्य व असत्य, नियत व अनियत स्थित आहे, असें तूं जाण. कारण ब्रह्म हेंच सर्व पदार्थरूप सत् व एक आहे, दुसरें कांहीं नाहीं. तेव्हां दुसरें सत्य किंवा असत्य आहे अशी भावना कशी करावी? यास्तव अज्ञानी लोकांना स्वप्न कचित् सत्य वाटतें, परंतु ज्ञानी लोकांना तें सद्रूपहि वाटत नाहीं. जगत् या नांवाची ही साक्षात् संविद्भ्रांति भासत आहे. ती स्वतःच 'मी भ्रांति आहें' असें पर्यायानें सांगते. तेव्हां ती यथार्थ कशी असेल? चितिच दीर्घकाल या चित्तरूपानें चमकते. जल आपल्या स्वरूपांतच जें द्रवयुक्त असतें तेंच हें जगत् होय. म्हणजे जलाच्या द्रवत्वाप्रमाणेंच चित् चित्तरूपानें जगद्भासरूप होते. ज्याप्रमाणें स्वप्न पाहून सुषुप्तीचा अनुभव घेतला जातो, त्याप्रमाणें जाग्रदवस्था पाहून निद्रेचा अनुभव घेतला जातो. यास्तव हे महामते! जाग्रत हेंच स्वप्न आहे, असें तूं समज आणि स्वप्नाला जाग्रदवस्था जाण. त्या दोन्ही अवस्था एक अज चित्तत्त्वच आहेत. घृत अगदीं पातळ असतें, किंचित घट्ट असतें व अगदीं घट्ट असतें, त्याप्रमाणें जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्था एकाच तत्त्वाच्या आहेत. याप्रमाणें अविद्यावृत चिन्मात्ररूप एक सुषुप्तिच घृताप्रमाणें सर्वदा पहावी. सर्व नामरूपभेद या तिच्याच पर्यायरचना आहेत. चित्लाच जागृत्, स्वप्न व सुषुप्ति अशीं नांवें कल्पिलीं आहेत. येथें नियति नाहीं व अनियतिहि नाहीं. मिथ्या स्वप्नसंविदेंत नियति व अनियति कोणत्या प्रकारची असणार? तूंच सांग बरें? अज्ञानानें आच्छादित झालेली चित् जेव्हां अनियंत्रित असते, तेव्हां जाग्रत् व स्वप्न यांचा अनुभव घेते. श्रमादि निमित्तानें जेव्हां नियंत्रित होते, तेव्हां तीच सुषुप्ति होते. प्रयत्नानें तिचें नियमन केलें असतां तीच समाधि होते व अज्ञानाचा नाश झाला असतां तीच मुक्ति होते. असें असल्यामुळें जाग्रदवस्थेच्या निरोधानें मनोव्यापारमात्ररूप स्वप्नांत जोंवर भान असतें, तोंवर तीच चितची बाह्यप्रवृत्तिनियंत्रणा असते. म्हणजे तोंवर तिची बाह्य प्रवृत्ति होत नाहीं जोंवर

संविद्भानाचेंच नियंत्रण झालेलें असतें, तोंवर सुषुप्तींत तो आत्माच सर्व शोकरहित होऊन रहातो. असें जाणून मुनीनें सर्व शोक-शून्य समाधिसुखविश्रांतीसाठीं चितीचें नियमनच करावें. ‘ पण वायूच्या पंक्तीप्रमाणें संविदूचें नियमन करतां येणें शक्य नाहीं. कारण स्वप्नादि आकारानें स्फुरण पावणें ही तिची नियतिच आहे. ’ ह्मणून म्हणशील तर तें बरोबर नाहीं. विषयाकारानें स्फुरण पावणें हा संविदेचा स्वभावच नव्हे. कारण सुषुप्तीमध्यें तो अनुभवास येत नाहीं. स्वप्नामध्यें तिचें तसेंच स्फुरण होण्यास कांहीं भिन्न कारण आहे, असेंहि निरूपण करतां येत नाहीं—कीं, ज्यामुळें तिची नियति निश्चित करतां येईल ! तेव्हां तिची नियति कोठची व कशा प्रकारची असणार ! बाह्य घटपटादिकांचा आकारच संविदेच्या आकाराचें कारण आहे, म्हणून म्हणावें तर तसें होईल; पण केव्हां ? जर सर्गाचें दुसरें कांहीं कारण निरूपण करतां येणें शक्य असेल तर ! पण वर सांगितलेल्या युक्तीनें सर्गकारण शून्यच आहे असें जेव्हां ठरतें, तेव्हां चितीहून भिन्न असें आकारादि चितीचें कारणच संभवत नाहीं. या जगांत जर नियति ह्मणून कांहीं असेल तर ती एवढीच कीं, जी चिति जेव्हां जशी स्फुरते ती वस्तु तेव्हां तशी पारमार्थिक, व्यावहारिक, किंवा प्रातिभासिक असते. स्वप्नामध्यें कधीं सत्यत्व असतें, कधीं असत्यत्व असतें. नियतीच्या अभावामुळेंच स्वप्न काकतालीयच आहे. आतां मणि, मंत्र, औषधि या रूपानें जें स्वभावतःच नियत भासतें, तें जागृतींतहि तसें दिसतेंच. याप्रमाणें जाग्रत् व स्वप्न हें केवल चिद्भानच आहे. त्यांत अन्यता कोठली ? त्या दोन अवस्थांतील वेद्यस्वरूप किंवा वेदनस्वरूप अनुभवतः एकरूपच असतें. त्यामुळें निद्रारहित आत्म्यामध्यें त्या दोहोंचाहि व्यभिचार होत असल्यामुळें असत्च आहे. जाग्रत् ह्मणून ज्याला म्हणतात तें जाग्रत् संभवतच नाहीं. स्वप्न ह्मणून ज्याला म्हणतात तें स्वप्नहि नाहींच. सुप्त व असुप्त या दोन्ही अवस्थांमध्यें एकरूप असलेल्या ब्रह्माला बोधरूपत्वच आहे. अर्थात् निर्निद्र आत्म्याला सुषुप्तिहि नाहीं. जाग्रद्, स्वप्न इत्यादि कोणतेच भाव केव्हांच सत्य नाहींत. मरण ही सुद्धां भ्रांतिच आहे. कधींहि लुप्त न होणारी चित्सत्ता दृश्याला पहाते. ज्याप्रमाणें सतत अनंत काळ समुद्रांत तुषार व ऊर्मि त्याच त्या किंवा भिन्नभिन्न जलैकरूपानें भासतात, त्याप्रमाणें एकरूप परमतत्त्वामध्यें कधींहि न स्फुरलेले सर्ग स्फुरतात. स्फटिकशिलेमध्यें जशा भ्रामक लेखा दिसतात, तशाच चित्मध्यें जाग्रत्-स्वप्नादि अवस्था भासतात. तेव्हां त्यांत भिन्न काय असणार ? हें आत्मस्वरूप जाग्रद्, स्वप्न, सुषुप्ति, तद्विरुद्ध तुरीयावस्था, साकारता व निराकारता, भूतकालकल्पना व सृष्टिकालकल्पना, सृष्टीचें स्वरूप इत्यादि सर्व स्वतः धारण करते. तथापि आपल्या चित्स्वरूपानें तें सर्व उपाधिशून्यच असतें. त्या दृश्यरूपानें या शून्यालाच व्यापलें आहे. चिन्मात्राच्याच आधारानें सर्व दृश्य रहातें. तथापि हें चिन्मात्र आकाश आपल्या निरूपाधिक आकाशरूपापासून यत्किंचित्हि ढळत नाहीं. आकाश, वायु, अग्नि, जल, पृथ्वी, लोकांतर, मेघ इत्यादि सर्व भूतभौतिक दृश्य जगत् सृष्टीच्या आरंभींहि कारणशून्य असल्यामुळें हिरण्यगर्भाच्या चित्तरूप आहे. चित्तात्मक मनोराज्याला नामरूप नसतें, त्याप्रमाणें हेंहि नामरूपरहितच आहे. मनःसाक्षीनें युक्त आहे. मनाचा विलय झाल्यावर शुद्ध वेदनमात्रच आहे. त्याव्यतिरिक्त दुसरें कांहीं नाहीं. १४८.

———

## सर्ग १४०, वा.

१ त्या स्वप्नवृत्तांतांत घरीं आलेल्या मुनीच्या तोंडून अनेकांच्या समान दुःखादिकांचे निमित्त ऐकलें असें वर्णन.

**व्याध:** हे मुने ! त्या प्राण्याच्या शरीरांत प्रलयादिकांच्या योगानें शेंकडों मनोहर वृत्तांतयुक्त संसार पहाणाऱ्या तुझ्या घरांतील भार्या, बंधु इत्यादिकांच्या सहवासांत राहून तेथें अनुभविलेल्या जगद्वृत्तांतानें तत्त्व मला सांग ( म्हणजे त्यानंतर काय झालें तें मला सांग. )

**मुनि:**—हे साधो ! असल्या कथा ऐकण्याची तुला फार आवड दिसते. त्या प्राण्याच्या हृदयांतील ओजांत त्यानंतर अपूर्वच असा कोणता वृत्तान्त घडला तो तूं ऐक. तेथें आपला सर्व पूर्व वृत्तान्त विसरून मी राहूं लागलों व ऋतुसंवत्सरात्मक काळ भराभर जाऊं लागला. कुटुंबामध्यें माझी मति आसक्त झाली. अशा अवस्थेंत सोळा वर्षें गेलीं. त्या गृहस्थावस्थेंत आत्म्याचें मनन केल्यावांचूनच माझा काळ व्यतीत झाला. एकदा एक उग्र तपस्वी, महाज्ञानी मान्य मुनि अतिथिरूपानें माझ्या घरीं आला. मीं त्याची पूजा केली. त्यामुळें त्याला आनंद झाला. त्यानें भोजन केलें. नंतर थोडी विश्रांति घेतली. पुढें जन तेच्या समानसुखदुःखप्राप्तीविषयीं मनांत विचार करून मीं त्याला असें विचारिलें, " हे भगवन्, आपण महा ज्ञानी आहांत; जगाच्या सर्व गति जाणतां; कारण आपल्या ठिकाणीं क्रोध मुळींच दिसत नाहीं, विषयसुखामध्यें आसक्ति मुळींच नाहीं. त्यावरून आपल्या ज्ञानाचें अनुमान होतें. कर्मशाली लोकांच्या शुभाशुभ कर्मांनीं त्यांना सुखदुःखें प्राप्त होतात. शरत्कालीं धान्यार्थी लोकांना शेतांतून धान्य जसें मिळतें, त्याप्रमाणेंच तीं सुखदुःखें प्राप्त होतात. पण जेव्हां चांगले, वाईट, पुण्यवान्, पापी, विद्वान, अविद्वान, या सर्वांचाच क्षय करणारे दोष उद्भवतात, तेव्हां या सर्व प्रजेनें एकसारखेंच अशुभ कर्म केलेलें असतें. कारण त्या सर्वांनीं एकाच काळीं एकसारखेंच पाप केलेलें असल्यावांचून त्यांना एकाच काळीं एकसारखेंच दुःखरूप फळ प्राप्त होणें शक्य नाहीं. दुर्भिक्ष, अवग्रह, उत्पात हे सर्वांना एकसारखे दुःख देतात. तेव्हां त्या सर्व जनसमूहाची एकसारखीच दुष्क्रिया फलद्रूप होते. पण सर्वांचें समान कर्म एकाच वेळीं कसें प्रवृत्त होतें ? हा माझा प्रश्न ऐकून व माझ्याकडे पाहून, किंचित् हसून व आश्चर्यचकित झाल्यासारखें दाखवून तो अमृताच्या वृष्टीसारखें अतिशय सुंदर व पूज्य वचन बोलला.

**अन्य मुनि:** हे साधो ! चिदचिद्विवेकयुक्त अंतःकरण असतांना या दृश्याचें तूं जें सत् किंवा असत् कारण जाणतोस, तें कां जाणतोस हें सांग बरें ? ( सर्व संशयाचें बीज जें अज्ञान तें याच्या ठिकाणीं पूर्णपणें दिसत असल्यामुळें त्याला घालविल्यावांचून याच्या संशयाचें निरसन होणार नाहीं, असें समजून त्यासाठीं आत्मतत्त्व व दृश्यमिथ्यात्व प्रतिपादन करावयास मुनीनें आरंभ केला आहे. )

पण मी कांहींच उत्तर देत नाहीं, असें पाहून तो मुनि मला म्हणाला, "अरे बाबा ! तूं कोण आहेस, याची चांगली आठवण कर. मी कोठें आहे, हें दृश्य काय आहे, यांत सार काय आहे, व तें किती आहे, याचा विचार कर. हें स्वप्नभ्रम भासत आहे, हें तूं कां जाणत नाहींस ? मी तुझ्या स्वप्नांतील पुरुष आहें व तूं माझ्या स्वप्नांतील पुरुषाप्रमाणें आहेस. अनाकार, अनाख्य, अनादि, अकारण, कल्पना-

शून्य अशा या चिन्मात्र कांचेचें जें चकचकणें तेंच हें जगत् होऊन स्थित आहे. या चिन्मात्राचें हें असेंच अकृत्रिम रूप आहे. तें चिन्मात्र सर्वव्यापी असून तें जेथें जें जाणतें तेथें तें असतें. याच्या सकारणत्वाची कल्पना केल्यानें सर्व सकारण होतें व याच्या अकारणत्वाची कल्पना केल्यामुळें सर्व अकारण होतें. आम्हीं ज्या प्राण्याच्या हृदयांतील ओजामध्यें स्थित आहों, तो आमचा विराडात्मा आहे. तो आमच्या चित्कल्पनेमुळेंच विराड्भावास प्राप्त झाला आहे. पण आपल्या कल्पनेनें इतरांप्रमाणें व्यष्टिरूपच आहे. या प्राण्याप्रमाणेंच दुसराहि प्राणी अन्य प्रजांचा विराडात्मा होऊं शकेल. त्या देहांत तोच सुख-दुःखादिकांचें भोक्तृरूपानें कारण आहे. संपत्ति व विपत्ति, सुकृत व दुष्कृत यांचेंहि तोच कारण आहे. लोकांना दुर्भिक्ष, अवग्रहादि साधारण दुःख जेव्हां प्राप्त होतें, तेव्हां जो ज्यांचा स्थूलसमष्टि विराट् असतो, त्याच्या धातुवैषम्यविकारामुळेंच तें प्राप्त होतें. कारण ते सर्व लोक त्या विराडात्म्याचे अंगावयव असतात. त्याच्या विषम स्पंदादिकानेंच दौर्भिक्ष्य, अवग्रह इत्यादि आपत्ति येतात व त्याच्याच समस्पंदामुळें त्यांची शांति होते. कारण विराटाची जी सत्ता तीच या सर्गाची सर्गता आहे. हे साधो! वृक्षावर जशी वीज पडते, त्याप्रमाणें काकतालीयन्यायानें त्या प्राण्यांचें एकाच कालीं परिपक्व झालेलें दुष्टकर्महि एकाच वेळीं फलोन्मुख होतें. त्यामुळेंच सर्वांवर एकाच वेळीं दुःख कोसळतें. तसें कर्महि संविदेनेंच पूर्वीं कल्पिलेलें असतें, त्यामुळेंच ती कर्मफलाला प्राप्त होत असते. संविद् कर्मकल्पना सोडून जर मुक्त झाली तर ती कर्मफलाला प्राप्त होत नाहीं. जी जी कल्पना, जेथें जशी जशी थोडी किंवा फार उदय पावते, ती ती तेथें तेथें तशीच असते. सहेतुक कल्पना सहेतुक असते व अहेतुक कल्पना अहेतुक असते. कारण स्वप्नमय नगरामध्यें सहकारी कारणादिक नाहींच. त्यामुळें तें अनादि, कल्याणरूप, अजर, चेतन परब्रह्मच आहे. हा स्वप्नभ्रम म्हणून कोणी एक अकारणच भास भासतो. कांहीं स्वप्नभास सकारणहि असतो. पण तो सदसद्रूप असल्यामुळें मिथ्या होय. सर्व स्वप्नभ्रम काकतालीयन्यायानें भासतात. जगाचा अवभासहि त्याप्रमाणेंच होत असल्यामुळें हें जगत् त्याहून विलक्षण स्वरूपानें प्रसार पावलेलें नाहीं. येथें सकारणत्वानें जें रूढ झालेलें आहे, तें सकारण असतें व जें अकारणत्वानें रूढ झालेलें असतें तें अकारण असतें. म्हणजे स्वप्नाप्रमाणेंच येथेंहि सकारणत्वअकारणत्वप्रसिद्धि व्यवस्थित आहे. स्वप्नांत कार्यकारणभावानें होणारें जें स्वाभाविक चिद्भान तेंच जागृतींतील आहे. म्हणजे स्वप्नांतील सर्व कार्यकारणभाव जसा चिद्भासमात्र तसाच जागृतींतहि स्थूळ प्रपंचभास स्वभावतःच चिन्मात्र आहे. त्यामुळें ब्रह्मवेत्ते सर्व शांत परमतत्त्वच आहे असें जाणतात. हे महामते! ज्यांचें कारण सत्य आहे असे भाव कोणते तें मी सांगतों, ऐक. स्वभावाचें कारण सत्य आहे, असें का म्हणतां येईल? आकाशाचें कारण काय आहे? पृथिव्यादि भूतांचा जो घट्ट पिंड बनला आहे, त्याचें कारण काय आहे? अविद्येचें कारण काय? स्वयंभू ब्रह्मदेवाचें कारण काय? सृष्टीच्या आरंभाचें कारण काय? वायु व तेज यांचें कारण काय? जलाचें कारण काय? वेदनेवांचून त्याचें दुसरें कांहींच स्वरूप दिसत नसल्यामुळें व वेदनामात्ररूप पदार्थांचें साधक कारणच नसल्यामुळें सर्व शून्य आहे. मृतांना पिंडग्रहण करून, देहाचा लाभ जो होतो, त्याचें कारण काय?

न्यायानें प्रथमतः सर्व सर्ग प्रवृत्त होतात.
चे उत्पत्तिनाश असेच दिसतात. चिरकाल
नव आल्यामुळें आकाशांतील भ्रामक चक्रा-
गं भ्रांतिदृष्टीनें हें सर्व दिसत आहे. अशाच
नें प्रवृत्त झालेल्या ब्रह्मरूपी सर्गानें मागून
यादि रूप झालेल्या आपल्याच स्वरूपाच्या
यादि संज्ञा निश्चित केल्या आहेत. पूर्वी
सर्ग चिदाकाशांत वातस्पदाप्रमाणें भास-
आणि स्वतःच देहाकार कल्पना करतात.
कल्पना करावी तशी नियति शरीर
। करते. कल्पित चित्तांचें हें असें स्वाभा
स्वरूप आहे. चितीनें प्रथम जें जें आभा-
स्वरूप कल्पिलें तें तें अद्यापि तसेंच
आहे. तिनें आपल्याला ' अहं ' असें
ं व ती अहं झाली. हिरण्यगर्भाची चित्
जशी कल्पना करते तशी तशी होते.
भाद्य कल्पनेचा अन्यथाभाव पुनः दुसऱ्या
नें करतां येतो. पण त्यासाठीं फारच
यत्न करावा लागतो. महात्म्यांनी तसाच
यत्न केल्यावांचून तो पूर्वसंकल्पाचित
तां येत नाहीं. दुधाचें दहीं करावयाचें
ास त्याला विरजण लावलें म्हणजे दहीं
अशी जेथें कारणकल्पना केलेली असते.
तें कारण हेंच सार असतें. पण जेथें
गर्भाच्या चित्नें तशी कल्पनाच केलेली
तेथें तें लौकिक-कारणाहि निरुपयोगी
जसें—वायूनें घन किंवा द्रवरूप व्हावें
कोणी कितीहि जरी म्हटलें तरी तें संभ-
नाहीं. वावटळीच्या आवर्ताप्रमाणें हें
। जसें असद्रूप भासलें आहे, तसेंच तें
ो स्थित आहे. म्हणजे अचित्प्रतिभास हें
कार्य नसून तो केवळ विवर्त आहे.
हिरण्यगर्भाचा संकल्प अविच्छिन्न असे-
तो तसाच अनुभवास येणार. सारांश,
जीव एकत्र मिळून हीं शुभाशुभ कर्में
करतात, आणि त्याचें फळहि मिळूनच भोग-
तात. कित्येक कर्तृत्वाभिमानरहित असल्यामुळें
कर्मांचे कर्ते जरी नसले तरी कारणावांचूनच
दुःख भोगतात. जशा पर्वतशिखरांवरील शिला
कांहीं दुष्कृत न करतांच विद्युत्पातादिकांचा
अनुभव घेतात, त्याप्रमाणें हजारों जीवन्मुक्तहि
कारणावांचूनच दुःख भोगतात. १४९.

---

## सर्ग १५० वा.

१. त्या अतिथीच्या वाक्यानें आत्मबोध, २. त्याचा सहवास, ३. पूर्वदेहांत जाण्याचें असामर्थ्य, आणि ४. देहादिकांचे वर्णन.

**मुनिः**—अशा प्रकारच्या युक्तींनें त्या मुनीनें तेव्हां मला बोध केला. त्यामुळें मी लागलाच तत्त्वज्ञ झालों. त्यानंतर मी त्याची प्रार्थना करून भक्ति, विनय इत्यादि गुणांनीं त्याला वश करून घेतलें. तेव्हां पूर्वी आत्मविचार-शून्य असल्यामुळें मृतप्रायच असलेल्या माझ्या घरांत तो तसाच राहिला. ज्या मुनीनें मला हें चंद्रोदयासारखें शुभ वचन सांगितलें तो हा मुनिश्रेष्ठ तुझ्या बाजूलाच बसला आहे, पहा. माझ्या मोहाचा नाश करणाऱ्या अशा यानें प्रत्यक्ष शब्दांनीं कांहीं न बोलतांच मला हें सांगितलें. दृश्याचा पूर्वापरभाव हा जाणतो. ज्यानें शरीर धारण केलें आहे अशा

१. याविषयीं ' गच्छतस्तिष्ठतो वापि जाग्रतः स्वपतोऽपि वा । न विचारपर चेतो यस्यासौ मृत उच्यते ' असें वृद्धवचन आहे. त्याचा अर्थः—ज्याचें चित्त आत्मविचार-परायण नाहीं, तो जात असला, उभा असला, जागत असला किंवा झोपेत असला तरी मृत म्हटला जातो.

शून्य अशा या चिन्मात्र कांचेचें जें चकचकणें तेंच हें जगत् होऊन स्थित आहे. या चिन्मात्राचें हें असेंच अकृत्रिम रूप आहे. तें चिन्मात्र सर्वव्यापी असून तें जेथें जें जाणतें तेथें तें असतें. याच्या सकारणत्वाची कल्पना केल्यानें सर्व सकारण होतें व याच्या अकारणत्वाची कल्पना केल्यामुळें सर्व अकारण होतें. आम्हीं ज्या प्राण्याच्या हृदयांतील ओजामध्यें स्थित आहों, तो आमचा विराडात्मा आहे. तो आमच्या चित्कल्पनेमुळेंच विराड्भावास प्राप्त झाला आहे. पण आपल्या कल्पनेनें इतरांप्रमाणें व्यष्टिरूपच आहे. या प्राण्याप्रमाणेंच दुसराहि प्राणी अन्य प्रजांचा विराडात्मा होऊं शकेल. त्या देहांत तोच सुख-दुःखादिकांचें भोक्तृरूपानें कारण आहे. संपत्ति व विपत्ति, सुकृत व दुष्कृत यांचेंहि तोच कारण आहे. लोकांना दुर्भिक्ष, अवग्रहादि साधारण दुःख जेव्हां प्राप्त होतें, तेव्हां जो ज्यांचा स्थूलसमष्टि विराट् असतो, त्याच्या धातुवैषम्यविकारामुळेंच तें प्राप्त होतें. कारण ते सर्व लोक त्या विराडात्म्याचे अंगावयव असतात. त्याच्या विषम स्पंदादिकानेंच दौर्भिक्ष्य, अवग्रह इत्यादि आपत्ति येतात व त्याच्याच समस्पंदामुळें त्यांची शांति होते. कारण विराटाची जी सत्ता तीच या सर्गाची सर्गता आहे. हे साधो! वृक्षावर जशी वीज पडते, त्याप्रमाणें काकतालीयन्यायानें त्या प्राण्यांचें एकाच कालीं परिपक्व झालेलें दुष्टकर्महि एकाच वेळीं फलोन्मुख होतें. त्यामुळेंच सर्वांवर एकाच वेळीं दुःख कोसळतें. तसें कर्महि संविदेनेंच पूर्वी कल्पिलेलें असतें, त्यामुळेंच ती कर्मफलाला प्राप्त होत असते. संविद् कर्मकल्पना सोडून जर मुक्त झाली तर ती कर्मफलाला प्राप्त होत नाहीं. जी जी कल्पना, जेथें जशी जशी थोडी किंवा फार उदय पावते, ती ती तेथें तेथें तशीच असते. सहेतुक कल्पना सहेतुक असते व अहेतुक कल्पना अहेतुक असते. कारण स्वप्नमय नगरामध्यें सहकारी कारणादिक नाहींच. त्यामुळें तें अनादि, कल्याणरूप, अजर, चेतन परब्रह्मच आहे. हा स्वप्नभ्रम म्हणून कोणी एक अकारणच भास भासतो. कांहीं स्वप्नभास सकारणाहि असतो. पण तो सदसद्रूप असल्यामुळें मिथ्या होय. सर्व स्वप्नभ्रम काकतालीयन्यायानें भासतात. जगाचा अवभासहि त्यासारखाच होत असल्यामुळें हें जगत् त्याहून विलक्षण स्वरूपानें प्रसार पावलेलें नाहीं. येथें सकारणत्वानें जें रूढ झालेलें आहे, तें सकारण असतें व जें अकारणत्वानें रूढ झालेलें असतें तें अकारण असतें. म्हणजे स्वप्नाप्रमाणेंच येथेंहि सकारणत्वअकारणत्वप्रसिद्धि व्यवस्थित आहे. स्वप्नांत कार्यकारणक्रमानें होणारें जें स्वाभाविक चिद्भान तेंच जागृतींतील आहे. म्हणजे स्वप्नांतील सर्व कार्यकारणभाव जसा चिद्भासमात्र तसाच जागृतींतहि स्थूळ प्रपंचभास स्वभावतःच चिन्मात्र आहे. त्यामुळें ब्रह्मवेत्ते सर्व शांत परमतत्त्वच आहे असें जाणतात. हे महामते! ज्यांचें कारण सत्य आहे असे भाव कोणते तें मी सांगतों, ऐक. स्वभावाचें कारण सत्य आहे, असें का म्हणतां येईल? आकाशाचें कारण काय आहे? पृथिव्यादि भूतांचा जो घट्ट पिंड बनला आहे, त्याचें कारण काय आहे? अविद्येचें कारण काय? स्वयंभू ब्रह्मदेवाचें कारण काय? सृष्टीच्या आरंभाचें कारण काय? वायु व तेज यांचें कारण काय? जलाचें कारण काय? वेदनेवांचून त्याचें दुसरें कांहींच स्वरूप दिसत नसल्यामुळें व वेदनामात्ररूप पदार्थांचें साधक कारणच नसल्यामुळें सर्व शून्य आहे. मृतांना पिंडग्रहण करून, देहाचा लाभ जो होतो, त्यांचें कारण काय?

याच न्यायानें प्रथमतः सर्व सर्ग प्रवृत्त होतात. जगाचे उत्पत्तिनाश असेच दिसतात. चिरकाल अनुभव आल्यामुळें आकाशांतील भ्रामक चक्राप्रमाणें भ्रांतिदृष्टीनें हें सर्व दिसत आहे. अशाच रूपानें प्रवृत्त झालेल्या ब्रह्मरूपी सर्गानें मागून पृथिव्यादि रूप झालेल्या आपल्याच स्वरूपाच्या पृथिव्यादि संज्ञा निश्चित केल्या आहेत. पूर्वी सर्व सर्ग चिदाकाशांत वातस्पंदाप्रमाणें भासतात आणि स्वतःच देहाकार कल्पना करतात. जशी कल्पना करावी तशी नियति शरीर धारण करते. कल्पित चितीचें हें असें स्वाभाविक स्वरूप आहे. चितीनें प्रथम जें जें आभासरूप स्वरूप कल्पिलें तें तें अद्यापि तसेंच स्थित आहे. तिनें आपल्याला ' अहं ' असें म्हटलें व ती अहं झाली. हिरण्यगर्भाची चित् जशी जशी कल्पना करते तशी तशी होते. त्या आद्य कल्पनेचा अन्यथाभाव पुनः दुसऱ्या यत्नानें करतां येतो. पण त्यासाठीं फारच मोठा यत्न करावा लागतो. महात्म्यांनीं तसाच महत् यत्न केल्यावांचून ती पूर्वसंकल्पाचित बदलतां येत नाहीं. दुधाचें दहीं करावयाचें झाल्यास त्याला विरजण लावलें म्हणजे दहीं होतें, अशी जेथें कारणकल्पना केलेली असते, तेथें तें कारण हेंच सार असतें. पण जेथें हिरण्यगर्भाच्या चितूनें तशी कल्पनाच केलेली नसते, तेथें तें लौकिक-कारणहि निरुपयोगी ठरतें. जसें—वायूनें घन किंवा द्रवरूप व्हावें असें कोणी कितीहि जरी म्हटलें तरी तें संभवत नाहीं. वावटळीच्या आवर्ताप्रमाणें हें प्रथमच जसें असद्रूप भासलें आहे, तसेंच तें अद्यापि स्थित आहे. म्हणजे अचित्प्रतिभास हें चितूचें कार्य नसून तो केवळ विवर्त आहे. आणि हिरण्यगर्भाचा संकल्प अविच्छिन्न असेपर्यंत तो तसाच अनुभवास येणार. सारांश, कांहीं जीव एकत्र मिळून हीं शुभाशुभ कर्में करतात, आणि त्याचें फळहि मिळूनच भोगतात. कित्येक कर्तृत्वाभिमानरहित असल्यामुळें कर्माचे कर्ते जरी नसले तरी कारणावांचूनच दुःख भोगतात. जशा पर्वतशिखरांवरील शिला कांहीं दुष्कृत न करतांच विद्युत्पातादिकांचा अनुभव घेतात, त्याप्रमाणें हजारों जीवन्मुक्तहि कारणावांचूनच दुःख भोगतात. १४९.

---

## सर्ग १५० वा.

१. त्या अतिथीच्या वाक्यानें आत्मबोध, २. त्याचा सहवास, ३. पूर्वदेहांत जाण्याचें असामर्थ्य, आणि ४. देहादिकांचें वर्णन.

**मुनिः**—अशा प्रकारच्या युक्तीनें त्या मुनीनें तेव्हां मला बोध केला. त्यामुळें मी लागलाच तत्त्वज्ञ झालों. त्यानंतर मी त्याची प्रार्थना करून भक्ति, विनय इत्यादि गुणांनीं त्याला वश करून घेतलें. तेव्हां पूर्वी आत्मविचारशून्य असल्यामुळें मृतप्रायच असलेल्या माझ्या घरांत तो तसाच राहिला. ज्या मुनीनें मला हें चंद्रोदयासारखें शुभ वचन सांगितलें तो हा मुनिश्रेष्ठ तुझ्या बाजूलाच बसला आहे, पहा. माझ्या मोहाचा नाश करणाऱ्या अशा यानें प्रत्यक्ष शब्दांनीं कांहीं न बोलतांच मला हें सांगितलें. दृश्याचा पूर्वापरभाव हा जाणतो. ज्यानें शरीर धारण केलें आहे अशा

१. याविषयीं ' गच्छतस्तिष्ठतो वापि जाग्रतः स्वपतोऽपि वा । न विचारपरं चेतो यस्यासौ मृत उच्यते ' असें वृद्धवचन आहे. त्याचा अर्थः—ज्याचें चित्त आत्मविचार-परायण नाहीं, तो जात असला, उभा असला, जागत असला किंवा झोंपेत असला तरी मृत म्हटला जातो.

यज्ञानें म्हणजे माझ्या यज्ञादि पुण्य कर्मानेंच तो मला उपदेश केला.

**अग्निः**—त्या मुनीचें तें वचन ऐकून व्याध त्या वेळीं ' हें सर्व मी प्रत्यक्ष पहात आहें कीं, ही स्वप्नसृष्टि आहे ? त्याला उपदेश करणारा मुनि या वेळीं माझ्या पुढें प्रत्यक्ष बसलेला असणें कसें शक्य आहे ? ' असें ह्मणून मनांत विस्मयानें खिन्न झाला.

**व्याधः**—अहो मुने ! आपण स्वप्नांत उपदेश करणारा मुनि येथें प्रत्यक्ष बसलेला आहे ह्मणून जें सांगितलें व मीहि जें त्याला प्रत्यक्ष पहात आहें, हा मोठा चमत्कार आहे. संसारतापांचें हरण करणाऱ्या आपण सांगितलेली ही गोष्ट मला दुःसह वाटत आहे. एखाद्या बालकाला भासलेल्या वेताळाप्रमाणें तो महान्स्वप्नपुरुष जागृतींतहि स्थिरीभूत कसा झाला ? अशा प्रकारचें आश्चर्यकारक असलेलें हें आख्यान मला पूर्णपणें सांगा. स्वाप्नपुरुष आतां जो आपल्याला प्रत्यक्ष दिसत आहे तो कोणत्या कारणानें ? आणि हें दर्शन तरी कोणाचें होत आहे ? हें स्वप्न आहे की जाग्रत् आहे ? मला खरोखर मोठा विस्मय वाटतो !

**मुनिः**—हे महाभागा ! त्या जंगलांत तेथें मला काय चमत्कारिक वर्तमान घडलें तें ऐक. मी तें संक्षेपानें सांगतों. अशी एकदम घाई करूं नकोस. त्यानें तेथें माझ्या बोधासाठी हें असें वर्णन केलें. त्यामुळें या महात्म्याच्या वाणीनें मी लागलाच जागा झालों. निर्मळ आकाशाला माघ मास संपल्यावर जसा आपला स्वाभाविक निर्मलपणा प्राप्त होतो, त्याप्रमाणें याच्या उपदेशवाणीनें मला पूर्वीचा अनादिसिद्ध सन्मात्रस्वभाव आठवला. त्यामुळें ' अरे, मी तर पूर्वी मुनि होतों ' अशी आठवण होतांच माझें हृदय एकदम विकास पावलें. मला मोठा चमत्कार वाटला. हृदयानें मला स्नान केल्याप्रमाणें आर्द्र केलें. " या भोगास्थेनें एखाद्या अज्ञ पांथाप्रमाणें मला या अवस्थेला पोंचविलें आहे. भ्रमानें आर्त झालेला एखादा वाटसरू पाण्याच्या इच्छेनें व्यर्थ मृगजळाच्या मागें जसा धांवत सुटतो, त्याप्रमाणें मी भोगास्थेनें अशा आपत्तींत पडलों. अहो, एखादा काल्पनिक वेताळ बालकाला जसा ठकवितो, त्याप्रमाणें या भ्रांतिमात्ररूप असलेल्या दृश्यानुभवानें प्राज्ञ असलेल्याहि मला फसविलें आहे. खरोखर ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. काय आश्चर्य आहे ! या प्रत्यक्ष दिसणाऱ्या सर्वअर्थशून्य अशा मिथ्या ज्ञानानें मला कोठल्या कष्टकर अवस्थेला पोंचविलें आहे, पहा ! किंवा तो मीहि भ्रांतिमात्रच आहें, सद्रूप नाहीं. तथापि साक्षी आत्मा असद्रूपाचें अनुकरण करतो, हें मात्र मोठें विचित्र खरें. मी नाहीं, ही भार्या नाहीं, हें गृह नाहीं व हा भ्रमहि नाहीं. हें सर्व मिथ्या आहे. तथापि तें सर्व सत्य असल्यासारखेंच स्थित आहे. आतां मी पुढें काय करावें ? बंधाचा छेद करणारा जो ब्रह्माकारवृत्तिविशेष तो अंकुर विद्यमान आहे. पण त्याचाहि छेद केलाच पाहिजे. यास्तव मी त्याचाहि त्याग करतों. किंवा तो जसा आहे तसाच असूं दे. ही मिथ्यारूप भ्रांति आहे. या भ्रांतीला घेऊन मला काय करावयाचें आहे ? भ्रांति असद्रूप असते. मी तिला आतां सोडलीच आहे. हा येथील उपदेष्टा मुनिहि भ्रांतिमात्रच आहे. हा उपदेष्टा व मी त्याचा शिष्य, असे दोघेहि ब्रह्मरूपच आहों. त्यामुळें त्यांत त्याग करण्यासारखें कांहींच नाहीं. गुरु व शिष्य हीं दोन्ही दिवसा भासणाऱ्या अभ्रपुरुषाप्रमाणें काल्पनिक आहेत. तेव्हां आतां ज्याच्या कृपेनें हें आपल्याला ज्ञान झालें आहे त्या महामुनीला मी आतां असें सांगेन. " असा मनांत विचार करून

मीं त्या मुनीला म्हटलें, 'हे मुनिश्रेष्ठा! मी त्या आपल्या आश्रमस्थ मुनिशरीरास प्राप्त होतों. त्याचप्रमाणें हें जें प्राणिशरीर पहा वयास मी प्रवृत्त झालों आहें, त्या शरीराला पाहण्यासाठींहि मी यांतून बाहेर पडतों.' हें माझें वचन ऐकून तो मुनिश्रेष्ठ मला म्हणाला— 'अरे, ते तुमचे देह आतां कोठें आहेत? ते दोन्हीं जळून भस्म झाले व आतां कोठें आहेत तें पहा! ते फार दूर गेले आहेत. किंवा हे वृत्तज्ञा! तूं स्वतःच जा व तें वृत्त पहा. अगोदर तेथें काय घडलें आहे तें पहा. म्हणजे स्वतःच तुला तो वृत्तांत कळेल.' त्यानें असें सांगितलें असतां मीं त्या प्राक्तन देहाचें चिंतन करून तेथें जाण्याच्या इच्छेनें आपल्या स्वाभ्रमसत्तेनें 'पार्थिव शरीरच मी आहें' हें कल्पित रूप सोडून प्राणोपहित चिदात्मा म्ह० आपला जीव त्याच्या प्राणाच्या द्वारा पवनस्कंधामध्यें योजला; व 'हे मुने! मी आपला प्राक्तन देह पाहून जों परत येई तों तुम्हीं येथेंच थांबा,' असें बोलून मी वायूमध्यें शिरलों नंतर पुष्पाच्या सुगंधाप्रमाणें मी वातरथावर आरूढ होऊन अनंताकाशांत भ्रमण करूं लागलों. मोठ्या त्वरेनें फार वेळ तेथें फिरलों. पण दीर्घकाळ भ्रमण करूनहि बाहेर पडण्याचें द्वार असें जें त्या प्राण्याचें कंठस्थ छिद्र किंवा दुसरेंहि एखादें द्वार मला सांपडलें नाहीं. तेव्हां त्याच्या वाताशयांत स्थित असलेल्या मला अतिशय खेद झाला. म्हणून मी पुनः याच आपल्या अंभनस्तंभभूत स्वगृहांत परत आलों. तेव्हां या सर्वोत्तम मुनीला म्ह० आपल्या गुरूलाच मीं आपल्या समोर पाहिलें. या जगज्जालांत परत येतांच मला हा मुनि दिसला. मी आपलें चित्त एकाग्र करून आपल्या घरांत बसलेल्या याला म्हटलें

"हे पूर्वापरवेत्त्यांतील पूज्य श्रेष्ठा! हें काय आहे? मला सांग. तूं आपल्या उत्तम ज्ञानचक्षूनें सर्व वृत्तांत जाणतोस. ज्याच्या देहामध्यें मीं प्रवेश केला तो प्राणी माझें शरीरच आहे. मग ते दोन देह कोठें गेले? व ते मला कां सांपडले नाहींत? मी दीर्घकाल या विस्तीर्ण संसारमंडळांत भ्रमण केलें. स्वतःपासून स्थावरापर्यंत विस्तार पावलेलें हें सर्व जगन्मंडल शोधलें. पण मला कंठछिद्र सांपडलें नाहीं? तें कां?" याप्रमाणें पुनः परत येऊन मजकडून विचारला गेलेला तो महाशय मुनि मला म्हणाला "हे कमलनयना! तूं त्या आपल्या पूर्व शरीरादि वृत्तांताला मीं सांगितलेल्या उपायावांचून स्वतः स्वबुद्धीनेंच कां जाणूं लागला आहेस? तूं योगानें एकाग्र केलेल्या संविदेनें जर पहाशील तर ज्ञानदृष्टीनें हें सर्व हातांतील आमलकाप्रमाणें तुला प्रत्यक्ष दिसेल. पण माझ्या तोंडूनच जर तुला ऐकण्याची इच्छा असेल व प्रत्यक्ष पहाण्याची इच्छाच नसेल, तर मी हा अखंडित यथार्थ वृत्तांत सांगतों तो ऐक. अगोदर तूं स्वजीवतत्त्व समजून घे, म्हणजे मग तुझ्या पूर्व देहाचा वृत्तांत मी तुला सांगेन." (असें मनांत म्हणणारा तो मुनि व्यष्टि जीवभावाचें मिथ्यात्व व समष्टि जीवभावाचें सत्यत्व 'त्रीणि रूपाणीत्येव सत्यं' या श्रुतिप्रदर्शित न्यायाचा आश्रय करून सांगतो-) "तूं आतां जसा अनुभव घेत आहेस तसा एक व्यष्टिजीवरूप नाहींस; तर सर्व प्राण्यांच्या पुण्यकमलांच्या फळदानानें म्ह. विकसनानें सूर्यभूत, सर्व कल्याणांचा म्ह. मानुषानंदापासून प्राजापत्यानंदापर्यंत सुखाचा जणुंकाय कमलाकरतुल्य ज्ञानस्वरूप, व हरीच्या नाभिकमलांतील कर्णिकेवर आरूढ झालेला सर्व जीवसमष्ट्यात्मा असा हिरण्यगर्भच तूं आहेस. तो तूं एकदा व्यष्टिभावरूप स्वप्न पाहण्याच्या इच्छेनें मनोराज्य-

रूप आलोचनामध्यें स्थित होऊन आश्रमांतील तापस झालास. तेथें दृढ झालेल्या व्यष्टिभावसंविदेनें दुसऱ्याच्या शरीरांतील स्वप्नादि पहाण्याच्या इच्छेनें कोणा एका प्राण्याच्या हृदयांत स्थित झालास आणि ज्या हृदयांत तूं प्रविष्ट झालास तेथेंच हे विस्तीर्ण द्यावा-पृथिवी हेंच ज्याचें विपुल उदर आहे असें भुवनत्रय पाहिलेंस. याप्रमाणें तूं दीर्घकाल दुसऱ्या शरीरांतील स्वप्नदर्शनामध्यें व्यग्र झाला असतां तुझा देह व त्याचप्रमाणें ज्या देहांत तूं प्रवेश केला होतास त्या महावनांतील निजलेल्या त्या प्राण्याचा देह, तो तुमचा आश्रम, तुमच्या आश्रमांतील कुटी या सर्वांना अग्नीनें जाळून टाकलें. कारण त्या महावनाला आग लागली व त्याच्या धुराचे लोट धूम्राकार मेघाच्याहि पलीकडील आकाशांत निघून गेले. त्यानें आपल्या वेगानें फिरणाऱ्या अलातचक्रांनीं सूर्यमंडळें व चंद्रमंडळें उत्पन्न केलीं. त्यानें अभ्रें जाळून टाकलीं व त्याचें भस्म धूमामध्यें मिश्रित झालें. त्यामुळें तें धूमपटल पांढऱ्या कमलाप्रमाणें दिसूं लागलें. तसल्या कमलांनीं दिशांना आच्छादित करून जणुंकाय नीलवर्ण आकाशपणें सुरक्षित ठेवण्यासाठींच त्यानें अंतरिक्षाला झांकून टाकलें. दऱ्यांतून सिंहांचे भयंकर आवाज निघूं लागले व जळणाऱ्या वेळसारख्या पदार्थांपासून 'चट चट चट' असे ध्वनि होऊं लागले व त्या दोन्ही प्रकारच्या ध्वनींनीं दिशांना बधिर करून सोडलें. म्हणजे सर्व दिशांतील प्राण्यांच्या कानठळ्या बसल्या. सर्व बाजूंनीं अग्नीनें व्यापल्यामुळें अग्निरूपत्वास प्राप्त झालेल्या ताली, तमाल इत्यादि वृक्षांच्या, पतनांनीं फुटणाऱ्या व उत्पात-मेघाप्रमाणें ध्वनि करणाऱ्या पदार्थांच्या कलकलांनीं तो सर्व प्रदेश निबिडित झाला. त्या अग्नीकडे दुरून पहाणाऱ्या लोकांना स्थिर विद्युत्प्रकाशाचा भास होऊं लागला. त्या प्रकाशामुळें आकाश सुवर्णरसाचा लेप दिलेल्या ओट्याप्रमाणें शोभूं लागलें. तो अग्नि आपल्या चकचकीत ठिणग्यांनीं आकाशांतील नक्षत्रसमूहाला द्विगुणित करिता झाला. तो अग्नि त्याच कणांनीं आकाशांत वृक्षस्थ ज्वालारूप बालवनितेच्या कटाक्षांनीं सर्वांस आनंदित करीत होता. ज्वालांतूच निघणाऱ्या 'घमघम' अशा शब्दांनीं तो गगनोदर दुमदुमून सोडीत होता. सिंहादि वनचर प्राणी जागे होऊन व आपल्या दरीरूपी गृहांतून बाहेर पडून इतस्ततः भ्रमण करूं लागले. त्या अग्नीनें अर्धदग्ध झालेल्या सिंह, हरणें, व्याध व पक्षी यांना पळावयास लावलें. सरोवरें, नद्या व इतर प्रवाह यांत पडलेल्या व्याघ्रादि वनचरांना तो शिजवूं लागला. सभोंवार पसरणाऱ्या ज्वालांनीं चमरी जातींच्या हरणांचे पांढरे शुभ्र केश तो जाळूं लागला. जाळलें जाणारें वन व प्राणी यांच्या मेदोगंधानें त्यानें मेघांना आच्छादित केलें. सर्प जसा वेगानें धांवतो त्याप्रमाणें धांवत सुटलेल्या त्या कल्पाग्नीसारख्या वनाग्नीनें तुमचा आश्रम जाळून टाकला.

व्याधः - मुने! त्या अग्निदाहाला असें कोणतें विशेष कारण झालें? तें वन व ते तुझे शिष्य हे सर्व एकदमच कसे नष्ट झाले?

मुनिः—संकल्पादिकांचा क्षय व उदय यांचें कारण संकल्प करणाऱ्या पुरुषाचा मनःस्पंदच आहे. त्याच न्यायानें त्रिजगत्संकल्पाचें कारण विधात्याचा तत्काल प्रवृत्त झालेला मनःस्पंद आहे. त्याचा मनःस्पंद हेंच त्रिजगत् होय. त्याचा क्षय व उदय यांचें कारणहि त्याचा मनःस्पंदच आहे. ज्याप्रमाणें हृदयामध्यें भयादिकांचा क्षोभ होणें किंवा क्षोभ न होणें यांचें कारण तत्काल होणारा स्पंदच असतो, त्याप्रमाणें त्रिजगत् व वनांतील क्षोभ व अक्षोभ

यांचें कारणहि स्पंदच आहे. जगत् ब्रह्मदेवाचें संकल्पनगर आहे. त्यामुळें त्याचें स्पंदनच जगांतील प्रजेचा उदय, क्षय, क्षोभ, वृष्टि, अवृष्टि इत्यादिकांचें कारण आहे. ब्रह्माचा मानस संकल्प हाच या जगाचा हेतु आहे. तोहि दुसऱ्याच्या मनांतील चिदाकाशच कल्पिलेला आहे. तोहि तिसऱ्याच्या मनांत कल्पिलेला आहे. याप्रमाणें ही मायाशबल चिदाकाशाची गति म्ह० कल्पनापरंपरा कोठेंच पर्यवसान न पावणारी म्ह० अनवस्थित आहे. वस्तुतः पहातां चिदाकाशांत हें चिदाकाशच स्फुरण पावत आहे, अशी विद्वानांची अबाधित दृष्टि असते. पण मूर्खांची ही आपातदर्शनरूप दृष्टि ज्या प्रकारची भासते तशाच प्रकारची म्ह० मिथ्यारूपच ती असते. या परमार्थामध्यें ती सद्रूप नाहीं. १९०.

---

## सर्ग १५१ वा.

—:०:—

१ ज्यानें आश्रम व देह यांस जाळलें आहे अशा अग्नीची शांति. २ वायूनें भस्म उडवून टाकलें. व ३ स्वप्नांत जाग्रत्स्थिति यांचे वर्णन.

**अन्यमुनिः**—त्या अग्नींत तें तुझें नगर, तीं गृहें ते वृक्ष तत्काल जळून गेले. शुष्क तृणाप्रमाणें सर्वांचें भस्म झालें. त्याचप्रमाणें अति संतापानें ज्यांतील मोठमोठ्या शिलाहि विदीर्ण झाल्या आहेत अशा त्या आश्रमांत असलेल्या तुझीं निजलेलीं तीं दोन शरीरें पूर्वोक्त प्रकारानें भस्म झालीं. ज्यानें सर्व समुद्र प्राशन करून सोडला आहे अशा अगस्त्याप्रमाणें ज्यानें सर्व अरण्य निःशेष करून सोडलें आहे असा अग्नि अगोदर अंगाररूपानें शांत झाला व शेवटीं हळुहळु शांत होत अस्त पावला. अग्नीचा अस्त झाला असतां त्याची राख प्रथम उष्ण होती, तीहि हळुहळू शीतल झाली. तेव्हां वायूनें झाडावरील पुष्पसमूहाप्रमाणें तिला कणशः उडविलें. तेव्हां तो तुझा आश्रम कोठें होता, तीं तुझीं शरीरें कोठें होतीं, व अनेक लोकांच्या पेटीप्रमाणें असलेलें तें तुझें नगर कोठें गेलें, याचा कांहीं पत्ता लागेना. स्वप्नांत दिसणारें नगर जागें होताच जसें एकदम नाहींसें होतें त्याप्रमाणेंच तें सर्व एकाएकीं अस्त पावलें. जेव्हां याप्रमाणें तुझ्या त्या दोन्ही तनु अस्त पावल्या, तेव्हां झोंप घेत असलेल्या व त्यांतच भ्रम पहाणाऱ्या तुझी संविद् मात्र तशीच कल्पना करीत राहिली. तेव्हां तें कंठच्छिद्र कोठचें व तो तुझा विराडात्मा कोठचा ! ओजानें युक्त असलेल्या त्या सुप्त पुरुषाच्या ओजासहवर्तमानच तो देह जळून गेला. त्यामुळें बा मुने ! तुला ते दोन्ही देह सांपडले नाहींत. तूं स्वप्नसंसारात्मक अनंत जागृतींत अवस्थित आहेस. याप्रमाणें स्वप्नच जाग्रद्भावाला प्राप्त झालें आहे. हे सुव्रता ! तूं आमचा स्वप्नपुरुष आहेस व आम्ही तुझे स्वप्नपुरुष आहों. हा चिदाकाश तिन्ही अवस्थेमध्यें अद्वय स्वभावांत स्थित आहे. पूर्वीं स्वप्ननर नसलेलाहि तूं तेव्हांपासून जाग्रन्नर होऊन गृहस्थाश्रमाचा आश्रय करून जाग्रत्प्रत्यय अनुभवीत राहिला आहेस. मीं हें तुला पूर्वींच इत्थंभुत वर्तमान कथन केलें आहे. मीं त्याचा अनुभव घेतला आहे. तुलाहि या गोष्टीचा अनुभव घेतां येईल. माझ्यावर विश्वास नसेल तर ध्यानानें तुला हें सर्व दिसेल. आकाशांतील सोन्यासारख्या सूर्यप्रकाशाप्रमाणें जो स्फुरण पावतो, त्याच्या शक्तीचा उत्कर्ष होऊन तो चंचलाकार होतो व आपल्या स्वरूपांतच पुण्यफलरूप व पापफलरूप आकारांनीं विकास पावतो. तथापि तो नेहमीं आदि-अंतरहित, अनंतरूप व संविद्-

घनच असतो. अर्थात् तो चिन्मय आत्माच स्वरूपामध्यें सृष्टिरूपानें सूर्यप्रकाशाप्रमाणें विकास पावतो. १९१.

## सर्ग १५२ वा.

१ अन्यमुनि या मुनीची 'स्वप्नार्थ सत्य आहे' ही शंका घालवितो. २ व्याधगुरुत्वाचें कारण.

**मुनिः**—असें बोलून तो मुनि रात्रीं आपल्या शयनावर मुकाट्यानें बसला. मीहि वावटळींत उडत असल्याप्रमाणें आश्चर्यचकित होऊन राहिलों. त्यानंतर बऱ्याच वेळानें मीं त्याला म्हटलें—"हे सन्मुने! हें सर्व प्रभूचें स्वप्न सद्रूपच आहे अशी माझी मति आहे."

**अन्यमुनिः**—जर जाग्रद्वस्तु सत्य संभवेल तर ही स्वप्नादि वस्तुहि सत्य आहे, असें म्हणतां येईल; पण हें जाग्रत् दृश्यच जर मुळीं मिथ्याभूत आहे, तर स्वप्नाच्या सत्यत्वाचें नांव कशाला पाहिजे? जसें स्वप्न तसाच हा सर्ग आरंभींहि भासतो. तो पृथिव्यादिकांनीं रहित असूनहि पृथिव्यादिकांनीं युक्त असल्याप्रमाणें अवस्थित होतो. याप्रमाणें वर्तमान काळीं दिसत असलेल्या या आमच्या स्वप्नाहूनहि जाग्रद्रूपानें प्रसिद्ध असलेलें सर्गस्वप्न शुद्ध चैतन्यमात्र रूप आहे. म्हणजे आमच्या स्वप्नाइतकीहि त्याला सत्ता नाहीं. हे व्याधाच्या महागुरो! हे कमलनयन मुने! मी यांची उपपत्ति सांगतों ती ऐक. आज जागृतींत पाहिलेल्या पदार्थांचा बुद्धीवर संस्कार होऊन रात्रीं स्वप्नांत तेच पदार्थ दिसले म्हणजे ते सत्य आहेत असें ह्मणण्यास कांहीं थोडेंसें तरी कारण आहे. त्यांची संस्काररूप सामग्री तरी विद्यमान असते, पण सृष्टीच्या आरंभीं दिसणारें सर्गस्वप्न तर अपूर्वच दिसतें. तें स्वप्न पूर्व संस्कारांवांचूनच चिदाकाशांत विराजमान होतें. 'पूर्व कल्पामध्यें पाहिलेला विषयच सृष्टीच्या आरंभीं दिसतो" असें म्हणावें, तर मध्यें प्रलयकालासारखा फार मोठा काल निघून गेलेला असतो. त्यामुळें पूर्वानुभवसंस्कार वगैरे उच्छिन्न झालेले असतात. ह्मणून हल्लींच्या स्वप्नाच्या अपेक्षेनें सर्गस्वप्न तुच्छच ठरतें. ह्मणजे या स्वप्नाची व त्या स्वप्नाची सत्ता समान नाहीं. याप्रमाणें जाग्रत्प्रपंच अधिक मिथ्या आहे, असें ठरलें असतां 'प्रभूचें सर्व स्वप्न सद्रूपच आहे, असें मला वाटतें' इत्यादि तूं कां बोलतोस? स्पष्ट अनुभवलेल्याहि या आपल्या गृहाचा माझ्या उपदेशानें अनुभव घेऊन पुनः स्वप्नाध्यायाविषयीं तुझा उद्यम कसा झाला? कोणीहि स्वप्नदर्शी स्वप्न पहात असतांना हें मिथ्या आहे, असें पहात नाहीं. शिवाय हे मुने! हें विस्तीर्ण स्वप्नजगत् स्पष्ट दिसत आहे. तें विद्यमान आहे असाच अनुभव येतो. त्याच्या असत्त्वाविषयीं संदेह घेण्याचें कांहीं कारणहि नाहीं. मग त्यामध्यें त्याविषयीं संदिग्धता कशी येते?

याप्रमाणें बोलत असलेल्या त्या मुनीच्या भाषणाला मीं मध्येंच विरोध केला व म्हटलें 'मला आपण व्याधगुरुत्व जें दिलें तें कोठचें? हें मला सांगा."

**अन्यमुनिः**—मी तुला आणखी एक आख्यान संक्षेपतः सांगतों, तें तूं ऐक. कारण हे महाप्राज्ञा! माझ्या विस्ताराचा अंत नाहीं. तूं जोंवर व्याधगुरु होशील तोंवर मी येथेंच आहें. हे मुनिनायका! तूंहि हें माझें वचन ऐकून याच आपल्या गृहांत संतुष्ट होशील. येथें असलेल्या मला तूं सोडणार नाहींस. पूजा, सत्कार वगैरे करून मला तूं येथेंच ठेवून

होशील. मी तुम्हांसह येथेंच राहीन हा निश्चय आहे. हे साधो ! त्यानंतर कांहीं वर्षें लोटल्यावर दुर्भिक्षानें तुझ्या सर्व बंधूंचा विनाश होईल. वैर, बल इत्यादिकांनीं मत्त झालेल्या, आपापल्या सीमेवर रहाणाऱ्या क्षुद्र राजांच्या परस्पर युद्धप्रसंगानें ज्यांतील प्राणी अगदीं कमी झाले आहेत, असा हा सर्व ग्रामच आपापलीं घरें सोडून पळून जाईल. त्यानंतर शून्य आकाशांत जसे चंद्रसूर्य रहातात, त्याप्रमाणें आम्ही दोघे येथेंच एका वृक्षसमूहामध्यें दुःखाला न आठवतां, एकमेकांला धीर देत तत्त्वज्ञानामुळें शांत, सम, सर्व विषयांविषयीं निःस्पृह व एकसारखाच आचार करणारे, असे होऊन राहूं. या रूक्ष अरण्यांत कांहीं दिवसांनीं उत्तम वन वाढेल. साल, ताल, लता, वृक्ष इत्यादिकांनीं सर्व भूमि आच्छादित होईल. ताली, तमाल यांच्या पानांच्या तांडवांनीं ज्यांनीं सर्व दिशांना भूषित केलें आहे, पद्मवनांनीं मुळांचा आश्रय केल्यामुळें त्यांकडून जणुंकाय वंदनच केले जाणारे पुष्पित वृक्ष ज्यांत आहेत, आणि ज्यांतील सुंदर लतागृहांत मंजुळ ध्वनि करणारे चकोर पक्षी आहेत, असें स्वर्गांतून आलेल्या नंदनवनाप्रमाणेंच भासणारें वन येथें उत्पन्न होईल. १५२.

## सर्ग १५३ वा.

१ येथें व्याधाचें आगमन, २ त्याच्या गुरुत्वाचें युक्तीनें समर्थन, ३ कालानें विवेकामुळें विज्ञान व ४ सर्वकारम्य यांचें वर्णन

अन्यमुनिः—वर वर्णिलेल्या त्या रम्य वनांत राहून आम्ही फार दिवस तप करीत असतां, मृगयेमुळें श्रांत झालेला एक मृगव्याध तेथें प्राप्त होईल. त्याला तूं स्वभावतःच पुण्यमय अशा कथांनीं बोध करशील. त्यामुळें तो व्याध विरक्त होऊन त्याच वनामध्यें तप आचरील. त्या तपश्चर्येच्या अभ्यासानें शमादिसाधनसंपन्न झालेला तो ज्ञानप्राप्तीच्या इच्छेनें स्वप्नजिज्ञासु होऊन स्वप्नसंकथा तुला विचारील. तूं त्याला स्वप्नकथांच्या प्रसंगानें अखंडित आत्मज्ञान सांगशील. त्यामुळें तो योग्य अधिकारी होईल. अशा प्रकारें तूं त्याचा गुरु होशील. म्हणून अरे बाबा ! तुला ‘ व्याधगुरो ’ या वचनानें मीं संबोधिलें. याप्रमाणें हा संसारभ्रम कसा उद्भवला, मी कसा आहें, तूं कशा प्रकारचा आहेस, येथें तुझें काय होईल हें सर्व मीं तुला सांगितलें.

याप्रमाणें त्याच्याकडून सांगितला गेलेला मी विस्मयाकुल बुद्धीनें त्याच्या बरोबर या दृश्यजाताचा विचार करून अत्यंत विस्मयास प्राप्त झालों. त्यानंतर ती रात्र संपून दिवस उगवला असतां त्या महामुनीची मीं अशी पूजा केली कीं, त्याच्या योगानें त्याला तेथेंच रहाण्याविषयीं तीव्र इच्छा झाली. त्यानंतर त्या वनांतील गृहांत व त्या प्राचीन ग्रामगृहांत आम्ही दोघेंहि परस्परांवर अत्यंत लोभ ठेवीत स्थिर बुद्धीनें राहिलों. पुढें आमचा हा ऋतुसंवत्सरात्मक काल भराभर जाऊं लागला. पर्वत दावाग्नि, वृष्टि इत्यादिकांना सहन करीत जसा रहातो, त्याप्रमाणें मी प्राप्त झालेल्या अनिष्ट, इष्ट व मिश्र भोगांस सहन करीत, म्हणजे जाणाऱ्या इष्ट पदार्थांस सुखानें सोडित व प्राप्त झालेल्या अनिष्ट भावांचेंहि आनंदानें ग्रहण करीत राहिलों. मी मरणाची इच्छा करीत नाहीं व जीविताचीहि इच्छा करीत नाहीं. मी जसा स्थिर आहें तसाच समाधानानें राहतों. त्यानंतर तेथें मीं त्या दृश्य मंडलाचा विचार केला. “या जगाचें काय कारण असेल ? व हा जीव चित्तानें काय

जाणतो ? हा पदार्थसंघात काय आहे ? चिदाकाशरूप अशा या स्वप्नदर्शनामध्यें अवस्थित असलेलें हें सर्व—स्वर्ग, पृथिवी, वायु आकाश, पर्वत, नद्या, दिशा वगैरे चिन्मात्र आकाशच असून तें चिदेकघनस्वभावांतच स्थित आहे. तें चिदाकाशच आहे तेव्हां याचें दुसरें कारण काय असणार ? ही चिच्चंद्रिका सभोंवार जो आपला प्रकाश विस्तारिते तेंच हें जगत् आहे. चिदाकाशांतील हें प्रतिघाताला अयोग्य अशा स्वभावाचें चित्र आहे. त्याच्यामध्यें स्थूलत्व नसल्यामुळें प्रतिघाताची योग्यताच नाहीं. " पण हे पर्वतादिक इतके स्थूल पदार्थ असतांना नाहीं कसें ह्मणतां ? ह्मणून ह्मणशील तर सांगतों. हे पर्वत नाहींत, ही भूमि नाहीं, हें आकाश नाहीं व हा मीहि नाहीं. चिन्मात्र आकाशाचें केवल स्मरणच हें असें भासत आहे. असल्या या पदार्थसमूहाचें कारण काय असणार ? याच्या स्थूलत्वाला काहीं कारण नसतांनाच हा कसा तरी पदार्थसंभव प्रतीत होत आहे. हें भ्रांतिमात्र जर असेल तर त्याचें कारण काय संभवणार ? भ्रांतीचा द्रष्टा व मनन करणारा कोण आहे ? तिचें निमित्त तरी कोठें व कशा प्रकारचें असणार ! ज्याच्या हृदयांतील तेजोधातूमध्यें प्रवेश करून संविद्-मात्र असा मी राहिलों, तो प्राणी माझ्या देहासह भस्म होऊन गेला. तस्मात् हें आदि-अंतरहित चिदाभासमात्र आकाशच आहे. कारण त्याचा देह, माझा देह इत्यादिकांना असत्त्व आहे. हें कर्ता, कर्म, करण यांनीं रहित व क्रमरहित असें चिद्घनरूप आहे. हे घट, पट, श्वभ्र इत्यादि चिदाकाशाचेंच स्फुरण आहे. घट, पट, इत्यादि आकारांनीं व्यक्त होण्यासाठीं त्या चिदाकाशानें हें आपलें व्यक्त रूप कोणत्या कारणानें बरें केलें ? कारणावांचूनच तें असें दिसत आहे. चिन्मात्राचें स्फुरण हें म्हणणेंहि ' राहूचें शिर ' या ह्मणण्याप्रमाणें विकल्पमात्र आहे. त्यामुळें हें चिन्मात्र स्फुरणहि नव्हे. तर केवल चिन्मात्र आकाशच आहे. त्याचें स्फुरण तें काय व कशा प्रकारचें असणार ? आकाश कसें स्फुरण पावणार ? चित्सागराचा हा जणुंकाय फेंस आहे, तेव्हां याचें नवीन स्फुरण कोठचें ? हा अनंत चिद्घन स्फुरद्रूपच स्थित आहे. तस्मात् चिन्मात्रस्फुरणहि शुद्ध परिपूर्ण चिद्घन ब्रह्मच सदा आहे. तेंच स्वरूपांत किंचित् विकास पावून हें जगत् असल्यासारखें भासतें, त्यांत दृश्य कोठचें व द्रष्टृत्व तरी कोठचें ! कालतः आद्यंतरहित, अप्रमेय, देशतः आदिमध्यरहित, म्हणूनच वस्तुतः एक, सर्वव्यापक, कारणरहित, कार्यशून्य, तदधीन सत्ताशून्य, स्वतःसत्ताप्रधान, स्वसत्तेनेंच भुवनादिकांच्या सत्तेचा निर्वाह करीत असल्यामुळें पृथ्वी, पर्वत, दिगंत, इत्यादि नानारूप व अनानारूप असें, वाणी व मन यांचा विषय न होणारें जें चेतन तेंच सर्व आहे. त्याहून निराळें अणुमात्रहि काहीं नाहीं. १५३.

---

## सर्ग १५४ वा.

—:०:—

१ मुनि आपल्या विचारजन्य जीवन्मुक्तस्थितीचें वर्णन करतो, २ पण अभ्यासहीन व्याधाची अनव स्थिति.

मुनिः—या दृश्याविषयीं असा निर्णय करून मी सर्व संतापशून्य होऊन राहिलों. वीतराग, आशंकाशून्य, शांत, अहंताशून्य, निराधार, निराधेय, निर्मान, निरुपाश्रय होऊन आपल्या स्वभावामध्येंच मी स्थित झालों. मी स्वयंशांत

बनलों. सर्गस्वरूप बनलों. सर्वथा उदय पावलों. जें प्राप्त होईल तें करावें व जें अप्राप्त असेल त्याचा विचारहि करूं नये, अशा निश्चयानें मी राहिलों. स्वतःच जो आकाशरूप, त्याला कर्तव्य कोठचें व कशा प्रकारचें असणार? स्वर्ग, पृथ्वी, वायु, आकाश, पर्वत, नद्या व दिशा हें सर्व एकरूप चिदाकाश आहे. हें सर्व भूतजात केवळ चिद्रूप आहे. म्हणून मी शांत होतों. सर्व विक्षेपशून्य होतों. केवळ सुखानें रहातों. मला विधिप्रतिषेध नाहींत. मला बाह्य व आंतरहि नाहीं. अशा रीतीनें मी आपल्या मूळ स्वरूपांत स्थिर स्थित असतां हा तूं आज काकतालीय न्यायानें येथें आला आहेस. याप्रमाणें हें स्वप्न कसें, आम्ही कसे, हें जगत् कसें, तूं कसा व हें दृश्य कसें आहे तूं त्याचा द्रष्टा कसा आहेस व हें दृश्य कसें आहे, देह, इंद्रियें इत्यादि आध्यात्मिक आंतर दृश्य कसें आहे व हें समोर दिसणारें आधिभौतिक दृश्य कसें आहे, त्याविषयीं राग, द्वेष, हान, उपादान इत्यादि भाव कसे आहेत? ब्रह्म कसें आहे व ही सर्व जनता कोणत्या स्वरूपाची आहे! हें सर्व मीं तुला सांगितलें. हें सर्व मिथ्या आहे असें जाणून हे लुब्धका, अरे बा व्याधा! तूं शांत हो. कारण ही आत्मसत्ता स्वतः शांतच आहे. ती चिन्मात्र आकाशरूपिणी व स्वभावतःच निर्वाणरूप भासत आहे. किंवा ती कोणत्याच प्रकारची भासत नाहीं. दृश्याचें सर्वथा भान न होणें हीच तिची शांति आहे.

लुब्धकः—असें जर म्हटलें तर मी, तूं, हे सर्व देवादिक चराचर प्राणी परस्पर स्वप्नपुरुषच आहेत असें म्हणावें लागतें. ते विद्यमान असूनहि अविद्यमान आहेत, असें होतें!

मुनिः—तूं म्हणतोस तें अगदीं खरें आहे. हें सर्व स्वप्नाप्रमाणें स्थित आहे. तें आत्म्यामध्यें सत् आहे व इतरांमध्यें असत् आहे. कारण त्याचा सर्वांना तसाच अनुभव येतो. आपल्या अनुभवानुसार पदार्थांची व्यवस्था करणें सर्वथा उचित होय. दृश्य नसें ज्यानें जाणलेलें असतें, तसाच तो त्याचा अनुभव घेतो. कोणतीहि वस्तु नानारूप व एकरूप असते. जसा एक घट कपालापासून परमाणूपर्यंत अनेक अवयवांनीं युक्त असतो, त्यामुळें त्याला नानात्व आहे; पण घट या रूपानें त्याची एकत्वप्रतीति येते, त्यामुळें त्याला एकत्व आहे. त्यांत जे नानात्वदर्शी असतात, त्यांच्या दृष्टीनें घटाचें एकत्व मिथ्या असतें. एकत्वदर्शी पुरुषांचें नानात्व मिथ्या असतें. उभयदर्शी पुरुषांचें सत् व असत् वैकल्पिक असतें. पण तत्त्ववेत्यांना प्रत्येक पदार्थ वेदनमात्र भासतो. त्यांना तो एकरूपहि भासत नाहीं व सदसद्रूपहि भासत नाहीं. जागृतीमध्यें स्वप्ननगर जसें वेदनमात्र सिद्ध होतें, त्याप्रमाणें पूर्वीं कधीं न पाहिलेल्या व दूर असलेल्या दृश्यमान नगराप्रमाणें हें सर्व आहे. याप्रमाणें हे व्याधा! मीं तुला सर्व सांगितलें. तुला मीं निरंतर बोध केला आहे. तूं स्वतःच बुद्धिमान् आहेस. तूं सर्व कांहीं जाणतोस. तेव्हां तुझी जशी इच्छा असेल तसें कर. हे व्याधबुद्धे! अशा प्रकारें मजकडून प्रबोध केल्या गेलेल्याहि तुझी बुद्धि तुला अभिमत असलेल्या जगत्सत्यत्वभ्रमांतच विश्रांति पावली आहे. परमपदीं विश्रांति पावली नाहीं. माझा उपदेश ऐकत असतांना ती एक क्षणभर स्थिर होते, पण तें तिचें स्थैर्य टिकत नाहीं. ज्याप्रमाणें लांकडाला तासून त्याला कमंडलूचा वगैरे आकार दिल्याबांचून तें जलधारणादिक कार्य करूं शकत नाहीं, फार काय पण नुस्त्या लांकडांत जल प्रवेशहि करीत नाहीं, हें प्रसिद्ध आहे; त्याप्रमाणें हा बोध अभ्यासानें परिणत झाल्याबांचून मनांत

दृढ होणार नाहीं. अभ्यासानें व गुरु व शास्त्र यांच्या एकनिष्ठ सेवनानें मनांत बोध स्थिर झाला असतां द्वैत व अद्वैत दृष्टींची शांति होऊन तें चित्तच निर्वाण आहे, असें अनुभवी लोकांकडून सांगितलें जातें. मनांत मानमोहरहित व जनांत संगदोषरहित, मनांत व जनांतांहि आत्मतत्त्वज्ञानामध्यें नित्य तत्पर, पूर्ण आनंदाचा लाभ झाल्यामुळें सर्व कामनाशून्य, व ज्यापासून सुखदुःखादिकांचा अनुभव येतो अशा प्रियाप्रियादि द्वंद्वांनीं रहित असे तत्त्ववेत्ते त्या विष्णूच्या निर्वाणाख्य परमपदाला प्राप्त होतात. १५४.

---

## सर्ग १५५ वा.

१ व्याधाच्या मूढ-तामस तपामुळें त्याला झालेले दीर्घ क्लेश. २ ब्रम्हदेवाच्या वरामुळें आकाशगति, ३ शरीरवृद्धि व मरण यांचें वर्णन.

अग्निः—हें ऐकून तो व्याध त्या वेळीं त्या वनांतरांत चित्रांत काढलेल्या प्रतिमेप्रमाणें विस्मयानें थक्क होऊन राहिला. उत्तम अभ्यासाच्या अभावीं त्याचें चित्त परमपदीं विश्रांति पावलेलें नव्हतें. त्यामुळें समुद्राच्या लाटांबरोबर वहात जात असल्याप्रमाणें तो अतिशय भ्रमण करूं लागला. नक्रानें आक्रमण केल्याप्रमाणें पराक्रमशून्य झालेल्या त्याचें कोणीं सिद्धानें आपल्या तपोबलानें चक्रवाताप्रमाणें जणुं काय हरण केलें. तो भ्रमरूप चक्रावर आरूढ झाल्याप्रमाणेंच मनांत संभ्रम पावला. निर्वाण हेंच आहे कीं याहून कांहीं निराळें आहे, असा संशय आल्यामुळें एखाद्या मूर्ख तरुणाप्रमाणें त्याला शांति मिळाली नाहीं. हें सर्व दृश्य अविद्याकृतच आहे, असें चिंतन करीत असूनहि, हें जगत् अविद्या आहे ही गोष्ट त्याच्या हृदयांत कांहीं केल्या ठसेना. कारण ‘ अविद्या ’ नांवाच्या ब्रह्मशक्तीनें त्याला उत्पन्न केलें असून तें खरें आहे असें तो चिंतन करूं लागला. त्यामुळें त्याच्या मनांत पूर्वोक्त बुद्धि ठसेना. हें दृश्य कोठवर पसरलेलें आहे, हें मी तपानें मोठें शरीर संपादन करून पृथ्वीपासून फार दूरवर उंच जाऊन पाहीन, अशी त्याला बुद्धि झाली. ‘ भावाभावरूप दृश्याच्या शेवटीं असंसारप्रदेशीं मला नित्य सुखाची प्राप्ति होईल. वास्तव जेथें आकाशाचाहि अभाव आहे तेथें मी जातों,’ असा मनांत निश्चय करून तो मूर्खच बनला. मुनीनें दृष्टान्तपूर्वक सोपपत्तिक व सविस्तर उपदेश जरी केला होता, तरी अभ्यासावांचून तो सर्व फुकट गेला. तेव्हांपासून त्यानें आपलें लुब्धकत्व टाकून तप करण्यास आरंभ केला. या जगांत तपस्व्यांमध्यें प्रसिद्ध असलेल्या लक्षणांनीं युक्त होऊन सदा त्यांच्याबरोबरच तो राहिला. अनेक सहस्र वर्षें त्यानें फार मोठें तप केलें. एकदा तप करीत असतांना तो पुनः त्या मुनीला म्हणूं लागला—“हे भगवन् ! सर्वोपद्रवरहित अशा आत्म्यामध्यें मला विश्रांति केव्हां मिळेल ?” त्यावर तो मुनि असें म्हणाला.

मुनिः—मीं तुला सांगितलेलें तें ज्ञान एखाद्या जीर्ण काष्ठांतील अल्प अग्नीप्रमाणें तुझ्या हृदयांत स्थित आहे. पण दाह्यपदार्थांचें आक्रमण करून तें वृद्धि पावलेलें नाहीं. ( यावरून जन्मांतरीं त्या ज्ञानाचा उद्बोध होईल, असें सुचविलें आहे.) अभ्यासावांचून तूं कल्याणरूप ज्ञानामध्यें विश्रांति पावलेला नाहींस. पण अभ्यासाच्या योगानें दीर्घकालानें पूर्ण विश्रांतीला प्राप्त होशील. आतां पुढील हा आपला निर्णय तूं ऐक. मी त्याचें वर्णन करतों. तुझ्या श्रवणेंद्रियाला तें भूषण होईल. भूतलावर कोणाला मनानेंहि त्याचा संकल्प करतां

येणें शक्य नसल्यामुळें, हा तुझा भविष्यत् निर्णय अति अद्भुत आहे. तूं ज्ञानाला आरंभ केला आहेस. पण तुला त्या विद्वत्प्रसिद्ध ज्ञानाची प्राप्ति झाली नाहीं. त्यामुळें तुझा आत्मा बोधयुक्त झालेला नाहीं. म्हणूनच तुझी संविद् संशयानें डळमळत आहे. तूं मूर्खहि नाहींस व पंडितहि नाहींस. या अविद्यारूप विस्तीर्ण दृश्य जगाचें काय प्रमाण आहे? अशा आत्मविकल्पानें तूं घोर तप करण्यास उद्युक्त झालास. तूं यापुढें शंभर युगेंपर्यंत सतत असेंच उग्र तप करशील. त्यानंतर संतुष्ट झालेला ब्रह्मदेव देवांसह तुझ्यापाशीं येईल. हे श्रेष्ठा! तूं आपल्या उत्कट दुर्मनोरथानें सर्व संदेह घालविण्यासाठीं त्या वरद देवापाशीं असा वर मागशीलः—हे देव! या दृश्यरूप अविद्याभ्रमांत असा एकाहि प्रदेश दिसत नाहीं कीं, ज्यामध्यें गेल्यानें माझी निर्विक्षेप स्थिति संभवेल. जोंवर हा अविद्याभ्रम आहे तोंवर आदर्शाप्रमाणें स्थित असलेल्या ब्रह्मांत प्रतीबिंबमलानें रहित असा प्रदेशच दिसत नाहीं. कारण या परमाण्वाकार असलेल्याहि अंतस्थ चिदाकाशदर्पणांत जेथें तेथें हें जगद्रूप प्रतिबिंबित होतें. म्हणून हें अनर्थावह दृश्य कोठवर पसरलें आहे, याचा अंत कोठें होतो, त्या दृश्याच्या पलीकडे अनंत व शुद्ध ब्रह्म किती दूरवर पसरलें आहे, तें मला अवश्य पहावयाचें आहे. ही गोष्ट प्रत्यक्ष जाणण्यासाठीं मी हा पुढील वर तुजपाशीं मागतों. हे देवाधिदेवा! माझा वर एक व निर्विघ्नपणें तो मला दे. हें माझें शरीर स्वच्छंदमृत्यु असो. तें रोगरहित व गरुडाच्या वेगानें युक्त होऊन आकाशगामी होवो. हें माझें शरीर प्रत्येक क्षणीं अवयवशः एकेक योजन विस्तीर्ण होवो. कालक्रमानें म्ह० असें प्रत्येक क्षणीं वाढतां वाढतां तें त्रैलोक्याच्या बाहेर जावो व आकाशाप्रमाणें विशालरूप होवो. हे परमेश्वरा! याप्रमाणें आकाशासह या दृश्याचा परम अंत लागो, असा मला वर दे. हे साधो! याप्रमाणें तूं वर मागितलास म्हणजे तो देवाधिदेव प्रभु 'एवं अस्तु' असें बोलून अंतर्धान पावेल. तो स्वर्गपति महादेव देवांसह वर देऊन निघून गेला असतां तुझा कृश देह तपाच्या योगानें चंद्रासारख्या कांतीनें युक्त होईल. तूं वर मिळतांच मला विचारून व नमस्कार करून मनांतील विषय पहाण्याच्या इच्छेनें आकाशांत उडून जाशील. जणुंकाय दुसरा चंद्रच किंवा दुसरा सूर्यच अथवा दुसरा मूर्तिमंत वडवाग्निच असा, चंद्र व सूर्य यांच्या स्पर्धेनेंच तूं आकाशांत उड्डाण करशील. त्यानंतर या दृश्य आकाशाच्या परमावधीला प्राप्त होण्यासाठीं, नद्या प्रत्येक क्षणीं जशा वाढत जातात, तसा प्रत्येक क्षणीं वृद्धि पावत तूं गरुडाच्या वेगानें जाऊं लागशील. नद्या अगदीं शेवटीं जशा फार वाढतात, त्याप्रमाणें त्रैलोक्याच्या शेवटीं तुझें शरीर सतत वाढूं लागेल. कल्पांतींच्या मत्त समुद्राप्रमाणें अपार आकाशाला भरून सोडणारें आपलें फार मोठें शरीर तूं महाकाशांत पहाशील. प्रतिबंधशून्य व आधारभूत जें अनंत आकाश त्याचें आक्रमण करीत तूं परमार्थमहाकाशांतील शून्यताप्रयुक्त वातचक्राप्रमाणें असलेल्या, स्वभावरूप द्रवतेच्या उत्सेकामुळें आविर्भूत झालेले चित्समुद्रावरील तरंगच अशा सर्गांस पहाशील. संविद्रूप स्वप्नांत जसे आकाशरूप नगरादि पदार्थ भासतात, त्याप्रमाणें अनेक सर्ग कोणत्याहि प्रकारच्या प्रतिबंधावांचून तुझ्या दृष्टीस पडतील. क्षुब्ध वायूच्या योगानें महाकाशांत शुष्क पर्णांचे संघ जसे उडूं लागतात, त्याप्रमाणें, ज्याचा निश्चय क्षीण झालेला नाहीं असा तूं अनंत सर्गांना पहाशील. पडद्याच्या आंत बसून सभेंतील नृत्यादि क्रीडा पहाणें ज्यांना

आवडतें, अशा स्त्रीजनांच्या दृष्टीनें मधील पडदा असूनहि जसा नसल्यासारखा वाटतो, तसेंच तत्त्ववेत्त्यांच्या दृष्टीनें जगद्वैचित्र्य तेथें असूनहि नसल्यासारखें भासतें. भूमीवरील लोकांच्या दृष्टीनें धूम. निहार, धूलि इत्यादिकांचा स्पर्श इंदुमंडलाला जरी होत असला, तरी इंदुमंडलांतील लोकांच्या दृष्टीनें तो जसा अत्यंत असत्, त्याप्रमाणेंच तत्त्ववेत्त्याच्या दृष्टीनें आत्म्यामध्यें एकरूप होऊन राहिलेलें जगत्‌हि अत्यंत असत्‌च आहे. पुनः सृष्टि, पुनः आकाश, पुनः सर्ग, पुनः नभ, याप्रमाणें पहाणाऱ्या तुझा तेथें दीर्घ काल जाईल. नंतर दीर्घकालानें सृष्टिरूप वर्णांनीं युक्त असलेल्या फार मोठ्या आकाशांतून संचार करीत असतांना तुला आपोआप उद्वेग प्राप्त होईल. आपल्या तपाचें फल अनुभवीत असतांना तूं विरक्त होशील. त्या वेळीं तूं आपल्या अनंत आकाशालाहि व्यापणाऱ्या देहाला पहाशील व असें म्हणशील कीं, हें माझें कुत्सित शरीर मला जणुंकाय भारभूत होऊन राहिलें आहे. मेरुप्रभृति लक्षावधि पर्वतहि यांत तृणाप्रमाणें होऊन रहातात. हा माझा देह प्रमाणातीत झाला आहे. मीं सर्व आकाशाला व्यापिलें आहे. आजच मी या आकाशाला जर भरून सोडीत आहें, तर मग पुढें याचा विस्तार केवढा होईल तें कांहीं कळत नाहीं. खरोखर ही अविद्या अतिशय घोर आहे व ती अनंत आहे, असा अनुभव येतो. एका सम ब्रह्मज्ञानावांचून दुसऱ्या कशानेंहि तिचा नाश करतां येत नाहीं. ज्यानें सर्व भाग व्यापून टाकला आहे, अशा या वृथा देहाचा मी त्याग करतों. या अतिशय वाढलेल्या देहानें साधुसमागम, सच्छास्त्र यांतील कोणत्याच मोक्षसाधनाचा मला लाभ होत नाहीं. ज्याचा अंत लागत नाहीं व निराधार आकाश हाच ज्याचा आधार आहे व ज्याच्या योगानें तत्त्ववेत्त्यांचा समागम होणें शक्यच नाहीं, असें हें शरीर काय कामाचें ? असा विचार करून पक्षी डाळिंबाच्या फळांतील रस काढून घेऊन शुष्क बीज जसें टाकून देतो, त्याप्रमाणें तूं प्राणरेचनी धारणा धारण करून त्या देहाचा त्याग करशील. याप्रमाणें, देहपरित्याग करून तुझा प्राणयुक्त जीव आकाशांत राहील. मोठ्या वाऱ्यांतील सूक्ष्म वायु जसा अंतरिक्षांत अवशिष्ट रहातो, तसाच तुझा जीव तेथें राहील. ज्याचे पंख तोडले आहेत अशा महामेरूप्रमाणें तुझा देह पतन पावेल. त्याच्या खालीं भूलोक, पर्वत, इत्यादि सर्वांचें चूर्ण होऊन जाईल. जिच्या अंगांत रक्ताचा लेशहि नाहीं, अशी चंडिकादेवी आपल्या मातृमंडलासह तुझ्या त्या देहाला भक्षण करील. त्यामुळें ती भूमि निर्दोष होईल. याप्रमाणें हे व्याधा ! तूं आपला हा सर्व भावी वृत्तान्त ऐकला आहेस, आतां ताळीवनामध्यें तप करून तुझी जशी इच्छा असेल तसें कर.

व्याधः—अरे अरे ! भगवन्, तर मग मला अक्षय दुःख भोगणें भाग आहे ! मी विनाकारण दुराशा धारण करून वृथा अनर्थासाठींच हें तप आचरणार आहें, असें होतें. म्हणजे पुरुषार्थाच्या भ्रमानें मी दुःखाचाच संकल्प करणार, असें यावरून सिद्ध होतें. अहो श्रेष्ठ मुने ! ब्रह्मन्, आपण ही सर्व पुढील स्थिति वर्णिली आहे. हा भावी अनर्थ ज्यायोगें टाळतां येईल असा एखादा उपाय आहे का ? किंवा नाहीं ? तें सांगा.

मुनिः—अवश्य होणारी गोष्ट कधींच कोणाला टाळतां येणें शक्य नाहीं. वर्तमान प्रयत्नानें अवश्य भवितव्यतेचा नाश होत नाहीं. पुरुषाला आपल्याच देहांतील उजव्या अंगाला डावें अंग करतां येत नाहीं व डाव्या अंगाला उजवें अंग करतां येत नाहीं. मस्तक,

गाथ, इत्यादिकांच्या स्थितींतहि बदल करतां येत नाहीं. त्याचप्रमाणें भावी अर्थांना बदलतां येत नाहीं. ज्योतिःशास्त्रादि उपायांनीं भावी अर्थाचें नुस्तें ज्ञान होतें. त्यांत अपूर्व असा कांहीं बदल करतां येत नाहीं. ज्या श्रेष्ठ पुरुषांनीं पूर्वसुकृतवशात् वर्तमानसमयीं शमदमादि साधनें संपादन करून श्रवणादि ब्रह्मज्ञानोपायांनीं तत्त्वज्ञान संपादन करून ब्रह्मरूपानेंच शयन केलेलें असतें व जगद्दर्शनानें जे जागत नसतात, तेच पुरुषश्रेष्ठ प्राक्तन सर्व कर्में व दुःसंकल्पादि वेदना अत्यंत दृढ असल्या तरी समूल नष्ट करूं शकतात व तेच या जगांत कृतकृत्य होत. १९९.

---

## सर्ग १५६ वा.

—:०:—

१ वायूमध्यें स्थित असलेला व्याधाचा जीवच सिंधुराजा होऊन विदूरथाला मारून मंत्र्याच्या तोंडून आत्मतत्त्व श्रवण करील असें वर्णन.

व्याधः—हे भगवन् ! त्यानंतर विस्तीर्ण आकाशामध्यें रहाणाऱ्या माझा देह खालीं भूमीवर पडल्यावर माझ्या जीवाचें काय होईल ?

मुनिः—हे कल्याणरूप व्याधा ! तुझा तो देह नष्ट झाला असतां त्या अव्याकृत आकाशांत तुझें काय होईल तें लक्ष देऊन ऐक. तो देह परिभ्रष्ट झाला असतां तुझा जीव प्राणयुक्त होऊन त्या विस्तीर्ण आकाशांत वायुरूप होऊन राहील. तूं स्वप्नांत जसें जगत् पाहतोस त्याप्रमाणें त्याच वातलवामध्यें तुझें चित्त स्वतःमध्यें स्थित असलेलें वासनामय भूपीठ व त्यानें उपलक्षित होणारें सर्व विस्तीर्ण जगत् पाहील. चित्तवृत्तीलाच जगदाकारानें महत्त्व येत असल्यामुळें त्यानंतर तुझा जीव त्या भूपीठावर मी राजा आहें असें पाहील. कारण तो संकल्पित अर्थाला पात्र झालेला असेल. तेथें एकाएकींच आपोआप मी 'सिंधु' या नांवाचा सामंतराजांना अतिशय पूज्य आहें अशी तुझी प्रतिभा लागलीच उत्पन्न होईल. "मी आठ वर्षांचा असतांनाच पिता अरण्यांत गेल्यावर चतुःसमुद्रवलयांकित भूमीचें पित्यानें दिलेलें राज्य मला प्राप्त झालें. सीमांतावर विदूरथ या नांवाचा प्रसिद्ध राजा माझा शत्रु आहे. त्याला प्रयत्नावांचून जिंकता येणार नाहीं. हें राज्य करीत असतांना माझीं अनेक वर्षें गेलीं. अहो, भृत्य, कलत्र इत्यादिकांसह मीं सुख भोगलें. पण हा माझा सीमांत–राजा अतिशय वृद्धि पावला आहे, ही मोठी कष्टकर गोष्ट आहे. त्याच्याशीं भयंकर संग्राम उपस्थित झाला आहे." असें चिंतन करीत असलेल्या तुझें तेथें विदूरथ राजाशीं चतुरंग सैन्याचा क्षय करणारें महत् युद्ध होईल. त्या भयंकर युद्धामध्यें तूं स्वतः विरथ होऊन सुद्धां तरवारीच्या पातानें ज्याची मांडी तोडली आहे असा होशील. भयानें व्याकुल झालेले दिक्पालहि तुझी आज्ञा मोठ्या आदरानें पाळतील. याप्रमाणें सिंधु होऊन ज्याला सर्व भूमंडल प्राप्त झालें आहे असा तूं आपल्या मंत्र्यांसह अशा गोष्टी करशील.

मंत्रीः—हे महाराज ! हें मोठें आश्चर्य आहे कीं, आपण त्या विदूरथाला याप्रमाणें युद्धांत जिंकलें व यमलोकीं पाठविलें.:—

सिंधुः—हे साधो ! धनयुक्त असलेल्या व कल्पांतसागराप्रमाणें ज्याचा वेग आहे अशा मला तो वैरी विदूरथ राजा दुर्जय कां झाला तें सांग पाहूं ?

मंत्रीः—लीला या नांवाची त्याची भार्या आहे. तिनें फार मोठें तप करून जगद्धात्री निरंजना सरस्वती देवीला आपली माता म्हणून स्वाधीन करून घेतलें आहे. त्या सरस्वती

देवीनेंहि तिला आपली कन्या मानली आहे. त्यामुळें ती भुवन-भाविनी देवी लीलेचीं मोक्षादि सर्व कार्यें सहज सिद्ध करून देते. शब्दमात्र-वरानें जी एका क्षणांत जगाला अजगत् करून सोडणारी देवी, तिला तुझा नाश करणें काय अशक्य आहे!

सिंधुः—तूं अगदीं योग्य सांगितलेंस. पण असें जर होतें, तर तो विदूरथ राजा जिंकण्यास अशक्यच होता. मग त्याचा वध कसा झाला? त्या भगवतीच्या प्रसादानें युक्त असलेल्या त्या राजाला त्या संग्रामांत विजय कां मिळाला नाहीं?

मंत्रीः—हे कमलनयना! त्या राजानें कधींहि खिन्न न होतां सर्वकाल माझा या संसारांतून मोक्ष होवो, अशी त्या देवीची प्रार्थना केली होती. त्यामुळें हे प्रभो! त्याच्या त्या सत्य संकल्परूप देवीनें त्याला मोक्षच संपादन करून दिला आणि त्या मोक्षासाठीं विदूरथानें आपण होऊनच पराजयाचा अंगीकार केला.

सिंधुः—असें जर आहे तर मी त्या देवीची सर्वदाच पूजा करतों. मग ती परमेश्वरी मला मोक्ष कां देत नाहीं?

मंत्रीः—महाराज! ही ज्ञप्ति सर्वांच्या हृदयांत सर्वदा रहाते. ती संविद्रूप भगवतीच सरस्वती होय. तिलाच सरस्वती म्हणतात. म्हणजे ती परा या नांवाची सर्व शब्दबीजभूत वाणी आहे. जो जो त्या आपल्या संविद्रूप सरस्वतीची जशी जशी प्रार्थना करतो, तशी तशीच ती त्याला फळ देते. तिच्या त्या फलदानामुळें ती सत्यसंकल्परूप चिद्रूप वराच्या फलरूपानें अनुभविली जाते. हे अरिमर्दना! तूं तिची मोक्षासाठीं प्रार्थना केली नाहींस. आपल्या त्या संविदेची तूं शत्रुशांतिसाठींच प्रार्थना केलीस.

सिंधुः—पण मजप्रमाणेंच त्या विदूरथराजानें राज्यासाठीं तिची कां प्रार्थना केली नाहीं? व मी त्या विदूरथाप्रमाणें त्या शुद्ध संविदेची मोक्षासाठीं प्रार्थना कां केली नाहीं? माझ्या हृदयामध्यें असलेली ही सरस्वती मला ज्ञान देऊन साधनसंपत्तिच्या द्वारा माझ्या मोक्षासाठींच कां प्रयत्न करीत नाहीं?

मंत्रीः—हे प्रभो! रिपूचा घात करणाऱ्या तुझा प्राक्तन अभ्यास अशुभ आहे, त्यामुळें तूं तिला नमस्कार करून मोक्षासाठीं तिची प्रार्थना केली नाहींस. देव स्वतंत्रपणें कोणावरहि अनुग्रह करीत नाहींत, तर भक्तांच्या चित्तानुसारच ते अनुग्रह करीत असतात. कारण ज्याचें जसें चित्त असतें तन्मय प्राणी असतो, ही गोष्ट जगाच्या अंतापर्यंत सिद्ध आहे. आबालवृद्धांस प्रख्यात असलेल्या या नियतीचें उल्लंघन करण्यास कोणीहि समर्थ नसतो. ज्या पुरुषानें आपल्या शुद्ध ज्ञप्तीनें आपल्या चित्तांत दृढाभ्यासानें राज्य किंवा मोक्ष यांतील जें कल्पिलेलें असतें, तें त्या वेळीं विद्यमान असो कीं नसो, इतर सर्व वासनांचा बाध करून पुरुषाला तें निर्विघ्नपणें आपोआपच अवश्य प्राप्त होतें. १५१.

---

## सर्ग १५७ वा.

—:०:—

१ सिंधुजीवाच्या अत्यंत तामसी जातीचें वर्णन २ व राज्यत्याग करणाऱ्या त्याला शेवटीं विवेकानें मुक्ति.

सिंधुः—हे श्रेष्ठा! मी मतिमंद पूर्वीं कोणत्या अनार्य जातींत होतों, कीं ज्यामुळें माझा संसार देणारा प्राक्तन कुसंस्कार दृढ झाला आहे?

मंत्रीः—हे राजाधिराज! सावधान चित्तानें एक क्षणभर मी सांगत असलेलें रहस्य ऐक. धजकडून प्रेरित झालेला तूं अज्ञानाचा नाश करणारें हें माझें वचन हृदयांत धारण करशील.

ज्याचें शब्दांनें वर्णन करतां येत नाहीं असें आद्यंतरहित अनामय सत्व आहे. तें ब्रह्म-संज्ञक सत्त्वच तूं, मी इत्यादिरूपानें स्थित आहे. तें ब्रम्ह स्वतःच चित् आहे. त्यामुळें 'जाणतों' अशा संकल्पसंविदेस प्राप्त होऊन, समष्टि-व्यष्टिचित्त बनून, त्याच उपाधीमध्यें जणूंकाय जीवत्वास प्राप्त होऊन आपली उपाधि न सोडतांच तें रहातें. ती उपाधि कोणती ह्मणून ह्मणशील तर सांगतों. चित्त हीच त्याची उपाधि होय. ती गगनाप्रमाणें शुद्धस्वरूप असून आतिवाहिक ह्मणजे सूक्ष्म शरीर तेंच आहे, असें तूं जाण. स्थूल शरीरादिकहि तें चित्तच आहे, दुसरें कांहीं नाहीं. परलोक, इहलोक इत्यादि व स्वप्न, जागृति, जन्म, मरण, भोग, मोक्ष इत्यादि संकल्पांनीं, तें निराकार असूनहि साकार जगत् होऊन राहिलें आहे. तत्त्ववेत्ते निराकार असलेलेंहि चित्त साकार व विस्तृत जगद्रूप आहे, असें समजतात. म्हणजे हें रहस्य त्यांनाच कळतें. जो वायु तेंच जसें स्पंदन किंवा जें आकाश तेंच जसें शून्यत्व, त्याप्रमाणें जें चित् तेंच जगत्. त्यामध्यें भेद नाहीं. तें सर्व एकच आहे. जगदाकार कल्पना करण्याचें ज्यामध्यें निरंकुश सामर्थ्य आहे, अशा या चित्तांत यत्किंचित्‌हि भेद नाहीं. हृदयांतील जगज्जाल मिथ्या असल्यामुळें वस्तुतः तें कांहीं नाहीं. वासनारूप असलेलेंच तें बाहेर साकार असल्याप्रमाणें स्थित आहे. जगत् निराकार चित्तच आहे, असें तूं जाण. तें खरें नव्हे. ब्रह्मपदापासून पहिल्या सर्गामध्यें सात्त्विक देवताघटित सत्त्व हेंच हिरण्यगर्भ नांवाचें समष्टि शरीर [illegible] पावलें. मग हा समष्टिच, व्यष्टिभाव प्राप्त झाला असतां, तामस विषयासक्तीनें, उत्पत्तिप्रकरणांत सांगितल्या-प्रमाणें, राजससात्त्विकादि तेरा प्रकारच्या विभागक्रमानें आज तुझा तामस-तामस जीव झाला आहे.

सिंधुः—हे महाभागा! तामस-तामस कशा-ला ह्मणतात तें सांग. परमपदीं पूर्वीं या संज्ञा कोणीं केल्या आहेत?

मंत्रीः—ज्याप्रमाणें सावयव प्राण्याचे येथें हस्तादि अवयव असतात, त्याप्रमाणें निरवयव आत्म्याला ही आतिवाहिकता आहे. त्यानंतर तोच आत्मा ह्म० मायेनें परि-च्छिन्न झालेला हिरण्यगर्भ अनेक संज्ञा उत्पन्न क-रतो. व्यष्टि जीवामध्येंहि तो समष्टि आत्माच संज्ञा करतो. त्याचप्रमाणें आतिवाहिक समष्टिस्वेद-हांत पंचीकरणानें आधिभौतिकत्व उत्पन्न केलें असतां त्या देहामध्यें पृथिव्यादि संज्ञा तोच क-ल्पितो. या स्वप्नासारखा जगद्भानांत आत्मरूप-संकल्पानें नामरूपांची कल्पना करून संज्ञारूप व्यष्टिजीवभावानें तो स्वतःच व्यवहार करतो. नवीन व्यष्टिभावकल्पना करतांना, हिरण्यगर्भ, तुला उद्देशून, हा महातमस्क जीव आहे, असें समजला. त्यामुळें तुझी आतिवाहिकाकार महा-तमस्का तामसतामसी जाति झाली. तुझ्या जन्मा-ला त्यानें महातमस्क हें नांव दिलें. हे प्रभो! निर्वि-कार ब्रम्हाला जणूंकाय विकार होत असल्या-प्रमाणें जीवत्व प्राप्त झाल्यावर अनेक प्रकार-च्या व अनेक नांवांच्या राजस-सात्त्विकादि जाति कल्पिल्या आहेत. म्हणजे तामसतामसी ही एकच जाति नाहीं, तर निरानिराळ्या उपाधि-गुणानुसार अनेक जाति झाल्या आहेत. (चित्ताच्या गुणोत्कर्षामुळें मोक्ष शीघ्र मिळतो व दोषामुळें त्यास विलंब लागतो. त्या गुण-दोषामुळेंच जीवांच्या अनेक जाति होतात. त्यां-तील पांच जाति येथें सांगतात—) कल्पाच्या आरंभीं ब्रह्म जेव्हां प्रथमच जीवभावास प्राप्त होतें, तेव्हां त्या जन्मांत जन्मसिद्ध ज्ञानैश्वर्य-युक्त बुद्धीनें विषयभोग घेणारा त्याच जन्मीं

मुक्त होतो. म्हणून ती सात्त्विकसात्त्विकी जाति होय. सनकादिकांचे जन्म अशा जातीचे होते. कांहीं काल संसाराला कारण होणारें अज्ञान असतांना त्याच जन्मीं ज्ञानैश्वर्यादि कल्याणगुणांनीं युक्त होऊन जर जीव मुक्त झाला तर त्या जातीला जातिवेत्त्यांतील श्रेष्ठांनीं केवल सात्त्विकी जाति ह्मटलें आहे. जी जाति कल्पाच्या आरंभीं अगदीं नवीनच जरी उत्पन्न झाली असली तरी अनेक जन्म भोग भोगून क्रमानें मोक्षाला पात्र होणारी जर ती असेल, तर ती राजसराजसी होय, असें तज्ज्ञ संत ह्मणतात. जी जाति दहा पांच जन्मांनींहि त्याच कल्पांत विवेकादि गुणांनीं युक्त होत नाहीं, तर अनेक जन्मपरंपरेनंतर भव्यगुणास प्राप्त होते, ती केवल राजस जाति सांगितलेली आहे. कल्पाच्या आरंभापासून असंख्य स्थावर-कीट-किरातादि जन्मांनंतर मोक्षभागिनी होणारी जी जाति असते, तिला जातिवेत्ते संत तामस-तामसी ह्मणतात. राक्षस, पिशाच, शूद्र इत्यादि अनेक सामान्य जन्मांनंतर जी जाति मोक्षाला पात्र होते, त्या जातीला जातिविशारद केवल तामसी ह्मणतात. याच क्रमानें जातींची विविधभेदकल्पना होऊं शकते. हे मानदा! तूं त्यांतील तामस-तामसी जाति झाला आहेस. तुझे अनेक जन्म होऊन गेले आहेत. त्या तुझ्या विविध व विचित्र जन्मांस मी जाणतों. हे वीरा! तूं जाणत नाहींस. विशेषतः तूं या अनंताकाशांत गमन करणाऱ्या महाशव शरीरानें व्यर्थ काल घालविलास. याप्रमाणें तामसतामसी जातीनें तूं उत्पन्न झाल्यामुळें या संसारकुहरांतून मुक्त होणें तुला अशक्य झालें आहे.

सिंधुः—ही प्राचीन अधमा तामसतामसी जीवजाति कोणत्या उपायानें जिंकली जाते, तो उपाय, हे श्रेष्ठा, तूं मला सांग. माझ्या चित्ताचें शोधन करणारें असें जर कांहीं साधन असेल तर यावज्जीव तूं सांगितल्या प्रकारानेंच मी तें करीत राहीन.

मंत्रीः—हे महाबुद्धे! या त्रिभुवनामध्यें असें एकहि फल नाहीं, कीं जें उद्वेगरहित पुरुषप्रयत्नानें प्राप्त होत नाहीं. कालची दुष्क्रिया आजच्या सत्क्रियेनें जशी शोभेला प्राप्त होते, त्याप्रमाणेंच प्राक्तनी दुष्क्रिया या जन्मांतील सत्क्रियेनें शुभपरिणामी करतां येईल. वास्तव तूं यत्नानें प्राक्तनाला जिंकून सत्कार्यवान् हो. जो एखाद्या फलाची इच्छा करतो व त्यासाठीं यत्न करतो, तें त्याला मध्येंच श्रांत होऊन निवृत्त न झाल्यास अवश्य प्राप्त होतें. मनुष्य जसा नित्य यत्न करतो, ज्याची नित्य भावना करतो, यद्रूप होतो व जसें होण्याची इच्छा करतो, तसा तो अवश्य होतो. त्याच्या विपरीत कधींहि होत नाहीं.

असें बोलला गेलेला तो सिंधुराजा जिनें आपल्यावरील राज्यभार काढून टाकला आहे अशा बुद्धीनें तत्काल सर्व राष्ट्राचा निःशेष त्याग करील व दूर वनांत निघून जाईल. मंत्र्यांनीं पुष्कळ प्रार्थना केली तरी ज्यांतील सर्व शत्रूंचा उच्छेद झाला आहे अशा आपल्या राज्याचा पुनः स्वीकार करणार नाहीं. साधूंच्या समागमांत रहाणाऱ्या याला त्यांच्या विवेकयुक्त कथा ऐकून, पुष्पाच्या संगतीनें तैलादिकांना जसा वास लागतो त्याप्रमाणें, त्याच्या ठिकाणीं विवेकाचा उदय होईल. त्यानंतर हा जन्म कसा झाला, संसार कोणत्या कारणानें प्राप्त झाला, असा सतत विचार केल्यानें तो जीवन्मुक्तावस्थेस प्राप्त होईल. याप्रमाणें सत्समागमानें नित्य विचारपरायण झालेला तो सिंधुराजा अशा पवित्र मोक्षाख्य पदाला प्राप्त होईल कीं ज्या मोक्षपदीं हिरण्यगर्भाच्या ऐश्वर्यापर्यंत ही सर्व लक्ष्मी वाऱ्याबरोबर उडून जाणाऱ्या शुष्क पर्णाप्रमाणें तुच्छ वाटेल. १९७

## सर्ग १५८ वा.

१ मुनिवचन ऐकून व्याधानें तप केलें. २ ब्रह्मदेवाच्या वरानें तो आकाशांत उडून गेला. ३ व शव होऊन खालीं पडला इत्यादि वर्णन.

मुनिः—हे व्याधा! हें तुझें सर्व भावी वृत्त मीं मार्गे होऊन गेलेल्या कथेप्रमाणें तुला सांगितलें. आतां तुझ्या जसें इच्छेस येईल तसें तूं कर.

अग्निः—याप्रमाणें त्याचें वचन ऐकून तो व्याध क्षणभर मनांत अत्यंत विस्मयाकुल झाला. नंतर लगेच तो व्याध व त्याचप्रमाणें तो मुनि स्नान करावयास गेले. याप्रमाणें निष्कारण स्नेही झालेले ते दोघे व्याध व महामुनि शास्त्र-विचारांनीं तप करूं लागले. त्यानंतर अल्प कालानेंच मुनि निर्वाण पावला ह्म० देह टाकून तो परमपदाला प्राप्त झाला. त्यानंतर पुष्कळ कालानें ह्मणजे आणखी शेंकडों युगें गेल्यानंतर व्याधाचा मनोरथ पूर्ण करण्यासाठीं ब्रह्मदेव तेथें आला. तेव्हां आपल्या वासनावेशामुळें भावी अनर्थाचें निवारण करण्यास असमर्थ झालेला तो व्याध पूर्वी मुनीनें व्यर्थ म्हणून सांगितलेला वर जाणत असूनहि मागता झाला. ब्रह्मदेव 'एवं अस्तु' असें बोलून इष्ट दिशेस गेला. व्याधहि त्याचें फल भोगण्यासाठीं पक्ष्याप्रमाणें आकाशांत उडाला. आपल्या वाढणाऱ्या शरीरानें त्रैलोक्याच्या पलीकडे अव्याकृत आकाशांत मोठ्या वेगानें अगणित काल पर्वताप्रमाणें फिरत राहिला. महागरुडाच्या वेगानें खालीं, वर, आसपास, असा संचार करीत असतांना त्याचा पुष्कळ काल निघून गेला. त्यानंतर दीर्घ कालानें जेव्हां त्याला अविद्या-भ्रमाचा अंत लागेना, तेव्हां अतिशय उद्विग्न होऊन तो विरक्त झाला आणि उद्वेगानें प्राण-रेचनधारणा धारण करून त्यानें प्राणत्याग केला. त्याबरोबर शवीभूत झालेलें त्याचें शरीर आकाशांत खालीं पडूं लागलें व प्राणयुक्त चित्त वर आकाशांत गेलें. तेथेंच तें विदूरथाचा शत्रु होऊन सर्व पृथ्वीचा पालक सिंधु राजा बनलें. ह्मणजे त्यानें सिंधुत्वाचा त्या सूक्ष्म देहांतच अनुभव घेतला. त्याचा देह शंभर मेरूंच्या आकाराचा महाशव झाला आणि दुसऱ्या पृथ्वीप्रमाणेंच आकाशांतून खालीं पडला. त्यावेळीं तो अशनिपाताप्रमाणें दिसला. ब्रह्मदेवाच्या एका जगद्भ्रमांतील भ्रामक आकाराप्रमाणें दिसणारा तो एखाद्या पृथ्वीचें विशाल आच्छादनच आहे असें भासलें. त्यानें आपल्या आकारानें सर्व पृथ्वी व पर्वतमंडल झांकून टाकलें. हे श्रेष्ठ विपश्चित् राजा! मीं हें तुला त्या महाशवाचें सर्व वृत्त यथावत् सांगितलें. ज्या जगांतील भूमंडळामध्यें तें शव पडलें, तें जगत् आमच्या स्वप्नगराप्रमाणें भासलें. त्या शवांतील रक्ताचा आस्वाद घेऊन शुष्का—महोदरी चंडिका देवी परिपूर्ण झाली. ती रक्तवर्ण बनली. तिचें शरीर रक्त व आंतडीं यांनीं भरून गेलें. त्या शवाच्या मेदानें माखलेली पृथ्वी मेदिनी म्हणजे मेदलिप्त झाली. हिमालयस्वरूपरूपी आश्चर्यकारक स्वरूपानें ती परिपूर्ण झाली. तोच महामेद मृद्धातुत्वाला प्राप्त झाला. दीर्घ कालानें पुनः पृथ्वी होऊन ती मृण्मय बनली. पूर्वी त्या शवाच्या योगानें जीं वनें वगैरे नाश पावलीं होतीं, तीं वनें पुनः पहिल्यासारखीं भूमीमध्यें उत्पन्न झालीं. नगर-युक्त ग्राम वसविले गेले. चूर्ण झालेले पर्वत पुनः पातालांतून वर उठले आणि लोकांची व्यवहारलक्ष्मी पुनः पूर्वीप्रमाणें प्रवृत्त झाली. १९८.

## सर्ग १५९ वा.

—:०:—

१. अग्नीचें अंतर्धान. २. इंद्राचें विपश्चित् राजाला उपदेश करून गमन. ३ अनेक आश्चर्यें व ब्रम्हतत्व यांचें वर्णन.

अग्निः—हे श्रेष्ठ विपश्चिता ! तूं स्थिर व पुनः प्रकृत व्यवहारयुक्त असलेल्या भूमंडलास प्राप्त होऊन आपल्या अभिमत दिशेस जा. स्वर्गलोकीं इंद्र प्रजासमूहाचा शंभरावा यज्ञ करावयास प्रवृत्त झाला आहे. त्यांत मला मंत्रानें बोलिवलें आहे. हे गतिज्ञा ! मी तेथें जातों.

भासः—असें बोलून भगवान् अग्नि, ज्याप्रमाणें विद्युत् निर्मल आकाशांत नाहींशी होते, त्याप्रमाणें तेथल्या तेथेंच अंतर्धान पावला, आणि मी देखील अविद्येचा अंत पहाण्याविषयींचे पूर्व संस्कार आपल्या चित्तानें वहात पुनः दिगंतीं जाणें हें आपलें कर्म संपादन करण्यासाठीं आकाशांत भ्रमण करीत राहिलों. पुनरपि आकाशांत मीं अगणित जगें पाहिलीं. तीं अनेक प्रकारचे आचार, विचार व अनेक रचना यांनीं युक्त होतीं. कित्येकांचीं अंगें छद्ममय होतीं व तीं एकमेकांना चिकटलेलीं होतीं. हे राजा दशरथा ! तीं प्रकाशमान होत होतीं, चेतनायुक्त होतीं, मंद गमन करीत होतीं, व पहाणारांचीं मनें आकर्षण करीत होतीं. हे रघुकुलोत्पन्ना ! कांहीं ठिकाणीं सर्व भूतें मृण्मय-देहांनीं युक्त होतीं. तीहि पूर्वीप्रमाणेंच हंसत होतीं, चेतनायुक्त होतीं व पर्वतासारखीं होतीं. कांहीं जगांतील भूतांचीं अंगें काष्ठमय होतीं, आणि कांहीं ठिकाणीं असंख्य भूतें पाषाणदेहानें युक्त होतीं. कांहीं ठिकाणीं यावज्जीव दगडाच्या प्रतिमेप्रमाणें एकत्र स्थित होतीं. कांहीं भूतें परस्पर संभाषणादिकांच्या योगानें वाङ्मात्र व्यवहार करीत होतीं, गमनागमनादि व्यवहार करीत नव्हतीं, असें मीं आपल्या चित्ताकाशांत पाहिलें. याप्रमाणें मीं स्वप्नाप्रमाणें मनोमात्रदेहत्वानें जगें पहात दीर्घकाल घालविला. पण मला अविद्येंतील दृश्यवर्गाचा अंत लागला नाहीं, त्यामुळें दृश्यवर्गाविषयीं मी उद्विग्न झालों. मोक्षसिद्धीसाठीं कोणत्या तरी एकांतप्रदेशीं बसून आत्मतत्त्वालोचनरूप तप करण्यास उद्युक्त झालों. तेव्हां इंद्र मला म्हणाला, "हे विपश्चित् राजा ! चित्ताकाशांत तुझी व माझी ही मृगयोनि उपस्थित झाली आहे. त्यामुळें आत्मतत्त्वाचें आलोचन करण्याचा हा काल नाहीं." तेव्हां मीं म्हटलें:—

'इंद्रा ! मी अल्पपुण्यवान् व त्यामुळें अभागी असल्यामुळेंच माझें मृगयोनि देणारें दुष्कृत संभवतें. पण महापुण्यवान् असलेल्या तुला मृगजन्म कां घ्यावा लागत आहे ?'

तेव्हां तो म्हणाला— 'मीहि स्वर्गभोगप्रयुक्त संमोहामध्यें पूर्वाभ्यासाधीन होऊन भ्रमण करीत असतां मंदरवृक्षांच्या अरण्यांत माझ्या हातून दुर्वासाचा अपराध घडला. त्यामुळें माझ्या चित्ताकाशांत हरिणयोनि उपस्थित झाली.'

त्या इंद्रानें असें सांगितलें असतां मीं म्हटलें 'हे देव ! मी या संसाराला आतां अगदीं कंटाळलों आहें. यांतून शीघ्र मुक्त होईन असा मला कांहीं उपाय सांग' तें ऐकून तो मला पुनः बोलला, "मी अवस्थात्रयरूपानें व मूर्तामूर्तरूपानें रहित विशुद्धात्माच आहें," अशा तत्त्वज्ञानानेंच शिघ्रमुक्ति मिळत असते व ही गोष्ट तूं पूर्वीं व्याध व मुनि यांच्या संवादवर्णनप्रसंगानें अग्नीच्या मुखानें ऐकलीच आहेस. यास्तव तूं माझ्यापासून दुसरा वर मागून घे." असें इंद्रानें सांगितलें असतां 'मृग झाल्यावर माझें पुढें काय होईल तें मला कळावें,' असा वर मीं मागितला.

इंद्रः—हे राजा! तुझी ही चिति मृगयोनीमध्यें चिरकाल संसार करण्याची इच्छा करीत आहे व हा तुझा अवश्यभवितव्यार्थ मीं पाहिला आहे. मृग होऊन तूं दशरथराजाच्या या अतिशय पवित्र सभेंत प्राप्त होशील व तेथें मीं आतां सांगितलेलें हें अव्याहत ज्ञान तुला प्राप्त होईल. याप्रमाणें तूं आतां संसारदुःखानें आर्त होऊन पृथ्वीवर हरिण हो. त्या हरिणयोनींतहि तुला हा सर्व निष्फल आत्मवृत्तान्त आठवेल. हें सर्व स्वप्नभ्रमाप्रमाणें आहे. संकल्पानें रचलेल्या पदार्थांचीच याला उपमा आहे. परलोकामध्यें अनुभव घेतलेल्या विषयाच्या कथेप्रमाणें ही नुस्ती विकल्पमात्र कथा आहे. हें तुला त्या योनींत आठवेल. पण तूं आपलें मृगत्व सोडून जेव्हां पुरुष होशील तेव्हां तुझा देह ज्ञानाग्नीनें दग्ध झाल्यावर तुझ्या मनांत असलेलें हें सर्व तत्त्वज्ञान अगदीं स्पष्ट आठवेल. त्या तत्त्वज्ञानानें चिरकाल दृढ झालेली ही अविद्याख्य भ्रांति सोडून तूं मुक्त होशील. स्पंदरहित वायु जसा स्वरूपांत स्थित होतो, त्याप्रमाणें तूं स्वरूपांत निर्वाण पावशील. त्या देवानें असें सांगितलें असतां लागलींच माझ्या मनांत 'मी या वनांतील हा हरीण आहे' अशी निश्चित प्रतिभा उदय पावली. तेव्हांपासून त्याच मंदारवनांतील एका कोपऱ्यांत मी हरिण झालों व श्रेष्ठ पर्वतावरील तृण व दुर्वांकुर खाऊं लागलों. त्यानंतर एकदां सीमान्तावरील सामन्त राजा मृगया करण्यासाठीं आला आहे, असें पाहून मी अतिशय भयभीत झालों व जीव घेऊन पळूं लागलों. पण त्यानें माझ्यावर आक्रमण केलें व मला धरून आपल्या घरीं नेलें. तेथें तीन दिवस ठेवून घेऊन हे रघुश्रेष्ठा! तुझ्या क्रीडेसाठीं येथें आणून पोंचविलें. हे निष्पापा! हा मी आपला सर्व वृत्तान्त तुला सांगितला आहे. हा संसारांत प्रसिद्ध असलेल्या गारुड्याच्या मायेसारखा आहे. तो अनेक अद्भुत रसांनीं युक्त आहे. ही अविद्या अशी अनन्त आहे. ती आपल्या असंख्य शाखाप्रसरांनीं युक्त आहे. ती शाखांच्या विस्तारांनीं अतिशय शोभते. आत्मज्ञानावांचून ती दुसऱ्या कोणत्याहि उपायानें शांत होत नाहीं.

श्रीवाल्मीकिः-विपश्चित्-राजा असें बोलून जेव्हां मुकाट्यानें बसला तेव्हां लागलीच अतिविस्मित राम त्याला असें म्हणाला—

श्रीरामः—दुसऱ्याचा संकल्परूप असा हा हरिण जर आम्हांला दृश्य झाला तर संकल्परहित असलेलाहि पुरुष दुसऱ्याच्या संकल्पसृष्टींतील वस्तु पाहूं शकेल, असें सिद्ध होतें. पण ही गोष्ट उपपन्न कशी होते, तें हे प्रभो! तूं मला सांग.

विपश्चित्:—( महामुनि, देवता यांच्या वर-शापादिकांच्या योगानें अन्यसंकल्पकल्पित अर्थाहि संकल्परहित असलेल्या दुसऱ्यांच्याहि दर्शनादि व्यवहारास योग्य होतो, असें उत्तर सांगण्यासाठीं पूर्वोक्त शवपतनाचेंच दुसऱ्या निमित्तानें वर्णन करण्यास राजा आरंभ करितो–) ज्या जगांतील भूतलांत तें पूर्वोक्त महाशव पडलें, त्या भूलोकीं तें पडण्यापूर्वीं यज्ञाच्या गर्वानें जाणाऱ्या इंद्रानें आकाशांत ध्यान करीत बसलेल्या दुर्वासमुनीला पायाचा प्रहार केला. तो मेलेला आहे, असें समजून अज्ञानानें इंद्रानें त्याला लाथ मारली. त्यामुळें कोपयुक्त झालेल्या दुर्वास ऋषीनें त्याला शाप दिला, "हे इंद्रा, अरे उन्मत्त इंद्रा! ज्या भूलोकीं तूं जाण्याची इच्छा करीत आहेस, त्याला थोड्याच अवधींत—लौकरच ब्रह्मांडासारखें एक महा घोर शव चूर्ण करून सोडील. ज्याअर्थी येथें बसलेल्या माझें तूं शवबुद्धीनें आक्रमण केलें आहेस, त्याअर्थी माझ्या शापानें त्या पृथ्वीस हरिण

होऊनच सत्वर प्राप्त होशील,' असें म्हटलें. त्या दुर्वासमुनींनें विपश्चित राजासह इंद्राच्या मृगभावप्राप्तीसाठींहि त्याला तूं देवमृग होऊन विपश्चितराजाप्रमाणेंच म्ह० तो जितके दिवस मृग असेल तितके दिवस हरिण होशील असें म्हटलें. अशा प्रकारच्या त्या शापकथेमुळें माझें सांकल्पिक मृगत्वहि तुमच्या दृष्टीचा विषय झालें. पण वस्तुतः त्यांतील एक मृगत्व खरें व दुसरें खोटें असें नाहीं. तर दोन्हींहि एकसारखींच आहेत. ती तशी प्रतिभाच उदय पावते. त्यांत सत् काय आणि असत् तरी काय? शिवाय हे राघवा! याविषयीं दुसरी एक युक्ति तूं ऐक, म्हणजे तुला या गोष्टीचें स्पष्ट ज्ञान होईल. ज्याच्यामध्यें हें सर्व आहे, ज्याच्यापासून हें सर्व होतें, जें सर्व आहे व जें सर्वतः आहे, त्या ब्रम्हामध्यें हे महाभागा! काय संभवत नाहीं? सर्व संकल्प एकमेकांशीं मिळत नाहींत असें म्हणतां येत नाहीं. उलट सर्व संकल्पजात एकमेकांशीं मिळतें, असेंच उपपन्न होतें. किंबहुना तें परस्पर मिळत नाहीं व मिळतें या दोन्ही गोष्टी सर्वशक्तिमान् ब्रम्हाच्या ठिकाणीं संभवतात. सर्वात्म्यामध्यें जेथें छाया तेथेंच प्रकाश ही गोष्ट जर संभवली नसती, तर ब्रम्हाला सर्वात्मक कसें म्हणतां आलें असतें? संकल्पनगर संकल्पानेंच परस्पर संबद्ध कां होणार नाहीं? सद्रूप ब्रम्हामध्यें तें परस्परसंबद्धहि होईल. सत्य नाहीं असें कांहीं नाहीं व मिथ्या नाहीं असेंहि कांहीं नाहीं. सर्वरूप ब्रम्हामध्यें सर्व, सर्वदा, सर्वथा व सर्वत्र संभवतें. अहो, ममाला मोह पाडणारी ही माया अतिशय विचित्र आहे. कारण तिच्यामुळें विधि व प्रतिषेध एकत्र स्थित झाले आहेत. ही ब्रम्हसत्ता अशा प्रकारची आहे. तिनें आपणच आपल्याला बद्ध करून घेतलें आहे. त्या सत्तेमुळेंच अनादि-सादि ही अविद्या अनुभवास येते. ज्ञप्तिमात्र स्फुरण हेंच जर त्रिभुवन नसतें तर महाकल्पामध्यें नष्ट झालेल्या पदार्थांची पुनः साक्षात् सृष्टि कशी झाली असती? अग्नीची सत्ता, वायूची सत्ता, भूमीची सत्ता कशी झाली असती! तस्मात् चित्स्वभावस्फुरणावांचून जगत् म्हणून कांहीं अनुभवच नाहीं. वेदान्तादि शास्त्रें, विद्वानांचे अनुभव व लोकप्रसिद्ध दृष्टान्त, हें सर्व ज्या महाकल्पाच्या आरंभापासून वाद करणाऱ्या मूर्खांना प्रमाण नाहीं, त्यांच्याशीं सज्जनांनीं संभाषणहि करूं नये. या ज्ञप्तिदृष्टीनें सर्व एका क्षणांत प्रमाणभूत होतें. पण ही चिद्विलासदृष्टि सोडून अन्यदृष्टीनें पाहूं लागल्यास तें सर्व अप्रमाण व त्यामुळेंच अगदीं अल्प होतें. त्यामुळें ज्ञानी लोक ज्ञानदृष्टिसिद्धच सार जाणतात. शुद्ध ज्ञप्ति हीच ब्रह्मसत्ता असून 'मी अविद्या आहें' अशी कल्पना केल्यानें ही जगद्रूप लक्ष्मी भासते. स्पंदनानें जशी वातश्री व्यक्त होते, त्याप्रमाणें संकल्पानें जगत्स्थिति सिद्ध होते. यांतील कोणी मरत नाही व कोणीं उत्पन्न होत नाहीं. मी मृत झालों आहें, ही केवळ चिद्रूप प्रतिभाच आहे. मरण हा जर अत्यंत नाश असेल तर ती सुखोपमेय सुषुप्तिच होय आणि जर पुनः दृश्याचा अनुभव येत असेल तर खरोखर तें जीवितच होय. म्हणून या जगांत मरणहि नाहीं व वास्तविक जीवितहि नाहीं. एक चिन्मात्र स्फुरणामध्येंच दोन्ही आहेत व दोन्ही नाहींत. चितीनें संकल्प केला तर दोन्ही आहेत, संकल्प केला नाहीं तर कांहीं नाहीं. तत्त्वदृष्टीनें विचार केला तर एक चित्तत्त्वच आहे. तें अनंत कल्याणरूप आहे. चिन्मात्राहून व्यतिरिक्त जीवन म्हणून काय आहे सांग बरें! चिन्मात्र तर सर्वदुःखशून्य व अक्षय आहे. तेव्हां दुःख कोणाला व कोठें होणार? जेथें नामासह सर्वरूप, रूपासह सर्व नाम चिदाकाशमात्र झालें तेथें सुखदुःखांचा

संभवच नाहीं. चिदूहून अन्य व तिच्याहून अनन्य असें द्वित्व व एकत्व कोठचें? जलामध्यें जसे तरंगादिक तसें परमात्म्यामध्यें परमात्मसत्तेनेंच सर्व जगत् सत्तायुक्त झालें आहे. तें कारणाहून भिन्न नाहीं व आकाशरूप आहे, हें सर्व जगत् चिद्घनमात्र, अव्यग्र, अघन, आकाशच आहे; तथापि तें सुघन, व्यग्र, द्रव्यरूप व स्थूलरूप होऊन दिसतें, हें मोठें आश्चर्य आहे. हें भूतप्रतीतीचा विषय नाहीं व वर्तमानप्रतीतीचाहि नाहीं, तर हा पिशाच भ्रांतिरूप भासत आहे. तो आकाशरूप आहे असें जाणावें. जसें हें महाकाश दिसत आहे तसें हें चिदाकाशरूप आकाश आहे. कारण चिदाकाशच आकाश म्हणून जाणलें असतां शून्य होऊन रहातें. ही भूमि, हा वायु, हें दुसरीकडे आकाश, या दिशा, या विदिशा इत्यादि अनेकाकारांनीं हें चिदाकाशच दिसत आहे, दुसरें कांहीं नाहीं. त्यांत एकत्व नाहीं व द्वित्वहि नाहीं. त्यांत सूक्ष्मत्व नाहीं व स्थूलत्वहि नाहीं. तत्त्वदृष्टीनें पहाणाराला सर्वच दृश्य शून्य भासतें. तज्ज्ञत्व व अतज्ज्ञत्व हीं दोन्हीं खरीं नव्हेत. असत् स्थितिहि खरी नाहीं. सत् व असत् हीं दोन्ही सत्य आहेत. यास्तव हें सर्व एक काष्ठमौन आहे. जें दृश्य तेंच ब्रह्म, तेंच अनंत परमपद आहे. हें सर्व परब्रह्ममात्र आहे, हाच सिद्धांत होय. याप्रमाणें हा चिद्धातुच अशा रूपानें आपल्या स्वरूपांत स्फुरण पावत आहे. ज्या आकाशाचें हें स्फुरणच सूक्ष्म जगद्रूप आहे, तेंच एक सत्य तत्त्व आहे. मृत जीवांच्या शरीरांत सर्व ठिकाणीं प्रत्येक अंगुलभर प्रदेशांत असंख्य सर्गादिक रहातात. ते परस्पर अदृश्यहि असतात. उत्तरोत्तर अधिक सूक्ष्म असलेले सिद्ध लोक स्वरूपास प्राप्त होऊन ब्रह्मामध्यें सुसंगत होतात. ते एकमेकांच्या आधारांनीं स्थित असूनहि एकमेकांस पहात नाहींत. कारण ही दृश्यश्री आत्माकाशच आहे. त्यामुळें ती दुसऱ्याला दिसत नाहीं. ती चिद्रूप आहे. स्वप्नाप्रमाणें आपणच आपल्याला पहाणारी आहे. प्रभातकालीं अंधकाराच्या आकृतीप्रमाणें जिची आकृति आहे अशी ही चिदाकाशरूप असल्यामुळें तिचें ज्ञान होतांच चिन्मात्ररूप बनते. तिच्यामध्यें हा जगद्भ्रम जरी भासत असला तरी ती स्वरूपांत स्थिर होते. ज्यांतील सर्व विशेष शांत झाले आहेत असें हें जगज्जाल जसें आहे तसेंच सत् असो किंवा असत् असो, आत्मज्ञानानें शांत होतें. ज्याप्रमाणें समुद्राच्या जलबिंदूंचा एका क्षणांत संयोग व वियोग होतो, त्याप्रमाणें ब्रह्मसागरांत स्फुरण पावणाऱ्या या चिदणूंचा परस्पर संयोग व वियोग होतो. सृष्टीच्या आरंभीं चिदाकाशमय सर्गशोभा स्वप्नाप्रमाणें भासते. यास्तव हें सर्व शांत ब्रह्मच आहे. ही गोष्ट उपपन्न होते. रामा! मीं अनंत वैभवानें युक्त अशीं विश्वें पाहिलीं, स्वकर्माचे परिणामच अशीं सुखदुःखें भोगलीं, अनेक युगें दशदिशांमध्यें भ्रमण केलें, पण ज्ञानावांचून हा दृश्य दोष पूर्णपणें शांत होत नाहीं, हाच सिद्धांत शेवटीं ठरला. १५९

## सर्ग १६० वा.

१ सायंकाळीं सभा उठली. २ दुसऱ्या दिवशीं पुनः भरली. ३ भासाची जीवन्मुक्ति व अविद्या यांचें वर्णन.

श्रीवाल्मीकिः—विपश्चित् राजा असें जों बोलत आहे तों त्याचा वृत्तांत प्रत्यक्ष पहाण्यासाठींच जणुं काय सूर्य आपले किरणरूपी चरण दूर पसरून लोकांतरीं गेला. सायंकाल झाला हें सुचविणारा दुंदुभि सर्व दिशांना भरून सोडीत वाजूं लागला. त्यामुळें जणुं काय संतुष्ट झालेल्या दिशांनींच जयजयकार

केला आहे, असें भासलें. राजा दशरथ त्या विपाश्चित् राजाला त्याच्या राजत्वाला अनुरूप असें वैभव, गृह, दासी, धन, इत्यादिकांची योजना करून क्रमानें आपल्या सिंहासनावरून उठला. राजा, राम व वसिष्ठादि यांनीं परस्परांचें विसर्जन करून व यथाक्रम पूजन करून ते सर्व आपापल्या स्थानीं निघून गेले. स्नान व भोजन करून, रात्र घालवून, पुनः ते सर्व समेत आले व पूर्वीच्याच रचनेप्रमाणें ती सर्व सभा संस्थित झाली. नंतर मुनि तीच प्रस्तुत कथा पुढें सांगूं लागला. चंद्र जसा अमृताचा वर्षाव करतो त्याप्रमाणें तो मुनि आपल्या मुखकांतीनें सर्वांना आह्लाद देत वागमृताचा असा वर्षाव करूं लागला:—हे राजन् ! ही अविद्या अशा रीतीनें असत्य असूनहि सत्य असल्याप्रमाणेंच स्थित आहे. विपश्चित् राजानें अशा दीर्घ यत्नानेंहि या दृश्य भ्रांतिरूप अविद्येचा निर्णय केला नाहीं. त्याला तिचा अंत लागला नाहीं. ही अविद्या जोंवर अशी अज्ञात आहे, म्ह० तिचें अधिष्ठान ब्रम्हमात्र आहे असें जोंवर कळत नाहीं, तोंवर ती नित्य व अनंत आहे असें भासते. पण मृगजलाची नदी अधिष्ठानरूपानें पहातांच जशी नाश पावते, त्याप्रमाणें ही अविद्या अधिष्ठानरूपानें ज्ञात होतांच बाधित होते. हे महाबुद्धिमाना ! या भासाचें म्हणजे विपाश्चित् राजाचें सर्व वर्तमान त्याचे मंत्री स्वतःच पहाते झाले. यापुढें परमकथांनीं ज्याला तत्त्वज्ञान झालें आहे असा हा राजा अविद्या शांत झाली असतां जीवन्मुक्त होईल. ब्रह्मदेवानें ज्याअर्थी आपल्या हृदयांत अविद्या म्हणून संविद् धारण केली, त्याअर्थी तिच्या सत्तेनेंच असत् असलेलेंहि हिचें रूप भ्रमानें सत् असल्यासारखें भासतें. जेव्हां ही अविद्या ब्रम्हरूपच आहे व इतररूप नाहीं, तेव्हां ही अज्ञान दशेंतच विद्यमान आहे व ज्ञानदशेंत याहून भिन्न नाहीं. ही अविद्या अशा रीतीनें अनंत आहे. अनेक प्रकारचे विकार तिच्यापासून उद्भवतात. ती जड आहे; हृदयंगम आहे; आसक्ति उत्पन्न करणारी आहे. मोहरूपी वसंत ऋतूंतील फुललेली मंजरी आहे. तिच्यामध्यें सार कांहीं नाहीं. ती कामरूपी ग्रंथीनें युक्त आहे. सकृद्दर्शनीं ती फार मनोहर दिसते, पण अनुभवकालीं तिच्या अंगावर सर्वत्र कांटे आहेत असा भास होतो. वेळूच्या वनांतील शाखेप्रमाणें ती कंटकमय आहे. जड, नीरस व दीर्घ आहे. तिच्यावर पुष्कळ मधुर फळें आहेत, अशी वृथा शंका येते. पण ती सर्वथा निष्फलच आहे. ती अज्ञाचें चित्त हरण करते. अकालीं उत्पन्न झालेल्या पुष्पमालेप्रमाणें सज्जनांकडून तिचें अभिनंदन केलें जात नाहीं. तिला वास्तविक रूप कांहींच नाहीं. तथापि ती अत्यंत पुष्ट व नाना भुवनांनीं परिपूर्ण असल्यासारखी भासते. ती अमावास्येच्या रात्रीप्रमाणें प्राणी व पिशाच यांनीं युक्त असते. तिच्यामध्यें प्रकाशाचा अभाव असतो. ती अत्यंत दीर्घ असते व तमोमय असते. आकाशांत तिमिरदृष्टीला जसा केसाचा भ्रम होतो, तशा प्रकारची ही अविद्या मिथ्या भ्रांति आहे. ती विचित्र ग्रंथींनीं परिवेष्टित झाली आहे. ती आकाशांत खोटीच भासत असते. तिच्याकडे पाहूं लागलें कीं ती मुळींच दिसत नाहीं. आकाशांतील इंद्रधनुष्याप्रमाणें ती विचित्र वर्णाची आहे, गुणहीन आहे व शून्यामध्यें विस्तार पावली आहे. जडस्पंद याच उत्पातांनीं ती भरलेली आहे. तिच्यामध्यें अनेक जड कल्लोल आहेत. ती पावसाळ्यांतील नदीप्रमाणें कलुषित तरंग व फेन यांनीं भूषित झाली आहे. तिच्यामध्यें चक्राकार भ्रमणें सतत चाललेलीं असतात. ती एकसारखी शून्य जगद्रूप असंख्य मृगजलनद्यांना वहात असते. धुळीच्या राशीप्रमाणें ती

रूक्ष आहे, स्मशानाप्रमाणें ती दुर्भग आहे. स्वप्नपुरामध्यें संचार करणाराला जसा अंत लागत नाहीं, त्याप्रमाणें या जाग्रत्संज्ञक स्वप्नपुरांत चिरकाल संचार करणारा पुरुष हिच्या अवधीला प्राप्त होत नाहीं. ज्यांनीं या सृष्टीविषयींचे संकल्प दृढ केलेले असतात, त्यांचे ते संकल्पच या जगांतील देहादि आकारांनीं परिणाम पावलेले असतात. एका दृश्यांतील जीवांनीं जसा दृढ निश्चय केलेला असतो, तसाच त्यांना दुसऱ्या जगांत अनुभव येतो. चिद्रूप आकाशकोशांतील तीं रत्नेंच आहेत व परस्परांना प्रतिबंध न करितां तीं सुखानें राहिलेलीं आहेत. विमानें, नगरें, भूमि इत्यादि रूपांनीं तें चिदाकाशच असें स्थिर स्थित झालें आहे. तींच सिद्धांचीं गृहें आकाशांत परस्पर भासतात. तीं अदृष्ट असलीं तरी विद्यमान आहेत व उत्तम प्रकारें दृढ असलीं तरी असत् आहेत. सुवर्ण, रत्नें, माणकें, मोत्यें, यांनीं त्यांतील भूमि मढविलेली आहे. ( आम्ही आपल्या घरांतील जमिनीला जशी फरशी करितों तशी तेथें भूमीस सुवर्णादिकांची फरशी केली आहे. ) भक्ष्य, भोज्य, अन्न, पान, यांनीं संपन्न अशीं रसायनाचीं सरोवरें त्यांत आहेत. मध, मद्य, दहीं, दूध, तूप, यांच्या प्रवाहांनीं तीं भरलेलीं आहेत. चंद्राप्रमाणें ज्यांचा आकार आहे, अशा स्त्रियांनीं युक्त आहेत. तीं सिद्धगृहें सर्व ऋतूंतील प्रसिद्ध पुष्पें, फळें, पल्लव व नद्यांचे प्रवाह यांनीं युक्त, लीलेनें विलासयुक्त स्त्रियांनीं आकुल, व संकल्पमात्रानें उत्पन्न केलेल्या सर्व संपन्न वैभवांनीं सर्वकाल भरलेलीं असतात. कांहीं जगें सहस्र चंद्रबिंबांनीं युक्त असतात. कित्येकांत शतसूर्य असतात. सुवर्णाप्रमाणें किंवा अमृताप्रमाणें ज्यांचा वेष आहे अशा प्रकारचीं जलभूतें ज्यांत आहेत, अशीं कित्येक जगें आहेत. ज्यांत स्वेच्छेनें अंधकार होतो व वाटेल तेव्हां प्रकाश होतो, अशीं कांहीं जगें आहेत. कित्येक नित्य आनंदमय असतात. कित्येक लहानशा कापसाच्या गोळ्याप्रमाणें हलकीं असून त्यांना वायु वाटेल तिकडे उडवून नेतो. कित्येक कल्पनावशात् एका क्षणांत उत्पत्ति होऊन नाश पावणारीं आहेत. ज्यांत उत्तम अन्न व जल आहे अशीं कित्येक आहेत. कित्येक विश्वांत जरा व मरण यांचा अभाव असतो. विचित्र रचना व विचित्र वैभव यांनीं कित्येक युक्त असतात. सर्व ऋतुगुणांनीं रम्य झालेलीं व सर्व काममय अशीं कांहीं विश्वें आहेत. ते सर्व संकल्पसमूह आहेत. शास्त्रीय सत्कर्म व उपासना यांमुळें तत्फलाकार—त्या त्या लोकांच्या भोग्याकारानें स्थिर झालेल्या मनांची ती परिणति होय. (पण ती अशा प्रकारची मनःपरिणति स्थूल भित कशी असेल ?) मनोरथादिकांत मनःपरिणाम चिन्मात्रसत्तेनें युक्त असतात, असें आम्हीं पाहिलें आहे. यास्तव जगत् ब्रह्ममात्रमय असल्यामुळें त्यांत हें सर्व पूर्वोक्त जगज्जाल संभवतें. अरे बाबा ! त्यांत कांहीं दुसरा प्रकार असेल तर, हें जगत् किंमय, कोणत्या स्वरूपाचें आहे, तें वाद्यांनीं सांगावें. या सृष्टिकालीं भूतमय भौतिक आहे, अशी कल्पना जरी करितां आली तरी सृष्टीच्या आरंभीं ' सदेव सोम्येदमग्र आसीत् ' अशी छांदोग्य श्रुति असल्यामुळें दुसरें कांहीं कारण होतें, असें म्हणतां येत नाहीं. त्यामुळें कारणावांचूनच झालेलें हें जगत् ब्रह्मरूप जर नसेल तर तें अत्यंत असत्च आहे, असें म्हणावें लागेल. पण विश्वें जर अत्यंत असत् असलीं तर भासतात कशीं, म्हणून म्हणशील

१ ' स यदि पितृलोककामो भवति संकल्पादेवास्य पितरः समुत्तिष्ठन्ते तेन पितृलोकेन संपन्नो भवति' इत्यादि श्रुति यांविषयीं प्रमाण आहे. ( छां. भा. पृ. २८८ पहा. ) .

तर सांगतों. त्यांची जशी जशी कल्पना केली जाते तशीं तशीं तीं चितींत भासतात. अत्यंत असत् असलेल्या शशशृंग–आकाशपुष्पादिकांची कल्पना केल्यास तींहि भासूं लागतात. त्यांत आश्चर्य तें काय आहे? सांग. तर मग आपले संकल्प वंध्य–निष्फळ कां होतात, म्हणून म्हणशील तर तीव्रवेगानें ते केलेले नसतात म्हणूनच वंध्य होतात. तीव्र संवेगानें तूं किंवा दुसरेहि कोणी आकाशांत नगरें कल्पितातच. एकरसानें जर कोणीं अभ्यास केला तर हें शरीर सोडून ते लवकरच यदृच्छेनेंच आकाशांत प्राप्त होतात. हा एक, व पूर्वसिद्ध उपासनादिकांच्या योगानं कल्पिलेला दुसरा, अशा या दोन प्रपंचांचें जो अनुवर्तन करितो, ह्म. आपल्या दृढनिश्चयानें ते दोन्ही अवश्य आहेत असें समजून त्याप्रमाणें जो वागतो तो पुरुष, यज्ञादि करणारा स्वर्गाला जसा अवश्य प्राप्त होतो, त्याप्रमाणें क्रमानें त्या दोन्ही प्रपंचांना प्राप्त होतो. पण या दोहोंतील एक सत्य आहे, अशी ज्याची दृढ मति असते तो त्यांतील एकालाच प्राप्त होतो. (सिद्धलोकांविषयीं सांगितलेला हा न्याय नरकादि पापफलकल्पनांमध्येंहि समानच आहे, असें सांगतात–) सिद्ध नेहमीं आपल्या मनांतील दृढ कल्पनेमळें असें पाहतात. त्यांना त्यांच्या दृढ संकल्पाप्रमाणेंच अनुभव येतो. नरकादि दुःखांचा अनुभवहि तसाच संकल्पामुळें येतो. तथापि त्यांत असा फरक आहे–उपासनेचें फल यत्नानें त्याच्या सत्यतेचा दृढ अभ्यास झाल्यासच प्राप्त होतें. पण पुण्याचें फल आस्तिक्य व अनुष्ठान असलें म्हणजे त्याच्या सत्यत्वाविषयीं दृढ अभ्यास जरी नसला तरी तें सत्य असल्याप्रमाणेंच दृढ होतें. पण पापाचें फल आस्तिक्य व अभ्यास यांचा अभाव जरी असला तरी नुस्त्या पापाचरणानेंच सत्य असल्याप्रमाणें दृढ होतें. पण संकल्पानुसारित्व हें सर्वांना एकसारखेंच लागू आहे. कारण संविद् ज्याची ज्याची कल्पना करिते त्याचा त्याचा तसाच अनुभव घेते. मग देह असो कीं नसो. कारण सर्व देह मनोमय आहेत. त्यामुळेंच जीव ज्या भावनेनें एक देहमयी बुद्धि सोडतो त्याच भावनेनें युक्त अशी दुसरी देहबुद्धि तत्काल तेथेंच पाहतो. शुभ संविद् शुभ लोकांना पहाते व अशुभ संविद् अशुभ लोकांना पहाते. ते लोक आकाशरूप असतात व संविद्हि आकाशरूप असते. ती त्यांचा चिरकाल अनुभव घेते. शुद्ध संविद् सिद्धांचीं पुरेंच पहाते व त्यांचा अनुभवहि घेते. अशुद्ध चित् नरकांतील भयंकर दुःखें पहातें. दोन पर्वतांच्या चक्रामध्यें स्वतःला गव्हांप्रमाणें चिरडून गेलेलें पहाते. ज्यांतून पुनः उद्धार होणें शक्यच नाहीं अशा अंधकूपांत पडलेली पहाते. भयंकर शैत्यानें देह दगडासारखा जड झालेला पहाते. पिशाचें व निखारे ज्यांत पुष्कळ आहेत अशा अनंत निर्जलप्रदेशांतहि आपण पांथ झालों आहों असें ती पहाते. निखाऱ्यासारख्या लालभडक मेघांतून धगधगीत निखाऱ्यांचा आपल्यावर वर्षाव होत आहे, असा अनुभव घेते. ज्यांतून पाषाण, चक्रें, तलवारी यांच्या नद्या वहात आहेत अशा आकाशांतून संचार करते. मेघासारख्या भयंकर कुठारांचे प्रहार होऊन आपलें वक्षःस्थळ फुटलें आहे, असा अनुभव घेते. तापवून लाल केलेल्या लोखंडी पुतळ्यांना गाढ आलिंगन देते. कडकड शब्द करीत शस्त्रांच्या घाण्यांत पीडली जाते. चक्र, वज्र, गदा, प्रास, शूल, तरवार, बाण यांची वृष्टि सहन करते. कांटेरी वृक्षाला कवटाळते. दृढ पाशांनीं बद्ध होते. हजारों शक्तींनीं पीडली जाते. तापलेल्या वाळूमध्यें गडगडां लोळते. पाताळामध्यें बुडते. दीपाच्या आकारानें गुप्त असलेला जो उल्काग्नि त्याचें भय अनुभवते. भयंकर कावळे तिच्या

अंगाला टोंचतात. ज्यांतून बाहेर निघतां येत नाहीं अशा धगधगीत निखाऱ्यांत ती प्रवेश करिते. बाण, शक्ति, गदा, प्रास, भुशुंडी, चक्रें यांचा तिच्या अंगाला वेध होतो. क्षुधेमुळें क्षुब्ध व निष्ठुर झालेलीं प्रेतें एकमेकांना खातात. फार उंचावरून कठोर शिलेवर ती पडते. रक्त, मांस इत्यादिकांच्या चिखलांत व पुवाच्या नद्यांत ती क्लेश भोगते. शिला-शस्त्रमय अश्व व हत्ती यांच्या पायांखालीं तिचा चूर होतो व पाषाणांत सांपडूनहि तिचें अंग फुटून जातें. श्वभ्रासारख्या प्रदेशांत उलूक तिच्या देहाचें विदारण करतात. जनसमूह तिच्यावर मुसळांचे प्रहार करतात. गृध्रसमूह तिचें मस्तक, हात, पाय, स्कंध, यांचे तुकडे उडविण्यासाठीं तत्पर असतात. अमुक पापाचें हें अमुक फल मिळतें, असा शास्त्रावरून निर्णय करून पूर्वी पुष्कळ वेळां तशा प्रदेशांतून तसा अनुभवहि घेतला असल्यामुळें आत्मसंविद्च त्या त्या दुःखरूपानें परिणाम पावून त्याचा अनुभव घेते. तात्पर्य, चेतन देहादि जें कांहीं चित्ताकाशांत भासलेलें अथवा स्वप्नांत पाहिल्यामुळें न भासलेलें किंवा अपूर्वच असें जें कांहीं संकल्पभ्रांतिरूप कल्पनेनें भासतें तें सर्व मनोमयच आहे. तस्मात् चिरकाल अनुभव घेतलेल्या भावांपासून तें यदृच्छेनेंच प्राप्त होतें, व शेंकडों प्रयत्न करूनहि तें प्राप्त होत नाहीं. १६०.

---

## सर्ग १६१ वा.

जगत् हें अन्य कारणरहित चित्र असून तें चिन्मात्र प्रतिभासात्मक आहे. २ अज्ञानामुळें तें जगत् भासतें व ३ ज्ञानानें तें ब्रह्म होतें असें वर्णन.

**श्रीरामः**—भगवन्! मुनि व व्याध यांचें भासानें वर्णन केलेले शेंकडों सुख-दुःखादि दशांनीं युक्त असलेलें जें वृत्त आम्हीं ऐकलें तें प्रत्यहीं दिसणाऱ्या स्वप्नादिकाप्रमाणें कारण-शून्य आहे कीं तें स्वाभाविकच आहे? म्हणजे ज्याप्रमाणें लवण, गाधि इत्यादिकांना भगवद्-वरादिकांच्या निमित्तानें चांडालभावादिक प्राप्त झाला त्याप्रमाणें दुसऱ्या कांहीं कारणामुळें झालें आहे?

**श्रीवसिष्ठः**—अज्ञात परमात्मरूप महासागरांत अशा प्रकारचे हे संकल्पमय भ्रम आपोआपच एकसारखे प्रवृत्त होत असतात. ते स्वरूपामध्यें आकाशमय असतात. ज्याप्रमाणें स्पंदात्मक वायूपासून सतत स्पंदपंक्ति उत्पन्न होतात, त्याप्रमाणें सत्तत्त्वाच्या चित्स्वभावामुळें चिदाकाशांत हे सर्व प्रतिभायुक्त भ्रम उत्पन्न होतात. या चिदाकाशाच्या अंगभूतच अशी जी प्रतिभारूप प्रमा या चित्पासून उत्पन्न होते, ती दुसऱ्या प्रतिभेनें बाधित होईपर्यंत येथें तशीच रहाते. जसा नाना अवयवांनीं युक्त असा एकच अवयवी असतो, तसें हें एक चिद्ब्रह्म प्रतिभायुक्त आहे. त्या अनंत प्रतिभासांमध्यें अधिष्ठान सन्मात्रात्मक ब्रह्म शाखादिकांतील वृक्षाप्रमाणें अनुगत असतें. त्यांतील भूमि, अंतरिक्ष, दिशा इत्यादि कांहीं अवस्था चिरकाल रहात असल्यामुळें स्थिर असतात, व बाकीच्या अस्थिर म्हणजे अल्प काल रहाणाऱ्या असतात. याविषयीं देहावस्थानाचें योग्य उदाहरण आहे. देहाच्या पिंड, हस्त, पाद इत्यादि आकारावस्था स्थिर आहेत, व निमिषोन्मेषादि अवस्था अस्थिर आहेत. पण त्या दोन्हीं प्रकारच्या अवस्थांमध्यें सारासारत्वादि कल्पना मूढ लोक उगीच करतात. कारण त्या अवस्था आकाशरूप आत्म्यामध्यें स्थित आहेत. स्वात्म्यामध्यें स्वप्ननगर जसें भासावें, तसाच हा चितींतील चमत्कार केवल भासमात्र आहे. हें सर्व तत्त्वतः जाणलें "तें

चिदाकाशमात्र होतें. पण तुम्हीं अज्ञ जनांनीं जाणलेलें तें जगत् सत्‌हि नाहीं व असत् नाहीं. त्याविषयीं कांहींच बोलतां येत नाहीं. हे तज्ज्ञ हो ! हा संसार सर्व प्रकारें शिवस्वरूप आहे. तें केवल चिदाकाशमात्र स्फुरण आहे. तेव्हां त्यांत आस्था किंवा अनास्था काय ठेवावयाची ? जसें स्वरूप स्थित आहे तसाच तुम्ही त्याचा आश्रय करून स्वस्थ रहा. समुद्रापासून उत्पन्न होणाऱ्या तरंगांप्रमाणें स्वात्म्यापासून हे प्रतिभारूप आकार आपोआप उत्पन्न होतात. ते स्वात्म्यापासून स्वात्मरूपच उद्भवतात. त्या प्रकाशमान देवापासून कार्यकारणरूपानें जें स्वसंकल्पाप्रमाणें व स्वसर्गाप्रमाणें चिदाकाशाचें विस्तृत प्रतिभान तेंच त्यानें जगत् म्हणून जाणलें आहे. त्यांत पृथिव्यादि कोठचें ? अज्ञानदर्शेत हा आभास असा भासतो, पण ज्ञानदर्शेत कांहीं भासत नाहीं. ब्रह्मच ब्रह्मामध्यें स्थित आहे. जगत् कांहीं कारणावांचून अविद्यासंज्ञक बनलें आहे. त्या जगाला चिद्घनामुळें घनत्व प्राप्त झालें आहे; पृथिव्यादि रूपानें नाहीं. सर्व जगत् चिदाकाशच आहे. हाच परम बोध आहे. हा बोधच भूमिकाभ्यासानें दृढ होणें यालाच मुक्ति म्हणतात. आकाशाच्या नीलवर्णाप्रमाणें असलेल्या या अज्ञानाचा अवलंब करून चिदाकाशाचा हा प्रतिभास: सर्वत्र पसरला आहे. तें चिदाकाशच शांत व निष्प्रतिबंध असून तेंच जगत् या रूपानें भासतें. ध्यान करणाऱ्या पुरुषांच्या अनुभवानेंच ही गोष्ट सिद्ध आहे. निर्विकल्प समाधीमध्यें स्थिर प्रतिष्ठा झाली असतां देहभान क्षीण होतें आणि साक्षिचिन्मात्र स्वरूपांत मन स्थिर होतें. त्यानंतर त्या मनाला जगद्दर्शनाचें सामर्थ्य कोठून असणार, हें तूंच सांग बरें ? अर्थात् अज्ञ पुरुषाच्या दृष्टीनेंच जगद्दर्शनसामर्थ्य असतें. चिद्धातूचा आकाशभाग जो जेथें जसा जसा भासतो, तसा तसा तो तेथें स्वभावतःच असतो. अज्ञाच्या चित्तोपाधींत ब्रह्मच जगद्रूपानें भासतें व ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं तें चिन्मात्रस्वभावानें भासतें. जन्मापासून तिमिर रोगानें ज्याची दृष्टि दूषित झाली आहे त्या पुरुषाला जन्मभर जसे दोन चंद्र दिसतात, त्याप्रमाणें अविचारवानाची दृश्यभ्रांति आकाशमय जरी आहे, तरी ती कधींच शांत होत नाहीं. कारण हें जें कांहीं दिसत आहे तें निरामय ब्रह्मच आहे. आदिअंतरहित चिदाकाश आहे. तेव्हां तें शांत कसें होणार ? आपलें स्वच्छ संवेदनात्मक रूप न सोडणाऱ्या चैतन्याचें जें स्वप्नाप्रमाणें स्फुरण पावणें तेंच हें जगत् आहे. शास्त्रार्थ व तीक्ष्ण बुद्धि यांनीं परस्पर संकल्प-विकल्प न करतां जें सुषुप्ताप्रमाणें स्वस्थ राहणें तेंच आत्मस्वरूप असून ज्ञानी पुरुषच त्याला जाणतो. नदीमध्यें जशी धूळ नसते, त्याप्रमाणें तुमच्या मनांत जी ही अविद्या नांवाची असद्रूप अव्यभिचारिणी संविद् रूढ झाली आहे, ती आमच्या दृष्टीनें नाहींच. जशी स्वप्नाप्रमाणें स्वतः अनुभवलेली ही पृथ्वी कोठेंच विद्यमान नाहीं, तशी ही दृश्यता उत्तम प्रकारें जरी अनुभूत आहे तरी ती मिथ्या आहे. रूपादि विषयांप्रमाणें व त्यांना प्रकाशित करणाऱ्या अग्नीप्रमाणें स्वप्नांत जसें चिदाकाशच भासतें, त्याचप्रमाणें जागृतींतहि चिदाकाशच पदार्थरूपानें भासतें. साक्षीचें अपूर्ण स्वप्रकाशरूपच तसें दिसतें. हें जाग्रत् व हें स्वप्न हा भेद सत्यवस्तूमध्यें मुळीं नाहींच. तथापि त्यांची जी भिन्नता भासते, ती अनुभवदृष्ट्या समान असलेल्या त्या दोन्ही अवस्थांमध्यें नाहींच. स्वप्नांतून जागें झाल्यावर स्वप्नांतील पदार्थ खरे नाहींत हें जसें भासतें, त्याप्रमाणें दुसऱ्या शरीरामध्यें जागृत झालेल्या गर्भस्थ जाति-

स्मर पुरुषाला पूर्व जागृतींतील प्रत्ययहि मिथ्या भासतो. जाग्रत् व स्वप्न हीं भेदबुद्धि स्वल्पकाल भासणें व दीर्घकाल भासणें यामुळें होतें. त्या दोन्ही अवस्थांचा त्या त्या अवस्थेंत अनुभव येणें हा धर्म एकसारखाच आहे. त्या दृष्टीनें त्यांचें साम्यच आहे. जाग्रत बाहेर दिसतें व स्वप्न आंत दिसतें, हा भेदहि वस्तुतः नाहींच. कारण स्वाप्नप्रत्ययहि बाहेर दिसतो व जाग्रत् प्रत्ययहि आंत येतो. अर्थात् स्वप्न व जाग्रत् या दोहोंचेंहि गुणसाम्य आहे. त्यामुळें त्यांतील एक श्रेष्ठ व एक कनिष्ठ असें ह्मणतां येत नाहीं. दोन जुळ्या मुलांना एक मोठा व एक लहान हें जसें ह्मणतां येत नाहीं, त्याप्रमाणेंच जाग्रत् व स्वप्न यांचें उत्कृष्टत्व व निकृष्टत्व संभवत नाहीं. त्या दोहोंविषयीं हें असें नाहीं ही बाधबुद्धि कालांतरीं उत्पन्न होते. मरेपर्यंत शेकडों अनियत स्वप्नें जशीं आपण पहातों, त्याप्रमाणें अज्ञान दशेमध्यें निजलेल्या जीवाला कल्पांत होईपर्यंत शेकडों अनियत जागृतींचा अनुभव येतो. एका जन्मांत उत्पन्न होऊन नाश पावणारीं अनेक स्वप्नें जशीं आठवतात, त्याचप्रमाणें ज्ञानी सिद्धांना शेकडों जन्मांतरांचें स्मरण होतें. याप्रमाणें सर्व प्रकारें साधर्म्य असलेल्या व समस्त अनुभवरूप चिदाकाशांत स्वप्नाप्रमाणें जागृत् स्फुरण पावते व जागृतीप्रमाणें स्वप्नसंवेदन होतें. ज्याप्रमाणें दृश्य व जगत् हीं दोन्ही नित्य एकार्थत्वास प्राप्त झालीं आहेत म्ह० ते दोन्ही शब्द भिन्न जरी असले तरी त्यांचा अर्थ एकच आहे, त्याप्रमाणें जाग्रत् व स्वप्न हे शब्द भिन्न जरी असले, तरी त्यांचा अर्थ एकच आहे. याप्रमाणें विस्तीर्ण स्वप्ननगर जसें चिन्मय आकाशच होय, तसेंच हें जगत् चिन्मय आहे. तेव्हां त्यांत अविद्या कोठली असणार ? व ती कोणत्या कारणानें दिसणार ? ज्याला अविद्या म्हणून म्हणतात ती आकाशमात्ररूपच आहे, असें जर तुम्ही ह्मणत असाल तर शब्दाविषयीं आम्ही वाद करीत नाहीं. कारण सर्व भ्रमाची शांति झाली ह्मणजे जें अवशिष्ट रहातें तेंच मी आहें; त्यापूर्वीं बंध स्वकल्पनात्मकच असतो, एवढेंच आह्मांला सांगावयाचें आहे; व तें याप्रमाणें सिद्ध होतें. वास्तव ज्याला बंध नाहीं त्यालाच बंध उत्पन्न करूं नका. निराकार शुद्ध आकाश व चिन्मय यांत विलक्षणता काय आहे, कीं ज्यामुळें आकाश बद्ध होत नाहीं व चिदात्मा बद्ध होतो असें ह्मणतां येईल ? दोहोंतहि अलेपकत्व, अमूर्तत्व, सूक्ष्मतमत्व इत्यादि रूपानें अत्यंत साम्य आहे. दृश्यनामक अविद्यारूप चिन्मय आकाशस्फुरणांत बंध किंवा मोक्ष कोठून असणार ! अविद्या विद्यमानच नाहीं. तेव्हां बंधहि बंध नाहीं व कोणाचा मोक्षहि मोक्ष नव्हे. कारण ब्रह्माहून निराळी वस्तु आहे किंवा नाहीं; असा व्यवहारच करतां येत नाहीं. विद्याहि नाहीं व अविद्याहि नाहीं. ही निर्विकार चित्च तशी भासत आहे. स्वप्नाप्रमाणें चित्च सृष्टीच्या रूपानें साकार होऊन दिसते. आकाश हीच जशी आकाशाकृति त्याचप्रमाणें ब्रह्मच जगदाकार आहे. संविद् एका पदार्थापासून दुसऱ्या पदार्थापर्यंत जाऊन पोंचली असतां त्या दोन पदार्थांमध्यें तिचें जें निर्विषय स्वरूप असतें, तेंच जाग्रत्-दृश्य व स्वप्नदृश्य यांचें पारमार्थिक रूप आहे असा निश्चय करावा. बाह्य दृश्य व आभ्यन्तर दृश्य यांमध्यें इंद्रियें, मन, त्यांचे विकार इत्यादिकांना प्रकाशित करण्यासाठीं सदा जागृत असलेल्या स्वयंप्रकाश आत्म्याचें जें स्वरूप तेंच जाग्रत्स्वप्नदृष्टीचें तात्त्विक स्वरूप आहे. रात्रीं एकाकी शांत निद्रित झालेल्या पुरुषाचें जें स्वरूप तेंच जाग्रत्स्वप्नदृष्टीचें तात्त्विक रूप आहे. जाग्रत् व स्वप्न यांचें

भेदज्ञानहि साक्षीरूपच आहे, असें तूं समज. त्या वेळींहि चित्‌चा भेद होत नाहीं. कारण तिन्ही अवस्थांमध्यें अनुगत असलेली जी साक्षी चित् तिच्या अंताला कोण प्राप्त झाला आहे? म्हणजे तिचा अंत दुसऱ्या कोणीं पाहिला आहे कीं ज्यावरून तिच्या भेदाची कल्पना करतां येईल? चिदाकाशच अभेदबुद्धि आहे व चिदाकाशच भेदबुद्धि आहे. द्वैत व अद्वैत हें एकच शांत अखंडित चित्तत्व आहे. ज्याप्रमाणें ब्रह्माच्या सत्, चित् व आनंद या तीन अंशांतील सदंश बोधमय आहे, त्यामुळें त्या दोहोंचा अभेद आहे, त्याचप्रमाणें द्वैत व त्याचें वेदन हीं दोन्ही एकच आहेत. त्यामुळें चिदंशहि अभिन्नच आहे. कारण जे दृक्‌चे विषय होणारे पदार्थ तेच दृश्य आहेत. हा विषयविषयीभाव चिदात्म्याहून भिन्न आहे, असें कोणालाहि सांगतां येणें शक्य नाहीं. यास्तव त्यांचा अभेदच आहे. एका सद्वस्तूचाच सर्व द्वैतरूपानें जेव्हां प्रतिभास होतो तेव्हां ब्रह्मच द्वैताद्वैत व अद्वैताभिन्न आहे. त्या व्यतिरिक्त दुसरें कांहीं नाहीं. सर्गच परब्रह्म आहे. द्वैत, अद्वैत, सत् हें सर्व तेंच आहे. याप्रमाणें सर्व मूर्तामूर्त प्रपंचाला ब्रह्मरूपत्व आहे असा निर्णय करून, सर्व द्वैत टाकून, चिदाकाशामध्यें उत्तरोत्तर भूमिकांचा अभ्यास करून आनंद-एकरसघन शिला होऊन रहा. हे भाग्यवाना! सुचिन्मय ब्रम्हामध्यें तूं परमपदरूप पाषाण होऊन स्ववर्णाश्रमोचित क्रमाला न सोडतां, लोकस्थितीचाही अतिक्रम न करतां आपल्या वैभवानुसार अभिमत प्रदेशीं जा, विहार कर, खा, पी व ब्राम्हण, सुहृद्वर्ग इत्यादिकांना भोजन घाल, पण या सर्व प्रसंगीं तूं निरिच्छ व निरहंकार असा रहा. १६१.

---

# सर्ग १६२ वा.

—:०:—

१ सर्व द्वैत ब्रम्हमात्र आहे व २ द्वितवचनांनीं अविद्येचा निरास याचें उपपादन.

**श्रीवसिष्ठः**—हे रामा! विषयांचें बाह्य स्वरूपावलोकन व मनांतील मनन यांसह दृश्यजात चिदाकाशाचेंच उपभोग्य आहे, म्हणजे गायींसाठीं असलेलें जें तृणादि पदार्थजात तें जसें गायीच्या आत्म्याचें भोग्य असतें, तसेंच सर्व बाह्य व आभ्यंतर दृश्य चिदुपभाग्य असल्यामुळें केवळ चिद्रूपच अवशिष्ट रहातें. स्वप्नचित् नगररूप होते, त्यामुळें त्यांत चिद्वांचून दुसरें कांहीं नसतें. त्याचप्रमाणें जगत् हें शांत चिदाकाशच आहे. त्यांत नाना असें कांहीं नाहीं. जें नानारूपानें भासणारें तें सर्व अनात्मजातच आहे. त्याला स्वतःचें स्वरूप कांहीं नाहीं. साक्षी आत्माच स्वतः तें आपल्याला दाखवितो. ज्याप्रमाणें स्वप्नपुरांतील व गंधर्वनगरांतील पदार्थ चिदृहून पृथक् नाहींत, त्याचप्रमाणें चिदाभास पृथक् नसतांनाच पृथक् असल्याप्रमाणें भासतो. सृष्टीच्यापूर्वी म्हणजे प्रलयकालीं जसें, तसेंच आतांहि हें जगत् स्वप्नाकाशांतील नगराप्रमाणें केवल आभासमात्र आहे. त्यामुळें तें आभासमात्र ह्म० असत्य आहे. तथापि खरोखर सत्यच असल्यासारखें स्थित आहे. **तज्ज्ञाचा जो विषय तो मूर्खाचा नव्हे व मूर्खाचा जो विषय तो तज्ज्ञांचा नव्हे.** यास्तव सर्गशब्दाचा अर्थ सत्यासत्यात्मक आहे. तज्ज्ञ केवल अंतर्दृष्टि असतात व अज्ञ केवल बाह्यदृष्टि असतात; आणि प्रपंचरूप तर बुद्धिवृत्तींमध्येंच स्थित असतें. त्यामुळें ते दोघेहि परस्परांचा विषय जाणण्यास किंवा तो परस्परांना सांगण्यास समर्थ नसतात. सर्व या शब्दाचा अर्थ तर आपापल्या बुद्धींत जसा स्थित

असतो तसाच स्फुरतो. त्याच्या उलट कधींच स्फुरत नाहीं, ही गोष्ट निर्विवाद आहे. अर्थात् मादक पदार्थांच्या सेवनानें मत्त न झालेला व मत्त झालेला याप्रमाणें भ्रांत व अभ्रांत या दोहोंच्याहि बुद्धीमध्यें प्रपंचरूप स्थित असतें, ही गोष्ट युक्तिप्रधान लोकांना प्रसिद्धच आहे. विद्वानांची बुद्धि सदाच स्थैर्यामध्यें जागृत असते, त्यामुळें तो स्थिर आत्मतत्त्वच पहातो. अविद्वानांची बुद्धि अस्थैर्यामध्यें जागते. त्यामुळें तो अस्थिर आत्मतत्त्वच पाहतो. पण बुद्धींतील प्रपंचस्वरूप अत्यंत आंतरहि नाहीं व बाह्यहि नाहीं. त्यामुळें दोघांनाहि त्याचें परिज्ञान नसतें. पण याप्रमाणें दोघांनाहि जर प्रपंच दिसणें अशक्य आहे, तर तो स्थित कसा झाला आहे, म्हणून विचारशील तर सांगतों. ज्याप्रमाणें नदींतील पाण्यामध्यें तरंग द्रवस्थितीला प्राप्त होतात, त्याप्रमाणें अज्ञात चित्स्वभावाचा आश्रय करून आत्मसत्तेनेंच आंतरादिस्थितीला प्राप्त झालेले आहेत. जें चिद्रूप कांहीं नाहीं, तेंच हें कांहीं होऊन राहिलें आहे. स्वप्नपुरामध्यें जसें, तसें अदृश्यहि दृश्य असल्यासारखें भासतें. अर्थात् जगत् चिच्चमत्कारमात्र आहे किंवा मायेंतील जें चित्प्रतिबिंब तेंच जीव व जगत या आकारानें स्फुरत आहे. आरशांत घटपटादि पदार्थांची छाया जशी स्फुरते, त्याप्रमाणेंच अमूर्त चित् मूर्तरूपानें भासते. पिशाचाचा भ्रम पहाणें ह्मणजे जसें दृढ आयासच सहन करणें आहे, त्याचप्रमाणें शरीरच मी असें समजणें म्हणजे साक्षात् क्लेशांचाच स्वीकार करण्यासारखें आहे. कारण ती भ्रांति असन्मात्र आहे. चंचल व तृणादिकांच्या अग्रावर लोंबणाऱ्या जलबिंदूप्रमाणें किंवा मनोराज्याप्रमाणें ती भ्रांति मिथ्या आहे. विद्वानांचा अनुभव व अविद्वानांचा अनुभव या दोन्ही अनुभवांनीं जें असत् त्याला आत्मत्व कोठचें? (तर मग 'मी राम आहे. तुम्ही वासिष्ठ आहांत' इत्यादि देहात्मशब्दव्यवहार कसे होतात, ह्मणून विचारशील तर सांगतों—) ज्याप्रमाणें पृथ्वीवर मोठा वेळू किंवा लांकूड यांचें विदारण करूं लागलें असतां आंत असलेला शब्दच बाहेर निघत आहे असें वाटतें पण वस्तुतः त्यांत शब्द नसतो व तो बाहेरहि निघत नाहीं, त्याप्रमाणें जलांत तरंगांपासून, अग्नीच्या ज्वालांपासून, आकाशांत प्रतिध्वनिरूपानें, वायुपासून कंठ, तालू इत्यादि प्रदेशीं, वर्ण-पद-वाक्यरूप स्फोट निघतात, असें वाटतें. पण पूर्वी ते त्यांत नसतात. त्याप्रमाणेंच वासनामय अर्थ अग्नीपासून निघणाऱ्या ठिणग्यांप्रमाणें जाग्रत् व स्वप्न या दोन अवस्थांमध्यें आत्म्यापासून निघतात असें भासतें. वस्तुतः शब्द नाहीं, अर्थ नाहीं व दृश्यत्वहि नाहीं. स्वप्नांतील पर्वताप्रमाणें स्वात्मचित्च सर्गादिरूपानें दिसते. हें जें कांहीं आहे व भासतें आहे, तें सर्व परमार्थसत् आहे. सद्व्यतिरिक्त रूप सृष्टीच्या आरंभींच कारणाच्या अभावीं उत्पन्न झालेलें नाहीं. यास्तव सर्ग शब्द व अर्थ यांनीं रहित, सदा एकरूप सदाकाशच मी आहें. मी शांत आहें, सदा एकरूप आहे, निर्वाणस्वरूप आहें असें जाणावें. यास्तव जीवामध्यें असलेला प्रसिद्ध मनोविक्षेप मिथ्याच उत्पन्न झाला आहे, असें समजून शुद्ध बोधैकरूप आत्मविश्रांतीनें स्वतः त्याचा त्याग करावा. आपणच आपला बंधु आहों व आपणच आपला शत्रु आहों. आत्म्याचें आत्म्यानेंच रक्षण न केल्यास त्याच्या रक्षणाचा दुसरा उपाय नाहीं. जोंवर तुझ्या ठिकाणीं हें तारुण्य आहे तोंवरच तूं विशुद्ध बुद्धिरूप नौकेनें या संसारनामक महासागरांतून तरून जा. जें तुझें श्रेयःसाधन असेल तें आजच कर. वृद्ध झाल्यावर तूं काय

करणार ? कारण एकदा तारुण्य जाऊन वृद्धावस्था आली कीं मग आपलीं गात्रेंहि आपल्याला भारी होतात. बालपण व वृद्धावस्था या दोहोंतहि तिर्यक्‌पणाच आहे असें समजावें. म्हणजे पशु-पक्ष्यादि तिर्यक् प्राण्यांना ज्ञानाचें साधन जसें करतां येत नाहीं, तसेंच बाल्यावस्था व वार्धक्य यांत ज्ञानसाधनाचा संभव नाहीं. ह्मणून तें एका प्रकारचें मरणच आहे. जीवाचें तारुण्य जर विवेकी असेल तर तेंच त्याचें खरें जीवित होय. विजेच्या चमकण्याप्रमाणें चंचळ असलेल्या या संसारास प्राप्त होऊन सच्छास्त्र व साधुसमागम यांच्या योगानें या मोहकर्दमांतून सार तेवढेंच काढून घ्यावें. अरे अरे ! हे सर्व लोक क्रूर आहेत. यांची काय गति होईल ! कर्दमामध्यें रुतलेल्याहि आत्म्याचा शास्त्रोपायांनीं उद्धार न करणाऱ्या यांचा उद्धार कसा होईल ? ज्याप्रमाणें मृन्मय वेताळांची सभा एखाद्या गांवढळाला भय, ज्वर, इत्यादि दुःख देते, पण हीं मातीचीं चित्रें आहेत असें खरें ज्ञान झाल्यावर तीच सभा जशी दुःख देत नाहीं, त्याप्रमाणें ही ब्रह्ममय दृश्य लक्ष्मी अज्ञाला दुःख देत असून तत्त्वज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं ब्रह्मच होऊन राहते; भयप्रद होत नाहीं. अशान्त असलेलें हें दृश्य त्याच्या दृष्टीनें शांत होतें. तें विद्यमान असतांनाच विलय पावतें व तत्त्वसाक्षात्कारानें पाहूं लागलें असतां दिसत नाहीं. स्वप्नकालीं स्वप्नांतील स्पष्ट अनुभवहि जागें झाल्यावर जसा असत्यच वाटतो त्याप्रमाणें अनुभवानें सत्यपदाला प्राप्त झालेली ही सर्गसंवेदना चिन्मय आकाशांत तत्त्वज्ञानामुळें मिथ्या ठरते. अनुभवाला आलेल्याहि तिच्यांतील शून्यताच अवशिष्ट राहते. जन्मज्वरभूत कामक्रोधादि दावाग्नींनीं पेटलेल्या जीवितजंगलामध्यें वातहरिणांचा तृणपर्णादि आहरणक्रम कदाचित् दिसतो व कदाचित् दिसत नाहीं. पण त्याच्या योगानें शिथिल झालेलीं व मत्त होणारें मन आणि प्राणवायु यांचा बहिःसंचार यांनीं युक्त असलेलीं हीं इंद्रियें जिंकून ज्ञानानें अविद्याजयास प्राप्त हो व त्यामुळें मुक्त होऊन पुनर्जन्माचें निवारण कर. १६२.

---

## सर्ग १६३ वा.

१ हृय चिदात्म्यांत चित्ताचा निरोध करणें हाच इंद्रियजयाचा उपाय आहे व २ या शास्त्राचा अभ्यास हें ज्ञानाचें साधन आहे.

श्रीरामः— इंद्रियांना जिंकल्यावांचून हें अज्ञत्व शांत होत नाहीं. यास्तव हे मुने ! इंद्रियें कशीं जिंकलीं जातात तें मला सांगा.

श्रीवसिष्ठः—ज्याची दृष्टिच मंद आहे अशा पुरुषाला उत्तम प्रदीपाचाहि सूक्ष्मवस्तुदर्शनार्थ कांहीं उपयोग होत नाहीं, त्याप्रमाणें जो अनेक भोगांमध्यें आसक्त आहे, आपला उत्कर्ष संपादन करण्यामध्यें निमग्न झाला आहे व जो जीवनोपायभूत धनार्जनादिकांमध्यें आसक्त झाला आहे, त्याचें शास्त्रादि साधन ब्रह्मदर्शनाच्या उपयोगीं नाहीं. त्याचप्रमाणें तें इंद्रियांचा जय व मुक्ति यांच्याहि उपयोगी नाहीं; तस्मात् इंद्रियजयाविषयीं मी सांगत असलेली ही उत्तम युक्ति ऐक. या युक्तीनें थोडीशीहि संपादन केलेली साधनसंपत् स्वप्रयत्नानें अनायासानें सिद्धीला प्राप्त होते. पुरुष चिन्मात्र असून चेतनेमुळेंच त्याला जीव हें नांव प्राप्त झालें आहे, असें तूं समज. तूं चित्तवृत्तीनें जें जें कल्पितोस तन्मयच तत्काल जीव होतो. यास्तव चित्ताला प्रत्याहारप्रयत्नानें आंत आकर्षण करून घेऊन, त्याच्या ब्राह्या-

कारतेला निरोध करून ब्रह्माकारताबोधाचा अभ्यास करावा. तो बोधाभ्यास हाच तीक्ष्ण अंकुश आहे. त्याच्या प्रहारांनीं मनोरूप मत्त हत्तीला जिंकून मग इंद्रियांना जिंकावें. मनाला जिंकल्यावांचून इंद्रियांना जिंकतां येत नाहीं. चित्त इंद्रियसैन्याचा नायक आहे. त्याला जिंकल्यानें इंद्रियांचा आपोआप विजय होतो. अहो, ज्याचा पाय उपानहानें आच्छादिला आहे त्याला सर्व भूमिच चामड्यांनीं मढविल्या-प्रमाणें भासते. चित्तावच्छिन्न संविदेला म्ह० जीवाला संविदाकाशांत म्ह० ब्रह्ममध्यें एकरूप करून हृदयामध्यें स्थिर झालेल्या पुरुषाचें मन शरत्कालच्या नीहाराप्रमाणें आपोआप शांत होतें. बा रामा! **जीवसंविदेचा मोठ्या यत्नानें ब्रह्ममध्यें निरोध केला असतां जसें चित्त शांत होतें, तसें तप, तीर्थ, विद्या, यज्ञ व कर्में यांच्या समूहांनीं शांत होत नाहीं.** जें जें कांहीं मनांत आठवतें, तें तें सर्व अधिष्ठान ब्रह्मसंविदेंत लीन करून, निश्चयानें पुनः त्याची आठवणच न होईल अशा रीतीनें जर तें विसरलें, म्ह० सर्व संस्कारांचाच उच्छेद केला, तर त्या उपायानें भोगांना कारण होणाऱ्या विषयांचा असा जय करतां येतो. आपल्या निरोधरूप संवेदनयत्नानें संविदेचा विषयापासून जर सतत निरोध केला तर त्या उपायानें तत्त्ववेत्त्यांचें अनुभवसिद्ध स्वराज्यपदच प्राप्त झालें असें समज. स्वधर्म-व्यवहारानें जें प्राप्त होतें तेंच मला आवडतें, दुसरें कांहीं आवडत नाहीं, अशा भावनेनेंहि वैराग्याच्या द्वारा इंद्रियांचा जय करून तूं परमपदीं वज्रासारखा दृढ हो! जीवनयात्रेला कारण होणारे पण स्वधर्माच्या विरुद्ध असलेले असे जे अन्नादि पदार्थ त्यांविषयीं इच्छा न करतां शम आणि संतोष यांचें संपादन करीत जो स्थित असतो, तो जितेंद्रिय होय.



ज्याचें मन अंतःसंविद्रसिकता व बाहेर नीरसता यांचा अभ्यास करीत असतांना कंटाळत नाहीं त्याचें मन शांत होतें. संवित्प्रयत्नसंरोधानें मन आपलें विषयांच्या मागोमाग धांवण्याचें दुर्व्यसन टाकतें व ज्याचें चित्त आपली चपलता सोडून विवेकाच्या मार्गे लागतें, तो विवेकवान् उदारात्मा जितेंद्रिय म्हटला जातो. भवसागरांतील वासनातरंगांच्या वेगांनीं तो मोहित होत नाहीं. साधुसमागम व सच्छास्त्राचें सतत अवलोकन यांच्या योगानें जितेंद्रिय होऊन तो जगत् यथावत् म्हणजे सत्यब्रह्ममात्र पहातो. सत्यब्रह्माच्या अवलोकनानें संसार-भ्रम शांत होतो. माळजमिनीवरील मृगजलाचें ज्ञान जसें वृथा दुःख देतें, त्याप्रमाणें जगद्भ्रम मिथ्यावस्तूच्या मार्गे धांवावयास लावून दुःख देतो. निर्विषय चिन्मात्रच हें जगत् या रूपानें स्थित आहे, असा ज्याला ब्रह्मबोध झालेला असतो, त्याला बंधमोक्षदृष्टि कोठच्या? उष्णतेनें शुष्क होऊन गेलेलें जल जसें पुनः वहात नाहीं, त्याप्रमाणें कारणावांचूनच दिसणारें व ज्ञानानें तुटून गेलेलें दृश्य पुनः दिसत नाहीं. आकाशमात्र वेदनच आपल्या अविद्येनें ज्या अर्थीं तूं मी इत्यादि रूप धारण करतें, त्या अर्थीं आत्म्यावर आरोपिलेल्या 'अहं' इत्यादि जगाचा ज्ञानानें बाध करून अधिष्ठानमात्र व्हावें. हें अहं इत्यादिक जगत् अविद्यामात्रच आहे. त्यामुळें तें स्वतःच शांत होऊन चिदाकाशरूप तात्त्विक स्वरूपांतच स्थित होतें. चिदाकाशांत ही चिच्छायाच जगद्रूपानें भासते. चित् जगच्छून्य आहे, त्यामुळें ती स्वतःशून्यच आहे हा निश्चय होय. याविषयीं आम्ही स्वप्नदर्शनाचा जो दृष्टान्त देत असतों, त्याचें निरसन कोणाला करतां येईल? तो असन्मय असूनहि अनुभवाला येतो व स्वानुभूत असूनहि असन्मय आहे. यास्तव हे रामा! आपली

स्वप्नसंवित्ति हेंच ज्याचें स्वरूप आहे अशा प्रकारचें जें जें राज्यवैभवादि होऊन महत्त्वास कारण होतें, तें तें सर्व चितीचेंच रूप आहे; कारण तें कर्तृकर्मकरणादि कारणनिरपेक्षरूप आहे. त्याचप्रमाणें जाग्रज्जगत्‌हि चिद्रूपच आहे असें जाणावें. मी कर्ता, कर्म, कारण-हीन आहें. चिद्‌घनमात्र आहें. हें जगत् पूर्वी कर्त्रादि कारणसामग्रीनें युक्त असतें असें म्हणतां येत नाहीं. त्यामुळें माझा स्वप्रकाश आत्म-रूपच आहे. जसें स्वप्नांतील मरणाचा अनुभव-जरी घेतला तरी तें खरें नव्हे, ऊषर भूमीवर जल जरी दिसलें तरी खरें नव्हे. तशीच ही अविद्या आहे अशी जरी वाटली तरी ज्ञानानें बाधित होत असल्यामुळें विद्यमान् नाहीं. चिदाकाशानें आपल्या स्वरूपांतच सृष्टीच्या आरंभीं जी कल्पना केली तेंच हें जगत् आहे. तें काकतालीयन्यायानें स्वतः निर्मूल आहे. हें कांहीं कारणावांचूनच भासत आहे. वस्तुतः प्रकाशरहित असूनहि प्रकाशयुक्त असल्या-प्रमाणें दिसतें. तें ज्या चित्प्रकाशामुळें अपरोक्ष दिसतें, तेंच नित्य अपरोक्ष परमपद आहे असें तत्त्वज्ञ जाणतात. शून्यताच आकाश आहे. जलच तरंगभ्रम आहेत. ज्याप्रमाणें अवयवी पदार्थांचें रूप एक सावयव असतें, त्याप्रमाणें जीवादि अवयवांनीं युक्त असें एक रूप ब्रह्म असून निरवयव आहे. म्ह० अवयव-अवयवी भाव कल्पून जीव व ब्रह्म यांचें ऐक्य जाणावें. किंवा स्फटिकशिलेमध्यें वन, पर्वत, नदी इत्यादिकांचा आभास जसा होतो, तसा ब्रह्मामध्यें हा जगद्भास आहे. त्यामुळें स्वच्छता हा त्याचा स्वभावच आहे. तोच जगद्रूपानें भासतो. तेव्हां अशा स्वस्वभावाविषयीं विचार काय करावयाचा आहे? त्या परमपदामध्यें आदि नाहीं, अंत नाहीं व मध्य प्रदेशा-चीही कल्पना होत नाहीं. अविद्या हें तिचेंच रूप आहे. पण तिच्यामध्यें अविद्या विद्य-मान् नाहीं. स्वप्नांतून जागृतींत व जागृतींतून स्वप्नांत प्रवेश करणारा जीव ज्ञानी असो कीं अज्ञानी असो, तो भानैकरूपानें स्थित आहे. अज्ञानावृत आत्मा हेंच सुषुप्त व शुद्धात्मा हें तुर्य, स्वप्न व जाग्रत् या दोन्हीं अवस्थेच्या शेवटीं असतात. भ्रांतीनें भासलेल्या सर्पाचा अंत जशी केवल रज्जु, त्याप्रमाणें स्वप्न व जाग्रत यांचा अंत या दोन अवस्था आहेत. याप्रमाणें जाग्रत् व स्वप्न एकत्र आहे. ज्ञानी पुरुषच तुर्येला जाणतो. ज्याला तत्त्वज्ञान झालें आहे, त्याला जाग्रत्, स्वप्न व सुषुप्त हें सर्व तुर्यच भासतें. त्याच्या ठिकाणीं अविद्या विद्य-मान् नसते. द्वयस्थ असला तरी तो अद्वयच होय. द्वैत, अद्वैत, मी, तूं, हें, अशी ही कोण-तीच कल्पना शुद्ध ब्रह्माच्या ठिकाणीं नाहीं. व त्या कल्पनेनें आकाश शून्य तरी कसें अस-णार? अज्ञ बालक द्वैत, अद्वैत इत्यादि भेदांनीं व वाक्यसंदर्भभ्रमांनीं खेळत असतात. पण ज्ञानानें प्रौढ झालेले लोक त्यांना हंसतात. तर मग शास्त्रामध्यें प्रबुद्ध झालेले लोकहि द्वैत-विवाद कसे इच्छितात, म्हणून विचारशील, तर सांगतों. द्वैताद्वैतविवादाविषयींची इच्छा ही त्यांच्या हृदयाकाशांत आरोपिलेली शिष्य-प्रबोध हें फल देणारी मंजरी आहे. तिच्यावांचून ज्ञानरूपी आकाशाचें शोधन होत नाहीं. मीहि तुझा सुहृद होऊन विवादानें द्वैत व अद्वैत यांचा विचार केला. ही द्वैताद्वैतविचारणा म्ह. हृदयगृहांतील अविद्याभस्माला झाडून टाक-णारी केरसुणी आहे. अर्थात् अविद्यारूप भस्म झाडून टाकल्यावर त्या विचारणारूप केरसुणी-चाहि त्याग करून अधिकारी ब्रम्हामध्येंच आपलें चित्त ठेवतात, ब्रम्हामध्येंच आपलें जीवित ठेवतात. ते परस्परांना बोध करतात, त्यांतच नित्य संतुष्ट होतात व रममाण होतात. या-

प्रमाणें सतत अतिशय प्रयत्नानें युक्त होऊन मोठ्या प्रेमानें ब्रह्माचेंच चिंतन करणाऱ्या पुरुषाला बुद्धियोग प्राप्त होतो व त्याच्या योगानें ते तत्पदाला पोंचतात. अहो, गवताचें रक्षण करावयाचें झालें तर तें सुद्धां मोठ्या यत्नानेंच करावें लागतें व तसें यत्नानें रक्षिलेलें तृणादिकच उपयोगीं पडतें. त्याकडेहि दुर्लक्ष करून चालत नाहीं. तेव्हां सर्व त्रैलोक्याला ब्रम्हरूप करून त्याचें नित्य रक्षण करावयाचें झाल्यास तें यत्नावांचून कसें सिद्ध होईल? तत्त्वज्ञान हेंच त्याचें रक्षण आहे व तें मोठ्या यत्नानेंच करावयास पाहिजे. अध्यात्मव्यसनानें रहित, चतुर्दश भुवनांमध्यें विस्तृत अशा हृदयस्थ अधम कामाला जिंकण्यास असमर्थ असें हें सर्व जगत् ह्म० जीवजात ज्या निरतिशय आनंदलक्षण स्थितीच्या उपहासाला पात्र झालें आहे, त्या सर्वोत्तम स्थितीविषयीं यत्न कसा करावा लागणार नाहीं? राज्यादि मनोंकुररूप सुख हें काय आहे? केवल तत्त्वज्ञानामध्येंच विश्रांति प्राप्त झाली ह्मणजे देवेंद्राचें स्थानहि तुच्छ वाटतें, अज्ञाननिद्रेमध्यें शयन करणारे व दृश्य विषयोपभोगांमध्यें आसक्त असलेले लोक दृश्याला जसे अति आसक्तीनें पहातात तसे शांत तत्त्ववेत्ते पहात नाहींत. ते दृश्यामध्यें जणुंकाय निजल्याप्रमाणेंच असतात आणि निरतिशय आनंदरूप पदामध्यें जागे असतात. अशा प्रकारचें नित्य, अपरोक्ष, निरतिशय, आनंदरूप मोक्षपद दृढ यत्नावांचून कसें सिद्ध होईल? तें कधींच सिद्ध होणें शक्य नाहीं. कारण परमपद हें फार मोठ्या अभ्यासवृक्षाचें फल आहे, असें जाण. यासाठींच मीं तुला दृढ अभ्यास व्हावा ह्मणून पुनः पुनः निरनिराळ्या युक्तींनीं कथा, आख्यानें इत्यादि विस्तारानें हेंच पुष्कळ वेळां सांगितलें. पण पुनः पुनः या सांगण्याचा काय उपयोग, अशी दुर्बुद्धि मनांत धरूं नकोस. कारण एखाद्या अति कुशल बुद्धिमानालाच अभ्यासाची अपेक्षा नसते. अज्ञ पुरुषाला इतका विस्तार करून जरी सांगितलें आहे, तरी हें आत्मतत्त्व त्याच्या हृदयांत रूढ होत नाहीं. यास्तव त्याचा आवृत्तिरूप अभ्यास आवश्यकच आहे. म्हणूनच या शास्त्राचा पुनः पुनः दीर्घकाल जर अभ्यास केला, श्रवण केलें, दुसऱ्याला व्याख्यान करून सांगितलें, तर अज्ञहि तज्ज्ञ होतो, यांत संशय नाहीं. जो एकवारच याचें अवलोकन करून, पाहिलें, असें ह्मणून सोडितो, त्या अधमाला भस्महि प्राप्त होत नाहीं. परमपुरुषार्थरूप फल देणाऱ्या या उत्तम आख्यानाचें वेदाप्रमाणें सदा अध्ययन करावें, त्याचें व्याख्यान करावें, पूजन करावें; वेदापासून जें फल प्राप्त होतें तेंच या शास्त्रापासून मिळतें. याचें ज्ञान झालें असतां क्रिया व ज्ञान हीं दोन्ही पवित्र होतात. हें शास्त्र जाणलें असतां वेदांतशास्त्रांतील तर्क व सिद्धांत यांचें ज्ञान होतें. शास्त्रदृष्टीमध्यें हें उत्तम आख्यान ह्मणून प्रसिद्ध आहे. मी हें कपटानें सांगत नाहीं, तर तुम्हांला कारुण्यानें सांगत आहें. या श्रेष्ठ शास्त्राचा विचार करूं लागलांत ह्मणजे सर्व दृश्यजात मिथ्या आहे हें तुम्हांला कळेल. यास्तव याचाच विचार करावा. या श्रेष्ठ शास्त्राचा दीर्घकाल विचार केला असतां जे बोध उत्पन्न होतात त्यांच्या योगानें इतर शास्त्रें, मिठानें भाजीला जशी रुचि येते, त्याप्रमाणें रुचकर होतात. अहो श्रोते हो! हें काव्य असल्यामुळें अपूज्य आहे, असें म्हणून त्याचा अनादर करून

१ याविषयीं 'या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी' हें भगवद्वचन प्रमाण आहे.
—गी. भा. अ. २ श्लो. ६९. पृ. २२०

दृश्य भोगांमध्यें ज्यांची बुद्धि आसक्त झाली आहे असें होऊं नका. तुम्ही पुनः पुनः मृत्युपरंपरा प्राप्त होणाऱ्या मोहगर्तेमध्यें पडूं नका. त्याचप्रमाणें पुनः पुनः जन्मभाक् होऊं नका. हलके लोक दुरभिमानानें जवळ असलेल्याहि गंगाजलाचा अनादर करून हा आमच्या पित्याचा कूप आहे असें समजून क्षारजल जसे पितात, त्याप्रमाणें तुम्ही पुनः पुनः जन्ममरणपरंपरेमध्यें मूर्खत्व प्राप्त करून घेण्यासाठीं सतत विविध विचार करणारे होऊं नका. १६३.

---

## सर्ग १६४ वा.

१. ब्रम्हभावाचा उदय झाल्यामुळे जीवजगद्भावाचें परिमार्जन करून जीव, जगत् व ब्रम्ह यांच्या समर्थनाचें वर्णन.

श्रीवासिष्ठः—हे राघवा! सर्वतः परिपूर्ण असलेलें चित्सूर्यमंडल आंतल्या आंत स्फुरण पावत असतां जगांत ते प्रसिद्ध जीवाणु या चिदात्म्याशीं तुल्य म्हणजे अग्निविस्फुलिंगाप्रमाणें समान—प्रकाशस्वभाव असतात, त्यामुळें चिदात्म्याची अनवयवरूपता सिद्ध होते. परमबोधाला प्राप्त होऊन सर्व वस्तु स्वरूपाचा त्याग करितात आणि पुनः त्याच्याशीं एकवाक्यता होत असल्यामुळें त्यांमध्यें भेदहि उत्पन्न होत नाहीं. सर्व अवस्थांमध्यें तत्त्वज्ञांचा विषय तें एक शुद्धब्रह्मच आहे, दुसरें कांहीं नाहीं. अतत्त्वज्ञाचा जो विषय तो त्याचा त्यालाच ठाऊक. आम्ही 'अहं' जाणत नाहीं व 'त्वं' जाणत नाहीं. अतत्त्वज्ञालाहि आम्ही ओळखीत नाहीं. कारण आम्ही त्या मलिन वस्तूला कोठेंच पहात नाहीं. हा तो, हा मी, हा अज्ञ, हा सत्य इत्यादि बुद्धि तत्त्वज्ञाच्या ठिकाणीं संभवत नाहीं. मरुभूमीवर मृगजल कोठचें? ज्याप्रमाणें चित्त एका द्रव्यामध्यें स्थित झालें असतां त्याला अन्य द्रव्याचें भान होत नाहीं, त्याप्रमाणें परमतत्त्वामध्यें अन्य संविदा रहात नाहींत. हें पूर्वीं नव्हतें, पुढें उत्पन्न झालें नाहीं, वर्तमानसमयीं नाहीं व पुढेंहि होणार नाहीं. सद्रूप ब्रह्मच हें असें जगत् होऊन राहिलें आहे. हा चिदाकाशाचा चकचकितपणाच स्वरूपामध्यें स्थित आहे. त्यांत त्याच्या ज्ञानानेंच जगत् असें जाणलें जातें. जीवन्मुक्त जगालाहि जड समजत नाहींत, तर चिद्रूपच समजतात. ज्याप्रमाणें स्वप्नांत व मनोराज्यानें कल्पिलेल्या नगरांत एक चिन्मात्राहून दुसरें कांहीं नसतें, त्याप्रमाणें या जाग्रत्संज्ञक जगांतहि चिन्मात्रावांचून दुसरें कांहींच उपाधिस्वरूप नाहीं. त्याचप्रमाणें उपाधीचें परिमार्जन केल्यावर जीवामध्यें कांहीं पृथग्रूपच रहात नसल्यामुळें त्याच्या ठिकाणीं चिदेकरस्य स्थितच आहे. सृष्टीच्या पूर्वीं, नंतर किंवा परिणामीं उपादान कारण कांहीं नसतें, निमित्त कारणहि कांहीं नसतें. तेव्हां जगत् होतें हें म्हणणें कसें संभवेल? अर्थात् हें कांहींच उत्पन्न होत नाहीं. जें उत्पन्न झाल्यासारखें भासतें, तें अनादि ब्रम्हच चित्स्वभावामुळें स्वतःच तसें भासतें, ही गोष्ट सिद्ध झाली. अज्ञांना विदित झालेले ब्रम्हादि व्यष्टि-समष्टि जीव व त्यांच्या उपाधि यांतील कांहीं नाहीं, तर स्वयंभूच हा प्रपंच आहे. त्या ब्रम्हापासून हें शून्यच असें पसरलें आहे. चिदाकाशच आपल्या चित्स्वभावानें तसें भासत आहे. १६४.

---

# सर्ग १६५ वा.

—:०:—

१ परस्परांमध्यें अनुप्रवेश केल्यामुळें व परस्परांपासून उत्पन्न झाल्यामुळें जागृति व स्वप्न यांचें ऐक्य, चिन्मात्रत्व दृढ करण्यासाठीं, सांगितलें जातें.

**श्रीवसिष्ठः**—हे रामा ! स्वप्न, जागृति व सुषुप्ति या अवस्था परस्परांमध्यें शिरून परस्परांपासून उत्पन्न होतात. त्यामुळें जाग्रज्जाग्रत्, जाग्रत्स्वप्न, जाग्रत्सुषुप्ति; स्वप्नस्वप्न, स्वप्नजाग्रत्, स्वप्नसुषुप्ति; सुप्तिसुषुप्ति, सुप्तिस्वप्न व सुप्तिजाग्रत् असे अवस्थांचे एकंदर नऊ भेद होतात. सावधान मनानें इंद्रियव्यापार करणें हीच जाग्रज्जाग्रत् आहे. इंद्रियव्यापाररहित व केवल मनोव्यापारमात्र असलेलें जें मनोराज्य तें जाग्रत्स्वप्न, इंद्रियें व मन यांची शांत स्थिति हीच जाग्रत्सुषुप्ति. याच न्यायानें दुसऱ्याहि अवस्था जाणाव्या. जीव स्वप्नरूप जागृतींतून जागा होऊन जाग्रद्रूप स्वप्नांत प्रवेश करतो. तो स्वप्नजाग्रत् पाहूं लागला म्हणजेच पूर्वीचें जाग्रत् स्वप्नत्वाला प्राप्त होतें. स्वप्न जाग्रतांत प्रवेश करतें व जाग्रत् स्वप्नापासून उत्पन्न होतें. स्वप्नजाग्रतापासून जागा झालेला जाग्रत्स्वप्नांत प्रवेश करतो. जाग्रत्स्वप्न पहाणारा स्वप्नालाच स्वप्न म्हणतो. स्वप्नजाग्रत्वानें जाग्रतालाच जाग्रत् ह्मणतो. त्यामुळें जागृतींत जाग्रत हें स्वप्न केव्हांच नव्हे. स्वप्नांत जाग्रत स्वप्नच आहे. तें जाग्रत केव्हांहि नव्हे. स्वप्न जागृतींत सर्वदा अल्पकालात्मक असतें. तसेंच स्वप्नकालीं जाग्रत अल्पकालात्मक असतें. याप्रमाणें स्वप्न व जाग्रत यांच्यामध्यें भेद मुळींच नाहीं. एकमेकींच्या अपेक्षेनें त्या दोन्ही जाग्रद्दशाच आहेत. याप्रमाणें त्या दोन्ही दशा अगदीं समान आहेत. त्या दोन्ही अवस्थांचा परस्परांमध्यें जरी प्रवेश होत असला तरी त्या सद्रूप नाहींत. जाग्रदवस्था दीर्घकाल असते. त्यामुळें तिला स्वप्न म्हणणें योग्य नव्हे, असें कदाचित् तूं म्हणशील. पण बाबारे ! हें जाग्रद्रूप स्वप्नहि मरणसमयींचा जो परलोकप्रबोध किंवा आत्यंतिक द्वैतबोधरूप तत्त्वबोध त्या दोन्ही बोधदशेंत शांत होतेंच. प्रतिदिवशीं स्वप्नानुभवरूप स्वाप्नार्थबोधकालीं व सुषुप्तिकालीं तें जाग्रत्स्वप्न शून्यच असतें. याप्रमाणें स्वप्न व जाग्रत या दोन्ही अवस्थांचें साधर्म्यच आहे, वैधर्म्य नाहीं. आजचे स्वप्नपदार्थ उद्यांच्या स्वप्नांत असत्च असतात. पण 'आजचे जाग्रत्पदार्थ उद्यांच्या जागृतींत अनुवृत्त होतात, हें त्या दोन अवस्थांमध्यें वैधर्म्य आहे' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. मृतिबोधाचा उदय झाल्यावांचून मरणोत्तर प्रबोधानें दिसणाऱ्या पदार्थांचा अभाव असल्यामुळें परलोकात्मक जाग्रत् कांहींच दिसत नाहीं. हा शून्य व नानापदार्थात्मक जीवितबोध स्थित असतां परलोकात्मक स्वप्न यत्किंचित्‌ही दिसत नाहीं. ह्मणजे प्रत्येक स्वप्नांत आपण जसा निरनिराळा देह धारण करतों, त्याप्रमाणें एका जन्मांतील प्रत्येक जागृतींत निरनिराळा देह धारण करीत नाहीं. त्यामुळें प्रत्येक स्वप्नांत पदार्थ जसे भिन्न भिन्न दिसतात, तसे ते प्रत्येक जागृतींत दिसत नाहींत. कारण एक देह जिवंत असेपर्यंत जागृतींत त्याला तेच ते पदार्थ दिसणें युक्तच आहे. म्हणूनच या जन्मांत परलोकात्मक स्वप्न दिसत नाहीं. एक जन्म हेंच दीर्घ स्वप्न आहे व मरणानेंच तें दीर्घ स्वप्न संपतें. ज्याप्रमाणें स्वप्नामध्यें त्रैलोक्य चिच्चमत्कारमालरूप असतें, तसेंच जन्मापासून जागृतींत सर्व जगत् चिद्रूपच भासतें. स्वप्नाप्रमाणें जागृतीचाहि हृदयांत भास होतो. याप्रमाणें स्वप्न व जाग्रत् यांचें ऐक्य सिद्ध झालें.

असतां, जागृतींत दिसणारी पृथिव्यादि भूतें स्वाप्नपदार्थांप्रमाणेंच निराकार व असत्य आहेत असें सिद्ध होतें. स्वप्नामध्यें जगत् नानाकार व भासुर जरी दिसत असलें तरी जसें शून्य, तसेंच जागृतींत हें सर्व चिद्रूप आकाशच आहे. सूर्यादि तेजापासून जसा प्रकाश पसरतो, त्याप्रमाणें चिदाकाशाचा हा स्वभाव आकाशांत जगद्रूपानें विस्तारला आहे. ही जगत् नांवाची चिच्चमत्कृतिच अशी चमकत आहे. ती आकाश, भिंत, परमाणु, जल, स्थल यांत सहज सिद्ध आहे. असत्यरूप भ्रांतिच जर ही सत्य वस्तूप्रमाणें स्थित आहे, तर आकाशमात्ररूप अशा हिच्याविषयीं आग्रह काय धरावयाचा आहे? ग्रहण करणारा, ग्रहणक्रिया व ग्राह्य पदार्थ हें सर्व शून्यच आहे, मग अधिष्ठान जगत् सत्य असो कीं असत्य असो. त्यांतील कोणत्या तरी एकाच पक्षाविषयीं आग्रह धरण्यांत काय अर्थ आहे? तें सत् आहे किंवा असत्च आहे, असा एकपक्षीं अभिमान धरण्याचें कारण अभिमान हें आहे. वास्तवं हें असें दिसणारें जगत् असेंच असो कीं याच्या अगदीं विपरीत असो, तें झालेलें असो किंवा झालेलें नसो, त्याविषयीं वृथा अभिमान धरण्यांत काय अर्थ आहे? उपभोगरूप अतिशय क्षुद्र फल देणाऱ्या या जगांतील फलांविषयीं आग्रह धरणें अगदीं अनुचित आहे. हें तुम्हीं सर्वांनीं आंता तत्त्वतः जाणलेंच आहे. १६५.

---

## सर्ग १६६ वा.

१. आत्मख्यातिरूप विशेष, २ तसाच दुसऱ्या ख्याति, व ३ प्रश्नोत्तररूप ब्रह्मनीलशिलाख्यान.

श्रीवसिष्ठः—शिलेच्या उदराप्रमाणें घनस्वरूप व वाद्यांनीं कल्पिलेल्या अख्याति, अन्यथाख्याति, असत्ख्याति इत्यादि सर्व ख्यातींनीं रहित अशा या आत्मख्यातीला तूं यथार्थ शब्दानें जाण. सर्गाच्या आरंभापासूनच हें असें चिदाकाश पसरलें आहे. ज्या अर्थी आत्म्यानें आत्म्यामध्येंच ती सर्गता स्वचैतन्यबलानेंच जाणली आहे, त्या अर्थीं हा आत्माच सर्गताविषयक ख्याति आहे. यांत नद्या वहात नाहींत व कोणाचें उन्मज्जननिमज्जन होत नाहीं. तर हें शून्यच शून्यामध्यें दिसत आहे. निष्क्रिय चिद्रूपच असें प्रकट झालें आहे. स्फुरणवाचक ख्यातिशब्दानें रहित, पूर्णपणें कल्पनाशून्य व ख्याति या शब्दानें व त्याच्या अर्थानें विरहित असा स्वप्रकाश आत्माच आपल्या आश्रयानें भासणाऱ्या सर्गाला प्रख्यापित करणें या धर्मामुळें आत्मख्याति आहे. विद्वान त्यालाच आत्मख्याति ह्मणतात. ह्मणजे आमच्या मतीं आत्मा हीच ख्याति आहे, आत्माच सर्व जगत् आहे व तो स्वप्रकाशरूप आहे. त्यामुळें तो वाद्यांना अभिमत असलेल्या स्वातिरिक्त ख्यातीनें प्रख्यापित होतो हें ह्मणणेंच अयोग्य आहे. ख्याति व अख्याति ही शब्दरचना मिथ्या आहे. कारण स्वयंप्रकाश आत्म्यामध्यें दृश्याप्रमाणें कल्पनामात्ररूप अशा अख्याति, अन्यथा ख्याति, असत्ख्याति व इतरख्याति हे सर्व चिच्चमत्कार आहेत, असें जर ह्मणत असशील, तर त्यांत आमची कांहीं हरकत नाहीं. चिन्मात्र आकाशसूर्यापासून जे जे, जसे जसे व जेव्हां जेव्हां अग्निविस्फुलिंगाप्रमाणें कल्पित चिद्भाग स्फुरतात, ते ते तसे तसे व तेव्हां तेव्हां स्वच्छ चिद्रूपच असतात. त्यामुळें तुला अभिमत असलेल्या आत्मख्याति, असत्ख्याति, अन्यथाख्याति, अख्याति इत्यादि सर्व चिच्चमत्काररूप ख्याति आत्मख्यातीच्या विभूति आहेत. आत्मख्याति या पदाचा अर्थ आत्मख्याति या पदानें विद-

हित असा आदि-अंत-शून्य अनिर्देश्य व एकघन आत्माच आहे.' याविषयीं हें एक फार मोठें आख्यान तूं ऐक. तें श्रवणेंद्रियाचें भूषण, द्वैतदृष्टीचें दूषण व बोधसूर्याचें प्रकाशन आहे. एक अतिशय विमल व विपुल शिळा आहे. तिचें प्रमाण हजारों कोटि योजनें आहे. हें सर्व बाजूंनीं नीलवर्ण दिसणारें आकाश जर भिंतीप्रमाणें कठिण असतें, तर त्यालाच ही शिळा म्हणतां आलें असतें. त्या शिळेमध्यें संधिबंध मुळींच नाहीं. ती अतिशय निबिड, वज्रासारखी दृढ, व्यापक, अत्यंत पुष्ट, कठीण, आकाशाप्रमाणें निर्मल, असंख्य कल्प गेले तरी विनाश न :पावणारी, घनस्वरूप, रमणीय अंगानें युक्त व निर्मल असल्यामुळें ती आकाशरूपच दिसत होती. तिची विशिष्ट जाति कोणालाच कळत नव्हती. ती कशी, कोठें व केव्हां झाली हें कोणाला ठाऊक नव्हतें. महाभूतें व जरायुजादि चार प्रकारचे भूतसमूह यांनीं रहित असलेल्या तिच्या जठरांत लेखारूप स्फटिकशिळेंतील रेघांप्रमाणें स्वांगभूत असंख्य पद्मजालें, शंख, गदा, चक्र इत्यादि होतीं. ती शिला निबिड, अनंत, कठिण वज्रासारखी दृढ व अविनाशी होती. त्या शिळेच्या उदरांत आकाश, वायु, तेज, जल, पृथ्वी इत्यादि जगत् नव्हतेंच, तथापि तिनें त्या त्या भूतांप्रमाणें भासणाऱ्या आपल्या रेखांना आकाश, वायु इत्यादि नांवें दिलीं होतीं आणि तिनें स्वतःला जीव• असें आपल्या देहरेखांमध्येंच नांव दिलें.'

**श्रीरामः**—ही शिळा अचेतनच असली पाहिजे, हें प्रसिद्ध आहे. तेव्हां ती चेतनाप्रमाणें आपलें नांव जीव असें कसें ठेवते ? त्याचप्रमाणें ती जर अचेतनच आहे, तर आपल्या अंगांतील रेघांना आकाश, वायु इत्यादि नांवें कशीं देते?.

**श्रीवसिष्ठः**—ती शिळा चेतनहि नाहीं व जडहि नाहीं. तर ती विपुल व उज्ज्वल आहे. तिची जातिच जर कोणी जाणत नाहीं, तर तिच्यामध्यें दुसरा कोणता धर्म असणार? व त्याला दुसरा कोण जाणणार?

**श्रीरामः**—तिच्यामध्यें तिला जाणणारा जर कोणी नाहीं तर तुम्हीं सांगितलेल्या तिच्या जठरस्थ वायु, आकाश इत्यादिरूप रेघा कोण पहातो? त्या रेखा तिच्या जठरामध्यें कशा स्थित आहेत? तिच्या उदरांत त्या रेघा कोणीं कोरल्या? व केव्हां कोरल्या? तें मला सांग.

**श्रीवसिष्ठः**—ती अति दृढ शिळा कोणालाहि तोडतां येत नाहीं व तिचा भेद करतां येत नाहीं. जिचा देह सभोंवार दूरवर पसरला आहे अशा तिनें सर्व व्यापलें आहे. तिच्यामध्यें रेखामय अनंत वृक्ष, पर्वतसमूह, नगरें व पुरें आहेत. तिच्यामध्यें लेखामयच देव, दानव, मानव इत्यादि सूक्ष्माहून सूक्ष्म, निराकार, पण साकार असल्याप्रमाणें दिसणाऱ्या पुत्रिका आहेत. त्यांत आकाश या नांवाची विद्युल्लतेप्रमाणे शोभणारी एक रेघ आहे. चंद्र व सूर्य या नांवाच्या त्या आकाशलेखेमध्यें दुसऱ्या दोन उपलेखा आहेत.

**श्रीरामः**—हे ब्रह्मन्! त्या लेखा तेथें कोणीं पाहिल्या व त्या कशा प्रकारच्या आहेत? अति घन अशा त्या शिळेच्या कोशामध्यें त्या कशा दिसतात?

**श्रीवसिष्ठः**—हे राघवा! मीं त्या तशा प्रकारच्या लेखा त्यांत पाहिल्या आहेत. 'तुझी इच्छा असेल तर तुलाहि त्या त्यांत पहातां येतील.

**श्रीरामः**—ती तशा प्रकारची वज्राप्रमाणें दृढ असलेली शिळा कोणालाहि तोडतां येत

नाहीं. तथापि तिच्या कोशामध्यें तुम्ही त्या लेखा कशा पाहिल्यात ?

**श्रीवसिष्ठः**—रामा ! त्या शिलेच्या जठरामध्यें बसून मीं त्या लेखा पाहिल्या. तिच्या उदरांतच मी स्थित असल्यामुळें तें अक्षत लेखाजाल मी पाहूं शकलों. नाहींतर त्या शिलेला मध्यें तोडण्यास कोण समर्थ होणार ? माझा देहहि तिच्या उदरांतील एक रेखाच आहे. त्यामुळें तिच्या अगदीं हृदयप्रदेशीं बसणाऱ्या मीं तें सर्व पाहिलें.

**श्रीरामः**—भगवन् ! ती शिला कोणती ? तुम्ही कोण व कोठें स्थित आहां, तें मला सांगा. आपण हें काय सांगत आहां व आपण काय पाहिलें ?

**श्रीवसिष्ठः**—रामा, मीं तुला या अशा शिलाख्याननिमित्तानें ही परमात्ममहासत्ता सांगितली. ती खरोखरच कांहीं शिला नव्हे. परमात्ममहासत्ताशिलेच्या अवकाशरहित उदरांत आह्मी हे सर्व, शरीरांतील मांसाप्रमाणें स्वरूपभूत स्थित आहोंत. त्या शिलेचें अंग आकाश आहे, असें तूं जाण. सदा गतिमान् वायुहि त्या शिलेचें अंगच आहे, असें तूं समज. त्याचप्रमाणें पंच भूतें व सर्व भूतभौतिक धर्म म्हणजे क्रिया, वासना, काल, कल्पना, इत्यादि सर्व त्या शिलेचीं अंगें आहेत. भूमि, जल, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि, अहंकार हें सर्व त्या शिलेचें अंगच म्हटलें आहे. परमात्ममहासत्ता हीच ती शिला व तिच्या अंगांतील मांस हेच आह्मी. त्यामुळें आह्मी सर्व अनन्य असून भ्रांतीनें तिच्याहून भिन्न आहों असें जाणतों. चिन्मात्र एकरूप अशी जी ही फार मोठी शिला आहे, हिच्याहून भिन्न असें कोठें काय आहे, सांग बरें ? शुद्ध वेदनच स्वप्नांतील पदार्थाप्रमाणें हें सर्व घटपटादिक वस्तुजात भासत आहे. जलच ऊर्मिरूपानें जसें भासतें, तसें वेदनच पदार्थरूपानें भासतें. हें ब्रम्ह सर्वघन आहे व चिन्मात्रघन पसरलेलें आहे. तें परमार्थघन शांत सर्व एकघन आहे, असें तत्त्ववेत्ते ह्मणतात. सर्व जगत् एक ब्रह्मशिलोदरच आहे. तें अवकाशरहित, अपार, अनंत, आदि-अंत-मध्य-शून्य आहे. त्या तशा प्रकारच्या ब्रम्हात्म्यानें स्वतःच सृष्टि, जगत्, भुवन, इत्यादि पर्याय-नांवांनीं प्रसिद्ध असलेली दृश्य या नांवाची कल्पना स्वीकारली आहे. १६६.

---

## सर्ग १६७ वा.

—:०:—

१ येथें तत्वज्ञाच्या दृष्टीनें वाद्यांनीं कल्पिलेल्या चार ख्यातींचें निरसन करून अवस्थात्रयरहित आत्मतत्वाचें निरूपण केलें जातें.

**श्रीवसिष्ठः**—आत्मख्याति, असत्ख्याति, अनन्यख्याति व अख्याति या शब्दार्थदृष्टि तज्ज्ञाला शशशृंगाप्रमाणें भासतात. रामा ! यांतील एकहि ख्याति त्या तत्त्वामध्यें कधींच संभवत नाहीं. ज्ञानी अनिर्वचनीय आत्मस्वरूप झालेला असतो. त्यामुळें ख्यात्यादि कल्पनांना कारण होणाऱ्या चित्तचेष्टांनीं रहित होऊन तो शांत असतो. या आत्मख्यात्यादिक ' चिन्मात्रापासून उत्पन्न होतात. तें शुद्धतर आकाश आहे व सर्व कल्पनाशून्य आहे. सर्व कल्पना मला तन्मयच दिसते. हा आत्मा व ही ख्याति हा मनांतील कल्पनाभ्रम संभवत नाहीं. यास्तव या शब्दांचा त्याग करून त्यांच्या अर्थाकडे लक्ष ठेव. आम्ही शब्द सोडून नेहमीं अर्थच पहात असतों. म्हणूनच आमचीं

ख्याति अर्थासह शब्दरहित आहे, असें वर म्हटलें आहे. सर्व जगत् जरी जात असलें, किंवा उभें असलें तरी शांत आहे. सर्व प्रवृत्तिशून्य आहे. तें स्वच्छ आकाशमौनच आहे. अनेक प्रकारच्या महाशब्दानें जरी तें युक्त असलें तरी तें शिलामौन होऊन राहिलें आहे. एकसारखें प्रवृत्त होत असलें तरी आकाशाप्रमाणें व पर्वताप्रमाणें स्थित आहे. अनेक प्रकारच्या आरंभांनीं युक्त असूनहि सर्व चिन्हरहित महाशून्य आहे. पंचभूतात्मक असूनहि आकाशाप्रमाणें भूतपंचकरहित आहे. सर्व पदार्थांनीं भरलेलें असलें तरी शून्य संवेदनमात्र आहे. स्वप्नांतील महापुराप्रमाणें तें जरी दिसलें तरी शुद्ध चिन्मय आहे. संकल्पनगर अनेक प्रवृत्तीनें युक्त असल्यासारखें दिसतें. तथापि तें जसें आरंभशून्य दिसतें, तसें हें जगत् आकाशमात्र, भ्रांतिरूप स्वप्नसमागमासारखें आहे. त्याचा अनुभव जरी येत असला तरी व्यर्थ आहे. एखाद्या स्त्रीच्या प्रतिबिंबासारखें तें आहे. नानाप्रकारच्या अनुभवांनीं युक्त असलें तरी तें वस्तुतः परमार्थशून्यच आहे.

**श्रीराम:**—भगवन्! हें जाग्रत्स्वप्नात्मक जगत् अविद्यमान असतांनाच केवल वासनेमुळेंच जर दिसत असेल तर तें स्मृतिज्ञानानेंच दिसतें. असें मी समजतों. ह्मणजे या जगत्प्रतिभानाला स्मृति हेंच कारण आहे, भ्रांति नव्हे. कारण त्यांत भ्रांतीची सामग्री[1] नसून बाहेरचे पदार्थ विद्यमान नसतात.

**श्रीवसिष्ठः**—अविद्या, निद्रा इत्यादि दोषांमुळें जगाचा भास होतो. स्वप्रकाश चैतन्यामध्यें इंद्रियादिकांच्या संप्रयोगाचा कांहीं उपयोग नाहीं. यास्तव त्याच्या अनिष्ठानावर झालेली ही भ्रांतिच आहे, स्मृति नव्हे. अर्थात् तो आकाशात्मा काकतालीयन्यायानें जें आपलें सत् स्वरूप प्रकट करतो, तेंच हें जगत् आहे. तें अविनाशरूप आहे. परमात्म्यामध्यें सर्व आहे. शांत जलामध्यें तरंग जसे असतात, तसेंच हें निमित्तावांचून आहे. तें परमात्म्यामध्यें परमात्मरूपच भासतें. सर्वात्मरूप शांत आकाशात्मा व निरात्मा अशा परमार्थामध्यें आंतल्या आंत हें जेव्हां जेव्हां व जसें जसें भासतें, तसें तसें तें दिसतें. किंवा तें सर्वदाच कांहीं नाहीं. त्या ब्रम्हरूप ब्रम्हभानाचेंच हें स्फुरण आहे. आपला स्वभाव न सोडतांच तें तद्रूप होतें. त्याचा स्वभाव अतिशय स्वच्छच आहे. हें जाग्रत्, हें स्वप्न, ही सुषप्ति, हें तुर्य हीं त्या स्वच्छ स्वभावाचींच नांवें आहेत. ब्रम्ह चिद्रूप असल्यामुळें तें आपणच आपल्या स्वरूपांत ब्रम्ह व आत्मा या नांवांची कल्पना करतें, पण वस्तुतः स्वप्न नाहीं, जाग्रत् नाहीं, सुषुप्तता नाहीं व तुर्याहि नाहीं. त्याहून विलक्षण असेंहि कांहीं नाहीं, तर सर्व शांत परमाकाश आहे, अथवा हें सर्व सर्वदाच जाग्रत्‌रूप आहे. कारण त्याला सुषुप्ति केव्हांच नाहीं. भ्रांतिमात्र असल्यामुळें तें सर्वदा स्वप्नमय आहे, सर्वदाच सुषुप्त आहे. कारण तें अविद्या-आवरणमात्र आहे, किंवा सर्वदाच तुरीय आहे. कारण तें स्वतःच तिन्ही अवस्थांचें अतिक्रमण करून राहतें. पण तीन अवस्थाच मिथ्या असल्यामुळें तुर्याहि वस्तुतः विद्यमान नाहीं. त्याचप्रमाणें निर्विकल्प अवस्थेंत 'तें हें' अशा प्रकारेंहि आम्ही त्याला जाणत नाहीं. आम्ही अत्यंत शांतस्वरूपी आहों. चिदाकाशांतील शून्यतारूप जलानें भरलेल्या महासागराच्या मध्यभागीं जगत् हा फेंस आहे. किंवा तो फेंसहि नव्हे, तर तरंग आहे. किंवा तो तरंगहि नव्हे, तर जें जसें जाणलें

---

१ अधिष्ठान, इंद्रियगत दोष, सादृश्य, संप्रयोग ही भ्रांतीची सामग्री आहे.

जातें, तसाच त्याचा अनुभव घेतला जातो. स्वप्नामध्यें सत् किंवा असत् जें जसें भासतें, तें तसेंच या चिदाकाशांत केवल कल्पनादृष्टीनें सत् किंवा असत् भासतें. आपल्या कल्पनेप्रमाणें हें संवित्स्फुरणच असें भासत आहे. आकाशांतील हें चिद्रूप आकाश व्यापक चिद्रूपामध्यें स्थित आहे. ज्या अर्थी संविद्च जगत् आहे, त्याअर्थी ती चिदाकाशाची मज्जा आहे. ती सर्वदा अशा स्वरूपाचीच आहे. ती कधीं अस्त पावत नाहीं व उदय पावत नाहीं. हें जगत् तिचें अंग आहे. महाप्रलय, सर्ग इत्यादि केशनखादिकांप्रमाणें तिच्या अवयवत्वास प्राप्त झाले आहेत. त्या चिद्रूपाचें भान हें भास्वर चिद्रूप किंवा अभान हें मायारूप तिच्याहून भिन्न नाहीं. वायूच्या स्पंदाप्रमाणें महाचितीचा तो स्वभाव आहे. तेव्हां जाग्रत् कोठचें, स्वप्न कोठचें, सुषुप्ति कोठची व तुर्य कोठचें ? स्मृति कोठची व इच्छा तरी कशाची ? या सर्व तुच्छ कुदृष्टि आहेत. ज्याअर्थी अंतःसंवेदनच बाह्यविषयरूपानें भासतें त्याअर्थी द्वैत कोठचें व विजयश्री कोठची ? आणि असा प्रकार असल्यामुळें स्मृति तरी कोठची ? हें जें निराधार चित्र भासत आहे, तें आत्मभान आहे. त्या रूपानेंच आकाशांत भानूचें प्रकाशरूप प्रकट होतें. तें भारूप भूतरहित, आश्रयरहित व विषयरहित आहे. बाह्य विषय जर सद्रूप असता, तर त्याच्यापासून उत्पन्न झालेली स्मृति आद्य जगत्थितीचें कारण झाली असती. पण हा भूतांचा बाह्य अर्थच नाहीं. कारण त्याचा अत्यंत असंभव आहे. सृष्टीच्या पूर्व कालीं पांचहि कारणांचा अभाव असल्यामुळें प्रपंचाचा असंभव आहे. सशाचें शृंग जसें नाहीं, आकाशांतील वृक्ष जसा नाहीं, वंध्येचा पुत्र जसा नाहीं, तसा ज्ञानी पुरुषाला भासलेला पदार्थ नाहीं. सृष्टीच्या आदिकालीं अज्ञांना भासलेला अहमादि अर्थ तत्त्वतः विचार करीपर्यंतच विद्यमान असतो; पण तत्त्वतः विचार केला म्हणजे तो बाधित होतो. हा सर्व महा-आकार-प्रपंच जरी दिसत आहे तरी तो तत्त्वज्ञाच्या दृष्टीनें मूर्तामूर्तरूपरहित, चिन्मात्रैकघन व अखंडित आहेच. संविद्घन आकाशाची मज्जा जेव्हां जेव्हां जशी जशी उदय पावते, तशी तशी ती नित्य उदितरूपच असते. तथापि व्यवहारामध्यें उपचारानें तिचे उदय व अस्त कल्पिले आहेत. ती आपल्या शून्य स्वरूपांत पृथिव्यादि रूपानें जेव्हां जेव्हां वृथा कल्पना करते, तेव्हां त्या आपल्या भानामध्येंच पृथिव्यादि कल्पना करते. महाचिति हें स्वाभाविक भानच आहे. तें आकाशमात्रच आहे. तथापि ती अजा महाचिति मागून त्या आपल्या भानाचाच पृथिव्यादि नांवांनीं व्यपदेश करते. आकाशच ही पृथ्वी आहे अशी स्वसंविद् धारण करतें. बालक मनोराज्यांतील नगराची जशी कल्पना करतो, त्याप्रमाणें अव्यय चिन्मात्र प्रपंचकल्पना करतें. त्याचें भान काय व अभान काय असा विकल्पच केला जात नाहीं. आकाशांतील वायुप्रमाणें तें स्पंदास्पंदस्वभाव आहे, असें जाण. चिदाकाश स्वप्नांत जसें भासतें, तसेंच तें आतां भासत आहे. तें आकाशांतील आकाशच आहे. तें नीरूप आहे. हें पृथिव्यादिक केव्हांहि सत् नाहीं. हें सर्व चिदाकाशरूप असल्यामुळें जरी भासलें तरी सत् नाहीं, असत् नाहीं, किंचित् नाहीं व अकिंचित्हि नाहीं. तें परोक्ष नाहीं, प्रत्यक्ष नाहीं. सत् नाहीं व असत्हि नाहीं. तर जसें आहे तसेंच आहे. तें अनिर्वचनीय आहे. प्राज्ञच या लोकपर्यायवृत्तान्ताला जाणतो; दुसरा कोणी जाणत नाहीं. ज्या अर्थी तो प्राज्ञच सर्वांच्या हृदयाकाशांत आत्मत्वानें असतो, त्याअर्थी

अशाच दृश्य संविदेनें हें आंतर शरीर, हें बाह्य ब्रम्हांड, हें सत्,: हें असत् इत्यादि भेदकल्पनेनें हें सर्व म्हटलें जातें. कारण यांत बाह्य काय व आंतर काय? सर्व शिव, शांत, अशांत ॐ आहे असें जाणून मांडुक्योपनिषदांत सांगितल्याप्रमाणें प्रणवरूप अभेदकल्पनेनें त्याचा प्रविलाप करून शांत व्हावें. विचार प्राप्त होईपर्यंत असत् असलेलाहि वाच्य व वाचक-विकल्प लौकिक व्यवहाराचा अतिक्रम न करतां स्वीकारावा. वाच्यवाचक दृष्टिवांचून शास्त्रार्थविचार सिद्ध होत नाहीं. तो विषय, संशय, पूर्वपक्ष, उत्तरपक्ष व फल या पांच अंगांनीं युक्त अशा विकल्पानें केल्यासच सिद्ध होतो. अर्थात विचारावांचून सिद्धि होत नाहीं. रात्रीं दीपावांचून घरांतील कोणताहि पदार्थ नेत्रांना दिसत नाहीं. म्हणून सम्यक् विचाररूप शुद्ध बुद्धीनें अंत:संकल्परूप सर्व विकल्प सोडून मनाला सर्व शास्त्रांचा महान् अर्थ असा जो सच्चिदानंद अद्वयात्मा तदेकनिष्ठ करून या संसारांतून उड्डाण कर व मोक्षाख्य उत्तम पदाला प्राप्त हो. १६७.

---

## सर्ग १६८ वा.

१ अबुद्धिपूर्वक सर्गाचा आरोप चिन्मात्ररूप आहे असें वर्णन. व २ चित् निर्विकार असल्यामुळें त्याचा अपवाद.

श्रीवसिष्ठः—ज्याप्रमाणें वृक्ष अबुद्धिपूर्वकच ह्मणजे मी शाखावैचित्र्य करतों अशा संकल्पावांचूनच तें करतो, त्याप्रमाणें जन्मादि विक्रियाशून्य परमात्मा आकाशासारख्या स्वात्म्यामध्यें शून्यात्मक विचित्र प्रपंचाध्यास करतो. ज्याप्रमाणें सागर अबुद्धिपूर्वकच आवर्तादि करितो, त्याप्रमाणें आकाशरूप सर्वेश्वर आकाशांत जगत्प्रतिभास उत्पन्न करतो. तो त्या जगदाकार स्वसंविदेच्याच मन, बुद्धि, अहंकार इत्यादि विविध संज्ञा सृष्टीच्या आरंभीं यथाश्रुति करतो. चितीचा बुद्ध्यादि सिद्धीपर्यंत अबुद्धिपूर्वकच आरंभ होतो. पण बुद्धीची सिद्धि झाल्यानंतर संकल्पानें केला जाणारा जो दृश्यरूप आरंभ तो बुद्धिपूर्वक होतो. या दोन्हींविषयीं समुद्रापासून होणाऱ्या तरंगांचा दृष्टांत योग्य आहे. ज्याप्रमाणें समुद्रापासून प्रथम अगदीं सूक्ष्म आवर्त, नंतर त्यापासून तरंग, नंतर त्यापासून मोठ्या लाटा होतात, त्याप्रमाणेंच चिन्मात्रापासून मनोबुद्ध्यादिक प्रवृत्त होतात. चित्रामध्यें काढलेलें जगत् जसें भित्तिमात्र म्हणजे आपलें आधाररूप असतें त्याप्रमाणें चितीमध्यें भासणारें हें जगत् चिदाकाशमात्र आत्माच आहे. पूर्वोक्त दृष्टांतांतील अबुद्धिपूर्वक प्रवृत्त झालेलाहि आरंभ नियतीनें समान रचनेनें युक्त असतो. त्याप्रमाणें चितींतील सर्गाकार आरंभहि एकसारख्याच रचनेनें युक्त असतो. ज्याप्रमाणें वृक्षाचे ठिकाणीं पल्लव, गुच्छ इत्यादि नांवें दुसरा कोणी करतो, त्याप्रमाणें चिद्वृक्षाच्या पुष्पाप्रमाणें असलेल्या पृथिव्यादिकांचीं नांवें हिरण्यगर्भ ठेवतो. महातरूहून पत्र-पुष्पादिक जसे भिन्न नाहींत तसेंच चिदाकाश परमात्म्याहून अनन्यच ह्मणजे हें सर्व अभिन्नच आहे. वृक्षाच्या अवयवांना व्यष्टि जीव जशीं निरनिराळीं नांवें देतो त्याप्रमाणें चिदाकाशस्वरूपांत व्यष्टि जीव होऊन स्वपुत्रादिकांच्या ठिकाणीं व कार्यांतरामध्यें अनेक नांवांची तो कल्पना करतो. सर्ग हे चित्तरूचे पल्लव आहेत. पण चित्त्वामुळेंच ते वस्तुभूत नाहींत. तो चित्त स्वतः स्वप्नाप्रमाणें कार्यकारणभावानें युक्त असल्याप्रमाणें भासतो. जर सर्गादि नाहींत तर चित्कडून परलोकीं त्याचा व्यर्थ कसा अनुभव घेतला जातो, अशी

शंका येते. पण ती योग्य नव्हे. कारण विहित-निषिद्ध कर्मफलत्त्वाचा असंभव होण्याचा प्रसंग येतो. यास्तव हें असें कसें म्हणतां येईल म्हणून विचारशील तर स्वप्नादिकांमध्यें व प्रसिद्ध रज्जुसर्प, मृगजल इत्यादिकांच्या अनुभवामध्यें तरी व्यर्थत्वाचा अपन्हव कोण करील? ह्मणजे तींहि व्यर्थ नव्हेत असे कोण म्हणेल? कारण तीं सुद्धां कर्मांचीं फळेंच आहेत. तेव्हां केवल कर्मफलाचा भास होतो, एवढ्याचवरून स्वप्नादिकांप्रमाणेंच परलोकालाहि सत्य मानतां येत नाहीं. साकार तरूच्या ठिकाणींहि साकार कल्पना केली आहे, व केवलरूप निराकार चितीच्या ठिकाणींहि साकार जगाची कल्पना झाली आहे. पण या दोन कल्पनांमध्यें असा फरक जरी असला तरी ते दोन्ही अध्यारोप आहेत, यांत कांहीं संशय नाहीं. जसे पुष्पांत गंधादिक, वायूंत स्पंदादिक, व आकाशांत शून्यादिक, तसे परब्रह्मामध्यें बुद्ध्यादिक पदार्थ आहेत. जसें पुष्पांत गंधादिक व आकाशांत जसें शून्यादिक, व जसें वायूमध्यें स्पंदादिक तशा या चितीमध्यें पृथिव्यादि सृष्टि आहेत. ज्याप्रमाणें आकाश, वायु व पुष्पें यांच्या ठिकाणच्या शून्यता, स्पंद व गंधदृष्टि जरी अनुभवाला आल्या तरी त्या त्याहून भिन्नत्वानें शून्य आहेत. त्याप्रमाणें चैतन्यामध्यें सर्गस्थितिहि शून्य आहे. आकाशाहून शून्यता पृथक् नाहीं. जलाहून द्रवत्व पृथक् नाहीं. पुष्पाहून वास पृथक् नाहीं. वायुहून स्पंदन पृथक् नाहीं. अग्नीहून उष्णत्व पृथक् नाहीं, हिमाहून शैत्य पृथक् नाहीं, त्याप्रमाणें स्वच्छ चिदाकाशैकरूप ईश्वराहून जगत् पृथक् नाहीं. सृष्टीच्या आरंभीं जें आकाशांत व स्वप्नांत हृदयामध्यें जें कारणावांचूनच दिसतें तें चिदाकाशाहून पृथक् कसें असेल? याविषयीं स्वप्न हाच दृष्टांत विचार करणाऱ्या लोकांना नित्य अनुभूत आहे. चिन्मात्रावांचून त्यांत सार काय आहे, तें सांगा पाहूं! स्वप्न स्मृतिच आहे, कारण हें सर्व बुद्धिसंस्कारानें दृश्य आहे, ह्मणून म्हणावें तर तेंहि संभवत नाहीं. कारण संस्कारापासून उत्पन्न झालेल्या इतर स्मृतींमध्यें विषय परोक्ष असतात व येथें निद्रादोषामुळें प्रत्यक्ष भासतात. त्यामुळें स्वप्नाला स्मृति म्हणतां येत नाहीं. स्वप्नाचें ज्या वेळीं स्मरण होतें, त्या वेळीं निद्रा अरण्यांत पाहिलेल्या व्याघ्रादिकाला स्वप्नप्रदेशीं समीप आणून ठेवते. त्यामुळें त्यांत 'हा वाघ' अशी प्रतीति येते, असें म्हणावें तर अरण्यांतील जो "वाघ याला येथें दिसतो तो त्याच वेळीं अरण्यांत दुसऱ्या लोकांना कां दिसत नाहीं? बरें, निद्रा एकाच वाघाला दोन ठिकाणीं स्थापिते म्हणून म्हणावें तर एकाच वस्तूची दोन ठिकाणीं स्थिति कशी संभवेल? यास्तव आवर्तभ्रमानें काकतालीय न्यायानें हें जगत् भासतें व जाग्रत् आणि स्वप्न यांच्या अनुभवाची सिद्धि झाल्यानंतर ही स्वप्नादि कल्पना होते. अर्थात सृष्टीला स्वप्नबोधाचा दृष्टांत बरोबर लागू पडतो. अगोदर सर्ग अबुद्धिपूर्वक संपन्न झाला असतां मागून त्यांतील तरंगादिकांची जशी सिद्धि होते, त्याप्रमाणें अगोदर सर्गसंनिवेशाची सिद्धि व नंतर त्यांतील स्मृत्यादिकांची कल्पना आपोआप सिद्ध होते. जें कारणावांचून झालेलें तें जरी झालें असलें तरी खरोखरच झालें नाहींच. कारण आरंभीं न झालेलेंच तें झाल्यासारखें दिसत असतें; रत्नादिकांच्या ज्योति अबुद्धिपूर्वकच उत्पन्न झालेल्या असतात त्याप्रमाणें ब्रम्हसत्ताच या जगद्दृष्टींच्या वेशानें स्फुरते. समुद्रांतील तरंगाप्रमाणें हें जगत् प्रथम अनिर्वचनीय मायाख्य कारणबलानेंच उत्पन्न होतें. नंतर अर्थक्रियारूप सत्त्व धारण करतें. चिदाकाशांत जशीं स्वप्नें त्याचप्रमाणें जगेंहि

शून्याशून्यात्मक असून सुद्धां कांहीं कारणावांचून प्रवृत्त होतात व निवृत्त होतात. सर्व पदार्थजात एकमेकांच्या कारणत्वास चिरकाल प्राप्त होतें. पण त्यांचे ईश्वरादिक पदार्थ मायासापेक्षरूप असल्यामुळें शून्यरूपच आहेत. शून्यच उत्पन्न होतें व हें शून्यच वृद्धि पावतें. अत्यंत शून्यत्वामुळें हें अविद्यमान असलेलेंच नाश पावतें. शून्य अशून्यासारखें स्फुरतें. याविषयीं स्वप्न हा अनुभवसिद्ध दृष्टान्त आहे. पण त्याचाहि जो अपलाप करतो तो मूढ, धनगर होऊन महामेषाला लांडग्यानें उचलून नेलेले प्रत्यक्ष स्वतः पाहिलेलें असूनहि नाहीं म्हणेल ! हें सर्व असत्च भासत आहे. तें भ्रांतिमात्र आहे. अतिशय कृत्रिम आहे. मायाशबल चित्चा चमत्कार, हेंच त्याचें स्वरूप आहे. पण तेंच ज्ञानी पुरुषाला अकृत्रिम सन्मात्र भासतें. त्याला जगत् भासतच नाहीं. हा सृष्टि-प्रलयभ्रम दीर्घ संकल्पच आहे. तत्त्वज्ञान हें त्याचें तात्त्विक स्वभावस्फुरण आहे व भ्रांत्याकारानें स्फुरण होणें हें अज्ञान आहे. मायोपहित ब्रम्हस्वरूप झटकन दृश्य होऊन कारणावांचूनच उदय पावतें असें पाहिलें आहे. याप्रमाणें दृश्यशून्य आत्म्यामध्यें सुषुप्तानंतर जसें स्वप्न दिसतें तसेंच तें दिसतें. नंतर अर्थक्रियाव्यवस्थेनें कार्यकारणभावादि नियतीला तें कारण होतें. चित्त्वामुळें चितीमध्यें हें दृश्य काकतालीयन्यायानें प्रकाशमान होतें. सागरांतील तरंगादिकांप्रमाणें तें चित्स्वभावामुळेंच स्वतः उद्भवतें. हा चिद्धातु असाच आकाशमात्र आहे, तो अशा रीतीनें आपल्या स्वभावालाच जगद्रूपानें प्रकट करतो. प्रथम अबुद्धिपूर्वकच दृश्याकार प्रतिभासानें दृश्यभूत होऊन त्यानंतर त्या चिद्रूपी आत्म्यानें आपल्याच स्वरूपांत स्मृत्यादिक, पृथिव्यादिक, बुद्ध्यादिक या सर्व कल्पनात्मक संज्ञा निश्चित केल्या आहेत.

श्रीरामः—भगवन् ! याप्रमाणें जगत् तात्कालिक कल्पनामात्र आहे, असें जर म्हटलें तर पूर्वी उत्पन्न झालेल्या बुद्धीच्या प्रामाणिक अनुभवापासून झालेल्या संस्कारापासून स्मृति व प्रत्यभिज्ञा होते, हा सर्व शिष्टांच्या अनुभवानें सिद्ध असलेला नियम कसा प्राप्त होतो ? स्मृति किंवा प्रत्यभिज्ञाहि पूर्वानुभूत विषयाविषयींच असते असें जर न मानलें तर पूर्वोक्त नियम बाधित होतो.

श्रीवसिष्ठः—रामा ! सिंह हत्तीला जसा मारतो त्याप्रमाणें मी तुझ्या या प्रश्नाचें युक्तीनें निवारण करतों. सूर्य प्रकाशाची जशी स्थापना करतो तसा मी एक अभेद प्रस्थापित करतों, म्हणजे अद्वैत आत्मतत्त्वाची सिद्धि करतों. हें जगद्रूप दृश्य चिन्मात्रकोटरामध्यें, वृक्षांत न खोदलेली वनस्थ बाहुली जशी असते, त्याप्रमाणें रहातें. ज्याप्रमाणें सुतार तिला तासून वृक्षांतून बाहेर काढतो त्याप्रमाणें अद्वितीय चित्स्तंभापासून ज्याच्या स्वरूपांत कांहीं विकार उत्पन्न झाला नाहीं असा आत्मा त्या चित्स्वरूप बाहुलीला उत्पन्न करतो. जडस्तंभावर ती अभिव्यक्त होत नाहीं, तर अव्यक्तच असते. पण अधिष्ठानचितीच्या आवरणाची निवृत्ति झाली असतां तसल्या चिद्बलानेंच चंद्रांतील राहूप्रमाणें चिदात्म्यांतच ती व्यक्त होते. तर मग प्रलय व सुषुप्ति यांमध्यें ती कां भासत नाहीं, म्हणून म्हणशील, तर त्या दोन अवस्थांमध्येंहि सत्तासामान्यरूपानेंहि ती न कोरलेल्या बाहुलीप्रमाणें भासतेच; ती स्वरूपापासून च्युत होत नाहीं. चिन्मात्रच असल्यामुळें आत्म्यामध्येंच स्थित असते. सृष्टीच्या आरंभींहि ती चित् प्रथम पूर्वोक्त निर्विकल्प कल्पनायुक्त होऊन मागून भोक्त्याच्या अदृष्टानुसार उत्पन्न झालेल्या मनोविकल्पांनीं विचित्र सृष्टिकल्पना करते. ज्याप्रमाणें स्वप्नांत आज उत्पन्न झालेली कल्पना

सहज होते, त्याप्रमाणेंच ती परमाकाशरूपिणी चिति आपल्या आकाशस्वरूपांत कल्पना करते. ती स्वरूपामध्यें स्वरूपानेंच चिद्रूप जगदाकार उत्पन्न करते. ती कशी करते, ह्मणून विचारशील तर सांगतों. ही सत्तासामान्यरूप जगद्बीजभूत ब्रह्मकला, त्या ब्रह्मकलेमध्येंच ही चिन्मात्रकल्पना, ही सदा अनावृतस्वभाव तत्प्रतिबिंबभूत चिति, हा जीव, हा अभिमान, हा वृत्तिप्रधान अहंकार, ही निश्चयप्रधान बुद्धि, हें चित्त, हा काल, हें आकाश, हा तो, हा मी, ही क्रिया, हें तन्मात्रपंचक, हा इंद्रियसमूह, हें पुर्यष्टक, हा आतिवाहिक देह, हा आधिभौतिक देह, मी ब्रम्हा, मी शंकर, मी उपेंद्र, मी सूर्य, हें बाह्य, हें आंत, हा सर्ग, हें जगत् इत्यादि कल्पनासमूह हें अतिनिर्मल चिदाकाशच आहे. त्याहून भिन्न असें त्यांत अणुमात्रहि कांहीं नाहीं. यास्तव अज्ञजनांनीं कल्पिलेले हे जडपदार्थसमूह कोठें रहातात? स्मृति कोठें रहाणार व द्वैताद्वैत तरी कोठचें? याप्रमाणें हें जगत् कांहीं कारणावांचूनच असें भासत आहे. सृष्टीच्या आरंभीं स्वप्नाप्रमाणेंच तें भासतें. आकाशांत आकाशरूपच असलेलें तें विकारी असल्यासारखें भासतें. आकाशांतच आकाश स्फुरतें. चिन्मयामध्यें जें चिन्मय ज्ञान झालें आहे तें त्या चिन्मयामुळेंच होय. पण ब्रम्हज्ञान झाल्यावर तें जगत् कोठचें? स्वप्न कोठचें? स्मृति कोठची? काल कोठचा व कल्पना कोठच्या? आकाशांतील शून्याप्रमाणें हें शांत चिद्धानच दिसत आहे. जें चिद्धनाच्या आंत आहे, तेंच बहिर्भूतत्वास प्राप्त झालें आहे. पण सन्मात्रावांचून वस्तुतः कांहीं आंत व कांहीं बाहेर नाहीं. हे अंध वाद्यांनो! अवयवशून्य, शांत, अनिर्देश्य अशा तत्त्वापासून कारणावांचूनच जें प्रवृत्त होतें, तें उत्पन्न झालें आहे असें कसें म्हणतां येईल? तशीच जी कूटस्थ वस्तु ती विकारी कशी होईल? यास्तव जसें परब्रम्ह आहे, तसेंच हें दृश्य परब्रम्ह आहे. जें स्वप्नांतील चिदाकाश तेंच स्वप्ननगर होय. हें दृश्य यत्किंचितूहि कांहींच नाहीं. पूर्ण सागरामध्यें रजःकण कोठचा? त्याचप्रमाणें परमाकाशांत दृश्य कोठचें? तथापि हें जें कांहीं भासत आहे, तें निर्विषय चिन्मात्रच आहे. आणि ज्या अर्थीं तें निर्विषय आहे, त्या अर्थीं तें शांत आहे. तें दुसऱ्या कोणाला प्रकाशित करीत नसतांना स्वयंप्रकाश असतें. पूर्णब्रम्हापासून हें पूर्ण जगत् उदय पावलें आहे. तें कोणीं वर काढलेलें नसतांहि त्यांतून वर काढल्याप्रमाणें दिसतें. परमात्मात्र हें प्रकाशरूप आभान आहे. रामा! स्वतः अनुभवच असलेलें हें आत्मतत्व मी अशा प्रकारें अतिशय स्पष्टपणें, पुनः पुनः उच्चस्वरानें जरी सांगत आहें, तरी मंद अधिकारी जनांच्या मनांतील विमूढत्व म्हणजे स्वप्नप्राय जगाला सत्य समजणें ही भ्रांति अद्यापि जात नाहीं. अरे अरे! ज्ञानी अधिकारीही तिचा एकाएकीं त्याग करूं शकत नाहीं. तेव्हां या मोहाचें प्राबल्य किती आहे म्हणून सांगावें!१६८.

---

## सर्ग १६९ वा.

१ ज्याचें चित्त विश्रांति पावलें आहे अशा जीवन्मुक्ताचीं अनेक लक्षणें सांगितलीं जातात. व २ आत्मज्ञाची सदा सुषुप्ति.

श्रीवसिष्ठः—ज्याची मति प्रत्यगात्म्यामध्यें आसक्त झाली आहे, त्याचीं सुखसाधनें सुखाला कारणें होत नाहींत व दुःखसाधनें दुःखाला कारण होत नाहींत. त्यालाच मुक्त असें म्हणतात. जशी विस्तीर्ण भोगांमध्यें

आसक्त झालेली अज्ञांची मति त्या भोगांपासून ढळत नाहीं, त्याप्रमाणें ज्याची चिदाकाशांत अचल झालेली बुद्धि त्यापासून ढळत नाहीं, त्याला मुक्त असें म्हटलें जातें. ज्याचें अचंचल चित्त चिन्मात्र आत्म्यामध्येंच विश्रांति पावतें व त्या परमात्म्यांतच निमग्न होतें त्याला जीवन्मुक्त म्हटलें जातें. परमात्म्यामध्यें विश्रांति पावलेलें ज्याचें मन त्यापासून परतून पुनः या दृश्यामध्यें रममाण होत नाहीं, तो जीवन्मुक्त म्हटला जातो.

श्रीरामः—हे मुने! ज्याचें सुखसाधन सुखाला कारण होत नाहीं व दुःखसाधन दुःखाला कारण होत नाहीं, त्या अचेतन मानवाला मी जडच समजतों.

श्रीवसिष्ठः—जो शुद्ध बोधात्मा चिदाकाशांत एकान्तनिष्ठ झालेला असतो व प्रयत्नावांचून सुख जाणत नाहीं, त्याला विश्रांत असें म्हणतात. विवेकानें ज्याचे सर्व पदार्थाविषयींचे सर्व संदेह वस्तुतः शून्य झालेले असतात तो परमपदीं विश्रांति पावला आहे. ज्याची कोणत्याहि विषयाविषयीं केव्हांहि आसक्ति नसते, तो बाहेरून व्यवहार जरी करीत असला तरी आंत विश्रांति पावलेलाच म्हटला जातो. ज्याचीं सर्व कर्में फलाविषयीं इच्छा व संकल्प यांनीं रहित असतात, त्या प्रारब्धप्राप्त व्यवहार करणाराला विश्रांति पावलेला असें म्हटलें आहे. या विश्रांतिरहित, निराधार, दीर्घसंसारमार्गांत चिन्मात्रत्वदर्शनामुळें आत्म्यामध्यें ज्यानें विश्रांति संपादन केली आहे, तोच सर्वोत्तम होय. जे चिरकाल भ्रमण करून त्यामुळें झालेल्या श्रमाचें निवारण करण्यासाठीं निजल्याप्रमाणें दिसतात, ते व्यवहार-तत्पर जरी असले तरी विश्रांतीला प्राप्त झाले आहेत, असें समजावें. विषयांच्या मागें न धांवणें हेंच जीवन्मुक्तांचें लक्षण आहे. ते 'दृश्य व द्रष्टा या दोहोंनीं शून्य असलेल्या स्वचित्ताकाशांत शुद्ध चिद्रूप भास्करच उदय पावले आहेत कीं काय' असे या संसारांत भासतात. सदेह व व्यवहारस्थ असूनही, ते उत्तम पुरुष निजल्याप्रमाणें व विदेह असल्याप्रमाणें दिसतात. ते जडासारखे भासतात, पण जड नाहींत. येथें शय्येवर निजलेलेच असतांना जे स्वप्ननगरामध्यें व्यवहार करीत असतात त्यांना 'निजलेले' असेंच म्हणतात, परंतु वस्तुतः ते अजडतेला प्राप्त झालेले असतात. दीर्घपरिभ्रमण करून थकलेला व त्या परिभ्रमणापासून निवृत्त झालेला एखादा मनुष्य विश्रांति घेत रहातो व सुखानें मौन धरून बसतो, तोंडानें एक वाक्यहि उच्चारीत नाहीं, पण त्याला जडाकृति म्हणतां येत नाहीं, त्याचप्रमाणें संसारमार्गांतील दीर्घ परिभ्रमणानें थकलेला हा जीवन्मुक्त बहिर्मुखाशीं भाषणहि करीत नाहीं. पण तेवढ्यावरून त्याला जड असें म्हणतां येत नाहीं. अविद्यातमोमयरूप जी सर्व भूतांची रात्र तोच परमबोध होय; तीच परा शांति व त्यांतच हा एकरसानें स्थित असतो. या दुःखद दृश्यामध्यें सर्व भूतें अगदीं दक्ष असतात. पण त्यांत हा जीवन्मुक्त सतत सुप्त असतो. तो सुखदुःखरूप संसाराला पहात नाहीं. जो कर्मसमूहाचा अनादर करून स्वात्म्यामध्येंच स्थिर रहातो, त्याला आत्माराम म्हणून म्हटलें आहे. रामा! तो जड नव्हे. तो या दुःखाच्या पार गेलेला असतो. भवसागराच्या परतीराला पोंचलेला असतो. तो भाग्यवान् पुरुष आत्म्यामध्येंच विश्रांतिसुखाचा अनुभव घेत रहातो. तो या दीर्घ संसारमार्गांत अतिशय श्रांत झालेला असतो व फसविण्यामध्यें अतिशय चतुर असलेल्या विषयांकडून क्रूर वाटमाऱ्यांप्रमाणें हा लुटला जातो. जो भोगभावांनीं आतुर झालेला असतो व त्यामुळेंच

तो विषयांचा प्रदेश सोडून दूर जावयास निघालेला असतो. जरारूपी असलेला तो मनुष्य तुषाराशनीकडून वारंवार व्यवहाराला असमर्थ केला जातो. तो जन्मरूप जंगलांतील हरिण व्यर्थ व्यग्र होऊन एकसारखा धांवत सुटतो. तो एकटाच दुःखरूपी कंटकमय प्रदेशांतून चालूं लागतो. ज्यांत सुखच्छाया अतिशय दुष्प्राप्य आहे, अशा संसारमार्गांतील तो वाटसरू होतो. दुष्कर्में हेंच पाथेय त्यानें बरोबर घेतलेलें असतें व तो पदोपदीं ठेंचाळून त्या मार्गांत गडबडा लोळत असतो. अर्थानर्थमय संकुचित मार्गाकडून तो परवश केला जातो. याप्रमाणें शांत झालेला हा जीव दैववशात् साधनसंपत्ति संपादन करून सच्छास्त्र व गुरुप्रसाद यांच्या योगानें तत्त्वसाक्षात्कारानें जागा होऊन संसारसागराच्या परतीरास पोंचून आत्मज्ञानी होत्साता शय्यारहित असूनहि सुखानें शयन करतो. शयनाची इच्छा करणारे लोक ज्या गृह-प्रासाद-पर्यंकादिकांची इच्छा करतात, त्यांनीं रहित असलेला हा आत्मज्ञानी प्राणादिकांच्या व्यवहारानें रहित होऊन, आत्मस्वरूपाविषयीं जागृत होऊन, स्वरूपबहिर्भूत निद्राख्य वस्तूनेंहि रहित होऊन सुखानें शयन करतो, हें केवढें आश्चर्य आहे ? जातिवंत घोड्याप्रमाणें हा आत्मवान् जातिरहित असून व्यवहारांत खाणें, जाणें, बसणें, बोलणें इत्यादि करीत असूनहि लोकांमध्यें किंवा महारण्यांत सुखानें शयन करतो. तत्त्वदर्शी लोकांची गाढ निद्रा कांहीं अपूर्वच आहे. ती कल्पांतींच्या मेघगर्जनेनें किंवा त्याचें अंग कापल्यानेंहि भंग पावत नाहीं. तत्त्वदर्शी लोकांची गाढ निद्रा कांहीं अलौकिकच आहे. कारण ती चिन्मात्रदर्शनाविषयीं प्रबुद्ध असलेल्या ज्ञात्यांच्याहि बाह्येंद्रियांना मिटविते. ह्मणजे त्यांच्यामध्यें विषयग्रहणशक्ति ठेवीत नाहीं. ज्याचे नेत्र मिटलेले नाहींत अशा त्या तत्त्वज्ञानी पुरुषाचें विश्व: निमीलित होतें. तो आत्मज्ञ पुरुष परमार्थानें मत्त झालेला असतो व त्यामुळें सुखानें शयन करतो. सर्व जगाला गिळून परम पूर्णतेला प्राप्त झालेला आत्मज्ञ तृप्ति होईपर्यंत अमृत पिऊन सुखानें शयन करतो. तो विषयानंदरहित असूनहि महाआनंदी असतो. तो अक्षय अद्वैतसुखाचा अनुभव घेतो. दुसऱ्या कोणत्याहि प्रकाशानें प्रकाशित न होणाऱ्या स्वात्म्यामध्यें त्याचा फार मोठा प्रकाश असतो आणि अशा स्थितींत तो सुखानें शयन करतो. त्याचा मोहान्धकार शांत झालेला असतो. प्रकाशामध्यें तो लंपट असतो. अमृतानंदरसाचा पूर्ण अनुभव घेतो व सुखानें शयन करतो. अनंत दुःखानुभवाविषयीं तो शांत असतो, पण लोकसंग्रहार्थ वर्णाश्रमोचित व्यवहारांत तत्पर असतो. बाह्य विषयांमध्यें अनासक्त असतो. आत्मसुखाचा सतत अनुभव घेतो. अशा रीतीनें तो आत्मज्ञानी सुखानें शयन करतो. आत्मज्ञानी पुरुष आपल्या स्वरूपाला सूक्ष्माहूनहि सूक्ष्म व स्थूलाहूनहि स्थूल करून चिदाकाशरूप शय्येवर सुखानें शयन करतो. सूक्ष्मतेमुळें अतिशय अणु व विभुत्वामुळें अतिशय स्थूल अशा चिद्देहांतील प्रत्येक अणूंत अनंत कोटि विश्वें धारण करून जीवन्मुक्त सुखानें शयन करतो. अनेक संहार व सर्ग करीत असूनहि कांहीं न करणारा जीवन्मुक्त परमप्रकाशरूप शय्येवर सुखानें शयन करतो. संसारसमूह हें स्वप्न आहे असें जाणून पूर्ण प्रकाशानें प्रकट होणाऱ्या दिशांप्रमाणें अपरिच्छिन्न सुषुप्ततेला प्राप्त होणारा तो ज्ञानी सुखानें शयन करतो. सर्व जगत्पदार्थांच्या सत्तासामान्यतेला प्राप्त झालेला तो आत्मज्ञानी आकाशाहूनहि अधिक व्यापी होऊन सुखानें शयन करतो. प्रथम प्रविलापनानें आकाश

तेला प्राप्त केलेलें जगत् अव्याकृत आकाशाहूनहि अति स्वच्छ असलेलें चिदाकाश करून शब्द व प्रश्वास या दोहोंसहि शांत करून सुखानें शयन करतो. प्रत्यगात्मभूत चिदाकाशाच्या एका कोंपऱ्यांत हें आमचें जगत् स्वप्नाप्रमाणें पहात तो जीवन्मुक्त सुखानें शयन करतो. प्रारब्धाच्या प्रवाहानें प्राप्त झालेल्या व्यवहाररूप चटईवर विश्रांति घेत असलेला तो जीवन्मुक्त सुखानें शयन करतो. आकाश आपल्याच शून्य सत्तेमध्यें जसें रहातें, त्याप्रमाणें दीर्घप्रयत्नानें बहिर्मुख होऊन स्वप्नदर्शनाप्रमाणें जगाला पहात तो स्वरूपानेंच जिवंत रहातो. परमाकाशत्वास प्राप्त झालेला ज्ञानी आकाशासारख्या स्वरूपज्ञानानें, आकाशासारख्याच जीव-जगद्रूप मिथ्या धर्मांना मोठ्या यत्नानें पहात रहातो. तो प्रबुद्ध असूनहि निजलेला व सुप्त असूनहि जागणारा जीवन्मुक्त सतत रममाण होतो. अज्ञविषयांमध्यें तो निजलेला असतो व परमार्थविषयामध्यें सतत जागत असतो. याप्रमाणें सदा सुप्त असलेलाहि तो लोकप्रसिद्ध प्रबोध व स्वाप या दोन अवस्थांमध्यें लोकांप्रमाणेंच प्रबुद्ध व सुप्त होऊन जाग्रत् व स्वाप्न विषयभोगांमध्यें साह्य करणाऱ्या एका सुहृदासह सतत रममाण होतो व सुषुप्तदशेंतहि त्या सुहृदाबरोबरच त्या अवस्थेचा अनुभव घेतो. तो जीवन्मुक्त जन्मांतरीं चिरसहवासानें जडलेल्या स्नेहातिशयानें आपलें सर्व वैषम्य टाकून समचित्तानें शम, दम, तितिक्षा, ज्ञान, वैराग्य, संतोष इत्यादि विचित्र अनुवृत्तींनीं मधुर झालेल्या चिरंतन मित्रासह क्रीडा करीत आपल्या आयुष्याचे दिवस घालवितो व देहपातानंतर निरतिशय आनंदरूप विदेहकैवल्यपदीं विश्रांति घेतो. १६०

---

## सर्ग १७० वा.

—:०:—

१ पुत्र, स्त्री, भृत्य, यांसह स्वकर्मसंज्ञक सुहृद, त्याचे गुण व त्याची सुखावह क्रीडा, यांचें वर्णन.

श्रीराम:—हे ब्रह्मन्! ज्याच्यासह हा रममाण होतो तो याचा सुहृद् कोण तें सांगा. त्याची क्रीडा कोणत्या स्वभावाची असते? आत्मस्वरूपावस्थिति हीच त्याची क्रीडा आहे? कीं, रम्य भोगस्थानामध्यें—विहारांमध्यें जडणारी प्रीति ही त्याची क्रीडा आहे?

श्रीवसिष्ठ:—कर्म हाच त्याचा एक अकृत्रिम मित्र आहे. कर्म तीन प्रकारचें आहे. एक स्वप्रवाहोहित, दुसरें प्रायोहित व तिसरें स्वकर्म. सहज कर्माला प्रवाहोहित, लोकसंग्रहार्थ शास्त्रीय कर्माला प्रायोहित व आपल्या प्रयत्नांनीं केलेला जो सच्छास्त्राभ्यास, विचार, सत्संग, शम, दम, तितिक्षा, उपरम, शौच, संतोष, ईश्वरप्रणिधान, संयम इत्यादि तें स्वकर्म होय. हें तिन्ही प्रकारचें अनिषिद्ध कर्मच ‘ कर्म ’ या नांवानें येथें सांगितलें आहे. हा कर्मरूप मित्र पित्याप्रमाणें समाधान करतो. स्त्रीप्रमाणें अकार्यामध्यें नियमन करतो व भयंकर संकटामध्यें एक क्षणभरसुद्धां सोडीत नाहीं. हा निर्भयपणानें सेवा करतो; उत्तम सुख देतो. याला कोप आला तरी उलट तो याच्यावर रागावत नाहीं. समाधानरूप अमृताचा प्रसार करतो. दुर्गम मार्गांत व दुर्वार वैर, कलह इत्यादि दोषांत आसक्त झालेल्या याचा उद्धार करण्यास तत्पर असतो. सर्व विश्वासरत्नांचा तो कोशच आहे. अनेक जन्मांमध्यें सतत अनुरक्त झाल्यामुळें तो लहानपणापासून बरोबर रहातो. त्याच्या बरोबर धुळीमध्यें खेळलेला असतो. त्यामुळेंच लहानपणापासूनच तो त्याचा सोबती असतो. तो याच्या दुराचर-

णाचें निवारण करतो. पित्याप्रमाणें रक्षण करण्यास तत्पर असतो. अग्नीच्या उष्णतेप्रमाणें, पुष्पाच्या सुगंधाप्रमाणें त्याचा याच्याशीं नित्य संबंध असतो. सूर्य व निर्मल दिवस यांची जशी व्याप्ति असते, तसेंच या दोघांचें नित्य साहचर्य असतें. केवल लालन करण्यांत तत्पर, नित्य पालन करण्यांत परायण, सर्व संकटांतील कठिण प्रसंगीं रक्षण करण्यास तयार, सोन्याला शुद्ध करणाऱ्या अग्नीप्रमाणें, अशुचिस्पर्श, अभक्ष्यभक्षण, इत्यादि कारणांनीं अशुद्धावस्थेंत असलेल्याहि याच्या देहाचें शोधन करणारा, हें त्याज्य आहे व हें ग्राह्य आहे असें दाखविण्यास तत्पर, जणुंकाय अनिंद्य कथांनीं एखाद्या नगरांतील चतुर मनुष्याप्रमाणें आल्हाद देणारा; शरीर, मन व वाणी यांच्या शुभ व्यवहाररूप विवेकरत्नांचें जणुंकाय भांडारच, सूर्य अंधकाराला ज्याप्रमाणें दाखवीत नाहीं, उलट त्याचें दुरूनच निरसन करतो, त्याप्रमाणें सतत अप्रिय न दाखवितां दुरूनच त्याचें निरसन करणारा व अनुरक्त पत्नीप्रमाणें प्रिय असेल तेवढेंच दाखविणारा, सर्व जनांला प्रियंवद करून स्वतःहि प्रियच आचरण करणारा; ज्याचें हृदय कोमल, मधुर, स्निग्ध, अक्षुब्ध व सावधान असतें; सज्जनांची शुश्रूषा करणारा, पूज्य, स्मितपूर्वक भाषण करणारा, कामापासून निवृत्त झालेला, सद्रूप, परमार्थाचें एक मुख्य कारण, अज्ञजनांमुळें दैववशात् उत्पन्न झालेल्या रणांत प्रथम प्रहार करण्यास तयार असलेला, लोकोत्तर क्रीडा, हास्य, कौतूहल निर्माण करून लीलेनेंच मनोरंजन करणारा; उत्तम शील, क्रिया व कुल यांचें रक्षण करणरा; आधि-व्याधींनीं युक्त असलेल्या चित्ताला अमृताप्रमाणें जीवन देणारें जणुंकाय औषधच, विशेषेंकरून पांडित्य व वाद यांच्या योगानें पूज्य; प्रभु, गुरु, मान्य, यांच्या चित्तांचें रंजन करणारा; कुल व शील समान असल्यामुळें जणुंकाय द्विधाभावानेंच स्थित असलेला; राजे, साधु, दाते या सर्वांना अनुरक्त करणारा, यज्ञ, दान, तप, तीर्थ, न्यायार्थ यांमध्यें प्रेरणा करण्यास सज्ज असलेला; पुत्र, भार्या, ब्राह्मण, स्त्रिया, भृत्य, बंधु यांसह शुभ भोजन व पान करण्यास योग्य; ज्याची संगति अतिशय श्लाघ्य आहे असा; दुःख देणाऱ्या विषयोपभोगादिकांच्या तृष्णेचें निवारण करणारा; स्निग्ध गोष्टी करण्यांत अतिशय उदार; विश्वासाचें उत्तम स्थान; अशा कलत्रयुक्त सत्कर्मनामक आत्ममित्राशीं संयुक्त झालेला जीवन्मुक्त स्वभावानेंच प्रेरित होत्साता रममाण होतो.

श्रीरामः—हे मुनीश्वरा! त्या मित्राचें कलत्र कोण? व त्याचें स्वरूप काय आहे? तें मला संक्षेपतः सांगा.

श्रीवसिष्ठः—हे रामा! स्थान, दान, तप व ध्यान, या नांवांचे या सुहृदाचे चार महात्मे पुत्र आहेत. त्यांच्या गुणांनीं सर्व प्रजा त्यांच्यावर अनुरक्त झाली आहे. चंद्राच्या कोरीप्रमाणें दृष्टीनेंच सर्व लोकांना आनंद देणारी व आपल्या शुभ कर्माख्य पतीला एक क्षणहि सोडून न रहाणारी मुदिता म्हणजे नित्य संतुष्टता या नांवाची त्याची भार्या आहे. ती त्याच्यावर अतिशय अनुरक्त आहे. ती दयेमुळें सर्वत्र धन पसरीत असते. ती दृश्याचें हरण करणारी, आनंद उत्पन्न करणारी, व त्याच्या मित्रालाहि सोडून न रहाणारी आहे. समता ही त्याची दुसरी भार्या होय. ती त्याला सतत अतिशय प्रिय आहे. ती याच्या द्वाराचें रक्षण करीत असते. नेहमीं त्याच्या सन्मुख उभी राहून त्याला सुख देते. ती याच्या बुद्धीला नेहमीं धैर्यामध्यें व धर्मामध्यें धारण करते. ती या धीर, धुरंधर व धन्य पतीच्या पुढें धांवत असते. या राजाच्या

सुहृदाला विषयरूप शत्रूला जिंकण्याचा प्रसंग आला असतां, योग्य सल्ला देणारी मैत्री या नांवाची तिसरी एक भार्या आहे. ती सर्वत्र सम असल्यामुळें सर्वदाच याच्या स्कंधाशीं संलग्न असते. श्रेष्ठ मर्यादाकार्यांची ही उपदेष्ट्री आहे. ही मोठी चतुर आहे. सर्वांना मान्य असलेल्या त्याची सत्यता हीच धन्याध्यक्ष आहे. अशा परिवारानें युक्त असलेल्या स्वकर्मसंज्ञक मित्र-मंत्र्यासहवर्तमान व्यवहार करणारा जीवन्मुक्त हृष्ट होत नाहीं व क्रुद्ध होत नाहीं. लाभ झाला असतां आनंद वाटत नाहीं व हानि झाली असतां खेद होत नाहीं. चित्रांत काढलेल्या योद्ध्याप्रमाणें युद्धादिकांच्या योगानें लौकिक व्यवहार करीत असूनहि तो स्वरूपामध्यें जशाचा तसाच रहातो व शांतचित्त मुनि असतो. वस्तुशून्यवादामध्यें डोंगराप्रमाणें स्वस्थ बसतो. प्रयोजनरहित शब्द उच्चारल्यास हा अत्यंत बधिर असतो. लोकाचाराच्या विरुद्ध असलेल्या सर्व कर्मांमध्यें शवासारखा निश्चल रहातो. श्रेष्ठ आचार व विचार यांमध्यें वासुकि किंवा बृहस्पति यांसारखा रहातो. त्याची वाणी बोलत असल्यास ती पुण्यकथाच बोलते. तो आपल्या व दुसऱ्यांच्या कौटिल्यादि दोषांना यथावत् जाणतो. संदिग्ध गोष्टींचा निर्णय एका क्षणांत करतो. सर्वव्यापक वस्तुचा मोठा वक्ता असतो. त्याची दृष्टि सर्वत्र सम असते; अंतःकरण उदार असतें. तो मोठा दाता आहे, तो आपल्याजवळ जें असेल तें सर्वांना विभागून देतो. तो कोमल, स्निग्ध, मधुर, सुंदर व पुण्यकीर्तन म्ह० ज्याची ख्याति पुण्यकारक आहे असा असतो. हे सांगितलेले सर्व गुण, हा ज्ञानी जीवन्मुक्तांचा स्वभावच आहे. त्यांना हे गुण आपल्या ठिकाणीं प्रयत्नानें आणावे लागत नाहींत. चंद्र, सूर्य, अग्नि इत्यादि दुसऱ्याच्यां प्रेरणेनें प्रकाशमान होत नसतात, तर ते स्वभावतःच प्रकाशमान होतात, हें प्रसिद्ध आहे. १७०.

---

## सर्ग १७१ वा.

—:०:—

१ जीवन्मुक्तीची दृढस्थिति होण्यासाठीं व सर्व संदेह शांत होण्यासाठीं पुनः तत्वोपदेशानें दृश्याचें निराकरण केलें जातें.

श्रीवसिष्ठः—हे रामा! हें चिदाकाशच जगद्रूपानें भासतें. पण वस्तुतः जगत् शून्य नाहीं, भासमात्र नाहीं व संविद् नाहीं. हें चिदाकाश जगत् या नांवानें भासत आहे, पण तें वस्तुतः जगत् नव्हे. अज्ञदृष्ट्या तें जगत् भिन्न असल्यासारखें जरी स्थित असलें, तरी आकाशाहून शून्यत्व जसें भिन्न नसतें, त्याप्रमाणें चिदाकाशाहून तें भिन्न नाहीं. निर्विषय चैतन्यच दृश्य या रूपानें भासतें. दोन पदार्थांच्यामध्यें जें संविद्चें स्वरूप असतें, तेंच दृश्यरूपानें भासतें. हें दृश्य त्याहून भिन्न नाहीं. महाप्रलय झाला असतां आदि सर्ग परमात्म्यापासून पुनः कसा होणार? कारण त्या वेळीं परमात्म्याहून कांहीं कारणच संभवत नाहीं. आणि सद्रूप परमात्मा तर सर्वकार्यकारणभावशून्य आहे. तेव्हां या दृश्याचा कोणापासून उद्भव होणार? त्या वेळीं अणुमात्रहि दृश्याचें बीज नसतें, कीं ज्यापासून हें 'मूर्तचक्र प्रवृत्त होईल. त्यामुळें हें मूळ तादृश जगत् उत्पन्नच झालेलें नाहीं. वंध्यापुत्राप्रमाणें हें अत्यंत असत् आहे. त्यामुळें ही दृश्यबुद्धि मुळीं नाहींच. दृश्य ह्मणून अभितः स्थित असलेलें हें जें कांहीं भासत आहे, तें शुद्ध चिन्मात्रच आहे. तें आकाशच स्वच्छ परमपद आहे, असें विद्वान् समजतात. ज्याप्रमाणें सुषुप्तापासून स्वप्नत्वाला प्राप्त होणारें चिदाकाश

अनवस्थित होतें त्याप्रमाणें आपलें स्वच्छ चिन्मात्र अनामयस्वरूप न सोडतांच तें जगद्रूप अनवस्थिति धारण करतें. सृष्टीच्या आरंभीं हा आत्माच स्वरूपांत स्थित असतो. आकाशात्माच चिदाभासरूपानें दृश्य होऊन भासतो. संकल्पानें मंद झालेलें मन जसें नगररूपानें भासतें, त्याप्रमाणें सृष्टीच्या आरंभीं परमचिदाकाश दृश्याप्रमाणें भासतें. जसा वायु आपल्या स्वरूपांतच स्पंद, चक्रावर्त या रूपानें चेष्टा करतो, त्याप्रमाणें सृष्टीच्या आरंभीं चिदाकाश दृश्यरूपानें विकास पावतें. ह्मणूनच दृश्याचें तत्त्व जर कळलें तर जगत्त्रय भासत नाहीं, केवल ब्रह्मच भासतें. तें स्वरूपांतच अशा रीतीनें अवस्थित असतें. पृथिव्यादि कोणतेंच मूर्त जगत्स्वरूप केव्हांहि नाहींच. किंवा मूर्त व अमूर्त जें कांहीं आहे: तें हें ब्रह्मच विराजमान होत आहे. स्वप्नांतला पर्वत जाग्रत्कालीं जसें निराकार आकाशच, त्याप्रमाणें ज्ञान झाल्यावर हें जगत्त्रय शांत चिन्मात्र आकाशच होतें. ज्ञानी पुरुषाला जगत् अवयवरहित परब्रह्मच भासतें. आम्ही पुष्कळ विचार करीत असूनहि अज्ञान कसें असतें तें जाणत नाहीं. एका देशाहून दुसऱ्या देशाला प्राप्त झाल्यावर संविदूचें मध्यें जें स्वरूप असतें, तो भूतांचा स्वस्वभाव आहे व तेंच परमपद आहे. एका देशाहून दुसऱ्या देशाला प्राप्त झालें असतां मध्यें जें संविदूचें स्वरूप असतें, तेंच परमाकाश होय. त्यांत सर्व प्रतिष्ठित आहे. हें पद जशा प्रकारचें आहे तशा प्रकारचेंच हें सदसद्रूप जगत् आहे. ह्मणजे अधिष्ठानानुरूपच अध्यास झाला आहे. कारण पंचभूतांहून भिन्न यांत दुसरें कांहीं नाहीं. आपलें कार्य आपल्याहून भिन्न नसणें हेंच या जगांतील ब्रह्मसादृश्य आहे. रूपदर्शन, संकल्प, विकल्प वगैरे सर्व तें परमपदच आहे, असें विद्वान् समजतात. या परमपदरूपी महाजलाचे संकल्पादिक हे आवर्त आहेत. दोन प्रदेशांमधील निर्विषय संविदेचें जें स्वरूप त्याहून निराळी अशी जगत् ह्मणून कांहीं वस्तुच नाहीं. रागद्वेषादिभाव व त्याचप्रमाणें भावाभावदृष्टि यांचें रूप न सोडतांच याचे अवयव होऊन राहिल्या आहेत. पूर्व व अपर या दोन्ही कोटि सोडून मध्यें जें संविदूचें रूप असतें, तोच परमस्वभाव आहे व तो जगद्रूप मृगजलाचें अधिष्ठान ह्मणून प्रसिद्ध आहे. एका देशाहून दुसऱ्या देशांत प्राप्त झालें असतां, म्हणजे जागृतींतून स्वप्नांत गेलें असतां मधील सुषुप्तीमध्यें जें संविदेचें रूप किंवा एक सर्गप्रदेशांतून दुसऱ्या सर्गाला प्राप्त होईपर्यंत मध्यें ह्मणजे प्रलयांत जें संविदेचें रूप असतें, इहलोकापासून परलोकीं जाईपर्यंत मधील मूर्छावस्थेंत जें संविदेचें रूप असतें तेंच सर्वदा तसेंच असतें. त्यालाच अज्ञजनांनीं जगत् असें दुसरें नांव कल्पिलें आहे. आपल्या स्वरूपापासून च्युत न होणाऱ्या कूटस्थालाच अज्ञ लोक जगत् ह्मणतात. पण आदिसर्गापासूनच दृश्य उत्पन्न झालेलें नाहीं. तथापि येथें आहे म्हणून जें वाटतें, तें जगत् मायारूप गारुड्याच्या खेळासारखें आहे. अरेरे! जें दृश्य मुळीं नाहींच, तें आहे असें स्थित आहे! आणि जें परब्रह्म आहे तें नसल्यासारखें झालें आहे! पण मला ब्रह्मभावशून्य व त्यामुळेंच विपरीत जगत् कोठें मिळणार? मूढांनींहि असत् दृश्याला सत् म्हटलें आहे. ते सुद्धां ब्रह्मच जगत् या नांवाचें आहे असें समजतात. ब्रह्मच हें असें भासत आहे. त्यामुळें दृश्य केव्हांच उत्पन्न झालेलें नाहीं व भासत नाहीं. हें जें कांहीं भासत आहे. तें ब्रह्माकाशच स्वतः स्फुरत आहे. स्वतःहून व्यतिरिक्त नसलेल्या आपल्या प्रकाशानेंच मणि, रत्न जसें प्रकाशित होतें, त्याप्रमाणें आत्म्याहून पृथक् नसलेल्या

सृष्टीनें चिद्व्योम स्फुरण पावत आहे. त्या शांत पदींच हा सूर्य तप्त होतो. हा भास्कर त्याचाच अंश आहे. सूर्य त्यामध्यें जरी स्थित आहे तरी त्याला ताप देत नाहीं. निशाकर—चंद्र त्याला प्रकाशित नाहीं. तर हा देवच सूर्याला प्रकाशित करतो. अर्क त्या ईश्वराला प्रकाशित करीत नाहीं, त्याच्या नित्य चैतन्यप्रकाशानेंच तो प्रकाशमान होतो. अहो! हें त्याचें दृश्यमंडल त्यामुळेंच दिसतें. चंद्र, सूर्य, अग्नि इत्यादि सर्व पदार्थांचा तो प्रकाशक दीप आहे. तो साकार आहे व निराकार आहे, ही नुस्ती शब्दार्थकल्पना आहे. आकाशांतील पुष्पाप्रमाणें ती असद्रूप आहे. तत्त्ववेत्त्यांच्या दृष्टीनें ती संभवत नाहीं. कारण विषयाच्या असत्त्वामुळेंच ती असद्रूप आहे. जीवरूप जगत् पहाणाऱ्या सूर्याच्या तेजामध्यें जसे बारीक परमाणु भासतात, त्याचप्रमाणें अपरिच्छिन्न चित्प्रकाश ब्रह्मामध्यें हे सूर्यादिक भासतात; किंवा भासताहि नाहींत! चिन्मात्र आकाशरत्नाच्या सूर्यादिकांनीं युक्त अशा ज्या सृष्टि त्या प्रकाशाहून भिन्न कशा असतील, सांगा बरें! तें परमपद चिन्मात्रानेंहि रहित आहे, शून्यत्वानेंहि रहित आहे, सर्वातिरिक्त आहे व सर्व पदार्थांनीं युक्त आहे. पृथिव्यादिकहि त्यांत आहेत व नाहींतहि. जिवंत असलेले हे जीव त्यांत नाहींत. दोन अवयवांच्या संयोगामुळें प्राप्त होणारें स्थूलत्व न टाकणारेच असे हे सूर्यादिक त्या चित्प्रकाशांतील निरवयव अणु आहेत. स्वसत्तेचा त्याग न करणारें असें द्वैत किंवा अद्वैत यांत कांहींच नाहीं. यामध्यें कांहीं आहे व कांहीं नाहीं. हें कांहीं आहे व कांहीं नाहीं, हें सविशेष आहे, किंवा निर्विशेष आहे, या सर्व कल्पना त्या तत्त्वापासून फार दूर आहेत. एक, निरंतर, अनंत, नित्य, अतिविस्तृत अशी चिन्मात्र आकाशसत्ताच जगत् या नांवानें स्वरूपामध्यें स्थित आहे. एका विषयाला सोडून दुसऱ्या विषयाला प्राप्त होईपर्यंत चितीचें जें स्वरूप तेंच या नानात्मक जगाचें रूप आहे. एकरूप असलेलें हें चिदाकाशच जणुंकाय नाना होऊन विस्तारलें आहे. स्वप्नांतील चितीप्रमाणें तें पांच भूतांच्या रूपानें स्थित आहे. सुषुप्तांतून स्वप्नामध्यें प्रवेश करणाऱ्या पुरुषाची चित् जशी सुषुप्तस्थच असते, त्याप्रमाणें स्वरूपांत स्थित असलेली संविद् या सृष्टिरूप स्वप्नाला प्राप्त होते. जसें सुषुप्त तसेंच स्वप्न व जसें जाग्रत् तसेंच तुर्य, त्यामुळें जगत् आकाशासारखें आहे. जाग्रत्, स्वप्न, सुषुप्त व तुर्यच हें सर्व स्थित आहे. पण ब्रह्मविद्यासंप्रदायानें रहित असलेला पामर जें जाणतो तें मी जाणत नाहीं. जड व अजड म्ह० जगत् व जीव यांच्या आंत कोणाला न दिसतांच अंतर्यामिरूपानें राहून जो जगाला परिणत करतो, तोच ईश्वर शोधित जीव-चितीचें पारमार्थिक रूप आहे. जगत्पदार्थहि तन्मयच आहेत व तेच जगद्रूपानें स्थित आहेत, स्वतंत्रपणें सद्रूप नाहींत. पण पृथिव्यादि पदार्थ जर चिद्रूप आहेत, त्याहून पृथक् नाहींत, तर अंतर्यामिरूपानें त्याचा परिणाम तें कसें करतें, म्हणून विचारशील तर सांगतों. परिणामादि शब्दांच्या अर्थाकडे दृष्टि देणाऱ्या लोकांना उपदेश करण्यासाठींच लौकिक परिणामादि शब्दांचा अंगीकार करून आम्हीं तसें म्हणत आहों. हे निष्पाप रामा! वस्तुतः त्या तत्त्वामध्यें परिणामादिकांचा गंधहि नाहीं. आदिसर्गापासूनच ही महासत्ता स्वरूपामध्येंच स्थित आहे! एक चिन्मात्र परमाकाश स्थित आहे. तत्त्ववेत्त्यांच्या परिपूर्ण एकात्म्यांतील जो अनुभव तीच सर्वव्यापिनी स्थिति होय. तिनेंच आपल्या स्वरूपांत जगत् ही संज्ञा उत्पन्न केली आहे. हें स्वप्न आहे, असें कळल्यावर त्यांतील दुःख हें

जसें सुख होतें, त्याप्रमाणें हें जगत् स्वप्न आहे असा अंगीकार केल्यावर जें जें जगत्कौतुक ज्ञानी पहातो तें सर्व सुखच होतें. स्वप्नांतील दुःख त्या अवस्थेंत जसें केवळ दुःखच असतें, त्याप्रमाणें अज्ञानदशेंत जन्म, मरण, जरा इत्यादि ज्या ज्या अवस्थांचा अनुभव येतो, तें तें सर्व दुःखच होतें. तत्त्ववेत्ता जात असला, उभा असला, जागत असला, झोंप घेत असला, तरी त्या शांत पुरुषाचें नित्य एकरूप समाधान स्थित असतें. भेदामध्येंहि जो अभेदनिष्ठ, दुःखामध्येंहि जो सुखस्थित, सत्‌लाहि असत् मानणारा म्हणजे बाहेर व्यवहार करीत असतांनाहि जो आंतून मुक्त त्या ज्ञानी पुरुषाला साध्य किंवा परिहार्य असें काय रहाणार? बाह्य कार्यांमध्यें व्यवहार करीत असूनहि मनानें कांहीं टाकीत नाहीं व कशाचें ग्रहण करीत नाहीं. तर अकार्य जें ब्रह्म, त्यामध्यें तो स्थिर असतो. ज्याप्रमाणें हिमाचें शीतत्व व अग्नीचें उष्णत्व, त्याप्रमाणें अशी स्थिति हा ज्याचा स्वभावच झाला आहे, त्याला तो तो गुण प्रयत्नानें संपादन करावा लागत नाहीं. ज्याचा असा स्वभाव झालेला नसतो तो तत्ववेत्ताच नव्हे. आत्मातिरिक्त विषयाची इच्छा करणें हेंच अज्ञतेचें चिन्ह आहे. जो अविद्यावरणशून्य असलेला विद्वान्, सदा समाहितचित्त, शत्रुमित्रादि विकल्पशून्य, स्वात्मसुखसारप्रचुर असतो, तो श्रेष्ठ शमामृतानें सदा तृप्त रहातो. १७१.

---

## सर्ग १७२ वा.

—:०:—

१ विधाता मनोमात्र आहे, २ त्याचा संकल्प हाच जगद्भ्रम आहे. ३ त्याला देह नाहीं, व स्मृतिहि नाहीं. ४ व स्मृतितत्त्व.

श्रीवसिष्ठः—याप्रमाणें पृथिव्यादिकांनीं रहित असलेलें चिदाकाशच आद्य प्रजापति आहे. तो मनःसमष्टि हिरण्यगर्भमात्रच आहे, असें मी मानतों. मन संकल्पवृक्षाप्रमाणें चित्स्फुरणरूप आहे, हें प्रसिद्ध आहे. ज्याप्रमाणें जलामध्येंच आवर्त विवर्ताकारानें स्वतः उत्पन्न होऊन त्यानेंच आवर्तता कल्पिली आहे, त्याप्रमाणें मननाकार कल्पना केल्यानें पूर्वीं चिन्मात्रच असलेलें तें तशी कल्पना केल्यानंतर 'मन' या नांवानें चित्तादात्म्याध्यास कल्पितें. म्हणूनच सत्तामात्ररूप तत्त्वाहून बुद्ध्यादि भिन्न नाहींत. पृथिव्यादिक नसतांना अनंत आकाशामध्यें रज कोठचें! देह, चित्त, इत्यादि त्याला नाहींत, इंद्रियें नाहींत, वासना नाहींत. व्यवहाराभास सिद्ध होण्यासाठीं तीं सर्व अविचारदशेंत सत् असल्यासारखीं जरी दिसलीं तरी परमार्थतः कांहीं विद्यमान नाहीं. कारण पूर्व कल्पांतील प्रजापति मुक्त झालेला असतो. तेव्हां हे प्राज्ञा! पुनः देहबुद्धि इत्यादिकांचें ग्रहण करण्याचें कांहीं कारणच नाहीं. त्यामुळें अगदीं नवीनच उत्पन्न झालेल्या प्रजापतीला जगद्रचनेला अनुकूल अशी स्मृति व त्याची उत्पत्ति हीं दोन्हीं संभवत नाहींत. विदेहमुक्त झालेल्या लोकांना संसाराची स्मृति होत नाहीं किंवा त्यांच्या देहाचाहि पुनः उदय होत नाहीं. संसारांत भ्रमण करणाऱ्या जीवांप्रमाणें ते देशकालानुसार भ्रमण पावत नाहींत, किंवा त्या प्रजापतीला पूर्व कल्पांतील वासनाजन्य हिरण्यगर्भाच्या अहंभावसंस्काराच्या बळानें

चि स्मृति व देहादिक संभवतें, अशी जरी ाभर कल्पना केली, तरी केवल उपासना- ; मन:कल्पनासंस्कारापासून उत्पन्न झालेलें र्व केवळ मानस होय, पृथिव्यादिकां- न झालेलें नव्हे. त्यामुळेंच संकल्पनगरा- खेंच तें अति तुच्छ—मिथ्याभूतच ठरतें. प्रमाणें संकल्पपर्वताचें स्पष्ट दिसणारेंहि पृथिव्यादिकांनीं रहित असतें, त्याचप्रमाणें ाट्-शरीराचें हें रूप पृथिव्यादिरहित तें. प्रजापतीला आदिसर्गामध्यें पूर्वानुभ- । अभाव असल्यामुळें स्मृतिहि होऊं त नाहीं. 'धाता यथा पूर्वं अकल्पयत्' श्रुतिबोधानें त्याची स्मृति संभवते, असें तां येत नाहीं. कारण जगत्सत्य आहे, समजणाऱ्या अज्ञांच्या बुद्धीला अनुसरून ादिसिद्ध कर्ममार्गाचा प्रवाह तसाच पुढें ;विण्यासाठीं श्रुतीनें तसें सांगितलें आहे. तत्त्ववेत्त्याच्या दृष्टीनें तें संभवत नाहीं.

**श्रीरामः**—हे गुणगणाकर मुने! या ातील प्रजापति पूर्व कल्पामध्यें उपासक- त असतांना त्याला पृथिव्यादिकांचा अनुभव व होता; कारण त्याला जर तसा अनुभव ग नसता तर पृथिव्यादिघटित ाड्देह मी आहें, अशी त्याला उपासना ां आली नसती. त्यामुळें त्या उपा- ाबलानेंच या कल्पाच्या आरंभीं पृथिव्यादि- ी स्मृति, तद्घटित विराट्शरीर व उपासना- ाथ्यानें प्राप्त झालेलें रचनासामर्थ्य हीं त्याला । होतात. त्यामुळें पूर्व स्मृतीनेंच तो त्या ला निर्माण करतो असें म्हटलें पाहिजे. का- तो पूर्वस्मृति झाल्यावांचूनच सृष्टीला निर्माण तो असें म्हटल्यास पूर्वोक्त श्रुतीनें सांगि- ला पूर्व कल्पांतील ब्रह्मांडाचा सर्व गुण या ांडांत कसा सिद्ध होईल?

**श्रीवसिष्ठः**—आम्ही कल्पनाभ्रांतिसंस्कार- जन्य अर्थशून्य स्मृतीचा निषध करीत नाहीं. तर सत्यार्थ-अनुभवजन्य संस्कारां- पासून होणाऱ्या श्रुतीचा निषेध करीत आहों. कल्पांतील पृथिव्यादि दृश्य जर खरोखरच असतें, तर स्मृतिद्वारा ही लौकिकन्यायप्रसिद्ध कार्यकारणता संभवली असती; पण ती द्वारभूत स्मृतिच संभवत नाहीं. आब्रम्हस्तंबपर्यंत हें दृश्य तत्त्वतः विद्यमान नाहीं. तेव्हां त्या- विषयींच्या स्मृतीचा संभव कसा असेल? दृश्य खरोखर उत्पन्न होऊन जर विद्यमान असेल तर त्याचा अनुभव येऊन त्यापासून पुढें कालांतरीं त्याची स्मृति होईल. स्मृतीचें हेंच लक्षण आहे. पण जेथें मुळीं दृश्यच नाहीं, तेथें या कल्पना कोठच्या? या दृश्याचा सर्वदा अत्यंत अभाव आहे. सर्व ब्रम्ह आहे. तेव्हां त्या स्मृतीच्या कल्पना सत्य कोठून असणार? त्यामुळें प्रजापतीची आद्यस्मृतिच संभवत नाहीं. या शुद्ध ज्ञानात्मकाला आकारत्वच कोठचें? पदार्थाच्या अनुभवामुळेंच तो पदार्थ स्मरणाचा विषय होतो. पण प्रजापतीला लौकिक स्मृति नाहींच. लौकिक स्मृतीचा माता, कन्या वगैरे विषय हा व्यवहारापुरता तरी खरा असतो. पण उपासनेचा विषय मनोराज्यासारखा असतो. त्यामुळें तो नाहींच. तो कसा नाहीं तें सांगतों ऐक. भूतकालीन पदार्थाचें संस्कारवशात् आंतल्याआंत जें स्मरण होणें त्याला स्मृति म्हणतात. पण पदार्थ भूतकालींहि नाहीं व भविष्यत्कालींहि नसणार. त्याचप्रमाणें हें सर्व अचल, कूटस्थ परब्रम्हच आहे. त्याला आदि- मध्य-अंत नाहीं. तेव्हां त्यांत स्मृत्यादिक को- ठचें? सर्वात्मत्वस्मृतीनें आत्माहि ब्रम्ह होतो, असें जर ह्मणाल तर तें सुद्धां चिदाकाश- स्फुरणच आहे. व्यवहारामध्येंहि तें अत्यंत शांतच असतें व त्यालाच मीं स्मृति असें म्हटलें आहे. जें हें 'मी सर्वात्मा आहें' इत्यादि प्रका-

रचें स्मरण तेंहि स्वभावस्फुरण आहे. अज्ञात ब्रह्मस्वभावाचें परोक्षपणेंच स्फुरण होतें. त्यामुळें उपासनारूपानें पुनः पुनः अभ्यास केला असतां ब्रह्मात्माच उपासनेच्या फलरूपानें बाह्यार्थाप्रमाणें उपासनाकल्पित आकाराच्या सादृश्यानें भासतो. अज्ञानोपहित ब्रह्म जीवाकडून भ्रांतीनें किंवा स्मृतिपरंपरेनें जसें जसें जाणलें जातें त्याच स्वभावाचा आश्रय करून कालांतरीं तें तसेंच भासतें. त्यालाच त्यानें स्वरूपामध्यें स्मृति असें नांव दिलें आहे. ज्याप्रमाणें भ्रांत अनुभवामध्यें अविद्यमान दृश्य भासतें तसेंच स्मृतीमध्येंहि अविद्यमान वस्तुच भासते. मृगजळ वस्तुतः नसतांनाहि स्पष्ट दिसतें. सत्य सर्वात्म्यामध्यें असलेल्या सुसंविदा जशा भासतात, त्या तशाच अभ्यासानें रूढ होतात व सादृश्यामुळें त्यांनाच स्मृति असें म्हटलें आहे. सर्वात्म्यामध्यें उत्तम संविदा काकतालीयन्यायानें भासतात. त्या सर्वभूत असून स्वतःच स्वरूपामध्यें स्थित असतात. त्यांनाच स्मृति असें म्हटलें आहे. सर्वात्म्याचें जें सद्रूप स्वाङ्ग तेंच स्फुरत असतें. तेंच अभ्यासविषयाच्या सादृश्यतेमुळें विद्वानांकडून स्मृति म्हणून म्हटलें जातें. हेतु असला तरी किंवा नसला तरी वायूच्या स्पंदाप्रमाणें ज्या संविदा अभ्यासानें रूढ होतात, त्यांना सादृश्यामुळें स्मृति म्हणतात. काकतालीयन्यायानें ज्या संविदा भासतात त्यांना स्मृति हें नांव दिलें आहे. जसे हे तुझे अवयव मनाचें तिकडे अवधान असल्यास तुला भासतात, नसल्यास भासत नाहींत, तोच न्याय या स्मृतीला लागू आहे. सर्व संविदा सर्वात्मक असून त्या स्वरूपामध्यें स्थित आहेत. यास्तव स्वप्न, इंद्रजाल इत्यादिकांतील मिथ्याज्ञानमय पदार्थ व स्मृतिमय पदार्थ यांचें मूळ काय आहे, याचा विचार करावा. दृश्याचा असंभवच असल्यामुळें ज्ञानी पुरुषाला त्याची स्मृतिच होत नाहीं. तत्त्ववेत्ता तसाच निर्विकार असतो. त्याच्या दृष्टीनें ही जगत्स्थिति चिदाकाशरूप आहे. अज्ञ पुरुषाला मात्र हें दृश्य, जसें दिसतें तसेंच आहे, असें भासतें. त्याला मोक्षाचा उपाय कसा सांगावा व त्याची स्थिति कशी असते हें मला कळत नाहीं. म्हणूनच दैववशात् साधनचतुष्टयसंपन्न होऊन संदेहामुळें जिज्ञासु होईपर्यंत त्याला गुरूनें मोक्षकथा सांगावी. दृश्य, त्याची स्मृति व त्याचें चिंतन, हें सर्व शांत होईपर्यंत त्याला मोक्षोपाय सुचवावे. अविद्या, मोह व अज्ञत्व यांचा तत्त्वतः अगदींच असंभव असल्यामुळें अज्ञांचा निश्चय आम्हांला कधींच कळणें शक्य नसतें. जो ज्याचा विषय नसतो त्याचा त्याला कधींच अनुभव येत नाहीं. सूर्याला रात्रीचा अनुभव कसा येणार सांग. रामा! अंतःकरणोपहित चिन्मात्रामध्यें बाह्य वस्तूच्या स्वरूपासारखें जें कांहीं भासतें त्याचाच पुनः पुनः व्यवहारानें अभ्यास केल्यास तशा पदार्थाच्या सादृश्यामुळें चित्त भावनायुक्त होणें, यालाच संस्कार असें म्हणतात. पण आत्मस्वभावभूत चिदाकाशरूप सर्व काल्पनिक पदार्थांचा आभास जरी झाला तरी वस्तुतः ते पदार्थ अवस्थित नसतात. त्यामुळें तत्त्ववेत्त्यांच्या ठिकाणीं त्यांचे संस्कारहि संभवत नाहींत. याप्रमाणें जगत् केव्हांच व यत्किंचित्‌हि संभवत नाहीं. तृषित हरिणाला दिसणारें जल वस्तुतः नसतें. अर्थात् जसा स्वप्नामध्यें तसाच सृष्टीच्या आरंभीं हा प्रपंच भासतो ही गोष्ट सिद्ध झाली. चिदाकाशच 'सर्ग' ह्या पर्यायनांवानें स्वरूपांत स्थित आहे. चिदाकाशच हें असें भासतें आहे. तथापि तें आपल्या स्वरूपापासून च्युत होत नाहीं. आपोआपच आत्म्यामध्यें स्फुरण पावून तें सद्रूप असल्यासारखें दिसतें. सृष्टीच्या आरंभींच स्फुरलेल्या चित्त्वांत तें मिथ्या स्फुरणाचा

अनुभव घेत राहिलेलें आहे. यास्तव हें हेय व उपादेय या रूपानें जरी भासत असलें तरी त्याला योग्य कारण नाहीं व योग्य प्रदेश नाहीं. त्याला खरा आकारहि नाहीं. त्यामुळें स्मृतिरूप असेंहि कोठेंच कांहीं नाहीं. कारणाच्या अभावामुळें परमात्म्याचें हें स्वरूप भासत आहे. त्याच्या आकारत्वामुळें जें दुःख होतें तेंच स्मरणानेंहि होतें. म्ह० भार्या, पुत्र इत्यादिकांच्या साक्षात् मरणामुळें होणारें जें दुःख तें त्यांच्या स्मरणामुळेंहि होतें. पण तें दोन्ही प्रकारचें दुःख असत् आहे. यास्तव बंध म्हणून कांहींच विद्यमान नाहीं. भूताकाशासारख्या चिदाकाशांत हें शून्यच यथास्थित आहे. तें आपलें स्वरूप न टाकतांच भुवन, सूर्य, पर्वत इत्यादि रूपानें दिसतें. उग्र दिशा, काल, इत्यादिरूप हें जगत् जसें अज्ञदृष्टच्या स्थित आहे, त्याप्रमाणें चिदाकाशाच्या उदरांत, आपलें मूळ चिदाकाशस्वरूप न सोडतांच, स्थित आहे. स्वानुभव हेंच एक याविषयीं प्रमाण आहे. जीवाचें हें स्वप्ननगर आहे. चित्तत्त्वामध्यें पृथिव्यादि कांहीं नाहीं. मग जगांत भासणारे हे पृथिव्यादि पदार्थ कोठून आले? तस्मात् जें कांहीं भासत आहे, तें आत्म्यामध्यें केवल शांत चिदाकाशच आहे. सृष्टीच्या आरंभीं व स्वप्नकालीं पृथिव्यादिकांचा संभव कोठचा ? ब्रम्हसत्ता आपल्या स्वरूपामध्यें स्वरूपानेंच जगद्रूपानें उदय पावून नंतर सत्यार्थ देणाऱ्या पृथिव्यादिकांचीं नांवें रूढ करते. याप्रमाणें पृथिव्यादिकांचा असंभव असल्यामुळें हें जगत् स्मृतिरूप नाहीं, साकार नाहीं, भ्रांतिरूप नाहीं, विवर्त नाहीं, तर केवल ब्रम्हरूप आहे. हें ब्रह्मच सुंदर जगद्रूपानें भासतें. सृष्टि व प्रलय या दोन्ही अवस्थांमध्यें तें आपल्या अविकृत स्वभावामध्यें स्थित आहे. तें एकरूपच असून दृश्यासारखें जरी भासलें तरी शुद्ध आकाशरूपच आहे, तथापि अज्ञांना अनादि कालापासून प्रलयसर्गरूपानें उदय पावलेलें दिसत आहे. १७२

---

## सर्ग १७३ वा.

१ चित्‌लाहि जडभाव कसा येतो व तिला सर्वात्मकत्व कसें, याचें प्रतिपादन.

**श्रीरामः**—सर्वानुभवरूप व सर्वात्मक अशा या अनंत आत्मतत्त्वाला देहाच्या ठिकाणींहि ‘ अहं ’ असा भाव ठेवण्याचें काय कारण होतें ? तसेंच चित् जर सर्वात्मक आहे, तर तिला हा काष्ठपाषाणादिभाव कसा नाहीं ? व तो कां नाहीं व जर असेल तर कसा आहे ?

**श्रीवसिष्ठः**—रामा ! सर्व शरीराची अहंरूपानें एकसारखीच प्रसिद्धि असतांना ज्ञात्यालाच हात ह्मणणें, पायालाच पाय ह्मणणें, हाताला पाय न ह्मणणें, पायाला हात न म्हणणें, इत्यादि व्यवस्था अनादि संस्कारांमुळें जशी सिद्ध आहे; त्याप्रमाणेंच देहाच्या देहत्वाविषयीं व अहंत्वादिकांविषयीं आग्रह आहे असें समजावें. सर्वात्म्यालाहि ‘ देहच मी ’ असा आग्रह अनादि संस्कारानेंच होतो. वृक्षाचा आपल्या पानांमध्यें पत्रत्वाविषयीं जसा आग्रह असतो, त्याचप्रमाणें सर्वात्म्याला वृक्षांतील वृक्षत्वाविषयीं आग्रह असतो. आकाशाला आपल्या शून्यांतील शून्यत्वाविषयीं जसा आग्रह असतो, त्याप्रमाणें सर्वात्म्याला द्रव्यांतील द्रव्यत्वाविषयीं आग्रह असतो. स्वप्नांतील नगराचें उपादान कारण निराकार चित्तत्त्व आहे. तथापि त्या नगराच्या साकारतेविषयीं स्वप्नद्रष्ट्याचा जसा आग्रह असतो, त्याप्रमाणें सर्वात्म्याचा स्वप्न, जागृति इत्यादि तीन विषयांविषयीं आग्रह आहे. ज्याप्रमाणें

श्रेष्ठ पर्वतांमध्यें पाषाण, वृक्ष, जळ इत्यादिकांविषयीं आग्रह दिसतो, त्याप्रमाणें सर्वात्म्याचा श्रेष्ठ पर्वत, नगर, इत्यादिकांविषयीं आग्रह असतो. शरीराचा केंस, नखें इत्यादिकांविषयीं जसा आग्रह असतो, त्याप्रमाणेंच सर्वात्म्याचा काष्ठ—पाषाणादिकांविषयीं आग्रह असतो. स्वप्नामध्यें चित्‌लाच काष्ठपाषाणादिरूपत्व जसें प्राप्त होतें, त्याप्रमाणें सृष्टीच्या आरंभीं चिदाकाशाला अवयवादित्व प्राप्त होतें. पुरुषाचें चेतनाचेतनरूप एक शरीर जसें असतें, त्याप्रमाणें नख, केंस, जल, आकाश, धर्म इत्यादि आकारांनीं हें जगत् भासुर झालें आहे. सर्वात्म्याचें चेतनाचेतनात्मक एक जंगम व स्थावर शरीर जरी दिसलें, तरी तें नित्य, निराकार आहे. स्वप्नामध्यें स्वप्नद्रष्ट्याला या दृष्ट पदार्थांचा जसा भ्रम होतो, त्याप्रमाणेंच अज्ञ पुरुषाला जगाचा भ्रम झाला आहे. पण ज्ञानी पुरुषाला हें जगत् जसेंच्या तसेंच दिसत असलें तरी तें शांत होतें. हें सर्व चिन्मात्र आकाशच आहे. कोणी द्रष्टा नाहीं व दृश्यहि नाहीं. स्वप्नद्रष्ट्याला प्रातःकाळीं सर्व स्वप्नपदार्थ जसे भ्रामक वाटतात, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाला हें सर्व चिन्मात्र आकाशच आहे, असें निश्चयानें कळल्यावर त्याची दृश्यता पार नाहींशी होते. समुद्रांतील जलतरंगांप्रमाणें चिदाकाशांत अनंत कल्पकोटीपर्यंत तेच ते किंवा निरनिराळे सर्ग येतात किंवा जातात. समुद्रांमध्यें जलाचेच ऊर्म्यादि अनेक आकार जसे स्फुरतात, त्याप्रमाणें चित् आपल्या चेतन स्वरूपांत सर्गादि संज्ञा करते. हें विश्व जसें दिसत आहे तसेंच तें सर्वदा अनामय ब्रम्ह आहे, असें तत्त्वज्ञ जाणतो. पण अतत्त्वज्ञ जनतेला त्याविषयीं कांहींच निश्चय करतां येत नाहीं. मी तरंग नसून जल आहे, असें ज्या तरंगानें युक्तितः जाणलें त्याला तरंगत्व कोठचें ? तरंगत्वाप्रमाणेंच या ब्रह्माचें इतस्ततः आभान होत असतें. तरंगत्व व अतरंगत्व या दोन्ही ब्रम्हाच्या शीतस्वप्नाप्रमाणें त्यांचें अन्योन्य धर्माध्यासानें ज्ञान होतें. हे रामा ! हें जें मन तोच पितामह ब्रह्मा म्हटलेला आहे. याप्रमाणें तो आद्य प्रजापति निराकार व निरामय आहे. चिन्मात्ररूप संकल्पनगराप्रमाणें तो कारणरहित आहे. ज्या सोन्याच्या बाहुभूषणानें आपणाला बाहुभूषणत्व नाहीं असें जाणलें त्याला अंगदत्व कोठचें ? त्याची शुद्ध सुवर्णताच सिद्ध होते. संकल्पमात्ररूप चिदाकाशदेहानें युक्त असलेल्या प्रजापतीच्या ठिकाणीं मी, तूं, जगत् इत्यादि जें भासलें तेंच तें रूढ झालें. चिदाकाशांत जे शून्यरूप चिच्चमत्कार भासतात, त्याच या सृष्टि-संहार-स्थितिरूप भ्रमसंविदा आहेत. स्वच्छ चिन्मात्र आकाशाचें तें स्वाभाविक स्फुरण आहे. तें स्वप्नासारखें चित्ततामात्र आहे. तोच हा प्रपितामह होय. जसा तरंग तरंगाच्या आकारानें किंवा जलाच्या आकारानें सतत स्फुरतो, तसाच हा आदि-अंतशून्य सर्ग-प्रलय-भ्रम आहे. चिदाकाशाचें जें सुंदर स्फुरण त्यालाच विराट् हें नांव प्राप्त होतें. त्या विराटाचें मन म्ह० हिरण्यगर्भहि जें भुवन, भूतसमूह इत्यादि करतो, तें सर्व संकल्पनगराप्रमाणेंच असतें. सर्ग स्वप्न आहे, जागृतिहि स्वप्न आहे, देहहि स्वप्नच आहे. जसें घन सुषुप्त, निद्रातिशयरूप तैमिर्यामुळें स्वप्नसंवेदन होतें, त्याप्रमाणें प्रलयकालीं अविद्यातिमिरानें आच्छादिलेला आत्माच जगत्संवेदन होतो. त्या विराड्रूप परमात्म्याचे कल्पांत हीच चतुर्मुखाची रजनी, तीच त्याच्या केशरूपानें उदय पावली आहे. प्रकाश व अंधकार म्ह० दिवस व रात्र याच त्याच्या कालक्रियासंज्ञक अंगसंधि आहेत. अग्नि हें त्याचें मुख आहे. द्युलोक हेंच मस्तक आहे, आकाश नाभि आहे;

पृथ्वी चरण आहेत; चंद्र व सूर्य हे नेत्र आहेत; पूर्व व पश्चिम या दिशा श्रोत्र आहेत. अशा रीतीनें मनःकल्पनाच विराडाकारानें विकास पावली आहे. याप्रमाणें उत्तम प्रकारें दिसणारा आकाशात्मा विस्तृत आकारवान् विराड् आमच्या संकल्पपर्वताप्रमाणें स्वप्नाकारानें स्थित आहे. चिदाकाशामध्यें जें चित् स्वतःच चमकतें तेंच हें जगत् होय. अशा रीतीनें त्यानें आपलाच अनुभव घेतला आहे. याप्रमाणें चिन्मय आकाशच विराडात्मा असून तोच जगद्रूपानें विस्तारला आहे. हें पर्वत, नाग इत्यादि विविधरूपानें भासणारें जगत् स्वाभाविक स्वप्ननगर आहे. अनुभव घेणारा चिदात्माच स्वरूपाला म्हणजे आपल्या सत्य स्वानुभावालाहि मायावरणानें असत् असल्याप्रमाणें करून परिच्छिन्न प्रपंचभावानें त्याचा अनुभव घेतो. स्वप्नांतील नट स्वात्म्यालाच स्वतःहून भिन्न अशा प्रेक्षकजनांनीं परिपूर्ण अशा स्वप्नदेशाची कल्पना करून त्यांत आपलें नाटक स्वतःच जसा अनुभवितो, त्याप्रमाणेंच हा चिदात्मा स्वरूपालाच जगद्रूप पहातो.

रामः—शुद्ध ब्रह्मपर, सर्वज्ञ ईश्वरपर व उपासनापर, वेदांती, जैन, सांख्य, योगी, बौद्ध, पाशुपात, वैष्णव व असेच आणखी दुसरेहि जगांतील वादी आपआपल्या दर्शनामध्यें जशा जशा वासनांचें प्रतिपादन करीत असतात, तसें तसेंच ब्रह्म स्फुरण पावतें. त्यांना त्यांच्या त्यांच्या आत्मनिश्चयाप्रमाणें सर्व फल प्राप्त होतें. या ब्रह्माचा असाच महिमा आहे. त्यामुळें तेंच मायाशबलरूपानें सर्वात्मक आहे. १७३.

# सर्ग १७४ वा.

१ जागृतीन स्वप्नाचें जसें मार्जन करावें, त्याप्रमाणें ज्ञानानें दृश्याचें मार्जन केल्यावर अवशिष्ट राहिलेला एक चिदात्माच परम पद आहे असें वर्णन.

श्रीवसिष्ठः—ज्या अर्थीं सृष्टीच्या आरंभीं केवल चित्च स्वप्नवित्—संविदेनें जगद्रूपानें भासते असें आम्हीं सिद्ध केलें आहे, त्या अर्थीं जगत्त्रय ब्रह्मच आहे असा प्रबोध झाला असतां कैवल्य सिद्ध होतें. सर्ग हे ब्रह्मसागराचे तरंग आहेत. त्यांत संवेदन हाच द्रव आहे; अशा ज्ञानानें अज्ञ जनांना प्रसिद्ध असलेल्या दुःखात्मक सर्गाचा बाध केला असतां जीवन्मुक्तांच्या व्यवहारासाठीं जें जगत् अवशिष्ट रहातें, तें आनंद-सच्चिद्-एकरस असल्यामुळें निराळेंच जगत् होय. त्यांत द्वैत व ऐक्य याहून निराळें असुखरूप कोणत्या कारणानें संभवणार? ज्याप्रमाणें स्वप्न व सुषुप्त हें एक निद्रारूप आकाशच असतें, त्याचप्रमाणें दृश्यादृश्यांशरूप हें एक चिदाकाशाचेंच स्वरूप आहे. जागृतीमध्यें जसें स्वप्ननगर तसेंच तें जगत् आहे असें कळल्यावर त्यामध्यें विवेक्याची आस्था कशी असणार? सृष्टीच्या आरंभीं सृष्टीचें ज्ञान यथाभूत पदार्थवेदनामुळें होतें. पण वस्तुतः जागृतीमध्यें जसें स्वप्ननगर तसेंच तें जगत् होय. जागृतीमध्यें स्वप्ननगराच्या विविध वासना जरी सत्यशा भासल्या तरी त्या जशा सत्य नव्हेत, त्याप्रमाणेंच जागृतींतील भोगवासना सत्य नव्हेत. आतां जगाचा तत्त्वज्ञानानें बाध होतो असें न मानतां इतर वाद्यांच्या संकेताप्रमाणें प्रधान, परमाणु इत्यादि कारणांची कल्पना केली व हें जगत् सत्य आहे असें मानलें, तरी त्यापासून दुःख होणारच; मग

श्रुतीला सोडून पुरुषकल्पनेचें प्रमाणत्वानें ग्रहण करण्यांत तरी कोणता लाभ ? इतर कल्पनांहून जगाला स्वप्नांतील जगाप्रमाणें मानणें ही कल्पना मनांत शीघ्र उपस्थित होते. त्यामुळें ती इतर सर्व कल्पनांहून समीप आहे. यास्तव जगाची भ्रांतिमात्रताच कां कल्पूं नये ? सर्व विकार शब्दमात्र आहे (वाचारंभणं.... ) अशा अर्थाच्या श्रुतीनें प्रदर्शित केलेल्या न्यायानें विचार केला असतां घट-पटादि पदार्थ मृत्तिका तंतु इत्यादि उपादान कारणांहून भिन्न दिसत नाहींत. अर्थात् पदार्थांविषयीं आपली ही भ्रांति प्रत्यक्ष सिद्ध आहे. मृत्तिकेहून घट निराळा आहे व तंतूहून पट निराळा आहे, असें आपल्याला प्रत्यक्ष दिसतें आणि प्रत्यक्ष अनुभवाच्या अपेक्षेनें अनुमान प्रमाण अधिक प्रबल आहे, असें कोठेंहि अनुभवास येत नाहीं. तेव्हां प्रधान, परमाणु इत्यादि अनुमित जगत्कारणांची स्थिति कशी होणार ? शिवाय जगत् स्वप्नांतील पर्वताप्रमाणें भ्रांतिरूप आहे, याविषयीं प्रत्यक्ष प्रमाणहि आहे. कारण हा जीव आपल्याला इष्ट असलेलीच वस्तु उत्पन्न करण्यास व अनिष्ट असलेल्या वस्तूचें निवारण करण्यास समर्थ नाहीं. आपण पूर्वी ज्याचा निश्चित विचार केलेला असतो, तेंच आपल्याला स्वप्नांत दिसतें, असा नियम नाहीं; तर अकस्मात् वाटेल ती वस्तु आपल्याला दिसते. सृष्टि दुसऱ्या कारणांच्या अधीन जर असती, तर लोकांनीं तसल्या कारणसंपत्तीनें साध्य होणाऱ्या इष्ट वस्तूलाच उत्पन्न केलें असतें, अनिष्टाचें निवारण केलें असतें व आकस्मिक जगत् पाहिलें नसतें. अर्थात् परमाणु-प्रधानादि कारण मानल्यानें या तीन गोष्टींची उपपत्ति लागत नसल्यामुळें स्वप्नांतील पर्वताप्रमाणें जगत् ही भ्रांतिच आहे, ही गोष्ट सिद्ध झाली. 'निर्विकल्प समाधीपर्यंत केलेल्या नुसत्या ध्यानानेंच, जगद्बाध केल्यावांचूनच, संसाराचें निरसन होतें' असें जें योगी मानतात तेंहि बरोबर नाहीं. चित्ताला निर्विकल्प समाधि जरी झाली तरी तें अत्यंत जाड्यच होय, व चित्त सविकल्प झालें कीं तोच संसार होय. त्यामुळें आत्म्याचें ध्यान व समाधि जरी सिद्ध झाली तरी त्यापासून पुरुषार्थरूप कांहींच संभवत नाहीं, असें होतें. ह्मणजे मोक्षामध्यें अवशिष्ट राहणारें जें आनंदरूप ज्ञान तो मोक्ष नव्हे. विकल्पात्मक संसार व विकल्पशून्य ध्यान ही पाषाणासारखी स्थिति आहे. आत्मा पाषाणासारखा आहे, असें समजणें हा मोक्ष नव्हे. त्यामुळें विकल्पात्मक चित्त हा बंध जरी असला तरी नुसतें ध्यान हें मोक्षाचें साधन नव्हे. अहो! दगडासारख्या निर्विकल्प समाधीनें दुसरें काय प्राप्त व्हावयाचें आहे ? आपल्या निद्रेपासून आपल्याला कोणता पुरुषार्थ प्राप्त होतो ? अर्थात् योग्यांचें हें सर्व म्हणणें असंगत आहे. आत्म्याला ज्ञानस्वभाव न मानणाऱ्या वैशेषिकादिकांना अभिमत असलेला मोक्षहि योग्याच्या मोक्षाप्रमाणें पुरुषार्थ होऊं शकत नाहीं. सांख्यांना अभिमत असलेल्या पुरुषाचीहि हीच स्थिति आहे. निर्विकल्प समाधीपर्यंत केलेल्या ध्यानानें चित्ताचें चांचल्य निवृत्त होईल यांत संशय नाहीं, पण अज्ञानावरणाची निवृत्ति होणें शक्य नाहीं. यास्तव इतर सर्व पक्षांवर अनिर्मोक्ष प्रसंग हा दोष येतो. म्हणून या जगाला भ्रांतिमात्रच मानलें पाहिजे. विवेकी पुरुषाला आत्मसाक्षात्कार झाला म्हणजे जगत् भ्रांतिमात्र आहे, असा निश्चित बोध होऊन सृष्टीचा अत्यंत असंभव झाल्यामुळें जीवन्मुक्ततेचा जो उदय होतो, तेंच आमचें निर्विकल्प समाधान होय. त्यालाच अनंत निर्वाण किंवा मोक्ष असें आम्ही म्हणतों. यत्किंचित्‌हि क्षुब्ध न होतां

स्वरूपामध्यें यथास्थित सर्वप्रकाशरूपानें स्थिर होणें हेंच 'अनंत सुषुप्त' या नांवाचें तुरीय आहे. त्यालाच निर्वाण ह्मटलें आहे. त्यालाच मोक्ष हें नांव आहे. सम्यग्-बोधाची जी एकरूपता त्यालाच ध्यान असें म्हटलें आहे. दृश्याचा अत्यंत असंभव या स्वरूपाचा जो बोध तेंच परमपद होय. तें योगी किंवा इतर वादी समजतात त्याप्रमाणें पाषाणासारखें जाड्य नव्हे. त्याला सुषुप्तोपम म्हणतां येत नाहीं. तें निर्विकल्पहि नव्हे व सविकल्पहि नव्हे किंवा असत्‌हि नाहीं. जें दृश्याचें अत्यंत असंभवरूप तेंच वेदन होय. तेंच सर्व आहे व तेंच कांहींहि नाहीं. रामा ! तें आपल्यालाच जगद्रूपानें पहातें. सम्यग्ज्ञानानें परम निर्वाण प्राप्त होतें असें म्हटलें आहे. तें जसेंच्या तसेंच स्थित आहे. तथापि त्यामध्यें 'हें विश्व' हा मिथ्या प्रत्यय येत असतो. त्यांत नाना असें कांहीं नाहीं. सर्व सदसद्भावांचा तो सीमांत ह्मणून म्हटलेला आहे. ज्याप्रमाणें पट सत् आहे किंवा असत् आहे या कल्पनेची सीमा कापूस, कापसाच्या सदसद्कल्पनेची सीमा सरकी, सरकीची सीमा पृथ्वी, त्याचप्रमाणें पृथ्वीची सीमा जल, जलाची सीमा तेज, तेजाची सीमा वायु, वायूची सीमा आकाश, आकाशाची सीमा अव्याकृत म्हणजे माया, व अव्याकृताची सीमा केवल चिदात्माच आहे. दृश्य अत्यंत असंभवनीय आहे असें समजून सर्वविक्षेपशून्य निरतिशय आनंदरूपानें रहाणें, शुद्ध बोधाचा उदय झाल्यानें शांत असणें, यालाच परमपद व परम पुरुषार्थ असें तूं समज. तो शुद्ध बोध या शास्त्राच्या द्वारा पदपदार्थज्ञानानें उत्पन्न झालेल्या शुद्ध बुद्धीनें प्राप्त होतो आणि तो शुद्ध बोध हेंच सर्वोत्तम ध्यान आहे. मोक्षोपाय या नांवाचें हें शास्त्र मुमुक्षूनें नित्य पठण करावें. कारण अध्यात्मशास्त्रजन्य ज्ञान, याच शुद्ध उपायानें मोक्ष प्राप्त होतो. तीर्थानें नाहीं, दानानें नाहीं, स्नानानें नाहीं, ब्रम्हविद्यातिरिक्त विद्येनें नाहीं, ध्यानानें नाहीं, योगानें नाहीं, तपांच्या योगानें नाहीं व यज्ञानेंहि साध्य नाहीं. सत् व असत् यांप्रमाणें दिसणारें हें सर्व खरोखर भ्रांतिमात्र आहे. हा जगदाकार आकाशच आहे. निद्रारहित चिदाकाशांतील तें स्वप्न आहे. कोणतीहि भ्रांति तप व तीर्थें यांनीं शांत होणें कधींच शक्य नाहीं. तप, तीर्थ इत्यादिकांच्या योगानें स्वर्ग प्राप्त होतात; मोक्ष प्राप्त नाहीं. शुद्धबुद्धीनें अवलोकन केलेल्या शास्त्रार्थानेंच भ्रांति शांत होते. आत्मज्ञानमय मोक्षोपायानेंच गेथें पुरुषार्थप्राप्ति होते, दुसऱ्या कोणत्याच उपायानें होत नाहीं. सूर्योदयानेंच कृष्णपक्षांतलि रात्रि निवृत्त होते. त्याच न्यायानें सर्वत्र प्रकाश करणाऱ्या शुद्ध शास्त्रार्थानेंच सर्व भ्रांति पूर्णपणें शांत होते. वायूंतील स्पंदनाप्रमाणें व जलांतील द्रवत्वाप्रमाणें चिदाकाशांत उत्पत्ति, स्थिति व संहार यांचे प्रतिभास होतात. ज्याप्रमाणें वटबीजादि द्रव्याच्या हृदयांत वटाकार धारण करणें हा चमत्कार असतो, वायूमध्यें स्पंद हा चमत्कार असतो, त्याप्रमाणें मायाशबल चिदाकाशांत ही यथास्थित असलेली जगाची सृष्टि व तिची स्थिति अनन्यरूप असते व ती चिदाकाशांतच लय पावते. १७४.

---

# सर्ग १७५ वा.

१ जोंवर अज्ञान आहे तोंवर चित्‌च कारणावांचून जणुंकाय जगत् भासते, व २ शास्त्रानें अज्ञानाचा अपहार केला असतां तीच मुक्ति, असें वर्णन.

श्रीवसिष्ठः—आद्य चिदाकाश आपल्या अविद्येनें स्वप्नासारखें होऊन जीवभावानें संसार करीत असतां 'मी देव आहें, मी मनुष्य आहें' इत्यादि सर्व संविदांचें कारण आहे. पण ही जीवोपाधि सिद्ध होण्यापूर्वीं महाप्रलयामध्यें स्वप्नतुल्यत्व प्राप्त झालें असतां दृश्यरूप अन्यत्वाचा असंभवच असतो. कारण त्याचें कांहीं निमित्तच संभवत नाहीं. तेव्हां तें दृश्य त्या चिदाकाशाचें शरीर कोणत्या निमित्तानें होणार? सृष्टीच्या आरंभीं स्वप्नसंविद्रूपानेंच सर्व सृष्टीची सिद्धि होते. दुसऱ्या कोणत्याहि कारणानें त्याची सिद्धि होत नाहीं. हा सर्ग व परलोक आहे असें जरी वाटत असलें, तरी तो प्रमाणानें सिद्ध होत नाहीं. हा मिथ्या अनुभव आहे. जगत् कारणावांचूनच भासत आहे. जगांतील विषयानुभव स्वप्नांतील विषयसुखाप्रमाणेंच आहेत. त्या सर्वांमध्यें एक शांत चिदाकाशच आहे. हा शुद्ध आदि-अंतशून्य चिद्धातु अशा प्रभावानेंच युक्त आहे. म्हणजे जो स्वरूपामध्यें जगत् भासवितो, तो जगच्छून्यरूप निर्मल चिद्धातुच आहे. हा परमात्मा जोंवर साक्षात् ज्ञात झाला नाहीं, तोंवर तो मल म्ह० अविद्या आहे; पण त्याचें साक्षात् ज्ञान झालें कीं तोच निर्मल ब्रम्ह आहे. तो अविद्यावस्थित होऊन संसार करीत असल्याप्रमाणें व पृथक् असल्याप्रमाणें भासतो. आदिअंतशून्य परमाकाशांत मल कोठून असणार? हें जें शुद्ध वेदन, तेंच स्वप्नांतील नगर होय व तेंच जगत् आहे. सृष्टीच्या आरंभीं पृथिव्यादिकांचा संभव कोठचा! चिदाकाशरूप आत्म्याचा जो अवभास तीच सृष्टिकल्पना होय. पृथिव्यादि किंवा मनोबुद्ध्यादि कल्पना त्याच्या ठिकाणींच होते. चिदाकाशांत हें जगत् जलांतील तरंगांप्रमाणें, वायूंतील स्पंदाप्रमाणें व निराधार चित्राप्रमाणें अबुद्धिपूर्वक भासत आहे. जगद्भावानंतर जीवभावानें त्यांत प्रवेश करून 'मी हिरण्यगर्भ आहें, भुवनांचा स्त्रष्टा आहें.' इत्यादि आपलें ऐश्वर्य प्रकट करणाऱ्या त्यानें बुद्ध्यादिक व पृथिव्यादिक नामरूप व्यक्त करणें ही कल्पना केली. ती कल्पना मूर्तामूर्तप्रचुर किंवा सत्य व मिथ्या यांच्या मिश्रणरूप आहे. ही स्वच्छ महाचिति स्वतःच स्फुरण पावते. ती तिचीच छाया आहे. तिलाच सर्ग हें नांव आहे. ती जगच्चित् आकाशच आहे, इतर कांहीं नाहीं. रामा! वस्तुतः येथें कांहींच स्फुरत नाहीं. ती स्वच्छ चितिच सांगितली आहे. जें चिन्मात्रलक्षण एकच एक स्फुरण, तेंच अशा रीतीनें स्वरूपांत पसरलें आहे. चिदाकाशांत हें चिदाकाशच आहे. तिचें हें परिपूर्ण स्वरूप आहे. स्वप्नामध्यें चित्तच जसें स्वप्नाप्रमाणें भासतें, त्याप्रमाणें चित्तच हें जगत् होऊन राहिलें आहे. दुसऱ्या कोणत्याहि प्रकारानें कोणत्याहि वाद्याला या सृष्टीची उपपत्ति सांगतां येत नसल्यामुळें व सृष्टीच्या आरंभीं स्वात्माच चिदाकाशरूप दृश्य पहात असल्यामुळें स्वप्नाप्रमाणें तें सर्वधर्मशून्य आहे. त्यांत खरेपणा यत्किंचित्‌हि नाहीं. यास्तव चिद्व्योम म्ह० चिदाकाश हें त्रिकालीं चिदाकाशच आहे, आकाशादिकांप्रमाणें त्याला शून्यत्वच आहे. जें सर्वरूपरहित परब्रह्म तेंच एक अशा सर्व जगद्रूपानें स्थित आहे. आपल्याला स्वप्नाचा अनुभव येतो त्यांत आपण आत्म्याला स्वप्नरूप पहातों. तें एकच एक निर्मल ब्रह्म असतांना अनेक वस्तूंच्या आकारानें स्फुरतें. ब्रम्हच चिद्भावामुळें

आपल्या स्वरूपांत जीवत्वाची मिथ्या कल्पना करतें. आपल्या स्वच्छ स्वरूपाचा त्याग न करतांच तें जणुं काय मनस्त्वाला प्राप्त होतें. जणुं काय तेंच मन समष्टिरूपानें हें सर्व विस्तारतें. पण तें त्रिकालीं आकाशरूप आकाशच असतें. तें अविकारी असूनहि विकारी असल्यासारखें भासतें व जणुं काय जगत् बनतें. समष्टि मन हाच स्वतः हिरण्यगर्भ आहे. तोच या जगाच्या हृदयामध्यें स्थित आहे. तोच सतत हें सर्व करतो व सतत त्याचा संहारहि करतो. पृथिव्यादिकांनीं रहित असलेला तो मनोरूप ब्रह्मदेव अंगरहित अशा आपल्या हृदयांतच स्वतः स्थित आहे. तोच त्रिजगद्रूप होऊन स्वतः भासतो. स्वप्नामध्यें जसें निराकार दृश्यस्फुरण होतें, त्याप्रमाणें तो आपल्या अविद्येनें पूर्णभावाच्या पराभवाला प्राप्त होऊन, तोच मनोरूप ब्रह्मा 'अहं' आकारानें व देहजगद्रूपानें अनंतरूप होऊन बोधाबोधरूपानें स्थित होतो. येथें पृथिव्यादि नाहीं, देह नाहीं व इतर दृश्यताहि नाहीं. जगद्रूपानें केवल हें मन स्फुरत आहे. विचारदृष्टीनें पाहिल्यास हें मनहि कांहींच नाहीं. तर केवल अत्यंत घन चिन्मात्रच स्वरूपामध्यें स्वरूपानेंच स्थित असतें. ज्याच्यापासून सर्व वाक्-वृत्ति निवृत्त होतात, व तूष्णीभाव अवशिष्ट राहतो, तो आकाशात्माच व्यवहार करीत असूनहि मुक्याप्रमाणें राहतो. अनंत, अपार, सर्वव्यापी चिन्मात्रलक्षण, परमप्रेमास्पदरूप निरतिशय आनंदघनता स्वतःच सिद्ध आहे. हा प्रबुद्ध पुरुषोत्तम अगदीं मुकाट्यानें बसलेला असतो. ज्याप्रमाणें जलाच्या द्रवत्वापासून आवर्तादिक अबुद्धिपूर्वकच उत्पन्न होतात त्याप्रमाणें ब्रह्माकडून चित्त जसें स्पंदन केलें जातें, त्याप्रमाणें परमात्म्याकडून अनन्य असें बुद्ध्यादिक केलें जातें. वायूपासून अनन्य असेंच अव्यय स्पंदन उत्पन्न होतें. चिदाकाश, ब्रह्म, चिन्मात्र, आत्मा, चिति, महान्, परमात्मा हे सर्व पर्यायशब्द आहेत, असें हे ज्ञान्यांतील श्रेष्ठा, तूं समज. वायुच्या स्पंदास्पंदस्वरूपाप्रमाणें हें जगत् ब्रह्माच्या उन्मेषरूप आहे. याचा जगत् प्रलयात्मक निमेष तसाच सर्गात्मक उन्मेष आहे. याचा उन्मेष हेंच दृश्य व दृश्याचा अभाव हाच निमेष. हें एक निराकार ब्रह्मच त्या दोघांच्याहि क्षयानंतर अवशिष्ट रहातें. निमेष व उन्मेष यांचें एकरूप हेंच परमतत्त्व आहे. त्यामुळें दृश्य आहे असें नाहीं. सत्, असत् इत्यादि सर्व चितिच आहे. निमेष उन्मेषाहून भिन्न नाहीं व उन्मेषहि निमेषाहून भिन्न नाहीं. निमेषोन्मेषरूप व सृष्टिशरीर अशा ब्रह्माहून ते भिन्न नाहींत. यास्तव हें सर्व शांतच यथास्थित आहे, असें तूं जाण. हें जगत् अजात, अजर, सौम्य, ब्रह्मरूपानें समरस व शून्य आहे. चेतनाचेतनात्मक आकाशाचें हें रूप चकाकत आहे. चित्च हें सर्व भासत आहे. जगत् म्हणून ज्याला म्हटलें आहे तें त्याचेंच स्वरूप आहे. दृश्य नाश पावत नाहीं व उत्पन्नहि झालेलें नाहीं. त्याचा अनुभवहि येत नाहीं. तर केवल एक चित्च केवळ आंतल्या आंत स्वतः चमत्कार करते. सूर्याचा प्रकाश हीच जशी उष्णता, त्याचप्रमाणें महाचिदाकाशरूप रत्नाची जी प्रभा तेंच हें दृश्य होय. आपल्या अधिष्ठानाहून अनन्य असलेली ही ती प्रभा अन्य असल्यासारखी भासते. सुषुप्त स्वप्नाप्रमाणें भासतें व ब्रह्मच सृष्टीप्रमाणें भासतें. सर्व एक, शिव, शांत असूनहि, अनेक असल्याप्रमाणें स्फुरत राहिलें आहे. जें जें जसें सत् किंवा असत् कल्पिलें जातें, तसा तसा त्याचा अनुभव येतो; मग ती वस्तु सत् असो किंवा असत् असो. जड जगाच्या परमाणु, प्रधान इत्यादि कारणांची कल्पना केल्यावांचून उपपत्ति लागत

नाहीं, म्हणून म्हणावें तर स्वप्नांतील प्रपंचहि तसाच कांहीं कारणावांचून झाला असें म्हणावें लागेल. पण स्वप्नांत आत्मस्फुरणावांचून कारण दिसत नाहीं, म्हणून त्याच न्यायानें सृष्टीच्या आरंभींहि ब्रह्मच जगद्रूप धारण करतें हा सिद्धांत होय. अप्रमेय व श्रेष्ठ अशा परमात्म्यापासून तद्रूपानें हें जगत् उत्पन्न झालें आहे, म्हणजे अप्रमेय ब्रह्मामध्यें त्याचा अध्यास झाला आहे. त्यामुळें स्वप्नाप्रमाणें त्याची अनिर्वचनीयता सिद्ध होते. अप्रमेयापासून झालेलें हेंहि अप्रमेयच आहे. ज्याचें चित्त ज्याविषयीं रसिक असतें तेंच तें पहात असतें. त्यामुळें ब्रह्माविषयीं रसिक असलेलें मन जगाला ब्रह्मच पहात असतें. मनुष्य सर्वदा ज्यामध्यें चित्त ठेवतो व ज्यावर आपलें जीवित ठेवतो, तीच खरी वस्तु आहे असें तो समजतो व तिचा त्याला स्पष्ट अनुभव येतो. जें मन केवल ब्रह्माविषयीं रसिक असतें तेंच एका क्षणांत तद्रूपच होतें. ज्याचें चित्त ज्याविषयीं रसिक असतें तेंच त्याला विद्यमान् असलेलें दिसतें. ज्या प्राण्याचें चित्त दृढ निश्चयानें ज्यांत विश्रांति पावलेलें असतें त्याला तेंच परमार्थसत्य भासतें. म्हणूनच ब्रह्मवित् जन हे यज्ञदानादिक जें कांहीं करतात तें केवल लोकसंग्रहार्थ करतात. त्यांना तें करण्याची मनापासून इच्छा नसते. द्वित्व-एकत्वादि कोणतीच कल्पना या परमार्थ तत्त्वांत नाहीं. मीं सांगितलेल्या उपायानें जगाकडे जर तूं पहाशील तर हें सर्व सन्मात्रच आहे, ही दृक्च आहे, अशी तुझी खात्री होईल. दृश्य, अदृश्य, सत्, असत्, मूर्त, अमूर्त इत्यादि दृष्टींतील एकहि दृष्टि खरी नव्हे व त्या दृष्टि नाहींत असेंहि नाहीं. अदृश्य ब्रह्मच दृश्य, सत्, असत्, मूर्त, अमूर्त आहे, अशी ज्यांची दृष्टि झालेली असते, त्यांना येथें कर्ता किंवा भोक्ता जीव भासतच नाहीं. पण तो नाहीं असेंहि म्हणवत नाहीं. कारण तोच शेवटीं ब्रह्मरूपानें अवशिष्ट रहातो. याप्रमाणें आत्म्यामध्यें हें अनादि अनंत जगत् पर्यायानें रहातें. पांथांना अरण्यांतील मार्गामध्यें स्थाणूच्या ठिकाणीं चोराची भ्रांति जशी होते, त्याप्रमाणें अज्ञांना जगद्भ्रांति होते. पण तें ब्रह्मैकघन व सर्वतः शांतच आहे. जें हिरण्यगर्भाच्या बुद्ध्यादिरूप जगत् तेंच हें निरंजन तत्त्व आहे. जें शांत व शून्य गगन तेंच हें जगत् आहे. आकाशांत सदसदात्मक केशपुंजादि जसे दिसतात त्याप्रमाणें परमात्मतत्त्वांत बुद्ध्यादिक द्वैतावस्थेला प्राप्त झालेले भासतात. सर्वसामान्यात्मक ब्रह्मामध्यें बुद्ध्यादिक, देहादिक, वेदनादिक, आकाशांतील शून्यत्वाप्रमाणें अनेक असूनहि अनन्य असलेलीं भासतात. झोंपेंतून स्वप्नांत जाणाऱ्या पुरुषाचें जसें एकच निद्रास्वरूप असतें, त्याप्रमाणें स्वर्गस्थ ब्रह्मालाहि द्वित्व नाहीं व एकत्वहि नाहीं. महाचितीची ही अशी स्वच्छ छायाच स्फुरत आहे. वस्तुतः तिला कांहींच स्वरूप नाहीं. कारण ती स्वाभाविक अविद्या आहे. तथापि तीच अशा भासुर जगद्रूपानें भासत आहे. चिदाकाशांत ती आपल्या स्वच्छ स्वाभाविकरूपानें म्ह० चिदाकाशरूपानें स्थित असतांहि स्वप्नाप्रमाणें दृश्य विषयरूपानें भासते. स्वतः तिला कांहींच कारण नसतें. वाद्यांनीं कल्पिलेलें एकहि कारण तिच्या ठिकाणीं संभवत नाहीं. यास्तव चिदाकाश सृष्टीच्या आरंभीं आपल्यालाच दृश्यरूपानें पहातें. सृष्टीच्या आरंभीं स्वात्माच निराकार दृश्यरूपानें भासतो. स्वप्न, संकल्प, मिथ्या ज्ञान, यांतील भ्रमांप्रमाणेंच तो भ्रम आहे. स्वप्नाप्रमाणेंच जगत्हि सर्वधर्मशून्य चिदाकाशच आहे. कारण त्यामध्यें कोणताहि धर्म विद्यमान नाहीं. परमार्थवस्तुभूत चिदाकाशाचा

विकारी आकारहि अविद्यामलामुळें प्रतीत होतो. स्वप्नांतील नगराप्रमाणें प्रतीतितः सधर्मक असलेलेंहि जगत् असधर्मक आहे. त्या शिवस्वरूप परमात्म्याहून तें पृथक् नाहीं, तर अधिष्ठानसन्मात्रच आहे. तथापि अज्ञदृष्टीनें तें निरंतर जगदाकारानें स्थित आहे. हें दृश्य स्वप्नांतील पर्वताप्रमाणें स्वच्छ अधिष्ठानरूप आहे. त्याहून यत्किंचित्‌हि भिन्न नाहीं. त्यामुळें चिदाकाशमात्रत्वानें अवशिष्ट असलेल्या गगनाहूनहि अतिसूक्ष्म आहे. जें सर्वरूपशून्य ब्रह्म तेंच हें यथाभूत जगत् आहे. तें सृष्टिरूपानें स्थित असलें तरी स्वरूपाला सोडीत नाहीं. स्वप्नामध्यें या सर्वांचा अनुभव येतो. स्वप्नांमध्येंच आत्मा नगरादिरूपानें भासतो, पण त्या वेळीं तो वास्तविक नगरादि रचीत नाहीं. स्वप्नांमध्यें ओळख, संस्कार किंवा स्मृति यांतील कशाशीच सत्ता नसते, तथापि त्याचा अनुभव येतो. पण तो अनुभव वास्तविक पदार्थांचा संभव नसतांच येतो. यास्तव असंभवामुळेंच स्मृत्यादिकांची कल्पना टाकून ब्रह्मसंविदेलाच निद्रादि दोषांमुळें अन्यथा भान होतें, असें म्हणणें सयुक्तिक होय. त्या स्वप्नभावाला जागृतींत पाहिलेल्या विषयांचें सादृश्य असल्यामुळें मूढांनीं स्वप्नामध्यें स्मृत्यादिकांची कल्पना केली आहे. सादृश्यावरून तीच ही लाट, तीच ही दीपज्योति इत्यादि प्रत्यभिज्ञेचे अनेक भ्रम होत असतात. त्याचप्रमाणें चिदाकाशांत जगद्भ्रम होत आहे. सर्व विधि व निषेध सर्वदाच ब्रह्मामध्यें विभक्त व विमिश्र असे अज्ञदृष्ट्या आहेत व ज्ञानिदृष्ट्या नाहींत. म्हणून ब्रह्म सत् आहे, सर्वात्मरूप आहे. त्यांत नाहीं असें काय आहे ? ती सत्ताच सर्वात्मक आहे. हेंहि सर्व सदा सर्वात्मकत्वच होय. आपल्या भोंवतीं गरगर फिरणाऱ्या बालकाला सभोंवारचे वृक्ष-पर्वतादि पदार्थ व भूमिहि गरगर फिरत आहे असें भासतें; पण इतरांना तसें भासत नाहीं. त्यामुळें त्या दोघांच्या दृष्टीनें ते दोन्ही अनुभव खरेच आहेत. बालकाचा तो भ्रम निवृत्त होण्यास स्वतः स्थिर होऊन पहाणें हाच उपाय आहे. तसल्या स्थैर्याभ्यासावांचून त्यानें स्वीकारलेली भ्रमणदृष्टि शांत होत नाहीं. त्याचप्रमाणें जगद्विषयक दृष्टिहि अभ्यासावांचून शांत होणार नाहीं. या शास्त्राचा गुरुप्रसादानें व गुरुमुखानेंच अभ्यास करणें यावांचून दृश्य शांतीचा उपाय कोणीं सांगितला नाहीं व कोणी सांगणार नाहीं. चित्ताचा विरोध केल्यानें या दृश्य भ्रमाची शांति होईल, म्हणून म्हणावें, तर तें खरें. पण चित्त जागृति व स्वप्न या दोन अवस्थांमध्यें जिवंत असतें व सुषुप्तीमध्यें लय पावतें. तथापि संसाराला सोडून रहाण्याचें त्याचें शीलच नसल्यामुळें मोठ्या प्रयत्नानेंहि त्याचा निरोध साध्य होत नाहीं. पण या शास्त्राचा अभ्यास केल्यानें ज्ञान होतें व त्या ज्ञानानेंच बाधित झालेलें चित्त पुनः संसाराकडे पहात नाहीं. यास्तव या शास्त्राचा अभ्यास करणें हाच त्याच्या शांतीचा उपाय आहे. जसें चित्त संसाराला सोडून रहात नाहीं, त्याप्रमाणें दृश्यरूप संसारहि चित्त व शरीर या दोहोंना सोडून रहात नाहीं. पण दृश्य व शरीर हीं दोन्ही या शास्त्राचा अभ्यास केल्यानें कांहीं प्रतिबंध नसल्यास या जन्मींच तत्त्वबोध होऊन शांत होतात आणि प्रतिबंध असल्यास परलोकीं किंवा जन्मांतरीं प्रतिबंधाचा क्षय होऊन बोधानें शांत होतात. वायु, त्याचा स्पंद व त्यानें प्रेरित होणारे मेघांचे समूह, हीं सर्व कारणाच्या अभावीं जशीं शांत होतात, त्याप्रमाणें चित्त, दृश्य व शरीर हीं तिन्ही ज्ञानानें शांत होतात. याचें कारण ब्रह्मात्मभावाला आच्छादित करणारी अविद्याच आहे. तें कारण या शास्त्रामुळें

निवृत्त होतें. ज्यांची बुद्धि किंचित् संस्कृत झाली आहे, त्यांनीं या शास्त्राचे प्रश्न केल्यानेंच त्यांची अविद्या शांत होते. पूर्व पूर्व भाग जो कळलेला नसतो तो पुढचा पुढचा ग्रंथ वाचल्यानें कळतो. पदपदार्थाचें ज्याला ज्ञान आहे असा मनुष्य, खिन्न होऊन याच्या अभ्यासापासून जर निवृत्त न झाला, तर त्याला या ग्रंथापासून अवश्य ज्ञान होतें. यास्तव भ्रमाचा क्षय होण्यासाठीं हें शास्त्र हाच उपाय आहे असें तूं समज. हें शास्त्र अनन्यसाधारणत्वास प्राप्त झालें आहे, असा अनुभव येतो. म्हणून या महाशास्त्राचा यथाशक्ति विचार करावा. त्याचे दोन भाग किंवा एक भाग अवश्य वाचावा, म्हणजे दुःखाचा क्षय होतो. हें शास्त्र ऋषींनीं केलेलें आहे. तें स्मृतिरूप आहे, व स्मृतीचें मूळ श्रुति आहे, यास्तव आम्ही श्रुतीचाच विचार करूं, या भावनेनें कोणाला हें शास्त्र न रुचल्यास त्यानें दुसऱ्या उपनिषद्भाष्यादिरूप आत्मज्ञानशास्त्राचाच विचार करावा. पण आत्मज्ञानशास्त्रापासून विमुख होऊं नये. व्यर्थ अविचारानें आपलें वय जाळून टाकूं नये. श्रवणादि उपायानें तत्त्वबोध संपादन करावा व सर्व दृश्य आत्म्याला अर्पण करावें. **आयुष्याचा एक क्षणहि सुवर्णादि राशींसह सर्व रत्नें दिल्यानेंहि मिळणार नाहीं.** पण असें आयुष्य जे वृथा घालवितात त्यांच्या हातून फारच मोठा प्रमाद घडतो. हें दृश्य प्रत्यक्ष जरी अनुभविलें असलें व अंतःकरणोपहित जीवानें युक्त जरी असलें, तरी स्वप्नांत स्वमरण पाहून सभोंवार आपले बांधव रोदन करीत असलेले जरी भासले, तरी तें जसें कांहींच खरें नव्हे, तसेंच मिथ्याच आहे, असा ब्रह्माद्वैतदिग्विजयाचा डिंडिम आहे. १७५.

---

# सर्ग १७६ वा.

—:०:—

१ सृष्टीच्या आरंभीं चिदणूमध्यें ब्रह्मांडें स्वप्नाप्रमाणें भासतात, याविषयीं ब्रम्हदेवानें सांगितलेलें ब्रम्हांडाख्यान.

**श्रीरामः**—हे भगवन्! विश्वें असंख्य आहेत. यापूर्वींहि असंख्य होऊन गेलीं आहेत व पुढेंहि असंख्य होतील. पण त्यांतील वर्तमान सृष्टिच बंध देणारी असल्यामुळें तिचें परिमार्जन करणेंच युक्त आहे. यास्तव भूत-भाविष्यत्कालीन विश्वांची या वेळीं प्रतीतिच येत नसल्यामुळें त्यांला बंधकत्व नाहीं. मग या शास्त्रांत त्याचा वृथा उपन्यास कां केला आहे?

**श्रीवासिष्ठः**—रामा! तुझें म्हणणें जरी खरें आहे, तरी शास्त्राचें श्रवण करण्यास योग्य असलेल्या अधिकारी जनांना जगच्छब्दार्थाचें यथार्थ ज्ञान व्हावें म्हणून शास्त्रांत त्यांचा निर्देश केलेला असतो. तथापि लौकिकदृष्टया हा तुझा आक्षेप योग्य आहे. पारमार्थिकदृष्टया तो बरोबर नाहीं. कारण तत्त्वज्ञाला सर्वत्र 'मीच द्रष्टा आहें' असें साक्षात् ज्ञान झालेलें असल्यामुळें भूत, वर्तमान व भविष्यत् ब्रह्मांडें एकरूप दिसतात. तूंहि जेव्हां तसा ज्ञानी होशील तेव्हां तुला शुद्ध त्रिकालदर्शन प्राप्त होईल. तत्त्ववेत्याची वर्तमान ब्रह्मांडांत किंवा भाविष्यत् ब्रह्मांडांत पुनरावृत्ति होत नाहीं, हें सांगण्यासाठीं त्यांचेंहि स्वप्नदृष्टान्तानें मूलाज्ञान घालवावें लागतें व त्यासाठीं शास्त्रांत सर्व ब्रम्हांडांचें मिथ्यात्व सांगितलेलें असतें. सर्व ब्रह्मांडें स्वप्नप्रपंचासारखीं आहेत. स्वप्नामध्यें आद्य चिन्मात्रच जसें स्वतः जगद्रूपानें भासतें, तसेंच तें सृष्टीच्या आरंभींहि भासतें. यावांचून या जगाची दुसरी उपपत्ति सांगतां येत नाहीं. त्यामुळें प्रत्येक अणूमध्यें असंख्य विश्वें आहेत.

त्यांच्या त्या व्यवहारसमूहाची गणना करण्यास कोण समर्थ आहे ?

प्रत्येक परमाणूंत असंख्य जगें भरलीं आहेत, याविषयीं माझ्या पित्यानें मला एक आख्यान सांगितलें आहे. कमलापासून उत्पन्न झालेल्या व कमलपरागांनीं व्यापलेल्या त्यानें मला सांगितलेलें तें आख्यान तूं ऐक. पूर्वीं मीं त्या आपल्या पित्याला म्हटलें–' हे भगवन् ! हें जगज्जाल केवढें आहे, व तें कोठें भासतें, तें मला सांगा. ' तेव्हां तो ब्रम्हा मला ह्मणाला.

**श्रीब्रम्हा:**—हे मुने ! ब्रम्हच हें सर्व जगत् भासत आहे. ज्ञानी पुरुषांना सत्त्वानें तें अनंत वाटतें व अज्ञानी पुरुषांना जगद्रूपानें भासतें. श्रोत्रेंद्रियाला भूषणभूत होणारें असें हें माझें शुभाख्यान तूं ऐक. याला ब्रह्मांडपिंड असें किंवा ब्रम्हांड-आख्यान असें म्हटलें आहे. आकाशांत आकाशाहून अभिन्न असा चिदाकाश परमाणु आहे. आकाशांतील शून्य रूपाप्रमाणें किंवा वायूंतील शुद्ध स्पंदाप्रमाणें तो त्यांत रहातो. त्यानें स्वप्नाप्रमाणें आपल्या स्वरूपांतच आपल्याला जीवत्व आलेलें पाहिलें. आकाश आपल्या शून्यरूपाला किंवा वायु जसा स्पंदाला पहातो, तसें त्यानें आपलें जीवत्व पाहिलें. स्वतत्त्वाचें अदर्शन याच निद्रेमुळें त्यानें स्वप्नाप्रमाणें आपलें समष्टिजीवत्व कल्पिलें. आपलें अविकारित्व, असंगत्व, पूर्णत्व, व सूक्ष्मत्व न सोडतांच त्यानें आकाशरूप 'अहं ' अशा प्रकारचें जीवत्व अनुभविलें. जीवाला आपल्या अहंरूपाचा अनुभव आला. त्या अहंकारानें आपल्या अहंरूपांतच मीं बुद्धि अशी कल्पना केली. ती बुद्धि निश्चयरूप असून मायेप्रमाणें असदर्थाचा भ्रम उत्पन्न करणारी होती. बुद्धीनें ' मीं मन ' असें खोटें स्वप्न पाहिलें. विकल्पाभासाच्या आरोपांनीं आपल्या स्वतःलाच हीन करणाऱ्या तिनें मनःकल्पना केली. त्यानंतर त्या मनानें स्वप्नांत देहांतील पंच इंद्रियें पाहिलीं. अज्ञ पुरुषाची बुद्धि स्वप्नांत निराकार असतांनाहि घनाकार पर्वतत्व जसें पहाते, त्याप्रमाणेंच त्या मनानें पंचेंद्रियें पाहिलीं. पुढें तो चिदाकाशपरमाणु अशा रीतीनें मनोदेहसमष्टिरूप होऊन त्रिभुवनात्मक विराट्शरीर पहाता झाला. तो स्वतः आकाशरूपच असून, आकाररहित असलेलेंहि तें त्रिभुवन साकार व भासुर पसरलेलें त्याला दिसलें. तें अनेक भूतांनीं युक्त होतें. नाना प्रकारच्या स्थावरजंगमांनीं भूषित झालें होतें. कल्पना व काल यांनीं युक्त होतें. त्यांतील पदार्थांचा अन्योन्यसमागम झाला होता. स्वप्नांत प्रत्येक जीव आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें द्रष्टा, दृश्य, दृष्टि, भोक्ता, भोग्य, भोग, कर्ता, कार्य, क्रिया या तीन त्रिपुटींनीं मनोहर झालेलें त्रैलोक्यनगर जसा पहातो, त्याप्रमाणें हा व्यष्टि जीव, भेदकल्पनेनें प्रत्येक जीवामध्यें आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें पूर्वोक्त तीन त्रिपुटींनीं मनोहर झालेलें त्रिजगत् हृदयांत जाणतो. प्रत्येक परमाणूच्या सूक्ष्म उदरामध्यें अशीं मोठमोठीं असंख्य जगें आहेत. तीं सर्व चराचर भूतें व पृथिव्यादि महाभूतें यांनीं भरलेलीं असतात. अविद्यादृष्टीनें पाहिल्यास हीच अनंत अविद्या होते व ब्रह्मत्वानें जाणल्यास तेंच निर्मल ब्रह्म होतें. ब्रह्मत्वानें पाहिलें असतां जो जगद्रूप स्वप्नजाल पहाणारा तोहि कांहींच नाहीं. कारण यांत द्रष्टा कोठचा, दृश्य कोठचें व कारण कोठचें ? सर्व अत्यंत शांत, प्रकाशरूप शून्य, भेदरहित, केवल स्वच्छ, आद्यंतशून्य असें ब्रह्मच स्वरूपामध्यें स्थित आहे. तात्पर्य, जोंवर अज्ञाननिद्रा आहे, तोंवर परमात्म्यामध्यें लक्षावधि ब्रह्मांडसमूह पूर्वोक्त प्रकारें, नित्य, अनन्यामध्येंहि अन्यवत् स्थित आहेत. समुद्रामध्यें सतत पसरणाऱ्या तरंगांच्या वेगानें चं-

चल झालेल्या जलाचे जसे असंख्यात परमाणु असतात, तसेच परमात्म्यामध्यें ते ब्रह्मांडसमूह असतात. १७६.

---

## सर्ग १७७ वा.

—:०:—

१ जगत् कल्पनेनें सकारण पण वस्तुतः अकारण आहे. २ मोहामुळें स्वप्नासारखें व ज्ञानानें तेंच ब्रह्म, असें वर्णन.

**श्रीरामः**—हे ब्रह्मन्! हें जगत् जर अकारण परात्पर ब्रह्मापासून स्वप्नसंकल्पादिकांप्रमाणें प्रवृत्त होतें, तर मग शेत नांगरणें, पाऊस इत्यादिकांवांचूनच धान्य उत्पन्न होईल! आणि कारणावांचूनच जर सर्वांची इष्टसिद्धि झाली, तर शेतकऱ्यांचा प्रयत्न, बीज यांची काय आवश्यकता राहिली? पण व्यवहारांत कारणावांचून कोणतेंच कार्य झालेलें दिसत नाहीं. तें कां?

**श्रीवसिष्ठः**—ज्यानें जशी कल्पना केलेली असते तसेंच तो पहातो. कल्पना अन्यथा केव्हांहि होत नाहीं. कल्पित कारण आपल्या कारणत्वापासून कधींच च्युत होत नाहीं. ज्यानें आपल्या मनानें जसें दृश्य कल्पिलेलें असतें, तसेंच तो पहातो आणि दुसऱ्यानें जसें कल्पिलेलें असतें तसें तो पहातो. ब्रम्ह स्वभावतः कल्पनात्मक व एक आहे. हें सर्व असेंच कल्पनात्मक आहे. जसा जंतु म्हणजे चेतन पुरुष केश-नखादि अचेतन पदार्थांनीं युक्त असलेला प्रतीत होतो, ह्मणून वस्तुतत्त्वदृष्टीनें अकारण पदार्थत्व व कल्पनादृष्टीनें सकारण पदार्थत्व या दोन्ही गोष्टी ब्रम्हामध्यें संभवतात. कारण तें सर्वशक्तिरूप आहे. मग ब्रम्ह जर असें उभयात्मक आहे, तर मग तुम्ही अकारणत्वपक्षच कसा प्रस्थापित करतां, म्हणून विचारशील तर सांगतों. तत्त्वज्ञानच मोक्ष देणारें असल्यामुळें केवल तत्त्वदृष्टीच्या पक्षपातानें आम्ही तें प्रस्थापित करतों. कारण जें जें कांहीं केव्हांहि व कोठेंहि ब्रम्हाहून भिन्न असतें तें तें त्या कारणविकल्पानेंच होय. कारणविकल्पानेंच त्याचा संयोग संभवतो. जेथें सर्व आदि-अंतशून्य नाना-अनानारूप ब्रह्मच शांत व एकरूप भासत असतें. तेथें कोण कोणाचें कारण होणार? येथें कांहीं प्रवृत्त होत नाहीं व कांहीं निवृत्त होत नाहीं. एक आदिअंतशून्य ब्रम्हच स्थित आहे व तें ब्रम्ह आकाशात्मक आहे. तेव्हां कोण, कशाचें, कोणत्या निमित्तानें व कशासाठीं कारण होणार? किंवा कोणी, कोणाचें कोणत्याहि हेतूनें कारण कां होणार नाहीं? कारण त्यांत शून्य नाहीं, अशून्य नाहीं, सत् नाहीं, असत् नाहीं, मध्यत्वहि नाहीं; महाशून्यामध्यें कांहीं नाहीं असेंहि म्हणतां येत नाहीं व आहे असेंहि म्हणतां येत नाहीं. हें जें कांहीं आहे व कांहीं नाहीं, आणि जें आहे व जें नाहीं, तें सर्व ब्रम्हच आहे. हें जसें आहे, तसें नाहींहि.

**श्रीरामः**—हे प्रभो! अज्ञांच्या विषयांमध्यें प्रत्येक कार्याला कारण संभवतें. आपण अतत्त्वज्ञाला बोध करण्यासाठीं अध्यारोप व अपवाद यांचा जसा स्वीकार करतां, त्याप्रमाणेंच प्रधान, परमाणु इत्यादि कार्य-कारणांचा संभवहि कां स्वीकारीत नाहीं? कारण पृथिवी, आप, तेज व वायु या कार्यांची अवयवपरंपरा ज्या सूक्ष्म भागांमध्यें स्थिर होते तेच परमाणु. त्याचप्रमाणें सत्त्वादि गुण हीं कारणें अज्ञासाठींच मानणें उचित आहे. कारण कोणतेंहि उत्पन्न होणारें द्रव्य कारणावांचून कसें असेल? किंवा अद्वितीय ब्रम्ह शेवटीं अवशिष्ट कसें राहील?

**श्रीवसिष्ठः**—रामा! तत्त्वज्ञाला अतत्त्वज्ञ म्हणून अगोदर कोणी नाहींच. कारण मिथ्या

आकाशवृक्षाचा विचार काय करावयाचा आहे? तज्ज्ञ एकबोधमय व शांत विज्ञानघनरूप असतात. त्यांची असद्रूप अर्थाविषयीं विचारणा कशी संभवते? 'अहो पण तार्किक, पामर इत्यादि पुष्कळ अतत्त्वज्ञ आहेत.' म्हणून म्हणशील तर सांगतों. अज्ञानादि सर्व जगाच्या आरोपाचें अधिष्ठान असें जें चिन्मात्रत्व तेंच ब्रह्मत्व होय. तें मी अज्ञ आहें असा अनुभव घेणारा जो तार्किक, त्याच्या ठिकाणींही असतेंच. कारण प्रबोधरूप आत्म्यामध्यें तें अज्ञत्व आंतश्या आंत भासतेंच. वैशेषिकादि आत्म्याला जड मानणारे जे दुसरे वादी आहेत त्यांना सुद्धां आत्म्याच्या ज्ञत्वाचा अनुभव येतो. त्यामुळें त्यांचेंहि चिद्रूपत्व सिद्ध होतें आणि जगत् केवल अज्ञानरूपच आहे. त्यामुळें तें त्याच्या अंगत्वास प्राप्त झालें आहे. ज्याप्रमाणें स्वप्न हें निद्रावस्थेंतच अनुभवास येत असल्यामुळें निद्रेच्या अंगत्वास प्राप्त झालेलें असतें, तसें. स्वप्न व सुषुप्ति यांतील कोणाचेंच स्वरूप निद्रेहून भिन्न नसतें. ज्ञानस्वभाव आत्म्यामध्यें स्वभावविरुद्ध अज्ञान आरोपावांचून असणें शक्य नाहीं. त्यामुळें अज्ञानादि जगदारोपाच्या अधिष्ठानत्वाची या अनुभवावरूनच सिद्धि होते. रामा! असें जरी आहे तरी अज्ञांना बोध करण्यासाठीं त्यांच्या बुद्धीला अनुसरून शुद्ध ब्रह्माचें ज्ञान प्रतिपादन करतां यावें म्हणून मी हें ब्रह्माचें तटस्थ लक्षण सांगतों. कारण त्याचें स्वरूपलक्षण अज्ञ जनांचा विषय होणें शक्य नाहीं. कारण तें शुद्ध, निरामय, आनंदैकरस आहे, यास्तव अज्ञबुद्धीला अनुसरून, जगत् भिन्न आहे असें कल्पून, कल्पाच्या आरंभीं ब्रह्मच कारण आहे, असा जरी स्वीकार केला, तरी मिथ्याभूत प्रपंचाची मिथ्या मायाच कारण असल्यामुळें ब्रह्माच्या वास्तविक अद्वैताची हानि होत नाहीं. असो. या जगांत शुक्तिरजत, मृगजल, रज्जुसर्प इत्यादि कारणरहित पदार्थहि आहेत व कांहीं संविदेनें कारणत्वानें कल्पिलेले सकारण पदार्थहि आहेत. संविद् जशी जशी कल्पना करते, तशी तशी ती सिद्ध होते. सर्व कारणांची शांति झाल्यावर ब्रह्मानुभवशाली तत्त्ववेत्त्यांच्या दृष्टीनें सर्गाचें कांहीं कारणत्व उरत नाहीं. त्यामुळें तो कारणशून्य आहे. अशा या स्वप्न, गंधर्वनगर, मृगजल, यांसारख्या जगांत ईश्वरादि कांहीं कारण जे कल्पितात ते नीरस वाग्जाळ व्यर्थ पसरितात. त्याच्या त्या कारणप्रतिपादनामध्यें हृदयंगमता मुळींच नसते. त्यांचा तो कंठशोष व्यर्थ चाललेला असतो. ज्ञानानें बाधित होणाऱ्या या जगाची दुसऱ्या कोणत्याच प्रकारें उपपत्ति लागत नसल्यामुळें तें स्वप्नासारखें आहे, असेंच म्हणावें लागतें. त्यावांचून दृश्याची स्थूलाकाररूप दृश्यता मुळींच संभवत नाहीं. अज्ञानी पुरुष स्वप्नांतील पृथिव्यादिकांचा अनुभव घेतो, त्याचें काय कारण आहे? चित्स्वभावावांचून दुसरें कांहीं कारण संभवतें का, सांग बरें? स्वप्नार्थ हा कशा प्रकारें संभवतो? स्वप्नांतील पदार्थ मिथ्या आहेत हें जोंवर कळलेलें नसतें, तोंवरच तो भयंकर महामोहांत पाडतो. पण त्याचें एकदा ज्ञान झालें म्हणजे मग मोह पाडीत नाहीं. सर्गहि तसेच आहेत. शुष्क तर्कांच्या आग्रहानें अनुभवाला झुगारून देऊन जें कांहीं कारण कल्पिलें जातें, तो केवल अज्ञानजन्य अभिनिवेश आहे. आतां कारणाची जर अत्यंत अपेक्षा भासत असेल तर अज्ञात ब्रह्मस्वभाव हेंच त्याचें कारण आहे. अग्नीचें उष्णत्व, जलाचें शैत्य, सर्व तेजांचें प्रकाशत्व, सर्व पदार्थांचा स्वभाव, किंवा अज्ञानोपहित आत्म्याचा स्वभाव, हेंच एक त्यास कारण आहे. शेंकडों

संकल्प करणाऱ्या लोकांनीं कल्पिलेल्या एका ध्येयाचें कारण काय सांगतां येईल? गंधर्वनगरांतील घरें व भिंती यांचें संकल्पावांचून काय कारण असणार? 'धर्म व अधर्म अमूर्त असल्यामुळें मूर्त देहादिकांचें तें उपादान कारण होऊं शकत नाहीं,' असें मीमांसक ह्मणतात. तेव्हां सर्गाच्या आरंभीं सुखादिकांचा उपभोग घेणाऱ्या देहाचें कारण परलोकीं काय असणार? विज्ञानवाद्यांच्या मतींहि अमूर्त व क्षणिक विज्ञानाची मूर्त व क्षणिक उपादानता संभवत नाहीं. स्थूल भिंती वगैरे, सूक्ष्म परमाणु, यांचें कारण काय असणार? त्याचप्रमाणें उत्पन्न होऊन नाश पावणारे जे दुसरे पदार्थ त्यांचें आणखी निराळें कारण काय संभवणार? अंकुरादि स्वभावाचें काल, क्षेत्र, जल इत्यादिकांसह बीजादि स्वभाव हें कारण आहे, असें चार्वाक ह्मणतात. पण बीजस्वभाव व अंकुरस्वभाव यांत अर्थभेद कोठें आहे, तेंच आह्मांला कळत नाहीं. त्यामुळेंच स्वभावाची ही पर्यायोक्ति व्यर्थ आहे. तस्मात् सर्व भाव व त्यांचें कारण ही सर्व अज्ञ पुरुषांच्या ठिकाणीं अकारण भ्रांति आहे. पण ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें सन्मात्ररूपानें स्थित असलेल्या कार्याचा त्याच कारणापासून चिच्चमत्कार रूपानें आविर्भाव व तिरोभाव होत असल्यामुळें सन्मात्रावांचून दुसरें यत्किंचितृहि कारण नाहीं. ह्मणूनच स्वप्नांत द्रव्याचा अपहार करणाऱ्या चोरांनीं दिलेलें दुःख, जागें होतांच स्वप्न मिथ्या आहे असें कळून जसें दुःखद होत नाहीं, त्याचप्रमाणें तत्त्वदर्शनानंतर तत्त्वज्ञाचें जीवितहि दुःखद होत नाहीं. हें दृश्य सृष्टीच्या आरंभींच उत्पन्न झालेलें नाहीं. हें केवल चिदाकाश आहे. स्वरूपच स्वप्नाप्रमाणें भासत आहे. याविषयीं कोणतीच कल्पना उपपन्न होत नाहीं. या विवर्तरूप कल्पनेवांचून दुसरी कोणतीच कल्पना सोपपत्तिक दिसत नाहीं. इतर वाद्यांची सर्व कल्पना न्यायाला सोडून आहे. यास्तव ब्रह्मानुभूति हीच जगत्कल्पना आहे. शुद्ध जलघन समुद्रांत ऊर्मि, आवर्त, द्रवत्व इ. जसें भासतें, तसेंच हें सर्गपर्यायानें युक्त असलेलें ब्रह्म ब्रह्मामध्यें भासतें. निर्मल वायूमध्यें स्पंद, आवर्त, विवर्त इत्यादि जसे भासतात, त्याप्रमाणें या ब्रम्हवायूमध्यें हा सर्गस्पंद भासतो. महाकाशांत अनंतत्व, छिद्रत्व, शून्यत्वादि जसें भासतें, त्याप्रमाणें बोधात्म्यानें युक्त असलेलें हें जगत् आकाशच आहे. हा पर व अपर सर्ग त्याहून भिन्न नाहीं. निद्रादि अवस्थांमध्यें स्पष्ट भासलेले हे भाव असन्मयच आहेत. ते आपल्या अधिष्ठानाहून भिन्न नाहींत. सर्ग प्रलयरचनाहि चिद्घन आत्म्यामध्यें अशीच आहे. सुषुप्तींतील स्वप्नाप्रमाणें सौम्य, शुद्ध व निद्राघन आत्मस्वरूपांत ती भासते. मनुष्य निद्रावस्थेंत एका स्वप्नांतून दुसरें, दुसऱ्यांतून तिसरें अशीं स्वप्नें जशीं पहातो, तसाच हा अज स्वसत्तेमध्यें एका सर्गांतून दुसऱ्यांत, दुसऱ्यांतून तिसऱ्या सर्गांत जातो. स्वप्नानुभवामध्यें जसा, तसाच हा निरामय ब्रम्हाकाश पृथिव्यादिरहित असूनहि त्यांनीं युक्त असल्यासारखा भासतो. घटपट इ० शब्द जसे या पश्यंती वाणीमध्येंच स्थित असतात, त्याप्रमाणें उत्पन्न झालेले व उत्पन्न न झालेले सर्ग एकरूप महाचितिमध्यें रहातात. पश्यंतीवाणीमध्येंच जसे घटादि शब्द स्थित असतात, त्याप्रमाणें सर्ग चितीमध्यें चित्स्वरूपानें चिन्मय होऊन राहतात. जेव्हां शब्द व सर्ग हे दोन्ही चिन्मयच झाले, तेव्हां शास्त्राचा काय उपयोग? व कथाविचारांचा तरी काय उपयोग? कारण वासनाशून्य जीवित हाच मोक्ष असून तेंच शास्त्राचें फल आहे. याप्रमाणें सर्गाचें कांहीं कारण नसल्यामुळें तो असत् आहे व त्यामुळें नाना-

प्रकारची प्रपंचरचना जरी दिसत असली तरी ती नाहीं. तिला कांहींच स्वरूप नाहीं. आणि जी ही वासना प्रपंचाचें बीज या रूपानें भासते, ती नानात्वानें भासणारी वासना नानात्वरहित बोधसत्ताच आहे. ज्याप्रमाणें या प्रत्यक्ष स्वप्नामध्यें चिद्‌च नगरादिरूपानें भासते. त्याप्रमाणें बोधसत्ताच वासनारूपानें प्रतीत होते. १७७.

## सर्ग १७८ वा.

१ अमूर्त चित् मूर्त जगाला कशी चलन देऊ शकते, याविषयीं युक्ति, २ ऐंदवाख्यानानें जगत् अमूर्त चिन्मात्र आहे, याचें स्पष्टीकरण.

श्रीराम:—भगवन्! या त्रिभुवनांत पदार्थ मूर्त व अमूर्त असे दोन प्रकारचे आहेत. त्यांतील कांहीं सप्रतिघ व कांहीं अप्रतिघ आहेत. जे पदार्थ एकमेकांला स्पर्श करीत नाहींत, त्यांना अप्रतिघ म्हणतात व जे परस्परांना स्पर्श करून परस्पर संबद्ध होतात त्यांना सप्रतिघ ह्मणतात. या जगांत जे सप्रतिघ पदार्थ आहेत त्यांचा परस्पर संबंध दिसतो, पण अप्रतिघ पदार्थांतील कोणाचाच कधींच परस्पर संबंध झालेला दिसत नाहीं. त्यांतील संवेदन ह्मणून जें आहे, तें अप्रतिघच आहे. कारण चंद्र पहाणाऱ्या पुरुषाच्या नेत्रप्रदेशापासून नेत्रकिरणांच्या मागोमाग जाणाऱ्या चित्तासह त्या चित्तानें अवच्छिन्न झालेलीं संविदें कोठेंहि संबद्ध न होतां चंद्रमंडलामध्यें जाऊन पडतात, त्यामुळें तीं अमूर्त आहेत, ही गोष्ट प्रत्येक चंद्रदर्शी पुरुषाला अवगत आहे. तृतीयचतुर्थ भूमिकांच्या मध्यें असणाऱ्या अर्धप्रबुद्धाच्या संकल्पविकल्प द्वैतानें कल्पिलेल्या या जगाचा स्वीकार करून मी हा आक्षेप करीत आहें. बोधदृष्टीनें अवशिष्ट राहिलेल्या चिन्मात्राचा स्वीकार करून मी आक्षेप करीत नाहीं. मूर्त प्राणवायु हाच शरीरांत प्रवेश करणें व बाहेर येणें ह्या दोन वृत्तींनीं क्षुब्ध होऊन देहाला प्रवृत्त करतो, हें म्हणणें बरोबर आहे. तथापि त्या प्राणवायूचा क्षोभ कोण करतो? वायूमध्यें निर्गममय क्षोभ उत्पन्न करून प्रत्येकाच्या हृदयांत प्रवेश करणारा हा कोण आहे? व तो क्षोभ कसा उत्पन्न करतो? तें हे प्रभो! मला सांगा. बरें, जीवात्मक चिदाभासच त्याला उत्पन्न करील म्हणून म्हणाल, तर अप्रतिघ वेदन सप्रतिघ देहाला कसें हालवितें? भारवाहक आपल्या डोकीवरील भाराला जसें हालवितो, त्याप्रमाणें प्राणापासून देहापर्यंत या सर्व समूहाला कोण हालवितो? जर अप्रतिघात्मकहि संवित्तिमात्र प्राणादि-देहान्त सप्रतिघ वस्तूला हालवीत असेल तर 'हा पर्वत हालूं दे' अशा पुरुषाच्या संकल्पसंविदेनें शैल कां हालत नाहीं? म्हणजे बाह्यपर्वतादिक व देह यांच्यामध्यें फरक काय आहे?

श्रीवसिष्ठ:—ज्याप्रमाणें बाह्य वायूला लोहाराच्या भात्यामध्यें प्रवेश होणें व त्यांतून बाहेर निघणें यामुळें त्याचें चालकत्व प्रसिद्ध आहे, तसाच प्राणवायुहि कंठादि छिद्राचा संकोच व विकास करीत बाहेरून आंत येतो व आंतून बाहेर जातो. त्यावरून त्यालाच देहादिचालकत्व आहे, ही गोष्ट प्रत्यक्षसिद्ध आहे. हृदयादि प्रदेशामध्येंहि असेंच समजावें. बाह्य आकाशांतील वायु भात्यामध्यें शिरूं लागला तर तो फुगतो, त्याप्रमाणें हा वायु कंठछिद्रांतून हृदयांत प्रवेश करूं लागला म्हणजे हृदय फुगतें व भात्याप्रमाणेंच तो बाहेर निघूं लागला म्हणजे तें रितें पडतें. ह्मणून वायुच देहादिकांचा चालक आहे.

**श्रीराम:**—अहो पण, लोहार आपल्या भात्याला संकोच व विकास यांच्या द्वारा हाल-वितो व त्यामुळें वायूचा त्यांत प्रवेश व निर्गम होऊं शकतो. पण त्याप्रमाणें आंतील नाडीला कोणता चालक हालवितो? शंभर हे एक कसे होतील व एक हे शंभर कसे होतील? हे काष्ठ, लोष्ठ, पाषाण इत्यादि पदार्थ सचेतन कसे? स्थावर वस्तु सचेतन जर असेल तर ती चलन-वलन कशी करीत नाहीं? देहाप्रमाणें भोगोप-योगानें ती जरी स्फुरण पावत असली, तरी कुंभारानें हालविलेल्या चक्रादिकांप्रमाणें ती जड वस्तु नियतकालच चेष्टा कशी करते? जंगम वस्तुच वेवढी प्रस्पंदन करते, असें आप-ल्याला कां दिसतें? हें सांगा.

**श्रीवासिष्ठ:**—लोहार जसा भात्याला त्या-प्रमाणें शरीरेंद्रियाची स्वामिनी अशी जी जीव-संवेदना ती आंतील नाडीसमूहाला हालविते व त्याला अनुसरूनच सर्व लोकांचा बाह्य व्यव-हार होतो.

**श्रीराम:**—वायु, नाड्या इत्यादि शरीरां-तील सर्व सप्रतिघ आहे. त्याला अप्रतिघा संविद् कशी हालविते, हें मला सांगा. अप्रति-घाकार संविद् जर सप्रतिघात्मक देहादिकां-नाहि हालवीत असेल तर तृषित पांथ आपल्या इच्छेनें दूर असलेल्या जलालाहि आप-ल्यापाशीं ओढून घेईल. सप्रतिघ व अप्रतिघ या दोन्ही पदार्थांचा जर संबंध होईल व त्या-मुळें त्यांच्यामध्यें चाल्य-चालकभाव येईल, तर बाह्य व्यवहारांत सर्व प्राण्यांच्या इच्छेनेंच सर्व कार्यांची सिद्धि होऊन कर्ता, कर्मेंद्रियें, घटादि उपकरणें, हीं सर्व व्यर्थ होतील. मग त्यांचा काय उपयोग? ज्याप्रमाणें सप्रतिघ व अप्र-तिघ यांचा बाहेर संबंध होत नाहीं, तसाच तो आंतहि होणार नाहीं, असें मी समजतों. यास्तव हे मुने! याविषयीं आणखी कांहीं युक्ति असली तर ती मला सांगा. अथवा योगी असलेल्या तुह्मांला या अमूर्ताचा मूर्ताशीं अत्यंत अप्रसिद्ध असलेलाहि संबंध योग-बलानें जर दिसत असेल तर तो कोणत्या उपायानें दिसतो व तुह्मांला त्याचा अनुभव कसा येतो, तें सांगा.

**श्रीवसिष्ठ:**—रामा! या सर्व संदेहवृक्षांचें तत्वाविषयींचें अज्ञान हेंच मूळ आहे. यास्तव सर्वैकतानुभवरूप तत्त्वसाक्षात्कारासाठीं हें माझें वचन ऐक. तें तुझ्या सर्व संदेहांचा समूळ उच्छेद करून तुझ्या श्रोत्रेंद्रियाचें भूषण होईल. रामा! सृष्टींत कोणतीच वस्तु कधींच सप्र-तिघ नाहीं, तर सर्वदा हें सर्व शांत अप्रतिघ विस्तारलेलें आहे. सर्व शुद्ध, संविन्मय, शांत व अप्रतिघरूप आहे. स्वप्न व संकल्प यांतील पदार्थांप्रमाणें पृथिव्यादि सर्व पदार्थजात संवि-न्मय आहे. कारणाच्या अभावामुळेंच आदि व अंतीं यांतील कांहींच विद्यमान नाहीं. स्व-प्नांतील पदार्थांप्रमाणें ही वर्तमानकाळीं भास-णारी संविद् भ्रांतिरूप आहे. म्हणूनच तत्त्व-वेत्ते विवेक, वैराग्य, त्याग, श्रवण, मनन, निदिध्यासन इत्यादि प्रयत्नसाध्य कारणसमू-हानें मूर्ताकाराचें वासनेसह परिमार्जन करून स्वर्ग, पृथ्वी, वायु, आकाश, पर्वत, नद्या,

---

१ 'शतं चैका च हृदयस्य नाड्यः' या श्रुती-मध्यें, 'हृदयांत एक मोठी नाडी असून तिच्या-पासून शंभर नाड्या शरीरांत पसरल्या आहेत व त्यांतील प्रत्येक नाडीला बाहत्तर हजार प्रतिशाखा-नाड्या आहेत. त्यांतून व्यान संचार करतो,' असें वर्णन आहे. हा व्यानाचा संचार देहादि चलना-मुळें होतो असें म्हटल्यास सर्वदाच सर्व अंगाचेंच चलन व्हावयास पाहिजे, हस्तपादादि एकेकच अंगाचें नियत चलनवलन होणार नाहीं. यास्तव त्याचा चालक दुसराच कोणी असला पाहिजे असें सिद्ध होतें. (काठक भा. २,३ पृ. १५७ प्रश्न भा. ३-६ पृ. ४२ पहा.)

दिशा इत्यादि सर्व जगत् अप्रतिघ बोधमात्र आहे असें जाणतात. अंतःकरण, भूतें इत्यादि किंवा काष्ठ, पाषाण, मृत्तिका इत्यादि सर्व शून्य किंवा अशून्य हें चेतन आहे, दुसरें कांहीं नाहीं.' याविषयीं हें ऐंदवाख्यान मी सांगतों तें ऐक. तें तुझ्या श्रोत्रेंद्रियाला भूषित करील. हें जगत् मनोमात्र आहे, हें दाखविण्यासाठीं पूर्वीं हेंच आख्यान सांगितलें आहे. आतां जगच्चिन्मात्रच आहे, असें निर्वाणाच्या निष्कर्षासाठीं वर्णन केलें जात आहे. तें जरी पूर्वीं सांगितलें आहे तरी आतां तूं विचारलेल्या प्रश्नाचें समाधान करण्यासाठीं पुनः तेंच सांगतों, ऐक. हें सर्व पर्वतादिक चित्च आहे. म्हणजे अमूर्त चित्च सर्व आहे, हें तुझ्या प्रश्नाचें समाधान आहे, असें तूं जाणशील. उत्पत्तिप्रकरणांत वर्णन केल्याप्रमाणें एका विशिष्ट जगामध्येंच एक ब्राम्हण होता. तप, वेद व कर्मे यांचा जणुं काय आधारच, असा तो ब्राम्हण 'इंदु' या नांवानें प्रसिद्ध होता. ब्रह्मांडोदराचे जसे दहा दिक्तट असतात, त्याप्रमाणें त्याचे दहा पुत्र होते. ते मोठे महाशय, महात्मे व सर्व महत्वाचे आधार होते. कालवशात् त्यांचा तो पिता मरण पावला. दहा रुद्रांचा अकरावा भगवान् महारुद्र प्रलय कालीं जसा अंतर्धान पावतो, तसा त्या दहा पुत्रांचा पिता अंतर्धान पावला. दिवसावर अतिशय अनुरक्त असलेली व नक्षत्र हेच जिचे नेत्र आहेत अशी संध्या दिवसाच्या बरोबरच जशी लोपते त्याप्रमाणें त्या इंदूची भार्या वैधव्यभीतीनें सहगमन करती झाली. त्या दोघांचे ते पुत्र वियोगदुःखानें व्याकुल झाले व त्या दोघांचेंहि और्ध्वदेहिक करून सर्व व्यवहार सोडून ते अरण्यांत गेले. सर्व धारणांमध्यें उत्तम सिद्धि देणारी धारणा कोणती बरें आहे, --कीं ज्या धारणेमध्यें तन्मय होऊन आम्ही सर्वेश्वर हिरण्यगर्भ होऊं, याप्रमाणें पुष्कळ विचार करून ते देहाहि ऐंदव ह्मणजे इंदूचे पुत्र श्वापदादि उपद्रवरहित अशा एका पर्वताच्या दरींत पद्मासन घालून बसले व असें चिंतन करूं लागले. ब्रह्मदेवाकडून अधिष्ठित झालेल्या अशा सर्व जगद्धारणेनें ते तेथें बसले. आम्ही चतुर्मुखानें युक्त असे जें सर्व जगत् तेंच निर्विघ्नपणें होऊं, असा मनांत विचार करून ब्रह्मासह सर्व जगत्च मी आहें, अशी धारणा धरून प्रत्येक ऐंदव दीर्घ काल बसला. त्या सर्वांनीं नेत्र मिटले व ते चित्राप्रमाणें निश्चल बसले. पुढें या धारणेमध्येंच ज्यांनीं आपलें चित्त स्थिर केलें आहे असे ते मनाला दुसरीकडे लावून त्यापासून च्युत न होतां अठरा महिने तसेच राहिले, तों त्यांचे ते देह शुष्क झाले-- शवत्वास प्राप्त झाले. कच्चें मांस खाणाऱ्या पशु-पक्ष्यांनीं त्यांच्या अंगाचे लचके तोडले व उन्हानें छायाभाग जसे निवृत्त होतात त्याप्रमाणें ते दहाहि ऐंदव नाश पावले. 'मी ब्रम्हदेव व जगत् आहें, हा सर्व सर्ग भुवनासह मीच आहें,' असें ध्यान करणाऱ्या त्यांचा तसाच आणखी दीर्घ काल निघून गेला. त्यांचीं तीं देहरहित दहा चित्तें एका परिपक्व ध्यानामुळें दहा चित्तें, दहा देह, व दहा ब्रम्हांडरूप झालीं. याप्रमाणें त्यांची चिद्रूच इच्छा होऊन सकल जगत् बनली. ती अत्यंत स्वच्छरूप व आकाररहित झाली. त्यांचीं तीं सर्व विश्वें संविन्मय असल्यामुळें त्यांतील भूमि, पर्वत वगैरे सर्व चिदात्मकच आहे, असें तूं जाण; आणि तसें जर न मानलें तर तीं काय होतीं तें सांग बरें? जें त्रिजगज्जाल त्याचें स्वरूप काय? तें वस्तुतः संविदाकाशशून्यत्वच आहे, दुसरें कांहीं नाहीं. जलाहून तरंग जसा भिन्न नाहीं, त्याप्रमाणें संवित्तत्त्वाहून चलनादि कांहीं निराळें नाहीं. हीं ऐंदवाचीं जगें जशीं आकाशांत चिन्मयच त्याप्रमाणें त्यांतील काष्ठ-लोष्ठ-पाषा-

णादिकहि चिन्मयच होत. ज्याप्रमाणें ते ऐंद-वांचे संकल्प जगत्वास प्राप्त झाले, त्याप्रमाणें ब्रह्मदेवाचा संकल्प जगत्वास प्राप्त झाला आहे. तस्मात् येथें दिसणारे हे पर्वत, ही पृथ्वी, वृक्ष, मेघ, महाभूतें हें सर्व चिन्मात्रमयच विस्तारिलें आहे. वृक्ष चित्, पृथ्वी चित्, आकाश चित्, पर्वत चित्, सारांश त्या ऐंदवाच्या जगांतील त्या त्या पदार्थाप्रमाणें अचित् केव्हांहि संभवत नाहीं. चिन्मात्ररूप चिन्मात्राकाशाकडून स्वदेहरूप चंचल चक्रावर स्वशरीररूप मृत्तिकेनें हा सर्ग अहर्निश वृथा कां केला जात आहे? संकल्पानें निर्माण केलेल्या सर्गांतील पाषाण जर चेतन नव्हेत तर जगांतील हें लोष्ठ-शैलादि काय आहे, तें सांग बरें? अनुभव, स्मृति, त्या स्मृतीला उत्पन्न करणारे संस्कार, आकृति इत्यादि हे सर्व संविद्विशेष अर्थगोचर आहेत; ह्मणजे या सर्वांमध्येंच विषय प्रकट होतात. हे आपल्या उदरांत अभिव्यक्त चिन्मात्ररूपच धारण करतात. जड अर्थाला धारण करतां येत नाहीं. म्हणूनच सर्व विषय चिद्रूपच आहेत व ही गोष्ट आम्हीं पूर्वींच सांगितली आहे. अर्थरहित असलेल्या कल्पनादिकांची स्थिति निराळीच असते व तत्त्वावगाहन या चमत्कारानें शोभणाऱ्या पदार्थांची चमत्कृति निराळीच असते, हें आम्ही यापूर्वीं स्पष्ट करून दाखविलेंच आहे. तें परम चिद्धामच सर्वात्मरूप चिद्धामामध्यें म्हणजे समष्टि-व्यष्टि-चित्तांत रत्नराशींतील रत्नाप्रमाणें देदीप्यमान होतें. आंत राहून तृण, काष्ठ, शैल इत्यादि पदार्थाकारानें जणुंकाय उदय पावतें. कोणताहि कार्यकारणरहित पदार्थ ब्रह्माहून भिन्न नाहीं. ज्याप्रमाणें सूर्याची प्रभा हा त्याचा स्वभावच आहे, अप्रकाशरूपत्व हा त्याचा स्वभाव नाहीं, त्याप्रमाणें हें सर्व चेतनब्रम्हच आहे, हा निश्चय होय. ज्याप्रमाणें सजल भूमीकडे वहाणारें पाणी कांहीं कारणावांचूनच स्वतःच तरंगादि-रूपानें परिणाम पावतें, त्याप्रमाणें चिद्रूपी जल अति तीव्र स्वभावानेंच विनाकारण जगद्-रूपानें परिणत होतें. पाद्म कल्पामध्यें भगवानाच्या नाभिकमलांतील लीला जगद्रूपानें भासते, त्याप्रमाणेंच चिन्मात्र ब्रम्हापासून हीं सर्व जगें विकास पावतात. तीं त्याहून यत्किंचितहि भिन्न नाहींत. केव्हांहि उत्पन्न न झालेलें व केव्हांहि प्रलय न पावलेलें असें हें आकाशात्मक सन्मात्र ब्रम्ह आहे. तें शांत आहे. भाव व अभाव या दोहोंनींहि शून्य असल्यामुळें तें मध्यस्थ आहे व हें जगत् चिदाभासमात्र आहे. संकल्पजगांतील पर्वतादि सर्व असंविन्मय आहे, असें बोलणारा अज्ञ ज्ञानी पुरुषाच्या उपहासाला पात्र होतो. ऐंदवांचीं हीं सर्व जगें आत्माच आहेत. तीं संकल्पमात्र आहेत, चिदाकाशरूप आहेत. त्याच न्यायानें हें जगत्हि ब्रह्मसंकल्पमात्र आहे. ही दृष्टि जों जों व जितक्या लवकर दृढ केली जाते, तों तों हें दुःख शीघ्र विलय पावतें. पण याच्या उलट ही दृष्टि जों जों दूर केली जाते व प्रपंचदृष्टिच दीर्घकाल पाहिली जाते, तों तों हें दुःख अधिकाधिक दृढ होतें. पापामुळें दीर्घकाल मूढ झालेल्या व ही दृष्टि दृढ न करणाऱ्या लोकांचा संसार वज्राप्रमाणें दृढ होतो; तो केव्हांहि शांत होत नाहीं. या जगांत आकृति नाहीं; उत्कर्ष, अपकर्ष, जन्म, नाश इत्यादि नाहींत; सत्ता नाहीं व असत्ताहि नाहीं. तर आत्म्यामध्यें, केवल शांत परम तत्त्वामध्यें हें विकल्परूपानें भासत आहे. अथवा ब्रह्मातिरिक्त स्फुरणच मुळीं नाहीं. तें ब्रह्म स्फटिकस्तंभाप्रमाणें अवकाशावांचूनच सृष्टिरूपी बाहुल्यानें युक्त जरी असलें तरी आद्यंतशून्य, मूलाग्ररहित, निर्माणतारहित, परिवेषरहित, स्वच्छ, नित्य, जन्म-नाशरहित व

चिदानंदैकघन नित्य स्थित आहे. हेंच जेव्हां अमूर्तरूप असतें, तेव्हां अंतरहित, असंख्य, अखिल, विश्वतोव्याप्त, हस्तजात, चक्षु, श्रोत्र, शिर, कंठ, उदर, पाद इत्यादि अंगांनीं गणनाहीन असें होऊन रहातें. पण तेंच जेव्हां अमूर्तरूप असतें तेव्हां आत्माकाशरूप सन्मात्र, सुस्तंभरूप, अज, मौन, विकल्पशून्य असें मीच झालेलें असतें. याविषयीं आणखी विकल्प करणें फुकट आहे. १७८.

---

## सर्ग १७९ वा.

—:०:—

१ ज्या अर्थी हें विश्व अप्रतिघ आहे, त्या अर्थी सर्व चिन्मात्र आहे. तेव्हां पूर्वोक्त शंकेला अवकाशच कोठें आहे ? असें वर्णन.

श्रीवसिष्ठः—याप्रमाणें हें जगत्त्रय शुद्धसत्त्व चिन्मात्रच आहे. त्यामुळें अज्ञ लोकांनीं सप्रतिघत्वानें व मूर्तत्वानें जाणलेलीं भूतें यांत संभवत नाहींत. तेव्हां शरीरादि कोठचें व सप्रतिघ वस्तुजात तरी कोठचें ? हें जें कांहीं दिसत आहे तें अप्रतिघ ब्रह्मच पसरलें आहे. चिदाकाशांत चिदाकाशच स्थित आहे. शांततत्त्वांत शांत व सर्व वैषम्यशून्य तत्त्व स्थित आहे. आकाशांत आकाश स्थित आहे व ज्ञप्तीमध्यें ज्ञप्ति स्थित आहे. सर्व संविन्मय व शांत आहे. जागृतींतील स्वप्नाप्रमाणें आहे. अप्रतिघाकार स्थित आहे. तेव्हां आतां तूं ह्मणतोस तशी सप्रतिघ स्थिति कोठें आहे ? ज्ञानी पुरुषांच्या दृष्टीनें देह व त्याचे अवयवादिक हें सर्व स्वप्न-देहाप्रमाणें चिन्मात्रच आहे. तेव्हां देहावयव कोठचे, शिरांचा समुदाय कोठचा व अस्थिपंजर तरी कोठचा ? स्वप्नांतील अप्रतिघ देहाप्रमाणेंच हा देह अप्रतिघ आकाशच आहे, असें तूं जाण. दोन्ही हात ही संविदच आहे, इंद्रियसमूहहि संविदच आहे. हें सर्व शांत अप्रतिघ आहे. सप्रतिघ कांहीं नाहीं. प्रत्यक्षसिद्ध देहादिकांचा अपलाप करणें हें साहस आहे, असेंही समजूं नये. कारण ब्रह्माकाशाचा हा स्वप्नरूप स्वभाव आहे व त्या स्वभावामुळेंच जगत्स्थिति झालेली आहे. ह्मणून हें सर्व सहेतुक व निर्हेतुक अशा दोन्ही प्रकारें संभवतें. कारणावांचून कार्य होत नाहीं, हें ह्मणणें युक्त आहे. ब्रह्म निर्विकार आहे व अद्वय आहे. त्यामुळें त्याचें कारणच संभवत नाहीं, पण भ्रांतिदृष्टया जो जशी कल्पना करतो तशी त्याला दिसते. भौतिकदृष्टया जर पाहिलें तर कारणावांचून उत्पन्न झालेलें व संविद्रूपानें उपलब्ध झालेलें हें जगत् अत्यंत असत्हि नाहीं व अत्यंत सत्हि नाहीं. तर तें अत्यंत असत् असल्यासारखें नुस्तें भासतें आणि जशी भावना करावी त्याप्रमाणें संविद् विषयत्वाला निःसंशय प्राप्त होते. चिन्मयत्वामुळें स्वप्नांत सर्व, सर्वत्र, सर्वथा जसें संभवतें, त्याप्रमाणें जागृतींतहि सर्वात्मरूप आहे. सर्वात्मरूप द्वैताद्वैतमय ब्रह्मपदामध्यें अकारण कार्यांची सत्ता आहे व कारणजन्य कार्यांचीहि सत्ता आहे. एकाहि सहस्र होतें. जसे हे ऐंदव संकल्प जगाच्या समूहांनीं लक्षावधि भूतें झाले, त्याप्रमाणेंच सहस्रावधि संविदांचेंहि एकरूप होतें; जसें भगवान् विष्णु, शंकर इत्यादिकांचें सायुज्य प्राप्त झालें असतां त्यांच्या सर्व सर्गांचें मिळून एकरूप होतें; शेंकडों नद्यांचाहि एक समुद्र होतो; ऋतु, संवत्सर यांच्या समूहाचा एकच काल होतो. स्वप्नाप्रमाणें हा देह चिदाकाशच उदय पावला आहे. तो स्वानुभवानें अगदीं स्पष्ट जरी असला तरी स्वप्नांतील पर्वताप्रमाणें अगदीं निराकार आहे. द्रष्टा व दृश्य यांच्या दृष्टीनें संविदच अनुभवरूप व अननुभवरूप भासते. त्यामुळें जगत् एक चिदाकाशच

आहे. ज्याप्रमाणें एकच निद्रा स्वप्नांत वेदनरूप व सुषुप्तींत अवेदनरूप अशी दोन प्रकारची जरी भासली तरी जशी एक, किंवा वायु व त्याचा स्पंद हे जसे एक, त्याप्रमाणें चिदाकाश व हें जगत् हीं एकच आहेत. द्रष्टा, दृश्य व दर्शन हें चिद्धान परमार्थतः आकाश आहे. तें शून्य स्वप्नाप्रमाणें भासतें. यास्तव चिदाकाश व हें जगत् हीं एकच आहेत. ज्या अर्थी ईश्वराच्या ठिकाणीं प्रथम सृष्टीपासूनच भ्रांतीनें असत् जगत् भासत आहे, त्या अर्थी स्वप्नांतील भय जागे होतांच जसें शांत होतें, त्याप्रमाणें तें ज्ञान होतांच शांत होतें. एका संविदेचें स्वप्नांत जसें अनेक प्रकारें भान होतें, त्याप्रमाणें सृष्टीच्या आरंभीं गगनांत नाना पदार्थरूपानें तिचेंच भान होतें. ज्या घरामध्यें पुष्कळ दीप लावले आहेत तेथें अनेक छायाही एकरूप जशा दिसतात, त्याप्रमाणें सर्व शक्तिमान् ईश्वराची एकच शक्ति अनेक प्रकारें भासते. आकाशांत वृक्षसमूहाचें जसें स्फुरण व्हावें त्याप्रमाणें शिवसंज्ञक सागरांतील जें सीकर-स्फुरण तोच हा सर्ग आहे. तथापि दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांत थोडा फरक आहे; तो असाः—आकाशांत हा वृक्षसमूह व्योमधर्मांनीं रहित असल्यामुळें अगदीं भिन्न असल्यासारखा भासतो. पण ब्रह्मसागरांत स्फुरणारा हा सर्गबिंदु त्याहून यत्किंचित्‌हि भिन्न नाहीं. १७९.

---

## सर्ग १८० वा.

१ रामानें सांगितलेली कुंददंताख्यानांतील पर्वतावरील वृक्षावर लोंबणाऱ्या तापसाची वरलाभापर्यंत कथा.

**श्रीरामः**—हे भगवन्, ज्याप्रमाणें सूर्याचा प्रकाश पृथ्वीवरील सर्व तमाला, पदार्थांच्या रूपाचा चांगला अनुभव येण्यासाठीं, नाहींसें करतो, त्याप्रमाणें आपण माझ्या या संशयाचा छेद करा, म्हणजे माझा संशय घालवा. एकदा मी विद्यागृहामध्यें विद्वानांच्या सभेंत एकाग्र चित्तानें बसलों होतों. इतक्यांत कोणी एक तापस विदेहदेशांतून तेथें आला. तो ब्राम्हण विद्वान्, श्रीमान्, महातपस्वी, अत्यंत कांतिमान् व त्यामुळें दुर्वास ऋषीसारखा दुःसह होता. तो प्रवेश करून, तेजस्वी द्विजसभेला अभिवादन करून व आमच्याकडून वंदन केला गेलेला असा, योग्य आसनावर बसला. मीं आपले अध्ययनाचे वेदान्त-सांख्यसिद्धांतवाद थांबवून सुखानें बसून विश्रांति घेत असलेल्या त्या तापसोत्तमाला असें विचारिलें. हे श्रेष्ठा! आपण फार दुरून चालत आल्यामुळें परिश्रांत झालां आहां व कांहीं तरी जाणण्याचा किंवा प्राप्त करून घेण्याचा यत्न करीत आहां, असें दिसतें; तर आपलें आगमन कां झालें तें मला सांगा.

**ब्राह्मणः**—हे महाभागा! तूं म्हणतोस तें खरें आहे. मी मोठा यत्न करीत आहें. मी येथें कशासाठीं आलों आहें तें ऐक. विदेहनांवाचा सर्वसौभाग्यसंपन्न देश आहे. पृथ्वीवर तें जणुं काय आकाशांतील स्वर्गाचें प्रतिबिंबच पडलें आहे. तेथें ब्राह्मणजातींत माझा जन्म झाला. मी विद्या संपादन करून तेथेंच राहिलों. माझे दांत कुंदाच्या कळ्यांप्रमाणें पांढरे असल्यामुळें 'कुंददंत' याच नांवानें मी प्रसिद्ध झालों आहें. त्यानंतर पुढें मला वैराग्य झालें आणि मोठ्या संभ्रमानें शांतीसाठीं देव, द्विज व मुनींद्र यांच्या स्थानांतून फिरूं लागलों. एकदा मी फिरतां फिरतां श्रीपर्वतास प्राप्त झालों. तेथें मी मृदु व दीर्घ तप करीत दीर्घ काल राहिलों. त्या ठिकाणीं तृण-वनादिकांनीं रहित असें एक प्रसिद्ध अरण्य आहे. जणुं काय भूमीवरील तेज, अंधकार व अभ्र यांनीं रहित असें तें नभस्तलच होतें. त्यांत अनेक शाखांनीं युक्त असा एक

वृक्ष होता. तो लहान होता व त्याचे पल्लव कोमल होते. तो शून्य आकाशांतील मंद किरणांनीं युक्त असलेल्या सूर्याप्रमाणेंच तेथें स्थित होता. त्या वृक्षाच्या शाखेवर ज्याची आकृति अतिशय पावन आहे असा एक पुरुष लोंबत होता. सूर्य आपल्या किरणांमध्यें जसा, तसाच तो त्या झाडावर रज्जूनें आपले पाय बांधून त्यावर लटकत होता, ह्मणजे त्याला पादबंधनरूप रज्जु हाच आधार होता. मुंजातृणाच्या दोरीनें त्यानें आपले पाय वर बांधले होते व त्याचें मस्तक सतत खालीं लोंबत होतें. त्यामुळें त्या शाल्मली-वृक्षाची जणुंकाय ग्रंथियुक्त पारंबीच खालीं लोंबत आहे असें भासत असे. एकदा सहज त्या प्रदेशीं गेलेल्या मीं त्याला पाहिलें. तेव्हां मी त्याच्या अगदीं जवळ जाऊन त्याच्या-विषयीं मनांत विचार करूं लागलों. "हा ब्राम्हण जिवंत आहे. कारण त्यानें आपल्या वक्षस्थळीं हात जोडून धरले आहेत. तो श्वासोच्छ्वास करीत आहे व त्याची आकृति निस्तेज दिसत नाहीं. निरनिराळ्या कालीं होणाऱ्या शीत, वात व उष्ण यांच्या सर्व स्पर्शास हा जाणतो. तेव्हां मीं त्या एकट्याच लोंबत असलेल्या पुरु-षाला पुष्कळ दिवस सूर्याच्या तापाचा खेद सहन करून व त्या योगानेंच त्याची सेवा करून हळूहळू आपलेंसें करून घेतलें; म्हणजे माझ्याविषयीं त्याच्या मनांत विश्वास उत्पन्न केला आणि विचारलें—' हे भगवन्, तूं कोण आहेस ? हें दारुण तप तूं कां करीत आहेस ? हे विशालाक्षा ! तूं श्वासोच्छ्वासहि फार उशी-रानें करीत असल्यामुळें तुझें जीवितहि लक्ष्या-लक्ष्यरूप आहे म्हणजे तूं जिवंत आहेस हेंहि एकाएकीं लक्षांत येत नाहीं.'

त्यावर तो बोलला:--' माझें कुळ, देश, तपः-प्रयोजन इत्यादि समजून घेऊन तुला काय करावयाचें आहे ? जीवांच्या इच्छा अतिशय विचित्र असतात व त्या कांहीं तरी निमि-त्तानेंच प्रवृत्त होतात.' तथापि असें बोलणाऱ्या त्या तापसाला मीं जेव्हां मोठ्या प्रयत्नानें व मोठ्या प्रेमानें पुनः विचारलें, तेव्हां त्यानें मला हें असें सांगितलें—' मी मथुरेमध्यें उत्पन्न झालों व पित्याच्या घरीं वृद्धि पावलों. बाल्य व तारुण्य यांच्या मध्यावस्थेंत असतांनाच मी शब्दशास्त्र व अर्थशास्त्र यांचें यथावत् ज्ञान संपादन केलें. ' राजा समग्र भोगसामग्रीचा कोशाप्रमाणें आश्रय असतो,' असें मीं तेथें ऐकलें. मी त्या वेळीं भोगार्थी व अगदीं तरुण होतों. त्यामुळें तें ऐकल्यानंतर मीं सप्तमहा-द्वीपांनीं विस्तीर्ण असलेल्या या भूमीचा स्वामी व त्याप्रमाणें याचकांचा अभिलाष पूर्ण करण्यास समर्थ व्हावें, अशी पुष्कळ दिवस इच्छा केली आणि त्याच इच्छेनें येथें येऊन मी हा असा स्थित आहें. हे मान देणाऱ्या ! येथें माझीं बारा वर्षें गेलीं, तरी हे अकारण-मित्रा ! तुझ्या प्रश्नाचें उत्तर मीं दिलेलें अस-ल्यामुळें आतां तूं सत्वर आपल्या इष्ट देशास निघून जा. मी माझा इष्ट मनोरथ पूर्ण होई-पर्यंत दृढस्थित होऊन रहाणार.' त्यानें असें सांगितलें असतां मी त्याला उलट काय बोल-लों तें तूं ऐक. बुद्धिमानाचें चित्त आश्चर्य श्रवण करण्यास कधीं कंटाळत नाहीं. मीं म्हटलें " हे साधो ! तुला जोंवर अभिमत वर प्राप्त झाला नाहीं, तोंवर तुझें रक्षण व परि-चर्या करण्यासाठीं मी येथेंच राहीन." मी असें बोललों असतां तो शमसंपन्न तपस्वी पाषाणा-प्रमाणें मौन धरून बसला. त्यानें आपले नेत्र मिटले. मेलेल्या पुरुषाप्रमाणें तो निश्चेष्ट झाला. त्याला बाहेरच्या कोणत्याच विषयाचें भान राहिलें नाहीं. मीहि त्या काष्ठ-मौन धारण करणाऱ्या पुरुषाच्या पुढें तसाच राहिलों.

मनांत उद्विग्न न होतां कालकृत वेग सहन करीत मीं सहा महिने तेथें काढले. तेव्हां एकदा सूर्यबिंबांतून निघून त्या प्रदेशीं त्या तापसाच्या समोर येऊन उभ्या असलेल्या सूर्यासारख्या पुरुषाला मीं पाहिलें. तो पुरुष त्या तापसाकडून माझ्यासह जो मनानें व कर्मानें पूजला जात आहे तो तो अमृताच्या तरंगाप्रमाणें सुंदर वचन बोलला. "हे वृक्षशाखेवर लोंबत असलेल्या दीर्घ तापस ब्राम्हणा! तूं हें शरीराचा संहार करणारें आपलें तप पुरें कर व मनोहर इष्ट वर मागून घे. सप्त समुद्र व द्वीपें यांनीं परिवेष्टित झालेल्या या पृथ्वीला या देहानें केलेल्या धर्मामुळें तूं सहस्र वर्षें पावशील म्हणजे पृथ्वीपति होशील." याप्रमाणें इष्ट वर देऊन मूर्तिमंत दुसरा सूर्यच असा तो अस्त पावण्यासाठीं ज्यांतून उत्पन्न झाला होता त्या सूर्याब्धींत प्रविष्ट झाला. याप्रमाणें शास्त्रांमध्यें ज्या श्रेष्ठ वरद आदित्यपुरुषाचें श्रवण केलें होतें, त्यालाच ज्यानें प्रत्यक्ष पाहिलें आहे व वरदानव्यवहारानें अनुभविलें आहे, अशा त्या विवेकी शाखातपस्व्याला मीं म्हटलें—'हे ब्रम्हन्! तूं इतके दिवस वृक्षशाखेवर लोंबत राहून जें तप केलेंस, त्याचें इष्ट फल तुला मिळालें. आतां हें तप सोडून यापुढें प्राप्त झालेला व्यवहार कर.' तेव्हां त्यानें तें माझें म्हणणें मान्य केलें. मीं त्याचे दोन्ही पाय त्या वृक्षापासून सोडविले. हत्तीच्या पायांतील सांखळदंड काढून त्याला जसें मोकळें करावें, त्याप्रमाणें मीं त्या तापसाला त्या बंधापासून मुक्त केलें. त्यानंतर त्यानें स्नान केलें. हातामध्यें पवित्रक धारण करून जपपूर्वक अघमर्षण केलें. त्या वृक्षापासून पुण्यानेंच प्राप्त झालेल्या फळानें व्रतपारणा केली. त्याच्या पुण्यप्रभावानें प्राप्त झालेल्या त्या वृक्षाच्या मधुर फळांनीं देहयात्रा करून आम्ही दोघेहि तेथें तीन दिवस एकमेकांवर विश्वास ठेवून शांत चित्तानें राहिलों. सप्त द्वीपें व समुद्र यांनीं जिच्या चारी दिशा चिन्हित झाल्या आहेत अशा समग्र भूमीचा भोग घेण्यासाठीं तो ब्राह्मण खालीं मस्तक व वर पाय अशा वृक्षावर लोंबणाऱ्या शरीरानें तप करून सूर्यपुरुषापासून अभिमत वर संपादन करून व तीन दिवस त्याच वृक्षाखालीं विश्रांति घेऊन पायांची पीडा निवृत्त झाल्यावर मज मित्रासह तो आपल्या मथुरानगरीस जावयास निघाला. १८०.

---

## सर्ग १८१ वा.

१ मथुरेस जाणाऱ्या आम्हीं मार्ग चुकून गौरीवनांत प्रवेश केला व तेथें एका तापसवृद्धाशीं आमचा संवाद झाला, असें वर्णन.

कुंददंतः—चंद्र व सूर्य पूर्व दिशेंतील प्रसिद्ध इंद्रपुरीला जाण्यास जसे प्रवृत्त होतात, त्याप्रमाणें मथुरा नगरीला जावयास निघालेले आम्हीहि संध्याकाळपर्यंत मार्ग चालून मध्यें एका निवासस्थानीं जाण्यास प्रवृत्त झालों. त्या वेळीं आमच्या आकृति अतिशय आनंदित होत्या. प्रथम रोधाभिद ग्रामास प्राप्त होऊन ज्यावर आंब्याचीं झाडें फार आहेत अशा एका पर्वतावर विश्रांति घेतली. त्यावरील सालीस नगरांत दोन दिवस सुखानें राहिलों. नंतर ज्यांचें चित्त आनंदित झालें आहे अशा आम्हीं दुसरे दिवशीं पुष्कळ मार्ग आक्रमिला. शीत जल व स्निग्ध छाया यांनीं युक्त अशा वनद्रुमांनीं रम्य झालेल्या, नदीतीरावरील लतांनीं सोडिलेल्या पुष्पांच्या थरांनीं पांढऱ्या दिसणाऱ्या, चंचल तरंगांच्या ध्वनिरूप गाय-

नांनीं प्रवाशांना आनंद देणाऱ्या, स्निग्ध वृक्षांच्या वनछायेंत मंजुल शब्द करणाऱ्या, मृगपक्ष्यांनीं युक्त असलेल्या, हिरव्या गवतावर पडलेल्या स्थूल जलबिंदूंनीं मौतिक शोभा धारण करणाऱ्या अशा जंगल, पर्वत, नगर, ग्राम, श्वभ्र व जलमय स्थळांचें व त्याचप्रमाणें नद्या, प्रवाह, सरोवरें यांचें उल्लंघन करून त्या दिवशीं आम्हीं दाट कदलीवनांत रात्र घालविली. तुषारांनीं थंड झालेल्या कदलीदलांच्या शय्येवर आम्हीं विश्रांति घेतली. तिसरे दिवशीं आम्हीं एका जंगलांत येऊन पोंचलों. तें कमलखंड व गुल्मखंड यांनीं मंडित झालें होतें. तृण, काष्ठ इत्यादिकांना तोडून नेणाऱ्या लोकांनीं जणुंकाय त्याचे मध्यें मध्यें विभागच केले होते. त्यामुळें मेघांनीं विभक्त केलेल्या आकाशाप्रमाणें तें दिसत होतें. तेथें प्रवृत्तमार्ग सोडून दुसऱ्याच वनामध्यें प्रवेश करणारा तो तापस असें अप्रासंगिक वचन बोलला. "मुनिमंडलानें मंडित झालेल्या गौरीच्या आश्रमांत आपण जाऊं या. माझे दुसरे सात भ्राते वनामध्यें अशीच इच्छा करून स्थित आहेत. आम्ही आठ भाऊ आहोंत. आमचीं शरीरें जरी भिन्न भिन्न असलीं तरी एकच संविन्मय आहेत. आमचा संकल्प व निश्चय एकच आहे. त्यामुळें तेहि आपापल्या निश्चयाचा आश्रय करून येथें येऊन तप करीत राहिले आहेत व नाना प्रकारच्या तपांनीं त्यांनीं आपलें पाप क्षीण केलें आहे. त्या माझ्या भ्रात्यांसह मी येथें येऊन पूर्वी सहा महिने राहिलों होतों. त्यमुळें मीं हा गौरीचा आश्रम पाहिला आहे. या आश्रमांत फुलझाडांच्या छायेखालीं लहानलहान हरिणबालकें निजलेलीं असतात. पर्णशालेवर विश्रांति घेत असलेल्या शुकांकडूनहि शास्त्रदृष्टीचा उपन्यास केला जातो. तर मित्रा चल, आपण ब्रह्म लोकासारख्या या मुनीच्या आश्रमांत जाऊं. तेथें पुण्यांच्या योगानें आमचें चित्त अधिकच स्वच्छ होईल. अरे बाबा ! जे मोठे धीर तत्त्ववेत्ते विद्वान् असतात, त्यांचेंहि मन तत्त्वदर्शी नानें तृप्त झालेल्या मुनींचें दर्शन घेण्याविषयीं नेहमीं तत्पर असतें. मग आमच्यासारख्या अतत्त्ववेत्त्यांविषयीं काय सांगावें ?" त्यानें असें सांगितलें असतां आम्ही दोघेहि त्या मुनींच्या आश्रमांत गेलों आणि त्या महारण्यांत जाऊन जों पहातों तों तेथें सर्व शून्य दिसलें. साक्षात् संहाराचें स्वरूप आमच्या नजरेस आलें. तेथें वृक्ष नाहीं, एकहि पर्णकुटी नाहीं, गुल्म नाहीं, मनुष्य नाहीं, मुनि नाहीं, बालक नाहीं, वेदी नाहीं व एखादा पक्षीहि नाहीं. तें एक अनंत केवल शून्य अरण्य होतें. सर्व बाजूंनीं सूर्यतापानें संतप्त झालेलें जणुंकाय आकाशच त्या भूमीवर येऊन राहिलें होतें. अरे अरे! हें काय झालें, असें तो बोलूं लागला. नंतर आम्हीं पुष्कळ वेळ भ्रमण करून एके ठिकाणीं एक वृक्ष पाहिला. त्याची कांति स्निग्ध होती, छाया दाट होती व मेघाप्रमाणें तो शीतल होता. त्या वृक्षाच्या खालीं एक वृद्ध तापस समाधानामध्यें बसलेला होता. आम्ही त्या मुनीच्या अग्रभागीं छायेंत हिरव्या गवतानें युक्त असलेल्या भूमीवर तो मुनि ध्यान सोडून देहभानावर येईपर्यंत दीर्घकाल बसलों. पुष्कळ वेळ बसल्यावर मला कंटाळा आला आणि मी चापल्यानें 'अरे बाबा ! आतां ध्यान सोडून ऊठ' असें मोठ्यानें बोललों. तेव्हां माझ्या त्या मोठ्यानें ओरडून बोललेल्या शब्दानें तो मुनि जागृत झाला आणि मेघरवानें जागा झालेला सिंह जसा जांभई देतो, त्याप्रमाणें जांभया देऊन बोलला, "तुम्ही दोघेहि साधु कोण ? तो गौरीचा आश्रम कोठें गेला ? मला येथें कोणीं आणलें ? व हा काल कोणता

आहे ?" तो असें बोलला असतां मींहि म्हटलें कीं, "भगवन्, तूं जें विचारीत आहेस त्यांतील आम्हांला कांहीं ठाऊक नाहीं. तूंच काय तें समज. तूं सर्वज्ञ असूनहि योगबलानें हें कां जाणत नाहींस ?" तें ऐकून तो भगवान् पुनः ध्यान करूं लागला. त्यानें आमचा व आपला-हि सर्व वृत्तांत पाहिला आणि ध्यानानें सर्व जाणून तो मुनि कांहीं वेळानें आम्हांस म्हणाला " हें आश्चर्य ऐका. तुम्ही सुद्धां कर्तव्याला जाणणारे आहां. तुम्ही श्रेष्ठ साधु हा जो लहानसा कदंब वृक्ष पहात आहां, तें माझें निवास-स्थान आहे. हा वृक्ष या अरण्याचा जणुंकाय पुष्पित केशपाशच आहे. कांहीं कारणानें येथें गौरी सरस्वती होऊन दहा वर्षें राहिली. सर्व ऋतु एकाच वेळीं तिचें सेवन करीत होते. त्यामुळें येथें हें वन अत्यंत विस्तृत झालें; तें दाट अरण्य बनलें. त्यामुळें हें गौरीवन म्हणून प्रसिद्ध झालें. कुसुमप्रधान सर्व ऋतूंनीं हें भूषित होतें. भ्रमरींचें मनोहर गायन ऐकून कोकिल व इतर पक्षीहि येथें सुंदर ध्वनि करीत होते. पुष्पांचा वर्षाव करणाऱ्या जलप्रवाहासारख्या वृक्षांनीं येथील अंतरिक्ष शतचंद्रांनीं युक्त असल्याप्रमाणें केलें होतें. म्ह० जलप्रवाहाप्रमाणें शुभ्रवर्ण पुष्पांची वृष्टि करणारे वृक्ष आकाशांतील चंद्राप्रमाणें शोभत होते. मंदार व कुंद यांच्या सुगंधांनीं सर्व दिशा सुगंधित झाल्या होत्या. सभोंवार विकास पावणाऱ्या कुसुमराशिरूप चंद्रबिंबामध्यें अतिशय शोभा पसरली होती. तें अरण्य जणुंकाय वसंताचें नगरच होतें. तें भ्रमरींनीं युक्त अशा कुसुमखंडमंडपांनीं युक्त होतें. चंद्रकिरणाच्या समूहाप्रमाणें सभोंवार पसरलेल्या कोमल पुष्परूपी झोंपाळ्यावर देव व सिद्ध यांच्या वधू झोंके घेत होत्या. हारित, हंस, शुक, कोकिल, कोक, चक्रवाक, भास, कलविंक इत्यादि पक्ष्यांनीं तें गजबजून गेलें होतें. भेरूड, कुक्कुट, कपिंजल, तित्तिर, आड, मयूर, बक यांच्या क्रीडांनीं रम्य दिसत होतें. त्यातील कदंबसरस्वती गंधर्व, यक्ष, देव, सिद्ध याच्या किरीटांनीं पादप्रदेशीं घर्षण केली जात होती. म्हणजे ते तिला नमस्कार करीत होते. तेथील पुष्पांच्या सुवासांनीं वायु सुगंधित होत असून मेघहि त्याचा वास धारण करीत होते. मंद वायूंनीं हालणाऱ्या बालवल्लींनीं ज्यांतील प्रदेश गुप्त झाले आहेत असे कुंज, सूर्याचे किरणहि त्यांत प्रवेश करीत नसल्यामुळें, शीतल होते व त्याचप्रमाणें कदंबाच्या पुष्प-रागानें तें अरण्य सर्वत्र पीतवर्ण दिसत होतें. कल्हारपद्मांनीं मिश्रित अशीं कुमुदोत्पलें ज्यांत आहेत, अशा पद्माकरामध्यें चकोरादि पक्ष्यांसह हंस क्रीडा करीत असत. तालीप्रभृति वृक्षांच्या मध्यप्रदेशीं सर्वांचे अभिलाष पूर्ण करणारी विचित्र शक्ति तेथें जणुंकाय विहारच करीत होती. बाबांनो ! या वनामध्यें शंकराची अर्धां-गी गौरी कांहीं कारणानें कदंबसरस्वती होऊन दीर्घ काल राहिली. त्यामुळें त्या वनाला अशी विलक्षण शोभा प्राप्त झाली. शंकराच्या मस्त-कावर शशिकला जशी रहाते, त्याप्रमाणेंच ती प्रसन्न चंद्रमुखी त्या वनांत रहात होती. १८१

---

## सर्ग १८२ वा.

१ कदंबतापसाशीं त्याच्या भ्रात्यांचा समागम, २ वर व शाप यांचा हेतु व सिद्धि, यांचें वर्णन.

**वृद्ध तापसः**—त्याच या कदंबामध्यें दहा वर्षें स्वेच्छेनें राहून गौरी शंकराच्या वामार्ध शरीररूप मंदिरांत गेली. हा कदंबतरु तिच्या स्पर्शरूपी अमृताचा सेक झाल्यामुळें तिच्या मांडीवरच वाढलेल्या बालकाप्रमाणें अद्यापि

तो बालकच आहे. तो जरेला कधींच प्राप्त होत नाहीं. त्यानंतर ती गौरी निघून गेली असतां तें तसलें फार मोठें वनहि सामान्य वनासारखें झालें व सर्व लोक त्यावर उपजीविका करूं लागले. 'मालव' या नांवाचा एक देश आहे. त्यांतील मी एक राजा आहें. एकदा आपली राज्यश्री टाकून मी मुनींच्या आश्रमांतून भ्रमण करीत करीत या प्रदेशीं आलों. येथील आश्रमवासी लोकांनीं माझा आदर केला. मी या कदंबाच्या तळीं ध्याननिष्ठ होऊन राहिलों. त्यानंतर कांहीं कालानें आपल्या सात भ्रात्यांसह तूं पूर्वीं तप करण्यासाठीं या आश्रमांत आला होतास. ते तुम्ही आठ तपस्वी त्यावेळीं इतर तपस्व्यांप्रमाणेंच येथें रहात होतां. त्या तपस्व्यांना तुम्ही अतिशय मान्य होतां. कांहीं कालानें त्यांतील एक श्रीपर्वतावर गेला, दुसरा तप करण्यासाठीं कार्तिकस्वामीच्या आश्रमांत गेला, तिसरा वाराणशीस गेला, चवथा हिमालयपर्वतावर गेला आणि बाकीचे चार धीर भ्राते येथेंच श्रेष्ठ तप करीत राहिले. त्या सर्वांचें ध्येय एकच होतें. आपण या सप्तद्वीपयुक्त पृथ्वीचे महीपति व्हावें, ही त्यांतील प्रत्येकाची इच्छा होती. पुष्कळ दिवसांनीं त्यांच्या तपांनीं संतुष्ट झालेल्या इष्ट देवतांनीं त्यांना श्रेष्ठ वर देऊन त्या सर्वांचे मनोरथ पूर्ण केले. त्यानंतर तप करणारे ते भ्राते आपल्या घरीं गेले. ब्रह्मदेव ब्रह्मपुरीचा जसा उपभोग घेतो त्याप्रमाणें धर्मप्रधान कृतयुगाचा भूलोकीं उपभोग घेऊन तुझ्या त्या भ्रात्यांनीं भव्य वरदानाविषयीं उद्युक्त झालेल्या आपापल्या इष्ट देवतांची मोठ्या प्रयत्नानें अशी प्रार्थना केली—'हे देवतांनो! आम्हीं सप्त द्वीपांचे ईश्वर असेपर्यंत आमची सर्व प्रजा सत्यनिष्ठ असो. त्याचप्रमाणें सर्वेहि सप्तद्वीपनिवासी लोक आपापल्या वर्णधर्माप्रमाणें व आश्रमधर्माप्रमाणें वागोत.' तेव्हां त्यांच्या त्या सर्व इष्ट देवता त्यांनीं मागितलेले वर मोठ्या आदरानें देऊन व 'एवं अस्तु' असें त्यांस बोलून अंतर्धान पावल्या. त्यानंतर ते आश्रमवासी आपापल्या घरीं गेले. त्यांतील मी मात्र मागें राहिलों. मी त्यांच्या बरोबर गेलों नाहीं. मी केवळ एकांतांत ध्यानामध्यें आपल्या मनाला तल्लीन करून या वागेश्वरीकदंबाच्या खालीं पर्वताप्रमाणें राहिलों आहें. ऋतुसंवत्सररूप फार मोठा काल निघून गेल्यावर आसपास रहाणाऱ्या लोकांनीं हें सर्व वन तोडून टाकलें. हा कदंबवृक्ष म्लान होत नाहीं, म्हणून हें वागेश्वरीचें गृह आहे, अशा भावनेनें जनता याची पूजा करिते व नित्य समाधीमध्यें स्थित असलेल्या माझीहि पूजा करिते. आतां तुम्ही दीर्घ तपस्वी या प्रदेशीं आलां आहां. मी आपल्या ध्यानदृष्टीनें पाहिलेलें हें सर्व तुम्हांला निवेदन केलें आहे. यास्तव साधुपुरुषांनो, तुम्ही आतां उठा व आपल्या घरीं जा. तेथें ते भ्राते स्त्रीबंधु यांसह संगत झाले आहेत. तुम्हां आठहि जणांचें आपल्या गृहांमध्यें कल्याण होईल. ब्रम्हलोकांमध्यें वसूंचा जसा समागम होतो, तसा तुमचा तेथें समागम होईल." त्यानें असें सांगितलें असतां संशय आल्यामुळें हें मोठें आश्चर्य आहे, असें समजून त्या परम तापसाला मीं काय विचारलें तें तुह्मांला सांगतों. 'भगवन् ही सप्तद्वीपयुक्त पृथ्वी एकच आहे; तेव्हां एकाच वेळीं आठ भ्राते सप्तद्वीपांचे ईश्वर कसे होणार ?'

**कदंबतापसः**—अरे बाबा ! यांत हें एवढेंच एक असंबद्ध नाहीं, तर दुसरेंहि यापेक्षां अधिक असंबद्ध आहे. तें मी तुला सांगतों ऐक. हे आठ तापसभ्राते देहाचा क्षय झाल्यावर एका गृहांत सर्वेच सप्तेश्वर होतील. हे आठहि भ्राते भूपीठावरील त्या त्या गृहांतून सप्तद्वीपेश्वर राजे होतील. हें तूं आतां माझ्या तोंडून ऐक. आठ

दिगंतरांचें उज्ज्वल ताराष्टक जसें नियत आहे, त्याप्रमाणें या आठ भ्रात्यांचें अनिंदित भार्याष्टक आहे. हे दीर्घ तप करण्यासाठीं गेले असतां यांच्या त्या आठ भार्या अतिशय दुःखित झाल्या. कारण **स्त्रियांना पतिविरह अत्यंत दुःसह होत असतो.** त्या पतींचें पुनःपुनः स्मरण झालें असतां अतिशय दुःखित होऊन त्यांनीं शतचांद्रायण नांवाचें दारुण तप केलें. त्यामुळें पार्वती त्यांच्यावर अतिशय संतुष्ट झाली आणि अंतःपुरमंदिरांत अदृश्य राहूनच ती देवी ईश्वरी पूजेच्या वेळीं त्यांतील प्रत्येकीला असें वचन बोलली.

**देवीः**—'हे बाले! भर्त्यासाठीं व अपत्यासाठीं वर मागून घे. उन्हाळयानें मंजरी जशी करपून जाते, त्याप्रमाणें तपाच्या योगानें तूं अतिशय कृश झाली आहेस.' असें देवीचें वचन ऐकून तिच्या चरणांवर जिनें पुष्पांजलि अर्पिली आहे अशी ती सुवासिनी आपल्या वासनानुसार त्या ईश्वरीची स्तुति करीत होत्साती आनंदपूर्ण कंठानें मृदु भाषण करीत असें वचन बोलली. ती देवी त्या वेळीं आकाशांत स्थित होती. मयूरी अभ्रमालिकेला पाहून जशी शब्द करते तशी ती बोलूं लागली.

**सुवासिनीः**—हे देवि ! देवाधिदेव शंभूचें तुजवर जसें प्रेम आहे, त्याप्रमाणें माझ्या भर्त्याचें मजवर प्रेम असो. त्याचप्रमाणें तो माझा भर्ता अमर होवो.

**देवीः**—सृष्टीच्या आरंभापासून प्रवृत्त झालेली नियति ह्मणजे ईश्वराज्ञा दृढ असल्यामुळें तिचा भंग करणें शक्य नाहीं; यास्तव तप व दान यांच्या योगानें तूं अन्य वर मागून घे.

**सुवासिनीः**—हे देवि ! हें जर अलभ्य असेल तर मृत झालेल्या माझ्या भर्त्याचा जीव गृहांतून कधींच बाहेर न जावो. जेव्हां माझ्या पतीचा देहपात होईल तेव्हां त्याचा जीव आत्म-मंदिरांत राहो. हा वर, हे अंबिके, मला दे !

**देवीः**—"हे कन्ये ! 'एवं अस्तु.' तूं तुझा पति लोकांतरीं गेला असतां दुसऱ्या जन्मींहि त्याची प्रिय भार्या होशील, यांत मुळींच संशय नाहीं." असें बोलून निर्दोष जगदानंदासाठीं उद्यत झालेली ती गौरीची वाणी आकाशोदरांत असें बोलून मेघमालेच्या ध्वनीप्रमाणें शांत झाली. याप्रमाणें वर देऊन देवी गेली असतां कांहीं कालानें त्यांचे पति निरनिराळ्या दिशांतून प्राप्त झाले. त्या सर्वांनाहि देवतांचे महावर मिळाले होते. आज हाहि पति आपल्या भार्येच्या निकट जावो. भ्राते व इतर आप्त यांचा समागम होवो. हे साधो ! यांचें आणखी एक असमंजस, आकुल, आश्चर्यकारक व सत्कार्याच्या फलाला उपरोध करणारें असें हें एक क्षुद्रवृत्त ऐक. हे आठहि पुत्र तप करीत असतां त्यांचे आईबाप दुःखानें युक्त होऊन स्नुषांसह निरनिराळीं तीर्थें व मुनींच्या आश्रमांची परंपरा पहाण्यासाठीं गेले. आपल्या शरीराची व शरीरसुखाची यत्किंचितहि अपेक्षा न करतां पुत्रांच्या हितेच्छेनें कलापग्रामनामक तीर्थास जाण्याविषयीं यत्न करूं लागले. ते जात असतांना मुनिग्राममार्गांत त्यांना एक शुभ्रवर्ण पुरुष दिसला. त्याचा वर्ण पिंगट होता, व तो ठेंगू होता. सर्वांगाला त्यानें भस्म फासलें होतें, त्याचे केस वर उभारले होते, तो कोणी एक वृद्ध पांथ असेल अशी शंका आल्यामुळें त्याचा अनादर करून ह्मणजे नमस्कार, पूजा, स्तुति इत्यादि आदर न करतां उलट त्वरेनें जात असतां पायानें त्याच्या अंगावर धूळ उडवीत तीं दोघें त्याच्या

१ येथें मुळाप्रमाणें 'माझे भर्त्यावर' असो, असें म्हणावयास पाहिजे. पण त्यापेक्षा तिनें पतीचें आपल्यावर प्रेम असो, असा वर मागणें स्वाभाविक आहे. म्हणून आम्हीं तसा अर्थ केला आहे.

अंगावरून निघून गेलीं, तेव्हां त्या अपराधानें क्रुद्ध झालेला मुनि म्हणाला, हे महामूर्खा! सुनांना बरोबर घेऊन स्त्रीसह तीर्थाच्या इच्छेनें मज दुर्वासाचें उल्लंघन करून मला वंदन न करतांच जात आहेस. पण याप्रमाणें जात असलेल्या तुझ्या स्नुषांचे व पुत्रांचे तपानें संपादन केलेलेहि महा वर विपरीत होतील. त्यांना जरी ते वर मिळाले तरी त्यांचें फल अनिष्ट होईल. असें बोलणाऱ्या त्या मुनीचा भार्या व स्नुषा यांसह तो सन्मान करावयास जों जात आहे तों मुनि अंतर्धान पावला. तेव्हां त्यांचे ते मातापितर स्नुषांसह अतिशय दुःखी झाले, त्यांचीं अंगें कृश झालीं, मुखें दीन झालीं व स्नुषांसह ते आपल्या घरीं परत आले. म्हणून मी म्हणतों कीं त्यांच्या चरित्रामध्यें असें एकच असमंजस वृत्त नाहीं, तर अशीं लक्षावधि असमंजस वृत्तें आहेत. ज्याप्रमाणें गालावर गळू व्हावें, त्यावर फोड यावे व ते फुटावे, त्याप्रमाणें त्यांची स्थिति झाली. दृश्याकाशामध्यें जसे अनेक दृश्याभास दिसतात, त्याप्रमाणें या जगद्रूप चिदाकाशसंकल्पमय महापुरांत अशीं असंख्य विचित्र असमंजस वर्तमानें संभवतात. १८२.

## सर्ग १८३ वा.

१ चतुराननाच्या वाक्यानें विरुद्ध वर व शाप यांच्या परस्पर विजयांचें वर्णन.

**कुंददंतः**—त्यानंतर मी त्या गौरीच्या आश्रमांतील तापसाला प्रश्न केला. उन्हानें वाळलेल्या दर्भाग्राप्रमाणें त्याचे डोकीवरील केस जरेनें जर्जर झाले होते. "भगवन्! या जगांत सप्तद्वीपा पृथ्वी एकच आहे, तेव्हां ते आठजण उत्तम सप्तद्वीपेश्वर कसे झाले? ज्याचा जीव घरांतून बाहेर जाऊंच शकला नाहीं, तो सप्तद्वीपांचा ईश्वर होऊन दिग्विजय कसा करतो? ज्या वरद देवानें वर दिले तेच शापांनीं तद्विरुद्ध स्वभावास कसे प्राप्त होतात? शीतल छाया ग्रीष्म ऋतूंतील प्रखर तापास कशी प्राप्त होते? परस्पर विरुद्ध धर्म एकत्र अशक्य असलेल्या स्थितीस कसे प्राप्त होतात? आधारच आपल्या स्वरूपांत आधेयास कसा प्राप्त होतो?

**गौर्याश्रमतापसः**—हे साधो! यामध्यें तूं विरुद्ध व असमंजस असें काय पहात आहेस? त्यानंतर काय घडलें तें तूं ऐक, म्हणजे तुझें समाधान होईल. तुम्ही येथून आजपासून आठव्या दिवशीं त्या मथुराप्रदेशीं जाऊन पोंचाल व त्या आपल्या बांधवांसह सुखानें रहाल. आपल्या बांधवांबरोबर कांहीं काल सुखानें घालवाल. त्यानंतर ते आठहि भ्राते क्रमानें त्या गृहांतच मरण पावतील. त्यांचे आप्त त्यांच्या देहांना अग्निसात् करतील. पृथक्पृथक् असलेले त्यांचे जीव झोपेमध्यें जड झाल्याप्रमाणें कांहीं काल रहातील. इतक्यांत कर्मांचें फल अवश्य प्राप्त होणें हा स्वभावच असल्यामुळें त्यांची वरशापात्मक कर्में त्यांच्या चित्तावच्छिन्न आकाशांत एकत्र जमतील. त्या कर्मांचे अधिष्ठाते म्हणजे त्यांचें त्यांचें फल देणारे देव तद्रूप होऊन आप-आपल्याला अनुकूल अशा समूहानें घटित असे पृथक् पृथक् संपुट करतील. याप्रमाणें संपुटित झालेले वर व शाप पृथक् पृथक् शरीरें उत्पन्न करतील. त्यांतील जे वररूप असतील ते मोठे भाग्यवान्, ज्यांच्या हातांत कमल आहे असे, ब्रह्मदंड याच आयुधानें युक्त, चंद्राप्रमाणें शुभ्रांग व चतुर्भुज अशा वेषांना प्राप्त होतील. आणि त्यांत जे शाप असतील ते दुर्वासाला रुद्रांशत्व असल्यामुळें व दुष्कर्मांचें फळ देण्यास तयार झाल्यामुळें त्यांचे वेष घोररूप होतील. त्यांना तीन नेत्र असतील; ते हातांमध्यें शूल

धारण करतील. नीलमेघाप्रमाणें त्यांची अंगकांति असेल. त्यांना दोनच भुजा असतील, त्यांच्या भुंवया क्रोधानें वर चढलेल्या असतील व त्यामुळें ते भयंकर दिसतील.

**वर** ( म्हणतील ):–हे शापांनो ! तुम्ही अगदीं दूर निघून जा. वसंतादि ऋतूंप्रमाणें हा आमचा काल प्राप्त झाला आहे. त्याचें उल्लंघन करण्यास कोण समर्थ आहे ?

**शाप** ( म्हणतील ):–अरे वरांनो ! तुम्हीच दूर व्हा. वसंतादि ऋतूंप्रमाणें हा आमचाच काल आला आहे.

**वर** ( म्हणतील ):—तुम्हांला मुनीनें केलें आहे व आम्हांला सूर्यानें केलें आहे. देव मुनीपेक्षां अधिक आहेत; कारण भगवान् सूर्याला ब्रह्मदेवानें मुनींच्या आधीं उत्पन्न केलें आहे. वर असें बोलूं लागले असतां शाप अतिशय रागावून वरांना म्हणतील–' तुम्हांला सूर्यानें केलें आहे, पण आह्मांला रुद्राच्या अंशानें उत्पन्न केलें आहे. सर्व देवांमध्यें रुद्र आधिक आहे व दुर्वासमुनि रुद्रांशापासून झाला आहे." असें बोलून शाप पर्वताच्या शिखराप्रमाणें आपल्या त्रिशूलाचीं अग्रें वर उचलतील. याप्रमाणें शापांनीं आपले त्रिशूल सांवरलेले पाहून ज्यांनीं आपल्या मनांत प्रमाणपूर्वक सम्यक्विचारानें आपल्या कर्तव्याचा निश्चय केला आहे असे वर हंसत म्हणतील– " हे शापांनो ! असलें अनुचित कर्म सोडून कार्याच्या परिणामाचा विचार करा. कलहाच्या शेवटीं जें करावयाचें त्याचा आधींच विचार केलेला बरा. कलहाच्या शेवटीं ब्रह्मदेवाच्या नगरीला जाऊन आह्मांला निर्णय करावा लागेल, हें जर निश्चित आहे, तर आरंभींच, येथेंच तो कां करूं नये?" हें वरांचें भाषण ऐकून शाप ब्रम्हलोकीं जांण्याचें कबूल करतील. कोणता मूढ पुरुषहि युक्तियुक्त वाक्य ग्रहण करणार नाहीं ? त्याबरोबर शाप ब्रम्हदेवाच्या नगरास जातील. **एखाद्या गोष्टीविषयीं संशय आला असतां तो घालविण्यास महानुभावच समर्थ असतात.** तेथें पोंचल्यावर ब्रम्हदेवाला ते प्रणाम करतील व आपसांत घडलेलें सर्व वृत्त कथन करतील. त्यांचें ह्मणणें ऐकून तो असें बोलेल.

**ब्रह्मा:**—वर-शापांच्या अधिपांनो, शास्त्रानुसार व दृढाभ्यास याच्या योगानें ज्यांनीं आपली संविद् दृढ केलेली असते ते अंतःसार होत; त्यांचा नेहमीं विजय होत असतो. तेव्हां तुमच्यापैकीं अंतःसार कोण आहेत, याचा तुम्हीं आपल्या मनांतच विचार करा. हें ऐकून अंतःसाराचें परीक्षण करण्यासाठीं वरांच्या हृदयांत शाप प्रविष्ट होतील व शापांच्या हृदयांत वर प्रवेश करतील. आणि ते परस्परांच्या हृदयांतील अंतःसारत्व स्वतःच शोधून, तें जाणून, व एकत्र जमून पितामहाला ह्मणजे ब्रम्हदेवाला नंतर असें म्हणतील.

**शाप:**—हे प्रजानाथ ! आमचा पराभव झाला. कारण आम्हीं अंतःसार नाहीं. तर हे वरच अंतःसार आहेत. वर वज्राप्रमाणें दृढ आहेत. भगवन् ! हे आम्हीं–वर व शाप सर्वदा संविन्मयच आहों. आमचा संविदेहून निराळा देहच नाहीं. ' वर दिला ' अशा रीतीनें स्थित असलेली जी वर देणाराची संविद् तीच वर मागणाराच्या ठिकाणीं ' मीं हा वर मिळविला ' अशा रूपानें रहाते. वराचें फल सुखोपभोगाचें आश्रयस्थान असा जो देह तेंच आहे; परंतु तें विज्ञप्तिमात्र संविदेचें केवळ स्फुरण आहे. त्यामुळें तीच विज्ञप्ति देहाकार होऊन देशकालादि शेंकडों कल्पनाभ्रमांनीं त्या त्या भोग्य अर्थास पहाते. त्यांत जें भक्षण करण्यास योग्य असतें त्याचें ती भक्षण करते. त्यांतील शास्त्रीय तपाच्या वेळीं दृढ केलेल्या संकल्पानें वश करून ' घेतलेल्या वरद

संविदात्म्यापासून ग्रहण केल्यामुळें वरकल्पना चित्फलावस्थेमध्यें जेव्हां अतिशय पुष्ट झालेली असते, तेव्हां तीच अंतःसार होते. त्यामुळें वरद चित् दुर्जय असून शापजन्य चित् तशी नसते. वराची इच्छा करणारे लोक आपल्याला अमुक वर मिळावा, म्हणून दीर्घ काल तोच संकल्प करीत असतात व त्या संकल्पामुळें प्रसन्न होऊन वरद देवता वरप्रदान करतात. त्यामुळें वरांनाच दृढत्व असतें. संविद् दीर्घकाल ज्या गोष्टीचा अभ्यास करते तेंच तिचें तत्काल सार बनलेलें होतें. ती तत्काल तन्मय होते. शुद्ध संविदेंतील अतिशुद्ध संविद्च विजयी होते. त्याचप्रमाणें अशुद्ध संविदांतील अतिशुद्ध संविद्च प्रबल असते. फलांमध्येंहि त्याचें साम्य नसतें. एका क्षणांशानेंहि जो न्याय श्रेष्ठ असतो तोच पुष्ट होतो. कोणत्याहि पदार्थाविषयीं याहून भिन्न न्याय संभवत नाहीं. अर्थात् कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी शापाला प्राबल्य संभवत नाहीं. शाप व वर या दोहोंचें ज्या वेळीं साम्य असतें, तेव्हां शुभ व अशुभ या दोन्ही कोटींतील मध्यवर्ति मिश्र फल प्राप्त होतें. जसा मनुष्यदेह शुभ व अशुभ यांच्या साम्याचें फल आहे. दुधामध्यें मिसळलेल्या पाण्याप्रमाणें वर व शाप यांच्या मिलाफानें मिश्र वस्तु उत्पन्न होते. किंवा समबल वर व शाप यांच्या योगानें चित् स्वतःच द्विरूपतेचा अनुभव घेते. स्वप्नामध्यें चित् नगररूप जशी होते, तसाच हा प्रकार होतो. हे प्रभो! तुमच्यापासून आम्ही जें शिकलों, तेंच आपल्यापुढें प्रकट केलें, असें जाणून आम्हांला क्षमा करा. तुम्हांला नमस्कार असो. आम्ही आतां सत्वर स्वस्थानीं जातों." असें बोलून विनाकारण प्रयास देणाऱ्या मूर्खपणाच्या आचरणाविषयीं लज्जित होऊन, ज्याप्रमाणें नेत्राचा तिमिररोग शांत झाला असतां दृष्टीला आकाशांत दिसणारे केशपुंज अदृश्य होतात, त्याप्रमाणें ते शापगण कोठें तरी नाहींसे होतील. याप्रमाणें दुर्वासाचे शाप निघून गेल्यानंतर सप्तद्वीपाधिपत्याच्या विरुद्ध असलेले व त्यांना घरांतून बाहेर पडण्यास प्रतिबंध करणाऱ्या त्यांच्या भार्यांना गौरीनें दिलेले वर त्यांना शापाप्रमाणेंच विरुद्ध फल देणारे होतील. शापस्थानीं असलेले व देवीनें दिलेले ते त्यांच्या आठ पत्नींचे वर ब्रह्मदेवाला असें म्हणतील.

**शापस्थानीं असलेले वर** ( म्हणतील )—देवेश! भावी सप्तद्वीपेश होण्याची इच्छा करणाऱ्या जीवांचें तें त्या शवगृहांतून बाहेर पडणें शक्य आहे असें आम्हांला वाटत नाहीं. आम्ही त्यांस प्रतिबंध करूं. अंधकूपांतून जल बाहेर पडणें ज्याप्रमाणें अशक्य, त्याप्रमाणें हे श्रेष्ठ वर या सप्तद्वीपेश्वरांस सात द्वीपामध्यें प्रतिबंध करतील! वीर रणामध्यें जसा दिग्विजय करतात, त्याप्रमाणें ते वर यांना सप्तद्वीपेश्वर करतील. याप्रमाणें हे देवाधिदेवा, असल्या या अनिवार्य विरोधाचे वेळीं आम्ही सफळ होण्यासाठीं काय करावें? तें सांगा.

**ब्रह्मा**:—हे सप्तद्वीपेश्वरवरांनो! व हे गृहांत निरोध करणाऱ्या वरांनो! तुम्हा दोघांचीहि इच्छा परिपूर्ण झाली आहे. तुम्ही परस्परांच्या अपेक्षत्वास प्राप्त व्हा. कारण तुम्हांला परस्परांच्या इच्छेविरुद्ध असतांहि ते आठ भ्राते मरणोत्तर-क्षणापासूनच दीर्घ काल आपल्या सदनांतच सप्तद्वीपेश्वर होऊन राहिले आहेत. देहपात झाल्यानंतर लागलेच हे सर्व आपापल्या गृहांमध्यें सप्तद्वीपेश्वर झाले आहेत.

**सर्व वर** ( म्हणतील ):—भगवन्! आठ भूमंडलें कोठें आहेत! आठ सप्तद्वीपें कोठें आहेत? व इतकें ऐश्वर्य तरी कोठें आहे? श्रुतीमध्यें व लौकिकांतहि एकच भूपीठ प्रसिद्ध आहे; दुसरें नाहीं. तेव्हां तीं एका गृहाच्या

कोंपऱ्यामध्यें कशीं रहातील? कमलाक्षाच्या सूक्ष्म कोशामध्यें हत्ती कधीं तरी राहतात का?

ब्रम्हदेवः—तुम्ही व्यष्टि जीव व मी समष्टि जीव यांनीं युक्त असें हें समस्त जगत् सचित् परमाणूमध्यें स्थित असलेलें स्वप्नच आहे. त्यामुळें परमाणूंच्याहि आंत असलेल्या स्वगृहोदरांत त्याचा अनुभव येतो. जें परमाणूच्या अंतःस्थ स्वगृहामध्येंहि रहातें, तें एका गृहामध्यें स्फुरण पावलें तर त्यांत काय आश्चर्य आहे? प्रकृतीच्या या क्रमामध्यें विस्मय तो कोणता? हें यथास्थित असलेलें जगत् मरणानंतर भासतें. शून्यात्माच तत्क्षणीं घनाकार होतो. चितीच्या एका अणूमध्यें सुद्धां जर जगत् भासतें तर सप्तद्वीपयुक्त पृथ्वी त्यांच्या गृहोदरांत भासली तर त्यांत काय आश्चर्य आहे? हें जें जगत् भासत आहे तें चित्तत्त्वच आहे. जगत् त्याहून भिन्न नाहीं. आकाश शून्यत्वानें जसें भासतें, तसेंच तें चिन्मात्र भासत आहे.

याप्रमाणें वरद ब्रम्हदेवानें त्या वरांना सांगितलें. तेव्हां आधिभौतिक भ्रांतिमय देहांना सोडून व प्रणाम करून ते वर आतिवाहिक देहानें एकदमच तेथून निघून गेले. सप्तद्वीपामध्यें देवांच्या गृहकोशांत ते येऊन पोंचले. तों ते सर्व—आठहि भ्राते यज्ञांनीं, सत्कर्मांनीं व बंधुजनांनीं परिपूर्ण असलेल्या आठ जगांमध्यें ब्रम्हाचे आठ दिवस स्वायंभुव मनूच्या कुलांत सप्त द्वीपांचे नायक झाले. ते परस्परांना अज्ञात होते. पण प्रत्येकानें आपण भ्रात्यांसह आहों अशी कल्पना केल्यामुळें परस्परांचे बंधु होते. राज्यभेदानें सर्वांना आधिपत्य आहे, याविषयीं ते अज्ञ होते, त्यामुळेंच एकमेकांच्या हितामध्यें तत्पर होते. त्यांच्या घरांमध्येंच कोणी तारुण्यानें सुंदर झालेला एक भ्राता उज्जयिनी नांवाच्या महापुरींत स्व० आपल्या राजधानींत सुखानें स्थित होता. कोणी शाकद्वीपामध्यें स्थित होता. सर्व दिशांना जिंकण्यास तयार झालेला तो नागलोकाला जिंकण्याच्या इच्छेनें समुद्रजठरामध्यें संचार करीत होता. कोणी कुशद्वीपाच्या राजधानींत कोणत्याहि प्रकारच्या मानसिक व्यथेवांचून सुखानें कांतेसह निजला होता. त्यानें सर्व प्रजेला सुखी केलें असून दिग्विजयहि पूर्वींच मिळविला होता. कोणी शाल्मलीद्वीपांतील श्रेष्ठ पर्वताच्या शिखरावरील नगराच्या सरोवरांत विद्याधरींच्या समूहासह जलक्रीडा करण्यांत रत झाला होता. कोणी क्रौंचद्वीपांत सप्तद्वीपांतून आणलेल्या महासमृद्धींनीं वृद्धि पावलेल्या हेमपुरांत अश्वमेध यज्ञानें आठ दिवस यज्ञ करण्यास प्रवृत्त झाला होता. कोणी शाल्मलीद्वीपांत संचारी राजासह युद्ध करण्यास प्रवृत्त झाला. तो राजा इतका बलाढ्य होता कीं, त्यानें दिग्गजांचे दांत उपटून काढले व त्यानें कुलपर्वतांनाहि नांगरून टाकलें. गोमेदद्वीपामध्यें राहणारा कोणी त्यांतील आठवा भ्राता पुष्करद्वीपराजाच्या कन्येला जिंकून तिच्याशीं विवाह करण्यासाठीं कालवशात् शत्रूच्या देशाला पीडा देणारी सेना बरोबर घेऊन गेला. पूर्वीं भ्रात्यांतील आठवा म्हणून जो सांगितला तो हाच. पुष्करद्वीपांत रहाणारा कोणी एक लोकालोक पर्वतावरील राजाची निधानभूमि पहाण्याच्या इच्छेनें निघाला. याप्रमाणें त्यांतील प्रत्येकजण द्वीप-द्वीपांचें आधिपत्य करीत होता. ते आपल्या प्रतिभेप्रमाणें स्वगृहाकाशांतच हा सर्व व्यवहार करीत होते. त्यानंतर ते दोन्ही प्रकारचे वर आतिवाहिक देहावरीलहि अभिमान टाकून त्या आठहि जीवांच्या संविदेशीं एकरूप होतील. शून्य शून्याशीं जसें मिळून जातें, तसे ते त्या गृहांमध्यें परस्पर मिळून जातील आणि त्यांना चिरकाळ अभिमत गोष्टींचा लाभ होईल. संतोष देणारें राज्य प्राप्त झाल्यामुळें ते आठहि भ्राते

सप्तद्वीपेश्वर होऊन संतुष्ट राहतील. याप्रमाणें तपाच्या योगानें ज्यांचा पूर्वोक्त वर सिद्ध झाला आहे असे ते आठ भ्राते सप्तद्वीपाधिपत्यास प्राप्त होतील. ज्यांची बुद्धि विकास पावली आहे असे ते याप्रमाणें संतुष्ट होतील. प्रत्येक चैतन्यामध्यें दृढनिश्चयरूपानें जें स्फुरण पावतें तेंच उचित तप, जप इत्यादि कर्मांनीं कोणाला प्राप्त होत नाहीं? प्रत्येकाला तें प्राप्त होतें. १८३.

---

## सर्ग १८४ वा.

—:०:—

१ अज्ञात चित्‌च जगद्रूपानें भासत असल्यामुळें गृहामध्यें आठचर्शी काय पण कोट्यवधि जगें संभवतात, असें वर्णन.

**कुंददंतः**—असें बोलणाऱ्या त्या कदंबवृक्षतलतापसाला मीं असें विचारलें–हे ब्रह्मन् ! गृहांतील भव्य अवकाशांत आठ सप्तद्वीपयुक्त भूमि कशा भासतात ?

**कदंबतापसः**—हा चिद्धातु असाच आहे. कारण हा प्रपंच जरी शून्य असला तरी सर्वव्यापी आहे. त्यामुळें आपल्या स्वरूपाला त्रैलोक्यरूपानें किंवा सुषुप्ततुर्यरूपानें आपलें रूप न टाकतांच जेथें जेथें असतो तेथें तेथें तो पहातो व तें सर्व आकाशरूपच पहातो.

**कुंददंतः**—एका निर्मल, शांत, शिव, परम कारणामध्यें स्वभावसिद्ध नानात्मत्व वास्तविक कसें सिद्ध आहे ?

**कदंबतापसः**—सर्व शांत चिदाकाश आहे. त्यांत दिसणारेंहि हें नानात्व कांहीं नाहीं. जलामध्यें जसा तरंग त्याप्रमाणें हें सर्व विस्तारलें आहे. असत् पदार्थामध्येंच पदार्थ या रूपानें जें भासतें तें चिदाकाश आहे. स्वप्नसुषुप्ताप्रमाणें आपल्या• यथार्थ स्वरूपाला विसरलेलें तें अज्ञात स्वरूपच आहे. स्वप्नांत स्पंदयुक्त असलेलाहि पदार्थ स्पंदरहित असतो. पर्वतहि पर्वत नसतो. त्याप्रमाणें चिद्भाव सन्मात्ररूपानें कल्पित वस्तुत्वाला जरी प्राप्त झाला तरी तो तसाच आहे, असें समजावें. सर्वात्मक चित्तत्वाच्या वास्तविक स्वरूपांत सर्गादि स्वभावहि नाहींत व तत्कृत पदार्थहि नाहींत, तर सृष्टीच्या आरंभीं जें रूप जसें स्फुरलें तें तसेंच होऊन राहिलें. स्फुरणरूप व अस्फुरणरूप असें कधींहि वास्तविक तत्त्व नव्हे. द्रव्यरूपानें अचिद्रूप भासणारें जें जें कांहीं आहे, तें तें केवल चिदाकाशच आहे. एकच चित् स्वप्नांतील सेनेमध्यें लक्षावधि जनांच्या रूपानें जशी विकास पावते, त्याचप्रमाणें चित्‌मध्यें ही सर्व पदार्थता प्रकट होते. जें स्वतः स्वच्छ स्वात्म्यामध्यें चिदाकाश चकाकतें, तें त्यामुळेंच तदाकार आहे असा अनुभव येतो. स्वप्नांत अग्नि नसतांनाहि उष्ण संविद् जशी भासते, त्याप्रमाणें केवळ संविद्‌मात्ररूप आकाशांत पदार्थ स्वभावतःच भासतो. स्वप्नामध्यें खांब नसतांनाहि आकाशांतच स्तंभत्वाचा भास जसा होतो, त्याप्रमाणें या चित्‌चें नानात्व भासतें. तें अनन्य असलें तरी अन्याप्रमाणें दिसतें. आदिसर्गामध्यें जें पदार्थत्व दिसतें तें स्वभावतः स्वच्छच आहे. चिदाकाशानें जें जसें जाणलें तें तसें अद्यापि अनुभवास येत आहे. पत्र, पुष्प, फल, स्तंभ, या सर्वांमध्यें एक वृक्षच जसा असतो, त्याप्रमाणें सर्व सर्वत्र सर्वात्मरूपच पर व अपररूपानें स्थित आहे. परमार्थआकाशसागरांतील सर्गपरंपरा हें जल आहे. परमार्थमहाकाशांतील शून्यता याच सर्गसंविद आहेत. परमार्थ व सर्ग हे दोन, तरु व वृक्ष यांप्रमाणें पर्यायशब्द आहेत. बोधामुळें हें कळतें. पण अज्ञानामुळें केवल दुःखासाठीं द्वैत भासतें. परमार्थ व हें जगत् हीं दोन्ही

एकच आहेत, असा अध्यात्मशास्त्रबोधानें निश्चय होतो व तीच मुक्ति आहे. संकल्पाचें शरीर ब्रम्ह आहे. संकल्परूपानें स्फुरणाऱ्या जगाचें रूपहि तेंच आहे. म्हणून जगत्‌हि तेंच आहे. त्या ब्रह्मापासून वाग्वृत्ति निवृत्त होतात किंवा सर्व शब्द सन्मात्ररूप असल्यामुळें निवृत्त होतहि नाहींत. विधि, प्रतिषेध व भावाभावदृष्टि हें सर्व तें ब्रम्हच आहे. पाषाणाप्रमाणें स्थिर राहणें व अमौनमौन हेंच जीवात्मरूप आहे. जें सत् असूनहि असद्रूपानें भासतें. त्यालाच ब्रम्ह हें नांव आहे. सृष्टि काय, प्रलय काय, भावाभावादि वस्तूंची उत्पत्ति काय व नाश काय? एकरूप व निरामय ब्रह्मामध्यें सर्ग कोठचा व प्रलय कोठचा? एकाच विचित्र निद्रेमध्यें विचित्र सुषुप्त व स्वप्न यांचे विभ्रम निरंतर भासतात. या चिदाकाशसत्तेमध्यें कारणरहित असे हे अनेक सर्ग, चित्ररहित भिंतीवर जशीं चित्रें दिसावींत, तसे निरंतर भासत आहेत. द्राक्षासारख्या एका द्रव्यांत साखरेसारखें दुसरें द्रव्य मिळविलें असतां त्यांतील प्रत्येकाच्या कार्याहून निराळेंच —रुचि, पुष्टि, पित्तोपशम इत्यादि कार्य जसें होतें, त्याप्रमाणें प्राण्यांच्या अंतःकरणांत अभिव्यक्त झालेलें प्रमातृ चित्सार चक्षुरादिकांच्या द्वारा बाहेर निघून घटादि आकारवृत्तींच्या द्वारा घट-पटादि विषयांशीं मिळतें. त्या त्या विषयाच्या अधिष्ठानचिदावरणाला दूर करतें, आणि परस्पर त्रिपुटींचें स्फुरण करतें, म्हणूनच घटादि विषयहि स्वतंत्र सत्तेनें युक्त नसून त्यांची सत्ता व स्फूर्ति यांचें अधिष्ठान जी चित् तिच्या ते अधीन असतात. ते सृष्टीच्या आरंभीं जसे भासतात, तसे आतांहि भासत आहेत. चिन्मात्र हेंच एक सार असल्यामुळें त्यांची स्थितिहि संवेदनाप्रमाणेंच असते. स्पंदरहित चित् हेंच त्यांचें अधिष्ठान असल्यामुळें सर्व द्रव्यशक्तिहि आपल्या आश्रयापासून ऱ्हास पावत नाहींत. ते पदार्थ द्वैताकारग्रहानें रहित आहेत. रुद्र, उपेंद्र, ब्रम्हदेव यांसह हें सर्व जगत् स्वप्नाप्रमाणें अविद्यमान असतांनाच दिसत आहे व त्याचा अनुभव येत आहे. चिज्जलामध्यें या खरोखर विचित्र स्पंदरचना दिसतात. जंगमस्थावर आत्म्यामध्यें हर्ष, क्रोध, विषाद यांपासून उत्पन्न झालेल्या त्या स्पंदरचना स्वप्नाप्रमाणेंच भासतात. अज्ञात स्वरूपामध्यें स्थित असलेली जी विक्षेपशक्ति तद्रूप वायूकडून हालविलेल्या जगज्जालचमत्कृतीची जी प्रसरणशीलता तेंच हें जगत् आहे. चित्सूर्यापासून निघणारे जे किरण तेच जनन-मरणादि सहस्रावधि अनर्थ होत. ज्याचे नेत्र तिमिररोगानें दूषित झाले आहेत, त्याच्या दृष्टीला आकाशांत जसा केशपुंज दिसतो, त्याचप्रमाणें आकाशांत अनात्मवेत्त्याला ही जगद्भ्रांति दिसते. जसें संकल्पनगर जितकें कल्पावें तितकें व जसें कल्पावें तसें दिसतें, तोच न्याय जगालाहि लागू आहे. संकल्पनगरांतील सर्व स्थिति संकल्पमय असते. ती असद्रूप असूनहि सद्रूप असल्यासारखी अनुभवास येते. तीच विधात्याची संकल्परूप नियति असून अद्यापि तशीच वहात आहे व पुढेंहि तशीच वाहील. तिच्यामुळेंच स्थावरादि प्राणिजात नियतच रहातें. जीवापासून जंगम शरीर उत्पन्न होतें व स्थावरापासून स्थावर उत्पन्न होतें. नियतीमुळेंच जल सखल प्रदेशीं वहातें व अग्नि ऊर्ध्वभागीं पेटतो, देहयंत्रें व्यवहार करतात, सूर्यादि ज्योति ताप देतात, वायु नित्य वाहातात, पर्वतादिक स्थिर स्थित आहेत. त्या नियतीमुळेंच ज्योतिर्मय कालचक्र दक्षिणायनरूपानें फिरतें व वर्षाऋतूमध्यें आकाशाला धारावृष्टीनें भरून सोडितें. तेंच कालचक्र युग, संवत्सर इत्यादिरूपानें परिवर्तन पावतें. भूतलावर निरनिराळीं द्वीपें, समुद्र, पर्वत यांची रचना

त्या नियतीमुळेंच स्थिर आहे. भाव, अभाव, गृह, उत्सर्ग व द्रव्यशक्ति त्यामुळेंच स्थित आहे.

कुंददंतः—अहो, आम्हां सर्व जीवांचा व्यवहार ब्रह्मदेवाच्या संकल्परूप नियतीनें व्यवस्थित असो, पण ब्रह्मदेवाची संकल्पव्यवस्थाच कशी सिद्ध होते? कारण पूर्वी जें अनुभविलें असेल त्याची स्मृति होते व तदनुसारच संकल्पहि होत असतात. पण प्रथमसर्गामध्यें ब्रह्मदेवाला पूर्वीच्या सर्गाचें भान होतें, असें जें प्रसिद्ध आहे, तें कोणत्या कारणामुळें होतें?

तापसः—ब्रह्मदेवाला जो सर्गाविषयाचा संकल्प होतो तो स्मरणाधीन नाहीं. तर दिव्य ज्ञानानेंच अतीत, अनागत सर्ववस्तुदर्शनाधीन आहे. त्याला त्या क्षणीं स्वप्नांतील आपल्याच मरणाप्रमाणें सर्व अतीत व अनागत जगत् अपूर्वच दिसतें आणि दृष्टानुसारिणी चिद्विवर्तरूप सांकल्पिक सृष्टि प्रवृत्त होते. तिच्या ठिकाणींच 'मीं हें पूर्वी पाहिलें' असा अध्यास होतो. चित्त्वामुळें चिदाकाशांत जगद्रूप संकल्पनगर स्फुरतें. म्हणून तें सत्‌हि नव्हे व असत्‌हि नव्हे. कारण तें केव्हां दिसतें व केव्हां दिसत नाहीं. चैतन्याच्या प्रसादानें संकल्प, स्वप्न इत्यादिकांचा अनुभव येतो; म्ह० स्वप्नांत नुस्त्या कल्पनेनेंच वाटेल तें पहाण्यास समर्थ असलेली शुद्ध चित् सृष्टीच्या आरंभीं संकल्पपुर निर्माण करण्यास असमर्थ कशी असेल? त्यासाठीं पूर्वानुभवजन्य स्मृतीचीच कल्पना करण्याचें कांहीं कारण नाहीं. म्हणूनच तत्त्वज्ञ लोक गुणदोषादिकांचें स्मरण न करतांच हर्षामर्षरहित होऊन कुलालचक्राप्रमाणें प्रवृत्तिचक्रानें प्रारब्धवशात् भ्रमण करतात. निद्रा सोडून जागें झाल्यावर स्वप्ननगराची जशी स्मृति होते तशीच ही त्रिजगत्स्मृति आहे असें तूं जाण. ती स्मृति अधिष्ठान चिदूहून भिन्न नाहीं, तसाच हा त्रिजगद्भ्रम अधिष्ठानचितीहून भिन्न नाहीं. ज्याला जगत् म्हणून म्हणतात तें संविदाभासमात्र आहे. हें संविदाकाश अत्यंत शांत व निरुपाधिक आहे, आणि हें जगत् तद्रूपच आहे, त्याहून पृथक् नाहीं असें तूं जाण. ज्यांत हें सर्व आहे, ज्याच्यापासून हें सर्व होतें, जें सर्वतः व सर्व स्थित आहे, जें सर्वरूपानें भासतें, तें ब्रम्हच सर्वत्र सर्वदा स्थित आहे. हा संसार ब्रह्ममय कसा आहे, तुझें पुढें काय होईल व हें दृश्य कसें दिसतें हें सर्व मीं तुम्हांला सांगितलें. यास्तव हे द्विज हो! तुम्ही उठा आणि उषःकालीं दोन भ्रमर जसे कमलामध्यें जाऊन बसतात, त्याप्रमाणें तुम्ही स्वगृहीं जा. तेथें तुम्हांला अभिमत असलेलें सत्कर्म सत्वर करा. मी आतां समाधिभंग झाल्यामुळें मोठ्या कष्टानेंच कांहीं वेळ येथें काढीन व पुनः दुःखपरिहार करण्यासाठीं समाधीमध्यें प्रवेश करीन. १८४.

---

## सर्ग १८५ वा.

१ त्या दोघांचें गृहागमन, २ भ्रात्यांचा क्रमानें क्षय व ३ रामाच्या दर्शनानें कुंददंताच्या मोहाचा उच्छेद यांचें वर्णन.

कुंददंतः—तो वृद्ध मुनि असें बोलून ध्यान करण्यासाठीं डोळे मिटून बसला आणि प्राण व मन यांच्या क्रिया शांत झाल्यामुळें चित्राप्रमाणें झाला. आम्हीं उदार व प्रेमळ वाक्यांनीं पुनः पुनः जरी त्याची प्रार्थना केली तरी त्याच्या बाह्य वृत्ति शांत झाल्यामुळें तो संसाराचें भानच विसरला. त्यामुळें त्यानें आम्हांला कांहींच उत्तर दिलें नाहीं. आम्ही दोघे हळुहळू त्या प्रदेशांतून निघालों. मुनिवियोगामुळें आमची उत्सुकता वाढली होती.

म्हणून आम्ही कांहीं दिवसांनीं ज्यांतील आप्त, बांधव आनंदित आहेत अशा मथुरेंतील गृहास प्राप्त झालों. तेव्हां त्या गृहामध्यें कुलदेवतांचें आराधन व सुवासिनी-ब्राम्हण-भोजन वगैरे उत्सव करून दीर्घकाल नाना प्रकारच्या गोष्टी बोलत तेथें राहिलों. पुढें क्रमानें ते सातहि भ्राते प्रलयकालच्या समुद्राप्रमाणें विलय पावले. त्यांपैकीं एकटा माझा मित्रच प्रलयकाळच्या आठव्या एकार्णवाप्रमाणें अवशिष्ट राहिला. पण कांहीं काळानें संध्याकाळच्या सूर्याप्रमाणें तोहि अस्त पावला. त्यावेळीं माझें अंतःकरण दुःखानें अत्यंत व्यापलें. माझ्या मित्राचा वियोग मला अत्यंत असह्य झाला. म्हणून अत्यंत दुःखित झालेला मी पुनः कदंब-तापसाकडे आलों. माझ्या दुःखाचा उपशम होण्यासाठीं त्याच्यापासून ज्ञान संपादन करावें म्हणून मोठ्या आदरानें तेथें जाऊन तीन महिने राहिलों. तरी तो समाधि सोडून उत्थान पावला नाहीं. तीन महिन्यांनंतर तो एकदां ध्यान सोडून देहभानावर आला. तेव्हां अतिशय नम्र होऊन मीं त्यास प्रश्न केला असतां तो मला असें बोलला.

**कदंबतापसः**—मी समाधि सोडून एक क्षणभरहि राहूं शकत नाहीं. यास्तव मोठ्या त्वरेनें मी पुनः समाधीमध्येंच प्रवेश करतों. हे निष्पापा! अभ्यासावांचून तुला परमार्थाचा उपदेश प्राप्त होणें शक्य नाहीं. मी या वेळीं तुला उपदेश जरी केला, तरी तो तुझ्या मनांत ठसणार नाहीं. मी तुला ज्ञानप्राप्तीचा आणखी एक उपाय सांगतों तो ऐक. अयोध्या या नांवाची एक नगरी आहे. त्यांत दशरथ म्हणून एक राजा आहे. त्याला राम या नांवाचा एक प्रसिद्ध पुत्र आहे. त्याच्याजवळ तूं जा. त्याला त्याचा कुलगुरु मुनिश्रेष्ठ वसिष्ठ सभेमध्यें दिव्य मोक्षोपाय-कथा सांगेल. हे ब्राह्मणा! ती कथा दीर्घकाल श्रवण करून तूं मजप्रमाणेंच परम-पावन-पदीं विश्रांति पावशील!

असें बोलून तो तापस समाधानरूप अमृताच्या महासागरांत प्रविष्ट झाला व मी येथें तुजपाशीं आलों. हा असा मी आहें व आपला सर्व वृत्तांत तुला निवेदन केला आहे. मीं जें केलें, ऐकलें व पाहिलें तें सर्व तुला सांगितलें.

**श्रीरामः**—कथा सांगण्यांत अत्यंत कुशल असलेला तो कुंददंत असें बोलून त्या दिवसापासून माझ्या समीपच राहिला. हाच तो माझ्याजवळ बसलेला कुंददंत नांवाचा ब्राह्मण होय. त्यानें मोक्षोपाय नांवाची ही संहिता श्रवण केली आहे. माझ्या समीप बसलेला हा 'कुंददंत' नांवाचा ब्राह्मण आज निःसंशय झाला कीं नाहीं हें तुम्ही त्यास विचारा.'

**श्रीवाल्मीकिः**—राघव याप्रमाणें बोलला असतां वक्त्यांतील श्रेष्ठ वसिष्ठ कुंददंताकडे पाहून म्हणाला.

**श्रीवसिष्ठः**—हे निष्पाप द्विजश्रेष्ठा, कुंददंता! सांग, मी सांगितलेलें हें श्रेष्ठ मोक्षद ज्ञेय तूं जाणतोस का?

**कुंददंतः**—सर्व संशयांचा उच्छेद करणारें माझें चित्तच माझ्या विजयाला कारण झालें आहे. माझ्या सर्व संशयांचा विच्छेद झाला. मला अखंडित आत्मज्ञान झालें. शुद्ध ज्ञातव्य मी जाणलें. अक्षत द्रष्टव्य मीं पाहिलें. सर्व प्राप्तव्य प्राप्त करून घेतलें व परमपदीं मी विश्रांति पावलों आहें. तुझ्या तोंडून मीं ही आत्मचित् जाणली. हें सर्व परमार्थघन आहे अशी माझी खात्री झाली. आत्म्याशीं अभिन्न अशा जगद्रूपानें आकाशांतच हा सर्व विस्तार झाला आहे. ती चित् सर्वांचा आत्मा असल्यामुळें सर्वरूपी व सर्वव्यापी अशा आत्म्यापासून हें सर्व सर्वत्र संभवतें. पांढऱ्या मोहरी-

च्या एका दाण्यामध्येंहि स्थित असलेल्या अधिष्ठानचितीपासून सर्व संभवतें. सर्व कल्पनाशक्तींनीं भरलेल्या चित्तत्त्वापासून मायादृष्टीनें सर्व जगें संभवतात, पण परमार्थदृष्टीनें कांहींच संभवत नाहीं, हें मीं पूर्णपणें जाणलें. गृहामध्यें सप्तद्वीपा वसुंधरा संभवतेच, आणि तें गृहहि शून्यच आहे, ही गोष्ट अगदीं सत्य आहे; यांत कांहीं संशय नाहीं. सर्वघन आत्माच सर्व जन, सार्वकालिक बोध, विषय, इत्यादि सर्वभावानें असतो. जी जी वस्तु जेव्हां जेव्हां जशी उदय पावलेली दिसते व भूतांकडून तिचा अनुभव जसा जसा घेतला जातो, तेव्हां तेव्हां तशी ती सर्वघन आत्माच आहे. हें ब्रह्मच आद्यंतशून्य व विमुक्त आहे. १८९.

## सर्ग १८६ वा.

१ सर्व ब्रह्मच आहे हा सिद्धांत युक्तींनीं दृढ करतात व २ ब्रम्हदेवाच्या संकल्पचित्-पासून वरशापादिसिद्धि.

श्रीवाल्मीकिः—कुंददंत असें बोलला असतां भगवान् अनिंद्य आत्मा वसिष्ठ मुनि हें परमार्थोचित वचन बोलला. खरोखर या महात्म्याला विज्ञानविश्रांति प्राप्त झाली. हा तळहातावरील आंवळ्याप्रमाणें हें विश्व ब्रह्म आहे असें पहातो. खरोखर हें विश्व भ्रांतिमात्र आहे. अज ब्रह्मच तसें भ्रांतिरूपानें भासतें. ती भ्रांतिहि ब्रह्मच आहे. तें शांत, एक व अनामय आहे. जें, जसें, ज्या प्रकारें, तितकें, जेव्हां आहे, तें, तसें त्या प्रकारें तितकें, तेव्हां, सर्व ब्रह्मच आहे. शिव, शांत, अज, मौन, अमौन, अजर, व्यापक, शून्याशून्य, उत्पत्ति, नाश, आदि, अंत यांनीं रहित व ध्रुव ब्रह्मच हें सर्व आहे. ज्या ज्या अवस्थेचा संकल्प मायाद्वारा संविदें-कडून केला जातो, ती ती अवस्था, जलसेकांनीं जशी लता, त्याप्रमाणें सहस्रशाखात्वास प्राप्त होते. ज्याअर्थीं चिदाकाशामध्यें ब्रह्मांड हाच परमाणु स्थित आहे, त्याअर्थीं परमाणुच ब्रह्म आहे व त्यांत हें सर्व जगत् स्थित आहे. यास्तव ज्याचा शरीरादि वैचित्र्यबंध अस्त पावला आहे असा होऊन तूं यथास्थित ब्रह्मच होऊन रहा. तूं निरामय आत्मरूप हो. कारण चिदाकाश आदि-अंत-मध्यशून्य, अखंडित, सौम्य व हें समस्त आहे. तें स्वतःच दृश्य, स्वतःच द्रष्टृ, स्वतःच चित्व, स्वतःच जड, स्वतःच किंचित् व न किंचित् ब्रह्मस्वरूपामध्यें स्थित आहे. स्वतः ब्रह्म आपल्या स्वरूपांत तेथें ज्या वासनेनें जसें होतें तसेंच तें जेथें आपलें हें शांत स्वरूप न सोडतां रहातें. ब्रह्म व दृश्य हें द्वैत केव्हांहि नाहीं. तर ब्रह्म सर्वदा स्वरूपांत स्थित आहे. शून्यत्व व आकाश यांप्रमाणें ब्रह्म व दृश्य यांचें एकत्व तूं जाण. दृश्यच परब्रह्म आहे व परब्रह्मच दृश्य आहे. हें शांत नाहीं, अशांत नाहीं, नानाकार नाहीं, साकारहि नाहीं. जागें होतांच स्वप्न जसें अदृश्य होतें तसाच हा देहहि निराकार आहे. तो संविन्मात्ररूप आहे, अप्रतिम आहे, त्याचा चांगला अनुभव आला तरी तो असन्मय आहे. जसा संविन्मय जंतु झोंपेमध्यें जड होऊन रहातो, त्याचप्रमाणें ही स्थावरनामक संविद जड झाली आहे. चित् स्थावर झाल्यामुळें जड होते, जंगमरूप झाल्यामुळें चिद्रूप बनते. निजलेला जीव स्वप्न पहातो व शेकडों जगांनीं जागृतीचा अनुभव घेतो. मोक्ष होईपर्यंत पृथ्वीवर, जलांत, तेजामध्यें, वायूमध्यें, आकाशांत स्वप्नासारख्या आकाशरूप लक्षावधि जगांनीं ही जगत्स्थिति भासते. झोंपलेला मनुष्य जसा जडतेचा अनुभव घेतो,

त्याप्रमाणें चित् जाड्याचा अनुभव घेते. वस्तुतः ती जडतेला केव्हांच प्राप्त होत नाहीं. जडता हा तिचा स्वभावच नाहीं. चित्त्व हाच तिचा स्वभाव आहे. जाड्यवेदनाला जाणणारा जो जीव त्याच्यासाठीं स्थावर शरीर जसें केलें जातें, त्याप्रमाणें चिद्-वेदनेला जाणणाऱ्या जीवासाठीं जंगम शरीर केलें जातें. तथापि चिद्मध्यें कोणत्याहि प्रकारचा भेद नाहीं. शरीराचे नख, हस्त, पाद इत्यादि अनेक अवयव जसे असतात व ते सर्व मिळून एकच शरीर म्हटलें जातें, त्याप्रमाणें चित्चे स्थावर व जंगम हे अवयव असून तिचें एकच अप्रतिघ-रूप आहे. प्रथमसर्गामध्यें स्वप्नाप्रमाणें जें रूप प्रगट झालें तेंच जगत् होय व अद्यापि तें तसेंच स्थित आहे. तें अप्रतिघ, शांत व जसें-च्या तसेंच स्थित आहे. वस्तुतः सृष्टीच्या आरंभींहि कांहींच प्रकट झालें नाहीं. कारण त्यापूर्वी कांहींच नव्हतें. त्यामुळें केव्हांच प्रकट न झालेलें चित्तत्त्व हेंच परम हित होय. सर्गाचा हा आदि व हा अंत असा भास होतो. पण तो गाढ निद्रित चित्मध्येंच निद्रेंतील स्वप्ना-प्रमाणें होणारा केवल भास आहे. म्हणजे स्वप्न-प्रपंच सुषुप्ति व प्रबोध यांनीं बाधित होतो. तथापि निद्रेमध्येंहि त्याची कल्पना होते. जागृ-तींत स्वप्नप्रपंचाची कल्पना कोणी करीत नाहीं. त्याप्रमाणेंच सृष्टीच्या आद्यंताची कल्पनाहि अज्ञानदशेंत होते, ज्ञानावस्थेंत होत नाहीं. कारण एक आद्यंतशून्य परमात्मघन चिद्धातुच स्थित आहे. मला प्रलय, स्थिति व सर्ग यांचें नांव देखील कधीं ठाऊक नाहीं, मग रूप तर दूरच राहिलें. प्रलय, स्थिति, सर्ग इत्यादि जें जें दिसतें, तें वस्तुतः नाहीं. चित्रांतील स्त्री चित्राहून जशी भिन्न नाहीं, त्याप्रमाणें हें दृश्य आत्म्याहून भिन्न नाहीं. चित्रकाराला पुढें चित्रांत काढावयाची सेना त्याच्या चित्तांतील चित्राहून भिन्न नसते, त्याप्रमाणें चित्तत्त्वामध्यें भासणारी ही सर्गता भिन्न नाहीं. विभागहीन अशाहि या चिद्घन निद्रेकडून म्हणजे अविद्ये-कडून सुषुप्तरूप आवरण घालून वास्तवस्वरूप-भूत असलेलाहि मोक्ष चोरला जातो. म्हणजे अविद्या या मोक्षाला आच्छादित करते, आणि तीच अविद्या स्वतः चित् बनून जाग्रत्भाव व स्वप्न यांना दाखविते. हा प्रलय, ही सृष्टि, हा स्वप्नभाव, हा जागर इत्यादि हे प्रज्ञान-घनतारूप आत्मसूर्याचे प्रकाशभेद आहेत. त्यांत उद्भूत वासनारूप जो स्वप्नभाग तोच उपाध्यंश-प्राधान्यानें चित्त व चिदंश-प्राधान्यानें जीव होय. तोच देव, असुर, मनुष्य, इत्यादि अधिकारी-शरीररूप होऊन तत्त्वज्ञानानें निद्रा घालवून मुक्त होतो. त्यालाच चवथ्या व पांच-व्या भूमिकेंत जाणलें असतां सहाव्या भूमींतील सुषुप्ति होते व सातव्या भूमिकेंत त्यालाच मोक्षाकांक्षी लोकांकडून मोक्ष म्हटलें जातें.

**श्रीरामः**—देव, असुर इत्यादि भेदानें चित्त्वाचें प्रमाण व रचना काय आहे? चिन्निद्रा व तिच्या उदरांतील जगत् किती प्रमाणाचें आहे व तें किती काल रहातें?

**श्रीवसिष्ठः**—मनुष्य, देव, असुर, स्थावर, स्त्रिया, नाग, पर्वत, पिशाचादि, पक्षी, कीटादि, राक्षस इत्यादि सर्व चित् आहे. त्याचें प्रमाण अनंत आहे, असें तूं जाण. परमाणूपासून ब्रह्मलोकापर्यंत व ब्रह्मलोकापासून कीटापर्यंत जेवढें जगत् आहे, त्यांत त्याचे सहस्रशः विभाग होतात. आकाशांत सूर्य जेथून संचार करतो व त्याच्या पलीकडे जेथवर आपली दृष्टि पोंचते तेथवर चित्त आहे. चित्ताचें प्रमाण अनंत व निराकार आहे. हें चितीचें उग्ररूप आहे. कारण याच्यामुळेंच संसाराचें दुःसह दुःख सोसावें लागतें. या समष्टि आत्म्याच्या स्वरूपांत सर्व भुवनांच्या ऋद्धि रहातात. त्या

ब्रम्हांडादि कल्पनेनें जेव्हां बाहेर पडतात, तेव्हां सर्ग होतो, व तो चित्तांतून आला आहे असें आम्ही म्हणतों. चित्तालाच जीव समतात. तें आदि-अंतशून्य विभु आहे. म्हणूनच घटांतील आकाशाप्रमाणें तें सर्वदेहांमध्यें असतें व विधात्याच्या इच्छेनें देहांतून उत्क्रमण केल्यावर तें नसतें. नदीचा प्रवाह भूमीच्या उंचसखल भागांचें ग्रहण व त्याग जसा करतो, त्याप्रमाणें मन शरीरांचें ग्रहण व त्याग करतें. त्या मनाला आत्म्याचा साक्षात्कार झाला असतां हा देहादिभ्रम तत्काळ शांत होतो. ऊषरभूमीचा बोध होतांच मृगजल जसें लोपतें, त्याप्रमाणेंच त्यांचा देहभ्रम लोपतो. जगामध्यें जेथें अणु तेथें हें मन असतें. म्हणून त्याचें तेंच प्रमाण होय. मन हाच पुरुष आहे. त्यामुळें पुरुषाच्या मनांत सर्व जगत् स्थित आहे. स्वप्नभूमिकेमध्यें जसें, त्याप्रमाणेंच हें जें कांहीं दृश्य आहे तें चित्तच आहे. तेंच पुरुष होय. तेव्हां जगत् व आत्मा यांत भेद काय राहिला? हा पदार्थसमूह चिद्‌च आहे. दुसऱ्या कशामध्येंहि पदार्थता नाहीं. स्वप्नांतील पदार्थ जसे भिन्न नाहींत किंवा सोन्यांतील अलंकारत्व जसें भिन्न नाहीं, त्याप्रमाणें पदार्थता चितीहून भिन्न नाहीं. ज्याप्रमाणें सागरांत एकदेशीं एकत्र जमून राहिलेलें जल पृथक् पृथक् भासतें, त्याप्रमाणें ब्रह्मामध्यें अनन्य व नित्यस्थित अशा दृश्यात्मक संवेदना पृथक् भासतात. जसें समुद्रामध्यें द्रवत्व व त्याच्या जठरकोशांत जल स्फुरतें, त्याप्रमाणें परमात्म्यामध्यें चिद्रूपीं अनन्य असे पदार्थसमूह स्फुरतात. बाहुल्यांची जी आकाशरूप आत्यंतिक शून्यता त्याचें रूप धारण करणारा हा जगद्रूप चित्-स्तंभच निश्चल पर्वत होऊन राहिला आहे. त्याला आदि-अंत नाहीं. हें विश्व संविदाकाशांत यथास्थित अवस्थित आहे. स्वप्नभूमींतील चिद्‌प्रमाणें जगांतील अधिष्ठानभूत चित्‌हि आपलें स्वरूप न सोडतांच सर्व शांतरूप स्थित आहे. समता, सत्यता, सत्ता, एकता व निर्विकारता, या पांच प्रकारांनीं भेदाची प्रतीति येत नसल्यामुळें तें शांत आहे. पण खांबावरील कोरलेल्या चित्राप्रमाणें व्यवहारांत आधार-आधेयभावानें जें किंचित् प्रतिभान होतें, तेंहि स्वरूप न सोडतांच होतें. स्वप्न, संकल्प, संसार, वर, शाप यांच्या दृष्टिहि या संसारांत चितीहून भिन्न नाहींत. ज्याप्रमाणें समुद्र, सरोवरें व नद्या यांत तात्त्विकदृष्ट्या भेद नाहीं, पण व्यवहारदृष्ट्या भेद आहे; त्याप्रमाणें वरील दृष्टींतहि तात्त्विकदृष्ट्या भेद नाहीं, व्यवहारदृष्ट्या भेद आहे.

श्रीराम:—भगवन्! वर व शाप यांच्या पदार्थसंवेदनामध्यें कार्यकारणता कशी आहे? उपादानावांचून कोणतेंहि कार्य होत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. पण वरानें नंदी बैल होता तो देव झाला व नहुष इंद्र होता तो सर्प झाला, याचें योग्य उपादानकारण मुळींच संभवत नाहीं. तेव्हां हें कसें घडतें तें सांगा.

श्रीवसिष्ठ:—(ज्यांचें विज्ञान आवरणशून्य आहे, अशा भगवान् रुद्राची व अगस्त्यादिकाची सत्यसंकल्पावच्छिन्न चिद्‌च देव, सर्प इत्यादि शरीररूपानें त्या वेळीं विवर्त पावते. याप्रमाणें विवर्तवादामध्यें या आक्षेपाला अवकाशच मिळत नाहीं, असें उत्तर देण्यासाठीं वसिष्ठ भूमिका रचतात.) तत्त्वज्ञानानें शोधून केल्यामुळें अतिशय निर्मल झालेलें जें चिदाकाश त्याचें स्फुरण जगत् म्हटलें जातें. समुद्रांतील जलाचें स्फुरण हेंच जसें तरंगांचें चलन, त्याचप्रमाणें चिदाकाशस्फुरण हेंच जगत् होय. समुद्रजलाच्या आवर्ताप्रमाणेंच हे चिदात्मकभाव भासत आहेत. ऋषींनी या भावांनाच

संकल्पादि नांवें ठेवलीं आहेत. ( ज्यांचें विज्ञान आवरणशून्य आहे, त्यांचें जें पदार्थस्फुरण तोच सत्यसंकल्प होय, हें दाखविण्यासाठीं तसल्या विज्ञानाचीं कारणें सांगतात-- ) पूर्वोक्त कर्कटीप्रमाणें अभ्यासानें, विचारानें, शत्रुमित्रादिकांमध्यें समदृष्टि ठेवल्यानें, देवादि सात्विक जन्मांमुळें व प्रयत्नानें शुद्ध सात्विक भाव संपादन केल्यानें सत्यसंकल्पाची प्राप्ति होते. सम्यग्ज्ञानवान् व सत्यार्थदर्शी ज्ञानी पुरुषाची बुद्धि चिन्मात्ररूप व द्वैत-ऐक्यरहित होते. ती निरावरण, विज्ञानयुक्त, चिद्ब्रम्हरूप, केवल संवित्प्रकाशरूप व देहादेहरहित असते. तो हा निरावरणविज्ञानपुरुष जें जें कांहीं संकल्पमात्र पहातो, तें तें सर्व परमार्थतः एकरूप पहातो. त्यामुळें त्याचा संकल्प सिद्ध होतो. अशा प्रकारचा जो हिरण्यगर्भ त्याचें सर्वतः भासणारें हें जगत् संकल्पमात्र आहे. जसें संकल्पनगर किंवा संकल्पांतलि महापुर, तसेंच हें जगत् आहे. त्याच न्यायानें दुसराहि निरावरणात्मा आपला संकल्पवर जसा जसा कल्पितो, त्या त्याप्रमाणें सर्व घडतें. संकल्पनगरामध्यें एखादा बालक दगड आकाशांतून उडत असलेले जसे खरेच पहातो, त्याप्रमाणें जगांतील हा सर्व भास आपल्याच अधीन आहे. त्याला प्रतिबंध करणेंहि आपल्या स्वाधीन आहे. परमात्मा या स्वसंकल्परूप त्रिभुवनांत या वरशापादिकांना सत्य व स्वरूपाहून अनन्य पहातो. संकल्पनगरांत वाळूपासूनही तेल निघेल. त्याप्रमाणें वरशापात्मक फल आपल्याहून अनन्य व सत्य आहे असें हिरण्यगर्भादि अनावरण विज्ञानात्मा जाणतो. अर्थात् पूर्वोक्त वाळूपासून निघणाऱ्या तेलाप्रमाणें हिरण्यगर्भादि आत्म्याचा वरशापादि अर्थ उपादानावांचूनहि सिद्ध होऊं शकतो. पण ज्याची ज्ञप्ति आवरणशून्य झालेली नसते, त्याची भेदबुद्धि शांत झालेली नसते. त्यामुळें त्या अज्ञ पुरुषाचे वरादिक सिद्ध होत नाहींत. एकदां जी कल्पना दृढ करावी ती जोंवर तसल्या दुसऱ्या कल्पनेनें बदलली जात नाहीं तोंवर तशीच स्थिर रहाते. याच न्यायानें निरावरण ज्ञानी पुरुषांची कल्पनाहि दुसऱ्या कल्पनेचा उदय होईपर्यंत निवृत्त होत नाहीं. पण ज्याप्रमाणें सावयव तत्त्वामध्यें विचित्र अवयवकल्पना संभवते, त्याप्रमाणें निरवयव निरावरण ज्ञानात्म्यामध्यें द्वित्त्व व एकत्व व त्याप्रमाणेंच वरशापादि कल्पनाहि स्थिर राहूं शकते.

श्रीरामः—तर मग ज्यांचें ज्ञान आवरणरहित झालें नाहीं, पण जे केवल उग्र तपश्चर्या करीत आहेत ते शापादि कसे देऊं शकतात? तें मला सांगा.

श्रीवसिष्ठः—( अशा लोकांचे वर-शापादिक सत्य असोत असा सृष्टीच्या आरंभीं ब्रम्हदेवानेंच संकल्प केला असल्यामुळें ते व्यर्थ होत नाहींत, असें उत्तर देण्यासाठीं वसिष्ठ भूमिका रचतात—) सृष्टीच्या आरंभीं ब्रम्ह जी कल्पना करतें त्याचाच अनुभव घेतें. त्यामुळें वरादिकांना सत्यत्व आहे, मिथ्यात्व नाहीं. ब्रम्ह आपल्या स्वरूपाला जें जाणतें तोच हा प्रजापति ब्रम्हा होय. जलाहून त्याचें द्रवत्व जसें भिन्न नाहीं त्याप्रमाणें तो ब्रम्हाहून भिन्न नाहीं. तो पहिला प्रजापति ज्याचा संकल्प करतो तेंच तत्काल घडतें. त्याचा संकल्प हेंच प्रस्तुत जगत् आहे. रोगिदृष्टीला केशपुंज किंवा मौक्तिकपंक्ति जशी दिसते, त्याप्रमाणें आकाशांत हें निराधार निरालंब आकाशरूप जगत् भासतें. त्या प्रजापतीनें प्रजा, धर्म, दान, तप, गुण, वेद, शास्त्रें, पांच भूतें, ज्ञानोत्पादक सांख्ययोगादि शास्त्रें यांस संकल्पानें उत्पन्न केलें. वेदवेत्ते तपस्वी वादांनीं किंवा सहजगत्या जें

बोलतील तें अवश्य घडावें, असेंहि प्रजापतीनें कल्पिलें आहे. या ब्रम्हानें चिद्रूप असावें, आकाशानें छिद्ररूप असावें, वायूनें चेष्टा करावी, अग्नीनें उष्णता धारण करावी, जलानें द्रवरूप असावें, भूमि कठिण असावी, असाहि त्यानें संकल्प केला. प्रजापतिरूप चिद्धातूचा हा असाच स्वभाव आहे. तो आकाशरूप असला तरी जें जें कल्पितो तें तें तसेंच अनुभवितो. तूं, मी, तो इत्यादि सर्व त्यानेंच कल्पिलें आहे. चिदाकाश ज्याचा जसा संकल्प करितें, तसेंच तें तत्काल होतें. स्वप्नांत तूं, मी इत्यादि कल्पना होते, पण ती सद्रूप भासली तरी असत् असते. संकल्पनगरांतलि शिलेचें नृत्य जसें सत्य त्याचप्रमाणें जगद्रूप संकल्पनगरांतलि प्रजापतीच्या अधिकार-प्रारब्ध-भोगासाठीं कल्पिलेलें सर्व सत्य आहे. शुद्ध चित्स्वभावानें जें वरशापादि कल्पिलेलें असतें तें अवश्य तसेंच होतें. एखाद्या कीटाप्रमाणें अशुद्ध चिद्रूप जीव त्याला बदलण्यास समर्थ नसतो. ज्याचा दृढ अभ्यास झालेला असतो तेंच संविद् पाहते. इतर अल्प अभ्यस्त गोष्टींचा ती अनुभव घेत नाहीं. अशुद्ध लोकांनीं आपल्या अस्वतंत्रतेचा अभ्यास केलेला असतो, त्यांची त्याविषयींचीच भावना दृढ झालेली असते. त्यामुळें त्यांना त्याविरुद्ध कल्पना करतां येत नाहीं. जागृतींत मी शृंखलाबद्ध आहें, असा दृढतर अभ्यास झालेल्या पुरुषाला स्वप्नांतहि तसाच अनुभव येतो. याप्रमाणें चित् द्रष्टृ, दृश्य, दर्शन इत्यादि कल्पितत्रिपुटीवेशानें जरी स्फुरण पावत असली तरी ती उदासीन साक्षिस्वभावानेंहि सदा स्फुरत असते, तिच्यामध्यें बदल कधींच होत नाहीं. ज्याअर्थीं चिदाकाश सर्वव्यापी आहे, त्याअर्थीं द्रष्टा व दृश्य हें सर्व एकच आहे. यास्तव वाटेल ती वस्तु हवी तेथें जरी दिसली तरी ती सर्वत्र सदा सत्च आहे. वायूंतील स्पंदाप्रमाणें व जलांतलि द्रवभावाप्रमाणें ब्रम्हामध्यें ब्रम्हत्व असून त्या अजामध्यें हें जगत् त्याच्या अवयवाप्रमाणें राहतें. ब्रम्हच मीं—विराडात्मा आहें व जगत् मज विराडात्म्याचें शरीर आहे, असें प्रजापति जाणतो. आकाश व शून्यत्व यांप्रमाणें ब्रम्ह व जगत् यांचा भेद नाहीं. ज्याप्रमाणें धबधब्यामध्यें जलाच्या विचित्र कणपंक्ति दिसतात, त्याप्रमाणें विचित्र देशकालादि रचना उत्पन्न होतात व लय पावतात. एकाच धारेनें कल्पापर्यंत वहात राहून मध्यें लक्षावधि भेदांनीं विभक्त झालेल्याहि जलधारा जशा पुनः एकत्वास प्राप्त होतात, त्याप्रमाणें आत्म्याच्या एकप्रवाहरूपामध्यें विचित्र ब्रह्मसंविदा जगद्भेदरूपानें भासतात. जलप्रवाह व आत्मप्रवाह यांत भेद काय तो इतकाच. जलाच्या कणपंक्ति मनोबुद्ध्यादिकांनीं रहित असतात व ब्रह्मसंविद् स्वतःच आपल्या देहामध्यें मनोबुद्ध्यादिकांची कल्पना करून सर्गशोभेचा आपल्या भोग्यत्वानें स्वीकार करतात. याप्रमाणें दुर्बोधानें म्हणजे मनोबुद्ध्यादि विक्षिप्त अज्ञानानें हें जगत् आहे. पण माझ्या ठिकाणीं तसा दुर्बोध नसल्यामुळें मनोबुद्ध्यादि हें सर्व जगत् त्रिकालीं उत्पन्न न झालेलेंच आहे. तें अद्वैत व अकारण आहे. या शरीरामध्यें मृतावस्थां मनोबुद्ध्यादिकांनीं रहित असलेली आपण पहातों, किंवा पाषाणादिकांत जसा जडसत्तेचा अनुभव घेतों, त्याचप्रमाणें परमात्म्याचीहि मनोबुद्धिरहित निर्विक्षेप सत्ताच जाणावी. ज्याप्रमाणें एका गाढ निद्रेमध्यें सुषुप्त व स्वप्न हे दोन अवांतर भेद असतात, त्याप्रमाणें ब्रह्मामध्येंच हे सर्गसंहारभास स्थित आहेत. सुषुप्त व स्वप्न या दोघांचाहि एकाच निद्रावस्थेंत अंधकार व प्रकाश या रूपानें जसा भास होतो त्याप्रमाणें परमात्म्यामध्यें सर्ग व असर्ग यांचा भास होतो. मनुष्य निद्रेमध्यें पाषाण-

स्थितीचा जसा अनुभव घेतो, त्याप्रमाणें परमात्मा जड स्थितीचा अनुभव घेतो. चित्त दुसऱ्या विषयामध्यें आसक्त झालें असतां पुरुषाच्या आंगठ्याला किंवा दुसऱ्या एखाद्या बोटाला वारा, ऊन, धूळ यांचा स्पर्श झाला असतां तो जसा भासत नाहीं, त्याप्रमाणें पाषाणादिकांना झालेला वाय्वादिकांचा स्पर्शहि न झाल्यासारखाच असतो. आकाश, जल, पाषाण इत्यादिकांच्या देहानुभवाप्रमाणेंच चित्तरहित असलेले आमचे नानानुभव आहेत; ह्मणजे विराड्देहभावांत किंवा तत्तदधिष्ठातृ देवतादेहभावांत जसे अनुभव येतात, त्याप्रमाणें प्रलयकालीं चित्तरहित असलेल्या आह्मांला आज म्हणजे सर्गकालीं सचित्तत्वलाभानें अनुभव येतात. ज्याप्रमाणें अखंड कालामध्यें आम्हांला दिनरात्रीच्या संविदा भासतात, त्याप्रमाणें परमात्म्यामध्यें असंख्य सर्गसंविदा भासतात. ज्याप्रमाणें केवळ जलस्वभाव समुद्रांत तरंगादिक स्फुरतात, त्याप्रमाणें आलोकनरूप मनन, त्याचा भोगलक्षण अनुभव, त्याविषयींची इच्छा, पुनः त्याच्या प्राप्तीची इच्छा इत्यादिकांनीं रहित अशा आनंदस्वभाव शांतरूप आत्म्यामध्यें हा सर्ग—संसारसमूह स्वभावतःच स्फुरतो. पण प्रमाणतः तत्त्वदर्शन झाल्यानंतर तो स्फुरत नाहीं. १८६-

---

## सर्ग १८७ वा.

१ सर्वभावस्वभाव, नियति, उत्पत्ति, जीवताप्राप्ति, हेतूची ब्रम्हशुद्धता, यांचें वर्णन.

श्रीरामः—भगवन्! असंख्य विचित्र भावांची नियति ह्मणजे कार्यकारणभावादि नियम कोठचे! अग्निजलादिकांचा औष्ण्य-द्रवत्वादि स्वभाव अचल कोणत्या कारणानें राहिला आहे? असंख्य देव असतांना त्यांत सूर्यच तेवढा उग्र प्रभेनें युक्त कसा? दिवसाचें दीर्घत्व व ऱ्हस्वत्व कोणीं केलें आहे?

श्रीवसिष्ठः—आदिसर्गाच्या वेळीं जें काकतालीयन्यायानें ब्रम्हदेवाला जसें भासलें तें तसेंच अवस्थित झालें व त्यालाच जगत् असें म्हणतात. त्या सर्वशक्तिमान् ईश्वराला जें जें जसें भासतें तें तें संविदूसारतेमुळें तसेंच सत् होऊन रहातें. कारण जें भासलेलें तें न भासलेलें कसें होईल? चित्त्वामुळें ब्रम्ह दीर्घकालपर्यंत जसें स्थित आहे व जसें भासत आहे, तसें तें त्याचें सर्व भान नियतिसंज्ञकच आहे. वस्तुतः तें अभानासारखेंच आहे. हें असें व हें तसें असें स्वतः ब्रह्मच भासतें, त्यालाच नियति हें नांव असून 'सृष्टिसंहाररूप धारण करणारें' असें म्हटलें आहे. जाग्रत्, स्वप्न व सुषुप्त या नांवांचें चितीचें जें स्वयंस्फुरण तें तिच्याहून भिन्न नाहीं, तर पाण्यांतील द्रवत्वाप्रमाणें तद्रूपच आहे. आकाशांत जसें शून्यत्व, कर्पूरामध्यें जसें सुगंधित्व, उन्हामध्यें जसें उष्णत्व तसेंच चितींतील जाग्रदादि भिन्न नाहीं. सर्ग-प्रलय या नांवाचे दोन भाव एकप्रवाहाच्या अनन्यसत्तेनें चिन्मात्रगगनरूप एका ब्रम्हरूपांतच स्थित आहेत. चित्चें 'हा सर्ग' असें जें एक क्षणभर स्फुरण त्यालाच सर्ग असें म्हटलें आहे व 'हा कल्प' असें जें दुसरें स्फुरण त्याला कल्प म्हटलें आहे. स्वप्नाप्रमाणें स्वभावतःच होणारें जें चिन्मात्रस्फुरण तोच काळ, तीच क्रिया, तेंच आकाश व तोच देश—द्रव्य यांचा उदय होय. रूपदर्शन, मनःसंकल्प, देश, काल, क्रिया इत्यादि चिदाकाशांत चित्त्वच स्फुरत आहे. पण तें स्वतः सर्व आकारशून्य आहे. जें जसें क्षणभर स्फुरतें तें तसेंच अनुभवास येतें. त्यामुळेंच ही नियति रूढ झाली आहे. त्याचें असें स्फुरण जरी होत असलें, तरी तें सर्व

आकाशरूपच आहे. ( आतां अग्न्यादि भावांचा स्वभाव कसा तें सांगतात--) कल्प या नांवाचें ब्रह्म एक क्षणभर पदार्थांचें जें एकरूप चिंतन करतें, त्यालाच स्वभावतत्त्ववेत्ते वस्तुतः 'नियतस्वभाव' असें म्हणतात. एका संविन्मात्राला पदार्थशतता जशी येते, त्याप्रमाणें स्वरूप न सोडणाऱ्या संविदंशाचें हें रूप आहे. संवित्प्रचुर वृत्तींमध्येंहि जे चिदाभास स्फुरतात, तोच स्वभाव होय. पृथ्वी, जल, तेज, वायु इत्यादिकांमध्यें त्या संविदांनीं ज्या ज्या आकाराची कल्पना केली, तो तो आकार त्याचा स्वभाव होय. कारण संविद् हा त्याचा स्वभाव आहे. पृथ्वी, जल, तेज, स्पंदत्व, शून्यत्व इत्यादि सर्वांचा आकार चिदाकाश आहे. स्वप्नांत चिदाकाशच पृथिव्यादि सर्व होतें, हें प्रसिद्ध आहे. त्यांतील भूमि हा या सप्रतिघ व कठिण पदार्थांचा मोठा आकार आहे. तो सर्व जनतेचा आधार आहे. त्यामुळें हे राजा! भूपीठ सर्वांना जीवन देणारें असल्यामुळें राजाप्रमाणें शोभतें. सर्व प्रधान जलांचा आधार समुद्र आहे. सर्व तेजांचा आधार भास्कर आहे, स्पंदाचा आधार वायु आहे व शून्याचा आधार आकाश आहे. याप्रमाणें पांच भूतांच्या आकारत्वानें ब्रह्मदेवाच्या पांच संविदा उदय पावल्या. मग एका सूर्याविषयींच काय प्रश्न करतोस? ही संविद् सर्वज्ञ आहे. कारण ती सर्वांना प्रकाशित करते. ती सर्वरूपिणी आहे, सर्वव्यापी आहे. आपल्या स्वप्रकाशरूप महिम्यानेंच ती सर्वत्र 'परमस्वभाव' व नियति म्हणून सर्व ज्ञानी पुरुषांकडून जाणली जाते. हा चतुर्मुखनांवाचा ब्रह्मबालक आकाश हेंच जिचें रेशमी प्रावरण आहे अशा 'भू' या नांवाच्या पृथ्वीला आपल्यामध्यें स्वतः ब्रह्माकार राहूनच विस्तारितो. ज्या वेळीं ती मायाशबल सर्वज्ञ संविद् चतुर्मुखाच्या संविदेसह तें स्थूल व हें सूक्ष्म अशा प्रपंचद्वयाचा स्वरूपामध्यें उपसंहार, करते तेव्हां चतुर्मुखसंविदेच्या अंगभूत सूर्यादिकांचें भ्रमणस्वभावरूप उत्पन्न होत नाहीं. त्यामुळें ती सर्वभक्षक पुरुष बनते. संकल्पपूर्वक मशकजालाप्रमाणें म्हणजे कोळ्यानें रचलेल्या कोळिष्टकाप्रमाणें हें नक्षत्रचक्र ब्रह्मदेवाकडून उत्पन्न केलें गेलें आहे. त्यानें तें नुसत्या संकल्पानें उत्पन्न केलें आहे. सूर्याच्या दक्षिणोत्तर मार्गानें होणारें जें आवर्तन, त्यामुळें दिवसांचें ऱ्हस्वत्व व दीर्घत्व नियत भासतें. त्या नक्षत्रचक्रामध्यें खद्योतसारखे कांहीं मुळींच न भासणारे, सूर्यासारखे कांहीं अतिशय प्रकाशरूप, कांहीं अल्पप्रकाशानें शोभणारे, असे अनेक चित्ररूपी पदार्थ आहेत. सर्व पदार्थजात काय तें एवढेंच. ते कधीं उत्पन्न झालेले नाहींत व कधीं दिसतहि नाहींत. स्वप्नदृश्याप्रमाणें साक्षी आत्म्याला हें आकाशरूप स्वरूपच वस्तुतः उत्पन्न झालेलें नसूनहि तसें दिसतें. सर्वेश चिन्मात्रात्माच हें सर्व आहे. तोच दृश्यरूपानें दिसतो व मनुष्य मृत झाला असतां जणुं काय नाश पावतो; पण आपल्या स्वरूपांत वस्तुतः भासतहि नाहीं व नाश पावतहि नाहीं. जें चिदाकाश चिदाकाशांत स्वप्नदर्शनाप्रमाणें भासतें त्या भासमान जगाचें चिदाकाशावांचून दुसरें काय रूप असणार? त्याला जें जसें स्फुरलें तें तसेंच सत्तारूपानें प्रकट झालें. त्यालाच 'स्वभाव, नियति' या शब्दांनीं व्यक्त करितात. गगनाची सत्ता शब्दतन्मात्रकल्पनेनें बीजांतील अंकुराप्रमाणें शांतरूपानें रहाते व तिच्यापासूनच ही सर्व रचना येथें झाली आहे असें जें सांगतात, ती केवल मूर्खांच्या बोधासाठीं मूर्खांनीं वृथा रचलेली कहाणी आहे. येथें कशाचा अस्त होत नाहीं व कशाचा उदय होत नाहीं. शिले-

च्या उदराप्रमाणें हें सर्व शांत असून नित्य व सत् आहे. तथापि असत् असल्यासारखें तें भासतें. ज्याप्रमाणें अवयवींच्या अवयवांचा केव्हांच अंत लागत नाहीं, त्याप्रमाणें या जगाचा अंत लागत नाहीं. आत्मपदामध्यें विश्वें अस्त पावत नाहींत. आकाशांत जसें आकाश रहातें, त्याचप्रमाणें ब्रम्हाकाशांत जगद्व्योम रहातें. तेव्हां अत्यंत शुद्ध असलेलें तें अस्त कसें पावेल व त्याचा उदय कसा होईल? त्या अनंत प्रकाशात्मरूप विभु चिन्मणीचें जें सतत सत्तामात्ररूप स्फुरण तो त्याचा स्वभावच आहे. तद्रूपानें तें स्वतःच किंचित् चेत्यतेला प्राप्त होतें. त्या वेळीं तें स्वरूपाला विसरतें व तर्क, विचार इत्यादि संविद्रूपानें बाह्यवृत्ति होतें. ह्मणजे त्याच्यामध्यें अन्यथाभाव प्राप्त होतो. पुढें होणाऱ्या विषयांच्या संकल्पामुळें तें कांहींसें जागृत होतें. आकाशाहून अणु व शुद्ध अशा त्यामध्यें भावी अर्थाचा बोध होतो. म्हणूनच ही परम सत्ता असून ती भावी विषयाला जाणण्यास तयार होते. त्यामुळेंच ती 'चित्' या नांवाला योग्य होते. चेतनोन्मुख होणें हें स्वरूप प्राप्त झाल्यामुळेंच तिला तसें नांव देतां येतें. घन संवेदनेनंतर ती भावी जीवादि नांव धारण करते आणि अधिकारी जन्माचा लाभ झाला असतां ती आत्मकल्पना परमपद होते. कारण ती जीवावस्थेंत चिदाकाशाला आच्छादित करणाऱ्या अविद्येला झांकून राहिलेली असते. त्यामुळें ती आपल्या परमपद—स्वभावाला प्रकट करीत नाहीं. पण ज्ञानप्राप्ति झाल्यावर ती शुद्धपदाशीं अनन्यरूप होते. त्यामुळें ती अखंडरूपच होते. ती आवृत दशेमध्यें आत्मतादात्म्याध्यास याच एका भावनेनें देहेंद्रियांच्या योगानें संसरणोन्मुखी होते व स्वरूपवियोगकृत क्लेशांना सहन करते. त्यांना घालविण्यासाठीं कर्में करते. ती सर्गसत्ता एकच असतांना सविकल्प चिद्भावनाभ्रांतीनें शब्दादि गुणयुक्त झाली व पुढें आकाशादि पंचभूतसंज्ञक पदार्थांच्या प्रवृत्तीचें निमित्त बनली, म्हणजे ती सूक्ष्मभूतात्मिका झाली. त्यानंतर कालसत्तेचा उदय होतो. अहंतासत्ता व कालसत्ता या पुढील पदार्थांच्या सूचक आहेत व तेंच पुढील जगत्स्थितीचें बीज आहे. श्रेष्ठ चितिशक्तीचें जें स्वसंवेदनमात्र तेंच असत्‌रूप जगज्जाल होय. तें चेतनेमुळें सत् असल्यासारखें भासतें. ती चित् प्रायः अशाच स्वरूपाची आहे. ती संकल्पवृक्षाचें बीज आहे. आपल्या स्वरूपांतच ती अहंतेची भावना करते व एका क्षणांत अहंता होते. तीच 'जीव-' संज्ञक अहंता भावाभावभ्रमांनीं मायाशबल ब्रह्मामध्यें भ्रमण पावते. जल स्वरूपामध्येंच तरंगरूपानें जसें भ्रमण करतें, त्याप्रमाणें जीव आत्मस्वरूपांत उत्कर्ष व अपकर्ष यांचा अनुभव घेतो. अशा रीतीनें भावनेनें युक्त असलेली चित् आकाशतन्मात्रभावना करते आणि स्वतः घनरूप बनून हळुहळू आकाशतन्मात्रतेचा अनुभव घेते. तें आकाशतन्मात्र शब्दौघवृक्षाचें बीज आहे. पद, वाक्य व प्रमाण यांनीं संपन्न असलेला जो वेदार्थ व शास्त्रार्थ त्या रूपानें तें विकार पावतें. तिच्यापासून समग्र जगच्छ्री उदय पावते. शब्दतत्त्वापासून शब्दौघानें निर्माण केलेला जो अर्थौघ त्याचा परिणाम होतो. अशा व्यवसायानें व अशा विचित्र संकल्पानें युक्त असलेली ब्रह्मचित्‌च 'जीव' —शब्दानें बोलली जाते. भूतसमूहरूपी जो वृक्ष त्याचें हें बीज आहे. तें भावी शब्दार्थसमूहानें युक्त असतें. चौदा प्रकारच्या भूतजातानें हा सर्व अवकाश भरून सोडला आहे व असा हा जगत्पूर्ण अवकाश त्या जीवापासूनच पुढें प्रसार पावणार आहे. जिला अद्यापि शब्द-

व्यवहार व आचार यांची प्राप्ति झालेली नाहीं, अशी ती चित् जीवत्वामुळें चेतन असते. म्हणूनच काकतालीयन्यायानें ती स्वतःच स्पंदचिन्मात्राची कल्पना करते. पवन-स्कंध हें ज्याचें रूप आहे, अशा त्वक्स्पर्श वृक्षाचें तें बीज आहे. सर्व भूतांचा क्रियास्पंद त्यापासूनच प्रसार पावतो. त्यांत चिद्विलासाचा जो प्रकाशानुभव होतो, तेंच रूपतन्मात्र होय. पुढील शब्दाचा अर्थ त्यापासून प्रकट होतो. प्रकाशचेतन हेंच तेज आहे. तेज दुसऱ्या कशामुळेंहि उत्पन्न होत नाहीं. स्पर्शसंवेदन हाच स्पर्श आहे स्पर्शाचा दुसऱ्या कोणापासूनहि संभव नाहीं. शब्दसंवेदन हाच शब्द आहे व तो स्वतःच अनुभविला जातो. ज्याप्रमाणें आकाश स्वरूपां तच स्वरूपानें आकाशाला प्राप्त होऊन रहातें, दुसऱ्या कोणत्याहि कारणानें नव्हे, त्याप्रमाणें संवेदनहि स्वरूपभूत शब्दानेंच शब्दग्राहक आहे, दुसऱ्या कोणत्याहि कारणानें नव्हे. सृष्टी-च्या आरंभीं समष्टीमध्यें जसें, तसेंच आतां व्यष्टींतहि तें तें संवेदनच स्वरूपामध्येंच त्या त्या अर्थाचा अध्यास करून स्वरूपामध्यें भा-सतें. याच न्यायानें रसतन्मात्र व गंधतन्मात्र स्वप्नाप्रमाणें असत्य असूनच सत्यासारखें भासतें. तेज सूर्यादि गोलकांच्या रूपानें विकास पावतें. तें प्रकाशवृक्षांचें बीज आहे. त्यापासून रूप-विभेदानें संसार प्रसार पावतो. विकारशून्य आकाशापासून जसें नाम उत्पन्न होतें, त्याप्रमा-णें त्याच्यापासूनच माधुर्यसंविद् उत्पन्न होते व त्याच्या संघाला रसतन्मात्र म्हणतात. हा सर्व गण भविष्यत्रूप व संकल्पनात्मक आहे, कार्य-कारणसमुदायरूप जीव संकल्परूप असून तो रस-तन्मात्रानंतर गंधतन्मात्राची कल्पना करतो. भावि भूगोलकत्वानें आकृतिवृक्षाचें तें बीज आहे. सर्वाधाररूप अशा त्याच्यापासून हा संसार प्रसार पावतो. तन्मात्रांचा समुदाय उत्पन्न झालेला नसतांनाच उत्पन्न झालेला वाटतो. हा मूळचा निराकार असूनहि कल्पना-वशात् साकार झाला आहे. हा तन्मात्रगण काकतालीयन्यायानें आपोआप झाला आहे. जीव ज्या प्रदेशानें रूपाला जाणतो त्याला चक्षु असें म्हणतात, ज्या प्रदेशानें तो शब्दाला जाणतो त्याला श्रोत्र म्हणतात, ज्या प्रदेशानें स्पर्शाला जाणतो त्याला त्वक् असें म्हणतात, ज्या प्रदेशानें रसाला जाणतो तें रसनेंद्रिय होय व ज्या प्रदेशानें गंधाला जाणतो, तें घ्राणेंद्रिय होय. नियत आकृतीला प्राप्त झालेला हा जीव दिशा व काल यांच्या भेदाला जाणत नाहीं. असर्वात्मकतेमुळें सर्वांगानें सर्व जाणत नाहीं. या रीतीनें न सांगितलेलीहि अनंत सांसारिक कल्पना प्रत्येक जीवाच्या हृदयांत असते असें समजावें. अनंतत्वामुळेंच त्यांचें वर्णन करतां येत नाहीं. तें अनंत स्फुरणहि आत्म्यांतून भिन्न नसल्यामुळें आत्मभूतच आहे. म्हणून परमार्थतः तें उदय पावत नाहीं व अस्त पावत नाहीं. तर पाषाणोदराप्रमाणें सच्चिदानंद एकघन व निर्व्यापारच स्थित असतें. १८७.

---

## सर्ग १८८ वा.

१ जीव ब्रम्हच आहे. त्याचीही उत्पत्ति लिंग-देहाच्या भ्रांतीनें गौण आहे असें निरूपण.

श्रीवसिष्ठः—रामा! जीवाची उत्पत्ति मीं आतांच सांगितली. पण ती युक्त नव्हे. कारण नूतन उत्पन्न झालेल्या जीवाची संसार-सिद्धिच होत नाहीं. कारण त्याच्या जन्माची कामकर्मादि सामग्रीच विद्यमान नाहीं. जीव परमार्थतत्त्वाहून भिन्न नाहीं. तथापि तुझ्या

बोधासाठीं मीं तसें वर्णन केलें तें खरें नव्हे. अशा प्रकारची जीवकल्पना हें आत्म्याचें अकृत्रिम अंगच आहे. विषयोन्मुख चिदाभासासालाच जीव म्हणतात. या चिदाभासात्मक जीवाचीं अनेक नांवें आहेत. हे रामा! विषयोन्मुख झालेल्या चिदात्म्याचीं तीं नांवेंच तूं ऐक. मुख्य प्राण व कर्मेंद्रियें यांचें धारण केल्यामुळें व ज्ञानेंद्रियांचेंहि धारण केल्यामुळें त्याला जीव म्हणतात. पूर्वी अनुभविलेल्या गोष्टींचें चिंतन केल्यामुळें त्याला चित्त म्हणतात. जवळ असलेल्या विषयाकडे जात असल्यामुळें चिद् असें „ म्हणतात. हें असेंच आहे, अशा निश्चित बोधामुळें बुद्धि म्हणतात. संकल्प, ऊहापोह केल्यामुळें मन म्हणतात. 'मी आहें' असा आंतल्याआंत प्रत्यय येत असल्यामुळें अहंकार म्हणतात. स्वतत्वज्ञानानें संपन्न असलेली परमार्थवस्तु म्हणजे आत्मा हाच चित्तपदाचा शास्त्रज्ञांनीं ठरविलेला अर्थ आहे. प्रौढ संकल्पसमूहामुळें त्या जीवाला पुर्यष्टक असें म्हणतात. सृष्टीच्या आरंभीं याचाच आरंभ झालेला असल्यामुळें त्याला प्रथमत्व आहे. म्हणून त्याला प्रकृति म्हणतात. तत्त्वदर्शनानें औपाधिक रूपानें अविद्यमान असल्यामुळें ज्ञाते त्याला अविद्या म्हणतात. चिदाभासाचीं अशीं अनेक नांवें आहेत. तीं मीं तुला सांगितलीं. पण हा चिदाभास आद्यंतरहित, अनाकार व अनामय आहे. सूक्ष्म देहदृष्टया तो जीव म्हटला जातो. याप्रमाणें संकल्पनगरासारखा हा त्रिजगद्भ्रम भासतो. तो व्यवहारक्षम असला तरी निराकार, शून्य व अप्रतिरूप आहे. त्याला वास्तविक स्वरूप कांहीं नाहीं. हे रामा! अशा प्रकारें हा आतिवाहिक देह सांगितला आहे. हा चित्तदेह चिदाकाशच आहे. तो आकाशाहूनहि शून्यच आहे. तो अस्त पावत नाहीं व उदय पावत नाहीं. मोक्ष होईपर्यंत तो असाच रहातो. चवदा प्रकारच्या भूतसर्गाची ही एक चित्तरूप भूमि आहे. त्यांत लक्षावधि संसार पुढें होतील, आतां आहेत, व पूर्वी होऊन गेले आहेत. कालव्यवस्थेनें वृक्षावरील फलाप्रमाणेंच याची स्थिति आहे. हा चित्तमय देह जगाच्या आंत व बाहेर व्यापून रहातो. आरसा प्रतिबिंबाला जसा व्यापतो, तसा हा जगाला व्यापतो. पण तो आकाशाप्रमाणें शून्य आहे. महाप्रलयाच्या अंतापर्यंत अत्यंत प्रौढ अशा निरामय ब्रह्मरूप महाशून्यपदीं सर्वनाश स्थिर स्थित झाला असतां ( प्राकृत प्रलयाचा क्षण संपला असतां ) चिदावर्त अज्ञानामुळें आत्म्याचें हें आतिवाहिक देहासारखें भान पूर्वोक्त कर्मानें होऊं लागतें. तो स्वतः चिद्घन असलेला जीव हाच आतिवाहिक देह असून त्याचा जो जगदालोकनात्मक प्रकाश, त्यानें प्रवृत्त केला गेलेला एक भाग, तो 'ब्रह्मा, चतुर्मुख, मी' या नांवांनीं शास्त्रांत सांगितला आहे. म्हणजे त्यालाच कोणी ब्रह्मदेव म्हणतात, कोणी विराट् म्हणतात, कोणी सनातन म्हणतात, कोणी नारायण म्हणतात, कोणी ईश म्हणतात व कोणी प्रजापति ह्मणतात. त्याच्या ज्या भागांत पांच इंद्रियसंविदा काकतालीयन्यायानें भासल्या, तेथें त्यांच्या तशा तशा संज्ञा स्थिर झाल्या. याप्रमाणें अत्यंत विस्तीर्ण असा हा दृश्यविभ्रम जरी झाला आहे तरी वस्तुतः कांहींच झालेलें नाहीं कारण विस्तारलेलें हें आत्मतत्त्व सर्वदृश्यशून्य आहे. परब्रह्म अनादि आहे. त्याला सत् म्हणतां येत नाहीं व असत् ह्मणतां येत नाहीं. त्याला प्रकट झालेलें ह्मणतां येत नाहीं व तिरोभूतहि ह्मणतां येत नाहीं. त्याअर्थी तेंच स्वरूप साक्षात्काररहित होऊन सदसदाकारानें स्थित आहे. या आतिवा-

हिक देहाच्या अनुभवानेंच हा प्रपंच पुष्ट होतो. ज्याप्रमाणें स्त्रीचें अनुसंधान करणाऱ्या विधुराला स्वप्नांत स्त्री दिसते, त्याप्रमाणेंच आतिवाहिक देहाला प्रपंच दिसतो. स्वप्न व संकल्प यांमध्यें शून्य असलेलाहि, निराकार असलेलाहि घटकार जसा अनुभवास येतो, त्याचप्रमाणें स्वतःच तो स्वदेहाचा व जगाचा मिथ्या अनुभव घेतो. स्वप्नांतील पदार्थांप्रमाणेंच तो मिथ्या पदार्थहि आपली अर्थक्रिया उत्तम प्रकारें करूं शकतो. शून्यरूप पदार्थच एखाद्या कठिण पदार्थाप्रमाणें भासतो. हा आतिवाहिक देह अनाकार असूनहि, शून्य असूनहि, स्वप्नाप्रमाणें अविद्यमान असतांनाहि स्वतः क्रमानें अनुभव घेतो. आपल्या शरीरांत हाडें वरगळ्या यांचा समूह पहातो. हात, पाय इत्यादि स्थूल अवयवांचा अनुभव घेतो. पाठीचा कणा, केश, त्वक्, मांस, शिरा इत्यादि अनेक पदार्थांनीं बनलेलें स्थूळ शरीर आपल्या भोगासाठीं कल्पितो. जन्म, कर्म, चेष्टा, स्थान, परिणाम, वय, देश, काल, क्रम, विस्तार इत्यादि सर्व भ्रमांचा अनुभव घेतो; गुणदोषांचें आधान, दशदिशांतील भ्रमण, ज्ञानादि त्रिपुटी, सर्व पदार्थांची उत्पत्ति, स्थिति, लय यांचा अनुभव घेतो. आतिवाहिकभूत पुरातन पुरुष स्वतःच कल्पिलेल्या व्यष्टिसमष्टि स्थूलदेहामुळें स्वतःच पृथिव्यादि पर्वतान्तरूप होऊन पृथिव्यादि हें माझा आधार आहे व मी त्यांचा आधेय आहें, असा भ्रांतिमय संसार पहातो. १८८.

## सर्ग १८९ वा.

१ आतिवाहिक देहरूप प्रजापतीच्या मनोरथांत आधिभौतिकताभ्रांति कशी होते त्याचें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—हे रामा ! त्या आद्य प्रजापतीचा हा आतिवाहिक देह ज्याची ज्याची जशी जशी कल्पना करतो, तें तें काकतालीयन्यायानें संविदस्वभावामुळें चिरकाल तसेंच स्थित होतें. अरे अरे ! सत्यसंकल्प संवित्स्वभावानें हें विश्व भासलें आहे. तेव्हां या असत्य विश्वामध्यें विस्मय कोठचा ? द्रष्टा असत्य आहे, दृक् असत्य आहे, दर्शनहि असत्य आहे; किंवा हें सर्व ब्रह्मरूपतेमुळें सत्यच आहे.

**श्रीरामः**—भगवन् ! या रीतीनें आतिवाहिक देह जर भ्रांतिमात्र आहे, तर त्याला शिलादिभाव कसा प्राप्त होतो ? स्वप्नाला सत्यता कोठची ?

**श्रीवसिष्ठः**—हें आतिवाहिक भ्रांतिदर्शन स्वतःच सदा एकसारखें अनुभवाला येत असतें. त्यामुळें तोच पुष्ट झाल्यासारखा दिसतो. चिरकाल अनुभव आल्यामुळें स्वप्नाला जसें पुष्टत्व येतें, त्याप्रमाणें आतिवाहिकत्व अति सत्य असल्याप्रमाणें भासतें. आतिवाहिक देहाचा दीर्घकाल स्वानुभव आला असतां मृगजलाप्रमाणें आधिभौतिकताबुद्धि उदय पावते. हें जगत् स्वप्नभ्रमाप्रमाणें भासतें व मृगजलाप्रमाणें स्थित आहे. तें सत्य असल्यासारखें जरी भासत असलें तरी वस्तुतः असत्यच आहे. आतिवाहिक रूपांना आपोआपच मिथ्या आधिभौतिकता प्राप्त होते व अविवेक्याच्या आसक्तीमुळें ती अत्यंत सत्य झाली आहे. हा मी व हें माझें, हे पर्वत, हें आकाश, या दिशा, असा हा मिथ्या भ्रम स्वप्नांतील पर्वताप्रमाणेंच भासतो. मी ब्रह्म आहें हें यथार्थज्ञान सोडून मी मनुष्यादि आहें, पृथिव्यादि हा माझा आधार आहे, असें पहातो; त्यामध्यें आसक्ति ठेवतो. त्यामुळें आद्य स्रष्ट्याच्याहि आतिवाहिक देहाला भावनेमुळें आधिभौतिकता येते. तो हा पिंडाकार पहातो. असत्यामध्यें सत्यबुद्धीची भावना केल्यामुळेंच तो बद्ध होतो. तो आपल्या अंतःकरणांत पुष्कळ भावना करतो व नानात्वाला अनुसरतो.

प्रथम लौकिक व वैदिक शब्द उत्पन्न करतो. त्यांच्या त्या त्या उपाधीनें युक्त अशा अर्थामध्यें संकेत करतो, त्या संकेतानें संज्ञा करतो, स्पंदनें उत्पन्न करतो; ॐ असें ह्मणून त्यापासून शब्दराशिरूप वेदांचें गायन करतो; त्यावेदांनींच इतस्ततः व्यवहाराची कल्पना करतो आणि लागलाच त्याचा अनुभवहि घेतो. जो ज्यामध्यें आसक्त होतो तो तेंच कसें पहाणार नाहीं? याप्रमाणेंच ही असत्य जगद्भ्रांति प्रौढ झाली आहे. दीर्घस्वप्न किंवा इंद्रजाल यांप्रमाणें आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व जीवांच्या ठिकाणीं आतिवाहिक देहालाच आधिभौतिकता प्राप्त होणें उचित आहे. आधिभौतिकता ही वस्तुतः कांहींच नाहीं. आतिवाहिकताच अभ्यासामुळें त्या भावनेला प्राप्त होते. हा मिथ्यानुभवरूप मोह अगदीं मुळापासूनच आलेला आहे. ब्रम्हदेवालाहि हा मोह झालेला आहे. त्यामुळें महात्म्यांच्या ठिकाणीं हि तो दिसतो. तत्त्ववेत्त्यांनाहि प्रारब्धक्षय होईपर्यंत तो टाळतां येत नाहीं. रामा ! चिदेकरसरूप ब्रह्माला अशा प्रकारची दुर्दशा कोठची? त्याला पिंडबंध कोठचा? ही सर्व भ्रांतिच आहे. किंवा ब्रह्मच कौतुकामुळें असें जगतादि आकारानें भासत आहे. शाश्वत ब्रह्माहून जगाचें दुसरें कारण नाहीं आणि तें कारणहि कार्यतेवांचून असूं शकणार नाहीं. अनामय कूटस्थ चिदानंदमय ब्रह्मामध्यें कार्य-कारणादिकांचा संभवच नाहीं तस्मात हें जगत् काहीं तरी भ्रांतिमात्रच पसरलेलें आहे; वास्तविक नाहीं. १८९

---

## सर्ग १९० वा.

१ मागच्या व पुढच्या सर्व शंकांचें युक्तीनें निरसन करून ज्ञानाची ज्ञेयता हीच शांति असें उपपादन.

श्रीवसिष्ठः—रामा ! ज्ञानाला ज्ञेयतेची प्राप्ति होणें यालाच बंध म्हणतात व त्याचचि ज्ञेयताशांति हा मोक्ष म्हटला जातो.

श्रीरामः—भगवन् ! ज्ञानाची ज्ञेयताशांति कशी प्रवृत्त होते? किंवा अत्यंत रूढ झालेली ती बंधताबुद्धि कशी निवृत्त होते?

श्रीवसिष्ठः—शम, दम, तितिक्षा इत्यादि साधनांसह दृढ अभ्यासिलेल्या सम्यक्ज्ञानरूप बोधानें भ्रांति निवृत्त होते आणि तें भ्रांतिस्वप्न निवृत्त झालें ह्मणजे अशा प्रकारची नियता शांति हीच मुक्ति प्रवृत्त होते.

श्रीरामः—भगवन् ! ज्यामुळें हा जंतु बंधापासून अशेषतः मुक्त होतो, तो केवलतारूप बोध किंवा सम्यग्ज्ञान कशाला म्हणतात?

श्रीवसिष्ठः—रामा अधिष्ठानचिन्मात्ररूप ज्ञानाला ज्ञेयता निराळी नाहीं. यास्तव सर्व दृश्याच्या बाधामध्यें ज्याचें पर्यवसान होतें, तें तत्त्वसाक्षात्काररूप अव्यय ज्ञानच सम्यग्ज्ञान होय. आपातज्ञान हें सम्यग्ज्ञान नव्हे. तें सम्यग्ज्ञान अवाच्य आहे.

श्रीरामः-भगवन्, चिदेकरस आत्म्याच्या ज्ञानस्वरूपांत त्याच्याहून भिन्न असलेली ज्ञेयता कोठची? शिवाय तेथील ज्ञान हा शब्द भावार्थी आहे कीं साधन या अर्थी आहे? म्ह० ज्ञप्ति—ज्ञानस्वरूप हें ज्ञान, कीं ज्याच्या योगानें जाणलें जातें तें ज्ञान?

श्रीवसिष्ठः—रामा ! हें ज्ञान भवसाधनमात्र आहे. म्ह० ज्ञप्ति हा त्याचा अर्थ आहे. तें केवळ बोधमात्र आहे. वायु व स्पंद यांप्रमाणें या ज्ञानाचा व ज्ञेयाचा भेद नाहीं.

श्रीरामः—असें जर आहे तर हा सशाच्या शृंगासारखा ज्ञानज्ञेयादि विभ्रम कसा सिद्ध झाला? व तो वर्तमान, भूत, भविष्यत इत्यादि भेदांनीं रूढ कसा झाला?

श्रीवसिष्ठः—रामा ! असत् वस्तूंनीं भासूंच नये किंवा व्यवहारक्षम होऊंच नये असा

नियम नाहीं. बाह्यार्थभ्रांतीमुळें ही भ्रमबुद्धि येथें उदय पावली आहे. यांतील बाह्य किंवा आभ्यंतर, कोणताच अर्थ संभवत नाहीं.

श्रीरामः—हे मुने! हा जो अहमादि प्रत्यक्ष दृश्यभूतादि अर्थ आहे, तो नाहीं असें कसें म्हणतां येईल? ज्या वस्तूचा अनुभव येतो ती नाहीं कशी हें मला सांगा!

श्रीवसिष्ठः—हे निष्पाप रामा! सृष्टीच्या आरंभींच विराडात्मा वगैरे कोणताच अर्थ योग्य सामग्रीच्या अभावीं झालेला नाहीं; ह्मणून ज्ञेयाचा असंभव आहे.

श्रीरामः—मुने! भविष्यत्, भूत व वर्तमान अशी ही जगत्दृष्टि नित्य अनुभवाला येते. असें असतांना ती आलीच नाहीं असें कां सांगता?

श्रीरामः—स्वप्नप्रपंच, मृगजल, दोन चंद्र, संकल्पित अर्थ यांप्रमाणें किंवा आकाशांतील केशपुंजाप्रमाणें जगत् मी व तूं असें मिथ्या भासत् आहे.

श्रीरामः—हे भगवन्! मी, तुम्ही, हा, इत्यादि अनुभवाला येणारेंहि हें जगत्जठर सर्गाच्या आरंभीं कसें झालें नाहीं? म्हणजे त्याचा बाध कोणत्या युक्तीनें होतो?

श्रीवसिष्ठः—कारणापासून कार्य उत्पन्न होतें, त्यावांचून कांहीं होत नाहीं, हा निश्चय आहे. सर्वांचीच शांति झाल्यावर जगाच्या उत्पत्तीचें कांही कारणच उरत नाहीं.

श्रीरामः—मुने! महाप्रलय झाल्यावर जें अज व अव्यय ब्रह्म अवशिष्ट रहातें तें सर्गाचें कारण कां नव्हे?

श्रीवसिष्ठः—कारणामध्यें जें कार्य असतें तेंच त्यापासून प्रवृत्त होतें. कोणतीहि असत् वस्तु उत्पन्न होत नाहीं. रामा! घटापासून पट होत नाहीं.

श्रीरामः—महाप्रलय झाला असतां जगत् सूक्ष्मरूपानें ब्रह्मांत रहातें व त्याच्यापासूनच तें पुनः प्रवृत्त होतें.

श्रीवसिष्ठः—हे निष्पाप रामा! महाप्रलय झाला असतां सर्ग विद्यमान असतो, या गोष्टीचा अनुभव कोण घेतो? त्याचप्रमाणें हे महाबुद्धिमाना! त्या प्रलयामध्यें असलेली सर्गाची सत्ता कशा प्रकारची असते?

श्रीरामः—भगवन्, प्रलयांतील जगच्छ्री ज्ञप्तिरूप असते व ज्ञप्तिरूप झालेले लोकच तिचा अनुभव घेतात. ती शून्यरूप असणें केव्हांहि शक्य नाहीं. असत् पदार्थ सत्तेला केव्हांहि प्राप्त होत नाहीं.

श्रीवसिष्ठः—असें जर असेल, तर हे महाबाहो! ज्ञप्तिच जगत्त्रय आहे. विशुद्ध ज्ञान हेंच ज्याचें स्वरूप आहे, त्याला मरण व जनन कोठचें?

श्रीरामः—असें जर असेल तर हें सर्व चिदेकरसच आहे व त्यापासूनच जगत् होतें. अर्थात् जगत् हा अध्यारोप नव्हे. तर मग ही जगद्भ्रांति कोठून व कशी आली तें मला सांगा?

श्रीवसिष्ठः—कार्यकारणाच्या अभावीं ह्मणजे वास्तविक कारण व त्याचें भावात्मक कार्य जगत् हीं नसतांना भाव व अभाव यांचा संभवच नाहीं. अर्थात् हें जें कांहीं दिसतें आहे, तो स्वात्माच आहे. अर्थात् ब्रह्मच त्या त्या त्रिपुटीचा वेष धारण करतें. जें जाणलें जातें, जें जाणण्याचें साधन व जें जाणतें तें, हे तिन्ही स्वात्माच आहेत.

श्रीरामः—पण भगवन्! जाणणारा या कार्यकारणसंघातरूप देहयंत्राला जाणतो. तेव्हां सर्वद्रष्टा ईश्वर दृश्यत्वास कसा प्राप्त होतो? काष्ठ अग्नीला कसें व केव्हां जाळील? (शरीरेंद्रियसमुदाय यंत्रासारखा आहे व तो जड आहे. तो तसा असल्यामुळेंच सर्वद्रष्टा ईश्वर जडरूप ईश्वरत्वाला प्राप्त होतो. असें

म्हणणें म्हणजे काष्ठ अग्नीला जाळतें या म्हणण्यासारखेंच आहे असा याचा भावार्थ.)

श्रीवसिष्ठः—रामा! द्रष्टा दृश्यत्वाला प्राप्त होतो असें आम्ही कधींच प्रतिपादन करीत नाहीं. कारण दृश्याचा मुळीं असंभवच आहे तेव्हां सर्वात्मा व एक घनाकार द्रष्टाच केवल भासतो.

श्रीरामः—तें आदिअंतरहित चिन्मात्रच विषयाला प्रकाशित करतें असें म्हटलें पाहिजे. पण त्या विषयाचा कोणापासून संभव होतो तें मला सांगा.

श्रीवसिष्ठः—कारणाचा अभाव असल्यामुळें कोणताच विषय संभवत नाहीं. तेव्हां तो कोणापासून झाला हा प्रश्नच कसा संभवतो! विषयाच्या अभावामुळेंच चेतनाची मुक्तताहि सदा अवाच्यच आहे.

श्रीरामः—असें जर असेल तर अहंतादि विषय कसे उत्पन्न झाले? जगद्वेदन कसें होतें? व स्पंदादि वेदन कसें होतें?

श्रीवसिष्ठः—कारणाचा असंभव असल्यामुळें आरंभीं कांहींच उत्पन्न झालेलें नाहीं. मग चेत्य म्हणजे विषय कोठचे? वास्तव हें सर्व शांत आहे व सर्ग हा विभ्रम आहे.

श्रीरामः—याविषयींच मला आपण उत्तर सांगा. वाक्-अगम्य, म्हणजे वाणीचा विषय न होणाऱ्या व सदा स्वप्रकाश व नित्यमुक्त ब्रह्मामध्यें विभ्रमच कोणाला कोणत्या निमित्तानें व कोणत्या प्रकारचा होऊं शकतो? कारण **अद्वैताला द्वैताचा लेशहि सहन होत नाहीं.**

श्रीवसिष्ठः—हे रामा! कारणाच्या अभावामुळें खरोखर हा विभ्रमहि नाहींच. तूं, मी इत्यादि हें सर्व शांत, एक व अनामय ब्रह्म आहे.

श्रीरामः—ब्रह्मन्! माझ्या बुद्धीला जणुं काय भ्रमच उत्पन्न झाला आहे. मी यापेक्षां अधिक कांहीं विचारूं शकत नाहीं. मला कांहीं सुचतच नाहीं. आपण काय म्हणतां हें मला कळलें नाहीं. तेव्हां आतां आणखी काय विचारूं?

श्रीवसिष्ठः—रामा! असा निरुत्तर होऊं नकोस. तुझ्या संशयाच्या कारणांचा क्षय होईपर्यंत मला प्रश्न तूं कर. तुझ्या संशयाचें जें बीज त्याच्या सारासारतेची परीक्षा कोठें करावी, तें मला विचार, म्हणजे क्रमानें प्रश्नाचें कारण संशय व त्या संशयाचें कारण अज्ञान यांचा निःशेष क्षय होऊन तूं परम अनिर्वाच्य स्वभावामध्यें स्वतःच विश्रांति पावशील.

श्रीरामः—कारणाचा अभाव असल्यामुळें सर्गाच्या आरंभींच सर्गता उदय पावलेली नाहीं हें आपण जें सांगितलें तें मला समजलें. आपला सिद्धांत माझ्या लक्षांत आला. पण चेत्यचेतन विभ्रम कोणाला होतो, हा माझा संशय अद्यापि जात नाहीं; त्याचें काय कारण?

श्रीवसिष्ठः—अकारणत्वामुळें व सर्वत्र शांतत्व असल्यामुळें ही भ्रांति नाहीं. हा माझा सिद्धांत जर तूं मानीत असलास तर अनभ्यासामुळें व त्या ज्ञानाचें दृढत्व नसणें याच कारणामुळें तुझ्या चित्ताची अविश्रांति हेंच नानासंशयांचें बीज आहे.

श्रीरामः—अनभ्यास कशामुळें होतो व अभ्यास कशामुळें होतो? जगद्भ्रांतीचेंहि जर कारण नाहीं तर अभ्यासात्मक भ्रांति कोठची! ती कशी उपस्थित झाली?

श्रीवसिष्ठः—अनंताला अनंतत्व असल्यामुळेंच सांप्रतकाळीं भ्रांति ही नाहींच. तथापि जीवन्मुक्तांचा चिद्घनात्मक सर्व वस्तूंशीं जसा

व्यवहार व्हावा, त्याप्रमाणें तुम्ही अभ्यासप्रवृत्तिंहि होऊं दे. कारण अभ्यासभ्रांतिहि असत् महाचिद्घनच आहे.

श्रीरामः—आपल्यासारख्या जीवन्मुक्तांचा सर्व जगद्भ्रम शांत झाला असतां या अध्यात्मशास्त्ररूप शब्दसंपत्तीनें आमच्यासारख्या उपदेशास पात्र असलेल्या जिज्ञासूंना उपदेश करण्याचें दुसरें काय कारण आहे तें मला सांगा.

श्रीवसिष्ठः—उपदेश व उपदेश्यरूप ब्रह्म ब्रह्मामध्यें स्थित झालें असतां बोधात्म्यामध्यें मोक्ष नाहीं व बंध नाहीं हा निश्चय होय.

श्रीरामः—सर्वांचा जर असंभव आहे तर देश, काळ, क्रिया, द्रव्य भेददृष्टि इत्यादिकांनीं युक्त असलेल्या लोकांना ही जगत्सत्ता कशी दिसते?

श्रीवसिष्ठः–देश, काल, क्रिया, द्रव्य, भेद, ज्ञान इत्यादिकांची अज्ञानावांचून दुसरी सत्ताच नाहीं. कारण जीवन्मुक्तीच्या पूर्वीं दुसरी तदनुभवसिद्ध अशी दुसरी जगत्सत्ताच नाहीं

श्रीरामः—भगवन्! तत्त्वदृष्टीनें द्वैत व ऐक्य यांचा असंभव झाला असतां बोध्य-बोधकभावाचाहि असंभव होतो. तेव्हां तत्त्वबोधाला बोधत्व कोठचें? बोध हा शब्द अकर्मक नाहीं, सकर्मक आहे.

श्रीवसिष्ठः—अबुद्धच ब्रह्मबोधानें अज्ञानक्षयरूप फलाश्रयत्वानें बोधत्वाला म्हणजे बोधकर्मत्वाला प्राप्त होतो. त्यामुळेंच बोध शब्दहि बोध्यतेला म्हणजे सकर्मतेला प्राप्त होतो. पण हेंहि सर्व तुमच्यासारख्या अज्ञांच्या दृष्टीनेंच होय. आमच्यासारख्या जीवन्मुक्तांमध्यें अज्ञानाचा अभाव असल्यामुळें बोधाला सकर्मकता आहे, असें निरूपण करतां येत नाहीं.

श्रीरामः–पण 'आम्हांमध्यें' असें म्हणून आपण जीवन्मुक्तांचे ठिकाणींहि अहंता प्रदर्शित केली. पण ती अहंता हें कांहीं अज्ञानाचें कार्य नाहीं. यास्तव बोधच अहंतारूप परिणामास प्राप्त होतो असें म्हटलें पाहिजे. तेव्हां त्याची बोधान्यता दुर्वार आहे. पण जलाहून अतिशय निर्मळ असलेल्या चिन्मात्रामध्यें ही अहंता कोठची?

श्रीवसिष्ठः—हें जें बोधाचें बोधत्व तेंच वायूच्या स्पंदाप्रमाणें 'अहं त्वं' इत्यादि बोललें जातें. म्हणने आम्ही आपल्या कूटस्थ स्वरूपालाच मी असें म्हणतों. अज्ञ जीवांप्रमाणें अभिमानप्राधान्यानें बोलत नाहीं.

श्रीरामः—असें जर असेल तर सौम्य समुद्रच आपल्या स्वरूपांत तरंगादिकांना जसा धारण करतो, त्याप्रमाणें जीवन्मुक्तांचें चिन्मयच अहंताहि जगत् व बोध्यबोधादि त्रिपुटी आहे असें ठरलें.

श्रीवसिष्ठः—हें जर तुला कळलें आहे, तर तूं द्वित्त्वादि दोषामुळें अद्वैतहानि होते, असें म्हणतोस तें कसें शक्य आहे? अनंत, शांत, एक, पूर्ण, परम पदीं द्वित्त्वादि दोषांचा संभवच नाहीं. यास्तव तूं शुद्ध अद्वैताचा आश्रय कर.

श्रीरामः—शुद्धाद्वैतपक्षीं वायूच्या स्पंदाप्रमाणें अहंत्वाचा विकल्प कल्पून कोणता भोक्ता या व्यवहाराचा अनुभव घेतो? कारण त्यामुळेंच ही जगद्भ्रांति उपस्थित झाली आहे. तिला जर सोडतां येत नसेल तर पुनः बंधमोक्ष कल्पनाहि अवश्य होईल.

श्रीवसिष्ठः–ज्ञेयसत्तेचा साक्षात्कार झाला असतां बंधन होतें. म्हणजे ज्ञेयविषय सत्य आहे, असा जर अभिमान धरला, तरच पुनर्बंधाची प्रसक्ति होते. पण तत्त्ववेत्त्यांना ज्ञेय विषयच मुळीं दिसत नाहीं. कारण तत्त्वज्ञानानें त्याचा बाध झालेला असतो. ज्ञप्तिच त्यांच्या

प्रारब्धशेषभोगासाठीं सर्व विषयाकारानें भासते. त्यामुळें त्याच्या ठिकाणीं पुनर्बंधाची कल्पनाच संभवत नाहीं.

श्रीरामः—अहो, पण ज्ञप्ति सर्वार्थरूप आहे, ज्याप्रमाणें दीपामुळें नील, पीत इत्यादि वर्ण दिसतात, त्याप्रमाणेंच ज्ञप्तीच्या योगानें बाह्य घटपटादि स्थिति प्रत्ययास येते. त्यामुळें प्रत्यक्षादि प्रमाणानें सिद्ध असलेला बाह्य अर्थ ज्ञप्तिबलानेंच सद्रूप आहे असें सिद्ध होतें. तेव्हां त्या ज्ञप्तीलाच तिचा अपलाप कसा सिद्ध करतां येईल?

श्रीवसिष्ठः—कारणरहित कार्य असा जो हा बाह्य अर्थ त्याची सत्यता भ्रांतिमात्ररूप आहे. ती यथार्थरूप नव्हे.

श्रीरामः—स्वप्न सत्य असो कीं असत्य असो, तें दुःख तर देतेंच. ही जगद्भ्रांतिहि तशीच आहे. तेव्हां त्याला उपाय काय तो सांगा बरें?

श्रीवसिष्ठः—हें अगदीं खरें आहे; पण जसें स्वप्न तशीच जर ही जगत्स्थिति असेल, तर तत्त्वबोधानें त्याच्या स्वरूपाचा बाध करणें हाच सर्व दुःखाच्या शांतीचा उपाय आहे.

श्रीरामः—तर मग काय इतकें झाल्यानेंच सर्वाप्रिय होईल! स्वप्नांत विषयांची पिंडकल्पना कशी शांत होते?

श्रीवसिष्ठः—पूर्वापर विचार केला असतां विषयाची स्थूलता शांत होते. स्वप्नांतील विषयस्थूलताहि बोधानेंच निवृत्त होते हेंहि प्रसिद्धच आहे. प्रबोध झाला कीं स्थूल स्वप्नभावना निवृत्त झालीच पाहिजे.

श्रीरामः—पूर्वापर परामर्शानें ज्याची जगत्स्थौल्य-भावना निवृत्त झालेली असते, तो जीवन्मुक्त या संसारभ्रमाला कसा पाहतो? त्याचा तो भ्रम कसा शांत होतो?

श्रीवसिष्ठः—वासनाशून्य जीवन्मुक्त संकल्पनगराप्रमाणें किंवा वृष्टीनें धुवून गेलेल्या चित्राप्रमाणें जगत् असदाभास पाहतो.

श्रीरामः—त्यानंतर वासनेचें कृशत्व स्थित झालें असतां, विषयाची स्थूलता नष्ट झाली असतां, ज्याला जगत्स्थिति स्वप्नाप्रमाणें झाली आहे त्याचें काय होतें?

श्रीवसिष्ठः—संकल्परूप जगाविषयींची त्याची ती वासनाहि हळूहळू लीन होते आणि मग क्रमानें तो वासनाशून्य जीवन्मुक्त शांत होतो.

श्रीरामः—अनेक जन्मांमध्यें रूढ झालेली व अनेक शाखापल्लवानें शोभणारी अशी ती संसारबंध उत्पन्न करणारी घोर वासना कशी शांत होते?

श्रीवसिष्ठः—भ्रांतिमात्ररूप अशा या दृश्यचक्रांत यथार्थ विज्ञानामुळें जगाची स्थूलता दग्धपटन्यायानें जरी स्थित असली तरी प्रारब्धशेषभोगक्रमानें तीहि क्षय पावते.

श्रीरामः—हे मुने! या दृश्यचक्रांतील स्थूलताभ्रांति हळूहळू गेली असतां दुसरें निर्विक्षेपता-साधन असें काय होतें? शांति कशी उत्पन्न होते?

श्रीवसिष्ठः—जगाच्या स्थूलतेचा भ्रम निवृत्त झाला असतां व तें चिन्मात्ररूप आहे असा निश्चय झाला असतां चित्त निरोधगौरवापासून मुक्त होतें आणि भोगांविषयींची आस्था शांत होऊन परम वैराग्य प्राप्त होतें.

श्रीरामः—बालसंकल्परूप अशा या भासुर जगाची स्थिति असतांना म्हणजे तें विद्यमान असतांना दुःखाला कारण होणाऱ्या आस्थेचा उपशम कसा होईल? ज्याचा संकल्प अतिशय कोमल आहे असा बालकहि दुःखाचा अनुभव घेत असलेला कसा दिसतो?

श्रीवसिष्ठः—अविचारामुळें हें सर्व संकल्पमात्र आहे असें कळत नाहीं. त्यामुळें बालकालाहि दुःख होतें. पण विचारानें तत्त्वज्ञान

झालें, हें सर्व संकल्पमात्र आहे असें कळलें, म्हणजे त्याचा नाश जरी झाला, तरी दुःख होत नाहीं. हें संकल्पमात्र आहे. याचा तूं चांगला विचार कर.

श्रीरामः—भगवन्! चित्त कशा प्रकारचें आहे व त्याचा विचार कसा केला जातो आणि त्याचा उत्तम प्रकारें विचार केला असतां काय फळ होतें, तें सांगा.

श्रीवासिष्ठः—चितीचें जें विषयोन्मुखत्व त्याला चित्त असें ह्मणतात. त्याचा विचार ह्मणजे ह्याच. या विचारानें वासना शांत होते.

श्रीरामः—हे ब्रह्मन्! चितीची अविषयोन्मुखता कितीशी होऊं शकेल? निर्वाण देणारी चित्ताची अचित्तता कशी उदय पावते?

श्रीवासिष्ठः—चेत्य संभवत नाहीं, तेव्हां चित् विषयाचें कसें प्रकाशन करणार? अशा विचारानें विषयाचा असंभव जाणून त्याचें परिमार्जन करणें ह्राच चित्तनाशाचा उपाय आहे. अशा उपायानें चित्ताची सत्ता कायमची नाहींशी होईल.

श्रीरामः—अहो, ज्याचा अनुभव येतो तें चेत्य असंभवनीय कसें? दृश्याचा इतका स्पष्ट अनुभव येत असतांना त्याचा निषेध कसा करतां येईल?

श्रीवासिष्ठः—अज्ञाच्या दृष्टीनें असलेलें हें जगत् तात्त्विक दृष्ट्या खरें नव्हे, आणि तज्ज्ञाला विषय होणारें जें जगत् तें कशा प्रकारचें आहे तें सांगतां येत नाहीं.

श्रीरामः—अज्ञांचें त्रिजगत् कशा प्रकारचें आहे? त्याला सत्यता कशी नाहीं? आणि तज्ज्ञांचें जगत् कशा प्रकारचें असतें व शब्दानें तें बोलतां कां येत नाहीं?

श्रीवासिष्ठः—अज्ञांचें जगत् देशकृत परिच्छेद, कालकृत परिच्छेद व वस्तुकृत परिच्छेद यांनीं युक्त असतें व तज्ज्ञांचें तसें नसतें. तें आरंभापासूनच संभवत नाहीं. नित्य अनुत्पन्नच आहे.

श्रीरामः—भगवन्! आरंभींच जें उत्पन्न न झालेलें तें कधींच संभवत नाहीं. असद्रूप व अनाभास असलेलें तें अनुभवाला कसें येतें?

श्रीवासिष्ठः—रामा! कधींच उत्पन्न न झालेलें व कारणशून्य असें असत् जगत् स्वप्नपदार्थप्रमाणें जाग्रद्रूपानें मिथ्या भासतें. स्वप्नांतलि पदार्थांप्रमाणेंच तें उत्पन्न होऊन व्यवहाराला योग्य असलेलें दिसतें.

श्रीरामः—स्वप्नादिकांमध्यें व कल्पनादिकांमध्यें जो दृश्याचा अनुभव येतो, तो जाग्रद्रूप व्यवहाराच्या अनुभवावरून उत्पन्न झालेल्या संस्कारांमुळें येतो, असें मला वाटतें.

श्रीवासिष्ठः—रामा! संस्कारांमुळें स्वप्नांत व मनोराज्यांत जो पदार्थ दिसतो, तो जागृतीमध्यें अनुभवलेला असतो, कीं त्याहून निराळा असतो, तें मला सांग.

श्रीरामः—स्वप्न, कल्पना, मनोराज्य इत्यादि भ्रमांमध्यें जाग्रद्विषयच मला भासतात.

श्रीवासिष्ठः—जाग्रत्संस्कारांमुळें तोच विषय जर स्वप्नांत भासतो, तर स्वप्नांत पडलेलें घर जागृतींत पुनः जसेंच्या तसेंच उभें कसें दिसतें?

श्रीरामः—भगवन्! जाग्रत्पदार्थच स्वप्नांत दिसत नाहींत, तर तें ब्रह्मच तसें भासतें, हें तुमचें म्हणणें मी मानतों. मला आतां एवढाच संशय आहे कीं, तें ब्रह्म अपूर्व जगाप्रमाणें कसें भासतें?

श्रीवासिष्ठः—राघवा! अपूर्व पदार्थच स्वप्नांत भासतो असा कांहीं नियम नाहीं. तर कधींहि न अनुभविलेले कांहीं पदार्थ स्वप्नांत

दिसतात व कांहीं अनुभविलेले चित्तांत भासतात. सृष्टीच्या आदि-अंत-मध्यसमयीं पदार्थ ज्या ज्या आकारानें अनुभविला असेल त्या त्या आकारानेंच तो भासतो. यास्तव सर्व ब्रह्माकार आहे, असा दृढ अभ्यास केलेला असल्यास स्वप्नांतहि तसाच भास होईल.

श्रीरामः—यापमाणें तुमच्या बोध केला गेलेल्या मीं जाग्रज्जगत्हि स्वप्नात्मकच भासतें हें जाणलें. पण हा जगद्यक्ष तसा असूनहि ग्रहाप्रमाणें मला पीडा देतो. त्याची शांति कशी करावी, तें सांगा.

श्रीवसिष्ठः—हा जो संसाररूप भ्रम आहे त्याचें काय बरें कारण असावें? कार्याहून कारण भिन्न नाहीं असा तूं विचार कर.

श्रीरामः—चित्तच स्वप्नानुभवाचें कारण आहे. त्यामुळें तेंच आदि-अंतरहित, असार, अनामय विश्व आहे.

श्रीवसिष्ठः—हे महाबुद्धिमान रामा, तें चित्तच महाचिद्घन आहे व तेंच स्वप्नादिरूपानें स्थित आहे. त्यांत इतरात्मक असें कांहीं नाहीं.

श्रीरामः—पण शाखा, पान, फुलें इत्यादि अवयव व वृक्ष हा अवयवी यांचें जरी तादात्म्य असलें, तरी त्यांत भेदहि असतो. तसाच चित्त व जगत् यांचा ऐक्यभावहि भेदास पात्र आहे असें कां म्हणूं नये? जगदादिक समष्टि चित्ताच्या योगानें निरवयव ब्रह्मामध्यें राहील.

श्रीवसिष्ठः—पण जगत् मुळीं संभवतच नाहीं. तें आरंभापासूनच नित्य अनुत्पन्न आहे. त्यामुळें तें सर्व अज, शांत, अजर व अखंड ब्रह्म आहे.

श्रीरामः—भगवन्! मी आतां सर्व समजलों. सृष्टि, स्थिति, लय इत्यादि सर्व भ्रम काकतालीयन्यायानें झाले आहेत. द्रष्टृत्व, भोक्तृत्व इत्यादि सर्वहि परमपदीं झालेले भ्रमच आहेत.

श्रीवसिष्ठः—रामा, तीन प्रकारची दृष्टि आहे. एक पामरदृष्टि, दुसरी यौक्तिक दृष्टि व तिसरी तत्त्वदृष्टि. त्यांतील पहिलीचें निराकरण दुसऱ्या दोन दृष्टींचा आश्रय करून करावें व दुसरीचें तिसऱ्या दृष्टींचा आश्रय करून करावें, असा तत्त्वज्ञांचा संकेत आहे; त्यास अनुसरून मीहि या शास्त्रांत सर्व दृष्टि व त्यांचे द्रष्टे जीव नाहींत, जगाची शून्यता व भ्रमहि नाहीं, इतकी स्थिति येईतों या जगाचा निर्णय केला आहे. १९०

---

## सर्ग १९१ वा.

—:०:—

१ अज्ञानामुळें ब्रह्मच जगदाकार भासतें. व २ तत्त्वज्ञांचाच निर्वाण हा विषय आहे असें वर्णन.

श्रीरामः—हे मुनिश्रेष्ठ! असें जर आहे तर मग हें जगत् परतत्त्वविवर्त आहे. सर्वदा सर्वभावात्मक आहे. त्यामुळें तें उत्पन्न होत नाहीं व त्याचा कधीं उपशमहि होत नाहीं. जगदाभासरूप ही विक्षेपशक्तिप्रधान अविद्याच यौक्तिकदृष्टच्या भासत आहे. पण तत्त्वदृष्ट्या ती भ्रांतिहि नाहीं, तर ती केवळ ब्रह्मसत्ताच आहे.

श्रीवसिष्ठः—खरें आहे. काकतालीयन्यायानें ब्रह्मच अतर्क्य अविद्यायोगानें आपल्याच स्वरूपांत जीवरूपानें भासतें व तेंच स्वतःला जगत् समजतें.

श्रीरामः—हे मुने! मला मोठा विसमय वाटतो. हें कसें घडतें तें मला सांगा. दिशादिकांचा आश्रय नसतांना महाप्रलयकालीं व मोक्षसमयीं अपरिच्छिन्न चिदाकाशाचा प्रकाश कसा संभवतो? म्ह. तें स्वयं कसें प्रकाशतें?

भिंतीचा आधार असल्यावांचून दीपाचा प्रकाश व्यक्त होणें शक्य नाहीं, त्याचप्रमाणें चिदात्म्याची अभिव्यक्ति आधारावांचून कशी संभवते ?

श्रीवसिष्ठ:—रामा ! हें मोठें आश्चर्य आहे, यांत संशय नाहीं. आधारावांचून प्रकाश संभवत नाहीं, हें खरें आहे. तथापि अन्वयव्यतिरेकन्यायानें विचार करून तूं पहा. कारण तें चित्स्वरूप सूर्यादिकांच्या प्रभेचीहि प्रभा आहे. ही चितिरूप प्रभा अंधकारांतहि प्रकाशते व सूर्योदयानंतर प्रकाशादिकांसह विद्यमान असते. सूर्यादिकांचा प्रकाशहि भिंत वगैरे आधारावांचूनहि राहूं शकतो. तो केवळ त्या आधारावर स्पष्ट भासतो इतकेंच. कारण त्याचें प्रकाशत्व भित्तिप्रयुक्त नाहीं, तर उलट प्रकाशामुळेंच भिंत व्यक्त होते. भिंत व्यक्त होण्यापूर्वींच जसा सूर्य प्रकाशतो, त्याचप्रमाणें सृष्टीच्यापूर्वीं व प्रलयकालींहि निरालंब चित्त संभवतें.

याप्रमाणें आधारावांचून चिति संभवते हें सिद्ध होत असल्यामुळें तीच सर्गाच्या आरंभीं जगदाकारानें मिथ्या परिणाम पावली आहे. जशी स्वप्नादिकांत त्याचप्रमाणें एक चितूच जागृतींतहि द्रष्टृदृश्यात्मक होऊन भासते. ही चित् सृष्टीच्या आरंभीं भासते. ती सृष्टीप्रमाणें स्फुरते, पण सर्गादि कालीं भासनीय व भान हीं दोन्हीं ती स्वयंप्रभाच आहे. एकच चित् त्रिपुटीरूप होऊन सृष्टीच्या आरंभीं सर्गाप्रमाणें भासते. असें भासुर भासणें हाच तिचा स्वभाव आहे; व ही गोष्ट स्वप्न, संकल्पनगर इत्यादिकांमध्यें अनुभवास येते. प्रथम उत्पन्न झालेली ही चिद्दीप्तिहि अशीच प्रकाशमान होत आहे. ती आकाशरूप आहे व तीच हें जगत् प्रकाशित करते. तिचें सर्ग हें आद्यंतशून्य प्रकाशन आहे. तिचा प्रकाशच सृष्टिरूपानें भासतो. अज्ञ लोकांनाच हें आश्चर्याप्रमाणें भासतें; आम्हांला नाहीं. कारण हें स्वभावभूत आहे. महात्म्यांना भास्य-भासनसंवेदन अकस्मात् जरी झालें तरी तत्त्वानुसंधानानें तें तत्काळ लोपून जातें. सृष्टीच्या आरंभीं कोणी भासक नसतो व त्याचा भास्य विषयहि नसतो; तर खांबाच्या ठिकाणीं पुरुषप्रत्यय मिथ्या अज्ञानामुळेंच जसा यावा त्याप्रमाणें आत्म्यामध्यें हा द्वैताभास होतो. चित्तामध्येंच हें द्वैताचें मिथ्याभान होत आहे. सृष्टीच्या आरंभीं भास्य-विषय नाहीं. पण त्या वेळीं भासक नसतो असें मात्र नाहीं. कारण हें एकरूप चिदाकाशच कारणाच्या अभावींहि तसें भासत आहे. सृष्टीच्या आरंभीं चितीमध्यें वस्तुतः काय कारण असतें तें तूंच सांग बरें ? विषयदृष्टीचा अभाव असल्यामुळें ही चितूच अशी प्रकाशमान होत आहे. हें जें जगद्भान आहे, तें जागृत नव्हे, सुषुप्त नव्हे व स्वप्नहि नव्हे. कारण दृश्याचा मुळीं असंभवच आहे. म्हणून हें केवळ ब्रह्मच भासतें. सृष्टीच्या आरंभीं जें जगद्भान होतें तें तुर्यचिद्च तसें चकाकतें. तें तुर्यचिद् स्वतःच्या स्वरूपालाच जगत् असें समजतें. पण तें त्याचें स्वरूप वस्तुतः जगन्मय नाहीं. चिन्मात्र आकाशच सृष्टीच्या आरंभीं असें भासतें. शून्यत्व व आकाश यांप्रमाणें त्याचें जें स्फुरण तेंच हें जगत् होय. याप्रमाणें तत्त्वानुसंधान-उपायानें तत्त्व जाणून भूमिकापरिपाकक्रमानें हें स्वानुभवानें युक्त म्हणजे दृढ होई तों सर्व विकल्प सोडून वागादिकांच्या व्यापाराला निरोध करून निर्विकल्प समाधीमध्यें रहावें. अज्ञानें या अनादि संसारामध्यें पुनः पुनः भोगलेलें विषयजात वैराग्यातिशयानें सोडावें.

१. 'आश्चर्यवत् पश्यति कश्चित् एनम् [ गी. भा. पृ. १२६ ] हें भगवद्वचन याविषयीं प्रमाण आहे.

आणि विषयीं जनांनीं त्याचा भोग घे असें जरी सांगितलें, तरी त्यांचें ग्रहण करूं नये. १९१.

# सर्ग १९२ वा.

१ प्रबुद्धराम आपला बोध गुरूपुढें प्रगट करतो. २ आणि हें सर्व चिन्मात्रच आहे असें विस्तारानें सांगतो.

श्रीराम:—अहो, काय चमत्कार आहे! आम्हीं या संसाररूप निरवधि आकाशांत व त्यांतहि ब्रम्हांडरूप एकदेशांत दीर्घकाल केवल आत्मतत्त्व ज्ञात झालेलें नसल्यामुळें भ्रमण केलें; पण आतां तत्त्वज्ञान होतांच ती सर्व जगद्भ्रांति आहे, यांतील कांहींहि पूर्वीं नव्हतें, आतां नाहीं व पुढेंहि नसेल. सर्व शांत, निरालंब व केवल विज्ञान स्थित आहे. तें अनंत, चिद्घन आकाश, कल्पनाशून्य व त्यामुळेंच आसक्तिरहित आहे. अहो, हें परमाकाशच केवल पूर्णपणें ज्ञात न झाल्यामुळें तें आमच्या संसारत्वास जणुं काय प्राप्त झालें आहे. खरोखर हें मोठें आश्चर्य आहे. 'हे लोक, हे पर्वत' अशा रीतीनें द्वैत भासलें आहे. हें स्वच्छ परमाकाशच अस्वच्छसें होऊन राहिलें आहे. सृष्टीच्या आरंभीं परलोकादिकांत, स्वप्नादिकांत व मनोरथादि अवस्थांमध्यें चित्च चेत्य—विषयाप्रमाणें भासतें. दृश्यबुद्धि निराळी कोठची? स्वर्गांत किंवा नरकांत मी स्थित आहें, अशी जर भ्रांति झाली तर त्या भ्रांतीमुळेंच त्या पुरुषाला नरकाचा बंध प्राप्त होतो. हें दृश्य संविन्मयात्मक आहे. हें दृश्य नाहीं, द्रष्टा नाहीं, सर्ग नाहीं व जगत् नाहीं. चिदाभास नाहीं, जाग्रत् नाहीं, स्वप्नसिद्ध पदार्थ नाहीं, तर हें अनिर्वचनीय असत् आहे. या भ्रांतीचा संभव कोठून होतो म्हणून जर विचार केला तर हे मुने! भ्रांति असद्रूप आहे असा अनुभव आल्यामुळें त्याच्या कारणांचा विचार करणें अयोग्य आहे. निर्विकार ज्ञप्तिपदामध्यें भ्रांति संभवतच नाहीं. हें जें भ्रांतितः ज्ञान तेंच हें जगत् आहे, दुसरें कांहीं नाहीं. निरंतर, आद्यंतशून्य आकाशांत किंवा पर्वताच्या उदरांत आणि निराकार तत्त्वज्ञानपदांत अन्यत्वाची कल्पना करणारें काय असणार! स्वप्नांतील स्वतःच्याच मरणाप्रमाणें भ्रांतीचा हा मिथ्याच अनुभव आहे. जें अविचारदशेमध्यें दिसणारें तें विचार केल्यानें शांत होतें. ज्याप्रमाणें मृगजल, गंधर्वनगर व दोन चंद्र, हे भ्रम विचारपूर्वक पाहिल्यानें उपलब्ध होत नाहींत, तसाच हा अविद्याभ्रम विचार केल्यानें निवृत्त होतो. बालकानें कल्पिलेल्या वेताळाप्रमाणें दिसणारी ही भ्रांति जागरावस्थेंत प्रत्यक्ष जरी दिसली तरी खरी नव्हे. ती अविचारानें रूढ झाली असून विचारानेंच शांत होते. हे मुने! ही भ्रांति कोणत्या निमित्तामुळें झाली, हा प्रश्नच येथें शोभत नाहीं. सत् वस्तूचाच विचारानें लाभ होतो, असत् वस्तूचा होत नाहीं. प्रमाणपूर्वक विचारानें पाहिलें असतां जें प्राप्त होत नाहीं तें असत्च आहे. जगाचें मूळ अज्ञान आहे, त्यामुळेंच त्याचें अज्ञान हा भ्रम आहे. प्रमाणांनीं चांगला विचार केल्यावर जें नाहीं असें ठरलें तें आकाशपुष्प, शशशृंग यांसारखें असलेलें अज्ञान सत्पासून कसें होईल? सर्व बाजूंनीं विचार केला असतांहि जो कोणत्याच कारणानें व प्रमाणानें प्राप्त होत नाहीं, त्या वंध्यापुत्रासारख्या पदार्थाची सत्ता कशी असणार? म्हणून कोणतीच भ्रांति केव्हांच संभवत नाहीं. हें निरावरण विज्ञानघनच जगद्रूपानें विस्तारलें आहे. या वेळीं येथें जें कांहीं भासत आहे तें परमतत्त्वच आहे. तें आपल्या परमस्वरूपामध्यें पूर्णपणें राहिलेलें आहे. येथें कांहींहि केव्हांच भासलेलें नाहीं व

न भासलेलें नाहीं. अशा प्रकारें हें स्वच्छ व शांतच जगत्स्वरूप स्थित आहे. हें अज, अमर, दुसऱ्याला अपहार करतां न येण्यासारखें, विद्वानानें ज्याचें सेवन केलें आहे असें, अत्यंत अविकारी, सर्व बाजूंनीं निरामय, पूर्णपद, प्रकाशरूप, व्यापक, शुद्ध व अद्वय ब्रम्ह असा मीच स्वतःहून भिन्न अनेक व सविकार झालों आहें. अज्ञानावरणामुळें मीं अनात्मा झालों होतों, तोच आतां आवरणभंगामुळें सर्व बाजूंनीं विकास पावलों आहें. १९२.

---

# सर्ग १९३ वा.

—:०:—

१ राम ज्ञानानें अज्ञाननिद्रेचा क्षय झाला असतां सर्व द्वैतशून्य नित्य आत्मस्थितीचें वर्णन करतो.

श्रीरामः—भगवन्! ज्या आदि, मध्य व अंत यांनीं रहित अशा पदाला कर्मोपासनेनें सिद्ध झालेले देव व तपोयोगानें सिद्ध झालेले ऋषि जाणत नाहींत, तेंच हें भासत आहे. त्यांत जगत् कोठचें व दृश्यता कोठची? द्वैत व अद्वैत यांचें अनुसंधान करूं लागलें असतां मनामध्यें क्षोभ उत्पन्न होऊन त्यामुळें होणारा जो वाक्यव्यवहार, संदेहविभ्रम यांचें आम्हांला कांहीं प्रयोजन नाहीं. अत्यंत शांत, आद्य व अनामयरूपच हें मला भासत आहे. आतां जगद्भान कसें झालें आहे म्हणून विचाराल तर सांगतों. आकाशांत दिसणारे गंधर्वनगरादि भास जसे अगदीं शांत स्थित असतात, त्याप्रमाणें चिदाकाशांत हें विस्तीर्ण त्रिजगदाकाशाचें भान होत आहे. आकाशांत जसें आकाशत्व किंवा पाषाणांत पाषाणत्व स्थित असतें व जलांत जलत्व असतें, त्याप्रमाणें चिद्घनांत हें जगत्त्व आहे. अहंतादिकांसह हें जगद्दृश्य सर्व दिशांमध्यें व आकाशामध्यें जरी अपार व अनंत पसरलें आहे तरी तें महाचितूचें उदर आहे असें तूं जाण. तें शांत आकाश आहे व शून्यतेनेंच उदय पावलें आहे. या विमूढ जीवाच्या दृष्टीनें परमतत्त्वानें तें परिमित रूपानें जरी उदय पावलें आहे, तरी याच अज्ञ जीवाला ज्याचा उदय अपरिमित आहे अशा ब्रह्माचा साक्षात्कार होतांच हें संसारभूत शांत होतें. मग तो जरी सर्व व्यवहार करीत असला तरी त्याची भेदबुद्धि नष्ट होते. जलाच्या उदरांत तरंगांचा जसा लोप होतो, त्याचप्रमाणें त्याच्या स्वरूपांत भेदज्ञान होत नाहीं. पाषाणादिकांला भेदबुद्धि जशी नाहीं, तशीच त्या सचेतन पुरुषालाहि ती होत नाहीं. संसारसत्तारूप दिवस उत्पन्न करणारा, त्रिविध तापांचा जणुं काय आकारच असा अज्ञानरवि कोठें तरी अस्त पावला असतां मोक्षसुखविश्रांतीला कारण होणाऱ्या रात्रीला आरंभ होतो. ज्ञानी पुरुष भावाभावरूप कार्यामध्यें, जरा-मरण-जन्मामध्यें व व्यवहारविक्षेपामध्यें असूनहि नसतो. वस्तुतः अविद्या नाहीं, भ्रांति नाहीं, सुख नाहीं व दुःखोदय नाहीं. विद्या, अविद्या, सुख, दुःख हें सर्व निर्मल ब्रह्मच आहे. आम्हांला अज्ञात, अब्रह्मरूप असें नाहींच. मी आतां प्रबुद्ध झालों आहें. माझ्या सर्व अज्ञानदृष्टि अगदीं शांत झाल्या आहेत. मी शांत सर्व द्वैतवैषम्यरहित झालों आहें व या सर्व जगाला आकाशरूप पहात आहें. हें सर्व जगत् केवल ब्रह्मच आहे हें मला आतां चांगलें कळलें. मी पूर्वीं व आतांहि कोणी निराळा नाहीं. पण पूर्वीं ब्रह्म हाच माझा अज्ञात आत्मा होता व आतां तेंच ब्रह्म ज्ञात झालेल्या स्वभावामध्यें स्थित आहे. ज्ञात व अज्ञात असें हें अनिर्भास म्ह० स्वातिरिक्त ज्ञानाज्ञानच निर्भासशून्य, एक व अजर आहे. ज्याप्रमाणें शून्यत्व, एकत्व, नीलत्वरूप एकच आकाश असतें, तसेंच हें ब्रह्म आहे.

यास्तव आतां मला ज्ञान झाल्यामुळें मी निर्वाणरूप होऊन रहातों. अज्ञाननिवृत्तीनेंच सर्व शंकांची निवृत्ति झाल्यामुळें मी निःशंक आहें. मी सर्वक्रियारहित होऊन राहिलों आहें. मी आतां विक्षेपरहित आत्मसुखामध्येंच चित्ताला स्थिर करून रहातों. यथास्थित, नित्य, अनंत होऊन रहात आहें. तेव्हां अशा ज्ञानानें युक्त असलेला हा मी समस्तात्मरूप ब्रह्मामध्यें कसा स्थित नाहीं? मी सर्वदाच सर्व आहें. अथवा अति शांत, सर्व उपद्रवरहित व सर्व विकल्पशून्य एक सद्रूप आहें. किंवा देश, काल, आधार इत्यादि कांहीं नसल्यामुळें मी कोठेंच नाहीं. अशा प्रकारची ही 'निर्वाण' या नांवाची सर्वशांति अत्यंत आश्चर्यरूप आहे. जाणण्यास योग्य असें जे परम पुरुषार्थरूप तें मीं जाणलें; अन्य अज्ञ जनांना दुष्प्राप असलेलें मोक्षसुख प्राप्त करून घेतलें. हें संसारअनर्थरूप सर्व वस्तुजात अस्त पावलें आणि चरमसाक्षात्कारानें प्रकट झालेलें माझें स्वरूप उदय पावलें. या माझ्या स्वरूपांत मरण, दुःख इत्यादिकांचें नांवहि नाहीं. १९३.

## सर्ग १९४ वा.

१ राम स्वतः जाणलेलें आत्मतत्व, जगत्तत्व व निर्वाणसाधन गुरूंना निवेदन करतो.

**श्रीराम:**—सर्व जीवांच्या मनोवृत्तींमध्यें जेव्हां जेव्हां ज्या ज्या भोगनिमित्तानें स्वप्रकाश चिदात्मा जसा विवर्त पावतो, तसाच तो स्वतःच नाना जीवभावानें अनुभव घेतो. एकाच निरवयव परमसूक्ष्म ब्रम्हामध्यें सर्व जीवांनीं एकाच वेळीं अध्यास केल्यामुळें एकत्र जमलेले हे अनंत सर्ग, ब्रह्मांड, भुवन इत्यादि भेदांनीं विस्तार पावलेल्या स्वभावांतच एकमेकांशीं संलग्न असल्याप्रमाणें रहातात. कारण ते त्या अशा प्रकारच्या निरवयव ब्रम्हामध्येंहि तादात्म्य-अध्यासानें परमसूक्ष्म केलेले असतात. अनेक रत्नांचे किरण एकाच घरामध्यें एकत्र जरी मिळाले, तरी ते जसे असंबद्ध असतात, त्याप्रमाणेंच हें समजावें. नानारत्नांचें दाट किरणजाल जसें स्वतंत्रपणें रहातें त्याप्रमाणें प्रत्यक्ष व परोक्ष असलेला जगत्किरणांचा समूह या परमात्म्यामध्यें एकमेकांला अडचण न करतां प्रवेश करतो व संचार करतो. त्यांतील ज्या जीवांचा समानकर्मवासनेमुळें अध्यास झालेला असतो त्यांना अनुभव येतो, इतरांना येत नाहीं. अनेक दीप जरी जळत असले तरी जे अंध नसतात त्यांनाच त्यांचा अनुभव येतो, अंधांना येत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. तरंगांच्या क्रीडास्थानीं म्ह० समुद्रामध्यें, प्रत्येक जलावयवामध्यें लवणादिरस जसा असतो, त्याचप्रमाणें सर्गांतील प्रत्येक अणूमध्यें सर्ग आहेत. पण परमार्थतः सर्ग नाहींत व त्यांचा क्रमहि नाहीं. जलबिंदूमध्यें जसा रस, त्याप्रमाणें चिद्घनाच्या प्रत्येक सूक्ष्म अवयवामध्यें सर्वत्र सर्गाधारपरंपरा आहेत. त्यांची गणना करण्यास कोण समर्थ आहे? ज्याप्रमाणें अवयवांहून अवयविता केव्हांहि भिन्न नाहीं, त्याप्रमाणें परमात्म्यामध्यें शब्दभेदावांचून सर्गता भिन्न नाहीं. एकच आत्म्याला मायेनें अनंतरूप प्राप्त होतें. पण त्या अनंततेचें कांहीं कारणच नसल्यामुळें ती स्वतः उदय पावत नाहीं व अस्तहि पावत नाहीं. जगाचें अधिष्ठान नित्य असल्यामुळें स्वभावतःच त्याच्या अस्तोदयाचा अभाव आहे. सूर्यप्रभा घटपटादिकांचें प्रकाशन जशी करते, त्याचप्रमाणें ही स्फुरण पावणारी ज्ञप्तिच वस्तुतः अकर्तृरूप असली तरी या अखंड ज्ञेयतेला उत्पन्न करते. सर्व पदार्थांविषयीं वैराग्य आल्यामुळें व

तत्त्वज्ञानानें सर्व संसाराचा बाध झाल्यामुळें ती ज्ञप्ति स्वतःच समाधान बनते व तेंच तिचें निर्वाण होय. तो बोध बुद्धीनें जाणला जात नाहीं. बोध नेहमींच जागृत असल्यामुळें त्याला जागें करावें लागत नाहीं. बोध या साधनानेंहि तो जाणला जात नाहीं; कारण तो जर बोधसाधनाचा विषय झाला तर त्याला बोध कोण म्हणणार? मध्यान्हीं सूर्याचा ताप जसा प्रकट असतो, त्याप्रमाणें बोधहि नित्य प्रकटच आहे. तथापि अज्ञानामुळें तो निजल्यासारखा असतो. आणि देशकालांच्या अभावींहि तो स्वतःच जागृत होतो. ऐहिक व पारमार्थिक कर्मफलांविषयीं विरक्त झालेल्या ज्यांच्या सर्व इच्छा शांत झाल्या आहेत अशा व ज्ञानामुळें निष्काम बनलेल्या पुरुषांचें निर्वाण आपोआपच प्रवृत्त होतें. मोहनिद्रेपासून ज्याचा चिदात्मा निवृत्त झाला आहे व बाह्यवृत्तीचा निरोध करून जो केवळ स्वभावामध्येंच स्थित झाला आहे तो कशाचेंहि ग्रहण करीत नाहीं व कशाचाहि त्याग करीत नाहीं. तो दीपाप्रमाणें जशाचा तसाच केवल पहात राहतो. अहंकारपूर्वक कोणतीहि क्रिया करीत नाहीं. कारण मनानें मनन करीत असूनहि विषयामध्यें आसक्ति नसल्यामुळें तो वस्तुतः मननरहितच असतो. व्युत्थानदशेमध्यें ज्याला विश्वरूप हें नांव आहे, तोच समाधींत ब्रह्मसंज्ञक बनतो. सर्गासर्गात्मक चिन्मात्रच सत्य असून तेंच सर्वत्र भासतें. जो व्युत्थित-दशेंत किंवा समाधि अवस्थेंत आपल्याला केव्हां अभिन्न बोधस्वरूपानुभवामध्यें स्थित असलेलें पहातो तोच शांत होतो. आकाशाला जशी शून्याहून भिन्न सत्ता नसते, त्याप्रमाणें जगांतील पदार्थसमूहांची बोधमात्र एकनिष्ठतेवांचून दुसरी सत्ता नाहीं. कारण अपरिच्छिन्न ब्रह्मबोधानें ज्याच्या ठिकाणीं केवळ अनंतबोधता प्राप्त झाली आहे, त्याची ती अनंतबोधताच अवशिष्ट रहाते व तीहि स्वरूपानेंच परिणत झाल्यामुळें शब्दानें बोलून दाखवितां येत नाहीं. त्या सत्तेमध्यें विश्रांति पावल्यावर एक श्रेष्ठ सत्ताच अवशिष्ट रहाते किंवा तीहि रहात नाहीं. अनंत सत्तेमध्यें शांत झालेल्या तत्त्वज्ञांची अवस्था वाणीचा विषय होत नाहीं. ती साम्यावस्थेची पराकाष्ठा आहे. तो सत्तासामान्याचा परमावधि आहे. तीच बोधाचीहि पराकाष्ठा आहे. सर्गहीं तद्रूपच आहे. यास्तव सर्व शांत व अव्यय आहे. सर्व विक्षेपशून्य व तृष्णाशून्य पुरुषाची संविद् अत्यंत स्वच्छ व शीतळ असते, म्हणूनच ब्रह्मदेव, शंकर व विष्णुहि त्याच सत्तेची सदा इच्छा करतात. सर्वत्र, सर्व ठिकाणीं, सर्व पदार्थांचा आत्माच सर्व प्रकारें उदय पावला आहे. हें सर्व शुद्ध चेतनच आहे. याचा नाश केव्हांच उपपन्न होत नाहीं. संसार अत्यंत दुःखरूप आहे व निर्वाण अतिशय शीतल आहे. यास्तव आत्मस्वरूप अति शीतलच आहे. तें सुखरूप आहे. त्यांत दुःखाचा लेशहि नाहीं. शिलेमध्यें न कोरलेल्या मूर्ति शिल्पकाराच्या बुद्धींत जशा यथेच्छ स्फुरण पावतात, त्याप्रमाणें अविच्छिन्न ब्रह्मच जगद्रूपानें स्फुरतें. सौम्य जलरूप कोशामध्यें तरंगमंडल जसें स्फुरतें, त्याप्रमाणें महाचिद्रूपी कोशामध्यें असलेलें हें अव्यय विषयजात प्रकट होतें. अज्ञानानें आच्छादित झालेला आत्मा तद्भावानें जडप्राय कृत्रिम वेशांनीं ज्या जीवांकडून जसा जसा कल्पिला जातो, तसा तसा तो स्फुरतो. भोग, मोक्ष इत्यादि अवस्थांमध्यें जीवांच्या कल्पनांप्रमाणें तो तसा तसा भासतो. स्वप्न पहाणाऱ्या पुरुषाच्या स्वप्नांत त्याचा बंधु मृत झाला किंवा जीवंत असलेला दिसला, तरी जागृतींत त्याला जसें कोणी सत्य मानीत नाहीं, त्याप्रमाणें तत्त्वे-

त्याला सर्व दृश्याविषयीं हर्ष किंवा शोक होत नाहीं. हें जें कांहीं दृश्यादिक त्रिपुटीरूप आहे, तें सर्व शांत व शिव आहे, अशी भावना केल्यावर व तसें ज्ञान झाल्यावर भ्रांतीचा उद्भव कसा होईल? देहामध्यें उत्तम प्रकारें अनुभवास येणाऱ्या विषयांविषयीं व त्यांच्या भोगांविषयीं ज्ञान झाल्यावर स्वप्नांतील पदार्थी-प्रमाणें सर्वथा वैराग्य उत्पन्न होतें. वैराग्यामुळें बोधाची वृद्धि होते व बोधामुळें वैराग्य वाढतें. भिंत व प्रकाश यांप्रमाणें बोध व वैराग्य एक-मेकांला प्रकट करतात. एखाद्यानें वैराग्य किंवा धन, स्त्री, पुत्र वगैरे यांचें तत्त्वाभिनि-वेशरूप बोधानेंच पुष्कळ संपादन केलें तर त्याच्या अनुरोधानें त्याचें जाड्यहि तित-केंच सुस्थित आहे असें जाणावें. पुष्कळ वैराग्य असल्यास त्याच्या ठिकाणीं ज्ञानहि तितकेंच आहे असें अनुमान करावें व धनसुतादिकांचा अभिनिवेश अधिक असल्यास त्यावरून त्याच्या तितक्याच अज्ञानाचेंहि अनुमान करावें. वैराग्य हें बोधाचें बोधत्व आहे. **जेथें वैराग्य नाहीं तेथील पांडित्यहि मौर्ख्यच आहे,** असें समजावें. विरक्ति व बोध यांनीं संपन्न असलेले लोक केव्हांहि मूढ नव्हेत. ते वैराग्य व बोध परस्परांकडून जरी वाढविले गेले असले तरी ते असत्यच आहेत. तथापि चित्रांतील अग्नीप्रमाणें ते कार्य करण्यास असमर्थच आहेत, असें समजूं नये. **बोध व वैराग्य यांची परम संपत्ति हाच मोक्ष होय.** त्या शांत व अनंत पदीं रहाणारा पुरुष कधीं शोक करीत नाहीं. "मला जेथें जावयाचें होतें तेथें मी गेलों. माझें कर्तव्य मीं केलें. सर्व दृश्य मीं पाहिलें. हें सर्व शिव व शांत आहे," असें जाणणाऱ्या विरक्त व अन-हंकार अशा पुरुषाची स्थिति संकल्परहित व त्यामुळेंच आकाशाप्रमाणें निर्मळ असते. जसा एखादाच सिंह आपला पिंजरा तोडतो, त्याप्रमाणें कोट्यवधि लोकांतील कोणी एखा-दाच वीर्यवान् उठून वासनाजाल तोडतो. स्वयंप्रकाश बोध प्राप्त झाल्यामुळें ज्याची परम शुद्धि झाली आहे व जो अंतःप्रकाशानें युक्त आहे, त्याचा जाड्यवासनाभाग शरदृतू-तील नीहाराप्रमाणें आपोआप तत्काल शांत होतो. ज्याला ज्ञेय ज्ञात झालें आहे, ज्याच्या ठिकाणीं संकल्प राहिला नाहीं, ज्याचें चित्त संकल्पांचें उल्लंघन करून गेलें आहे, असा जीवन्मुक्त व्यवहारामध्यें स्पंदन करतो किंवा करीत नाहीं. सर्व वस्तूंमध्यें तत्त्वमननानें स्थिर होणें हेंच वासनाशून्य अवस्थान होय. भ्रांतिमात्र निश्चयाचा त्याग करून स्वरूपा-मध्यें स्थिर होणें व सर्वत्र शून्यभाव धारण करणें हीच मुक्तस्थिति आहे. भगवन्, ज्याचें अंतःकरण अतिशय शुद्ध झालें आहे, अशा पुरुषामध्यें वर सांगितल्या प्रकारचा निर्वासना-भाव उदय पावला असतां, सर्व दृश्य ब्रह्मच असें ज्ञान झालें असतां, त्याच्या स्थिर व शांत बुद्धीमध्यें, अनंत मोक्ष हें ज्याचें नांव आहे असा सर्व संसारोपशम आपोआप उदय पावतो. १९४.

## सर्ग १९५ वा.

१ ज्ञानी रामाच्या शुभ उक्तींची प्रशंसा करून गुरूनें त्याच्या परीक्षेसाठीं प्रश्न केले, व २ रामानें त्यांचें समाधान केलें, असें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—राघवा, शाबास. तूं उत्तम ज्ञानी झालास. तुझी ही वाणी, अज्ञ जनांच्या पापाचा नाश करणारी आहे व तुझें हें अनु-भवसिद्ध युक्तियुक्त वचन ज्ञानी पुरुषांना संतोष देणारें आहे. हें असत्च असलेलें जगत् बोधप्रयुक्त संकल्पांत जणुंकाय भासतें, पण

असंकल्प दृढ झाला असतां तत्त्वज्ञानानें त्याचा उपशम होतो. म्हणजे त्याची शांति हेंच निर्वाण आहे व तीच परमार्थता आहे. अज्ञानी व ज्ञानी यांचा कल्पनारूप बंध व अकल्पनारूप मोक्ष हीं दोन्ही ब्रह्मप्राप्तीचींच रूपें आहेत. स्पंदन व अस्पंदन हीं दोन्ही जशीं वायूचींच रूपें, तशीं बंध व मोक्ष हीं दोन्हीं ब्रह्माचींच रूपें आहेत. त्यांत एकत्व किंवा द्वित्व नाहीं. ज्ञानी पुरुषाचीच व्यवहारामध्यें जी शिलाजठराप्रमाणें स्थिति तीच अमल मुक्तता होय. हे राघवा! पापाचा नाश करणाऱ्या या पदीं स्थित होऊन समाधीमध्यें व व्यवहारामध्यें आम्ही तुल्यरूप स्थित आहों. ब्रह्मदेव, विष्णु, शंकर इत्यादि ज्ञानी व्यवहार करीत असतांनाहि याच पदीं नित्य शांत रहातात. पर्वताच्या उदराप्रमाणें निर्विक्षेप स्थितीनें युक्त असलेल्या व प्रबुद्ध अशा आमचें हें अनामय पद तूंहि आम्हांप्रमाणेंच प्राप्त करून घे व त्याचाच आश्रय करून आजपासून जीवन्मुक्त स्थितींत सदोदित रहा.

**श्रीरामः**—भगवन्, ब्रह्मामध्यें असें हें असद्रूप, अनुत्पन्न असल्यामुळेंच पृथक् प्रसिद्ध नसलेलें, आरंभरहित, निराकार असें हें जगत् भासत आहे. हें मृगजलासारखें आहे. तरंगरूपानें विवर्त पावणाऱ्या जलाप्रमाणें आहे. सोन्यांतील अलंकाराप्रमाणें आहे. स्वप्नांतील किंवा संकल्पांतील पर्वताप्रमाणें आहे.

**श्रीवासिष्ठः**—रामा! तूं जर खरोखरच ज्ञानी झाला असशील तर आपल्या बोधाच्या वृद्धीसाठीं मीं विचारलेल्या प्रश्नांचें उत्तर दे. मी शिष्याप्रमाणें तुला प्रश्न करतों, तूं गुरूप्रमाणें उत्तर देऊन माझ्या शंकांचें समाधान कर. याप्रमाणें नित्य अनुभूत, जणुं काय डोक्यावरच बसलेला, अतिशय भासुर असा जगद् या नांवाचा हा आभास विद्यमान कसा नाहीं?

**श्रीरामः**—हें जगत् पूर्वींच उत्पन्न झालेलें नाहीं. त्यांतील कांहीं केव्हांच झालें नाहीं. त्यामुळें या वंध्यापुत्राची कल्पनेवांचून सत्ता नाहीं. ज्यापासून ही जगद्भ्रांति उत्पन्न झाली असें म्हणतां येईल असें तिचें कांहीं कारणच नाहीं. कारणावांचून कोणतेंहि कार्य संभवत नाहीं. अविकार व अजर असलेलें ब्रह्म पूर्व अवस्थेचा क्षय झाल्यावांचून सविकार होणें शक्य नाहीं. यास्तव त्याचें कांहींच कारण संभवत नाहीं. हें ब्रह्मच अनिर्वाच्य कारण असावें असें वाटतें. पण निर्विकार ब्रह्मामध्यें जगत् हा शब्द व त्याचा अर्थ यांचें संवेदन कसें व कोठें संभवणार? त्या अनाख्य शांत पदीं हिरण्यगर्भ या नांवाचें प्रथम चेतन द्विपरार्धपरिमित किंचित् काल विवर्तरूप आतिवाहिक देह धारण करून रहातें. यास्तव जगद्भ्रांतीचा तो विषय आहे असें सिद्ध होतें. तुम्ही आपल्या स्वप्नांत एक क्षणाला दीर्घकाल जसा समजतां, त्याप्रमाणें तो हिरण्यगर्भ आपल्या क्षणांत वर्षांची कल्पना करतो. पुढें काकतालीयन्यायानें त्यांत चंद्र, सूर्य इत्यादिकांना पहातो. संकल्प हेंच एक ज्याचें स्वरूप आहे, अशा त्या हिरण्यगर्भाला देश, काल, क्रिया यांनीं युक्त असलेलें हें भुवन आकाशामध्येंच आपोआप भासतें. त्या मिथ्या कल्पनेनेंच उत्पन्न झालेल्या जगांत तो मिथ्या पुरुष मिथ्या भूत-भवनादि सृष्टिसमाचार करीत परिभ्रमण करतो. तोच स्वतः कल्पिलेल्या निरनिराळ्या भुवनांमध्यें व्यष्टिजीवरूपानें दुष्कृतादिकांचें फल भोगण्यासाठीं खालीं जातो व पुण्यफल भोगण्यासाठीं वर येतो. याप्रमाणें अनंत पदार्थांचा व्यर्थ संभ्रम कल्पून तो भ्रमण करीत असतो. जर त्याच्या संकल्पाची काकतालीयन्यायानें जशी पूर्व

स्थिति होती तशीच आतांहि झाली तर तिला 'तीच ही' असें ओळखून जगामध्यें स्थिर स्थिति आहे असें भ्रांतीनें तो समजतो. 'शिला कामिनी होऊन, वंध्यापुत्राच्या सुंदर ललाटावर आकाशचूर्णाचा तिलक लावून त्याला सुशोभित करते' इत्यादि वाक्यांच्या अर्थाप्रमाणें हें मिथ्या जगत् उपस्थित झालें आहे. किंवा हें अधिष्ठानदृष्ट्या सत्यच आहे. कारण याला मिथ्यात्व तरी कोठचें? मिथ्यात्वहि नाहीं व सत्यत्वहि नाहीं. तर हें अनिर्वचनीय अजच असें पसरलेलें आहे. तें आकाशकोशाप्रमाणें स्वच्छ, शिलेच्या जठराप्रमाणें घन, पाषाणमौनाप्रमाणें शांत व अक्षयच आहे. चिदात्म्याचा जो मायिक सर्वाकार संकल्प तद्रूप विराडात्म्यामध्यें म्हणजे त्याच्या आतिवाहिक देहांत जें संवेदनरूप आकाश तेंच जगद्रूपानें भासतें. याप्रमाणें हें ब्रह्म महाकाशच आहे. त्यांत जगत्कथा कोठची? तें शांत, आत्यंतिक वैषम्यशून्य व आद्यंतरहित आहे. जलामध्यें तरंगांचा उद्भव व लय जरी होत असला तरी जलाला अन्यत्व जसें येत नाहीं, त्याप्रमाणें या कल्पित भावाभावांनीं कांहीं फरक पडत नाहीं. जलामध्यें जलबिंदु जसा मिळून जातो, त्याप्रमाणें कित्येक सारासारवेत्ते या शुद्ध परमपदीं एकरूप होऊन जातात. परब्रह्माच्या वेशाप्रमाणें, कार्याप्रमाणें किंवा अवयवाप्रमाणें हें जगज्जीवरूप भासतें. तत्त्वतः विचार केला असतां तें परमात्मरूपच होतें. त्यांत जगें व त्यांचा व्यवहार संभवत नाहीं. स्वप्नाला स्वप्न या रूपानें ओळखलें असतां, मृगजलाला ऊपरभूमिमात्रत्वानें जाणलें असतां व दृश्याला ब्रह्मरूपानें पाहिलें असतां जगामध्यें सत्यताबुद्धि कोण धारण करील? ज्याप्रमाणें ब्राह्मण[1] मद्याची गोडी जाणत नाहीं, त्याप्रमाणें अशुचि प्रपंचाचा भोगरस ज्ञानी जाणत नाहीं. त्याला आपल्या हृदयांतील परमार्थचमत्काराचाच तेवढा अनुभव येत असतो. या आत्म्याला बहिर्वृत्ति सोडून समाधीमध्यें चरमसाक्षात्कारवृत्तीनें जाणावें व आपल्याच शांत, नित्यमुक्त आत्म्यामध्यें स्थिर व्हावें.

**श्रीवसिष्ठः**—हें दृश्य ब्रह्मरूप कारणांत बीजांकुराप्रमाणें स्थित आहे. त्यामुळें त्यांत सर्गादि सद्भाव कां उपपन्न होणार नाहीं?

**श्रीरामः**—जर अंकुर सत्य असेल तर बीजाच्या उदरांत असलेलाच तो बीजाचें आच्छादन फोडून बाहेर येतो असें म्हणतां येईल, पण तसें म्हणतां येत नाहीं. कारण बीज जर फोडलें तर त्यांत अंकुर दिसत नाहीं. बीजाच्या उदरामध्यें जे सूक्ष्म अवयव दिसतात तें बीजच होय, अंकुर नव्हे. त्याप्रमाणें ब्रह्मामध्येंहि जगत्सत्ता दिसत नाहीं, तर जगत्ताच दिसते. हें वैषम्य प्रलयकालींहि तसेंच असतें म्हणून म्हणाल, तर ती ब्रह्मसत्ताच आहे व ब्रह्म अविकारी आहे. तें निर्विकार असल्यामुळें व निराकार असल्यामुळें साकार व सविकार जगद्रूपानें उत्पन्न होतें असें आम्हीं कधीं पाहिलें नाहीं व कधीं ऐकलेंहि नाहीं. निराकारामध्यें साकार वस्तु राहूं शकत नाहीं. परमाणूमध्यें मेरुपर्वत संभवत नाहीं. संपुटांत जसें रत्न त्याप्रमाणें निराकार ब्रह्मामध्यें महाकारानें युक्त असलेलें जगत् रहातें. हें उन्मत्ताचें वचन आहे. शांत व निरवयव ब्रह्म साकार जगाचा तादात्म्यानें आधार आहे असें म्हणणें मुळींच शोभत नाहीं. साकाराचें अविनाशित्व कधीं तरी कोणीं पाहिलें आहे

१ हा दृष्टांत खऱ्या स्वधर्मनिष्ठ ब्राह्मणाला उद्देशून आहे. धर्मबाह्य व विशेषतः सांप्रत कालच्या धर्मबंधनें सोडून वागणाऱ्या ब्राह्मणांना उद्देशून नाहीं.

का ? असें असल्यामुळें 'स्वप्नाप्रमाणें रूढ झालेल्या अपूर्व आकारांनीं बोधच क्षणिक साकार होतो,' ही बौद्धांची कल्पनाहि सर्वथा अनुपपन्न आहे. कारण हें सर्गरूप अपूर्वच म्हणजे पूर्वी कधीं न पाहिलेलेंच चक्षुरादि प्रमाणांनीं अनुभविलें जातें. पण स्वप्न जागृतीमध्यें अनुभविलेल्या पदार्थांच्या संस्कारानें भासतें. जागृतिमध्यें ज्या पदार्थाचा अभ्यास केलेला असतो तोच पदार्थ स्वप्नांत दिसतो, हें सर्वलोकप्रसिद्ध आहे. त्यामुळें बौद्धांची 'जागृति व स्वप्न यांमध्यें कांहीं भेद नाहीं' ही कल्पना असंगत आहे. जें जाग्रत् तेंच स्वप्न अशी कल्पना येथें उपपन्न होत नाहीं. स्वप्नांत मरण पावलेला व श्मशानांत नेऊन जाळलेला पुरुष सकाळीं कसा दिसतो ? यास्तव प्रपंचाचें स्वप्नाशीं साम्य सर्वप्रमाणविरुद्ध आहे; म्हणजे प्रपंच स्वप्नतुल्य नव्हे. ( तर मग शास्त्रांतहि प्रपंचाला स्वप्नतुल्य कसें म्हटलें आहे, असें विचाराल तर सांगतों—) प्रपंच कूटस्थ ब्रम्हाच्या ठायीं आरोपिलेला असल्यामुळें बाध होण्यास योग्य असतो. म्हणून तेवढ्या त्या अंशामध्यें त्याचें ब्रम्हाशीं साम्य आहे. ( आतां चार्वाकांच्या आक्षेपाचें निरसन करतात—) 'स्थूलशरीररहित असलेल्यांस स्वप्न कसें दिसतें ?' असें जर म्हणाल तर तें योग्य नाहीं. कारण पिशाचादिक संभवतात व त्यांची स्थिति स्वप्नवत्च असते. म्हणून स्वप्नासारखा आभास संविदात्म्यामध्यें स्थित आहे. निराकार परमात्माच विवर्तरूप सर्गादि नाना आकारांनीं स्थित आहे. स्वप्नामध्यें चित्च पर्वतादि रूपानें स्वरूपांत स्थित असते. हा परमात्मा सर्व बंधनांपासून मुक्त ब्रम्हच आहे. हा प्रपंच अज्ञानानेंच स्वप्नाप्रमाणें केला आहे. या सिद्धांतीं तशा प्रकारच्या ब्रम्हात्म्याचा अनुभव आला असतां प्रपंचांत अस्तित्व-नास्तित्वादिक अनुभवाला येत नाहीं. त्यामुळें तुच्छताच अनुभवाला येते. अनुभवितृत्व नाहीं व अनुभवक्रम नाहीं. हें कांहीं तरी अनाख्येय आहे. ज्ञान झाल्यावर त्याचा अनुभवच येत नाहीं. अज्ञानदशेमध्येंहि तें केवळ आपल्या कल्पनेनेंच ज्ञात होतें; सत्ता व असत्ता यांनीं विकास पावतें. त्यांतील भाव अभावरूपी असतात व अभाव भावरूपी असतात. भासुरतेला प्राप्त झालेले सर्व पदार्थ त्यांत सर्वदा सर्वप्रकारें भासतात. आकाशच आकाशांत वृद्धि पावतें. ब्रम्हच ब्रम्हामध्यें जगद्रूपानें विकसित होतें. पण ब्रम्हाकाशामध्यें अशी जगद्रूपानें वाढ होणें उपपन्न नाहीं. मी व सृष्टि इत्यादि प्रकारचा जो हा द्रष्टा-दृश्य-दर्शनरूप विभ्रम होत आहे, तो संकल्पनगराप्रमाणें सत् नव्हे. तो शांत चिदाकाशाचाच मिथ्या विस्तार आहे. त्यांत कुड्यादिक मुळींच उपपन्न होत नाहीं. हें जगत्हि शांत, एक, अनामय आहे. हें सर्व अखंडित पूर्ण परम शांत आहे. निश्चेष्ट, निराभास, आदि-अंतशून्य, निर्विषय, जन्ममरणशून्य, शांत, फार मोठें, निरुपाधिक व निराकार अशा स्वपदाला मीं जाणलें आहे. अंतःकरणांत जी संविद् स्फुरत असते तीच वाक्यत्वाला प्राप्त होत असते. पृथ्वीमध्यें जें बीज लीन असतें तेंच अंकुरत्वास प्राप्त होतें. आत्मा एक व शुद्ध ज्ञानमय आहे. तो द्वैत व ऐक्य यांनीं रहित आहे. द्वैत व ऐक्य यांच्या कल्पनेची एक कलाहि मीं जाणत नाहीं. हे सर्वजन अगदीं शांत व जीवन्मुक्त आहेत. त्यांचे सर्व आरंभ अगदीं शांत झाले आहेत. आकाशांत आकाशभाव जसा स्थित असावा तसे ते स्वभावतः स्थित आहेत. जगत्संबंधीं महारंभानें स्थित असलेलें हें सर्व मुकाट्यानें राहिलें आहे. हें जणुंकाय भिंतीवर काढलेलें चित्रच आहे. तें मनोराज्याप्रमाणें उदय पावलें आहे. जणुंकाय पर्वतांतूनच कोरून काढलें

आहे. जणुं काय कथेंतच वर्णिलेलें आहे. जणुं काय शंबरानेंच रचिलें आहे. आकाशांत स्वप्नाप्रमाणें उदय पावलें आहे. जें सर्गाच्या आरंभीं भासतें तें खरोखर स्वप्नाप्रमाणेंच आहे. तें निराधार आहे व अप्रतिघ आहे. अशा या जगाला सत्यता कोठची? हें जगत् अज्ञदृष्टच्या सत्य आहे व तत्त्वज्ञाच्या दृष्टीनें असत्य आहे. ब्रह्मदृष्टच्या पाहणाराला ब्रह्म आहे. निरनिराळ्या भूमिकांच्या आरोहणक्रमानें शांत पुरुषामध्यें क्रमानें शांत होत शेवटीं परमशून्यामध्येंच त्याचें पर्यवसान होतें. अंधकार हळुहळू शांत होत उजाडतांच प्रकाशरूप जसा होतो, त्याचप्रमाणें हें सर्व परमाकाश बनतें. हे सर्वहि स्थावरजंगमात्मक भाव व आम्ही आकाशरूप आहों. ज्ञानी पुरुषाला हें जगत् तुरीयरूपानें सदा भासतें. मी आकाश आहें, आपणहि आकाश आहां, चिदाभासहि आकाश आहे, व आकाशहि आकाशच आहे. हे गुरो! मीं सांगितलेल्या या सिद्धान्ताची परीक्षा पहाण्यासाठीं तुम्ही केवळ आकाशरूपतेचें सेवन करा. म्हणजे चिदाकाशैकरूप होऊनच याचा अनुभव घ्या. आकाशासारख्या ज्ञानानें सर्वात्म-आकाशरूप व ज्ञेयाशीं अभिन्न जो झाला त्या मनुष्यश्रेष्ठाला मी वंदन करितों. हें जगत् चिद्रूपत्वापासून उदय पावतें व त्यांतच लय पावतें. तें कारणावांचूनच स्फुरतें. तें निर्मल परमाकाशच आहे. सर्व पदार्तीत, सर्व शास्त्रयुक्तींच्या पलीकडे असलेलें निर्द्वंद्व पद संपादन करून तुम्ही आकाशात्मक व्हा. मी व जगत् वस्तुतः नाहीं. हात, पाय इत्यादि अवयव नाहींत. घटादि पदार्थ नाहींत. सर्व आकाश आहे. शुद्ध आकाशहि सूक्ष्म चिद्रूच आहे. हा जो सर्वांचा निषेध मीं तुह्मांस दाखविला तो वाद्यांच्या वादामध्यें जरी निंद्य असला तरी आत्मज्ञानांत फार शोभतो. वादामध्यें सर्वांचा काष्ठमौनरूप निषेध कधींच संभवत नाहीं. त्यामुळें वादामध्यें आत्मज्ञान उदय पावत नाहीं. प्रत्यक्षादि प्रमाणांना जें अगम्य, जें अनुमानप्रमाणाला कारण होणाऱ्या सर्व लिंगांनीं रहित, तें स्वानुभवसिद्ध असलेलें ब्रह्म वादांनीं कसें सिद्ध होणार! सर्व शास्त्रांच्या अर्थाहून अगदीं पलीकडे असलेलें, अनुभवमात्रप्रमाण, अचिन्ह, त्यामुळेंच शुद्ध असें एक चिद्रूप ब्रह्माकाशच आहे. तें अज, आद्य व अनात्मरूप आहे. त्या ठिकाणीं शब्दकल्पना शांत झाली आहे. त्याहून अणुमात्रहि भिन्न कांहीं नाहीं. त्याच्या अशुद्धत्वाविषयीं शंकाहि घेणें व्यर्थ आहे. १९५.

---

## सर्ग १९६ वा.

१ गुरु, शास्त्र इत्यादि उपायांनीं ब्रम्ह कसें प्राप्त होतें, त्याचें दारुवैवधिक आख्यानानें थोडक्यांत वर्णन.

**श्रीवाल्मीकिः**—हे महाबुद्धिमान् भरद्वाजा, कमलनयन राम असें बोलून व क्षणभर विश्रांति घेऊन परमपदीं स्थिर राहून परम तृप्तीला प्राप्त झाला. तो परमात्म्यामध्यें विश्रांति पावला. नंतर तो स्वतः जाणत असूनहि लीलेनें मुनीला पुनः विचारूं लागला.

**श्रीरामः**—हे भगवन् मुनीश्वर! आपण संशयरूप मेघांचे शरत्काल आहां. या वेळीं माझ्या मनांत हा असा सूक्ष्म संशय आला आहे. हें महाज्ञान संसारसागरांतून तारणारें आहे, ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे. हें ज्ञान सर्व वाग्जालांचें उलंघन करून राहातें. हें जें सद्ब्रह्म तें स्वसंविद्रूप तुरीय आहे. म्हणजे तें तिन्ही अवस्थांच्या पलीकडे आहे. तें केवल स्वप्रकाशवस्तुमात्रलभ्य आहे. त्यामुळेंच जाग्रदवस्थेंतील गुरु व शास्त्र यांच्या द्वारा अगम्य

आहे. तें मोठमोठ्या महात्म्यांच्या वाणीचाहि विषय होत नाहीं. तें सर्वसंकल्परहित आहे. तेव्हां अतिशय क्षुद्र, प्रतियोगिव्यवच्छेद, संख्याभेद इत्यादिकांची अपेक्षा करणाऱ्या व त्यामुळेंच त्याचा बोध करण्यास असमर्थ असलेल्या सविकल्प शास्त्रपदांनीं तें कसें प्राप्त होणार! विकल्प हेंच ज्यांतील सार आहे अशा शब्दादि शास्त्रांनीं त्याचें ज्ञान होत नाहीं. मग हजारों विकल्प, त्यांचें अनुसंधान, भ्रांति इत्यादि अनर्थपरंपरेला कारण होणाऱ्या गुरु-शास्त्रादिकांची कल्पना कां केली आहे? गुरुशास्त्रादिक हें तत्त्वज्ञानाचें कारण आहे कीं नाहीं याविषयींचा निश्चय मला सांगा. हे वक्त्यांतील श्रेष्ठ मुने! माझा हा संशय आपण घालवा.

श्रीवसिष्ठः—हे महापराक्रमी रामा! तूं म्हणतोस तें बरोबर आहे. शास्त्र हें ज्ञानाचें कारण नव्हे. कारण शास्त्र हें नानाशब्दमय असतें व परमपद नामरहित आहे. तथापि हे रामा! शास्त्र ज्ञानाला कसें कारण होतें, त्यापासून उत्तम बोध कसा होतो, तें तूं ऐक. एके ठिकाणीं कावडी वहाणारे दरिद्री कीरक या नांवाचे शूद्र होते. ग्रीष्मऋतूमध्यें जसे जुने वृक्ष वाळून जातात, त्याप्रमाणें ते सर्व दुःखामुळें कृश झाले होते. त्या कावडी वहाणारांना वैवधिक असें म्हणत. असह्य दारिद्र्यानें ते अतिशय पीडले होते. बांध फुटून सरोवरांतील सर्व पाणी निघून गेलें असतां त्यांतील कमळें जशीं सुकून जातात त्याप्रमाणें नुसत्या गोधड्या पांघरून राहणारे ते दीन व दुर्बल झाले होते. याप्रमाणें अतिशय दुःखी झालेले ते दीन आपली उपजीविका कशी करावी ह्याविषयीं विचार करूं लागले. कोणत्या उपायानें आम्हीं आपलें उदरभरण करावें त्या गोष्टीचा विचार करून त्यांनीं असें ठरविलें. दिवसभर मेहनत करून प्रतिदिवशीं काष्ठें गोळा करावीं व तीं विकून त्यावर आपला निर्वाह करावा, असा त्यांनीं निश्चय केला. याप्रमाणें निर्वाहाचा उपाय योजून ते काष्ठें गोळा करण्याकरितां अरण्यांत गेले. ज्या उपायानें शरीरनिर्वाह होतो तोच उपाय आपत्तींमध्यें शोभतो. याप्रमाणें प्रत्यहीं ते अरण्यांत जाऊन लांकडें आणून, तीं विकून देहाचें धारण करूं लागले. ज्या दिवशीं जें प्राप्त होईल तेवढें अन्न भक्षण करून ते आपलें पोषण करूं लागले. ते ज्या वनांत काष्ठें आणण्यासाठीं जात होते त्याच वनामध्यें सर्व गुप्त व प्रकट रत्नें, काष्ठें, व सुवर्णादि विपुल होतीं. याप्रमाणें भार वहाणाऱ्या त्यांच्यापैकीं कित्येक भाग्यवानांना त्या वनांत सोनें व रत्नें मिळत असत. कित्येकांना चंदनाचीं लांकडें मिळत. कित्येकांना केतकी, चंपक इत्यादि पुष्पें मिळत. फार दिवसांपासून घडलेल्या अभ्यासानें ज्यांची कीरकवृत्ति दृढ झाली आहे असे कित्येक फळें विकून त्यांवर उपजीविका करीत. कित्येक दुर्बुद्धि पुरुष दुसरें काहींच न मिळाल्यामुळें काष्ठें गोळा करून व तीं विकून त्यांवर आपले प्राण वांचवीत. याप्रमाणें वनपत्तीवर उपजीविका करणारे ते सर्व लांकडें आणण्यास तयार झाले; पण त्या महावनांत गेल्यावर त्यांतील कित्येकांस रत्नादिकांचा लाभ होऊन ते दारिद्र्यांतून मुक्त झाले व सुखानें राहिले. याप्रमाणें सतत ते महावनांचें सेवन करीत होते. तों एका प्रदेशांतून त्यांना चिंतामणि या नावांचें एक महारत्न सांपडलें. त्या चिंतामणीपासून त्यांना समग्र वैभवश्री प्राप्त झाली. त्यांना परम सुख झालें व त्यांत ते मोठ्या आनंदानें राहिले. याप्रमाणें प्रथम लांकडें गोळा करावयास तयार झालेल्या त्यांना सर्व प्रकारचें वैभव देणारा मणि सांपडला व स्वर्गीतील श्रेष्ठ देवांप्रमाणें शीतोष्णादि-द्वंद्वरहित होऊन ते

आतां सुखानें रहात आहेत. काष्ठादिकांविषयींच्या उद्यमानेंच ज्यांना चिंतामणि प्राप्त झाला आहे असे ते सर्व प्रकारच्या उत्तम धनानें संपन्न होऊन भय, शोक, विषाद व दुःख यांनी रहित होऊन सुखानें राहूं लागले. ते इतर लाभालाभादिकांमध्यें समदृष्टि ठेवीत होते. १९६.

---

## सर्ग १९७ वा.

—:०:—

१ वरील वैवधिकाख्यानाचें स्पष्ट तात्पर्य, व २ गुरु, शास्त्र इत्यादिकांना आत्मज्ञानाचें कारणत्व, यांचें वर्णन.

श्रीरामः—हे मुनिश्रेष्ठ ! या वैवधिकांच्या आख्यानाचें तात्पर्य मला स्पष्ट कळेल असें त्याचें विवेचन करा.

श्रीवसिष्ठः—ते जे वैवधिक ह्मणून सांगितले, तेच या भूलोकांतील मानव होत. त्यांचें जें दारिद्र्यदुःख तेंच अज्ञान असून त्यामुळें त्यांना फार ताप होत असे. तें जें महावन म्हणून सांगितलें तेच गुरुशास्त्रादि होत. अन्नासाठीं ते उद्यत झाले म्हणून जें म्हटलें, तें ते भोगांची इच्छा करणारेच लोक होत. माझे भोगसमूह सिद्ध होवोत असें म्हणून अत्यंत कृपण झालेला मानव इतर शास्त्रार्थाकडे दुर्लक्ष करून भोगोपायभूत शास्त्रामध्येंच प्रवृत्त होतो. तो भोगांसाठीं जरी प्रवृत्त झालेला असला तरी अभ्यासानें हळुहळू चिंतिलेल्या आद्यपदालाच प्राप्त होतो. तो जरी आपल्या भोगेच्छेच्या अधीन असला, तरी शास्त्रोक्त उपायानुष्ठानानें इष्ट फल मिळालें असतां त्याचा शास्त्रावर विश्वास बसतो. नंतर तो उत्तरोत्तर उक्त साधनांचा अभ्यास करून शेवटीं परमपदाला प्राप्त होतो. ज्याप्रमाणें काष्ठ आणण्यासाठीं तयार झालेला भाग्यवान् चिंतामणीला प्राप्त झाला, त्याप्रमाणें विषयोपभोगासाठीं शास्त्रोक्त उपायांनें ग्रहण करणारा पुरुष शेवटीं परमपदाला प्राप्त होतो. शास्त्र आणि विचार यांनीं काय होणार असें ह्मणून संदिग्धमनानें कोणीं शास्त्रार्थांत प्रवृत्त होतो; पण शेवटीं त्यालाहि उत्तम फल प्राप्त होतें. ज्यानें उत्तम तत्त्वार्थ पाहिलेला नाहीं, असा मनुष्यहि संदेहानें विषयभोगासाठीं शास्त्रांत प्रवृत्त होतो व त्यालाहि त्या पदाची प्राप्ति होते. आपापल्या वासनानुसार शास्त्रफलाची विपरीत कल्पना करणारे जन त्या शास्त्रांत प्रवृत्त होतात, पण शेवटीं वाङ्मनसागोचर, निर्विषय, निरतिशय सुखास प्राप्त होतात. याविषयीं वैवधिकांच्या आख्यानांतील त्यांना मिळालेल्या रत्नांचा दृष्टांत आहे. जो कोणी स्वभावतःच परोपकारामध्यें प्रवृत्त होतो त्याला साधु असें म्हटलें आहे. त्याचें आचरणच सर्व लोकांना प्रमाण आहे. अतत्त्वज्ञ लोक शास्त्रफलाविषयीं संदिग्ध जरी असले तरी त्यांत सांगितलेल्या उत्तम आचारामुळें निदान भोगप्राप्ति तरी होईल या भावनेनें शास्त्रार्थांत प्रवृत्त होतात; आणि भोगासाठीं प्रवृत्त झालेलेहि ते भोग व मोक्ष यांस प्राप्त होतात. काष्ठाच्या इच्छेनें वनांत गेलेल्याला चिंतामणि जसा प्राप्त झाला, त्याचप्रमाणें त्याला भोग व मोक्षहि मिळतो. ज्याप्रमाणें वनांतून कोणाला चंदनाचीं काष्ठें मिळतात, कोणाला चिंतामणि रत्न मिळतें, तर कोणाला सामान्य रत्नें मिळतात; त्याप्रमाणेंच शास्त्रापासून कोणाला काम, कोणाला अर्थ व कोणाला धर्म, कोणाला काम, अर्थ व पूर्ण मोक्षहि प्राप्त होतो. हे राघवा ! शास्त्रादिकांमध्यें धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गाचा मुख्य वृत्तीनेंच उपदेश आहे. पण ब्रह्मप्राप्ति अवाच्य असल्यामुळें ती ब्रह्मपर शास्त्रांमध्येंहि मुख्य वृत्तीनें सांगितलेली नाहीं. वसंतादि लक्ष्मी त्या त्या ऋतूंतील

फलपुष्पादिकांनींच जशी सूचित होते, त्याप्रमाणें शास्त्रांतील सर्व वाक्यार्थांनीं ब्रह्मबोध केवल ध्वनित केलेला दिसतो. पण तो साक्षात् स्वानुभवानेंच जाणावयाचा असतो. याप्रमाणें शास्त्राला मुख्य वृत्तीनें ब्रह्मबोध करण्याचें सामर्थ्य जरी नसलें तरी लक्षणादि उपायांनीं बोध करण्याचें सामर्थ्य आहेच. त्यामुळें अधिकाऱ्याला ब्रह्मबोधन होतेंच. स्त्रीमध्यें रत्न, आरसा, चंद्र इत्यादिकांतील सौंदर्याचें अतिक्रमण केलेलें लावण्य जसें असतें, त्याप्रमाणें सर्व दृश्यवर्ग व धर्मादि त्रिवर्ग यांहून अतिशय उत्कर्ष पावलेलें ब्रह्मवेदन शास्त्रांत आहे. हा सर्वपदातीत असलेला श्रेष्ठ बोध शास्त्रापासून प्राप्त होत नाहीं, गुरूपासून प्राप्त होत नाहीं, दानापासून प्राप्त होत नाहीं व ईश्वरपूजनानेंहि प्राप्त होत नाहीं. तथापि हे राघवा ! हीं सर्व केवल परमात्म्यांतील विश्रांतीचीं कारणें नसतांनाहि तीं कारणत्वास कशीं प्राप्त झालीं आहेत तें मी तुला सांगतों, ऐक. शास्त्रोक्त उपायांचा अभ्यास केल्यानें अतिशय शुद्ध झालेलें चित्त त्यांची इच्छा नसतांनाहि सत्वर पावन पदाला पहातें. तें जसें जसें शुद्ध होऊं लागतें तसें तसें भोगेच्छारहित होऊन प्रत्यहीं अंतर्मुख होत जातें व शेवटीं आत्मपरायण होतें. या शास्त्रामुळें अविद्येचा सात्त्विक भाग उत्कर्ष पावतो आणि या सात्त्विक भागाच्या उत्कर्षामुळें तिचा तामस भाग क्षीण होतो. या शास्त्ररूपी प्रधान जलानें नित्य मलाचें क्षालन करणारा मनुष्य अचिंत्य शास्त्रप्रभावामुळें परमशुद्धीला प्राप्त होतो. ज्याप्रमाणें सूर्य व समुद्र हे एकमेकांच्या समोर आले तर त्यांतील कोणाचीहि जरी इच्छा नसली तरी पूर्वी त्यांत पाहिलेलेंच प्रतिबिंब स्वच्छ प्रकाशस्वभावामुळेंच प्रवृत्त होतें, त्याच न्यायानें मुमुक्षु व शास्त्र यांचा परस्पर संबंध झाल्यामुळेंच अनुभवसिद्ध सर्व संवित्पदांतील आत्मज्ञान प्रवृत्त होतें. सूर्य व समुद्र यांना पाहिल्यामुळें ते अत्यंत विलक्षण आहेत, असा बोध होतो. त्याचप्रमाणें शास्त्रोक्त विवेकापासूनहि देहामध्यें सर्व उपाधिशून्य अद्वितीय आत्मतत्त्वाचें ज्ञान स्वभावतःच होतें. ज्याप्रमाणें एखादा बालक दोन हातांत मातीचीं ढेकळें घेऊन तीं पाण्यामध्यें एकावर एक घांशीत बसला असतां कांहीं वेळानें तीं क्षय पावतात व हातहि अतिशय स्वच्छ होतात, त्याप्रमाणें ज्ञानी मनुष्य शास्त्रविकल्पौघांनीं विकल्पांचें पुनः पुनः आत्मतत्त्वपरीक्षणानें क्षालन करीत राहिला असतां आत्मविचारानें परम शुद्धीला प्राप्त होतो. महावाक्यार्थाचा जणुंकाय सारभूत रसच असें आत्मज्ञान प्राप्त होतें. शास्त्रापासून प्राप्त होणारा हा रस उंसाच्या रसाहून अतिशय मधुर आहे, असें स्वानुभवानें सिद्ध होतें. ज्याप्रमाणें आकाशभर पसरलेलाहि प्रकाश भिंतीवर आसक्त झाल्यामुळें अभिव्यक्त होतो, म्ह० भिंत व प्रकाश यांच्या संबंधानें प्रकाशाचा स्पष्ट अनुभव येतो, त्याप्रमाणें नित्य स्वप्रकाशरूप असलेलेंहि आत्मज्ञान श्रवण व त्याचा अधिकारी यांच्या संमेलनानें स्पष्ट अनुभवास येतें. जें धर्म, अर्थ व काम यांच्या सिद्धीसाठींच असून मोक्षासाठीं जें श्रुत नसतें, तें बहुश्रुत तत्त्ववेत्त्यांच्या तत्त्वोपायचर्चेमध्यें जरी श्रुत असलें तरी तें तुच्छ अज्ञानच होय. जें आत्मज्ञानाला कारण होतें, तेंच श्रवण होय. जिच्यामुळें समता प्राप्त होते तीच ज्ञप्ति होय. जागृतीमध्यें सौषुप्त स्थितीचा अनुभव येणें हेंच साम्य होय. याप्रमाणें हें सर्व शास्त्रांपासूनच प्राप्त होतें. यास्तव सर्वप्रयत्नानें शास्त्रादिकांचा अभ्यास करावा. हे रामा ! ब्रम्हलोकापर्यंत जीं सुखें आहेत त्या सर्वांहून अतिशय पावन, सर्वेश्वर, मोक्षसंज्ञक

अनादि सुख गुरूच्या शास्त्रार्थबोधरूप वाणीनेंच प्राप्त होतें व तो शास्त्रार्थबोध सत्समागम, नियम व शम यांच्या योगानें प्राप्त होतो. १९७

---

## सर्ग १९८ वा.

—:०:—

१ सर्वत्र समदर्शन हेंच ज्ञानी पुरुषांच्या निर्विक्षेप सुखस्थितीचें कारण आहे, असें वर्णन.

श्रीवसिष्ठः—हे रामा ! बोध दृढ होण्यासाठीं पुनः मी सांगतों तें ऐक. कारण पुनः पुनः सांगितलेली गोष्ट अज्ञ पुरुषामध्यें स्थिर होते. राघवा ! मीं तुला प्रथम स्थितिप्रकरण सांगितलें. त्यामुळें हें जगत् असें भ्रांतिमात्र उत्पन्न झालें आहे, असें कळतें. त्यानंतर समदर्शनप्रतिष्ठेनें उपशम प्रकरणांत समदर्शन वर्णिलें आहे. तेंच येथें जीवन्मुक्तिसुख स्थिर होण्याकरितां पुनः वर्णिलें आहे. जगांत उत्पन्न झालेल्या अत्यंत उपशमशाली पुरुषानें कसें वागावें तें मीं उपशमयुक्तींनीं उपशम प्रकरणांत सांगितलें. त्या उक्त उपशमक्रमांनीं परमोपशमास प्राप्त होऊन निर्वाणसुखामध्यें रहावें, असें येथें सांगितलें. आतां ज्याला प्राप्य वस्तु प्राप्त झाली आहे अशा तज्ज्ञानें संसारदृष्टीमध्यें कसें रहावें तें आम्हांस थोडेंसें सांगावयाचें आहे व तेंच तुलाहि अवश्य ऐकण्यासारखें आहे. या जगामध्यें जन्म घेऊन तुझ्याप्रमाणें बाल्यावस्थेंतच जगत्स्थितीला यथार्थपणें जाणून येथें निर्विक्षेपपणें रहावें. सर्वांविषयींचें प्रेम उत्पन्न करणाऱ्या व सर्वांच्या मनांत विश्वास उत्पन्न करणाऱ्या समतेचा पूर्णपणें आश्रय करून या जगांत विहार करावा. सर्व भूतांमध्यें एक आत्मा आहे, असें पाहून आपल्याप्रमाणेंच दुसऱ्यांनाहि सुख इष्ट व दुःख अनिष्ट आहे हें जाणून जगांत प्राप्त व्यवहार करावा. या समतारूप तुलनेचें सर्वभूतमैत्रीरूप पावन फल प्राप्त होतें. तें सर्वसंपत्तींनीं सुंदर असून सर्व प्रकारचें सौभाग्य वाढविणारें आहे. समतेनें सर्व भूतांना हितावह होईल, अशीच हालचाल करणाऱ्या पुरुषाच्या भृत्यतेला ही सर्व जगल्लक्ष्मी प्राप्त होते. रामा ! समत्वामुळें जें अविनाशी सारभूत सुख प्राप्त होतें, तें राज्य किंवा स्त्रीजनसमागम यांपासून प्राप्त होत नाहीं. हे रामा ! हें समत्व द्वंद्वोपशमाची पराकाष्ठा आहे. तें संरंभ व संताप यांचा नाश करणारें आहे. सर्व दुःखरूपी उष्णतेला घालविणारा तो मेघ आहे, असें तूं जाण. ज्याचे सर्व शत्रु मित्र झाले आहेत व जो यथाभूत पदार्थ पहात आहे असा साम्यरूपी अमृतानें भरलेला जन या जगांत दुर्लभ आहे. जनकादिक सर्व जीवन्मुक्त प्रबुद्ध झालेल्या स्वचित्तचंद्राचा जणुंकाय रसच व अमृताहून मधुर अशा साम्याचा स्वाद घेऊनच जिवंत रहातात. साम्याचा अभ्यास करणाऱ्या मनुष्याचा दोषहि गुणासारखा होतो, दुःखहि सुखासारखें भासतें व मरणहि नित्य जीवित होतें. साम्यरूपी सौंदर्यानें युक्त असलेल्या महात्म्याला व्यसनितेप्रमाणेंच मुदितादिक स्त्रिया नित्य आलिंगन देतात. कल्याणगुण व सर्वसंपत्ति यांच्या योगानें उत्तम उदयास प्राप्त झालेल्या, सम व नित्य चिंतारहित पुरुषाला प्राप्त होत नाहींत अशा कोणत्याच ऋद्धि ह० संपत्ति नाहींत. स्वकार्यामध्यें व परकार्यामध्यें सम असलेल्या, प्रकृत व्यवहार करणाऱ्या, अपराध्यांना क्षमा करणाऱ्या व चिंतामणीप्रमाणें उदार असलेल्या पुरुषाला सर्व मनुष्य व देव नित्य इच्छितात. रामा ! सदाचारी, सर्व जनांचें हित करणाऱ्या, अतिशय आनंदित व समचित्त पुरुषाला अग्नि जाळीत नाहीं व जल क्लेददुःख देत नाहीं. जें जसें करणें उचित आहे

तें तसेंच त्याच्याकडून केलें जातें. जो हर्ष व अमर्ष यांनीं रहित आहे त्याच्याशीं त्याची तुलना करण्यास कोण समर्थ आहे! सम्यक् आचरण करणाऱ्या तत्त्वज्ञावर मित्र, बंधु, रिपु, राजे, व्यवहारी व इतर महा बुद्धिमान् जन विश्वास ठेवतात. समदर्शी तत्त्वज्ञ अनिष्टापासून पळून जात नाहींत व इष्ट झालें असतां संतोष पावत नाहींत. तर आपला जो प्रकृत क्रम आहे त्याप्रमाणेंच आचरण करीत राहतात. हे रामा, ते अनिंदित असलेल्या सर्व गृहक्षेत्रादि उपादेय पदार्थांस टाकून निर्लोभ संतोषरूप उत्तम वृत्ति धारण करून सर्व दुःखरहित समतेमध्यें राहतात. या विचित्र जगज्जालाला ते हंसतात. ते स्वतः निरामय असून विवेकोपदेशानें इतरांना उज्जीवित करतात. ज्यांचें अंतःकरण समता व मुदिता यांनीं युक्त असतें ते सर्व देवांकडूनहि पूजिले जातात. तो समचित्त पुरुष दुसऱ्याच्या हितासाठीं आपल्या मुखचंद्रावर प्रकृतक्रमप्राप्त कोप जरी धारण करीत असला तरी तो अमृताप्रमाणेंच होतो. समदृष्टि पुरुष जें करतो, जें खातो, ज्याचें आक्रमण करतो व ज्याची स्तुति करतो त्याचेंच सर्व जन अनुकरण करतात. समदृष्टि पुरुषानें केलेलें जें शुभ किंवा अशुभ, फार दिवसांनीं केलेलें किंवा आज केलेलें कर्म, त्याचें लोक सुद्धां अभिनंदनच करतात. समदृष्टि पुरुष भयंकर, एकसारखीं व मोठमोठीं सुखदुःखें जरी येऊन कोसळलीं तरी यत्किंचित्‌हि विरस होत नाहींत. या समदृष्टीमुळेंच शिबिराजा संतुष्टचित्तानें कपोताला आपलें अंग कापून मांस देता झाला. ज्याचें चित्त सम आहे असा अंगराजा आपल्यासमोर आपले शत्रु प्राणाहून प्रिय असलेल्या आपल्या भार्येला दुःख देत आहेत असें पाहूनहि मोहित झाला नाहीं. त्रिगर्तेशानें समबुद्धीनें शेंकडों मनोरथांनीं प्राप्त झालेल्या पुत्राला आपल्या पणामध्यें—वाग्युद्धांत राक्षसानें जिंकलें असतां त्याच्या स्वाधीन केलें. सर्व राजांमध्यें श्रेष्ठ असा जो जनकराजा तो आपली नगरी जळत असतांना व ती उत्सवामध्यें भूषित झाली असतां एकसारख्या वृत्तीनें राहिला. समदर्शन शाल्वराजा न्यायानें इच्छित दक्षिणारूपानें ब्राह्मणास दिलेलें आपलें शिर आपल्या हातानें कमलदलाप्रमाणें कापता झाला. सौवीरराजानें समबुद्धीनें कुंदपुष्पांच्या ढिगाप्रमाणें व कैलास पर्वताप्रमाणें भासणाऱ्या ऐरावताला, इंद्राला जिंकून, जरी संपादन केलें होतें, तरी पुनः यज्ञांत ऋत्विजांच्या सांगण्यावरून इंद्राला परत दिलें. आपल्या देहयात्रेला कारण होणारा व्यवहार समबुद्धीनेंच करणारा 'कुंडप' नांवाचा मातंग एक गाय वेतन रूपानें घ्यावयाची ठरवून ब्राह्मणाच्या चिखलांत रुतलेल्या पांच गायी वर काढता झाला आणि आपली वेतन केलेली गायहि पुष्कर क्षेत्रीं समबुद्धीनें त्या ब्राम्हणाला देऊन तत्काल प्राप्त झालेल्या विमानांत बसला व देवत्वास प्राप्त झाला. कदंबवनराक्षस साम्याचा अतिशय अभ्यास करून सर्व भूतांचा क्षय करणारी राक्षसी वृत्ति सोडता झाला. बालचंद्राप्रमाणें सुकुमार असलेलाहि जडभरत समबुद्धित्वामुळें न्यायानें भिक्षापात्रांत प्राप्त झालेल्या अन्नाला एखाद्या लाडवाप्रमाणें भक्षण करता झाला. धर्मव्याध क्रूरव्यवहारपरायण असूनहि समबुद्धीच्या बलानें शरीर सोडून परमपदास प्राप्त झाला. नंदनवनांत असलेलाहि कपर्दन नांवाचा राजा खरोखर आपल्यावर सानुराग असलेल्या अप्सरांवरहि आसक्त झाला नाहीं. तोच आपल्या राज्याचा त्याग करून समचित्तत्वामुळें विंध्यारण्यांतील दलदलीच्या प्रदेशांत कांटेच्या झुडपांतहि दीर्घकाळ निश्चल राहिला.

जे ऋषि, मुनि व देवांना पूज्य झालेले सिद्ध ते तपाचे क्लेश व भोग यांमध्यें समदृष्टि ठेवल्यामुळें उद्विग्न झाले नाहींत. राजे व दुसरे धर्मव्याधादि प्राकृत लोक या समदृष्टिबलाच्या अभ्यासानेंच श्रेष्ठांच्या पूज्यत्वास प्राप्त झाले आहेत. सुबुद्धिमान् लोक या लोकीं व परलोकीं सिद्धि प्राप्त होण्यासाठीं व पुरुषार्थप्रवृत्तीसाठीं सतत समदृष्टीनें रहातात. यास्तव मरणाची इच्छा करूं नये व जीविताची इच्छा करूं नये. यथाप्राप्त व्यवहार करीत कोणाचीहि हिंसा न करतां या जगांत समत्वामुळें ज्याला गुण व दोष एकरूप झाले आहेत, सुख व दुःख सम झालें आहे, उत्कृष्ट व निकृष्ट जातींचे प्राणी समान वाटतात व मान व अवमान तुल्य भासतात, तो जीवन्मुक्त प्रवृत्त व्यवहारामध्येंहि आसक्ति ठेवीत नाहीं. तो पवित्रमूर्ति विलसनशील होऊन लोकानुग्रहासाठीं देशांतून संचार करतो. १९८.

---

## सर्ग १९९ वा.

१ मुक्तांना कर्में केल्यापासून किंवा सोडल्यापासून जरी लाभ व हानि नाहीं, तरी ते सत्कर्मांचेंच अनुष्ठान करितात.

**श्रीरामः**—हे मुने! नित्यज्ञानैकनिष्ठ झाल्यामुळें व आत्माराम झाल्यामुळें मुक्त पुरुष कर्मत्याग कां करीत नाहींत?

**श्रीवासिष्ठः**—ज्याची त्याज्य व ग्राह्य ही बुद्धि क्षीण झाली आहे, त्याच्या क्रियात्यागाचा तरी काय उपयोग? व क्रियेचा आश्रय केल्यानें तरी त्याची काय हानि आहे? ज्ञानी पुरुषाला उद्वेग उत्पन्न करील असें या जगांत कांहीं नाहीं. त्यामुळें त्याला येथें त्याज्यहि कांहीं नाहीं; तसेंच अवश्य अनुष्ठान करण्यासारखेंहि त्याला कांहीं नाहीं. त्यामुळें ग्राह्य असेंहि त्याला कांहीं उरत नाहीं. ज्ञानी पुरुषाला कर्मत्यागानेंहि कांहीं फळ प्राप्त होत नाहीं व कर्माचा आश्रय केल्यानेंहि कांहीं फल नाहीं. जें जें वर्णाश्रमोचितत्वानें त्याला प्राप्त होईल तें तें तो तसेंच करितो. रामा! हें शरीर आयुष्य असेपर्यंत निश्चयानें हालचाल करणारच! यास्तव ज्याचा उत्तम अभ्यास केला आहे अशा प्राप्त सदाचाररूपानेंच त्याची हालचाल होवो. इतर प्रकारानें काय करावयाचें आहे! आपला प्राप्त क्रम सोडून अप्राप्त क्रम जर अवश्य स्वीकारावाच लागत असेल तर क्रियास्पंद दोन्ही अवस्थांमध्यें एकसारखाच प्राप्त आहे. मग आपला सत्क्रमच पुढें चालविण्यास कोणता दोष आहे? सम, स्वच्छ व निर्विकार बुद्धीनें जें जसें सतत आचरण केलें जातें तें सर्वदा निर्दोषच होय. रामा! या पृथ्वीवर पुष्कळ लोक निरनिराळ्या दृष्टींचे आहेत. शहाणे लोक सुद्धां बहु प्रकारें अनेक दोषांमध्यें विहार करतात. आसक्तिरहित बुद्धीनें प्राप्त स्थितीमध्यें ते विहार करीत रहातात. कांहीं जीवन्मुक्त या भूलोकीं गृहस्थाश्रमाचा आश्रय करून रहातात. तुझ्यासारखे कांहीं वीतराग तज्ज्ञ राजपुत्र अनासक्त बुद्धीनें व विक्षेपशून्य चित्तानें राज्य करतात. कित्येक प्रकृत वेदार्थव्यवहाराचें अनुवर्तन करणारे यज्ञ करून अवशिष्ट राहिलेलें अमृतसंज्ञक अन्न खातात व नित्य अग्निहोत्रामध्यें स्थित असतात. कित्येक चार वर्णांमध्यें ध्यान, देवपूजन इत्यादि स्वक्रिया करीत राहतात. ते आपापल्या वर्णाश्रमाप्रमाणें निरनिराळें आचरण करतात. कित्येक महाशय मनामध्यें सर्वपरित्याग करून तज्ज्ञ असूनहि बाहेर अज्ञाप्रमाणें सर्व कर्मामध्यें तत्पर होऊन राहतात. जेथें स्वप्नांतहि एखादा मनुष्य दिसत नाहीं, अतिमुग्ध हरणें मात्र

संचार करीत असतात, अशा शून्य वनभूमींमध्यें कित्येक ध्यानपरायण होऊन राहतात. पुण्यवानांनीं ज्याचें सदा सेवन केलें आहे व पुण्याचा जेथें मोठा संचय होतो, अशा समशाली सदाचरणानें युक्त असलेल्या पुण्यतीर्थे, मुनि-आश्रम अशा ठिकाणीं कित्येक राहतात. कित्येक समचित्त पुरुष रागद्वेषाचा परिहार करण्यासाठीं आपला देश सोडून दुसऱ्या देशांतील एखाद्या स्थानाचा आश्रय करून राहतात. कित्येक ज्ञानी संसाराचा उच्छेद करण्यासाठीं एका वनांतून दुसऱ्या वनांत, नगरांतून ग्रामांत, एका स्थानांतून दुसऱ्या स्थानांत व एका पर्वतावरून दुसऱ्या पर्वतावर भ्रमण करीत राहतात. श्रेष्ठ पुरी जी वाराणशी तिच्यामध्यें, पावन प्रयागांत, श्रीपर्वतावर, सिद्धपुरामध्यें, त्याचप्रमाणें बदरी-आश्रमांत, अतिपुण्यवान् शालग्रामांत, कलापग्रामांत, पवित्र मथुरेमध्यें, कालंजर पर्वतावर, महेंद्र पर्वतावरील वनगुल्मांत, गंधमादनाच्या शिखरावर, दर्दुर पर्वताच्या कड्यावर, सह्याद्रीच्या पठारावर, विंध्यपर्वताच्या कड्यांवर, मलयपर्वताच्या मध्यभागीं, कैलासपर्वताजवळील वनांत, ऋक्षवान् पर्वताच्या दऱ्यांत व या अशाच दुसऱ्याहि वनांमध्यें व स्थानांमध्यें पुष्कळ लोक तपश्चर्या करीत रहातात. अनेकांच्या अनेक दृष्टि असतात. आपापल्या प्रारब्धभोगानुसार त्यांच्या त्या दृष्टि बनलेल्या असतात. कित्येकांनीं संन्यासविधीनें आपला आचार सोडलेला असतो. कित्येक ब्रम्हचर्यादि आश्रमधर्मामध्यें तत्पर असतात. कित्येक ज्ञानी नित्य उन्मत्ताप्रमाणें आचरण करितात. कित्येक स्वदेशरहित होऊन राहतात. कित्येकांनीं आपलें स्थानमात्र सोडलेलें असतें. कित्येक आपल्या गृहांतच आसक्त असतात व कित्येक भ्रमण करीत रहातात. या महात्म्यांतील कित्येक देव अंतरिक्षामध्यें वास करितात व दैत्यादिक पातालामध्यें निमग्न असतात. त्यांनीं या लोकांचें परिवर्तन उत्तम प्रकारें जाणलेलें असतें. ते सम्यग्दर्शनानें निर्मळ झालेले असतात. कित्येकांच्या बुद्धि जागृत झालेल्या असतात. त्यांनीं दृश्याचा आदि-अंत पाहिलेला असतो. कित्येकांच्या बुद्धि चांगल्या प्रबुद्ध झालेल्या नसतात. त्यामुळे त्यांचीं चित्तें संशयग्रस्त होतात. कित्येक पापाचरणापासून निवृत्त झालेले असतात. कित्येक सुजनांचें अनुवर्तन करीत असतात. कित्येकांच्या मति अर्धप्रबुद्ध झालेल्या असून ज्ञानाभिमानानें ते सदाचार सोडतात व उभयतः भ्रष्ट होतात. रामा! याप्रमाणें या जनसमूहामध्यें जन्मरूपी सागरांतून तरून जाण्याची इच्छा करणारे पुष्कळ जीव प्रारब्धानुसार अनेक दृष्टि धारण करून बहुतप्रकारें रहातात. पण बाबारे! संसाराचें उल्लंघन करण्यास केवळ वनवासित्वच उपयोगी नाहीं. स्वदेशामध्यें रहाणें याचाहि कांहीं उपयोग नाहीं. कष्टकर तपश्चर्या हेंहि त्याचें साधन नाहीं. क्रियेचा केवल संन्यास केल्यानें मोक्ष मिळत नाहीं. किंवा क्रियेचा आश्रय केल्यानेंहि बंध निवृत्त होत नाहीं. सत्कर्माचरणामध्यें विचित्र फलसमूह निष्पन्न होतील, असें केल्यानेंहि संसाराचें उल्लंघन होत नाहीं. तत्त्वज्ञानरूप स्वभाव हाच संसारसागरांतून तरून जाण्याचा उपाय आहे. ज्याचें मन अत्यंत आसक्तिरहित असतें. तोच भवसागरांतून तरून जातो. असंसक्तचित्त मुनि सतत शुभाशुभ क्रिया करीत असला किंवा त्यांचा परिहार करीत असला, तरी तो पुनः संसारास प्राप्त होत नाहीं. पण जो दुर्मति आपलें मन विषयांत आसक्त ठेवतो तो शुभ कर्माचें आचरण व अशुभ कर्माचा त्याग जरी करीत असला किंवा शुभाशुभ क्रिया मुळींच करीत नसला तरीहि

तो आत्मवंचक पुनः संसारांत निमग्न होतोच. असें जर आहे तर मनाचेंच विषयापासून निवारण करावें किंवा त्याला मारावें. ( तत्त्वज्ञानाचें काय कारण आहे, या शंकेचें समाधान करतात--) ज्याप्रमाणें मधाच्या भांड्यावर लोलुप झालेल्या माशांचें निवारण करतां येणें शक्य नसतें, त्याचप्रमाणें जिनें विषयरसाचा आस्वाद घेतला आहे अशा सुखदुःख देणाऱ्या मतीचें निवारण करणें किंवा तिला मारणें शक्य नाहीं. एखादे वेळीं भाग्यवशात् साधनचतुष्टयसंपत्ति प्राप्त होऊन श्रवणादि उपायांनीं आत्मावलोकनामध्यें आपोआपच प्रवृत्ति होते. आत्मावलोकनामुळें तत्त्वप्राप्ति होऊन निर्मलतेस प्राप्त झालेलें चित्त निर्द्वंद्व, असंसक्त व अनामय होतें. अचित्तत्वास प्राप्त झालेल्या सत्त्वरूप चित्तानें सम होऊन चित्तादि सर्व प्रपंचाचा अधिष्ठानांश जो आत्मा त्याचें रूप धारण करून रहा. हे महात्मन् रघुतनय! ज्यानें परमार्थाला जाणलें आहे, रागादि दोषांना सोडलें आहे व ज्याचा आत्मा स्वरूपानें उदय पावला आहे असा समचित्त, निःशोक, महात्मा होऊन निःशंक रहा. कारण जन्ममरणरहित पावन ब्रम्हपद तूंच आहेस. विमलब्रम्हरूप जगामध्यें प्रकृतिरूप, मलरूप, विकाररूप, उपाधिरूप, तद्बोधरूप, इच्छा, प्रयत्न, हान, उपादान, भोग इत्यादिरूप कोठेंच कांहीं नाहीं. तर अकृत्रिम चिद्धाम ब्रम्हच आहे. तें स्वतः स्वानुभवानेंच 'अहं' असें मानून तूं एक, निःशंक होऊन रहा. हे भाग्यवाना! तुझ्या ज्ञानबोधनासाठीं याहून आणखी अधिक शुभ उपदेश नाहीं. कारण आद्य ज्ञानसार मीं तुला पूर्णपणें सांगितलें आहे आणि तूंहि आतां विदितवेद्य झाला आहेस. तुला सर्व ज्ञेय साक्षात् कळलें आहे.

श्रीवाल्मीकिः—मुनिनायक वसिष्ठ शेवटीं असें बोलून व राघव शुद्ध बुद्धीनें ब्रम्हपदाला प्राप्त झाला असतां व त्यामुळेंच सर्व एषणाशून्य झाला असतां आणि सर्व सभा ध्यानामध्यें तल्लीन झाल्याप्रमाणें राहिली असतां त्या सभेंत स्वतः ब्रम्हरसायनाचा आस्वाद घेण्यामध्यें तत्पर होऊन मुकाट्यानें बसला. जसा भ्रमर कमलपटलावर गुंजारव करून मकरंद पिण्यास प्रवृत्त झाला असतां मुकाट्यानें बसतो, तसाच मुनि वसिष्ठ मुकाट्यानें बसला. १९९.

---

## सर्ग २०० वा.

१. सिद्धांचा साधुवाद. २ दुंदुभिध्वनीसह पुष्पवृष्टि, व ३ गुरुपूजामहोत्सवाचा आरंभ यांचें वर्णन.

श्रीवाल्मीकिः—याप्रमाणें निर्वाणवाक्यांचा संदर्भ समाप्त झाला असतां, मुनिनायक वसिष्ठ क्रमप्राप्त शेवटच्या वाक्याची समाप्ति करीत मुकाट्यानें बसला असतां, निर्विकल्प समाधानामध्यें तो समत्वास प्राप्त झाला असतां, सर्व सभाजन शांत व स्वच्छ मनोवृत्तीनें युक्त होऊन राहिले असतां, निर्विकल्प समाधानक्रमानें श्रवणाच्या योगानें शोभणाऱ्या सर्व जनांचा प्रत्यगात्मा सन्मात्रत्वाच्या पराकाष्ठेस पोंचला असतां, त्यामुळेंच परमपावनत्वास प्राप्त झाला असतां, आकाशकोटरांत राहणाऱ्या व पूर्वींच मुक्तचित्त झालेल्या सनकादि सिद्धांचा आकाशव्यापी प्रशंसावाक्यानें, त्याचप्रमाणें सभेमध्यें स्थित असलेल्या विश्वामित्रप्रभृति आत्मज्ञ मुनींच्या प्रशंसावाणीनें मोठा कोलाहल झाला; त्यानें सर्व दिशा व्यापून टाकल्या. ज्यांच्या छिद्रांतून वायु शिरला आहे, अशा वेळूंच्या मधुर ध्वनीप्रमाणेंच तो ध्वनि सर्वांना आल्हाद देता झाला. त्या सिद्धांच्या साधुवादां-

बरोबरच एकाएकीं देवदुंदुभि वाजूं लागल्या. त्यांच्या प्रतिध्वनीनें सर्व पर्वत भरून गेले. देवदुंदुभींच्या ध्वनीबरोबरच चोहोंकडून तुषारवृष्टीसारखी सुंदर पुष्पवृष्टि झाली. तिनें सर्व दिशांना आच्छादित करून सोडलें. पुष्पौघानें ज्यानें सर्व सभास्थान भरून टाकलें आहे, ध्वनीनें ज्यानें पर्वतांच्या दऱ्या भरून टाकल्या आहेत, रजानें ज्यानें आकाशाला रंजित केलें आहे व सुगंधानें ज्यानें वायूला सुवासित केलें आहे, असा तो साधुवादशब्द, देवदुंदुभींचा ध्वनि व पुष्पवृष्टीचा घोष यांचा समवाय अतिशय शोभला. त्या समवायानें सर्व सभ्यांचे नेत्र अंतरिक्षाकडे लावले व त्यांच्या किरणजालानें सर्व भाग कृष्णवर्ण होऊन गेला. हरिण, हत्ती, घोडे, पक्षी व पशु आपले कान वर उभारून तो ध्वनि ऐकूं लागले. विस्मित व सभय झालेल्या बालकांनीं व स्त्रीजनांनीं आपले नेत्र वर करून त्याच्याकडे पाहिलें. विस्मयानें चकित झालेल्या राजसमूहानें त्याच्याकडे किंचित् हस्ययुक्त वदनानेंच पाहिलें. पुष्पांच्या संतत वृष्टीनें, शब्दांच्या अतिशय शोभेनें व त्यामुळें उत्पन्न झालेल्या संरंभानें भूमि व अंतरिक्ष यांमधील भाग अलौकिक चमत्कारास प्राप्त झाला. पुष्पवृष्टीनें व मकरंदानें क्षालन केलेलें, आणि शब्द करणाऱ्या प्राण्यांनीं पुण्यशब्दयुक्त केलेलें आकाश वाजविलेल्या शेंकडों शंखांच्या योगानें त्या राजगृहाच्या समत्वास प्राप्त झालें. देव व चारण यांच्या योगानें सर्व भुवन अनेक प्रकारच्या आवाजांनीं भासुर झालें व त्यामुळें तेंहि ज्यांत मोठा उत्सव चालला आहे असें होऊन पुष्पांनीं भूषित झालेल्या दशरथाच्या गृहाप्रमाणेंच शोभलें. ज्याप्रमाणें सागरांतील कल्लोल समुद्रतीरावर येतो, त्याप्रमाणें दुंदुभींचे शब्द, सिद्धांचीं वाक्यें व पुष्पांचा भर, हीं सर्व एकाच कालीं दिगंतीं गेलीं. तो देवांचा संरंभ एका क्षणांत शांत झाला असतां सिद्धांचीं हीं वाक्यें ऐकूं आलीं.

सिद्ध:—सिद्धसंघामध्यें कल्पाच्या आरंभापासून आजवर हजारों मोक्षोपाय आम्हीं व्याख्यानांच्या योगानें प्रकट केले व ते दुसऱ्यांनीं ऐकलेहि. पण ते अशा प्रकारचे नव्हते. या मुनीच्या वाक्यविलासानें पशु, पक्षी, स्त्रिया, बालक व सर्वेहि शांतीला प्राप्त होतात, यांत कांहीं संशय नाहीं. या मुनीनें दृष्टांत, हेतु, युक्ति यांच्या योगानें रामाला जसा बोध केला आहे, तसा साक्षात् अरुंधतीलाहि केला असेल कीं नाहीं, याचीहि शंका आहे. या मोक्षोपायांनीं तिर्यक् प्राणीहि निरुपद्रव होऊन मुक्त होतील. मग याचें श्रवण केल्यावर मनुष्य कां मुक्त होणार नाहींत? आपल्या श्रवणरूपी अंजलींनीं हें ज्ञानामृत प्राशन करून आम्ही श्रेष्ठ श्रीला प्राप्त झालों आहों. आमच्या सिद्धि आज पूर्णपणें नवीन झाल्या आहेत.

अयोध्यावासी जन अशा प्रकारचीं सिद्धवाक्यें ऐकत असतां त्या सभेला कमलादि पुष्पांच्या वृष्टीनें परिपूर्ण झालेली पहाते झाले. मंदारादि महापुष्पांच्या समूहांनीं तें सभास्थान आच्छादित होऊन गेलें. तेथें पुष्पांचे मोठमोठे ढीग जमले. पारिभद्र नावांच्या कल्पलतागुच्छांनीं त्या सभास्थानांतील अंगणभूमि अगदीं भरून गेली. पारिजातपुष्पांनीं सर्व भूतल आच्छादित होऊन विराजमान झालें. हरिचंदनाचीं पुष्पें राजांच्या मुकुटमणींच्या अग्रांवर अडकून राहिलीं. पाण्यानें भरलेले मेघ जसे खालीं लोंबकळतात, त्याप्रमाणें पुष्पभारामुळें त्या सभेचीं छतें लोंबकळूं लागलीं. अशा प्रकारच्या सभेला पहाणारा तो लोकसमूह निरनिराळ्या तत्कालोचित प्रशंसावाक्यानें उद्युक्त होऊन वसिष्ठमुनीची पूजा करूं लागला. सर्व इंद्रिय-

समूहांनीं तो समाज नम्र झाला. कुसुमांजलीसह त्यानें त्या ऋषीला प्रणाम केला. त्यानंतर त्या राजांच्या प्रणामांची परंपरा किंचित् शांत झाली असतां ज्यानें आपल्या हातांत अर्घ्यपात्र घेतलें आहे, असा राजा दशरथ असें बोलला.

दशरथः—हे अरुंधतीपते! . क्षय व अतिशय यांनीं रहित अशा परम आत्मवस्तूच्या बोधानें अंतःकरणामध्यें परिपूर्णता उत्पन्न झाली आहे. तुज पूज्य महात्म्याचें पूजन ज्यामुळें होईल अशी योग्य वस्तु या भूलोकीं नाहीं व स्वर्गलोकीं देवांमध्येंहि अशी वस्तु दिसत नाहीं. पातालांतहि अशी वस्तु आढळत नाहीं. तथापि हे ब्रह्मन्! मी माझें अवश्य कर्तव्य असें हें शास्त्रलोकप्रसिद्धिप्राप्त गुरुपूजन सफल करण्यासाठीं कांहीं थोडीशी प्रार्थना करतों, त्याबद्दल आपण माझ्यावर कोप करूं नये. मी आपल्या पत्नीसह हें शरीर, दोन्ही लोकीं अत्यंत शुभ असलेलें राज्य व सर्व भृत्य यांचें समर्पण करून आपलें पूजन करतों. हे प्रभो! हें सर्व तुमचें आहे. तुमच्या आश्रमाप्रमाणेंच हें तुमच्या अधीन आहे. आपली जशी इच्छा असेल त्याप्रमाणें आपण हें सर्व वाटेल त्या कार्यांत नियुक्त करा.

श्रीवसिष्ठः—आम्ही ब्राह्मण केवळ प्रणामानेंच संतुष्ट होणारे आहोंत. आम्ही नुसत्या प्रणामानेंच प्रसन्न होतों व तो प्रणाम तूं केलाच आहेस. राज्याचें रक्षण कसें करावें तें तूंच जाणतोस व तें तुलाच शोभतें; यास्तव तें तुझें तुलाच असूं दे. अरे बाबा ब्राह्मण कधीं राजे झाले आहेत का?[1]

दशरथः—मुने! आपण परमपुरुषार्थरूप मोक्ष देऊन जे अनंत उपकार केले आहेत त्यांपुढें या राज्याची काय किंमत आहे? यास्तव आम्हांला 'तें घ्या' असें म्हणण्याचीहि लाज वाटते. करितां आपल्याला जसें योग्य दिसेल तसें करा.

श्रीवाल्मीकिः—राजा दशरथ असें बोलत आहे तो राम पुष्पांजलि समर्पण करून व नम्र होऊन त्या महागुरूच्या पुढें असें वाक्य बोलला.

श्रीरामः—महाराजांना ज्यानें निरुत्तर केलें आहे अशा हे मुने! केवळ प्रणाम हीच एक ज्याच्यापाशीं सर्वोत्कृष्ट वस्तु आहे असा हा राम आपल्या चरणांवर मस्तक ठेवीत आहे.

असें बोलून त्यानें त्यांच्या दोन्ही पायांवर मस्तक ठेवलें. ज्याप्रमाणें वन पर्वताच्या पायथ्यावर पल्लवावर सांचलेलें दंव सोडतें, त्याप्रमाणें त्यानें त्यांच्या चरणावर वंदनपूर्वक पुष्पांजलि समर्पण केली. त्या वेळीं त्या नीतिकुशल दशरथपुत्राचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून आले. त्यानें त्या गुरूला परमभक्तीनें पुनः पुनः प्रणाम केला. त्यानंतर लक्ष्मण, शत्रुघ्न व त्यांच्यासारखे जे दुसरे त्यांच्याजवळ बसले होते त्या सर्वांनीं मुनीश्वराला तत्काल प्रणाम केला. दूर असलेल्या लोकांनीं दुरूनच प्रणाम केले व तेथूनच पुष्पांजलि समर्पण केली. राजे, राजपुत्र व मुनि त्याला प्रणाम करूं लागले. त्या प्रसंगीं तेथें बर्फाच्या योगानें हिमालयपर्वत जसा आच्छादित होतो त्याप्रमाणें तो मुनि पुष्पांजलिवृष्टींनीं आच्छादित झाला. याप्रमाणें झालेला तो सभाक्षोभ शांत झाला असतां, त्याच प्रणामांचा प्रकारहि थांबला असतां वसिष्ठांना एका गोष्टीची आठवण झाली. आपण मान्य मुनींच्या पुढें हा उपदेश केला आहे, पण त्याविषयीं कोणाला विषाद वाटेल; त्यांत कांहीं दोष आहेत, असाच कोणाला संशय येईल. म्हणून आपल्या चरित्रानेंच सर्व लोकांना

[1] ब्राह्मण म्हणविणारांनीं भगवान् वसिष्ठांचें हें वचन अवश्य लक्षांत ठेवावें.

विनय शिकविण्यासाठीं त्यानें आपल्या दोन्ही हातांनीं पुष्पांचा ढीग दूर केला व शुभ्र अभ्रांतून चंद्र जसा दिसावा त्याप्रमाणें त्यानें आपलें मुख सर्वांना दाखविलें. ( आपल्या या सत्य शास्त्राविषयींहि लोकांच्या मनांत संशय येईल, कोणाला तें सदोष वाटेल, कोणाला निर्दोष वाटेल. यास्तव या मान्य मुनींना कांहीं प्रश्न करणें अवश्य आहे, असें समजून तें करण्यासाठीं त्यानें फुलांनीं आच्छादित झालेलें आपलें मुख फुलें दूर करून प्रकट केलें असा याचा भावार्थ. ) सिद्धांचें वचन शांत झालें असतां, नगाऱ्यांचा घोष थांबला असतां, आकाशांतून होणारी पुष्पवृष्टि बंद झाली असतां व सभेंतील कोलाहल शांत झाला असतां रामादिकांनीं प्रणाम केल्यावर आपला पूजा करणारा सभाजन अव्यग्र होऊन आपल्या स्थानीं स्थिर स्थित झाला असतां, वारा थांबला म्हणजे मेघ जसा स्थिर होतो त्याप्रमाणें सर्व जनसमूह अव्यग्र झाला असतां, धन्यतावाद ऐकणारा अनिंद्यात्मा मुनिनायक वसिष्ठ विश्वामित्राला मृदुस्वरानें असें बोलला— ' हे गाधिकुलोत्पन्न मुने ! हे वामदेवा ! हे निमे ! हे क्रतो ! हे भरद्वाजा, हे पुलस्त्य, हे अत्रे, धृष्टे, नारदा, शांडिले, भासा, भृगो, भारंडा, वत्सा व वात्स्यायना ! त्याचप्रमाणें हे इतर मुनींनो ! तुम्ही सर्व अतिशय मान्य, पूज्य व तत्त्वज्ञ असूनहि हें माझें तुच्छ वचन ऐकलेंत ! यांत मीं जें कांहीं सांगितलें नसेल किंवा जें अर्थशून्य किंवा निरर्थक असेल तें मजवर अनुग्रह करून तुम्ही आतां सांगा.' ( भगवान् वसिष्ठांची ही विनयोक्ति लोकांना विनयाचें शिक्षण देण्यासाठीं व ग्रंथाची निर्दोषता प्रकट करण्याकरितां आहे. )

सभ्यः—( विश्वामित्रादि वर संबोधिलेले सर्व मुनि म्हणाले ) हे ब्रह्मन् ! केवल परमार्थैक्यशाली अशा वसिष्ठवचनांत दुरर्थादि असेल हीं आम्हीं आज नवीनच वाणी ऐकली. अग्नि जसा सुवर्णाला मलरहित करतो, त्याप्रमाणें आमच्या अनंत जन्मांतील दोषांमुळें आमच्या मनावर सांचलेला मल तूं आज काढून टाकलास. ब्रम्हामध्यें विस्तारलेल्या व परमामृतानें शीतल झालेल्या अशा तुझ्या या वाणीनें, हे विभो ! चंद्रदीप्तीनें कुमुदें जशीं विकसित होतात, त्याप्रमाणें आम्ही विकसित झालों आहों. सर्व प्राण्यांस महाबोध देणाऱ्या तुज मुनिनायकास —नित्य गुरूंस आम्ही सर्व प्रणाम करतों.

श्रीवाल्मीकिः—मुनिनाथ जो वसिष्ठ त्यास असें बोलून दीर्घ मेघरवाप्रमाणें एका शब्दानें 'पुनः तुला नमस्कार असो' असें ते म्हणाले. मेघ हिमालयपर्वताला हिमानें जसे आच्छादित करतात त्याप्रमाणें आकाशांतून सिद्धांनीं केलेल्या पुष्पवृष्टीबरोबरच त्या ऋषींनींहि पुष्पांजलीचा वर्षाव करून वसिष्ठमुनीस झांकून टाकलें. त्याचप्रमाणें राजा दशरथ व विष्णवतार राम यांची त्यांनीं पूजा केली. कारण राम चार अंशांनीं अवतीर्ण झालेला माधवच आहे हें ते सर्व जाणत होते.

सिद्धः—साक्षात् चतुरात्मा नारायणच अशा या भ्रात्यासह जीवन्मुक्त राजकुमार रामाला आम्ही नमस्कार करतों. ज्याच्या ठिकाणीं त्रिकालीं नष्ट न होणारीं राजचिन्हें आहेत अशा व चतुःसमुद्रवलयांकित पृथ्वीचें रक्षण करणाऱ्या राजा दशरथालाहि आम्ही वंदन करतों. कारण तो श्रीरामाचा जनक असल्यामुळें धन्य आहे. मुनिसेनेचा स्वामी, अत्यंत तेजस्वी, जणुंकाय सूर्यच असा वसिष्ठहि धन्य आहे. अति प्रसिद्ध तपोनिधि विश्वामित्रहि धन्य आहे. कारण या सर्वांच्याच प्रभावानें भ्रांति व क्षोभ यांचा नाश करणाऱ्या या श्रेष्ठ ज्ञानयुक्तीला आम्हीं सर्वांनीं श्रवण केलें.

श्रीवाल्मीकि:—असें बोलून सिद्धांनीं आकाशांतून सभेमध्यें पुन: पुष्पवृष्टि केली आणि संतुष्टचित्त होऊन ते मुकाट्यानें बसले. ज्याप्रमाणें आकाशांतील सिद्ध त्या लोकांची प्रशंसा करूं लागले त्याचप्रमाणें सभेंतील लोक पुष्कळ स्तुतींसह सिद्धांचें पूजन करते झाले. आकाशचर महर्षि, देवगण, भूचर ब्राम्हण व राजे, उभयचर मुनीश्वर याप्रमाणें आपापल्या सामर्थ्यानुसार सर्व लोकांचीं कुसुम-अर्ध्यासह उच्चवाणीनें पुजा करते झाले. २००.

---

## सर्ग २०१ वा.

१ गुरूनें आदरानें विचारलें असतां रामानें आपली पूर्णानंदपदीं विश्रांति प्रकट केली.

श्रीवाल्मीकि:—नंतर सभेंतील साधुवाद हळूहळू शांत झाला असतां, ज्ञानोपदेशास प्राप्त होऊन सर्व राजे जणुं काय उल्लसित झाले असतां, ज्यांचा संसारभ्रम शांत झाला आहे असे जन आपल्या अज्ञदशेंतील चरित्राला, सत्य तत्त्वाला साक्षात् पहाणाऱ्या चित्तानें हंसत असतां, सभेंतील लोक आपली चित्तवृत्ति आपल्या साक्षी आत्म्याकडे लावून चिदेकरस आनंदाचा साक्षात् अनुभव घेण्यास तत्पर झाले असतां, विवेकी सभाजन शांत चित्तानें जणुंकाय ध्यान करीत बसले असतां राम आपल्या भ्रात्यासह पद्मासन घालून हात जोडून, ज्ञानानें सुशोभित झालेल्या गुरुमुखा कडे पहात बसला असतां, राजा दशरथ जणुं-काय ध्यानच करीत असल्याप्रमाणें अंत:-करणांत आदि, मध्य व अंत या तिन्ही काळीं पावन जीवन्मुक्तिरूप स्थितीचा अनुभव घेत असतां, भक्तांच्या पूजेचें ग्रहण करण्यासाठीं एक क्षणभर मुकाट्यानें बसून मुनि वसिष्ठ स्पष्टपणें म्हणाला—'हे राजीवनयना, स्वकुलाकाशांतील चंद्रा रामा! आतां तुला आणखी काय ऐकण्याची इच्छा आहे? तुला जें अभिमत असेल तें स्वेच्छेनें सांग. तूं आतां ही कोणत्या प्रकारची स्थिति अनुभवीत आहेस? हा जगदाभास कोणत्या प्रकारचा पहात आहेस, तें मला सांग.'

त्या मुनीनें असा प्रश्न केला असतां गुरूच्या मुखाकडे अवलोकन करणारा तो राजकुमार स्पष्ट, मृदु व निर्भय असें वचन बोलला—

श्रीराम:—हे प्रभो! तुझ्या प्रसादानें मी परम निर्मलतेस प्राप्त झालों आहें. ज्याच्या-वरील सर्व मेघकलंक शांत झाला आहे असा पूर्णचंद्र हेंच ज्यांतील चिन्ह आहे त्या शरदृतूंतील नभस्तलाप्रमाणें माझें चित्त निर्मल झालें आहे. माझ्या संसाररूपी अनर्थांत पाडणाऱ्या सर्व भ्रांति शांत झाल्या आहेत. मी आपल्या शुद्ध स्वरूपानें स्वच्छ आकाशा-प्रमाणें स्थित आहें. माझ्या सर्व हृदयग्रंथि शांत झाल्या आहेत. माझे सर्व विषय निवृत्त झाले आहेत. माझी बुद्धि स्फटिकाच्या गृहांतील मध्यस्फटिकाप्रमाणें स्वच्छ होऊन राहिली आहे. विक्षेपशून्य झालेलें माझें मन आणखी कांहीं ऐकण्याची किंवा संपादन कर-ण्याची इच्छा करीत नाहीं, तर तें निजल्या-प्रमाणें परम दृष्टीला प्राप्त होऊन राहिलें आहे. त्यानें सर्व विषयस्मरण व विषयानुसंधान टाकलें आहे. त्याचे भोगांविषयींचे संकल्प पार नाहींसे झाले आहेत व त्याचें सर्व कौतुक मावळलें आहे. हे मुने! माझें मन अशा प्रकारें शांत झालें आहे. भगवन्! मी जागा असतांनाच या जगस्थितीविषयीं शांत झालों आहें. सर्व प्रकारें मी विक्षेपशून्य झालों आहें. मी या वेळीं मानसविषयालोचनरहित

व इंद्रियविषयालोचनरहित होऊन जणुंकाय स्वस्थ झोंप घेत आहें. वस्तुतः मला स्वप्नभानहि नाहींच. कारण ती अवस्थाहि मिथ्या आहे. अर्थात् मी तुर्यावस्थेंतच स्थित आहें. आशेनें विव्हल झालेल्या व देहालाच मी म्हणणाऱ्या माझ्या पूर्वीच्या आत्मस्थितीला अतिशय हंसून आपल्या उपदेशवाक्यांनी आंत स्वस्थ राहिलों आहें. माझ्या मनांत आतां मी कोणत्याहि प्रकारचा संशय उरला नाहीं. मला आतां उपदेशाची गरज नाहीं. त्यामुळें प्राप्त होणाऱ्या दुसऱ्या कोणत्याही फलाची आवश्यकता नाहीं, शास्त्रांची गरज नाहीं, बंधूंची गरज नाहीं व त्यांचा त्याग करूनहि कांहीं मिळवावयाचें नाहीं. ज्याचें चित्त प्रत्यगात्ममात्र प्रतिष्ठित आहे, असा मी आतां अक्षय जीवन्मुक्तस्थितीचा अनुभव घेत आहें. ही स्थिति म्ह० असुरादिकांच्या क्षोभांनीं रहित अशी जी स्वर्गातील साम्राज्यस्थिति त्यासारखीच आहे. मी बाह्यदृष्टया नेत्रादि अंगांनीं युक्त जरी आहें, तरी या जगाला आकाशाहूनहि अतिशय स्वच्छ चिन्मात्ररूपच पहातों; अज्ञाप्रमाणें त्याला जड पहात नाहीं. हें जगत् आकाशमात्रच आहे, हा माझा एकनिश्चय आहे. हें जगत् मोहनिद्रेसह बाधित झालें असतां या दृश्य नामक आकाशांत अक्षय असलेला मी सदाच जागत आहें. पुढचें कार्य आपल्या इच्छेप्रमाणें, वर्तमान कार्य यथाप्राप्त व भूतकार्य यथास्थित जसें आपण मला सांगाल त्याप्रमाणें मी फलाभिसंधि सोडून गुरुशास्त्रानुसार करीन. मी मनामध्यें संतुष्ट होत नाहीं. इष्ट प्राप्ति झाली असतां बाहेर देहानें हृष्टपुष्ट होत नाहीं. अनिष्टप्राप्ति झाली असतां मी रडत नाहीं. आपलें अवश्य कर्तव्य असलेलें लौकिक वैदिक कार्य करतों. मी आतां एक आहें. भ्रांति माझ्यापासून दूर निघून गेली आहे. या सर्गाचें वाटेल तें होवो, प्रलयवात सोसाट्यानें वाहो, किंवा हा देश शून्य होवो, मी स्वरूपामध्यें स्वस्थ आहें. मी विश्रांति पावलों आहें. बाह्य इंद्रियांनीं अलक्ष्य झालों आहें आणि मनानेंहि दुर्लभ झालों आहें. मी निरामय झालों आहें. मुने! आकाशाला मुठींत जसें भरतां येत नाहीं, त्याप्रमाणें तृष्णांकडून मी बांधला जात नाहीं. ज्याप्रमाणें सुवास वृक्षावरील पुष्पापासून निघून अंतरिक्षांत जाऊन रहातो, त्याप्रमाणें मी या देहांतून निघून म्ह० देहाभिमान सोडून सम स्थित आहें. ज्याप्रमाणें सर्व राजे सुखानें विहार करीत असतात, ते प्रबुद्ध असले किंवा अप्रबुद्ध असले तरी राज्यांतील अनेक कर्तव्यांत व्यग्र असतात, त्याप्रमाणें मीहि स्वकर्तव्य आचरीन, पण त्या वेळीं मी आपला हर्ष, विषाद व आशा शांत करीन. सर्वत्र एक समदृष्टि ठेवीन. स्वरूपामध्यें निःशंक राहीन आणि अशा स्थितींत राहून प्राप्त कर्तव्य करीन. भगवन्! विषय व ऐश्वर्य यांच्या आनंदाहूनहि श्रेष्ठ असलेल्या ब्रह्मानंदानें मी सुखी झालों आहें. म्हणूनच मी या शरीरांत विषयसुखाची इच्छा करीत नाहीं, तथापि मी लौकिकांत सामान्य जनाप्रमाणें रहातों. यास्तव हे प्रभो! मला सेवादि कार्यामध्यें यथेच्छ नियुक्त करा. एखादा बालक जसा खेळ खेळतो, त्याप्रमाणें मी सर्व शंका सोडून व एक शुद्ध आत्मदृष्टि होऊन हें शरीर असेपर्यंत प्राप्त झालेल्या संसारस्थितीचें परिपालन करीन. हे मुनीश्वर! तुमच्या प्रसादानें मी आतां सर्व शंकाशून्य झालों आहें. यास्तव खाईन, पिईन, आनंदानें राहीन व आपली प्राप्त क्रियाहि करीन.

श्रीवसिष्ठः—अहाहा! मोठ्या संतोषाची गोष्ट आहे कीं, हे रामा! तूं मोठ्या पुण्यपदाला प्राप्त झालास. ज्या पदामध्यें स्थित

झालेले लोक शोक करीत नाहींत, तें हें आदि-मध्य-अंतशून्य पद आहे. आकाशांत जसें आकाश असतें, त्याप्रमाणें सर्वत्र सम, पूर्ण, शीतल व शांत अशा स्वात्म्यामध्यें स्वतःच तूं विश्रांतीला पूर्णपणें प्राप्त झाला आहेस. मोठ्या संतोषाची गोष्ट आहे कीं, तूं शोक-रहित झाला आहेस. मोठ्या भाग्यामुळेंच तूं असा स्वरूपामध्यें स्थित झाला आहेस. इहलोक व परलोक यांतील दृष्ट, अदृष्ट, श्रुत अनर्थां-विषयींची तुझी शंका शांत झाली, ही फार मोठी समाधानाची गोष्ट आहे. अरे बालका! तूं आत्मतत्त्ववेत्ता होऊन होऊन आपल्या भूत वर्त-मान व भविष्यत् कुलसंततीला ज्ञानानें पावन केलें आहेस. आतां हे राघवा! तूं या मुनिश्रेष्ठ विश्वामित्राची इच्छा पूर्ण करून म्हणजे त्याच्या यज्ञाला विघ्न करणारांचें निवारण करून आपल्या पृथ्वीचा उपभोग घेत रहा. हे सुभगा! तुझ्याशीं संगत झालेले पुत्रपौत्रांसह भृत्य, बांधव व चतुरंग सैन्य असे दोन्ही प्रकारचे लोक शरीरामध्यें निरामय, निर्भय व व चित्तामध्यें सदा प्रसन्न होऊन स्वगृहामध्यें सुखानें राहोत. २०१.

## सर्ग २०२ वा.

१ ज्ञानानें दृष्ट झालेले राजे व राम यांचें वर्णन व २ रामाच्या ज्ञाननिर्मल स्थितीचें कथन.

श्रीवाल्मीकिः—वसिष्ठांचें हें वचन ऐकून सभेंतील सर्व राजे व लोक अमृतधारांनीं वृष्टि केल्याप्रमाणें अंतःकरणाच्या शीतलतेस प्राप्त झाले. कमलनयन राम पूर्ण चंद्राचा उदय झाला असतां क्षिरसागर जसा शोभतो, त्याप्र-माणें आपल्या मुखचंद्रानें शोभला. तत्त्वज्ञाना-मध्यें विशारद असलेले वामदेमादि सर्व ‘ भगवा-नानें आश्चर्यकारक ज्ञान सांगितलें ’ असें मोठ्या आदरानें म्हणूं लागले. ज्याचें अंतः-करण शांत झालें आहे असा राजा दशरथ आनंदानें शोभूं लागला. अतिशय संतोषानें त्याचें अंग रोमांचानें युक्त झालें व तो एक प्रकारच्या नव्याच शोभेला प्राप्त झाला. ज्यांनीं ज्ञेयाला जाणलें आहे, अशा पुष्कळ लोकांच्या साधुवादकथा प्रवृत्त झाल्या असतां ज्याचें अज्ञान निवृत्त झालें आहे असा राम पुनः असें वचन बोलला.

श्रीरामः—भगवन्! हे भूतभव्येश! अग्नी-कडून सोन्याचें श्यामत्व जसें घालविलें जातें, त्याप्रमाणें आपण आमच्या अज्ञानाचें परिमा-र्जन केलें. आम्ही पूर्वीं आमच्या शरीराला आत्मा समजत होतों. पण हे प्रभो! आतां सर्वात्मदर्शी झालों आहों. मी आतां सर्वात्मक होऊन संपूर्ण झालों आहें. या वेळीं सर्व उपद्रवशून्य झालों आहें. माझ्या सर्व शंका निवृत्त झाल्या आहेत. मी आतां चांगला जागा झालों आहें. पुनरपि केव्हांहि खेद न पावण्या-साठीं आनंदित झालों आहें. मला चिरकाल सुख प्राप्त झालें आहे. माझ्या परमपुरुषार्थाचा आविर्भाव झाला आहे. माझा आतां अस्त केव्हांहि होणार नाहीं. अहो, काय आश्चर्य आहे! पवित्र व शीतल ज्ञानजलानें आपण मजवर वर्षाव केला आहे. त्यामुळें शरदृतूंतील कमलाप्रमाणें मी आपल्या हृदयांत विकसित झालों आहें. ज्या स्थितीमध्यें स्थित झालेल्या मला आज सर्व जगत् अमृतमय झालें आहे ती ही श्रेष्ठ पदवी मला आज तुमच्या प्रसादानें प्राप्त झाली आहे; माझी मति आंतल्या आंत प्रसन्न झाली आहे. त्यामुळें माझा सर्व शोक निवृत्त झाला आहे. शांतीमुळें माझें हृदय शुद्ध होऊन म्हणजे माझ्या हृदयांतील अज्ञानमल कार्यासह निवृत्त होऊन मी परम शोभेला प्राप्त झालों आहें.

आपल्या अंतःकरणांतच आनंदाचा अनुभव घेत आहें. उत्तम प्रकारें परीक्षण करून पाहिल्यानें मी स्वतः शुद्ध निर्मलतेस प्राप्त झालों आहें. यास्तव मलाच नमस्कार असो. २०२

## सर्ग २०३ वा.

१. मध्यान्हकालचा वाद्यघोष, दिनकृत्य, रात्रीचा क्रम व प्रातःकालीं सभेंत रामाचा निःसंदेह, यांचें वर्णन

श्रीवाल्मीकिः—याप्रमाणें मुनि व राघव विचारांत निमग्न झाले असतां सूर्य जणुंकाय श्रवण करण्यासाठींच आकाशाच्यां मध्यभागीं आला. त्याबरोबर त्याचा प्रखर ताप सर्व दिशांमध्यें उष्णत्वास प्राप्त झाला. पदार्थसमूहाला प्रकट करण्यासाठीं रामाच्या महाबुद्धीप्रमाणेंच तो प्रखर ताप सर्वत्र पसरला. ज्यांचीं हृदयकमलें प्रफुल्ल व त्यामुळें विस्तीर्ण झालीं आहेत अशा सभेंतील राजांप्रमाणें उद्यानांतील सरोवरें शोभूं लागलीं. मोत्यांनीं गुंफलेलीं जीं स्फटिकांचीं वातायनें त्यांत सूर्याचें प्रतिबिंब पडल्यामुळें अधिकच दीप्तियुक्त झालेलें आकाश जणुंकाय विज्ञानश्रवणानेंच तरंगत असल्याप्रमाणें व नाचत असल्याप्रमाणें दिसलें. पद्मरागामध्यें प्रतिबिंबित झालेल्या सूर्याच्या प्रतिबिंबाकृति चमकूं लागल्या. त्यामुळें त्या स्वच्छ बुद्धीच्या उपदेशज्ञानकलाच स्फुरत आहेत कीं काय, असा भास झाला. याप्रमाणें आपल्या कुलाचें जणुंकाय कमलच असा राम शांत झाला असतां, मुनींद्राच्या मुखावलोकनामुळें जणुंकाय त्याचें मुखकमल विकासच पावलें असतां, वडवानलाची ज्याला उपमा आहे असा सूर्य आकाशरूप महासागराच्या मध्यभागीं आला असतां, समग्र रसांना प्राशन करणाऱ्या अशा त्याच्या तेजःपुंज ज्वाला चमकूं लागल्या असतां, नीलवर्ण आकाशनीलोत्पलामध्यें गळणारें रज शोभूं लागलें असतां, उष्ण किरणांच्या कर्णिकेनें तें रमणीय झालें असतां व त्यांतील किरणरूपी केसर स्फुरण पावत असतां, तें सूर्यमंडल हीं जगल्लक्ष्मीच्या त्रिलोकीरूप कर्णांतील कुंडलें शोभूं लागलीं असतां, त्याचा ताप सर्व दिशांमध्यें अतिशय पसरला असतां, गगनरूपी गृह त्या वेळीं दुप्पट प्रज्वलित झालें असतां मध्यान्हकालचे शंख वाजूं लागले. ते कल्पांतींच्या वायूंनीं परिपूर्ण झालेल्या सागराप्रमाणें भासले. त्या वेळीं सर्वांच्या मुखावर घर्मश्री शुद्ध मुक्ताफळांप्रमाणें प्रकट झाली. जल समुद्राला जसें भरून सोडतें, त्याप्रमाणें गृहांतील भिंतीपासून परावृत्त झालेली व प्राण्यांच्या संरंभानें पुष्ट झालेली शब्दश्री सर्वांचे कान भरून सोडती झाली. पुरस्त्रियांनीं उष्णतेच्या शांतीसाठीं फेंकलेली सकर्पूर जलसेकरूप जलपंक्ति उल्लास पावली. तेव्हां तो राजा आपल्या सामंतांसह, राजांसह, सर्व परिवारासह, मुनि वसिष्ठ, राम व सर्व सभा यांसह एकदम उठला. राजे, राजपुत्र, मंत्री यांनीं परस्परांची पूजा केली व आनंदित होऊन ते आपापल्या स्थानीं गेले. अंतःपुरगृहांवर पंख्यांच्या वाऱ्यानें उडवून आणलेल्या कर्पूरधुळीची नवीच मेघमाला झाली. मध्यान्हकाळच्या वाद्यांचा ध्वनि त्या सभेमध्यें घुमत असतांना वाक्यकोविद मुनिनायक असें वचन बोलला—“ जें श्रवण करण्यास योग्य होतें तें सर्व तूं ऐकलें आहेस. सर्व ज्ञेय पूर्णपणें जाणलें आहेस. हे राघवा ! तुला आतां आणखी याहून ज्ञातव्य कांहींच उरलें नाहीं. मीं जसा तुला उपदेश केला आहे, शास्त्रतः तूं जसें पहात आहेस आणि ज्याप्रमाणें तूं स्वतः अनुभव घेत आहेस, त्याप्रमाणें आचरण कर. शास्त्र, गुरु व स्वानुभव यांची एकवाक्यता कर. आतां आपलें

कर्तव्य करावयास ऊठ. हे महामते ! आम्ही स्नान करावयास जातों. आमचा हा मध्यान्ह काल उलटून चालला आहे. हे कल्याणा! आपली आकांक्षा पूर्ण करण्यासाठीं तुला आणखी जें कांहीं विचारावयाचें असेल तें सर्व शुभ प्रष्टव्य तूं उद्यां सकाळीं विचार."

श्रीवाल्मीकि—मुनिनाथानें असें म्हटलें असतां राजा दशरथानें सर्व सभ्य व सर्व साधु यांची पूजा केली. रामासह तो धर्मात्मा वसिष्ठादिकांनीं सांगितलेल्या क्रमानें मुनि, विप्र, राजे, त्याचप्रमाणें आकाशचर, यांची रत्नें, मोत्यें, दिव्य पुष्पें इत्यादिकांच्या योगानें पूजा करिता झाला. मणि व रत्नें यांचें प्रदान करून, मोत्यांचे हार अर्पण करून, प्रणय, प्रणाम, पदार्थांनीं शोभणारें प्रदान, वस्त्र, आसन, अन्न, पान, सुवर्ण, भूमि, धूप, गंध, पुष्प इत्यादि सर्व शास्त्रोक्त उपचारांनीं त्या अनिंदित राजानें सर्वांची पूजा केली. त्यानंतर वर वर्णन केल्याप्रमाणें तो आपल्या सभेंतून वसिष्ठादि मुनि, देवर्षि व इतर सभासद यांसह, सायंकाळीं आकाशांत जसा चंद्र त्याप्रमाणें उठला. सभा उठण्याच्या वेळीं फार मोठा संरंभ झाला. त्यामुळें ती सभा विशेषच शोभूं लागली. देवांनीं वृष्टि केलेल्या पुष्पांचा जो गुडघ्याइतका थर तेथें पसरला होता, त्यावर लोकांचे पाय पडून तीं फुलें तुडविलीं गेल्यामुळें त्यांचा चिखल झाला. एकमेकांचीं बाहुभूषणें परस्परांवर आपटून त्यांतील रत्नांचें चूर्ण झालें व त्यामुळें भूमि रक्तवर्ण दिसूं लागली. लोकांच्या गळ्यांतील मुक्ताहार तुटून त्यांतील मोत्यें जमिनीवर पसरलीं, त्यामुळें ती सभा रात्रीच्या नक्षत्रयुक्त आकाशाला तुच्छ करीत असल्याचा भास झाला. देवर्षि, मुनि, श्रेष्ठ ब्राह्मण, राजे, यांच्या स्पंदानें तें सभागृह व्याकुल झालें. दासी आपल्या व्यग्र हस्तांनीं चंचल चामर वारूं लागल्या. तात्पर्य, अशा अवस्थेमध्यें ते सर्व दशरथादि राजे व मुनि एकमेकांना विचारून व मृदु शब्दांनीं परस्परांचें पूजन करून तेथून निघाले. साधु आपल्या आश्रमास गेले. परस्परांविषयीं त्यांचीं अंतःकरणें स्निग्ध व संतुष्ट झालीं होतीं. सात लोकांमध्यें रहाणारे देव इंद्राच्या अमरावतींतून निघून प्रेमानें एकमेकांचें पूजन करून जसे स्वस्थानीं जातात, त्याप्रमाणें राजानें ज्यांचें विसर्जन केलें आहे असे ते सर्व आपापल्या गृहीं जाऊन दिनक्रिया करते झाले. वसिष्ठादि मुनि व दशरथादि राजे आपापलें आन्हिक करते झाले. त्या दिवसाचीं यथाप्राप्त क्रिया करीत असतांनाच आकाशांतील पांथ—सूर्य क्रमानें अस्त पावला. तेव्हां त्यांच्या त्याच कथेनें व महामति रामाच्या प्रबोधामुळें ती रात्र सत्वर संपली. तेव्हां अंधकाररूप धूळ व नक्षत्ररूप पुष्पें यांना झाडून टाकीत सूर्य भुवनाला प्रकाशमय करीत होत्साता उदयाचलीं प्रकट झाला. कण्हेरीच्या लाल पुष्पांसारख्या आपल्या किरणांनीं त्यानें सर्व दिशा रंगविल्या. तो बाल दिवाकर गगनसागरांत प्रविष्ट झाला. तेव्हां राजे, राजपुत्र, मंत्री, वसिष्ठादि मुनि पुनः दशरथाच्या सभेंत आले व यथाक्रम आपापल्या आसनावर बसले. सर्व सभ्य आपापल्या प्रदेशीं व स्वस्वस्थानीं बसले असतां ती सभा आकाशांतील नक्षत्रश्रीप्रमाणें शोभली. त्यानंतर दशरथादिक व सुमंतादिक आसनस्थ मुनि वसिष्ठाची प्रसंशा करीत असतां, वसिष्ठ व पिता यांच्या अग्रभागीं बुद्धिमान् कमलनयन राम असें वचन बोलला.

श्रीरामः—भगवन् ! आपण सर्वधर्मज्ञ आहां, सर्व ज्ञानाचा महासागर आहां, सर्व संदेहांना तोडणारे परशु आहां, सर्व शोक व भय यांचें निवारण करणारे आहां. यास्तव हे ब्रम्हन्,

मला आणखी कांहीं श्रोतव्य किंवा वेध आहे का? जर कांहीं श्रोतव्य असेल तर तें सांगण्यास आपण समर्थ आहां.

श्रीवसिष्ठः-रामा! तूं आज श्रेष्ठ बुद्धीला प्राप्त झाला आहेस, तुला आतां श्रोतव्य कांहीं उरलें नाहीं. तुझी बुद्धि कृतकृत्य झाली आहे व ती सर्व प्राप्य प्राप्त झाल्यामुळें स्वरूपामध्यें स्थित आहे. यास्तव तूंच आतां आपल्या सूक्ष्म बुद्धीनें विचार करून मला सांग. तूं आतां आपल्या अंतःकरणांत स्वानुभवानें कशा प्रकारचा आहेस व आतां तुला काय ऐकावयाचें आहे, तें सांग.

श्रीरामः—भगवन् मी असें समजतों. माझी बुद्धि कृतकृत्य झाली आहे. मी सर्व विक्षेपशून्य झालों आहें. माझें चित्त अतिशय शांत झालें आहे व मला आतां कोणत्याहि प्रकारची आकांक्षा उरली नाहीं. आपण सर्व वक्तव्य मला सांगितलें आहे व मीहि सर्व ज्ञातव्य जाणलें आहे. आतां कृतकृत्य झालेली तुमची वाणी विश्रांति पावो. समजून घेण्यासारखें जें जें कांहीं होतें, तें मीं समजून घेतलें आहे. सर्व ज्ञेय संपादन केलें आहे. सर्व जगदैक्य विशेषतः संपादन केलें आहे. द्वैत अस्त पावलें आहे. दृश्यभेदाचा सर्व भास निःशेष नाहींसा झाला आहे. कारण मीं चांगला विचार करून संसाराविषयींची सर्व आस्था सोडली आहे. २०३.

---

## सर्ग २०४ वा.

१. वसिष्ठ व राम हे दोघेहि चिदात्म्याच्या परिशुद्धीकरितां सारभूत युक्तीनें चितींतील दृश्याचें पुनः परिमार्जन करितात.

श्रीवसिष्ठः—हे महापराक्रमी रामा! पुनरपि हें माझें परम वचन ऐक. कारण पुनःपुनः ज्याचें शोधन केलें आहे असा आरसा अधिक च चमकूं लागतो, हें प्रसिद्ध आहे. दृश्य दोन प्रकारचें आहे. एक नाम व दुसरें रूप. पण त्यांतील जाति, गुण, क्रिया व आकार यांस व्यक्त करणाऱ्या—गाय, काळी, चपळ व सुंदर, इत्यादि—चार प्रकारच्या शब्दांचा अर्थ भ्रांतिकल्पित आहे. कारण त्या चार शब्दांवरून चार पृथक् वस्तूंचा अनुभव येत नाहीं. याप्रमाणें वस्तूंचें पृथकत्व नाहींसें झालें म्हणजे निरर्थक शब्द जलाच्या ध्वनीप्रमाणें पदार्थांमध्येंच रहातो. पदार्थांचें मार्जन तर पूर्वींच केलें आहे. यास्तव शब्द व अर्थ असें दोन्हीं प्रकारचें दृश्य चिदाभासमात्र, म्हणूनच स्वप्नतुल्य आहे. त्यांत जाग्रत् कोठचें? आणि जाग्रत्च जर स्वप्नाप्रमाणें मिथ्या आहे तर त्याच्या निमित्तानें होणारें स्वप्न तरी कोठचें असणार? अर्थात् तें स्मरणाप्रमाणें विषयभूत पदार्थांवांचूनच मनांत उभें रहातें. यास्तव तें संवेदनमात्रच आहे. तथापि त्याहून भिन्न असल्यासारखा भास होतो. ज्याप्रमाणें स्वप्नपुरात्मक संविदाकाश माझ्या ठिकाणीं अगदीं स्वच्छ असतें, त्याचप्रमाणें हें भुवनत्रय सरूप असलें तरी नीरूप आहे.

श्रीरामः—ही भूमि कशी झाली? पर्वत कसे झाले? जल कसें झालें? पाषाण कसे झाले? तेज कसें झालें? क्रिया कशा झाल्या? काल कसा झाला? वायु कसा झाला? शून्य कसें झालें? चिदाकाश कसें झालें? हे प्रभो, मीं हें सर्व जाणलें आहे. तरी मला बोध होण्यासाठीं तें सर्व पुनः सांगा.

श्रीवसिष्ठः—हे राघवा! स्वप्नांत पाहिलेल्या महापुरींतील भूमि कशी झाली? आकाश कसें झालें? जल कसें झालें? पाषाण कसे

झाले? तेज कसें झालें? दिशा कशा झाल्या? काल कसा झाला? क्रिया कशा झाल्या? हें निमित्तादिक कसें झालें? तें मला सांग बरें. हें कोणीं निर्माण केलें? याला कोणीं जाळलें? याला कोणी रचिलें! याचें पोषण कोणीं केलें? याला कसें उत्पन्न केलें? याचा आचार काय? व याचें स्वरूप काय? तें सांग.

श्रीरामः—भगवन्! स्वप्नरूप जगाचें निराकार, निराधार केवल आत्मा हेंच स्वरूप आहे. केवल आकाश हेंच त्याचें रूप आहे. त्यांतील भूमि, पर्वत वगैरे कांहीं सत्य नाहीं. निराधार आकाशरूप आत्माच याचें निमित्त आहे. आकाररहित असलेल्या या स्वप्नाकाशाचें दुसरें कारण काय असणार? व त्याच्या आधाराचें तरी काय प्रयोजन? पण हें सुद्धां पृथिव्यादि आकाशाची कल्पना गृहीत धरून मी बोलत आहें. वस्तुतः यांतील कांहींच झालेलें नाहीं. हे सर्व भास मुळींच विद्यमान नाहींत. हें चितूचें नुसतें स्फुरण आहे. मनच जगद्रूपानें स्थित आहे. मनोरूप चित्स्फुरण हेंच दिशा, काल वगैरे आहे. चिद्भानच पर्वतादिक आहे. जलादिकहि चितच आहे व तत्त्ववेत्त्याला बोधामुळें वाय्वादि सर्व चिदाकाशच भासतें. आकाशत्वाला प्राप्त झालेली संविदच आकाशरूपानें स्थित आहे. काठिन्यामुळें तीच पाषाणरूपानें व द्रवत्वामुळें जलरूपानें स्थित आहे. पण वस्तुतः भूम्यादि नाहीं व दृश्यताहि नाहीं. तें अनंत चिदाकाश आहे. तें सर्व एक सद्रूप आहे. ज्याप्रमाणें समुद्राचें जल द्रवत्वामुळें समुद्रामध्यें नाना आकारानें स्थित असतें, त्याप्रमाणें चिदाकाश स्वरूपामध्यें अ-नाना असतांनाच नानारूप भासतें. चित् काठिन्यसंकल्पानें पृथ्वी झाली व संकल्पानेंच जणुंकाय पर्वतत्वास प्राप्त झाली. चिद्रूप आकाशच शून्यतासंकल्पानें आपल्या शून्यत्वाचा अनुभव घेतें. द्रवत्वसंकल्पानें तेंच जलरूप होतें, स्पंदत्वानें वायु बनतें व उष्णतेच्या संवेदनेनें अग्निरूप होतें. पण तें चिदाकाश त्या सर्व अवस्थांमध्यें आपलें स्वरूप टाकीत नाहीं. हा आकाशरूप चिद्धातु अशा स्वरूपाचाच आहे. तो निष्कारण गुणक्रमानें अशा स्वरूपाचा भासतो. आकाश व समुद्र यांमध्यें शून्यत्व व जल यांवांचून दुसरें कांहीं नसतें, त्याप्रमाणें त्या चिद्धातूवांचून या जगामध्यें दुसरें कांहींहि नाहीं. हें, तूं, मी इत्यादि त्या चिदाकाशाहून भिन्न नाहीं. कारण त्याचा संभवच नाहीं. यास्तव अगदीं शांतपणें रहावें. भगवन्! आपण या गृहामध्यें स्वप्न-मनोरथादिकांनीं अग्नि, पर्वत इत्यादिकांची कल्पना जशी करतां त्याचप्रमाणें हें निराकार चिदाकाश पहात आहां. चिदाकाश सृष्टीच्या आरंभीं देहासारखें भासतें. पण त्या वेळीं त्याचें कांहीं कारणच संभवत नसल्यामुळें देह संभवत नाहीं. यास्तव अज्ञानामुळें देहाकार चित् उदय पावते, तत्त्वतः नाहीं, असा विचार तत्त्वज्ञांनीं करावा. मन, बुद्धि, अहंकार, सर्व प्राणिशरीरें, पर्वत, दिशा हें सर्व एखाद्या मोठ्या शिलेच्या उदराप्रमाणें मनोमय अनिर्वाच्य स्थित आहे. याप्रमाणें कांहींहि उत्पन्न झालेलें नाहीं. कांहीं नष्ट झालेलें नाहीं; तर हें जगद्रूप चिद्ब्रह्मात्म्यामध्यें जसेंच्या तसेंच स्थित आहे. स्वरूपाचें जें विशेष रीतीनें स्फुरण होणें तेंच हें जगत् म्हटलेलें आहे. जो द्रव तेंच जसें जल, त्याप्रमाणें जें चित्स्फुरण तेंच जगत् होय. यथार्थ दृष्टीनेंहि पाहिल्यास हें जगद्रूपानें भासणारेंहि सर्व शून्य चिदाकाशच आहे. तें भासत असलें तरी नाहीं. हाच परमार्थ होय. ही ज्ञानी पुरुषाची दृष्टि झाली. आतां अज्ञ पुरुषाच्या दृष्टीनें जसें असेल तसें असूं दे. आपल्याला त्याच्याशीं काय करावयाचें आहे? २०४

———

## सर्ग २०५ वा.

—:०:—

१. जगत्स्थिति विवर्तरूप, स्वप्नतुल्य व चिन्मात्र आहे; ती कधीं उदय पावली नाहीं, कधीं स्थित झाली नाहीं व अस्तहि पावली नाहीं, असें वर्णन.

श्रीराम:—भगवन्! ज्याप्रमाणें स्वप्नांत हें सर्व दृश्य परमाकाश असतें, तसेंच तें जागृतींतहि आहे. याविषयीं जर मुळींच संशय नसेल, तर महाराज! मला या सर्वोत्तम महाप्रश्नाचें उत्तर सांगा. कूटस्थ अद्वय चित्पासून जागृत-स्वप्नामध्यें स्वदेहाप्रमाणें भास कसा होतो? ह्मणजे निर्विकार चिदात्म्यामध्यें विवर्त तरी कसा संभवतो?

श्रीवासिष्ठ:—रामा! ज्याअर्थीं कांहीं कारणावांचूनच हें दृश्य उत्पन्न झालेलें आहे, त्याअर्थीं तें शून्याच्याच आधारानें आहे, व तें सर्वथा शून्यात्मकच आहे, असें समजणें उचित होय आणि तें शून्य आकाश तर परब्रम्हच आहे, दुसरें कांहीं नाहीं. त्यामुळेंच उत्पत्त्यादिशून्य व ब्रम्हाद्वैताशीं अविरुद्ध अशा या विवर्ताच्या अनुपपत्तीविषयीं संदेहच संभवत नाहीं. सर्व कारणाकारशून्य अशा सृष्टीच्या आरंभीं कोणतींच भूतें संभवत नाहींत. त्यामुळें पृथिव्यादि भूतांपासून नियमानें होणारा हा देह नाहींच. पृथिव्यादि भूतें हाच खरोखर देह आहे. पण तीं भूतेंच मुळीं संभवत नाहींत. त्यामुळें चिदाकाश स्वप्नाप्रमाणें आभास पहातें. तें स्वरूपाचेंच स्फुरण आहे. मायेच्या गुणांमध्यें क्षोभ उत्पन्न झाल्यामुळें तें साकार असल्यासारखें दिसतें. तें जें आभासमात्रत्व तेंच स्वप्नभान. तीच जगदाकृति. चिदाकाशरूपानेंच स्वप्न, विवर्त, जगत्, इत्यादि म्हटलें जातें. अर्थात् चिदाकाशाचें आकाशासारखें निर्मल असें जें हें वेदन ह्मणजे आतल्याआंत भासणारें जगद्रूप तें सूक्ष्मावस्थेंत स्वप्न या नांवानें व स्थूलावस्थेंत जगत् या नांवानें स्थित आहे. हें चितूचेंच स्वरूप आहे. रूपभेदाची कल्पना करणाऱ्या त्या चिदात्म्यानें त्याच आपल्या विस्तीर्ण स्वभावस्फुरणामध्यें 'पृथिव्यादि' या पृथक् संज्ञा केलेल्या आहेत. हें चिद्भानच स्वप्न व जगत् या शब्दांनीं सांगितलें जातें. भान हा त्या चितीचा स्वभावच आहे. त्यामुळें स्वप्नादिकांची जरी शांति झाली, तरी त्याचें तत्त्व असें जें भान तें केव्हांहि शांत होत नाहीं. त्याच्या अस्तित्वामुळेंच त्यांत अनेक भिन्न भिन्न सृष्टिदृष्टि प्रवृत्त होतात. शून्यता व आकाश हीं जशीं भिन्न नाहींत, त्याप्रमाणें ब्रह्मच ब्रम्हाकाश आहे, त्याहून भिन्न नाहीं. त्यांत सर्गदृष्टि रहातात व प्रवेश करतात.

श्रीराम:—भगवन्! आपण लीलोपाख्यान, भुशुंडाख्यान इत्यादिकांमध्यें कोट्यावधि सृष्टि सांगितल्या आहेत. त्यांची स्थितिहि एकसारखीच नाहीं. कांहीं सृष्टि ब्रम्हांडकोशामध्यें स्थित आहेत, कांहीं ब्रह्मांडरहित भूकोशामध्यें आहेत, कांहीं आकाशामध्यें स्थित आहेत, कांहीं तेज:कोशगत आहेत, कांहीं पवनकोशामध्यें स्थित आहेत. कांहीं आकाशांतलि गोलकाकार भूपीठरूप आहेत. त्याच्या ऊर्ध्वभागीं व अधोभागीं मुंग्यांप्रमाणें रहाणाऱ्या देवासुरादिकांचा 'आम्ही या गोलावर रहातों, तुम्ही खालीं रहातां' असा निश्चय आहे. ज्याअर्थीं सर्वांच्या दृष्टीनें भूमीच्या अध:प्रदेशीं असलेली प्रजा तिच्या पृष्ठावर पाय देऊन चालत असते, त्या अर्थीं वस्तुत: तिचे पाय वर असून मस्तकें खालीं आहेत. त्याचप्रमाणें ज्यांचीं मूळें वर आहेत व शाखापल्लवादि खालीं लोंबत आहेत अशीं वनें व पर्वतहि ज्यांत आहेत अशीं कित्येक ब्रम्हांडें आहेत. कांहीं ब्रह्मांडांतलि भूतसमूह वायुशरीर आहेत. कांहीं

ब्रह्मांडांच्या कोटी नेहमीं अंधकारांत निमग्न झाल्या आहेत. कांहीं ब्रह्मांडांतील प्राण्यांची देहरचना आकाशरूप असते. कांहीं ब्रम्हांडें कृमिकुलांनीं व्यापलेलीं असतात. कांहीं आकाशकोशामध्यें स्थित असतात व कांहीं पाषाणकोशामध्यें स्थित असतात. कांहीं गृहमंडपादि कोशामध्यें असतात. कांहीं आकाशामध्यें आकाशचारी पक्ष्यादिकांप्रमाणें स्थित आहेत. त्यांमध्यें हें आमचें जणुंकाय आश्रयभूत म्हटलेलें ब्रम्हांड कशा प्रकारें स्थित आहे, तें मला आपण सांगा ! कारण, हे भगवन् ! आपण तत्त्ववेत्त्यांतील श्रेष्ठ आहां.

श्रीवसिष्ठः—रामा ! हा प्रश्न तत्त्वज्ञानोपयोगी नाहीं. त्याचें कांहीं प्रयोजनहि नाहीं. तसाच तो प्रकृतोपयोगीहि नाहीं. जोतिषसिद्धान्तामध्यें मुनींनीं भूमि-भुवनादिकांचें वर्णन निरनिराळ्या रीतीनें केलें आहे. पण ते मुनि दुसऱ्या प्रमाणांनीं सिद्ध न होणाऱ्या व कधींहि कोणी तत्त्वज्ञानें न अनुभविलेल्या सृष्टिरचनेचें व स्थितीचें वर्णन करीत असतात. त्या त्या सिद्धांतांचे प्रवर्तक त्याचें वर्णन करतात. शिष्य तें ऐकतात, व त्याचें मनन करतात. हे रामा ! आगम, भूमि व देव यांनीं या ब्रम्हांडाचें शतशः वर्णन केलें आहे. तें सर्व तुला ज्ञात झालेंच आहे. उपनिषदादि तत्त्वप्रतिपादक आगमांत त्याचें कसें वर्णन केलें आहे, तेंहि तुला ज्ञात झालेंच आहे. तेव्हां आतां त्याचेंच पुनः चर्वितचर्वण करीत बसण्यांत काय अर्थ आहे ?

श्रीरामः—हे ब्रह्मन् ! हें चिन्महाकाश ब्रम्हांडाकार कसें झालें आहे ? त्याचें प्रमाण केवढें आहे ? व हें असें किती काल स्थित आहे? तें मला सांगा !

श्रीवसिष्ठः—ब्रम्ह आदि-अंतशून्य आहे. तें नित्य अव्यय आहे. परमाकाशामध्यें उत्पत्ति, स्थिति व नाश हे भाव नाहींत व आकारहि नाहींत. हें अनाद्यंत ब्रह्माकाश अव्यय असून व्यापक आहे. विश्व तद्रूप आहे व तें सर्वतः उत्पत्तिनाशशून्य आहे. कारण या परमचिदाकाशाचें स्वरूपामध्यें जें आपोआप होणारें भान तेंच हें 'विश्व' म्हणून म्हटलेलें आहे. त्यानें स्वतःच त्याला 'विश्व' हें नांव दिलें आहे. त्यामुळें तें मिथ्या होय. पुरुषाला जसें स्वप्ननगरदर्शन होतें, तसेंच त्याचें त्या नगरासारखें जें भान त्यालाच विश्व म्हटलें जातें. त्यांत वस्तुतः हे कठिण पर्वत नाहींत. द्रवात्मक जल नाहीं. हें शून्य आकाश नाहीं. गणनात्मक काल नाहीं. जें जसें जेथें स्वतः चितीनें कल्पिलें आहे तें तसें तेथें चित्तत्त्वांत पर्वतादिकांप्रमाणें स्थित आहे. चित्च भ्रांतिकल्पनेनें तसें तसें स्थित आहे. चिदेकस्वभाव ब्रह्मामध्यें तद्विरुद्ध असलेले हे गिरिकाठिन्यादि स्वभाव सत्य कसे असतील? स्वप्नामध्यें अशिलाच जशी शिलेप्रमाणें भासते, अनाकाशच जसें आकाश होतें त्याप्रमाणें येथें सृष्टि वगैरे होते. चितीमध्यें स्वप्नाप्रमाणेंच ही दृश्य स्थिति आहे. चित् शांत व अनाकारच आहे. ती स्वप्नाप्रमाणें जें स्वचेतन जाणते त्याला जगत् म्हटलें आहे आणि तें निराकारच सत् आहे. वायूचा स्पंद जसा अंतस्थ निरंतर वायुच होय, त्याप्रमाणें ब्रह्मामध्यें हें सर्व आहे. तें उदय पावत नाहीं व त्याचा अस्त होत नाहीं. जलामध्यें जसें द्रवत्व, आकाशाचें जसें शून्यत्व व वस्तूमध्यें जसें वस्तुत्व तसें हें ब्रह्मामध्यें जगत् आहे. तें कोठें गेलेलेंहि नाहीं व कोठून आलेलेंहि नाहीं. तें गुप्तहि होत नाहीं व त्याचा आविर्भावहि होत नाहीं. कारणावांचून त्याचा प्रलय संभवत नाहीं कारणाच्या अभावीं त्याचा उदयहि होऊं शकत नाहीं. ब्रह्मपदीं जगत् भिन्न नाहीं असेंहि म्हणतां येत नाहीं व आहे असेंहि

म्हणतां येत नाहीं. ब्रह्म या आभासाचें कारण होऊं शकत नाहीं. कारण तें अनादि, निराभास, निराकार, चिदंबर आहे. तस्मात् अवयवींचे अवयव जसे स्वात्ममात्र असतात, त्याचप्रमाणें निरवय ब्रह्माकाशांत हें जगदाकाश स्थित आहे. हें सर्व शांत, निराधार, ज्ञप्तिमात्र व अनामय आहे. येथें सत्ता नाहीं, असत्ता नाहीं व नानात्वहि नाहीं. संकल्प व स्वप्न यांतील नगराच्या वृत्तान्ताप्रमाणें हें सर्व विस्तार पावलें आहे. पण वस्तुतः तें सम, शांत, अज व अव्यय आकाशच स्थित आहे. स्वच्छ व स्फुरद्रूप चिदाकाशाचें परमस्वरूपच चित्स्वभावामुळें ज्या ज्या आकारानें भ्रांतीनें स्फुरतें तें स्वकल्पित आत्मरूपच प्रलयापर्यंत जगत् या रूपानें त्याच्याकडून जाणलें जातें. २०९

---

## सर्ग २६ वा.

१. ब्रम्हच एक सत् आहे, जगत् नाहीं या निर्णयाचे हेतुभूत कुशद्वीपेश्वराचे प्रश्न.

श्रीवासिष्ठः—जें भान कांहीं कारणावांचूनच भासतें तें कांहींच नाहीं. त्यामुळें हे निष्पाप रामा! परमार्थ ब्रम्हच परमार्थानें स्थित आहे. या सम्यक् बोधाच्या दृढतेसाठीं कोणीं एकानें मला विचारलेला हा महा प्रश्न मी तुला सांगतों. हे महामते! तो तूं ऐक. या त्रिभुवनामध्यें सुरोद व घृतोद या नांवाच्या दोन समुद्रांनीं दोन्ही बाजूंनीं व्यापलेलें कुशद्वीप या नांवाचें एक द्वीप भूमीवर वलयाप्रमाणें स्थित आहे. त्याच्या ईशान्य दिशेंत इलावती नांवाची एक सुवर्णनगरी आहे. तिनें दीप्तिरूप ज्वालापंक्तिस्तंभांनीं भूतल व नभस्तल हीं दोन्ही एकमेकांशीं जोडून टाकलीं आहेत. त्या नगरीमध्यें पूर्व दिशेंत 'प्रज्ञप्ति' या नावांचा एक महाप्रख्यात राजा होता. त्याच्यावर सर्व जगत् अनुरक्त होतें. तो जणुं काय स्वर्गींतील साक्षात् इंद्रच योय. कांहीं कारणानें आकाशांतून पडलेल्या प्रलयसूर्याप्रमाणें मी त्या राजाच्या समीप एकदा गेलों. पुष्प, अर्घ्य, आचमनीय यांच्या योगानें माझें पूजन करून व खालीं बसून कांहीं एक कथाप्रसंग सुरू असतां तो मध्येंच मला असें विचारूं लागला— "भगवन्! सर्व संहार होऊन सर्वत्र शून्यरूप पसरलें असतां ह्या० सर्वांचीं कारणें—बीजादिक व पृथिव्यादि यांचा परम आकाशामध्यें क्षय झाला असतां पुनः सृष्टीच्या आरंभाचें मूळ कारण काय आहे, हें मला सांगा. त्याचप्रमाणें त्याचीं निमित्तकारणें काय आहेत? व कोणत्या उपादान कारणापासून कोणत्या उपायानें तीं होतात? जगत् तत्त्वतः काय आहे? त्याचे उत्पत्तीपासून प्रलयापर्यंत होणारे जे विकार ते काय आहेत? त्यांतील कांहीं भूमि नित्य अंधकाराला धारण करणाऱ्या असतात. कांहीं ब्रह्मलोकादिक व्योमस्थ समुद्र आहेत. कांहीं नरकादि भूमि कृमिकुलांनीं व्याप्त आहे. कांहीं आकाशकोशामध्यें रहाणारे अंतरिक्षादि लोक आहेत. कित्येक शिलोदरामध्यें दैत्य दानवादिकांचीं नगरें आहेत. ते सर्व लोक तत्त्वतः काय आहेत? पृथिव्यादि भूतें व त्यांतील जरायुजादि चतुर्विध भूतसमुदाय तत्त्वतः काय आहेत? त्यांचे आध्यात्मिक बुद्ध्यादिपदार्थ कोणत्या कारणापासून कसे झाले आहेत? या सर्वांचा कर्ता कोण? किंवा द्रष्टा कोण? त्याचा आधार कोण व आधेय काय आहे? जगाचा अत्यंत नाश होत नाहीं, असा वेदवेत्यांचा निश्चय आहे. 'पण जसें संवेदन तसा अनुभव' अशी प्रसिद्धि असल्यामुळें संवेदनच देहादिकांचें निमित्त आहे कीं दुसरें कांहीं? संवेदनच कारण असल्यास तें नित्य व अव्यय आहे?—कीं

नश्वर व असत् आहे? नित्य असेल तर त्याच्यापासून देहादि विकार कसा उत्पन्न होईल? बरें, तें नश्वर आहे असें म्हणावें, तर त्याच्या उत्पत्तीचें कारण काय, तें कांहींच सांगतां येण्यासारखें नाहीं. कारण संवेदनावांचून त्याची सिद्धिच होत नाहीं. तेव्हां वेदन नित्य आहे कीं अनित्य आहे? शिवाय हे मुनिश्रेष्ठा! या कुशद्वीपांत मेलेल्या व अग्नीनें दग्ध झालेल्या म्हणजे येथें देहतः नाश पावलेल्या जीवांच्या नरक-स्वर्गभोगासाठीं विदेहावस्थेंतील म्हणजे देहोत्पादक मातापितरादिशून्य प्रदेशीं देहाचें उपादान कारण काय आहे? त्याचीं सहकारी कारणें कोणतीं? धर्माधर्मच देहादिकांच्या आकारानें परिणाम पावतात म्हणून म्हणावें, तर अमूर्त असलेल्या त्या धर्माधर्मापासून मूर्त देह होणें संभवत नाहीं. 'जें द्रव्य नाहीं तेंच पार्थिवादि द्रव्यभागांनीं देहादिकांस निर्मितें' असें म्हणावें तर ही युक्तिहि अगदीं असमंजस आहे. त्या अवस्थेंत मातापितरादिकांचाहि अभाव असतो. त्यामुळें परलोकीं त्यांच्या देहोत्पत्तीचें बीजहि नसतें. किंवा त्याचे आणखी दुसरे हेतु काय असतात? द्रव्यादिकांचा संभव कसा होतो? बरें, नास्तिकांचा पक्ष स्वीकारून 'या सृष्टीचा धर्माधर्मादि कोणी कर्ता नाहीं' म्हणून म्हणावें, तर संवेदनाप्रमाणेंच सर्व स्थिति असल्यामुळें व समस्त लोक व वेद यांच्याशीं विरोध येत असल्यामुळें तेंहि असमंजस आहे. कारण हा जन्म मानला तर त्याला कारण होणारा पूर्व जन्महि अवश्य मानावा लागतो. तोच परलोक होय. या जगांतील लोकांना त्यांच्या इच्छेच्या व प्रयत्नांच्या विरुद्ध फल मिळाल्याचें आपण शतशः पहातों. पण त्याचें कारण काय हें नास्तिकांना सांगतां येत नाहीं. एखादे वेळीं एखाद्याला इष्ट देव, गुरु इत्यादिकांच्या अनुग्रहानें मोठा लाभ होतो, तो कां? त्याचप्रमाणें प्रजा देशांतरांतील अमूर्त राजाज्ञादिकांच्या योगानें स्वतःची इच्छा व चेष्टा यांच्या अभावींहि वध, बंध, दंड इत्यादि फलांस प्राप्त होते, यांत काय उपपत्ति आहे? शिलादिमय स्तंभ देव, मुनि इत्यादिकांच्या वरानें सोनें मिळविण्यासाठीं प्रयत्न न करतांहि क्षणांत कोणी सुवर्णमय बनतो. त्यांत काय उपपत्ति आहे! कांहीं प्रयोजनावांचूनच प्रवृत्त झालेल्या विधि-निषेधशास्त्रांचा लोकांत प्रचार झाला तरी व न झाला तरी काय उपयोग आहे! पूर्वी हें सर्व जगत् असत् होतें, तेंच आतां सत् झालें आहे, असें श्रुति सांगते. तेव्हां त्यांत संगतार्थता कशी आहे? तें सांगा. सृष्टीच्या आरंभीं शून्य आकाशापासून हा हिरण्यगर्भ कसा झाला? 'आकाशाचा असाच विचित्र प्रभाव आहे!' असें म्हटल्यास सर्वच आकाशापासून हिरण्यगर्भ कां होत नाहींत? आपापल्या पूर्व बीजापासून उत्पन्न होणें हे औषधींचे स्वभाव व अग्न्यादिकांचे औष्ण्यादि स्वभाव रूढ कसे झाले? हे मुनीश्वर! आपल्याला हें जसें ठाऊक असेल तसेंच मला सांगा. एकाच पुरुषाचा मित्र त्यानें जिवंत रहावें या इच्छेनें व त्याचा शत्रु त्यानें मरावें या इच्छेनें इष्ट फल देणाऱ्या प्रयागादि क्षेत्रीं जीविताचा त्याग करतात, तेव्हां त्यांच्या त्या परस्परविरोधी इच्छांचें फल कसें प्राप्त होतें? 'मी आकाशांत अक्षय पूर्ण चंद्र व्हावें, या इच्छेनें सहस्रावधि उपासक उपासना करतात व उपासनेप्रमाणें फल मिळतें असें शास्त्रहि सांगतें. पण तदनुरोधानें आजपर्यंत मेलेल्या अनेक चंद्रोपासकांच्या चंद्ररूपांनीं आकाश भरून कां गेलें नाहीं? हजारों उपासक एकाच स्त्रीला उद्देशून हिनें माझी भार्या व्हावें म्हणून चिंतन करतात. त्यांना एकाच काळीं त्यांच्या ध्यानाचें फल

कसें प्राप्त होतें? ती त्या सर्वांची भार्या कशी होते? तशीच ती त्यांच्या भिन्न भिन्न देशांतील गृहांत एकटीच कशी राहूं शकते? म्ह० ती स्वतः एकच असतांना अनेकांच्या घरांत कशी रहाते? ती आपल्या तपानें श्रेष्ठ ब्रह्मचारिणी असते. त्यांतील प्रत्येकाच्या तपानें साध्वी असते, पण बहुभोग्यत्वामुळें असाध्वी कशी होत नाहीं? मी घरांतून बाहेर न जातांच कल्पान्तापर्यंत सप्तद्वीपांत राजा होऊन आपल्या घरांतच राहीन, असें विरुद्ध फल वरामुळें किंवा शापामुळें जेथें संपादन केलेलें असतें, तेथें घरांतच उपभोग घेण्यास योग्य असें जें वराचें वरत्व तें कसें उपपन्न होतें? शिवाय दानधर्मादि तपांचें व और्ध्वदेहिक श्राद्धादि कर्मांचें पुण्य क्रियोत्पत्तिप्रदेशीं जर उत्पन्न होत असेल तर येथील त्या कर्मांचें परलोकीं फल कसें संभवतें? शिवाय कोणतेंहि पुण्य मूर्त देहादिकांत प्रीति उत्पन्न करूनच सफल होऊं शकतें. पण परलोकांतील मूर्त देहादिकांत तें संभवत नाहीं. आतां कदाचित् यावर असें म्हणाल कीं, व्यवहार करणारा जीव आहे व तें पुण्यहि तत्संबद्ध आहे. यास्तव जेथें त्याचा भोग घडतो तेथें तें असतें. पण हेंहि समाधान बरोबर नाहीं. कारण दोन्ही देहांमध्यें व्यवहार करणारा जीव मूर्त नाहीं. येथील देहादि मूर्त पदार्थ देशांतरीं किंवा कालांतरीं संभवत नाहींत. त्यामुळें त्यांच्या आश्रयानें याला फलप्राप्ति होते असेंहि म्हणतां येत नाहीं. याप्रमाणें हें सर्वच असमंजस आहे; तें समंजस कसें होणार?

मुने! माझ्या मनांत असे हजारों संशय आहेत. चंद्र आपल्या प्रकाशानें संध्याकाळच्या अंधकाराला जसा घालवितो त्याप्रमाणें आपण आपल्या शुद्ध व निर्दोष वाणीनें माझ्या या सर्व संशयांचें निरसन करा. हे भगवन्! परमात्मवस्तूविषयीं उपदेश करून माझ्या सर्व संशयांचें निरसन करा, म्हणजे माझें उभय लोकीं परम हित होईल. कोणाचाहि साधुसमागम अल्पफल देणारा नसतो. तो नेहमीं महत्फलच देतो. यास्तव माझें परमकल्याण होईल असें करा. २०६.

---

## सर्ग २०७ वा.

१. वरील प्रश्नांतील कांहीं प्रश्नांचें क्रमानें व व्युत्क्रमानें समाधान. २ त्या पुढील तीन सर्गांनीं इतर प्रश्नांचें समाधान.

श्रीवसिष्ठः—हे राजन्! मी आतां तुला करतलामलकवत् स्पष्ट आत्मतत्त्व सांगतों, तें ऐक. त्यायोगें तुझे सर्व संशय समूल नाहींसे होतील. सर्व जगद्भाव सदाच असद्रूप आहेत व तसेच ते सद्रूपहि आहेत. कारण संवेदनाप्रमाणें त्यांची स्थिति होत असते. अरे बाबा! वस्तु सत् असो किंवा असत् असो, जेथें ही वस्तु अशी काळी, पिवळी, घट, पट, आहे किंवा नाहीं अशा निश्चयानें संविद् व्यापलेली असते तेथें ती अवश्य होतेच. अशा स्वभावाची ही संविद् आहे. तिच्याकडून देह एकच आत्मभावानें प्रथम कल्पिला जातो. त्या देहानें त्या संविदेची अभिव्यक्ति कल्पिली जाते आणि देहच मी आहें व मी देहाचा धर्म आहें, अशी ती विपरीत अध्यास करते. म्हणूनच स्वप्न व जाग्रत् यांतील देहांना जाणणारी जी संविद् तिलाच देह समजतात आणि इतर संविद् ज्ञात्याचा धर्म आहे असें समजतात. अर्थात् भ्रांतिरूप संविद्च शरीरता आहे. त्याहून निराळी संविदता नाहीं. अर्थात् स्वर्गनरकभोगार्थ विदेहावस्थेंत देहाचें कारण काय आहे, हा प्रश्न उरत नाहीं. सर्गाच्या आरंभीं कोणतेंहि कारण नसल्यामुळें स्वप्न-

द्रष्टा संविदात्माच जगद्रूपानें भासतो. स्वप्ना-पेक्षां या जगांत कोणता विशेष आहे? शि-वाय 'आहे, भासतें' इत्यादि प्रकारें प्रत्यगात्म-स्वभावानेंच जगाचा अनुभव येत असतांना तें जगत् त्याहून अन्य कसें असणार? अर्थात् ब्रह्मसंज्ञक शुद्ध वेदनच हें जगत् आहे. तेंच जगद्रूपानें भासत आहे. तेव्हां जगाला अन्यत्व कोठचें! याप्रमाणें अविकार्य ब्रह्माचीच जग-द्रूपानें स्थिति होत असल्यामुळें विद्वान् लोक व अध्यात्मशास्त्रें असेंच सांगतात. आमचाहि असाच अनुभव आहे व आपल्या अनुभवानु-सारच आम्हीं वर्णन केलें आहे. याप्रमाणें समस्त प्राण्यांच्या संविदेमध्यें रूढ झालेलें म्हणजे दृढ अनुभवानें सिद्ध झालेलें, सत्तारूपानें सर्वत्र पूर्ण व महात्म्यांनीं सांगितलेलें जगाचें नित्य संविन्मात्रत्व नाकबूल करून जे केवल भ्रामक नामरूपानुभवाला प्रमाण मानतात, ते संविद् नित्य नाहीं, तर शरीरच तिचें कारण आहे, जडच तिचें उपादन आहे किंवा जड आत्म्या-चा तो गुण आहे, असें म्हणून व्यर्थ मोहित होतात. ते सर्व वेडे आहेत. आम्हां आत्म-वाद्यांच्या कथांमध्यें भाग घेण्यास ते योग्य नाहींत; कारण मत्त व अमत्त, अज्ञ व ज्ञानी यांचा परस्पर संभाषणव्यवहार कसा होणार? ज्या विद्वानांच्या कथेनें सर्व संशयांचा क्षय होत नाहीं ती तिन्ही लोकांत मूर्खसभाच आहे, असें समजावें. केवल प्रत्यक्ष प्रमाणावर निष्ठा ठेवून राहि-लेल्या अज्ञांना विवेकादि दुसरीं सर्व यथार्थ ज्ञानाचीं साधनें नाहींशीं होतात. तो नास्तिक श्रुत्यादिसिद्ध अर्थ ग्राह्य नाहीं असें सांगतो; त्यामुळें सर्वप्रमाणविरुद्ध व युक्तिशून्य अशा आपल्या वचनानें चांगल्या लोकांच्या कानांना किटवीत असतो. त्याचे ते शब्द आस्तिकांना पाषाणासारखे कठोर वाटतात. सर्व विद्वान् त्या अज्ञाला कूपांतील अंध दर्दुर म्हणतात. कारण तो पूर्वापर विचार सोडून केवळ वर्त-मान विषयामध्यें आपल्याच बुद्धीनें पशू-प्रमाणें स्थित असतो. वेद व तत्त्वज्ञानी लोक यांना प्रश्न केला असतां ते स्वानुभवसिद्ध अशीच दृष्टि सांगतात. मी जसें सांगत आहें, तसेंच तेहि बोलतात. त्यामुळें जिज्ञासूंचे सर्व संशय नष्ट होतात. संविद्च जर शरीर असेल तर मृतशरीरहि संविद्च आहे. मग त्याला ज्ञान कां होत नाहीं? अशी ज्याची शंका असेल त्या शुश्रूषु मूढाला असें सांगितलें जातें:—हिरण्यगर्भरूप ब्रम्हाचें जगद्रूप हें संकल्पनगर आहे. तुझ्या स्वप्नपुराप्रमाणेंच तें जगद्भान आहे. तें सर्वदाच निरंतर चिन्मात्र-रूप आहे. पण तुला आपल्या स्वप्ननगरांत चेतनभ्रांति जशी नाहीं, तशीच शवादि जडामध्येंहि नाहीं. स्वप्नांत दिशा, पर्वत, पृथि-व्यादि भूतें, नगरें हें सर्व चिन्मय आकाश आहे, हें तुझ्या स्वानुभवानें सिद्ध आहे. संविदाकाश हेंच घन ब्रम्ह असून विराट हें त्याचें संकल्पनगर आहे. ब्रम्हदेव शुद्ध संविद्मय आहे. तसेंच हें जगत् शुद्ध संविन्मय आहे. तूं आपल्या संकल्पपुरामध्यें ज्याप्रमाणें कल्पित पदार्थांचाच अनुभव घेतोस, त्याप्रमाणें ब्रम्हदेवाच्या संकल्पनगरांत त्याच्याकडून जशी जशी कल्पना केली जाते तसा तसा अनुभव येतो. संकल्पनगरांत ज्याची ज्याची जशी कल्पना करावी, त्याचा तसाच अनुभव येतो. याविषयीं तुझें संकल्प-नगरच प्रमाण आहे. हिरण्यगर्भरूप चितीनें जिवंत शरीरामध्यें स्पंद असावा व मृत शरीरांत तो असू नये, अशा कल्पनेनें स्पंद व अस्पंद नियत केले; त्याचप्रमाणें त्याचा त्याला अनुभव आला. त्यामुळें शवामध्यें चेतनताव्यंजक स्पंदाची प्राप्तिच नाहीं. महा-

प्रलयाचे शेवटीं सृष्टीची पुनः प्रवृत्ति होते. सर्व कारणांच्या अभावामुळें त्या वेळीं कोणतेंच द्रव्य विद्यमान नसतें. पूर्व प्रजापतीनें निर्मिलेलें द्रव्यच या सृष्टीच्या उपयोगीं पडेल म्हणून म्हणावें, तर तसेंहि म्हणतां येत नाहीं. कारण पूर्वसृष्टीचा प्रजेश्वर पूर्वीच मुक्त होऊन गेलेला असतो व त्या त्या जगाचा निःशेष प्रलय झालेला असतो. यास्तव त्याविषयींची स्मृत्यादि निमित्तकारणेंहि संभवत नाहींत. अर्थात् स्वयंप्रकाश ब्रम्हच जगद्रूपानें भासतें. द्रव्यरूप जगत् त्याहून निराळें नाहीं. हिरण्यगर्भरूपानें ब्रम्हच प्रथम प्रगट झालें व त्यानें स्वतःच संकल्पनगराप्रमाणें या जगाची कल्पना केली. तो स्वतः आकाशरूप असून त्यानें जें कल्पिलें तेंहि आकाशच होय. संकल्पनगर जसें केवल चिन्मात्र भासतें, तसेंच चिन्मात्र संकल्परूप जगत् कारणावांचूनच भासतें. शरीर असो किंवा नसो, जेथें जेथें चिदाकाश आहे, तेथें तेथें तें आपल्यालाच द्वैताद्वैतमय जगत् समजतें. तस्मात् जसें स्वप्ननगर किंवा जसें संकल्पनगर तसें चिदाकाश मरणानंतर जगत् पहातें. म्ह० मरणोत्तर जगद्दर्शनालाहि हाच न्याय लागू आहे. सृष्टीच्या आरंभीं जसें हें अपृथिव्यादिमय जगत् पृथिव्यादिमय असल्यासारखें भासतें, त्याप्रमाणेंच मृतालाहि हें सर्व जगत् दिसतें. ज्याप्रमाणें तत्त्ववेत्त्याला किंवा स्वप्नांतून जागृत झालेल्या मनुष्याला स्वप्नांतील देश, काल, जागृतींतील सर्गानें अणुमात्राहि व्यापलेले दिसत नाहींत, त्याप्रमाणें परलोकीं गेलेल्यालाहि ऐहिक देश, काल तेथें व्याप्त असलेले दिसत नाहीं. याप्रमाणें तत्त्ववेत्त्याला अज्ञाच्या अनुभवानें सिद्ध असलेलेंहि जगत् विद्यमान् आहे असें वाटत नाहीं. त्याला तें सर्व आकाशांतील प्रतिभासाप्रमाणेंच भासतें. निजलेल्या मनुष्याला स्वप्नांत मिथ्याच प्रपंच जसा भासतो, त्याप्रमाणें परलोकीं गेलेल्या प्राण्याला चिदाकाशच स्वर्गाप्रमाणें भासतें. परलोकीं गेलेल्या प्राण्याला स्वर्ग, पृथ्वी, पर्वत, यम इत्यादिकांनीं संपन्न असलेलें आकाशच अभूतपूर्व भासतें. तें पूर्वीं सिद्ध असलेल्या जगाप्रमाणेंच आहे, असाच त्याचा निश्चय असतो. हा मी मृत होऊन पुनः यमलोकीं उत्पन्न झालों आहें, येथें मी आपल्या शुभाशुभ कर्मांचें फल भोगीन, इत्यादि भ्रांति तो मृत मनुष्य पहातो. मोक्षोपायांचा आदर न करणाऱ्या लोकांना हा मोह अवश्य होतो. पण आत्मज्ञानानें वासनारहित झाल्यानेंच तो शांत होतो. मोक्षोपायाचें सेवन केल्यानेंच ही भ्रांति निःशेष नाहींशी होते. अनात्मज्ञाची जी अशा प्रकारची संविद् तीच धर्माधर्मवासना होय. ती चिदाकाशांत आकाशात्मकच भासते व तीच जगत्स्थिति होय. जगत्स्वरूप शून्यहि नाहीं व सत्यहि नाहीं. तर चैतन्य हेंच जगद्रूप आहे. तें अज्ञानामुळेंच अनर्थरूप भासतें. ज्ञानी पुरुषाला तें परम कल्याणरूप व निरतिशय आनंदस्वभावच आहे. २०७.

---

## सर्ग २०८ वा.

१ विधात्याच्या इच्छेप्रमाणें लोकांना प्रतिकूल फल मिळतें असें वर्णन.

**श्रीवसिष्ठः**—हे राजा! असंबद्ध, अमूर्त व दूरस्थ प्रजांना गृहसंगमामध्यें शुभाशुभ फल कसें मिळतें तें ऐक. हें जगत् ब्रह्मसंकल्पनगर आहे ही गोष्ट सिद्धच आहे. कारण ब्रह्मच अज्ञानानें दृश्यकल्पनेनें पाहूं लागलें असतां दृश्य होतें व ब्रह्मबोधानें पाहूं लागलें असतां ब्रह्म होतें. संकल्पनगरामध्यें जें, जेव्हां, जसें कल्पिलें जातें, तें, तेव्हां तसेंच अनुभवास येतें. ज्याप्रमाणें तुझ्या

या संकल्पमय गृहांतील ही प्रजा त्वत्संकल्पानुसारिणी झाली आहे, त्याप्रमाणें ब्रह्मसंकल्पानुसारिणीच असते. या तुझ्या संकल्पनगरामध्यें तूं जें जें जसें असावें असें कल्पितोस, त्याप्रमाणेंच तें तूं पहातोस. ज्याप्रमाणें वर व शाप यांच्या योगानें शुद्ध संविद् व्यवहारक्षम होते, तशीच ब्रह्मसंविद्हि बनते. ह्म० वर व शाप यांच्या योगानें जें कांहीं होतें तेंहि या हिरण्यगर्भानें, तपस्व्यांचे वर शाप सिद्ध होवोत, अशी कल्पना केल्यानेंच होतें. विधिनिषेधशास्त्रांनीं सांगितलेल्या धर्माधर्मांतील ज्या एकावर आस्था ठेवून प्रजा त्याप्रमाणें अनुवर्तन करते, त्याचें फल तिला मिळतें. पण तें सुद्धां ब्राह्मसंकल्पामुळेंच होय. या जगामध्यें जे प्राणी आहेत त्यांना न दिसल्यामुळें जगत् पूर्वीं असत् होतें व आतां सत्य आहे असें ते म्हणतात. पण ही कल्पना सुद्धां चिद्रूप हिरण्यगर्भाच्या संकल्पामुळेंच होय. चित्चे जे निमेष व उन्मेष तेच प्रलय व उदय होत.

राजाः—भगवन्! जगत् हिरण्यगर्भाच्या संकल्पामुळेंच जर सत् आहे, तर तें सुषुप्ति व प्रलय यांमध्यें उपलब्ध कां होत नाहीं? जाग्रत् व सृष्टि या कालींच उपलब्ध कां होतें? प्रत्येक क्षणीं विकार पावणारें हें सुस्थिर असल्यासारखें कसें भासतें?

श्रीवासिष्ठः—राजा! या चिदाकाशसंकल्पनगराचा हा असाच स्वभाव आहे. सृष्टि जाग्रत् व स्वप्न या कालीं होऊन प्रलय, सुषुप्ति व मोक्ष यांमध्यें नसणें, याच स्वभावामुळें हें जगत् उत्पन्न होऊन नाश पावतें व पुनः क्षणांत उत्पन्न होतें. एखाद्या बालकाच्या संकल्पनगरांतलि पदार्थाप्रमाणें किंवा आकाशांतील भ्रामक केशपुंजाप्रमाणें चिदात्म्यामध्यें सदसद्रूप सर्ग भासतात. तूं संकल्पनगर रचून एका क्षणांत त्याचा नाश करतोस. त्या नगराविषयींहि कल्पना सोडून तूं दुसरी कल्पना करूं लागलास कीं तें नगर नाश पावतें. हा जसा तुझा स्वभावच आहे, त्याप्रमाणें चिदाकाशकल्पनानगरांतील उन्मज्जन व निमज्जन हें केवल त्याचें स्वभावस्फुरण आहे असें जाण. त्रिजगदाकाश संविद्घनमात्र आद्यंतरहित ब्रह्माकाशच आहे. त्यामुळें हा परमेश्वर जें जें कल्पितो व जें जें करतो तें तें याच्या सत्य संकल्पामुळें हजारों योजनें दूर असलेल्या व अनेक युगांनंतरहि परलोकादिकांमध्यें अगदीं समीप असल्याप्रमाणें कार्यक्षम होतें. अर्थात् मध्यें कितीहि काळ गेला व परलोक कितीहि दूर असला तरी पुण्यपापादि कर्मे आपापलें फल उत्पन्न केल्यावांचून रहात नाहीं. देशांतरीं व लोकांतरीं नित्य असणारा व आवरणरहित एकात्मा कशाचें स्फुरण करूं शकत नाहीं? त्याला अज्ञात व अशक्य असें काय आहे? जीव व त्याचें कर्म या उभयतांचेंहि अधिष्ठान तोच असल्यामुळें जीव कर्म केल्यानंतर कोठेंहि जरी गेला तरी त्याचें फळ त्याला भोगावेंच लागतें. ज्याप्रमाणें रत्नामध्यें निरनिराळ्या कांति स्वभावतःच उत्पन्न होतात, त्याप्रमाणें चिद्रत्नामध्यें जगाचे सृष्टिप्रलयात्मक व नाना कर्मफलवैचित्र्यभोगात्मक आभास स्वभावतःच अनुभवास येतात. विधिप्रतिषेधशास्त्राला साफल्य देणारी लोकसंस्था ब्रह्मामध्येंच रूढ झालेली असल्यामुळें मरून परलोकीं गेलेल्याहि जीवाला ती अनुरूप फल देते. दूरस्थ कर्मांचेंहि फल ती कल्पूं शकते. वस्तुतः ब्रह्म कधींच अस्त पावत नाहीं व कधींच उदय पावत नाहीं. हे ब्रह्मचिदाभास सर्वदा स्वरूपामध्यें स्थित आहेत. त्यामुळें जन्म व मरण ही केवळ भ्रांति आहे. ज्याप्रमाणें द्रष्ट्याला दिसूं लागल्यामुळें कल्पनानगर उत्पन्न

झालें अशी कल्पना होते, त्याप्रमाणें जगतूहि कल्पनेनेंच दिसूं लागतें. याचें जें दिसणें त्यालाच जन्म असें म्हणतात. अर्थात् द्रष्ट्याचा विषय होणें हाच जन्म व तोहि शब्दमात्र होय. याच न्यायानें पूर्वदेहादि भ्रांतीचा उपसंहार करणें हेंच मरण होय. अर्थात् ब्रह्म-चित् आपल्या स्वाभाविक स्फुरणाचा उपसंहार करून जेव्हां स्वरूपांत स्थित होते तेव्हां जीव शांत झाला, आकाशरूप झाला, किंवा मरण पावला असें म्हणतात. स्पंद व अस्पंद हा जसा वायूचा स्वभाव, त्याप्रमाणेंच दृश्याकार स्फुरण व अस्फुरण हा अज्ञानोपहित चितीचा स्वभाव आहे. तो निर्मल व अक्षय आहे. मणि, मंत्र, औषधि इत्यादिकांचे निरनिराळे प्रभावहि ब्रह्माचे सत्यसंकल्पच होत. ज्याप्रमाणें तुझ्या कल्पनानगरामध्यें ही औषधि जरा-मरणाचा नाश करणारी होवो, असें तूं कल्पितोस व त्याप्रमाणेंच ती त्या अवस्थेंत होते, त्याप्रमाणेंच ब्रह्म-संकल्पनगरामध्यें या त्रिभुवनांतील औषधींचे व सर्व पदार्थांचें स्वभाव त्याच्या संल्कपामुळेंच सिद्ध आहेत. ईश्वर प्रत्येक क्षणीं प्रत्येक वस्तूच्या स्वभावाचा संकल्प करीत बसत नाहीं. कारण राजा! तूंहि आपल्या संकल्पनगरामध्यें प्रत्येक पदार्थाचा धर्म प्रत्येक क्षणीं कल्पित बसत नाहींस. तर एखादा बालक आपल्या खेळांतील वस्तूची जशी एकदाच कल्पना करतो, त्याप्रमाणें ईश्वरहि सृष्टीच्या आरंभीं एकदाच संकल्प करतो. ही अमुक वस्तु अमुक धर्मांनीं युक्त असो व अमुकच कार्य करो, ही दुसरी वस्तु अमुकच स्वभावाची असो अशी एकदा कल्पना करतो आणि मग त्या कल्पनेमुळेंच बीजांकुरादि क्रमानेंच पूर्वपूर्व तृणापासून उत्तरोत्तर तृणाची कल्पना होते. तो परमात्मा एका क्षणांत ज्याची ज्याची कल्पना करतो ते ते पदार्थ तशा तशा अवयवांनीं निरनिराळ्या शक्ति व कार्यें यांनीं आणि कार्यपरंपरांनीं सिद्ध होतात. त्या चिद्घनाचा हा असा अबाधित स्वभावच आहे. ते संकल्पकल्पित पदार्थ स्वरूपानें अनेक जरी असले तरी चिदेकस्वभावानें स्थित असतात, त्याप्रमाणें ते स्वतः नाना आकार व स्वभाव यांनीं जरी युक्त असले तरी सद्रूपानें एकरसच असतात. त्या पदार्थांतील प्रत्येकामध्यें ब्रह्मचिन्मात्रता आहे. कारण ती सर्वात्मिका चित् जेथें जशी असते तशीच ती भासते. याप्रमाणें आदि-अंतमध्यशून्य, अनंतवीर्य ब्रह्म वस्तुतः कांहीं नाहीं व तेंच सर्व आहे. तें असत्यरूपानें भासत असूनहि सत्यरूपानें स्थित आहे. त्यामुळें तें सर्वांची आत्मभूमि आहे. प्राण्यांमध्यें व तृणादि जातींमध्यें जेथें जी वस्तु दिसते, तेथें तेंच त्याचें स्वरूप होय. म्ह० तेंच ब्रह्म त्या पदार्थरूपानें नटलें आहे. २०८.

---

## सर्ग २०९ वा.

१ विरुद्ध फल देणाऱ्या कर्मांचें अविरोधानें साफल्य व २ एकाच वेळीं भोगप्राप्ति यांचें समर्थन.

श्रीवसिष्ठः—एकच पुरुषाचा मित्र त्यानें जिवंत राहावें या इच्छेनें व त्याचा शत्रु त्यानें मरावें या इच्छेनें इष्टफल देणाऱ्या प्रयागादि क्षेत्रामध्यें मरण पावलेल्या त्या दोघांना फल कसें मिळतें तें तूं ऐक. पुढें सांगितलेल्या अधिकाऱ्याला उद्देशून क्षेत्रांचें व सर्व अर्थ-धर्मांचें फल ब्रह्मदेवानें आपल्या आदिसर्गामध्यें कल्पिलें आहे. आपल्या या संकल्पनगराकार जगांतील कोणत्या क्षेत्रांत, कोणत्या अधिकाऱ्यानें, कशा रीतीनें कर्मानुष्ठान केलें असतां कोणतें फळ मिळतें, तें त्या ईश्वरानें जसें जसें ठरवून ठेविलें आहे,

तसें तसेंच तें होतें. त्यामुळें प्रयागादि क्षेत्रांत वांच्छितार्थांची सिद्धि होण्यासाठीं स्नान, तप, दान, यज्ञ, इत्यादि पुण्य, मला अवश्य केलें पाहिजे व त्याचें फल मला हें अवश्य मिळेल अशा निश्चयानें अधिकाऱ्यानें केल्यास त्याच्या त्या भावनाबलानें इष्ट फल आविर्भूत होतें. पुण्यवानाला जसें तें मिळतें तसेंच तें पाप्यालाहि त्याच्या पातकाच्या योग्य अंशाचें निरसन करून क्षेत्रानुष्ठान उपकारक होतें. पापांश थोडा असून क्षेत्रांतील पुण्यांश अधिक असेल तर तें पुण्यानुष्ठान पापाचा निःशेष नाश करून शिवाय अवशिष्ट पुण्यांशानें पुरुषाला उचित इष्ट फळहि देतें. पाप व पुण्य हीं दोन्हीं समान असल्यास त्या दोहोंचेंहि फल भोगण्यासाठीं पृथक् शरीरें घ्यावीं लागतात. सारांश, अशा प्रकारचीं पापें व पुण्यें हेंहि ब्रह्मसंकल्पस्फुरणच आहे. ब्रह्मसंकल्प जसा जसा स्फुरतो, तसा तसाच तो होऊन राहतो. या चिद्धातूलाच हिरण्यगर्भ असें म्हणतात. तोच ब्रह्मदेवादि समष्टि जीव व अहमादि व्यष्टि जीव आहे. तो व्यष्टिसमष्टि उपाधींमध्यें जसा संकल्प करीत राहातो तसेंच त्याचें संकल्परूप जगतूहि बनतें. त्या विधात्याच्या संकल्पानुसारच जीवाची क्षेत्रार्जित पुण्याच्या अनुरोधानें तत्फलभोगात्मक प्रतिभा स्वप्नाप्रमाणें उदय पावते. पुण्याच्या विपरीत पाप करणाऱ्या जीवाला नरकादि प्रतिभा जशी होते, तशीच ती पुण्यफलभोगरूप प्रतिभा उदय पावते. 'मी आज एकटाच मरण पावलों. हे माझे सर्व बांधव जिवंत आहेत व माझ्यासाठीं रडत आहेत, मी एकाकीच या परलोकाला प्राप्त झालों आहें' अशी त्याला प्रतिभा होते. ज्यांना सन्निपातवायु झाला आहे त्यांना जसे निरनिराळे भ्रम होतात, त्याप्रमाणें त्या मृताच्या बंधूंनाहि रोदन, त्याच्या शवाला स्मशानांत नेणें, दहन करणें, त्याचें और्ध्वदेहिक करणें वगैरे भ्रामक प्रतिभा होते. अति उग्र पुण्य-पापांच्या योगानें मृतांची चित्कलाच लक्षावधि देहभावाहि कल्पिते. कारण मरणोत्तर तीच पुण्यपापें क्षुब्ध होतात व तीं महात्म्यांनीं निग्रहानुग्रहदृष्टीनें जरी पाहिलीं असलीं किंवा क्षुब्ध झालेल्या दुसऱ्या कोणीं त्याचें अवलोकन केलें असलें किंवा तीं कोणाला दिसलीं नसलीं तरी जीवांच्या चित्संकल्पामुळेंच त्यांना त्यांचीं फलें भोगण्यासाठीं हजारों शरीरें धारण करावयास लावतात. असो; ते त्याचे बांधवहि क्वचित् उत्कट पुण्यापापांच्या योगानें त्या आपल्या आप्ताला मृत व शवीभूत झालेले पाहतात. ते त्याच्यासाठीं रडतात व इतर बांधवांसह त्याला अग्नींत टाकतात. सुहृद् व शत्रु यांच्या परस्परविरुद्ध फलोद्देशानें केलेल्या कर्मांच्या योगानें तो विनेय पुरुष स्नेहसंवित्पूर्ण मित्रानें जशी प्रार्थना केली होती त्याचप्रमाणें आपल्याला जरा-मरणरहित असलेलें पाहतो. आपण दुःखरहित आहों, असें तो जाणतो. पण तेंहि दुसऱ्या देहानें नव्हे तर यथास्थित देहानेंच तो आपल्याला जीवितस्थित पाहतो. तर मग त्याच्या शत्रूच्या मनोरथाची सिद्धि कशी होते, ह्मणून विचारशील तर सांगतों— सुहृद् व स्वजन यांना अदृश्य अशाच दुसऱ्या देहानें तो मरणाचा अनुभव घेतो. कारण प्रयागादि क्षेत्रांत शत्रुमरणानुकूल पुण्य करणाऱ्या शत्रूनें बलात्कारानें त्याला मरणासाठीं प्रेरणा केलेली असते. शत्रूनें केलेल्या अभिचारादि शून्य विनेय संविदेकडून तत्कालींच मरणादिकांचा अनुभव घेतला जातो. कारण ज्यानें आपलें शरीर चिलखतानें आच्छादित केलें आहे व जो शस्त्रादिकांनीं सज्ज आहे त्याला ज्यानें चिलखत घातलें नाहीं व शस्त्रास्त्रानेंहि

जो सज्ज नाहीं अशा पुरुषाला मारणें मुळींच कठिण नाहीं. असो; मित्राच्या इच्छेप्रमाणें तो अमरत्वास प्राप्त झाला आहे, असें त्याचे बांधवहि पाहातात. याप्रमाणें तो जीवित व मरण या दोन अवस्थांचा एकाच वेळीं अनुभव घेतो. याच न्यायानें दुसऱ्याहि सर्व विरुद्ध प्रश्नांचा निर्णय करावा. कारण हें जगत्त्रय अप्रतिघारंभ व भ्रांतिमात्र आहे. भ्रांतीमध्यें कोणता भ्रांतिविपर्यय संभवणार नाहीं? एका भ्रमाच्या विरुद्ध दुसरा कोणता भ्रम असंभवनीय आहे? संनिपातादि दशेंत हजारों परस्परविरुद्ध भ्रम संभवतात. स्वप्न व संकल्पनगर यांत ज्या भ्रांतीचा अनुभव घेतला जातो तिच्याहून ही जगद्भ्रांति अधिकच आहे, न्यून नाहीं. या जाग्रद्रूप स्वप्नांत तिचा अनभव येतो.

**राजा**:—हे ब्रम्हन्! धर्म व अधर्म हें देहसंविदेचें कारण कसें? धर्म व अधर्म अमूर्त असतांना जीव त्यामुळें दुसऱ्या शरीरभावास कसा प्राप्त होतो?

**श्रीवासिष्ठ**:—हे महा बुद्धिमाना! ब्रह्मदेवाचें संकल्पनगर अशा या जगांत कोणतें सत्य किंवा असमंजस संभवत नाहीं? आपल्या संकल्पनगरामध्यें सुद्धां जर सर्व असंभवनीय गोष्टीहि संभवतात, तर मग ब्रह्मसंकल्पाविषयीं काय बोलावें? स्वप्न व संकल्पनगर यांमध्यें एकच लक्षत्वास प्राप्त होतें. त्याप्रमाणें एकच चित् स्वप्नामध्यें सेना बनते व तीच सहस्ररूप झालेली चित् सुषुप्तींत एकरूपत्वास प्राप्त होते. स्वप्नसंकल्पभूत सेनेच्या स्मरणामध्यें समूहरूपत्वानें तिचा एकाकार झाला असतां 'हें' असें जें म्हणावयाचें त्याबद्दल 'तें' अशी कल्पना करून विपरीत अनुभव येतो हें सर्व अनुभवसिद्ध आहे. कारण संकल्प आणि स्वप्ननगर यांमध्यें असा अनुभव कोण घेत नाहीं? या संविदाकाशमात्र अनुभवरूप जगांत असा अनुभव प्रत्येकाला येतो. तस्मात् या चिदाकाश संकल्परूप जगदात्म्यांत संभवत नाहीं असें काय आहे? व संभवतें असें तरी काय आहे? ही भ्रांति अशीच भासत आहे. तें प्रकाशरूप आकाश आहे. यांत सत्, किंचित् सत् किंवा असत् कांहीं नाहीं. तत्त्वदर्शी पुरुषाला सर्व एकरूप दिसतें. ज्याचा ज्याचा जसा अनुभव घ्यावा तसें तसें तें दिसतें. ज्ञानी पुरुषाला त्यांत असमंजस तें काय आहे? मनुष्य येथें विहित धर्माचें आचरण करतो व शास्त्राप्रमाणेंच स्वर्गाची कल्पना करतो. देव, त्याचे उपभोग्य अमृतरसाचे निर्झर व फलपुष्पादिकांनीं पूर्ण असे पर्वत स्वर्गामध्यें आहेत, अशी शास्त्रावरून कल्पना करून त्याविषयींचा संकल्प दृढ करून, त्याच्या प्राप्तीसाठींच मी हें धर्माचरण करीत आहें, अशी कल्पना करून मेल्यावर स्वर्गांतील तसल्याच पर्वतास प्राप्त होतो. अर्थात् स्वर्गासाठीं जर त्यानें धर्मानुष्ठान केलें असेल तर मेल्यावर आपण त्या स्वर्गास प्राप्त झालों आहों असा त्यास कां अनुभव येऊं नये? आतां कदाचित् तूं असें म्हणशील कीं, सर्वच मिथ्या असल्यामुळें असें होणें असमंजसपणाचें आहे. तर मग हा लोक, येथें केलेलें धर्मानुष्ठान, त्यामुळें प्राप्त होणारा परलोक, त्यांतील भोग इत्यादि सर्व असमंजस म्हटलें पाहिजे. कारण जगत् हें संकल्पनगर आहे हें आम्हीं वर सांगितलेंच आहे. पण या असल्याहि जगांत जर कांहीं भूतभुवनादि वस्तु सुस्थिर असेल तरच हा विरोध येईल. त्या वेळीं 'हें समंजस आहे, हें असमंजस आहे' अशा प्रकारचा सर्व न्याय अकुंठित होईल. पण सर्व द्रष्टा संविद्रूप असल्यामुळें आपआपल्या संकल्पालाच दृश्यरूपानें पहातो. अशा प्रकारचा आम्हीं सांगितलेला हा असमंजसतेच्या परिहाराचा न्याय

स्वप्न व संकल्प यांनीं सिद्ध झालेल्या कल्पनांमध्यें अनुभवास येतो; यास्तव तोच जगालाही लागू करावा. कारण जगत्‌हि ब्रह्मस्वरूपानेंच स्थित असलेल्या चितीचा संकल्पच आहे. ज्याप्रमाणें तुझ्या संकल्पनगरामध्यें असंभवनीय असें कांहींच नाहीं, त्याप्रमाणें हिरण्यगर्भाच्या संकल्पांतहि कोणत्याच पदार्थाची असंभावना नाहीं. त्या ब्रह्मसंकल्पामध्यें जें जसें कल्पिलेलें असतें तें त्याच आकारानें व त्याच स्वभावानें स्थित असतें. तशा प्रकारच्या स्वभावनियमानेंच ज्ञानेंद्रियांनीं सर्व वस्तूंचें उत्तम प्रकारें परीक्षण प्रवृत्त होतें. त्यांच्या विषयग्रहणामध्यें विसंवाद कधींच होत नाहीं. त्याचप्रमाणें कर्मेंद्रिय-व्यवहारांतहि संकल्प प्रवृत्त होत नाहीं. एका चित्-प्रयत्नानें केलेला निश्चय दुसऱ्या विरुद्ध चित्-प्रयत्नावांचून अन्यथा होत नाहीं. कल्पाच्या आरंभापासून प्रलयापर्यंत ब्रह्मदेवाच्या संकल्पांत जसें भासलें, तसेंच हें जगत् स्थित आहे. प्रलयानंतर संकल्परूपानेंच दुसऱ्या ब्रह्मांडाला आरंभ होईल. प्रत्येक कल्पामध्यें संकल्पात्मक जगत् तसेंच भासतें. स्वप्नामध्यें स्वप्नपुर जसें भासतें, तसेंच प्रत्येक जीवाला चित्स्वप्नामध्यें हें जगत् भासतें. संकल्पनगररूप अशा या जगांत संभवत नाहीं असें कांहींच नाहीं. सर्व संभवतें व तें कल्पना करणाऱ्या या चिदात्म्याहून पृथक् नसतें. त्यामुळें सर्व जगत् ब्रह्मच आहे, असें तूं जाण. २०९.

---

## सर्ग २१० वा.

१. अवशिष्ट प्रश्नांचें समाधान. २. विवेकदृष्ट्या देहादि जगाला ब्रह्ममात्रत्व.

श्रीवसिष्ठ:—आतां अक्षय चंद्रप्रभारूप फल शेंकडों उपासकांनीं प्राप्त करून घेतलें असतां आकाश शेंकडों पूर्ण चंद्रांनीं युक्त कसें होत नाहीं, तें सांगतों ऐक. चंद्रबिंबाचें ध्यान करणारे प्राप्तव्य जो चंद्रभाव त्यामध्यें चिरकाल ध्यानानें अन्यभाव विसरून तद्रूप होऊन राहतात. म्हणजे ते चंद्रभावास प्राप्त झालेलेच असतात; पण ते या आकाशतलाला प्राप्त होत नाहींत. किंवा या चंद्रामध्यें प्रवेशहि करीत नाहींत. कारण एकाच्या संकल्पपुराला दुसरा प्राप्त होतो असा कधीं तरी अनुभव येतो का, सांग बरें? संकल्पकर्त्या पुरुषाला आपल्या संकल्पनगरांतील पदार्थांचीच प्राप्ति होणार हें उघड आहे. दुसऱ्याच्या संकल्पनगरांतील पदार्थांची त्याला प्राप्ति होणें शक्य नाहीं. ते चंद्रोपासक आपापल्या भिन्न भिन्न संकल्पसृष्टींतील आकाशांतच स्थित आहेत. तेथेंच ते कलाक्षयरहित चंद्र होऊन चमकत आहेत. जो ध्याता 'मी याच चंद्रामध्यें प्रवेश करीन' असें ध्यान करतो, तो याच चंद्रामध्यें प्रवेश करतो. मीं चंद्रामध्यें प्रविष्ट व्हावें व चंद्रबिंबाच्या सुखानें युक्त व्हावें असें जो ध्यान करीत असेल तो तशा सुखाला पात्र होतो, हा अगदीं निश्चय आहे. कारण ही अव्यय संविद् जशा स्वभावाचें अनुसंधान करते तसाच त्याचा अनुभव घेते. पण त्याविषयीं तिचा दृढ निश्चय मात्र झाला पाहिजे. सर्व ध्यान करणारांना स्वसंकल्पामुळेंच जसें पृथक्-पृथक् चंद्रत्व प्राप्त होतें, त्याप्रमाणेंच काल्पनिक स्त्रीचाहि पृथक् लाभ होतो. एक साध्वी ज्या लक्ष ध्यान करणारांच्या ध्यानामध्यें भार्यात्वास प्राप्त झालेली असते, त्यांचा अंत:करणोपहित साक्षीमध्यें तसाच कल्पनानुभव स्थित असतो. गृहांतून बाहेर न पडलेला जीव सप्त द्वीपांमध्यें राजा होऊन रहातो, त्याचेंहि तें काल्पनिक राज्य स्वचित्ताकाशांतच असतें. जेव्हां हें आम्हांला दिसणारें जगत्‌हि हिरण्य-

गर्भाच्या कल्पनामात्र आहे, तेव्हां त्या जगांत उपासकांनीं कल्पिलेल्या अन्य जगांमध्यें सत्यत्व कोठचें ? आतां दान, और्ध्वदेहिक कर्म, तप, जप, इत्यादि अमूर्तांचें परलोकीं मूर्त फळ कसें मिळतें, तें मी सांगतों ऐक. ज्यांच्या बुद्धि दानादिकांनीं चिन्हित झालेल्या असतात, त्यांना परलोकीं स्वप्नाप्रमाणें फलाचा अनुभव येतो. कारण दानादि जरी अमूर्त असलीं तरी चैतन्यानेंच त्यांच्या मूर्त आकाराची कल्पना केलेली असते. मन व ज्ञानेंद्रियें यांनीं वेदनावेदनाकार भ्रांति होते. त्या भ्रांतीनें विषयप्राप्तीसाठीं तें चिन्मात्र मनासह कर्मेंद्रियांनीं स्पंदास्पंदरूप बनतें. पण ती भ्रांति शांत झाली कीं तें निर्मल शांतरूपच रहातें. येथें केलेल्या दानामुळें परलोकीं चित्प्रतिभासात्मक तें तें फळ समीप येतें व त्याविषयीं संकल्प करणारा जीव त्याला प्राप्त होतो, असें विद्वान् सांगतात. या दानापासून किंवा अदानापासून अकृत्रिम संकल्पच भोगैश्वर्यादि दानफल व दारिद्र्यादि अदानफळ परलोकामध्यें असो, त्यांत कांहीं विरोध नाहीं. हे राजा ! तूं जें विचारलें होतेंस तें हें सर्व मीं तुला सांगितलें आहे. हें सर्व जगत् अप्रतिघ चिन्मात्र संकल्परूप आहे.

राजाः—भगवन् ! सृष्टीच्या आरंभीं देहशून्य चैतन्य व त्या चैतन्यानेंच केलेली देहकल्पना कशी होते ? कारण देहावांचून चित् अनुभवालाच येत नाहीं. कारण एखाद्या दिव्याची प्रभा आधारावांचून जशी असावी त्याचप्रमाणें त्या वेळीं चैतन्य असतें.

श्रीवसिष्ठः—हे महामते ! तूं देहशब्दाचा जो अर्थ समजला आहेस तो तत्त्वज्ञाला संमतच नाहीं. आकाशामध्यें शिलेच्या नृत्याप्रमाणेंच तो त्याला भासतो. ब्रह्मशब्दाचा जो अर्थ तोच देहशब्दाचा अर्थ आहे. जल व पाणी, यांप्रमाणें या दोन शब्दांच्या अर्थीमध्यें मुळींच भेद नाहीं. स्वप्नाप्रमाणें असलेला हा देह ब्रह्मच आहे. हा स्वप्नच आहे. पण ही सुद्धां तुझ्या बोधासाठींच युक्ति सांगितली जात आहे. वस्तुतः ब्रम्ह कांहीं स्वप्न नव्हे. स्वप्न हा पदार्थ तुझ्या परिचयाचा आहे. त्यामुळें त्याचा दृष्टांत देऊन मी तुला बोध करीत आहें. पण स्वप्न हा बाधित होणारा अर्थ आहे. त्याच्याशीं चिदात्म्याकडून प्रकाशित केलेल्या जाणाऱ्या सर्गाचें सादृश्य कसें असेल ? तें शक्यच नाहीं. त्यांत देह हा काय पदार्थ आहे ? हे स्वप्नांतील पदार्थ कोणाचे ? किंवा स्वप्नबुद्धि कशी होते ? याप्रमाणें ज्ञानी पुरुषाकडून भ्रम ह्मणून जाणल्या जाणाऱ्या स्वप्नाच्या दृष्टान्तानें अज्ञानी जीव बोध केला जातो. त्यांत जाग्रत् नाहीं, स्वप्न नाहीं, सुषुप्त नाहीं व दुसरेंहि कांहीं नाहीं. तर हें कांहीं आकाशरूप अनिर्वाच्य भान आहे. तें तुरीयरूप 'ओं'—मौन आहे. त्यांत सर्वसाधनें व पुरुषार्थ यांची परिसमाप्ति होते. जें हें आतां जणुं काय भासतें आहे तें अभासच आहे. पूर्वीं जें भासलें तेंहि तसेंच अभास आहे. अर्थात् जाग्रत्स्वप्नादि ज्या प्रकारें कदापि नाहींच, तसें हें अत्यंत स्वच्छ ब्रम्ह आहे. एका देशाहून दुसऱ्या देशास प्राप्त झालेल्या चितीचें मध्यें जें निर्विषयचिन्मात्रमय स्वरूप असतें, तन्मयच हें सर्व द्वैत व अद्वैत आहे. अज्ञ पुरुषाच्या दृष्टीहून अन्य दृष्टीमध्यें म्ह० ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीमध्यें स्वप्न, द्वैताद्वैत, शुभाशुभ वगैरे सर्व चिन्मात्र आकाशच आहे. हें जगत् पूर्ण ब्रम्हापासून प्रसार पावलेलें असल्यामुळें तें पूर्णच स्थित आहे. त्याची निरावरण चिन्मात्र आकाशाशींच तुलना केली जाते. शून्य, विषयानुभव, भाव, अभाव, द्वैत, ऐक्य, असत्, सत् हें सर्व श्रेष्ठ चिदाकाशच आहे. तें प्रकाशरूप नाहीं आणि अप्रकाश-

रूपहि नाहीं. स्फटिकशिलेचा जो घन मध्य-भाग त्यासारखें हें आहे. ज्याअर्थीं जगत् हा चित्चा विकास आहे, त्याअर्थीं तें अप्रतिघ आकाशरूप आहे. चिन्मात्र जेथें जेथें आहे, तेथें तेथें जगत् रहाणें उचित आहे. चिदाकाश सर्व ठिकाणीं आहे. त्यामुळें हें सर्व जगत् चिन्मय आहे, सर्व शांत ब्रह्मच आहे. त्यालाच जगत् असेंहि नांव आहे. जसें हें विश्व स्थित आहे तसेंच अनामय शुद्ध स्वरूप ब्रह्मच विस्तारलें आहे. ही चित् संकल्पनगराची आकृति आहे. दुसऱ्या कोणत्याहि युक्तीचा येथें असंभव असल्यामुळें येथें हीच युक्ति प्रशस्त आहे. अनुभव व युक्ति यांना सोडून बोल बोलणें ज्ञात्यांना केव्हांच शोभत नाहीं. लोक, शास्त्र व वेद यांमध्यें जें सिद्ध आहे तें सिद्धच होय. यास्तव वेदादिकांवरून जें सत् किंवा असत् ठरलें असेल तें कधींहि कोणाला टाकतां येणें शक्य नाहीं. तेंच असें जाणलें असतां ब्रह्मत्वाला प्राप्त होतें. जेव्हां चरमसाक्षात्कार-वृत्तिरूप ज्ञानासहवर्तमान तें स्थित असलेलेंच जगत् लीन होतें तेव्हां पूर्वीं अब्रह्म म्हणून जाण-लेलें विश्व ब्रह्म बनतें. मीं सांगितलेल्या या सवि-स्तर न्यायानें जीवन्मुक्तिसहित लोकवेदादि सर्व जगत् हें ब्रह्मच असें सिद्ध होतें. यास्तव हा मीं सांगितलेला न्यायच परमपुरुषार्थाचा उपाय या रूपानें ग्रहण करण्यास योग्य आहे. या अज्ञानमात्ररूप संसारवृत्तांत परिज्ञात चिदाका-शच आहे. त्याहून अणुमात्रहि अन्य कांहीं नाहीं. तो अपरिज्ञात व परिज्ञात चिदाकाश मींच असून मीच हें त्रिजगत् व पर्यायानें बंध-मोक्ष आहे, हा निर्णय होय. आत्मज्ञानानंतर हें जगत् जसें आहे तसें रहात नाहीं. तत्त्वज्ञाचें स्वरूप सर्व दृश्यरहित व वाङ्मनसातीत दृङ्मात्र अवशिष्ट रहातें. जीवन्मुक्त लोकांमध्यें, शास्त्रा-मध्यें व वेदांमध्यें शतशः विचारानें जें सिद्ध होतें तेंच स्वानुभवानें सर्व प्रकारें ज्ञात होतें. आणि तेंच परमपुरुषार्थभावानें फलद्रूप होतें. इतर सर्व विषयांचा त्याग करून ज्याची ज्याची दीर्घ भावना करावी, तें तेंच प्राप्त होतें. लौकिक कार्यामध्येंहि ज्याचें निश्चयानें चिंतन करावें तेंच प्राप्त होतें असा अनुभव आहे. यास्तव ब्रह्मैकनिष्ठ होणें हाच ब्रम्हप्राप्तीचा उपाय आहे. लौकिक कार्य असत्य व मोक्ष सत्य असा जरी फलामध्यें मोठा फरक असला तरी साधनाविष-यींचा उद्योग व त्याच्या फलाचा अनुभव यांमध्यें कांहीं फरक नाहीं. यास्तव ज्याचा ज्याचा जसा जसा अभ्यास करावा, त्याचा त्या-चा तसा तसाच अनुभव येतो. फललाभापर्यंत एकनिष्ठ होऊन यत्न करणें हाच एक इष्टफल-प्राप्तीचा उपाय आहे. हे मतिमान् महात्म्या ! याप्रमाणें मीं तुझ्या महाप्रश्नांचें विचारफलनिर्ण-यरूप समाधान सांगितलें. तूं या मार्गानें जा; म्हणजे सत्वर मनामध्यें आधिरहित, देहामध्यें व्याधिरहित व इंद्रियांमध्यें व्यसनरहित होऊन सर्वोत्कृष्ट होऊन रहाशील. २१०.

## सर्ग २११ वा.

--:०:--

१ सिद्धसाध्यादि लोकांच्या दर्शनाचा उपाय, व पुन: सर्व जगत् ब्रम्हच आहे असें स्पष्ट वर्णन.

**श्रीवासिष्ठ:**--हे बुद्धिमानांतील श्रेष्ठ रामा ! मीं त्या कुशद्वीपांतील इलावती नांवाच्या नगरींत बसून त्या प्रज्ञप्तिराजाला याप्रमाणें उपदेश केला व त्यानें पुन: केलेल्या पूजेचा स्वीकार करून त्याच्यावर अनुग्रह करणें हें प्रयोजन सिद्ध झालें असतां मीं स्वर्गीं जाण्याकरितां आकाशांत उडून गेलों. आज या अयोध्येंत असलेल्या मीं तुला तेंच रहस्य सांगितलें आहे. या विवेकदृष्टीनें तूं शांत-चित्त व आकाशात्मा होशील. हें सर्व ब्रह्म

निःशब्द शुद्ध आकाशच आहे. हें अनिर्वचनीय, अज, सर्वतः शांत व आदिमध्यांतशून्य आहे. त्याला चिद्भानमात्ररूप म्हटलेलें आहे व त्यालाच ब्रह्म असेंहि कल्पनेनें म्हटलें आहे. त्याला परात्पर असेंहि म्हटलें आहे. पण तें पद नामरहित आहे.

**श्रीराम**:—हे ब्रह्मन्! सिद्ध, साध्य, यम, ब्रह्मा, विद्याधर, देव इत्यादिकांचे लोक कसे दिसतात?

**श्रीवासिष्ठ**:—सिद्ध, साध्य, यम, ब्रह्मदेव, विद्याधर, दिवौकस, देव व इतर अपूर्व भूतें, महात्मे, या सर्वांना प्रतिरात्रीं, प्रतिदिवशीं, पुढें, मागें, खालीं, वर तूं अवलोकन करूं लागलास म्हणजे पहातोस व त्यांना पहावयाचें सोडलेंस म्हणजे पहात नाहींस. हे जे सिद्ध लोक ते दोन प्रकारचे आहेत. जे हे महर्, जन, तप व सत्य या नांवाचे लोक ते स्थानतः दूर आहेत; पण हे जे दुसरे संकल्पलोक आहेत, ते सर्वत्र संचार करणाऱ्या सिद्धांचे लोक आहेत. ते सर्वत्र आहेत त्यांनीं सर्व विश्व व्यापलें आहे. त्या दोनहि प्रकारच्या लोकांचें दर्शन होण्यास धारणाभ्यास कारण आहे. तो तुझ्या ठिकाणीं नाहीं. (तर मग काय त्यांच्या दर्शनासाठीं मी धारणाभ्यास करूं?) त्यांचे नसे ते कल्पनात्मक लोक, तसाच हा आमचा लोक कल्पनामात्र सिद्ध आहे. ज्याप्रमाणें काल्पनिक असलेलाहि वायु सर्वत्र भ्रमण करतो त्याप्रमाणें ते भ्रमण करतात व आमचा लोक भ्रमण करीत नाहीं. इतकाच आम्हां दोघांत फरक आहे. अर्थात् ते लोक निःसार असल्यामुळें धारणाभ्यासानें ते पाहण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. तुला जे संकल्पस्वप्नलोक अहर्निश भासतात, तेच ते सिद्धलोक म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांनीं तसलेच दुसरे लोकहि निर्माण करून संकल्पानेंच स्थिर केलेले आहेत. तूंहि जर योगधारणा स्थिर करून ध्यानानें स्वकल्पनाप्राप्त लोकांना स्थिर करशील तर तेहि निर्विघ्नपणें स्थिर होतील. त्याच न्यायानें दुसराहि जरी कोणीं दृढतर ध्यातृसंकल्पभावानें युक्त असेल तर तोहि इष्ट विस्तार व अभिमत संपत्ति यांना सिद्ध असल्याप्रमाणें पाहील. त्यामध्यें विशेष एवढाच आहे कीं, त्या सिद्धांनीं स्वर्गातील सिद्धलोकांना पोंचविणाऱ्या प्राक्तन धर्मसंपत्तीनें ते लोक स्थिर केलेले आहेत. त्यामुळें त्यांचे ते लोक अनायासानें सिद्ध झाले आहेत. पण जे हल्लींच्या अनित्य धारणाभ्यासांनीं ध्यानविश्रांतीसाठीं श्रम करतात, ते मोठ्या श्रमानेंच या लोकांना स्थिर करूं शकतात. सर्व जगत् सर्वदा अप्रतिघ शांत चिदाकाश आहे. त्याच्याविषयीं जसा दृढ निश्चय केलेला असतो, तसेंच जगत् भासतें, त्याच्या उलट कधींच भासत नाहीं. दृढ निश्चयानें जें स्थिर केलेलें नसतें तें भासत नाहीं, कारण त्या अनिश्चित जगाविषयीं 'आहे, नाहीं' इत्यादि प्रकारचें तर्कविषयत्वच संभवत नाहीं. तें परमाकाश शून्य अप्रतिघ व कोणालाहि प्रतिबंध न करणारें आहे. कारण जें दृढसंवेदनानें भासलेलें असतें, तें चित्स्वभावत्वानें प्रकाशरूप असल्यासारखें दिसतें. पण या असंविदित तत्त्वामध्यें स्वभावतः चित्सत्तास्फूर्तीची व्याप्ति नसते. कारणाच्या सत्तेनें कार्याची सत्ता सिद्ध होईल म्हणून म्हणावें, तर तें शक्यच नाहीं. कारण, सृष्टीच्या आरंभीं कारणाचाच अभाव असल्यामुळें जगत् उत्पन्न होत नाहीं, असें म्हणून आम्ही याचें पूर्वींच निरसन केलें आहे. अनंत व स्वतःसिद्ध अशा आकाशाचें काय व कसें उत्पन्न होणार? पण असें असतांहि जें भूतभुवनादि उत्पन्न झालेलें दिसतें तें

आकाशांत आकाशच झाल्यासारखें दिसतें. त्यामुळें त्यांत एकत्व, द्वित्व इत्यादि निराकार कल्पना तरी कशी होणार? तें जसें होतें तसेंच आतांहि निर्विकार आहे. जसें स्वप्नांत आकाशच पर्वतासारखें होतें, तसें निर्विकार ब्रह्मच जगत् झालें आहे. संकल्पामध्यें चित्च आकाराची कल्पना करून पर्वताच्या लीलेनें उदय पावते. पण वस्तुतः तो पर्वत नव्हे व तें आकाशहि नव्हे. त्याच न्यायानें ब्रह्म जगत् झालें आहे. यासाठींच महाबुद्धिमान् जीवन्मुक्तच आपल्या दृष्टीनें काष्ठाप्रमाणें मौन धारण करून बसतात. तथापि लौकिकदृष्ट्या लाकडी बाहुलीप्रमाणें ते भाषणादि व्यवहार करीत असतात. ज्याप्रमाणें जलामध्यें तरंग-आवर्तादि उद्भवतात व ते जलरूपानेंच परिवर्तन करीत असतात, त्याप्रमाणें ब्रह्मामध्यें सृष्टि आहेत. ज्याप्रमाणें वायूमध्यें प्रस्पंद व आकाशामध्यें शून्यता अनन्य असते, त्याप्रमाणें ब्रम्हामध्यें या सृष्टि अनन्य व अमूर्त असतात. जसें संकल्पनगर शून्यच असतांना नगरासारखें दिसतें त्याप्रमाणें ब्रम्हामध्यें साकार असलेलेंहि जगत् निराकार आहे. या त्रिभुवनाचा चिरकाल अनुभव आलेला आहे व तें लौकिक-वैदिक कार्यालाहि समर्थ आहे. तथापि शून्य व निराकार संकल्पनगराप्रमाणेंच तें आहे. जो चित्तसंकल्प तेंच जसें नगर, त्याचप्रमाणें जें स्वच्छ ब्रह्म तेंच जगत् म्हटलें जातें. जगत् हा पदार्थ दीर्घकाल व नित्य जरी अनुभूत आहे तरी पुरुषाच्या स्वप्नांतील स्वमरणाप्रमाणें त्यांत वास्तविक कांहीं नाहीं. स्वप्नांत मेलेला पुरुष आपला दाहादि जसा पहातो, त्याप्रमाणें परमात्म्यामध्यें हें असत् असलेलें जगत् सत् असल्यासारखें भासतें. जगत्त्व व अजगत्त्व हें परमात्म्याचें शुद्धरूप आहे. रज्वादि पदार्थ सर्पादि नांवाचा जो विषय होतो, तो भास आहे, ती वस्तुस्थिति नव्हे. रामा! सिद्धलोक-भोगादि फल मीं वर्णन केलेल्या प्रकारानें कल्पनामात्र असो, किंवा अन्य मुनींनीं वर्णन केल्याप्रमाणें त्याहून निराळ्या प्रकारचें असो, किंवा तें मुळींच नसो, तुला जीवन्मुक्ताला त्याविषयींचा आदर कशाला पाहिजे? अतिशय तुच्छ अशा सिद्ध्यादिकांविषयीं आपली पुरुषार्थबुद्धि तूं टाक. ज्या अर्थीं तूं ब्रह्मतत्त्वाला जाणलें आहेस त्या अर्थीं तुला मायामात्र-रूप सिद्धलोक, किंवा वैभव यांच्या ज्ञानासाठीं श्रम करणें फुकट आहे. त्यापासून कांहीं साध्य होणें नाहीं. २११.

---

## सर्ग २१२ वा.

—:०:—

१. ब्रह्माची अहंभावकल्पना हाच पितामह व २. त्याचा संकल्प हेंच त्रिभुवन, यास्तव सर्व ब्रह्मच आहे असें वर्णन.

श्रीवसिष्ठः—रामा! ब्रह्म चिद्रूप असल्यामुळें मी आकाशच आहें असें जें आपोआप जाणतें तेंच परमेष्ठित्व असून हें जगत् त्याचा उदय आहे. असें असल्यामुळें वस्तुतः ब्रह्मा नाहीं व हें जगत्हि उत्पन्न झालेलें नाहीं; तर हें सर्व जसेंच्या तसेंच पूर्वीप्रमाणेंच अज परब्रह्मच आहे. स्वप्नसंवित्तींत जगद्रूप असेंच भासतें. म्हणून तें मृगजलाप्रमाणें मिथ्याच आहे. दिसत असलें तरी असत्यच आहे. अर्थात् तें प्रातिभासिक सत् होय; परमार्थ सत् नव्हे. सर्गकालापासून ही भ्रांति उदय पावली आहे; अथवा ती मुळीं उदय पावलीच नाहीं. तर मग भ्रांति कोठें, कशी व कोठची राहिली? कारण हें सर्व अनामय ब्रह्मच आहे. जगत् हा ब्रह्मजलावरील तरंग आहे, तेव्हां त्यांत द्वित्व व एकत्व कोठचें? अर्थात् जगत् ब्रह्माचा अनिर्वचनीय धर्म असला तरी त्यांत कांहीं हानि

नाहीं. आवर्त व जल यांना द्वित्व कोठचें ? व द्वित्वाचाच अभाव असल्यामुळें एकत्व तरी कोठचें ? तें ब्रह्म घन व सर्वतः शांत आहे. प्रकाशणें हा त्याचा स्वभावच असल्यामुळें 'अहं' असा अहंकार—समष्टिरूप भाव—जाणतें. त्याचें अंतस्थ स्वरूप शून्य आहे आणि तेंच आतां विषयाकार होऊन भासतें. वायु स्पंदनाप्रमाणें, अग्नि उष्णतेप्रमाणें व पूर्णचंद्र स्वशैत्याप्रमाणें ब्रह्मच स्वतः पदार्थाप्रमाणें आपल्या सत्तेला जाणतें.

**श्रीरामः**—हे ब्रह्मन्! हें अहमादि केव्हां प्रकट होत नाहीं? व हे मुने, स्वरूपचैतन्यच जर विषयाकार होऊन भासतें, तर तें सदा विद्यमान् असल्यामुळें आतांच भासतें, असें म्हणण्यांत काय अर्थ आहे? कारण तें सदाच निरावरण व आदि-अंतशून्य आहे.

**श्रीवसिष्ठः**—खरें आहे. तथापि सर्ग व असर्ग या दृष्टींमध्यें ब्रह्म जरी तुल्यरूपानें असलें तरी विषयांचें अस्तित्व व नास्तित्व हा फरक आहेच. हें सर्वदाच 'अहं' या रूपानेंहि स्फुरण पावतेंच. कारण अनादि व अज अशा याला स्वरूपचैतन्यानें स्फूर्ति पावण्यास कशाचीहि अपेक्षा नसते. सर्ग व असर्ग हें आकाशरूप ब्रह्मच सर्वदा सर्वत्र आहे. अविद्यादृष्टीमध्यें केव्हांहि हें नाहीं असें नाहीं व विद्यादृष्टीमध्यें हें कांहींच नाहीं. मिश्रदृष्टीमध्यें वायु व स्पंदन, चंद्र व शैत्य, शून्यत्व व आकाश याप्रमाणें ब्रह्म व अहंत्व हें एकरूप आहे. तें केव्हांहि स्फुरण पावत नाहीं. सर्वदाच ही अशा प्रकारची सत्ता आहे. ती याच्या उलट प्रकारची कधींहि नाहीं. ज्याअर्थी जगत् आदि-अंतशून्य आहे, त्याअर्थी तें निरामय ब्रह्मरूपच आहे. तूं केवळ अबोधामुळेंच या भिन्नदृष्टीचा आश्रय करीत आहेस. शब्दश्रवणादि व्यवहारासिद्धीकरितां ही मिश्रदृष्टिहि स्वीकारणें अयोग्य नाहीं. पण तो परमार्थ नव्हे. तूं अद्वयब्रह्मबोध झाल्यावरहि अबोधाचा स्वीकार करून माझ्या उपदेशश्रवणामध्यें आसक्त चित्त होऊन मिश्रदृष्टीमध्यें प्राप्त झालेल्या सप्रपंच निष्प्रपंचरूप द्वैताला स्वीकारीत आहेस, परमार्थदृष्ट्या नव्हे. परमार्थदृष्टीमध्यें ब्रह्म सर्वात्मक आहे. सर्वांच्या आंत असलेला कोणी जीव त्यांत जर कांहीं पहात असेल तर तें ब्रह्मच तद्रूपानें पहातो. पण निर्विशेष ब्रह्मरूपानें कोणी कांहींच पहात नाहीं. रामा! बद्ध पुरुषाच्या दृष्टीनें ब्रह्म त्रिभुवनाभासानेंच सर्वदा भासतें; पण मुक्तदृष्ट्या शांत सम ब्रह्मच आहे. येथें नाना असें कांहींच नाहीं. त्यामुळें त्या दृष्टीनें कांहींच भासत नाहीं. पण या दोन दृष्टींतील बद्धदृष्टीचा विषय बाधित होत असल्यामुळें तूं मुक्तदृष्टीचाच आश्रय करावास. आकाशापासून वृक्ष-पर्वतादि कांहीं कधींच उत्पन्न होत नाहीं, त्याचप्रमाणें ब्रह्मापासून विश्वांचा उद्भव होत नाहीं, असें जाणून परम शांतीला प्राप्त हो. उपदेश्याला उपदेश व्हावा व संदेहप्रसंगीं त्याचें निरसन व्हावें यास्तव जोंवर बोध झाला नाहीं तोंवर मिश्रदृष्टि धारण करण्यास कोणत्याहि प्रकारचीं हरकत नाहीं. जोंवर तुझी बुद्धि अल्प आहे तोंवरच जर तूं या भेददृष्टीचा स्वीकार करीत असशील तर खुशाल कर; पण एकदा आत्मसाक्षात्कार झाला कीं, मग अहंकारतत्संकल्परूप जगत् या स्वरूपाच्या प्रजापतीची भेदबुद्धि किंवा त्याच्या अभावाची बुद्धि यांपैकीं तुला कोणतीच बुद्धि होणार नाहीं.

**श्रीरामः**—भगवन्! मीं आतां जो प्रश्न केला होता त्याचें उत्तर मी समजलों. आतां आपण माझ्या बोधासाठीं समष्टयहंकारादि अध्यासाचें निरूपण करावयास आरंभ केला होता, त्याचेंच पुढें निरूपण करा. त्या परम

पदामध्यें अनंतत्वाचें स्फुरण झालें असतां पुढें काय होतें? आपण सर्वज्ञ असल्यामुळें सर्व जाणतां, आपलें वचन ऐकण्याची इच्छा करणारा मीं तृप्त होत नाहीं, यास्तव पुढें सांगा.

श्रीवसिष्ठः—याप्रमाणें अहंत्वाचा आरोप झाला असतां त्या अहंतेमध्यें आकाशाचा अध्यास प्रवृत्त होतो; दिक्सत्ता, कालसत्ता व त्रिविध परिच्छेद यांचा अध्यास होतो. जेव्हां त्याला या देहादिकांमध्यें 'अहं' असें भासतें, तेव्हां देहशून्यस्थानीं मी नाहीं, असें भासणें अगदीं साहजिक आहे. हाच देशकृत परिच्छेद होय. अशाच रीतीनें नानाप्रकारचा कालकृत परिच्छेद व वस्तुकृत-परिच्छेद होतो. स्वात्माच क्रमावांचून द्वैतरूपानें उदय पावतो. या आकाशात्मक सत्तांचा वाचक शब्दाध्यास उत्तरकालीं होतो. त्या वेळीं तें आकाशच आहे. जातिगुण इत्यादिकांच्या योगानें या वस्तूचें हें नांव, याचें हें, इत्यादि नामभेदाचा अध्यास होतो. त्यांतील अहंकाराच्या अवच्छेदामुळें प्रतिशरीरीं साक्षिचैतन्यामध्यें जरी भेद भासला तरी तें चैतन्य आवरणशून्य असल्यामुळें त्यांत स्वाभाविक चित्ची अभिव्यक्ति होते व त्यांत अध्यस्त जगाच्या आकारानें ब्रह्मच अब्रह्म असल्यासारखें भासतें. हें जें प्रतिभासरूप वेदन भासतें, तेंच दृश्य होय. शांत, अज, एकच, अनादिमध्य ब्रम्हच —चिदाकाशच— जणुं काय जीवभावना करून आवरणशून्य जीव साक्षी आकाशांतच अत्यंत विस्तृत दृश्य पहातो. तत्त्वज्ञान होईपर्यंत तें आपल्या स्वरूपालाहि विपरीतपणानें भासतें. २१२.

---

# सर्ग २१३ वा.

१. राम व वसिष्ठ यांच्या पूर्व संवादाचें गुरुशिष्यांच्या आख्यायिकारूपानें वर्णन.

श्रीवसिष्ठः—हे रामा! तूं मला आज जगत्तत्त्व व आत्मतत्त्व जसें विचारलेंस तसें पूर्वींहि दुसऱ्या रामजन्मामध्यें विचारलें होतेंस. त्या जन्मांतहि मी तुझा गुरु व तूं माझा शिष्य होतास. पूर्वीं एका कल्पांत कोणा एका निर्जन वनांत अशीच गुरुशिष्यरूप प्रतिभा उत्पन्न झाली. तूं असाच राम होतास, मी वसिष्ठ होतों; तुला वैराग्य आलें, मजपाशीं आलास व तूं माझ्यापुढें बसून मला असाच प्रश्न केलास. त्या वेळीं तुझी बुद्धि किंचित् उद्दाम होती. त्यामुळें तुला बोध झाला नव्हता.

शिष्यः—हे भगवन्! माझ्या या एका फार मोठ्या संशयाचें निरसन करा. महाकल्पांत नाश कशाचा होतो? व कोणती वस्तु नाश पावत नाहीं?

गुरुः—हे पुत्रा! हें सर्व दृश्य पूर्णपणें नाश पावतें. ज्याप्रमाणें स्वप्नांतील नगर सौषुप्त स्थितीला प्राप्त होणाऱ्या आत्म्याच्या तन्मात्ररूपानें अवशिष्ट राहून बाकी पूर्णपणें नाश पावतें, त्याप्रमाणें जगत्हि प्रलयामध्यें नाश पावतें. त्या वेळीं भूमि, पर्वत, दशदिशा, क्रिया, काल, हें सर्व निःशेष नाश पावतें. त्यांतील कांहीं अवशिष्ट रहात नाहीं. सर्व भूतें नाश पावतात. सर्व जगदाभासासह आकाशहि अव्याकृतामध्यें लय पावून नाश पावतें. भोग्याची स्थिति भोक्त्याच्या अधीन असते व प्रलयकालीं उपलब्धा व भोक्ता यांचा असंभव असतो. तेव्हां त्या वेळीं भोग्य कसें रहाणार? ब्रह्मा, विष्णु, इंद्र, रुद्र इत्यादि जे कारणांचेहि कारण असलेले ईश्वर त्यांचाहि प्राकृत व वैज्ञानिक प्रलयामध्यें नाश होतो त्यांचें नांवहि

त्या वेळीं उरत नाहीं. त्या वेळीं केवळ चिदाकाश अवशिष्ट रहातें. अन्यय चिद्वस्तूवरील विवर्त नाहींसा झाला म्हणजे चिदाकाश रहातें, असें अनुमान करतां येतें. कारण आपल्यावर आरोपिलेल्या सर्गाचा अनुभव घेणारा जो चिदात्मा त्याच्या योगानेंच सर्व प्रपंचशून्य तत्कालशेषता सिद्ध होते. कारण त्याचाहि नाश झाल्यास साक्षिरहित प्रलयच सिद्ध होणार नाहीं.

शिष्यः—भगवन्! सद्वस्तूचा अभाव व असद्वस्तूचा भाव संभवत नाहीं. तेव्हां हें इतकें विस्तृत व विद्यमान असलेलें जगत् कोठें जातें?

गुरुः—पुत्रा! हें तुझें म्हणणें बरोबर नाहीं. कारण हें जगत् नाश पावतेंच. सावयव पदार्थाचा नाश होतो हें श्रुति, स्मृति, प्रत्यक्ष, अनुमान इत्यादि सर्व प्रमाणांनीं सिद्ध आहे. तेव्हां तें विद्यमान नाहींच. अर्थात् 'असत् असलेल्या याचा भाव नाहीं' हें तुझें म्हणणें आम्हांला अनुकूलच आहे. त्याचप्रमाणें सत्चा अभाव नाहीं; कारण जें वस्तुतः आहेच तें केव्हांहि अभावात्मक म्हणजे असत् होणें शक्य नाहीं. सद्भाव विनाश कसा पावणार? जें सत् तें असत् कसें होईल? मृगजल स्थिर कसें असेल? दोन चंद्रांविपर्यांचा भ्रम खरा कसा असेल! आकाशांतील केशदृष्टि अबाधित कशी राहील? भ्रांतीनें आलेला अनुभव दीर्घकाल कसा टिकेल? हे पुत्रा! हें सर्व दृश्य स्वप्नांतील पुराप्रमाणें असत् व भ्रांतिमात्र आहे. तें शांत कसें होणार नाहीं? ज्याप्रमाणें स्वप्ननगर पूर्णपणें शांत होतें, त्याप्रमाणें हें विश्व सर्वदा सर्वत्र नाश पावतें. ज्याप्रमाणें जाग्रदवस्थेमध्यें स्वप्न किंवा स्वप्नदशेमध्यें जागर किंवा शांत झालेलें स्वप्ननगर बाधित होऊन एका क्षणांत कोठें जातें व कोठें रहातें हें योग्यांनाहि दिसणें शक्य नाहीं, तसेंच हें बाधित झालेलें जगद्दृश्य कोठें जातें तें कांहीं कळत नाहीं. म्हणूनच त्याला असत्त्व आहे.

शिष्यः—गुरुवर्य! दृश्य जर नाहींच, तर दृश्यरूपानें कांहीं काळ परमार्थतः काय भासतें? व तेंच बोधानंतर तसें कां भासत नाहीं?

गुरुः—हे पुत्रा! हें स्वच्छ चिदाकाशच शुक्तीप्रमाणें जें चकाकत आहे तेंच हें जगत् होय. जगत् म्हणून त्याहून निराळें कांहीं नाहीं. अति विस्तृत अशा या चिदाकाशाचेंच हें मूर्तामूर्तरूप आहे. हें चिदाकाश आपलें स्वच्छरूप न सोडतांच असें भासतें. सृष्टि व क्षय या रूपानें स्फुरणें हें त्याचेंच स्वरूप आहे. ज्याप्रमाणें अवयवीचें स्वरूप अवयवभेदांनीं भिन्न असल्यासारखें दिसतें, त्याप्रमाणें हें आकाशरूप शुक्ल व कृष्ण होतें ज्याप्रमाणें स्वच्छ उदकानें भरलेल्या डोहांत पडलेलें प्रतिबिंब क्षणि झालें असतां हा प्रसिद्ध बिंब-प्रतिबिंबभेद एकच आहे, त्या डोहामध्यें प्रवेश करून बिंबप्रतिबिंबभावानें प्रतीत होण्यापूर्वींहि तो एकच; त्याप्रमाणें ब्रह्महि सृष्टि व सृष्टीचा क्षय ५। दोन्ही समयीं अक्षय व अद्वयच आहे. ज्याप्रमाणें स्वप्न व सुषुप्त या दोन्ही अवस्थांमध्यें एक निद्राच सतत अक्षय असते, त्याप्रमाणें सर्गामध्यें व प्रलयामध्यें एक ब्रह्मचैतन्य अन्यय आहे. ज्याप्रमाणें स्वप्नांतील जगत जाग्रत् व सुषुप्ति या दोन अवस्थांमध्यें पूर्णपणें शांत होऊनच निवृत्त होतें, त्याप्रमाणें हें आमचें जगत् बाधित होऊन अशेषतः शांत होतें. बाधित झाल्यामुळें तें शून्यसंज्ञक स्वाप्न जगत् दुसऱ्या दिवशीं कसें रहातें, हें आम्ही जाणत नाहीं. दुसऱ्या पुरुषांच्या जीवाकाशांत तें राहील ही मुळीं शंकाच नको. कारण आमच्या वासनामय शब्दाचा आमच्या चिदाकशांतच संभव आहे. त्यामुळें अबाधितच दशेंतहि तो दुसऱ्याच्या चिदाकाशांत असण्याचा संभवच नाहीं. आम-

च्या अनुभवानें सिद्ध असलेला सर्ग प्रबोधानें बाधित होऊन दुसऱ्याच्या संविदाकाशांत जर शिरूं लागला तर दुसऱ्याच्या प्रबोधानें शुद्ध चिदाकाशाचें स्फुरणच होत नाहीं, असें म्हणावें लागेल. पण त्याला कांहीं प्रमाण नाहीं.

शिष्य:—भगवन्! आमच्या संविद्चा विषय दुसऱ्याच्या संविदमध्यें भासत नाहीं, असें जर असेल तर स्वप्न पहाणाऱ्या पुरुषाच्या अपेक्षेनें भिन्न असलेला जागृत पुरुष जसा दृश्य पहात असतो, त्याप्रमाणें प्रलयसमयींहि दुसऱ्या पुरुषामध्यें जगदादि बुद्धि असते, असें मला वाटतें.

गुरु:—हे महा प्राज्ञा! तूं म्हणतोस तें अगदीं खरें आहे. पण जगत् हें चित्चें कांहीं स्वरूप नाहीं. त्यामुळें तें सर्वांना सारखेंच दिसत नाहीं, तर चैतन्याच्या ठिकाणीं आरोपिलें आहे व तसेंच तें भासतें. पण इतरांना तसें भासत नाहीं. यास्तव द्रष्ट्याच्या कल्पनेप्रमाणें त्याचें स्वरूप व्यवस्थित आहे. तें सर्वांना एकाच रूपानें भासत नाहीं. त्यामुळेंच तें तुच्छ आहे. तें सत् नव्हे. तर तें निरनिराळ्या जीवांच्या चिदाकाशस्फुरणमात्र आहे. तेव्हां त्यांत सत्-असत्दृष्टि कोठची! चिदाकाशरूपानें तें आहे म्हणून म्हटलें तर तें जगत् सर्व प्रकारें सर्वत्र सर्वदा आहे. पण स्वरूपानें कांहींच कोठेंहि व केव्हांहि नाहीं. ज्या अर्थीं तें ब्रह्मच सत् व असत् आहे, त्याअर्थीं तें जगत्हि सत् व असत् भासतें. ज्या अर्थीं चिदाकाश नाश पावणारें नाहीं त्या अर्थीं चिदाकाशमय जगत्हि नाश पावणारें नाहीं. ज्याअर्थीं तें चिदाकाशच सृष्टिप्रलयरूप आहे, त्याअर्थीं तें अज्ञानावस्थेत दु:खाला कारण होतें व ज्ञात झालें असतां सर्व दु:खांचा क्षय करतें. ज्याप्रमाणें अज्ञ पुरुषाच्या दृष्टीनें तें सर्वत्र, सर्वदा, सर्व प्रकारें विद्यमान आहे, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें तें सर्व प्रकारें सर्वत्र, सर्वदा नाहीं. हा देवच घट, पर्वत, पट, स्फोट, तट, वट, तृण, अग्नि, स्थावर, जंगम इत्यादि सर्व आहे. आहे, नाहीं, शून्य, क्रिया, काल, आकाश, पृथ्वी, भाव, अभाव, ऐश्वर्य, नाश, शुभाशुभपाश इत्यादि सर्व तोच आहे. जें तो नव्हे तीं वस्तुच नाहीं. तो नित्य, एक व त्याचप्रमाणें सर्वत्र आहे. आदिमध्य-अंत व त्रिकाल तोच आहे. अज्ञदृष्टच्या सर्व, सर्व प्रकारें, सर्वत्र, सर्वदा आहे व ज्ञानिदृष्टच्या सर्व, सर्व प्रकारें, सर्वत्र, सर्वदाच नाहीं. रामा! ज्या वेळीं असें आहे त्या वेळीं सर्वच, सर्वत्र, सर्वदा आहे. सर्व ब्रह्मरूप असल्यामुळें स्वप्नसंकल्पपुरन्यायानें सर्व तेंच आहे. भावानें पाहिलें असतां सर्व पदार्थ, सर्व ब्रह्मकर्ते सर्वभोक्ते व सर्वेश्वर आहेत. ब्रह्मात्मत्वामुळें तृण कर्ता, तृण भोक्ता व तृण विभु आहे. घट कर्ता, घट भोक्ता व घटच सर्वेश्वरांचा ईश्वर आहे. पट कर्ता, पटच भोक्ता व पटच सर्व ईश्वरांचा ईश्वर आहे. दृष्टि कर्ता, दृष्टि भोक्ता व दृष्टिच इंद्रादि सर्वांचा ईश्वर आहे. पर्वत कर्ता, पर्वत भोक्ता व पर्वतच सर्व ईश्वरांचा ईश्वर आहे. पुरुष कर्ता, पुरुष भोक्ता व तोच सर्वेश्वरांचा ईश्वर आहे. सर्व वस्तूंतील प्रत्येक वस्तु कर्ता, भोक्ता व श्रेष्ठाहून श्रेष्ठ, अनादि, निधन, धाता आहे. कारण सर्व ब्रह्मात्मक आहे. हे तृण-घटादि सर्व पदार्थ आपल्या प्रत्यगात्मरूपानें विभु आहेत. ज्या रूपामध्यें क्षय व उदय हे भासतात, तशा प्रकारचीच ही विभुता स्थित आहे. ज्यांच्या मतीं बाह्य पदार्थ आहे, त्यांचा तोच कर्ता व भोक्ता. ज्यांच्या मतीं केवल विज्ञानच आहे व बाह्य पदार्थ नाहीं, त्यांचें तें विज्ञानच कर्ता व भोक्ता. शून्यवाद्यांना कर्ताहि नको व भोक्ताहि नको. पाशुपतादिकांना त्यांच्या प्रक्रियेनें युक्त असा ईश्वरच

कर्ता व भोक्ता वाटतो. तात्पर्य, वाद्यांच्या या सर्व कल्पना त्या उत्तमोत्तम परमपदांत संभवतात. सर्व शक्तिमान् व सर्वात्मक अशा त्या पदामध्यें वाद्यांच्या परस्परविलक्षण पदार्थप्रक्रिया, साधनानुष्ठान, फल इत्यादि विधि, परस्परांनीं केलेले त्यांचे प्रतिषेध इत्यादि सर्व कांहींएक विरोध न येतां संभवतात. कारण त्यांच्या त्यांच्या बुद्ध्यवच्छिन्न चैतन्यांत वर–शापाप्रमाणें स्वसंकल्पानुसार व्यवस्थित विवर्त संभवतात. चिदाकाश शुद्धस्वरूपांत निरनिराळ्या जीवांच्या वासनानुसार जणुंकाय दृश्यतेची भावना करीत जणुंकाय द्रष्टा होऊन स्वरूपालाच तशा जगद्रूपानें पहात सर्व ठिकाणीं वस्तुतः निर्विकारच राहण्यास समर्थ आहे. हे रामा! सर्व जीवांच्या आपापल्या अनुभवानें सिद्ध अशा सर्व पदार्थादि दृष्टि, परस्परविलक्षण अशा सर्व विधिनिषेधदृष्टि, ज्या अर्थी त्याचे त्याचे संकल्प, वेदन, अनुभवजन्य वासना, काम, व कर्म इत्यादिकांनीं युक्त असतात, त्या अर्थी तेवढ्या वेळेपुरत्या त्या दृष्टि व्यवहारसमर्थ असल्यामुळें सत्य भासतात. पण इतरांच्या दृष्टीनें त्यांची प्रतीति येत नसल्यामुळें शशशृंगाप्रमाणें त्या असत्च होत. कारण प्रत्यगात्म्याचें रूप अनुभवानुसारच जगद्रूप धारण करतें. असो. राघवा! पूर्वे युगामध्यें तूं शिष्यरूपानें स्थित होऊन मज गुरूपासून असा उपदेश ऐकलास. पण त्या उपदेशानें तूं त्या वेळीं ज्ञानी झाला नाहींस. त्यामुळें त्या अज्ञानदोषवशात् पुनर्जन्म घेऊन व दुसऱ्या जगाचा अनुभव घेऊन आज या त्रेतायुगांत या दशरथाच्या गृहांत उत्पन्न झाला आहेस व पूर्वी विचारलेलेंच मला अद्यापि विचारीत आहेस. येथेंहि मीं उपदेशिलेलें हें परमार्थवस्तुविषयक ज्ञान उत्तम, संसारलक्षण दीर्घ रजनींतील ताप व अंधकार यांचें निवर्तन करणारें असल्यामुळें जणुंकाय पूर्ण चंद्रबिंबाप्रमाणें स्थित असलेलें हें समग्र तूं ऐकलें आहेस. त्यामुळें तूं मोह व अज्ञान यांना घालवून निरतिशय आनंदरूप परमपुरुषार्थाच्या लाभानें उत्कर्ष पावला आहेस; शुद्ध एकबोधरूप झाला आहेस; कृतकृत्य झाला आहेस. यास्तव तूं व्यवहारपरंपराप्राप्त स्वराज्य परिपालनादिक कर. हे रामा! तूं विमलस्वभावतः सर्व प्रकाशमान सर्वात्मक आत्म्यामध्यें सर्व दृश्य पदार्थांपासून मुक्त होऊन निर्वाण, निरतिशय, आनंदमग्न, शांतचित्त, हो. आकाशकोशाप्रमाणें मनोहर व तृष्णारहित होऊन धर्मानें राज्याचें रक्षण कर. २१३

---

## सर्ग २१४ वा.

१ उपदेशाची प्रशंसा, २ श्रोत्यांची कृतकृत्यता, ३ देवलोकांतील व मनुष्यलोकांतील देवांचा व मनुष्यांचा महोत्सव.

श्रीवाल्मीकिः—मुनि वसिष्ठ इतकें बोलून थांबत आहे तों देवांचा दुंदुभि वृष्टि करण्यासाठीं अमृतानें भरलेल्या मेघाप्रमाणें मोठी गर्जना करिता झाला आणि जिनें सर्व दिशांचीं मुखें तत्काळ शुक्ल केलीं आहेत व त्यामुळेंच तुषारांच्या वृष्टीचीच जिला उपमा आहे अशी पुष्पवृष्टि भूलोकीं पडली. सायंकाळच्या मेघासारखा रक्तवर्ण किंजल्कसमूह हाच जिचा अंगराग आहे, त्याचप्रमाणें पुष्पोदरांतील मृदु तुषार हींच जिचीं शीतल अंगें आहेत, वाऱ्यानें हालविलेले शुभ्र केसर हेच जिचे शुभ्रवर्ण हार आहेत अशा प्रकारची ती वृष्टि देवनगरांतून स्वतःच उत्सवदर्शनासाठीं भूलोकीं आलेली जणुंकाय पुष्पलक्ष्मीच आहे अशी भासली. कल्पनाकालरूप कपीनें ज्याच्या कल्पद्रुमरूप व दिक्पालपुररूप शुक्ल शाखा

हालविल्या आहेत अशा स्वर्गरूप वृक्षापासून पडलेल्या तारासमूहाचें ती पुष्पवृष्टि अनुकरण करीत होती. दुंदुभीचा नाद हीच ज्याची गर्जना आहे व परागसमूह हेंच ज्यांतील जल आहे, अशी ती मेघरूप पुष्पवृष्टि कांहीं वेळानें शांत झाली. मनोहर पुष्पपूरानें तिनें ती सर्व सभा भरून सोडली. त्यामुळें एका क्षणांत तिनें सर्व सभ्यांच्या अतःकरणांत कौतुक उत्पन्न केलें. त्या सभेंत वसिष्ठ सर्वापेक्षां अधिक उच्च स्थानीं बसले होते. त्यांच्याजवळ विश्वामित्रादि इतर मुनि, त्यांच्या जवळ दशरथ-रामादिक, त्यांच्याजवळ मंत्री व सामंत राजे, त्यांच्यासमीप पण किंचित् अलीकडे व्यापारी, नागरिक, व इतर प्रजा अशा क्रमानें सर्व सभ्य बसले होते. त्यांनीं तीं दिव्य पुष्पें घेऊन वसिष्ठांच्या चरणांवर वाहिलीं व त्यांना नमस्कार करून पुष्पांच्या सुगंध, शैत्य इत्यादि गुणसंपर्कानें सर्व प्रकारचे क्लेश टाकले. व त्यांचीं मनें प्रसन्न झालीं.

**दशरथः**—अहाहा! हे गुरो! संसाररूप अति दीर्घ अरण्यांत फिरून अतिशय श्रांत झालेले आम्ही तुमच्या अनुग्रहानें आत्म्यामध्यें सुखानें प्रवेश करण्यास योग्य झालों आहों; व त्याच आत्म्यामध्यें चिरकाल विश्रांति पावलों आहों. जसे जाड्य व नीलत्व यांनीं रहित झालेले शरदृतूंतील मेघ हिमालयादि पर्वतांवर विश्रांति घेतात, तसेंच आम्ही आत्म्यामध्यें विश्रांति घेत आहों. तसेंच पुरुषार्थसिद्धीसाठीं अवश्य कर्तव्य असलेलीं जीं कर्में त्यांचा अवधि पूर्ण झाला. आम्ही कृतकृत्य झालों. आपत्तीचा परमावधि पाहिला. सर्व ज्ञेय पूर्णपणें जाणलें व परमपदीं विश्रांति पावलों आहों. ध्यानानें कल्पिलेलें जें दुसरें आकाश त्यांत चिरकाल विहारादि अनुभव घेणें, याच लीलोपाख्यानादिकांत वर्णिलेल्या भ्रमांनीं, धारणेनें सर्वांचा आधार असें जें ब्रम्ह त्यांत विश्रांति पावून देहत्यागक्रमांनीं संकल्पानें नवीन केलेल्या निर्माणांनीं, स्वप्नदृष्टींतील जगद्-दुःखांनीं, शुक्तिकारौप्यासारख्या अनुभवांनीं, स्वप्नांतील आत्ममरणादि दर्शनांनीं, अनन्य अशाच जलद्रवांनीं, मायेनें प्रदर्शित केलेल्या जलपूर्ण पूरांच्या विस्तारांनीं, इंद्रजालपुरांच्या पूर्तीनीं, गंधर्वनगरसमूहांनीं, मृगजलाच्या वेगांनीं, प्रलयांतील उग्र पवनस्पर्शांनीं, दोन चंद्रांच्या अनुभवोदयांनीं, मदामुळें विवेकाचा भ्रंश होऊन प्रतीत होणाऱ्या पुरस्पंदांनीं, शुभाशुभसूचक उत्पातांवांचूनच भ्रांतीनें भासणाऱ्या भूकंपांनीं, बालयक्षादिकांच्या अनुभवांनीं, आकाशांतील केशपुंजदर्शनांनीं, या अशा प्रकारच्या व दुसऱ्याहि स्वानुभव देणाऱ्या दृष्टांतांनीं आपण माझ्या दृश्यदृष्टीचें परिमार्जन केलें. खरोखर हें केवढें आश्चर्य आहे!

**श्रीरामः**—हे मुनीश्वरा! माझा मोह नष्ट झाला, व तुमच्या प्रसादानें मी परममदाला प्राप्त झालों! मी सत्य ब्रम्ह झालों. माझी बुद्धि अत्यंत शुद्ध झाली. मी आतां सर्व संशयशून्य होऊन आपल्या ब्रम्हरूप स्वभावांत स्थित आहें. माझें विज्ञान आवरणशून्य झालें आहे. आतां मी तुमच्या उपदेशाप्रमाणें वागतों. अमृताच्या वृष्टीप्रमाणें सुख देणारें तुमचें वचन पुनः पुनः आठवून, माझी कोणीं पूजा केली किंवा अपमान केला तरी समदृष्टीनें हर्ष-विषाद मानीत नाहीं. त्यामुळें मी त्या दोन्ही प्रसंगीं मनांत शांत असतों. पण जणुंकाय वारंवार हृष्ट होत आहें, असें दाखवितों. कांहीं केल्यानें मला कांहीं फल मिळत नाहीं व न केल्यानें माझी कांहीं हानि नाहीं. मी पूर्वीं जसा व्यवहारांत स्थित होतों तसाच यापुढेंहि राहीन व व्यवहारामुळें प्राप्त होणाऱ्या संतापानेंहि संतप्त होणार नाहीं. तुमच्या वचनानें

जसा विश्रांतीचा उपाय मला सांपडला, तसला दुसरा उपाय किंवा दुसरी दृष्टि कोणती असणार ? अहो, अपरिच्छिन्न विश्रांतिसुखभूमि मला प्राप्त झाली! अरे अरे, प्राण्यांना अशी जन्ममरणादि अनन्त अनर्थांनीं भरलेली दशा भोगावी लागतेना ? आतां मला दुःखाचें एकहि निमित्त उरलेलें नाहीं. कारण माझा कोणी शत्रु नाहीं, कोणी मित्र नाहीं. माझें शरीर किंवा क्षेत्रहि नाहीं. मला कोणी दुर्जन दिसत नाहींत, सर्व सुजनच दिसतात. ही स्वात्मचित् जोंवर दुर्बोध होती तोंवरच दुःख देणारें जगत् होतें. आतां जगाचा बाध झाल्यामुळें ती शांत व सर्वांगसुंदर झाली आहे. भगवन्! आपल्या अनुग्रहावांचून मनुष्य ही दृष्टि कशी जाणणार ? सेतु किंवा नौका यांवांचून बालक समुद्राचें उल्लंघन कसें करील ?

**लक्ष्मण**:—अनेक जन्मांतील संचित दुर्वासनांच्या योगानें सहज उत्पन्न होणाऱ्या संशयांचा उच्छेद करणाऱ्या अनेक जन्मांत संपादन केलेल्या असंख्य पुण्यांना फलोन्मुख करणाऱ्या अशा मुनिवचनकृत बोधानें ज्यांत विचारोद्योग उत्पन्न झाला आहे अशा माझ्या मनांत आज चंद्राप्रमाणें परम आल्हाद देणारा परमात्मप्रकाश उत्पन्न झाला आहे. अशी निरतिशय आनंदप्रकाशरूप आत्मदृष्टि तुमच्यासारख्या महानुभावांच्या उपदेशानें साक्षात् दिसत असतांनाहि लोक आपल्याच सुप्रसिद्ध दुर्भाग्यानें महत्सेवा, शुश्रूषा इत्यादिकांनीं हीन होऊन राग-द्वेष-अहंकार-जन्म-मरणादि सहस्र दोषांनीं काष्ठाप्रमाणें अहोरात्र जळत असतात, हें मोठें आश्चर्य आहे !

**विश्वामित्र**:—अहाहा! केवढी आनंदाची गोष्ट आहे! आम्हीं मुनीच्या मुखानें ज्ञान ऐकलें व त्यामुळें सहस्र गंगास्नानें केल्याप्रमाणें आल्हादयुक्त होऊन राहिलों आहों !

**श्रीराम**:—संपत्तीच्या उत्कर्षाचा परमावधि आत्मा आहे. कारण तो निरतिशय आनंदरूप आहे. दृष्टीचा परमावधि आत्मदृष्टि आहे. कारण एक आत्मविज्ञानानेंच सर्व विज्ञान होतें. शास्त्राचा सीमान्त अध्यात्मशास्त्र आहे. कारण तें शेवटचें प्रमाण आहे. पशु-पुत्र-धनादिनाशरूप आपत्तींचा सीमान्त सर्व संसाराचा उच्छेद आहे, कारण त्यानंतर दुसरा कोणताहि नाश अवशिष्ट रहात नाहीं. काव्यरसालंकारादि सुंदर वाणीचा सीमान्त वसिष्ठोक्ति आहे. सुखविश्रांतिहेतुभूत प्रासाद, आराम, पर्वत, नदीपुलिनादि देशांचा परमावधि परमात्मप्रदेश आहे. कारण तो परमविश्रांतीचें कारण आहे किंवा या सर्वांचाहि श्रेष्ठ सीमान्त परमात्मा आहे व तो आज मीं पाहिला !

**नारद**:—मीं जें ब्रह्मलोकीं ऐकलें नाहीं, स्वर्गांत किंवा भूलोकींहि ऐकलें नाहीं तें ज्ञान आज ऐकून माझे कान पवित्र झाले आहेत !

**लक्ष्मण**:—हे मुने! खरोखर हृदयांतील व बाहेरील अज्ञान घालविणाऱ्या तुम्ही आपलें परमसूर्यत्व आमच्या प्रत्ययास आणून दिलेंत !

**शत्रुघ्न**:—मी अगदीं तृप्त झालों आहें; अत्यंत शान्त झालों आहें; परमपदाला प्राप्त झालों आहें; मी नित्य परिपूर्ण झालों आहें व आतां केवळ सुखानें स्थित आहें.

**दशरथ**:—अनेक जन्मीं संपादन केलेल्या पुण्यानें या धीर मुनीश्वरानें आम्हांला तें ज्ञान सांगितलें, कीं ज्याच्या योगानें आम्ही पावन झालों आहों.

**श्रीवाल्मीकि**:—राजासह ते सर्व सभ्य असें बोलत असतां वसिष्ठ आपल्या ज्ञानानें पावन झालेल्या वाणीनें असें बोलले—"हे राजन् रघुकुलांतील श्रेष्ठ ! आतां मी जें सांगत आहें

तें कर. इतिहासकथेच्या शेवटीं ब्राम्हणांची पूजा करावी, असें आहे. यास्तव तूं आज ब्राह्मणसमूहाचें सर्व कामनांनीं पूजन कर. त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण कर. ह्मणजे तुला वेदार्थाच्या उत्तम अनुष्ठानाचें पूर्ण व शाश्वत फल प्राप्त होईल. मोक्षोपायाचें कथाश्रवण समाप्त झाल्यावर एखाद्या दरिद्री पुरुषानेंहि यथाशक्ति ब्राह्मणपूजन करावें असें आहे; मग तुझ्यासारख्या सार्वभौम राजानें तर तें अवश्य केलें पाहिजे. हें मुनींचें वचन ऐकून राजानें दूत पाठवून मथुरा, सौराष्ट्र, गौड इत्यादि देशांत जे द्विज रहात होते त्यांच्या श्रेष्ठ कुलांतून वेदपारंगत दहा सहस्र ब्राह्मण बोलाविले. त्या सर्व ब्राह्मणांची त्यानें पूजा केली. ज्यांचें ज्ञान अधिकाहून अधिक आहे अशा ब्राम्हणांपासून सर्वांस भोजन देण्यास त्यानें आरंभ केला, व दहा सहस्र ब्राह्मणभोजन घातलें. त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांस अन्न, दान व दक्षिणा दिली. याप्रमाणें त्या ब्राम्हणांची पूजा करून, पितर व देव यांचीं श्राद्धें व इष्टि यांच्या योगानें संतर्पण करून, राजांचा यान रत्नादिकांनीं सत्कार करून, नगरवासी जन व अमात्य यांस आहेर देऊन, भृत्यांना पारितोषिकें अर्पण करून, दीन, अंध, दरिद्री यांस वस्त्रादि देऊन ज्याला संसाराचा सीमांत ह्म० परमात्मा प्राप्त झाला आहे असा राजा दशरथ त्या दिवशीं सुहृज्जनांसह आपल्या राजगृहांत मोठा उत्सव करिता झाला. त्याचप्रमाणें त्याच दिवशीं सर्व नगरभर रेशमी पताका उभारून तें रत्नें व सुवर्ण यांनीं भूषित केलें होतें. त्यामुळें तें मेरुपर्वतासारखें सुंदर दिसत होतें. घरोघर विलासिनी स्त्रिया हृष्ट होऊन नाचूं लागल्या. मुरल्या, झांजा, वीणा, मृदंग, ढोल वगैरे वाद्यें वाजूं लागलीं. तांडवनृत्य करितांना त्या मोठा ध्वनि करूं लागल्या. त्यांनीं आपापले केंस वगैरे परस्परांहून अगदीं विलक्षण रीतीनें बांधले व त्यांची विचित्र रचना केली. त्या नर्तकींनीं इतस्ततः हालविलेल्या व विविध अभिनयरूप व्यवहार करणाऱ्या हातांच्या भ्रमणांनीं जणुं काय आकाशरूप वस्त्र सभोंवार पल्लवितच केलें होतें. हास्यरसाचा अभिनय करतांना आपल्या मुग्ध अट्टहासांनीं त्या आपल्या दन्तेंदूंच्या किरणच्छटा सभोंवार पसरीत होत्या. त्या वीररसाचा अभिनय करीत असतांना मदानें आकुलित असा हुंकार करीत होत्या. करुणा, अद्भुत इत्यादि रसांच्या अभिनयप्रसंगीं तत्सदृश लीला करीत असतांना ज्यांचा स्वर तरल झाला आहे अशा त्या शृंगार-मान इत्यादि अभिनय करितांना एक पादतलाच्या आघातानें भूमीला ताडन करीत होत्या. शृंगार-कोप इत्यादि अभिनयांचे वेळीं पुष्पमाला जोरानें हालवून गळणाऱ्या नक्षत्रांप्रमाणें पुष्पांची वृष्टि करीत होत्या, हार तोडून टाकीत होत्या. पण दैवयोगानें त्यांवर पाय पडल्यास त्या एकदम तो उचलून घेत होत्या. आपल्या चंचल अलंकारांनीं कामास साक्षात् प्रकट करणाऱ्या त्या कृत्रिम आकारांनीं यथेच्छ नाचल्या. ब्राह्मण वेदस्तवगीतें वगैरे ह्मणूं लागले. भाट राजाची स्तुति करूं लागले. स्त्रियाहि राजाचें यश गाऊं लागल्या. त्यांत जे अब्राह्मण होते त्यांनीं मध्वासव प्राशन केलें व ते मदानें देहभान विसरले. भोजनार्थी ब्राह्मणादिकांनीं नानाप्रकारचें चतुर्विध अन्न भक्षण केलें. घराच्या भिंतींना सुधालेप दिला व त्या रंगविल्या. त्यामुळें राम व लक्ष्मण यांच्या देहप्रभारूप चांदण्यानें व पुष्प-धूप-विलेपनांच्यायोगानें त्या गृहभित्ति फारच शोभल्या. उत्तम विचित्र वस्त्रें नेसून, उत्तम पुष्पमालांनीं विभूषित होऊन राजगृहांतील परिचारक व परिचारिका राजाच्या उत्सवयज्ञांत इतस्ततः फिरूं लागल्या. कापूर, अगरु, कस्तूरी व कंकोळ समभाग

घालून उगाळलेलें जें चंदन त्याला यक्षपंक म्हणतात. त्याचा अंगाला लेप करून म्हणजे उटी लावून तांडवनृत्य करणाऱ्या स्त्रिया भूषित केलेल्या राजसभांगणांत गेल्या. सारांश, राजा दशरथ अक्षय ब्रह्मपदास प्राप्त होऊन संसाररूप कृष्णपक्षरात्रीचा बोधसूर्याच्या उदयानें नाश केल्यामुळें मोठ्या हर्षानें असा दान-भोगशोभेनें युक्त असा महोत्सव सात दिवस करता झाला. २१४.

## सर्ग २१५ वा.

१ रामादिकांप्रमाणें तूंही प्रबुद्ध, जीवन्मुक्त व २ सुखी होऊन रहा, असा वाल्मीकींनें आपला शिष्य भारद्वाज याला उपदेश केला.

श्रीवाल्मीकिः—माझ्या शिष्यांतील नायक अशा हे महाबुद्धिमान् भारद्वाजा! याप्रमाणें रामादिक ज्ञेयास साक्षात् जाणून निःशोकत्वास प्राप्त झाले. याच रमणीय दृष्टीचा आश्रय करून तूं विरक्त, निःशंक, जीवन्मुक्त-व शांतचित्त होऊन सुखानें रहा आणि मी उपदेशिलेल्या ज्ञानाचें रक्षण कर. दुःसंगानें किंवा भोगाभ्यासानें त्याला नष्ट करूं नको. हे निष्पापा! रामादिकांच्या बुद्धीप्रमाणें जिनें आसक्ति ठेवलेली नाहीं अशी बुद्धि घनमोहांत जरी निमग्न झाली व ती विमूढ जरी झाली तरी सर्वथा मोहांत पडत नाहीं. याप्रमाणें ते सर्व महाधीर राघवादि राजपुत्र, व दशरथादि राजे जीवन्मुक्तपदाला प्राप्त झाले. हे पुत्रा भरद्वाजा! तूंही आज ही मोक्षसंहिता ऐकून खरोखर स्वतःच मुक्तबुद्धि झाला आहेस. तूं मुक्ततर आहेस. एखादा बालकहि हे प्रत्यक्ष अनुभव देणारे पुण्यकारक मोक्षोपाय ऐकून तज्ज्ञ होईल, मग तुझ्यासारख्या उत्तम अधिकाऱ्याची काय गोष्ट सांगावी? साधो! वसिष्ठवाक्यांचा हृदयांत प्रसार होऊन सर्व संशयांसह अज्ञानाचा नाश झाल्यामुळें महानुभाव रामादिक जसे जीवन्मुक्तपदास प्राप्त होत्साते शोकरहित झाले त्याप्रमाणें हे साधो! तूंहि आद्य नित्यसिद्ध ब्रह्मभावरूप जीवन्मुक्तपदास प्राप्त हो व शोकाचा त्याग कर. संतांच्या शिक्षणानें लोभ, आलस्य, निद्रा, इत्यादिकांचे त्यागासह सप्रेम निरंतर सेवेनें, बोधोपायभूत उदार कथांनीं, प्रश्नांनीं व त्यांच्या उपदेशानें, नित्य अप्रमत्त असलेले अधिकारी वेद्याला जाणतात. वसिष्ठाच्या संगतीनें रामादिकांना जसें तत्त्वज्ञान झालें, तसेंच त्यांना होतें. तृष्णारूप चर्मरज्जूनें दृढ बंधांनीं बांधलेल्या व अज्ञांच्या हृदयांत अत्यंत रूढ झालेल्या ज्या देहेंद्रियादितादात्म्यसंसर्गाध्यासरूप ग्रंथि व गृह-पुत्र-दारा इत्यादिकांवरील ममताभिनिवेशरूप व रागद्वेषादिकांना कारण होणाऱ्या ग्रंथि त्या सर्व मोक्षकथांचा विचार केल्यानें सर्व भूतांमध्यें एकरसत्वास प्राप्त होतात. जशा लहान मुली पूर्वी क्रीडादिकांत आसक्त असल्यामुळें व रसानभिज्ञ असल्यामुळें भर्त्याविषयीं विरक्त असल्या तरी पुढें त्याच प्रौढ स्त्रिया झाल्यावर भर्त्याशीं अभेदास प्राप्त होतात, तशाच पूर्वोक्त ग्रंथि ज्ञानानें अभेदास प्राप्त होतात. हे पुत्रा! जे तत्त्ववेत्त्यांतील श्रेष्ठ-जन अत्यंत समर्थ असे मोक्षाचे उपाय श्रवणादिकांच्या द्वारा जाणतील, ते पुनः या संसारास प्राप्त होणार नाहींत, हें मी तुला रहस्य सांगितलें आहे. उगीच पुष्कळ बोलून काय करावयाचें आहे! जे संत बहुश्रुत गुरूंच्या पुढें या माझ्या ग्रंथाचा चांगला विचार करून संवादकथेनें त्याचा अर्थ निश्चित झाला असतां तो स्वतःहि शुश्रूषुजनाला संप्रदायपूर्वक सांगतात ते पुनर्जन्माला प्राप्त होत नाहींत. त्यांच्या ठिकाणीं पुनः अज्ञानहि संभवत नाहीं. त्यांना तत्त्वज्ञानाचें फल अवश्य

प्राप्त होतें. संप्रदायपूर्वक प्राप्त न झालेलीं वाक्यें कितीहि जरी श्रवण केलीं किंवा तीं दुसऱ्यांना ऐकविलीं तरी त्यांचा काय उपयोग ! व्युत्पत्तीच्या अभावीं अर्थ न जाणतांहि जे या ग्रंथाचा नुस्ता पाठ करितात किंवा पारायण, दक्षिणा, द्रव्य इत्यादिकांचा लोभ न धरितां पुस्तक लिहवितात अथवा जे दुसऱ्या कोणाला वाचक करून हा ग्रंथ पुष्कळांना शुभ आर्यदेशांत ऐकवितात ते सकाम असले तर राजसूय यज्ञाच्या फलानें युक्त होऊन पुनः पुनः स्वर्गाला प्राप्त होतात. पण जे पुण्यवान् निष्काम असतात ते उत्तम जन्म, सद्गुरु, सच्छास्त्रश्रवण इत्यादिकांस प्राप्त होऊन लक्ष्मीप्रमाणें तृतीय जन्मलाभानें मोक्षाला जातात. पूर्वीं अचिंत्यरूप ब्रम्हदेव मुनींच्या समाजांत मीं केलेल्या या मोक्षमय संहितेचें आमूलाग्र अवलोकन करून व आपल्याशींच चांगला विचार करून सर्वांना असें म्हणाला—" सत्यवाक् वाल्मीकींच्या, वसिष्ठाच्या व माझ्या वाणी असत्य होणार नाहींत." या मोक्षोपायभूत कथाप्रबंधाची समाप्ति झाली असतां बुद्धिमानानें मोठ्या प्रयत्नानें वाचकादि ब्राम्हणांना उत्तम गृह, अन्न, पान, धन इत्यादि द्यावें व त्यांची पूजा करावी. ब्राम्हणांप्रमाणेंच मित्र, भृत्य, दीन, अंध, कृपण इत्यादिकानांहि अन्नाच्छादनादिक द्यावें. आपल्या धनांतील त्यांना जें कांहीं इष्ट असेल त्याची यथाशक्ति दक्षिणा द्यावी. आपण केलेलें कर्म पुण्यफलरूपानें यथाशास्त्र प्राप्त होतें, हें जाणून कर्त्यानें तें करावें. हे भरद्वाजा ! तुझ्या बुद्धीला बोध व्हावा म्हणून शेंकडों कथाक्रमांनीं वाढविलेलें ब्रम्हतत्व—दृष्टान्तयुक्तींनीं युक्त असलेलें हें शास्त्र मीं तुला सांगितलें. हें ऐकून जिवंत असतांनाच ज्याचें चित्त मुक्त झालें आहे असा होऊन लोकांवर अनुग्रह करण्यासाठीं ज्ञान-तपःक्रियाफलयुक्त प्रारब्धभोगसत्कर्मफलभूत योगज्ञानसिद्ध्यैश्वर्यलक्ष्मीचा अक्षय भोग घेऊन सदेह व विदेह दशेंत नित्य निरतिशय आनंदरूप मुक्तीचा पूर्ण अनुभव घे. २१५.

---

## सर्ग २१६ वा.

१ अरिष्टनेमि, सुरुचि, कारुण्य इत्यादिकांची कृतार्थता व २ शिष्यांनीं गुरूला केलेलें आत्मनिवेदन, यांचें वर्णन.

**श्रीवाल्मीकिः**—हे अरिष्टनेमि राजा ! मीं तुला हें अगस्त्य व वसिष्ट यांचें सुतीक्ष्ण व राम यांस उद्देशून केलेलें सुभाषित सांगितलें. या ग्रंथरूपी तत्त्वमार्गानें तूं त्या पदास निश्चयानें प्राप्त होशील.

**राजाः**—भगवन् ! आपली दृष्टि भवबंधाचा विनाश करणारी आहे. त्या आपल्याकडून कृपावलोकन केला गेलेला मी भवसागरांतून उत्तीर्ण झालों आहें.

**श्रीदेवदूतः**—असें बोलून, ज्याचे नेत्र विस्मयानें प्रफुल्लित झाले आहेत असा तो राजा नम्र व मधुर वाणीनें मला असें वचन बोलला.

**राजाः**—हे देवदूता ! तुला नमस्कार असो. हे विभो ! तुझें कुशल असो. सात पावलें एकमेकांबरोबर चाललें असतां संतांची मैत्री होते, हें म्हणणें तूं आज सत्य केलेंस. आतां तूं देवराज इंद्राच्या भवनास जा. तुझें कल्याण होवो. या श्रवणानें मी सुखी झालों. मला अतिशय आनंदहि झाला. आतां श्रुत अर्थाचें चिंतन करीत येथेंच निर्विक्षेप अवस्थेंत राहीन. हे कल्याणि ! असें बोलला गेलेला मी परम विस्मयास प्राप्त झालों. पूर्वीं कधींहि न ऐकलेलें, अपूर्व असेंच हें ज्ञानसार सत्संगामुळें मीं ऐकलें. त्यामुळेंच मी आतां अमृतप्राशन केल्याप्रमाणें अन्तःकरणांत आनंदित झालों

त्यानंतर वाल्मीकि मुनींनीं विचारून मी तुजपाशीं आलों आहें. हे निष्पापे! तूं जें मला विचारलें होतेंस तें हें सर्व मीं तुला कथन केलें. आतां मी इंद्राच्या अमरावतीस जातों.

**अप्सरा**:—हे महाभागा देवदूता! तुला माझा नमस्कार असो. तूं सांगितलेल्या या पुरुषार्थविज्ञानामुळें मी अत्यंत सुखविश्रांतीस प्राप्त झालें आहें. मी कृतार्थ व शोकरहित झालें आहें. मी विगतज्वर होऊन राहीन. आतां आपल्या इच्छेप्रमाणें तूं इंद्राच्या सांनिध्यांत जा; तुझें कल्याण होवो.

**आग्निवेश्य**:—त्यानंतर ती श्रेष्ठ सुरुचि अप्सरा त्याच शास्त्रार्थाचें चिंतन करूं लागली. गंधमादनपर्वतावर हिमालयाच्या पृष्ठभागीं ती राहिली. हे पुत्रा! हा वसिष्ठाचा उपदेश तूं ऐकलास का? त्या सर्वांचा चांगला निश्चय करून जशी तुझी इच्छा असेल तसें कर.

**कारुण्य**:—भगवन्! अतीत, अनागत व असंनिकृष्ट विषयाविषयीं स्मृति, परोक्षबुद्धि व वाग्व्यवहार आणि वर्तमान विषयाविषयीं दृष्टिसत्ता व प्रत्यक्षता, हें मला तत्त्वज्ञानामुळें सांप्रतकाळीं स्वप्नासारखें वाटूं लागलें आहे. त्यामुळें वंध्यापुत्राविषयीं स्मरण, वाग्व्यवहार वगैरे जे निर्विषय त्याप्रमाणेंच हे सर्व निर्विषय झाले आहेत. सर्व संसारस्थिति मरुप्रदेशांतील मृगजळाप्रमाणें झाली आहे. आतां मला कोणत्याहि प्रकारचा संदेह उरलेला नाहीं. माझ्या कृतकर्माचा कांहीं उपयोग नाहीं व अकृतकर्माचाहि उपयोग नाहीं. यास्तव मी आतां रामादिकांप्रमाणेंच यथाप्राप्त वर्णाश्रमोचित व्यवहारानेंच राहीन. बलात्कारानें कर्मत्याग करण्याचा आग्रह कशाला?

**अगस्ति**:— असें बोलून अग्निवेश्याचा कृतकृत्य पुत्र कारुण्य विवाहानें कर्माधिकार प्राप्त करून घेऊन यथोचित कालीं स्नान, दान, अग्निहोत्र, अतिथिपूजन इत्यादिं कर्म यथाशास्त्र करूं लागला. सुतीक्ष्णा! या ज्ञानकर्माविषयीं संशय धरूं नये. कारण पुरुष संशयामुळें स्वार्थापासून भ्रंश पावतो. संशयचित्त पुरुष विनाश पावतो. संशयादि अनेक सांसारिक विषयांचें पारमार्थिक ब्रह्मतत्त्वरूपानें सर्वविरोधरहित ऐक्यबोध करणारें हें मुनिवचन ऐकून व गुरूला नमस्कार करून त्याच्या समीप विनयानें युक्त होऊन राहिलेला तो सुतीक्ष्ण असें म्हणाला.

**सुतीक्ष्ण**:—माझें अज्ञान व अज्ञानकार्य नष्ट झालें आहे. उत्तम ज्ञान मला प्राप्त झालें आहे. सर्वसाक्षी निष्क्रिय परमात्मा नित्य स्वयंप्रकाशमान होत असतां नाटकगृहांतील दीपांच्या प्रकाशानें होणाऱ्या नरांच्या नृत्यादि क्रियांप्रमाणें चित्ताच्या स्पंदरूप सर्व क्रिया प्रवृत्त होतात. ज्याप्रमाणें सुवर्णापासून कडें, बाहुभूषण वगैरे अलंकार किंवा जलापासून तरंग उद्भवतात, त्याप्रमाणें ज्याच्यापासून हें सर्व दृश्य उद्भवतें, तें हें सर्व पूर्ण जगत् असून तें पूर्णांत राहिलें आहे. मी आतां प्रारब्धप्राप्त अवस्थेंत तिचेंच अनुवर्तन करीत राहतों. सद्वचनाचें उल्लंघन कोण करील! भगवन्! आपल्या प्रसादानें मी ज्ञानी झालों आहें, मला सर्व ज्ञेय ज्ञात झालें आहे. मी कृतार्थ आहें. तुला नमस्कार असो. मी भूमीवर दंडाप्रमाणें पडलों आहें. शारीर, मानसिक, किंवा वाचिक कोणत्याच कर्मानें गुरूंच्या उपकाराची फेड होऊं शकत नाहीं. तस्मात्, शिष्यांनीं आत्मनिवेदन करावें. आत्मनिवेदन करणें हीच गुरूची उत्तीर्णता आहे. दुसऱ्या कोणत्याहि कर्मानें उत्तीर्ण होतां येत नाहीं. स्वामिन्! आपल्या प्रसादानें मी संसारसागरांतून उत्तीर्ण झालों आहें. पूर्णानंदभावानें

सर्व जगज्जाल भरून सोडलें आहे. मी आतां निःसंदेह होऊन राहिलों आहें. जें ब्रह्म सामवेदांत—' सर्वं खलु इदं ब्रह्म तज्जलान् इति शान्त उपासीत ' या वचनानें अधिकाऱ्यांना करतलस्थ आमलकवत् साक्षात् स्पष्टपणें सांगितलें जातें, त्या ब्रह्मभावानें अवशिष्ट राहिलेल्या आत्म्याला प्रत्यक्चिद्घनानंदाला नमस्कार असो. साक्षात् ब्रह्मानंद, परम-सुखद, केवळ ज्ञान-मूर्ति, द्वंद्वातीत, आकाशसदृश, तत्त्वमस्यादि महावाक्यांचें लक्ष्य, एक, नित्य, विमल, अचल, सर्वबुद्धिवृत्तिसाक्षी, भावातीत व त्रिगुणरहित श्रीवसिष्ठाला मी नमस्कार करितों. २१९.

---

# योगवासिष्ठ भाग ३ रा समाप्त.

श्रीकृष्णार्पणमस्तु.

*